# महाराष्ट्रीय ज्ञानकोश.

## प्रस्तावनाखंड.

विभाग दुसरा.

### वेदविद्या.

हा ग्रंथ

श्रीधर व्यंकटेश केतकर, एम्. ए., पीएच्. डी.

यांनीं

मंडळांतील अनेक साहाय्यकांच्या मदतीनें तयार केला.



१९२१

मुद्रक—रामचंद्र येसु शेडगे, निर्णयसागर प्रेस, २३ कोलभाट लेन, मुंबई.

प्रकाशक—महाराष्ट्रीय ज्ञानकोशमंडळ लिमिटेड नागपूर, तर्फे श्रीधर व्यंकटेश केतकर,

४८१ शनिवार पेठ, पुणें.

## ग्रंथालोक.





### ( वेदाभ्यासप्रवर्तकांचीं चित्रें. )

१ दयानंद सरस्वती, २ राजाराम रामकृष्ण भागवत, ३ शंकर पांडुरंग पंडित, ४ बाळ गंगाधर टिळक, ५ विष्णुबावा ब्रह्मचारी, ६ रमेशचन्द्र दत्त, ७ डॉक्टर थिबो, ८ शंकर बाळकृष्ण दीक्षित, ९ महादेव मोरेश्वर कुंटे, १० ईश्वरचंद्र विद्यासागर, ११ राजेंद्रलाल मित्र, १२ महादेव चिमणाजी आपटे, १३ जावजी दादाजी, १४ मॅक्स मुल्लर, १५ काशिनाथ त्रिंबक तेलंग, १६ डॉ. भाऊ दाजी.




# प्रस्तावनाखंड.

## विभाग दुसरा–वेदविद्या.

### ग्रंथप्रवेश.

सर्व विद्यांचा उगम वेद होत हें विधान इतकें खरें व सर्वमान्य आहे कीं त्यावर अधिक लिहिणें नकोच.

कुरुयुद्धाच्या सुमारास जेव्हां सर्व ज्ञानाचें एकीकरण करण्याचा निकराचा प्रयत्न झाला, तेव्हां यज्ञसंस्थेस साहाय्यक अशा सर्व प्रकारच्या ऋत्विजांच्या ज्ञानाचें एकीकरण झालें आणि वेदचतुष्टयाचें अर्वाचीन स्वरूप निर्माण झालें. त्या सुमारास कांहीं प्राचीन ज्ञान इतिहासपुराणें या नांवानें अस्तित्वांत होतें, तें वेदचतुष्टयाबाहेर राहिलें व पुढें स्वतंत्रपणें वाढत गेलें. वैदिक वाङ्मयाचा इतिहास लिहिणें म्हणजे अत्यंत प्राचीन ज्ञानकोशकारांच्या प्रयत्नाचें स्पष्टीकरण करणें होय.

संहिताकार वैदिक वाङ्मय जमा करूं लागले तेव्हां त्याचा अनेक तऱ्हांनीं अभ्यास सुरू झाला. प्राचीन वेदाभ्यास करणाऱ्यांचे प्रयत्न अनेक दिशांनीं झाले आहेत. संहितापाठ, पदपाठ, ब्राह्मणें, आरण्यकें, उपनिषदें व शिक्षाकल्पादि षडंगें हीं व त्याप्रमाणेंच बृहद्देवता, सर्वानुक्रमणी, प्रातिशाख्य, निरुक्त यांसारखे ग्रंथ प्राचीन अभ्यासाचें फल होत. वैदिक ग्रंथ पाठ करणें, वैदिक ग्रंथानुषंगानें जीं शास्त्रें तयार होत असत तीं शिकणें, वेदग्रंथांचा क्रियांकरितां उपयोग व तसाच वेदग्रंथांचा अर्थ हीं समजून घेणें, ही वेदाभ्यासाची प्राचीन पद्धति होय. प्राचीन पद्धतीनें एकच प्रकारचे लोक तयार होत नसत. कोणी श्रौती होई तर कोणी शास्त्री होई. दोन्ही वर्गांस एकमेकांची गरज होती.

वेदाभ्यासास महत्त्व यज्ञसंस्थेनें उत्पन्न केलें. यज्ञसंस्थेच्या दौर्बल्याबरोबर वेदाभ्यासासहि दौर्बल्य उत्पन्न झालें. आज वेदाभ्यासास जें महत्त्व आहे तें वेद प्राचीन इतिहासाचें साधन होत म्हणून आहे. यज्ञसंस्थेनें आपलें कार्य जें वेदसंरक्षण तें आतांपर्यंत केलें. यज्ञसंस्था ऐतिहासिक पंडितांच्या हातीं आज आपलें धन देत आहे. हें धन घेतांना घ्यावयाच्या द्रव्याची मोजदाद करणें अवश्य आहे, व मिळवत्यानें प्रत्येक चीज कोणत्या उपयोगासाठीं मिळविली हें जाणणेंहि अवश्य आहे. यासाठीं वेदाभ्यास आपणांस यज्ञसंस्थेच्या अभ्यासाबरोबर केला पाहिजे.

वेदविद्येवर लिहितांना यज्ञसंस्थेवर व तदंतर्गत ऋत्विजांच्या विशिष्टीकरणावर व यज्ञावयवविकासावर जें पुष्कळ विवेचन केलें आहे त्याचें प्रयोजन ग्रंथ वाचतांना स्पष्ट होईल. यज्ञसंस्था वाढूं लागली, ऋत्विजांनां आपलें काम सजवावें लागलें त्यामुळें वाङ्मय जमा झालें; आणि त्यामुळें पुढें शास्त्रें तयार झालीं, आणि भारतीय ज्ञानसंवर्धनास व अंशरूपानें जगाच्या ज्ञानसंचयास खरा प्रारंभ झाला. ज्ञानेतिहास या दृष्टीनें व भारतीय समाजाच्या इतिहासाच्या दृष्टीनें या भागांत आलेल्या, प्रसंगीं कंटाळवाण्या वाटणाऱ्या, माहितीस महत्त्व आहे.

प्रस्तावनाखंडाच्या पहिल्या भागांत हिंदुस्थानाच्या इतिहासाचे विभाग भाषेस असलेल्या महत्त्वाच्या किंवा तीस कमी अगर अधिक झालेल्या विकारांच्या दृष्टीनें पहावे हें तत्त्व सांगितलें आहे, व मूलगृहकाल म्हणजे यूरोपीय व भारतीय यांच्या सामान्य पूर्वजांचा भाषादृष्टीनें ठरविलेला काल, पर्शुभारतीयकाल म्हणजे इराणांतील व हिंदुस्थानांतील लोकांच्या सामान्य पूर्वजांचा काल व वेदकाल असे तीन प्राचीन काल उल्लेखिलेले आहेत. यांपैकीं तिसऱ्या कालावर जितका प्रकाश अधिक पाडतां येईल तितका पाडून मग वाचकाचा प्रवेश मूलगृहकालांत व पर्शुभारतीय कालांत करून द्यावयाचा ही सामान्य ग्रंथयोजना आहे, व यामुळें दुसऱ्या भागांत वेद, ब्राह्मणें, आरण्यकें व उपनिषदें यांचें स्थूल वर्णन व या वाङ्मयाच्या उत्पत्तीस व रक्षणास कारण झालेली यज्ञसंस्था व यज्ञसंस्थेच्या अनुषंगानें दैवतेतिहास एवढाच मजकूर आलेला आहे. यज्ञसंस्था स्पष्ट करतांना श्रौतसूत्रांकडेहि लक्ष दिलेलें आहे. तसेंच यज्ञसंस्थेच्या इतिहासावर प्रकाश पाडण्यासाठीं कृष्णयजुर्वेद व अथर्ववेद यांतील अध्वर्यू व अथर्व यांस सामान्य असलेलें वाङ्मय शोधून एका परिशिष्टांत घातलें आहे. तसेंच ज्या कालामध्यें शाकलसंहितेव्यतिरिक्त दुसरी एक संहिता होती त्या कालाची माहिती भावी संशोधकास व्हावी या हेतूनें शाकलसंहिता, ऐतरेय ब्राह्मण, आश्वलायन श्रौतसूत्र, कौषीतकी ब्राह्मण व शांखायन श्रौतसूत्र यांचा तौलनिक अभ्यास दिलेला आहे. तौलनिक अभ्यासानंतर ऐतिहासिक ज्ञानाची निष्पत्ति व्हावयाची. ऐतिहासिक निर्णय काय काढावयाचे हें भावी संशोधकांचें काम आहे.

त्यांच्या अभ्यासास प्रारंभ म्हणून आमचीं हीं कोष्टकें उपयोगीं पडतील. अथर्ववेद व आश्वलायन गृह्यसूत्र यांचेंहि एक कोष्टक दिलें आहे. श्रौतविद्या म्हणजे तीन अग्नींवरील कर्मासंबंधाची विद्या याला अथर्ववेद हा बराच अपवाद आहे त्याचें गृह्याशीं नातें त्या कोष्टकावरून दिसून येईल.

वैदिक वाङ्मयाचा ऐतिहासिक दृष्टीनें अभ्यास करणारे संशोधक बहुतेक पाश्चात्त्यच आहेत. वेदांचे अर्वाचीन दृष्टीचे भारतीय अभ्यासक म्हटले म्हणजे राजेंद्रलाल मित्र, शंकर पाण्डुरंग पंडित, राजाराम रामकृष्ण भागवत, बाळ गंगाधर टिळक व महादेव मोरेश्वर कुंटे हे होत. हे सर्व संस्कृत पंडित आज गतकालीन झाले आहेत. सध्यांच्या संस्कृत पंडितांपैकीं डॉ० भांडारकरांचा परिश्रम वेदोत्तर कालावर आहे, व रा. ब. चिंतामणराव वैद्य हे देखील वेदोत्तरकालीन वाङ्मयाचाच अभ्यास करीत आहेत. रा. रा. विश्वनाथ काशिनाथ राजवाडे यांनीं अलीकडे संस्कृत भाषेच्या ऐतिहासिक अभ्यासाकडे लक्ष दिलें असून त्यामुळें ते वेदावर परिश्रम करीत आहेत.

येथील व पश्चिमेकडील पंडितांचे अभ्यास प्रत्येक वर्गाच्या अडचणींमुळें अपूर्ण आहेत. पाश्चात्त्य अभ्यास तौलनिक स्वरूपाचा असल्यामुळें आणि पाश्चात्त्य पंडितांस लाटिन, ग्रीक इत्यादि भाषांचें ज्ञान सहजच असल्यामुळें त्यांनां तसला अभ्यास करण्यास कांहीं मदत झाली. आपल्याकडील संस्कृत पंडितांस पाश्चात्यांच्या प्राचीन भाषांचें ज्ञान नसल्यामुळें तौलनिक अभ्यासांत शिरतां आलें नाहीं. वैदिक वाङ्मयाचा भारतीय इतिहासाच्या दृष्टीनें अभ्यास करावयास यज्ञशास्त्राची माहिती उत्तम असावी लागते ती नसल्यामुळें पाश्चात्त्य संशोधक चांगलेसे यशस्वी झाले नाहींत. वैदिक अभ्यासास उपांगें फार आहेत. त्यांपैकीं बऱ्याचशा उपांगांची माहिती या आणि नंतरच्या भागांत येईलच. गेल्या पिढींत श्रौतविद्यायुक्त वेदाभ्यास करणारांमध्यें काशिनाथ वामन उर्फ भाऊशास्त्री लेले हे प्रमुख होत पण यांच्या अभ्यासाचें फल फारसें शिल्लक राहिलें नाहीं. ज्यांची माहिती फारशी देतां येणार नाहीं अशीं उपांगेंहि अनेक आहेत. उदाहरणार्थ, वैदिक व्याकरण घ्या. ऋग्वेदमंत्रांत आढळणारीं रूपें घेऊन त्यांत कालानुक्रम निघेल काय, निघाल्यास त्याच्या साहाय्यानें मंत्रभागाचा कालक्रम लावतां येईल काय, या प्रकारचा अभ्यास आर्नोल्ड व इतर पंडितांनीं केला आहे. ब्लूमफील्ड वेदांतील पुनरुक्त्यांचा अभ्यास करून त्यांच्यावरून काय इतिहासनिष्पत्ति होते हें पहात आहेत. या दोन्ही प्रकारच्या अभ्यासाचें महत्व दिसून येण्यापुरतें यांच्या परिश्रमास खास फल आलेलें आहे. तथापि या परिश्रमाच्या योगानें प्राचीन भाषेच्या व ग्रंथकर्तृत्वाच्या आपल्या ज्ञानांत आपलें पाऊल निश्चितपणें पुढें पडलें असें आज म्हणवत नाहीं.

वैदिक वाङ्मय आणि पौराणिक वाङ्मय यांचा ऐतिहासिक अभ्यास अजून थोडाबहुत पृथक् होतो. तो तसा इतःपर न व्हावा. वैदिक पांडित्य इतिहासपुराणांतील माहितीशिवाय दुर्बल आहे आणि इतिहासपुराणांचा अभ्यासहि वेदाभ्यासाशिवाय पंगु आहे. वैदिक वाङ्मय आणि पौराणिक कथांचा जन्म हा फारसा भिन्नकालीन नाहीं. एका वाङ्मयांत एका अत्यंत प्राचीन कालाची भाषा जर राहिली असली तर दुसऱ्या वाङ्मयांत तत्कालीन कथा राहिल्या आहेत.

वेदकालाचा अभ्यास आपणांकडून फार सूक्ष्म रीतीनें व्हावयास पाहिजे. जें वेदकालांत होतें व आज आहे तें चंद्रगुप्ताच्या कालीं होतें असें सिद्ध केल्यानें इतिहासज्ञान फारसें वाढत नाहीं. संस्कृतीच्या इतिहासासाठीं वैदिक वाङ्मय हें आधुनिक काल आणि अज्ञात काल यांतील एक महत्त्वाचा दुवा आहे. यासाठीं वेदवाक्यें व वैदिक शब्द यांचें पृथक्करण करून जी इतिहासज्ञाननिष्पत्ति करावयाची ती ज्ञानकोशमंडळानें बरीच केली आहे. तिचें फल पुढील भागांत दिलें जाईल. वेदाभ्यासोपयोगी ग्रंथांची माहितीहि पुढील भागांत दिली जाईल.

हा भाग तयार करतांना ज्ञानकोशमंडळांतील ज्या लेखकांचें साहाय्य झालें त्यांत विशेष निर्देश वे. शा. सं. धुंडिराज गणेश बापट व हौत्रवेत्ते वे. रा. चिंतामणभट्ट दातार यांचा केला पाहिजे. धुंडिराजदीक्षित यांनीं आजपर्यंत पंधरांहून अधिक यज्ञांत ऋत्विजाचें काम केलें आहे. श्रौतकर्मांत इतक्या अनुभवाचा मनुष्य महाराष्ट्रांतच काय पण इतरत्र देखील सांपडणें कठिण आहे. हौत्रवेत्ते दातार हे महाराष्ट्रांतील फारच थोड्या होत्यांपैकीं एक आहेत. हे दोघेहि जुन्या शिक्षणाचे असून म्हणजे शब्दाचें नित्यत्व पढले असून वेदांचा व श्रौतविद्येचा ऐतिहासिक दृष्टीनें अभ्यास करण्यांत व यज्ञसंस्थेचें स्वरूप प्रथमपासून संपादकास समजावून देण्यास आणि ऐतिहासिक विवेचनास साहाय्यक असे उतारे शोधून काढण्यांत यांनीं चांगलीच मेहनत केली. रा. रा. सर्वोत्तम वासुदेव देशपांडे यांचा ग्रंथसंक्षेप व त्यांचे मुद्रणशुद्धीकडे असलेलें तीव्र लक्ष यांनीं ग्रंथाची उपयुक्तता वाढविली आहे. भाषांतरें करणें, उतारे तपासणें, प्रुफें तपासणें इत्यादि कामामध्यें रा. रा. यशवंत रामकृष्ण दाते, रा. रा. पांडुरंग महादेव बापट, सौ. शीलवती केतकर, रा. चिंतामण गणेश कर्वे, रा. लक्ष्मण केशव भावे, रा. कृष्ण महादेव चिपळुणकर इत्यादि लेखकांचा परिश्रम विसरतां येण्याजोगा नाहीं.

श्रीधर व्यंकटेश केतकर.

## दयानंद सरस्वती.



वेदाच्या अभ्यासास समाजांत महत्त्व देण्यास जे लोक कारण झाले त्यांतील सर्वांत हे प्रमुख होत. वेदाच्या कांहीं भागाचें यांनीं हिंदींत भाषांतर केलें आहे. यांचा वेदार्थयत्न ऐतिहासिक दृष्टीचा नसून विशिष्टमतस्थापक आहे.

जन्म १८२४ मृत्यु १८८३

---

## राजाराम रामकृष्ण भागवत.



वैदिक समाजाची अर्वाचीन समाजाहून आचारांच्या बाबतींत भिन्नता यांनीं वारंवार महाराष्ट्रीयांच्या नजरेस आणली. यांनीं वैदिक वाङ्मयावर मराठींत जितकें लिहिलें तेवढें कोणत्याहि महाराष्ट्रीयानें आजपर्यंत लिहिलें नाहीं. वेदार्थयत्नकारांचें स्मारक म्हणून विस्तारांत आलेले यांचे लेख महत्त्वाचे आहेत. मानववंशशास्त्रीय प्रश्नांमध्यें रा. रा. वि. का. राजवाडे यांचेच अनुयायी आहेत.

जन्म १८५१ मृत्यु १९०८

## शंकर पांडुरंग पंडित.



यांनीं वेदार्थयत्न नांवाचें नियतकालिक काढून महाराष्ट्रास वेदपरिचय करून देण्यांत पुढाकार घेतला. अथर्ववेदाचें यांनीं संपादन केलें. जन्म १८४० मृत्यु १८९४

---

## बाळ गंगाधर टिळक.



यांनीं वेदकालनिर्णयार्थ ज्योतिषाचा उपयोग करण्यांत पुढाकार घेतला आणि आर्टिक कटिबंधांत वैदिक ऋषींचे पूर्वज असावेत असें सिद्ध करण्याचा प्रयत्न केला आहे.

जन्म १८५६ मृत्यु १९२०

## विष्णुबाबा ब्रह्मचारी.



१८६५ ते १८७१ या मुदतींत यांनीं मुंबईंत अनेक खिस्ती धर्मोपदेशकांशीं वाद केले. जवळ जवळ चोवीस वर्षे हे धर्मवाद व धर्मोपदेश करून वेदोक्त धर्माविषयींची लोकसमाजाची श्रद्धा शिथिल झालेली दृढ करण्याचा यत्न करीत होते. हे अत्यंत उत्तम वक्ते असून प्रतिपक्षाला निरुत्तर करण्यांत फार कुशल होते. वेदोक्तधर्मप्रकाश नांवाचा एक मोठा ग्रंथ यांनीं केला.

जन्म १८२५ मृत्यु १८७१

## डॉक्टर थिबो.



यांनीं मॅक्समुल्लर यांस ऋग्वेद तयार करून प्रसिद्ध करण्याच्या कामीं साह्य केलें. शुल्बसूत्रें, वेदांतसूत्रें, पंचसिद्धांतिका वगैरे कांहीं ग्रंथांचें यांनीं भाषांतर केलें. आर्यज्योतिष व मीमांसा यांवर व दुसऱ्या कित्येक भारतीय विषयांवर यांचे निबंध आहेत.

जन्म १८४८ मृत्यु १९१५

## रमेशचन्द्र दत्त.



यांनीं वेदांतील कांहीं भागाचें बंगालींत रूपांतर केलें.

जन्म १८४८ मृत्यु १९०९

## शंकर बाळकृष्ण दीक्षित.



यांचा भारतीय ज्योतिषशास्त्र हा ग्रंथ वेदाच्या अभ्यासास फार महत्त्वाचा आहे.

जन्म १८५३ मृत्यु १८९८

## महादेव मोरेश्वर कुंटे.



यांचा आर्यांच्या संस्कृतीचीं स्थित्यंतरें, (Vicissitudes of Aryan Civilisation) हा निबंध प्राचीन भारतीय संस्कृतीच्या अभ्यासास उपयुक्त आहे.

जन्म १८३५ मृत्यु १८८६

## ईश्वरचंद्र विद्यासागर.



वेदाच्या कांहीं भागावर यांचें भाष्य आहे.

जन्म १८२० मृत्यु १८९१

## राजेंद्रलाल मित्र.



हे कांहीं वैदिक ग्रंथांचे संपादक होते. मॅक्समुल्लर यांनीं यांची गणना कोलब्रूक, बर्नाफ इत्यादि महापंडितांत केली आहे.

जन्म १८२४ मृत्यु १८९१

## महादेव चिमणाजी आपटे.



ह्यांची पुणें येथील आनंदाश्रमसंस्था प्रसिद्ध आहे. प्राचीन संस्कृत वाङ्मयाचा जीर्णोद्धार हा या संस्थेचा उद्देश असून त्या उद्देशाला अनुसरून अनेक वेदविषयक व इतर प्राचीन ग्रंथ या संस्थेनें छापून प्रसिद्ध केले आहेत.

जन्म १८४५ मृत्यु १८९४

## जावजी दादाजी.



यांचा निर्णयसागर छापखाना वेदविषयक व इतर प्राचीन संस्कृत वाङ्मय लोकांपुढें ठेवण्याच्या कामीं प्रसिद्ध आहे.

जन्म १८३९ मृत्यु १८९२

## काशिनाथ त्रिंबक तेलंग.



रामायण होमरच्या ग्रंथाच्या आधारानें लिहिलें गेलें या वेबरच्या लेखाचें यांनीं एक निबंध लिहून खंडन केलें. याच प्रकारचा भगवद्गीता व वेबल या विषयावर यांचा लेख आहे. यांनीं कित्येक कठिण संस्कृत ग्रंथांस सूचक टीपा जोडून ते समजण्यास सोपे केले. जन्म १८५० मृत्यु १८९३

## मॅक्स मुल्लर.



हे सुप्रसिद्ध प्राच्यविद्यापंडित सर्वांच्या परिचयाचे आहेत. यांनीं वेदांचा अभ्यास फार मार्मिकपणें केला व तद्विषयक अनेक ग्रंथ प्रसिद्ध केले.

जन्म १८२३ मृत्यु १९००

## डॉ. भाऊ दाजी ( रामकृष्ण विठ्ठल ).



जुने शिलालेख ताम्रपट इत्यादिकांचा शोध लावून व अभ्यास करून भारताच्या प्राचीन इतिहासांत भर घालण्याचें काम यांनीं केलें.

जन्म १८२२ मृत्यु १८७४

# महाराष्ट्रीय ज्ञानकोश-प्रस्तावनाखंड.

## विभाग दुसरा-वेदविद्या.

## ग्रंथसंक्षेप.

### प्रकरण १ लें.

### वेदांविषयीं भारतीय वृत्ति.

प्राचीनतमस्थितिबोधक वाङ्मयाचे अवशेष या नात्यानें वेदाभ्यासाचें महत्त्व आहे. वेद हे कुराणादि विशिष्ट संप्रदायांच्या ग्रंथांप्रमाणें विशिष्टकालीं विशिष्ट व्यक्तीनें लिहिलेले नसून वेद हें एक ग्रंथभांडार आहे. तें अपौरुषेय व नित्य आहे असा जुना समज आहे. वैदिक वाङ्मयाचे तीन वर्ग आहेत-संहिता, ब्राह्मणें आणि आरण्यकें व उपनिषदें. १

पूर्वी संहितांची संख्या वरीच मोठी होती. आज ज्यामध्यें विशेष फरक दिसून येतो अशा ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद व अथर्ववेद, या चार संहिता आहेत. ब्राह्मणें, आरण्यकें व उपनिषदें यांचाहि वैदिक वाङ्मयांत समावेश होतो. वैदिक वाङ्मय श्रौतस्मार्त धर्माचा पाया आहे. वैदिक वाङ्मय ईश्वरप्रणीत आहे अशी भारतीयांची भावना आहे. ... ... ... ... ... ... २

हिंदुस्थानांत निघालेल्या तत्त्वज्ञानाच्या सर्व संप्रदायांस वेदांचें प्रामाण्य कबूल आहे. ... ... ... ३

वेदांमध्यें वेद आणि वेदस् अशा दोन शब्दांचे प्रयोग आढळतात. वेदस्चा पहिला अर्थ धन, नंतरचा ज्ञान व पुढें वेद शब्दाचा ज्ञान या अर्थानें प्रचार व त्यानंतर वेद या शब्दास ऋग्यजुःसामांचा समुच्चय असा अर्थ आला. ऋक्, यजुः व सामन् यांचे अर्थ मात्र पूर्वीपासून निश्चित होते. वेदस् शब्दाचा हविः व वेद शब्दाचा मार्जनी असाहि अर्थ करण्यांत आला आहे. ... ... ,,

वेदप्रामाण्यवादी लोकांनींहि अंधश्रद्धेनें बुद्धि मंद होऊं न देतां वेदांविषयीं आपलें विचारस्वातंत्र्य कायम ठेविलें होतें. ... ... ... ... ... ... ५

जगदुत्पत्तीबरोबरच वेदोत्पत्ति झाली असें वेदांचें श्रेष्ठत्व दर्शविणारें वर्णन ऋग्वेदांत व अथर्ववेदांत आहे. ६

वेद व देवता यांचा अन्योन्याश्रय दाखवून वेदांचें महत्त्व अथर्ववेदांत गाइलें आहे. अग्नि, वायु व सूर्य या तीन प्रकाशांपासून तीन वेद उत्पन्न झाले असें ब्राह्मणग्रंथांत, उपनिषदांत व मनुस्मृतींत म्हटलें आहे. ,,

वेदांचें प्राचीनत्व दाखविण्यासाठीं, वेद सृष्टीच्याहि पूर्वींचे आहेत, किंवा प्रजापतीनें ते निर्माण केले, असें वर्णन ब्राह्मणग्रंथांत उपनिषदांत व पुराणांतहि आहे. ... ७

वेदांचें महत्त्व स्थापिल्यानंतर आपआपल्या विषयांचें महत्त्व पटविण्याकरतां, सर्व विषयांचें वेद हे आदिस्थान होत, देवांच्या व भूतमात्रांच्या कर्माला वेदांच्या द्वाराच आरंभ झाला, अशा तऱ्हेचीं वर्णनें स्मृति व पुराणग्रंथांत आहेत. वेदांचें अनंतत्व दर्शविणारी एक आख्यायिका तैत्तिरीय ब्राह्मणांत आढळते. ... ... ... ८

स्मृतिपुराणादि ग्रंथांत वेदांच्या स्तुतिपर वाक्यें आहेत. त्याप्रमाणें वेदांपेक्षांहि पुराणग्रंथांचें श्रेष्ठत्व अधिक असें म्हणणारीं व सामवेदाची निंदा करणारीं वाक्येंहि आहेत. ९

उपनिषद्ग्रंथांत वेद ईश्वरप्रणीत असल्याचें मान्य केलें आहे. ... ... ... ... ... ... ... १०

उपनिषदांत व भगवद्गीतेंतहि कर्मकांडविषयक वेदभाग गौणप्रतीचा मानला आहे. वेदविद्येचे परा व अपरा हीं नांवें देऊन दोन विभाग केले जातात व त्यांपैकीं 'परा' नामक भागास अधिक महत्त्व दिलें जातें. ब्रह्मज्ञान होण्यास अडथळा करणारें वेदांतील अनेकेश्वरी मत व स्वर्गसुखाच्या इच्छेनें करावयाचे संस्कार यावद्दल अनादर दर्शविणारीं वाक्यें उपनिषदांत व भागवतपुराणांतहि आहेत. ... ... ... ... ... ११

ब्रह्मदेवाच्या चार मुखांतून चार वेद निघाले असें वर्णन कांहीं पुराणांत आहे. उलट, श्रीविष्णूंनीं वेदव्यासाचें रूप घेऊन मूळ एक असलेल्या वेदाचे चार भाग केले व ते अनुक्रमें पैल, वैशंपायन, जैमिनी व सुमंतु या चार शिष्यांनां पढविले, नंतर शिष्यपरंपरा वाढतां वाढतां चार वेदांचे उपविभाग पडून हजारापर्यंत शाखा निघाल्या, असें वर्णन विष्णु व वायुपुराणांत आहे. ... ... ... ... ... ... ... १२

वेद जगदारंभीं ईश्वरानें निर्माण केले पण संहिता त्रेतायुगांत रचल्या गेल्या. यजुर्वेदाच्या ज्ञात्यांस अध्वर्यु म्हणतात. प्राचीन अध्वर्यूंचा ग्रंथ तैत्तिरीय वेद होय. अध्वर्युद्वेषदर्शक वचनें वाजसनेयी संहितेंत व शतपथ ब्राह्मणांत आहेत. ... ... ... ... ... १३

वेद ईश्वरप्रणीत नाहींत याला पुरावा असा देतात कीं, अमुक एक वेदांतील सूक्त अमुक एक ऋषीनें रचिलें, असें वेदांच्या अनुक्रमणिकेंत सांगितलेलें असतें. या शंकेला उत्तर असें कीं, ऋषींनीं तपःसामर्थ्यानें ईश्वरप्रणीत वेदांचें ज्ञान करून घेतलें. ... ... ... ,,

मीमांसक नास्तिक मताचे होते व वेदांचें ईश्वरप्रणीतत्व त्यांस मान्य नव्हतें. परंतु मीमांसक वेद प्रमाण मानीत असत. ... ... ... ... ... ... १४

वेदांती म्हणतात कीं वेद ब्रह्मापासून निघाले; मिमांसक म्हणतात कीं, ते स्वतःसिद्ध आहेत. पण कालांतरानें सूत्रें, ब्राह्मणें व उपनिषदें यांत दिसून येणारीं वेदांविषयींचीं विरोधी मतें मागें पडून वेद अपौरुषेय व निर्दोष आहेत असें मानण्यांत येऊं लागलें. १५

नैयायिकांच्या मतें ध्वनि नित्य नाहीं; तेव्हां वेद खोटे आहेत, त्यांत विसंगतपणा आहे, वगैरे नैयायिकांनीं केलेले आरोप गौतमानें आपल्या न्यायसूत्रांत खोडून काढले आहेत.... ... ... ... ... ,,

कांहीं वैशेषिक सूत्रें म्हणतात कीं वेद देवानें आपल्या मुखानें उच्चारले व ते कोणातरी बुद्धिमान् प्राण्यानें लिहिले.... ... ... ... ... ... ... १६

कपिल म्हणतो कीं, देवच नाहीं तर त्याचेपासून वेद कोठून निघणार? तेव्हां जैमिनीप्रमाणें कपिलाचेंहि मत असें कीं, वेद स्वतःसिद्ध आहेत. ... ... ... ,,

पूर्वमीमांसाकार उर्फ कर्ममीमांसाकार आणि उत्तरमीमांसाकार उर्फ ब्रह्ममीमांसाकार उर्फ वेदांती आणि सांख्यसूत्रकार या सर्वांनीं वेदांचे स्वमतपोषक असे निरनिराळे अर्थ लावले आहेत, व त्यांत कित्येक वेळां जमीनअस्मानाचें अन्तर दिसून येतें.... ... ... ... १७

पाणिनीकालापासून प्रत्यक्ष वेद व वेदांवर उभारणी करून लिहिलेले इतर ग्रंथ म्हणजे दर्शनें, स्मृती, पुराणें, इतिहास या दोहोंमध्यें फरक करून फक्त वेदच 'प्रमाण' मानण्याची पद्धत पडली. ... ... ... ... ,,

तथापि 'इतर ग्रंथांचे' कर्ते म्हणजे मनूसारखे स्मृतिकार व इतर पुराणऋषी हे ब्रह्मज्ञानी व अतींद्रियद्रष्टे असल्यामुळें त्यांच्या स्मृत्यादि ग्रंथांनांहि वेदांच्या खालोखाल समाजांत मान मिळूं लागला. ... ... १८

तथापि कपिलासारखे कांहीं दर्शनकार अतींद्रियज्ञानी नव्हते म्हणून त्यांचे ग्रंथ 'प्रमाण' नाहींत, अशी त्यांची शंकराचार्यांनीं निंदा केली आहे. ... ... ,,

अलीकडे निरनिराळे दर्शनकार मागें पडून वेदांतांतील मत विशेष श्रेष्ठ, असें लोक मानूं लागले आहेत. सांख्यतत्त्वज्ञानांतहि निरीश्वरवादाचा पुरस्कार केलेला असल्यामुळें त्यांतील तेवढा भाग गौण मानतात. ... ,,

वेदांतील यज्ञ व पशुहनन या गोष्टी जैनांच्या अहिंसातत्त्वास विरोधी असल्यामुळें वेदांविषयीं जैनांची वृत्ति निश्चित नव्हती व त्यामुळें त्यांच्या ग्रंथांत वेदांविषयीं परस्परविरोधी वचनें आढळतात. ... ... ... १९

जैनांच्या हरिवंशपुराणांत वेदविषयक वादांत ब्राह्मणांस जिंकल्याच्या गोष्टी आहेत; व ब्राह्मणांचे वेद खोटे असून जैनांचे ग्रंथ तेच खरे वेद असें प्रतिपादन केलें आहे. ... ... ... ... ... ... १९

पैतृक ग्रंथ व ज्ञानाचें मूळ या दृष्टीनें वेद सर्व भारतीयांस पूज्य आहेत. त्यांच्या अपौरुषेयत्वाबद्दल मतभेद असला तरी आपले वेद हे जगांतील अत्यंत प्राचीन भाषेचे, प्राचीन धर्माचे व प्राचीन समाजस्थितीचे द्योतक आहेत म्हणून त्यांबद्दल अभिमानपूर्वक महत्त्व सर्व हिंदूंस सतत वाटणार, इतकेंच नव्हे तर वेदांचें ऐतिहासिक व समाजशास्त्रीय महत्त्व सर्व जगासच आहे. ... ... २०

---

## प्रकरण २ रें.

### वेदप्रवेश—ऋग्वेद.

वेदकाल म्हणजे वैदिक वाङ्मयांतील अगदीं पहिलीं सूक्तें जेव्हां रचलीं गेलीं तेव्हांपासून वेदाच्या संहिता ज्या कालांत झाल्या तोंपर्यंतचा सर्व कालविस्तार होय. ... २०

या वेदकालांत परस्परावलंबी अशा १ वाङ्मय, २ सामाजिकसंस्था व ब्राह्मणजात, ३ यज्ञसंस्था, ४ भाषा, ५ देवता, ६ राजकीय खळबळी, ७ कुलें, जाती व गोत्रें, ८ गृहस्थधर्म, ९ आर्यांचा प्रसार व १० व्यापक विचार उर्फ तत्त्वज्ञान या दहाहि अंगांची प्रगति झालेली दिसते. २१

अत्यंत विस्तीर्ण अशा वेदकालेतिहासाची माहिती होण्याकरतां वरील दहा मुद्यांचें विवेचन येथें देणें अवश्य आहे; व वाचकांस हें विवेचन सुलभ व्हावें म्हणून वेदग्रंथांविषयीं सामान्य माहिती प्रथम दिली आहे. ,,

वैदिक वाङ्मयाशीं निकट संबंध असलेलीं जीं कल्पसूत्रें त्यांत धार्मिक विधी व संस्कार यांची माहिती गद्यांत दिली आहे. त्यांत श्रौतसूत्रें, गृह्यसूत्रें व धर्मसूत्रें असे तीन प्रकार आहेत व त्यांत अनुक्रमें यज्ञ, जन्मविवाहादि संस्कार व आचारविषयक नियम व कायदे हे विषय आहेत. ... ... ... ... ... ... ,,

हे तिन्ही प्रकारचे सूत्रग्रंथ प्रत्येक वेदाला जोडलेले असून हे सूत्रग्रंथ आणि शिक्षा, व्याकरण, निरुक्त, छंदस् व ज्योतिष यांवरील ग्रंथ या सर्वांचा वेदांगांमध्यें म्हणजे वेदांच्या उपग्रंथांमध्यें समावेश होतो.... ... ... २२

ऋग्वेदसंहितेंतील बराच भाग प्राचीनतम आहे. या संहितेच्या अनेक शाखांपैकीं आज एक शाकल शाखाच कायती उपलब्ध आहे. या संहितेंत दहा मंडळें मिळून १०२८ सूक्तें आहेत. यांचीच, अष्टक, अध्याय व वर्ग अशीहि विभागणी आहे. मंडळें २ ते ७ यांचे अनुक्रमें गृत्समद, विश्वामित्र, वामदेव, अत्रि, भारद्वाज, व वसिष्ठ हे मंत्रद्रष्टे ऋषी होत. १, ९ व १० या मंडळांतील सूक्तांचे द्रष्टे अनेक ऋषी आहेत, त्यांत कांहीं स्त्रियाहि आहेत. ... ... ... ... ... ,,

हीं सूक्तें निरनिराळ्या देवतांनां उद्देशून आहेत. ९ व्या मंडळांतील मात्र सर्व सूक्तें 'सोम'देवाला उद्देशून आहेत. इराणी लोकांतहि सोमदेवतेचें माहात्म्य असून तिला 'हओम' म्हणतात. पहिल्या व दहाव्या मंडळांत अत्यंत विविध विषयांवर सूक्तें असून कांहीं सूक्तें एकंदर सूक्तांत सर्वांत अर्वाचीन आहेत. ... ... ... २३

ऋग्वेदांतील कोणतीं सूक्तें प्राचीन व कोणतीं अर्वाचीन याचा निर्णय त्यांची भाषा व त्यांतील विषय व त्यांचे छंद यांवरून बराचसा होतो. गायत्री हा फार प्राचीन छंद आहे, शिवाय अनुष्टुभ्, पंक्ति, महापंक्ति, त्रिष्टुभ्, जगती हे सर्व प्राचीन छंद आहेत व त्यांवरून सूक्तांचें प्राचीनत्व ठरतें. ... ... ... ... ... २३

ऋग्वेदसूक्तांत पंचनदांचा व दस्यूंचा उल्लेख आहे, पण कमळ, वंगाल्यांतील वाघ, शेतकीचा मुख्य पदार्थ तांदूळ यांचें नांव नाहीं. गुरांमध्यें सर्वांत अधिक लक्ष गाईबैलांकडे असे. घोड्यालाहि वरेंच महत्त्व असे. ... ... ... ... ... ... २४

ऋग्वेदकालीं चांभारकाम, सुतारकाम, लोहारकाम हे उद्योगधंदे होते; नौकानयनकला बाल्यावस्थेंत होती; व्यापारीवर्ग होता; सोन्याचे दागिने व बैल यांचा नाण्यासारखा उपयोग होई; शेतकी माहीत होती. ऋग्वेदांत चातुर्वर्ण्य सांपडतें पण जातिभेदाचें तीव्र स्वरूप नाहीं. त्या कालीं कित्येक अनाथ स्त्रिया आडमार्गाला जाऊं लागल्या होत्या, पण वेश्यावृत्तीचा धंदा चालत नव्हता. २५

ऋग्वेदसूक्तांत फसवेगिरी, दरोडा, व्यभिचार इत्यादि गोष्टींचा उल्लेख आढळतो. ऋग्वेदकालीन भारतीय आर्य लोक चपल, आनंदी व भांडखोर होते. वैभव, संतति, संपत्ति इत्यादिकांसाठीं ते देवांची पूजा करीत. हल्लींप्रमाणें त्यांचा दुबळा, निर्जीव, निवृत्तिपर स्वभाव नव्हता. ऋग्वेदाचें पूर्ण स्पष्टीकरण अद्याप झालें नाहीं. ऋग्वेदसूक्तांच्या अति प्राचीनत्वामुळें प्राचीन काळींहि हीं सूक्तें तत्कालीनांस दुर्बोध झालीं होतीं. ऋग्वेदाचें साग्र भाष्य खिस्ती शकाच्या १४ व्या शतकांत सायणाचार्यांनीं केलें. ... ... ... ... ... ... २६

वैदिक वाङ्मयाच्या यूरोपीय अभ्यासकांपैकीं कांहींनीं सर्वस्वीं सायणभाष्याचा आश्रय केला आहे व कांहींनीं सामान्यभाषाशास्त्र व तुलनात्मक व्युत्पत्तिशास्त्र या दोहोंवरच भिस्त ठेऊन सायणभाष्य त्याज्य ठरविलें आहे. आजचे वेदवाङ्मयाचे टीकाकार यूरोपीयांपेक्षां भारतीय टीकाकारांस हिंदी परिस्थिति चांगली समजते हें ओळखून मध्यम मार्ग स्वीकारितात. ... ... ... २७

मंत्रांचा हेतु काव्य असून ऋग्वेदाचीं सूक्तें भक्तियुक्त अंतःकरणाच्या कवींनीं अंतःस्फूर्तीनें लिहिलीं आहेत हें व तीं ऋत्विज लोकांनीं विशिष्ट यज्ञांच्या वेळीं उपयोगीं पडावीं या हेतूनें लिहिलीं आहेत हें, हीं दोन्हींहि मतें अतिशयोक्तिपूर्ण आहेत. ... ... ... ... ... २८

हिंदुधर्माच्या उत्क्रांतींतील पहिल्या पायऱ्यांचें व इंडो जर्मानिक लोकांच्या पुराणकथांचें संशोधन करणारास ऋग्वेदवाङ्मयाशिवाय गत्यंतर नाहीं. ... ... ... २९

पुराणकथांतील मुख्य मुख्य देवता मुळांत सृष्टिचमत्कारांच्या ठिकाणीं मानवी गुणधर्मांची कल्पना करून झालेल्या आहेत असें ऋग्वेदसूक्तांवरून समजतें. एकाच निसर्गशक्तीच्या निरनिराळ्या स्वरूपांना अनुलक्षून असलेलीं नांवें कांहीं कालानें देवतांचीं वाचक बनून त्यावरूनच पुढें निरनिराळ्या स्वतंत्र देवता मानण्यांत आल्या. निरनिराळ्या काळांतील निरनिराळ्या लोकांच्या देवता वैदिक काळांतील भारतीय लोकांच्या देवतासमुच्चयांत शिरल्या. देवतांची उत्पत्ति शोधून काढण्याचें काम प्रत्येक देवतेच्या बाबतींत सोपें नसल्यामुळें देवतांच्या उत्पत्तीसंबंधानें संशोधकांत मतभेद आहे. ... ... २९

ऋग्वेदांत मानवी भावनांना व कल्पनांना मूर्तस्वरूप येऊन बनलेल्या कांहीं देवता असून गंधर्व, राक्षस, पिशाच्चें वगैरेंचाहि त्यांत उल्लेख आढळतो. ... ... ३०

असुरशब्दाचा मूळ अर्थ देव आहे. दास किंवा दस्यु हें नांव ऋग्वेदांत नेहमीं पिशाच्यांना व शत्रुपक्षास (मूळच्या अनार्य रहिवाश्यांना?) लावलेलें आहे. पितृपूजेच्या कल्पनेचा उगम तेथें सांपडतो, पण पुनर्जन्माच्या कल्पनेचा मागमूसहि नाहीं. सूक्तकार आपणांस सामान्य जनांपेक्षां निराळे मानीत नसत. ... ... ... ,,

ऋग्मंत्रांच्या रचनाकालीं लोकांना आपल्या आराध्य देवतेबद्दल फारसा दृढ विश्वास, आदर व धाक वाटत नाहीं. जिचे भक्त तिच्याशीं भीत भीतच व नमून बोलतात अशी एक वरुण देवताच आहे. ... ... ... ३१

इंद्राला वैदिक काळांतील लोकांची राष्ट्रीय देवता हें नांव देतां येईल. इन्द्र ही युद्धप्रिय देवता होती. इन्द्रानें राक्षसांवर व त्यांतूनहि विशेषतः वृत्रावर मिळविलेल्या विजयांचीं अनेक वर्णनें ऋग्वेदांत आढळून येतात. इन्द्रवृत्रांच्या युद्धकथेंत निसर्गांतील अजस्र व अचाट व्यापाराचें वर्णन गर्भित आहे. इन्द्राच्या विशिष्ट गुणांइतकें इतर दुसऱ्या कोणत्याहि देवतेचें विस्तृत वर्णन सांपडत नाहीं. ... ... ... ... ... ... ३२

वरुण व इन्द्र यांच्या सूक्तांवरून ऋग्वेदकाळांतील मंत्रद्रष्टे ऋषी कल्पकता, करुणरस व ओजस्विता ह्या गुणांत कोणत्याहि प्रकारें कमी नव्हते असें सिद्ध होतें. ह्या लोकांच्या अंगांत मुग्ध व कोमल असे भाव व्यक्त करण्याची शक्ति होती. ... ... ... ... ३५

अग्नीसंबंधानें बोलतांना परममित्राशीं बोलण्याची भाषा वापरली आहे. अग्नि ही गृहस्थांची गृहदेवता आहे. विवाहादि संस्कारांच्या प्रसंगीं त्याची प्रार्थना करण्यांत येते. यज्ञिय अग्नि हा देव व मनुष्यें यांचा मध्यस्थ आहे. ,,

अग्निसूक्तांमध्यें कविकल्पना कोणत्या व परंपरागत लौकिककथा कोणत्या यांची निवड करणें कठिण आहे. पुराणकथा व धार्मिक विधी यांत अग्नीचा व घोड्याचा निकट संबंध आढळतो. अग्निसंबंधाच्या कथा काव्यमय, गूढ व अलंकारिक भाषेंतून निघाल्या असाव्या. कांहीं अग्निसूक्तें निःसंशय कवीच्या अंतःकरणांतून निघालेलीं काव्यें आहेत. ... ... ... ... ... ... ३६

उषादेवतेला वाहिलेलीं गीतें फारच सुंदर आहेत. ३७

वायुसूक्तेंहि चांगलें काव्य म्हणून नांवाजण्यासारखीं आहेत.... ... ... ... ... ... ... ३८

असल्या सूक्तांखेरीज ऋग्वेदांत दुसराहि एक सूक्तांचा वर्ग याहे. या वर्गातील सूक्तें म्हणजे केवळ यज्ञकर्मासाठींच रचलेलीं सूक्तें व शांतिसूक्तें होत. यज्ञविषयक सूक्तांचा विशेष म्हटला म्हणजे त्यांतील विलक्षण पौनःपुन्यमूलक एकसुरीपणा होय. ... ... ... ... ... ,,

'आप्रीसूक्तें' हीं यज्ञमंत्रांच्या वर्गांतलींच होत. पशुयज्ञाच्या वेळीं यांचा एक विशिष्ट प्रकारचा ठराविक उपयोग आहे. ... ... ... ... ... ... ३९

विधिसंस्कारांकरितां म्हणून रचलेलीं सूक्तें सुद्धां वरींच काव्यमय असूं शकतात. फार प्राचीन काळीं भारतीय लोकांत प्रेतें पुरण्याचीहि पद्धति चालू होती असें दिसतें.... ,,

ऋक्‌संहितेंतील जवळ जवळ १२ सूक्तें आध्यात्मिक सूक्तें हें नांव देतां येण्यासारखीं आहेत. या सूक्तांत विश्व व विश्वोत्पत्ति यांसंबंधाचे विचार आलेले असून, शिवाय सर्व विश्वांत एकच आत्मा भरून राहिलेला आहे ही कल्पनाहि त्यांत आढळून येते.—हिंदी लोकांत परमेश्वराच्या अस्तित्वाविषयीं साशंकपणा फार प्राचीन काळीं उत्पन्न झाला होता. ... ... ... ... ... ४१

ऋग्वेदसंहितेंत आर्षकाव्यांचा पाया घालणारीं सुमारें वीस आख्यानसूक्तें आहेत. या आख्यानसूक्तांत मूळांतला संवादात्मक पद्यभाग तेवढा सांपडत असून कथानकांचा गद्यभाग कालवश झाला आहे. तथापि ब्राह्मणग्रंथ, पुढील काळांतील आख्यानकाव्यें व टीका यांच्या साहाय्यानें कांहीं कथानकें निदान अंशतः तरी बसवितां येतात. पुरूरवाउर्वशीसंवाद व यमयमीसंवाद हे अशा प्रकारचे भाग असून सूर्याविवाहाचें सूक्तहि आख्यानसूक्तांच्या जोडीला बसविण्यासारखें आहे. ... ... ४२

ऋग्वेदामध्यें जवळ जवळ ३० सूक्तें मांत्रिकी सूक्तांच्या वर्गांतील आहेत. मांत्रिकी सूक्तांचा अंतर्भाव केवळ दहाव्या मंडळांतच केलेला नसून तीं इतरत्रहि आढळतात. सातव्या मंडळांतील दर्दुरसूक्तांत ब्राह्मणांचा व्याजोक्तिपूर्ण उपहास केला आहे ही समजूत वरोवर नसून वस्तुतः तें मांत्रिकी सूक्तच आहे. ... ... ... ... ४६

कित्येक केवळ लौकिक पद्यें ऋग्वेदांतील पारमार्थिक व यज्ञविषयक सूक्तांत मधून मधून आलीं आहेत. धार्मिक विधींचा ज्यांत कांहीं संबंध नाहीं. अशा सूक्तांपैकीं उत्तम सूक्त म्हणजे दहाव्या मंडळांतील एका द्यूतकाराच्या पश्चात्तापासंबंधींचें सूक्त होय. ... ... ... ... ४७

ऋग्वेदांत दानस्तुतिसूक्तांचा—म्हणजे यज्ञ करविणारे जे राजे वगैरे लोक त्यांच्या उदारतेचें वर्णन ज्यांत आहे अशा सूक्तांचा—एक वर्ग आढळतो. ह्या वर्गांत जवळ जवळ चाळीस सूक्तें आहेत. ह्या सूक्तांत दान देणाऱ्याचें सबंध नांव दिलेलें आढळत असल्यानें तीं ऐतिहासिकदृष्ट्या महत्त्वाचीं आहेत. तीं काव्य ह्या दृष्टीनें अर्थातच वाखाणण्यासारखीं नसावयाचींच. ... ... ... ४८

नीतितत्त्वाचा निर्देश ऋग्वेदांत सूक्त १०.११७ खेरीज इतरत्र कोठेंहि आढळत नाहीं. ऋग्वेदांत नीतितत्त्वांखेरीज सर्व कांहीं आहे. ... ... ... ... ... ४९

प्राचीनकाळच्या इतर राष्ट्रांप्रमाणें प्राचीन भारतीय लोकांतहि कूटकाव्यांची आवड होती. ऋग्वेदांत अशा प्रकारचीं कूटें पुष्कळ सांपडतात. ... ... ... ५०

संहिताभागांत अत्यंत जुनें भारतीय काव्य कोठें कोठें आढळतें. ऋग्वेदसंहिता पूर्वीं वरीच मोठी होती असें दिसतें. मंडळें बांधणाऱ्या ऋषींनीं हा सूक्तसंग्रह याज्ञिकीच्या व वाङ्मयाच्या अशा दोन्ही दृष्टींनीं बनविला. ... ५२

---

## प्रकरण ३ रें.

### वेदप्रवेश—अथर्ववेद.

अथर्ववेद हा अथर्वन् म्हणजे अग्निउपासक पुरोहितांचा वेद. अवेस्तांतील 'अथ्रवन्' लोक व भारतीय अथर्वन् यांत वरेंच साम्य आहे. आचार्यत्व व अभिचारत्व यांचें पुरोहितवर्गात सहास्तित्व होतें. भारतीय वेदांत ह्या वेदाचें अतिशय जुनें नांव अथर्वांगिरस असें होतें. अथर्वन् व अंगिरस् हे दोन प्रकारचे मंत्रविधी आहेत. अथर्वन् मंत्र सुखकर व पवित्र आहेत तर अंगिरस् हे मंत्र अघोर पीडाकर आहेत. ... ... ... ... ५२

अथर्वसंहितेच्या एका प्रतींत अजमासें सहा हजार ऋचांचीं वीस कांडें आहेत. ह्यांपैकीं विसावें तर वरेंच अलीकडे जोडलें आहे. अथर्ववेदाच्या मूळ अठरा कांडांतील सूक्तांची रचना पद्धतशीर व फार काळजीपूर्वक केलेली दिसून येते. ... ... ... ... ... ५३

अथर्ववेदांतील भौगोलिक ज्ञान व संस्कृति, प्राचीन अभिचार ऋचांनां दिलेलें ब्राह्मणी स्वरूप, उपमा देण्यांतील ब्राह्मणी दृष्टि, त्यांत केलेलें वैदिक देवतांच्या कृतींचें वर्णन, त्यांतील देवविषयक व जगदुत्पत्तिविषयक कल्पना या सर्व गोष्टींवरून अथर्ववेदसंहिता ही ऋग्वेदसंहितेच्या मागाहूनची आहे हें निर्विवादपणें सिद्ध होतें. ... ,,

पुष्कळ दिवसपर्यंत भारतीय लोक अथर्ववेदाला पूज्य व पवित्र मानीत नव्हते व अजूनसुद्धां ह्याविषयीं अनेक वेळां लढा पडतो. ... ... ... ... ... ५४

अथर्ववेदसंहितेची उपलब्ध प्रत ऋग्वेदसंहितेच्या मागाहूनची आहे हें जरी खरें आहे, तरी अथर्ववेदांतील अनेक सूक्तें ऋग्वेदांतील जुन्यांत जुन्या सूक्तांइतकींच प्राचीन आहेत हेंहि निश्चित आहे. अथर्ववेद हें भूतपिशाचें, मुंजे, राक्षस वगैरे पुष्कळ निरनिराळ्या योनींसंबंधानें आणि यज्ञसंस्था व तत्त्वज्ञानयुक्त विचार यांपासून पृथक्त्वानें वागत असलेल्या लोकांच्या निरनिराळ्या काय समजुती होत्या यावद्दलचें यथार्थ ज्ञान मिळविण्यास अमूल्य साधन आहे. ... ... ... ... ... ५५

अथर्ववेदांतील रोग बरे करण्याच्या प्रयोगांतील मंत्रांत म्हणजे भैषज्यसूक्तांत रोगनिवारक औषधींचें किंवा देवतांचें

आवाहन व स्तुति असते किंवा ते मंत्र रोग हे राक्षस कल्पून त्यांनां उद्देशून लिहिलेले असतात. हे मंत्र व तत्संबंधीं प्रयोग हाच आयुर्वेदाचा आरंभ होय. ह्या मंत्रांतून निरनिराळ्या रोगांचीं लक्षणें फार विशद रीतीनें दिलीं आहेत. ... ... ... ... ... ... ५६

भैषज्यसूक्तांतील कांहीं मंत्र, त्यांच्या उदात्त व सौंदर्यपूर्ण भाषेमुळें, भावपूर्ण काव्याचे उत्कृष्ट मासले झाले आहेत. ... ... ... ... ... ... ,,

पुष्कळ वेळां ह्या सूक्तांतील ऋचा अगदीं एकतानी असतात व त्यांचा अर्थ बुद्धिपुरःसर गूढ व दुर्गम ठेवलेला असतो. ... ... ... ... ... ... ... ५७

वरेचसे रोग जंतूंपासून उत्पन्न होतात अशी कल्पना वरीच प्राचीन आहे. हे जंतू असुर आहेत, त्यांच्यांत राजा, प्रधान वगैरे अधिकारी आहेत वगैरे ह्या रोगजंतू-विषयीं लोकांच्या भावना असत. ... ... ... ,,

निरनिराळ्या रोगांचे उत्पादक मानल्या जाणाऱ्या अनेक भूतवर्गांचें अपसारण करण्याच्या उद्देशानें त्यांनां उद्देशून रचलेले असेहि पुष्कळ मंत्र या वेदांत आहेत. मांत्रिकांचा आपल्या शक्तीविषयीं निःसीम आत्मविश्वास होता. ... ... ... ... ... ... ... ५८

मनुष्यांनां भुरळ घालून त्यांच्याशीं सृष्टिनियमाविरुद्ध संभोग करणाऱ्या अप्सरागंधर्वांचा उपद्रव नाहींसा करण्याकरितांहि मंत्र आहेत. ... ... ... ... ,,

आयुरारोग्यार्थ म्हणावयाच्या प्रार्थनामंत्रांचा एक वर्ग आहे. आपल्या कामांत चांगलें यश मिळण्याची इच्छा करणाऱ्या शेतकरी, धनगर, व्यापारी वगैरे लोकांनीं म्हणावयाचे असे या प्रार्थनामंत्रांसारखेच, पुष्कळसे पौष्टिकमंत्रहि सांपडतात. ... ... ... ५९

अंहस् शब्दाचे संकट व पाप असे दोन्हीहि अर्थ असल्यामुळें ज्यांतील प्रत्येक ऋचेच्या शेवटीं अंहसापासून मुक्त कर असें पालुपद आहे त्या मृगारसूक्तास प्रायश्चित्तमंत्रांच्या वर्गांत टाकतां येईल. प्रायश्चित्तमंत्र रोगनिवारक मंत्रांहून फारसे भिन्न नाहींत. व्याधी, आपत्ती, गुन्हे, पातकें वगैरे सर्व वाईट गोष्टी पिशाच्चेंच घडवून आणतात अशी समजूत होती. ... ... ,,

दुष्ट दैत्य किंवा मत्सरी मांत्रिक यांच्यामुळें गृहकलह उत्पन्न होतात अशी समजूत असल्यामुळें घरांत शांति नांदावी यावद्दलचे मंत्र दिले आहेत. याशिवाय विवाह व प्रेमविषयक मंत्रांचीं स्वतंत्रच सूक्तें आहेत. हा प्रणय-मंत्रांचा सूक्तवर्ग फार मोठा आहे. एखाद्या पुरुषाला कोणा स्त्रीचें किंवा स्त्रीला पुरुषाचें प्रेम संपादन करावयाचें असल्यास त्यांच्याकरितां दिलेले मंत्र यांतच येतात. ६०

अतिशय दुष्ट व द्वेषभाव भरलेले मंत्र म्हणजे सपत्नीमंत्र होत. ... ... ... ... ... ... ... ६१

कांहीं काममंत्र कमालीचा दुष्टपणा व्यक्त करीत असल्यामुळें ते अंगिरसूवर्गांत म्हणजे अभिचारवर्गांत मोडतात. कांहीं रोगनिवारक मंत्रसुद्धां या वर्गांत घालतां येतील. ह्या सूक्तांत त्या वेळच्या विशेषतः सामान्य जनांत रूढ असलेल्या कल्पना आढळून येतात. कांहीं अभिशाप व अपसारणमंत्र हीं सामान्य लोकांतील काव्यांचीं चांगलीं उदाहरणें आहेत. ... ... ... ... ... ६२

वरुणसूक्तहि ह्याच जातीचें म्हणजे काव्य आणि अभिचारमंत्र यांचें मिश्रण आहे. ह्या वेदांत या व इतरत्रहि पुष्कळ ठिकाणीं जुन्या सूक्तांचे विवक्षित अभिचारमंत्रांनां जोड लावण्यास उपयोगी असे भाग घेऊन त्या त्या मंत्रांनां जोडून दिले आहेत असें रोट व विंटरनिट्झ यांचें मत आहे. ... ... ... ... ... ६३

राजांच्या गरजा भागविण्यासाठीं जे मंत्र आहेत त्यांत शत्रूंविरुद्ध अभिचारविधी व पौष्टिकमंत्र आहेत. अथर्ववेदाचा क्षत्रियवर्गाशीं निकट संबंध आहे. अथर्ववेदांत ब्राह्मणहितरक्षणार्थ अभिचार व मंत्रप्रयोग यांचें वाढच्या वाढ दृष्टीस पडतें. हीं सर्व सूक्तें व यज्ञकर्मासंबंधीं सूक्तें व मंत्र हीं अथर्ववेदसंहितेच्या अलीकडच्या भागापैकीं आहेत. ऋग्वेदाच्या १० मंडळांतील उत्तरक्रियाविषयक सूक्तें कांहीं भर घालून शब्दशः पुन्हां अथर्ववेदाच्या १८ व्या काण्डांत दिलीं आहेत. २० व्या काण्डांतील वहुतेक सूक्तें सरसकट ऋग्वेदावरून घेतलीं आहेत. ... ... ६४

१५ वें काण्ड गद्यात्मक असून त्यांत व्रात्यस्तोम म्हणजे चातुर्वर्ण्यांत नसलेल्या इतरांची रहस्यात्मक स्तुति आहे. ... ... ... ... ... ... ६५

अथर्ववेदाचा शेवटचा वर्ग म्हणजे तत्त्वज्ञान व जगदुत्पत्ति एतद्विषयक सूक्तांचा. तथापि हीं तत्त्वविद्याविषयक सूक्तें अभिचारमंत्रांप्रमाणेंच व्यवहारोपयोगी आहेत. ह्या सूक्तांत तथ्यापेक्षां बाष्कळणाच अधिक आढळतो. ह्या तत्त्वज्ञानविषयक सूक्तांवरून असें कळून येतें कीं, त्या वेळीं अध्यात्मज्ञानाची चांगलीच वाढ झालेली असावी. तथापि तत्त्वज्ञानविषयक सूक्तांत ऋग्वेद व उपनिषदें यांमधील अशा विचारांची एक विकासावस्था आढळते असें म्हणतां येत नाहीं. ... ... ... ... ... ,,

ह्या सूक्तांतून पुष्कळशीं गहनतत्त्वें मधून मधून झळकतात, पण त्यांची भाषा एखाद्या धंदेवाईक गूढवाद्यासारखी दिसते. १३ व्या काण्डांतील रोहितसूक्तांत सुद्धां खरें तत्त्वज्ञान फार थोडें असून गूढाचेंच अवडंबर फार आहे. ह्या सूक्तांतील ऋचांच्या पालुपदांत ब्राह्मणाला जो पीडा करील त्याचें निर्मूलन करण्याविषयीं रोहिताची (सूर्याची) प्रार्थना केली आहे. ... ... ... ६६

ह्या उत्कृष्ट रोहितप्रशस्तीच्या शेजारींच मधून मधून गूढ कल्पना घातलेल्या आहेत. ४ थ्या काण्डांतील ११ व्या सूक्तांत बळी देण्याकरितां काढलेल्या बैलाची विश्वोत्पादक व विश्वरक्षक अशी स्तुति आहे. ह्याच सूक्तांत गाईचें माहात्म्य वर्णन केलें आहे. विंटरनिट्झच्या मतें अशा ऋचांतील 'गहन अर्थ' शोधून काढण्याचा प्रयत्न निष्फळ झाल्यावांचून राहणार नाहीं. ... ६७

परलोकवासी डॉयसेन यानें अथर्ववेदांतील तात्त्विक सूक्तांचा अर्थ लावण्याची बरीच खटपट करून त्यांत कांहींशी संबद्धता दाखविली आहे. पण ह्या सूक्तांत डॉयसेन म्हणतो तितकें तत्त्वज्ञान भरलें असेल हें विंटरनिट्झला खरें वाटत नाहीं. त्याची अशी कल्पना आहे कीं, ह्या सूक्तांच्या लेखकांनीं कोणतेंहि तत्त्व नव्यानें शोधून काढलें नसून त्यांच्या वेळीं परिणतस्थितींत असलेलीं तत्त्वें त्यांनीं गूढ, अव्यक्त व विसंगत अशा तऱ्हेनें नव्यानें मांडण्याचें मात्र काम केलें. ... ... ... ६८

जगदुत्पत्तिविषयक सूक्तांत १२ व्या काण्डांतील पृथिवीसूक्तामध्यें मात्र खरें काव्य बरेंचसें आढळतें. यावरून अथर्ववेदांतसुद्धां मधून मधून अनेक प्राचीन काव्यांचे खंड आहेत व ऋग्वेदसंहितेप्रमाणें त्यांतहि कमी दर्जाच्या व टाकाऊ काव्यप्रबंधाच्या जोडीला प्राचीन भारतीय काव्यांपैकीं कांहीं मौल्यवान् रत्नें आहेत असें सिद्ध होतें. ६९

ऋग्वेद व अथर्ववेद संहितांमध्यें जें एक साम्य आहे तें हें कीं, त्यांतील सूक्तें प्रारंभीं कोणत्याहि विशिष्ट कर्मांच्या प्रयोगाकरितां रचिलीं गेलीं नाहींत. ऋग्वेदसूक्तांची एकापुढें एक मांडणी यज्ञोपयोगाच्या दृष्टीनें केलेली दिसत नाहीं अथर्ववेदाचें हौत्र मात्र यज्ञाच्या दृष्टीनें मांडलेलें दिसतें. ... ... ... ... ७०

---

## प्रकरण ४ थें.

### वेदप्रवेश—यजुर्वेद.

यजुर्वेदसंहितांतील ऋचा मात्र यज्ञकर्मांमध्यें उपयोगीं पडतील अशा क्रमानें एकत्र केल्या आहेत. प्राचीन वैदिकधर्मांतील कर्में दोन प्रकारचीं असत. ह्यांनांच उत्तरकालीं गृह्यकर्में व श्रौतकर्में अशीं नांवें मिळालीं. पहिलीं प्रत्येक आर्याला आवश्यक असत व दुसरें श्रीमंत किंवा राजेलोकच करीत. गृह्यकर्में एकाग्नीवर व श्रौतकर्में त्रेताग्नीवर होत असे. गृह्यकर्मांत यजमान स्वतःच यज्ञपुरोहिताचें स्थान घेत असे. त्याच्या मदतीला फार तर एक आचार्य 'ब्राह्मण' असे. श्रौतकर्मांत होता, उद्गाता, अध्वर्यु व ब्रह्मा असे चार मुख्य व त्यांच्या हाताखालीं दुसरे पुष्कळ ऋत्विज असत. गृह्यकर्में स्मृतींच्या व श्रौतकर्में श्रुतींच्या आधारानें होत असे. ब्रह्यास त्रयीविद्या व बाकीच्या तीन पुरोहितांनां प्रत्येकीं एक एक वेद येत असावा लागतो. सामवेदसंहिता म्हणजे उद्गात्याचें गानपुस्तक व यजुर्वेदसंहिता म्हणजे अध्वर्युऋत्विजाचें कर्मदर्शक पुस्तक असतें. ... ... ... ... ७१

यजुर्वेदाच्या १०१ शाखा आहेत असें पतञ्जलि म्हणतो. चरणव्यूहामध्यें ८६ शाखा आहेत. असें म्हटलें आहे. आतांपर्यंत यजुर्वेदाच्या (१) काठक, (२) कपिष्ठलकठ, (३) मैत्रायणी, (४) तैत्तिरीय, (५) काण्व व (६) माध्यंदिन अशा सहा संहिता उपलब्ध झाल्या आहेत. ... ... ... ... ... ७२

होत्यानें म्हणावयाचे पद्यमंत्र त्या ऋचा (ऋग्वेद), अध्वर्यूनें म्हणावयाचे गद्यमंत्र ते यजू (यजुर्वेद) व उद्गात्यानें म्हणावयाचीं गाणीं तीं सामें (सामवेद) होत. उपयोगावरून एखादें वाक्य मंत्र किंवा ब्राह्मण हें ठरवितां येतें. यजुर्वेदाच्या संहिताभागांत ब्राह्मण व ब्राह्मणभागांत संहिता आलेली असल्यामुळें अगोदर संहिता वर्णावयाच्या व मग ब्राह्मण ही पद्धति थोडा वेळ त्यागिली पाहिजे. ... ७३

तैत्तिरीय संहिता, ब्राह्मण व उपनिषद् या ग्रंथांची विषयवार सूची (विषयांच्या वर्णनासह): या ग्रंथांत निरनिराळ्या ठिकाणीं मिळून १ अग्न्याधान, २ पुनराधान, ३ अग्निहोत्रहोम, ४ दर्शपूर्णमास, ५ पिंडपितृयज्ञ, ६ सान्नाय्य, ७ साकंप्रस्थायी याग, ८ दाक्षायण यज्ञ, ९ काम्येष्टींचीं विधानें व त्यांचें हौत्र, १० अभिचारक व स्वतंत्र इष्टींचें हौत्र, ११ चातुर्मास्य हौत्र, १२ दर्शपूर्णमासेष्टीचें हौत्र, १३ नित्य व काम्य पशुयाग, १४ नित्य व काम्य पशुयागांचें हौत्र, १५ अग्निष्टोम, १६ समिष्टयजु, १७ अवभृथ, १८ प्रवर्ग्य, १९ अतिरात्र, २० अप्तोर्याम, २१ वाजपेय. २२ दशपेय, २३ राजसूय, २४ अश्वमेध, २५ महाव्रत, २६ सौत्रामणि, २७ पुरुषमेध २८ अग्निष्टुत्, २९ इंद्रस्तुत्, ३० पंचशारदीय, ३१ विघन, ३२ विध्यपराध, ३३ चयन, ३४ काठकचयन, ३५ लोष्टचिति, ३६ मृताचा प्रेतविधि, ३७ बृहस्पत्यादिसव, ३८ सोमयाग (हीन, अहीन व सत्रात्मक. विशिष्टरूप;) ३९ सत्रें (फार दिवस समुच्चयानें चालणारे सोमयाग,) ४० संवत्सरसत्र (सोमयागात्मक,) ४१ गवामयन, ४२ स्वर्गसत्र (इष्ट्यात्मक,) ४३ नक्षत्रसत्र (इष्ट्यात्मक,) ४४ सहस्रतमीचें (गाईचें) दान, ४५ श्रौतयज्ञाशीं संबंद्ध होणारीं, व स्वतंत्र अशीं निरनिराळीं कर्में किंवा विधी, ४६ वृषालंभादि कांहीं स्वतंत्र याग, ४७ सार्तविषयक निरनिराळे विधी व याग, आणि उपासना व तत्त्वज्ञानविषयक विषय यांसंबंधीं माहिती आली आहे. ... ... ... ... ... ... ,,

तैत्तिरीय संहितेची विस्तृत अनुक्रमणिका. ... ... ८५

तैत्तिरीय ब्राह्मणाची अनुक्रमणिका.... ... ... १०१

तैत्तिरीय आरण्यकाची अनुक्रमणिका. ... ... ११०

सायणाचार्यांच्या मतें इष्टप्राप्त्यनिष्टपरिहारासंबंधींचे अलौकिक उपाय सांगणारा जो ग्रंथ तो वेद; अशा प्रकारच्या उपायांचें कथन हाच त्याचा विषय व हे उपाय कथन करणें हेंच त्याचें प्रयोजन; या उपायांच्या ज्ञानाची लालसा करणारा उपनयनसंस्कार झालेला मनुष्य वेदाचा अधिकारी असून वेद व वेदांचे अधिकारी यांचा संबंध उपकारक व उपकार्य असा आहे. वेद नित्य असल्यामुळें त्यास अपरप्रामाण्याची जरूर नाहीं. ... ११४

वेदपठनापेक्षां वेदज्ञानापासून अधिक फलप्राप्ति सांगितली आहे. ... ... ... ... ... ११५

वेदाच्या पूर्वकाण्डांत नित्य, नैमित्तिक, काम्य व निषिद्ध अशा चतुर्विध कर्मांचें प्रतिपादन असून ब्रह्मो-

पदेश व तत्सिद्ध्यर्थ उपासना इत्यादि विषय उत्तरकाण्डांत अंतर्भूत होतात. ... ... ... ... ... ११५

यज्ञकर्मांच्या दृष्टीनें मंत्रब्राह्मणात्मक यजुर्वेदासच प्राधान्य दिलें जातें. ... ... ... ... ... ११६

कृष्णयजुर्वेदांत यज्ञांचा एका दृष्टीनें उत्तान काल दिसतो; परंतु कृष्णयजुर्वेदापेक्षां श्रौतसूत्रांत ब्रह्म्याचें काम अधिक विस्तृत दिलें आहे. यज्ञशास्त्र हें क्रमाक्रमानेंच वाढलें. ... ... ... ... ... ,,

सोमयागाच्या वर्णनांत अनेक यागांची माहिती येत असल्यानें त्याचेंच वर्णन पुढें ( परिशिष्टांत ) दिलें आहे. ,,

यज्ञांतील बहुतेक क्रियांची जबाबदारी अध्वर्यूवर पडते. तो यजमान व ब्रह्मा यांच्या अनुज्ञेनें इतर सर्व ऋत्विजांस प्रैष देतो. त्याचे मंत्र यजुर्वेदांतील मंत्रविभागापैकीं व क्रियांसंबंधीं वाक्यें ब्राह्मणविभागापैकीं असतात. ... ,,

यज्ञांतील सर्व ऋत्विजांच्या क्रियांवर नजर ठेवून अनुष्ठान प्रमादरहित करण्याची काळजी ब्रह्म्यास घ्यावी लागते. त्यास वेदत्रयीचें संपूर्ण ज्ञान असावें लागतें. त्याच्या कर्तव्यांचें संपूर्ण स्पष्टीकरण मुख्यतः अथर्ववेदाच्या ग्रंथांत केलेलें आहे. ... ... ... ,,

यज्ञांतील देवतांचा होता हा एक स्तुतिपाठक व आमंत्रक होय. सोमयागाच्या अलीकडील यागांतील त्याचे मंत्र व क्रियाबोधक वाक्यें मुख्यतः यजुर्वेद ग्रंथांत व सोमयागापासून सत्रापर्यंतच्या यज्ञांतील त्याचे मंत्र व क्रियाबोधक वाक्यें ऋग्वेदग्रंथांत आलीं आहेत. ... ,,

उद्गात्याचें मुख्य कर्तव्य यज्ञांतील मुख्य देवतांची गायनानें आळवून स्तुति करणें हें होय. या गायनास साम असें म्हणतात. अध्वर्युवगैरे ऋत्विजांप्रमाणें यास हविःशेष भक्षावयाचें नसून त्याजकडे फक्त सोमपान करण्याचें कर्तव्य असतें. ... ... ... ... ,,

ह्या चार मुख्य ऋत्विजांशिवाय अध्वर्यूंच्या हाताखालीं प्रतिप्रस्थाता, नेष्टा व उन्नेता, ब्रह्म्याच्या हाताखालीं ब्राह्मणाच्छंसी, आग्नीध्र व पोता, होत्याच्या हाताखालीं मैत्रावरुण, अच्छावाक व ग्रावस्तुत् आणि उद्गात्याच्या हाताखालीं प्रस्तोता, प्रतिहर्ता व सुब्रह्मण्य असे एकूण १२ ऋत्विज असतात. यांतील ब्रह्म्याच्या हाताखालच्या तिन्ही ऋत्विजांचा उपयोग ब्रह्म्याच्या ऐवजीं होत्यासच होत असतो. कधीं कधीं ब्रह्म्याचा मदतनीस आग्नीध्र हा अध्वर्यूस व अध्वर्यूचा मदतनीस नेष्टा हा होत्यास मदत करतो. ... ... ... ... ... ... ... ११७

यांशिवाय सदस्य नावाचा एक सतरावा ऋत्विज असतो त्याचा दर्जा श्रेष्ठ प्रतीचा असून त्यास प्रसंगविशेषीं ब्रह्म्यास अभियुक्तपणें सूचना करण्याचा अधिकार असतो. ... ... ... ... ... ... ११९

वरील शिष्ट अधिकाऱ्यांशिवाय परिचर्यास्वरूपी कर्म करणारे दहा किंवा अकरा चमसाध्वर्यू, चार किंवा त्याहून अधिक उपगाते, ध्रुवगोप, पशुपाल, कांहीं प्रेष्य, दोग्धा, शमिता व हविष्कृत् असे आठ प्रकारचे उपऋत्विज लागतात. ... ... ... ... ... ... ११९

यज्ञामध्यें अग्निमंथन, कृषि, श्मश्रुकर्म, दारू तयार करणें, स्वयंपाक करणें, सोनारकाम, सुतारकाम, कुंभारकाम, चांभारकाम, कोष्टीकाम, लोहारकाम, शिवणकाम, पशुपालन, सोमक्रय, गंवडीकाम, दळणकांडण, दोऱ्या वळणें, गवत कापणें, लांकडें तोडणें, रथारोहण, खड्डे करणें, वाद्यें वाजविणें वगैरे अनेक प्रकारचीं कर्में गोंविलीं गेलीं आहेत. ... ... ... ... ,,

शमीगर्भ पिंपळाच्या एका जाड फांदीच्या खालच्या भागाच्या फळींतून अधरारणी व वरच्या भागाच्या फळींतून उत्तरारणी करून त्यांच्या साहाय्यानें अग्निहोत्रासाठीं धारण करावयाचा अग्नि मंथन करून प्रदीप्त केला जातो. अरणीपासून अथर्वा नामक ऋषीनें प्रथम अग्नि उत्पन्न केला. ... ... ... ... ... ,,

कृषिकर्माची माहिती आर्यांस वैदिक कालापासून दिसते. तैत्तिरीय संहितेंत 'अग्निचयन' प्रकरणामध्यें कृषिकर्माचा प्रकार आढळतो. नांगरट झाल्यावर नांगरानें पडलेल्या भेगांमधून खूप तूप ओतीत असत व मग एकवार पाणी देऊन बीं पेरण्यांत येई. ... ... १२०

यज्ञांत खाटकाचें काम असतें. त्यास बलि द्यावयाच्या पशूचें प्रत्येक अंग छिन्नविच्छिन्न न होऊं देतां समग्र काढावें लागतें. ... ... ... ... ... ,,

चातुर्मास्य नामक यागांत प्रत्येक पर्व संपल्यावर कांखा, मिशा व डोकें या क्रमानें हजामत करवावयाची असून त्यानंतर डाव्या व उजव्या हातांचीं व पायांचीं नखें करंगळीकडून अंगठ्याकडे काढीत जावयाचीं असतात. ... ... ... ... ... ... १२१

सौत्रामणि नामक यज्ञांत सुरेचें हवन आहे. या प्रसंगीं पैष्टी, गौडी व माध्वी या तीन प्रकारांपैकीं 'तीन दिवस आंबत ठेऊन बनविलेली तांदुळांच्या रसाची दारू वापरतात. यज्ञामध्यें हुतशेष सुरेचें पान करावयाचें नसतें. ... ... ... ... ... ... ... ,,

यज्ञांतील हवनीय द्रव्यांत पुरोडाश, चरु, धाना, करंभ, परिवाप, आमिक्षा, वाजिन इत्यादि द्रव्यें आहेत. भाजीपाले, कोशिंबिरी व इतर पक्वान्न वगैरे प्रकार वेदांत आढळत नाहींत. यज्ञांतील शिजविण्याचें काम अध्वर्यु अगर नियोजित ऋत्विजच करतो. ... ... ... १२२

सोनारांनीं बनविलेले पदार्थ यज्ञांत अनेक वेळां उपयोगांत आणण्याचें कारण पडतें. ... ... ... १२३

मंचक, झोंपाळा, विणलेली घडवंची, उखळ-मुसळ, पळी, पाळें, उलथनें, मंडप, सांडस, ग्रह, स्फ्य, रथ, गाडे वगैरे सुतारकामाचें लांकडी सामान यज्ञप्रसंगानें वेदांत उपयोगांत आणलेलें आढळतें. ... ... ... १२३

श्रौतकर्मांत, निरनिराळ्यां आकारांच्या विटा, शेगड्या, उतरंडीच्या आकाराचीं वोळकीं, मडकीं, घागरी,

माठ व परळ अशा प्रकारचें कुंभारकामाचें सामान लागतें. यापैकीं, अग्निचयनांत लागणाऱ्या तीन शेगड्या आणि मंडला व ऋषभा नामक विटा एवढें सामान तयार करून भाजण्याचें काम स्वतः अध्वर्यूसच करावें लागतें. इतर नमुन्याप्रमाणें कुंभाराकडून करवून घेतात. १२४

यज्ञामध्यें चांभारानें तयार केलेल्या जोडे वगैरे वस्तू वापरावयाच्या असतात. ... ... ... ... १२६

वेम, शलाकोपधान, प्राचीन तान, ओतु वगैरे विणकामासंबंधीं शब्द, दर्भाचीं, गवताचीं, कापसाचीं, तागाचीं व क्षौम वस्त्रें, रंगविलेलीं धोतरें व पागोटीं वगैरे गोष्टींचा उल्लेख यज्ञांगानें वेदांत अनेक ठिकाणीं आला आहे. ... ... ... ... ... ... ... ,,

लोहारानें तयार केलेल्या नांगराचा फाळ, वस्तरा, लोखंडी झांकण्या, सुया, लोखंडी कमंडलू, चिमटे, पळी, बाणाचें फळ, सुरी, वगैरे जिनसा यज्ञामध्यें उपयोगांत आणण्याचे अनेक प्रसंग आहेत. ... ... ... १२७

यज्ञकर्मांत अप्रत्यक्ष रीतीनें शिवणकलेचा उल्लेख आलेला आढळतो. ... ... ... ... ... ,,

यज्ञकालांत पशुपालन हा एक स्वतंत्र धंदाहि लोक करीत असावेत.... ... ... ... ... ... १२८

सोम खरेदी करितांना सोमवल्लीची किंमत यजमानाच्या ऐपतीवर अगर यज्ञाच्या लहान मोठ्या प्रमाणावर गाईंच्या व इतर वस्तूंच्या रूपांत देण्यांत येई. ठरलेल्या ज्यास्तींत ज्यास्त किंमतींतहि सोमविक्या सोमवल्ली देण्यास कुरकुरेल तर ती त्याच्यापासून वळजबरीनें घेऊन त्यास हांकून लावीत.... ... ... ... ... ... ,,

सोमयागांत सोमवल्ली वरवंट्यानें कुटून तिच्यापासून रस काढतात. ... ... ... ... ... ... ,,

श्रौतकर्मांत निरनिराळ्या आकृतींच्या वेदी व चिती करण्यांत गवंडीकामाची गरज लागते. घरें बांधण्याचा प्रकार श्रौतकर्मांत कोठें आढळत नाहीं. ... ... १२९

पीठ करावयाचें तें जात्याच्या साहाय्यानें दळून करण्यांत येत नसून पाट्यावरवंट्याच्या साहाय्यानें करण्यांत येतें. कांडावयास घेतलेलें उखळ व मुसळ हीं लांकडीच असतात. मुसळास वेढणी म्हणजे लोखंडी पट्टी मात्र नसते. ... ... ... ... ... १३०

त्रिसंधि दोरी उर्फ शुल्व वळण्याचा विधि यज्ञकर्मांत दृष्ट आहे. दोऱ्या, शिंकीं व दावीं हीं मात्र धंदेवाईक लोकांनीं तयार केलेलींच उपयोगांत घेतल्याचें दिसतें. ,,

प्राचीन काळीं दर्भ कापण्याकरितां घोड्याच्या बरगडीची अस्थि उपयोगांत आणीत. पुढें सुरीचा उपयोग करूं लागले. ,,

यूपांकरितां लांकूड तोडण्याचें काम व झाडें तोडून यज्ञभूमि साफसूफ करण्याचें काम लांकूडतोड्या धंदेवाइकांकडून करवीत असत असें दिसतें. ... ... ... १३१

यज्ञांगानें रथ वापरण्याचें काम पुनराधानप्रसंगीं, चयनप्रकरणामध्यें, वाजपेय यज्ञांत, आधानप्रयोगांत व अश्वमेध यज्ञांत आलेलें आहे. ... ... ... ... १३१

यज्ञांमध्यें खड्डा करण्याच्या प्रसंगीं त्याची आंखणी अगोदर केली जाते. खळगा करण्यास कळकाच्या काठीचा उपयोग केलेला आढळतो. ... ... ... ... १३२

यज्ञांमध्यें वाद्यांचें वादन विहित आहे. तत म्हणजे तंतुवाद्यांपैकीं वीणा, वाण, अलाबुवीणा, वक्रावीणा, कपिशीर्षी, महावीणा, शीलवीणा, पिच्छोरा, कांडवीणा व तुंबरुवीणा; घन वाद्यांपैकीं उखळी; सुषिर म्हणजे पोकळ वाद्यांपैकीं नाळी, तूनव व शंख; आणि नद्ध म्हणजे चामड्यांनीं मढविलेल्या वाद्यांपैकीं दुंदुभि, भूमिदुंदुभि व पणव उर्फ मृदंग या वाद्यांचा उल्लेख आलेला आहे. ... ... ,,

यज्ञांमध्यें गायनवादनाखेरीज रथांच्या शर्यती वगैरे दुसरींहि कित्येक करमणुकीचीं साधनें असत. ... ... १३३

अश्वमेध व पुरुषमेध या यागांत ज्या अनेक देवतांचें आवाहन केलें जातें व त्यांच्यासाठीं जे नानाविध पशू मारले जातात किंवा धरून सोडले जातात त्यासंबंधाची तपशीलवार यादी. ... ... ... ... ... १३४

शुक्लयजुर्वेदसंहितेंत श्रौतकर्म कृष्णयजुर्वेदाइतकें विस्तृत नाहीं. तथापि आहे तें जुनेंच आहे. शुक्लयजुर्वेदाची संहिता याज्ञवल्क्यांनीं वाजी (सूर्य) पासून घेतली म्हणून तिला 'वाजसनेयि' हें नांव मिळालें असें विष्णुपुराणांत सांगितलें आहे. ... ... ... ... १४१

वाजसनेयि संहितेच्या ४० अध्यायांपैकीं शेवटचे १५ (कदाचित् २२) मागाहूनचे आहेत. पहिल्या २५ अध्यायांत अत्यंत महत्त्वाच्या महायज्ञांचे मंत्र दिले असून शिवाय नित्य अग्निकर्म, अग्निप्रतिष्ठा, प्रातःसायंकालीन अग्निहोत्रांतील हवन व चातुर्मास्य यज्ञ यांविषयीं माहिती आणि अग्निचयन व सौत्रामणि विधी सांगितले आहेत. २२ व्या अध्यायांत अश्वमेधाचें कारण फार सुंदर रीतीनें वर्णन केलें आहे. ... ... ... ,,

शेवटच्या १५ अध्यायांस प्राचीन परंपरेंतहि पुरवण्या (खिल) असेंच नांव आहे. या अध्यायांतील विषयांवरून व कृष्णयजुर्वेद संहितेंतील मंत्रांसारखे मंत्र वाजसनेयि संहितेच्या पूर्वार्धांतच आहेत यावरून ते मागाहूनचे असावेत असें ठरतें. ३१ व्या अध्यायांत ऋग्वेदाच्या १० व्या मंडलांतील पुरुषसूक्त असून ४० वा अध्याय ईशोपनिषदच आहे. ... ... ... ... ... १४२

या संहितेंतील यजू उर्फ गद्य मंत्र हे तालबद्ध व कित्येक ठिकाणीं प्रासादिक आहेत. ऋचा ऋग्वेदसंहितेंतून प्रसंगाला साजेशा अशा पाहून घेतल्या आहेत. त्यांचे भिन्न पाठ मूळ पाठाहून जुने नाहींत.... ... १४२

आहुति देतांना म्हणावयाची ऋचा (याज्या) ही सर्वांत सोपी प्रार्थना असते. धार्मिक कृत्याचें प्रयोजनहि अगदीं थोडक्या शब्दांत सांगितलेलें असतें. कोठें हेतु सांगून त्याबरोबर इच्छा प्रदर्शित केलेली असते. एखाद्या वस्तूपासून वाईट परिणाम होईल असें वाटल्यास तो टाळण्यासाठीं एक लहानसा मंत्र म्हणतात. यज्ञविधींमध्यें पुष्कळ वेळां देवतांच्या स्तुतीऐवजीं यज्ञपात्रें व यज्ञकर्म

यांचा देवतांशीं संबंध दाखविलेला असतो. अरणी आणि मंथ्यानें अग्नि उत्पन्न करण्याच्या क्रियेची ऋग्वेदांत जननक्रियेशींच तुलना केली आहे. ... ... ... ... १४३

अल्पार्थी किंवा अर्थहीन विधिमंत्र यजुर्वेदांत पुष्कळच आहेत. सूत्रवत् प्रार्थना बऱ्याच आहेत व त्यांत अर्थहि चांगला असतो. ज्यांत अर्थ गौण आहे असे अनेक मंत्र आहेत. कांहीं प्रार्थना अर्थशून्य वाटतात याचें कारण एकमेकांशीं संबंध नसलेल्या वस्तूंची त्यांत तुलना व संयोग केलेला असतो. ... ... ... ... ... १४४

या प्रार्थनांत एखाद्या वेड लागलेल्या माणसाप्रमाणें एकाच गोष्टीची निरनिराळ्या तऱ्हेनें पुनरुक्ति केलेली आढळते. यजुर्वेदांतील कांहीं प्रार्थना म्हणजे गद्यमय अभिचारमंत्रच आहेत.... ... ... ... ... १४५

पिशाचनिवारणमंत्राप्रमाणेंच आज उपलब्ध असलेल्या यजुर्वेदांतील कोड्यांतहि कांहीं फार जुनीं लोकप्रचारांतील कोडीं व लोकांमध्यें थोडेंफार ब्रह्मज्ञान पसरलें होतें असें स्पष्ट दाखविणारीं ब्रह्मोद्यनामक धार्मिक कोडींहि आढळतात. गूढ कोडीं व सूचक गोष्टी यांपासून आनंद होतो अशी कल्पना आहे. देवाच्या नांवांचें व विशेषणांचें आवर्तन करून भक्ति दर्शविण्याचा प्रकारहि यजुर्वेदांत आढळतो. ... ... ... ... १४६

उत्तरकालीन तंत्रग्रंथांतील अम्, आम्, ऱ्हीम्, फट्, इत्यादि अर्थविहीन शब्द व अक्षरांप्रमाणें यजुर्वेदांतील प्रार्थनांतहि स्वाहा, वषट्, वेट्, वाट्, ॐ इत्यादि अर्थविहीन अक्षरें व शब्द आढळतात. ॐ या अक्षराचा मूळ अर्थ असेंच होवो किंवा होय असा होता. ... ... १४७

धर्म या विषयाच्या सामान्य शास्त्रावरील आधारग्रंथ व नंतरचे भारतीय उपासनापंथ व तत्त्वज्ञान समजण्यास पूर्वतयारी या दृष्टीनें यजुर्वेदाचें ज्ञान अवश्य आहे. ... ,,

## प्रकरण ५ वें.

### वेदप्रवेश—सामवेद.

सामवेदाच्या अनेक संहितांपैकीं आज एकच उपलब्ध आहे. तिच्यांतील १८१० (पुनरुक्ती सोडून १५४९) ऋचांपैकीं ७५ खेरीज करून बाकी सर्व ऋग्वेदांत आहेत. १४७

सामवेदाच्या आर्चिक व उत्तरार्चिक या दोन्ही भागांतील शब्द हे केवळ साधनभूत आहेत; मूळ साध्य म्हणजे गाण्याचे राग. आर्चिकाला प्रत्येक पद्याची पहिली ऋचा त्या त्या रागाची आठवण होण्याकरितां ज्यांत दिलेली आहे असें एक गाण्याचें पुस्तक म्हणतां येईल. उत्तरार्चिकेमधून मुख्य यज्ञांच्या वेळीं गावयाचीं जीं स्तोत्रें तीं तयार केलेलीं असतात. आर्चिकानंतर उत्तरार्चिक झालें असावें. ... ... ... ... ... ... १४८

उत्तरार्चिकांत शब्दांतील अक्षरें गातांना जशीं लांबवून व पुनरुक्ति करून म्हणतात तशीं तीं निरनिराळ्या सुरांसह लिहिलीं आहेत. ... ... ... ,,



छंदांची संख्या वरीच मोठी असली पाहिजे. ऋत्विज व धर्मगुरू यांनीं हे छंद स्वतः बनविले नाहींत; ते बहुतेक लोकप्रचारांतीलच आहेत. ... ... ... १४९

यज्ञकर्म, अभिचार व भारतीय संगीतशास्त्राचा इतिहास जाणण्यास सामवेदसंहिता फार उपयुक्त आहे. ,,

## प्रकरण ६ वें.

### वेदप्रवेश—ब्राह्मणें.

भारतीय वाङ्मयाच्या क्षेत्रांतील संशोधकांनां ब्राह्मण ग्रंथ कितीहि हृदयंगम वाटले तरी सामान्य सुशिक्षित लोकांनां ते अगदीं नीरस वाटतात. ... ... ... १४९

ब्राह्मण शब्दाचा मूळ अर्थ यज्ञकर्मांतल्या मुद्द्यांवरील विद्वान् याज्ञिकांचें विवेचन असा आहे. पारमार्थिक ज्ञानाला शास्त्र म्हटल्यास ब्राह्मण ग्रंथांचें यज्ञशास्त्रग्रंथ असें नामाभिधान करितां येईल. यजुर्वेदसंहितेंत जे अशा प्रकारचे ब्राह्मणग्रंथांसारखे घटकावयव आहेत त्यांपासून हें ब्राह्मण वाङ्मय तयार झालें. ... ... १५०

जुन्या ब्राह्मण ग्रंथांतील महत्त्वाचे ग्रंथ म्हटले म्हणजे ऋग्वेदाचीं ऐतरेय व कौषीतकी (शांखायन) हीं दोन ब्राह्मणें, सामवेदाचीं पंचविंश (ताण्ड्य) व षड्विंश व जैमिनीय हीं तीन ब्राह्मणें, कृष्ण यजुर्वेदाचें तैत्तिरीय ब्राह्मण व शुक्लयजुर्वेदाचें शतपथब्राह्मण हे होत. ... ... ... ,,

ऋग्वेदाच्या ब्राह्मणांत एकंदर यज्ञविधीचें विवेचन करतांना होत्याचीं कर्तव्यकर्मे, सामवेदाच्या ब्राह्मणांत उद्गात्याचीं कर्तव्यकर्मे व यजुर्वेदाच्या ब्राह्मणांत अध्वर्यूचीं कर्तव्यकर्मे तपशीलवार दिलीं आहेत. ... ... ... १५१

आचार्यांच्या वंशावळ्यांवरून यज्ञशाखांचा उत्पत्तिकाल भूतकालाच्या पोटांत फार खोल असला पाहिजे असें दिसतें. ऋग्वेदमंत्ररचना ब्राह्मण वाङ्मयाच्या फार पूर्वींची आहे; सूक्तकाव्य हें स्तोत्र व यज्ञ यांचें मिळून एक निराळें शास्त्र बनण्यास सुरवात झाली त्या वेळचें आहे; व अथर्ववेदांतील अभिचारमंत्र व विधी हे ब्राह्मण विधानांच्या पूर्वींचे आहेत एवढेंच कायतें या संबंधांत निश्चित आहे. ... ... ... ... ... ... १५२

ऋग्वेदकालानंतर धार्मिक व सामाजिक स्थित्यंतरें बरींच झालीं. दिवसेंदिवस ऋग्वेदांतील देवांचें महत्त्व कमी होत जाऊन यज्ञास व यज्ञसंबंधीं प्रत्येक गोष्टीस महत्त्व येत चाललें. ... ... ... ... ... ,,

ब्राह्मणांत प्रत्येक यज्ञकर्म फार फार विस्तारानें सांगितलें आहे.... ... ... ... ... ... ,,

त्या वेळीं याज्ञिक ब्राह्मणवर्णाचा अधिकार अमर्यादित होता. ब्राह्मणांतून व अथर्ववेदाच्या कांहीं खंडांतून ब्राह्मणवर्ण आढळतो. ... ... ... ... ... ... १५३

आरंभीं ब्राह्मणांत एक एक विधि कसा करावयाचा याविषयीं नियम म्हणजे विधी घालून दिले आहेत व

## प्रकरण ७ वें.

### वेदप्रवेश–आरण्यकें व उपनिषदें.

उपनिषदांमध्यें प्रजापति व इन्द्र यांच्या एका प्रसिद्ध संवादांत ज्ञाता व विवेकी जीवात्मा म्हणजेच परमात्मा असा जीवात्मा व परमात्मा यांच्यामधील भेद व्यक्त केला आहे. ... ... ... ... ... ... १७३

आत्मा व जगत् हीं एकच असून ज्या प्रमाणांत एखादी वस्तु ज्ञात्याच्या ज्ञानाचा विषय असते त्या प्रमाणांत त्या वस्तूला अस्तित्व असतें. ... ... १७४

उपनिषदांमध्यें आत्म्याला प्राण अशी संज्ञा वारंवार दिली आहे. मुख्य इंद्रियांच्या वर्चस्वाबद्दलच्या तंट्याची उपनिषदांतील मानसशास्त्रासंबंधींची गोष्ट सर्वांच्या परिचयाची आहे. ... ... ... ... ... ... ,,

कर्माप्रमाणें पुनर्जन्म प्राप्त होतो हें तत्त्व बृहदारण्यकोपनिषदांत आलें आहे. या उपनिषदांतील आत्म्याच्या व्यापारासंबंधीं रेखाटलेलें चित्र भाषासौंदर्याच्या दृष्टीनें सर्व राष्ट्रांच्या वाङ्मयांत अद्वितीय आहे असें डॉयसेन म्हणतो. ... ... ... ... ... ... १७५

ब्राह्मणांपेक्षां उपनिषदांत नैतिक भाग अधिक आहे तरी त्यांतहि नैतिक तत्त्वज्ञानास फारशी जागा मिळालेली नाहीं. त्यांत ज्ञान प्राप्त करून ब्रह्माशीं एकरूप होणें हेंच उच्च ध्येय मानलेलें आहे. ... ... १७६

नचिकेताच्या व बृहद्रथ राजाच्या कथेंत ज्ञानलालसेबद्दल अत्यंत हृदयंगम वर्णन आलें आहे. ... ... १७७

जग मिथ्या आहे या कल्पनेची पहिली पायरी उपनिषदांत असून या तत्त्वापासून पुढें हलके हलके जगाचा तिरस्कार व त्यायोगें नैराश्यवाद उत्पन्न झाला. ... १७८

अर्वाचीन सर्वच भारतीय तत्त्वशास्त्रांचा उगम उपनिषदांपासून झालेला आहे. ... ... ... ... ,,

शोपनहावर व डॉयसेन यांच्या मतें उपनिषद्ग्रंथकारांची गणना मानव जातींत क्वचितच करतां येईल. सत्याजवळजवळ जाण्याकरितां केलेला केवळ निकराचा असा मानवी प्रयत्न उपनिषदांत आहे असें त्यांना वाटतें. ... ... ... ... ... ... ... ,,

पाश्चात्त्य देशांत भारतीय एकेश्वर वादाचें तत्त्व चोहोंकडे लोकप्रिय होईल असें शोपेनहावरचें भविष्य आहे. तो म्हणतो कीं, माझ्या जीवाची शांति व मरतेसमयींची शांति या ग्रंथांत आहे. ... ... ... ,,

---

## प्रकरण ८ वें.

### वेदप्रवेश–वेदांगें.

शिक्षा, कल्प, व्याकरण, निरुक्त, छन्द व ज्योतिष हीं वेदांचीं षडंगें आहेत. वेदांगांचा प्रारंभ ब्राह्मणांत व आरण्यकांत झालेला दिसतो. ... ... ... ... १७९

शिक्षण देण्यास व ध्यानांत ठेवण्यास सुलभ जावें म्हणून निरनिराळ्या शास्त्रांवर सूत्रग्रंथ रचण्यांत आले. ब्राह्मणांतील गद्यानुसार लिहिलेली ही विशिष्ट तऱ्हेची सूत्रपद्धति दिसते. ... ... ... ... ... ,,

यज्ञयागादि नियमांचे मंत्र ध्यानांत ठेवण्यासाठीं जे सूत्रग्रंथ लिहिले गेले त्यांस कल्पसूत्रें म्हणतात. यांपैकीं ज्यांत श्रौतसंस्कार आले आहेत त्यांस श्रौतसूत्रें व गृह्यसंस्कार आले आहेत त्यांस गृह्यसूत्रें म्हणतात. ... १८०

धर्मसूत्रें कल्पसूत्रांचाच एक भाग असून गृह्यसूत्र व श्रौतसूत्रांप्रमाणें यांचाहि उगम वेदशाळेंतच झाला. धर्म या शब्दांत न्यायतत्त्वें, कर्म, स्मृती, विधी, चारहि वर्णांचे अधिकार वगैरेंचा समावेश होतो. शुल्वसूत्रेंहि कल्पसूत्रांचाच भाग आहेत. त्यांचा श्रौतसूत्रांशीं संबंध असून ते भारतीय भूमितीवरील अतिप्राचीन ग्रंथ होत.... १८१

सूत्रांत यजुःशाखेंतील मंत्र देतांना यजुःसंहितेंतून घेतलेल्या मंत्रांचीं फक्त आद्याक्षरें व त्यांच्या स्पष्टीकरणार्थ अथर्ववेद किंवा ऋग्वेद यांतील पूर्ण मंत्र जोडलेले आहेत. बौधायन व आपस्तंब शाखांचीं जशीं श्रौत, गृह्य, धर्म व शुल्व अशीं चार सूत्रें आहेत तशीं सूत्रें प्रत्येक वैदिक शाखेला आहेत असें नाहीं. ... १८२

श्रौत व गृह्यसूत्रांनंतर लिहिल्या गेलेल्या परिशिष्टांत सूत्रग्रंथांत थोडक्यांत दिलेल्या मंत्रांचें स्पष्ट विवरण आहे. यानंतर प्रयोगपद्धति व कारिका लिहिल्या गेल्या. १८३

शिक्षेसंबंधाचीं सूत्रें कल्पसूत्रांइतकीं तरी जुनीं असावीं. शिक्षा याचा अर्थ स्पष्ट उच्चार करून आघात वगैरे देऊन संहिता म्हणणें असा आहे. धर्माच्या दृष्टीनें शिक्षेची आवश्यकता वाटली. संहितापाठाशिवाय पदपाठ म्हणून एक निराळा आहे. संहितापाठ व पदपाठ हें शिक्षापंथाचें सर्वांत जुनें काम होय. ... ... ... ,,

पदपाठावरून संहितापाठ कसे तयार करावयाचे हें प्रातिशाख्यांत दिलें आहे. संहितापाठ प्रातिशाख्यांच्या रचनाकालापासून आजपर्यंत जशाचा तसाच राहिला आहे. प्रातिशाख्यांशिवाय शिक्षेवर अलीकडील पुष्कळ लहान लहान ग्रंथ आहेत.... ... १८४

प्रातिशाख्यकार शौनक व कात्यायन यांनीं अनुक्रमणी, बृहद्देवता व ऋग्विधान हे ग्रंथ लिहिले आहेत, पण त्यांची वेदांगांत गणना होत नाहीं. ... ... १८४

यास्काचें निरुक्त ही निघण्टु या शब्दकोशावरील टीका आहे. पिंगल याचा छन्दःशास्त्रावरील ग्रंथ व वेदाङ्गज्योतिष हा ज्योतिःशास्त्रावरील लहानसा पद्यमय ग्रंथ हे छन्दःशास्त्र व ज्योतिःशास्त्र ह्या वेदाङ्गांसंबंधीं जुने ग्रंथ आहेत. व्याकरणावरील जुनीं वेदाङ्गाचीं पुस्तकें उपलब्ध नाहींत. ... ... ... ... ... १८५

---

## प्रकरण ९ वें.

### वेदकालीन इतिहास–वेदकालनिर्णय.

वेदकालनिर्णयाच्या बाबतींत विद्वान् संशोधकांच्या मतांत शेंकड्यांचाच नव्हे तर सहस्रकांचा सुद्धां फरक

आढळतो. वेबरला तर वैदिक वाङ्मयाच्या कालाची निश्चित मर्यादा आंखणें अशक्य वाटलें. ... ... १८६

१८५९ सालीं मोक्षमुल्लर यानें जें प्राचीन संस्कृत वाङ्मयाचा इतिहास नामक पुस्तक प्रसिद्ध केलें त्यांत त्याचा उद्देश वेदसूक्तांचा रचनाकाल खि. पू. १००० च्या अलीकडे येऊं शकत नाहीं एवढेंच सांगावयाचा आहे. ... ... ... ... ... ... ... ,,

त्यानें पुढें १८९० सालीं एका व्याख्यानांत वेदकालाची कमालमर्यादा ठरविणें मानवी शक्तीबाहेरचें आहे असें स्पष्ट म्हटलें असतांहि विद्वान् लोक अद्यापपर्यंत त्याच्या निर्णयास शास्त्रीय सिद्धांताचें महत्त्व देतात. ... ... ... ... ... ... ... १८७

ज्योतिर्विषयक माहितीवरून वेदकाल ठरविण्याचा प्रयत्न लुडविग यानें पूर्वी केला होता. पुढें १८९३ मध्यें ब्राह्मणकालीं कृत्तिका हें व वेदकालीं मृगशीर्ष हें नक्षत्रमालेंतील आद्य नक्षत्र होतें असें यॅकोबी व बाळ गंगाधर टिळक यांनीं एकाच कालीं पण निरनिराळ्या देशांत व स्वतंत्र रीतींनीं ठरवून वेदकाल किमानपक्ष खि. पू. ४५०० वर्षें इतका मागें नेला. ... ... ... १८८

गृह्यसूत्रांतील विवाहकर्मामधल्या ध्रुवदर्शनाच्या विधीवरूनहि वरील मतास पुष्टि मिळते. ... ... ... ,,

ज्योतिर्विषयक उपर्युक्त दोन्हीहि पुरावे खोडून काढण्याचे प्रयत्न झाले आहेत; परंतु त्यांतल्या त्यांत दुसरा पुरावा खोडण्यांत कोणासहि यश आलेलें नाहीं. १८९

तथापि वैदिक वाङ्मय खि. पू. तिसऱ्या सहस्रकांतलें व प्राचीन आर्यसंस्कृति चौथ्या सहस्रकांतली आहे हें तर निर्विवादच असल्याविषयीं बुल्हर वगैरे पंडितांचें मत आहे. ... ... ... ... ... ... ,,

दक्षिण हिंदुस्थानांत आर्यसंस्कृतीचा प्रसार खिस्तपूर्व सातव्या आठव्या शतकांत झाला व वैदिक ऋचांच्या रचनाकालीं आर्य लोक हिंदुस्थानच्या वायव्य कोंपऱ्यांत राहत होते. अर्थात् त्यांना एवढा अफाट हिंदुस्थान देश काबीज करून तेथें आपल्या संस्कृतीचा प्रसार करण्यास अनेक शतकें लागलीं असलीं पाहिजेत. शिवाय वेदांतील सर्व ऋचा रचल्या जाण्यासच प्रथम कित्येक शतकें लागलीं होतीं. ... ... ... ... ... ... ,,

जैनांचा आद्यप्रवर्तक होण्यापूर्वीच सर्व वेदवाङ्मय पूर्णपणें अस्तित्वांत आलें असल्यामुळें वेदवाङ्मयाचा समाप्तिकाल खिस्तपूर्व ८०० वर्षें मानला पाहिजे, व आरंभकाल तर खि. पू. तिसऱ्या सहस्रकांत असणें अधिक संभवनीय आहे असें विंटरनिट्झला वाटतें. ... १९०

कै. लो. टिळक यांनीं असें दाखविलें आहे कीं, वैदिक कालीं वसंतसंपात अनुक्रमें पुनर्वसु, मृगशीर्ष व कृत्तिका नक्षत्रीं असल्याचा संहिता व ब्राह्मणें यांतून उल्लेख सांपडत असल्यामुळें वैदिक ऋचांचा रचनाकाळ खि. पू. ६००० पावेतों मागें नेतां येतो. ... ... १९१

ऋचांच्या मूळ अर्थाचें संशोधन करण्यापूर्वीं ज्या यज्ञसंस्थारूप यंत्रानें ऋचांवर परिणाम घडविला तें तपासण्याची अर्वाचीन संशोधकांनीं काळजी घेतलेली नाहीं. ... ... ... ... ... ... ... १९३

यज्ञसंस्थेचा इतिहास आणि संहितीकरण यांचा निकट संबंध असल्यामुळें यज्ञसंस्था समजावून घेऊन तिच्या अनुषंगानें संहिता व ब्राह्मणें समजावून घेतलीं पाहिजेत. ... ... ... ... ... ... १९४

उपबृंहित यज्ञसंस्थेचा परिणाम समाजाच्या विकासाकडे झाला एवढेंच नव्हे तर तीपासून अनेक ज्ञानविषयक व समाजघटनाविषयक फायदे झाले. यज्ञसंस्थेचा उपयोग ब्राह्मणांचें महत्त्व वाढविण्यापलीकडे कांहीं झाला नाहीं अशी पाश्चात्त्यांनीं आपली समजूत करून घेतल्यामुळें यज्ञाचें खरें सामाजिक स्वरूप त्यांच्या लक्षांत आलें नाहीं. ... ... ... ... ... १९५

यज्ञसंस्थेचें मर्म समजावून घेण्यासाठीं ती ब्राह्मणांनीं केवळ स्वार्थासाठीं वाढविली ही समजूत काढून टाकली पाहिजे.... ... ... ... ... ... ... ,,

पाश्चात्त्यांस संहितीकरणाचा इतिहासहि समजलेला नाहीं. चातुर्वर्ण्य, ब्राह्मण जात व गोत्रें, प्रवर इत्यादि या तीन सामाजिक संस्थांचा परिणाम वैदिक वाङ्मयावर बराच झाला आहे. ... ... ... ... ... १९६

आज सर्वांत ज्यास्त परिचित वेदशाखा म्हणजे ऋग्वेदाची शाकल, कृष्णयजुर्वेदाची तैत्तिरीय, आणि शुक्लयजुर्वेदाच्या माध्यंदिन व काण्व या होत. याशिवाय कृष्णयजुर्वेदाच्या मैत्रायणीय व चरक शाखांचे आणि नार्मद उर्फ जाबाल शाखेचेहि कांहीं लोक आहेत. अथर्ववेदीय लोक आतां बहुतेक ऋग्वेद्यांत अंतर्भूत होऊं लागले आहेत. ठाणें जिल्ह्यांत थोडेसे सामवेदी जातिरूपानें आहेत. ... ... ... ... ... ... ,,

कालांतरानें श्रौतकर्म जवळजवळ लुप्त झालें; तरी श्रौतकर्ममूलक जें अध्ययनवैशिष्ट्य तें व त्या अध्ययनवैशिष्ट्यामुळें पुढें जे जातिसमुच्चय उत्पन्न झाले ते मात्र टिकले. अध्ययन व जाति यांची आज पूर्ण फारकत झाली आहे. पण जातीचें सामाजिक पृथक्त्व गेलें नाहीं. जात्यंतर्गत कुलानें आपली अध्ययनपरंपरा सोडून नवीन परंपरा घेतली तर तें मात्र पूर्वीच्या शाखेचें न राहतां नवीन शाखेचें बनतें. ... ... ... ... १९७

वेदशाखा व त्यांचा प्रचार यांचा हिशोब घेण्याचें काम महार्णवकारांनींच कायतें केलें. पण ती माहिती आज अपुरी व वस्तुस्थितीस न जुळणारी अशी भासते. १९८

सध्यां श्रौतधर्म चालू आहे म्हणजे वर्षदोन वर्षांनीं एखादा याग कोठें तरी ऐकूं येतो. ... ... ... १९९

ऋत्विजांस आपला अभ्यासग्रंथ स्वतंत्र पाहिजे असल्यामुळें संहितीकरणास प्रारंभ झाला. वरींचशीं सूक्तें अनेक ठिकाणच्या ऋचा एकत्र घेऊन केलीं असावींत.

कर्मकर्तृत्व यांची सांगड घालून देण्यास चुकले नाहींत. अदृष्टफल उपायांची प्रसिद्धि जाहिरातीवर अवलंबून असल्यानें यज्ञसंस्थेंत जाहिरात करणाऱ्यांस स्थान दिलें आहे. ... ... ... ... ... ... ... २१२

यज्ञांतील महत्त्वाच्या प्रश्नांचा निर्णय करण्यासाठीं चार माणसें जमवून जो वाद होई त्यास–म्हणजे ब्रह्याचें संशयनिर्णयाचें जें काम तें करणारा वाद त्यास–ब्रह्मवाद म्हणत. या ठिकाणींच पुढें तात्त्विक वाद उपस्थित होत जाऊन वेदांतज्ञानाची स्थापना व्हावयाचा उपक्रम झाला.... ... ... ... ... ... २१३

वेदग्रंथांमध्यें अनेक भिक्षुकी कलह दिसून येतात. उदाहरणार्थ वसिष्ठविश्वामित्र या राजपौरोहित्याबद्दल धडपडणाऱ्या ऋषींचा कलह. या कलहाचें पुढें पौराणिक रूपांतर झालें. ... ... ... ... ... ... २१४

श्रौतधर्म म्हणजे परमार्थासाठीं होणाऱ्या प्रयत्नांचें सर्वस्व नव्हतें. समाजाच्या इतर हालचाली वाङ्मयरूपानें अवतरल्याच नसाव्यात, किंवा त्यांचें वाङ्मय मेलें असावें, किंवा त्यापैकीं कांहीं श्रौती लोकांनीं आपल्या वाङ्मयांत समाविष्ट करून इतर मरूं दिलें असावें. ... २१५

यज्ञास मदत करणें हा अथर्व्यांचा प्रयत्न फारच अल्प प्रमाणानें होता. उलट पक्षीं अथर्ववेदांत यज्ञाच्या विरुद्धहि प्रयत्न दिसून येतो. ... ... ... ... ,,

ज्यास आज आपण गृह्यकर्म म्हणतों तें बरेंचसें व्यवस्थित व मंत्रयुक्त करण्याचें श्रेय अथर्व्यांस आहे. अथर्ववेदसंहिता श्रौतसूत्रापेक्षां वरीच जुनी असावी. ... २१६

श्रौतकर्मसंकोचानंतर, भिक्षुकी पेशा न घेतलेल्या ब्राह्मणांचें पौरोहित्य करून त्यावर अवलंबून राहण्याची उत्तरकालीन श्रौती भिक्षुकांत प्रवृत्ति सुरू झाली व या प्रवृत्तीमुळेंच पुढें ब्राह्मणांत पोटजाती पडूं लागल्या. ... २१६

प्रचारांत असून ज्यांचें प्रयोजन गेलें आहे अशा जुन्या आचारांस नव्या सृष्टींत स्थान देणारें सूत्रें व ऋग्विधान यांसारखें वाङ्मय श्रौतकर्म संपल्यानंतरच्या काळांत सपाट्न झालें.... ... ... ... ... २१७

गृह्यकर्म श्रौताहूनहि जुनें असावें. श्रौतकर्म हें समाजास अवश्य असें कर्म दिसत नाहीं. श्रौतकर्माच्या अनावश्यकतेमुळेंच त्याच्या अभिमान्यांस त्याच्या आचरणासाठीं अधिक विद्वत्ता खर्च करावी लागली. ... ,,

त्रयी हें पक्वान्नांचें पाकशास्त्र व गृह्यसूत्रें किंवा अथर्ववेद हें रोजच्या जेवणाचें पाकशास्त्र असल्यामुळें त्रैविद्य अथर्व्यांस हलके समजत यांत नवल नाहीं. ... २१८

गृह्यकर्मांमध्यें आचारभिन्नता शिरली तिच्या मुळाशीं आपल्या शाखेच्या लोकांची भिक्षुकी आपल्यामध्यें रहावी हाच केवळ हेतु होता असें नाहीं. ... ... ... ,,

रूढी प्रथम व धर्मवाङ्मय नंतर उत्पन्न होत असल्यामुळें रूढींची व त्यांच्या अवलंबनाची आवश्यकता आहे; तथापि रूढींचेंच अवलंबन करा हा उपदेश मनुष्यांस व्यवहारोपयोगी नाहीं. लौकिक विधीस ग्रांथिक वाक्यांनीं मान्यता देण्याचा काल म्हणजे गृह्यसूत्रांचा काल होय. या काळांत त्रैविद्यांनीं श्रौतसूत्रें व गृह्यसूत्रें तयार करून अथर्ववेद्यांचा पूर्ण पाडाव केला. या काळांतील ग्रंथांचें अवलोकन करतां ब्राह्मणांच्या सच्छील वर्तनाबद्दल तारीफ केल्यावांचून राहवत नाहीं. ... ... ... ... २१८

**सूत्रकालीन परिस्थिति.**—आश्वलायन सूत्रांत इतिहासपुराणांच्या अभ्यासास वेदाध्ययनापेक्षां अधिक महत्त्व दिलें आहे. पशुहननापासून निवृत्ति व्हावी असा भाव स्मार्तधर्माप्रमाणें श्रौतधर्मांतहि दृष्टीस पडतो. ... २१९

पशुहनन यज्ञाखेरीज इतर प्रसंगींहि होत असे. मधुपर्क मांसाखेरीज होत नव्हता. अग्निहोत्र्याच्या और्ध्वदेहिकांत गाय किंवा शेळी मारून तिचे अवयव मृताच्या अवयवांवर ठेवण्याचा विधि आहे. येथें हा स्त्रीपशु किंवा अनुस्तरणी मृताच्या स्त्रीच्या प्रतिनिधिरूप असावी. तथापि पशुयज्ञाविषयींची जुगुप्सा यज्ञकर्माचा पुरस्कार करणाऱ्यांतहि थोडीबहुत उत्पन्न झाली होती. प्रतिमापूजनाचा आरंभ या गृह्यसूत्रांत थोडासा दिसतो. ... ... २२०

आश्वलायन सूत्राच्या काळीं यज्ञ कमी होत चालले होते. ... ... ... ... ... ... ... २२१

श्रौतधर्माचा इतिहास तयार करावयाचा झाल्यास आपणांस साहित्य अनेक प्रकारचें सांपडतें. यज्ञसंस्थेंत उत्सवास धार्मिक स्वरूप दिलें गेलें किंवा उपासनेस खेळ चिकटविले गेले हें नेहमींच सांगतां येण्याजोगें नाहीं. यज्ञसंस्थेच्या कालभागांतील पहिला काल अथर्व्यांच्या अमंत्रक हवनाचा. त्यानंतर क्रियाविभागणीरहित सामुचयिक समंत्रक हवनाचा काळ आला असावा. ... ... ,,

यापुढील ब्रह्माध्वर्युभेदकालांत ब्रह्यांची यज्ञसंस्था राजाश्रयानें व अध्वर्यूंची लोकाश्रयानें चालत असावी. अध्वर्यु हा होत्यांतलाच कमी विद्वान् पण लटपट्या दांडगा वर्ग असावा. त्यानंतर श्रौतधर्माच्या ठाकठिकीचा अध्वर्युकाल आला व त्यानंतरच्या यजुरथर्वैक्यकालांत संहितीकरण झालें. ... ... ... ... ... ... २२२

अंतिम संहितीकरणापूर्वी शुक्लकृष्णांचें भांडण झालें होतें आणि अथर्व व यजू यांचा समेट झाला होता. ... २२२

सत्रें, अश्वमेधादि यज्ञ आणि दैनिक अग्निहोत्र हीं अत्यंत प्राचीन असावींत. सोमयाग ही कृति अध्वर्यूंनीं नवी आणली व तींत सामगायन घातलें. अध्वर्यूंच्या सोमयागाची अनवश्यकता सिद्ध करण्याकरितां ब्रह्यांनीं आतिथ्यधर्म आचरला असतां सोमयागाचें श्रेय मिळतें हें सांगणारें सूक्त निर्माण केलें. अग्न्याधान श्रौतधर्माचा पूर्ण लोप होण्याच्या वेळीं आलें. ... ... ... ,,

अथर्व्यांचा व यजूंचा समेट झाल्यानंतर जीं कर्में लौकिक महत्त्वाचीं होतीं तीं देखील त्रैविद्यांनीं आपल्याकडे खेंचावयास सुरवात केली. ... ... ... २२३

---

## प्रकरण १२ वें.

### वेदकालीन इतिहास—दैवतेतिहास.

यास्काचार्य व सायणाचार्य यांच्यांतील ऋग्वेदीय देवताविषयक मतभेद–पृथ्वीवरच्या देवता, मध्यस्थानासंबंधीं देवता, मध्यस्थानाः देवगणाः, मध्यस्थानाः स्त्रियः द्युस्थानदेवताः ... ... ... ... ... ... २४५

ऋग्वेद आणि अथर्ववेद या दोहोंत मिळून एकंदर ५२७ पृथक् देवता आल्या आहेत त्यांचीं नांवें. ... २४६

देव, स्वर्ग, निर्वाण इत्यादिकांचें विवरण ज्या शास्त्रांत येतें तें परमार्थसाधनशास्त्र. मनुष्याच्या डोळ्यासमोर असणाऱ्या निरनिराळ्या नैसर्गिक शक्ति व वस्तू यांची उपपत्ति लावण्याचा प्राचीन कालीं मानवी बुद्धीनें जो प्रयत्न केला तोच अतिमानुष सृष्टिविषयक कथांचा उगम होय. वैदिक देवतांचीं कृत्यें किंवा स्वभाव यांतील मूळ नैसर्गिक बीजें हुडकून काढणें फार अवघड आहे. ... २४९

वैदिक दैवतेतिहासांत पारमार्थिक समजुतींच्या विकासाची प्रथमावस्था दृष्टीस पडते. देव आणि त्याचें नांव या दोघांचा भौतिक आधार अत्यंत पारदर्शक आहे. नैसर्गिक दृग्विषय व घटना हीं सर्व सचेतन व दैवी आहेत अशी प्राचीन काळापासून चालत आलेली श्रद्धा वैदिक दैवतसृष्टीच्या बुडाशीं आहे. ... ... ... ,,

वेदांतील देव अत्यंत बलवान् पण माणसेंच आहेत. भौतिक शक्तींचें व घटनांचें हें मानवीकरण निरनिराळ्या प्रसंगीं निरनिराळ्या प्रमाणांत झालेलें दिसतें. बऱ्याच देवांचें मूळ एकच देवता असून तिच्या गुणवाचक नांवांनां स्वतंत्र व्यक्तींचें अस्तित्व अध्यारोपानें प्राप्त होऊन अनेक देव झाले. ... ... ... ... २५०

वैदिक देवासुरकथांचा प्रधान सांठा म्हणजे ऋग्वेद. ऋग्वेदमंत्ररचनाकालावरोवर निसर्गघटनांवर मानवी गुणांचा अध्यारोप करण्याची प्रवृत्ति वाढत जाऊन तिच्यामुळें बहुदेवतामतांतून एकेश्वरवादी व थोड्याबहुत प्रमाणानें 'सर्वत्र ईश्वरवादी' मत उदयास आलें. ऋग्वेदांत पिशाचवर्ग व मरणोत्तरस्थिति यांसंबंधीं पुरेशी माहिती नाहीं. दैवतेतिहासांत सामवेदास कांहींच महत्त्व नाहीं. ... ... ... ... ... ... ... ,,

अथर्ववेदांत असुरपिशाचादि वर्गासंबंधानें भरपूर माहिती आहे. तथापि प्राचीन ऋग्वेदांत सांपडत नाहीं अशी महत्त्वाची देवकथा यांत क्वचितच आढळते. कृष्णयजुर्वेदांत केवळ १०३ देवतांचाच उल्लेख येतो त्यांची यादी. ... ... ... ... ... ... ... २५१

यजुर्वेदांत देवांपेक्षां विधींचें महत्त्व अधिक असल्यानें दैवतविषयक माहिती त्यांत फारच थोडी सांपडते. ... २५२

ब्राह्मणग्रंथांत प्रजापति हा मुख्य देव मानलेला आहे; तसा तो ऋग्वेदांत नाहीं. ब्राह्मणांत सर्वत्रेश्वरी मत विशेष असंदिग्ध रीतीनें मांडलेलें आहे. ... ... ,,

या कालांत अतिमानुष कोटींतील व्यक्तींमध्यें देव व असुर हे दोन परस्परविरोधी वर्ग झाले. ब्राह्मणांमध्यें मुख्य विषयाच्या स्पष्टीकरणार्थ प्राचीन व्यक्तींविषयींच्या अनेक कथा घातल्या आहेत; संहितांत यांपैकीं थोड्यांचाच उल्लेख आढळतो. ... ... ... ... ... २५२

वैदिक वाङ्मयांत वर्णिलेल्या गोष्टी खरोखर घडलेल्या नसून त्या केवळ कवींच्या प्रतिभेंतून निघालेल्या कल्पना आहेत; या कवींची निसर्गाकडे पाहण्याची दृष्टि आपणांहून भिन्न होती. भिन्नदेशीय कथांतील नामसाम्यावरून बसविलेलीं ऐक्यें आतां कोणी बरोबर धरून चालत नाहीं. ... ... ... ... ... ... ... ,,

वैदिक वाङ्मयांतील देवदेवतांच्या गुणांचें व कृतींचें यथातथ्य वर्णन करण्यास भारतीय वाङ्मयांत उपलब्ध होणाऱ्या माहितीपासूनच आरंभ करावा. ... ... २५३

एखाद्या कथेंत ज्या गोष्टींचा उल्लेख वारंवार येतो त्या मूलभूत समजाव्या. देवतेचे प्रधान गुण ठरवितांना उसने लावलेले गुण वगळले पाहिजेत. कोणत्याहि भागाचा पुराव्याच्या दृष्टीनें उपयोग ठरवितांना तो भाग ज्या सूक्तांतील असेल त्या सूक्तांचा काळ लक्षांत घेतला पाहिजे. ब्राह्मणग्रंथांत कल्पनेच्या भराऱ्या बऱ्याच मारल्या आहेत.... ... ... ... ... ... ,,

कोणत्याहि प्राचीन कथेसंबंधानें वेदांतील अंतर्गत पुरावा नीट तपासून व त्याला उत्तरकालीन भारतीय वाङ्मयांत आढळणारी पोषक माहिती मिळवून नंतर भारतीय दैवतेतिहासाशीं सदृश असा जो इराणी लोकांचा दैवतेतिहास त्याचा उपयोग वैदिक कथा नीट समजण्यासाठीं करावा. ... ... ... ... २५४

इंडोयूरोपीय कालासंबंधीं सिद्धांत काढण्यासाठीं संशोधनाच्या पहिल्या उत्साहांत पुष्कळशीं नामसादृश्यें एकत्रित केलीं गेलीं. हीं सादृश्यें प्रथम जरी बहुतांनीं मान्य केलीं तरी यांतील पुष्कळशीं आतां अमान्य झालीं आहेत. ... ... ... ... ... ... ... ,,

**इन्द्र.**–इन्द्रास कोणी आकाशाची, कोणी निरभ्र आकाशाची, कोणी अभ्राच्छादित आकाशाची तर कोणी अंतरिक्षांतील देवता मानतात. ... ... ... ... २५५

इन्द्र वादळाचा देव आहे. वादळाचा चमत्कार अंतरिक्षांत होतो. अंतरिक्षाची कल्पना स्वर्ग व पृथ्वी यांच्यानंतर उत्पन्न झाली. ... ... ... ... २५६

इन्द्राच्या बापाचें नांव द्यु व आईचीं पृथ्वी, ढग, अदिति अशीं निरनिराळीं नांवें उल्लेखिलेलीं आढळतात. परंतु हे उल्लेख अगदींच त्रोटक व उडत उडत आहेत. ,,

इन्द्र व वृत्र या दोहोंच्याहि कल्पनांचे उगम सारखेच अनिश्चित आहेत. यास्कानें त्यांच्या व्युत्पत्ती अनेक प्रकारें दिल्या आहेत. ... ... ... ... ... २५८

इन्द्राच्या विरुद्ध लढणाऱ्या राक्षसांबद्दल अगदींच त्रोटक उल्लेख आले आहेत. ते राक्षस पाऊस चोरणाऱ्या जातींपैकीं आहेत कीं दुसऱ्याच कोणत्या तरी बाबतींत मनुष्यांनां हानिकारक आहेत हें नीट समजत नाहीं. ... ,,

इन्द्र अंतरिक्षांतील पावसाला अडवून धरणाऱ्या भूतपिशाचांचें निर्दालन करतो. पावसाच्या धारा ह्या

कवींनीं गाई कल्पिलेल्या आहेत. ह्या गाई सोडविण्यासाठीं इन्द्राला देवांकडून धाडण्यांत येतें. वृत्र हा पाऊस लपवून ठेवणाऱ्यांत प्रमुख आहे. ढगांना कोठें दैत्य, कोठें पर्वत तर कोठें दैत्यांचे किल्ले म्हटलेलें आहे. ... २६१

त्रित हें इन्द्राचेंच पर्यायनाम असावें असें मानण्यास आधार मिळतो, पण त्याच्या विरुद्धहि दुसरे कांहीं दाखले सांपडतात. त्रित हा गृत्समद गोत्राचा मूळ पुरुष असावा असेंहि कांहीं उताऱ्यांवरून वाटतें. ... ... ... २६४

त्रित हा इन्द्रापेक्षांहि प्राचीन असा वादळाचा देव असून इन्द्रसंप्रदायापुढें तो मागें पडला असावा. ... २६५

इन्द्र व त्रित यांनीं मारलेल्या विश्वरूपाचें वर्णन पर्शुभारतीयकालीन आहे, फक्त नांव मात्र भारतीय आहे. त्वष्टा विश्वरूपाचा बाप होता ही कल्पनाहि भारतीयच आहे. ... ... ... ... ... २६६

वेदकालीन इन्द्राला सायण एक आदित्य मानतात, परंतु तें बरोबर दिसत नाहीं. ... ... ... ... ,,

आदित्य हे देवांचे व मानवांचे कायदे करणारे व न्याय देणारे आहेत. पण ते रक्तपाताच्या विरुद्ध असल्यामुळें इन्द्रासारखा धडाडीचा वीर न्यायाचा पुरस्कर्ता बनला. वरुणाखेरीज इतर आदित्यांना फारसें महत्त्व नसल्यानें सर्व आदित्यांत वरुणाचाच इन्द्राशीं ज्यास्त संबंध येतो. ... ... ... ... ... २६८

वरुणाचें निवासस्थान आकाशांत असून तो वारिधारांना पृथ्वीतलावर सोडतो तर इन्द्राचें निवासस्थान अंतरिक्षांत असून तो राक्षसांच्या कचाट्यांतून वारिधारांना मुक्त करतो. हे दोन्हीहि देव संतति व संपत्ति देणारे आहेत. ... ... ... ... ... ... ,,

तथापि या दोन देवतांच्या स्वभावांतील सादृश्यापेक्षां विसंगतपणाच ज्यास्त मनोरंजक व महत्त्वाचा आहे. ... २६९

पूर्वी वरुण सर्वसत्ताधीश होता, परंतु त्याची जागा नंतर इन्द्राला मिळाली. कारण, युद्धप्रिय राष्ट्राला युद्धदेवताच मान्य होणार.... ... ... ... ... ,,

ज्यावेळेस नरयज्ञ होत त्यावेळीं वरुणदैवत प्रधान असावें, ऋग्मंत्रांच्या संग्रहकालीं इंद्रदेवता प्रधान होती व यज्ञसंस्था अत्यंत विकसित झाली तेव्हां प्रजापति ही मुख्य देवता झाली. ... ... ... ... ... ,,

इंद्रानें दैत्यांवर ज्या अनेक मोहिमी केल्या त्यांत त्याला वादळांचे देव जे मरुत् त्यांचें फार साहाय्य असे. ... ... ... ... ... ... ... २७१

वायूचा मरुतांशीं अथवा वादळाच्या देवतांशीं क्वचितच संबंध येतो हें विलक्षण दिसतें. ... ... २७२

पर्शुभारतीय कालापासून आर्यन् लोकांस सोम वनस्पतीपासून रस काढण्याची कला अवगत होती. सोमरसपानाचा हक्क इन्द्राइतका कोणत्याहि देवतेस नाहीं. सोमास पुरुषाकृति मिळाल्यावर त्याचा इन्द्राशीं ज्यास्त निकट संबंध आला. ... ... ... ... २७२

शारीरिक पराक्रमासाठीं ज्याप्रमाणें सोमरसाशीं इन्द्राचें साहचर्य जोडण्यांत आलें त्याचप्रमाणें बौद्धिक सामर्थ्य वाढण्यासाठीं इन्द्राचें बृहस्पतीशीं साहचर्य जोडण्यांत आलें आहे. ... ... ... ... ... २७३

इंद्रानें गंधर्वांच्या ताब्यांत असलेला अंतरिक्षांतील वारिसंचय सोडविला ही एक किंवा गंधर्वांनीं सोमरसाचें अथवा वारिधारांचें दैत्यांपासून संरक्षण करून इंद्रास त्यांचा सुगावा लावून दिला ही एक अशा दोन कल्पना गंधर्वांसंबंधीं आहेत. ... ... ... ... ... ,,

अग्नि हा देव व मनुष्य यांतील प्रतिहारी असल्यामुळें इतर देवांप्रमाणेंच त्याचा इंद्राशींहि संबंध येतो. त्याचप्रमाणें अग्नि हा अंतरिक्षांत विद्युल्लतेच्या रूपानें वसत असल्यामुळें वृत्रहननाच्या वेळीं तो इंद्रास मदत करतो. २७४

विष्णु हा सर्वांना नवजीवन देणारा एक रक्षणकर्ता आदित्य आहे. तो व इंद्र हे समानशील असल्यामुळें त्यांचें परस्पराशीं सख्य आहे. ... ... ... ... २७५

त्वष्ट्यानें इंद्राकरितां वज्र तयार केलें; पण इंद्र त्वष्ट्याचा सोमरस बलात्कारानें पिऊन टाकतो. ... २७६

त्वष्ट्याप्रमाणेंच ऋभू हेहि कुशल कारागीर असून ते इंद्राचा रथ व घोडे तयार करतात.... ... ... २७७

इंद्र वसूंचा अग्रणी होता असें मानण्यास मुळांत कोठें चांगलासा पुरावा सांपडत नाहीं. ... ... ,,

वेदकालीन आपआपसांतील लढायांत प्रत्येक टोळीनें, कुळानें किंवा जातीनें इन्द्रानें आपल्यालाच साहाय्य करावें अशी याचना केलेली आढळून येते. गाणारा कवि विरुद्ध पक्षाच्या लोकांना दैत्य मानीत असे. ... ... ,,

पर्वत हा डोंगरांचा पूर्वज असून ढगांचा अधिपति होता. ... ... ... ... ... ... ... २७८

जगाची रचना इन्द्रानें आपल्या पराक्रमानें स्थिरस्थावर केली या कल्पनेपासून पुढें त्या जगाची उत्पत्तीहि इन्द्रानेंच केली अशी कल्पना परिणत झाली. ... ... ,,

वेदकालीन धन म्हणजे गुरें. हीं गुरें व परकीयांशीं झगडण्यासाठीं बरींचशीं मुलें त्या काळचे लोक इन्द्रापाशीं मागत. लढाईच्या प्रसंगींच नव्हे तर शांततेच्या काळांत सुद्धां इन्द्र मनुष्यांस साहाय्य करतो.... ... २७९

पूषन् हा सर्वांचा रक्षणकर्ता आहे ह्या समजुतीमुळें त्याचा इन्द्राशीं संबंध येतो. ... ... ... ... २८१

इन्द्र व अश्विनी यांचें साहचर्य ऋग्वेदांत तितकेंसें निकट नसल्यामुळें तें अश्विनींबद्दलच्या अर्वाचीन कल्पनांवरून बनलेलें असावें.... ... ... ... ... २८१

इन्द्राला ज्याप्रमाणें मानवी आकार दिलेला आहे त्याप्रमाणें इतर कोणत्याहि देवाला दिलेला आढळत नाहीं. ... ... ... ... ... ... ... २८२

**वरुण.**—मित्र व वरुण यांची नेहमीं जोड घालून दिलेली असते. मित्र ही आदित्यदेवता आहे व वरुण

हें नांव सर्वव्यापि आकाशाला दिलें गेलें असावें असें सामान्य मत आहे. वरुण ही देवता इंडो-इराणी काळांतील आहे. अवेस्तांतील अहुरमझ्द हा गुणांच्या दृष्टीनें वरुणाशीं एकरूप आहे. वरुण शब्द वृ या धातूपासून निघाला असावा. ... ... ... ... ... २८५

**अग्नि.**—अग्नि हा इंडो–यूरोपीय शब्द आहे. इंडो-इराणी काळांत तो यागयोग्य अग्निदेव बनला. वीज, काष्ठजन्य अग्नि इ. हीं त्याच अग्नीचीं निरनिराळीं रूपें मानलीं जात असावीं. हा शब्द संस्कृत अज् (लॅटिन व ग्रीक ॲगो) या धातूपासून निघाला असावा. अपांनपात्, तनूनपात्, नराशंस हीं अग्नीचीं कांहीं नांवें आहेत.... ... ... ... ... ... ... २९०

**सोम.**—एक मत असें आहे कीं, ऋग्वेदांत सोम याचा देव या नात्यानें चंद्र असा अर्थ आहे व देव नसतां त्याचा अर्थ सोमलता किंवा सोमरस असा आहे. उलटपक्षीं असें म्हणतात कीं ऋग्वेदांतील कवींचा सोमदेव म्हणजे मानवी गुणांनीं युक्त असा सोमरस किंवा सोमलता होती. इंडो-इराणी काळांत सोम (हओम) तयार करीत असत व त्याची देव म्हणून उपासनाहि होत असे. उत्साह व उल्हास उत्पन्न करणारें असें हें देवलोकींचें पेय आहे ही कल्पना इन्डो-यूरोपीय कालांतली असू शकेल. सोम=हओम हा शब्द सु=हु धातूपासून बनला असून तिचा पिळणें किंवा ठेंचणें असा अर्थ आहे. ... ... ... ... ... ... ... ३०१

**द्यौ.**—हा इंडो-यूरोपीय काळांतील देव आहे. द्यौ (आकाश) याला तेव्हांचे लोक सर्व देवतांत श्रेष्ठ असा पिता मानीत असतील. वैदिक द्यौस्=ग्रीक झ्यूस. हा शब्द दिव् (प्रकाशणें) या धातूपासून निघाला. ... ३११

**मित्र.**—मित्र हा दिवसाचा व वरुण हा रात्रीचा देव होता या ब्राह्मणग्रंथांतील कल्पनेचें बीज ऋग्वेदांत सांपडतें. वैदिक मित्र (=इराणी मिथ्र) ही सूर्यदेवता आहे. मित्र याचा मूळ अर्थ स्नेही किंवा सुहृद् असा असावा. ... ... ... ... ... ... ३१२

**विष्णु.**—विष्णु ही देवता ऋग्वेदांत गौणच मानलेली आहे. विष्णूच्या वामन व वराह या दोन अवतारांचें बीज ऋग्वेदांत सांपडतें. मत्स्य व कूर्म या दुसऱ्या दोन अवतारांचें मूळ शतपथब्राह्मणांत आहे. ... ... ३१३

**आदित्य.**—ऋग्वेदांत आदित्यदेवता ज्यास्तींत ज्यास्त सहा दिल्या असून मित्र, अर्यमन्, भग, वरुण, दक्ष व अंश हीं त्यांचीं नांवें आहेत. अथर्ववेदांत हे अदितीचे पुत्र आठ आहेत. शतपथ ब्राह्मणांत त्यांची संख्या बारा दिली असून त्यांनां बारा महिन्यांचे निदर्शक म्हटलें आहे. इराणी अमेषस्पेंतांची संख्या सात आहे. अर्यमाचा उल्लेख अवेस्ता ग्रंथांत आला आहे. वैदिक भग=इंडो-इराणी बघ=इंडो-यूरोपीय बोगू. वैदिक विवस्वन्=इंडो-इराणी विवङ्हन्त. ... ... ३१४

**सूर्य.**—सूर्य याचा अर्थ निसर्गदृष्ट सूर्यबिंब असा असल्यानें सूर्यदेव हा आदित्यदेवतांमध्यें सर्वांत अधिक प्रमाणानें जड निसर्गाशीं संबद्ध आहे. सूर्य याची व्युत्पत्ति वैदिक स्वर् (=अवेस्ती हर्) शब्दापासून निघते. ... ३१६

**सविता.**—सविता हा शब्द सू म्हणजे उठविणें, चेतना देणें या धातूपासून निघाला. सविता हें विशेषण प्रथम सूर्याला लावलें जात असावें व पुढें सूर्यापासून हें विशेषण विभक्त होऊन त्यांत दर्शविलेल्या गुणांची वेगळी देवता बनली असावी.... ... ... ... ... ३१७

**पूषन्.**—पूषा हा निसर्गांतील एखाद्या घटनेचा प्रतिनिधिभूत देव आहे असें निःसंशय म्हणवत नाहीं; तथापि सूर्याचा व त्याचा निकट संबंध असावा एवढें मात्र स्पष्ट दिसतें. तो मनुष्य व गुरेंढोरें यांचें रक्षण करून व मनुष्यांनां परलोकीं जीं आनंदस्थानें आहेत तेथें पोंचवून मनुष्यांचें कल्याण करतो. पूषन् हा शब्द पुष्=भरभराट करणें या धातूपासून निघाला.... ... ३१९

**मरुत्.**—ऋग्वेदांत मरुत् हा शब्द केवळ वायु या अर्थी कोठेंहि वापरलेला नाहीं. ऋग्वेदकालीन मरुतांत वायु, विद्युत् व मेघ यांच्या गुणांचें मिश्रण आढळत असल्यानें यूरोपीय पंडित त्यांनां ऋग्वेदांतील तुफानदेवता मानतात. हा शब्द मर् म्ह० प्रकाशणें या धातूपासून बनला असावा.... ... ... ... ... ३२०

**रुद्र.**—रुद्राचा संबंध कोणत्या भौतिक चमत्काराशीं आहे हें नीट समजत नाहीं. ही देवता तुफानांतील विजेच्या योगानें होणाऱ्या संहाराची भयानक बाजू दाखवीत असावी. रुद्र शब्दाची व्युत्पत्ति प्रायः रुद् म्हणजे ओरडणें या धातूपासून लावण्यांत येते. ... ३२३

**अदिति.**—अदितीचें मातृत्व व शारीरिक यातना आणि नैतिक दोष यांच्या बंधनांपासून मुक्त करणारी तिची शक्ति हीं तिचीं दोन वैशिष्ट्यें दिसून येतात. ऋग्वेदांत अनेक ठिकाणीं वरुणादि आदित्यांनां लाविलेलें 'अदितेः पुत्राः' हें विशेषण वेदपूर्वकालीं 'स्वातंत्र्याचे पुत्र' (दा=बांधणें) याच अर्थी केवळ त्या देवांचा प्रधान गुण दाखविण्यासाठीं योजिलें असावें व त्यावरून पुढें अदिति हें त्या देवांच्या मातेचें नांव बनलें असावें. ३२५

**दिति.**—दिति हा शब्द ऋग्वेदांत तीन वेळां आला आहे, पण त्यांपैकीं कोणत्याच ठिकाणीं त्याचा दैत्यमाता हा वेदोत्तरकालीन अर्थ संभवत नाहीं. ... ... ३२६

**वायु–वात.**—ऋग्वेदांत वायु ही मुख्यत्वेंकरून देवता आहे व वात हें पंचमहाभूतात्मक तत्त्व आहे व म्हणूनच त्यांत वायूचें साहचर्य इन्द्राशीं कल्पिलें आहे, तर वाताचें पर्जन्याशीं कल्पिलें आहे.... ... ... ३२७

**अश्विन्.**—या देवतांचा कोणत्या विशिष्ट सृष्टिव्यापाराशीं संबंध आहे तें कळत नाहीं. अश्विन् हे दुःख-

पीडितांनां त्वरित येऊन मुक्त करणारे आहेत. अश्विनांचें नांव भारतीय असलें तरी त्यांची कल्पना इंडो-यूरोपीय काळांतील असावी. ... ... ... ... ... ३२७

**उषा.**—उषा देवतेवर मानवगुणाध्यारोप फार अल्प प्रमाणांत केलेला आहे. निसर्गाचें काव्यमय वर्णन या दृष्टीनें ऋग्वेदांतील उषासूक्तें हीं अत्यंत बहारीचीं आहेत. उषा हा शब्द वस्=प्रकाशणें या धातूपासून झालेला आहे. ... ... ... ... ... ... ... ३२९

**त्रितआप्त्य.**—सोम व त्रित यांचा परस्परसंबंध पर्शुभारतीय काळापासून होता. त्रित हा शब्द संख्यावाचक असावा किंवा तृ धातूपासून सिद्ध झाला असावा. आप्त्य हा आप् म्हणजे पाणी या शब्दापासून बनला आहे. त्रित=पर्शुभारतीय थ्रित व आप्त्य=पर्शुभारतीय आथ्व्य. त्रित या देवतेचें प्राथमिक रूप हुबेहुब इन्द्रासारखेंच होतें. पुढें हळूहळू इन्द्रानें त्रिताची जागा पटकावली असें कोणी म्हणतात.... ... ... ३३०

**अजएकपाद्.**—अजएकपाद् ही एक वायव्यदेवता असली पाहिजे. याला कोणी तुफानाची देवता, कोणी चंद्रदेवता, कोणी सूर्यदेवता तर कोणी लाक्षणिक अर्थी विद्युत् म्हणतात. ... ... ... ... ... ३३१

**मातरिश्वन्.**—ऋग्वेदांतील मातरिश्वन् हें द्युलोकस्थ अग्नीचें व्यक्तित्व आरोपिलेलें एक रूप आहे. मेघांतील वीज हें त्याचें स्वरूप असावें. श्वि=फुगणें हा श्वन्मधील धातु असावा. उत्तरकालीन वाङ्मयांत मातरिश्वन् हें वायूचें नांव मानलें आहे. ... ... ... ... ३३२

**आपदेवता.**—आपः यांच्या ठिकाणीं व्यक्तित्वारोप केलेला जो सांपडतो तो अगदीं प्राथमिक स्वरूपाचा आहे. ३३३

**पर्जन्य.**—ऋग्वेदांत पर्जन्य हा शब्द गडगडणाऱ्या पावसाच्या ढगाचा वाचक व त्याच्या सगुणत्वाचें विशेषनाम आहे. त्याचा वाताशीं निकट संबंध आहे .... ३३४

**अपांनपात्.**—ही देवता पर्शुभारतीय कालांत पडते. अपांनपात् हा मेघाच्छादित असें अग्नीचें विद्युद्रूप असावेंसें दिसतें. तथापि याविषयीं यूरोपीय विद्वानांचें एकमत नाहीं. कारण त्यास कोणी जलदेवता, कोणी चंद्र व कोणी सूर्यहि मानतात. ... ... ... ... ३३५

**अहिर्बुध्न्य.**—जरी अहिर्बुध्न्य हा अपांनपाताच्या सदृश असा देव मानण्यांत येतो तरी तो मुळांत अहिवृत्रापेक्षां निराळा नव्हता. ... ... ... ... ३३६

**सरस्वती.**—ऋग्वेदांत सरस्वतीला नदीदेवता इतकेंच मानलेलें आहे; पण ब्राह्मण ग्रंथांत तिला वाणी असें म्हटलें असून वेदोत्तरकथांत तिला वाग्देवता, बुद्धिदेवता मानली आहे व ब्रह्याची पत्नी म्हटलें आहे. ... ३३७

**पृथिवी.**—ऋग्वेदांतल्या पृथ्वींतील बहुतेक गुण सामान्य जड पृथ्वीच्या गुणांसारखेच आहेत. पृथिवी या शब्दाचा अर्थ विस्तृत असा असून तो प्रथ धातूपासून बनला आहे. ... ... ... ... ... ३३७

**बृहस्पति.**—ही देवता शुद्ध भारतीय आहे. बृहस्पति हें अग्नीचेंच एक रूप असून ऋग्वेदकालीं त्याला स्वतंत्र देवतेचें स्वरूप प्राप्त झालें असावें. ... ... ... ,,

**स्त्रीदेवता.**—वैदिक उपासनेंत देवींचा दर्जा कनिष्ठ आहे. विश्वचालक म्हणून त्यांनां क्वचितच मानण्यांत येतें. ... ... ... ... ... ... ... ३३८

**ऋभुदेव.**—ऋभुक्षन्, वाज आणि विभ्वन् असे तीन ऋभू आहेत. ऋभु हा शब्द रभ्=ग्रहण करणें या धातूपासून बनला. असा एक संभव आहे कीं, ऋभू हे प्रथमतः भूपृष्ठावरील किंवा अंतरिक्षांत संचार करणारे वनदेव असावेत व त्यांची कार्यकुशलता जसजशी वाढत गेली तसतशा त्यांच्या चातुर्याच्या अनेक आख्यायिका प्रचलित झाल्या असाव्यात. ... ... ... ... ३३९

**अप्सरा.**—अप्सरा ही एक जलसंचारी स्वर्गीय देवता असून ऋग्वेदकालींच ती गंधर्वपत्नी मानली गेली होती. ऋग्वेदांत उर्वशी या एकाच अप्सरेचें नांव आढळतें. ... ... ... ... ... ... ३४१

**गंधर्व.**—ही इंडो-इराणी काळांतील कोणी एक व्यक्ति असून तिजपासून पुढें गंधर्वकुल तयार झालें असावें. गंधर्वासंबंधीं निरनिराळ्या पंडितांकडून निरनिराळे तर्क व्यक्त झाले आहेत. देव आणि गंधर्व यांतील वैर फार पुरातन दिसतें. गंधर्व हे स्वर्गांतील गायक आहेत ही वेदोत्तरकालीन कल्पना ऋग्वेदांत सांपडत नाहीं. ... ३४२

**इष्टदेवता.**—वास्तोष्पति ही एक गृहदेवता आहे. 'क्षेत्रस्यपति' ही शेताची अधिदेवता आहे. सीता ही तासाची देवता असून तिचा इंद्रपत्नी म्हणून उल्लेख आला आहे. ३४३

**देवतायुग्में.**—मूळच्या दोन स्वतंत्र देवतांची एक जोडदेवता कल्पून तिची स्तुति करणें हा वैदिक उपासनेचा एक प्रकार आहे. बहुतेक जोड्यांत एकाचे गुण व कृत्यें त्याच्या जोडीदारावरहि लादण्यांत येतात. ... ३४४

**देवतासंघ.**—वैदिक दैवतेतिहासांत कांहीं कमी अधिक स्पष्ट देवतासंघ असून ते कोणत्या तरी एका विशिष्ट देवाशीं संबद्ध असतात. ... ... ... ३४५

**भावमूलक अगर क्रियामूलक देवता.**—प्राचीन इराणीलोकांच्या ग्रंथांत भावमूलक देवतांस प्राधान्य दिलें आहे, पण भारतीय दैवतेतिहासांत भावविषयक देवतांस प्राधान्य नाहीं. ... ... ... ... ३४६

वेदांतील देव इतर कोणत्याहि इंडो-यूरोपीय लोकांच्या देवांपेक्षां त्यांच्या पायाभूत भौतिक घटनांशीं अधिक जवळ असल्यामुळें त्यांच्यामध्यें व्यक्तित्वाची अस्पष्टता अथवा अभाव दिसतो. स्वतंत्रदेवबाहुल्य हें ऋग्वेदांत खरोखरीनें नसून तसा भास मात्र होतो. ... ... ३४६

वैदिक कवींच्या दृष्टीनें देवतांनां जन्म होता. ऋग्वेदामध्यें देव हे प्रथम अमर नव्हते असें सुचविलें आहे.

---

## प्रकरण १३ वें.

### वेदकालीन इतिहास–यज्ञसंस्थेचा अधिक इतिहास.

**ब्रह्मा.**—सर्वांवर देखरेख ठेवणारा जो ब्रह्मा नामक ऋत्विज त्याचें कार्य मुख्यत: स्तुति करण्याचें असावें. परंतु इतरहि यज्ञविषयक कार्यें तो करीत असे. हवन किंवा स्तवन हीं दोन्हीहि कार्यें ब्रह्मेच करीत. हवन करणें, देवांनां बोलावणें किंवा त्यांची स्तुति करण्याचें काम करणें या गोष्टी करणाऱ्या व्यक्ती पृथक् पृथक् होत्या असें दिसून येत नाहीं.... ... ... ... ... ३८६

यज्ञसंस्था जसजशी वाढत गेली तसतसें ऋत्विजाचें सामान्य स्वरूप जाऊन त्यास विशिष्ट स्वरूप प्राप्त झालें व त्यामुळें संहितीकरण अधिक सहेतुक व अधिक नेटानें होऊं लागलें. ऋग्वेदरचना झाली तिच्यापूर्वीं हौत्राच्या अनेक पद्धती प्रचलित असल्यामुळें ऋग्वेदाची रचना हौत्रानुसार न करतां निराळ्याच रीतीनें केली. ... ३८८

वैदिक वाङ्मयाचा तौलनिक अभ्यास करून त्याच्या साहाय्यानें ब्राह्मणजातीचा व सामाजिक चळवळींचा इतिहास निर्माण करण्यास परिशिष्टांतील कोष्टकें उपयोगीं पडतील. एकाच ऋचेचे दोन भिन्न विनियोग असतील तर ते दोन्ही विनियोग नवीन असण्याचा संभव आहे. जेथें दोन्ही विनियोग एकच आहेत तेथें ती क्रिया जुनी असावी अथवा एकाची क्रिया व मंत्र दुसऱ्यानें घेतले असावे.... ३८८

---

## प्रकरण १४ वें.

### अतींद्रियस्थितीसंबंधानें कल्पना.

ऋग्वेदमंत्ररचनाकालीं दहन करणें व जमिनींत पुरणें या दोन्ही प्रकारांनीं प्रेताची व्यवस्था करण्याची वहिवाट रूढ होती. अग्नीच्या धुराबरोबर मृत मनुष्य दिव्य लोकांत जातो अशी समजूत होती. मृत मनुष्याबरोबर वस्त्रें भूषणें दिलीं जात. पतीच्या शरीराबरोबर त्याच्या पत्नीला व शस्त्रास्त्रांनां जाळण्याची पद्धत होती असें दिसतें ... ... ... ... ... ... ३८९

मृताचा आत्मा अमर्त्य आहे व मरणोत्तर स्थिति ही देहयुक्त स्थिति असते अशी समजूत होती. आत्मा शरीरांतर करतो ही कल्पना केवळ बीजरूपानेंच ऋग्वेदांत सांपडते. ... ... ... ... ... ... ३९०

मृताचा आत्मा शाश्वत प्रकारच्या लोकांत जातो, आत्मा द्युलोकांत गमन करतो तेव्हां तो आपल्या घरीं परत येतो अशी कल्पना आहे. ... ... ... ,,

पितर आणि यम राहतात ती जागा आकाशाच्या मध्यभागीं आहे; कडक तपश्चर्या करणारे, लढाईंत प्राण देणारे वीर व यज्ञांत उदारपणानें दक्षिणा देणारे यांनां स्वर्ग मिळतो; स्वर्गामध्यें मृताला आनंदमय जीवनक्रम लाभतो. ... ... ... ... ... ... ३९१

इहलोकीं केलेल्या दुष्कर्मांबद्दल पुढच्या लोकीं शिक्षा मिळते ही कल्पना ब्राह्मणकालापूर्वीं स्पष्टपणें व्यक्त झालेली नाहीं. नरक म्हणजे पृथ्वीखालीं असणारा अंधकाराचा खड्डा आहे अशी कांहीं तरी तत्कालीनांची कल्पना असावी. ३९२

नरकांत यातना भोगण्यास जाण्यासंबंधीं कल्पना भारतांत उत्तरकालीं उद्भवली.... ... ... ... ३९३

जे पुण्यशील मृतलोक तिसऱ्या स्वर्गांत असतात त्यांनां पितर हें नांव आहे. पितरांचें अन्न म्हणजे त्यांनां दिलेले बली होत. पितर हे अमर आहेत. देवांचा मार्ग व पितरांचा मार्ग हे वेगळे आहेत. ... ... ... ,,

सुखसंपन्न मृतांचा मुख्य यम होय. त्याला मृतांचा राजा म्हटलें आहे, देव म्हटलें नाहीं. ऋग्वेदकालीं यमाची थोडीफार भीतीच वाटत असावी. यम या शब्दाचा ऋग्वेदांत जुळें असा अर्थ आहे. यम हा यमीचा जुळा भाऊ होता. अवेस्तामध्येंहि यम असून त्याला जुळेपणाचा अर्थ आहे. यम हा पुरुष निरनिराळ्या लोकांच्या परंपरागत कथांत आढळतो. ... ... ... ... ... ३९४

---

## प्रकरण १५ वें.

### ब्राह्मणोक्त व सूत्रोक्त यज्ञसंस्थेचें वर्णन.

यज्ञाची पूर्ण कल्पना येण्यास विधींचें ज्ञान अवश्य आहे. सोमयागाची माहिती झाली म्हणजे एकंदर यज्ञसंस्थेच्या बऱ्याच भागाची माहिती होते. कारण इष्टि, पशु, सोमयाग व चयन हे जे यागाच्या प्रकारांमध्यें मुख्यस्वरूपबोधक प्रकार आहेत त्यांपैकीं इष्टि व पशु हे सोमयागांत येत असून चयन त्यास जोडतां येतो. सत्रामध्यें द्वादशाह क्रतूंतीलच अनुष्ठान आलटून पालटून अनेक दिवस चालविण्यांत येतें. ... ... ... ... ३९६

अग्निष्टोम सोमयागांत प्रथम अनुष्ठानारंभ, ऋत्विङ्निमंत्रण, ऋत्विजांचें स्वागत, अग्निसमारोप व यज्ञभूमिप्रवेश, प्राग्वंश मंडप, अग्निस्थापना, दीक्षणीयेष्टि, प्रायणीयेष्टि, सोमक्रय, आतिथ्येष्टि, उपसदिष्टि व प्रवर्ग्योद्वासन हे विधी होतात. ... ... ... ... ,,

नंतर अग्नीषोमीय पशूस सुरुवात होते. त्यांत अग्निप्रणयन, हविर्धानमंडप, आग्नीध्रीय मंडप, वैसर्जन होम, अग्नीषोमप्रणयन, पशुपुरोडाशयाग व अंगयाग, व वसतीवरीपरिहरण हे विधी आहेत.... ... ... ... ३९८

दुसऱ्या दिवशीं म्हणजे सवनीयदिनीं प्रातःसवन, दधिग्रहप्रचार, अंशुप्रचार, सवनीयपशु, शुक्रामंथिप्रचार, ऋतुग्रहप्रचार, माध्यंदिनसवन, विप्रुड्ढोम, तृतीयसवन व पत्नीसंयाज हे विधी होऊन अग्निष्टोमाचें अनुष्ठान समाप्त होतें.... ... ... ... ... ३९९

सत्रापेक्षां लहान पण अग्निष्टोमापेक्षां मोठे असलेल्या यज्ञांचे अहीन व व्यूढ असे दोन प्रकार आहेत. त्यांपैकीं अहीन प्रकारांत द्विरात्र (गर्ग) त्रिरात्र, (आत्रेय) चतूरात्र, पंचरात्र (विश्वजित् सर्वपृष्ठातिरात्र) षड्रात्र, सप्तरात्र, अष्टरात्र, नवरात्र, दशरात्र (प्राजापत्य), एकादशरात्र व द्वादशाह हे यज्ञ येतात. ... ... ... ४०२

यज्ञसंस्थेनें प्राचीन वाङ्मय जिवंत ठेवून आपणांस देशाचा भौतिक व सांस्कृतिक इतिहास लिहिण्यास साहित्य दिलें. ... ... ... ... ... ... ४०८

# ग्रंथशुद्धि.

## ग्रंथ संक्षेप.

| पान | कॉलम | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|---|
| १२ | २ | १ | ...... | प्रकरण १० वें. वैदिक वाङ्मय, ब्राह्मण जाति आणि यज्ञसंस्था. |
| १५ | १ | ३६ | ...... | प्रकरण ११ वें. विषयांतर–वेदोक्त इतिहास व आख्यायिका. |

## मुख्य ग्रंथ.

| पान | कॉलम | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|---|
| ३ | १ | ३८ | जाति | जात |
| १० | १ | २४ | यजुर्मय | यजुर्मैय |
| १० | १ | ३९ | जाणतो पण तो | जाणतो तो |
| १६ | १ | ६ | वरील | ह्या सूत्रांवरील |
| २२ | २ | २४ | इत्यादि जे ऋषी | इत्यादि ऋषि |
| ३४ | १ | ३४ | जनासा | जनास |
| ३४ | १ | ३३ | गुहा कः | गुहाकः |
| ३९ | १ | ८ | शंः | शं |
| ४० | १ | ३८ | †१३ व्या ऋचेवरील... | † १३ व्या. ऋचेवरील भाष्य विंटरनिट्झच्या विधानाशीं विसंगत आहे (संपादक). |
| ४४ | २ | २५ | रिरिच्यां* विचिंद्रहेव् | रिरिच्यां *विचिंद्रहेव् |
| ४४ | २ | २८ | आहे. †मी | आहे†. मी |
| ५१ | १ | ४ | पक्षाचें | पक्ष्याचें |
| ५९ | १ | ६ | आप्सरांचा | अप्सरांचा |
| ६० | २ | ३५ | अपसरणमंत्र | अपसारणमंत्र |
| ६४ | २ | ३५ | दुंदमे | दुंदुमे |
| ६९ | १ | ६ | पूष्पन् | पूपन् |
| ७० | २ | ३९ | Viccititudes | Vicissitudes |
| ७१ | २ | ३६ | अथर्वैवेदाला | अथर्ववेदाला |
| ७३ | २ | ११ | याठिकाणीं संहिता या शब्दाऐवजीं संहिता ब्राह्मण व आरण्यक असें वाचावें. | |
| ८५ | १ | ३१ | | |
| ७९ | २ | २ | त्या | हा शब्द गाळावा. |
| ८७ | २ | ४१ | इश्नीच्या | इष्टीच्या |
| ८९ | १ | ४१ | व्यतिरक्त | व्यतिरिक्त |
| ८९ | २ | ८ | करणावरच | करणारावरच |
| ९१ | १ | ६ | पांढरा व काळा शेळी | पांढरा बोकड व काळी शेळी |
| १०६ | २ | ५ | चांमध्यें | स्रुचांमध्यें |
| ११० | २ | १० | उपाधान | उपधान |
| ११२ | १ | ५ | घर्मधुवाव्हान | घर्मधुगाव्हान |
| ११५ | १ | ६ | ब्रह्मापासून | ब्रह्मयापासून |
| १२० | २ | ७ | फोंपावून | फोंफावून |
| १२५ | २ | १७ | आकराच्या | आकाराच्या |
| १३२ | २ | ७ | व किंवा | किंवा |
| १४४ | २ | २ | त्वामुज्जेएमिन्द्र | त्वामुज्जेपमिन्द्र |
| १४४ | २ | ६ | रूद्रा | रुद्रा |
| १४५ | २ | ४१ | धूर्वयं | धूर्व यं |
| १४६ | १ | २४ | मोठ्या धान्यपात्रांनां काय म्हणतात ? | मोठें धान्यपात्र कोणतें ? |
| १५० | २ | २१ | अर्वाचीना | अर्वाचीन |
| १५० | २ | २५ | ग्रंथ हा ग्रंथांत | हा ग्रंथ |
| १५० | २ | ३४ | पंक्तिंच | पंक्तिंत |
| १५५ | २ | २० | अग्निहोत्रहवनीय | अग्निहोत्रहवनी |
| १६७ | १ | ३ | उतक्या | इतक्या |
| १६९ | २ | ४०–४४ | ह्या शब्दाचा मूळ... विषय असा झाला | हा उपनिषद् याशीं सदृश इतिहासाचा शब्द आहे. ह्याचा मूळ अर्थ सभा किंवा परिषद् असा आहे. पुढें ह्याचा अर्थ विद्यालयांत किंवा सभेंत दिलेल्या व्याख्यानांचा विषय असा झाला (Reading a kolleg 'hearing a kolleg'). |
| १७२ | २ | २९,३९ व ४२ | सत्त्व | सत्तत्त्व |
| १७३ | २ | ३९ | उपनिषदाप्रमाणेंच | उपनिषदांमध्यें |
| १७५ | २ | ४१ | त्याच्या आत्म्याशीं | त्या आत्म्यापाशीं |
| १७६ | २ | १ | त्याचा | हा शब्द गाळावा |
| १८२ | १ | ८ | धर्मैयवाङ्मयाचा | धर्मवाङ्मयाचा |
| १८८ | १ | ... | मेषसंपात | वसंतसंपात |
| १९९ | २ | १४ | चतुरात्र | चतूरात्र |
| २२५ | १ | २ | आस्तिक | आस्तीक |
| २२५ | २ | २५ | असले | असला |
| २३० | २ | ४३ | जाडे | जुळे |
| २३१ | २ | ३९ | प्रतीनें | पतीनें |
| २३८ | २ | ६ | महार्षींनीं | महर्षींनीं |
| २६२ | २ | १७ | आहे | आहे त्या गुहा, |
| २६२ | २ | ३८ | वृत्रापुढें | वृत्रापुढें उभे |
| २६६ | २ | ८ | चालवून | चालवतो व |
| २६८ | २ | १७ | ऋचेंच | ऋचेंत |
| २७१ | २ | ५ | व (१०,१२८,२)... (६.५१,१५) | (१०.१२८,२) व ...(६.५१,१५). |
| २७१ | २ | २० | २७ | २१ |
| २७१ | २ | २२ | १.१००,५ | वाक्याच्या शेवटीं वाचावें. |
| २७१ | २ | २७ | होते, | होते, कारण |
| २७७ | १ | ७ | ह्याच | च्यवथ्याच |
| २७७ | १ | २० | मिरिॲन्यूस | मिरिॲन्यूस ज्या |
| २७७ | १ | २६ | (३) | हा आंकडा गाळावा. |
| २७७ | २ | १४ | 'स्थान' | कायदे (धाम= कायदे–पेरि) |
| २७८ | १ | १ | जगदुत्पादनानें | जगदुत्पादनामध्यें |
| २७८ | २ | ३४ | परितोषकें | पारितोषिकें |
| २७९ | २ | ३४ | सूर्याच्या | सूर्याची |
| २८० | १ | २७ | असत० ह्या समजुतीस पोषक | असत. ह्या समजुतीच्या दर्शक |

| पान | कॉलम | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|---|
| २८० | २ | ४० | प्रेमळांतला प्रेमक वायांसारखा | प्रेमळांतल्या प्रेमळ वापांसारखा |
| २८१ | १ | १५ | (२.१५,५;४.३०,१७) | (२.१५,५;४.३०,१७;६.४५,१) मध्यें |
| २८१ | १ | १७ | (६.४,५;५.३१,८) | (५.३१,८) मध्यें |
| २८१ | १ | २० | तुर्वति | तुर्वीति |
| २८१ | २ | १ | २.१३,१२, | २.१३,१२; |
| २८१ | २ | ३ | (२.१५,७) (१३,१२; | (२.१५,७;४.३०,१६ताडून पहा) (१३,१२;४.३०,१६ ताडून पहा.) |
| २८१ | २ | २६ | त्याच्या हातीं ते | आपल्या हातीं तो |
| २८४ | २ | १६ | असें म्हटलें आहे. | हे शब्द गाळावे. |
| २८४ | २ | १८ | या." | या" असें म्हटलें आहे. |
| २८६ | २ | ३२ | मित्रासह | मित्रावरुणांनां |
| २८७ | १ | ७ | व | लावतात व त्याला |
| २८७ | १ | ८ | टाकण्यास लावतात; | टाकतात; |
| २८८ | २ | ७ | ऋतावान् | ऋतावन् |
| २९० | १ | ३९ | देवताला | देवतेला |
| २९२ | २ | ४३ | आपत्य | अपत्य |
| २९३ | २ | ५ | सहसः सुनु | सहसः सूनु |
| २९५ | १ | ३३ | उद्दिपित | उद्दीपित |
| २९५ | २ | १३ | दुष्ट | दृष्ट |
| २९८ | १ | ३३ | उशसन | उशनस् |
| २९८ | २ | ३८ | क्रव्यवाहन | कव्यवाहन |
| २९९ | १ | १३ | हें नांव ऋग्वेदांत | हें नांव एकट्या अग्नीलाच दिलें–असून तें ऋग्वेदांत सुमारें |
| २९९ | २ | ८ | प्रकारची देणगी | प्रकारच्या देणग्या |
| २९९ | २ | १५ | अतिथीच्या | अदितीच्या |
| ३०० | १ | ३३ | आपत्ति | संतति |
| ३०० | २ | १७ | अज | अज् |
| ३०१ | २ | ३ | येतो, | येतो (ऋ. ९.८६,४२) |
| ३०१ | २ | १३ | नराशंस,देवानामशंस अशीं रूपें | नरां शंस, देवानां शंस असे प्रयोग |
| ३०१ | २ | १४ | २,३४; | २,३४,६ |
| ३०२ | १ | २३ | पितु, म्हणजे पेय (ऋ. १,१८) | पितु म्हणजे पेय (ऋ. १,१८७), |
| ३०२ | २ | १ | सू | सु |
| ,, | ,, | २४ | लालपिंगट | लाल, पिंगट |
| ३०३ | १ | ४२ | स्वच | त्वच् |
| ३०५ | १ | २४ | क्रंद्र | क्रन्द |
| ३०५ | १ | २४ | वास | वाश् |
| ३०८ | १ | ३७ | पक्षानें | पक्ष्यानें |
| ३११ | २ | २२ | सोमाच्यें | सोमाची |
| ३१२ | १ | ३५ | रितीनें | रीतीनें |
| ३१४ | २ | ५ व ७ | शतपथब्राह्मणांत | शतपथब्राह्मणांतील. |

| पान | कॉलम | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|---|
| ३१५ | १ | १३ | अमेषस्पेंत | अमेषस्पेंतमध्यें |
| ३१६ | २ | ११ | अग्नि आणि यज्ञ याप्रमाणें उषा. | उषा, अग्नि आणि यज्ञ यांच्या प्रमाणें. |
| ३१७ | १ | २१ | चेटके | तो चेटकिणी |
| ३१७ | १ | ३५ | त्यांजकडे | याजकडे |
| ३१७ | १ | ३९ | आहे. | आहे व |
| ३२० | १ | ३५ | करंभाद | करंभाद् |
| ३२२ | २ | १९ | सपक्षनगाचा | अहीचा |
| ३२६ | १ | २९ | दाहा | दहा |
| ३२७ | १ | ४ | वर्णिलेले | वर्णिलेलीं |
| ३२९ | १ | १४ | या कथेशीं | यांशीं |
| ३३२ | २ | ३१ | अंतकरणें | अंतःकरणें |
| ३३२ | २ | ३७ | कालीन मातरिश्वन् | या कालीं मातरिश्वन् |
| ३३३ | १ | १९ | ग्रंथांत | भाषांत |
| ,, | ,, | १४ | अपोदेवींनीं | आपोदेवींनीं |
| ३३७ | १ | ६ | व्यापिले आहेत | व्यापिलें आहे |
| ३३७ | २ | ३० | हीं | हीं त्याचीं |
| ३३९ | १ | ३९ | सौधन्वान | सौधन्वन |
| ३४० | १ | २६ | नसेलेला | नसलेला |
| ३४१ | १ | ४ | सौधन्वान् | सौधन्वन |
| ३४१ | १ | २१ | तसतसा | तसतशा |
| ३४४ | २ | २ | जोडदेवत | जोडदेवता |
| ३४७ | १ | ६ | सूय | सूर्य |
| ३४८ | १ | १५ | उलंघन | उल्लंघन |
| ३५३ | २ | ४० | स स्वत्व | सदस्यत्व |
| ३५५ | १ | १३ | पृथ्वीच | पृथ्वीचा |
| ३५५ | १ | २४ | दुर्योधनानें | दुर्योधनाच्या |
| ३६४ | १ | ३५ | उशतीवर्हिरेदं | उशतीर्वर्हिरेदं |
| ३६४ | २ | २६ | (नामकपात्रांत) | (तन्नामक पात्रांत) |
| ३६४ | २ | ३९ | द्रप्सस्कंदति | द्रप्सस्स्कंदति |
| ३६५ | १ | १४ | यवाशिर | यवाशिर= |
| ३६६ | १ | ३६ | पीतये। | पीतये। ४,३,५. |
| ३६६ | २ | ११ | या प्रत्येकानीं | यांपैकीं प्रत्येकानें |
| ३६६ | १ | २५ | स्विष्टकृत | स्विष्टकृत् |
| ३६६ | २ | १४ | दहि | दहीं |
| ३६८ | १ | २५ | दिससें | दिसतें |
| ३६८ | २ | ३ | देवपत्ता | देवपत्न्या |
| ३७० | १ | ४ | अशी | हा शब्द गाळावा. |
| ३७१ | १ | ३७ | दूधमिश्र | दुग्धमिश्रित |
| ३७१ | १ | ३४ | पृष्टदाज्य | पृषदाज्य |
| ३७२ | ७ | १६ | ० | ५ |
| ३७२ | ७ | १७ | ५ | ३ |
| ३७२ | ७ | १८ | ३ | ० |
| ३७२ | ९ | २२ | ० | १ |
| ३७४ | १ | २१ | १४ | ४४ |
| ३७९ | २ | ५ | क्षमस्य | क्षम्यस्य |
| ३७९ | २ | ३० | बर्हिरस्रौ | बर्हिरग्नौ |

व लोकोपयोगी अशीं विहिरी, तलाव वगैरे बांधणें इत्यादि पूर्त कर्मे करीत राहणें हेंच कायतें पुरुषार्थाचें श्रेष्ठ साधन आहे असें जे मूढजन समजत असतात ते स्वर्गलोकांत कांहीं काळ सुख भोगून पुन्हां या किंवा याहूनहि खालच्या लोकांत जन्माला येतात" (* इष्टापूर्तं मन्यमाना वरिष्ठं नान्यच्छ्रेयो वेदयन्ते प्रमूढाः । नाकस्य पृष्ठे ते सुकृतेऽनुभूत्वेमं लोकं हीनतरं वा विशन्ति ॥ )

वेदामध्येंच असणाऱ्या ज्ञान व कर्मकांडविषयक दोन विभागांपैकीं ज्ञानकांडविषयक विभागासच कसा मोठेपणा उपनिषदें देतात हें वरील उताऱ्यांवरून स्पष्ट होतें. याच मुंडकोपनिषदांत सर्व भूतांनां व्यापून असणाऱ्या परमात्म्याची 'वेद' ही 'वाचा' आहे. († वाग्विवृताश्च वेदाः ) असें जरी म्हटलें आहे तथापि वेदाच्या या सामान्य गौरवापेक्षां वर निर्दिष्ट केलेला कर्मकांड व ज्ञानकांड यांमधला तरतमभाव लक्षांत घेण्याजोगा आहे.

कर्म व ज्ञानविषयक भागास अनुसरून उपनिषदांत वेद-वाङ्मयाचे परा व अपरा हीं नांवें देऊन दोन विभाग कसे दाखविले जातात व त्यांत 'परा' नामक भागास म्हणजे उपनिषद्भागास कसें महत्त्व दिलें जातें हें पाहणें मौजेचें आहे.

मुंडकोपनिषदांत एके ठिकाणीं शौनकानें अंगिरसाला प्रश्न विचारला आहे कीं, हे भगवन्, कोणत्या गोष्टीचें ज्ञान झालें असतां सर्व समजण्यांत येईल? (कस्मिन्नु भगवतो विज्ञाते सर्वमिदं विज्ञातं भवतीति । मुंड० १.१,३.) या प्रश्नाला लागलीच उत्तर मिळालें आहे कीं, 'अपरा' व 'परा' या दोन विद्यांचें ज्ञान झालें म्हणजे सर्व समजण्यांत येतें.

ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद, अथर्ववेद, शिक्षा, कल्प, व्याकरण, निरुक्त, छंद व ज्योतिष यांनां 'अपरा' विद्या अशी संज्ञा आहे. (तत्राऽपरा ऋग्वेदो यजुर्वेदः सामवेदोऽथर्ववेदः शिक्षा कल्पो व्याकरणं निरुक्तं छंदो ज्योतिषमिति । मुंड० १.१,५.) व जिच्या योगानें अविनाशि अशा नित्य वस्तूचें—परमात्म्याचें—ज्ञान होतें ती (उपनिषद्भाग) 'परा' विद्या होय. (अथ परा यया तदक्षरमधिगम्यते । मुंड० १. १,५.).

वर दिलेल्या उताऱ्यांवरून वेदांपैकींच कर्मविशिष्ट भागा-पेक्षां ज्ञानविशिष्ट भागास दिलेलें वैशिष्ट्य लक्षांत येण्याजोगें आहे. तथापि ब्रह्माच्या गूढ ज्ञानप्राप्तीपेक्षां वेदांतील बाह्य भागांची म्हणजे ज्यांत संस्कार, विधी वगैरे सांगितले आहेत अशा भागांची किंमत फार कमी आहे या विचारांचें अस्तित्व दर्शविण्यासाठीं आणखी कांहीं उतारे पुढें देत आहों.

उपनिषद्विचारांचीच पुनरावृत्ति करणारी भगवद्गीता, तींत श्रीकृष्ण म्हणतात, हे पार्था, भोग व ऐश्वर्य यांच्या प्राप्तीसाठीं धडपड करणारे व कामनांच्या ठिकाणीं चित्त ठेवणारे जे अज्ञानी लोक फलप्राप्तीविषयीं खुलवून दिलेलीं वचनें पाहून त्याविषयींच बडबड सुरू करतात, वेदवाक्यांची काथ्याकूट करीत बसतात, कर्मकांडापेक्षां थोर कांहीं नाहीं असें प्रतिपादन करतात, स्वर्गप्राप्ति हेंच ज्यांचें ध्येय व जन्म आणि कर्मे यांचीच प्राप्ति करून देणाऱ्या जगड्व्याल वैदिक क्रियेचेंच जे स्तोम माजवितात, त्या भोग व ऐश्वर्य यांनीं वेडावलेल्या अर्थात् चित्त ठिकाणावर नसलेल्या लोकांची अनेक ठिकाणीं गुंतून राहिलेली बुद्धि एकाग्रतेच्या कामीं उपयोगी पडत नाहीं (यामिमां पुष्पितां वाचं प्रवदंत्यविपश्चितः । वेदवादरताः पार्थ नान्यदस्तीति वादिनः ॥ कामात्मानः स्वर्गपरा जन्मकर्म-फलप्रदाम् । क्रियाविशेषबहुलां भोगैश्वर्यगतिं प्रति ॥ भोगैश्वर्य-प्रसक्तानां तयाऽपहृतचेतसाम् । व्यवसायात्मिका बुद्धिः समाधौ न विधीयते ॥ भगव० २. ४२–४४ ).

याच्या पुढच्या ४६ व्या श्लोकांत "क्षुद्र अशा एखाद्या पाण्याच्या डबक्यांत जितक्या गरजा भागतात तितक्या गरजा मोठ्या थोरल्या तलावांत सहजच भागून जातात. त्याच-प्रमाणें सर्व वेदांमध्यें सांगितलेल्या कामना आत्मसाक्षात्कार झालेल्या ब्राह्मणाला सहजच प्राप्त होत असतात" असें म्हटलें आहे. (यावानर्थ उदपाने सर्वतः संप्लुतोदके । तावान्सर्वेषु वेदेषु ब्राह्मणस्य विजानतः ) छांदोग्य उपनिषद् (७. १.२–३) यामध्यें सनत्कुमाराला नारद म्हणत आहेत कीं हे भगवन्, मी ऋग्वेद जाणतों, यजुर्वेद, सामवेद व चौथा अथर्ववेदहि जाणतों. इतिहास पुराणेंहि मला ठाऊक आहेत. पण मी नुसता मंत्रवेत्ता आहें, मला आत्मज्ञान नाहीं, यावद्दल मला दुःख वाटतें. यावर सनत्कुमार उत्तर देतात कीं नारदा, जें कांहीं तूं जाणत आहेस त्याचेंच नांव आत्मा. (ऋग्वेदं भगवोऽध्येमि यजुर्वेदं सामवेदमाथर्वणं चतुर्थं....एतद्भगवो ध्येमि । सोहं भगवो मंत्रविदेवास्मि नाऽत्मवित्......तं होवाच यद्वै किं चैतदध्यगीष्ठा नामैवैतत् ) ऋग्वेदादि चार वेद तूं जाणत आहेस तेंच नामब्रह्म होय यासाठीं तूं त्या नामब्रह्माचीच उपासना कर (नामोपास्स्वेति). जो कोणी नामब्रह्माची उपासना करतो त्याला त्या नामब्रह्माचे ठिकाणीं यथेष्ट संचार करतां येतो. (स यो नामब्रह्म इत्युपास्ते यावन्नाम्नो गतं तत्रास्य यथाकामचारो भवति यो नाम ब्रह्मेत्युपास्ते । छांदो० ७.१,५.) भागवतपुराणांतील एका श्लोकांतहि ब्रह्म-विद्येचें महत्त्वच दर्शविलें आहे. "हे राजा, सर्वपृथ्वीभर पूर्वेस शेंडे करून दर्भ पसरून यज्ञनिमित्तानें झालेल्या अतिशय पशुवधाचाच अभिमान बाळगून तूं स्तब्ध बसला आहेस व आत्मज्ञानसंपादनरूप सत्कर्म करण्याचें मनांत सुद्धां आणीत नाहींस याला काय म्हणावें? अरे ज्या योगानें हरीचा—भगवंताचा—संतोष होईल, त्याचा प्रसाद होईल तीच खरी विद्या व तेंच खरें कर्म" हरीच्या ठिकाणीं बुद्धी जडविणें हीच खरी विद्या आहे. (आस्तीर्य दर्भैः प्रागग्रैः कार्त्स्न्येन क्षितिमंडलम् । स्तब्धो बृहद्वधान्मानी कर्म नावैषि यत्परम् ॥

* मुंड० १.२,१० † मुंड० २.१,४.

तत्कर्म हरितोषं यत् सा विद्या तन्मतिर्यया ॥ ४·२९,४९) ब्रह्मज्ञान होण्यास वेदांतील अनेकेश्वरीमत कसा अडथळा करितें व त्या मतापासून निघालेल्या व स्वर्गसुखाच्या इच्छेनें केलेल्या संस्कारांविषयीं तिटकारा नसला तरी निदान अनादर तरी कसा वाटत असे हें वरील उताऱ्यावरून सहज कळून येण्यासारखें आहे.

**वेद आणि व्यास.**—विष्णु, वायु व भागवत पुराणें आणि महाभारत यांनीं केलेले वेदांचे भाग कसकसे आहेत हेंहि पाहणें जरूर व मनोरंजक आहे. मागें सांगितल्याप्रमाणें वेदांची उत्पत्ति ब्रह्माच्या निरनिराळ्या मुखांतून झाली असें कांहीं पुराणांत सांगितलें आहे. ही गोष्ट खरी असल्यास त्यापैकीं प्रत्येकाला स्वतंत्र अस्तित्व असणें जरूर आहे, पण एके ठिकाणीं असें म्हटलें आहे कीं, मुळांत एकच वेद होता व नंतर त्याची चार भागांत विभागणी करण्यांत आली. उदाहरणार्थः–"द्वापरयुगांत वेदव्यासाचें रूप धारण करून प्रभूनें एकच वेद चार ठिकाणीं विभागला आणि मोठा केला" असा मजकूर विष्णुपुराणांत आहे. ( वेदमेकं चतुर्भेदं कृत्वा शाखाशतैर्विभुः । करोति बहुलं भूयो वेदव्यासस्वरूपधृक् । वेदांस्तु द्वापरे यस्य...॥ ३·२,५६–५७) याच पुराणांत एका श्लोकांत "जगाचें हित करणारा श्रीविष्णु वेदव्यासाचें स्वरूप धारण करून प्रत्येक द्वापरयुगामध्यें एकाच वेदाचे अनेक विभाग करतो ( द्वापरे द्वापरे विष्णुर्व्यासरूपी महामुने । वेदमेकं स बहुधा कुरुते जगतो हितः ॥ ३·३,५,) असें म्हटलें आहे. याच्यापुढेंच एका श्लोकांत 'पूर्वीचा जो वेद तो चार पादांनीं युक्त असून त्याची संख्या एक लक्ष होती. सर्व मनोरथ पूर्ण करणारे दहा प्रकारचे यज्ञ या आद्यवेदापासूनच झाले ( आद्यो वेदश्चतुष्पादः शतसाहस्रसंमितः । ततो दशगुणः कृत्स्नो यज्ञोयं सर्वकामधुक् ॥ ३·४,१ ) असें विधान आहे. वाजसनेयि ( शुक्लयजुः ) संहितेवर भाष्य लिहिणारा महीधर सुरुवातीलाच असें म्हणतो कीं 'ब्रह्मपरंपरेनें प्राप्त झालेला वेद मनुष्यें मंदमति होत चाललीं हें पाहून त्या ब्रह्माच्याच प्रेरणेनें चार ठिकाणीं विभागता झाला आणि ऋक्, यजु, साम व अथर्व संज्ञक ते चार विभाग–चार वेद–त्यानें पैल, वैशंपायन, जैमिनी व सुमंतु या चार शिष्यांनां क्रमानें दिले.' ( तत्रादौ ब्रह्मपरंपरया प्राप्तं वेदं वेदव्यासो मन्दमतीन् मनुष्यान्विचिन्त्य तत्कृपया चतुर्धा व्यस्य ऋग्यजुःसामाथर्वाख्यांश्चतुरो वेदान् पैलवैशम्पायनजैमिनिसुमन्तुभ्यः क्रमादुपदिदेश ). वायुपुराणांत असें वर्णन आढळतें कीं, द्वापरयुग उलटल्यावर स्वायंभुवमन्वंतरामध्यें ब्रह्मा मनूला म्हणाला हे महाबुद्धिमंता, वेदाचे विभाग कर. मूळ वेद एकच होता व त्याचे चार पाद होते व तो ग्रंथ एक लक्ष होता पुढें तो सर्व दसपट वाढविला गेला. यज्ञ हा सर्व कामनांचें पूरण करणारी कामधेनु आहे. ब्रह्मदेवानें वेदाचे विभाग कर म्हणून सांगितल्यावर मनु 'वरें' म्हणाला व चतुष्पादयुक्त असा एकच असलेला वेद त्यानें चार ठिकाणीं केला. ते चार विभागच ऋक्, यजु, साम व अथर्ववेद म्हणून प्रसिद्धीस आले ( द्वापरे तु परावृत्ते मनोः स्वायंभुवेऽन्तरे। ब्रह्मा मनुमुवाचेदं वेदं व्यस्य महामते ।·········आद्यो वेदश्चतुष्पादः शतसाहस्रसंमितः । पुनर्दशगुणः कृत्स्नो यज्ञो वै सर्वकामधुक् । एवमुक्तस्तथेत्युक्त्वा मनुर्लोकहिते रतः। वेदमेकं चतुष्पादं चतुर्धा व्यभजत्प्रभुः । अध्याय ६० श्लोक २–८) वैवस्वतमन्वंतरांत व्यासांनीं वेदाचे पुन्हा विभाग केले असें भागवतांत आहे. प्रजांचें असें चतुर्होत्रसंज्ञक वैदिक कर्म अवलोकन करून यज्ञाची परंपरा कायम राहण्यासाठीं एकच असलेला वेद श्रीव्यासांनीं चार ठिकाणीं विभागला. व्यासांनीं एकाच वेदापासून उद्धृत केलेले चार विभाग हेच ऋक्, यजु, साम व अथर्वनामक चार वेद होत. (चातुर्होत्रं कर्म शुद्धं प्रजानां वीक्ष्य वैदिकम् । व्यदधाद्यज्ञसंतत्यै वेदमेकं चतुर्विधम् । ऋग्यजुःसामाथर्वाख्या वेदाश्चत्वार उद्धृताः१·४,१४;१९;२०) याच पुराणांत शेवटच्या भागांत म्हणजे स्कंध १२ यांतील ६ व्या अध्यायाच्या ३७ श्लोकापासून पुढें जें वर्णन आढळतें त्यावरून व्यासांनीं केलेल्या वेदांच्या व्यवस्थेचें सामान्य वर्णन लक्षांत येईल. तेथील वर्णन बरेंच विस्तृत असल्यामुळें येथें दिलें नाहीं त्याचा सारांश असा–व्यासांनीं पैल, वैशंपायन, जैमिनी व सुमंतु या चार शिष्यांनां चार वेदांच्या चार संहिता पढविल्या. पैलाचे दोन शिष्य झाले. या शिष्यपरंपरेंत वाष्कल व शाकल्य असे दोन शिष्य झाले त्यांनीं ती संहिता अनुक्रमें चार व पांच ठिकाणीं विभागली. पुढेंहि त्या संहितेचा थोडाबहुत विस्तार झाला. वैशंपायनानें आपली यजुःसंहिता आपल्या अनेक शिष्यांनां पढविली त्यांतच याज्ञवल्क्य हा शिष्य होता. याचें व वैशंपायनाचें भांडण झालें व याज्ञवल्क्यानें पढलेला वेद परत टाकला तो दुसऱ्या वैशंपायनशिष्यांनीं तित्तिरिपक्ष्याचें रूप घेऊन ग्रहण केला. तेव्हांपासून त्या शिष्यांनां तैत्तिरीय हें नांव पडलें. वैशंपायनासाठीं कांहीं शिष्यांनां व्रताचरण करावें लागल्यामुळें त्यांनां चरकाध्वर्यु हें नांव मिळालें. याज्ञवल्क्यानें सूर्याची आराधना करून नवाच वेद मिळविला. सूर्यानें घोड्याचें ( वाजी ) रूप घेऊन वेद दिल्यामुळें त्या वेदास 'वाजसनेय' असें नांव मिळालें. जैमिनीनें व्यासापासून मिळविलेला सामवेद आपल्या मुलांनां व शिष्यांनां पढविला. यांच्या शिष्यपरंपरेंत पौष्यंजी वगैरे नामांकित शिष्य झाले. सामवेदाच्या परंपरेनें वाढत वाढत हजार शाखा झाल्या. पौष्यंजीचे शिष्य वास्तविक उत्तरेकडचे राहणारे म्हणून त्यांनां उदीच्य किंवा औदीच्य असें म्हणत असत पण पुढें त्यांनां प्राच्य म्हणजे पूर्वेकडील राहणारे असें लोक म्हणूं लागले. सुमंतूनें आपला अथर्ववेद कबंधाला शिकविला त्यानें आपल्याला दोन शिष्य केले त्यापैकीं वेददर्शाचे पुन्हां चार व पथ्याचे तीन शिष्य झाले. इ. इ.

**वेद जगदारंभीं पण संहिता त्रेतायुगाच्या प्रारंभीं.**—अशी कल्पना पुराणांत आहे. भागवतपुराणांत स्कंध ९ अध्याय १४ याच्या शेवटीं जें वर्णन आलें आहे त्यांत सर्व वाङ्मय प्रणव म्हणजे ओंकार हा एकच वेद पूर्वी होता, त्याचप्रमाणें 'नारायण' हा एकच देव व लौकिक अग्नि हा एकच अग्नि होता. वर्णहि एकच असे. त्रेतायुगाच्या आरंभीं पुरूरव्यापासून तीन वेद झाले. अग्नि व प्रजा यांच्या योगानें धन्य होत्साता तो पुरूरवा राजा गंधर्वलोकीं गेला" असें वर्णन आढळतें ( एक एव पुरा वेदः प्रणवः सर्ववाङ्मयः। देवो नारायणो नान्य एकोग्निर्वर्ण एवच। पुरूरवस एवासीत् त्रयी त्रेतामुखे नृप। अग्निना प्रजया राजा लोकं गन्धर्वमेयिवान् ) या संस्कृत श्लोकांचा अर्थ भागवत पुराणावरील टीकाकार असा करतो कीं, कृतयुगांत लोकांमध्यें सत्वगुण विशेषेंकरून वास करीत होता. लोक त्या युगांत ध्यानांत गुंग होऊन गेलेले असत. त्रेतायुगांत रजोगुणाचें प्राबल्य झाल्यामुळें वेदांचे भाग पाडून कर्ममार्ग दाखविण्यांत आला.

महाभारतांतील शांतिपर्व श्लोक १३०८८ व पुढील श्लोक पाहिले तर असें आढळतें कीं, हें कृतयुग आहे, श्रेष्ठ असा उत्कृष्ट काल प्राप्त झाला आहे, या युगांत पशू हे अवध्य आहेत हें कांहीं खोटें नाहीं......नंतर 'त्रेता'-नामक युग येईल व त्या त्रेतायुगांत वेदत्रयी उत्पन्न होईल त्याचप्रमाणें प्रोक्षण केलेले यज्ञपशू यज्ञामध्यें मारले जातील. ( इदं कृतयुगं नाम कालः श्रेष्ठः प्रवर्तितः। अहिंस्या यज्ञपशवो युगेऽस्मिन् न तदन्यथा॥.........ततस्त्रेतायुगं नाम त्रयी यत्र भविष्यति। प्रोक्षिता यज्ञपशवो वधं प्राप्स्यंति वै मखे॥)

वेदाच्या एकत्वासंबंधानें किंवा बहुत्वासंबंधानें आणि वेदाच्या निरनिराळ्या शाखाभेदासंबंधानें कल्पना येण्यास वरील उतारे पुरे होतील.

यजुर्वेदाचा आद्य प्रवर्तक वैशंपायन व त्याचा शिष्य याज्ञवल्क्य यांचें भांडण कसें झालें? याज्ञवल्क्यानें वैशंपायनाच्या यजुर्वेदापेक्षां निराळाच एक यजुर्वेद कसा प्रचलित केला वगैरे गोष्टींचें विवेचन पुढें येईलच. अथर्ववेदाचे अनुयायी यांचें इतर वेदांशीं व छंदोगांचें ( सामवेद्यांचें ) ऋग्वेद्यांशीं असलेलें वैर येथें वर्णन करीत नाहीं. कारण त्याचा ऊहापोह वेदकालीन भांडणांचा परामर्श घेतांना होईलच.

ऋग्वेदांत पारंगत असलेल्या मनुष्याला, बहूच व सामवेद जाणणाऱ्याला छंदोग असें म्हणतात. यजुर्वेदाच्या ज्ञात्यांस अध्वर्यु ही संज्ञा आहे. ह्या संज्ञा तैत्तिरीय संहिता व शतपथ ब्राह्मण यांत आढळतात. शतपथ ब्राह्मणानुयायांनां अध्वर्यु ही संज्ञा शतपथ ब्राह्मणांत दिलेली आहे; ह्या अनुयायांच्या प्रतिस्पर्ध्यांनां चरकाध्वर्यु असें नांव आहे. हें नांव जरा निंदादर्शक आहे. ह्या चरकसंज्ञक प्रतिस्पर्ध्यांची शतपथ ब्राह्मणानुयायी निंदा करतात. वाजसनेयि संहितेंत ( ३०·१८ ) हें शतपथानुयायी व त्यांचे प्रतिस्पर्धी यांचें वैर दृग्गोचर होतें. दुष्कृत देवतेकरितां पुरुषयज्ञप्रसंगीं 'चरकाचार्य' नामक मनुष्य पशु बळी देण्याकरितां राखून ठेवल्याची हकीकत त्या ठिकाणीं आहे. ह्याविषयीं प्रो. मुल्लर म्हणतात कीं, "वाजसनेयि संहितेच्या एका खिलांत चरक हा शब्द निंदा दर्शविण्याकरितां वापरलेला आहे. ३० व्या अध्यायांत पुरुषमेधांत बळी देण्याच्या लोकांची याद दिली आहे व त्यांत पापदेवतेला बळी देण्याला योग्य असा बळी 'चरकाचार्य' आहे असें सांगितलें आहे."* प्राचीन अध्वर्यूंच्याविषयीं वाटत असणाऱ्या द्वेषाचे वरील उतारा व शतपथ ब्राह्मणांतील तत्सदृश उतारे द्योतक आहेत. प्राचीन अध्वर्यूंचा ग्रंथ तैत्तिरीय वेद होय. वाजसनेयि यांच्या नवीन चरणांचा मूल उत्पादक होण्यासाठीं याज्ञवल्क्य तैत्तिरीयापासून निराळे झाले.

"वेदार्थप्रकाशां"तहिं† "न्यायमालाविस्तरां"तील उताऱ्याचें निरूपण करितांना माधवानें वेद मनुष्यकृत नाहींत असेंच सांगितलें आहे—

यथा व्यासवाल्मीकिप्रभृतयोऽत्र तत्तद्ग्रन्थनिर्माणावसरे कैश्चिदुपलब्धा अन्यैरप्यविच्छिन्नसंप्रदायेनोपलभ्यन्ते। न तथा वेदकर्ता पुरुषः क्वचिदुपलब्धः। प्रत्युत वेदस्य नित्यत्वं श्रुतिस्मृतिभ्यां पूर्वमुदाहृतम्।...

परंतु वेद मनुष्यकृत नाहींत याविषयीं जी एक हरकत घेण्यांत येते तिकडे या टीकाकारांनीं लक्ष पुरविलेलें नाहीं. ती हरकत अशी कीं ऋग्वेद व इतर वेद यांच्या अनुक्रमणिकेंत‡ असें सांगितलें आहे कीं अमुक एक वेदांतील सूक्त अमुक एक ऋषीनें रचिलें. यस्य वाक्यं स ऋषिः।

वरील हरकतीला उत्तर कोठेंच दिलेलें नाहीं असें नाहीं; उदाहरणार्थ वेदार्थप्रकाशांत वरील हरकतीला उत्तर म्हणूनच कीं काय कोण जाणे पुढीलप्रमाणें वाक्यें आढळतात—

अतीन्द्रियार्थद्रष्टारो हि ऋषयः। तेषां वेदद्रष्टृत्वं स्मर्यते। युगान्तेऽन्तर्हितान् वेदान् सेतिहासान् महर्षयः। लेभिरे तपसा पूर्वमनुज्ञाताः स्वयंभुवा¶। मनु म्हणतो—

ऋषयो वेदान् तपसा प्रतिपेदिरे।

---

* प्राचीन संस्कृत वाङ्मय प्रो. मुल्लर पान ३५०. चरक किंवा चरकाध्वर्यु यांची निंदा केली आहे असे कांहीं उतारे प्रो. वेबरनें दिले आहेत. त्यांचा येथें संग्रह करण्याची जरूर भासत नाहीं. जरूर तर शतपथ ब्राह्मण ३·८·२,२४;४·१·२·१९;४·२·३,१५;४·२·४,१;६·२·२,१;८·१·३,७;८·७·१,१४; २४. येथें लिहिलेलें वर्णन वाचावें. † तैत्तिरीय संहितेवरील "वेदार्थप्रकाश" नांवाची माधवाची टीका. आनंदाश्रमप्रत १·१,१· वरील भाष्य, पृ. १९. ‡ कोलब्रूकः—संकीर्ण निबंध १. २६ किंवा वुइल्यम्स आणि नॉरगेटची प्रत पान १२ पहा. ¶ तैत्तिरीय संहितेवरील "वेदार्थप्रकाश" नांवाची टीका पान ११ आनंदाश्रमप्रत उपोद्घात पृ. ८.

वेदांचें प्रामाण्य कोणत्या भक्कम पायावर उभारलेलें आहे ह्या गोष्टीविषयीं एका बाजूस मीमांसक व दुसरे बाजूस नैयायिक यांच्यामध्यें जो मतविरोध दिसून येतो, तो अधिक खुलासेवार पहावयाचा असल्यास माधवाचार्यकृत सर्व-दर्शनसंग्रहनामक* ग्रन्थ पहा.

ब्रह्मसूत्रांत † सत्कर्माचें फल देव देतो असें म्हटलें आहे पण त्यांतच पुढें धर्मापासून उत्तम फल प्राप्त होतें असें म्हटलें आहेः—

ईश्वरस्तु फलं ददातीत्यनुपपन्नम् । अविचित्रस्य कारणस्य विचित्रकार्यानुपपत्तेर्वैषम्यनैर्घृण्यप्रसङ्गादनुष्ठानवैयर्थ्यापत्तेश्च । तस्माद् धर्मादेव फलमिति‡।

देवो न कश्चिद् भुवनस्य कर्ता भर्ता न हर्ताऽपि च कश्चिदास्ते। कर्मानुरूपाणि शुभाशुभानि प्राप्नोति सर्वो हि जनः फलानि । वेदस्य कर्ता न च कश्चिदास्ते नित्याहि शब्दा रचनापि नित्या । प्रामाण्यमस्मिन् स्वत एव सिद्धमनादिसिद्धेः परतः कथं तत्।¶

वरील दोन उताऱ्यांवरून असें दिसून येईल कीं, मीमांसक नास्तिक मताचे होते. मीमांसकांवर टीका करणारा प्रभाकर व त्याचे अनुयायी पूर्वमीमांसेंतील मतें नास्तिक स्वरूपाचीं आहेत असेंच म्हणतात.

कुमारिलाचें म्हणणें याहून निराळें आहे; तो म्हणतो पूर्व-मीमांसेंतील मतें आस्तिक्य स्वरूपाचीं आहेतः—

प्रायेणैव हि मीमांसा लोके लोकायतीकृता । तामास्तिक्य-पथे कर्तुमयं यत्नः कृतो मया।§

प्रसिद्ध व्याकरणकार जो पतञ्जलि त्यानें आपल्या महाभाष्य नामक ग्रन्थांत वेदांच्या निरनिराळ्या भागांनां ऋषींचीं जीं नांवें मिळालीं आहेत तीं मिळण्याचें कारण काय असावें याविषयीं लिहिलें आहे कीं, वेद नित्य आहेत पण वेदशाखा अनित्य आहेत.

ननु चोक्तम् "नहि छंदांसि क्रियंते नित्यानि छंदांसीति ।" यद्यप्यर्थो नित्यः । या त्वसौ वर्णानुपूर्वी सानित्या तद् भेदा-च्चैतद्भवति काठकं कालापकं मौदकं पैप्पलादकमित्यादि... ।

कैय्यट व नागोजीभट्ट यांनीं महाभाष्यावर ज्या टीका लिहिल्या आहेत त्यांतील या भागावरील टीकांतील भाग पाहिला म्हणजे आपणांस असें आढळून येतें कीं वेदांचें नित्यत्व व वेदांच्या अनेक पाठांमधील फरक—जे पाठ चूक नाहींत असें तो तो पाठ किंवा अर्थ करणारे प्रतिपादन करितात—ह्या दोहोंचा समेट करणें हें काम दोघांहि टीका-कारांनां फार कठिण वाटत आहे. नागोजीभट्ट लिहितो कीं, आधुनिक मीमांसक वेद नित्य आहेत इतकेंच समजत नाहींत तर वेदांचा अर्थहि नित्य आहे असें समजतात; थोडक्यांत बोलावयाचें म्हणजे वेदांचा पाठ फक्त एकच आहे असें ते समजतात. पूर्वमीमांसक व स्वतः नागोजी-भट्ट ह्या मताचे नाहींत. नागोजीभट्ट व कैय्यट असें सांगतात कीं अनेक अनुमानांपैकीं एका अनुमानाप्रमाणें वेदांतील अक्षरांचा किंवा शब्दांचा अनुक्रम अनेक प्रलयांत नाहींसा झाला. प्रत्येक मन्वंतरांत त्या त्या मन्वंतराचा वेदतुल्य ग्रंथ असे. त्यांचा व वेदांचा अर्थ एकच असे; मात्र दोहोंच्या शब्दांत फरक असे. वेदांचे जे अनेक पाठ दृष्टीस पडतात ते वरील टीकाकारांच्या मतें त्या त्या मन्वंतरांतील वेदतुल्य ग्रंथ होत. "कठांचे पाठ," "कलापांचे पाठ" ह्या नांवाचे जे अनेक पाठ वेदांत दिसतात ते म्हणजे खरोखर ऋषींनीं आपआपल्या काळीं त्या त्या मन्वंतरांतील वेदतुल्य ग्रंथाची केलेली पुनरुक्ति होय.*

**वेदांत.**—वेदांतसूत्रांचा कर्ता बादरायण हा वेद नित्य व अपौरुषेय आहेत ह्या मताला पाठिंबा कशा रीतीनें देतो तें पाहूं; शंकराचार्यांनीं आपल्या "शारीरकमीमांसाभाष्यांत" वेदांतसूत्रांचें स्पष्टीकरण केलें आहे. जैमिनी व त्याचे अनुयायी यांचीं वेदाविषयीं मतें व बादरायणाचीं मतें एकच नाहींत. ब्रह्मज्ञानाची प्राप्ति करून घेण्यास तीन उच्च जातींखेरीज अन्य कोणी लायक आहे कीं काय ह्या प्रश्नासंबंधीं बराच ऊहापोह केल्यावर बादरायणाचें शेवटीं असें मत झालें कीं, चवथ्या जातीचे लोक म्हणजे शूद्र नालायक आहेत; पण मनुष्याहूनहि श्रेष्ठ प्राणी जे देव ते लायक आहेत. † एका सूत्रांत (१·३,२६) बादरायण निश्चितपणें म्हणतो कीं, आपलें वैभव क्षणभंगुर आहे याची जाणीव असल्यामुळें मोक्षप्राप्ति व्हावी अशी देवांच्या मनांत इच्छा असते; ते शरीरी असल्यामुळें मोक्ष-प्राप्ति करून घेण्यास ते समर्थ असतात; व ती मिळविण्याच्या कामांत अडथळाहि त्यांचे मार्गांत येत नाहीं. देव शरीरी असणें असंभवनीय आहे, कारण ते जर शरीरी असते तर पुरोहित ज्याप्रमाणें यज्ञविधींत हजर असतात त्याप्रमाणें ज्या यज्ञांत त्यांचें स्वतःचें पूजन होत असतें त्यांत ते देव स्वतः शरीरानें हजर असावयाला पाहिजेत; पण यज्ञांत शरीरानें देव हजर असल्याचें दिसत नाहीं; शिवाय ते शरीरी आहेत असें धरून चालल्यास अनेक यज्ञांत ते एकसमयावच्छेदेंकरून कसे हजर राहणार? अशा प्रकारचा जरा अवघड प्रश्न

---

* माधवाचार्यकृत "सर्वदर्शनसंग्रह" ग्रन्थ बिब्लिओथेका इन्डिका. प्रत. पान १२७ व पुढील पानें. † ब्रह्मसूत्रें ३·२,३८; ३९ व ४०. ‡ ब्रह्मसूत्र ३·२, ४० वरील शङ्कराचार्यांचें भाष्य. ¶ विद्वन्मोदतरंगिणी नामक ग्रन्थ. § कुमारिल वार्तिक. श्लोक १०

* ह्याच विषयाची उत्तम माहिती कुमारिलकृत मीमांसा-वार्तिक १·३,१० यांत आढळेल ती पहा. † Colebrooke's Misc. Ess. I. 348 or p. 223 of Wiilliams and Norgate's ed.

उपस्थित केला गेल्यामुळें पुढील सूत्रांत (१.३,२७) वरील शंकेस उत्तर दिलें आहे कीं, (१) देव निरनिराळीं रूपें धारण करितात; मनुष्यांनां ते जरी दिसत नाहींत तथापि एकसमयावच्छेदेंकरून ते अनेक यज्ञसमारंभांत हजर असतात; किंवा (२) अनेक लोक एकाचवेळीं ज्याप्रमाणें एका ब्राह्मणाला वंदन करूं शकतात त्याप्रमाणें निरनिराळे लोक एकाच देवतेला एकाच वेळीं आहुति देणें शक्य आहे. एवं च देव शरीरी असणें व यज्ञयागादि कर्मे या दोहोंमध्यें विसंगतपणा मुळींच नाहीं.

वेदांतसूत्र 'शब्दे इति चेन्नातः प्रभावात्प्रत्यक्षानुमानाभ्याम्' (१.३,२८)। यावर भाष्य लिहितांना शंकराचार्य म्हणतात–

कथं पुनरवगम्यते शब्दात्प्रभवति जगदिति? "प्रत्यक्षानुमानाभ्याम्।" प्रत्यक्षं श्रुतिः। प्रामाण्यं प्रत्यनपेक्षत्वात्। अनुमानं स्मृतिः। प्रामाण्यं प्रति सापेक्षत्वात्। ते हि शब्द-पूर्वां सृष्टिं दर्शयतः। एत इति वै प्रजापतिर्देवानसृजता-सृग्रमिति मनुष्यान्।......सूत्र १-३-२८ वरील शंकराचार्यांची सबंद टीका पहा.

अत एव च नित्यत्वम्। (ब्रह्मसूत्र १.३,२९)

भाष्य—अत एव च नियताकृतेर्देवादेर्जगतो वेदशब्दप्रभवत्वादेव वेदशब्दे नित्यत्वमपि प्रत्येतव्यम्। तथाच मन्त्रवर्णः। "यज्ञेन वाचः पदवीयमायन्तामन्वविन्दन्नृषिषु प्रविष्टाम्। (ऋ. १०.७१,३)" इति स्थितामेव वाचमनुविन्नां दर्शयति। वेदव्यासश्चैवमेव स्मरति। "युगान्तेन्तर्हितान् वेदान्सेतिहासान्महर्षयः। लेभिरे तपसा पूर्वमनुज्ञाताः स्वयंभुवा" इति। (महाभारत वनपर्व ७६६०)।

ब्रह्मसूत्र १.१,३ यांत वेदांचें उगमस्थान ब्रह्म आहे असें सांगितलें आहे. "यावरून ब्रह्म सर्वज्ञ होता हें सिद्ध होतें." असें शङ्कराचार्य म्हणतात.* सायण वरील सूत्रावरून असा बोध घेतो कीं† वेद अपौरुषेय आहेत. वेद नित्य आहेत याचा अर्थ एवढाच घ्यायचा कीं, हें नित्यत्व जगदुत्पत्ति व लय ह्या दोहोंच्यामध्यें जो काल जातो तितक्या कालाएवढें असतें.

ब्रह्मसूत्र १.१,३ यावरून असें दिसून येईल कीं, वेदोत्पत्तीविषयीं पूर्वमीमांसक व उत्तरमीमांसक किंवा वेदान्ती यांच्या मतांत फरक आहे. वेदान्ती म्हणतात कीं वेद ब्रह्मापासून निघाले. वेद ब्रह्मापासून निघाले किंवा काय ह्याविषयीं पूर्वमीमांसक मुग्ध आहेत.

वेदांविषयीं जीं अनेक मतें आहेत त्यांत खरा विरोध आढळून येणें अशक्य आहे. सूत्रें, ब्राह्मणें व उपनिषदें हीं लिहिणाऱ्या निरनिराळ्या लेखकांनीं हजारों वस्तूंच्या उत्पत्तीविषयीं व विश्व आणि देवता यांच्यामधील संबंधाविषयीं स्वतःच्या अनेक कल्पना दिल्यामुळें व अमुक एका मताला ते चिकटून न राहिल्यामुळें ह्या लेखकांच्या मतांत साहजिकपणेंच विरोध दिसूं लागला. पण कालान्तरानें वेद अपौरुषेय व निर्दोष आहेत असें जेव्हां मानण्यांत येऊं लागलें त्यावेळेस वेदांच्या उत्पत्तीविषयीं सुसंबद्ध मत त्याच ग्रन्थांतून प्रतिपादन करणाऱ्या पद्धतशीर धर्मशास्त्रज्ञांनीं असें दर्शविलें कीं, वेदांच्या निरनिराळ्या पाठांत दिसून येणारा फरक फक्त वरवरचा आहे, खरा नव्हे.

आतां न्याय, वैशेषिक व सांख्यमतानुयायी वेदांचें प्रामाण्य कशा रीतीनें प्रस्थापित करतात पण ध्वनि नित्य नाहीं हें ते कशा रीतीनें दर्शवितात हें पाहूं.

**न्याय.**—नैयायिकांच्या मतें ध्वनि नित्य नाहीं. गौतमाचीं जीं न्यायसूत्रें आहेत त्यांत हें मत स्पष्टपणें पहावयास सांपडतें. "न्यायसूत्रवृत्तीं"त विश्वनाथ भट्टाचार्यानें ह्या सूत्रांचें स्पष्टीकरण केलें आहे.

प्रागुच्चारणादनुपलम्भादावरणाद्यनुपलब्धेः।* मीमांसकाच्या १३ व्या सूत्राविरुद्ध वरील मजकूर आहे.

अक्षरें बदलूं शकतात किंवा नाहीं ह्याविषयीं १०६-१२२ या सूत्रांत विचार केलेला आहे. हाच विचार मीमांसकांच्या १० व्या व १६ व्या सूत्रांत केला आहे. अक्षर दीर्घ किंवा लघु केलें म्हणजे त्या अक्षरांत फरक झाला असें जरी म्हणतां येईल तथापि त्या अक्षरांचा किंवा शब्दांचा जो खरा अर्थ असतो त्यांत फरक होत नाहीं असें गौतमाचें म्हणणें आहे.

वेद खोटे आहेत; वेदांतील मजकुरामध्यें निरनिराळ्या स्थलीं विसंगतपणा दृष्टीस पडतो; तींच तींच वाक्यें पुन्हां पुन्हां वेदांत आलीं आहेत वगैरे जे आरोप वेदांवर करण्यांत आले आहेत ते खोटे आहेत असें उत्तम रीतीनें गौतमानें ५७-६८ या सूत्रांत दर्शविलें आहे.

या सूत्रांत वेदांचें प्रामाण्य सिद्ध करून दाखविलें आहे. मन्त्रायुर्वेदवाक् च तत् प्रामाण्यप्राप्तप्रामाण्यात्। आप्तस्य वेदकर्तुः प्रामाण्याद् यथार्थोपदेशकत्वाद् वेदस्य तदुक्तत्वमर्थाल्लभ्यम्। तेन हेतुना वेदस्य प्रामाण्यमनुमेयम्।†

भाष्यकार वात्स्यायन यानें या सूत्राचें लांबलचक स्पष्टीकरण दिलें आहे तें पहा.‡

* ब्रह्मसूत्र १.१,३ वरील शङ्कराचार्यांची टीका पहा.
† सायणाचार्यांची वेदान्तसूत्र १.१,३ वरील टीका.

* गौतमकृत न्यायसूत्रें. सूत्र ८६ † सूत्र ६८ ‡ आप्ताः= साक्षात्कृतधर्माणः —वात्स्यायन. ऋषींचा स्वभाव वर्णन करितांना साक्षात्कृतधर्माणः असेंच वाक्य यास्काचार्यांनीं निरुक्त १-२० यांत वापरलें आहे.

**वैशेषिक सूत्रें**:—यांतील कांहीं सूत्रें असें प्रतिपादन करितात कीं, वेद कोणातरी बुद्धिवान् प्राण्यानें लिहिले; व ते देवानें आपल्या मुखानें उच्चारिले.

टीप—सूत्र १·१,२; ६·१,१; १०,२-८; १०,२·९. व त्यांचे वरील भाष्यकाराची टीका पहा.

वरील भाष्यकाराची टीका पाहिली म्हणजे असें आढळून येतें कीं त्याच्या मतें वेदांचें प्रामाण्य दोन गोष्टींवरून सिद्ध होतें:—(१) वेदांचा विस्तृतपणा व त्यांत येणारा विषय (२) जुन्याला चिकटून राहणाऱ्या व निरनिराळीं धार्मिकमतें प्रतिपादन करणाऱ्या सर्व पंथानुयायांनीं वेदांचा एकमतानें स्वीकार केला ही गोष्ट.

वेदांत कांहीं तरी अलौकिक आहे असें ज्यांचें मत झालेलें आहे किंवा ज्यांनीं वेदांचा स्वीकार केला ते चुकीस कधींहि पात्र नव्हते असें जे गृहीत धरून चालतात अशा लोकांशिवाय इतरांनां हीं कारणें पटण्यासारखीं नाहींत. बुद्ध व इतर पाखंडी यांनां वेदांत चमत्कारिक किंवा अमानुष कांहींच दिसून न आल्यामुळें वेदानुयायांनां त्यांनीं दोषी ठरविलें व वेदांनां मुळींच किंमत नाहीं असें त्यांचें मत झालें. टीकाकारानें वर जीं कारणें सांगितलीं आहेत तीं सांगण्याचा त्याचा इतकाच उद्देश दिसतो कीं मीमांसक समजतात त्याप्रमाणें वेदांचें प्रामाण्य वेद निरंतर दोषरहित राहणार या गोष्टीवर अवलंबून नसून त्यांचा उच्चार कोणा बुद्धिमान व सर्वज्ञ अशा विभूतीच्या मुखांतून झाला ह्या गोष्टीवर अवलंबून आहे. वेदांत न पाहिलेल्या व भविष्यकालीं घडणाऱ्या गोष्टींचा उल्लेख आला आहे; यावरून वेदकार एक सर्वज्ञ विभूति असली पाहिजे हें सिद्ध होतें; कारण अशा व्यक्तीशिवाय अशा प्रकारचें ज्ञान कोणालाहि असणें शक्य नाहीं. अदृष्ट गोष्टींसंबंधीं वेदांत येणारा मजकूर अशा सर्वज्ञ विभूतीच्या मुखांतून आल्यामुळें व म्हणून तो खरा असल्यामुळें ज्ञानी लोकांनीं एकमतानें तो विश्वसनीय आहे असें जाहीर केलें.

वैशेषिकांच्या मतें ईश्वरी प्रेरणेचें किंवा अमानुष ज्ञानाचें स्वरूप काय हें वैशेषिक सूत्रांवरून आपणांस समजतें.

वैशेषिक सूत्र ८.१,२. वरील आपल्या टीकेंत टीकाकार म्हणतो–ज्ञान दोन प्रकारचें आहे–तच्च ज्ञानं द्विविधं विद्या चाविद्या च । विद्या चतुर्विधा प्रत्यक्षलैङ्गिकस्मृत्यार्षलक्षणा ।

तर्कसंग्रहांत वेदोत्पत्तीसंबंधीं पुढीलप्रमाणें म्हटलें आहे:–वाक्यं द्विविधं लौकिकं वैदिकं च । वैदिकमीश्वरोक्तत्वात् सर्वमेव प्रामाण्यम् । लौकिकं त्वाप्तोक्तं प्रमाणमन्यदप्रमाणम् ।*

परंतु न्यायसूत्रांत मन्त्रायुर्वेदवच्च तत्प्रामाण्यमाप्तप्रामाण्यात् । (२·६८) असें वेदांच्या उत्पत्तीसंबंधीं म्हटलें आहे. यावरून एके बाजूस न्यायसूत्रांचा कर्ता व दुसरे बाजूस वैशेषिकसूत्रें व तर्कसंग्रह यांचे कर्ते यांच्यामध्यें वेदोत्पत्तीसंबंधीं मतभेद आहे असें म्हटलें पाहिजे किंवा न्यायसूत्र २·६८ यांत आप्त याचा अर्थ ईश्वर असा समजून दोघांत मतभेद नाहीं असें तरी म्हटलें पाहिजे.

वैशेषिकसूत्रें व तर्कसंग्रह यांच्या कर्त्यांप्रमाणें कुसुमाञ्जलिनामक ग्रंथाचा कर्ता उदयनाचार्य हाहि वेद ईश्वरापासून उत्पन्न झाले असें म्हणतो. त्यांतील कांहीं श्लोकांवरून* असें दिसून येतें कीं, वेद नित्य आहेत ही गोष्ट वेदांच्या परंपरेवरून ठरवितां येणें अशक्य आहे असें वरील ग्रंथकाराचें मत आहे; कारण तो म्हणतो कीं, हल्लींच्या उत्पत्तीपूर्वी जो प्रलय झाला त्यावेळेस ही परंपरा ( वेद-व्यवहारः । ) बंद पडली असली पाहिजे. त्याच्या मतें वेदांचा कर्ता कोणी तरी नित्य व सर्वज्ञ विभूति असला पाहिजे; वेद पौरुषेय आहेत व ही गोष्ट वेदांवरूनच सिद्ध होते. वेदशाखांनां जीं ऋषींचीं नांवें दिलीं आहेत ते ऋषी म्हणजे जगदुत्पत्तिकालीं वेदोच्चार करितांना ईश्वरानें धारण केलेलीं मनुष्यरूपें होत.

सांख्यसूत्रांचा कर्ता कपिल याचेंहि मत न्याय व वैशेषिक सूत्रकारांच्या मताप्रमाणेंच असें आहे कीं, वेद नित्य नाहींत:–न नित्यत्वं वेदानां कार्यत्वश्रुतेः ।†

गौतम व कणाद यांच्या मतें वेद ईश्वरापासून निघाले; पण कपिलाचें मत तसें नाहीं; कारण तो म्हणतो कीं, देवच नाहीं तर त्याचेपासून वेद कोठून निघणार? जीवन्मुक्त झालेल्या प्राण्यांत श्रेष्ठ असा जो विष्णु हा जरी सर्वज्ञ असला तथापि तो "वीतराग" असल्यामुळें वेद त्याचेपासून निघाले असणें अशक्य आहे. त्याचेशिवाय दुसरें कोणी सर्वज्ञ नसल्यामुळें दुसरा कोणी मनुष्य वेदांचा कर्ता होऊं शकत नाहीं. आद्य पुरुषानें वेदोच्चार केला असें जरी म्हटलें तरी वेद त्यानें केले असें म्हणतां येणार नाहीं, कारण त्यांचा उच्चार त्यानें आपण होऊन म्हणजे जाणूनबुजून केलेला नाहीं. वेद हे स्वतःसिद्ध आहेत असें जैमिनीप्रमाणें कपिलाचेंहि मत आहे. वैशेषिक व कपिल यांच्यामध्यें पुढील बाबतीपुरताच फरक आहे:–कपिल म्हणतो,—

नन्वेवं यथार्थवाक्यार्थज्ञानापूर्वकत्वात् शुकवाक्यस्येव वेदानामपि प्रामाण्यं न स्यात्……‡।

* तर्कसंग्रह. See Dr. Ballantyne's ed. with Hindi and English Versions P. 40 of the Sanskrit.

* कुसुमाञ्जलि दुसरा स्तवक. ३,१६; ५,१;५,१६.
† सांख्यसूत्रें. ५ वें. मंडल, सूत्र ४५ वें. ‡ सूत्र ५०

मीमांसक असें समजतात कीं, स्फोट हें ध्वनीचें जरा फरक करून झालेलें स्वरूप आहे; त्या स्फोटाचें वर्णन ते पुढीलप्रमाणें करितात—

प्रत्येकवर्णेभ्योतिरिक्तकलशइत्यादिरूपमखण्डमेकपदं स्फोटः .........।

कपिलाच्या मतें हें म्हणणें चूक आहे. ध्वनि नित्य नाहीं असें तो म्हणतो—न शब्दनित्यत्वं कार्यताप्रतीतेः।

दर्शनकार वेदांचा कसा उपयोग करितात व त्यांचा अर्थ करण्याची त्यांची पद्धति कशी आहे याविषयीं थोडा विचार करूं.

ब्रह्ममीमांसा किंवा वेदान्त ही कर्ममीमांसेची पूरक आहे व तिला उत्तरमीमांसा म्हणतात. तींत वेदाच्या अस्तित्वाविषयीं ऊहापोह केलेला आहे; पूर्वमीमांसेंत कर्मे व त्यांचीं फलें यांचा ऊहापोह केलेला आहे. दोन मीमांसा मिळून वेदांतील मतें व सिद्धांत—कर्मविषयक व देवज्ञान-विषयक दोन्ही—यांचें पूर्ण विवरण आपणांस पहावयास सांपडतें. कर्ममीमांसेंत जें ध्येय सांगितलें आहे तें बिन-मोलाचें आहे असें ब्रह्ममीमांसेंत सांगण्याचा प्रयत्न करण्यांत आला आहे. बिनमोलाचें असण्याचें कारण हें कीं कर्म-मीमांसेंत सांगितलेलें भविष्यत् कालच्या स्थितींत मिळणारें सुख ब्रह्ममीमांसकांच्या मतें क्षणिक आहे. शङ्कराचार्य तर म्हणतात कीं—

नन्विह कर्मावबोधानन्तर्यं विशेषः। न। धर्मजिज्ञासायाः प्रागप्यधीतवेदान्तस्य ब्रह्मजिज्ञासोपपत्तेः।*

ब्रह्मसूत्रांवरील शांकरभाष्य व त्याच सूत्रांवरील जैमिनीचीं टीका पाहिल्यास आपणांस ठिकठिकाणीं असें आढळून येतें कीं उत्तरमीमांसाकार व तिचेवर भाष्य लिहिणारा (वेदान्ती) हे दोघे ज्या उपनिषदांचें विवरण करितात त्याच उपनिषदांचें विवरण जैमिनीनें केलें असल्यास ते दोघे व जैमिनि यांच्या विवरणांत हमेशा फरक पडतो. तसाच फरक वेदान्त व सांख्यसूत्रें व त्यांच्यावरील टीका पाहिल्या असतां आढळून येतो. वेदान्ती व सांख्यसूत्रकार हे आपआपलीं मतें तींच वेदांतील मतें असें प्रतिपादन करतात. ब्रह्म-सूत्रकार किंवा वेदान्ती व सांख्यसूत्रकार ह्या दोहोंपैकीं उप-निषदांतील अत्यंत रूढ अशा मताशीं कोणाचीं मतें जुळतात हें पहावयाचें असल्यास डॉ. रुअर (Röer) यांचीं त्यांजवरील टिपणें पहा.

वैशेषिक मतानुयायांच्या बाबतींत हीच गोष्ट दृष्टोत्पत्तीस येते; उत्तरमीमांसाकार किंवा वेदान्ती उपनिषदांचा जो अर्थ करितात तो अर्थ वैशेषिकमतानुयायी स्पष्टपणें नाकबूल करितात.*

वेदाच्या अर्थासंबंधीं वेदान्ती लोकांचीं जीं मतें आहेत त्यांत व शाण्डिल्याच्या मतांत जमीनअस्मानाचें अंतर आहे.†

वरील एकंदर विवेचनावरून आपणांस असें दिसून येतें कीं,

(१) ज्यांत विचारांचें एकीकरण करण्याचा प्रयत्न आढळत नाहीं व ज्यांच्या भागाभागांत त्यामुळें विसंगतपणा दृष्टीस पडतो अशा वेदांसारख्या परंपरेनें पवित्र व निर्दोष मानल्याजाणाऱ्या ग्रन्थांचें स्पष्टीकरण आचार्य आपआपल्या स्वतःच्या मताप्रमाणें करीत; म्हणजे त्यांच्या मतानें वेदांचा जो अर्थ होतो तो खरा असें प्रतिपादन करण्याकडे त्यांचा कल दिसतो. वेदांत कधींहि न बदलणारीं व संगतवार अशीं धर्मविषयक ठाम मतें आहेत असेंहि दाखविण्याचा हे आचार्य प्रयत्न करीत.

(२) निरनिराळीं मतें प्रतिपादन करणारे जे पंथ आहेत त्या निरनिराळ्या पंथांतील ग्रन्थकारांमध्यें वेदांसारख्या ग्रन्थांच्या अर्थाच्या बाबतींत बरेंच मतांतर दृष्टीस पडतें. वेदांत अमुक एक प्रकारचींच तत्त्वें आढळतात असें हे निरनिराळे लेखक जोरानें सांगतात; परंतु कोणत्याहि दोन पंथांच्या लेखकांचीं अशा प्रकारचीं हीं तत्त्वें परस्परविरोधी किंवा विसंगत असतात.

"न्यायमालाविस्तर" व "मनुस्मृतीवरील कुल्लूकाचें भाष्य" यांतील टीपेंत दिलेले उतारे‡ लक्षांत घेतल्यास असें दिसून येतें कीं, पाणिनीच्या कालच्या लेखकांनीं वेद व इतर सर्व ग्रन्थ या दोहोंमधील मर्यादादर्शक एक कल्पित रेषा आंखलेली आहे. इतर सर्व ग्रन्थ असें जें वर म्हटलें त्यांत दर्शनें, स्मृती, पुराणें, इतिहास इत्यादिकांचा समावेश होतो. वेदांना स्वतंत्र व कधींहि न चुकणारे मार्गदर्शक किंवा वाटाडे समजतात, आणि इतर ग्रन्थांची उभारणी वेदांवर झाली असली व त्यांतील मतें वेदांशीं जुळतीं असलीं तर तेवढ्यापुरतेच फक्त ते ग्रन्थ "प्रमाण" समजण्यांत येतात; उरलेल्या बाबतींत ते प्रमाण समजण्यांत येत नाहींत.

वेद व इतर ग्रन्थ यांतील वरील मान्यताभेदाचा जो दृश्य परिणाम व्हावयाचा तो एका गोष्टीमुळें बराच कमी झालेला आहे. ती गोष्ट म्हटली म्हणजे ही कीं, मनूसारखे स्मृतिकार व पुराणऋषी हे पुराणमतवादी आहेत असें समजण्यांत येतें. हल्लीं उपलब्ध नसलेल्या वेदग्रन्थांचें त्यांनीं अध्ययन केलें होतें

* ब्रह्मसूत्रावरील शङ्कराचार्यांचें भाष्य. १. १, १. P. 25 of Bibl. Ind. Ed.

* वैशेषिकसूत्रें ३.२,२१ व त्यावरील शङ्करमिश्राची टीका पहा. † शाण्डिल्यकृत भक्तिसूत्रें—सूत्रें १,२,४,७,७८,७९. ‡ न्याय-मालाविस्तर १. ३, २४; व मनुस्मृति १. १ वरील कुल्लूकाचें भाष्य पहा.

असें माधवाचार्य* व शङ्कराचार्य† यांजसारख्यांकडून मानलें जाई. देवांशीं त्यांची बोलाचाली होत असे व त्यांच्या नंतरच्या मानवांनां मिळविण्यास अशक्य अशा प्रकारच्या ईश्वरी चमत्कारांचें ज्ञान त्यांनां साहजिक होतें असें समजण्यांत येत असे. येथें एक गोष्ट लक्षांत ठेविली पाहिजे कीं ब्रह्मज्ञान जाणण्याची अतींद्रिय दृष्टि सर्वच प्राचीन ऋषींच्या अंगीं नव्हती. उदाहरणार्थ, शङ्कराचार्यांच्या मतें कपिलाचें वचन प्रमाण मानतां येत नाहीं.‡ उपनिषदांत¶ कपिलाची फार महती गाइली आहे पण वर सांगितल्याप्रमाणें शङ्कराचार्यांनां ती पसंत नाहीं.§

कपिलाची निंदा शङ्कराचार्यांनीं वरीलप्रमाणें केली आहे, पण भागवतपुराणांत|| व इतर ठिकाणीं§ त्याची फार स्तुति केलेली आहे.

प्राचीन कालीं निरनिराळे दर्शनकार विरुद्ध मतांनां तोंड देऊन आपलीं मतेंच काय तीं खरीं आहेत असें जरी ओरडून सांगत असले; तथापि अलीकडे वेदांतांतील मत विशेष श्रेष्ठ प्रकारचें आहे ही गोष्ट आतां सामान्यपणें लोक कबूल करूं लागले आहेत. इतर अनेक प्रकारच्या मतांत कितीहि जरी फरक असला तथापि वेदांतांतील मताशीं आपलें मत जुळतें असावें अशी ह्या सर्व मतांची सरतेशेवटची अपेक्षा असते असें मधुसूदनसरस्वती आदिकरून लोक समजतात.**

सांख्यसूत्रावर भाष्य लिहिणारा विज्ञानभिक्षु†† म्हणतो कीं, कपिलमुनींचा निरीश्वरवाद व वेदांतादि ग्रंथांतला सेश्वरवाद यांचें जमत नाहीं असें नाहीं. देव नाहीं असें कपिल व्यवहारापुरतें मात्र बोलतो; आणि असें बोलण्याचें कारण एवढेंच कीं, नित्य व सर्वगुणसंपन्न अशा एखाद्या देवतेच्या ध्यानांत निमग्न झाल्यामुळें वस्तु व चैतन्य यांतील भेद ओळखण्यांत लोकांनां मध्यें अडथळा येऊं नये. सांख्यमताचे जे दोन मुख्य हेतू व मुद्दे आहेत त्यांपैकीं एक असा आहे कीं, मोक्ष मिळविण्याचें मोठें साधन वरील भेद लोकांनीं नीट समजून घेणें अवश्य आहे हें लोकांनां शिकविणें. वरील गोष्टीपुरतेंच सांख्यमताला "प्रमाणत्व" आहे. सांख्य तत्त्वज्ञानांत निरीश्वरवादाचा पुरस्कार केल्यामुळें त्या तत्त्वज्ञानांत तेवढा भाग गौण मानण्यांत येतो. देव आहे किंवा नाहीं या विषयावर सांख्यग्रंथांनां कोणीच प्रमाण मानीत नाहीं.

विज्ञानभिक्षु पुढें म्हणतो,......अस्तु वा पापिनां ज्ञानप्रतिबन्धार्थमास्तिकदर्शनेष्वप्यंशतः श्रुतिविरुद्धार्थव्यवस्थापनं तेषु तेष्वंशेष्वप्रामाण्यं च । श्रुतिस्मृत्यविरुद्धेषु तु मुख्यविषयेषु प्रामाण्यमस्त्येव ।.........

नंतर विज्ञानभिक्षु पद्मपुराणांतील उतार्‍यावरून सांगतो कीं, "पद्मपुराणांत शिव पार्वतीला म्हणतो. 'वैशेषिक, न्याय, सांख्य, पूर्वमीमांसा दर्शनें व वेदान्तांतील मायावाद यांतील तत्त्वें काळीं (तमस्) म्हणजे अस्पष्ट असल्यामुळें त्यांनां प्रमाण कोणी मानीत नाहीं. तथापि सर्व आस्तिक शास्त्रें प्रमाण आहेत; व त्या त्या शास्त्रांत जो विषय प्रतिपादन केलेला आहे त्यांत चूक मुळींच आढळून येत नाहीं." एकात्मत्वाविषयीं वेदान्त व सांख्य यांच्यामध्यें जरी विरोध दिसून येत असला तथापि सांख्याला प्रमाणग्रन्थ मानण्यास हरकत नाहीं (तथापि च सांख्यस्य नाप्रामाण्यम् ।) कारण, *व्यावहारिकात्मनो जीवस्येतरविवेकज्ञानस्य मोक्षसाधनत्वे विवक्षितार्थे बाधाभावात् । एतेन श्रुतिस्मृतिप्रसिद्धयोर्नानात्मैकात्मत्वयोर्व्यावहारिकपारमार्थिकभेदेनाविरोधः ।

अपौरुषेय वेद व त्यांनां जोडलेलीं पौरुषेय म्हणजे मनुष्यकृत परिशिष्टें, कल्पसूत्रें वगैरे व स्मृती यांच्यामध्यें जो फरक टीकाकार दाखवीत असतात तो खरा नाहीं असें कांहीं ग्रंथांचें मत दिसतें. बृहदारण्यक व मुण्डकोपनिषद् या दोहोंत वेद धरून निरनिराळ्या तर्‍हेचीं सर्व शास्त्रें एकाच वर्गात घातलीं आहेत. हीं शास्त्रें ब्रह्माचा श्वास आहेत असें बृहदारण्यकांत सांगितलें आहे.† मुण्डकोपनिषदांत सांगितलें आहे कीं, उपनिषदांखेरीज इतर सर्व शास्त्रें हे श्रेष्ठज्ञानाचे म्हणजे ब्रह्मज्ञानाचे भाग नसून गौणज्ञानाचे भाग आहेत. मुण्डकोपनिषदाप्रमाणें छान्दोग्योपनिषदांतहि‡ वेद व तर्‍हेतर्‍हेचीं संकीर्ण शास्त्रें एकाच पंक्तीस बसविलीं आहेत. वेद त्यांच्या पंक्तीस बसविलेल्या शास्त्रांपेक्षां वरिष्ठ दर्जाचे आहेत असें छान्दोग्योपनिषदांत दर्शविलेलें नाहीं. वेद व इतर शास्त्रें यांच्यांत मोठा फरक आहे असें आधुनिक मत असल्यामुळें त्या मताविरुद्ध जाऊन "वेद व इतर शास्त्रें यांचें उत्पत्तिस्थान एकच आहे" असें शङ्कराचार्यांनां म्हणतां येईना.

---

* न्यायमालाविस्तर १.३,३;९. † ब्रह्मसूत्र १.३,३३. वरील शङ्कराचार्यांची टीका पहा. ‡ ब्रह्मसूत्र २.१ वरील शङ्कराचार्यांच्या भाष्याचा उत्तरभाग पहा. ¶ श्वेताश्वतरोपनिषद् ५.२. § तैत्तिरीयोपनिषदावरील, (Bib. Ind. P. P. 136, 137) शङ्कराचार्यांची टीका पहा. प्रश्नोपनिषद् ६.४; (Bib. Ind. VIII. 244) वरील शङ्कराचार्यांची टीका पहा. || भागवतपुराण. १.३,१०;९.९,८;१२;१३. § महाभारत शांतिपर्व ११०३७ वा व पुढील श्लोक. Colebroke's essays I 236. Wilson's Vishnu Puran Pref. p. xciv and Text pp. 18ff. Bhagawata Purāna III Chapters 24-30 Dr. Roöer' Introduction to श्वेताश्वतरोपनिषद्, Bibl. Ind. xv. xv. ff. ** मधुसूदनसरस्वतीकृत "प्रस्थानभेद" हा ग्रंथ पहा. Weber's Indische Studien, †† विज्ञानभिक्षुकृत "सांख्यप्रवचनभाष्य." Bibliotheca Indica, pp. 3 ff.

* सांख्यप्रवचनभाष्य Bibliothica Indieca pp. 3 ff.
† See pp. 8, 31 of vol. III. Muir's Sankrit Texts.
‡ P. 32, Muir's Sanskrit Texts Quotation from छान्दोग्योपनिषद्.

बृहदारण्यकांतील उताऱ्यावरील आपल्या भाष्यांत शङ्कराचार्यांनीं* असें दर्शविण्याचा प्रयत्न केला आहे कीं, वेदांबरोबर ज्या इतर शास्त्रांचा उच्चार ब्रह्मानें केला असें समजतात तीं शास्त्रें वस्तुतः "ब्राह्मणांचे" भागच होत. शङ्कराचार्यांचें हें म्हणणें यादींतील सर्वच ग्रन्थांनां लागू होणें अशक्य आहे. मुण्डक व छान्दोग्योपनिषदांतील इतर उताऱ्यांचा रोख लक्षांत घेतल्यास शङ्कराचार्यांच्या वरील भाष्याचें बीज लक्षांत येतें. इतिहास व पुराणें यांत अशा प्रकारचा भेद नाकारला आहे.

**जैनांची वेदांविषयीं वृत्ति.**—ही निश्चित नव्हती. वेळेस खरे वेद लुप्त झाले आहेत, वेळेस ते इतरांत समजत नाहींत, ते आम्हांसच समजतात अशीं परस्परविरुद्ध विधानें त्यांच्या ग्रंथांत दृष्टीस पडतात. जेव्हां जैन वेदांविषयीं बोलत तेव्हां ते सध्यांच्या वेदानांच वेद समजत असत यास पुरावा त्यांच्या हरिवंशपुराणांतच आहे.

सतराव्या सर्गांत (८४–८५) नारद व पर्वत यांचा वाद दिला आहे त्यांत वेदग्रंथांचें वर्णन करतांना सभ्यांच्या कानाला अतिशय आनंद देणारा सामवेद व प्रारंभींच्या ओंकाराचा जोरानें उच्चार होतो असा यजुर्वेद असा उल्लेख असून ऱ्हस्व, दीर्घ, प्लुत या भेदांनीं उदात्त, अनुदात्त आणि स्वरित यांचें भिन्नस्वरूप समजाविलें जात होतें असा उल्लेख आहे. शिवाय मंत्र, पद आणि क्रम यांनीं वेद म्हटले जातात असें दाखविलें आहे. 'अजैर्यष्टव्यं', 'स्वर्गकामः अग्निहोत्रं जुहुयात्', हीं वेदांतील वाक्यें आहेत अशी कबूली दिली आहे. मात्र यांचा अर्थ काय याविषयीं मतभेद दाखविला आहे. पर्वत, नारद व राजा वसु हे तिघेहि एकाच गुरूचे शिष्य होते. बोकड मारून यज्ञ करावा हा पर्वतानें घेतलेला अर्थ संप्रदायविरुद्ध आहे असें नारद सांगतो, आणि खरा अर्थ बोकड मारावा असा नाहीं तर निराळाच कांहीं आहे असें पर्वताची आई ब्राह्मणी स्वस्तिमती हिला ठाऊक असूनहि पुत्रास "खऱ्या अर्था"कडे वळविण्याच्या परिश्रमांत अपयश आल्यानंतर पुत्रमोहामुळें ती वसुराजाकडून परंपरागत अर्थ पर्वत म्हणतो त्याप्रमाणें बोकड मारावा असाच आहे असें सांगण्याचें अभिवचन घेते आणि या वचनानुसार राजा वसूनें पर्वताचाच अर्थ खरा आहे असें सांगितल्यामुळें तो राजा नरकास जातो, असें दाखविलें आहे. नारदाच्या मतें "नजायंते इत्यजा" म्हणजे शालिधान्य आणि त्यांहीं यजन म्हणजे देवपूजा करावी असें आहे.

जैन हरिवंशाची वेदविषयक वृत्ति अन्यत्र निराळ्या प्रकारें दिसून येते. तेविसाव्या सर्गांत कृष्णाचा बाप वसुदेव यानें एका ब्राह्मणीस वेदविषयक वादांत जिंकून तिच्याशीं लग्न लावलें असें दाखविलें आहे, आणि त्या प्रसंगीं ब्राह्मणांचे वेद खोटे असून जैनांचे ग्रंथ तेच खरे वेद असें मत प्रतिपादित केलें आहे. विश्वदेव ब्राह्मणाची कन्या सोमश्री हीस जिंकण्यासाठीं वसुदेव एका ब्रह्मदत्त नांवाच्या वेदवेत्त्या ब्राह्मणाकडे जातो (श्लोक २६ पासून पुढें). ब्रह्मदत्त वसुदेवास शिकवितो कीं, वेद दोन प्रकारचे आहेत एक आर्ष आणि दुसरे अनार्ष. जेव्हां युगाच्या प्रारंभीं सर्व कल्पवृक्षांचा क्षय झाला तेव्हां तीन ज्ञानांचे धारक "भगवान आदीश्वर" यांनीं तीन वर्णांचे भेद करून प्रजेस षट्कर्मांचा उपदेश केला. पुढें आदीश्वराचें चित्त संसाराविषयीं विरक्त झालें तेव्हां भरतादि शंभर पुत्रांस राज्य अर्पण करून चार हजार राजांसह त्यानें दिगंबरपंथाची दीक्षा धारण केली. आदीश्वरानें गृहस्थाश्रम आणि मुनींचा आश्रम असे दोनच आश्रम दाखविले. गृहस्थाश्रमानें स्वर्ग प्राप्त होतो व मुनींच्या आश्रमानें मोक्ष प्राप्त होतो. द्वादशांगरूपी बारा वेद त्यानें दाखविले आणि त्यांमध्यें मुख्यतः मुनिधर्माचा उपदेश केला तथापि मधूनमधून श्रावकधर्महि सांगितला. अणुव्रत, गुणव्रत आणि शिक्षाव्रत यांचें पालन करणाऱ्या श्रावकांस अनेक नियम घालून दिले. यामुळें ज्या वेदांचें वर्णन भगवान् ऋषभानें केलें तो आर्ष वेद होय. युगाच्या प्रारंभीं चक्रवर्ती भरतानें याच वेदांचा अभ्यास केला. त्यानेंच ब्राह्मणवर्णाची स्थापना केली आणि ब्राह्मणहि हाच धर्मयज्ञ करीत होते. अनार्ष वेद मनुष्यद्वारा उत्पन्न झाले आणि अनार्ष वेदांत चालू युगांत होणाऱ्या मनुष्यांच्या क्रियांचें वर्णन आहे. आतां खोटे वेद आले तरी कसे? सुलसानामक देखण्या राजकन्येच्या स्वयंवरप्रसंगीं सगर राजानें मधुपिंगलास पाहिलें आणि हा जर स्वयंवरमंडपांत राहिला तर सुलसा आपणांस मिळणें शक्य नाहीं हें जाणून सगरानें अपयशी अवगुण कोणते, यांची यादी पुरोहितामार्फत मधुपिंगलास वाचवून दाखविली. त्या यादींत प्रत्येक शारीरिक सुलक्षणाचें फल अनिष्ट दिलें होतें. मधुपिंगल घाबरून बाहेर पडला आणि त्यानें दिगंबर दीक्षा धारण केली. इकडे सगरास सुलसेनें माळ घातली. पुढें मधुपिंगलास दुसऱ्या एका ज्योतिष्यानें सांगितलें कीं, तुझ्या अंगावर जीं चिन्हें आहेत तीं सर्व सुचिन्हें आहेत. तेव्हां त्यास कळलें कीं, सगर राजानें आपणांस ठकविलें. तेव्हां तो क्रुद्ध झाला आणि त्या विकारवशतेमुळें त्याचा प्राण हृदयांतून निघून गेला व मधुपिंगल हा महाकाल नांवाचा नीच देव झाला. महाकालास सगरानें आपणास पूर्वजन्मीं फसविलें याची जाणीव होतीच. त्यानें त्याचा बदला घेण्यासाठीं युक्ति योजिली ती येणेंप्रमाणें—सगराकडे जातांना रस्त्यावर त्यास नारदानें पराभूत केलेला पर्वत भेटला तेव्हां तो पर्वतास म्हणाला, "पर्वता, तूं आणि मी तर गुरुबंधु, तुझा पराभव तो माझा पराभव असें मी समजतों तर आपण तुझाच संप्रदाय जगांत प्रवर्तवूं." महाकाल दुष्टानें याप्रमाणें पर्वतास आपल्या कक्षेंत घेऊन भरतक्षेत्रांतील राजे व प्रजा यांस शेंकडों रोगांनीं आकुलित केलें आणि पर्वतास शिकविलें कीं त्या रोगांच्या शमनार्थ अनेक यज्ञ करावेत. यज्ञ केल्यानंतर रोग कोठें कोठें शांत होऊं लागले आणि लोकांचा पर्वतावर मोठा विश्वास जडला आणि ते त्याचे शिष्य झाले. दुष्ट महाकालानें ज्यांत हिंसेचें पूर्ण वर्णन आहे असे स्वतः बनविलेले अनार्ष वेद विप्रांस पढविले आणि त्यांस वश केलें. पुत्रादि नानाफलांची अभिलाषा करणाऱ्या क्षत्रियांनां अश्वमेध, अजमेध आणि गोमेध हे दाखवून दिले. आपलें व दुसऱ्याचें अनिष्ट करणारे ब्राह्मण शेवटीं गोळा करून त्यांजकडून सुलसा व सगर यांचाहि होम करविला, व याप्रमाणें कृतकृत्य होऊन तो स्वस्थानाप्रत

* बृहदारण्यकावरील शङ्कराचार्यांची टीका. Bibliotheca Indica. II 855 ff.

गेला. येणेंप्रमाणें पर्वतानें क्रोधवश वेदांची प्रवृत्ति केली आणि त्यांचा प्रसार जगांत केला.

महाकाल आणि पर्वत हे याप्रकारें शेंकडों पशूंचा नाश करीत असतां प्राग्दिवाकर देव नांवाच्या विद्याधरास दया आली व तो नारदासह तेथें आला, तथापि महाकाल हा दुष्ट असला तरी देव होता त्यापुढें विद्याधराचें काय चालणार? अणिमादि ऋद्धींच्या प्रभावामुळें हें सर्व होऊं शकतें. यज्ञास विरोध करणाऱ्या प्राग्दिवाकरानें नारदाचा मुलगा परमसम्यग्दृष्टि यास आपली परमकल्याणी ही मुलगी दिली. तीच परमकल्याणी ब्राह्मणकुलामध्यें क्षत्रियेपासून उत्पन्न झालेल्या विश्वदेव ब्राह्मणाची सोमश्री मुलगी होय. तिचें लग्न तिला वेदांत जिंकणाऱ्याबरोबर होईल असें अवधिज्ञानी मुनिराज कराल ब्रह्मदत्त यानें भविष्य केलें आहे.

हा वृत्तांत जाणल्यानंतर वसुदेवानें "सगळे वेद" शिकून घेतले आणि सोमश्रीस जिंकून तिजबरोबर लग्न लावलें.

वेदांसंबंधीं भारतीयांची वृत्ति येणेंप्रमाणें सांगतां येईल– पैतृक ग्रंथ आणि ज्ञानाचें मूळ या दृष्टीनें सर्व लोकांस वेद पूज्य आहेत. त्यांचें अपौरुषेयत्व सिद्ध करूं पाहणारा एक वर्ग समाजांत होता; पण तो भारतीय इतिहासांत बऱ्याच उत्तरकालीं उत्पन्न झाला. वेद हे अत्यंत प्राचीन धर्मांचे निदर्शक ग्रंथ होत अशी ज्याप्रमाणें लौकिक भावना आहे त्याप्रमाणेंच ऐतिहासिक सत्यहि आहेच. उत्तरकालीन विचारांचा ओघ वेदानुवृत्त होता, आणि वेदांचें महत्त्व कायम राखण्यासाठीं पुष्कळ खटपट झालेली दिसते. आजच्या भारतीय समाजास आणि त्याबरोबर सर्व जगास जगांतील अत्यंत प्राचीन भाषेचें, प्राचीन धर्मांचें आणि प्राचीन सामाजिक स्थितीचें द्योतक म्हणून वेदांचें महत्त्व आहे. आजच्या वेदानुयायी म्हणविणाऱ्या लोकांचीं मतें आणि वेदाविरुद्ध असणाऱ्या लोकांचीं मतें प्रत्यक्ष वेदाशींच तुलना केली असतां वेदांपासून सारखींच जवळ किंवा सारखींच दूर आहेत असें आढळून येईल. वेदांस मानणाऱ्या लोकांत पूर्वीं ज्याप्रमाणें विचारभेद होते त्याप्रमाणें पुढेंहि राहतील. समाजांत जे जे फेरबदल होत जातात त्यांचें समर्थन किंवा त्यांस विरोध करतांना लोक वेदांकडे अजूनहि पाहतीलच, आणि कदाचित् त्यामुळें कायदेपंडितहि वेदांकडे नजर फेंकतील. सर्व जगास वेदांचें महत्त्व आहे तें ऐतिहासिक आणि समाजशास्त्रीय आहे; आणि इतःपर वेदांचा अभ्यास होईल तो या व ऐतिहासिक समाजशास्त्रीय दृष्टीनेंच होईल.

## प्रकरण २ रें.

### वेदप्रवेश—ऋग्वेद.

**वेदकालेतिहास.**—इतिहासाची अत्यंत स्थूल कल्पना म्हणजे कालानुक्रमानें वृत्तांत. कालानुक्रमानें वृत्तांत या विधानांतहि दोन कल्पना येतात. एक कल्पना म्हटली म्हणजे, घडलेल्या गोष्टींपैकीं अगोदर कोणती झाली आणि नंतर कोणती झाली हें म्हणजे वृत्तांचें पौर्वापर्य सांगणें; आणि दुसरी कल्पना म्हटली म्हणजे पौर्वापर्य व कालाची गति यांची संगति दाखविणें. एखादी गोष्ट अमुक गोष्टीनंतर दहा वर्षांनीं, वीस वर्षांनीं अथवा तीस वर्षांनीं झाली असें सांगतां आलें म्हणजे दोन गोष्टींतील दूरपणा अधिक निश्चित तऱ्हेनें मोजला जात आहे असें होतें. हा दूरपणा आपण वर्षांनीं सांगतों म्हणजे आपण फक्त एका कार्यपरंपरेचा दुसऱ्या कार्यपरंपरेशीं संबंध दाखवितों. इतर कार्यपरंपरांशीं तुलना करण्यासाठीं आपण ज्योतिःशास्त्राचा उपयोग करितों याचें कारण आकाशस्थ ताऱ्यांच्या, ग्रहांच्या आणि उपग्रहांच्या गति म्हणजे दैनंदिन परिभ्रमणाच्या स्थानांतील फरक अधिक निश्चित कालानें होतात. शिवाय त्यांच्यामध्यें क्रियांची पुनरावृत्ति होत असल्यानें आणि तीहि नियमित कालानें होत असल्यामुळें कालपरिमाणास त्या अत्यंत उपयोगी पडतात.

ज्योतिःशास्त्रविषयक कालपरिमाणें आपण एकदां ठरविलीं म्हणजे काल मोजावा कोठपासून हें ठरवावें लागतें. काल मोजण्यास उपयुक्त प्रारंभस्थान मिळालें नसेल अशा कालांत ज्योतिःशास्त्रमूलक परिमाणपद्धति उपयोगी पडत नाहीं.

ज्योतिःशास्त्रमूलक कालपरिमाणाच्या म्हणजे वर्षविशिष्ट गणनाज्ञानाच्या अभावीं, वृत्तांचें समकालीनत्व अंकनिर्दिष्ट कालविभागाशीं दाखवावयाचें तें एकमेकांशीं दाखविलें पाहिजे. आपणांस सामाजिक संस्थांच्या प्रगतींची आणि भूपृष्ठावरील फेरफारांसारख्या इतर क्रियासमुच्चयांची एकामेकांशीं समकालीनत्व पाहून परस्परसंगति ठरविली पाहिजे. यासाठीं सोपा उपाय म्हटला म्हणजे ज्या संस्थेच्या इतिहासाची आपणांस अधिक सूक्ष्म माहिती असेल त्या संस्थेच्या इतिहासाशीं इतर वृत्तांत जुळविले पाहिजेत. ज्या संस्थांनां कांहीं इतिहास आहे अशा संस्थांच्या प्रगतीच्या पायऱ्या जाणल्या पाहिजेत.

वेदकाल म्हणजे सर्व वैदिक वाङ्मयामध्यें अगदीं पहिलें सूक्त अगर पहिलीं सूक्तें जेव्हां रचलीं गेलीं तेव्हांपासून वेदांच्या संहिता ज्या काळांत झाल्या त्या काळापर्यंत सर्व कालविस्तार होय. या विस्तृत कालामध्यें सामाजिक संस्थांनां, विशेषतः ब्राह्मण जातीला, अनेक रूपांतरांतून जावें लागलें आहे. याच काळांत यज्ञसंस्था अमंत्रक क्रियेपासून मोठमोठ्या क्रतूंच्या कल्पनेपर्यंत वाढली आणि जवळ जवळ नष्टहि होण्याच्या पंथास लागली. आर्यांचा प्रसार या काळांत सर्व हिंदुस्थानभर आणि कांहीं अंशीं हिंदुस्थानाबाहेर झालेला दिसतो. त्यांची भाषा अनेक फरक पावलेली दिसते. देवतांच्या उच्चनीचतेंत फरक झालेले दृष्टीस पडतात. आर्यांचा जो चोहोंकडे विस्तार झाला त्या विस्तारावरोबर झालेल्या राजकीय खळवळी देखील दृष्टीस पडतात. कुलें गोत्रें यांच्या देखील अनेक पिढ्या होऊन गेल्या. कुलाभिमान व गोत्राभिमान देखील समाजांत

दृग्गोचर होत असे. सामाजिक संस्थांमध्यें एक महत्त्वाची संस्था जें गृह त्याचाहि विकास प्राथमिक व अनियंत्रित स्वरूपापासून झालेला दिसतो. आर्यांची विचार करण्याची संवय देखील क्रमानें वरीच वृद्धिंगत झालेली दृष्टीस पडते.

या सर्व प्रकारची प्रगति आपणांस वेदकालांत दृष्टीस पडते. या प्रगतीचा इतिहास लिहितांना केवळ या काळांत आढळणारे एकमेकांशीं असंबद्ध देखावे आपणांस दाखवावयाचे नाहींत. प्रत्येक प्रकारच्या प्रगतीचा दुसऱ्या प्रकारच्या प्रगतीशीं संबंध येतो. ग्रंथांचें स्वरूप ब्राह्मणजातीच्या इतिहासाशीं व प्रयत्नाशीं फारच निकट रीतीनें संबद्ध आहे. शब्दांचा व भाषेचा इतिहास हा लोकांच्या प्रसाराशीं संबद्ध आहे. आणि यज्ञसंस्थेचा इतिहास घेतला तर इतिहासांतील अनेक वृत्तें समाजाच्या दुसऱ्या अंगांशीं संबद्ध आहेत. यामुळें प्रत्येक अंगाचा स्वतंत्रपणें इतिहास द्यावा लागेल आणि त्या इतिहासांतील वृत्तांचा संबंध समाजाच्या इतर अंगांच्या प्रगतीच्या वृत्तांशीं शोधून द्यावा लागेल. या प्रकारानें इतिहास-निवेदन करावयास घेतलें म्हणजे प्रत्येक अंगाची प्रगति मोजतां येईल. विवेचनसौलभ्यासाठीं वेदकालेतिहासाचे खालील विभाग पाडतां येतील.

( १ ) ग्रंथाचा विकास व वाङ्मयेतिहास.

( २ ) सामाजिक संस्थांचा व विशेषेंकरून ब्राह्मणजातीचा इतिहास.

( ३ ) यज्ञसंस्थेचा इतिहास.

( ४ ) आर्यांच्या प्रसाराचा इतिहास.

( ५ ) शब्दांचा व भाषेचा इतिहास.

( ६ ) देवतांचा इतिहास.

( ७ ) राजकीय खळवळी.

( ८ ) कुलांचा, जातींचा व गोत्रांचा इतिहास.

( ९ ) गृहस्थधर्माचा, व स्त्रीपुरुषसंबंधाचा इतिहास.

( १० ) व्यापक व नियमांकित विचाराचा इतिहास.

या दहा मुद्द्यांवरील इतिहास दिला म्हणजे अत्यंत विस्तीर्ण अशा वेदकालावर जो अंधार पसरला आहे तो बराच नाहींसा होईल. या दहा इतिहासांगांपैकीं कांहीं अंगांचा एकमेकांशीं फार निकट संबंध आहे. यज्ञसंस्थेच्या इतिहासाशीं व्यापक विचाराचा इतिहास संबद्ध आहे, त्यापेक्षां सामाजिक संस्थांचा व विशेषतः ब्राह्मणजातीचा इतिहास फारच निकट रीतीनें संबद्ध आहे.

वर दिलेल्या बाबींचा इतिहास द्यावयाचा तो विधान-रूपानें न देतां विवेचनरूपानें देणें अवश्य आहे. कां कीं, वेदविषयक अनेक गोष्टी लोकांस अपरिचित असल्यामुळें आणि अर्थ लावणाऱ्यांमध्यें अनेक मतें असल्यामुळें वाचकांचा ऐतिहासिक संशोधनात्मक विवेचनांत प्रवेश करून देणें अवश्य आहे.

संशोधनांत प्रवेश करून देण्यापूर्वीं वेदविषयक स्थूल माहिती तरी हवी, तीशिवाय विवेचन देखील समजावयाचें नाहीं; आणि यासाठीं विवेचनांत प्रवेश करण्यापूर्वीं कांहीं माहिती विधानरूपानें दिली पाहिजे. ही अशी माहिती अत्यंत बाह्य गोष्टींविषयीं म्हणजे वेदग्रंथांमध्यें पुस्तकें किती, त्यांचा एकमेकांशीं संबंध काय यापुरतीच द्यावयाची. तसेंच कांहीं अत्यंत साधें व बहुतेक वेद वाचणाऱ्यांस दृष्टीस पडणारें वेदाचें अंतरंग प्रथम वर्णन करून दाखविलें पाहिजे आणि नंतर वाचकांस अधिक खोलांत नेलें पाहिजे.

वेदग्रंथांतील धर्म वाचकांस समजावून द्यावयाचा म्हणजे एक बरेंच मोठें लचांड उपस्थित होतें. उपनिषदांतील कल्पना आज समाजांत बऱ्याच प्रचलित आहेत त्यामुळें त्यांचें मूळ सांगण्यास अडचण पडत नाहीं. उत्तरकालीन स्थिति अधिक परिचित असल्यामुळें पूर्वकालीन स्थितीची माहिती देतां येते. वैदिक धर्माची गोष्ट तशी नाहीं. वैदिक धर्म म्हणजे श्रौतधर्म म्हणजे यजुर्वेदधर्म आज सामान्य वाचकांस मुळींच परिचित नाहीं. श्रौतधर्म महाराष्ट्रांतील यज्ञयाग करणाऱ्या पांचपन्नास लोकांस मात्र तो थोडासा परिचित असेल. यासाठीं श्रौतधर्माचें उत्तरकालीन अथवा श्रौतसूत्रोक्त म्हणजे आजच्या प्रयोगी लोकांच्या परिचयाचें स्वरूप देऊन वैदिक धर्माचें स्पष्टीकरण केलें पाहिजे. हें स्वरूप सांगणें म्हणजे लिहिणाराला तसेंच वाचणाराला मोठें कंटाळवाणें आहे. तथापि इतिहास द्यावयाचा म्हणजे तें दिलें पाहिजे. तें देणें वाचकांच्या अभिरुचीचें कोड पुरविण्याची अपेक्षा न करतां वाचकांस वेद समजण्यास सोपें जाईल या बुद्धीनें दिलें पाहिजे, आणि कंटाळवाणा मजकूर दिल्याबद्दल वाचकाचा रोष निमूटपणानें सहन केला पाहिजे. असो.

आतां वेदाच्या स्थूल स्वरूपाकडे लक्ष देऊं. सामाजिक स्थिति, नीतिकल्पना, व्यवहारांतील पद्धति, छंदःशास्त्र, भाषा हे सर्व विषय स्वतंत्रपणें विवेचन करण्याजोगे आहेत आणि त्यांचा इतिहास हा स्वतंत्र विषय होतो. तथापि या सर्व प्रकारच्या विषयांचा थोडासा स्पर्श वेदांचें स्थूलरूप वर्णन करतांना होतो.

वेदकालीन धर्माच्या अधिक विकसितावस्थेचें उद्बोधन ज्या वेदोत्तर ग्रंथांत केलें आहे त्यांच्या साहाय्यानें वेदकाल-ज्ञान आपणांस मिळवावें लागेल.

**वेदांगें.**—वैदिक वाङ्मयाशीं अत्यंत निकट संबंध असलेला परंतु वेदांतला नव्हे असा एक ग्रंथसमूह आहे. याला कल्पसूत्रें किंवा नुसतीं सूत्रें असें म्हणतात. यांचा विषय धार्मिक विधि व संस्कार हा होय. यांची रचना गद्यात्मक आहे व त्यांतील वाक्यें लहान लहान असून त्यांत पुष्कळ अर्थ भरलेला असतो. कल्पसूत्रांचे तीन प्रकार आहेत.

(१) श्रौतसूत्रें:—श्रौतकर्म म्हणजे तीन किंवा अधिक अग्नींवर होणारें कर्म. या कर्मांचा बोध श्रौतसूत्रें करितात. श्रौतसूत्रांत मोठमोठ्या यज्ञांच्या प्रयोगांचे नियम दिलेले आहेत. हे यज्ञ पुष्कळ दिवसपर्यन्त चालत व त्यांस ऋत्विजहि पुष्कळ लागत.

(२) गृह्यसूत्रें:—एकाग्नीवरचीं कर्में करावयाचीं त्यांस स्मार्तकर्में म्हणतात. त्या कर्मांचें वर्णन गृह्यसूत्रांत आलें आहे. जन्म, विवाह, मृत्यु, इत्यादि प्रसंगीं करावे लागणारे लहानसान संस्कार, व नित्याचें होमहवन यांसंबंधीं नियम यांत येतात.

(३) धर्मसूत्रें:—आचारविषयक नियम, व व्यवहारविषयक नियम यांचा संग्रह यांत असतो. हीं धर्मसूत्रें म्हणजे भारतीयांचा अत्यंत प्राचीन असा कायद्यांचा संग्रह होय.

ब्राह्मणें, आरण्यकें, व उपनिषदें, या ग्रंथांप्रमाणेंच हे सूत्रग्रंथहि कोणत्याना कोणत्या तरी वेदाला जोडले आहेत. प्रत्येक वेदाला श्रौत, गृह्य, व धर्मसूत्रें, असे तिन्ही प्रकारचे निरनिराळे सूत्रग्रंथहि आहेत. हे ग्रंथ अर्थातच, निरनिराळ्या वैदिक संप्रदायांत त्या त्या विशिष्ट वेदाचा अभ्यास चालला असतां निर्माण झाले. वेदांप्रमाणें हे ग्रंथ अपौरुषेय आहेत असें मानलें जात नाहीं. ते पौरुषेय मानले जातात. हे ग्रंथ वेदांत अन्तर्भूत होत नसून वेदांगांमध्यें समाविष्ट होतात. वेदांगें म्हणजे वेदांचे उपग्रंथ.

वेदांगांमध्यें सूत्रांखेरीज शिक्षा, व्याकरण, निरुक्त, छंदस् व ज्योतिष या विषयांवरील अनेक ग्रंथ येतात. यांचा विचार पुढें करूं. यांचा उपयोग वेदज्ञान होण्यास आहे हें उघड आहे.

**ऋग्वेदसंहितेची रचना.**–ऋग्वेदसंहिता किंवा ज्याला सामान्यतः ऋग्वेद असें म्हणण्यांत येतें, तो ग्रंथ, किंवा त्या ग्रंथांतील बराच भाग वैदिक वाङ्मयांतील प्राचीनतम व अत्यंत महत्त्वाचा होय ही गोष्ट निर्विवाद आहे. या संहितेच्या निरनिराळ्या शाखांपैकीं एकच शाखा आज उपलब्ध आहे. ही शाखा शाकल शाखा होय. या शाखेची जी संहिता आहे तींत १०२८ सूक्तें असून तिचीं दहा मंडलें आहेत. याशिवाय अष्टक, अध्याय व वर्ग अशीहि एक कृत्रिम विभागरचना आहे. सबंद संहितेचीं आठ अष्टकें व प्रत्येक अष्टकाचे आठ अध्याय आहेत. अध्यायांतील वर्गांची संख्या नियमित नाहीं. प्रत्येक वर्गांत सरासरीनें पांच ऋचा अशी हि विभागरचना आहे. ही संहिता अत्यंत प्राचीन आहे किंवा निदान भारतीय वाङ्मयाचा प्राचीनतम भाग जेवढा आपणांस उपलब्ध आहे तेवढा यांत आहे हें यांतील सूक्तांच्या भाषेवरून निर्विवादपणें ठरवितां येतें. हा ग्रंथ एकानेंच केलेला नसून भाषेच्याच पुराव्यावरून यांतल्या यांतहि प्राचीन व अर्वाचीन असे भाग पाडतां येतात. हीब्रू लोकांचीं स्तोत्रें ज्याप्रमाणें एकमेकांपासून फार दूर अशा निरनिराळ्या काळांत रचिलीं गेलीं. व नंतर कांहीं काळानें तीं स्तोत्रें एकत्र करून प्रागैतिहासिककालीन कोणातरी पुरुषांच्या—विशेषतः ज्या परंपरांत तीं स्तोत्रें चालत आलीं त्या परंपरांच्या मूळपुरुषांच्या–नांवांवर घातलीं गेलीं, तसाच प्रकार ऋग्वेदसंहितेच्या सूक्तांचाहि झालेला आहे.

यांपैकीं प्राचीनतमसूक्तें ऋग्वेदसंहिता मंडळें २ ते ७ या भागांत आहेत. या मंडळांनां एकेका ऋषीच्या नांवाखालीं मोडणारीं गोत्र-मंडळें म्हणण्याचा प्रघात आहे. हीं सूक्तें गाणाऱ्या ऋषींचीं–किंवा आपण ज्यांनां मंत्रद्रष्टे म्हणतों त्यांचीं–नांवें कांहीं ब्राह्मणग्रंथांत, कांहीं अनुक्रमणी नांवाच्या स्वतंत्र ग्रंथांत, दिलेलीं आहेत. हे अनुक्रमणीग्रंथ वेदांगांशीं संबद्ध आहेत. हीं नांवें येणेंप्रमाणें:—गृत्समद, विश्वामित्र, वामदेव, अत्रि, भारद्वाज आणि वसिष्ठ. हे ऋषी व यांच्या परंपरेंतील लोक हे मंडळें २–७ यांचे अनुक्रमें मंत्रद्रष्टे होत.

आठव्या मंडळांत कण्व व अंगिरस् यांच्या शाखांचीं सूक्तें आहेत. परंतु यांशिवाय अनुक्रमणीग्रंथांत १, ९ व १० या मंडळांतील प्रत्येक सूक्ताच्या द्रष्ट्याचें नांव दिलेलें आहे; व यांत कांहीं स्त्रियांचींहि नांवें आढळतात ही ध्यानांत घेण्याजोगी गोष्ट आहे.

या नांवांचा उपयोग मंत्रकर्ते ऋषी खरे कोणते याचा निर्णय करण्याच्या कामीं मुळींच होत नाहीं. मंत्रद्रष्टे तेच मंत्रकर्ते होते असें म्हणतां येत नाहीं. कारण, गृत्समद विश्वामित्र, इत्यादि जे ऋषी व त्यांचे विवक्षित वंशज यांच्या नांवांवर जीं सूक्तें परंपरेनें चालत आलेलीं आहेत त्या सूक्तांत या कल्पनेच्या विरुद्ध कांहीं प्रमाणें आढळून येतात.* सूक्तांमध्यें या पुराणऋषींच्या वंशजांचींच कायतीं नांवें सूक्तांचे कर्ते म्हणून आलेलीं आहेत; व या सूक्तांतून गृत्समद, विश्वामित्र, वसिष्ठ इत्यादि ऋषींचीं जीं नांवें आलीं आहेत तीं विवक्षित सूक्तें ज्या गोत्रांत परंपरेनें चालत आलीं त्या गोत्रांचे मूळपुरुष म्हणून आलीं आहेत व याच सूक्तांत त्यांनां फार प्राचीन कालचे मंत्रद्रष्टे असें म्हटलें आहे. हे ऋषी व यांचीं नांवें भारतीय वाङ्मयांत सुप्रसिद्ध आहेत, व असंख्यात कथांचे व आख्यानांचे हे नायक आहेत.

नवव्या मंडलांत मात्र एक प्रकारची सुसंबद्धता व संगति आहे. त्याचें कारण असें कीं, त्यांत एकसहा सोमपानाची महती गाणारीं सूक्तें आहेत व हीं सूक्तें 'सोम' देवाला उद्देशून आहेत. सोम हें एका लतेचें नांव असून तिचा रस मोठा मादक असे असें दिसतें. पर्शुभारतीय काळांत या सोमरसाचें

* Oldenberg "Uber die Liedverfasser des Rigveda" in Z. D. M. G. Vol. 42. p. 199 &c. Already previously A. Ludwig, Der Rigveda Vol. III. XIII.

पान देवांनां मोठें प्रिय आहे असें मानीत असत. म्हणून प्राचीन इराणी लोक व भारतीय आर्य यांच्या यज्ञविधींत सोमाचें एवढें स्तोम आहे. इराणी लोकांत याला 'हओम' म्हणत. प्राचीन भारतीयांच्या पुराणकथांमध्यें सोमपानाची देवांच्या अमृतपानाशीं तुलना केलेली आहे. या दैवी पेयाचें मूलस्थान सुवर्णमय तेजोबिंदु चंद्र होय अशी कल्पना आहे. संस्कृतांत इंदु या शब्दाचा अर्थ चंद्र व बिंदु असा होतो. हिलेब्रँट यानें आपल्या ग्रंथांत* ऋग्वेदांत सुद्धां सोम शब्दाचा अर्थ केवळ पेय असाच नसून चंद्र असाहि होता असें दाखविलें आहे. अलीकडील वाङ्मयांत मात्र सोम म्हणजे चंद्र असाच अर्थ रूढ आहे. म्हणून नवव्या मंडळांत सोमदेवतेचें स्तोत्र केवळ देवांचें प्रिय पेय या नात्यानेंच गाइलें नसून, आकाशाचा स्वामी चंद्र या नात्यानेंहि गाइलेलें आहे. सोमदेवतेची पूजा पर्शुभारतीय काळापर्यंत पोहोंचत असल्याकारणानें नवव्या मंडळांतील सूक्तें बऱ्याच प्राचीनकालीं रचिलीं गेलीं असावीं असें अनुमान करण्यास हरकत नाहीं. या सूक्तांचा सोमयज्ञाशीं निकट संबंध येतो.

संहितेंतील सर्वांत अर्वाचीन सूक्तें पहिल्या व दहाव्या मंडळांत आढळतात. पहिलें व दहावें हीं मंडळें अत्यंत विविध विषयांवरील सूक्तांचीं बनलेलीं आहेत. या म्हणण्याचा अर्थ या मंडळांत प्राचीन सूक्तें मुळींच नाहींत असा नाहीं. उलट गोत्रमंडळें म्हणून जीं सांगितलीं त्यांतहि कित्येक अर्वाचीन सूक्तें आहेत.

**ऋग्वेदसूक्तांचा काल भाषाविषयक पुरावा.**— सामान्यतः कोणतीं सूक्तें प्राचीन व कोणतीं अर्वाचीन याचा निर्णय करण्याचें काम कठिण आहे. ही गोष्ट मुख्यतः भाषेवरून ठरवावी लागते व एखाद्या सूक्ताची भाषा, केवळ कालावर अवलंबून नसून त्याचा प्रसंग, त्याचा हेतु, व त्या सूक्ताचा संबंध ब्राह्मणी विधिमार्गाशीं जास्त आहे कीं, सामान्यजनधर्माशीं आहे, इत्यादि गोष्टींवर अवलंबून असते. सोम अथवा इंद्र यांच्या स्तुतिपर जीं सूक्तें आहेत त्यांची भाषा प्रार्थनापर वगैरे सूक्तांहून भिन्न दिसून येते परंतु तेवढ्यावरून एक पूर्वीचें व एक नंतरचें असा निश्चय करतां येत नाहीं.† तथापि भाषेच्या दृष्टीनें प्राचीन सूक्तें कोणतीं, व अर्वाचीन कोणतीं याचा विचार करतांना एवढें सांगितलें म्हणजे पुरे आहे कीं, ऋग्वेदोत्तर भारतीय वाङ्मयांत आढळून येणाऱ्या अनेक समाजविषयक गोष्टी ऋग्वेद रचणाऱ्यांस विदित नव्हत्या व ऋग्वेदोत्तर वाङ्मयाच्या सर्व उत्पादकांस ऋग्वेदकालीन भारतीय धर्म पूर्ण परिचित होता.‡ या दोन गोष्टींवरून ऋग्वेदांतील अगदीं अर्वाचीन भागाची रचना देखील अतिप्राचीन कालीं झाली असा जो सामान्य समज आहे तो अगदीं यथार्थ आहे हें निर्विवादपणें ठरतें.

**छन्दविषयक पुरावा.**—ऋग्वेदाचें प्राचीनत्व ठरविण्याच्या बाबतींत भाषेच्या खालोखाल छंदांची मदत होते. एकतर लौकिक संस्कृत वाङ्मयांतील छंद व वैदिक वाङ्मयांतील छंद हे परस्परांहून अत्यंत भिन्न आहेत. वैदिक कवितेंत असे अनेक छंद आहेत कीं त्यांचा मागमूसहि लौकिक संस्कृत काव्यांत आढळत नाहीं. शिवाय लौकिक संस्कृत वाङ्मयांत आढळणारे अनेक छंद वैदिक वाङ्मयांत नाहींत. तसेंच, वैदिक काव्यांतील कांहीं थोडेसे छंद लौकिक काव्यांत आढळतात; परंतु तेथें त्यांच्या मात्रासाम्याकडे विशेष लक्ष दिलेलें आढळतें.

जुन्या भारतीय वाङ्मयांतील छंदांत केवळ प्रत्येक पादांतील* अक्षरें नियमित केलेलीं आहेत, परंतु मात्रांसंबंधीं इतकी नियमबद्धता नाहीं. वैदिक छंदांत प्रत्येक श्लोकाच्या एकेका पादांत ८, ११, १२ व क्वचित् ५ हि अक्षरें असतात.

प्राचीन भारतीय छंदशास्त्रांत "पाद" हें सर्वांत लहान परिमाण आहे. यांत शेवटल्या चार किंवा पांच अक्षरांचा मात्रांच्या साम्याच्या दृष्टीनें विचार केला जातो. म्हणजे आठ अक्षरी पादाचें स्वरूप असें होतें:—

० ० ० ० ⏑ — ⏑ — ⏓.

यांतील शेवटचें अक्षर विकल्पानें ह्रस्व किंवा दीर्घ असतें.

वर दिलेल्या पादासारखे तीन पाद म्हणजे गायत्री छंद, व चार पाद म्हणजे अनुष्टुभ् होतो. प्राचीन वाङ्मयांत अनुष्टुभ् छंद गायत्रीइतका प्रचारांत नव्हता. पण पुढें मात्र त्याच्या उलट स्थिति आढळते. अनुष्टुभ् हा सामान्य छंद होऊन बसला व त्यांतूनच आर्षकाव्यांत उपयोजिलेला 'श्लोक' हा छंद निघाला. गायत्री व अनुष्टुभ् यांच्यापेक्षां कमी प्रमाणांत आढळणारे छंद म्हणजे पंक्ति व महापंक्ति हे होत. पंक्ति छंदांत प्रत्येक ऋचेंत पांच पाद व प्रत्येक पादांत आठ अक्षरें असतात. महापंक्ति छंदांत प्रत्येक ऋचेंत सहा पाद असतात.

अकरा अक्षरांच्या पादामध्यें चौथ्या किंवा पांचव्या अक्षराच्या शेवटीं यति असतो. या पादाचें सामान्य स्वरूप येणें प्रमाणें:—

* A. Hillebrandt, "Vedische Mythologie Breslau 1891. † M. Bloomfield the relative Chronology of the Vedic hymns JAOS. XXI. ‡ Alfred Ludwig Der, Rigveda Vol. III p. 183.

* पाद शब्दाचा अर्थ चरण. इंग्रजी भाषेंतल्या foot या शब्दानें याचें भाषांतर होतें; परंतु, ग्रीक छंदःशास्त्रांत ज्याला foot अशी पारिभाषिक संज्ञा आहे त्याचा व याचा कांहीं संबंध नाहीं. इतकी सूक्ष्म विभागणी करण्यापर्यन्त प्राचीन भारतीय छंदांची मजल गेलेली नव्हती—विंटरनिट्झ.

० ० ० ० ॥ ० ० ० — ⏑ — ⏓.
किंवा ० ० ० ० ० ॥ ० ० — ⏑ — ⏓.

असल्या चार पादांच्या ऋचेला त्रिष्टुभ् छंदाची ऋचा म्हणतात. बारा अक्षरांच्या पादाची व्यवस्था अगदीं अशीच आहे. प्रत्येक पादांत काय तें एक अक्षर जास्त एवढाच फरक, या पादाचें स्वरूप असेंः—

० ० ० ० ॥ ० ० ० — ⏑ — ⏑ ⏓.
किंवा ० ० ० ० ० ॥ ० ० — ⏑ — ⏑ ⏓.

अशा तऱ्हेचे चार पाद मिळून जगती छंदाची एक ऋचा होते. पांच अक्षरांच्या पादाचें स्वरूप खालीं दिलें आहे. असे चार किंवा आठ चरण घेतले म्हणजे द्विपदा विराज् छंदाची एक ऋचा होते.

⏓ — ⏑ — ⏓.

निरनिराळ्या छंदांचे पाद घेऊन त्यांच्या मिश्रणानेंहि कांहीं गमतीचे छंद बनविलेले आहेत. उदाहरणार्थ, उष्णिक् किंवा बृहती यांच्या पादांमध्यें ८ किंवा १२ अक्षरें असतात. प्राचीन छंदःशास्त्रांत अक्षरांनां किती प्राधान्य होतें व मात्रा किंवा लय यांनां ते किती लेखीत हें ब्राह्मणें, उपनिषदें, वगैरे ग्रंथांतून अनेक वेळां छंदांच्या गूढार्थासंबंधाचें जें विवरण येतें त्यावरून स्पष्ट समजण्यासारखें आहे. ऋचांच्या पादांतील अक्षरांत सुद्धां गूढार्थ दाखविला आहे. "भूमि, अंतरिक्ष व द्यु (=दिव्) हे तीन शब्द मिळून आठ अक्षरें आहेत व गायत्री छंदांत ८ अक्षरें आहेत तेव्हां ज्याला गायत्री छंद माहीत आहे त्याला तीन्ही लोकांची प्राप्ति होते," असें बृहदारण्यकोपनिषदांत सांगितलें आहे.* परंतु विधींमधील गूढतेस हे छंद पुष्कळ अंशानें कारण झाले आहेत, छंद या देवता मानून त्यांनां हविर्भाग दिलेले आहेत.† यासंबंधीं, विशेषतः गायत्रीसंबंधीं पुराणकथा आहेत (गायत्रीनें पक्षिरूपानें स्वर्गातून सोम आणला इ०.) इतर भूतांप्रमाणें त्यांची उत्पत्ति प्रजापतीपासून वर्णिली आहे.‡ या सर्व गोष्टींवरून वेदांतील छंद हे फार प्राचीन आहेत असें सिद्ध होतें. यांचा उगम अनादिकालांत झाला असावा अशी समजूत होती. हें छंदांचें प्राचीनत्व हेंहि सूक्तांच्या प्राचीनत्वाचें एक प्रमाण आहेच.

**भौगोलिक ज्ञानविषयक व सामाजिक गोष्टींचा पुरावा.**—तथापि, वैदिक सूक्तांच्या प्राचीनत्वाची यथार्थ कल्पना, त्या कालच्या भौगोलिक स्थितीकडे आणि त्या काळांतील संस्कृतीकडे नजर पुरविली असतां येईल. या गोष्टींचा विचार करतांना, सकृद्दर्शनीं जी गोष्ट आपल्यास नजरेस येते ती ही कीं, ऋग्वेदसूक्तांच्या रचनाकालीं, या वाङ्मयाचे कर्ते आर्य लोक सर्व हिंदुस्थानभर पसरले नव्हते. अद्याप हे लोक सिंधुनदीच्या आसपासच (सध्याच्या पंजाब प्रांतांत*) वस्ती करून राहिले होतेसें दिसतें. पश्चिमेकडून व हिंदुकुश पर्वताच्या खिंडींतून आर्य लोकांचा प्रवेश पंचनदांच्या प्रदेशांत झाला, व ऋग्वेदाच्या सूक्तांत आर्य† लोकांनीं दस्यूंशीं केलेल्या लढायांचें वर्णनहि आहे. येथें राहणाऱ्या मूळच्या लोकांनां "दस्यु" म्हणत असत. दस्यु किंवा दास या लोकांनां देव माहीत नाहीं, धर्म माहीत नाहीं, यज्ञ माहीत नाहीं, असा आर्यांचा त्यांवर आक्षेप असे. अशा लोकांशीं लढत लढत पूर्वेकडे गंगानदीपर्यंत आर्यांनीं हळूहळू शिरकाव केला. पुढच्यापुढच्या काळांतील भारतीयांच्या इतिहासांत जी क्षणोक्षणीं आढळते, भारतीयांच्या काव्यांत व त्यांच्या सामान्य धर्मांत जिला एवढें प्रमुख स्थान देण्यांत येतें, त्या गंगानदीचा उल्लेख ऋग्वेदांत जवळजवळ मुळींच नसावा ही ध्यानांत घेण्याजोगी गोष्ट आहे. कालिदासाच्या काव्यांतील रम्य कल्पना वैदिक कालाशीं मुळींच जुळत नाहींत.

अर्वाचीन भारतीय काव्याचें अंगभूत होऊन बसलेलें जें कमलपुष्प त्याचाहि उपमान या दृष्टीनें वैदिक कवींनीं कोठें उल्लेख केल्याचें आढळत नाहीं. वैदिक काळांतील प्राणी व वनस्पती हीं दोन्हीं तदुत्तर काळच्या प्राण्यांहून व वनस्पतींहून बरींच भिन्न होतीं. न्यग्रोधवृक्ष वेदांत नाहीं. सध्यांच्या काळीं, हिंदुस्थानांत अति क्रूर मानलेला हिंस्र पशु जो वाघ त्याचें नांव ऋग्वेदांत आढळत नाहीं. वाघाचें मूलस्थान जो वंगाल देश तेथपर्यंत आर्य लोकांचा प्रवेश त्या कालीं झालेला नव्हता असें यावरून दिसतें.

पुढच्या अर्वाचीन काळांतील हिंदुस्थानच्या शेतीचें मुख्य उत्पन्न व खाण्याचा मुख्य पदार्थ जो तांदूळ, त्याचें नांवहि ऋग्वेदांत नाहीं. जवाची लागवड मात्र करीत असावे असें दिसतें. या काळीं (ऋग्वेदसूक्तकाळीं) शेती अगदींच बाल्यावस्थेंत होती.

गुरांची निपज हा त्या वेळचा मुख्य धंदा होता. गुरांमध्यें सर्वांत अधिक लक्ष बैलाकडे असे. घोड्यालाहि बरेंच महत्त्व

* बृहदारण्यकोपनिषद् ५·१५. † वसिष्ठधर्मसूत्र, १३·३ व इतरत्र. ‡ शतपथ ब्राह्मण ८·१·१,२.

* इ. डब्ल्यू. हॉपकिन्स याच्या वर्णनाप्रमाणें (पंजाब आणि ऋग्वेद, जर्नल ऑफ दि अमेरिकन ओरिएंटल सोसायटी १९,१९–२८) ऋग्वेदाचीं बहुतेक सूक्तें ज्या काळांत रचलीं गेलीं त्या काळांत, भारतीय आर्य लोकांचें वसतिस्थान सध्यांच्या अंबाला शहराजवळपास सरस्वती व धुग्गर या नद्यांच्या मध्यें कोठें तरी असावें. † संस्कृत 'आर्य,' जुनी बाक्ट्रि 'ऐर्य', जुनी फारसी 'अरिय'; 'अरिय'=भक्त, किंवा एकाच वंशाचे लोक. हीरॉडोटस्च्या म्हणण्याप्रमाणें मीड्स् लोकहि आपल्याला आर्य म्हणवीत (७. ६२). यावरून हें उघड होतें कीं भारतीय आणि इराणी या दोघांनांहि आर्य ही सामान्य संज्ञा होती. (जुनी फारशी भाषा व वेदभाषा यांच्या साम्याबद्दल मागें लिहिलें आहे तें पहा. विभाग पहिला पृष्ठ. ८४.)

असे. घोडे रथाला जुंपून त्यांतून योद्धे लढावयास जात व साधारण लोकांत घोड्यांच्या रथांच्या शर्यती होत असून त्या जिंकणाऱ्यांची वाहवा होई. देवांनां आळविण्याकरितां रचलेल्या सूक्तांत बैल, गाई, घोडे यांची पुन्हां पुन्हां मागणी केलेली आढळते. मूळच्या रहिवासी लोकांत निरनिराळ्या तटांत जीं भांडणें होत तीं सर्व बैलगाईंच्यासाठीं असत व यावरूनच "लढाई"ला मूळचा शब्द "गोधनाची इच्छा" असा योजिला आहे. गोधन हें अतिश्रेष्ठ धन अशी याची अतिशयोक्तिपूर्ण स्तुति केलेली आहे.* वासराकडे धांवत जाणाऱ्या गाईचें हंबरणें म्हणजे मधुरगान होय असें प्राचीन लोक मानीत. आपलें वासरूं समोर दिसलें असतां जशी गाय आनंदानें हंबरते तसे इंद्रदेवतेच्या अग्रभागीं ऋषी हे आनंदानें गीत गातात असें एका कवीनें वर्णन केलें आहे. देवांनां बैलांची व देवतांनां गाईंची उपमा दिलेली आहे. गाईचें दूध हा खाण्याच्या पदार्थांतला मुख्य पदार्थ मानला जात असे एवढेंच नव्हे, तर दूध व तूप हे पदार्थ देवांनां द्यावयाच्या हविर्भागांतहि प्रामुख्येंकरून असत. पिण्याकडे विशेषतः धारोष्ण दुधाचा उपयोग करण्यांत येई, व "कच्ची" गाय "पक्कें (पक्व)" दूध कसें देते याचें वैदिक काळांतील कवींनां आश्चर्य वाटे, व एका जर्मन बालगीतांत आलेल्या कल्पनेप्रमाणें ("गाय तांबडी आणि दूध कसें पांढरें?") वैदिक काळांतले कवीसुद्धां इंद्रानें काळ्या किंवा तांबड्या गायींच्या ठिकाणीं पांढरें दूध ठेवलें या चमत्कारा-बद्दल त्याची स्तुति करीत.

तथापि, गाईबैलांबद्दल जरी इतकी आवड होती तरी गायी किंवा बैल यज्ञाचे वेळीं मारले जात व त्यांच्या मांसाचा खाण्याकडेहि उपयोग करण्यांत येत असे. अति प्राचीन काळांत गोवधाचा निषेध नव्हता.

**शास्त्रें व कला यांची प्रगति.**—बैलांच्या कातड्याचाहि उपयोग करण्यांत येत असे. याच्यापासून धनुष्याच्या दोऱ्या, पट्टे, नळ्या वगैरे जिन्नस तयार करण्यांत येत. निरनिराळ्या प्रकारचे उद्योग धंदेहि या काळांत चालू होते. सुतारकाम करणारीं माणसें या काळांत होतीं. साधें सुतारकाम, गाड्या बांधण्याचें काम, व कळाकुसरीचें काम एकच माणूस करी व त्याचें विशेष काम रथ करण्याचें असे. लोहारकाम करणारे लोकहि या काळांत होते. हे लोक एका पक्ष्यांच्या पंखांचे भाते वापरीत.

नौकानयनकला या लोकांत अद्याप बाल्यावस्थेंत होती. नद्यांतून जाण्यास एकं साधारण होडी व वल्हीं वापरीत. या होड्या बहुधा झाडांचे बुंधे पोखरून त्यांच्या बनविलेल्या असत. प्राचीन लोकांनां समुद्राची माहिती होती याबद्दल वाद नाहीं, परंतु दर्यावरचा व्यापार हे लोक करीत कीं नाहीं याबद्दल जबरदस्त शंका आहे.*

तथापि, या लोकांत व्यापारीवर्ग होता व सोन्याचे दागिने व बैल यांचा नाण्यांसारखा उपयोग करून बराच मोठा व्यापार चाले हें निर्विवाद आहे. बैल व घोडे यांशिवाय मुख्यत्वेंकरून सोन्यासाठीं वैदिक कवींनीं देवांची प्रार्थना केलेली आहे व श्रीमान् यजमानांपासून दानरूपानें आपणांस सोनें मिळावें अशीहि यांची इच्छा असे.

ऋग्वेदांतील सूक्तांत गुरेंढोरें पाळण्यासंबंधानें उल्लेख आहेत, शेतकी त्या लोकांनां माहीत होती असाहि पुरावा आहे, व्यापार व उद्योगधंदे या गोष्टी ऋग्वेदांत आढळतात, यज्ञ, युद्ध इत्यादि गोष्टींचा संबंधहि अनेकवेळां येतो, परंतु सध्यांच्या हिंदुसमाजावर ज्या गोष्टीची एवढी छाप आहे, जीमुळें हिंदुसमाजाच्या आयुष्याला एक प्रकारचें विशिष्ट वळण मिळालें आहे, व ज्या गोष्टीमुळें आज तागायत हिंदुसमाजाचें सारखें नुकसान होत आलेलें आहे त्या गोष्टीचें म्हणजे हल्लींच्या जातिभेदाचें ऋग्वेदांत तीव्र स्वरूप मुळींच नाहीं. त्यांत चातुर्वर्ण्याची कल्पना आहे. वर्णांचीं नांवें आहेत. एका सूक्तांत—व तेंहि अर्वाचीन आहे यांत संशय नाहीं—ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र या चार वर्णांचा उल्लेख आढळतो. पण ब्राह्मण त्या काळीं हा वर्णच होता, जात नव्हती. ऋत्विज् व योद्धे या काळांत होते ही गोष्ट खरी; परंतु, योद्ध्यांची एक विशिष्ट अशी जात म्हणून ऋग्वेदांत मुळींच नाहीं. तसेंच शेतकरी, गवळी व्यापारी, मजूर, कलाकौशल्याचीं कामें करणारे इत्यादि लोकांच्या निरनिराळ्या जातींचा उल्लेखहि यांत नाहीं.

**स्त्रियांचें स्थान.**—अर्वाचीन काळाप्रमाणें ऋग्वेदकालींहि राजाच्या पुरोहितानें राजाजवळ उभें राहून राजाकरितां म्हणून हविर्भाग द्यावा अशी चाल होती. पण घरचे मुख्य पुरुष उपाध्यायाची अपेक्षा न ठेवतां आपले होमहवन संस्कार करीत-असत अशीं उदाहरणें प्राचीन व अर्वाचीन वैदिक युगांतहि पुष्कळशीं सांपडतात. घरच्या कर्त्या पुरुषानें हीं कृत्यें करावयाचीं असत तथापि यजमान व त्याची पत्नी या दोघांनीं मिळून हीं धर्मकृत्यें केलीं पाहिजेत असा स्पष्ट निर्बंध होता. यजमान-पत्नीनें या कृत्यांत भाग घ्यावयाचा असे, या गोष्टीवरून असें दिसतें कीं, स्त्रियांची योग्यता ऋग्वेदकालीं नंतरच्या स्मृति-कारांच्या कालांतल्या इतकी कमी मानली जात नव्हती. या

---

*ही स्थिति आफ्रिकेंत डिंक व काफिर या लोकांतहि आढळते. यांच्या राहणीशीं वैदिक आर्यांची राहणी बरीच सदृश असावी असें वाटतें.

* ऋग्वेदांतील सूक्तांत गुरांबद्दलच्या उपमा, रूपकें, वर्णनें असंख्यात यावीं, व नौकानयनासंबंधाचा उल्लेख फार तर एखादा असावा ही कांहीं अकारण घडलेली गोष्ट खास नव्हे. उलटपक्षीं, होमरच्या काव्यांत नौकानयनाबद्दलचे उल्लेख व उपमा बऱ्याच आढळतात.

शास्त्रकारांनीं वेदपठन व यज्ञ या कर्मांची स्त्रियांनां अजीच मनाई केली आहे. 'दंपती एकचित्तानें सोमवल्ली ठेंचून पिळून तिचा रस काढून त्यांत दूध मिसळतात व तें मिश्रण देवांनां स्तुतिपूर्वक अर्पण करितात,' असें वर्णन *ऋग्वेदांत आहे. परंतु मनूनें मात्र स्त्रियांनीं यज्ञ करणें देवांनां† अप्रिय आहे व ज्या स्त्रिया अग्निहोत्र करतात त्या नरकांत‡ जातात असें लिहिलें आहे. उपनिषदांत ज्याअर्थीं तत्त्वज्ञानी लोकांच्या वादविवादांत स्त्रियांनां भाग घेतां येत होता असें आपणांस दिसतें, त्याअर्थीं वैदिक काळांत ऋग्वेदसूक्तांत मेजवान्या, नृत्य वगैरे प्रसंगीं स्त्रिया समाजांत प्रसिद्धपणें कांहीं आड पडदा न ठेवतां वावरत असें वर्णन आलें असतां त्या गोष्टीचें आपणांस कांहींच आश्चर्य वाटावयास नको. उत्सवप्रसंगीं सुंदर स्त्रिया एका ठिकाणीं जमल्याचें वर्णन आलें असतां त्या ठिकाणीं तें वर्णन वेश्यांचें असावें असा जो कांहीं विद्वानांचा समज होतो तो तसा होण्याचें बिलकुल कारण नाहीं. वेश्या नव्हत्या असें नाहीं. होत्या याबद्दल पुरावा आहे. वेदकाळांत कित्येक एकाकी, अनाथ स्त्रिया (भ्रातृहीन कन्यका) आडमार्गाला जाऊं लागल्या होत्या, ही गोष्ट नाकबूल करतां येत नाहीं हें खरें. यांनां एका कवीनें "गणगोत नसलेल्या (भ्रातृहीन) कुमारी" असें म्हटलें आहे. परंतु वेश्या समाजांत प्रतिष्ठा पावलेल्या दिसत नाहींत. अथेन्समधील पेरिक्लीजच्या काळाप्रमाणें, किंवा बुद्धाच्या काळांतील वेसाली येथील प्रकाराप्रमाणें वेश्यावृत्तीचा हिंदुस्थानांत धंदा ऋग्वेदकालीं चालत होता असें पिशेल व गेल्डनेर¶ यांनां अनेक परिश्रम घेऊनहि सिद्ध करतां आलें नाहीं.

**नीतिमत्ता व स्वभाव.**—तथापि प्राचीन भारतीयांच्या नीतिमत्तेबद्दलची आपली कल्पना फाजील उच्चतेची न होईल व मॅक्समुल्लरप्रमाणें या नीतिमत्तेचें चित्र गोपगीतांच्या धर्तीवर अतिशय साधेपणाचें व निर्व्याजतेचें आपणांकडून रंगविलें न जाईल अशी काळजी घेतली पाहिजे. कारण ऋग्वेदसूक्तांत आपणांस फसवेगिरी, चोरी, दरोडा, गर्भपात, अगम्यगमन, चारित्र्यभंग, व्यभिचार इत्यादि गोष्टींचा उल्लेख आढळतो. परंतु, 'ऋग्वेदकाल अत्यंत जुना होय' या गोष्टीला विरुद्ध जाणारा हा पुरावा नव्हे हें लक्षांत ठेविलें पाहिजे. समाजशास्त्र मानवी प्राणी केव्हांहि अजीबात दुष्ट राक्षस होते असेंहि मानीत नाहीं; किंवा सर्वांशीं निर्दोष व धुतल्या तांदुळासारखे होते असेंहि मानीत नाहीं. समाजशास्त्र एवढेंच जाणतें कीं, सांस्कृतिक स्थितीच्या निरनिराळ्या पायऱ्यापायऱ्यांनीं मनुष्यप्राणी रानटी स्थितींतून अर्धवट सुधारलेल्या स्थितींत व तेथून पूर्ण सुधारलेल्या स्थितींत जातो. तेव्हां ऋग्वेदकालांतले लोक साधेभोळे गोपाल होते असें मानण्याचें किंवा ते अतिशय रानटी अथवा अतिशय सुधारलेले होते असेंहि मानण्याचें आपणांस कारण नाहीं.

ऋग्वेदसूक्तांत दिसून येणारें आर्यसंस्कृतीचें स्वरूप पाहतां यांत भारतीय आर्य लोक चपल, आनंदी व भांडखोर होते असें दिसतें.* यांची रहाणी साधी पण कांहींशी रानटी अशी होती. वैदिक सूक्तांची रचना करणारे लोक शत्रूशीं लढण्याच्या कामीं देवांची मदत मागत, युद्धांत आपणांस जय मिळावा म्हणून ते त्यांची प्रार्थना करीत, वैभव व यथास्थित लूट सांपडावी म्हणून ते देवांनां आळवीत, पैसा, सुवर्णाच्या राशीच्या राशी, गोधनांचे कळप, पिकांकरितां पाऊस इत्यादि गोष्टी मिळाव्या, संतति, संपत्ति व दीर्घायुष्य हीं प्राप्त व्हावीं म्हणून ते देवांची पूजा करीत. हा काळपर्यंत वैदिक सूक्तांत पुढच्या पुढच्या वाङ्मयांत वारंवार आढळून येणारा भारतीय लोकांचा दुबळा, निर्जीव निवृत्तिपर स्वभाव मुळींच आढळत नाहीं.

कित्येक शोधकांच्या मतें ऋग्वेदांतील सूक्तें अति प्राचीन असून ह्यांत आढळणारें आध्यात्मिक जीवनाचें चित्र तितकेंसें हिंदुसमाजाचें चित्र नव्हेच. यांच्या मतें हें चित्र बहुतांशीं आर्यन् किंवा इंडोजर्मानिक लोकांचेंच आहे. याच्या उलट कित्येक शोधक असेंहि म्हणतात कीं, ऋग्वेदसंहिता ही सर्वांशीं हिंदु मनाची कृति आहे व या संहितेचा अर्थ समजण्यास हिंदूंच्या इतर भारतीय वाङ्मयाचा सारबोध होण्यासाठीं जीं तत्त्वें लावावीं लागतात त्यांखेरीज इतर तत्त्वांची जरूर नाहीं. ऋग्वेदसंहितेचा अर्थ लावणारांमध्यें या मुद्यावर बराच तीव्र मतभेद आहे.

**ग्रंथाची दुर्बोधता.**—या ठिकाणीं आपल्याला एक महत्त्वाची गोष्ट लक्षांत ठेविली पाहिजे ती ही कीं, ऋग्वेदाचें पूर्ण स्पष्टीकरण अद्याप झालेलें नाहीं. भारतीय लोकांच्या इतर ग्रंथांप्रमाणें यांतहि ज्यांचा अर्थ निर्विवाद आहे अशीं सूक्तें पुष्कळ आढळतात ही गोष्ट खरी; पण ऋग्वेदांत अशींहि अनेक सूक्तें, ऋचा व फुटकळ भाग आहेत कीं, त्यांच्या अर्थाबद्दल अद्याप बरेंच गूढ आहे. या जुनाट वाङ्मयाची यथार्थ कल्पना करून घेतांना या गोष्टी लक्षांत ठेवणें जरुरीचें आहे. कोणीतरी नवशिक्या मनुष्य हाताशीं येईल तें ऋग्वेदाचें भाषांतर घेऊन वाचतो व त्यांत कांहीं दुर्बोध, नीरस, असंबद्ध गोष्टी सांपडल्या म्हणजे 'हें असें कसें' म्हणून आश्चर्य मानतो, अशी स्थिति पुष्कळदां होते. याचें कारण कित्येक वेळां असें असतें कीं, आपल्याला जेवढें समजलें तेवढ्याचेंच भाषांतर करून भाषांतरकाराची तृप्ति होत नाहीं. त्याला असें वाटत असतें कीं,

*ऋग्वेद. ८·३१,५. †मनु. ४·२०६. ‡मनु. ११·३७.
¶ Vedische Studien I p. xxv.

* Heinrich Zimmer in Altindisches Leben.

आतांपर्यंत दुर्बोध म्हणून मानल्या गेलेल्या गोष्टींचें सुद्धां भाषांतर आपल्या हातून झालें पाहिजे.

तथापि, ऋग्वेद आपल्याला अजून नीटसा समजत नाहीं, व ऋग्वेदाचें संपूर्ण भाषान्तर करावयाचें म्हटलें म्हणजे त्यांत बऱ्याच चुका यावयाच्याच, या गोष्टींचा दोष सर्वस्वी आपल्या माथीं येत नाहीं. वरील दोन गोष्टींचें खरें कारण असें आहे कीं, ऋग्वेदसूक्तांच्या अतिप्राचीनत्वामुळें प्राचीन काळींहि हीं सूक्तें खुद्द तत्कालीन लोकांनां दुर्बोध झालीं होतीं. वैदिक वाङ्मयांतच संहितेच्या कांहीं कांहीं ऋचांचा चुकीचा अर्थ लावलेला आपणांस आढळतो. हिंदी विद्वानांनीं ऋग्वेदाचें पृथक्करण करण्यास प्राचीन काळापासूनच सुरवात केलेली दिसते. दुर्बोध व क्वचितच आढळणारे असे ऋग्वेदांतील शब्द घेऊन त्यांचे कोश बनविण्यास प्रथम सुरवात झाली. या कोशांनां "निघंटु" अशी संज्ञा आहे. ऋग्वेदावर जे टीकाग्रंथ उपलब्ध आहेत त्यांत प्राचीनतम ग्रंथ यास्काचा होय. यास्कानें निघंटूचा आधार घेऊन आपल्या निरुक्त ग्रंथांत बऱ्याच ऋचा स्पष्ट करून सांगितल्या आहेत. हा यास्क कांहीं झालें तरी पाणिनीच्या पूर्वी होऊन गेला व यानें आपल्यापूर्वी सतरा निरुक्तकार होऊन गेले असें सांगितलें आहे. या निरुक्तकारांत वारंवार मतभेद दृष्टीस पडतो. यास्कापूर्वीच्या एका निरुक्तकारानें तर "वेदांचा अर्थ करणें हा व्यर्थ खटाटोप आहे. कारण वेदांतील सूक्तें दुर्बोध असून त्यांत असंबद्धता फार आहे व तीं अर्थहीन आहेत" असें म्हटलें आहे. यावर यास्काचें उत्तर असें कीं, आंधळ्याला किरण दिसत नाहीं हा कांहीं किरणाचा दोष नाहीं. यास्कानें सुद्धां निरनिराळ्या कठिण शब्दांचा अर्थ लावतांना व्युत्पत्तीवर भर देऊन पुष्कळ वेळां दोनदोन चारचार अर्थ सांगितलेले आहेत. अर्थातच ही व्युत्पत्ति पुष्कळ ठिकाणीं आधुनिक व्युत्पत्तिशास्त्राला सोडून आहे. यावरून एवढें उघड होतें कीं, यास्काच्या वेळीं देखील ऋग्वेदांतील पुष्कळ शब्दांचे व ऋचांचे अर्थ त्यांची परंपरा अबाधित न राहिल्यानें दुर्बोध होऊन बसले होते. यास्काच्या पाठीमागून झालेले व त्याच्या पूर्वी होऊन गेलेले जे निरुक्तकार त्यांचे ग्रंथ आज आपणांस मुळींच उपलब्ध नाहींत.

ख्रिस्ती शकाच्या चौदाव्या शतकांत मात्र ऋग्वेदाचें साग्र भाष्य आपल्या दृष्टीस पडतें. या भाष्यांत ऋग्वेदाचें शब्दशः आमूलाग्र स्पष्टीकरण सांपडतें. याचा कर्ता प्रसिद्ध सायणाचार्य होय.

**यूरोपीय अभ्यासक.**—ऋग्वेदाचे कांहीं जुने यूरोपीय टीकाकार सर्वथा सायणभाष्याचा आश्रय करीत व त्यांचें मत असें होतें कीं, सायणाचार्यांनीं पूर्वपरंपरेचा अवलंब केला असल्यानें त्यांचें भाष्य विश्वसनीय आहे. उलट दुसरे टीकाकार ऋग्वेदासंबंधानें भारतीय लोकांनीं काय लिहून ठेविलें आहे हें पाहण्याची पर्वा करीत नाहींत. एखादा यूरोपीय आधुनिक टीकाकार सामान्य भाषाशास्त्र व तुलनात्मक व्युत्पत्तिशास्त्र यांच्या मदतीनें कोणत्याहि वेदभागाचा जितका चांगला अर्थ लावूं शकेल तितका संहितेनंतर दोन हजार वर्षांनीं झालेल्या कोणत्याहि हिंदी टीकाकाराला लावतां येणार नाहीं असें यांचें मत आहे. या वर्गांतला प्रमुख मनुष्य 'रूडोल्फ रोथ' हा होय. याच्या अनुयायिवर्गांत याचा शिष्य 'एच्. ग्रासमन' हा होता. यानें सबंद ऋग्वेदसंहितेचें छंदोबद्ध भाषान्तर दोन भागांत प्रसिद्ध केलें आहे.*

आजचे वेदवाङ्मयाचे टीकाकार मध्यम मार्ग स्वीकारतात. हिंदी जुन्या टीकाकारांवर अंधविश्वास ठेवून उपयोग नाहीं ही गोष्ट हे टीकाकार कबूल करतात. परंतु किती झालें तरी ते टीकाकार हिंदू असल्यानें यूरोपियन लोकांपेक्षां हिंदी परिस्थिति त्यांनां चांगली समजते. अबाधित परंपरेचाहि त्यांनां थोडाफार फायदा मिळतो आणि म्हणूनच पुष्कळदां त्यांचा अर्थ खरा असतो, असें यांचें मत आहे. या वर्गांतले टीकाकार म्हणजे आल्फ्रेड लुडविग्प्रभृति होत. लुडविग्नें सबंध ऋग्वेदाचें भाषान्तर जर्मन भाषेंत प्रसिद्ध करून त्याला एक उपयुक्त भाष्यहि जोडलें आहे व यानेंच प्रथमतः सायणभाष्याचा उपयोग केला असून दुसऱ्या टीकांचाहि यथासंभव उपयोग केला आहे.† याच्या मागून गेल्डनेर व पिशेल हे झाले व या दोघांनीं आपल्या "वेदिक स्टडीज" या ग्रंथाच्या द्वारें दुर्बोध वैदिक ऋचांचा अर्थ स्पष्ट करण्याच्या कामीं चांगलीच मदत केली आहे. ऋग्वेदाचा अर्थ लावतांना ऋग्वेद हिंदुस्थानांत तयार झाला व त्यांतील विचार हिंदु मनोभूमींत जन्मास आले आहेत ही गोष्ट विसरतां कामा नये व या गोष्टीला प्राधान्य देऊनच ऋग्वेद लावला पाहिजे असें यांचें मत असून या मतालाच ते चिकटून—किंबहुना वाजवीपेक्षां जास्तच चिकटून-राहिले आहेत. तसेंच हिंदू लोकांच्या या मनोभूमीची यथार्थ कल्पना येण्यास त्यांच्या उत्तरकालीन वाङ्मयासारखें दुसरें साधनच नाहीं असें या टीकाकारांचें म्हणणें आहे.

या मनोभूमीच्या प्रश्नाबरोबरच दुसरा एक अत्यंत वादग्रस्त प्रश्न उद्भवतो व या प्रश्नाचेंहि महत्त्व वैदिक सूक्तांचा अर्थ लावण्याच्या कामीं कांहीं कमी नाहीं. हा प्रश्न असा कीं, ऋग्वेदाचीं सूक्तें भक्तियुक्त अंतःकरणाच्या कवींनीं अंतःस्फूर्तीनें लिहिलेलीं असून त्यांच्या भक्तीचें तें एक द्योतक आहे व

* लाइपझिग् १८७६–१८७७. † लुडविग्चें भाष्य Prag. 1876–1888 सहा भागांत प्रसिद्ध झालेलें आहे. ग्रासमनच्या सुरस गोड कवितांपेक्षां लुडविग्चें गद्य भाषांतरच मूळाला जास्त धरून आहे. यांबरोबरच मॅक्स मुल्लर व ओल्डनबर्ग यांनीं सेक्रेड बुक्स् ऑफ दि ईस्ट भाग ३२ व ४६ यांत प्रसिद्ध केलेलीं भाषांतरें वाचावींत.

त्यांचा यज्ञयागांशीं कांहीं संबंध नाहीं असें म्हणावयाचें, किंवा, ऋत्विज लोकांनीं कांहीं कांहीं विशिष्ट यज्ञांच्या व समारंभांच्या वेळीं उपयोगीं पडावीं या हेतूनें आपलें कौशल्य खर्च करून हीं सूक्तें निर्माण केलीं असें मानावयाचें ?

या सूक्तांकडे पहावयाच्या ज्या दोन दृष्टी वर दाखविल्या आहेत त्या दृष्टींच्या अनुरोधानें शोधकांच्या या सूक्ताबद्दलच्या मतांत साहजिकच फरक उत्पन्न होतो. हा फरक किती असूं शकेल याची कल्पना खालीं दिलेलीं 'केगी' व 'ओल्डनबर्ग' या टीकाकारांचीं मतें वाचून होण्यासारखी आहे. आपल्या एका सुंदर व आजहि अभ्यासकास उपयोगी असलेल्या पुस्तकांत* या सूक्तांबद्दल 'केगी' म्हणतोः "या सूक्तांपैकीं बरींचशीं सूक्तें स्तुतिपर व प्रार्थनापर असून निरनिराळ्या देवतांस उद्देशून गायिलेलीं आहेत. या सूक्तांत चोहोंकडे अंतःकरणांतील भक्तीचा उद्रेक झालेला दृष्टीस पडतो; हीं सूक्तें म्हणजे शुद्ध भावानें दिलेले हविर्भाग प्रेमानें स्वीकारण्यासाठीं देवतांची केलेली प्रार्थना होय. परमेश्वराच्या इच्छेनें या कवींच्या अंतःकरणांत ज्या प्रेरणा झाल्या त्या प्रेरणा अथवा त्या भावना या सूक्तांच्या द्वारें सुरस वाणीनें व्यक्त करून दाखविण्याचा या कवींचा उद्देश दिसतो." संहितेमध्यें कांहीं सामान्य प्रतीचीं सूक्तें आहेत हें म्हणणें केगीला मान्य आहे. परंतु त्याचें म्हणणें असें कीं, "समाजाच्या बाल्यावस्थेंतील निर्मळ व जोरदार कविकल्पना या सूक्तांत स्पष्टपणें दृग्गोचर होतात. आपल्या वंशाच्या आध्यात्मिक उन्नतीच्या प्रथमावस्थेंतील, धार्मिक आचार व विचार यांचें जें चित्र या वाङ्मयांत उत्तम रीतीनें रेखाटलें आहे त्याशीं तादात्म्य करून घेण्याचें जो कोणी मनावर घेईल, त्याचें चित्त अनेक सूक्तांकडे अनेक निरनिराळ्या कारणांनीं वेधलें जाईल. कित्येक ठिकाणीं त्याला बाल्यावस्थेंतला मुग्धभाव पाहून कौतुक वाटेल तर कित्येक ठिकाणीं नव्या जोमाची व सूक्ष्म दृष्टि पाहून आनंद होईल. तसेंच कोठें उठावदार शब्दचित्रें, तर कोठें कल्पनेच्या भराऱ्या पाहून मनाला आल्हाद वाटेल" हें झालें केगीचें मत.

आतां ओल्डनबर्ग काय म्हणतो तें पाहूं.† त्याला या प्राचीनतम धार्मिक वाङ्मयामध्यें हळू हळू या लोकांचा आध्यात्मिक ऱ्हास होत चाललेला दृष्टीस पडतो. ऋत्विज व त्यांनीं देवतांना केलेलीं आवाहनें, भोंवतीं दर्भ मांडून तयार केलेलीं यज्ञकुंडें, यज्ञांत दिलेले हविर्भाग घेण्यासाठीं व मादक सोमरस पिऊन अंगीं धैर्य व दिव्य शक्ति आणण्यासाठीं रथांना घोडे जुंपून आकाशांतून धांवत येणारे रानटी देव व त्यांना आवाहन करणारे रानटी ऋत्विज यांखेरीज ओल्डनबर्गला या सूक्तांत कांहींच दिसत नाहीं. तो म्हणतो, "ऋग्वेदांतील ऋषींनीं पूर्वीपासून चालत आलेल्या तऱ्हेनें भव्य अशा सोमयज्ञाचीं सूक्तें रचिलीं, परंतु या सूक्तांचा हेतु देवाविषयीं ज्ञान देण्याचा नसून केवळ त्या देवाचीं स्तुतिस्तोत्रें गाण्याचा असल्यानें एखाद्या बहुभाषी स्तुतिपाठकाप्रमाणें मन मानेल तीं मोठमोठीं लांबलचक विशेषणें त्यांनीं या देवाला दिलीं आहेत. लोकांच्या मनाचा ओढा सामान्यतः भडक आणि भपकेदार चित्रांकडे असल्यानें त्यांच्या हातून साहजिकच वरील प्रकारची स्तुति झाली आहे." याप्रमाणें सूक्तांच्या हेतूचें वर्णन करून ओल्डनबर्गनें असा शेरा मारला आहे कीं, ऋत्विज लोकांच्या खेरीज इतरांकडून असलें काव्य निर्माणच होणार नाहीं.

पण विंटर्निट्झच्या मतें हीं दोन्हीं मतें अतिशयोक्तिपूर्ण असून वस्तुस्थिति या दोहोंच्या दरम्यान आहे व सामान्यतः ऋग्वेदाचा अर्थ लावतांना जे जे प्रश्न उपस्थित होतात त्यासंबंधानें असेंच म्हणतां येईल. ऋग्वेदाच्या सूक्तांतील कांहीं सूक्तें अगोदरचीं असून कांहीं नंतरचीं आहेत, ही गोष्ट विसरून चालावयाचें नाहीं. त्याचप्रमाणें हेंहि लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, ज्याप्रमाणें संहितेंतील सूक्तें निरनिराळ्या काळचीं आहेत त्याप्रमाणें सूक्तांतले विषय सुद्धां निरनिराळ्या ठिकाणचे व कमी अधिक महत्त्वाचे आहेत. तसेंच, पुष्कळशीं सूक्तें यज्ञयागादिकांत उपयोगी पडावीं म्हणून रचलीं गेलीं नसून मानववंशाच्या आरंभकाळची जी धार्मिक काव्यस्फूर्ति तिच्या स्वतंत्र प्रेरणेनें रचलीं गेलीं यांत संशय नाहीं.* बऱ्याच सूक्तांचा उपयोग यज्ञयागादि कर्मांकडे जरी करण्यांत येत असला तरी हीं सूक्तें आरंभीं याच उद्देशानें लिहिलीं गेलीं होतीं, असें आपणांस म्हणतां यावयाचें नाहीं. उलटपक्षीं, ऋग्वेदसंहितेचे बरेचसे भाग यज्ञयागादि कर्मांकरितां लिहिले होते, व त्यांचा संग्रह ऋत्विज लोकांनीं मोठ्या कुशलतेनें केला हेंहि निःसंशय आहे. "वेद हे भारतीय नसून इंडोजर्मानिक आहेत" हा व्हिटनेचा सिद्धांतहि अतिशयोक्तिपूर्ण आहे व पिशेल, गेल्डनेर व विल्सन म्हणतात त्याप्रमाणें भारतीय लोकांची संस्कृति वेदकालीं अत्यंत परिणतावस्थेस पोहोंचली होती, व शिकंदर बादशाहानें हिंदुस्थानावर स्वारी केली त्या वेळच्या संस्कृतींत व वेदकालीन भारतीय संस्कृतींत फार थोडा फरक होता हेंहि म्हणणें अतिशयोक्तीचें आहे.

* Der Riveda die Alteste Litteratur der Inder.
† Religon des Veda.

* ब्रन्होफरनें आपल्या Uber den Geist der Indischen Lyrik ( on the Spirit of Indian Literature ), Liepzig, 1882 या ग्रंथांत ऋग्वेदांतील एका उत्तर कालीन सूक्ताच्या रचनाकाराला कवींचा मुकुटमणि असें म्हटलें आहे व वेद हा चंडोलाच्या प्रभात गीताप्रमाणें असून त्यांत सृष्टींतील आपल्या थोर भूमिकेचें ज्ञान मानवजातीला होऊं लागल्याचें स्पष्ट दिसतें असेंहि विधान केलें आहे. हीहि एक अतिशयोक्तीच आहे.

**ऋग्वेदाचें महत्त्व.**—ऋग्वेदसूक्तें व इतर भारतीय वाङ्मय यांच्या दरम्यान लोटलेला काळ कांहीं टीकाकार मानतात इतका दीर्घ जरी नसला तरी या दोन वाङ्मयांत कांहीं काळ लोटला आहे एवढी गोष्ट खास. ही गोष्ट सूक्तांची भाषा व त्यांत दिसून येणारी सांस्कृतिक स्थिति यावरून सिद्ध होतेच, तथापि धार्मिक उत्क्रांतीच्या ज्या पायऱ्या आपणांस ऋग्वेदांत दृग्गोचर होतात त्यांवरून ती विशेषच स्पष्ट होते. ऋग्वेदाच्या सूक्तांत काव्य कितपत आहे हा प्रश्न जरी एका बाजूस ठेविला तरी हिंदु धर्माच्या उत्क्रांतींतील पहिल्या पायऱ्यांचें व इन्डोजर्मानिक लोकांच्या–सामान्यतः सर्वच लोकांच्या–पुराणकथांचें संशोधन करणाराला अत्यंत उपयोगी असें वाङ्मय ऋग्वेदसूक्तांखेरीज इतर कोणतेंहि नाहीं ही गोष्ट निर्विवाद आहे.

**पुराणकथांचा उगम व वाढ.**—वरील गोष्टच थोडक्या शब्दांत सांगावयाची म्हटली तर ऋग्वेद सूक्तांचें महत्त्व, त्या सूक्तांमध्यें पुराणकथांची वाढ होत असलेली दृष्टीस पडते, एवढ्या एका गोष्टींत आहे. देवताविषयक कल्पनांचा उदय कसा होत गेला याचें चित्र हीं सूक्तें वाचीत असतां आपल्या डोळ्यांसमोर स्पष्ट उभें राहतें. पुष्कळ सूक्तांत सूर्य, चंद्र, अग्नि, आकाश, वारे, पाणी, उषःकाल, जमीन वगैरेंची जी स्तुति व प्रार्थना केलेली आहे ती त्यांच्या भौतिक स्वरूपांतच केलेली आहे. कोठें आकाशांत तळपणारा सूर्य तर कोठें शीतलप्रकाश चंद्र, कोठें वेदीवर पेटलेला किंवा घरांतील अग्नि तर कोठें मेघांतून उतरणारी वीज, कोठें दिवसा सूर्यतेजानें झळकणारें तर कोठें रात्रीं नक्षत्रांनीं शोभविलेलें आकाश, कोठें सोंसों वाहणारे वारे तर कोठें मेघांतून होणारे वर्षाव, तसेंच नद्यांचे प्रवाह, तेजोमय उषःकाल, फलपुष्पयुक्त विस्तीर्ण क्षेत्रें या व इतर निसर्गांतील पदार्थांची व व्यापारांची जी स्तुति, पूजा व प्रार्थना पुष्कळशा सूक्तांतून केलेली आढळते, ती त्यांच्या इंद्रियगोचर भौतिकस्वरूपांतच केलेली आढळते; आणि या ऋग्वेदांतीलच कांहीं सूक्तांत या वरील निसर्गचमत्कारांनां देवदेवतांचें स्वरूप येऊन त्यांस सूर्य, सोम, अग्नि, द्यौः, मरुत्, वायु, आपः, उषस् आणि पृथ्वी अशा निरनिराळ्या नांवांनीं संबोधूं लागल्याचें नजरेस येतें. हें रूपांतर हळू हळू घडून आलें असलें पाहिजे. या देवतांचीं मूळ स्वरूपें काय होतीं हें त्यांच्या नांवांवरूनच असंदिग्ध रीतीनें समजण्यासारखें आहे. याप्रमाणें ऋग्वेदसूक्तांच्या साहाय्यानें आपणांस असें म्हणतां येतें कीं, पुराणकथांत ज्या देवता आल्या आहेत त्यांच्यांतील मुख्य मुख्य देवता मूळांत सृष्टिचमत्कारांच्या ठिकाणीं मानवी गुणधर्मांची कल्पना करून झालेल्या आहेत.

पुराणकथांचें जें कांहीं संशोधन आजपर्यंत झालें आहे त्यावरून आपणांस असेंहि म्हणतां येतें कीं, ज्या देवतांच्या नांवांवरून त्यांच्या मूळ स्वरूपाचा फारसा बोध होत नाहीं त्या देवताहि सूर्य चंद्र यांसारख्या सृष्टिचमत्कारांवरूनच आलेल्या असाव्या. अशा देवता, इन्द्र, वरुण, मित्र अदिति, विष्णु, पूषन्, अश्विनौ, रुद्र या होत. यांचें मूलस्वरूप कांहीं अंशानें ऋग्वेदकाळांतच अंशतः विस्मृत झालेलें दिसतें व यांनां पराक्रमी, बलवान, शूर, उच्च दर्जाच्या देवता असें मानलें आहे. वरीलप्रमाणें हीं नांवेंहि आरंभीं निसर्गांतील पदार्थ व व्यापार यांचीं द्योतक होतीं व एकाच निसर्गशक्तीच्या निरनिराळ्या स्वरूपांनां अनुलक्षून असलेलीं नांवें कांहीं कालानें देवतांचीं वाचक बनून त्यांवरूनच पुढें निरनिराळ्या स्वतंत्र देवता मानण्यांत आल्या. उदाहरणार्थ, सवितृ म्हणजे जीवन देणारा व विवस्वत् म्हणजे प्रकाशणारा अशीं सूर्याचीं विशेषणें मागांहून सूर्याचीं नांवें बनलीं व यांतून विवस्वान् व सविता अशा सूर्याच्या तोडीच्या आदित्यदेवता आल्या.

शिवाय निरनिराळ्या काळांतील व निरनिराळ्या लोकांच्या देवता वैदिक काळांतील भारतीय लोकांच्या देवसमुदायांत शिरल्या. याप्रमाणें मित्र, विष्णु व पूषन् यांनां ऋग्वेदांत आदित्यदेवतांमध्यें स्थान मिळालें. "वर्त्माधिपति, पथिकांचा संरक्षक, सर्व मार्गांचा ज्ञाता, नष्टपथ गोधनास मार्गास लावणारा" असा वैदिक देवसमुदायांतील पूषा हा देव वरील प्रकारच्या नात्यानें वैदिक लोकांत शिरण्यापूर्वीं एखाद्या धनगर जातीचा आदित्यदेव असावा असें वाटतें. तसाच मित्र म्हणजे अवेस्तांतील मिथ्रदेवता होय. या गोष्टीवरून मिथ्र ही आर्यांची अतिप्राचीन आदित्यदेवता असून हिचा प्रथम उदय भारतीय व इराणी आर्य एकत्र होते त्या काळीं झाला असें सिद्ध होतें.

अमुक सृष्टिचमत्कारांतून अमुक देवतेची कल्पना निघाली हें प्रत्येक देवतेच्या बाबतींत शोधून काढणें सोपें नाहीं. यामुळें इंद्र, वरुण, रुद्र, अदिति व अश्विनौ इ. देवतांच्या उत्पत्तीसंबंधानें संशोधकांत बराच मतभेद आहे. एकजण म्हणतो इंद्र ही वायुदेवता आहे, दुसरा म्हणतो ती आदित्यदेवता आहे; तसेंच एकाच्या मतें वरुण ही अंतरिक्षदेवता होय; दुसऱ्या कांहींच्या मतें ही सोमदेवता आहे. रुद्र हा मरुतांचा जनक असल्यानें त्याला वायुदेवता असें सामान्यतः समजण्यांत येतें. परंतु ओल्डनबर्गच्या मतें रुद्र ही वनें व पर्वत यांची अधिष्ठात्री देवता आहे, व हिलेब्रँट् म्हणतो कीं, 'रुद्र ही उष्ण प्रदेशांत होणाऱ्या भयानक पीडांची देवता आहे.' एकाच्या मतें अदिति ही अफाट असें अंतरिक्ष आहे, तर दुसरा म्हणतो कीं अदितिदेवता ही अनंत आणि अफाट अशी पृथ्वी होय. अश्विनौ या देवतायुग्माचा संबंध निःसंशय ग्रीकांच्या Dios Kuri शीं पोंचतो, व जर्मानिक व लेटिक पुराणकथांमध्येंहि हें देवतायुग्म आलेलें आहे. परंतु

यास्काच्या पूर्वी सुद्धां कित्येक भारतीय टीकाकारांनां अश्विनौ या देवतायुग्माचें स्वरूप म्हणजे एक गूढ होऊन बसलें होतें. द्यावापृथिवी, दिवसरात्र, संध्याद्वय, सूर्यचंद्र, पूर्वप्रभातशुक्र व सायंशुक्र, मिथुन राशींतील तारकाद्वय, इत्यादि निरनिराळ्या युग्मांनां अश्विनौ हें नांव निरनिराळ्या शोधकांनीं लाविलें आहे.* परंतु विशेषतः लक्षांत घेण्याची गोष्ट ही कीं, वैदिक देवतांपैकीं बहुतेक देवता निसर्गांतील शक्ती किंवा व्यापार यांपासून निघालेल्या आहेत या संबंधानें बहुतेक पुराणकथाभ्यासकांची एकवाक्यता आहे.

अव्यक्त मानवी भावनांनां व कल्पनांनां मूर्त स्वरूप येऊन बनलेल्या अशाहि कांहीं देवता ऋग्वेदांत आहेत. या देवता प्रायः दहाव्या मंडळांतील अत्यंत अर्वाचीन अशा सूक्तांत आढळतात. जसें विश्वकर्मा (सृष्टीचा श्रेष्ठ शिल्पकार), प्रजापति (सर्व प्राणिमात्रांचा स्वामी), श्रद्धा, मन्यु (राग) वगैरे भावना.

'कनिष्ठ' पुराणकथांतील कांहीं कांहीं देवता या भावनादेवतांपेक्षां महत्त्वाच्या आहेत. याहि देवता ऋग्वेदांत आढळतात. जसें ऋभु, अप्सरसः व गंधर्व. ऋभु व अप्सरा या देवता अनुक्रमें यूरोपीयांच्या एल्व्ह (पिशाच्चें), व निंफ (वनदेवता) या कल्पनांशीं जुळतात. गंधर्व हा वनांत व क्षेत्रांत संचार करणारा देवतावर्ग आहे. याशिवाय राक्षस, पिशाच्चें वगैरेंचा उल्लेख सूक्तांत देवांचे शत्रू या नात्यानें केलेला आढळतो. यांच्याशीं देवांच्या लढाया झालेल्या आहेत.

**'असुर' व 'दास.'**—पुढच्या पुढच्या वैदिक ग्रंथांत देवांच्या शत्रूंचा उल्लेख 'असुर' या शब्दानें केलेला आढळतो. परंतु खुद्द ऋग्वेदांत बहुतेक ठिकाणीं याचा अर्थ 'देव' असा असून कांहीं ठिकाणीं मात्र राक्षस असा आहे. असुर याचा जुना अर्थ देव हाच असून असुर या शब्दाशीं समानरूप असा जो अवेस्तांतील 'अहुर' शब्द त्याचाहि अर्थ देव असाच आहे.

ऋग्वेदांत दास किंवा दस्यु हें नांव नेहमीं पिशाच्चांनां लावण्यांत येतें व मूळ अनार्य रहिवाशांचा उल्लेख याच नांवानें करण्यांत येतो. याचप्रमाणें रक्षस् किंवा राक्षस या शब्दानें ऋग्वेदांत व तदुत्तरकालीन वाङ्मयांत सुद्धां सर्व प्रकारचीं त्राय पिशाच्चें उद्दिष्ट आहेत.

**यम व यिम.**—पितरांची देव या नात्यानें पूजा करण्याची कल्पना ऋग्वेदांत सुद्धां उगम पावली होती. या पितृदेवतांचा राजा यम होय. याचें राज्य पितृलोक. यम ही देवता प्रागैतिहासिक पर्शुभारतीय काळांतील असून तिचें 'अवेस्तां'तील 'यिम' देवतेशीं साम्य आहे. अवेस्तांतील 'यिम' हा मानववंशाचा मूळपुरुष होय. मृत्युवश होऊन पितृलोकीं गेलेला असा हा पहिलाच मानवी प्राणी असल्यानें त्याला तेथील राज्यपद मिळालें. ही मर्त्यलोक सोडून पितृलोकांत जाण्याची कल्पना सूर्याच्या दैनिक अस्तावरून किंवा चंद्राच्या मासिक अदृश्य होण्यावरून प्रथम निघाली असावी असें विंटरनिट्झचें मत आहे. यमाचें राज्य (यमलोक) सर्वांत वरच्या स्वर्गांत आहे अशी तत्कालीन समजूत होती. मृत्यूनंतर आपणांस स्वर्गांत यमाच्या शेजारीं रहावयास मिळेल या कल्पनेनें मरतांना मनुष्याच्या मनाला एक प्रकारचें समाधान वाटे.

**पुनर्जन्म.**–आत्म्याला पुनर्जन्म असून या पुनर्जन्मपरंपरेला अंतपार नाहीं या कल्पनेचा पुढच्या पुढच्या शतकांतील लोकांवर अत्यंत पगडा बसला आहे व त्यांच्या सर्व तत्त्वज्ञानांत ती कल्पना रूढ होऊन बसली आहे, परंतु या कल्पनेचा मागमूससुद्धां ऋग्वेदांत नाहीं. तेव्हां यावरूनहि आपणांस असें स्पष्ट दिसतें कीं, विचारांची व कल्पनांची ऋग्वेदसूक्तांतील दिशा आणि तदुत्तरकालीन वाङ्मयांतील दिशा या परस्परांपासून अगदीं भिन्न आहेत. ऋग्वेद व तदुत्तरकालीन वाङ्मय या दोहोंमधल्या धार्मिक विचारांत हा जो फरक दिसून येतो त्यावरून हें उघड होतें कीं, ऋग्वेदांत जुन्या आर्य लोकांच्या समजुतींचें प्रतिबिंब आहे.

ऋग्वेदसूक्तें हीं 'लौकिककाव्यें' नव्हत, ह्या सूक्तांचा उदय निदान बहुंशीं तरी विशिष्ट गोत्र-कुलांतच झालेला आहे म्हणजे मर्यादित ब्राह्मणी कक्षेंतच झालेला आहे, या गोष्टी जरी खऱ्या आहेत तरी या ऋत्विज सूक्तकारांनीं लौकिक परंपरेनें चालत आलेल्या समजुती लक्षांत न घेतां लोकांच्या आध्यात्मिक जीवनाच्या अंगभूत होऊन बसलेल्या पुराणकथा उत्पन्न केल्या असें मात्र आपणांस म्हणतां यावयाचें नाहीं. देवताविषयक गोष्टींपैकीं कांहीं सूक्तकारांच्या त्या

---

* वैदिक पुराणकथांसंबंधानें जे वादग्रस्त प्रश्न उद्भवतात त्यांचा निर्णय करण्याचें हें स्थळ नव्हे. वैदिक पुराणकथांची सर्व माहिती A. A. Macdonell यानें Vedic Mythology या ग्रंथांत उत्तम रीतीनें संकलित केलेली सांपडेल. भारतीय लोकांच्या धार्मिक समजुती व पुराणकथांचें स्पष्टीकरण या गोष्टींची माहिती ज्याला हवी असेल त्यानें ओल्डनबर्गचा Religion Des Veda (1894) Berlin व हिलेब्रँटचा Vedische Mythologie हे ग्रंथ पाहिले पाहिजेत. या दोघां संशोधकांत मतभेद जरी पुष्कळ असला तरी वैदिक धर्मासंबंधाच्या कल्पना प्रसृत करण्याच्या व त्या ज्यास्त स्पष्ट करण्याच्या बाबतींत या दोघांनीं बरेंच काम केलें आहे यांत शंका नाहीं. परंतु, येथें उपस्थित झालेल्या वादग्रस्त बाबींसंबंधानें सत्याचें साकल्यानें ज्ञान होणें केव्हांहि शक्य नाहीं, फार तर सत्याच्या जवळ जवळ जाणें मात्र शक्य आहे हें सामान्य लोकांनीं ध्यानांत ठेवावें. Abel Bergoigne या फ्रेंच पंडितानें सुद्धां वैदिक धर्मासंबंधानें व विशेषतः वेद–स्पष्टीकरणाच्या कामीं बरेच परिश्रम केलेले आहेत.

वेळच्या वैयक्तिक कल्पना असतील असें जरी मानलें तरी या कल्पना त्यांनीं लौकिक परंपरेस बेमालुमपणें जोडून दिल्या हें आपणांस कबूल केलें पाहिजे. हीच गोष्ट दुसऱ्या शब्दांत सांगावयाची म्हणजे हिलेब्रँटनें म्हटल्याप्रमाणें सूक्तकार हे आपणांस सामान्य जनांपेक्षां जरी वरच्या प्रतीचे समजत, तरी त्यांजपेक्षां आपण अगदीं निराळे आहोंत अशी त्यांची कल्पना नसे.

या वरील एकंदर विवेचनावरून हें स्पष्ट आहे कीं, आर्य लोकांच्या प्राचीनतम धार्मिक समजुती काय होत्या यांचें चित्र या नात्यानें ऋग्वेदसूक्तें बहुमोल असून काव्य या दृष्टीनें सुद्धां जगाच्या वाङ्मयांत यांनां प्रमुख स्थान द्यावें लागेल. मात्र एवढें खरें कीं हिब्रू लोकांच्या धार्मिक काव्याप्रमाणें कल्पनेच्या उंच भराऱ्या अथवा भक्तीचा गाढ आवेश ऋग्वेदांत क्वचितच आढळतो.

**देवता व भक्त.**—ऋग्वेदकाळांतील लोकांनां येहोवाच्या भक्तांप्रमाणें आपल्या आराध्य दैवताबद्दल इतका दृढ विश्वास, आदर व धाक वाटत नाहीं, व या लोकांप्रमाणें वैदिककाळांतील लोकांच्या प्रार्थना अगदीं अंतःकरणापासून निघालेल्या दिसत नाहींत. वैदिक ऋषी आपल्या आराध्य देवतेशीं बरोबरीच्या नात्यानें वागतात. परमेश्वराचें स्तोत्र गाण्यांत त्यांचा हेतु आपल्याला गोधन, वीरपुत्र मिळावे असा असतो व हा हेतु ते लपवून ठेवीत नाहींत. यांचा न्याय 'देवाण घेवाणा'चा दिसतो. उदाहरणार्थ, इंद्राला उद्देशून म्हणतांना एक ऋषि म्हणतोः—

यदिन्द्राहं यथा त्वमीशीय वस्व एक इत्। स्तोता मे गोषखा स्यात् ॥ १ ॥
शिक्षेयमस्मै दित्सेयं शचीपते मनीषिणे। यदहं गोपतिः स्याम् ॥ २ ॥ ऋ. ८. १४.

हे इन्द्र, जसा तूं एकटा वसूंचा (धनाचा) ईश आहेस तसा जर मी ईश असतों तर माझें स्तोत्र गाणारा गोधनयुक्त होता. १.

हे शचीपते, जर मी गोपति असतों तर मला मनीषी* (सकाम) स्तोत्याला (धन) देण्याची इच्छा झाली असती व मी त्याला देऊनहि टाकलें असतें. २.

तसेंच दुसरा एक सूक्तकार अग्नीला उद्देशून खालील भाषेंत बोलतो.

यदग्ने मर्त्यस्त्वं स्यामहं मित्रमहो अमर्त्यः। सहसः सूनवाहुत ॥ २५ ॥

न त्वा रासीयाभिशस्तये वसो न पापत्वाय सन्त्य। न मे स्तोतामतीवा न दुर्हितः स्यादग्ने न पापया ॥ २६ ॥
ऋ. ८. १९.

हे बलपुत्रा, हुत पदार्थांचा स्वीकार करणाऱ्या अग्ने, जर तूं मर्त्य आणि मी अमर्त्य असतों तर मी मित्रमह (ज्याचें तेज स्तोत्यांनां मित्रस्थानीं आहे असा) असतों. २५.

हे वसो, हे सन्त्य (स्तुत्यर्ह)! मी तुला व्यर्थ आक्रोश करूं दिला नसता, (कारण) हें मिथ्यापवादजनक आहे, तसेंच हें पापवत्त्वजनक आहे. माझा स्तोता अबुद्धिमान् राहिला नसता. तो दुःखांत पडला नसता* व पापबुद्धियुक्त झाला नसता. २६.

तथापि या सूक्तांचें स्वरूप उद्दिष्ट देवतांच्या स्वभावानुरूप पुष्कळ निरनिराळें आढळतें. ही गोष्ट जीं सूक्तें यज्ञाकरितां रचलेलीं नसून केवळ स्तुतिपर आहेत अशांनां जास्त लागू आहे.

**वरुणसूक्तें.**—वरुणसूक्तें हीं प्रतिभा व तालबद्धता या दृष्टीनें श्रेष्ठ दर्जाच्या सूक्तांत मोडतात हें निर्विवाद आहे. अशीं सूक्तें फार नाहींत. वैदिक देवतांमध्यें मनुष्यांच्या वरतीं पुष्कळच उंच स्थानावर अधिष्ठित झालेली, जिचे भक्त तिच्याशीं भीतभीतच व नमून बोलतात अशी एक वरुण देवताच आहे. मनुष्याच्या नैतिक वर्तनाकडे या देवतेचें इतर देवतांपेक्षां ज्यास्त लक्ष असून पापी माणसांनां शिक्षा करणारी देवता हीच होय. तेव्हां सहजच मनुष्य वरुणापाशीं जाऊन क्षमेची याचना करितो. ख्रिस्ती मनुष्याला त्याच्या सांप्रदायिक ग्रंथांतील 'साम्स्' (Psalms) या कवितांशीं थोडीं फार सदृश वाटतील अशीं काय तीं वरुणसूक्तेंच आहेत. उदाहरणादाखल खालीं ५ व्या मंडळांतलें ८५ वें सूक्त देतोंः—

प्रसम्राजे बृहदर्चा गभीरं ब्रह्म प्रियं वरुणाय श्रुताय। वि यो जघान शमितेव चर्मोपस्तिरे पृथिवीं सूर्याय ॥ १ ॥

वनेषु व्यन्तरिक्षं ततान वाजमर्वत्सु पय उस्रियासु। हृत्सु क्रतुं वरुणो अप्स्वग्निं दिवि सूर्यमदधात्सोममद्रौ ॥२॥

नीचीनबारं वरुणः कवन्धं प्र ससर्ज रोदसी अन्तरिक्षम्। तेन विश्वस्य भुवनस्य राजा यवं न वृष्टिर्व्युनत्ति भूम ॥ ३ ॥

उनत्ति भूमिं पृथिवीमुत द्यां यदा दुग्धं वरुणो वष्ट्यादित्। समभ्रेण वसत पर्वतासस्तविषीयन्तः श्रथयन्त वीराः ॥ ४ ॥

इमामूष्वासुरस्य श्रुतस्य महीं मायां वरुणस्य प्र वोचम्। मानेनेव तस्थिवाँ अन्तरिक्षे वि यो ममे पृथिवीं सूर्येण ॥५॥

इमामू नु कवितमस्य मायां महीं देवस्य नकिरा दधर्ष। एकं यदुद्ना न पृणन्त्येनीरासिञ्चन्तीरवनयः समुद्रम् ॥ ६ ॥

---

* मनीषिन्=सकाम, मनांत इच्छा असणारा. मनावर स्वामित्व असलेला—सायण.

* दुर्हितः=शत्रु. तो आमचा शत्रु नसता—सायण.

अर्यम्यं वरुण मित्र्यं वा सखायं वा सदमिद्भ्रातरं वा ।
वेशं वा नित्यं वरुणारणं वा यत्सीमागश्चकृमा शिश्रथस्तत् ।७।

कितवासो यद्रिरिपुर्न दीवि यद्वाघासत्यमुत यन्न विद्म ।
सर्वा ता विष्य शिथिरेव देवाधा ते स्याम वरुण
प्रियासः ॥ ८ ॥ ऋ. ५. ८५.

सम्राट् आणि सर्वत्र श्रुत असा जो वरुण त्याचें गंभीर आणि प्रिय असें बृहत्स्तोत्र ( मोठें स्तोत्र ) गा. यानें खाटिक चर्म अंथरतो त्याप्रमाणें सूर्याला आसनासाठीं पृथ्वी (अंतरिक्ष) अंथरली. १.

या वरुणानें वनांच्या शिरोभागीं अंतरिक्ष पसरलें. व घोड्यांच्या ठिकाणीं बल, गाईच्या ठिकाणीं दूध, हृदयाच्या ठिकाणीं कर्म ( संकल्प ), जलाच्या ठिकाणीं अग्नि, ( मेघाच्या ठिकाणीं विद्युत् ) द्यौच्या ठिकाणीं सूर्य व अद्रीवर (पर्वतावर) सोम ठेविला. २.

यानें रोदसी आणि अंतरिक्ष यांच्या हितासाठीं मेघ अधोमुख केला. जसा पेरणी करणारा यव पेरतो त्याप्रमाणें सर्व भुवनाचा राजा वरुण त्याच्या ( मेघाच्या ) द्वारा पृथ्वी ( वर्षाधारांनीं ) भिजवतो. ३.

जेव्हां वरुण दुग्धाची ( उदकाची ) इच्छा करतो तेव्हां तो भूमि, पृथ्वी आणि द्यौ यांनां सिंचित करतो. नंतर पर्वत अभ्रांचें ( मेघांचें ) आच्छादन घेतात. बलवान होऊं इच्छिणारे वारे मेघांशीं द्वंद्व करतात. ४.

मी आतां सुविश्रुत आसुर–वीर्यवान्-( असुरविघातक-सायण ) वरुणाची मोठी माया सांगतों. यानें अंतरिक्षांत राहून मानदण्डाप्रमाणें सूर्यानें ( सूर्य हें मोजण्याचें माप करून ) पृथ्वी* मोजली. ५.

प्रज्ञश्रेष्ठ वरुणाची ही ( पुढील ) माया कोणीहि आकलन करूं शकला नाहीं. या शुभ्र नद्या एकटा समुद्र(हि) आपल्या आसिंचनानें भरूं शकत नाहींत. ६.

अर्यमा ( गुरु किंवा दाता ), मित्र, सखा ( आप्त ), भ्राता, शेजारी व परका ( ज्याच्याशीं संभाषण झालें नाहीं असा ), यांचा जो अपराध आम्ही वारंवार करतों तो तूं नाहींसा कर. ७.

द्यूतांतल्याप्रमाणें जें पाप आमच्यावर लबाड लोकांनीं खोटेंच लादलें असेल तें, तसेंच खरोखरीचें आणि जें आम्हांला कळलें नाहीं तें, हीं सर्व, हे देवा, शिथिलबंध करून आमच्यापासून दूर कर, आणि आम्हाला तूं प्रिय ( तुला ) होऊं दे. ८.

ऋग्वेदांतहि नंतरच्या पुराणकथांप्रमाणें वरुणाला समुद्राची व सामान्यतः जलाची देवता कल्पिलें आहे. आणि हा पापी जनांनां जलोदर उत्पन्न करून त्यांच्या पापाबद्दल शिक्षा करितो असें वर्णन आहे. जलोदर झालेला एक मनुष्य पुढीलप्रमाणें प्रार्थना करतोः—

मोषु वरुण मृन्मयं गृहं राजन्नहं गमम् । मृळा सुक्षत्र मृळय ॥ १ ॥

यदेमि प्रस्फुरन्निव दृतिर्न ध्मातो अद्रिवः । मृळा सुक्षत्र मृळय ॥ २ ॥

क्रत्वः समह दीनता प्रतीपं जगमा शुचे । मृळा सुक्षत्र मृळय ॥ ३ ॥

अपां मध्ये तस्थिवांसं तृष्णाविदज्जरितारम् । मृळा सुक्षत्र मृळय ॥ ४ ॥

यत्किंचेदं वरुण दैव्ये जनेऽभिद्रोहं मनुष्याश्चरामसि ।
अचित्ती यत्तव धर्मा युयोपिम मानस्तस्मादेनसो देव रीरिषः ५
ऋ. ७. ८९.

हे वरुणा, तुझ्या मृत्तिकामय घरामध्यें माझें जाणें न होवो. हे सुक्षत्र, मला सुख दे व मजवर दया कर. १.

हे आयुधवान्* वरुणा, वातानें भरलेल्या पखालीप्रमाणें मी जेव्हां कंप पावेन तेव्हां हे सुक्षत्र० इ. २.

हे निर्मल आणि श्रेष्ठ वरुणा, दीनतेमुळें ( कर्तव्य )कर्माच्या विरुद्ध मी गेलों आहें. हे सुक्षत्र० ३.

जलामध्यें उभें राहून स्तुति करणाऱ्या मला तृष्णा लागली आहे. हे सुक्षत्र० ४.

देवजनासंबंधानें आम्हीं मनुष्यांनीं जो कांहीं अभिद्रोह ( अपकार ) केलेला आहे, आणि जें तुजसंबंधींचें कर्म अचित्तामुळें आम्ही चुकलों, या ( सर्व ) पापापासून आम्हांला अरिष्ट येऊं देऊं नकोस. ५.

**इंद्रसूक्तें.**—इंद्राला उद्देशून जीं सूक्तें गायिलेलीं आहेत, त्यांचा डौल निराळ्याच प्रकारचा आहे. वैदिक काळांतील लोकांची राष्ट्रीय देवता हें नांव इंद्राला देतां येईल. ऋग्वेद-काळांतील लोकांनां अद्याप आपआपसांत लढावें लागत होतें. तेव्हां, त्यांच्याप्रमाणेंच त्यांची देवताहि एक युद्धप्रिय देवता बनली. इन्द्राच्या अचाट शक्तीचें व पराक्रमाचें वर्णन वैदिक लोकांनीं पुन्हां पुन्हां केलें आहे. इंद्रानें राक्षसांशीं लढाया केल्या व आपल्या वज्रानें त्यांचा नाश केला या गोष्टींचीं वर्णनें करण्यांत वैदिक काळांतले लोक अगदीं रंगून जातात. विशेषतः, इन्द्र व वृत्र यांच्या युद्धाच्या वर्णनास अनेक सूक्तें खर्चीं पडलीं आहेत. इन्द्रानें वृत्रावर मिळविलेल्या जयाचें पुन्हां पुन्हां वर्णन करून वृत्राला इन्द्रानें आपल्या वज्रानें मारिलें याबद्दल वैदिक लोकांनीं त्याची प्रेमभरानें स्तुति केली आहे. 'वृत्र' ( धात्वर्थ बहुधा 'अडवून धरणारा' ) हा एक सर्पाकृति राक्षस असून यानें पाणी पर्वतांत कोंडून ठेविलें अशी समजूत आहे.

* पृथ्वी=अंतरिक्ष–सायण.

* अद्रिवान्=आयुधवान्.

इन्द्राला हें पाणी मोकळें सोडण्याची इच्छा. तेव्हां तो सोमरस पिऊन ताजातवाना होतो व लढाई करून वृत्राला मारितो. अशा तऱ्हेनें मोकळें झालेलें पाणी वृत्राच्या प्रेतावरून मोठ्या वेगानें वहात जातें. इन्द्राचा हा पराक्रम ऋग्वेदमंडल पहिलें सूक्त बत्तीस यांत फार चांगल्या तऱ्हेनें वर्णिला आहे. याच्या आरंभींच्या ऋचा येणेंप्रमाणेः—

इन्द्रस्य नु वीर्याणि प्रवोचं यानि चकार प्रथमानि वज्री। अहन्नहिमन्वपस्ततर्द प्रवक्षणा अभिनत्पर्वतानाम् ॥१॥
अहन्नहिं पर्वते शिश्रियाणं त्वष्टास्मै वज्रं स्वर्यं ततक्ष। वाश्रा इव धेनवः स्यन्दमाना अंजः समुद्रमव जग्मुरापः ॥२॥
ऋ. १. ३२.

वज्रधारी इन्द्राचे जे प्रथम पराक्रम ते मी वर्णन करितों. त्यानें अहीस ( मेघास ) मारिलें. नंतर उदकें ( भूमीवर ) मुक्त केलीं व पर्वतांच्या कुक्षी भेदिल्या. १

( त्यानें ) पर्वताचा आश्रय करून राहणाऱ्या अहीस मारलें. त्यासाठीं त्वष्ट्यानें गर्जणारें वज्र तयार केलें. ( मग ) उदकें खालीं गळून हंबरणाऱ्या गाईंप्रमाणें समुद्राकडेस त्वरेनें वाहून गेलीं. २

इन्द्रवृत्रांच्या या युद्धकथेंत वास्तविक एका निसर्गांतील अजस्र व अचाट व्यापाराचें वर्णन गर्भित आहे याविषयीं हीं सूक्तें वाचल्यानंतर कोणासहि शंका राहत नाहीं. वृत्रवधाच्या क्षणीं आकाश व पृथिवी सुद्धां कंपायमान होतात. या राक्षसाला इन्द्र एकदांच मारतो असें नव्हे, तर ही लढाई अनेक वेळां होते व वृत्रहनन करून जलमोचन करण्यास येण्याबद्दल इन्द्राची प्रार्थनाहि अनेक वेळां केलेली आहे.

वेदग्रंथाचे जुने टीकाकार इन्द्र ही एक वादळाची देवता (=विद्युत् व मेघगर्जना ) होय असें म्हणतात. त्यांच्या मतें पर्वत म्हणजे मेघ व वृत्र हा अवर्षणरूपी राक्षस. या राक्षसानें पाणी मेघोदरांत कोंडून ठेविलें. पुराणकथासंशोधन करणाऱ्या यूरोपीय पंडितांपैकीं बरेचजण या मताचा अनुवाद करितात व वज्रायुध इन्द्राचा 'थुनर' या जर्मानिक देवतेशीं संबंध जोडतात. 'थुनर' ही एक 'वादळदेवता' असून तिच्या हातांत Miolnir नांवाचें एक वज्रासारखें आयुध असतें. या देवतेचा संबंध इतिहासप्राक्कालीन इंडोजर्मानिक युगाशीं पोहोंचतो. वृत्र व इन्द्र यांच्या युद्धाचा संबंध हे लोक वादळाशीं जोडतात.

परंतु हिलेब्रँट् यानें नुकतेंच असें दाखविलें आहे कीं, वृत्र हा अवर्षणरूपी राक्षस नाहीं, हा मेघ नाहीं, तर हा एक हिमराक्षस आहे व याचा पाडाव इन्द्र या आदित्यदेवतेकडून होतो. वृत्रानें कोंडून ठेविलेले व इन्द्रानें मोकळे सोडलेले जलौघ म्हणजे पावसाचा धो धो वर्षाव नव्हे तर हिंदुस्थानच्या वायव्य दिशेस हिंवाळ्यांत कोरडे ठणठणीत पडणारे व उन्हाळ्यांत सूर्याच्या उष्णतेनें हिमालयांतील वर्फ वितळल्यावर पुन्हां तुडुंब भरून वाहणारे जलौघ होत असें हा म्हणतो.



तें कांहींहि असो. वैदिक सूक्तकारांना इन्द्र देवतेच्या मूळ स्वरूपाची यथार्थ कल्पना स्वतःलाच झालेली नव्हती हें यावरून उघड आहे. त्यांच्या मतें इन्द्र हा एक बलाढ्य देव असून वृत्र हा अत्यंत त्रासदायक अशा राक्षसांपैकीं एक होता. हे राक्षस त्या प्रदेशांतल्या मूळच्या काळ्या रहिवाशांच्या रूपानें असत असा समज असे. इन्द्र हा वृत्राखेरीज इतर राक्षसांबरोबरहि लढे. त्याच्या लढायांचीं वर्णनें हीं आर्यांच्या व दस्यूंच्या लढायांच्या वर्णनांसारखींच आहेत. यावरून इन्द्र ही एक युद्धप्रिय देवता आहे ही गोष्ट विशेष ठळकपणानें नजरेस येते. वैदिक देवतासमुदायापैकीं कोणत्याहि देवतेच्या विशिष्ट गुणांचें वर्णन इतकें विस्तृत दिलेलें नाहीं. इन्द्र देवतेला उद्देशून गायिलेल्या २५० सूक्तांत इन्द्राचें जसें यथातथ्य वर्णन सांपडतें तसें दुसऱ्या कोणत्याहि देवतेचें सांपडत नाहीं.

इन्द्राचे बाहू मोठे असून बळकट होते. त्याचे ओंठ सुंदर असून तो सोमपान करून मिटक्या मारी व आपली शुभ्र दाढी मोठ्या कौतुकानें हलवी. त्याचे केश व एकंदर अंगकान्ति सोन्याप्रमाणें पिंवळी होती. तो मोठा धिप्पाड असून, आकाश व पृथिवी या दोघांचीहि मिळून मेखला केली तरी ती त्याला पुरण्यासारखी नव्हती. स्वर्गांतील किंवा पृथ्वीवरील कोणताहि प्राणी शक्तीच्या कामीं त्याची बरोबरी करूं शकला नसता. आकाश व पृथ्वी हीं दोन्हीं त्याच्या मुठींत मावत. त्याला वृषभ ही संज्ञा मोठ्या आदरानें दिली जात असे. त्याच्या अचाट सामर्थ्याप्रमाणें त्याचें सोमपान-सामर्थ्यहि कांहीं विलक्षण होतें. या त्याच्या सोमपानाचीं विनोदयुक्त वर्णनें जागोजाग आढळतात. वृत्राला मारण्यापूर्वी इंद्र तीन तळीं सोमरस प्याला असें सांगतात. एके ठिकाणीं तर इंद्रानें एकाच वेळेस ३० तळीं सोमरस गट्ट केला असें वर्णन आहे. तो जन्मास आला नाहीं तोंच त्यानें पेले भर-भरून सोम घेतला. याच्या जन्माची कथा मोठी विचित्र आहे. आपल्या आईच्या गर्भांत असतांच तो म्हणाला कीं, मी या मार्गानें बाहेर जात नाहीं. हा मार्ग वाईट आहे. मी बरगड्या फोडून बाहेर निघेन.

नाहमतो निरया दुर्गहैतत्तिरश्चता पार्श्वान्निर्गमाणि।
ऋ. ४. १८, २

मी या मार्गानें बाहेर पडणार नाहीं. हा मार्ग दुर्गह ( संकटमय ) आहे. मी बाजूनें तिरपा बाहेर पडेन.* २

*सायणभाष्याप्रमाणें वरील ऋचा वामदेवानें इंद्राला दिलेलें उत्तर आहे व ही कथा इन्द्राच्या जन्मासंबंधीं नसून वामदेवाच्या जन्मासंबंधीं आहे.

कांहीं कांहीं वेळां तर इन्द्राकडून त्याच्या आवडत्या पानकर्मांतहि अतिरेक होत असे. ऋग्वेदाच्या १० व्या मंडलाच्या ११९ व्या सूक्तांत सोम पिऊन अंमल चढलेल्या इन्द्राचें वर्णन एका कवीनें केलें आहे. या सूक्तांत इन्द्राचें एक आत्मगत भाषण असून त्यांत त्यानें आपण काय करावें व काय नाहीं याचा विचार केला आहे. "ही गोष्ट अशी करूं कां ? छे; अशी नाहीं, अशी."* "ही पृथ्वी मीं अशी ठेवतों, पण नको, ती तेथेंच ठेवूं या."† अशा रीतीच्या ऋचा या सूक्तांत आहेत व प्रत्येक ऋचेच्या शेवटीं "मी सोम पिऊन झिंगलों काय?"‡ असें मोठें सूचक ध्रुवपद आहे.

ही युद्धप्रिय देवता सर्व देवतांमध्यें मुख्यस्थानीं वसण्यास इतर देवतांपेक्षां अनेक कारणांनीं अधिक पात्र आहे. ऋग्वेदांत प्रत्येक देवतेची 'तूं सर्वांत श्रेष्ठ' अशी कोणत्या ना कोणत्या तरी प्रसंगीं स्तुति केली आहे खरी; पण ग्रीक ऑलिंपसवरील झ्यूस देवतेप्रमाणें, इंद्र हीच देवता सर्वांत श्रेष्ठ व पुराणतम होय. प्रत्येक देवतेची श्रेष्ठ म्हणून स्तुति करणें हें देवतेला स्वतःकडे वळवून घेण्याचें कार्य साधण्याकरितां होय. ही एक प्रकारची खुशामत आहे. अशी खुशामत उत्तरकालीन राजदरबारांत भाटांनीं केलेली आढळते.

ऋग्वेद मंडळ २ सूक्त १२ यांत इन्द्राची अशा तऱ्हेनें स्तुति केलेली आहे व इंद्रसूक्तांचा नमुना म्हणून हें सूक्त जसेंच्या तसेंच खालीं दिलें आहे.

यो जात एव प्रथमो मनस्वान्देवो देवान्क्रतुना पर्यभूषत्। यस्य शुष्माद्रोदसी अभ्यसेतां नृम्णस्य मह्ना स जनास इन्द्रः ॥ १ ॥

यः पृथिवीं व्यथमानामदृंहद्यः पर्वतान्प्रकुपिताँ अरम्णात्। यो अन्तरिक्षं विममे वरीयो यो द्यामस्तभ्नात्स जनास इन्द्रः ॥ २ ॥

यो हत्वाहिमरिणात्सप्त सिन्धून्यो गा उदाजदपधा वलस्य । यो अश्मनोरन्तरग्निं जजान संवृक्समत्सु स जनास इन्द्रः ॥ ३ ॥

येनेमा विश्वाच्यवना कृतानि यो दासं वर्णमधरं गुहाकः। श्वघ्नीव यो जिगीवाँल्लक्षमाददर्यः पुष्टानि स जनास इन्द्रः ॥ ४ ॥

यं स्मा पृच्छन्ति कुह सेति घोरमुतेमाहुर्नैषो अस्तीत्येनम्। सो अर्यः पुष्टीर्विज इवामिनाति श्रदस्मै धत्त स जनास इन्द्रः ॥ ५ ॥

यो रध्रस्य चोदिता यः कृशस्य यो ब्रह्मणो नाधमानस्य कीरेः । युक्तग्राव्णो योऽविता सुशिप्रः सुतसोमस्य स जनास इन्द्रः ॥ ६ ॥

यस्याश्वासः प्रदिशि यस्य गावो यस्य ग्रामा यस्य विश्वे रथासः । यः सूर्यं य उषसं जजान यो अपां नेता स जनास इन्द्रः ॥ ७ ॥

यं क्रन्दसी संयती विह्वयेते परेऽवर उभया अमित्राः । समानं चिद्रथमातस्थिवांसा नाना हवेते स जनास इन्द्रः ॥ ८ ॥

यस्मान्न ऋते विजयन्ते जनासो यं युध्यमाना अवसे हवन्ते । यो विश्वस्य प्रतिमानं बभूव यो अच्युतच्युत्स जनास इन्द्रः ॥ ९ ॥

यः शश्वतो मह्येनो दधानानमन्यमानाञ्छर्वा जघान । यः शर्धते नानुददाति शृध्यां यो दस्योर्हन्ता स जनास इन्द्रः ॥ १० ॥

यः शंबरं पर्वतेषु क्षियन्तं चत्वारिंश्यां शरद्यन्वविन्दत्। ओजायमानं यो अहिं जघान दानुं शयानं स जनास इन्द्रः ॥ ११ ॥

यः सप्तरश्मिर्वृषभस्तुविष्मानवासृजत्सर्तवे सप्त सिन्धून्। यो रौहिणमस्फुरद्वज्रबाहुर्द्यामारोहन्तं स जनास इन्द्रः १२

द्यावा चिदस्मै पृथिवी नमेते शुष्माच्चिदस्य पर्वता भयन्ते । यः सोमपा निचितो वज्रबाहुर्यो वज्रहस्तः स जनास इन्द्रः ॥ १३ ॥

यः सुन्वन्तमवति यः पचन्तं यः शंसन्तं यः शशमानमूती । यस्य ब्रह्म वर्धनं यस्य सोमो यस्येदं राधः स जनास इन्द्रः ॥ १४ ॥

यः सुन्वते पचते दुध्र आ चिद्वाजं दर्दर्षि स किलासि सत्यः । वयं त इन्द्र विश्वह प्रियासः सुवीरासो विदथमा वदेम ॥ १५ ॥ ऋ. २. १२.

जो उपजतांच सर्वश्रेष्ठ मेधावी देव देवांनां आपल्या पराक्रमानें रक्षिता झाला, ज्याच्या बळाला (व) वीर्याच्या महत्त्वाला द्यावापृथिवी भिऊन कांपल्या, तो हे जनहो इन्द्र (असें समजा.) १.

जो कांपत असणाऱ्या पृथिवीला दृढ करिता झाला, जो चंचल पर्वतांना स्थिर करिता झाला, जो विस्तीर्ण अंतरिक्षाला व्यवस्थापिता झाला, जो द्यूला धारण करिता झाला, तो हे जनहो इन्द्र. २

जो अहीला मारून सप्तसिंधूंनां खालीं सोडून देता झाला, जो गाईंनां वलाच्या अटकेपासून मुक्त करिता झाला, जो मेघांमध्यें अग्नि उत्पन्न करिता झाला, (जो) संग्रामांत (शत्रूचा) नाश करतो, तो० ३.

* इति वा इति मे मनः । ऋ. १०·११९,१
† हन्ताहं पृथिवीमिमां निदधानीह वेहवा। ऋ. १०· ११९,९ ‡ कुवित्सोमस्यापामिति । ऋ. १०·११९.

ज्यानें हीं सर्व भुवनें हादरून सोडलीं* ( च्यवन=अस्थिर केलीं ), निकृष्ट दासवर्णांनां ज्यानें गुहांत नेऊन घातलें, ज्यानें व्याधाप्रमाणें ( †श्वघ्नी=कुत्रे घेऊन शिकार करणारा ) आपलें लक्ष‡ जिंकलें व अरींपासून त्यांचें सर्वस्व हिसकून घेतलें, तो० ४

ज्यासंबंधानें "तो घोर इन्द्र आहे कोठें ? तो नाहींच" असें पृच्छापूर्वक उद्गार काढतात, तो शत्रूची संपत्ति ( त्यांस ) उद्वेग ( पीडा ) देऊन हरण करतो. त्यावर श्रद्धा ठेवा. ५

जो समृद्धास व स्तुति करणाऱ्या गरीब याचक ब्राह्मणास धन देतो, ( आणि ) ज्याचे ( येथें ) ग्रावे ( सोम ठेंचण्याचे दगड ) युक्त ( व्यापृत ) आहेत व ज्यानें सोमसवन केलें आहे अशाचें जो सुवदन रक्षण करतो, तो० ६.

ज्याच्या आज्ञेंत सर्व अश्व, गाई, गांवें, रथ आहेत. ज्यानें सूर्य व उषा यांनां उत्पन्न केलें, जो जलांचा प्रेरक तो० ७.

ज्याला सिंहनाद करणाऱ्या परस्पर भिडणाऱ्या सेना हांका मारितात, पलीकडचे व अलीकडचे उभय शत्रु ( हांका मारितात ), एकाच रथावर बसलेले दोघेजण आपआपल्या बाजूला बोलवितात, तो० ८.

ज्याच्याशिवाय लोकांनां जय मिळत नाहीं, ज्याला युद्ध करणारे रक्षणासाठीं बोलवितात, जो विश्वाचें प्रतिमान झाला आहे ( जो विश्वामध्यें कोणालाहि तोडीचा प्रतिमल्ल आहे ), जो स्थित ( वस्तूंनां ) हलविणारा, तो० ९.

जो मोठें पाप करणाऱ्या व स्तुति न करणाऱ्या अनेकांनां वज्रानें मारिता झाला, जो बलाचा गर्व वहाणाऱ्याला बल देत नाहीं, जो दस्यूंचा मारणारा तो इन्द्र० १०.

जो पर्वतांत ( गुप्त ) वास करणाऱ्या शंबराला चाळिसाव्या वर्षीं शोधून काढिता झाला, आणि जो पराक्रमी अहि दानवाला ( तो ) निजला असतांना मारिता झाला. तो० ११.

ज्या बलवान् सप्तमेघयुक्त वृष्टि करणाऱ्या इन्द्रानें सप्त-सिंधूंनां वाहण्यासाठीं खालीं सोडलें, ज्या वज्रबाहूनें द्युलोकाचें आरोहण करणाऱ्या रौहिणाला ( एका असुराला ) मारिलें, तो० १२

ज्याला द्यावापृथिवी नमून असतात, ज्याच्या प्रतापाला पर्वतहि भितात, जो सोमपान करणारा, शरीरानें दृढ, वज्रबाहु व वज्रधारी, तो० १३.

जो सोमसवन करणाऱ्याचें रक्षण करितो, जो ( हवि ) शिजवणारा, ( शस्त्राची ) प्रशंसा करणारा व स्तुति करणारा यांचें रक्षण आहे, ( आमचें ) स्तोत्र, सोम व हविरन्न हें ज्याला वृद्धिकर आहे, तो० १४.

जो तूं दुर्धर आहेस व जो तूं सोमसवन करणारा व हवि शिजविणारा यांनां बल देतोस, तो तूं सत्य आहेस हें खरें. आम्ही तुला सर्वदा प्रिय असावें व आम्ही वीर पुत्रपौत्रां-सहित तुझीं स्तोत्रें गात असावें. १५.

वरुण व इंद्र यांच्या सूक्तांवरून आपणांस असें दिसतें कीं, ऋग्वेदकाळांतील मंत्रद्रष्टे ऋषी, कल्पकता, करुण रस व ओजस्विता या गुणांत कोणत्याहि प्रकारें कमी नव्हते. तसेंच या लोकांच्या अंगांत मुग्ध, कोमल असे भाव व्यक्त करण्याची शक्ति होती असें अग्निसूक्तें वाचलीं असतां दिसून येईल.

**अग्निसूक्तें.**—अग्नि हा मनुष्यांचा परममित्र होय. मनुष्यें व देव यांचा अग्नि हा मध्यस्थ होय. याच्या संबंधानें बोलतांना परममित्राशीं बोलण्याची भाषा वापरली आहे. वैदिक ऋषींनीं याची स्तुति करून बाप मुलाला आशीर्वाद देतो त्याप्रमाणें तूं आम्हांला आशीर्वाद दे अशी प्रार्थना केली आहे. या स्तोत्रानें अग्नि संतुष्ट झाला आहे व तो आपली इच्छा पूर्ण करणारच अशा प्रकारची त्यांची भावना या सूक्तांत दृष्टीस पडते.

इन्द्र ही जशी रणगार्जीची रणदेवता आहे तशी अग्नि ही गृहस्थांची गृह-देवता आहे. गृहांतील बायकांपोरांचें तो रक्षण करितो; व तेथील ऐहिक संपत्ति वाढवितो. त्याला 'गृहपति' असें वारंवार म्हटलें आहे. तो प्रत्येक घरांत अतिथि मानला जातो व त्याला अतिथिश्रेष्ठ समजतात. तो स्वतः अमर असून मर्त्य लोकांत राहतो, व घरांतील धनधान्यसमृद्धि वगैरे त्याच्यावर अवलंबून असते.

फार पुरातन काळापासून, 'नवरी' लग्न होऊन स्वतःचे घरीं गेली म्हणजे तिला अग्नीला प्रदक्षिणा घालण्यास सांग-ण्याची चाल आहे. यावरून अग्नीला 'कुमारींचा प्रियकर' 'स्त्रियांचा पति' अशीं नांवें देण्यांत येतात. एका विवाहप्रसंगीं म्हणावयाच्या मंत्रांत अग्नि हा सर्व कुमारिकांचा पति असून त्याच्याचपासून वराला वधूची प्राप्ति होते असें वर्णन आहे. विवाह, जातकर्म वगैरे अनेक गृह्यसंस्कारांच्या प्रसंगीं अग्नीची प्रार्थना करण्यांत येते. विवाहहोमाच्या वेळीं मुलीच्या वतीनें म्हणून अग्नीची प्रार्थना येणेंप्रमाणें केली जाते: "गृहपति अग्नि या मुलीचें रक्षण करो; या मुलीचे वंशज दीर्घायुष्य पावोत; हिच्या गर्भस्थानावर अग्नीची कृपादृष्टि असो; हिचीं अपत्यें जगोत व हिला संततिसुख प्राप्त होवो."

यज्ञिय अग्नि हा देव व मनुष्यें यांचा मध्यस्थ आहे. तो देवांच्याकडे हविर्भाग लवकर नेऊन पोंचवितो, तो देवांनां यज्ञस्थलीं त्वरित घेऊन येतो, म्हणून याला ऋत्विज्

---

* ज्यानें हीं अस्थिर (नश्वर) विश्वें स्थिर केलीं.—सायण.
† श्वघ्नी याचा अर्थ कोणी द्यूतकार असा करितात. ‡ लक्ष याचा अर्थ कोणी एक लक्ष ही संख्या असा घेतात.

म्हणतात, कवि म्हणतात, ब्रह्मा म्हणतात, पुरोहित म्हणतात, होता, 'सर्व ऋत्विजांत श्रेष्ठ', असेंहि म्हणतात.

अग्निसूक्तांमध्यें कविकल्पना कोणत्या व परंपरागत लौकिक-कथा कोणत्या याची निवड करतां येणें कठिण आहे. पुष्कळसें तूप घालून यज्ञिय अग्नि नेहमीं प्रज्वलित ठेविला जात असे. असल्या प्रज्वलित अग्नीचें वर्णन एक कवि असें करितो, "अग्नीचा चेहरा प्रफुल्लित दिसतो आहे, त्याचा पृष्ठभागहि तसाच तेजस्वी दिसत आहे; त्याच्या केंसांतून तूप गळत आहे." अग्नीचें वर्णन कोठें ज्वालाशिख किंवा रक्तशिख आणि रक्तकूर्च असें केलें आहे, त्याच्या जवड्याचीं हाडें मोठीं वळकट व तीक्ष्ण असून त्याचे दांत सोन्यासारखे झळकणारे आहेत, असें म्हटलें आहे. कोठें अग्नीच्या ज्वालांनां त्याच्या जिह्वा असें म्हटलें आहे; तर कोठें त्याच्या चोहोंकडे पसरणाऱ्या ज्वालांनां उद्देशून त्याला चतुर्नेत्र किंवा सहस्रनेत्र म्हटलें आहे. या सर्व प्रकारच्या कल्पना परंपरागत लोककथांतील अथवा कवीच्या वैयक्तिक मनःसृष्टींतील असणें सारखेंच संभवनीय आहे. तसेंच, अग्नीचा तडतड असा होणारा आवाज व बैलाचें डुरकणें यांची तुलना करून त्यावरून अग्नीला वृषभ म्हटलें आहे. अग्नीच्या उंच वाढणाऱ्या ज्वालांनां शिंगांसारखीं टोंकें असतात म्हणून ज्वाला हीं अग्नीचीं शिंगें होत, असें एकजण म्हणतो. दुसरा एक ऋषि अग्नीला हजार शिंगें होतीं असें म्हणतो. तिसरा म्हणतो कीं, तो आपलीं शिंगें पाजवून रागानें इकडे तिकडे हालवितो. तसेंच अग्नीला अतिशय वेगवान् दूत, मौजेनें खिंकाळणारा घोडा, असेंहि म्हटलें आहे. पुराणकथा आणि धार्मिक विधी या दोहोंतहि अग्नीचा व घोड्याचा बराच निकट संबंध आढळतो.

पण अग्नीला ज्या वेळीं पृथ्वी व आकाश यांमध्यें चपलतेनें तळपणारा स्वर्गीय गरुड असें म्हणण्यांत येतें त्या वेळीं मात्र अग्नि या शब्दानें आकाशांतून खालीं येणारा विजेचा झोतच उद्दिष्ट असला पाहिजे. पुन्हां खालील ऋचेंत जें वर्णन दिलें आहे त्यावरून तेथें कवीच्या मनासमोर यापेक्षांहि निराळें अग्निस्वरूप आहेसें वाटतें.

अ॒ग्निर्जम्भै॑स्ति॒गि॒तैर॑त्ति॒ भर्व॑ति यो॒धो न शत्रू॒न्त्स वना॒न्यृ॑ञ्जते ।

ऋ. १. १४३,५.

अग्नि तीक्ष्ण दाढांनीं (वृक्षादिकांस) भक्षितो व चाऊन टाकतो. योद्धा जसा शत्रूंनां जेर करतो तसा हा वृक्षांनां जेर करतो. अशाच प्रकारचें वर्णन पुढील ऋचेंत आहेः—

यद्वात॑जूतो॒ वना॒ व्यस्था॑द॒ग्निर्ह॑ दाति॒ रोमा॑ पृथि॒व्याः ।

ऋ. १. ६५, ४.

वातप्रेरित अग्नि जेव्हां अरण्यांत शिरतो, (तेव्हां) तो पृथ्वीचे केंसच जणूं कापतो.

अग्नीसंबंधाच्या म्हणून ज्या कथा आहेत त्या सुद्धां काव्यमय, गूढ व अलंकारिक भाषेंतून निघाल्या असाव्या. अग्नीचे जन्म अथवा जन्मस्थानें तीन आहेत असेंहि एके ठिकाणीं वर्णन आहे. आकाशांत तो सूर्यतेजाच्या रूपानें तळपतो; मर्त्यलोकांत माणसें त्याला काष्ठावर काष्ठ घांसून प्रकट करितात; व पाण्यांत त्याचें जन्म विद्युद्रूपानें होतें. ज्या दोन अरणींच्या साहाय्यानें अग्नि सिद्ध करतात त्या अरणी म्हणजे अग्नीच्या माता असें समजतात, व हें बाळ जन्मास येतांच आपल्या मातांनां खाऊन टाकतें असें वर्णन* आहे. दुसऱ्या एका ठिकाणीं दहा कुमारींनीं या त्वष्ट्याचे पुत्राला जन्म दिला असें वर्णन† आहे. या ठिकाणीं अग्निमंथन करण्यांत उपयोगांत आणावीं लागणारीं दहा बोटें उद्दिष्ट आहेत. अग्निमंथन करण्याचें काम अत्यंत मेहनतीचें असल्यानें सर्व संहितेंत अग्नीला 'बळाचा पुत्र' 'सहसःसूनुः' अशी संज्ञा आहे.

प्राचीन हिंदुलोकांत वाढलेलें अग्निहोत्राचें स्तोम लक्षांत घेतां ऋग्वेदांतील अग्निसूक्तांपैकीं बरींचशीं सूक्तें यज्ञासंबंधाचीं असावीं याचें कांहीं आश्चर्य वाटणार नाहीं. हीं सूक्तें सुमारें २०० आहेत. यांपैकीं कित्येक केवळ यज्ञासाठीं म्हणूनच रचिलेलीं आहेत. तरी पण यांतील कांहीं सूक्तें, तीं जरी प्रार्थनापर व ऋत्विजांनीं केलेलीं असलीं तरी, कवींच्या अंतःकरणांतून निघालेलीं काव्यें आहेत यांत शंका नाहीं. ऋग्वेदसंहितेचें पहिलेंच सूक्त खालीं देतों. त्यावरून मूळ सूक्तांची यथार्थ कल्पना होणारी आहे.

अ॒ग्निमी॑ळे पु॒रोहि॑तं य॒ज्ञस्य॑ दे॒वमृ॒त्विज॑म् । होता॑रं रत्न॒धात॑मम् ॥ १ ॥

अ॒ग्निः पूर्वे॑भि॒र्ऋषि॑भि॒रीड्यो॒ नूत॑नैरु॒त । स दे॒वाँ एह व॑क्षति ॥ २ ॥

अ॒ग्निना॑ र॒यिम॑श्नव॒त्पोष॑मे॒व दि॒वेदि॑वे । य॒शसं॑ वी॒रव॑त्तमम् ॥ ३ ॥

अग्ने॒ यं य॒ज्ञम॑ध्व॒रं वि॒श्वतः॑ परि॒भूरसि॑ । स इद्दे॒वेषु॑ गच्छति ॥ ४ ॥

अ॒ग्निर्होता॑ क॒विक्र॑तुः स॒त्यश्चि॒त्रश्र॑वस्तमः । दे॒वो दे॒वेभि॒रा ग॑मत् ॥ ५ ॥

यद॒ङ्ग दा॒शुषे॒ त्वमग्ने॑ भ॒द्रं क॑रि॒ष्यसि॑ । तवेत्तत्स॒त्यम॑ङ्गिरः ॥ ६ ॥

उप॑ त्वाग्ने दि॒वेदि॑वे॒ दोषा॑वस्तर्धि॒या व॒यम् । नमो॒ भर॑न्त॒ एम॑सि ॥ ७ ॥

राज॑न्तमध्व॒राणां॑ गो॒पामृ॒तस्य॒ दीदि॑विम् । वर्ध॑मानं॒ स्वे दमे॑ ॥ ८ ॥

* ऋ. १०.७९,४. † ऋ. १. ९५, २.

स नः पितेव सूनवेऽग्ने सूपायनो भव। सचस्वा नः स्वस्तये ॥ ९ ॥

ऋ. १. १.

पुरोहित, यज्ञाचा दैदीप्यमान ऋत्विज् होता (व) अतिशय संपत्ति देणारा अशा अग्नीस मी स्तवितों. १.

अग्नि पूर्वीच्या ऋषींनीं तसाच नव्या ऋषींनीं स्तुति करावी असा आहे. तो देवांनां येथें घेऊन येवो. २.

अग्नीच्या द्वारें (यजमानास) यशोयुक्त, वीर (पुत्रभृत्य)-युक्त व दिवसेंदिवस पुष्ट होणारें धन प्राप्त होतें. ३.

हे अग्ने, ज्या यज्ञाभोंवतीं तूं परिवेष्टन करून असतोस व जो विघ्नरहित असतो तोच देवांप्रत पोंचतो. ४.

दिव्यकर्मा, अनृतरहित, अतिशय विविध कीर्तीचा, होमसंपादक असा अग्नि देव देवांसह येवो. ५.

बा अग्ने, तूं हविर्दान करणाराचें जें कल्याण करशील तें हे अंगिरा, तुझेंच कल्याण (आहे). ६.

हे अग्ने, रोज रात्रीं व दिवसां आम्ही तुला ध्यानपूर्वक नमस्कार करीत तुजसमीप येतों. ७.

अध्वरांचा रक्षिता, सत्या (कर्मफला)चा प्रकाशक, स्वगृहीं (यज्ञशालेंत) वृद्धि पावणारा असा जो तूं दैदीप्यमान अग्नि (त्या तुला नमस्कार करीत०) ८.

जसा पिता पुत्राला तसा तूं आम्हांला शोभन उपायन* देणारा (चांगली देणगी देणारा) हो व आमच्या कल्याणासाठीं जवळ रहा. ९.

**उषासूक्तें.**–सूर्य, पर्जन्य, मरुत् इत्यादि देवतांनां उद्देशून लिहिलेल्या सूक्तांपैकीं कांहीं कांहीं सूक्तें अलंकारिक भाषा व चटकदार सृष्टिवर्णनें या दोन्ही बाबतींत श्रेष्ठ दर्जाचीं असून अंतःकरण वेधून घेणारीं आहेत; तरी यांहीपेक्षां उषा देवतेला वाहिलेलीं गीतमौक्तिकें फारच सुंदर आहेत. अरुणोदयाच्या शोभेचीं भपकेदार शब्दचित्रें रंगविण्याच्या कामीं सूक्तकारांनीं एकमेकांवर ताण केली आहे. उषा देवता, आईनें अलंकार घालून सजविलेल्या एखाद्या कन्येप्रमाणें, आपल्या तेजानें लोकांनां दिपवीत दिपवीत येते. तिला आपल्या सौंदर्याचा अभिमान वाटे. उषा एखाद्या नर्तकीप्रमाणें अंगावर उत्तम उत्तम वस्त्रें धारण करिते व आपला हृदयप्रदेश लोकांनां उघडा करून दाखविते. तेजोमय वस्त्र धारण करून ही युवति उषा पूर्वेस उदयास येते व आपलें सौंदर्य हलकें हलकें प्रकट करिते. ती स्वर्गाचीं कपाटें उघडून आपली प्रभा पसरीत बाहेर येते. हिच्या सौंदर्याची तुलना प्रणयाकांक्षिणी प्रमदेच्या सौंदर्याशीं केलेली वारंवार आढळते.

* उपायन.–सूपायन याचा अर्थ सुगम केला आहे (सायण.)

एषा शुभ्रा न तन्वो विदानोर्ध्वेव स्नाती दृशये नो अस्थात्। अप द्वेषो बाधमाना तमांस्युषा दिवो दुहिता ज्योतिषागात् ॥ ५ ॥

एषा प्रतीची दुहिता दिवो नॄन्योषेव भद्रा नि रिणीते अप्सः। व्यूर्ण्वती दाशुषे वार्याणि पुनर्ज्योतिर्युवतिः पूर्वथाकः ॥ ६ ॥ ऋ. ५. ८०.

ही उषा स्नान करून उठलेल्या, जिचीं अंगें (अवयव) दिसत आहेत अशा, गौरवर्ण स्त्रीप्रमाणें आमच्या दृष्टीसमोर उभी आहे. अंधकाररूप शत्रूंचा नाश करीत ही द्यूची कन्या तेजासह येत आहे.

भद्रा (सुंदर) स्त्रीप्रमाणें ही अभिमुख (प्रसन्न) अशी द्यूची कन्या मनुष्यांनां रूप दाखविते (पाठविते). (हवि) देणाऱ्याला धन देण्यासाठीं या युवतीनें पूर्वीप्रमाणें पुन्हां प्रकाश केला आहे.

खालीं दिलेलें उषासूक्त पहाण्यालायक आहे.

उदु श्रिय उषसो रोचमाना अस्थुरपां नोर्मयो रुशन्तः। कृणोति विश्वा सुपथा सुगान्यभूदु वस्वी दक्षिणा मघोनी ॥१॥

भद्रा ददृक्ष उर्विया वि भास्युत्ते शोचिर्भानवो द्यामपप्तन्। आविर्वक्षः कृणुषे शुम्भमानोषो देवि रोचमाना महोभिः ॥ २ ॥

वहन्ति सीमरुणासो रुशन्तो गावः सुभगामुर्विया प्रथानाम्। अपेजते शूरो अस्तेव शत्रून्बाधते तमो अजिरो न वोळ्हा ॥ ३ ॥

सुगोत ते सुपथा पर्वतेष्ववाते अपस्तरसि स्वभानो। सा न आ वह पृथुयामन्नृष्वे रयिं दिवो दुहितरिषयध्यै ॥४॥

सा वह योक्षभिरवातोषो वरं वहसि जोषमनु। त्वं दिवो दुहितर्या ह देवी पूर्वहूतौ मंहना दर्शता भूः ॥ ५ ॥

उत्ते वयश्चिद्वसतेरपप्तन्नरश्च ये पितुभाजो व्युष्टौ। अमा सते वहसि भूरि वाममुषो देवि दाशुषे मर्त्याय ॥ ६ ॥

ऋ. ६. ६४.

पाण्याच्या लाटांप्रमाणें उषेचे दैदीप्यमान शुभ्र प्रभाकिरण (श्रियः) उदय पावत आहेत. (ही) सर्व सुमार्ग सुगम करिते व सर्वांनां दाक्षिण्यवती व धन आणि समृद्धि देणारी होते.*१.

हे उषादेवि, हे भद्रे, तूं विस्तीर्ण (प्रदेशावर) प्रकाशमान होतेस. तुझे दीप्तिमान किरण वर अंतरिक्षांत जातात. तेजानें शोभायमान व दैदीप्यमान अशी तूं आपलें वक्ष (रूप) प्रकट करतेस. २.

* मघोनी=धनवती, वस्वी=प्रशस्ता, दक्षिणा=समर्धयित्री. —सायण.

विस्तीर्ण प्रदेशावर पसरणाऱ्या या सुभग उषेला दैदीप्यमान रक्तकिरण वाहून नेतात. शूर ( अस्त्र )क्षेपकाप्रमाणें ही शत्रूंना घालवून देते. वेगवान् रथ्याप्रमाणें ( किंवा सारथ्याप्रमाणें ) ही ( शत्रूचा ) अंधकाराचा नाश करते. ३.

हे स्वप्रकाश उषे, दुर्गम पर्वतांवर तुला सुगम सुमार्ग असतात. तूं अन्तरिक्षांतहि प्रवेश करतेस ( किंवा जलांतूनहि जातेस ). पृथुरथांतून जाणाऱ्या दर्शनीय दिवोदुहिते (द्युकन्ये), आम्हांला इष्ट धन दे. ४.

हे उषे, तूं अश्वांच्या साहाय्यानें अप्रतिहतगति ( असून ) ( याचकाच्या ) इच्छेप्रमाणें त्याला ( इष्ट ) वर पोंचवितेस. ती तूं आम्हाला ( इष्टधन ) दे. हे द्युकन्ये, जी तूं सर्वांच्या अगोदर आवाहनीय व पूजनीय आहेस ती तूं आम्हांला दर्शन दे. ५.

हे उषोदेवि, तुझा प्रकाश होतांच पक्षी आणि अन्नोपार्जक लोक आपापल्या वसतिस्थानांतून बाहेर पडतात. हे उषोदेवि, तुजसमीप असणाऱ्या हविर्दात्या मनुष्याला तूं प्रभूत धन देतेस. ६.

**वायुसूक्तें.**—मरुद्गणांचा नायक या नात्यानें खालील सूक्त वायुदेवतेस उद्देशून आहे.

वात॑स्य॒ नु म॑हि॒मानं॒ रथ॑स्य रु॒जन्ने॑ति स्त॒नय॑न्नस्य॒ घोषः॑। दि॒वि॒स्पृग्या॑त्यरु॒णानि॑ कृ॒ण्वन्नु॒तो ए॑ति पृथि॒व्या रे॒णुम॑स्यन् ॥ १ ॥

सम्प्रेर॑ते अनु॒वात॑स्य वि॒ष्ठा ऐनं॑ गच्छन्ति॒ सम॑नं॒ न योषाः॑। ताभिः॑ स॒युक्स॒रथं॑ दे॒व ईयते॒स्य विश्व॑स्य॒ भुव॑नस्य॒ राजा॑ ॥ २ ॥

अ॒न्तरि॑क्षे प॒थिभि॒रीय॑मानो॒ न निवि॑शते कत॒मच्च॒नाहः॑। अ॒पां सखा॑ प्रथम॒जा ऋ॒तावा॒ क्व॑ स्विज्जा॒तः कुत॒ आब॑भूव ॥

आ॒त्मा दे॒वानां॒ भुव॑नस्य॒ गर्भो॑ यथाव॒शं च॑रति दे॒व ए॒षः। घोषा॒ इद॑स्य शृण्वि॒रे न रू॒पं तस्मै॒ वाता॑य ह॒विषा॑ विधेम ॥ ४ ॥ ऋ. १०. १६८.

आतां मी वाताच्या रथाचा महिमा सांगतों. याचा घोष ( सर्वत्र ) घडघड शब्द करित व मोडतोड करीत जातो. हा पृथ्वीवरील धूळ उडवीत ( व तिच्या योगानें दिशांनां ) रक्तवर्ण करीत, अंतरिक्षमार्ग व्यापून चालतो. १.

ज्याप्रमाणें योषिता धृष्ट पुरुषाकडे जातात, त्याप्रमाणें विशेष स्थिर असे तरुगुल्मादि वाताकडे जातात. ( आणि ) त्यांसह एका रथांत वसून हा सर्व भुवनांचा राजा वायुदेव जातो. २.

अन्तरिक्षांतील मार्गांनीं जाणारा ( हा वायु ) एकहि दिवस ( स्वस्थ ) बसत नाहीं. हा जलांचा सखा प्रथमजन्मा ( सर्वांच्या पूर्वी जन्मलेला ), सत्याचा पालक ( सत्यमय ), कोठें उत्पन्न झाला, कोठून आला? ३.

हा देवांचा आत्मा, भुवनाचा गर्भ ( प्राण ), हा देव इच्छेप्रमाणें संचार करितो. याचे घोष ( आवाज ) केवळ ऐकूं येतात, याचें रूप दिसत नाहीं. त्या वायुदेवाची आम्ही हवीनें सेवा करितो. ४.

हीं सूक्तें चांगलें काव्य म्हणून नांवाजण्यासारखीं आहेत. असल्या सूक्तांखेरीज ऋग्वेदांत दुसराहि एक सूक्तांचा वर्ग आहे. या वर्गांतील सूक्तें म्हणजे केवळ यज्ञकर्मासाठींच रचलेलीं सूक्तें व शांतिसूक्तें होत. या दोन तऱ्हेच्या सूक्तांत भेद दाखविण्याचें काम कठिण आहे. एखादें सूक्त भक्तीच्या उत्कट प्रेरणेनें व दिव्य काव्यस्फूर्तीनें प्रकट झालेलें समजावयाचें किंवा एखाद्या यज्ञिय प्रार्थनेसाठीं कुशलतेनें तयार केलेलें समजावयाचें हें रुचिभेदावर अवलंबून राहील.

**यज्ञिय सूक्तें.**—यज्ञविषयक सूक्तांचा विशेष म्हटला म्हणजे त्यांतील विलक्षण एकसुरीपणा ( पुनःपुनरुक्ति ) होय. एका देवतेच्या बळाचें व श्रेष्ठपणाचें वर्णन ज्या विशेषणांनीं एकाद्या स्थळीं केलेलें आढळतें तींच विशेषणें दुसऱ्या देवतेला लाविलेलीं आढळतात. पशु, धन, धान्य, संपत्ति वगैरे गोष्टी देण्याबद्दल केलेल्या देवांच्या प्रार्थनाहि कायम ठशाच्या व ठरींव सांचाच्या आढळतात. या संहितेंमध्यें कांहीं ठिकाणीं एकाच सूक्तांत अनेक देवतांचें—कधीं कधीं सर्वच देवतांचें—आवाहन केलेलें आहे असें आढळून येतें. याचें कारण, सोमयज्ञांत प्रत्येक देवतेला हविर्भाग मिळालाच पाहिजे, व प्रत्येक आहुति समंत्रक असली पाहिजे असा निर्बंध आहे हें होय. उदाहरणार्थ, वर दिलेल्या वरुण, इंद्र व अग्नि यांच्या सूक्तांशीं खालील यज्ञसूक्त ताडून पाहण्यासारखें आहे.

शं न॑ इन्द्रा॒ग्नी भ॑वता॒मवो॑भिः॒ शं न॒ इन्द्रा॒वरु॑णा रा॒तह॑व्या। शमिन्द्रा॒सोमा॑ सुवि॒ताय॒ शं योः शं न॒ इन्द्रा॑पू॒षणा॒ वाज॑सातौ ॥ १ ॥

शं नो॒ भगः॒ शमु॑ नः॒ शंसो॑ अस्तु॒ शं नः॒ पुर॑न्धिः॒ शमु॑ सन्तु॒ रायः॑। शं नः॑ स॒त्यस्य॑ सु॒यम॑स्य॒ शंसः॒ शं नो॑ अर्य॒मा पु॑रुजा॒तो अ॑स्तु ॥ २ ॥

शं नो॑ धा॒ता शमु॑ ध॒र्ता नो॑ अस्तु॒ शं न॑ उरू॒ची भ॑वतु स्व॒धाभिः॑। शं रोद॑सी बृह॒ती शं नो॒ अद्रिः॒ शं नो॑ दे॒वानां॑ सु॒हवा॑नि सन्तु ॥ ३ ॥

शं नो॑ अ॒ग्निर्ज्योति॑रनीको अस्तु॒ शं नो॑ मि॒त्रावरु॑णाव॒श्विना॒ शम्। शं नः॑ सु॒कृतां॑ सुकृ॒तानि॑ सन्तु॒ शं न॑ इषि॒रो अ॒भिवा॑तु॒ वातः॑ ॥ ४ ॥

शं नो॒ द्यावा॑पृथि॒वी पू॒र्वहू॑तौ॒ शम॒न्तरि॑क्षं दृ॒शये॑ नो अस्तु। शं न॒ ओष॑धीर्व॒निनो॑ भवन्तु॒ शं नो॒ रज॑स॒स्पति॑रस्तु जि॒ष्णुः ॥ ५ ॥

शं न इन्द्रो वसुभिर्देवो अस्तु शमादित्येभिर्वरुणः सुशंसः। शं नो रुद्रो रुद्रेभिर्जलाषः शं नस्त्वष्टा ग्नाभिरिह शृणोतु ॥ ६ ॥

शं नः सोमो भवतु ब्रह्म शं नः शं नो ग्रावाणः शमु सन्तु यज्ञाः। शं नः स्वरूणां मितयो भवन्तु शं नः प्रस्वः शम्वस्तु वेदिः ॥ ७ ॥

शं नः सूर्य उरुचक्षा उदेतु शं नश्चतस्रः प्रदिशो भवन्तु। शं नः पर्वता ध्रुवयो भवन्तु शं नः सिन्धवः शमु सन्त्वापः ॥ ८ ॥

शं नो अदितिर्भवतु व्रतेभिः शं नो भवन्तु मरुतः स्वर्काः। शं नो विष्णुः शमु पूषा नो अस्तु शं नो भवित्रं शम्वस्तु वायुः ॥ ९ ॥

शं नो देवः सविता त्रायमाणः शं नो भवन्तूषसो विभातीः। शं नः पर्जन्यो भवतु प्रजाभ्यः शं नः क्षेत्रस्य पतिरस्तु शम्भुः ॥ १० ॥

शं नो देवा विश्वदेवा भवन्तु शं सरस्वती सह धीभिरस्तु। शमभिषाचः शमु रातिषाचः शं नो दिव्याः पार्थिवाः शं नो अप्याः ॥ ११ ॥

शं नः सत्यस्य पतयो भवन्तु शं नो अर्वन्तः शमु सन्तु गावः। शं न ऋभवः सुकृतः सुहस्ताः शं नो भवन्तु पितरो हवेषु ॥ १२ ॥

शं नो अज एकपाद्देवो अस्तु शं नोऽहिर्बुध्न्यः शं समुद्रः। शं नो अपां नपात्पेरुरस्तु शं नः पृश्निर्भवतु देवगोपाः ॥ १३ ॥

आदित्या रुद्रा वसवो जुषन्तेदं ब्रह्म क्रियमाणं नवीयः। शृण्वन्तु नो दिव्याः पार्थिवासो गोजाता उत ये यज्ञियासः ॥ १४ ॥

ये देवानां यज्ञिया यज्ञियानां मनोर्यजत्रा अमृता ऋतज्ञाः। ते नो रासन्तामुरुगायमद्य यूयं पात स्वस्तिभिः सदा नः ॥ १५ ॥ ऋ. ७. ३५.

"इन्द्र व अग्नि आमचें रक्षण करून आमचें कल्याण करोत. हविर्भाग प्राप्त झालेले इन्द्र व वरुण आमचें कल्याण करोत, इन्द्र व सोम आमचें कल्याण करोत. इन्द्र व पूषन् हे युद्धाच्या ठिकाणीं लाभ देऊन आमचें कल्याण करोत. भग आमचें कल्याण करो, आमचीं स्तोत्रें आमचें कल्याण करोत. पुरंधि (मोठी बुद्धि) आमचें कल्याण करो. रै (धन) आमचें कल्याण करो...धाता आमचें०, धर्ता आमचें०, विस्तीर्ण पृथ्वी अन्नादिकांनीं आमचें०...विस्तृत-द्यावापृथिवी आमचें० अद्रि आमचें० व आमच्या या देवांनां केलेल्या प्रार्थना आमचें कल्याण करोत......ज्योतिर्मुख अग्नि आमचें०, मित्रावरुण आमचें०, अश्विनौ आमचें०, सदाचरणी लोकांचीं सुकृतें आमचें कल्याण करोत, वाहणारा वायु आमचें कल्याण करो–" अशी ही लांबण सूक्ताच्या १५ ऋचांपर्यंत लागली आहे.

**आप्रीसूक्तें.**–"आप्रीसूक्तें" म्हणून जीं सूक्तें आहेत तींहि या यज्ञमंत्रांच्या वर्गांतलींच होत. यज्ञाशीं ज्यांचा संबंध पोंचतो असल्या गोष्टींचीं मानलेलीं मूर्तस्वरूपें, राक्षस, कांहीं कांहीं देवता, इत्यादिकांनां प्रसन्न करून घेण्यासाठीं या सूक्तांचा विनियोग आहे. सबंध ऋग्वेद संहितेंत हीं आप्रीसूक्तें दहा आढळतात. पशुयज्ञाच्या वेळीं यांचा एक विशिष्ट प्रकारचा ठराविक उपयोग आहे. या सूक्तांत अकरापासून बारा ऋचा असून निरनिराळ्या संज्ञांनीं अग्नीचें यांत स्तवन केलेलें आहे व त्यानें देवांनां यज्ञासाठीं घेऊन यावें म्हणून त्याची प्रार्थना केलेली आहे. प्रत्येक सूक्ताच्या चौथ्या किंवा पांचव्या ऋचेंत ऋत्विजांनां दर्भ मांडण्यासाठीं आवाहन असतें. हे दर्भ म्हणजे देवांनां यज्ञाच्या वेळीं वसण्यासाठीं मांडलेलीं आसनें होत. या आसनांवर वसून त्यांनीं हविर्भाग ध्यावयाचा असतो. या सूक्तांत कांहीं कांहीं स्त्रीदेवतांचीहि स्तुति केलेली आढळते, व सामान्यतः या सूक्तांच्या उपान्त्य ऋचांत यज्ञपशु बांधून ठेवण्याच्या स्तंभाची स्तुति आढळून येते. जसें: "हे दैवी वृक्षा, हें यज्ञिय अन्न देवांप्रत पोंचू दे."

सोमयागांत ज्यांचा विनियोग होतो अशीं व सोमदेवतेला उद्देशून लिहिलेलीं नवव्या मंडळांतील सर्व सूक्तें सर्वस्वीं यज्ञिय सूक्तें होत. सोमवल्ली ठेंचून पिळणें, तिचा रस दुधाशीं किंवा दह्याशीं मिसळणें (गवाशिरं दध्याशिरं) व तो गाळून भांड्यांतून ओतणें वगैरे क्रियांचें पुनःपुनरुक्तिपूर्ण कंटाळवाणें वर्णन यांत आढळतें. इंद्राला सोमपान करण्यासाठीं पुनःपुनः आमंत्रण दिलें आहे. इंद्र व सोम या दोघांची एके ठिकाणीं स्तुति केलेली आहे. धनधान्यसंपत्ति देण्यावद्दल व पाऊस पडावा म्हणून यांची एकत्र प्रार्थना केलेली आहे. गाळणींतून पडणाऱ्या सोमरसाला अंतरिक्षांतून पडणाऱ्या पावसाचा दृष्टान्त देत. या कंटाळवाण्या व येथून तेथून एकाच प्रकारच्या वर्णनांनीं भरलेल्या सूक्तांत मधूनमधून एखादें सुंदर सूक्त आढळतें. उदाहरणार्थ, सोमास उद्देशून म्हटलेली खालील ऋचा.

पुनानो रूपे अव्यये विश्वा अर्षन्नभिश्रियः।
शूरो न गोषु तिष्ठति ॥ ऋ. ९.१६.६.

(हा सोम लोंकरीच्या वस्त्रांतून स्वच्छ होऊन खालीं गळणारा व नाना प्रकारच्या प्रभांनीं युक्त असा रणक्षेत्राच्या ठिकाणीं गाईजवळ उभ्या रहाणाऱ्या शूराप्रमाणें पात्राचे ठिकाणीं स्थित होतो.)

**संस्कारसूक्तें.**—विधिसंस्काराकरितां म्हणून रचिलेलीं सूक्तें सुद्धां वरींच काव्यमय असूं शकतात हें दहाव्या मंडळांतील एका और्ध्वदेहिक क्रियेच्या सूक्तावरून स्पष्ट होतें. प्राचीन हिंदुस्थानांत प्रेतें सामान्यतः जाळण्यांत येत. परंतु याच्याहि पूर्वी

प्रेतें पुरण्याची पद्धति इतर इंडोजर्मानिक लोकांच्या प्रमाणेंच हिंदू लोकांत चालू होती असें दिसतें. खालीं दिलेल्या ऋचांमध्यें पुरण्याचा उल्लेख आहेः—

उप॑ सर्प मा॒तरं॒ भूमि॑मे॒तामु॑रु॒व्यच॑सं पृथि॒वीं सु॒शेवा॑म् । ऊर्ण॑म्रदा युव॒तिर्दक्षि॑णावत ए॒षा त्वा॑ पातु॒ निर्ऋ॑तेरु॒पस्था॑त् ॥ १० ॥

उच्छ्व॑ञ्चस्व पृथिवि॒ मा नि बा॑धथाः सूपाय॒नास्मै॑ भव सूपवञ्च॒ना । मा॒ता पु॒त्रं यथा॑ सि॒चाभ्ये॑नं भूम ऊर्णुहि ॥ ११ ॥

उ॒च्छ्वञ्च॑माना पृथि॒वी सु ति॑ष्ठतु स॒हस्रं॒ मित॒ उप॒ हि श्रय॑न्ताम् । ते गृ॒हासो॑ घृत॒श्चुतो॑ भवन्तु वि॒श्वाहा॑स्मै शर॒णाः स॒न्त्वत्र॑ ॥ १२ ॥

उत्ते॑ स्तभ्नामि पृथि॒वीं त्वत्परी॒मं लो॒गं नि॒दध॒न्मो अ॒हं रि॑षम् । ए॒तां स्थूणां॑ पि॒तरो॑ धारयन्तु॒ तेऽत्रा॑ य॒मः साद॑ना ते मिनोतु ॥ १३ ॥ ऋ. १०. १८,१०–१३.

या विस्तीर्ण व सर्वांस सुख देणाऱ्या भूमातेच्या सन्निध तूं जा. दक्षिणावत पुरुषाला ऊर्णवस्त्राप्रमाणें मृदु असणारी ही युवति ( भूमि ) मृत्युदेवतेपासून तुझें रक्षण करो. १०

हे पृथिवि, याला तूं वर कर ( खालीं जाऊं देऊं नको ), याला बाधा करूं नको, याचें चांगलें स्वागत करून याच्याशीं चांगलें भाषण कर. माता ज्याप्रमाणें बालकाला वस्त्रानें आच्छादिते, तद्वत् तूं याला आच्छादन घाल. ११.

याला आच्छादन करून वर राहणारी पृथिवी सुप्रतिष्ठित होवो, व हजारों ( धुळीचे कण ) याच्या सभोंवार असोत आणि हे याला गृहाचे ठिकाणीं होऊन घृत देणारे होवोत व नित्य याचें रक्षण करोत. १२.

तुझ्यावर मी माती टाकतों, तुझ्यावर चोंहोंकडे ( सर्वबाजूंनां ) हें मातीचें ढेंकूळ ठेवतों. मजकडून तुला त्रास न होईल अशा रीतीनें ( तें मी ठेवतों ). या ढेंकळास पितर धारण करोत ( स्थिर करोत ). या ठिकाणीं यम तुजकरितां सदनें निर्माण करो. १३

ओल्डनबर्गच्या मताप्रमाणें* या ऋचा प्रेतदहनविधीसंबंधींहि असूं शकतील. प्राचीन हिंदुस्थानांतील धर्मविधींच्या माहितीवरून असें दिसतें कीं, प्रेतें जाळल्यानंतर त्यांच्या अस्थी गोळा करून त्या एका पात्रांत घालून तें पात्र जमिनींत पुरीत. या विधीला अनुलक्षून ह्या ऋचा म्हटल्या जात असण्याचा संभव आहे. परंतु विंटरनिट्झच्या† मतें हें फारसें संभवनीय नाहीं.

ऋचेमधील "उच्छ्वञ्चस्व पृथिवि मा निबाधथाः" इत्यादि शब्द पाहिले म्हणजे प्रत्यक्ष प्रेत पुरून त्याच्यावर समाधि रचण्याच्या प्रचारालाच ते जास्त धरून आहेत असें विंटरनिट्झला वाटतें. अस्थी पुरण्याची चाल ही प्रेतें पुरण्याच्या चालीचा अवशेष असावा व या जुन्या चालीचा उल्लेख प्रस्तुत सूक्तांत आहे* असें विंटरनिट्झचें मत आहे.

उलटपक्षीं, ऋ. १०.१६,१–६ याचा विनियोग दहनप्रसंगीं करण्याचा आहे हें स्पष्ट आहे. हें सूक्त बहुधा उत्तरकालीन असावें. चिता रचून वर प्रेत ठेविलें व त्यास अग्नि दिला आणि अग्नीच्या ज्वाला निघाल्या म्हणजे उपाध्याय खालील मंत्र म्हणतो.

मैन॑मग्ने॒ वि द॑हो॒ माभि शो॑चो॒ मास्य॒ त्वचं॑ चिक्षिपो॒ मा शरी॑रम् । य॒दा शृ॒तं कृ॒णवो॑ जातवे॒दोऽथे॑मेनं॒ प्र हि॑णुतात्पि॒तृभ्यः॑ ॥ १ ॥

शृ॒तं य॒दा कर॑सि जातवे॒दोऽथे॑मेनं॒ परि॑ दत्तात्पि॒तृभ्यः॑ । य॒दा गच्छा॒त्यसु॑नीतिमे॒तामथा॑ दे॒वानां॑ वश॒नीर्भ॑वाति ॥ २ ॥

सूर्यं॒ चक्षु॑र्गच्छतु॒ वात॑मा॒त्मा द्यां च॑ गच्छ पृथि॒वीं च॒ धर्म॑णा । अ॒पो वा॑ गच्छ॒ यदि॒ तत्र॑ ते हि॒तमोष॑धीषु॒ प्रति॑ तिष्ठा॒ शरी॑रैः ॥ ३ ॥

अ॒जो भा॒गस्तप॑सा॒ तं त॑पस्व॒ तं ते॑ शो॒चिस्त॑पतु॒ तं ते॑ अ॒र्चिः । यास्ते॑ शि॒वास्त॒न्वो॑ जातवेद॒स्ताभि॑र्वहैनं सु॒कृता॑मु लो॒कम् ॥ ४ ॥ ऋ. १०. १६, १–४.

हे अग्ने, या प्रेताला फार दाह करूं नको, याला कोणीकडूनहि शोक उत्पन्न करूं नको, याची त्वचा किंवा शरीर इकडे तिकडे फेंकूं नको; हे अग्ने, याला पूर्ण दहन केलेंस म्हणजे पितरांकडे पाठवून दे. १

हे जातवेद, याचें शरीर नीट दग्ध केल्यावर याला पितरांपाशीं नेऊन दे. जेव्हां या प्रेतपुरुषाचे प्राण याप्रमाणें नेले जातील तेव्हां हा देववश होईल. २

याचें चक्षुरिंद्रिय सूर्याप्रत जावो, आत्मा वायूप्रत जावो. धर्मानें तूं द्यौ अथवा पृथिवी या ठिकाणीं जा. आणि जर अपोलोकांत जाण्यांत तुझें हित असेल तर तूं तेथें जा, आणि शरीरावयवांनीं तूं या ओषधींमध्यें रहा.† ३.

हे जातवेदा, याचा जो भाग अज ( जननरहित ) आहे त्याला तूं तपोज्वालांनीं तप्त कर, तसेंच तुझ्या शोचिज्वाला

---

* Religion des Veda. p. 571. † १३ व्या ऋचेवरील सायणभाष्य पहातां विंटरनिट्झचें हें विधान आक्षेपार्ह आहे असें वाटतें—संपादक.

* प्रेतें जाळण्याची चाल सर्व रूढ झाल्यानंतर सुद्धां मुलें व संन्यासी यांचीं प्रेतें पुरीत हें स्पष्ट आहे. वरच्या सूक्तांत उद्दिष्ट प्रेत संन्याशाचें किंवा मुलाचें तें स्पष्ट केलेलें नाहीं.–विंटरनिट्झ.

† सायणभाष्याप्रमाणें—हित=स्थापित. जर तुझें कर्मफल अपोलोकांच्या ( अंतरिक्षाच्या ) ठिकाणीं स्थापित होऊन शरीरावयवांनीं प्रतिष्ठित असेल तर तूं अंतरिक्षांत जा.

व अर्चिर्ज्वाला याला तप्त करोत. तुझ्या ज्या सुखद तनू त्यांनीं तूं याला सुकृती जनांच्या लोकाप्रत घेऊन जा. ४

या सूक्तांत मृत्यूनंतर माणसाचें काय होतें, जीवात्म्याची कर्मगति कशी असते, यासंबंधानें तात्त्विक विचार आलेले आहेत व यांतूनच अग्नि व पितृदेवता यांच्याबद्दल पुराण-कथांचा उपक्रम झालेला दिसतो. अशा तऱ्हेच्या तात्त्विक विचारांच्या छटा केवळ मधून मधून दृष्टीस पडतात असें नाहीं, तर ऋक्संहितेंत अशीं जवळजवळ १२ सूक्तें आहेत कीं, ज्यांना आध्यात्मिक सूक्तें हें नांव आपणांस देतां येईल.

**आध्यात्मिक सूक्तें.**—या सूक्तांत विश्व व विश्वोत्पत्ति यांसंबंधाचे विचार तर आहेतच पण याशिवाय सर्व विश्वांत एकच आत्मा भरून राहिलेला आहे ही अद्वैतवाद्यांची कल्पना प्रथमच या सूक्तांत आढळून येते. तेव्हांपासून आजपर्यंत या कल्पनेचा पगडा आज जवळजवळ सर्व हिंदी तात्त्विक विचारांवर बसला आहे.

हिंदी लोकांत परमेश्वराच्या शक्तिमत्त्वाविषयीं, किंबहुना त्याच्या अस्तित्वाविषयीं देखील साशंकपणा फार प्राचीनकालीं उत्पन्न झाला होता. ऋ. २·१२. हें सूक्त मागें दिलेलेंच आहे. त्यांतील ऋचांत इन्द्राच्या शक्तिमत्त्वाबद्दल व पराक्रमाबद्दल त्याची स्तुति गायिली आहे. या सूक्ताच्या प्रत्येक ऋचेच्या शेवटीं 'स जनास इंद्रः' असें ध्रुपद आहे. असल्या या सूक्तांत-देखील 'इन्द्र कोण' 'इन्द्र अस्तित्वांतच नाहीं' असें म्हणणारे लोक असल्याचा उल्लेख आहे. अशाच तऱ्हेच्या आशंका पुढील सूक्तांत आढळतात.

**प्रसुस्तोमं भरत वाजयन्त इन्द्राय सत्यं यदि सत्यमस्ति। नेन्द्रो अस्तीति नेमं उत्व आह क ईं ददर्श कमभिष्टवाम ॥ ३ ॥**

**अयमस्मि जरितः पश्यमेह विश्वा जातान्यभ्यस्मि मह्ना। ऋतस्य मा प्रदिशो वर्धयन्त्यादर्दिरो भुवना दर्दरीमि ॥ ४ ॥**

ऋ. ८. ८९.

हे युद्धेच्छू लोकहो, इन्द्राची सत्य व प्रभूत स्तुति करा, मात्र खरोखरी तो असेल तर. नेम म्हणाला, "इन्द्र म्हणून कोणी नाहीं, (कारण) याला कोणी पाहिलें आहे? आम्ही कोणाची स्तुति करीत आहों." ३.

(इन्द्र म्हणतो), "हे स्तुतिगायका, हा मी येथें आहें पहा. सर्व सृष्ट पदार्थ मी माझ्या महत्त्वानें व्यापून टाकतों. सत्याचे जाणते माझीं स्तोत्रें गातात. मी आदरणशील* असून भुवनांचें पुनःपुनः विदारण करितों. ४.

येथें ऋत्विजलोक इन्द्राची स्तुति करीत आहेत.

परंतु, अशा तऱ्हेनें सर्वांत श्रेष्ठ देवता जी इन्द्र तिच्याबद्दलच असल्या शंका उपस्थित होऊं लागल्यानंतर, देवतांच्या अनेकत्वाबद्दल लोकांचीं मनें अधिकच साशंक होऊं लागलीं व यज्ञ करण्यामध्यें कांहीं अर्थ आहे कीं नाहीं असले प्रश्न येऊं लागले. ऋ. मं. १० सू. १२१ या सूक्तांत प्रजापतीची जगाचा उत्पत्तिकर्ता व स्थितिकर्ता असा एकच खरा देव म्हणून स्तुति केली आहे. या सूक्ताचें ध्रुपद "कस्मै देवाय हविषा विधेम" असें आहे. यांत अर्थातच 'देव अनेक आहेत' या कल्पनेंत कांहीं अर्थ नाहीं असा ध्वन्यर्थ असून एकच प्रजापति देव पूज्य आहे असाहि अभिप्राय आहे. या शंकेखोरपणाचा शेवटीं कळस होऊन ऋ. १०. १२९ मधले विचार जन्मास आले. या सूक्ताच्या आरंभीं विश्वोत्पत्तीपूर्वीच्या काळाचें वर्णन आहे.

**नासदासीन्नो सदासीत्तदानीं नासीद्रजो नो व्योमापरो यत्। किमावरीवः कुहकस्य शर्मन्नम्भः किमासीद्गहनं गभीरम् ॥ १ ॥**

**न मृत्युरासीदमृतं न तर्हि न रात्र्या अह्न आसीत्प्रकेतः। आनीदवातं स्वधया तदेकं तस्माद्धान्यन्न परः किंचनास ॥ २ ॥**

ऋ. १०. १२९.

तेव्हां असत् नव्हतें, सत् नव्हतें. तेव्हां रज नव्हतें, व्योम नव्हतें. व्योमाच्या पलीकडचेंहि कांहीं नव्हतें. तेव्हां कशानें कशाचें आवरण करावयाचें आणि तें कोठें करावयाचें व कोणाच्या कल्याणाकरितां (शर्म)? तेव्हां गहन व गभीर असें जलहि कोठें होतें? १.

तेव्हां मृत्यु नव्हता व अमृतहि (अमरत्व) नव्हतें. रात्री आणि दिवस यांचें ज्ञान नव्हतें. तें (ब्रह्म) त्यावेळीं स्वधेशीं (मायेशीं) एकरूप असें वात नसतांहि वर्तत होतें. त्याहून दुसरें पर असें कांहींहि नव्हतें. २.

विश्वोत्पत्तीबद्दल सूक्तकर्त्या ऋषीनें आपलें मत अगदीं भीत भीत व्यक्त केलेलें आहे. 'अंधकारानें व्यापलेला अंधकार' अशी विश्वोत्पत्तीपूर्वीच्या काळाबद्दल कवीनें कल्पना वसविली आहे. चोहोंकडे अफाट अमर्याद असें पाणी व त्यांतून तपःसामर्थ्यानें एक 'एकच चित्तत्त्व' उत्पन्न झालें. याचें मानसिक प्रथम फल म्हणजे काम. मूलतत्त्व अगोदरच चेतन होतें. आपल्या अंतःकरणांत नीट विचार करून, शेवटीं 'नास्ति' व 'अस्ति' यांचा संबंध, किंवा उत्पन्न व अनुत्पन्न वस्तूंचा संबंध, या कामाशीं जोडला आहे. पण, कवीनें या गोष्टी अगदीं पुसट पुसट रीतीनें दाखविल्या असून त्याच्या शंका मधून मधून वळावतात व तो शेवटीं खालीलप्रमाणें उत्कंठापूर्वक प्रश्न करितोः—

**को अद्धा वेद क इह प्रवोचत्कुत आजाता कुत इयं विसृष्टिः। अर्वाग्देवा अस्य विसर्जनेनाथाको वेद यत आबभूव ॥ ६ ॥**

* आदर्दिरः=आदरणशील–सायणाचार्य. विदारणशील?

इयं विसृष्टिर्यत आबभूव यदि वा दधे यदि वा न।
यो अस्याध्यक्षः परमे व्योमन्त्सो अङ्ग वेद यदि वा न वेद ॥ ७ ॥ ऋ. १०. १२९.

ही विविध सृष्टि कोठून कशी झाली हें कोण परमार्थतः जाणतो? कोण येथें या गोष्टीचें प्रवचन करूं शकेल? देव हे या विसृष्टीहून अर्वाचीन आहेत? म्हणून ही विसृष्टि जेथून झाली तें कोण जाणतो. ६.

ही विसृष्टि जेथून झाली तें, हिला (कोणी) धारण* करतो किंवा नाहीं तें, इचा परम व्योमाचे† ठिकाणीं असणारा जो अध्यक्ष तो 'एक' जाणीत असेल वा नसेल. ७.

कोठें प्रजापति तर कोठें ब्रह्मणस्पति, कोठें बृहस्पति तर कोठें विश्वकर्मा, अशा तऱ्हेच्या नांवांखालीं कां होईना पण विश्वकर्त्याची कल्पना ऋग्वेदांतील बहुतेक तात्त्विक सूक्तांत आढळते. तरी पण अजून याचें सगुणत्व सुटत नाहीं. या वर उद्धृत केलेल्या शेवटच्या ऋचेंत मात्र परमेश्वरानें उत्पत्ति केली कीं दुसऱ्या कांहीं कारणांनीं ती झाली अशाबद्दल संशय दर्शविला आहे. उत्पादक तत्त्वाला अद्याप या सूक्तांत नांव असें दिलेलें नाहीं त्याला "एक" असें म्हटलें आहे. तेव्हां सृष्टींत आपणांस जें जें दिसतें व भासतें, ज्यांनां आपण निरनिराळे देव समजतों ते सर्व देव, त्या सर्व कल्पना एकाच एकजिनसी तत्त्वाच्या विकृती होत. भासमान होणारें नानात्व सर्व मिथ्या आहे. या कल्पना वैदिक सूक्तांतच प्रादुर्भूत होऊं लागल्या होत्या हें उघड आहे. या कल्पनांचा स्पष्ट व स्वच्छ उल्लेख ऋ. १·१६४,४६ यांत आढळतो.

इंद्रं मित्रं वरुणमग्निमाहुरथो दिव्यः स सुपर्णो गरुत्मान्।
एकं सद्विप्रा बहुधा वदन्त्यग्निं यमं मातरिश्वानमाहुः॥
ऋ. १. १६४,४६.

याला इन्द्र, वरुण, मित्र, अग्नि, म्हणतात. आणि हाच (सुपक्ष) सुपतन‡ असा दिव्य गरुत्मान् (पक्षि) आहे असें म्हणतात. हा एकच असून याला विप्र (ज्ञाते) अग्नि, यम, मातरिश्वा अशीं नाना प्रकारचीं नांवें देतात. ४६.

**आख्यानसूक्तें.**—वरील प्रकारें औपनिषद तत्त्वज्ञानाचा पाया घालणारीं तात्त्विक सूक्तें ज्याप्रमाणें ऋग्वेदांत आढळतात, त्याचप्रमाणें आर्षकाव्यांचा पाया घालणारीं सूक्तेंहि या संहितेंत आहेत. हीं सूक्तें सुमारें वीस आहेत. निरनिराळ्या अतिप्राचीन कथांचे हे संवादात्मक अवशिष्ट भाग आहेत. अशा तऱ्हेच्या सूक्तांचा विशेष अभ्यास ओल्डनबर्ग यानें प्रथमतः केला व या सूक्तांनां त्यानें आख्यानसूक्तें असें नांव दिलें. सांप्रत हेंच नांव या सूक्तांनां रूढ झालें आहे. ओल्डनबर्ग यानें असें सिद्ध केलें आहे कीं, आर्षकाव्यांचें मूळस्वरूप गद्यपद्यमिश्रित असें होतें. कथानकांतील पात्रांचीं भाषणें तेवढीं पद्यांत व कवीनें आपण सांगितलेले इतर प्रसंग गद्यांत असा यांचा प्रकार असे. परंतु प्रथम प्रथम यांपैकीं पद्यभाग तेवढा पाठ केला जाई व गद्यभाग म्हणणाराच्या इच्छेप्रमाणें निरनिराळ्या शब्दांत सांगितला जात असे. ऋग्वेदाच्या आख्यानसूक्तांत मूळांतला संवादात्मक पद्यभाग तेवढा सांपडतो व कथानकांचा गद्यभाग कालवश झाला आहे. मात्र ब्राह्मणग्रंथ व पुढील काळांतील आख्यानकाव्यें यांच्या साहाय्यानें कांहीं कथानकें निदान अंशतः तरी बसवितां येतात. या कामीं कित्येक ठिकाणीं टीकांचाहि उपयोग होतो.

उदाहरणार्थ ऋ. मं. १० सू. ९५ या अठरा ऋचांच्या सूक्तांत पुरूरवा व उर्वशी यांचा संवाद आहे. पुरूरवा हा एक मर्त्य माणूस व उर्वशी ही एक अप्सरा होती. हीं दोघें चार वर्षेंपर्यंत एकत्र राहिलीं असतां उर्वशीच्या पोटीं गर्भ राहिला. नंतर ती अप्सरा उषेच्या प्रथम प्रकाशाप्रमाणें एकाएकीं नाहींशी झाली. पुरूरवा तिच्या शोधार्थ गेला. त्याला उर्वशी जलदेवतांबरोबर एका तळ्यावर क्रीडा करितांना आढळली. पुष्कळ अंशीं दुर्बोध झालेल्या ऋचांमधून राजा पुरूरवा व तळ्यांत सखींच्याबरोबर खेळणारी उर्वशी यांच्या संवादावरून एवढीच माहिती आपणांस काढतां येते.

सुदैवानें मर्त्य राजा पुरूरवा व अप्सरा उर्वशी यांच्या प्रेमसंबंधाची ही कथा पुढील वाङ्मयांत आपल्याला आढळते, व अशा तऱ्हेनें ऋग्वेदांतील या काव्याचें कथासूत्र साधारणतः पूर्ण करितां येतें. शतपथ ब्राह्मणांत पुरूरवा व उर्वशी यांची कथा आहे.* त्यांतील कथानकांत ऋग्वेदांतील ऋचा गोंवून दिल्या आहेत. या ब्राह्मणांत असें सांगितलें आहे कीं, पुरूरव्याशीं लग्न करावयास तयार होतांना उर्वशीनें तीन अटी घातल्या होत्या, त्यांत राजाला नग्न पहाणार नाहीं अशी एक अट होती. गंधर्व लोकांनां उर्वशी परत मिळावी अशी इच्छा होती, म्हणून रात्रीच्या वेळीं उर्वशीच्या परम प्रीतींतले व तिच्या पलंगास बांधून ठेवलेले असे दोन लहान मेंढे त्यांनीं चोरून नेले. तेव्हां, "जवळपास कोणी पुरुष नसल्याप्रमाणें माझे मेंढे चोरीस कसे गेले" असा उर्वशी आक्रोश करूं लागली. तेव्हां राजा पुरूरवा वस्त्र वगैरे सांवरण्याच्या भानगडींत न पडतां, तसाच नग्न स्थितींत लगबगीनें उठला व चोरांनां धरण्यासाठीं धांवला. अशा ऐन वेळेस गंधर्वांनीं विजेचा प्रकाश पाडला व त्यामुळें राजा नग्न स्थितींत उर्वशीच्या दृष्टीस पडला. तेव्हां उर्वशी नाहींशी झाली. पुरूरवा परत येऊन पहातो तों अर्थात् उर्वशी तेथें नव्हती. तेव्हां दुःखानें वेडा होऊन भटकत भटकत पुरूरवा राजा एका तळ्यापाशीं आला. त्या ठिकाणीं हंसीच्या

* दधे–धारणकरतो–सायण. निर्माण करतो, Paul Dussen.
† व्योम=आकाश, स्वप्रकाश, निरतिशयानन्दस्वरूप, इ०
‡ सुपतन=चांगला उडणारा.

* श. प. ब्रा. ११·५,१.

रूपानें तळ्यामध्यें पोहणाऱ्या अप्सरा त्याचे दृष्टीस पडल्या. या ठिकाणीं जो संवाद झाला तो ऋग्वेदांत आढळतो* व हाच संवाद थोडी फार भर घालून ब्राह्मणांत आलेला आहे. पुरूरव्याच्या सर्व विनवण्या व्यर्थ होऊन गेल्या. शेवटीं तो ज्या वेळेस आत्महत्या करण्याला प्रवृत्त झाला व स्वतःला हिंस्र पशूंकडून खाववून घेण्यास तयार झाला, तेव्हां उर्वशीनें त्याला उत्तर केलें तें असें:—

**पुरू॑रवो॒ मा मृ॑था॒ मा प्र प॑प्तो॒ मा त्वा॒ वृका॑सो॒ अशि॑वास उक्षन् । न वै स्त्रैणा॑नि स॒ख्यानि॑ सन्ति सालावृ॒काणां॒ हृद॑यान्ये॒ता ॥ १५ ॥** ऋ. १०. ९५.

* सदरहू सूक्तांतील पुरूरवा व उर्वशी यांचा संवाद पुढील-प्रमाणें आहे:—

**पुरूरवा**—"हे प्रिये कठोरहृदये, थोडा वेळ थांब. आपण परस्पर कांहीं गोष्टी बोलूं. कारण अशा प्रकारच्या गोष्टी आपल्या गत आयुष्यकालांत आपण कधींच न बोलल्यामुळें, शेवटपर्यंत आपणांस सुखप्राप्ति झाली नाहीं." ( १ )

**उर्वशी**—"असल्या शुष्क संभाषणांत कसलें सुख मिळणार आहे? मी तुझ्यापासून उषेप्रमाणें पळालें. तरी, हे पुरूरवस्, तूं आपल्या गृहाप्रत गमन कर. मी वायूप्रमाणें दुष्प्राप्यच आहें असें समज." ( २ )

**पुरूरवा**—"उर्वशी, तुझ्या विरहानें जड झालेल्या मला मी बलवान असतांहि, शत्रूचा पराभव करवत नाहीं व शत्रूंची संपत्ति हरण करतां येत नाहीं. त्याचप्रमाणें एकंदर राज्य-कारभारामध्येंहि चित्त रमत नाहीं; व रणांगणामध्यें मी मनानें किंकर्तव्यमूढ होऊन गेल्यामुळें, माझ्या सैनिकांनांहि भीति वाटून ते सिंहनाद करीत नाहींत. ( ३ )

**उर्वशीचे पूर्व गोष्टींच्या स्मरणानें निघालेले उद्गार.**—"हे उषोदेवि, श्वशुरास वसु व वय देऊन जेव्हां मला पतिविषयक इच्छा होई तेव्हां मी श्वशुरगृहांतून पतीच्या खोलींत जात असें. तेथें रात्रंदिवस पतीबरोबर क्रीडा करीत असें. ( ४ )

**पुरूरव्यास उद्देशून**—"हे राजा, प्रत्यहीं तूं माझा तीनदां उपभोग घेत असस. इतर स्त्रियांस सोडून, माझी मनःकामना तुझ्याकडून अगोदर पूर्ण होईल, या आशेनें मी तुजकडे आलें. हे राजन्, त्या वेळीं तूं माझ्या शरीराचा स्वामी होतास. ( ५ )

ती ( उर्वशी ) सुजूर्णि, श्रेणि, सुम्नआपि व ह्रदेचक्षु या चार सख्यांसह एकमेकांस मिठ्या मारून निघून गेली. ( परंतु परत जातांना ), त्या अरुणवर्णांकित अप्सरा नवप्रसूत गाई ज्याप्रमाणें शब्द करीत जातात त्याप्रमाणें शब्द करीत नव्हत्या. ( ६ )

**उर्वशी**—हे पुरूरवस्, तुझा जन्म झाल्याबरोबर देवपत्न्या तुजभोंवतीं एकत्र जमल्या. देवांनीं मोठ्या संग्रामाकरितां व दस्यूंनां मारण्याकरितां तुझ्या सामर्थ्याची वाढ केली. त्याचप्रमाणें वाहणाऱ्या नद्यांनीं स्वतः तुझें संगोपन केलें. ( ७ )

हा पुरूरवस् देवतारूप अप्सरांच्या पुढें जेव्हां मनुष्यरूपानें जात असे, त्यावेळीं कामेच्छा उत्पन्न झालेली मृगी ज्याप्रमाणें ( व्याधापासून ) दूर पळते, किंवा रथास जोडलेले घोडे ज्याप्रमाणें दूर पळतात, त्याप्रमाणें त्या भयभीत होऊन त्याजपासून दूर जात. ( ८ )

मानवदेहधारी पुरूरवस् ज्या वेळीं अप्सरांशीं कामचेष्टा करावयास जात असे, त्या वेळीं ज्याप्रमाणें क्रीडा करणारे घोडे किंवा साप, मनुष्यास आपलें स्वरूप स्पष्ट दिसूं देत नाहींत, त्याप्रमाणें ह्या अप्सरा आपलें स्वरूप दिसूं देत नसत. ( ९ )

**पुरूरवा**—जी उर्वशी विजेप्रमाणें प्रकाशते व मला प्रिय असे स्वर्गीय भोग संपादन करते, त्या उर्वशीपासून जेव्हां मला सुलक्षणी पुत्र होईल तेव्हां माझें आयुष्य वृद्धिंगत होईल. ( १० )

**उर्वशी**—हे पुरूरवस्, तूं पृथ्वीचें पालन करण्याकरितां जन्मला आहेस व तूं माझ्या ठिकाणीं ही गर्भस्थापना केली आहेस. त्या वेळीं मी सांगितल्याप्रमाणें न ऐकतां तूं प्रतिज्ञाभंग केलास, अर्थात् आतां शोक करून काय उपयोग? ( ११ )

**पुरूरवा**—प्रिये, तुला केव्हां पुत्र उत्पन्न होईल? तो मला ( केव्हां ) सुखवील व मजजवळ रडून हट्ट घेईल? त्याचप्रमाणें हा पुत्र केव्हां आपला दोघांचा वियोग करील व श्वशुराचें तेज वाढवील? ( १२ )

**उर्वशी**—राजा, तुझा पुत्र रडूं लागतांच काळजीपूर्वक त्याचें संवर्धन करण्याकरितां मी त्याला तुझ्याकडे पाठवून देईन. परंतु तूं आपल्या घरीं निघून जा. हे मूढ, आतां मी तुला प्राप्त होणें शक्य नाहीं. ( १३ )

**पुरूरवा**—उर्वशी, तुझ्याबरोबर क्रीडा करणारा तुझा पति जो मी त्या माझें शरीर येथेंच पतन पावो किंवा देशांतरीं गमन करो, किंवा येथेंच पृथिवीच्या अंकावर शयन करो, अथवा मला या अरण्यांतील हिंस्र लांडगे फाडून खावोत. ( १४ )

**उर्वशी**—हे पुरूरवस्, तूं प्राणत्याग करूं नकोस, येथें उडी टाकूं नकोस. अमंगल लांडगे तुझें शरीर न खावोत. स्त्रियांचें सख्य हें सख्यच नव्हे. तें कोल्ह्याच्या हृदयाप्रमाणें आहे. राजा, मानवरूप घेऊन मीं तुझ्याशीं आपलें देवत्व विसरून विविध प्रकारचीं रूपें धारण करून चार वर्षेपर्यंत रतिसुखाचा उपभोग घेतला. परंतु आतां माझी तेवढ्यानें पूर्ण तृप्ति झाल्यामुळें मी तुझ्यापासून दूर निघून जात आहें. (१५) (१६)

**पुरूरवा**—आपल्या तेजानें अंतरिक्ष भरून टाकणाऱ्या व स्वर्गीय उपभोग देणाऱ्या उर्वशीस मी वश करतों. सुकृती असा हा पुरूरवा तुझी प्रार्थना करतो कीं परत फीर. कारण, हें अंतःकरण वियोगानें संतप्त झालें आहे. ( १७ )

**उर्वशी**—राजा, देवांनीं तुला सांगितलें आहे कीं, सांप्रत तूं मृत्यूच्या वश आहेस, करितां देवांकरितां यजन कर व स्वर्ग प्राप्त करून घे; म्हणजे तुला आमच्याबरोबर रममाण होतां येईल. अर्थात् मद्विषयक अभिलाष सोडून देऊन ह्या उपायानें सुखी हो." ( १८ )

ऋ. १०. ९५.

हे पुरूरवस्, तूं प्राणत्याग करूं नकोस, येथें उडी टाकूं नकोस. अमंगल लांडगे तुझें शरीर न खावोत. स्त्रियांचें सख्य हें सख्यच नव्हे, कारण हें सख्य कोल्ह्याच्या हृदयाप्रमाणें आहे.

पुरूरवा राजा व उर्वशी यांचें पुनरपि मीलन झालें कीं नाहीं याचा ऋग्वेद किंवा शतपथ ब्राह्मण यावरून स्पष्ट बोध होत नाहीं. पुरूरवा गंधर्व झाला व गंधर्व लोकांत पुरूरव्याची व उर्वशीची भेट झाली अशी प्राचीन कल्पना असावी असें दिसतें. पुरूरवा व उर्वशी यांची कथा भारतवर्षांत अनेक ठिकाणीं आलेली आहे. कृष्णयजुर्वेदाच्या काठक ब्राह्मणांत या गोष्टीचा थोडासा उल्लेख आहे, अनेक वेदभाष्यांत ही कथा आहे, महाभारताचें खिलपर्व जें हरिवंश त्यांत ही कथा आलेली आहे, विष्णुपुराणांत व कथासरित्सागरांत ही कथा आहे, व कालिदासासारख्या महाकवीनेंहि आपल्या एका चिरस्थायी नाटकांत ही कथा गोंविली आहे. तरीहि ऋग्वेदसूक्तांतील एतद्विषयक ऋचांपैकीं पुष्कळसा भाग दुर्बोधच राहिला आहे. यांतील कथानकाचा तदनंतरच्या निरनिराळ्या कथानकांशीं मेळ वसविण्याचा व त्यावरून या ऋचा सुबोध करण्याचा प्रयत्न होऊनहि फारसा उपयोग झालेला नाहीं. या एका गोष्टीवरूनहि आपणांस सध्यां उपलब्ध असलेल्या वाङ्मयाहून ऋग्वेद किती जुना आहे ही गोष्ट स्पष्ट होते.*

ऋग्वेदकालीं कथा सांगण्याची कला किती वाढली होती याचा आणखी एक महत्त्वाचा नमुना आपणांस ऋग्वेद मं. १० सू. १० यांत यमयमीसंवादांत सांपडतो. या संवादाच्या मुळाशीं मानववंशाच्या उत्पत्तीसंबंधीं कांहीं तरी प्राचीन काल्पनिक कथा असावी.†

मानववंश बुडून लयास जाऊं नये म्हणून 'यमी' आपल्या भावाला समागमास प्रवृत्त करण्याचा प्रयत्न करते. प्रेमरसानें थवथवलेल्या आपल्या मोहक वाणीनें यमीनें यांत भावाला वळविण्याचा प्रयत्न केला आहे. तसेंच यम तिचा धिक्कार करतो त्या वेळीं त्याची वाणीहि पण सौम्य असून निश्चयाची आहे. परमेश्वरानें घालून दिलेल्या सनातन धर्माचें उल्लंघन होऊं नये, यासाठीं एकाच रक्तमांसाच्या स्त्रीपुरुषांनीं विवाहपाशांत बद्ध होणें अनुचित आहे असें यमानें यमीस सांगितलें आहे. या भाषणामध्यें नाट्यमय आवेश आहे परंतु दुर्दैवानें यांतला बराचसा भाग दुर्बोध होऊन बसला आहे. यमी प्रथम म्हणतेः—

ओचित्सखायं सख्या ववृत्यां तिरः पुरू चिदर्णवं जगन्वान् । पितुर्नपातमादधीत वेधा अधिक्षमि प्रतरं दीध्यानः ॥ १ ॥ ऋ १० ·१०

गुप्त व प्रशस्त अशा अर्णव प्रदेशांत जाऊन माझ्या पूज्य सख्याला मी सख्यासाठीं (संभोगसख्यासाठीं) अभिमुख करूं इच्छितें. पृथ्वीवर उत्कृष्टगुण असा (कोणीतरी) व्हावा अशी इच्छा करणारा विधाता तुझा गर्भ (माझे ठिकाणीं) ठेवो १.

यावर यम म्हणतोः—

न ते सखा सख्यं वष्ट्येतत्सलक्ष्मा यद्विषुरूपा भवाति । महस्पुत्रासो असुरस्य वीरा दिवो धर्तार उर्विया परिख्यन् ॥ २ ॥ ऋ. १०. १०.

तुझा सखा सख्य (असल्याप्रकारचें) इच्छीत नाहीं. कारण, जी समानरूप (नात्याची) आहे ती विषमरूप (नात्याची) होईल. महाप्रज्ञावान् असुराचे पुत्र वीर आहेत, द्यावादि लोक धारण करणारे आहेत. ते सर्वतः पहातात. २.

परंतु यमीनें आपलाच हट्ट चालवून पुन्हां म्हटलें कीं, मानववंश कायम रहावयासाठीं तुझा माझा संगम व्हावा अशी देवांचीच इच्छा आहे. यम जसजसा नाहीं नाहीं म्हणे तसतशी यमी अधिक अधिकच उत्कंठित होत जाई.

यमस्य मा यम्यं१काम आगन्त्समाने योनौ सहशेय्याय । जायेव पत्ये तन्वं रिरिच्यां* विचिद्वृहेव रथ्येव चक्रा ॥ ७ ॥ ऋ. १०. १०.

एकाच ठिकाणीं सहशयन करण्याचा यमविषयक काम यमीचे ठिकाणीं आला आहे. † मी माझी तनु पतीपुढें जाया (करते त्या-) प्रमाणें त्वदधीन करतें.‡ रथचक्र (आणि अक्ष) याप्रमाणें एकमेकांस आलिंगन देऊं. ७.

यावर यम म्हणतोः—

न तिष्ठन्ति न निमिषन्त्येते देवानां स्पश इह ये चरन्ति । अन्येन मदाहनो याहि तूयं तेन विवृह रथ्येव चक्रा ॥ ८ ॥ ऋ. १०. १०.

देवांचे हेर जे येथें संचार करितात ते (कोठेंहि) थांबत नाहींत व डोळेझांक करीत नाहींत. हे प्रहार करणारे, तूं त्वरित अन्य पुरुषाकडे जा व त्याशी रथचक्र (आणि अक्ष) याप्रमाणें आलिंगन दे. ८.

* गेल्डनेर 'वेदिक् स्टडीज्' १. २४३-२९५. खेरीज ओल्डनबर्ग Z. D. M. G. ३९. ७२. इत्यादि. 'The Literature of Ancient India, p. 53. etc. † 'यम' शब्दाचा अर्थ जुळा. यमी हें त्याचें स्त्रीलिंगी रूप होय. A. Winter नांवाच्या मनुष्यानें या गोष्टीचें पौराणिक स्पष्टीकरण करण्याचा प्रयत्न केला आहे. याच्या निबंधाचें नांव "My brother wooes me." या निबंधांत लेखकानें ऋ. १०-१० ची तुलना एका लेटिक लौकिक काव्याशीं केली आहेः या काव्यांत एका भावानें आपल्या बहिणीस संभोगास प्रवृत्त करण्याचा यत्न केला आहे.

* विवृहेव=विविध रीतीनें (कामाचा) उद्यम करूं—सायण.
† यमीविषयक काम यमाचे ठिकाणीं उत्पन्न होवो—सायणभाष्य, ऋग्वेद. वर दिलेला अर्थ अथर्ववेदावरील सायणभाष्याप्रमाणें आहे.
‡ रिरिच्याम्=प्रकाशमान करते—सायण.

तथापि यमी अधिकाधिकच बेफाम होऊन तिची यमाला आलिंगन देण्याची इच्छा सारखी वळावत जाते. तरीहि यम वारंवार तिला झिडकारतो. अखेरीस संतापून जाऊन यमी म्हणते कीं,

ब॒तो ब॑तासि यम॒ नैव ते॒ मनो॒ हृद॑यं चाविदाम । अ॒न्या किल॒ त्वां क॒क्ष्ये॑व यु॒क्तं परि॑ष्वजाते॒ लिबु॑जेव वृ॒क्षम् ॥ १३ ॥
ऋ. १०. १०.

हे यमा, तूं अति दुर्बल झाला आहेस. तुझी मला कींव येते. तुझें मन व हृदय ( तुझ्या ताब्यांत ) मुळींच नाहीं.* हें मला कळलें. कक्षारज्जु ( तंग ) ज्याप्रमाणें अश्वाला परिवेष्टन करते किंवा लता ज्याप्रमाणें वृक्षाला परिवेष्टून असते त्याप्रमाणें दुसरी कोणी तरी तुला खात्रीनें परिवेष्टून आहे. १३.

यावर यमाचें उत्तरः—

अ॒न्यमू॒षु त्वं य॑म्य॒न्य उ॒ त्वां परि॑ष्वजाते॒ लिबु॑जेव वृ॒क्षम् । तस्य॑ वा॒ त्वं मन॑ इ॒च्छा स वा॒ तवाधा॑ कृणुष्व सं॒विदं॒ सुभ॑द्राम् ॥ १४ ॥
ऋ. १०. १०.

तर मग तूं दुसऱ्यालाच लता वृक्षाला आलिंगन देते त्याप्रमाणें दृढ आलिंगन दे व तोहि तुला तसेंच आलिंगन देवो. तूं त्याचें मन ओढून घे. तो तुझें घेवो. व नंतर (त्याच्यासह) गोड ( सुखांचा ) अनुभव घे. १४

यमयमीसंवादाचा शेवट काय झाला हें समजत नाहीं. पुढच्या वाङ्मयांतहि यावद्दल माहिती मिळत नाहीं. हें ऋग्वेदांतील सूक्त म्हणजे एक शिरोविहीन धडाप्रमाणें आहे. मात्र वरील उताऱ्यावरून याचें मूळ एक उत्तम काव्य असावें एवढें स्पष्ट होतें.

या आख्यानसूक्तांच्या जोडीला बसविण्यासारखें दुसरें सूक्त म्हणजे ऋ १०·८५ हें सूर्यासूक्त होय. या सूक्तांत सूर्याची कन्या जी सूर्या ( उषेचें एक नांव ) तिचें व सोमदेवतेचें लग्न झाल्याचें वर्णन आहे. हिला अश्विनौ देवांनीं मागणी घातलेली होती. या सूक्ताच्या एकंदर ऋचा ४७ असून त्यांचा परस्परसंबंध जरासा तुटक वाटतो. यांपैकीं बहुतेक ऋचा विवाहविधिविषयक आहेत. घरगुती-संस्कारांचा व आचारांचा ग्रंथ जो 'गृह्यसूत्र' त्यावरून आपणांस असें दिसून येतें कीं, सामान्य माणसाच्या विवाहविधीच्या वेळेसहि यांपैकीं बहुतेकांचा उपयोग केला जात असे. परंतु विंटरनिट्झ असें म्हणतो कीं, और्ध्वदेहिक क्रियेबद्दलच्या सूक्तांप्रमाणेंच, याहि सूक्तांतल्या ऋचा केवळ प्रायोगिक ग्रंथांतून निवडून एकत्र केलेल्या नसाव्या; पण जर कदाचित् तशीच वस्तुस्थिति असेल तर विवाहविधीच्या वेळीं म्हणावे लागणारे मंत्र ख्रिस्ती प्रार्थनापुस्तकाप्रमाणें एका प्रकरणांत ग्रथित केलेले आहेत असें अनुमान करावें लागेल. विंटरनिट्झची अशी समजूत आहे कीं, या सूक्तांत सूर्या देवतेच्या लग्नाची कथा असावी. इतर आख्यानसूक्तांतल्याप्रमाणें येथेंहि मूळ कथेंतील गद्यभाग नष्ट होऊन केवळ लग्नप्रसंगींचीं ऋत्विजांचीं भाषणें, मंत्र वगैरे, व कथेंतील कांहीं महत्त्वाच्या गोष्टींबद्दलचीं पद्यें एवढेंच शिल्लक राहून बाकीचा भाग नष्ट झाला असावा. या सूक्तांतील विवाहमंत्रांपैकीं अनेक मंत्र असे आहेत कीं त्यांतील साधा व प्रेमळ भाव पाहून वर सांगितलेल्या और्ध्वदेहिक क्रियेसंबंधाच्या सूक्तांची आठवण होते. उदाहरणार्थ, नवपरिणीत दाम्पत्याला खालील शब्दांनीं आशीर्वाद दिला आहे.

इ॒ह प्रि॒यं प्र॒जया॑ ते॒ समृ॑ध्यताम॒स्मिन्गृ॒हे गार्ह॑पत्याय जागृहि । ए॒ना पत्या॑ त॒न्वं१॒॑ सं सृ॑ज॒स्वाधा॒ जिव्री॒ वि॒दथ॒मा व॑दाथः ॥ २७ ॥
ऋ. १०. ८५.

हे वधू, येथें ( तुला ) संतती होऊन तुझें प्रिय होवो. या गृहीं जागृतीनें गार्हपत्याचें रक्षण कर. या पतीबरोबर तूं शरीरानें एक हो. तुम्ही दोघेंजणें वृद्धपणींहि या घरांत एकमेकांशीं आभिमुख्यानें बोला ( मिळून रहा ). २७.

वधूवरांची वरात चालली असतांना वाटेंतील प्रेक्षक लोकांस उद्देशून पुढील ऋचा आहे.

सु॒म॒ङ्ग॒लीरि॒यं व॒धूरि॒मां स॒मेत॒ पश्य॑त । सौभा॑ग्यमस्यै द॒त्वाया॒थास्तं॒ वि परे॑तन ॥ ३३ ॥
ऋ. १०. ८५.

ही सुमंगल वधू, इला येऊन पहा, हिला सौभाग्याशीर्वाद देऊन आपापल्या घरीं जा. ३३.

प्राचीन आर्यन् पद्धतीप्रमाणें पति ज्या वेळेस पत्नीचें पाणिग्रहण करितो तेव्हां त्याला खालील मंत्र म्हणावा लागतोः—

गृ॒भ्णामि॑ ते सौभग॒त्वाय॒ हस्तं॒ मया॒ पत्या॑ ज॒रद॑ष्टि॒र्यथासः॑ । भगो॑ अर्य॒मा स॑वि॒ता पुर॑न्धि॒र्मह्यं॑ त्वादु॒र्गार्ह॑पत्याय दे॒वाः ॥ ३६ ॥
ऋ. १०. ८५.

मी तुझ्या हस्ताचें सौभाग्यासाठीं ग्रहण करतों. मज-पतीबरोबर तूं वृद्ध होईपर्यंत अस. भग, अर्यमा, सविता, पुरन्धि ( उषा ) या देवतांनीं मला गार्हपत्य प्राप्त व्हावें म्हणून तुला माझ्या स्वाधीन केली आहे. ३६.

शेवटीं नवपरिणीत दांपत्यानें गृहप्रवेश केल्यानंतर त्यांचें स्वागत पुढील शब्दांनीं केलें जातेंः—

इ॒हैव स्तं॒ मा वि यौ॑ष्टं॒ विश्व॒मायु॒र्व्य॑श्नुतम् । क्रीळ॑न्तौ पु॒त्रैर्नप्तृ॑भि॒र्मोद॑मानौ॒ स्वे गृ॒हे ॥ ४२ ॥ ऋ. १०. ८५.

तुम्ही दोघेंजण येथें असा. तुमचा वियोग न होवो. तुम्ही दीर्घायू व्हा आणि पुत्रपौत्रांसह आपल्या घरीं आनंदानें क्रीडा करा. ४२.

---

* अथवा तुझें मन व हृदय(तुझें) नाहीं, आम्हाला ठाऊक झालें.

नंतर वधूला पुढील आशीर्वाद दिला जातोः—

इमां त्वमिन्द्र मीढ्वः सुपुत्रां सुभगां कृणु । दशास्यां पुत्रानाधेहि पतिमेकादशं कृधि ॥ ४५ ॥ ऋ १०. ८५.

हे इन्द्रा, तूं हिला सुपुत्रवती आणि भाग्यवती कर. हिच्या ठिकाणीं दहा पुत्र देऊन पति अकरावा होईल असें कर. ४५

कांहीं कांहीं विवाहमंत्रांचें स्वरूप वरेंचसें जादुटोण्याच्या मंत्रांसारखें दिसतें. या विवाहमंत्रांपैकीं कांहीं मंत्र दुष्ट किंवा अशाच तऱ्हेचीं दुसरीं कांहीं चेटकें, कीं ज्यांच्या योगानें पत्नी भावी पतीचें अनिष्ट करूं शकते, त्यांच्या प्रतिकारार्थ म्हणावयाचे असतात व कांहीं पत्नीचें अनिष्ट करणारे जे राक्षस पिशाच्चादि त्यांचें निवारण करण्यासाठीं म्हणावयाचे असतात.

**मांत्रिकी सूक्तें.**—ऋग्वेदांत जवळ जवळ ३० सूक्तें वरील प्रकारच्या मंत्रांचीं आहेत. यांत नानाप्रकारचे रोग नाहींसे व्हावे, गर्भाचें रक्षण व्हावें, दुष्ट स्वप्नें व अशुभ शकुन यांचा प्रतिकार व्हावा, आणि चेटक्यांचें निराकरण, शत्रूचा व दुष्ट मांत्रिकाचा नाश, प्रतिस्पर्ध्यांचा पराजय, विष व सर्पादिकांचा प्रतिकार इ० गोष्टी घडून याव्या यासाठीं म्हणावयाचे मंत्र आहेत. त्याचप्रमाणें, शेतकी, बैल, युद्ध, यांसंबंधीं आशीर्वादपर मंत्र, झोंप येण्याचे मंत्र, इत्यादि अनेक मंत्र या सूक्तांत आहेत.

या सूक्तांतच ऋ. ७·१०३. हें फारच गमतीचें दर्दुरसूक्तहि येतें. येथें ब्राह्मण व बेडूक यांची तुलना केली आहे. उष्णकाळांत हे बेडूक मौनरूप घेतलेल्या ब्राह्मणांप्रमाणें निःशब्द असतात. जेव्हां पावसाळा येतो तेव्हां ते पुत्र पित्याकडे आनंदानें ओरडत जातो त्याप्रमाणें एकमेकांकडे आनंदानें शब्द करीत जातात. पितरं न पुत्रो अन्यो अन्यमुपवदन्तमेति ॥ ७·१०३,३. ज्याप्रमाणें, पाठशाळेंत शिष्य गुरूच्या शब्दांप्रमाणें शब्द उच्चारून वेद म्हणतो तसे हे बेडूक एकमेकांच्या शब्दांचा अनुकार करतात. ते नाना प्रकारचे उच्चनीच सूर काढतात. सोमयागांत ज्याप्रमाणें ऋत्विज भरलेल्या सोमपात्राभोंवतीं बसून गातात त्याप्रमाणें हे बेडूक पावसाळ्याच्या आरंभीं गाणीं गाऊन पावसाचें स्वागत करितात. या सूक्ताच्या शेवटीं धनधान्यसंपत्तीबद्दल एक प्रार्थना केली आहे ती अशीः—

गोमायुरदादजमायुरदात्पृश्निरदाद्धरितो नो वसूनि । गवां मण्डूका ददतः शतानि सहस्रसावे प्रतिरन्त आयुः ॥ १० ॥ ऋ. ७. १०३.

बैल आम्हांस संपत्ति देवोत. तसेंच मेंढेहि पण आम्हांस सौख्य देवोत. रंगीत वर्णाचे व हिरव्या वर्णाचे आम्हांस सुख देवोत. हे बेडूक आम्हांस शेंकडों गाई देवोत. हजार वर्षेंपर्यंत हे बेडूक आपलें आयुष्य आम्हांस देवोत. १०.

या सर्व गोष्टी मोठ्या मौजेच्या आहेत. बहुतेक सर्व लोक या सूक्तांत ब्राह्मणांचा व्याजोक्तिपूर्ण उपहास आहे असें मानीत. परंतु ब्लूमफील्ड यानें असें सिद्ध करून दाखविलें आहे कीं, हें सूक्त म्हणजे पाऊस पाडण्यासाठीं जपलेला मंत्र आहे. हा एक पावसाचा तोडगा आहे. बेडूक पृथ्वीवर पाणी आणितात अशी प्राचीनांची समजूत असल्यानें त्यांची पर्जन्य घेऊन येणारे अशा नात्यानें स्तुति केली आहे. अर्थातच यांची व ब्राह्मणांची तुलना हा ब्राह्मणांचा उपहास नसून ती उलट बेडकांची खुशामत होय हें सांगणें नकोच.

तथापि असेंहि असण्याचा संभव आहे कीं, हें सूक्त प्रथमतः उपहास करण्यासाठीं म्हणून लिहिलें गेलें असून नंतर पुढच्या काळांतील लोकांनीं त्याला मांत्रिकी स्वरूप दिलें असावें. तसेंच ऋ. मं. ६ सूक्त ७५ हें सूक्तहि प्रथमतः युद्धसूक्त म्हणून लिहिलेलें असावें व नंतर त्याचें रूपांतर आशीर्वचनांत झालें असावें. या सूक्तांतील कांहीं कांहीं ऋचा काव्य या दृष्टीनें, विशेषतः कल्पनेच्या धडाडीच्या दृष्टीनें, बऱ्याच उच्च प्रतीच्या आहेत, तर कांहींची भाषा अगदींच रुक्ष व नीरस असून जादूच्या मंत्रांप्रमाणें आहे. पहिल्या तीन ऋचा या मंत्रांप्रमाणें नसून युद्धसूक्तासारख्या भासतात.

जीमूतस्येव भवति प्रतीकं यद्वर्मी याति समदामुपस्थे । अनाविद्धया तन्वा जय त्वं स त्वा वर्मणो महिमा पिपर्तु ॥ १ ॥

धन्वना गा धन्वनाजिं जयेम धन्वना तीव्राः समदो जयेम । धनुः शत्रोरपकामं कृणोति धन्वना सर्वाः प्रदिशो जयेम ॥ २ ॥

वक्ष्यन्तीवेदागनीगन्ति कर्णं प्रियं सखायं* परिषस्वजाना । योषेव शिङ्क्ते वितताधिधन्वञ्ज्या इयं समने पारयन्ती ॥ ३ ॥ ऋ. ६. ७५.

जेव्हां हा राजा चिलखत घालून संग्रामाच्या अग्रभागीं शिरतो तेव्हां तो जीमूताप्रमाणें दिसतो. हे राजा तुझें शरीर अनाविद्ध ( अक्षत ) राहून तूं शत्रूला जिंक. (या) कवचाचा महिमा तुझें रक्षण करो. १.

आमच्या धनुष्याच्या साहाय्यानें आम्हीं गाई जिंकाव्या व लढायांमागें लढाया जिंकाव्या. उद्धत व अत्यंत मदोन्मत्त ( शत्रुसेना ) जिंकाव्या. आमचें धनुष्य शत्रूचा इच्छाभंग करो. आमच्या धनुष्यानें सर्व दिशा ( आम्हीं ) जिंकाव्या. २.

ही धनुष्यावर चढविलेली व रणकर्मांत पार नेणारी दोरी प्रियसख्याला आलिंगन देणाऱ्या स्त्रीप्रमाणें जणूं काय बोलण्याच्या इच्छेनें कानापाशीं येते व ( मंजुळ ) बोलते. ३.

सामान्यतः पाहतां, ऋग्वेदांतील मांत्रिकी सूक्तांत व अथर्ववेदांतील मांत्रिकी सूक्तांत फारसा फरक नाहीं. अथर्व-

* सखायं=पतिमिव इषुम्–सायण, यास्क.

वेदासंबंधानें आपल्याला पुढें बोलावयाचेंच आहे. परंतु ऋग्वेदांत देवतापर व यज्ञिय सूक्तांबरोबरच मांत्रिकी सूक्तांचा अंतर्भाव केलेला आहे व तो केवळ दहाव्या मंडलांतच नसून इतरत्रहि आहे ही गोष्ट ध्यानांत ठेवण्यासारखी आहे.

**लौकिक सूक्तें.**—वरील गोष्टीपेक्षां अधिक महत्त्वाची गोष्ट म्हणजे ही कीं, कित्येक निवळ लौकिक पद्यें ऋग्वेदांतील पारमार्थिक व यज्ञविषयक सूक्तांत मधून मधून आलीं आहेत. उदाहरणार्थ, ऋ. मं. ९ सू. १११. हें सूक्त सोमसूक्तांत आढळतें व यांत मनुष्यप्राण्याच्या नाना प्रकारच्या वासनांची निंदा आहे. कदाचित् एखाद्या विनोदी माणसानें, "सोमा-इन्द्रासाठीं वहा" असलें पालुपद यांतील ऋचांना जोडलें म्हणूनहि या सूक्ताचा ऋग्वेदसंहितेंत अंतर्भाव झाला असावा. हें सूक्त खालीं दिलें आहे.

नानानं वा उं नो धियो विव्रतानि जनानाम् । तक्षारिष्टं रुतं भिषग्ब्रह्मा सुन्वन्तमिच्छतीन्द्रायेन्दो परिस्रव ॥ १ ॥

जरतीभिरोषधीभिः पर्णेभिः शकुनानाम् । कार्मारो अश्मभिर्द्युभिर्हिरण्यवन्तमिच्छतीन्द्रायेन्दो परिस्रव ॥ २ ॥

कारुरहं ततो भिषगुपलप्रक्षिणी नना । नानाधियो वसूयवोनुगा इव तस्थिमेन्द्रायेन्दो परिस्रव ॥ ३ ॥

अश्वो वोळ्हा सुखं रथं हसनामुपमन्त्रिणः । शेपो रोमण्वन्तौ भेदौ वारिन्मण्डूक इच्छतीन्द्रायेन्दो परिस्रव ॥ ४ ॥
ऋ. ९. १११.

आमच्या नाना बुद्धी असतात, जनांचीं नानाव्रतें ( कर्मे ) असतात. तक्षा ( सुतार ) तक्षणाची ( लांकूड तासण्याची ), वैद्य कण्हण्याची ( रोग्याच्या ) व ब्राह्मण सवन करणाऱ्याची इच्छा करीत असतो. हे सोमा, तूं इन्द्रासाठीं वहा. १.

वाळलेलीं लांकडें, पक्ष्यांचीं पिसें व ( घांसण्याचे ) दगड व भट्टी ( इ० सामग्री )सह लोहार धनवानाची इच्छा करितो. हे सोमा, तूं इन्द्रासाठीं वहा. २.

मी एक कवि (कारु) आहे. माझे वडील वैद्य आहेत. माझी आई घरांत कांडणारी आहे. अशा तऱ्हेनें जसे गाईच्या मागें गोंवारी धांवतात, तसे आम्ही पैशाच्या मागें धांवतों. हे सोमा, तूं इन्द्रासाठीं वहा. ३.

घोडा गाडी हलकी असावी अशी इच्छा करतो, खुशामते लोक हास्याच्या लकेरींची इच्छा करितात, बेडूक पाण्याच्या डेंबक्याची इच्छा करितात. हे सोमा, तूं इन्द्रासाठीं वहा. ४.

धार्मिक विधींचा ज्यांत कांहीं संबंध नाहीं, अशा सूक्तांपैकीं उत्तम सूक्त म्हणजे ऋ. मं. १० सूक्त ३४ हें आहे. या सूक्तांत द्यूत खेळून पश्चात्ताप पावलेल्या एका द्यूतकाराचें भाषण आहे. यानें आपल्या आयुष्याचा द्यूतापायीं नाश करून घेतल्यामुळें याला पश्चात्ताप झाला आहे.

न मा मिमेथ न जिहीळ एषा शिवा सखिभ्य उत मह्यमासीत् । अक्षस्याहमेकपरस्य हेतोरनुव्रतामप जायामरोधम् ॥ २ ॥

द्वेष्टि श्वश्रूरप जाया रुणद्धि न नाथितो विन्दते मर्डितारम् । अश्वस्येव जरतो वस्न्यस्य नाहं विन्दामि कितवस्य भोगम् ३

अन्ये जायां परिमृशन्त्यस्य यस्यागृधद्वेदने वाज्य१क्षः । पिता माता भ्रातर एनमाहुर्न जानीमो नयता बद्धमेतम् ॥४॥
ऋ. १०. ३४.

माझ्या पत्नीनें माझा कधींहि धिक्कार केला नाहीं, ती कधींहि माझ्यावर चरफडली नाहीं, उलट माझ्या मित्रांबद्दल व माझ्याबद्दल तिच्या मनांत आदर असे. अशी जरी ती गुणवती होती तरी फांशांच्या नादानें मीं तिला घालवून दिलें. कारण फांशांवांचून मला कांहींच प्रिय वाटत नाहीं. २.

माझी सासू माझा द्वेष करते, माझी बायको मला विचारीत नाहीं. उघडच आहे, जुगाऱ्याच्या विनवणीला कोण भीक घालतो ? जुगाऱ्याचा उपयोग काय होऊं शकेल हें समजतच नाहीं. म्हातारा झालेल्या घोड्याप्रमाणें तो निरुपयोगीच ठरतो. ३.

फांशांनीं खेळण्याकरितां हा जेव्हां बाहेर निघतो तेव्हां याच्या बायकोचा हात परके धरतात, याचे भाऊ, बाप, आई म्हणतात, "आम्ही याला ओळखीत नाहीं. याला बांधून घेऊन जा." ४.

फांशांचा मोह किती पडतो याचेंहि वर्णन खालीलप्रमाणें कठोर भाषेंत केलेलें दिसतें:—

यदादीध्ये न दविषाण्येभिः परायद्भ्योव हीये सखिभ्यः । न्युप्ताश्च बभ्रवो वाचमक्रतँ एमीदेषां निष्कृतं जारिणीव ॥ ५ ॥
ऋ. १०. ३४.

आणि जरी मी आपल्या मनाशीं निश्चय केला कीं, अतःपर फांशांनीं खेळावयाचें नाहीं, कां, कीं, त्यामुळें माझे मित्र माझा धिक्कार करतात, तरी देखील फांशांचा आवाज ऐकल्याबरोबर व्यभिचाराला चटावलेल्या बाईप्रमाणें मीं त्यांच्याकडे धांव घेतों. ५.

फांशांच्या संबंधानें आणखी असें म्हटलें आहे:—

अक्षास इदंकुशिनो नितोदिनो निकृत्वानस्तपनास्तापयिष्णवः । कुमारदेष्णा जयतः पुनर्हणो मध्वा संपृक्ताः कितवस्य बर्हणा ॥ ७ ॥

नीचा वर्तन्त उपरि स्फुरन्त्यहस्तासो हस्तवन्तं सहन्ते । दिव्या अङ्गारा इरिणे न्युप्ताः शीताः सन्तो हृदयं निर्दहन्ति ॥ ९ ॥

हे फांसे म्हणजे मांसापर्यंत रुपणारे गळ होत. हे कपटी, फसवे आहेत, ह्यांच्यायोगें शरीराचा दाह होतो, त्याचे तुकडे होतात. थोड्याशा लाभाचें आमिष दाखवून ते जुगारी माणसाला नादीं लावितात. इतकें असूनहि जुगाऱ्याला त्यांचाच मोह पडतो. ७.

फांसे खालीं पडतात, ते वर हवेंत खेळतात. त्यांनां स्वतःला हात नसले तरी दुसऱ्याच्या हातांनां ते आपणांकडे ओढून घेतात. फांसे जादूच्या कोळशांप्रमाणें होत. ते स्वतः मृत असले तरी दुसऱ्यांचीं अंतःकरणें जाळतात." ९.

शिवाय या जुगाऱ्यानें स्वतःचा कितीहि तिटकारा केला तरी तो फांशांच्या मोहांत सांपडतोच.

जाया तप्यते कितवस्य हीना माता पुत्रस्य चरतः क्व स्वित् । ऋणावा बिभ्यद्धनमिच्छमानोन्येषामस्तमुप नक्तमेति ॥ १० ॥

स्त्रियं दृष्ट्वाय कितवं ततापान्येषां जायां सुकृतं च योनिम् । पूर्वाह्णे अश्वान्युयुजे हि बभ्रून्त्सो अग्नेरन्ते वृषलः पपाद ॥ ११ ॥ ऋ. १०.३४.

जुगाऱ्याची विरही पत्नी बिचारी एकटीच झुरत असते. आपला मुलगा कोठें भटकतो तें समजत नाहीं म्हणून त्याची आई सुद्धां दुःख करीत असते. हा स्वतः कर्जबाजारी होऊन भीत भीत धनाची इच्छा करीत हिंडतो व रात्रीचा परक्यांच्या घरांत दडून रहातो. १०.

दुसऱ्यांच्या बायका सुखानें नांदतांनां पाहून व त्यांची गृहव्यवस्था पाहून याला अतोनात दुःख होतें. सकाळीं उजाडतांच हा पश्चात्तापानें फांसे फेंकून देतो, पण पश्चात्तापाची लहर मावळली कीं, हा गरीव बिचारा पुनः मोहवश होतो. ११.

परंतु शेवटीं चांगलें वागायचेंच असा निश्चय करून तो फांशांचीच मला आपल्या जाचांतून सोडवा अशी प्रार्थना करतो. तो म्हणतो,

अक्षैर्मा दीव्यः कृषिमित्कृषस्व वित्ते रमस्व बहु मन्यमानः । तत्र गावः कितव तत्र जाया तन्मे वि चष्टे सवितायमर्यः ॥ १२ ॥ ऋ. १०. ३४.

मला सन्माननीय सवितृ देवानें आज्ञा केली आहे कीं, फांशांनीं जुगार खेळूं नको, शेती कर, संपत्तीचा उपभोग घे, त्यांत गाई व स्त्री यांची प्राप्ति होईल.

द्यूतविषयक उल्लेख ऋग्वेदांत आणखी एक ठिकाणीं आढळतो. तेथें द्यूतांतील फांसे ( त्या वेळीं वेहड्याचीं फळें ) टाकणाऱ्याची उपमा घेतली आहे.

चतुरश्चिद्ददमानाद्बिभीयादा निधातोः ।
ऋ. १. ४१, ९.

चार ( फांसे-कवड्या-वेहड्याचीं फळें ) टाकणाऱ्यापासून तो टाकीपर्यंत भय असतें. याखेरीज कितव आणि श्वघ्नी ( 'स्व'चा नाश करणारा ) असे शब्द आले आहेत.

**दानस्तुतिसूक्तें.**—निवळ लौकिक वर्णनात्मक सूक्तें व धार्मिक सूक्तें यांच्यामध्यें एक 'दानस्तुति' सूक्तांचा दुवा आहे. हीं सूक्तें म्हणजे यज्ञ करविणारे जे राजे वगैरे लोक त्यांच्या उदारतेचें वर्णन करणारीं सूक्तें होत. अशा तऱ्हेचीं सूक्तें जवळ जवळ चाळीस आहेत. यांत कांहीं जयसूक्तें आहेत, त्यांत इन्द्राचें स्तवन आहे. इन्द्रस्तवनाचें कारण त्यानें एका राजाला आपल्या शत्रूवर विजय मिळविण्याचे कामीं मदत केली हें होय. इन्द्राच्या स्तवनाबरोबरच विजयी राजाचेंहि स्तवन उरकून घेतलें आहे. सूक्ताच्या शेवटीं सूक्तकर्ता ऋषि आपल्या यजमानानें आपणांस बैल, घोडे, लढाईत लुटून आणलेले सुंदर सुंदर नोकरलोक इत्यादि गोष्टी दिल्याबद्दल त्याची स्तुति करितो. यांत मधून मधून या गुलामांच्यापासून कवीला जें सुख मिळतें त्याचें जरा ग्राम्य भाषेंत वर्णन आहे. कांहीं सूक्तें- हीं इन्द्रदेवतेलाच उद्देशून आहेत-विशिष्ट प्रसंगांनां उद्देशून रचिलेलीं यज्ञसूक्तें असून तीं कोणातरी राजाच्या किंवा श्रीमान् माणसाच्या विनंतीवरून रचिलेलीं आहेत. कांहीं सूक्तांत भरपूर दक्षिणा दिल्याबद्दल यज्ञकर्त्याची स्तुति आहे. 'दानस्तुति'सूक्तांत दक्षिणा देणाऱ्या राजाचें सवंद नांव दिलेलें असतें यावरून या सूक्तांत प्रत्यक्ष घडलेल्या कांहीं ऐतिहासिक गोष्टींचा उल्लेख असावा असें निश्चयानें म्हणतां येतें. या दृष्टीनें हीं सूक्तें महत्त्वाचीं आहेत. काव्य या दृष्टीनें या सूक्तांत कांहींच अर्थ नाहीं. 'देणावळ तशी धुणावळ' या न्यायानें किंवा 'सांगितलेला हुकूम पाळावयाचा' म्हणून हीं सूक्तें कशीं तरी रचिलेलीं दिसतात. दानस्तुतिसूक्तांशीं कांहींहि संबंध नसणारीं अशीं ऋग्वेदसूक्तें ठाकठिकीनें लिहिलेलीं आहेत. वैदिक ऋषि कित्येक वेळां आपलें काव्य व सुताराचें काम यांची तुलना करितात. तथापि ही गोष्ट लक्षांत ठेवली पाहिजे कीं, काव्य या दृष्टीनें जीं सूक्तें वाखाणण्यायोग्य आहेत त्यांत दानस्तुतिसूक्तांचा अंतर्भाव होत नाहीं. ओल्डनबर्गनें एके ठिकाणीं असें म्हटलें कीं, "सामान्यतः वैदिक सूक्तांतील काव्य सौंदर्यप्रपूरित नाहीं; व जातीचें हित साधणें व वैयक्तिक स्वार्थ साधणें या दोन गोष्टीच सूक्तकारांनां माहीत होत्या." यावर विंटरनिट्झनें असें उत्तर दिलें आहे कीं, "१०२८ सूक्तांपैकीं, ४० च सूक्तें कायतीं अशा तऱ्हेचीं आहेत ही गोष्ट ओल्डनबर्ग विसरतोसें दिसतें. वैदिक काळांतील कविगणांमध्यें कृत्रिम रचना करणारे लोक नव्हते, असें म्हणण्याचा माझा उद्देश नाहीं; परंतु त्याचबरोबर खरे कवीहि त्या काळांत होते हें विसरून चालावयाचें नाहीं एवढेंच मला म्हणावयाचें आहे."

"दानस्तुति" सूक्तें असें ज्यांनां एका अर्थी म्हणतां येईल परंतु जीं दुसऱ्याहि दृष्टींनीं महत्त्वाचीं आहेत अशीं कांहीं सूक्तें ऋक्संहितेंत आहेत. त्यांपैकीं सूक्त ऋ. १०·११७ हें एक सूक्त होय. यामध्यें एका नीतितत्त्वाचा निर्देश आहे म्हणून त्याचा या ठिकाणीं उल्लेख करणें अवश्य आहे. नीतितत्त्वांचा निर्देश ऋग्वेदांत याखेरीज इतरत्र कोठेंहि आढळत नाहीं. ऋग्वेदांत नीतितत्त्वांखेरीज सर्व कांहीं आहे. यास्तव खालीं भाषांतर करून दिलेलें सूक्त हें ऋग्वेदांत मोठें चमत्कारिक दिसतें.

न वा उ॑ दे॒वाः क्षुध॒मिद्व॒धं द॑दुरु॒ताशि॑त॒मुप॑ गच्छन्ति मृ॒त्यवः॑ । उ॒तो र॒यिः पृ॑ण॒तो नोप॑ दस्यत्यु॒ताऽपृ॑णन्मर्डि॒तारं॒ न वि॑न्दते ॥ १ ॥

य आ॒ध्राय॑ चकमा॒नाय॑ पि॒त्वोऽन्न॑वान्त्स॒न्रफि॒तायो॑पज॒ग्मुषे॑ । स्थि॒रं मनः॑ कृणु॒ते सेव॑ते पु॒रोतो चि॒त्स म॑र्डि॒तारं॒ न वि॑न्दते ॥ २ ॥

स इद्भो॒जो यो गृ॒हवे॑ द॒दात्यन्न॑कामाय॒ चर॑ते कृ॒शाय॑ । अर॑मस्मै भवति॒ याम॑हूता उ॒ताप॒रीषु॑ कृणु॒ते सखा॑यम् ॥३॥

न स सखा॒ यो न द॒दाति॒ सख्ये॑ स॒चाभुवे॒ सच॑मानाय पि॒त्वः । अपा॑स्मा॒त्प्रेया॒न्न तदोको॑ अस्ति पृ॒णन्त॑म॒न्यमर॑णं चि॒दिच्छेत् ॥ ४ ॥

पृ॒णीयादिन्नाध॑मानाय॒ तव्या॒न्द्राघी॑यांस॒मनु॑ पश्येत॒ पन्था॑म् । ओ हि वर्त॑न्ते॒ रथ्ये॑व च॒क्रान्यम॒न्यमुप॑ तिष्ठन्त॒ रायः॑ ॥५॥

मोघ॒मन्नं॑ विन्दते॒ अप्र॑चेताः स॒त्यं ब्र॑वीमि व॒ध इत्स तस्य॑ । नार्य॒मणं॒ पुष्य॑ति॒ नो सखा॑यं॒ केव॑लाघो भवति केवला॒दी ।६।

कृ॒षन्नित्फाल॒ आशि॑तं कृणोति॒ यन्नध्वा॑न॒मप॑ वृङ्क्ते च॒रित्रैः॑ । वद॑न्ब्र॒ह्मा व॑द॒तो वनी॑यान्पृ॒णन्ना॒पिरपृ॑णन्तम॒भि ष्या॑त् ॥ ७ ॥

एक॑पा॒द्भूयो॑ द्वि॒पदो॒ वि च॑क्रमे द्वि॒पात्त्रि॒पाद॑म॒भ्ये॑ति प॒श्चात् । चतु॑ष्पादेति द्वि॒पदा॑मभिस्व॒रे सं॒पश्य॑न्प॒ङ्क्तीरु॑प॒तिष्ठ॑मानः ।८।

स॒मौ चि॒द्धस्तौ॒ न स॒मं वि॑विष्टः संमा॒तरा॑ चि॒न्न स॒मं दु॑हाते । य॒मयो॑श्चि॒न्न स॒मा वी॒र्या॑णि ज्ञा॒ती चि॒त्सन्तौ॒ न स॒मं पृ॑णीतः ॥

ऋ. १०. ११७,१-९.

क्षुधा हें एकच शासन परमेश्वरानें उत्पन्न केलें नसावें. कारण ज्यांची क्षुधा शमन झालेली आहे अशांनां सुद्धां नानाप्रकारांनीं मृत्यु येतो.* दान देणाराची संपत्ति कमी होत नाहीं, पण जो दान देत नाहीं त्याच्यावर दया करणारें कोणीहि भेटत नाहीं. १.

ईशकृपेनें ज्याला अन्नवस्त्र यथास्थित आहे, व जो क्षुधेनें व्याकुळ झालेल्या व अन्नासाठीं आपल्या दाराशीं आलेल्या भुकेल्या माणसाला—त्यानें पूर्वी याची सेवा केली असतांना सुद्धां—अन्नदान करीत नाहीं त्याला कोणीं वरें पहात नाहीं. २.

गरजू क्षुधार्त माणसाला जो अन्नदान करतो तोच दाता होय. अशा दात्याचे उपकार स्मरून लोक संकटकाळीं त्याच्या साहाय्यार्थ धांवतात. दाता मनुष्य इतरांनां कायमचें ऋणी करून ठेवितो. ३.

आपल्या स्नेह्याला व विश्वासू दोस्ताला जो अन्नदान करीत नाहीं तो खरा मित्रच नव्हे. तो स्नेही याच्यापासून परावृत्त होऊन मागें फिरेल, किंवा एखादा परका दाता भेटला तर तिकडे जाईल. ४.

आपल्याला बरेंच आयुष्य कंठावयाचें आहे एवढ्या गोष्टीवर नजर देऊन तरी श्रीमंत माणसानें गरीबास दान करावें, कां कीं, रथाचीं चक्रें ज्याप्रमाणें रथाला गति देतात त्याप्रमाणें पैसा माणसाला माणसाकडे ओढतो. ५.

मूर्खाच्या हातांत अन्नसंचय जाणें म्हणजे खरोखरीच व्यर्थ होय. मीं हें खरें सांगतों. तो त्याचा अधःपात होय. मूर्ख मनुष्य स्वतःच्या इमानी स्नेह्याला अन्नदान देत नाहीं. तो एकटा एकटाच अन्नाचें सेवन करितो. व शेवटीं त्याचीच निंदा होते. ६.

नांगरण्यानेंच नांगराचा उपयोग चांगला होतो. चालणारा मनुष्य चालण्यानेंच भूमि आक्रमण करूं शकतो. मुखस्तंभ ऋत्विजापेक्षां बोलका ऋत्विजच जास्त मिळकत मिळवूं शकतो. दान देणारा मनुष्य न देणाऱ्यापेक्षां पुष्कळच बरा. ७.

एक पायाचा दोन पायांच्याला मागें टाकतो. दोन पायांचा तीन पायांच्याला पकडतो. चार पायांचा दोन पाय असणारापेक्षां मागें पडतो, व सर्वांच्या मागें राहून त्यांचें निरीक्षण करितो.* ८.

* याचें स्पष्टीकरण A. Ludwig (Der Rigveda. V. 561) यानें चांगलें दिलें आहे. तो म्हणतो, "क्षुधेनें व्याकुळ होणाऱ्या माणसाला अन्नदान करणें म्हणजे देवांच्या आज्ञेविरुद्ध वागणें होय" असें जें म्हटलें आहे ती व्याजोक्ति होय. जे दांभिक लोक स्वतःच्या निष्ठुरपणाचें समर्थन 'क्षुधेनें व्याकुल झालेल्या लोकांचें भवितव्य परमेश्वरानें आगाऊच ठरविलेलें आहे' असल्या कोटिक्रमानें करावयास पाहत त्यांनां उद्देशून ही व्याजोक्ति होय. यांत व्याजोक्ति आहे हें पुढील गोष्टीवरून सिद्ध होतें. पुढें शेवटीं सूक्तकर्ता कवि म्हणतो कीं, "गरीब लोकांनीं उपासमारीनें मेलेंच पाहिजे असा ईश्वरी संकेत असेल तर श्रीमान् लोकांनीं चिरंजीव राहिलें पाहिजे असाहि ईश्वरी संकेत असलाच पाहिजे."

* या ऋचेच्या अर्थासंबंधानें एक कल्पना अशी आहे. "एकपाद्" या शब्दानें "एकपाद् अजा" म्हणजे एक मरुद्देवता उद्दिष्ट आहे. "त्रिपाद्" म्हणजे काठीच्या आधारावर उभा राहिलेला एक म्हातारा, व "चतुष्पाद्" म्हणजे कुत्रा. विंटरनिट्झ.

दोन हात सारखे असतात पण त्यांच्यानें काम सारखें होत नाहीं. एकाच गाईच्या कालवडी सारखें दूध देत नाहींत. दोन आवळीं जावळीं मुलें सुद्धां सारख्या ताकतीचीं असूं शकत नाहींत. दोन जवळ जवळचे नातेवाईक सुद्धां सारखें दान देत नाहींत.* ९.

'एक पायाचा' इत्यादि ऋचा जी आहे ती कूटकाव्याचें एक उदाहरण होय.

**कूटकाव्यें.**—प्राचीन काळच्या इतर राष्ट्रांप्रमाणें प्राचीन हिंदू लोकांतहि कूटकाव्यांची आवड होती. ऋ. १·१६४ मध्यें वरील प्रकारचीं कूटें वरींच सांपडतात. परंतु दुर्दैवानें त्यांतील वरींचशीं आपणांस दुर्बोध होऊन बसलीं आहेत. उदाहरणार्थ—

स॒प्त यु॑ञ्जन्ति॒ रथ॒मेक॑चक्र॒मेको॒ अश्वो॑ वहति स॒प्तना॑मा ।
त्रि॒नाभि॑ च॒क्रम॒जर॑मन॒र्वं यत्रे॒मा विश्वा॒ भुव॒नाधि॑ त॒स्थुः ॥ २ ॥
ऋ. १. १६४.

एका एकचाकी रथाला सात घोडे जुंपतात. हा रथ सात घोड्यांकडून किंवा सात रूपांच्या एकाच घोड्याकडून ओढला जातो. या सतत फिरणाऱ्या अजर चक्राला तीन छिद्रें आहेत. त्यांच्या आधारावर हे सर्व प्राणी राहतात. २.

याचा अर्थ असा कीं, यज्ञांतले सात ऋत्विज आपल्या यज्ञाच्या योगानें सूर्याचा रथ चालता करतात. हा रथ सात घोड्यांनीं किंवा सात रूपें धारण करणाऱ्या एका घोड्याकडून ओढला जातो. ह्या अजर सूर्यचक्राला तीन छिद्रें आहेत. या 'तीन' शब्दानें येथें उन्हाळा, पावसाळा व हिंवाळा हे तीन ऋतू उद्दिष्ट आहेत. या तीन ऋतूंतच अर्थात मनुष्याचें सर्व आयुष्य जातें. याचे दुसरे अर्थ अनेक होऊं शकतील. [या ऋचेवरील सायण भाष्य पहावें. ऋ. १·१६४,२.] खालीं दिलेल्या कूटांसारखीं कूटें सोडवीत बसणें म्हणजे निरर्थक काथ्याकूटच होय.

ति॒स्रो मा॒तॄस्त्रीन्पि॒तॄन्बिभ्र॒देक॑ ऊ॒र्ध्वस्त॑स्थौ॒ नेम॒व॑ग्लापयन्ति । म॒न्त्रय॑न्ते दि॒वो अ॒मुष्य॑ पृ॒ष्ठे वि॑श्व॒विदं॒ वाच॒मवि॑श्वमिन्वाम् ॥ १० ॥

य ईं॑ च॒कार॒ न सो अ॒स्य वे॑द॒ य ईं॑ द॒दर्श॒ हिरु॒गिन्नु त॒स्मात् । स मा॒तुर्योना॒ परि॑वीतो अ॒न्तर्ब॑हुप्र॒जा निर्ऋ॑ति॒मा वि॑वेश ॥ ३२ ॥

द्यौर्मे॑ पि॒ता ज॑नि॒ता नाभि॒रत्र॒ बन्धु॑र्मे मा॒ता पृ॑थि॒वी म॒हीयम् ।
उ॒त्ता॒नयो॑श्च॒म्वो॒३॒॑र्योनि॑र॒न्तरत्रा॑ पि॒ता दु॑हि॒तुर्गर्भ॒माधा॑त् ।३३।
ऋ. १· १६४

तीन माता, व तीन बाप यांचें ओझें पाठीवर राहून हा एकटा ताठच्या ताठ उभा राहूं शकतो. या ओझ्याचा त्याला कधींच कंटाळा येत नाहीं. अंतरिक्षांत ते सर्वज्ञ असून सुद्धां सर्वव्यापी नसणाऱ्या अशा वाग्देवतेशीं वादविवाद करितात. १०.

ज्याला त्यानें उत्पन्न केलें त्याची त्याला माहिती नाहीं. ज्यानें त्याला पाहिलें त्यालाच तो दिसत नाहीं. तो आईच्या गर्भांत राहिलेला आहे. त्याला अनेक अपत्यें आहेत. तरीपण निर्ऋति याला मोहवश करिते. ३२.

अंतरिक्ष हा माझा बाप. त्याच्या पोटीं मीं जन्म घेतला. माझें उत्पत्तिस्थान तें, ही मोठी पृथ्वी माझी आई होय. उताण्या धरलेल्या दोन सोमपात्रांच्या मध्यें गर्भाशय आहे. त्यांत बाप आपल्या दुहितेच्या ठिकाणीं गर्भाधान करितो. ३३.

उलट खालील ठिकाणीं सूर्य उद्दिष्ट आहे हें स्पष्ट आहे.

अप॑श्यं गो॒पामनि॑पद्यमान॒मा च॒ परा॑ च प॒थिभि॒श्चर॑न्तम् ।
स स॒ध्रीचीः॒ स विषू॑ची॒र्वसा॑न॒ आ व॑रीवर्ति॒ भुव॑नेष्व॒न्तः ३१
ऋ. १. १६४.

मीं एक धनगर पाहिला. तो कधींहि खालीं पडत नसे. आपल्या मार्गानें तो खालीं वर वाटेल तसा जात असे. एके ठिकाणीं जमाव करून चालणाऱ्या व मध्यें मध्यें वियुक्त होणाऱ्या मेघांच्या आड तो लपतो. तो सर्व भुवनांना प्रदक्षिणा घालतो. ३१.

तसेंच खालील कूटप्रश्नहि तितकाच सुस्पष्ट आहे.

द्वाद॑श प्र॒धय॑श्च॒क्रमेकं॒ त्रीणि॒ नभ्या॑नि॒ क उ॒ तच्चि॑केत ।
तस्मि॑न्त्सा॒कं त्रि॑श॒ता न श॒ङ्कवो॑ऽर्पि॒ताः ष॒ष्टिर्न च॑लाच॒लासः॑ ४८
ऋ. १. १६४.

बारा परिमंडळें, एक चाक, तीन नाभी असें काय? त्यामध्यें जवळ जवळ तीनशें साठ खुंट्या आहेत. ४८.

या ठिकाणीं बारा महिने तीन ऋतू व तीनशें साठ दिवस यांनीं विशिष्ट असें वर्षरूप चक्र उद्दिष्ट आहे हें उघड आहे.

अशा तऱ्हेचे कूटप्रश्न* व कूटांचे खेळ हे प्राचीन हिंदू लोकांचीं अतिशय प्रिय अशीं करमणुकीचीं साधनें होत. कांहीं कांहीं यज्ञांच्या प्रसंगीं तर हे कूटप्रश्न म्हणजे याज्ञिकीचा

---

* विंटरनिट्झ. Cf. Deussen Allg. Geschichte der Philosophie. I. 1. p. 93. etc.

* ऋक्संहितेंतील कांहीं कूट ऋचांचे सरळ मराठी अर्थ पुढें दिले आहेत.

ह्या मनोहर पांढऱ्या केशाच्या होत्याचा मधला भाऊ अधाशी, तिसरा भाऊ पाठीवर तूप वाहणारा आहे. मी सात पुत्र असलेला राजा पाहिला. (१)

ज्या ह्या सातचाकी रथावर सातजण बसतात त्या रथाला सातजण वाहून नेतात. सात बहिणी खूप स्तुति करितात. जेथें गाईंचीं सात स्वरूपें आहेत. (३)

एक भागच होऊन बसला होता. असल्या तऱ्हेच्या गोष्टी अथर्ववेद व यजुर्वेद यांतहि आढळतात.

( मागील पानावरून पुढें चालू )

ज्या कोणाला ठाऊक असेल त्यानें सांगावें. या सुंदर पक्षाचें रूप गुप्त आहे. याच्या गाई शिरापासून दूध देतात. तेजःपुंज रूप धारण करणाऱ्या पायानें दूध पितात. (७)

दक्षिणेच्या धुरेला माता जोडिली गेली. गाईच्या पोटीं गर्भ राहिला. वत्स ओरडूं लागला आणि तो विश्वरूप गाईकडे तीन योजनांपर्यंत पाहूं लागला. (९)

त्या माझ्या स्त्रिया असतांहि त्यांस माझे पुरुष म्हणतात. डोळस पाहूं शकतो. आंधळा पाहूं शकत नाहीं. जो पुत्र बुद्धिमान् आहे तोच हें जाणील. जो जाणील तो पित्याचा पिता होईल. (१६)

एका पायानें वत्साला खालीं धरणारी आणि (त्याला) दुसऱ्या पायानें वर धारण करणारी गाय उगवली आहे. ती कुठें गेली ? कोणत्या अर्धाला गेली ? कोठें विते ? कळपांत नाहीं. (१७)

खालीं असलेला या लोकांचा पिता दुसऱ्यामुळें आणि दुसरा वरतीं असलेला खालच्यामुळें जो जाणतो असा ज्ञाता व असें सांगणारा कोण ? दिव्य मन कोठून झालें ? (१८)

ज्या वृक्षावर गोड खाणारे पक्षी राहतात आणि ज्या जगांत प्रसवतात त्याचेंच फल फार गोड असें म्हणतात. जो बापाला जाणत नाहीं त्याला तें फल मिळत नाहीं. (२२)

हा तो वत्स ओरडत आहे, ज्यानें वेष्टिलेली गाय गोठ्यांत उभी राहून हंबरते. ती ज्ञानानें सर्वांना मागें टाकते. वीज होऊन रूप प्रकट करिते. (२९)

द्यु माझा बाप, उत्पत्ति करणारा, आदिकारण आहे. येथें माझी ही मोठी पृथ्वी आई व भाऊ आहे. (३३)

उदकें निर्माण करणारी गाय हंबरडा फोडिते, ती एक पायाची, दोन पायांची, चार पायांचीं, आठ पायांची, नऊ पायांची, हजार अक्षरांची होणारी अत्यंत उंच स्वर्गी ( हंबरते ). (४१)

त्या गाईपासून समुद्र वाहतात. त्यामुळें चारहि दिशा आणि उपदिशा जगतात. तीपासून जें कधींहि क्षीण न होणारें पाझरतें त्यामुळें सर्व विश्वाचा निर्वाह चालतो. ( ४२ )

तिघे केंसाळ ऋतूप्रमाणें अवलोकन करितात. त्यांतून एक प्रतिवर्षी वपन करितो. दुसरा प्रकाशनवृष्टयादिकांनीं विश्वाला पहातो. तिसऱ्याची गति दिसते, रूप दिसत नाहीं. (४४)

उदक पांघरणारे आणि उत्तम पंख असलेले घोडे अंधारमय मार्गानें उडून स्वर्गाला जातात. ते सत्याच्या स्थानापासून परत येतात. आल्याबरोबर पृथ्वी घृतानें भरून टाकतात ( ४७ )
१. १६४

हे जे सप्तरश्मि आहेत तेथें माझी नाभि बांधिली आहे. त्रित आप्त्य ते जाणतो. तो ( संकट निवारणकरितां ) आप्तपणाकरितां रश्मींनां स्तवितो. हे द्यावापृथिवीनों, माझें स्तोत्र ऐका. ( १. १०५. ९ )

**मंडळांचें मूळ.**—आतांपर्यंत ऋग्वेदसंहितेचें जें स्वरूप वर रेखाटलें आहे त्याचें सिंहावलोकन केलें असतां आपली

तांबडा लांडगा मार्गानें जाणाऱ्या मला एकदां पाहता झाला. मला पाहून वरगड्या दुखत असलेल्या सुताराप्रमाणें तो उठतो, तर द्यावापृथिवींनों माझें स्तोत्र ऐका ( १.१०५,१८ )

काय ? सर्वांत वडील तो आला आहे ? कीं सर्वांत लहान तो आला आहे ? अथवा दूत्य करीत आहे ? आम्ही जें म्हटलें तें काय ? आम्ही चमसाला निन्दीत नाहीं, कारण तो मोठ्यापासून झाला आहे. हे बंधो अग्ने, आम्हीं त्या काष्ठपात्राचीच प्राप्ति वर्णिली आहे. ( १.१६१.१ )

यमानें दिला. त्रितानें याला जोडला. इन्द्र यावर प्रथम बसला. गंधर्वानें याची दोरी धरिली. हे वसूंनों, तुम्हीं घोडा आदित्यापासून मिळविला. ( १.१६३,२ )

दोघी न संचार करणाऱ्या आणि पादरहित संचार करणारें व पादयुक्त पुष्कळ गर्भ धारण करितात. पित्याच्या मांडीवर असलेल्या मुलाप्रमाणें, द्यावापृथिवींनों, आमचें रक्षण करा. ( १.१८५,२ )

धनापैकीं कांहीं विशेष धनाला मिळविणारा ज्ञानी स्वामी सहज ताब्यांत ठेवतां येणाऱ्यावर चढतो. नीलपृष्ठ आणि अनेक शरीरें धारण करणारा त्याजकडून गमन होण्यासाठीं पोषण करवितो. ( ३.७,३ )

हे सिंधूंनों, मेधावींचीं तीन गुणे तीन स्थानें आहेत; आणि तीन मातांचा पुत्र यज्ञामध्यें देदीप्यमान असतो. उदकसंबंधी व प्राप्त करण्यास योग्य अशा तीन स्त्रिया यज्ञांत दिवसांतून तीन वेळां येतात. ( ३.५६,५ )

ज्या 'भगिनी' वीराकारणें शक्ति इच्छितात, आणि नम्र होणाऱ्या वीरापासून गर्भाला प्राप्त करितात, व मोठ्या रूपाला धारण करणाऱ्या, कामुक, धेनु पुत्राकडे जातात. ( ३.५७,२ )

हे ऋभूंनों, अश्विनींचा स्तुत्य रथ, अश्वरहित आणि लगामरहित उत्पन्न झाला. आणि तीन चाकी ( तो रथ ) अन्तरिक्षांत भ्रमण करितो. तुम्ही द्यूचा आणि पृथिवीचा उत्कर्ष करितां हें तुमच्या देवत्वाचें मोठें व्यापक आहे. ( ४.३६,१ )

ऋताचीं दृढ, धारक व बहुत आल्हादक रूपें आहेत ऋताकडून पुष्कळ अन्न इच्छितात. ऋतानें गाई ऋतांत शिरतात. ( ४.२३,९ )

आधान केलेल्या उदकांत अन्तर्हित असलेल्या मला देवांचीं व्रतें रक्षिणारा म्हणाला. हे अग्ने, विद्वान् इन्द्र भक्त असणाऱ्या तुला जाणतो. त्यानें उपदेशिलेला मी गेलों. ( १०.३२,६ )

सिंचन केलीं जाणारीं उदकें मीच सिंचन करतों. त्याचप्रमाणें उदकाच्या ठिकाणीं अथवा आदित्याच्या ठिकाणीं द्युलोक धारण करतों. उदकाच्या योगानें यज्ञवान् असा अदितीचा पुत्र मी झालों. आकाशव्याप्त अशी भूमि ( मजकरितां ) तीन प्रकारांनीं विस्तारली गेली. ( ६.४२,४. )

अशी खात्री होते कीं, या संहिताभागांत भारतीयांच्या काव्याचा अत्यंत जुना भाग म्हणजे अत्यंत जुनें भारतीय काव्य कोठें कोठें आढळतें, व सध्यांची ऋग्वेदसंहिता पूर्वी बरीच मोठी असून धार्मिक व इतर गोष्टींसंबंधाचें वाङ्मय पूर्वी बरेंच असलें पाहिजे व आपल्या दुर्दैवानें तें नष्ट झालें असलें पाहिजे असेंहि दिसतें. या सूक्तांपैकीं बरींच सूक्तें यज्ञविषयक मंत्रांचीं आहेत. त्यांचा उपयोग यज्ञासाठीं केला होता किंवा होऊं शकतो. यावरून आपणांस असें म्हणतां येईल कीं, या सूक्तांच्यामुळेंच मंडळें बांधण्याची प्रवृत्ति झाली व यांच्या मुळेंच मंडळें बांधलीं गेलीं. परंतु या मंडळें बांधणाऱ्या ऋषींनां हा सूक्तसंग्रह याज्ञिकीच्या व वाङ्मयाच्या अशा दोन्ही दृष्टींनीं बनवावयाचा असल्यामुळें, छंद, भाषा इत्यादिकांमुळें जीं कांहीं इतर कमी दर्जाचीं गाणीं त्या वेळेस रूढ होऊन बसलीं होतीं त्यांचाहि समावेश या संग्रहांत करण्यास ऋषींनीं मागेंपुढें पाहिलें नाहीं. अशा गाण्यांचें संरक्षण त्यांचा समावेश पाठ करण्याकरितां म्हणून बांधलेल्या मंडळांत केल्यानेंच होणारें होतें ही गोष्ट उघड आहे. या गाण्यांतील पुष्कळशा गोष्टी संहिताकारांनांच ग्राम्य अतएव त्याज्य वाटत असल्या पाहिजेत. असल्या कांहीं गोष्टी आपणांस दुसऱ्या एका संहितेंत म्हणजे अथर्ववेदांत ग्रथित केलेल्या आढळतात. असो.

ऋग्वेदसंहिता या ग्रंथाचें स्थूल वर्णन येथवर दिलें. यांतील विषयांची संगतवार मांडणी करावयाची ती येथें स्वतंत्रपणें न करतां पुढें एकंदर वैदिक वाङ्मयांतील विषयांची व्यवस्था सांगतांना करणेंच इष्ट असल्यानें तसें करण्याचें योजिलें आहे.

---

( मागील पानावरून पुढें चालू )

सर्वत्र सारख्याच भासणाऱ्या अग्नीप्रत कर्माच्या मागून जाणारी आमची बुद्धि जाऊन पोहोंचो. त्या निद्राळू अग्नीनें पृथिवीचें सुंदर असें मंडल आपल्या पाठीवर धारण केलें आहे. (४.५, ७.)

माता आणि पिता अशा द्यावापृथिवींच्या मध्यें असणारा दीप्यमान् अग्नि धूचें गुप्त असें दूध तोंडानें पिता झाला. दैदीप्यमान् व नियत अशा अग्नीची जिव्हा मातेच्या जवळ असलेलें दूध पिण्याची इच्छा करूं लागली. (४.५,१०.)

हेंच तें महान आणि प्राचीन मंडळ; ज्याचें कामदुघा गाय सेवन करती झाली. अंतरिक्षामध्यें दीप्यमान् असें जें गुप्त व शीघ्रगामी मंडळ तें मी जाणलें. (४.५,९.)

तो मला पर्याप्त अशी बाधा करूं शकला नाहीं. ( मी ) बलानें त्याचा नाश केला. ( त्या ) सर्वप्रेरक शूरानें वायूंचा व शत्रूंचा नाश केला. (४.२७,२.)

# प्रकरण ३ रें.

## वेदप्रवेश-अथर्ववेद.

**सामान्य स्वरूप.**—अथर्ववेदांत अभिचारमंत्र आहेत. हा अथर्वन् लोकांचा वेद आहे. प्राचीन कालीं, अग्निउपासक पुरोहितास अथर्वन् असें म्हणत व हें नांव बहुतेक सरसकट सर्व उपाध्यायांनां फार पुरातन कालीं लावूं लागले असावेत, कारण हा 'अथर्वन्' शब्द पर्शुभारतीय काळचा आहे. अवेस्तामधील अथ्रवन् लोक व हिंदू अथर्वन् लोक ह्यांच्यांत बरेंच साम्य आहे. अग्निपूजक नांवानें प्रसिद्ध असलेल्या प्राचीन इराणी लोकांइतकेंच प्राचीन भारतीयांच्या दैनिक कृत्यांत अग्निपूजेचें माहात्म्य असे. हे प्राचीन अग्निपूजक, अमेरिकेंतील इंडियनांच्या वैद्यांप्रमाणें, किंवा उत्तर आशियांतील 'शामन' लोकांप्रमाणें, जादूटोणा जाणणारेहि होते. हे पुरातन अग्निपूजेचे उपासक जारणमारण विद्येचेहि उपासक असत; म्हणजे एकाच व्यक्तीच्या ठिकाणीं आचार्यत्व व अभिचारकत्व हीं दोन्हीं असत; मिडिया देशांतील अथ्रवन् लोकांस "मगी" ( जादूटोणा जाणणारा अग्निपूजक ) असें म्हणत, ह्यावरून आचार्यत्व व अभिचार यांचें पुरोहितवर्गांत सहास्तित्व सिद्ध होतें. तसेंच हेंहि उघड होतें कीं, अथर्वन् हें नांव अथर्वन् लोकांच्या किंवा "आचार्य अभिचारकां"च्या मंत्रांनांहि (अभिचारांनांहि) लावीत. भारतीय वाङ्मयांत या वेदाचें अतिशय जुनें असें नांव म्हणजे अथर्वांगिरस. इतिहासास ज्ञात अशा कालापूर्वी अंगिरस् म्हणून एक अग्निउपासकांचा वर्ग होता व अथर्वन् शब्दाप्रमाणेंच ह्या शब्दाला "जारणमारणादि मंत्र" हा अर्थ आला. तथापि अथर्वन् व अंगिरस् हे दोन निराळे मंत्रवर्ग आहेत.

अशी एक कल्पना होते कीं, ब्राह्मणजातीचा उद्भव होण्यापूर्वी ज्या लोकांकडे भारतीयांचें पौरोहित्य होतें त्यांस अथर्वण हेंच नांव असे. आणि असेंहि शक्य आहे कीं, ज्याप्रमाणें पर्शूंचे आचार्य परजातीय होते त्याप्रमाणें हिंदूंचे आचार्यहि कांहींसे परजातीय असावेत. निदान परजातीय लोक यांच्या वर्गांत बरेचसे घुसले असावेत. या प्रश्नाचें विवेचन सविस्तरपणें 'ब्राह्मणजातीचा उदय' या प्रकरणांत करावयाचें आहे.

अथर्वन् मंत्र सुखकारक व पवित्र आहेत, तर त्याच्या उलट अंगिरस् हे मंत्र अघोर पीडाकर आहेत. ह्याला उदाहरण म्हणजे, अथर्वन् मंत्रांमध्यें रोगनिवारक विधी आहेत, तर अंगिरस् मंत्रांमध्यें आपले द्वेष्टे, शत्रू, दुष्ट मायावी लोक व इतर तशाच प्रकारची मंडळी ह्यांनां शाप देण्याचे विधी सांगितले आहेत. अथर्ववेदांत मुख्यतः अथर्वन् व अंगिरस् हे दोन प्रकारचे मंत्रविधी आहेत व म्हणून ह्या वेदाचें जुनें नांव अथर्वांगिरस असें आहे. अथर्ववेद हें नांव नंतरचें आणि अथर्वांगिरसवेद या नांवाचें संक्षिप्त रूप आहे.

अथर्ववेदसंहितेच्या एका प्रतींत एकंदर सातशें एकतीस सूक्तें व अजमासें सहा हजार ऋचा आहेत. ह्या वेदाचीं वीस कांडें आहेत व ह्यांपैकीं विसावें तर बरेंच अलीकडे जोडलें आहे व एकोणिसावें कांड सुद्धां पूर्वीं ह्या संहितेंत नव्हतें. विसाव्या कांडांतील बहुतेक सर्व सूक्तें ऋग्वेदसंहितेंतूनच अक्षरशः घेतलीं आहेत. ह्याखेरीज अथर्ववेद संहितेचा अजमासें $\frac{1}{6}$ भाग ऋग्वेदावरूनच घेतला आहे. ऋग्वेद व अथर्ववेद ह्या दोहोंत सांपडणाऱ्या ऋचांतील निम्म्यांहून अधिक ऋचा ऋग्वेदाच्या दहाव्या मंडळांत दिसून येतात व बाकी राहिलेल्या बहुतेक ऋचा त्याच्या पहिल्या व आठव्या मंडळांत सांपडतात.

अथर्ववेदाच्या मूळ अठरा कांडांतील सूक्तांची रचना पद्धतशीर व फार काळजीपूर्वक केलेली दिसून येते. पहिल्या सात कांडांत पुष्कळ लहान लहान सूक्तें आहेत; पहिल्या कांडांतील सूक्तें सामान्यतः चार चार ऋचांचीं, दुसऱ्यांतील पांच ऋचांचीं, तिसऱ्यांतील सहांचीं, चवथ्यांतील सातांचीं असा क्रम दिसतो. पांचव्या कांडांतील सूक्तांच्या ऋचा कमींत कमी आठ व जास्तींत जास्ती अठरा आहेत. सहाव्या कांडांत बहुतेक तीन ऋचांचीं अशीं एकंदर एकशें बेचाळीस सूक्तें आहेत व सातव्या कांडांत एक किंवा दोन ऋचांचीं अशीं एकशें अठरा सूक्तें आहेत. आठ ते चवदा कांडें आणि सतरावें व अठरावें कांड ह्यांतून लांबलांब सूक्तें आहेत. ह्या वरील कांडमालिकेंतील सर्वांत लहान सूक्त ( एकवीस ऋचांचें ) म्हणजे आठव्या कांडांतील पहिलें व सर्वांत लांब सूक्त ( एकूणनव्वद ऋचांचें ) म्हणजे अठराव्या कांडांतील शेवटचें ( चवथें ). पंधरावें कांड पूर्ण व सोळाव्या कांडांतील बराचसा भाग एवढाच मध्यें गद्यात्मक आहे. ह्यांतील भाषा व धाटणी ब्राह्मणग्रंथांप्रमाणें आहे. ह्या वरील सर्व गोष्टी पाहिल्या म्हणजे संहिताकाराची बाह्य रचनेवर व ऋचांच्या संख्येवर विशेष दृष्टि होतीसें दिसतें. पण अंतर्रचनेंत सुद्धां त्यानें हेळसांड केलेली नाहीं. दोन, तीन, चार किंवा अधिक एकाच विषयावरील सूक्तें बहुतेक एका ठिकाणीं घातलेलीं आढळून येतात. कधीं कधीं कांडांतील पहिल्या सूक्तास तें स्थान देण्याचें कारण त्यांतील विषय असावा असें दिसतें. उदाहरणार्थ, दुसऱ्या, चवथ्या, पांचव्या आणि सातव्या कांडाच्या सुरवातीला ब्रह्मविद्याविषयक सूक्तें घातलेलीं आहेत, तीं निःसंशय सहेतुक घातलीं आहेत. तेरा ते अठरा यांपैकीं प्रत्येक कांडांत बहुतेक एक एक स्वतंत्र विषय आहे. चवदाव्या कांडांत नुसतीं विवाहवचनें आहेत, तर अठराव्या कांडांत फक्त अंत्यविधीबद्दलच्या ऋचा आहेत. ह्यावरून वरील विधानांची सत्यता पटेल. अथर्ववेदांतील सूक्तांची भाषा व वृत्तें हीं प्रधानतः ऋग्वेदसंहितेप्रमाणेंच आहेत. तथापि अथर्ववेदांत कांहीं रूपें निःसंशय ऋग्वेदकाळाच्या नंतरचीं आहेत. तसेंच यांतील भाषेंत लोकभाषेंतील शब्द व प्रयोग ऋग्वेदापेक्षां अधिक आढळतात व ह्याखेरीज या वेदांत ऋग्वेदाप्रमाणें वृत्ताकडे बारकाईनें लक्ष पुरविण्यांत आलेलें दिसत नाहीं. पंधरावें कांड सर्व व सोळाव्याचा बहुतेक भाग गद्यात्मक आहे, हें वर सांगितलेंच आहे. याशिवाय इतर कांडांतूनहि मधून मधून गद्यभाग आलेला आहे. पुष्कळ ठिकाणीं तर अमुक एक भाग रचना नीट न साधलेलें पद्य आहे किंवा उत्तम गद्य आहे, याचा निर्णय करणें कठिण होतें. कधीं कधीं असेंहि दिसून येतें कीं, मुळांतील वृत्त निर्दोष असून त्याचा प्रक्षेप किंवा विक्षेप यामुळें भंग झालेला आहे.

कांहीं कांहीं ठिकाणीं भाषा व वृत्त यांवरून ते भाग अलीकडचे आहेत हें थोडेंफार ओळखतां येतें. तथापि भाषा व वृत्त यांवरून सूक्तांच्या कालाबद्दल निश्चित सिद्धांत बांधतां येत नाहीं, व यामुळें अर्थातच संहितेचाहि कालनिर्णय करितां येत नाहीं. ऋग्वेदसूक्तें व अथर्ववेदमंत्र ह्यांत जो फरक अथर्ववेदांतील भाषावैचित्र्य व वृत्तस्वातंत्र्य ह्यामुळें पडलेला आहे, तो फरक या दोहोंतील कालभेदामुळें आहे किंवा याज्ञिक व सामान्य लोकांच्या प्रबंधांत साहजिक पडणारें अंतर ह्याच्या बुडाशीं आहे हा मोठा वादाचा प्रश्न आहे.

**अथर्वसंहिताकाल.**—आतां कांहीं पुरावे मात्र असे सांपडतात कीं, त्यांवरून अथर्ववेदसंहिता ही ऋग्वेदसंहितेच्या मागाहूनची आहे हें निर्विवादपणें सिद्ध होतें. असा पहिला पुरावा म्हणजे ऋग्वेद व अथर्ववेदांतील भौगोलिक ज्ञान व संस्कृति. यांच्याकडे लक्ष्य दिलें असतां अथर्ववेदसंहितेचा काळ ऋग्वेदकाळाच्या नंतरचा आहे असें दिसून येतें. त्या वेळीं आर्य लोकांनीं आग्नेयीकडे पुढें सरकत सरकत गंगा नदीकांठचा प्रदेश व्यापिला होता. बंगाल्यांत दलदलीच्या अरण्यांतून राहणारा वाघ ऋग्वेदांत दृष्टीस पडत नाहीं, पण अथर्ववेदांत त्याचें वर्णन आढळतें. तो हिंस्र पशूंमध्यें सर्वांत बलाढ्य व भीतिप्रद आहे व राज्याभिषेकाच्या वेळीं अतुल राजबलदर्शक चिन्ह म्हणून राजाच्या पायांखालीं व्याघ्रचर्म हांतरतात व राजा त्यावर पदन्यास करितो. अथर्ववेदकालीं ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र हे चार वर्ण होते इतकेंच नव्हे, तर ब्राह्मणांनां उच्च स्थानीं बसविलें आहे व त्यांस भूदेव असें म्हटलें आहे. अथर्ववेदाच्या अभिचारऋचांतील विषयांकडे पाहिलें असतां त्या फार प्राचीन असून सामान्य जनांत प्रचलित होत्या असें स्पष्ट दिसतें. परंतु अथर्ववेदसंहितेंतच त्यांनां ब्राह्मणी स्वरूप प्राप्त झालेलें आहे. इतर देशांतील लोकांनां ज्याप्रमाणें आपले अभिचारमंत्र, मोहिनीमंत्र, वगैरेंचा उत्पादक कोण हें माहीत नसतें, परंतु हे मंत्र सामान्यतः सर्व लोकांच्या प्रचारांत असतात, त्याप्रमाणेंच अथर्ववेदांतीलहि होते, परंतु या वेदाच्या संहिताकालांतच ते बरेचसे सामान्य जनांच्या कक्षेबाहेर गेले होते. हा संग्रह ब्राह्मणांनीं केला असून पुष्कळशीं सूक्तेंहि ब्राह्मणांनींच

रचिलीं आहेत, असें वाचकांस पदोपदीं दिसून येतें. विशेषणें व उपमा देण्याच्या कामीं तर वारंवार अथर्ववेदसूक्तांच्या संग्रहकारांची व थोड्या बहुत प्रमाणानें लेखकांची ही ब्राह्मणी दृष्टि चांगलीच दिसून येते. उदाहरणार्थ, क्षेत्रकर्मींविरुद्ध जो मंत्र आहे त्यांत संस्कारानें शुद्ध न केलेल्या अन्नाला ज्याप्रमाणें ब्राह्मण शिवत नाहीं, त्याप्रमाणें क्षेत्रकर्मींनीं क्षेत्रांतील धान्यास स्पर्श करूं नये असें म्हटलें आहे. ब्राह्मणांनां जेवूं घालणें, यज्ञांत त्यांनां दक्षणा देणें वगैरे ब्राह्मणांच्या हिताच्या गोष्टी असलेला असा जो एक सूक्तांचा भाग अथर्ववेदांत आहे, तो ब्राह्मणांनींच रचिला असला पाहिजे यांत संशय नाहीं. आतां, जसें जुन्या अभिचारमंत्रांनां ब्राह्मणी स्वरूप प्राप्त होणें हें नंतरच्या कालाचें दर्शक आहे, तसें अथर्ववेदांत वैदिक देवतांच्या कृतींचें जें वर्णन आहे त्यावरूनहि ही संहिता ऋग्वेदसंहितेनंतर तयार झाली हें स्पष्ट होतें. अग्नि, इंद्र वगैरे ऋग्वेदांतील देवता ह्या वेदांतहि दिसून येतात, पण यांचें वैशिष्ट्य नष्ट झालें असून त्या सर्व येथें जवळ जवळ सारख्याच दिसतात. निसर्गांतील शक्ती या नात्यानें मूळ जें त्यांनां महत्त्व होतें, तें पुष्कळ अंशीं नष्ट होऊन ह्या वेदांतील मंत्र राक्षसांचें निरसन व नाश ह्याकरितांच असल्याकारणानें, या कामाकरितां मात्र देवतांनां आव्हान करण्यांत येतें. म्हणजे अथर्ववेदांत देवता या निवळ राक्षससंहारक बनल्या आहेत. सरतेशेवटीं, अथर्ववेदांतील देवविषयक व जगदुत्पत्तिविषयक कल्पनांवरूनहि त्यांतील मंत्र ऋग्वेदानंतरचे आहेत हें सिद्ध होतें. ह्या वेदांत तत्त्वज्ञानपरिभाषेचा चांगलाच विकास झालेला आहे, व ईश्वर सर्वव्यापी आहे या कल्पनेचें जें परिणत स्वरूप उपनिषदांमध्यें आढळतें तेंच जवळ जवळ येथेंहि आढळतें.

तत्त्वज्ञानविषयक सूक्तें सुद्धां अभिचारमंत्र म्हणून उपयोगांत आणलेलीं आहेत. उदाहरणार्थ, तत्त्वविद्येंतील ''असत्'' ची मूळ कल्पना, राक्षस, शत्रु आणि अभिचारी ह्यांचा नाश करण्याच्या कामीं योजिलेली दिसून येते. यावरून या वेदांत जे अभिचार, मंत्र, तंत्र इत्यादि अंतर्भूत झालेले आहेत, ते जुन्या काळीं सामान्य जनांत प्रचलित असलेल्या साध्या जादूटोण्याची नंतरच्या कल्पना जोडून तयार केलेली कृत्रिम आवृत्ति होत हें स्पष्ट होतें.

**अथर्ववेदाचें स्थान.**—पुष्कळ दिवसपर्यंत भारतीय लोक अथर्ववेदाला पूज्य व पवित्र मानित नव्हते, व अजून सुद्धां ह्याविषयीं अनेक वेळां लढा पडतो, म्हणून हा वेद मागाहूनचा आहे, असें कांहीं निश्चित म्हणतां येणार नाहीं. ह्या वरील गोष्टीला कारण म्हणजे अथर्ववेदांतील विषयच आहे. ह्या वेदाचा हेतु ( शांतिपौष्टिकाभिचार कर्म ) अनिष्टशांति, इष्टपूर्ति व शत्रुपीडा हे आहेत. अभिशाप व भूतापसारण यांसंबंधीं मंत्रविधी अपवित्र मंत्रवर्गांत येत असल्यानें ब्राह्मणांनीं आपल्या ब्राह्मणधर्मापासून त्यांनां दूर ठेवण्याचा प्रयत्न केला. एकंदरींत पाहूं जातां, परमार्थसाधन व जादूविद्या ह्यांत तत्त्वतः मुळींच फरक नाहीं. दोन्ही अतींद्रिय सृष्टीवर ताबा चालवूं पाहतात. शिवाय आचार्य व जादूगार मूळांत एकच आहेत. परंतु प्रत्येक देशांतील लोकांच्या इतिहासांत असा एक काल येतो कीं, त्या वेळेस परमार्थसंप्रदाय व मंत्रविद्या एकमेकांपासून विभक्त होऊं पाहतात. त्यांत सर्वस्वी यश येत नाहीं ही गोष्ट निराळी. देवांशीं सख्य ठेवणारा पुरोहित, पिशाचांशीं संबंध ठेवणाऱ्या जादूगाराचा अनादर करितो आणि त्याला आपल्यापेक्षां कमी प्रतीचा लेखतो. हिंदुस्थानांत सुद्धां हें दोघांतील अंतर वाढत गेलें आहे. अथर्ववेदांतील अभिचारांपासून व मंत्रविद्येपासून अलिप्त राहण्याविषयीं बौद्ध व जैन भिक्षूंनां सक्त ताकीद असते इतकेंच नव्हे, तर ब्राह्मणी धर्मशास्त्रांतून सुद्धां चेटुक हें पाप मानिलें आहे, व चेटुक करणाराला दगलबाज व पाखंडी ह्यांच्या पंक्तीला बसवून त्यांनां शिक्षा करण्याची या शास्त्रानें राजाला आज्ञा केली आहे. उलटपक्षीं, ब्राह्मणांच्या धर्मशास्त्रांतून कांहीं ठिकाणीं, शत्रूविरुद्ध अथर्ववेदांतील अभिचारमंत्रांचा उपयोग करण्याविषयीं स्पष्ट परवानगी दिली आहे; आणि मोठमोठ्या यज्ञांचें वर्णन असलेल्या सूत्रग्रंथांतून पुष्कळसे भूतापसारणमंत्र आणि शत्रूंचा ( योऽस्मान् द्वेष्टि यं च वयं द्विष्मः) नायनाट करण्यास समर्थ अशा मंत्रविधींचीं वर्णनें आढळतात. तरीपण ह्या अभिचारवेदाविषयीं त्रैविद्य पुरोहितवर्गामध्यें एक प्रकारचा तिटकारा उत्पन्न झाला; हा वर्ग अथर्ववेदाला सत्य व प्राचीनत्व या दृष्टींनीं कमी प्रतीचा लेखीत असे म्हणून पवित्र धर्मग्रंथांत त्याचा समावेश करण्याचें पुष्कळ वेळां टाळलेलें आढळतें. मूळापासूनच पवित्र धार्मिक वाङ्मयांत ह्याचें स्थान अनिश्चित असून त्यासंबंधाच्या कल्पना कांहींशा चमत्कारिक दिसतात. जेथें जेथें म्हणून जुन्या ग्रंथांतून पवित्र धार्मिक विद्या म्हणून उल्लेख आला आहे, त्या त्या ठिकाणीं ऋग्वेद, यजुर्वेद व सामवेद ह्या ''त्रयी विद्ये''चा पहिल्यानें नामनिर्देश केलेला आढळतो; या त्रयी विद्येनंतर अथर्ववेदाचा उल्लेख सांपडला तर सांपडतो. कधीं कधीं असेंहि होतें कीं, वेदांगें व इतिहासपुराणें हीं सुद्धां धार्मिक ग्रंथमालिकेंत दृष्टीस पडतात, पण अथर्ववेद मात्र वगळला जातो. शांखायनाच्या गृह्यसूत्रामध्यें ( १·२,४,८ ) एक संस्कार वर्णन केला आहे; तो नवीन जन्म पावलेल्या मुलांच्या ठायीं वेदाधिक्षेपण करण्याचा होय. हें अधिक्षेपण विधियुक्त करण्यांत येतें व त्या वेळीं मंत्र म्हणावयाचा तो असा–''मी तुझ्या ठिकाणीं ऋग्वेदाधिक्षेपण करतों, मी तुझ्या ठिकाणीं यजुर्वेदाधिक्षेपण करतों, मी तुझ्या ठिकाणीं सामवेदाधिक्षेपण करतों, मी तुझ्या ठिकाणीं कथापुराणाधिक्षेपण करतों, मी तुझ्या ठिकाणीं सर्व वेदाधिक्षेपण करतों.'' या ठिकाणीं तर अथर्ववेदाला मुद्दाम वगळलेलें दिसतें. जुन्या

बौद्ध ग्रंथांतून सुद्धां विद्वान् ब्राह्मणांविषयीं उल्लेख करितांना ते तीन वेदांत पारंगत आहेत असें म्हटलें आहे. आतां अथर्ववेदाचा वरील सर्व ठिकाणीं उल्लेख केलेला नाहीं म्हणून अथर्ववेदसंहिता या सर्वांच्या मागाहूनची आहे असें म्हणणें निखालस चुकीचें ठरेल; कारण कृष्णयजुर्वेदाच्या एका संहितेंत, आणि कोठें कोठें ब्राह्मणें, उपनिषदें वगैरे ग्रंथांतून अथर्ववेदाचा इतर तीन वेदांबरोबर उल्लेख केलेला आढळतो.

अथर्ववेदसंहितेची उपलब्ध प्रत ऋग्वेदसंहितेच्या मागाहूनची आहे हें जरी खरें आहे, तथापि ह्यावरून असें कांहीं निघत नाहीं कीं, त्यांतील सर्वच सूक्तें ऋग्वेदसूक्तांनंतरचीं आहेत. फक्त एवढें सिद्ध होतें कीं, अथर्ववेदांतील सर्वांत मागाहूनचीं सूक्तें हीं ऋग्वेदांतील सर्वांत मागाहूनच्या सूक्तांनंतरचीं आहेत. ज्याप्रमाणें अथर्ववेदांतील बरींचशीं सूक्तें पुष्कळशा ऋग्वेदसूक्तांनंतरचीं आहेत, त्याचप्रमाणें अथर्ववेदांतील अभिचारऋचा या ऋग्वेदांतील यज्ञसंबंधीं ऋचांपेक्षां जरी जास्त जुन्या नसल्या तरी त्यांच्या इतक्याच जुन्या आहेत हेंहि निश्चित आहे व अथर्ववेदांतील अनेक सूक्तें ऋग्वेदांतील जुन्यांत जुन्या सूक्तांइतकींच प्राचीन, त्याच अज्ञात प्रागैतिहासिक कालांतील, आहेत. 'अथर्ववेदकाल' म्हणून ठराविक मर्यादित काल असा नाहीं. ऋग्वेदसंहितेप्रमाणें अथर्ववेदांतील कांहीं कांहीं सूक्तांच्या रचनाकालामध्यें कित्येक शतकांचें अंतर आहे. आणि म्हणून अथर्ववेदाच्या शेवटचीं शेवटचीं सूक्तेंच काय तीं ऋग्वेदसूक्तांच्या धर्तीवर रचलीं आहेत, असें म्हणतां येईल. "हिंदुस्थानांतील अतिशय जुने अभिचार गद्यात्मक होते आणि पद्यमय ऋचा व सूक्तें हीं सर्व ऋग्वेदांतील यज्ञविषयक सूक्तांच्या धर्तीवर रचलीं आहेत" हें ओल्डनबर्गचें मत डॉ. विंटरनिट्झला चुकीचें वाटतें. ऋग्वेदांतील विषय व कल्पना हीं अथर्ववेदाहून अगदीं निराळीं आहेत. ऋग्वेदांतील सृष्टि निराळी व अथर्ववेदांतील निराळी. एकांत पंचमहाभूतात्मक मोठमोठे देव आहेत, गायक त्यांचा जयजयकार व स्तुति करीत आहे, त्यांच्या प्रीत्यर्थ यज्ञ करीत आहे; ते फार बलाढ्य, संकटसमयीं धांवून येणारे, कांहींसे उदार मनाचे, बहुतांशीं आनंद व प्रकाशदायी असे आहेत; तर इकडे दुसऱ्या सृष्टींत, मनुष्यजातीवर संकटें व पीडा आणणाऱ्या दुष्ट आसुरी शक्ती, भयप्रद पिशाचें, त्यांच्यावर उग्र शाप सोडणारे किंवा त्यांची मिथ्या प्रशंसा करून त्यांचें शमन व निराकरण करूं पहाणारे मांत्रिक इत्यादि आढळतात. या वेदांतील पुष्कळशीं सूक्तें व तत्संबंधीं तंत्रविधी या गोष्टी अशा प्रकारच्या कल्पनांच्या वर्गांत मोडतात कीं त्या कल्पना पृथ्वीवरील अगदीं भिन्न संस्कृतीच्या लोकांत आढळत असून त्यांजमध्यें विलक्षण सादृश्य असतें. उदाहरणार्थ, उत्तर अमेरिकेंतील इंडियन, आफ्रिकेंतील नीग्रो, मलायी व मोंगल, पुरातन ग्रीक व रोमन, आणि यूरोपखंडांतील आजकालचे कृषीवल या सर्व लोकांच्या जारणमारणविषयक कल्पना, व मंत्रतंत्र आणि त्यांमधील विचारांच्या विलक्षण उड्या ह्या सर्व गोष्टी पुरातन हिंदू लोकांच्या अथर्ववेदांतल्याप्रमाणेंच दिसतात. तेव्हां, अथर्ववेदांतील पुष्कळशा ऋचांचे विषय व त्यांचें स्वरूप अमेरिकन इंडियन वैदूलोक व तार्तरशामन ह्यांचे मंत्र, व अति प्राचीन जर्मन काव्यावशेषांत आढळणारे मर्सेबर्ग मंत्र, यांच्याशीं बहुतेक जुळतें. उदाहरणार्थ, मर्सेबर्ग मंत्रसंग्रहांत एक मंत्र असा आहे कीं, वोडन (Woden) या मांत्रिकानें बाल्डर (Balder) याच्या शिंगराचा मुरगळलेला पाय खालील मंत्रानें बरा केला. 'हाडाशीं हाड, रक्ताशीं रक्त, अवयवाशीं अवयव अगदीं चिकटविल्याप्रमाणें (एकजीव होवो)' अगदीं ह्यासारखाच मंत्र अथर्ववेदांत (४·१२), पाय मोडलेल्यावर आहे.

सं ते॑ म॒ज्ञा म॒ज्ज्ञा भ॑वतु॒ समु॑ ते॒ परु॑षा॒ परुः॑ ।
सं ते॑ मां॒सस्य॒ विस्र॑स्तं॒ सम॒स्थ्यपि॑ रोहतु ॥ ३ ॥

म॒ज्ञा म॒ज्ज्ञा संधी॑यतां॒ चर्म॑णा॒ चर्म॑ रोहतु ।
असृ॑क् ते॒ अस्थि॑ रोहतु मां॒सं मां॒सेन॑ रोहतु ॥ ४ ॥

लोम॒ लोम्ना॒ सं क॑ल्पया त्व॒चा सं क॑ल्पया॒ त्वच॑म् ।
असृ॑क् ते॒ अस्थि॑ रोहतु छि॒न्नं सं ध॑ह्योषधे ॥ ५ ॥
अथर्व. ४. १२.

तुझ्या शरिरांतील मज्जांशीं ह्या तुटलेल्या मज्जा, व अवयवांशीं तुटलेला अवयव जोडला जावो. शरिरांतील नाहींसें झालेलें मांस व मोडलेलें हाड पुन्हां वाढो. ३.

मज्जांत मज्जा मिळून जावोत. फाटलेलें कातडें पुन्हां एक होवो. तुझ्या शरिरांतील नाहींसें झालेलें रक्त व मोडलेलें हाड पुन्हां उत्पन्न होवो आणि मांसांची वाढ होवो. ४.

हे वनस्पते, नाहींसे झालेले केस तुझ्यामुळें पुन्हां येवोत, कातड्याशीं कातडें मिळून जावो. रक्त व हाड वाढो; आणि याप्रमाणें झालेली जखम पूर्ण बरी होवो. ५.

अथर्ववेदसंहितेला जें विशेष महत्त्व प्राप्त झालें आहे तें खालील गोष्टीमुळें होय. भूतपिशाचें, मुंजे, राक्षस वगैरे पुष्कळ निरनिराळ्या योनींसंबंधानें आणि यज्ञसंस्था तसेंच तत्त्वज्ञानयुक्त विचार यांपासून पृथक्त्वानें वागत असलेल्या लोकांच्या निरनिराळ्या काय समजुती होत्या यावद्दलचें यथार्थ ज्ञान मिळण्यास हें अमूल्य साधन आहे. हें ज्ञान मानववंशशास्त्र व देवविषयक कल्पनांचा इतिहास यांच्या अभ्यासकांस अत्यंत महत्त्वाचें आहे हें उघड आहे. मनुष्यजातीचा बौद्धिक इतिहास जाणूं इच्छिणाऱ्या शास्त्रज्ञाला अथर्ववेदाचें ज्ञान किती आवश्यक आहे हें त्यांतील कांहीं निरनिराळ्या प्रकारच्या सूक्तांचा विचार केला असतां दिसून येईल.

**भैषज्यसूक्तें.**—अथर्ववेदांतील एक प्रमुख भाग म्हणजे रोग बरे करण्याच्या प्रयोगांतील मंत्र होत. यांस भैषज्यसूक्तें म्हणतात. कांहीं मंत्र, रोग हे राक्षसांसारख्या व्यक्ती आहेत असें कल्पून त्यांनां संबोधून म्हटले जातात; तर कांहीं, अमुक राक्षसवर्ग अमुक रोग उत्पन्न करितो असें समजून त्यांनां उद्देशून म्हटले जातात. इतर लोकांप्रमाणें हिंदू लोकांत सुद्धां अशी समजूत आहे कीं, हे राक्षस रोग्यांनां बाहेरून छळतात व बोकांडीं बसतात किंवा त्यांच्या अंगांत संचार करतात. कांहीं मंत्रांत रोगनिवारक औषधीचें आवाहन व स्तुति असते, कांहींत रोगनिवारण करण्याची विशिष्ट शक्ति असलेल्या पाण्याची प्रार्थना असते तर कांहींत लोकांच्या समजुतीप्रमाणें राक्षसांनां पळवून लावण्यांत अग्रणी जो अग्नि त्याची प्रार्थना असते. हे मंत्र व तत्संबंधीं प्रयोग (तंत्र) हाच आयुर्वेदाचा मूळ आरंभ होय. या वैद्यकाचें वर्णन पुढें कौशिकसूत्रांत आलेलें आहे. ह्या मंत्रांतून निरनिराळ्या रोगांचीं लक्षणें फार विशद रीतीनें दिलीं आहेत व म्हणून वैद्यकाच्या इतिहासाच्या कामीं त्यांचा फार उपयोग आहे. वरील विधान तापाच्या मंत्रांस विशेष लागू पडतें. ताप हा वारंवार येणारा व तीव्र पीडा देणारा रोग असल्यामुळें वेदांमागून पुष्कळ काळानंतर झालेल्या ग्रंथांतहि त्याला 'रोगांचा राजा' अशी संज्ञा आहे. अथर्ववेदांत तक्मन् नांवाच्या ज्वराला राक्षस असें कल्पून त्याला संबोधून पुष्कळ मंत्र लिहिले आहेत. ह्याला उदाहरण म्हणजे अथर्ववेदांतील ५ व्या कांडांतील २२ वें सूक्त होय. त्यांतील कांहीं ऋचा खालीं दिल्या आहेत.

अयं यो विश्वान् हरितान् कृणोष्युंच्छोचयंन्नग्निरिवाभिदुन्वन्। अधा हि तंक्मन्नरसो हि भूया अधान्यङ्ङधराङ्वापरेंहि ॥ २ ॥

यः परुषः पारुषेयो विध्वंस इवारुणः । तक्मानं विश्वधावीर्याधराञ्चं परा सुव ॥ ३ ॥

तक्मन् मूजंवतो गच्छ बल्हिकान् वा परस्तराम् । शूद्रामिच्छ प्रफर्व्यं१तां तंक्मन् वीव धूनुहि ॥ ७ ॥

यत् त्वं शीतोथों रूरः सह कासावेंपयः । भीमास्ते तक्मन् हेतयुस्ताभिः स्म परिं वृङ्धि नः ॥ १० ॥

तक्मन् भ्रात्रा बलासेंन स्वस्रा कासिंकया सह । पाप्मा भ्रातृंव्येण सह गच्छामुमरणं जनंम् ॥ १२ ॥ अथर्व. ५. २२.

अग्नीप्रमाणें रखरखीत तापानें जाळून, तूं विश्वलोकांला पिंवळे करून सोडतोस; तेव्हां हे तक्मन्* ! तूं दुर्बल व निस्तेज हो; अधराला जा किंवा येथून नाहींसा हो. २.

* ताप; ज्वर.

जो परुष जळजळीत व परुषापासून उत्पन्न झालेला (सांसर्गिक ?) अरुणवर्णाच्या धूलीप्रमाणें* आहे अशा तक्म्याला, आपल्या अंगीं विश्ववीर्य धारण करून रसातळाला पोंचवा. ३.

हे तक्मन् ! मूजवन्तांकडे जा, किंवा त्यापलीकडे बल्हिकांकडे जा. एखाद्या कामुक शूद्र युवतीला गांठ व तिला मनसोक्त हालीव. ७.

तूं एकदां थंड तर एकदां तप्त असतोस (व) कासा (खोकल्या)च्या योगानें आम्हांला हालवून सोडतोस; हे तक्मन् ! हीं तुझीं उपकरणें फार भयंकर आहेत; त्यांनीं आम्हांला इजा करण्याचें सोडून दे. १०.

हे तक्मन् ! तुझा भाऊ बलास, बहिण कासिका (कास) व पुतण्या पुरळ (पाप्मन्) यांसह त्या विदेशी लोकांकडे जा. १२.

रोगांनीं इतर लोकांनां पछाडावें, दुसऱ्या देशांवर त्यांनीं हल्ला करावा ही इच्छा अथर्ववेदांत वारंवार दर्शविली आहे.

खोकल्याला रोग्यापासून ज्या मंत्राच्या प्रयोगानें दूर हांकलून दिलें जातें तो मंत्र असाः—

यथा मनों मनस्केतैः परापतंत्याशुमत् ।
एवा त्वं कासे प्र पंत मनसोनुं प्रवाय्यम् ॥ १ ॥
यथा बाणः सुसंशितः परापतंत्याशुमत् ।
एवा त्वं कासे प्र पंत पृथिव्या अनुं संवतंम् ॥ २ ॥
यथा सूर्यस्य रश्मयंः परापतंन्त्याशुमत् ।
एवा त्वं कासे प्र पंत समुद्रस्यानुं विक्षरम् ॥ ३ ॥
अथर्व. ६. १०५.

ज्याप्रमाणें मन बुद्धिगम्य अशा दूरस्थविषयांबरोबर (म्ह. ध्रुवमंडलापर्यंत) वेगानें जातें, त्याप्रमाणें, हे कासे ! तूं मनोवेगानें जा. १.

ज्याप्रमाणें सज्ज केलेला तीक्ष्ण बाण वेगानें (भूमी भेदून) जातो, त्याप्रमाणें हे कासे ! तूं (बाणानें भेद केलेल्या) भूमीला अनुलक्षून (पातालापर्यंत) जा. २.

ज्याप्रमाणें सूर्याचे किरण वेगानें जातात त्याप्रमाणें हे कासे ! तूं समुद्राच्या प्रवाहाबरोबर जा. ३.

कांहीं मंत्र, त्यांच्या उदात्त व सौंदर्यपूर्ण भाषेमुळें, भावपूर्ण काव्याचे उत्कृष्ट मासले आहेत असें म्हणण्यास हरकत नाहीं. आतां या काव्यांत फारसा रस सांपडेल अशी अपेक्षा अर्थातच करतां कामा नये; मात्र मधून मधून कांहीं

* या विशेषणावरून हा विशिष्ट ताप गोंवर किंवा मधुरा असूं शकेल.

सुंदर कल्पनाचित्रें दृष्टीस पडून चित्ताला आश्चर्य व आल्हाद किंवा मौज यांपैकीं कांहीं तरी वाटेल; कां कीं, या वैदिक कवींनीं आपली उपमा देण्याची इच्छा रक्तवाहिन्या, जंत यांपर्यंत नेऊन भिडविलेली दिसेल. एक सुंदर कल्पना अथर्व. १. १७ यामध्यें आहे. हा मंत्र रक्तस्रावस्तंभक असून त्यांत शिरांना रक्तांबरधारी कुमारिका असें म्हटलें आहे.

अमूर्या यन्ति योषितो हिरा लोहितवाससः ।
अभ्रातर इव जामयस्तिष्ठन्तु हतवर्चसः ॥ १ ॥
तिष्ठावरे तिष्ठ पर उत त्वं तिष्ठ मध्यमे ।
कनिष्ठिका च तिष्ठति तिष्ठादिद्धमनिर्मही ॥ २ ॥
शतस्य धमनीनां सहस्रस्य हिराणाम् ।
अस्थुरिन्मध्यमा इमा साकमन्ता अरंसत ॥ ३ ॥
परि वः सिकतावती धनूर्बृहत्यक्रमीत् ।
तिष्ठतेलयता सु कम् ॥ ४ ॥

अथर्व. १. १७.

या रक्तवस्त्र नेसून जाणाऱ्या योषिता, रक्तवाहिन्या (नाड्या), भाऊ नसलेल्या बहिणींप्रमाणें हतबल होऊन, जागच्या जागीं स्तब्ध उभ्या राहोत. १.

खालची (खालच्या भागांतून वाहणारी) धमनी! तूं थांब; अगे वरची! तूंहि थांब; (त्याचप्रमाणें) मधली! तूं पण थांब. सर्वांत लहान धमनी तर थांबलीच व मोठीहि थांबूं दे. २.

शंभर धमन्या व हजार शिरा यांमधील नाड्यासुद्धां थांबल्या व बाकी राहिलेल्या या निवृत्तरुधिरस्रावा धमन्यांबरोबर खेळूं लागल्या (त्यांच्याप्रमाणें यांनींहि आपलें काम सोडलें) ३.

सिकतावती व धनूसारख्या विशिष्ट नाडीनें तुम्हांस आक्रमिलें आहे; तेव्हां तुम्ही थांबा व याला (रोग्याला) सुख द्या. ४.

नेहमींच ह्या ऋचा काव्यरसभरित असतात असें नाहीं; तर पुष्कळ वेळां अगदीं एकतानी असतात; आणि पुष्कळशा ऋचांमध्यें हा एकसुरीपणा, म्हणजे प्रत्येक ऋचेंत त्याच त्याच शब्दांचें आणि वाक्यांचें पुनरुच्चारण, एवढेंच काय तें काव्याचें रूप असतें. या बाबतींत प्राथमिक स्थितींतील लोकांच्या कवितांशीं या वरील प्रकारच्या अथर्ववेदांतील ऋचा अगदीं समान आहेत. इतर सर्व लोकांच्या मंत्रांशीं या अथर्ववेदांतील मंत्रांचें दुसरेंहि एक प्रकारचें साम्य आहे, तें म्हणजे यांचा अर्थ पुष्कळ वेळां बुद्धिपुरस्सर गूढ व दुर्गम ठेवलेला असतो. अशा एकसुरी आणि गूढार्थी ऋचांचें एक उदाहरण अथर्व ६·२५ मध्यें आहे. हा गंडमाळेचा मंत्र आहे.



पञ्च च याः पञ्चाशच्च संयन्ति मन्या अभि ।
इतस्ताः सर्वा नश्यन्तु वाका अपचितामिव ॥ १ ॥
सप्त च याः सप्ततिश्च संयन्ति ग्रैव्या अभि ।
इतस्ताः सर्वा नश्यन्तु वाका अपचितामिव ॥ २ ॥
नव च या नवतिश्च संयन्ति स्कन्ध्या अभि ।
इतस्ताः सर्वा नश्यन्तु वाका अपचितामिव ॥ ३ ॥

अथर्व. ६. २५.

पांच आणि पन्नास ज्या गळ्याच्या वरच्या भागावर (मन्या धमनीवर) जमल्या आहेत, त्या सर्व कटकट करणाऱ्या अपचित् किड्याप्रमाणें नाश पावोत. १.

ज्या सात आणि सत्तर (गंडमाळा) ग्रैव्यानाडीवर एकत्र जमल्या आहेत, त्या सर्व कटकट लावणाऱ्या अपचित् किड्याप्रमाणें नाश पावोत. २.

ज्या नऊ आणि नव्वद, स्कंधाभोंवतीं जमल्या आहेत, त्या सर्व कटकट लावणाऱ्या किड्याप्रमाणें नाश पावोत. ३.

वरेचसे रोग जंतूंपासून उत्पन्न होतात अशी कल्पना बरीच प्राचीन आहे; व म्हणून अथर्ववेदांत सर्व जातींच्या जंतूंचें अपसारण करण्यासाठीं एक मंत्रमालिकाच तयार केलेली आहे.

अन्वान्त्र्यं शीर्षण्य१मथो पार्ष्टेयं क्रिमीन् । अवस्कवं व्यध्वरं क्रिमीन् वचसा जम्भयामसि ॥ ४ ॥

ये क्रिमयः पर्वतेषु वनेष्वोषधीषु पशुष्वप्स्व१न्तः । ये अस्माकं तन्वमाविविशुः सर्वं तद्धन्मि जनिम क्रिमीणाम् ॥ ५ ॥ अथर्व. २. ३१.

आंतड्यांत, डोक्यांत व पार्ष्णींत असणारे कृमी, आंत शिरणारे कृमी (अवस्कव) व अनेक मार्ग करून आंत शिरणारे कृमी (व्यध्वर) या सर्वांना मी मंत्राच्या योगानें मारून टाकतों. ४.

जे कृमी पर्वतांत, वनांत, वनस्पतींत, पशूंत व पाण्यांत असतात, जे आमच्या शरीरांत शिरले आहेत, त्या सर्व कृमींचें कूळच नाहींसें करतों. ५.

हे जंतू असुर आहेत, त्यांच्यांत राजा प्रधान वगैरे अधिकारी आहेत, त्यांच्यांत सुद्धां लिंगभेद—स्त्रीपुरुष जात—आहे, त्यांचे रंग विविध आहेत, ते निरनिराळीं रूपें धारण करितात वगैरे ह्या रोगजंतूंविषयीं लोकांच्या भावना असत. ह्याचें उदाहरण अथर्ववेदाच्या ५ व्या कांडांत २३ व्या सूक्तांत आढळतें; त्यांत मुळांत लहान असलेल्या रोगजंतूंविरुद्ध खालील ऋचा आहेतः

अस्येन्द्र कुमारस्य क्रिमीन् धनपते जहि । हता विश्वा अरातय उग्रेण वचसा मम ॥ २ ॥

यो अक्ष्यौ॒ परि॒सर्प॑ति॒ यो नासे॑ परि॒सर्प॑ति । द॒तां यो मध्यं॒ गच्छ॑ति॒ तं क्रिमिं॑ जम्भयामसि ॥ ३ ॥

सरू॑पौ॒ द्वौ विरू॑पौ॒ द्वौ कृ॒ष्णौ द्वौ रोहि॑तौ॒ द्वौ । ब॒भ्रुश्च॑ ब॒भ्रुक॑र्णश्च गृध्रः॒ कोक॑श्च॒ ते ह॒ताः ॥ ४ ॥

ये क्रिम॑यः शिति॒कक्षा॒ ये कृ॒ष्णाः शिति॒बाह॑वः । ये के च॑ वि॒श्वरू॑पा॒स्तान् क्रिमी॑न् जम्भयामसि ॥ ५ ॥

ह॒तो रा॒जा क्रिमी॑णामु॒तैषां॑ स्थ॒पति॑र्ह॒तः । ह॒तो ह॒तमा॑ता॒ क्रिमि॑र्ह॒तभ्रा॑ता ह॒तस्व॑सा ॥ ११ ॥

ह॒तासो॑ अस्य वे॒शसो॑ ह॒तासः॒ परि॑वेशसः । अथो॒ ये क्षु॑ल्ल॒का इ॑व॒ सर्वे॒ ते क्रिम॑यो ह॒ताः ॥ १२ ॥

सर्वे॑षां च॒ क्रिमी॑णां॒ सर्वा॑सां च॒ क्रि॒मीणा॑म् । भिनद्म्यश्म॑ना॒ शिरो॑ दहा॑म्य॒ग्निना॒ मुख॑म् ॥ १३ ॥ अथर्व. ५. २३.

हे धनपते इंद्रा! या मुलाच्या अंगावरील कृमींनां मारून टाक. माझ्या उग्र मंत्राच्या योगानें सर्व शत्रू मारले गेले. २.

जो कृमि डोळ्यांत शिरतो, जो नाकांत शिरतो, जो दांतांच्या मध्यें शिरतो, त्याला मी मारून टाकतों. ३.

दोन एकवर्णाचे, दोन भिन्नवर्णाचे, दोन काळे, दोन तांबडे, पिंगट व पिंगट कानाचा, गिधाड व लांडगा, हे सर्व मारले गेले. ४.

ज्या कृमींच्या कुशी पांढऱ्या आहेत, जे कृष्णवर्णाचे असून ज्यांचे बाहू पांढरे आहेत, ज्यांचें रूप, रंग अनेक प्रकारचें आहे, त्या कृमींनां मारून टाकतों. ५.

कृमींचा राजा मारला गेला, त्यांचा स्थपति गेला, ज्याची आई, भाऊ, वहीण मारली गेली, तो कृमीहि मारला गेला. ११.

त्याचा परिवार मारला गेला, त्याच्या सभोंवतालची मंडळी मारली गेली, व जे क्षुल्लक म्हणून दिसत होते, ते सर्व कृमी मारले गेले. १२.

सर्व स्त्रीपुरुष कृमींपैकीं प्रत्येकाचें डोकें मी दगडानें चेंचतों, व प्रत्येकाचें तोंड अग्नीनें भाजून काढतों. १३.

निरनिराळ्या रोगांचे उत्पादक मानल्या जाणाऱ्या अनेक भूतवर्गांनां–विशेषतः पिशाचें व राक्षस यांनां–उद्देशून रचलेले असेहि पुष्कळ मंत्र या वेदांत आहेत. यांचा उद्देश त्यांचें अपसारण हा आहे. ह्याला उदाहरण म्हणून पिशाचांविषयींच्या कांहीं ऋचांतून खालीं दिलेल्या ऋचा निवडून घेतल्या आहेत, त्या अशाः—

तप॑नो अस्मि पिशा॒चानां॑ व्या॒घ्रो गोम॑तामिव । श्वानः॑ सिं॒हमि॑व दृ॒ष्ट्वा ते न वि॑न्दन्ते॒ न्यञ्च॑नम् ॥ ६ ॥

न पि॑शा॒चैः सं श॑क्नोमि॒ न स्ते॒नैर्न व॑न॒र्गुभिः॑ । पि॒शा॒चास्तस्मा॑न्नश्यन्ति॒ यम॒हं ग्राम॑मावि॒शे ॥ ७ ॥

यं ग्राम॑मावि॒शत॑ इ॒दमु॒ग्रं सहो॒ मम॑ । पि॒शा॒चास्तस्मा॑न्नश्यन्ति॒ न पा॒पमु॑प जानते ॥ ८ ॥ अथर्व. ४. ३६.

गुरांच्या मालकांनां ज्याप्रमाणें वाघापासून उपद्रव होतो त्याप्रमाणेंच पिशाच्चांनां माझ्या मंत्रसामर्थ्यामुळें त्राहि भगवान् होतें. सिंहाला पाहिल्यावर कुत्र्याला ज्याप्रमाणें दडून बसण्यास अवकाश मिळत नाहीं. त्याप्रमाणें पिशाच्चांनांहि (मला चुकवून) लपून बसणें शक्य नाहीं. ६.

पिशाच्चांबरोबर, चोरांबरोबर व रानांत भटकणाऱ्यांबरोबर मी मुळींच संबंध ठेवीत नाहीं. उलट मी ज्या ज्या गांवांत प्रवेश करतों तेथून सर्व पिशाच्चें नाहींशीं होतात. ७.

ज्या ज्या गांवांमध्यें माझ्या मंत्रसामर्थ्याचा प्रादुर्भाव होतो तेथून पिशाच्चें पार पळून जातात, व लोकांनां मुळींच त्रास होत नाहीं. ८.

त्यावरून मांत्रिकांचा आपल्या शक्तीविषयीं किती निःसीम आत्मविश्वास होता हें चांगलें दृष्टोत्पत्तीस येतें.

राक्षस, भूतपिशाच्चें वगैरे प्राणी मनुष्यप्राण्यांवर रोग आणून सोडतात अशी जी समजूत आहे तिच्याखेरीज दुसरी एक सर्व जगांत रूढ अशी समजूत म्हणजे, आसुरी स्त्रीपुरुष मानवी स्त्रीपुरुषांनां रात्रीच्या वेळीं अडवितात व त्यांच्यावर बलात्कार करितात, ही होय. पुरातन हिंदू लोकांतील असे स्त्रीपुरुष म्हणजे अप्सरा व गंधर्व हे होत. ह्या निसर्गदेवता, जलदेवता, वनदेवता अशांपैकीं देवता आहेत. ह्यांचें निवासस्थान म्हणजे नद्या, झाडें वगैरे असून मनुष्यांनां भुरळ घालून त्यांच्याशीं सृष्टिनियमाविरुद्ध संभोग करण्याकरितांच हे आपलीं निवासस्थानें सोडून बाहेर पडतात. अशा देवतांचा उपद्रव नाहींसा करण्याकरितां त्या काळचे मांत्रिक अजशृंगी नांवाच्या सुवासिक वनस्पतीचा उपयोग करीत व त्या प्रसंगीं अथर्ववेदाच्या ४ थ्या कांडांतील ३७ वें सूक्त तोंडानें म्हणत. त्यांत खालील ऋचा आहेतः—

त्वया॑ व॒यम॑प्स॒रसो॑ गन्ध॒र्वांश्चा॑तयामहे । अज॑शृङ्ग्यज॒ रक्षः॒ सर्वा॑न् ग॒न्धेन॑ नाशय ॥ २ ॥

न॒दीं य॑न्त्वप्स॒रसो॒ऽपां ता॒रम॑वश्व॒सम् । गु॒ल्गु॒लूः पीला॑ नल॒द्यौ॒३॑क्षग॑न्धिः प्रम॒न्दनी॑ । तत् परे॑ताप्सरसः॒ प्रति॑बुद्धा अभूतन ॥ ३ ॥

यत्रा॑श्व॒त्था न्य॒ग्रोधा॑ महावृ॒क्षाः शि॑ख॒ण्डिनः॑ । तत् परे॑ताप्सरसः॒ प्रति॑बुद्धा अभूतन ॥ ४ ॥

आ॒नृत्य॑तः शिख॒ण्डिनो॑ गन्ध॒र्वस्या॑प्सरा॒पतेः॑ । भि॒नद्मि॑ मु॒ष्कावपि॑ यामि॒ शेपः॑ ॥ ७ ॥

श्वेवैकः कुपिरिवैकः कुमारः सर्वकेशकः । प्रियो दृश इव भूत्वा गन्धर्वः सचते स्त्रियस्तमितो नाशयामसि ब्रह्मणा वीर्यावता ॥ ११ ॥

जाया इद्वो अप्सरसो गन्धर्वाः पतयो यूयम् । अप धावता मर्त्या मर्त्यान् मा सचध्वम् ॥ १२ ॥ अथर्व. ४. ३७.

तुझ्या योगानें आम्हीं गंधर्वांचा व आप्सरांचा नाश करून टाकतों. हे अजशृंगि, सर्व राक्षसांना पळवून लाव; तुझ्या वासानें सर्वांचा नाश कर. २.

ह्या अप्सरा नदीमध्यें आपल्या स्थानीं जावोत. गुल्गुलू, पीला, नलदी, अक्षगंधी, प्रमन्दनी यांच्या हवनानें त्या भिऊन जातात. आतां त्या गेल्यामुळें तुमचें लक्ष ठिकाणावर आलें. ३.

अप्सरा गेल्या त्या ठिकाणीं अश्वत्थ, न्यग्रोध असे मोठाले वृक्ष आहेत, मोर आहेत. त्या गेल्यामुळें आतां तुमचें चित्त ठिकाणीं आलें आहे. ४.

मोराप्रमाणें नाचणारा हा अप्सरेचा पति गंधर्व याचें मी वृषण दाबून इंद्रिय छेदून टाकतों. ७.

कोणी कुत्र्याचें, कोणी माकडाचें, कोणी मुलाचें रूप घेऊन, सर्वांगावर केंस वाढवून, मोठें मोहक रूप घेऊन हे गंधर्व अप्सरांच्या मागें लागले आहेत. त्यांचा मी मंत्र-सामर्थ्यानें नाश करतों. ११.

गंधर्व हो, तुम्ही पती व अप्सरा तुमच्या पत्न्या, सर्व तुम्ही अमर आम्हां मर्त्यजनांपासून दूर जा, आमच्यामध्यें बिलकुल येऊं नका. १२.

**आरोग्यमंत्र आणि ताईत.**–अथर्ववेदसूक्तांचा पहिला वर्ग रोगनिवारक मंत्रप्रयोगांचा धरला तर दुसरा वर्ग आयुरारोग्यार्थ म्हणावयाच्या प्रार्थनामंत्रांचा होईल. या दोहोंच्या स्वरूपांत फारसा फरक नाहीं. हे प्रार्थनामंत्र विशेषतः चौल, उपनयन वगैरे गृह्यसंस्कारांच्या वेळीं वापरतात. ह्या प्रत्येक प्रसंगीं, शंभर पावसाळे किंवा शंभर हिंवाळे इतकें दीर्घायुष्य, शंभर किंवा एकशेंएक प्रकारच्या मृत्यूंपासून मुक्तता व सर्व जातींच्या रोगांपासून संरक्षण होण्याविषयींच्या एकसुरी प्रार्थना या वर्गांतील मंत्रांतून केलेल्या आढळतात.

अथर्ववेदाच्या १७ व्या कांडांत एकच तीस ऋचांचें जें सूक्त आहे तें अशा प्रकारचें आहे. ज्याप्रमाणें रोगनिवारक मंत्रांनीं मांत्रिकवैद्य रोगनाशक औषधींनां आह्वान करतात त्याचप्रमाणें आयुरारोग्यार्थ म्हणावयाचे प्रार्थनामंत्र हे तन्निमित्त धारण केलेल्या ताइतांनां उद्देशून म्हटले जातात.

**पौष्टिकमंत्र.**—ह्या वरील प्रार्थनामंत्रांसारखेच पुष्कळसे पौष्टिकमंत्रहि सांपडतात. शेतकरी, धनगर, व्यापारी हे लोक असे मंत्र म्हणून सुख व आपल्या कामांत चांगलें यश मिळण्याची इच्छा करितात. घर बांधण्याच्या वेळीं करण्याच्या प्रार्थना, जमीन नांगरणें, बीं पेरणें, धान्य उगवणें, कीड मरून जाणें यांसंबंधीं स्तवनें, अग्निपीडानिवारक मंत्र, पर्जन्यमंत्रांतील पर्जन्यप्रार्थना, गोकुलसमृद्धिविषयक आराधना, चोर व हिंस्र पशू यांचें निरसन होण्याविषयीं गोपालानें म्हणावयाचे मंत्र, आपल्या धंद्यांत यश व प्रवासांत सुख मिळण्यासाठीं व्यापाऱ्यानें करावयाची अभ्यर्थना, द्यूतकारानें फांसा चांगला पडावा म्हणून करावयाची आराधना, सर्पाचें विष उतरणें व त्याला बाहेर काढून देणें यावद्दल मंत्रप्रयोग वगैरे विषय पौष्टिकमंत्रांतून आढळतात. ह्यांपैकीं फारच थोड्या ऋचांनां काव्य असें म्हणतां येईल. मात्र, कधीं कधीं एखाद्या साधारण दर्जाच्या लांबलचक सूक्तांतून तुटक तुटक पण फारच सुंदर अशा ऋचा सांपडतात. अथर्वसंहितेंतील ४ थ्या कांडाच्या १५ व्या सूक्तांतील पर्जन्यसूक्त फारच सुंदर आहे त्यांतील दोन ऋचा खालीं देतोंः—

समुत्पतन्तु प्रदिशो नभस्वतीः
समभ्राणि वातजूतानि यन्तु ।
महऋषभस्य नदतो नभस्वतो
वाश्रा आपः पृथिवीं तर्पयन्तु ॥ १ ॥
अभि क्रन्द स्तनयार्दयोदधिं
भूमिं पर्जन्य पयसा समङ्धि ।
त्वया सृष्टं बहुलमैतु वर्षमा-
शारैषी कृशगुरेत्वस्तम् ॥ ६ ॥
अथर्व. ४. १५.

सर्व दिशांकडून वाऱ्याच्या योगानें पर्जन्यमेघ एकत्र जमोत. माजलेल्या बैलाप्रमाणें गर्जना करणाऱ्या मेघांमधून पृथ्वीवर भरपूर पर्जन्यवृष्टि होवो. १.

हे पर्जन्या, मोठ्यानें गर्जना कर, समुद्र खवळून टाक आणि चांगली वृष्टि करून जमीन भिजव. पावसाच्या जोराच्या सरी पाड. सूर्य मेघाच्छादित करून पाऊस पाड. ६.

सुख आणि शांति, व संकटनिवारण ह्याप्रीत्यर्थ सर्वसाधारण प्रार्थनेचे जे पौष्टिकमंत्र असतात, त्यांतून काव्याचा भाग फारच थोडा असतो.

**प्रायश्चित्तमंत्र.**–संकट निवारण करण्याबद्दलच्या प्रार्थनामंत्रांत "मृगारसूक्त" नांवाचे शांतिपाठ आहेत. अथर्व. ४·२३–२९ हीं सात ऋचांचीं सात सूक्तें असून तीं अनुक्रमें, (१) अग्नि, (२) इंद्र, (३) वायु आणि सवितृ, (४) अंतरिक्ष व धरित्री, (५) मरुद्गण, (६) भव व शर्व, आणि (७) मित्र व वरुण ह्या देवतांनां संबोधिलीं आहेत व प्रत्येक ऋचेच्या शेवटीं, अंहसः (संकटा)पासून मुक्त करण्याविषयींचें पालुपद आहे.

अंहस् शब्दाचा "संकट" ह्या अर्थाखेरीज दुसरा अर्थ "पाप" असा आहे; म्हणून वरील शांतिपाठ अथर्ववेदाच्या प्रायश्चित्तसूक्तवर्गांत घालण्यास हरकत नाहीं. हे पापक्षालनाचे प्रायश्चित्तविधिमंत्र रोगनिवारक मंत्रांहून आपणाला वाटतात तितके भिन्न नाहींत. कारण, प्राचीनांच्या मतें, धर्मबाह्य किंवा नीतिबाह्य आचरण झाल्यास मात्र प्रायश्चित्ताची आवश्यकता असते असें नसून, यज्ञयाग वगैरे संस्कारांची अपूर्णता, जाणूनबुजून किंवा नकळत घडलेला अपराध, मनांतले पापी विचार, ऋण परत न करणें व विशेषतः द्यूतऋण परत न करणें, अशास्त्र विवाह–वडील भावापूर्वी धाकट्याचा–वगैरे पापांच्या शांतीसाठीं देखील प्रायश्चित्त विहित आहे. त्याप्रमाणेंच सामान्यतः अपराध व पातकें यांचें क्षालन होण्यासाठीं व शारीरिक आणि मानसिक दुर्बलता, वाईट ग्रहांवर मूल जन्मास येणें, जुळीं मुलें होणें वगैरे अवलक्षणें, दुष्ट स्वप्नें, अपघात इत्यादि गोष्टींचें निराकरण होण्यासाठीं सुद्धां प्रायश्चित्तमंत्र आहेत. अपराध, पाप, अरिष्ट, दुर्दैव ह्या सर्व कल्पनांची या वेदांत जिकडे तिकडे भेसळ झालेली दिसते. व्याधी, आपत्ती, त्याप्रमाणेंच गुन्हे व पातकें वगैरे जितक्या वाईट गोष्टी तितक्या सर्व पिशाचेंच घडवून आणतात अशी समजूत आहे. जसा रोगी व वेडा मनुष्य त्याप्रमाणें पातकी मनुष्यहि पिशाच्यानें झपाटला आहे असें मानतात. हीं रोग उत्पन्न करणारीं मनुष्यद्वेषी पिशाचें अपशकुन व अपघात यांनाहि कारण होतात. उदाहरणार्थ, अथर्ववेदांतील १० व्या कांडांतील ३ रें सूक्त यांत एका ताइताची २५ ऋचांत अतिशय प्रशंसा केली आहे व सर्व प्रकारचीं अरिष्टें, दुष्ट मंत्रप्रयोग, दुःस्वप्नें, दुश्चिन्हें, आपले आई, बाप, भाऊ, वहीण यांनीं व आपण स्वतः आचरिलेलीं पापें, या सर्वांचें पूर्ण निरसन करण्याचें सामर्थ्य यांत आहे व सर्व रोगांवर हें रामबाण औषध आहे वगैरे प्रकारें त्याची स्तुति केलेली आहे.

**शांतिसूक्तें.**—दुष्ट दैत्य किंवा मत्सरी मांत्रिक यांच्यामुळें गृहकलह उत्पन्न होतात अशी त्यावेळीं समजूत असल्यामुळें, घरांत शांति नांदावी यावद्दलचे मंत्र अथर्ववेदांत आढळून येतात. ह्या मंत्रवर्गाला, प्रायश्चित्तमंत्रवर्ग व पौष्टिकमंत्रवर्ग ह्यांच्या मधलें स्थान दिलें पाहिजे; कारण ह्या मंत्रवर्गांत नुसते घरांत एकी व शांति राखण्यावद्दलचेच मंत्र येत नसून ह्यांत असेहि मंत्र आहेत कीं ज्या योगानें आपल्याला अधिकाऱ्याचा राग शांत करतां येईल, वाटल्यास समाजांत आपलें वजन पाडतां येईल, न्यायकचेरींत आपली बाजू उत्तम रीतीनें मांडून न्यायाचा कांटा आपल्या बाजूला झुकवितां येईल किंवा अनेक दुसरीं महत्त्वाचीं कामें पार पाडतां येतील. ह्या बाबतींत अतिशय गोड सूक्त असेल तर तें अथर्वसंहितेंतील ३ ऱ्या कांडांतील ३० वें सूक्त होय.

सहृदयं सांमनस्यमविद्वेषं कृणोमि वः ।
अन्यो अन्यमभि हर्यत वत्सं जातमिवाघ्न्या ॥ १ ॥
अनुव्रतः पितुः पुत्रो मात्रा भवतु संमनाः ।
जाया पत्ये मधुमतीं वाचं वदतु शन्तिवाम् ॥ २ ॥
मा भ्राता भ्रातरं द्विक्षन्मा स्वसारमुत स्वसा ।
सम्यञ्चः सव्रता भूत्वा वाचं वदत भद्रया ॥ ३ ॥
अथर्व. ३. ३०.

मी तुम्हांला अविद्वेषी, समानचित्तवृत्ति व प्रीतियुक्त असें करतों. गाय जशी आपल्या वत्सावर प्रीति करते, त्याप्रमाणें तुम्ही एकमेकांवर प्रीति करीत जा. १.

पित्याला अनुव्रत (अनुकूल) व मातेशीं समानमनस्क असा पुत्र असू दे. भार्या पतीशीं मधुर व सुखदायक अशा वाणीनें बोलू दे. २.

भावानें भावाचा द्वेष करूं नये, त्याचप्रमाणें वहिणीनें वहिणीशीं दावा मांडूं नये. त्या सर्वांनीं एकमेकांशीं संमत व सव्रत होऊन चांगलें गोड (भद्र) बोलावें. ३.

**प्रणयमंत्र.**—कुटुंबामध्यें ऐक्यभाव उत्पन्न करून देणारे हे मंत्र नवराबायकोमध्यें ऐक्य घडवून आणण्याच्या कामीं उपयोगी पडण्यासारखे आहेत हें उघड आहे. तथापि अथर्ववेदांत विवाह व प्रेमविषयक मंत्रांचीं स्वतंत्रच सूक्तें आहेत. हा सूक्तवर्ग फार मोठा आहे. अथर्ववेदाच्या कौशिकसूत्रांत स्त्रीकर्म या नांवाचे मंत्रप्रयोग व नानाप्रकारचे काममंत्र आहेत. या मंत्रांचे दोन प्रकार आहेत. एका प्रकारांत विवाह व प्रजोत्पादन ह्यासंबंधीं चांगले सात्त्विक व अनुपद्रवी मंत्र आहेत; हे मंत्र कुमारिकांनां पति प्राप्त करून देतात व तरुणांनां गृहिणींचा लाभ करून देतात. वधूवरांच्या व नूतन विवाहितांच्या कल्याणार्थ हे मंत्र योजिलेले आहेत. ह्यांच्या योगानें लवकर गर्भधारणा होते, पुत्ररत्नाची प्राप्ति होते, गर्भवती स्त्रीस स्वास्थ्य मिळतें, गर्भांत असलेल्या बालकाचें नीट संरक्षण होतें, व ह्यासारखें अनेक प्रकारचें वैवाहिक सुख लाभतें. चवदाव्या कांडांत सर्वत्र हाच विषय आहे. ऋग्वेदांतील विवाहसंबंधीं मंत्रांची ही वाढवून केलेली आवृत्तीच असावी असें वाटतें. आतां दुसऱ्या प्रकारांत येणाऱ्या मंत्रांविषयीं पाहतां, ह्यांची संख्या फार मोठी असून, वैवाहिक सुखांत बिघाड झाला असतां किंवा प्रेमाचीं कारस्थानें करतांना लागणारे अभिशाप व अपसरणमंत्र ह्यांत येतात. तथापि पतीचा मत्सरग्रस्त स्वभाव नाहींसा करण्याची इच्छा धरणाऱ्या स्त्रीनें म्हणावयाचे मंत्र, दुराचारी स्त्रीस पतीशीं एकनिष्ठपणें वागण्यास लावणारे मंत्र किंवा आपल्या प्रणयिनीला चोरून भेटावयास आलेल्या तिच्या प्रियकरानें, तिचे आईबाप वगैरे सर्व घरांतल्या मंडळीवर, एवढेंच नव्हे तर, तिच्या घरांतील कुत्र्यावरसुद्धां प्रयोग करावयाचे झोंपीं जावयाला लावणारे मंत्र, विशेषसे उपद्रवी नाहींत ह्यांत शंका नाहीं. (अथर्व. ४.५ यांत वरील शेवटला मंत्र आहे). ह्यापेक्षां थोडे अधिक उपद्रवी व

कांहींसे रानटी मंत्रप्रयोग म्हणजे एखाद्याच्या मर्जीविरुद्ध त्याला किंवा तिला आपणावर प्रेम करावयास लावण्याबद्दलचे मंत्र होत. जगांतील इतर भागांतल्याप्रमाणें प्राचीन हिंदुस्थानांत सुद्धां, एखाद्याची प्रतिमा आपणाजवळ असली म्हणजे तिच्यावर प्रयोग करून त्या प्रतिमागत व्यक्तीला आपल्या ताब्यांत ठेवतां येतें किंवा तिला आपणास वाटेल ती इजा करतां येते, अशी समजूत असे. एखाद्या मनुष्याला कोणा एका स्त्रीची प्रीति संपादन करावी असें वाटलें तर तो तिची मातीची प्रतिमा तयार करीत असे; व धनुष्याला अंबाडीची दोरी लावून, व काळ्या लांकडाच्या बाणाला कांट्याचें टोंक व घुबडाचें पीस जोडून, त्यानें त्या प्रतिमेच्या हृदयाचा आरपार भेद करीत असे. हें कशाकरितां तर कामदेवाच्या बाणानें आपल्या प्रणयिनीचें हृदय असेंच विद्ध करून सोडावें म्हणून. अशा तऱ्हेनें हृदयविदारण चाललें असतां तो खालील मंत्र तोंडानें म्हणेः—

उत्तुदस्त्वोत् तुदतु मा धृथाः शयने स्वे ।
इषुः कामस्य या भीमा तया विध्यामि त्वा हृदि ।१।
आधीपर्णां कामशल्यामिषुं संकल्पकुल्मलाम् ।
ता सुसंनतां कृत्वा कामो विध्यतु त्वा हृदि ॥ २ ॥
या प्लीहानं शोषयति कामस्येषुः सुसंनता ।
प्राचीनपक्षा व्योषा तया विध्यामि त्वा हृदि ॥ ३ ॥
शुचा विद्धा व्योषया शुष्कास्याभि सर्प मा ।
मृदुर्निमन्युः केवली प्रियवादिन्यनुव्रता ॥ ४ ॥
आजामि त्वाजन्या परि मातुरथो पितुः ।
यथा मम क्रतावसो मम चित्तमुपायसि ॥ ५ ॥
व्यस्यै मित्रावरुणौ हृदश्चित्तान्यस्यतम् ।
अथैनामक्रतुं कृत्वा ममैव कृणुतं वशे ॥ ६ ॥
अथर्व. ३. २५.

उत्तुद (कामदेव) तुला व्यथित करो. तुला अंथरुणावर स्वस्थ पडवणार नाहीं. कामाचा बाण भयंकर आहे, त्या बाणानें मी तुझें हृदय विद्ध करतों. १.

ज्याला आधींचे (मानसिक पीडेचे) पंख लाविले आहेत, काम हें ज्याचें शल्य आहे, संकल्प हेंच ज्याचें कुल्मल* आहे असा बाण सुसज्ज करून, (हे कामिनि!) काम (देव) तुझें हृदय विदारण करो. २.

जो सुसज्ज केलेला कामाचा बाण प्लीहेचें शोषण करतो व ज्याचे पंख सरळ जाळीत जातात, अशा बाणानें मी तुझें हृदय विद्ध करितों. ३.

दाहक व दुःखदायक (बाणानें) विद्ध होत्साती, व्याकुळ होऊन माझ्याकडे ये; व मृदुभाषिणी, मदेकशरणा, प्रियवादिनी, अनुव्रता, क्रोधरहित (शांता) अशी हो. ४

तुला, तुझ्या मातेच्या व पित्याच्या सुद्धां समोरून, चाबकाच्या योगेंकरून येथें यायला लावतों, जेणेंकरून तूं माझ्या संकल्पाप्रमाणें वागून, मला वाटेल तें करूं द्यावयास सिद्ध होशील. ५.

मित्रावरुण हो! हिचा चित्तविक्षेप करा. हिला कार्याकार्यविभागाचें ज्ञान राहणार नाहीं असें करून, माझ्या स्वाधीन करा. ६.

एखाद्या स्त्रीला जर कोणा पुरुषाचें प्रेम संपादन करावयाचें असलें तर ती ह्याचप्रमाणें वागते. ती त्या पुरुषाची प्रतिमा तयार करून आपल्या पुढें ठेवते व त्यावर तप्त शरफलाचा मारा करते व तोंडानें अथर्ववेदांतील ६ व्या कांडांतील १३० व १३१ व्या सूक्तांतील ऋचा म्हणते; त्यांपैकीं कांहीं खालीं दिल्या आहेत.

उन्मादयत मरुत उदन्तरिक्ष मादय । अग्न उन्मादया त्वमसौ मामनु शोचतु ॥ ४ ॥ अथर्व. ६. १३०.

नि शीर्षतो नि पत्तत आध्योऽ३नि तिरामि ते । देवाः प्रहिणुत स्मरमसौ मामनु शोचतु ॥ १ ॥

यद् धावसि त्रियोजनं पञ्चयोजनमाश्विनम् । ततस्त्वं पुनरायसि पुत्राणां नो असः पिता ॥ ३ ॥ अथर्व. ६. १३१.

हे मरुत! याला उन्माद होईल असें करा; हे अंतरिक्ष! याला उन्माद दे; हे अग्नी! तूं याला इतका उन्मत्त बनव कीं त्याला माझें स्मरण होऊन तो शोकार्त होईल. ४.

डोक्यापासून पायापर्यंत तुझ्या शरीरांत मी (काम) पीडा घालतें. हे देवांनों! ह्याच्याकडे असा काम पाठवून द्या कीं, त्याला माझें स्मरण होऊन तो शोकार्त होईल. १.

तूं जो तीन योजनें पांच योजनें घोड्यासारखा धांवत गेला आहेस, तो परत येशील, व आपणांला होणाऱ्या पुत्रांचा तूं पिता होशील. ३.

**सपत्नीमंत्र.**—अतिशय दुष्ट व द्वेषभाव भरलेले जाज्वल्य मंत्र म्हणजे, बायकांनीं आपल्या सवती होऊं पाहणाऱ्या इतर बायकांनां आपल्या मार्गांतून दूर करण्याच्या कामीं उपयोगांत आणावयाचे होत. ह्या मंत्रांचें एक उदाहरण म्हणजे खालील ऋचा होयः—

भगमस्या वर्च आदिष्यधि वृक्षादिव स्रजम् ।
महाबुध्न इव पर्वतो ज्योक् पितृष्वास्ताम् ॥ १ ॥
एषा ते राजन् कन्या वधूर्नि धूयतां यम ।
सा मातुर्बध्यतां गृहेथो भ्रातुरथो पितुः ॥ २ ॥
एषा ते कुलपा राजन् तामु ते परि दद्मसि ।
ज्योक् पितृष्वासाता आ शीर्ष्णः समोप्यात् ॥ ३ ॥
असितस्य ते ब्रह्मणा कश्यपस्य गयस्य च ।
अन्तः कोशमिव जामयोपि नह्यामि ते भगम् ॥४॥
अथर्व. १. १४.

* बाणाचें अग्र ज्याच्यामुळें काठीला जोडलें जातें तो भाग.

( फुललेल्या ) झाडाचीं जशीं फुलें तोडून घेतात, त्याप्रमाणें मीं हिचें भाग्य व तेज ( हरण करून ) स्वतः धारण केलें आहे. ज्याचा पाया जमीनींत खोल गेलेला आहे, अशा पर्वताप्रमाणें ती चिरकाल आपल्या आईबापांच्या घरीं राहो. १.

हे यमराजा! ही तुझी बायको म्हणून तुझ्या अंकित होवो. ही आपल्या आईच्या, भावाच्या व बापाच्या घरीं बद्ध होऊन ( चिरकाल ) राहो. २.

हे राजा! ही तुझी कुलपालयित्री स्त्री आहे ती तुला देऊन टाकतें. तिचे केंस गळून पडेतोंपर्यंत ( म्हातारपणापर्यंत ) ती चिरकाल बापाच्या घरीं राहो. ३.

असित, कश्यप व गय यांच्या मंत्रांच्या योगानें, वहिणी ज्याप्रमाणें अंतःकोश बांधून ठेवितात, त्याप्रमाणें मी तुझें भाग्य बांधून ठेवितें ( तुला भाग्यहीन करतें ). ४.

**अभिचारमंत्र.**—एखाद्या स्त्रीला वांझ करण्याविषयींचे* किंवा एखाद्याचें पुरुषत्व हरण करून टाकण्याविषयींचे† मंत्र कमालीचा दुष्टपणा व्यक्त करतात. त्याचप्रमाणें त्यांची भाषाहि संदिग्ध नसून, दुष्टपणा स्पष्ट शब्दांनीं दाखविणारी आहे.

अशा रीतीचे काममंत्र अंगिरस् वर्गांत म्हणजे अभिचारमंत्रवर्गांत येतात. मागें सांगितलेंच आहे कीं, असुर, अभिचारी व अमित्र यांजवर योजावयाचे अभिशाप व अपसारणमंत्र अंगिरस् वर्गांत घातले आहेत. या सर्वांस अभिचारिकाणि असें नांव आहे. कांहीं रोगनिवारक मंत्रसुद्धां या वर्गांत घालतां येतील, कारण हे मंत्र म्हणजे रोगराक्षसांवर योजावयाचे अपसारणमंत्र आहेत. सोळाव्या कांडाचा उत्तरार्धसुद्धां या वर्गांत पडेल; कारण त्यांत दुःस्वप्नावर अभिचारमंत्र आहेत व त्यांतून हें दुःस्वप्नाचें भूत शत्रूंच्या बोकांडीं बसो म्हणून प्रार्थना आहे. वरील प्रकारच्या अपसारणमंत्रांतून राक्षस, भूतें व दुष्ट अभिचारी स्त्रीपुरुष ह्यांत कांहीं फरक मानलेला नाहीं, व अग्नि हा असुरसंहारक असें मानून ह्या लोकांविरुद्ध त्याची कुमक मागितली आहे. इतर ठिकाणीं अज्ञात असलेलीं बऱ्याच असुरांचीं नांवें ह्या अभिचारमंत्रसूक्तांतून आढळून येतात. ह्या सूक्तांत त्या वेळच्या विशेषतः सामान्य जनांत रूढ असलेल्या कल्पना जितक्या आढळून येतात तितक्या इतरत्र आढळत नाहींत. उदाहरणार्थ, ह्यांत अशी एक सर्वच लोकांत रूढ असलेली समजूत दृष्टीस पडते कीं, रोग व अरिष्टें केवळ भूतपिशाचेंच उत्पन्न करीत नसून, दुष्ट अभिचारी लोकहि तीं उत्पन्न करूं शकतात. हे दुराचारी लोक ज्या अभिचारमंत्रांच्या योगानें दुष्ट कर्मे करतात, त्या अभिचारमंत्रांच्या ठिकाणीं बऱ्याच सूक्तांतून व्यक्तित्व कल्पिलें आहे व त्याविरुद्ध मांत्रिक तोडगा म्हणून उपशामक वनस्पति, ताईत, रक्षाकरंडक वगैरे प्रतिकार योजिले आहेत. हे कृत्या उत्पन्न करणारे व तिचा प्रतिकार करणारे मंत्र त्यांतील उच्छृंखल कल्पना आणि त्यांतील रानवट जोर यामुळें ओळखतां येतात व या गुणांमुळें या मंत्रांत थोडीशी मौजहि आली आहे. ऋग्वेदांतील बहुतेक यज्ञविषयक स्तोत्रें व गीतें यांपेक्षां अथर्ववेदांतील ह्या वर्गांतले कांहीं अभिशाप व अपसारणमंत्र हीं सामान्य लोकांतील काव्यांचीं चांगलीं उदाहरणें आहेत. अथर्व वेदांतील ५ व्या कांडांतील १४ व्या सूक्तांतील कांहीं अभिशापमंत्रप्रतिषेधक ऋचा उदाहरणादाखल खालीं दिल्या आहेत.

सु॒प॒र्णस्त्वान्व॑विन्दत् सूक॒रस्त्वा॑खनन्न॒सा । दिप्सौ॑षधे॒ त्वं दिप्स॑न्त॒मव॑ कृत्या॒कृतं॑ जहि ॥ १ ॥

अव॑ जहि यातु॒धाना॒नव॑ कृत्या॒कृतं॑ जहि । अथो॒ यो अ॒स्मान् दिप्स॑ति॒ तमु॒ त्वं ज॑ह्योषधे ॥ २ ॥

रिश्य॑स्येव परीशा॒सं प॑रि॒कृत्य॒ परि॒त्वचः । कृ॒त्यां कृ॑त्या॒कृते॑ देवा नि॒ष्कमि॑व॒ प्रति॑ मुञ्चत ॥ ३ ॥

पुन॑ः कृ॒त्यां कृ॑त्या॒कृते॑ हस्त॒गृह्य॒ परा॑ णय । स॒म॒क्षम॑स्मा॒ आ धे॑हि॒ यथा॑ कृत्या॒कृतं॒ हन॑त् ॥ ४ ॥

कृ॒त्याः स॑न्तु कृत्या॒कृते॑ श॒पथः॑ शपथीय॒ते । सु॒खो॒ रथ॑ इव वर्ततां कृ॒त्या कृ॑त्या॒कृतं॒ पुन॑ः ॥ ५ ॥

यदि॒ स्त्री यदि॑ वा॒ पुमा॑न् कृ॒त्यां च॒कार॒ पा॒प्मने॑ । ताम॒ तस्मै॑ नयाम॒स्यश्व॑मिवाश्वाभि॒धान्या॑ ॥ ६ ॥

पु॒त्र इ॑व पि॒तरं॑ गच्छ स्व॒ज इ॑वा॒भिष्ठि॑तो दश । ब॒न्धमि॑वावक्रा॒मी ग॑च्छ॒ कृत्ये॑ कृत्या॒कृतं॒ पुन॑ः ॥ १० ॥

अथर्व. ५. १४.

गरुडानें तुला शोधून काढलें, डुकरानें आपल्या नाकानें खणून तुला ( बाहेर ) काढलें. हे औषधे! दुष्टाला तूं इजा कर, जादूटोणा करणाऱ्याला मारून टाक. १.

यातुधानांना मारून टाक, चेटक्याला मार व त्याप्रमाणेंच हे औषधे! आम्हांला जो इजा करतो त्याला मारून टाक. २.

पांढऱ्या हरिणाच्या त्वचेपासून काढलेल्या तुकड्याप्रमाणें, हे देवांनो! त्या चेटक्याच्या ( अंगावर ) त्याचेंच चेटुक निष्काप्रमाणें बांधा. ३.

पुन्हां त्याचें चेटुक हातीं धरून त्या चेटक्याकडे परत न्या, व तें त्याच्या डोळ्यांसमोर अशा रीतीनें ठेवा कीं, तें त्याला मारील. ४.

चेटकाचा प्रयोग चेटक्यावरच होवो, त्याचा शाप त्यालाच बाधो व त्याचें चेटुक चांगल्या सुरळीत चाललेल्या रथाप्रमाणें पुन्हां परत त्याच्यावरच जाऊन आदळो. ५.

* अथर्व. ७·३५. † अथर्व. ६·१३८; ७·६०.

ज्या कोणीं, ती स्त्री असो कीं पुरुष असो, दुष्टबुद्धीनें चेटुक केलें असेल, त्याच्यावर किंवा तिच्यावर, घोड्याला दोरीनें पाठीमागें आणतात त्याप्रमाणें तें चेटुक आणून सोडूं. ६.

बापाकडे मुलगा जातो त्याप्रमाणें तूं जा; तुडविला गेलेला साप जसा चावतो, त्याप्रमाणें तूं चाव, बंधनांत सांपडलेला जसा पळून जातो त्याप्रमाणें हे कृत्ये! तूं कृत्याकृता (चेटक्या)कडे जा. १०.

वरीलप्रमाणेंच, अथर्वसंहितेंतील ६ व्या कांडांतील ३७ व्या सूक्तांतील ऋचांतून जेथें अभिशापमंत्र योजकावरच उलट योजला आहे, त्या ऋचांची भाषा फार जोरदार आहे. त्यांतील कांहीं अशाः—

उप प्रागात् सहस्राक्षो युक्त्वा शपथो रथम् ।
शप्तारमन्विच्छन् मम वृक इवाविमतो गृहम् ॥ १ ॥
परि णो वृङ्धि शपथ ह्रदमग्निरिवा दहन् ।
शप्तारमत्र नो जहि दिवो वृक्षमिवाशनिः ॥ २ ॥
यो नः शपादशपतः शपतो यश्च नः शपात् ।
शुने पेष्ट्रमिवावक्षामं तं प्रत्यस्यामि मृत्यवे ॥ ३ ॥
अथर्व. ६. ३७.

शापक्रियेचा कर्ता सहस्राक्ष (इंद्र), रथ तयार करून इकडे आला; लांडगा मेंढपाळाच्या घरीं येतो त्याप्रमाणें येऊन, (आमच्या) शाप देणाऱ्याला (मारण्याची) इच्छा करतो. १.

ज्याप्रमाणें दाहक अग्नि सरोवराला बाधा करीत नाहीं, त्याप्रमाणें हे शपथ! तूं आम्हांला बाधा करूं नकोस. जशी आकाशांतून पडणारी वीज वृक्षाचा नाश करते, तसा तूं आम्हांला शाप देणाऱ्याचा नाश कर. २.

ज्याला आम्हीं शाप दिला नसतां जो शाप देतो, ज्याला शाप दिला असतां जो आम्हांला शाप देतो, त्याला कुत्र्यापुढें पिष्टमय खाद्य फेंकतात त्याप्रमाणें मृत्यूला बळी म्हणून टाकून देतों. ३.

वरुणसूक्तहि (अथर्वः ४·१६) याच जातीचें म्हणजे काव्य आणि अभिचारमंत्र यांचें मिश्रण आहे. ह्याच्या पूर्वार्धांत तूं सर्वशक्तिमान् आहेस, सर्वसाक्षी आहेस वगैरे वरुणदेवाचें भक्तियुक्त अर्थाचें वर्णन आहे. अशा तऱ्हेचें वर्णन फारच थोड्या ठिकाणीं आढळतें. वरील सूक्ताचा उत्तरार्ध म्हणजे अनृतवादी लोकांस पाशबद्ध करण्याचा जोरदार मंत्र आहे. तें सूक्त असेंः—

बृहन्नेषामधिष्ठाता अन्तिकादिव पश्यति ।
यस्तायन्मन्यते चरन्त्सर्वं देवा इदं विदुः ॥ १ ॥
यस्तिष्ठति चरति यश्च वञ्चति
यो निलायं चरति यः प्रतङ्कम् ।
द्वौ संनिषद्य यन्मन्त्रयेते राजा
तद् वेद वरुणस्तृतीयः ॥ २ ॥
उतेयं भूमिर्वरुणस्य राज्ञ
उतासौ द्यौर्बृहती दूरेअन्ता ।
उतो समुद्रौ वरुणस्य कुक्षी
उतास्मिन्नल्प उदके निलीनः ॥ ३ ॥
उत यो द्यामतिसर्पात् परस्तान्न
स मुच्यातै वरुणस्य राज्ञः ।
दिव स्पशः प्र चरन्तीदमस्य सह-
स्राक्षा अति पश्यन्ति भूमिम् ॥ ४ ॥
सर्वं तद् राजा वरुणो वि चष्टे
यदन्तरा रोदसी यत् परस्तात् ।
संख्याता अस्य निमिषो जनानाम-
क्षानिव श्वघ्नी नि मिनोति तानि ॥ ५ ॥
ये ते पाशा वरुण सप्तसप्त
त्रेधा तिष्ठन्ति विषिता रुशन्तः ।
छिनन्तु सर्वे अनृतं वदन्त यः
सत्यवाद्यति तं सृजन्तु ॥ ६ ॥
शतेन पाशैरभि धेहि वरुणैनं
मा ते मोच्यनृतवाङ् नृचक्षः ।
आस्तां जाल्म उदरं श्रंशयित्वा
कोश इवाबन्धः परिकृत्यमानः ॥ ७ ॥
यः समाम्यो३ वरुणो यो व्याम्यो३
यः संदेश्यो३ वरुणो यो विदेश्यः ।
यो दैवो वरुणो यश्च मानुषः ॥ ८ ॥
तैस्त्वा सर्वैरभि ष्यामि पाशैरसावामुष्यायणामुष्याः पुत्र ।
तानु ते सर्वाननुसंदिशामि ॥ ९ ॥
अथर्व. ४. १६.

त्रैलोक्याचा हा बलाढ्य राजा दुष्टांचीं कृत्यें जवळून पाहत असतो. सर्व वस्तू नश्वर आहेत हें वरुण जाणतो व सर्व देवहि जाणतात. (सायण). १.

मनुष्य उभा असो, चालत असो, लपून जात असो; कोठेंहि दोघे बसून खलबत करीत असतील तेथें वरुण तिसरा हजर असावयाचाच. २.

ही पृथ्वी व अफाट पसरलेलें आकाश वरुणाच्या ताब्यांत आहे. हे दोन समुद्र त्याच्या कुक्षी होत व लहानसान जलाशयहि वरुणामध्यें अंतर्भूत होतात. ३.

कोणी वरुणाचा शत्रु दूर आकाशापलीकडे जाईल तर तेथेंहि त्याची वरुणापासून सुटका होणार नाहीं. वरुणाचे हजारों नेत्र (हेर) सर्व दिशा पाहणारे व भूमीपलीकडे पाहणारे पृथ्वीवर फिरत असतात. ४.

पृथिवी व आकाश यांमधील व ह्यांच्याहि पलीकडे असणाऱ्या प्राणिमात्रांवर वरुण राजाचें चांगलें लक्ष असतें.

लोकांच्या पापण्यांची उघडझांप किती वेळां होते हेंहि त्यानें मोजून ठेविलें आहे; ज्याप्रमाणें एखादा जुगारी फांसे (काळजीपूर्वक) टाकतो, त्याप्रमाणें हा सर्व गोष्टींची व्यवस्था लावितो. ५.

वरुणा! तुझे सात सात असे तीन प्रकारचे (उत्तम, मध्यम व अधम) हे घातक पाश सज्ज आहेत. ते सर्व असत्यवादी मनुष्याला बंधनकारक होवोत व सत्यवादी मनुष्याला पीडा न देवोत. ६.

वरुणा! शंभर पाशांनीं त्याला बांध; हे नृचक्षा! त्या असत्यवाद्याला मोकळा सोडूं नकोस. त्या लबाडाचें पोट लोंबत राहूं दे (त्याला जलोदर होऊं दे) व सैल झालेल्या कोशाप्रमाणें होऊन नंतर त्याभोंवतीं तुझ्या पाशांचें वेष्टन राहूं दे. ७.

वरुण रोग पाठवून देतो व नाहींसे करतो; वरुण संदेश्य आहे व विदेश्यहि आहे; वरुण दैवी व मानुषी आहे. ८.

ह्या सर्व पाशांनीं मी तुला–हे अमक्या गोत्रांतील अमक्याच्या पुत्रा!—गच्च बांधून टाकतों; तुला अनुलक्षून मी हे पाश तुझ्यावर टाकतों. ९.

अथर्ववेदाचा जर्मन भाषांतरकर्ता रोथ (R. Roth) हा या वरुणसूक्ताविषयीं असें मत देतो कीं, ईश्वराचें सर्वसाक्षित्व इतक्या उठावदार रीतीनें वर्णन करणारें गीत, सबंध वेदवाङ्मयांत दुसरें सांपडणार नाहीं; पण यांतील सुंदर कविकृतीचा जो भाग आहे त्याला एका अभिचारमंत्राचा प्रास्ताविक भाग बनविलें आहे. या वेदांत इतरत्रहि पुष्कळ ठिकाणीं जुन्या सूक्तांचे विवक्षित अभिचारमंत्रांनां जोड लावण्यास उपयोगी असे भाग घेऊन ते त्या त्या मंत्रांनां जोडून दिले आहेत असा तर्क करणें अस्थानीं होणार नाहीं. वरील मंत्रांतील पहिल्या ५।६ ऋचा अशा एखाद्या सूक्तापैकीं असाव्यात. वरील रोथच्या म्हणण्याला डॉ. विंटरनिट्झचा पूर्ण पाठिंबा आहे, व अभिचारमंत्र म्हणून प्रथम हें सूक्त रचलें असावें,* हें जें ब्लूमफील्डचें मत, तें निराधार असलें पाहिजे, असें विंटरनिट्झचें म्हणणें आहे.

**राजकारण व मंत्रशास्त्र.**–राजांच्या गरजा भागविण्यासाठीं जे मंत्र आहेत त्यांचा एक मोठा वर्ग पडतो. ह्या वर्गात कांहीं शत्रूंविरुद्ध अभिचारविधी व कांहीं पौष्टिकमंत्र आहेत. पुरातन कालापासून हिंदुस्थानांत प्रत्येक राजाच्या पदरीं एक पुरोहित असे; व त्याला "राजकर्मा"ची (राजाला लागणाऱ्या सर्व मंत्रप्रयोगांची) व तत्संबंधीं सर्व सूक्तांची व वचनांची माहिती असावी लागे. तेव्हां अथर्ववेदाचा क्षत्रियवर्गाशीं निकट संबंध आहे; म्हणून ह्या वेदांत राज्याभिषेकप्रसंगीं ज्या वेळीं राजाला पवित्र उदकानें स्नान घालण्यांत येई व तो व्याघ्रचर्मावर अधिष्ठान करी त्या वेळचे मंत्र आहेत; त्याची इतर राजांवर सत्ता राहून, बल व कीर्ति यांची सदोदित वृद्धि व्हावी एतदर्थ कांहीं मंत्र आहेत; व आणखी कित्येक, अंगावर चिलखत घालण्याच्या वेळच्या, रथावर चढण्याच्या वेळच्या वगैरे प्रार्थना आहेत. राजाची निवड करण्याच्या वेळचे प्रार्थनामंत्र (अथर्वः ३·४) फार मजेदार आहेत. वरुण ह्या शब्दांत वर हा धातु "निवडणें" ह्या अर्थी आहे म्हणून वरुण देव ह्या निवडणुकीच्या वेळीं, निवड करण्यास हजर राहतो अशी समजूत आहे. हद्दपार केलेल्या राजाला परत गादीवर बसविण्याबद्दलचे *मंत्रविधी वरीलप्रमाणेंच सुंदर आहेत. ह्या वर्गातील पहिल्या प्रतीच्या सूक्तांत युद्धगीतें व संग्राममंत्र येतात. यांत योद्धे ज्या सूक्तांनीं दुंदुभीची प्रार्थना करून त्याला लढाईत हजर राहून विजयश्री मिळवून देण्याकरितां† बोलावितात तीं दोन सूक्तें तर विशेषच बहारीचीं आहेत. उदाहरणार्थ, ५ व्या कांडांतील २० वें सूक्त यांतील कांहीं ऋचा खालीं दिल्या आहेतः—

उ॒च्चैर्घो॑षो दु॒न्दु॒भिः स॑त्वना॒यन् वा॑नस्प॒त्यः संभृ॑त उ॒स्रिया॑भिः। वाचं॑ क्षुणु॒वानो॑ द॒मय॑न्त्स॒पत्ना॑न्त्सिं॒ह इ॑व जे॒ष्यन्न॒भि तं॑स्तनीहि ॥ १ ॥

सिं॒ह इ॑वास्तानीद् द्रु॒वयो॒ विब॑द्धोभि॒क्रन्द॑न्नृष॒भो वा॑सि॒तामि॑व। वृ॒षा त्वं व॑ध्रयस्ते स॒पत्ना॑ ऐन्द्रस्ते॒ शुष्मो॑ अभिमाति॒षाहः॑ ॥ २ ॥

वृ॒षेव॑ यू॒थे सह॑सा विदा॒नो ग॒व्यन्न॒भि रु॑व सन्धना॒जित्। शु॒चा वि॑ध्य॒ हृद॑यं॒ परे॑षां हि॒त्वा ग्रा॒मान् प्रच्यु॑ता यन्तु॒ शत्र॑वः ॥ ३ ॥

दु॒न्दु॒भेर्वाचं॒ प्रय॑तां॒ वद॑न्तीमाशृ॒ण्वती॑ ना॒थि॒ता घोष॑बुद्धा। नारी॑ पु॒त्रं धा॑वतु हस्त॒गृह्या॑मि॒त्री भी॒ता स॑म॒रे व॒धाना॑म् ॥ ५ ॥ अथर्व. ५. २०.

लांकडाचा बनविलेला, वाद्यांनीं आंवळलेला, वीराप्रमाणें आचरण करणारा दुंदुभि मोठा शब्द करीत आहे. आपला आवाज चढवून, शत्रूंनां जेरीस आणणारा तूं, विजयी सिंहाप्रमाणें मोठ्यानें ओरड. १.

विबद्ध द्रुवय (दुंदुभि) सिंहाप्रमाणें ओरडला. त्यानें कामुक बैलाप्रमाणें शब्द केला. हे दुंदभे! तूं बैल (वृष) आहेस, तुझे शत्रू नेभळे आहेत; शत्रूंनां जिंकण्याची तुझी शक्ति इंद्रासारखी आहे. २.

जनावरांच्या कळपांत, बैलाप्रमाणें शक्तीनें प्रसिद्धीस आलेला असा तूं, लूट जमा करीत व गाई मिळवीत ओरडत राहा. दुःखानें शत्रूंचीं हृदयें विदारण कर व त्यांची धूळधाण उडून ते आपलीं घरेंदारें सोडून जावोत. ३.

* Sacred Books of the East, XIII, 389.

* अथर्व. ३·३. † अथर्व. ५.२०–२१.

दुंदुभीचा आवाज दूरवर दुमदुमत असलेला ऐकून, त्यानें जागी होऊन व्यथित झालेली शत्रुपत्नी मुलाचा हात धरून शस्त्रांचा खणखणाट चाललेल्या समरभूमींतून भीतीनें पलायन करो. ५.

ब्राह्मणांनीं सदोदित राजे व इतर लोक ह्यांच्या कल्याणासाठींच फक्त मंत्रांचा उपयोग करावा व स्वतःविषयीं उदासीन रहावें असें होणें शक्यच नव्हतें. राजकर्माच्या मंत्रप्रयोगांत तर कांहीं मंत्र राजाप्रीत्यर्थ नसून, त्याच्या घरच्या पुरोहिताप्रीत्यर्थ तयार केलेले आहेत; व जरी ब्राह्मणी वाङ्मयांत अभिचारमंत्रविद्येविरुद्ध टीका केलेली आहे, तरी मनुस्मृतींत (११,३३) असें स्पष्ट म्हटलें आहे कीं, कांहीं विवक्षित प्रसंगीं ब्राह्मणानें अथर्ववेदाचा निःशंकपणें उपयोग करावा. ब्राह्मणाची शक्ति वाचेच्या ठिकाणीं आहे, तिचा त्यानें शत्रूंनां ठार करण्याच्या कामीं खुशाल उपयोग करावा.

श्रुतीरथर्वांगिरसीः कुर्यादित्यविचारयन् ।
वाक्शस्त्रं वै ब्राह्मणस्य तेन हन्यादरीन् द्विजः ॥

तेव्हां अथर्ववेदांतसुद्धां ब्राह्मणहितरक्षणार्थ अभिचार व मंत्रप्रयोग यांचें बाडच्या बाड दृष्टीस पडतें. अशा सूक्तांतून ब्राह्मणांचें जीवित व त्यांची मालमत्ता यांनां कोणीहि धक्का लावूं नये ही गोष्ट वारंवार जोरदार भाषेंत मनावर ठसविण्याचा प्रयत्न केलेला आहे व जे ब्रह्मस्वावर व ब्रह्मजीवितावर घाला घालतात त्यांनां भयंकर शाप दिलेले आहेत. शिवाय ब्राह्मणांनां यज्ञांत वगैरे द्यावयाच्या दक्षिणेला फार गहन अर्थ जोडून या गूढार्थावर अत्युक्तिपूर्ण भाषेंत पुन्हां पुन्हां जोर दिला आहे. ब्राह्मणांनां छळण्यासारखें दुसरें भयंकर पाप नाहीं व त्यांनां सढळ हातानें दक्षिणा देणें यासारखें मोठें पुण्य नाहीं, या दोन कल्पना अनेक सूक्तांत पुन्हां पुन्हां निरनिराळ्या रीतीनें मांडल्या आहेत. हीं सूक्तें आत्मिक उन्नतीच्या दृष्टीनें अगदीं निरुपयोगी आहेत. यांत कांहीं थोडींशीं चांगलीं सूक्तें आहेत त्यांतून अंतर्ज्ञान, प्रज्ञा, भक्ति आणि पारमार्थिक ज्ञान प्राप्त होण्याविषयींच्या प्रार्थना आहेत. हीं सर्व ब्राह्मणीसूक्तें अथर्ववेदसंहितेच्या सर्वांत अलीकडच्या भागांपैकीं आहेत असें निर्विवादपणें म्हणतां येईल.

यज्ञकर्मासंबंधीं सूक्तें व मंत्र हींसुद्धां अथर्ववेदसंहितेच्या अलीकडच्या भागांपैकींच आहेत. हीं सूक्तें व मंत्र ह्या वेदांत गोंवण्याचा हेतु इतर तीन वेदांप्रमाणें ह्या वेदाचाहि यज्ञांशीं संबंध यावा व हा एक "वेद"च आहे अशी लोकांची दृढ समजूत व्हावी हा असावा. या वेदांतील दोन आप्रीसूक्तें व इतर कांहीं सूक्तें ऋग्वेदांतील यज्ञसंबंधीं सूक्तांप्रमाणें आहेत. यज्ञसंस्थेच्या इतिहासांत अथर्ववेदाचें स्थान कळविल्याशिवाय या विषयावर अधिक विवेचन अयोग्य आहे. त्याचप्रमाणें यजुर्वेदांतल्यासारखे गद्यमंत्रहि त्यांत सांपडतात; उदाहरणार्थ १६ व्या कांडाच्या पूर्वार्धांत उदकस्तुतिपर व निरनिराळ्या शांतिविधीसंबंधीं सूक्तें आहेत तीं वरीलप्रकारचीं आहेत. १८ वें कांडहि असेंच गद्यमय आहे; यांत और्ध्वदेहिक व श्राद्ध ह्यासंबंधीं मंत्र आहेत. ऋग्वेदाच्या १० व्या मंडळांतील उत्तरक्रियाविषयक सूक्तें शब्दशः येथें पुन्हां आढळतात व कांहीं फरक असेल तर तो त्या सूक्तांत वरीच भर घातली आहे इतकाच. मागें सांगितलेंच आहे कीं, अथर्ववेदाचें २० वें कांड त्याला अगदीं मागाहून जोडलें आहे व त्यांतील वहुतेक सूक्तें सरसकट ऋग्वेदावरून घेतलीं आहेत. या कांडाचा सोमयज्ञाशीं संबंध येतो. त्यांत नवीन असा भाग म्हणजे कुन्तापसूक्तांचा होय (अथर्वः २०·१२७–१३६). ह्या सूक्तांचा उपासनामंत्र म्हणून यज्ञकर्मांत प्रवेश झाला आहे व ह्यांचा विषय म्हणजे कांहींसा ऋग्वेदांतील दानस्तुतीप्रमाणें आहे. हीं सूक्तें कांहीं राजेलोकांच्या दातृत्वाची प्रशंसा करतात. या सूक्तांत कांहीं भाग कोडीं व त्यांचीं उत्तरें या प्रकारचा व कांहीं अश्लील व ग्राम्य विनोदाचा आहे. कांहीं पुष्कळ दिवसपर्यंत चालणाऱ्या यज्ञांतून पुरोहित लोकांत या सूक्तांमध्यें ठराविक संभाषण चाले व हें यज्ञकर्मांत आवश्यक असे. अखेरीस या संवादाला, ब्लूमफील्डच्या शब्दांत सांगावयाचें म्हणजे, गुत्त्यांतील अश्लील गोंधळाचें स्वरूप आलें.

**व्रात्यस्तोम.**—१५ वें काण्ड गद्यात्मक असून त्याची रचनाहि निरनिराळ्या विधींच्या उपयोगासाठीं झाली असावी. यांत व्रात्य लोकांची म्हणजे चातुर्वर्ण्यांत आलेल्या इतरांची रहस्यात्मक स्तुति आहे. त्रैवर्णिकांत घेतांना कराव्या लागणाऱ्या संस्काराच्या वेळीं हीं गुंतागुंतीचीं, दुर्बोध, व रहस्यात्मक सूक्तें (वाक्यें) म्हणावीं लागत असलीं पाहिजेत. व्रात्यस्तोम हा प्रथम साधा विधि असून तो पुढें यज्ञसंस्थेंत शिरला. त्याचें सविस्तर विवेचन पुढें येईल.

**अध्यात्म.**—या कांडांतील विषय गहन व कांहींसे तत्त्वज्ञानात्मक असल्यानें, हें कांड अथर्ववेदसूक्तांच्या शेवटल्या वर्गांत घालण्यास हरकत नाहीं. हा शेवटला वर्ग म्हणजे तत्त्वज्ञान व जगदुत्पत्ति एतद्विषयक सूक्तांचा असून, हा अथर्ववेदाचा सर्वांत अलीकडील भाग होय. मंत्रविद्या व तत्त्वविद्या हीं एकमेकापासून फार दूर आहेत; पण आश्चर्य हें कीं, अथर्ववेदसंहितेंत अभिचार, भैषज्य व पुष्टि एवढेच विषय नसून, कांहीं तत्त्वज्ञानविषयक सूक्तेंहि आहेत. तथापि, हीं तत्त्वविद्याविषयक सूक्तें जरा बारकाईनें पाहिल्यास, असें दिसून येईल कीं, अभिचारमंत्रांप्रमाणें हीं व्यवहारोपयोगी अशीं आहेत. ह्यांमध्यें, सत्याविषयींची उत्कंठा किंवा त्याचें अन्वेषण किंवा विश्वांतील गहन कोडीं सोडविण्याचें औत्सुक्य वगैरे कांहीं एक दिसून येत नाहीं. यांत जो तत्त्वज्ञानाचा

भाग आहे तो केवळ तत्त्वज्ञानविषयक सुप्रसिद्ध अशीं कांहीं वचनें असून त्यांचा उपयोग मांत्रिकांनीं आपल्या मंत्रांनां एक प्रकारचें रहस्यात्मक स्वरूप यावें म्हणून एक विचित्र व कौशल्यपूर्ण परंतु बाष्कळ कल्पनांनीं भरलेलें जाळें वनविण्याकडे केला आहे. प्रथमदर्शनीं जो भाग गूढार्थानें भरलेला असा दिसतो तो वास्तविक तसा नसून त्यांत पोकळ शब्दजाल व तथ्यापेक्षां बाष्कळपणाच अधिक असतो. अशा रीतीनें आपल्या खऱ्या साध्या कृतीवर रहस्याचें पांघरूण घालून तिला गूढ कृतीचें स्वरूप देणें हा मांत्रिकाच्या धंद्याचाच एक भाग आहे. कसेंहि असलें तरी, ह्या तत्त्वज्ञानविषयक सूक्तांवरून असें कळून येतें कीं, त्या वेळीं अध्यात्मज्ञानाची चांगलीच वाढ झालेली असावी. उपनिषद्ग्रंथांतील सृष्टीचा उत्पादक व रक्षक देवाधिदेव प्रजापति आहे ही कल्पना व त्यानंतरची सृष्टीचें आदिकारण असें एक अव्यक्त तत्त्व आहे ही कल्पना या दोन्हीहि कल्पना व त्याचप्रमाणें ब्रह्म, तप, प्राण, मन, हे तत्त्वज्ञानांतील पारिभाषिक शब्द, वरील सूक्तें तयार करण्याच्या वेळीं, अस्तित्वांत असून त्यांचा बराच प्रसार झालेला असला पाहिजे. परंतु एवढ्यावरून अथर्ववेदांतील हीं जगदुत्पत्तिविषयक व तत्त्वज्ञानविषयक सूक्तें, भारतीय तत्त्वज्ञानाच्या वाढींतील एखादी अवस्था दाखवितात, असें म्हणतां यावयाचें नाहीं. ऋग्वेदांत जीं खरीं तत्त्वज्ञानविषयक सूक्तें आहेत त्यांतील बीजरूपानें असणारे विचार पुढें फक्त उपनिषदांतच वाढीस लागले. पण अथर्ववेदांतील तत्त्वज्ञानविषयक सूक्तांत, ऋग्वेद व उपनिषदें यांमधील अशा विचारांची एक विकासावस्था आढळते असें अगदीं म्हणतां येत नाहीं. *डॉयसेन ( Deussen ) म्हणतो त्याप्रमाणें, हीं अथर्ववेदांतील सूक्तें त्या विचारांच्या विकासमार्गांत येत नसून, मार्गाच्या कडेला आहेत.

ह्या सूक्तांतून पुष्कळशीं गहन तत्त्वें मधून मधून झळकतात, पण पुष्कळ वेळां असें म्हणण्याची पाळी येते कीं, हीं चमकणारीं तत्त्वें अथर्वन् कवीच्या मेंदूंतून निघालीं नसून त्यानें फक्त दुसऱ्यांच्या बुद्धीचा आपल्या कामीं उपयोग करून घेतला आहे. उदाहरणार्थ, काल हा एकंदर सर्व सृष्टीच्या अस्तित्वाचें मूलतत्त्व आहे, ही कल्पना तत्त्वज्ञान्याला खरोखर साजेशी आहे; पण जेव्हां आपण अथर्ववेदाच्या १९ व्या कांडांतील ५३ वें सूक्त वाचूं लागतों तेव्हां त्याची भाषा एखाद्या तत्त्वज्ञान्याची असावी असें आपणांस न वाटतां ती एखाद्या गूढवाद्याची असावी असें वाटूं लागतें. त्या सूक्तांतील कांहीं ऋचा येणेंप्रमाणें:—

का॒लो अश्वो॑ वहति स॒प्तर॑श्मिः सह॒स्रा॒क्षो अ॒जरो॒ भूरि॑रेताः । तमा रो॑हन्ति क॒वयो॑ विप॒श्चित॒स्तस्य॑ च॒क्रा भुव॑नानि॒ विश्वा॑ ॥ १ ॥

स॒प्त च॒क्रान् व॑हति का॒ल ए॒ष स॒प्तास्य॒ नाभी॑र॒मृतं॒ न्वक्षः॑ । स इ॒मा विश्वा॒ भुव॑नान्य॒ञ्जत् का॒लः स ई॑यते प्र॒थ॒मो नु दे॒वः ॥ २ ॥

पू॒र्णः कु॒म्भोऽधि॑ का॒ल आहि॑त॒स्तं वै पश्या॑मो बहु॒धा नु स॒न्तः । स इ॒मा विश्वा॒ भुव॑नानि प्र॒त्यङ् का॒लं तमा॑हुः पर॒मे व्यो॒॑मन् ॥ ३ ॥ अथर्व. १९. ५३.

भूरिरेत, अजर, सहस्राक्ष असा सप्तरश्मी अश्व जो काल तो ( आम्हांला ) वाहून नेत आहे. त्यावर निष्णात असे कवी आरोहण करतात. त्याचीं ( त्याच्या रथाचीं ) चाकें म्हणजे सर्व भुवनें होत. १.

या कालाचीं सात चक्रें आहेत, सात नाभी आहेत, याचा अमृत हा अक्ष* आहे; तो या सर्व भुवनांनां प्रेरणा करतो व तो सर्व देवांत श्रेष्ठ म्हणून पूजिला जातो. २.

काल हा पूर्णकुंभाप्रमाणें ( अविच्छिन्न ) आहे. त्याला आम्ही पुष्कळ ठिकाणीं ( पुष्कळ प्रकारांनीं ) पाहातों. तो सर्व भुवनांनां व्यापून राहिला आहे. त्याला श्रेष्ठ अशा व्योमांत ( देखील ) "काल" म्हणून हांक मारतात ( किंवा हे "परमे व्योमनि !" असें कालाला संबोधून म्हणतात. ) ३.

याच सूक्ताच्या ५ व्या आणि ६ व्या ऋचांत कालापासून सर्वांची उत्पत्ति आहे, हें फार चांगल्या तऱ्हेनें, सांगितलें आहे; त्या ऋचा अशाः—

का॒लो॒मूं दिव॑मजनयत् का॒ल इ॒माः पृ॑थि॒वीरु॒त । का॒ले ह॑ भू॒तं भव्यं॑ चेषि॒तं ह॒ वि ति॑ष्ठते ॥ ५ ॥

का॒लो भू॒तिम॑सृजत का॒ले त॑पति॒ सूर्यः॑ । का॒ले ह॒ विश्वा॑ भू॒तानि॑ का॒ले चक्षु॒र्वि प॑श्यति ॥६॥ अथर्व. १९. ५३

कालानें हें आकाश व ही पृथिवी निर्माण केली; कालाच्या ठिकाणीं भूत, भविष्य व इष्ट ( वर्तमान ) यांचा वास आहे. ५.

कालानें भूति ( जग ) उत्पन्न केली. कालाच्या ठिकाणीं सूर्य तळपत आहे; कालाच्या ठायीं सर्व भूतांचा वास आहे; व कालांत चक्षूचें निरीक्षण आहे. ६.

परंतु लगेच ह्यांच्या पुढील ऋचांतून व ५४ व्या सूक्तांत, नाना प्रकारच्या वस्तूंचा विशेषतः त्या कालीं ठाऊक असलेल्या देवतांचा नामनिर्देश करून या सर्व वस्तू व देवता कालापासून उत्पन्न झाल्या आहेत असें यंत्रासारखें पुनः पुनः सांगितलें आहे.

अथर्ववेदाच्या १३ व्या कांडांतील रोहितसूक्तांत सुद्धां खरें तत्त्वज्ञान फार थोडें असून गूढाचें अवडंबर फार आहे. या सूक्तांत सर्व प्रकारचे एकमेकांशीं संबंध नसलेले

* Deussen, Allgemeine Gerchichte der Philosophie I, 1, p. 209.

* आंस.

विषय, अव्यवस्थित रीतीनें मांडले आहेत. उदाहरणार्थ, ह्यांतील पहिल्या सूक्तांत, रोहिताची म्हणजे सूर्याची, (भौतिक तेजोगोलाची किंवा तदधिष्ठित देवतेची) उत्पादक तत्त्व या नात्यानें, त्यानें द्यावापृथिवी निर्माण केली, आपल्या बलानें त्यांचें संरक्षण केलें, अशी प्रशंसा केली आहे; व त्याच ठिकाणीं पृथ्वीवरील राजाचा व्यवहार व स्वर्गांतील राजा रोहित याचा व्यवहार यांची बुद्धिपुरस्सर संदिग्ध अशा भाषेंत तुलना केली आहे. मध्यंतरीं, प्रतिस्पर्ध्यांनां व शत्रूंनां, आणि जे गाईला लत्ताप्रहार करतात किंवा सूर्याभिमुख होऊन जलो(मूत्रो)त्सर्ग करतात त्यांनां शाप दिलेले आढळून येतात. पुन्हां, १३ व्या कांडाच्या ३ ऱ्या सूक्तांत, कांहीं ऋचांतून रोहिताची, सर्वांत श्रेष्ठ देव, म्हणून प्रशंसा केलेली आहे; ह्यांतील करुणरस वरुणसूक्ताची आठवण करून देतो. परंतु या सूक्तांतील ऋचांस जें पालुपद जोडलें आहे त्यांत ब्राह्मणाला जो पीडा करील त्याचें निर्मूलन करण्याविषयीं रोहिताची प्रार्थना केली आहे. त्या ऋचा अशाः—

**य इमे द्यावापृथिवी जजान यो द्रापिं कृत्वा भुवनानि वस्ते । यस्मिन् क्षियन्ति प्रदिशः षडुर्वीर्याः पतङ्गो अनु विचाकशीति तस्य देवस्य । क्रुद्धस्यैतदागो य एवं विद्वांसं ब्राह्मणं जिनाति । उद् वेपय रोहित प्रक्षिणीहि ब्रह्मज्यस्य प्रति मुञ्च पाशान् ॥ १ ॥**

**यस्माद् वाता ऋतुथा पवन्ते यस्मात् समुद्रा अधि विक्षरन्ति तस्य देवस्य । ०।० ॥ २ ॥**

**यो मारयति प्राणयति यस्मात् प्राणन्ति भुवनानि विश्वा तस्य ०।०।० ॥ ३ ॥**

**यः प्राणेन द्यावापृथिवी तर्पयत्यपानेन समुद्रस्य जठरं यः पिपर्ति तस्य ०।०।० ॥ ४ ॥** अथर्व. १३. ३.

ज्यानें ही द्यावापृथिवी निर्माण केली, ज्यानें भुवनांचे स्वतःला पांघरूण केलें, ज्याच्या ठिकाणीं विस्तीर्ण अशा सहा ऊर्वी नांदत आहेत व ज्या (ऊर्वी) मधून पतंगाचें अन्वीक्षण चाललें आहे त्या क्रुद्ध देवाचा अपराध करणारा म्हणजे जो हें सर्व जाणणाऱ्या ब्राह्मणाला छळतो त्याचा, हे रोहित! पिच्छा पुरव, त्याचा नाश कर, ब्राह्मणाच्या शत्रूला आपल्या पाशांत अडकव. १.

ज्यापासून (ठराविक) ऋतूंमध्यें स्वच्छ वारे वाहतात, ज्यापासून समुद्र (सर्व दिशेकडे) वाहत जातात, त्या क्रुद्ध देवाचा इ. २.

जो जीव घेतो व जीवदान देतो, ज्यामुळें सर्व भुवनें जगतात, त्या क्रुद्ध देवाचा इ. ३.

जो प्राणाच्या योगानें द्यावापृथिवीला उल्हासित करतो, जो अपानाच्या योगानें समुद्राचें जठर भरून टाकतो त्या क्रुद्ध देवाचा इ. ४.

ह्या उत्कृष्ट रोहितप्रशस्तीच्या शेजारींच मधूनमधून गूढ कल्पना घातलेल्या आहेत. उदाहरणार्थ, एके ठिकाणीं असें म्हटलें आहे कीं, बृहत् व रथंतर ह्या दोन छंदांपासून रोहिताची उत्पत्ति आहे व दुसऱ्या ठिकाणीं, गायत्री छंदाला "अमृतगर्भ" असें म्हटलें आहे. अशीं पुष्कळ गूढ कल्पनांचीं उदाहरणें देतां येतील. अशा ऋचांतील गहन अर्थ शोधून काढण्याचा प्रयत्न निष्फळ झाल्यावांचून राहावयाचा नाहीं; व म्हणून विंटरनिट्झ म्हणतो कीं, अथर्ववेदांतील ४ थ्या कांडांतील ११ व्या सूक्तासारख्या सूक्तांत मोठें तात्त्विक सत्य सांपडेल अशी कधींहि आपण आशा करूं नये; वरील सूक्तांत, वृषाची, विश्वोत्पादक व विश्वरक्षक अशी स्तुति केलेली आहे.

**अनड्वान् दाधार पृथिवीमुत द्यामनड्वान् दाधारोर्वन्तरिक्षम् । अनड्वान् दाधार प्रदिशः षडुर्वीरनड्वान् विश्वं भुवनमा विवेश ॥ १ ॥** अथर्व. ४. ११.

अनडुहानें (वृषभानें) पृथिवी व स्वर्लोक धारण केला आहे; अनडुहानें विस्तीर्ण अंतरिक्षाला धारण केलें आहे; अनडुहानें (प्राच्यादि) महादिशा व सहा उर्वी धारण केल्या आहेत; व अनडुहानें विश्व भुवन व्याप्त केलें आहे. १.

ह्याशिवाय, इंद्र व दुसरे मोठाले देव ह्यांच्या पंक्तीला ह्या वृषभाला आणून बसविलें आहे व "अनड्वान् दुहे"। "वृषभ दूध देतो," "अस्य यज्ञः पयो दक्षिणा दोहो अस्य"। "यज्ञांतील दक्षिणा म्हणजे त्याचें दोहन त्याचें दूध म्हणजे यज्ञ", "यो वेदानडुहो दोहान् सप्तानुपदस्वतः । प्रजां च लोकं चाप्नोति", "हे अनडुहाचे सात दोह जाणणाऱ्यास संतति व स्वर्ग यांची प्राप्ति होते" इत्यादि वर्णनांत आपणांला कोणताच गुण दिसत नाहीं. मात्र सात दोह जाणणाऱ्यास स्वर्ग मिळतो असें मानावयास आमची हरकत नाहीं! हें वृषभाचें वर्णन अथर्व. ९·४ सूक्तांत केलेल्या वृषभाच्या वर्णनापेक्षां अधिक महत्त्वाचें आहे असें मुळींच नाहीं. वरील सूक्तांत वृषभाच्या ठिकाणीं सर्व देवांचें अस्तित्व आहे, मूळारंभीं तो जलरूप होता वगैरे त्याची प्रशंसा आहे. हा वृषभ दुसरा तिसरा कोणी नसून यज्ञांत बळी देण्याकरतां काढलेला बैल होय. हें मिथ्या तत्त्वज्ञान व हा गूढाचा पडदा कशाकरितां, तर त्याचा व्यवहारांत चांगला उपयोग असे म्हणून; हें पुढें उतारे दिलेल्या सूक्तावरून सिद्ध होतें. या सूक्तांत गाईचें माहात्म्य वर्णन केलें आहे तें असेः—

**यया द्यौर्यया पृथिवी ययापो गुपिता इमाः ॥ ४ ॥**
**शतं कंसाः शतं दोग्धारः शतं गोप्तारो अधि पृष्ठे अस्याः । ये देवास्तस्यां प्राणन्ति ते वशां विदुरेकधा ॥ ५ ॥**
**वशा माता राजन्यस्य वशा माता स्वधे तव ।**
**वशाया यज्ञ आयुधं ततश्चित्तमजायत ॥ १८ ॥**

ही द्यावापृथिवी व जल यांचें संरक्षण करिते, हिच्या पाठीमागें शंभर दुधाचे घडे, शंभर दूध काढणारे, शंभर गुराखी

असतात, जे देव इच्या ठिकाणीं वास करतात ते इला जाणतात, ही क्षत्रियांची माता, ही स्वधेची माता, हिचें यज्ञ आयुध आहे, हिच्यापासूनच चित्ताची उत्पत्ति होते. ह्या प्रशस्तीचा कडेलोट खालील ऋचेंत झाला आहे.

वशामेवामृतमाहुर्वशां मृत्युमुपासते ।

वशा ( गाय ) हिलाच अमृत म्हणतात, मृत्यु म्हणून हिचीच पूजा करतात.

वशेदं सर्वमभवद् देवा मनुष्या३ असुराः
पितर ऋषयः ॥ २६ ॥

मनुष्य, असुर, पितर, ऋषी हीं सर्व वशेचींच रूपें आहेत. परंतु आतां ह्यापुढें गाईचा व्यवहारांत उपयोग कसा करावा तें दिलें आहेः—

य एवं विद्यात् स वशां प्रतिगृह्णीयात् ॥ २७ ॥

जो असें जाणतो त्यानेंच गाईचा प्रतिग्रह करावा.

\+ + + + + + + ॥

ब्राह्मणेभ्यो वशां दत्त्वा सर्वांल्लोकान्त्समश्नुते ।
ऋतं ह्यस्यामार्पितमपि ब्रह्माथो तपः ॥ ३३ ॥

ब्राह्मणाला गाय दिली असतां देणाराला सर्व लोकांची प्राप्ति होते, कारण गाईच्या ठिकाणीं ऋत, ब्रह्म आणि तप हीं सर्व वास करतात. व शेवटीं,

वशां देवा उप जीवन्ति वशां मनुष्या उत ।
वशेदं सर्वमभवद् यावत् सूर्यो विपश्यति ॥ ३४ ॥
अथर्व. १०. १०.

देवांची उपजीविका गायीवर होते, त्याप्रमाणेंच मनुष्यांचीहि उपजीविका गायीवर होते. सूर्याची दृष्टि पोंचते तेथपर्यंत सर्व कांहीं गायीचेंच रूप आहे.

डॉयसेन ( Deussen ) ह्या विद्वान् जर्मन गृहस्थानें अथर्ववेदांतील "तात्त्विक" सूक्तांचा अर्थ लावण्याची वरीच खटपट केली आहे व त्यांत कांहींशी संबद्धता दाखवून दिली आहे. उदाहरणार्थ, १० व्या कांडाच्या २ ऱ्या सूक्तांत ब्रह्मसिद्धीचा विचार जड व मीमांसक दृष्टीनें केला आहे व ११ व्या कांडाच्या ८ व्या सूक्तांत तोच विचार अध्यात्म दृष्टीनें केला आहे, असें डॉयसेननें दाखविलें आहे. पण ह्या सूक्तांत इतकें तत्त्वज्ञान भरलें असेल हें विंटरनिट्झला खरें वाटत नाहीं. त्याची अशी कल्पना आहे कीं, ह्या सूक्तांचे लेखक मिथ्या तत्त्वज्ञानी असावेत, व त्यांनीं मनुष्यामध्यें विश्वात्मा ( ब्रह्म ) आहे हें तत्त्व नव्यानें शोधून काढलें नसून, त्यांच्या वेळीं परिणत स्थितींत असलेलें हें तत्त्व, त्यांनीं गूढ, अव्यक्त व विसंगत अशा तऱ्हेनें नव्यानें मांडण्याचें मात्र काम केलें. ऋग्वेदाच्या १० व्या मंडलांतील १२१ व्या सूक्तांत एक गहन तत्त्ववेत्ता व उत्तम कवि विश्वाच्या वैभवाचें वर्णन फार स्पष्ट भाषेंत करून अशा विश्वाचा उत्पादक कोण ह्याबद्दल साशंक होतो; पण तेंच अथर्ववेदांत ( १० कांड २ सूक्त ) एक कवि ( सूक्तकार ) एकामागून एक मनुष्यावयवांचें वर्णन करीत सुटतो व हीं कोणी उत्पन्न केलीं असावींत, म्हणून प्रश्न करतोः—

केन पार्ष्णी आभृते पूरुषस्य केन मांसं संभृतं केन गुल्फौ ।
केनांगुलीः पेशनीः केन खानि.......... ॥ १ ॥

कस्मान्नु गुल्फावधरावकृण्वन्नष्ठीवन्तावुत्तरौ पूरुषस्य ।
जङ्घे निर्ऋत्य न्यदधुः क्वस्विज्जानुनोः संधी क उ
तच्चिकेत ॥ २ ॥

अशा आठ ऋचा आहेत व पुढच्या नऊ ऋचांत मनुष्यरचनेंतील व मानवी जीवितांतील सर्व प्रकारच्या गोष्टींची चवकशी केली आहेः—

प्रियाप्रियाणि बहुला स्वप्नं संबाधतन्द्र्यः ।
आनन्दानुग्रो नन्दांश्च कस्माद् वहति पूरुषः ॥ ९ ॥
आर्तिरवर्तिर्निर्ऋतिः कुतो......... ।

लगेच ह्याच ठिकाणीं हें विचारलें आहे कीं,

को अस्मिन्नापो व्यदधात्............ ॥ ११ ॥

को अस्मिन् रूपमदधात् को मह्मानं च नाम च ।
गातुं को अस्मिन् कः केतुं कश्चरित्राणि पूरुषे ॥ १२ ॥
\+ + + + + +

को अस्मिन्सत्यं कोनृतं कुतो मृत्युः कुतोमृतम् ॥ १४ ॥ इ.

नंतर असें विचारलें आहे कीं, सृष्टीवर मनुष्याची सत्ता कशी बसली? ह्या सर्व प्रश्नांना उत्तर म्हणून असें सांगितलें आहे कीं, मनुष्य ब्रह्मस्वरूप असल्यामुळें त्याला हें सामर्थ्य प्राप्त झालें. येथपर्यंत हें सूक्त फारसें सुंदर जरी नसलें तरी अगदीं शुद्ध व स्पष्ट आहे. पण ह्यापुढें ऋचा २६–३३ पर्यंत नेहमींच्या लपंडावाला सुरवात होते. ह्याला उदाहरण म्हणून खालील कांहीं ऋचा पाहाव्याः—

मूर्धानमस्य संसीव्याथर्वा हृदयं च यत् ।
मस्तिष्कादूर्ध्वः प्रैरयत् पवमानोधि शीर्षतः ॥ २६ ॥
तद् वा अथर्वणः शिरो देवकोशः समुब्जितः ।
तत् प्राणो अभि रक्षति शिरो अन्नमथो मनः ॥२७॥
अथर्व. १०. २.

अशा ऋचांतून अगाध ज्ञान शोधूं जाणें म्हणजे त्यांना गैरवाजवी मोठेपणा देण्यासारखें होतें. अथर्वसंहितेंतील ११ व्या कांडाच्या ८ व्या सूक्तांत डॉयसेनच्या म्हणण्याप्रमाणें ब्रह्मतत्त्वावर सर्वस्वीं अवलंबून राहणाऱ्या आध्यात्मिक व जड या घटकांच्या संयोगानें मनुष्याची उत्पत्ति झाली असें प्रतिपादिलें आहे; परंतु त्या सूक्तांत फारसा खोल अर्थ नाहीं असें विंटरनिट्झचें म्हणणें आहे. ज्याप्रमाणें खोटें बोलणाराला आपल्या बोलण्यावर लोकांनीं विश्वास ठेवावा म्हणून कधीं कधीं खरें बोलावें लागतें, त्याचप्रमाणें गूढवाद्याला आपल्या रचनेंत

कोठें कोठें इकडून तिकडून उसनें आणलेलें तत्त्वज्ञान, आपल्या मूर्खपणाला लोकांनीं उच्च ज्ञान समजावें या हेतूनें, घुसडून द्यावें लागतें. याचें प्रत्यंतर ११ व्या कांडाच्या ८ व्या सूक्तांत दिसून येतें. या सूक्तांत, अग्नि, वनस्पति, ओषधी, इन्द्र, बृहस्पति, सूर्य, वरुण, मित्र, विष्णु, भग, विवस्वान्, सविता, धाता, पूष्पन्, त्वष्टा इत्यादि देवतांची जवळजवळ नुसती यादी दिली आहे व या देवतांची आम्ही स्तुति करतों, त्यांनीं आम्हांला अंहसापासून म्हणजे पातकापासून मुक्त करावें अशी प्रार्थना केली आहे.

ही अशा दर्जाची पद्यरचना म्हणजे काव्य नव्हे किंवा तत्त्वज्ञानहि नव्हे. ह्या पद्यापेक्षां पुष्कळच सरस असें एक सूक्त अथर्ववेदांत सांपडतें. ह्या सूक्तांत कांहीं ऋचा पृथ्वीच्या उत्पत्तीसंबंधीं आहेत म्हणून ह्या सूक्ताची गणना जगदुत्पत्ति-विषयक सूक्तांत बहुतेक करण्यांत येते; परंतु ह्यांत कांहींएक गूढ व तात्त्विक ज्ञान नसल्यामुळें, खरें काव्य बरेंचसें आढळतें. हें सूक्त म्हणजे अथर्ववेदांतील १२ व्या कांडांतील १ लें पृथिवीसूक्त होय. ह्यांतील ६३ ऋचांतून पृथिवीमातेची, सर्व ऐहिक वस्तूंनां धारण करून त्यांचें रक्षण करणारी तूं आहेस, सर्व संकटांपासून आम्हांला मुक्त कर व आमच्यावर कृपादृष्टि ठेव वगैरे प्रकारें प्रार्थना केली आहे. प्राचीन भारतांतील धार्मिक काव्यप्रबंधांतून कांहीं प्रबंध किती सुंदर असतात याची कल्पना आणून देण्याकरितां, ह्या सूक्तांतील कांहीं ऋचा खालीं दिल्या आहेतः—

स॒त्यं बृ॒हदृ॒तमु॒ग्रं दी॒क्षा तपो॒ ब्रह्म॑ य॒ज्ञः पृ॑थि॒वीं धार॑यन्ति । सा नो॑ भू॒तस्य॒ भव्य॑स्य॒ पत्न्यु॒रुं लो॒कं पृ॑थि॒वी नः॑ कृणोतु ॥ १ ॥

यार्ण॒वेऽधि॑ सलि॒लमग्र॒ आसी॒द् यां मा॒याभि॑र॒न्वच॑रन् मनी॒षिणः॑ । यस्या॒ हृद॑यं पर॒मे व्यो॑मन्त्स॒त्येनावृ॑तम॒मृतं॑ पृथि॒व्याः । सा नो॒ भूमि॒स्त्विषिं॒ बलं॑ रा॒ष्ट्रे द॑धातूत्त॒मे ॥ ८ ॥

याम॒श्विना॒वमि॑माताँ॒ विष्णु॒र्यस्यां॑ विचक्र॒मे । इन्द्रो॒ यां च॒क्र आ॒त्मने॑ऽनमि॒त्रां शची॒पतिः॑ । सा नो॒ भूमि॒र्वि सृ॑जतां मा॒ता पु॒त्राय॑ मे॒ पयः॑ ॥ १० ॥

गि॒रय॑स्ते॒ पर्व॑ता हि॒मव॒न्तोऽर॑ण्यं ते पृथिवि स्यो॒नम॑स्तु ।
ब॒भ्रुं कृ॒ष्णां रोहि॑णीं वि॒श्वरू॑पां
ध्रु॒वां भूमिं॑ पृथि॒वीमिन्द्र॑गुप्ताम् ।
अजी॒तोऽह॑तो॒ अक्ष॒तो-
ऽध्य॑ष्ठां पृथि॒वीम॒हम् ॥ ११ ॥

त्वज्जा॒तास्त्वयि॑ चरन्ति॒ मर्त्या॒स्त्वं
बि॑भर्षि द्वि॒पद॒स्त्वं चतु॑ष्पदः ।
तवे॒मे पृ॑थिवि॒ पञ्च॑ मान॒वा येभ्यो॒ ज्योति॑र॒मृतं॒
मर्त्ये॑भ्य उ॒द्यन्त्सूर्यो॑ र॒श्मिभि॑रात॒नोति॑ ॥ १५ ॥
भूम्यां॑ दे॒वेभ्यो॑ ददति य॒ज्ञं ह॒व्यमरं॑कृतम् ।
भूम्यां॑ मनु॒ष्या॒जीवन्ति स्व॒धयान्ने॑न॒ मर्त्याः॑ ।
सा नो॒ भूमिः॑ प्रा॒णमायु॑र्दधातु
ज॒रद॑ष्टिं मा पृथि॒वी कृ॑णोतु ॥ २२ ॥
यत् ते॑ भूमे वि॒खना॑मि क्षि॒प्रं तदपि॑ रोहतु ।
मा ते॒ मर्म॑ विमृग्वरि॒ मा ते॒ हृद॑यमर्पिपम् ॥ ३५ ॥

यस्यां॒ गाय॑न्ति॒ नृत्य॑न्ति॒ भूम्यां॒ मर्त्या॒ व्यै॑लबाः ।
यु॒ध्यन्ते॒ यस्या॑माक्र॒न्दो यस्यां॒ वद॑ति दु॒न्दुभिः॑ ।
सा नो॒ भूमिः॒ प्रणु॑दतां स॒पत्ना॑न-
सप॒त्नं मा॑ पृथि॒वी कृ॑णोतु ॥ ४१ ॥

म॒ल्वं बिभ्र॑ती गुरु॒भृद् भ॑द्रपा॒पस्य॑ नि॒धनं॑ तितिक्षुः ।
व॒रा॒हेण॑ पृथि॒वी सं॑विदा॒ना सू॑क॒राय॒ वि जि॑हीते मृ॒गाय॑ ४८
भूमे॑ मात॒र्नि धे॑हि मा भ॒द्रया॒ सुप्र॑तिष्ठितम् ।
सं॒वि॒दा॒ना दि॒वा क॑वे श्रि॒यां मा॑ धेहि॒ भूत्या॑म् ६३
अथर्व. १२. १.

सत्य, मोठें व उग्र असें ऋत, दीक्षा, तप, ब्रह्म व यज्ञ हीं पृथिवीला धारण करतात. ती आमच्या भूत व भविष्याची पत्नी आहे, ती आमच्याकरितां विस्तीर्ण लोकांची योजना करो. १.

जी प्रथम समुद्रांत जल ( रूपानें ) होती, मनस्वी ( ऋषी ) लोक जिला नानाविध मायेनें अनुसरते झाले, जिचें हृदय उंच आकाशांत असून सत्यानें आवृत व अमर असें आहे, ती पृथिवी आम्हांला तेज व उत्तम राष्ट्रबल देवो. ८.

जिला अश्विनांनीं मोजलेली आहे, जिच्यावर विष्णूनें पाऊल ठेविलेलें आहे, जिला शचीपति इंद्रानें स्वतःकरितां अमित्र-रहित निःशत्रु अशी केली, ती भूमि आम्हांला, माता ( आम्हां )पुत्रांनां दूध देते त्याप्रमाणें दूध देवो. १०.

हे पृथिवि ! तुझे गिरी, हिमवन्त पर्वत, अरण्य, यांचें मंगल असो. पिंगट, कृष्ण, रोहित, विश्वरूप व ध्रुव अशी इंद्रानें रक्षण केलेली जी पृथिवी त्या पृथिवीवर मी अजित, अहत ( मारला गेलों नाहीं असा ) व अक्षत असा उभा राहिलों. ११.

तुझ्यापासून उत्पन्न झालेले मर्त्य लोक तुझ्यावर हिंडतात फिरतात; तूं द्विपाद व चतुष्पाद यांचें पोषण करितेस. हे पृथिवि ! तुझ्या या पांच मानवी जाती आहेत; या मर्त्य असूनहि यांच्याकरितां सूर्य उदय पावून आपल्या किरणांच्या योगानें अमर ज्योति वृद्धिगत करतो. १५.

भूमीवर देवांनां यज्ञ व चांगला तयार केलेला हवि देतात. भूमीवर मर्त्य मनुष्यें आपल्या *चालीप्रमाणें अन्न ग्रहण करून जगतात. ती भूमि आम्हांला प्राण, आयु, व चांगलें बळकट शरीर ( जरत् अष्टिम् ) देवो. २२.

* ( इच्छेप्रमाणें. )

हे भूमि ! मी जें तुला खणतों, त्यापासून लवकरच उगवो. हे पावक ( भूमि ) ! तुझ्या मर्माला किंवा हृदयाला माझ्यापासून धक्का न लागो. ३५.

जीवर मर्त्यलोक मोठ्यानें आरडाओरडा करून गातात व नाचतात, जीवर ते युद्ध करतात व युद्धांतील आरोळ्या व दुंदुभी गर्जतात, ती भूमि आमच्या शत्रूंनां हांकून लावो व ती पृथिवी मला शत्रुरहित करो. ४८.

मूर्ख व वजनदार अशा ( दोघां )नां धारण करणारी भद्र व पाप यांच्या निधनाची तितिक्षा करणारी पृथिवी वराहासमवेत, मृग व सूकर या ( दोहीं ) करितांहि फिरते. ४८.

हे माते भूमि ! मला सुस्थानीं सुखानें ठेव. हे कवे ! स्वर्गाशीं सख्य जोडून मला यश व धन द्या. ६३.

हें सूक्त ऋग्वेदसंहितेंत शोभण्यासारखें आहे; व ह्यावरून असें सिद्ध होतें कीं, अथर्ववेदसंहितेंत जरी ऋग्वेदापेक्षां हेतूची एकरूपता अधिक आहे तरी तींत मधून मधून अनेक प्राचीन काव्यांचे खंड आहेत. ऋग्वेदाप्रमाणेंच ह्या संग्रहांत सुद्धां अगदीं कमी दर्जाच्या व टाकाऊ काव्य प्रबंधांच्या जोडीला, प्राचीन भारतीय काव्यापैकीं कांहीं फार मौल्यवान् रत्नेंहि आहेत व हिंदुस्थानांतील आर्य लोकांच्या जुन्या काव्याची खरी कल्पना येण्यास हे दोन्ही ग्रंथ विचारांत घेतले पाहिजेत.

ऋग्वेदाचें आणि अथर्ववेदाचें वाङ्मय या दृष्टीनें विवेचन करण्यांत आलें, आणि आरामखुर्चीवर बसून वाचण्याजोगें कांहीं तरी लिहितां आलें. यजुर्वेद व सामवेद यांची माहिती द्यावयाची म्हणजे विचार आणि कल्पना द्यावयाच्या नसून डोकेंफोड करावयास लावणारीं दोन शास्त्रें द्यावयाचीं. त्यांपैकीं एक शास्त्र म्हटलें म्हणजे यज्ञशास्त्र होय, आणि दुसरें शास्त्र म्हटलें म्हणजे संगीतशास्त्र होय. सामवेदास सूक्तांचा संग्रह म्हणण्यापेक्षां चालींचा संग्रह म्हटलें तरी चालेल. यजुर्वेद म्हणजे यज्ञशास्त्र होय. आपण वैदिक धर्म किंवा श्रौत धर्म म्हणतों त्याचा अर्थ यजुर्वेदात्मक धर्म असा आहे. यजुर्वेद वर्णन करावयाचा म्हणजे यज्ञ व इतर क्रिया ज्या ग्रंथांत वर्णिल्या आहेत त्यांचें वर्णन द्यावयाचें. आतांपर्यंत ऋग्वेद आणि अथर्ववेद यांचें विवेचन केलें. या दोन ( ऋग्वेद आणि अथर्ववेद ) संहितांमध्यें जें एक साम्य आहे तें हें कीं, यांतील सूक्तें कोणत्याहि विशिष्ट कर्माच्या प्रयोगाकरतां रचिलीं गेलीं नाहींत. ऋग्वेदांतील विषयविविधताच याला साक्ष आहे. जरी ऋग्वेदांतील बहुतेक सूक्तांचा उपयोग यज्ञकर्मामध्यें होतो आणि जरी अथर्ववेदांतील ऋचा आणि मंत्र बहुतेक सर्व विधी व अभिचार या कामांकडे लावीत असत, तरी या विशिष्ट कर्मासाठींच त्यांची रचना प्रारंभीं झाली असें म्हणतां येत नाहीं. या दोन्ही संहितांतील ऋचांचा संग्रह वाङ्मयविषयक हेतु धरून केला आहे आणि कांहीं तरी प्रयोजन काढून हीं अमक्यानें अमक्या प्रसंगीं म्हणावयाचीं गाणीं ( मंत्र ) या रूपानें या जमलेल्या वाङ्मयाचा विनियोग केला आहे असें आपणांस म्हणतां येईल.

ऋग्वेदसूक्तांची एकापुढें एक मांडणी यज्ञोपयोगाच्या दृष्टीनें केलेली दिसत नाहीं. अथर्ववेदाचें हौत्र मात्र यज्ञाच्या दृष्टीनें मांडलेलें दिसतें. अथर्ववेदाचें श्रौतकर्मांत मोठें मौजेचें स्थान होतें. पण अगोदर यजुर्वेदाची थोडीशी माहिती दिल्याशिवाय हें समजणार नाहीं म्हणून आपण आतां यजुर्वेदाकडे वळूं.

---

## प्रकरण ४ थें.

### वेदप्रवेश–यजुर्वेद.

या वेदाच्या संहितांची गोष्ट ऋग्वेद व अथर्ववेद यांहून निराळी आहे. या संहितांतील ऋचा व्यावहारिक उपयोगाच्या दृष्टीनें म्हणजे यज्ञकर्मामध्यें उपयोगी पडतील अशा क्रमानें एकत्र केल्या आहेत. या संहिता म्हणजे खरोखर यज्ञांतील विशिष्ट पुरोहितांच्या उपयोगाचीं ऋचांचीं पुस्तकें होत, दुसरें कांहीं नाहीं. अर्थात् त्या काळीं हीं लिहिलेलीं पुस्तकें नव्हतीं; तर संहिता पुरोहित व गुरु यांच्या डोक्यांमध्यें ( पाठ केलेल्या ) असत; आणि पुरोहितांच्या पाठशाळांत त्या तोंडीं शिकवून व शिकून कायम ठेवीत असत.

यजुर्वेदाच्या संहितांचा मूळ उगम समजण्याकरितां प्राचीनांच्या कर्मकलापाबद्दल येथें चार शब्द लिहिणें जरूर आहे. प्राचीन वैदिक यज्ञसंप्रदायाचें थोडेंफार मर्म समजल्याशिवाय एकंदर वैदिक वाङ्मय पूर्णपणें समजणें बहुतेक अशक्य आहे. प्राचीन वैदिक धर्माची आपणांस जी माहिती आहे तिजवरून त्यांतील कर्मे नेहमीं दोन प्रकारचीं असत असें दिसतें. ऋग्वेदांतील कांहीं सूक्तांचा व अथर्ववेदांतील पुष्कळ मंत्रांचा संसारांतील जन्म, विवाह आणि इतर समारंभांच्या वेळीं प्रार्थना करण्याकडे आणि आशीर्वाद देण्याकडे, तसेंच मृताची उत्तरक्रिया करतांना आणि पितरांचीं श्राद्धकर्मे करतांना उपयोग करीत असत हें आपण पाहिलेंच आहे. त्याप्रमाणेंच पशुपाल आपल्याजवळ गुरांढोरांची समृद्धि होण्याकरितां, आणि शेतकरी आपल्या पिकांची चांगली वाढ होण्याकरितां, करावयाच्या समारंभांमध्यें त्यांचा उपयोग करीत हेंहि आपण पाहिलें आहे. या समारंभांनां व त्या प्रसंगीं करावयाच्या होमहवनांनां उत्तरकालीं 'गृह्यकर्माणि' असें म्हणत. *या गृह्यकर्माविषयीं गृह्यसूत्रांमध्यें–यांविषयीं पुढें

* गृह्यकर्मे आणि पाकयज्ञ हे श्रौतकर्मांच्या अगोदर असावेत असें कै० महादेव मोरेश्वर कुंटे आपल्या Viccititudes of the Aryan Civilisation मध्यें म्हणतात.

माहिती येईल—आपणांस सविस्तर माहिती मिळते. या गृह्यकर्मांच्या वेळीं करावयाच्या यज्ञांमध्यें घरांतील यजमानच यज्ञपुरोहिताचें स्थान घेत असे;* आणि त्याच्या मदतीला फार तर एकच आचार्य 'ब्राह्मण' असे.

या यज्ञांतील आहुती घरांतील यज्ञकुंडांतच देत असावेत. पुरातन पद्धतीप्रमाणें, गरीबश्रीमंत, लहानथोर प्रत्येक आर्याला आवश्यक अशा या यज्ञांशिवाय दुसरे महायज्ञहि करीत असावेत. विशेषतः योद्ध्यांची देवता जी इंद्र, तिच्या प्रीत्यर्थ सोमयज्ञ करीत असत. असा यज्ञ श्रेष्ठ, श्रीमंतलोक, मुख्यत्वेंकरून राजेलोकच करीत असावेत. ठरलेल्या नियमांप्रमाणें एक मोठी यज्ञभूमि तयार करून तीवर अशा यज्ञांत आवश्यक असलेल्या तीन पवित्र अग्नींकरितां कुंडें रचीत असत. अशा यज्ञांत मुख्य ऋत्विज चार असून त्यांच्या हाताखालीं इतर ऋत्विजांचा मोठा समुदाय असे. हे ऋत्विज यज्ञांतील असंख्य भानगडीचीं कृत्यें व विधी करीत असत. यज्ञांतील यजमान म्हणजे यज्ञकर्ता राजा किंवा थोर गृहस्थ जो असतो, त्याचें काम अगदीं थोडें असतें; त्याचें मुख्य काम असें कीं, यज्ञांमधील ब्राह्मणांनां सढळ हातानें दक्षिणा द्यावयाची; ही देखील गाईच्या हिशोबानें ठरलेली असे. तेव्हां ज्या यज्ञाकर्मामध्यें ब्राह्मणांनां अत्यन्त प्राप्ति होत असे, त्या यज्ञकर्मांतील विधिसंकल्पांचा अभ्यास ते बऱ्याच आस्थेनें करीत व यज्ञकर्मांविषयींचें त्यांनीं एक स्वतंत्र शास्त्रच तयार केलें, यांत आश्चर्य नाहीं. या यज्ञकर्मांची माहिती देणारे ग्रंथ जीं 'ब्राह्मणें' व 'श्रौतसूत्रें' त्यांचा परिचय आपणांस पुढें होईल. ज्यांनां कालान्तरानें 'अपौरुषेय' असें मानूं लागले त्या 'श्रुति' ग्रंथांतील ब्राह्मणें हा महत्त्वाचा भाग असल्यानें यज्ञांनां 'श्रौतकर्म' असें म्हणूं लागले. श्रुतीच्या आधारानें हे यज्ञ करीत असत. त्यांच्या उलट जीं 'गृह्यकर्में' तीं 'स्मृतीं'च्या आधारानें करीत. 'स्मृति' म्हणजे स्मरण, म्हणजे परंपरा. स्मृतींनां 'अपौरुषेय' मानीत नाहींत. श्रौतकर्में त्रेताग्नीवर व गृह्यकर्में एकाग्नीवर होत असत. आतां, श्रौत यज्ञकर्में करणारे जे मुख्य चार पुरोहित ते असेः—१ होता म्हणजे 'बोलाविणारा; हा देवांची प्रार्थना करून त्यांनां यज्ञकर्मांत येण्याविषयीं आमंत्रण करण्याकरितां सूक्तांतील ऋचा म्हणतो; २ उद्गाता अथवा 'गाणारा'; सोमाच्या आहुती देण्याच्या वेळीं सामें म्हणणारा; ३ अध्वर्यु अथवा 'यज्ञकरणारा, म्हणजे स्वतःच तोंडानें गद्यमंत्र म्हणून हातानें यज्ञांतील सर्व विधी करणारा आणि ४ ब्रह्मा अथवा महापुरोहित यानें यज्ञाला पीडा होऊं नये म्हणून बंदोबस्त ठेवावयाचा असे. या बंदोबस्ताचें कारण प्रत्येक पवित्र कृत्याला, तसेंच प्रत्येक यज्ञाला, प्राचीनांच्या मतें कांहींना कांहीं विघ्न यावयाचेंच; आणि जर विधिनियमाप्रमाणें अगदीं बरोबर कर्म झालें नाहीं, जर एखादा मंत्र किंवा एखादी प्रार्थना बरोबर म्हटली गेली नाहीं, तर—एखादा स्वर चुकला तरी—तेंच पवित्र कर्म यज्ञकर्त्या यजमानाच्या नाशाला कारण व्हावयाचें. असें न व्हावें म्हणून यज्ञस्थलाच्या दक्षिणभागीं ब्रह्मा यज्ञाचें रक्षण करण्याकरितां बसलेला असतो. दक्षिणदिशा ही मृत्युदेवता यम याची दिशा असून यज्ञविध्वंसक जे असुर ते याच दिशेनें येऊन लोकांनां भय घालतात असें मानीत. ब्रह्मा चाललेल्या यज्ञकर्माकडे सारखें लक्ष ठेवितो आणि कोठें थोडीशी चूक झालेली त्याच्या नजरेस आली तर कांहीं मंत्र म्हणून त्या चुकीचें क्षालन करतो. ब्रह्म्याला एका जुन्या ग्रंथांत 'यज्ञपुरोहितांतील उत्तम वैद्य' (भिषग्वर्य) असें म्हटलें आहे.* हें काम करतां येण्यास ब्रह्मा स्वतः वेदसंपन्न असला पाहिजे. हें यज्ञपुरोहिताचें काम तो 'त्रयीविद्या' म्हणजे तीन वेदांच्या अध्ययनाच्या साहाय्यानें करतो. तीन वेदांचें ज्ञान असल्यामुळें प्रत्येक चूक त्याच्या ताबडतोब ध्यानांत येऊं शकते.†

बाकीच्या तीन पुरोहितांनां प्रत्येकीं एकेक वेदच येत असावा लागतो. होता ज्या पुरोनुवाक्या म्हणजे 'निमंत्रण-ऋचा' म्हणून देवांनां यज्ञाकरितां आह्वान करतो आणि ज्या याज्या म्हणजे 'यज्ञ-ऋचा' आहुती देतांना म्हणत असतो त्या ऋचा ऋग्वेदामधील असतात. होत्याला ऋग्वेदसंहिता येत असावी लागते, म्हणजे ती त्यानें पाठ केलेली असली पाहिजे. कारण सोमयज्ञ करतांना जे 'स्तुतिमंत्र' अथवा स्तोत्रें म्हणावीं लागतात तीं त्या संहितेमधून घेतलेलीं आहेत. येणेंप्रमाणें ऋग्वेदसंहिता आणि होता यांचा असा विशिष्ट संबंध असतो. (तथापि या होत्याकरतां ऋग्वेदसंहिता रचून तयार केली असें मात्र नाहीं.) शिवाय होता जेवढे 'स्तुतिमंत्र' म्हणतो, तेवढेच सोमयज्ञामध्यें लागतात असें मात्र नाहीं; तर आणखी उद्गाता व त्याचे साहाय्यक जीं

* आश्वलायन गृह्यसूत्र १.३,६. गृह्य कर्मामध्यें ब्राह्मण सांगणें ऐच्छिक असे. गोभिलगृह्यसूत्र. १.९.८,५. या पाकयज्ञांमध्यें म्हणजे गृह्यकर्मांतील नित्ययज्ञांमध्यें फक्त एक ब्राह्मणपुरोहित असतो. यज्ञ करणारा यजमानच मंत्र म्हणणाऱ्या होत्याचें काम करतो.

* शतपथब्राह्मण १४. २, २, १९. छांदोग्य उपनिषद् पहा ४. ७,८. † ऐतरेय आरण्यक ३. २, ३, ६. शतपथब्राह्मण ११. ५,८,७. ब्रह्मा याचा अथर्ववेदाशीं संबंध उत्तरकालीं आला, आणि म्हणून अथर्ववेदाला 'ब्रह्मवेद' असें नांवहि पडलें; आणि पुढें अथर्ववेदी लोक म्हणूं लागले कीं, ब्रह्म्याला अथर्ववेदसंहिताहि आली पाहिजे. खरोखर, श्रौतयज्ञांत ब्रह्म्याचा अथर्ववेदाशीं कांहीं संबंध नसतो. तथापि या दोघांचा संबंध कसा जडला हें समजण्यासारखें आहे. हा संबंध जडण्याचें कारण गृह्ययज्ञामध्यें ब्रह्मा एकटाच पुरोहित असे, व त्यामुळें बहुंशीं अथर्ववेदांतच येणारे आशीर्वचनमंत्रहि त्याला येणें आवश्यक असें हेंच दिसतें.

स्तुतिस्तोत्रें' म्हणतात,* तींहि लागतात. हीं स्तोत्रें म्हणजे पद्यमय ऋचा असतात आणि त्या, ठराविक चालींत म्हणजे सामांत बसविलेल्या असतात. हे राग व ज्या पद्यमय ऋचांशीं त्यांचा संबंध असतो त्या, उद्गातृपुरोहित सामवेदी पाठशाळांमध्यें जाऊन शिकतात; आणि सामवेदसंहिता म्हणजे उद्गात्यांच्या उपयोगाकरतां संग्रह केलेल्या ऋचांचा ग्रंथ. या संहितेंत ऋचांपेक्षां ज्या सुरांत त्या असतात त्या रागांचें महत्त्व अधिक असतें.

शेवटचा व मुख्य पुरोहित अध्वर्यु. याला यज्ञामध्यें असंख्य विधी करीत असतांना तोंडानें हळू हळू कांहीं लहान लहान गद्यमय व कांहीं जरा मोठालीं गद्यपद्यमय अशीं स्तोत्रें म्हणावीं लागतात; त्यांपैकीं गद्यमय असतात त्यांनां 'यजुः' (अनेकवचन 'यजूंषि') म्हणतात आणि पद्यांनां 'ऋक्' (अनेकवचन 'ऋचः') असें म्हणतात.† यजुर्वेद-संहितांमध्यें ह्या सर्व गद्यमय प्रार्थना व विधी, आणि त्या प्रार्थना म्हणून जीं यज्ञांतील कर्में करावयाचीं, त्यांबद्दलचे नियम आणि विवेचन, यांचा अध्वर्युपुरोहितांचे उपयोगाकरतां संग्रह केलेला आहे; आणि यज्ञांतील उपयोगाला अनुसरून त्यांचा क्रम लाविला आहे.

ऋग्वेदसंहिता आणि अथर्ववेदसंहिता यांच्याहून अगदीं निराळ्या प्रकारच्या अशा ज्या सामवेद आणि यजुर्वेद संहिता यांनां त्यांच्या विशिष्ट रचनेवरून उपासनामयसंहिता असें नांव देणें योग्य होईल.

**यजुर्वेदसंहिता.**—ज्याप्रमाणें सामवेदसंहिता म्हणजे उद्गात्याचें गानपुस्तक, तसेंच यजुर्वेदसंहिता म्हणजे अध्वर्यु-ऋत्विजाचें कर्मदर्शक पुस्तक होय. 'अध्वर्यूंच्या वेदाच्या एकशेंएक शाखा आहेत,' असें व्याकरणकार पतञ्जलि म्हणतो.‡ यजुर्वेदाच्याच इतक्या शाखा कां असाव्या याची कल्पना करतां येते. कारण निरनिराळ्या प्रकारचीं यजनकर्में करीत असतां अध्वर्यूंनां स्वतः प्रार्थना म्हणाव्या लागत असत; या प्रार्थनांसंबंधानें निरनिराळीं मतें व पंथ पडत गेले असावे, आणि त्यामुळें प्रार्थनांच्या निरनिराळ्या पोथ्या निघाल्या असाव्या. विधी किंवा उपासना यांत अगदीं थोडा फरक पडला तरी तेवढ्यानें एक नवीन वैदिकपंथ उत्पन्न होई. हें पंथभेदोत्पत्तीचें सामान्य स्वरूपवर्णन झालें. शुक्ल

* वस्तुतः स्तोत्रें प्रथम येतात, आणि नंतर शस्त्रें येतात. † होता सूक्तें म्हणत असतो, म्हणजे मोठ्यानें गाण्याचे सुरावर तीं पाठ म्हणतो. उद्गाता स्तुति–स्तोत्रें तालस्वरयुक्त म्हणत असतो. अध्वर्यु प्रार्थनामंत्र हळुहळू म्हणत असतो. पुरोहितांनां यज्ञांतील आपआपलीं निरनिराळीं कामें करण्याची सूचना देण्याकरतां म्हणावयाचे जे यजु–मंत्रांतील एक प्रकारचे "निगद", ते मात्र अर्थात् अध्वर्यूला मोठ्यानें म्हणावे लागतात. ‡ महाभाष्याच्या प्रस्तावनेंत.

कृष्णांच्या भेदाचा इतिहास बराच भानगडीनें भरला आहे. त्याचें सविस्तर विवेचन पुढें येईलच.

चरणव्यूहामध्यें यजुर्वेदाचे ८६ भेद दिले आहेत परंतु त्या सर्व शाखांचीं नांवें दिलीं नाहींत. चरणव्यूहांत पुढील नांवें दिलीं आहेत.* चरकांचे बारा भेद आहेत ते–चरक, आव्हरक, कठ, प्राच्यकठ, कपिष्ठल कठ, चारायणीय, वारायणीय, वार्त्तान्तवीय[1]. श्वेताश्वतर[2], औपमन्यव, पाताण्डनीय[3] व मैत्रायणीय हे होत. मैत्रायणीयांमध्यें पुन्हां सहा शाखा उत्पन्न झाल्या त्या–मानव, वाराह, दुंदुभ, छगलेय[4], हारिद्रवीय व श्यामायनीय[5] या होत. तैत्तिरीयांच्या मुख्य दोन शाखा आहेत औखेय[6] आणि खाण्डिकेय[7]. त्यांपैकीं खाण्डिकेयांच्या पांच शाखा आहेत त्या[8]–कालेत, शाट्यायनी, हिरण्यकेशी, भारद्वाजी आणि आपस्तम्बी या होत. वाजसनेय शाखेचे पुढीलप्रमाणें भेद आहेत–जाबाल[9], बौद्धायन[10], काण्व, माध्यंदिनेय[11], शाफेय[12], तापनीय[13], कपोल[14], पौण्डरवत्स[15], आवटिक[16], परमावटिक[17], पाराशर[18], वैणेय, वैधेय, अद्ध[19] आणि बौधेय[20].

आतांपर्यंत यजुर्वेदाच्या सहा संहिता उपलब्ध झाल्या आहेत त्या येणेंप्रमाणें:—

१ ली **काठक-संहिता.**—कठशाखेच्या या संहितेची माहिती बराच कालपर्यंत बर्लिन-लायब्ररीमधील एका हस्तलिखितावरून मिळत असे, पण आतां ती L. Von Schroeder नें प्रसिद्ध केली आहे.†

२ री **कपिष्ठल-कठ-संहिता.**—ही देखील प्रसिद्ध झाली आहे.

* पुढील टीपांमध्यें पाठभेद दाखविले आहेत. १ पाणिनी (४.३.१०२) प्रमाणें 'वारतन्तवीय' असें होईल. २ श्वेताश्वतर; श्वेताः श्वेततर; ३ मॅक्स मुल्लरनें पाताण्डनीय ही शाखा आणि वारायणीय ही शाखा पाठभेदांत दाखविली आहे व मूळांत वारायणीय ही अजिबात गाळून पात आणि ऐण्डिनेय ह्या वेगळ्या दाखविल्या आहेत. ४ छागलेय; चैकेय; छागेय. ५ मॅक्स मुल्लर 'श्याम' असा एक जास्त भेद दाखवितो. ६ औखीय; औख्य; औक्ष्य, औपेय. ७ खाण्डिकीय; पाण्डिकेय. ८ आपस्तम्बी, बौधायनी, सत्याषाढी, हिरण्यकेशी, औखेय किंवा औधेयी. दुसऱ्या एका प्रतींत कालेय, शाट्यायन, हिरण्यकेश, भारद्वाज, आपस्तम्बीय. ९ जाबाल. १० बौधेय, औधेय, गौधेय, बौधि. ११ माध्यंदिन. १२ शापीय, शापेय. १३ तापायनीय, तापायन. १४ कपाल, कलाप. १५ पौंड्रवत्स, पौंड्रवछ. १६ अवटिक. १७ पामावटिक. १८ पाराशर्य, पाराशरीय. १९ औख्य, उवेय, उरस, औधेय, औखीय. २० बौध्यश्व, मौनेय. याखेरीज एका पुस्तकांत गलव, वेजरस व कात्यायनीय हीं नांवें जास्त आढळतात आणि कठ शाखेचे प्राच्य, उदीच्य आणि नैऋत्य असे भेद आढळतात.

† काठकम् Liepzig 1900.

३ री **मैत्रायणी-संहिता.**—मैत्रायणीशाखेची संहिता. L. Von schroeder नें ही प्रसिद्ध केली आहे.*

४ थी **तैत्तिरीय-संहिता.**—तैत्तिरीय-शाखेची संहिता. यजुर्वेदांत तैत्तिरीय हा एक मुख्य पंथ होता व त्यांत ही संहिता शिकवीत असत. ए. वेबरनें ही प्रसिद्ध केली†. ही आनंदाश्रमानें सायणभाष्यासह प्रकाशिली आहे.

या चार संहितांचा परस्पर निकट संबंध आहे, आणि या सर्व 'कृष्ण-यजुर्वेदां'तील आहेत. यांहून अगदीं निराळी अशीः—

५ वी **वाजसनेयि-संहिता.**—हिलाच शुक्ल-यजुर्वेद म्हणतात. या वेदाचा मुख्य गुरु याज्ञवल्क्य वाजसनेय(यि) यावरून हें नांव पडलें. ह्या वाजसनेयि संहितेंत काण्व व माध्यंदिन अशा दोन शाखा आहेत; पण दोहोंत फरक फार थोडा आहे.‡

उवट आणि महीधर यांच्या भाष्यांसह निर्णयसागर छापखान्यानें माध्यंदिनसंहितेची एक सुंदर आवृत्ति छापली आहे. काण्वसंहिता ही आतां सायणभाष्यासह अजमीर येथें छापून प्रसिद्ध झाली आहे.

शास्त्रीय वर्गीकरण करतांना ऋग्वेद, यजुर्वेद इत्यादि वेदनामें आणि मंत्र, ब्राह्मण इत्यादि ग्रंथनामें यांचा उपयोग समजून घेतला पाहिजे. ऋचा, यजू यांस विशिष्ट अर्थ आहे. होत्यानें म्हणावयाचे मंत्र त्या ऋचा (ऋग्वेद) होत, अध्वर्यूनें म्हणावयाचे मंत्र ते यजू (यजुर्वेद) होत, उद्गात्यानें म्हणावयाचीं गाणीं तीं सामें (सामवेद) होत. याजकावरून जसा वेदविभाग करतां येतो तसा उपयोगावरून अमुक एखादें वाक्य मंत्र कीं ब्राह्मण हें ठरवितां येतें. ग्रंथाचें नांव यजुर्वेद असलें म्हणजे आंतील सर्व मजकूर शास्त्रीय दृष्टीनें यजुर्वेद नव्हे. यजुर्वेदांत हौत्र देखील पुष्कळच आहे. दर्शपूर्णमास आणि पशु यांचें हौत्र यजुर्वेदांत आहे. यज्ञप्रसंगीं यजुर्वेदांतील हौत्र म्हणावें अगर म्हणू नये याविषयीं क्षुल्लक भांडणें पुण्यांत उपस्थित झालीं होतीं. या याजुषहौत्रासंबंधाच्या भानगडी पुण्यांतील पत्रांतून वारंवार दृष्टीस पडत होत्या. असो.

कृष्णयजुर्वेदांतील ज्या भागास संहिता म्हणतात त्या भागांत ब्राह्मणहि पुष्कळ आलें आहे, आणि ज्या भागास ब्राह्मण म्हणतात त्यांत संहिता म्हणजे मंत्रभागहि पुष्कळ आला आहे. अगोदर संहिता वर्णावयाच्या आणि मग ब्राह्मणें वर्णावयाचीं, ही पद्धति थोडावेळ तरी त्यागिली पाहिजे. कृष्णयजुर्वेदाच्या तैत्तिरीय शाखेचें संपूर्ण पृथक्करण द्यावयाचें म्हणजे वेद व ब्राह्मणें या दोहोंचीहि माहिती द्यावयाची. एकाशिवाय दुसरें लिहिणें व्यर्थ होय.

कृष्णयजुर्वेद वर्णन करावयाचा म्हणजे तत्कालीन कर्मांचें ज्ञान करून द्यावयाचें आणि तें ग्रंथांत कसें काय मांडलें आहे हें समजावून द्यावयाचें. यासाठीं प्रथम या वेदाचें विषयवार पृथक्करण दिलें पाहिजे. सोईसाठीं व ऐतिहासिक महत्त्वामुळें तैत्तिरीय शाखा स्पष्टीकरणार्थ घेतली आहे. तींतील विषयांचें पृथक्करण येणेंप्रमाणेः—

## —तैत्तिरीयसंहितेची विषयसूची.—

(विषयांच्या वर्णनासह.)

१. **अग्न्याधान.**—अग्निहोत्राचा स्वीकार करतेवेळीं करावयाचा 'अग्न्याधान' हा एक विधि आहे. शमीच्या वृक्षांत वाढलेल्या पिंपळाच्या झाडाच्या 'अरणी' करून त्यांच्या घर्षणानें उत्पन्न केलेला अग्नि ३ किंवा ५ ठिकाणीं स्थापन करावयाचा हें अग्न्याधानांतील प्रधान कर्म होय. यजमान व पत्नी यांखेरीज अध्वर्यु, ब्रह्मा, होता, उद्गाता व आग्नीध्र असे ५ ऋत्विज या प्रसंगीं नियोजित केले जातात. अध्वर्यु हा सर्वांत मुख्य असतो. उद्गाता अग्निस्थापनेच्या प्रसंगीं सामगायन करतो. होत्यानें स्तुति, ब्रह्म्यानें देखरेख व आग्नीध्रानें अध्वर्यूच्या हाताखालीं मदत करावयाची असते. गार्हपत्य, दक्षिणाग्नि व आहवनीय हे तीनच अग्नी कोणी स्थापन करतात व कोणी या तिघांत सभ्य व आवसथ्य या दोन अग्नींची भर घालतात.

**१. अग्न्याधान** (अग्निहोत्र घेण्याचा विधि.)

| | | कांड | प्रपाठक | अनुवाक |
|---|---|---|---|---|
| कालनिर्णय | ब्राह्मण. | १ | ५ | २ व ३ |
| आधान | ,, | १ | १ | २–१० |
| | ,, | १ | ३ | १ |

२. **पुनराधान.**—कांहीं थोड्या फरकानें अग्न्याधानाचा व पुनराधानाचा विधि सारखाच आहे. फार दिवस नित्यहोम इष्टी वगैरे अंतरल्यानें अथवा दुसऱ्या कांहीं प्रमादानें अग्निहोत्र विच्छिन्न होतें, म्हणजे स्वीकारलेले अग्नी कर्मांच्या दृष्टीनें निरुनिपयोगी होतात, अशा वेळीं 'पुनराधान'नामक विधि करून अग्निहोत्राची तुटलेली परंपरा पुन्हां कायम करण्यांत येते.

**२. पुनराधान** {नष्ट झालेलें अग्निहोत्र पुन्हां सुरू करण्याचा विधी.}

| | कां. | प्र. | अ. |
|---|---|---|---|
| संहिता | १ | ५ | १–४ |

३. **अग्निहोत्रहोम.**—अग्निहोत्र्यानें नित्य सकाळीं व सायंकाळीं तिन्ही अग्नींच्या ठिकाणीं तुपाच्या, दुधाच्या किंवा दुसऱ्या एखाद्या हवनीय द्रव्याच्या दोन दोन आहुती द्यावयाच्या असतात. सूर्य व प्रजापति यांनां उद्देशून सकाळीं व अग्नि व प्रजापति यांनां उद्देशून संध्याकाळीं पूर्वोक्त आहुती देणें हा एकच मुख्य विधि अग्निहोत्र्याला नित्य आवश्यक आहे. शिवाय

* Leipzig 1881–1886. यांतील पुष्कळ उताऱ्यांचें जर्मन भाषान्तर झालेलें आढळतें. † Schroeder च्या 'Indische Studien' च्या ११–१२ व्या भागांत. ‡ शुक्लयजुर्वेद भाग १ ला, वाजसनेयि संहिता, व तीवरील महीधराची टीका. Berlin–London 1858. R. T. H. Griffith नें या संहितेचें इंग्रजी भाषान्तर केलेलें आहे.

अग्नीजवळ उभें राहून दोन्ही वेळ कांहीं प्रार्थनामंत्रहि म्हणावे लागतात. या कर्मालाच 'उपस्थान' अशी संज्ञा आहे.

**३. अग्निहोत्रहोम** ( रोजचा ) उपस्थानासह.

| | कांड | प्रपाठक | अनुवाक |
|---|---|---|---|
| ( होम ) संहिता | १ | ५ | ९ |
| ,, ब्राह्मण | १ | ४ | ३ व ४ |
| ,, ,, | २ | १ | १–२१ |
| ,, ,, | २ | ३ | ७ |
| आरण्यक | – | १० | १९ |
| ( उपस्थान ) संहिता | १ | ५ | ५–८ व १० |

**४. दर्शपूर्णमास.**—अमावास्या व पौर्णिमा या दोन पर्व दिवशीं संकल्प करून दुसऱ्या दिवशीं जी इष्टि करावी लागते तिला अनुक्रमें दर्शेष्टि व पौर्णमासेष्टि म्हणतात. या दोन्ही इष्टींनां अनुलक्षून 'दर्शपूर्णमास' हा पुल्लिंगी शब्द समासानें यजनार्थी रूढ झाला आहे. अमावास्येच्या इष्टींत अग्नि व इंद्राग्नी व पौर्णिमेच्या इष्टींत अग्नि व अग्नीषोम या देवांनां हविर्भाग द्यावयाचा असतो. अग्निहोत्री सोमयाजी असेल तर तो अमावास्येच्या इष्टींत एक वर्ष इंद्राग्नीच्या जागीं इंद्राचें व पुढें नेहमीं महेंद्रदेवतेचें यजन करतो. त्याचप्रमाणें पौर्णिमेच्या इष्टींत कोणाच्या मतें प्रजापति अगर विष्णु ह्यांनां तुपाचा हवि अर्पण करावयाचा व 'इंद्रोवैमृध' या देवतेचाहि एक पुरोडाश करून यजन करण्याचा संप्रदाय सूत्रभेदानुरूप असतो. देवतांच्यासाठीं अर्पण करण्याकरितां पुरोडाश वगैरे हवि तयार करणें व योग्य वेळीं त्यांचे भाग अग्नींत अर्पण करणें वगैरे सर्व लहान मोठ्या गोष्टी मुख्यत्वेंकरून अध्वर्यु करतो. ब्रह्मा देखरेख करणें, अध्वर्यूच्या क्रियेस अनुमोदन देणें वगैरे कामें करतो. देवतांनां अर्पण करावयाचा भाग हवन करण्याच्या पात्रांत भरून घेतांना, ते अग्नींत अर्पण करतांना किंवा अशा प्रकारच्या दुसऱ्या कांहीं विशिष्ट प्रसंगीं होत्याकडे मंत्र म्हणावयाचें काम असतें. आग्नीध्र हा नुसता खटपट्या असून अध्वर्यूच्या आज्ञेनें जें पडेल तें काम करतो. हवींचें अग्नींत समर्पण झालें म्हणजे चारी ऋत्विज व यजमान उरलेल्या हविर्द्रव्याचें भक्षण करतात. या इष्टीची दक्षिणा म्हणून चारी ऋत्विजांनां भातच शिजवून द्यावयाचा असतो.

**४ दर्शपूर्णमास** ( इष्टीचें सामान्य स्वरूप. )

| | कांड | प्रपाठक | अनुवाक. |
|---|---|---|---|
| संहिता | १ | १ | १–१३ |
| ,, | १ | ५ | १० |
| ,, | १ | ६ | १–११ |
| ,, | १ | ७ | १–६ |
| ,, | २ | ५ | १–११ |
| ,, | २ | ६ | १–१० |
| ,, | ३ | ५ | १ व ६–७ |
| ब्राह्मण | २ | ५ | ८ |
| ,, | ३ | २ | १–१० |
| ,, | ३ | ३ | १–११ |
| ,, | ३ | ७ | ४–६ व ११ |

**५. पिंडपितृयज्ञ.**—पितरांनां उद्देशून भाताचे पिंड दर्भांवर समर्पण करण्याचा हा विधि आहे. हा अग्निहोत्र्याला दर अमावास्येच्या दिवशीं दुपारीं करावा लागतो. पितरांच्यासाठीं म्हणून पिंडांच्या ठिकाणीं काजळ लावणें, तूप अगर दह्यावरील साय लावणें व वस्त्रासाठीं एक एक लोंकरीच्या वस्त्राची दशी अगर म्हातारा अग्नीहोत्री असेल तर छातीवरील केंस उपटून अर्पण करणें वगैरे कर्में या विधींत करावयाचीं असतात. शेवटीं पितरांनां उद्देशून प्रार्थनापर मंत्र म्हटले जातात व 'पराक्रमी पुत्र द्या' अशी त्यांची प्रार्थना करून कर्म संपविण्यांत येतें.

**५. पिंडपितृयज्ञ** { दर्शेष्टीच्या आदले दिवशीं करावयाचें पितृकर्म, पिंडदान वगैरे. }

| | कां. | प्र. | अ. |
|---|---|---|---|
| संहिता | १ | ५ | ३ |
| ब्राह्मण | १ | ३ | १० |
| ,, | २ | ६ | १६ |

**६. सान्नाय्य.**—सोमयाग केलेल्या अग्निहोत्र्याला अमावास्येच्या इष्टींत इंद्राग्नी देवतेच्या ऐवजीं इंद्र अगर महेंद्र देवतेचें यजन करावें लागतें हें वर सांगण्यांत आलेंच आहे. इंद्रासाठीं अगर महेंद्रासाठीं हविर्द्रव्यहि पुरोडाशाच्या ऐवजीं निराळें करावें लागतें. अमावास्येच्या रात्रीं दूध विरजून ठेवावयाचें व दुसऱ्या दिवशीं तें विरजलेलें दहीं आणि तापविलेलें दूध या दोहोंचें मिश्रण हविर्द्रव्य म्हणून हवन करावयाचें असा विधि आहे. दहीं व दूध या दोहोंच्या समुच्चयाला अनुसरून 'सान्नाय्य' अशी संज्ञा रूढ झाली आहे.

**६. सान्नाय्य** { सोमयाजी अग्निहोत्र्याचे दर्शेष्टीस जोडून करावयाचा एक विशिष्ट याग. }

| | कां. | प्र. | अ. |
|---|---|---|---|
| संहिता | १ | ५ | ३–५ |

**७. साकंप्रस्थायीयाग.**—सान्नाय्यांत सांगितलेल्या रीतीनें दूध व दहीं चार अगर त्यापेक्षां जास्त पात्रांत सिद्ध करून त्या अनेकविध सान्नाय्यद्रव्यांचें अनेक उपऋत्विजांसह अध्वर्यु या यागांत यजन करीत असतो. हा काम्य आहे. अमावास्येच्या इष्टींतील सान्नाय्याच्या व या सामुच्चयिक सान्नाय्ययागाच्या देवता एकच आहेत.

**७. साकंप्रस्थायी** ( एक ऐष्टिक याग. )

| | कां. | प्र. | अ. |
|---|---|---|---|
| संहिता | १ | ५ | ४ |

**८. दाक्षायणयज्ञ.**—ज्या विधींच्या अनुष्ठानानें यजमान दक्ष म्हणजे कर्मकुशल होतो ते विधी ( याग ) 'दाक्ष' होत. प्रत्येक महिन्यांत हे याग दोनदां करावयाचे, अशा क्रमानें वर्षभरांत या यागांचीं अनेक अयनें म्हणजे आवृत्त्या होतात, सबब या यागांनां अगर यागाला 'दाक्षायण' असें नांव पडलें आहे. हा दाक्षायण यज्ञ पौर्णिमेस व प्रतिपदेस मिळून दोन वेळ आणि अमावास्येस व त्याच्या दुसऱ्या दिवशींच्या प्रतिपदेस मिळून दोन वेळ याप्रमाणें एक महिन्यांत चार वेळ करावा लागतो. अग्नि व अग्नीषोम, अग्नि व इंद्र, अग्नि व इंद्राग्नी आणि अग्नि

व मित्रावरुण अशा देवतांच्या चार जोड्या चार यागांत क्रमानें येतात. यांपैकीं इंद्राला दहीं व मित्रावरुणाला आमिक्षा (आदल्या दिवशीं दूध विरजून केलेलें दहीं दुसऱ्या दिवशीं तापविलेल्या दुधांत ओतून तें मिश्रण आळल्यावर बनलेला लोण्यासारखा घट्ट गोळा) हीं हविर्द्रव्यें अर्पण करावयाचीं असतात. दर्शपूर्णमासांच्या मोबदला अगर स्वतंत्र हा दाक्षायण यज्ञ करण्याविषयीं विकल्प आहे. दर्शपूर्णमासेष्टी करून शिवाय हा याग करावा असेंहि वचन आहे.

८. **दाक्षायणयज्ञ** (एक ऐष्टिक याग.)

| | कां. | प्र. | अ. |
|---|---|---|---|
| संहिता | १ | ५ | ५ |

९. **काम्येष्टींचीं विधानें व त्यांचें हौत्र.**—काम्येष्टी अनेक आहेत. यजमानाच्या ज्या प्रकारच्या कामना असतील त्याप्रमाणें वेदानें उपदेशिलेल्या इष्टी करावयाच्या असतात. इष्टींच्या अनुष्ठानाचा प्रकार साधारणतः दर्शपूर्णमासेष्टीप्रमाणेंच असतो. फक्त देवता, हविर्द्रव्य व होत्याचे याज्यापुरोनुवाक्यांचे मंत्र यांमध्यें फरक पडतो. एखाद्या विशिष्ट विधीचीहि क्वचित् भर पडते. ऐश्वर्यप्राप्ति, शत्रुनाश, कार्यविजय इ. अनेक कामनापरत्वें अनेक प्रकारच्या इष्टी काम्य म्हणून करावयाच्या आहेत. प्रथमतः अशा इष्टींचा 'आध्वर्यव'-विषयक भाग 'विधानें' या सदरांत दाखवून 'हौत्र' या सदराखालीं सर्व इष्टींचे होत्यानें म्हणावयाचे मंत्र प्रदर्शित केले आहेत.

**९. काम्य-इष्टींचीं विधानें व त्यांचें हौत्र.**

(विधानें)

| | कांड | प्रपाठक | अनुवाक |
|---|---|---|---|
| संहिता | २ | २ | १–११ |
| ,, | २ | ३ | १–१३ |
| ,, | २ | ४ | १–१३ |
| | | (हौत्र) | |
| ,, | १ | १ | १४ |
| ,, | १ | २ | १४ |
| ,, | १ | ४ | ४६ |
| ,, | १ | ५ | ११ |
| ,, | १ | ६ | १२ |
| ,, | १ | ७ | १३ |
| ,, | १ | ८ | २२ |
| ,, | २ | १ | ११ |
| ,, | २ | २ | १२ |
| ,, | २ | ३ | १४ |
| ,, | २ | ५ | १२ |
| ,, | ३ | १ | ११ |
| ,, | ३ | २ | ११ |
| ,, | ३ | ३ | ११ |
| ,, | ३ | ४ | ११ |
| ब्राह्मण | २ | ४ | २ |

१०. **अभिचारक व स्वतंत्र इष्टींचें हौत्र.**—अभिचार म्हणजे आपल्याशीं वैर करणाऱ्या शत्रूचें नुकसान करणें असा सामान्य अर्थ आहे. व्यवहारामध्यें कारणपरत्वें 'अभिचारक' कृत्यांचा आश्रय करणें जरूर असतें. अशा अभिचारांच्या सिद्धीसाठीं ज्या इष्टी सांगितल्या आहेत त्यांचें हौत्र म्हणजे याज्यापुरोनुवाक्या येथें दर्शित केल्या आहेत. शिवाय केवळ अभ्युदयार्थ अशा ज्या इष्टी करावयाच्या असतात त्यांना 'स्वतंत्र' ही संज्ञा देऊन त्या इष्टींचेहि हौत्रसंदर्भ दाखविले आहेत.

**१०. अभिचारक व स्वतंत्र इष्टींचें हौत्र.**

(अभिचारक)

| | कांड | प्रपाठक | अनुवाक |
|---|---|---|---|
| ब्राह्मण | २ | ४ | २ |
| | | (स्वतंत्र) | |
| ,, | १ | ६ | १ |

११. **चातुर्मास्य हौत्र.**—हा एक अनेक इष्टींच्या समुच्चयानें होणारा याग आहे. या यागाचीं वैश्वदेव, वरुणप्रघास, साकमेध व शुनासीरीय अशीं चार पर्वें किंवा भाग आहेत. एका संवत्सरामध्यें विशिष्ट अशा चार महिन्यांत चार पर्वें क्रमानें करावीं हा मुख्य पक्ष असून चारी पर्वें ओळीनेंच एकेक दिवस करीत जाण्याचाहि एक गौण पक्ष प्रचलित आहे. चातुर्मास्यामध्यें हविर्भेदानुरूप ऐष्टिक, पाशुक व सौमिक असे तीन प्रकार असून एकाच दिवसांत चारी पर्वें समुच्चयानें करण्याचा एक चौथा प्रकारहि विहित आहे. या प्रकारास 'ऐकाहिक' अशी अन्वर्थ संज्ञा आहे. साकमेध या नांवाचें पर्व दोन दिवस चालतें. याच पर्वांत 'पितृयज्ञ' नामक एक यजनविधि पितरांच्या उद्देशानें येत असतो. वरुणप्रघासनामक पर्वाच्या शेवटीं यजमान, पत्नी व ऋत्विज या सर्वांनीं अवभृथ स्नान करावयाचें असतें. चातुर्मास्यांतील चारी पर्वांमध्यें उपयुक्त असणारें हौत्र संदर्भानें येथें प्रदर्शित केलें आहे.

**११. चातुर्मास्य (एक ऐष्टिक याग) हौत्र.**

| | कां. | प्र. | अ. |
|---|---|---|---|
| संहिता | ४ | १ | ११ |
| ,, | ४ | २ | ११ |
| ,, | ४ | ३ | १३ |
| ,, | २ | ६ | ११ व १२ |

१२. **दर्शपूर्णमासेष्टीचें हौत्र.**—दर पंधरवड्यास म्हणजे पौर्णिमा व अमावास्या या दोन पर्वदिवसांच्या यागामध्यें येणारें होत्याचे मंत्र येथें दाखविले आहेत.

**१२. दर्शपूर्णमासेष्टीचें हौत्र.**

| | कांड | प्रपाठक | अनुवाक |
|---|---|---|---|
| ब्राह्मण | ३ | ५ | १–१३ |

१३. **नित्य व काम्य पशुयाग.**—इंद्राग्नी, सूर्य अगर प्रजापति या देवतेला उद्देशून एक पशुयाग करावयाचा असतो.

हा सहा सहा महिन्यांनीं किंवा एकामागून दुसरा अशा प्रकारें अनेक रीतीनें करण्यांत येतो. हा याग 'नित्य' आहे. निरनिराळ्या कामनांच्या अनुरोधानें ज्याप्रमाणें निरनिराळ्या इष्टी करावयाच्या, त्याचप्रमाणें भिन्नभिन्न कामनांच्यासाठीं भिन्नभिन्न असे पुष्कळ पशुयाग आहेत त्यांचीं विधानें व आध्वर्यवविषयक कर्माचे संदर्भ या भागांत दिग्दर्शित केले आहेत.

### १३. नित्य व काम्य पशुयाग

| | कांड | प्रपाठक | अनुवाक |
|---|---|---|---|
| | | नित्य. | |
| संहिता | १ | ३ | ५–११ |
| ,, | ३ | १ | ४ व ५ |
| ,, | ३ | ५ | ५ |
| ,, | ३ | ५ | ११ |
| ,, | ६ | ३ | ३–११ |
| ,, | ६ | ४ | १ |
| ब्राह्मण | २ | ५ | ३ |
| ,, | ३ | ७ | ८ |
| | | चितिसंबंधीं | |
| संहिता | ५ | ५ | १ |
| | | काम्य | |
| ,, | २ | १ | १–१० |
| ,, | ३ | ४ | १–३ |

**१४. नित्य व काम्य पशुयागांचें हौत्र.**—होत्यानें नित्य व काम्य अशा पशुयागांत कोणत्या देवतेसाठीं कोणत्या याज्या-पुरोनुवाक्या म्हणावयाच्या त्यांचीं स्थलें येथें दाखविलीं आहेत.

### १४ नित्य व काम्य पशुयागांचें हौत्र

| | कां. | प्र. | अ. |
|---|---|---|---|
| | | नित्य. | |
| ब्राह्मण | ३ | ६ | १–१५ |
| | | काम्य | |
| ब्राह्मण | २ | ६ | १७–२० |
| ,, | २ | ८ | १–९ |

**१५. अग्निष्टोम.**—सोमयागामध्यें हा याग प्रथम करावा लागतो. सात सोमसंस्थांपैकीं 'अग्निष्टोम'नामक सोमयाग ही पहिली संस्था होय. सोमयागाच्या आरंभीं यजमान व पत्नी खाण्यापिण्याच्या, बोलण्याचालण्याच्या व वसण्याउठण्याच्या वगैरे अनेक बाबतींत कांहीं विशिष्ट तऱ्हेनें वागण्याविषयीं नियमांचें ग्रहण करतात. त्या नियमस्वीकारनिमित्तक कराव्या लागणाऱ्या इष्टीस 'दीक्षणीया' असें नांव आहे· देवांनीं यज्ञ शोधावयास प्रयाण केलें त्यावेळीं जी इष्टि त्यांनीं केली ती 'प्रायणीयेष्टि' होय. अग्नि आणि विष्णु या 'दीक्षणीयेष्टी'च्या देवता असून आतां सांगितलेल्या प्रायणीयेंत पथ्यास्वस्ति, अग्नि, सोम, सविता व अदिति या पांच देवता मुख्य आहेत. प्रायणीयेनंतर 'सोमराजा'च्या पाहुणचाराकरितां एक इष्टि करावयाची असते तिला आतिथ्या म्हणतात. मुख्य सोमयागाच्या आदले दिवशीं 'अग्नीषोमीय' या नांवाचा एक पशुयाग होत असतो व याच दिवशीं सोमयागाच्या (सुत्याहसंज्ञक) मुख्य दिवशींच्या अनुष्ठानाचीं सर्व प्रकारें पूर्वतयारी करून ठेवण्यांत येते. मुख्य सोमयागाच्या–सोमरसाच्या हवनाच्या–दिवशींहि 'अग्नि'देवतेला उद्देशून 'पशुयाग' होत असतो. सोमरसाचें सवन म्हणजे कुटणें याच मुख्य दिवशीं होत असल्यानें पूर्वोक्त पशुयागासहि 'सवनीय पशु' असें नांव आहे. सोम कुटण्याचा, हवनाचा व पिण्याचा विधि या दिवशीं एकंदर तीन वेळ म्हणजे सकाळीं, दुपारीं व सायंकाळीं होत असतो. या तीन वेळींच्या अनुष्ठानांस अनुक्रमें प्रातःसवन, माध्यंदिनसवन व तृतीयसवन अशीं नांवें आहेत. तिन्ही सवनांत मिळून बारा वेळ होणाऱ्या सोमहवनाच्या मुख्य देवता 'इंद्र' वगैरे असतात. पशुयागापैकीं सकाळीं वपेचा, दुपारीं पुरोडाशाचा व सायंकाळीं हृदयादि अंगांचा याग व्हावयाचा असतो. प्रत्येक देवतेला सोमरसाचें अवदान समर्पण करतांना होता अगर त्याच्या वर्गांतला कोणीतरी त्या देवतेच्या स्तुतिमंत्रांचें विशिष्ट पद्धतीनें पठन करतो. या पठनास 'शस्त्र' अशी संज्ञा आहे. 'शस्त्र'पठन होण्यापूर्वी उद्गाता आपल्या साथीदारांसह सामगायन करतो, त्याला 'स्तोत्र' म्हणतात. प्रथम स्तोत्र, नंतर शस्त्र व नंतर सोमरसाचें हवन असा त्याप्रसंगीं हवनाचा क्रम असतो. अग्निष्टोमामध्यें सोमरसानें आहुति देण्याचा मुख्य विधि जसा १२ वेळ येतो तशीं शस्त्रें व स्तोत्रें १२।१२ च होतात. सोमयागाचे शेवटीं अवभृथ स्नान होतें व नंतर 'उदयनीया' नामक इष्टि करून या सोमयागाचा उपसंहार व समाप्ति करण्यांत येते.

### १५. अग्निष्टोम प्रवर्ग्यासह.

(सोमयागाचें सामान्यस्वरूप.)

| | कांड. | प्र. | अ. |
|---|---|---|---|
| संहिता | १ | २ | १–१३ |
| ,, | १ | ३ | १–४ व १२–१३ |
| ,, | १ | ४ | १–३१ व ३७–४३ |
| ,, | ३ | १ | १–३ व ६–१० |
| ,, | ३ | २ | १–१० |
| ,, | ३ | ३ | १–४ व ७ |
| ,, | ३ | ५ | २–५ व ८–९ |
| ,, | ६ | १ | १–११ |
| ,, | ६ | २ | १–११ |
| ,, | ६ | ३ | १–२ |
| ,, | ६ | ४ | २–११ |
| ,, | ६ | ५ | १–११ |
| ,, | ६ | ६ | १–११ |
| ,, | ७ | १ | १–२ |
| ब्राह्मण | १ | १ | १ |
| ,, | १ | ४ | १ व ५–६ |
| ,, | १ | ५ | ४ |
| ,, | १ | ५ | ९–१२ |
| ,, | २ | २ | ८ |
| ,, | २ | ५ | ७–७–९–९ |
| ,, | ३ | ७ | ७,९,१२–१४ |

**१६. समिष्टयजु.**—इष्टि, पशुयाग व सोमयाग या तिन्ही यागांमध्यें हवनविषयक कर्म संपतेवेळीं तुपाच्या ३ आहुती अगर १ आहुति घालावयाची असते. ह्या आहुतींचा मंत्र पादबद्ध नसून अनियताक्षरात्मक असल्यामुळें त्या मंत्राच्या अनुरोधानें केलेल्या आहुतिप्रक्षेपास 'समिष्टयजु' असें नांव आहे.

**१६. समिष्टयजु.**

{ इष्टी, पशु व सोमयागांत येणारा असा एक विशिष्ट होम. }

| | कां. | प्र. | अ. |
|---|---|---|---|
| संहिता | १ | १ | १३ |
| ,, | १ | ४ | ४४ |

**१७. अवभृथ.**—चातुर्मास्यांतील वरुणप्रघासपर्व, कौकिलसौत्रामणि, व सर्वप्रकारचे सोमयाग यांच्या शेवटीं नदी वगैरे जलप्रवाहावर जाऊन तेथें वरुण देवतेस उद्देशून एक लहानशी इष्टि करावयाची असते व नंतर सर्वांनीं स्नानविधि करावयाचा असतो. यागसमाप्तिदर्शक अशा या यागास व स्नानविधीस 'अवभृथ' अशी संज्ञा आहे.

**१७. अवभृथ.**

{ यज्ञाच्या शेवटीं येणारा याग व स्नानविधि. }

| | कां. | प्र. | अ. |
|---|---|---|---|
| संहिता | १ | ४ | ४५ |

**१८. प्रवर्ग्य.**—हा विधि सोमयागाच्या साहाय्यानें होत असतो. स्वतंत्र रीतीनें होत नाहीं. सोमयागांत देखील हा विधि करण्याविषयीं विकल्पच आहे. उतरंडीच्या आकाराचें व टीचभर उंच असें एक तिमजली मातीचें पात्र तयार करतात, व त्या पात्रांत खूप तूप ओतून तें भोंवतालीं अग्नीची अतिशय आंच देऊन कढूं देतात, नंतर त्या कढलेल्या तुपांत गाईचें व शेळीचें दूध ओततात. कढलेलें तूप व दोन प्रकारचें दूध यांच्या मिश्रणानें बनलेल्या पदार्थास 'घर्म' अशी संज्ञा आहे. 'अश्विनौ' देवतांच्यासाठीं या घर्म द्रव्याचें हवन प्रवर्ग्यविधींत मुख्य आहे. तूप शिजविल्यापासून तों हवनापर्यंत होणाऱ्या सर्व ठळकठळक गोष्टींच्या वेळीं होता कांहीं स्तुतिमंत्र म्हणत असतो व प्रस्तोतानामक एक गायक ऋत्विज सामगायन करीत असतो. हें कर्म चालतेवेळीं मंडपाभोंवतीं पडदे लावून बंद करतात.

**१८ प्रवर्ग्य** ( घर्म ).

( सोमयागांत येणारें एक वैकल्पिक कर्म ).

| | कां. | प्र. | अ. |
|---|---|---|---|
| आरण्यक | – | ४ | १–४२ |
| ,, | – | ५ | १–१२ |

[ **सोमयाग ( संस्थारूप ).**—अग्निष्टोम, अत्यग्निष्टोम, उक्थ्य, षोडशी, अतिरात्र, अप्तोर्याम व वाजपेय अशा या सोमयागाच्या सात संस्था आहेत. ]

**१९. अतिरात्र.**—ही संस्था एक दिवसांत न संपतां एक दिवस व एक रात्र उलटून गेल्यावर समाप्त होते, कारण तीमध्यें पुष्कळच अनुष्ठान, शस्त्रें व स्तोत्रें वगैरे व्हावयाचें असतें. अतिरात्रांत स्तोत्रें व शस्त्रें एकंदर १३ असतात. रात्रीचें अतिक्रमण करून ही संस्था समाप्त होत असल्यानें तिला 'अतिरात्र' हें नांव मिळालें आहे.

अतिरात्र संस्थेंत मुख्य सुत्येच्या ( सोमरसाच्या हवनाच्या ) दिवशीं सरस्वतीदेवतेसाठीं पशुयाग करावयाचा असतो. 'आपिशर्वर'संज्ञक इंद्र ही अतिरात्र संस्थेची मुख्य देवता असते.

**१९. अतिरात्र.**

| | कां. | प्र. | अ. |
|---|---|---|---|
| संहिता | ७ | १ | ३ |

**२०. अप्तोर्याम.**—हीहि एक सोमयागापैकीं संस्था आहे. या सोमयागाचें सर्व अनुष्ठान अतिरात्रासारखेंच असतें. अतिरात्रापेक्षां ३ स्तोत्रें व शस्त्रें अधिक असतात. आश्विन, वालखिल्य, वृषाकपि, एवयामरुत् हीं मोठमोठीं व श्रवणीय अशीं शस्त्रें या यज्ञांत होता, मैत्रावरुण, ब्राह्मणाच्छंसी व अच्छावाक हे ऋत्विज पठण करीत असतात.

**२०. अप्तोर्याम.**

| | कां. | प्र. | अ. |
|---|---|---|---|
| ब्राह्मण | २ | ७ | १४ |

**२१. वाजपेय.**—या नांवाचा सोमयाग संस्था व स्वतंत्र असा उभयरूपी आहे. हा सोमयाग पाहणारास मोठा चमत्कृतिजनक आहे. या यज्ञांत सुरेचेंहि हवन केलें जातें. या यागांत ऋत्विज १७, स्तोत्रें १७, शस्त्रें १७, दक्षिणेच्या वस्तू १७, असा सतरा या संख्येचा मोठा निकट संबंध आहे. हवनास लागणारी सुरा पिठापासून विशिष्ट अशा शास्त्रोक्त रीतीनें पूर्वकाळीं करीत असत. परंतु हल्लीं सुरायागाचे ऐवजीं प्रतिनिधिरूपानें दुधाचाच याग करण्याचा प्रघात चालत आहे. वाजपेय यागांत अग्नि, इंद्राग्नी, इंद्र, मरुत् व सरस्वती या देवतांच्या साठीं प्रत्येकीं एक व प्रजापति देवतेसाठीं १७ असे २२ पशू सुत्याह ( यागाचा मुख्यदिवस ) प्रसंगीं मारून त्यांचें हवन यथोक्त पद्धतीनें केलें जातें. चात्वाल नामक एका विशिष्ट स्थलांत खांब रोंवून त्यावर एक फिरतें चाक बसविलें जातें व त्या चाकावर 'ब्रह्मा' नामक ऋत्विजास बसविण्यांत येऊन तें चाक गरगर फिरविलें जातें. १७ रथांनां घोडे जुंपून त्यांची शर्यत खेळली जाते. त्या वेळीं १७ नगारे एकदम वाजवून शर्यतीस उत्तेजन देण्यांत येतें. यजमान यूपस्तंभावर आरोहण करतो. या सोमयागांत १७ शस्त्रें व १७ स्तोत्रें जशीं पठण केलीं जातात त्याप्रमाणें सोमरसाचें हवनहि १७ वेळच मुख्यतः होत असतें. वाजपेय याग करणाऱ्या पुरुषाला सार्वभौम राजाप्रमाणें श्वेतछत्र धारण करण्याचा अधिकार असतो.

ऋत्विजांकडून यज्ञकर्त्या यजमानावर हुतशेष आज्यानें विधिपूर्वक अभिषेक करण्यांत येतो. वाजपेय यज्ञाच्या अनुष्ठानानें यज्ञविषयक अशी एक अत्यंत श्रेष्ठप्रकारची इतिकर्तव्यता आपल्या हातून घडली असें पूर्वकाळीं समजण्यांत येत असे.

२१. वाजपेय.

| | कां. | प्र. | अ. |
|---|---|---|---|
| संहिता | १ | ७ | ७–१२ |
| ब्राह्मण | १ | ३ | २–९ |

[ **सोमयाग ( स्वतंत्र )**.—या सदरांत येणारे सोमयाग हे संस्थेत समाविष्ट होत नसून वेगळे गणले जातात. ]

**२२. दशपेय**.—या सोमयागामध्यें दीक्षा व सोमक्रय एकाच दिवशीं करावयाचे असतात. यजमान गळ्यांत स्वर्णकमलांची माळा घालतो. दहा कालवडी देऊन सोमवल्ली विकत घेतली जाते. ऋत्विजांच्या खेरीज आणखी १०० ब्राह्मणांनीं सोम पिण्याचा विधि या यज्ञांत आहे. या यज्ञांत एकेका लांकडी पाळ्यानें दहा दहा ब्राह्मण सोमरस पीत असल्यानें या यज्ञाला 'दशपेय' अशी संज्ञा पडली आहे. १७ शस्त्रें व १७ स्तोत्रें दशपेय यागांत व्हावयाचीं असतात.

२२. दशपेय.

| | कां. | प्र. | अ. |
|---|---|---|---|
| संहिता | १ | ८ | १८ |

**२३. राजसूय**.—हा सोमयाग फक्त अभिषिक्त क्षत्रिय राजाला करतां येतो. या यज्ञांत अग्नि व इंद्राग्नी या देवतांच्या उद्देशानें मुख्य सवनीय दिवशीं पशुयाग करावयाचा असतो. या यागांतहि यजमानाला वाघाच्या कातड्यावर बसवून अभिषेक, रथांची धांवाधाव, दुन्दुभिवादन इत्यादि प्रकार व्हावयाचे असतात. शिवाय सोन्याच्या कवड्यांनीं अगर फांशांनीं द्यूत खेळण्याचा विधि राजसूय यज्ञांत केला जातो. राजसूय यज्ञ करणाऱ्या राजाला इतर राजेलोकांत अत्यंत श्रेष्ठ प्रकारचा दर्जा प्राप्त होतो. व राजसूय करणाऱ्या राजानें यज्ञधर्मांतील अतिशय उच्च अशी एक इतिकर्तव्यता केली असें समजलें जातें.

२३. राजसूय.

| | कां. | प्र. | अ. |
|---|---|---|---|
| संहिता | १ | ८ | १–१७ |
| ,, | ३ | ४ | ९ |
| ब्राह्मण | १ | ४ | ९ व १० |
| ,, | १ | ५ | ५ व ६ |
| | | ( चातुर्मास्यें ) | |
| ,, | १ | ६ | २–१० |
| ,, | १ | ७ | १–१० |
| ,, | २ | ५ | ८ |

**२४. अश्वमेध**.—हा सोमयज्ञ सार्वभौम चक्रवर्ति अशा राजपुरुषानें करावयाचा आहे. श्यामकर्ण जातीचा एक घोडा चारी दिशांनां हिंडवावयाचा असतो. या घोड्याला धरील त्या राजाबरोबर लढून घोडा परत सोडविण्यांत येतो. एक वर्षांत चारी दिशांकडून घोडा हिंडवून आणून सर्वत्र विजयी ठरला म्हणजे तो घोडा मारून त्याच्या शरिराच्या निरनिराळ्या अवयवांचा याग या अश्वमेध यज्ञांत मुख्य आहे. या घोड्याला प्रथम मंगलस्नान घालण्यांत येतें. शंभर राजपुत्रांनां बरोबर घेऊन पूर्वदिशेस उभा राहिलेला अध्वर्यु, राज्याला अधिकारी नसलेले पण शूर अशा १०० क्षत्रियांनां घेऊन दक्षिणेस उभा राहिलेला ब्रह्मा, सारथी व निरनिराळ्या ग्रामांचे अधिपती (पाटीललोक) अशा शंभर असामींसह पश्चिमबाजूस उभा राहणारा होता आणि क्षत्ता जातींतील ( वैश्य व शूद्र यांच्या मिश्रणानें बनलेली जात ) व जामदारखान्याकडील मिळून १०० लोकांसह उत्तरदिशेस उभा राहणारा उद्गाता असे चौघे ऋत्विज घोड्याला उत्कृष्ट रीतीनें पाणी शिंपून धुऊन काढतात. घोड्याबरोबर एक कुत्रें पाण्यांत सोडण्यांत येतें व त्या कुत्र्याचा मुसळांनीं चोप देऊन वध करण्यांत येतो. अश्वमेध यज्ञांत पशूंनां बांधावयासाठीं ६ बेलाचे, ६ खैराचे, ६ पळसाचे, ४ देवदारूचे, आणि १ रगतरोडा या नांवाच्या वृक्षाचा मिळून एकवीस यूप–खांब–पुरण्यांत येतात. एकेका यूपास ९।९ याप्रमाणें वीस खांबांनां मिळून १८० पशू बांधून पुढें त्यांनां मारण्यांत येतें. याशिवाय मुख्य यूपाला बांधून चातुर्मास्य, ऐकादशिन व दशिन अशा संज्ञांनीं दर्शित केलेले आणखी कितीतरी पशू मारले जातात. या सर्व पशूंमध्यें ग्राम्य ( गांवांतले ) व आरण्यक ( रानटी ) असे दोन वर्ग असतात. रानटी पशूंचा कांहीं विशिष्ट रीतीनें संस्कार करून नंतर त्यांनां न मारतां सोडून देण्यांत येतें. यजमानपत्नी व मृतघोडा या उभयतांचा मैथुनप्रसंग या यज्ञांत विहित आहे. शिवाय ऋत्विजांमध्यें परस्पर प्रश्नोत्तरसंवाद करण्याचाहि प्रकार या यज्ञांत योजिलेला अढळतो. मुख्य जो श्यामकर्ण घोडा त्यास मारण्यापूर्वीं रथाला जोडून यज्ञभूमीसभोंवार फिरविलें जातें. रथावर एक विजयध्वज फडकत ठेवलेला असतो.

राजाच्या निरनिराळ्या स्त्रिया त्या घोड्याच्या अंगावर सोन्यारुप्याच्या सुयांनीं टोंचून कांहीं ठिकाणीं खुणा करितात. रगतरोड्याचा जो मुख्य खांब ( यूप ) त्याला हा घोडा बांधून ठेवण्यांत येतो. गानकुशल असा एक ब्राह्मण व क्षत्रिय या उभयतांचें वीणावादन व गाणेंहि या यज्ञामध्यें एके प्रसंगीं होत असतें. दिवसा ब्राह्मणाचें गाणें असतें व रात्रीं क्षत्रिय गात असतो.

घोड्याला मारावयास नेतांना एक घोडी पुढें चालविलेली असते. वेतसनामक वृक्षाच्या डाहाळ्यांवर तुपांत भिजविलेलें लोंकरीचें वस्त्र व पांघरावयास उपयोगांत आणतात तें कातडें खालीं अंथरावयाचें व वरतीं सुवर्णखचित अशी शय्या पसरावयाची, तीवर रुप्याचा पत्रा ठेऊन नंतर त्या पत्र्यावर घोड्याला आडवा पाडून मारावयाचा विधि करण्यांत येतो. अश्वाबरोबर एक गायहि मारण्यांत येते.

२४ अश्वमेध.

| | कां. | प्र. | अ. |
|---|---|---|---|
| संहिता | ४ | ६ | ६–९ |
| ,, | ४ | ७ | १५ |
| ,, | ५ | १ | ११ |
| ,, | ५ | २ | ११–१२ |
| ,, | ५ | ३ | १२ |
| ,, | ५ | ४ | १२ |
| ,, | ५ | ५ | ११ |
| ,, | ५ | ६ | ११–२३ |
| ,, | ५ | ७ | ११–२६ |
| ,, | ७ | १ | ११–२० |
| ,, | ७ | २ | ११–२० |
| ,, | ७ | ३ | ११–२० |
| ,, | ७ | ४ | १२–२२ |
| ,, | ७ | ५ | ११–२५ |
| ब्राह्मण | २ | ५ | २ |
| ,, | ३ | ८ | १–२३ |
| ,, | ३ | ९ | १–२३ |

**२५. महाव्रत.**—कांहीं कांहीं सोमयागांत 'महाव्रत' म्हणून एक विधिविशेष करण्यांत येतो. सत्रांतून येणाऱ्या अग्निष्टोमादि सोमयागाच्या अंगानें प्रायः महाव्रताचा विधि येतो. एकदिनसाध्य असा महाव्रत ऋतु स्वतंत्र करावयाचेंहि विधान ऐतरेय आरण्यकांत आढळतें. महाव्रतांत पुष्कळ चमत्कारिक गोष्टी पहावयास मिळतात. आग्नीध्रीय मंडपासमोर व सद आणि हविर्धान या मंडपांच्यामध्यें ब्राह्मण व शूद्र यांचा ओढाओढीचा एक प्रयोग करण्यांत येतो. एक वाटोळें कातडें असतें व तें ब्राह्मण व शूद्र आपआपल्या वाजूनें जोरानें ओढीत असतात. होता आपले मंत्र झोंपाळ्यावर बसून म्हणतो. सुवर्णाच्या आसनावर बसून अध्वर्यु व स्वर्णखचित बैठकीवर बसून उद्गाता आपआपले मंत्र म्हणतात. उद्गाता वगैरे सामग सामें गातात त्यावेळीं यजमानाच्या स्त्रिया शंभर तारा लावलेलें एक तंतुवाद्य व पिछोला, कर्करी इत्यादि संज्ञांचीं दुसरीं तंतुवाद्यें वाजवून सामगांची साथ करतात. कित्येक दासी आपल्या मस्तकावर पाण्याच्या घागरी घेऊन मार्जालीय नामक मंडपाच्या उत्तर बाजूस विशिष्ट पद्धतीचा नाच करतात. सामगायन चाललें असतां भूमीला खळगा करून त्यावर विशिष्ट रीतीनें कातडें वसवून केलेलें भूमिदुंदुभिनामक वाद्य वाजवून गाण्याचा ताल धरण्यांत येतो. नंतर एका धनुर्धर राजपुत्राकडून टांगलेल्या कातड्यावर नेम धरून वाण मारण्यांत येतो.

**२५. महाव्रत** ( कांहीं सोमयागांत येणारा विधिविशेष. )

| | कां. | प्र. | अ. |
|---|---|---|---|
| संहिता | ७ | ५ | ८–१० |
| ब्राह्मण | १ | २ | ६ |

**२६. सौत्रामणि.**—सुराद्रव्यप्रधान असा हा एक स्वतंत्र याग आहे. चयनाच्या अनुष्ठानानंतर त्या तदंगभूत म्हणूनहि शेवटीं सौत्रामणियाग करण्याचा विधि आहे. या यागांत पशु व पुरोडाश या हविर्द्रव्यांचें साहचर्य आहे. विवक्षित जातीचें धान्य नासवून त्याच्यापासून विधिपूर्वक उत्पन्न केलेली जी पैष्टिक सुरा तिचे पेले भरून घेऊन ते सुत्रामसंज्ञक इंद्राला उद्देशून अग्नींत समर्पण करण्यांत येतात. पळस, वड व पिंपळ या तीन जातींच्या लांकडांचे ते सुरा भरून घेण्याचे पेले तयार केलेले असतात. या यज्ञामध्यें हल्लीं सुरेच्या ऐवजीं दुधाचाच याग करण्याचा प्रचार आहे. या यागाच्या शेवटींहि अवभृथस्नानाचा समारंभ व्हावयाचा असतो.

**२६. सौत्रामणि** ( सुराहवनप्रधान एक यागविशेष ).

| | कां. | प्र. | अ. |
|---|---|---|---|
| संहिता | १ | ८ | २१ |
| ब्राह्मण | १ | ४ | २ |
| ,, | १ | ८ | ५ व ६ |
| ,, | २ | ६ | १–१५ |

**२७. पुरुषमेध.**—हा यज्ञ फक्त ब्राह्मण व क्षत्रिय यांनींच करावयाचा असतो. हा यज्ञ पांच दिवस चालतो. मधल्या म्हणजे तिसऱ्या अथवा यागाच्या मुख्य दिवशीं ११ खांबांनां बांधलेल्या अकरा पशूंनां मारून त्यांचा याग करण्यांत येतो. नंतर खांबांच्या मधल्या अंतरामध्यें उभे केलेल्या पुरुषपशूंचें उपाकरण ( देवतार्पणविधि ) करण्यांत येतें. उपाकरणानंतर ते सर्व मानवीपुरुषपशु दक्षिण बाजूस उभे करून ब्रह्मा पुरुषसूक्तांतील ऋचा म्हणून त्यांचें शंसन करतो. नंतर त्यांच्याभोंवतीं अग्नीवर पेटविलेलें कोलीत तीनदां फिरविण्यांत येऊन त्या सर्व मनुष्यपशूंची मुक्तता करण्यांत येते. त्यांनां मारण्यांत येत नाहीं. त्यांच्या अंगांच्या हवनाऐवजीं तुपाच्या आहुती दिल्या जातात. ह्या मनुष्यपशूंची संख्या ७५ च्या पेक्षां जास्त आहे.

**२७. पुरुषमेध** ( सोमयागविशेष )

| | कांड | प्रपाठक | अनुवाक |
|---|---|---|---|
| ब्राह्मण | ३ | ४ | १–१९ |

[ **सोमयागविशेष.**—या सदरांत पुरुषमेधाखेरीज आणखी कांहीं याग येतात. ]

**२८. अग्निष्टुत्.**—हा एक सोमयागविकार आहे. अग्निदेवतेचें स्तवन 'त्रिवृत्' नामक स्तोमपद्धतीनें या यज्ञांत केलें जातें. अनुष्ठानाचा प्रकार साधारणतः अग्निष्टोमाप्रमाणें आहे. मंत्रतंत्रांत कांहीं फरक आहे. पापमोचनासाठीं व अभक्ष्यभक्षणदोषनिवृत्त्यर्थ वगैरे कामनांच्या साठीं हा सोमयाग भिन्नभिन्न स्तोमपद्धतीनें केला जातो.

२८. अग्निष्टुत्

| | कां. | प्र. | अ. |
|---|---|---|---|
| ब्राह्मण | २ | ७ | १२ |

**२९. इंद्रस्तुत्.**—हाहि याग कांहींशा मंत्रतंत्राच्या फरकानें 'अग्निष्टुत्'सारखाच जवळजवळ आहे. या यागांत पंचदश-स्तोमपद्धतीनें मुख्यतः इंद्राची स्तुति केली जाते.

**२९. इंद्रस्तुत्.**

| | कां. | प्र. | अ. |
|---|---|---|---|
| ब्राह्मण | २ | ७ | १३ |

**३०. पंचशारदीय.**—प्रत्येक वर्षाच्या शरदृतूंत याग करावयाचा अशा रीतीनें ५ वर्षांच्या शरदृतूंत केलेल्या पांच यागांच्या समुच्चयानें पूर्ण होणारा जो याग तो पंचशारदीय याग. या पंचवर्षात्मक यागामध्यें मुख्य देवता 'मरुत्' ही आहे. पहिल्या वर्षाच्या शरदृतूंत एकएक वर्षाच्या १७ कालवडी व १७ खोंड 'मरुत्' देवतांनां अर्पण करावयाचे असतात. त्यांत खोंड सोडून देऊन फक्त कालवडी मारून याग केला जातो. अशाच रीतीनें लागोपाठ ४ वर्षे याग करावयाचे. पांचव्या वर्षी ओळीनें पांच दिवस अग्निष्टोम, उक्थ्य, उक्थ्य, उक्थ्य व अतिरात्र हे पांच सोमयाग निरनिराळ्या स्तोमपद्धतीनें करण्याचे असून पहिल्या चार यागांत प्रत्येकीं ३।३ पशू मारावयाचे व पांचव्या यागाला पांच पशू मारावयाचे असा विधि आहे. हे पशू म्हणजे १७ कालवडीच होत. या खेपेसहि पूर्वीप्रमाणें १७ खोंड सोडून द्यावयाचे असतात. हा याग फक्त ब्राह्मण व क्षत्रिय यांनीं करावयाचा आहे.

**३०. पञ्चशारदीय.**

| | कां. | प्र. | अ. |
|---|---|---|---|
| ब्राह्मण | २ | ७ | १० व ११ |

**३१. विघन.**—प्रजेकडून कराची वसुली होत नसली, प्रजेवरील राजाचा वचक कमी झालेला असला तर त्या राजानें किंवा एखाद्या पातकामुळें एखादा ब्राह्मण समाजांत अमान्य ठरला असेल त्या ब्राह्मणानें हा याग करावयाचा असतो. या यज्ञांत १२ स्तोत्रें व १२ शस्त्रें व्हावयाचीं असतात. सामगायनांत होणाऱ्या पद्धतीखेरीज व इतर कांहीं बाबीं-खेरीज बाकी सर्व अनुष्ठान अग्निष्टोमासारखेंच जवळ जवळ आहे.

**३१. विघन**

| | कां. | प्र. | अ. |
|---|---|---|---|
| ब्राह्मण | २ | ७ | १८ |

**३२. विध्यपराध.**—निरनिराळ्या प्रसंगीं यज्ञकर्मांत जे अनेक प्रकारचे प्रमाद अगर दोष घडतात त्यांच्या परिहारार्थ प्रायश्चित्तहोम करावयाचा असतो. या सदरांत अशा प्रकारचे अनेक प्रायश्चित्तहोम सांगितले आहेत.

**३२. विध्यपराध** (प्रायश्चित्तहोम).

| | कां. | प्र. | अ. |
|---|---|---|---|
| ब्राह्मण | १ | ४ | ६–८ |
| ,, | २ | १ | १ |
| ,, | १ | ४ | ७ |

**३३. चयन.**—सोमयागाच्या साहचर्यानें होणारा हा एक विधिविशेष आहे. विशिष्ट मापानें विशिष्ट लांबीरुंदीच्या मोजून घेतलेल्या स्थळांत २००।२०० विटांचे विशिष्ट आकृतीचे असे एकावर एक पांच थर रचून केलेल्या ओट्यास चिति अगर चयन म्हणतात. चयनाचे आकार अनेक प्रकारचे आहेत. त्या सर्वांत 'श्येनाकृति' चयन श्रेष्ठ गणला जातो. हल्लीं श्येन-चितीच (बहिरी ससाण्याच्या आकृतीचा) सर्वत्र करण्याचा प्रायः प्रचार आहे. या चयनांत उपयोगीं आणावयाच्या विटा चौकोन, त्रिकोण, पंचकोण वगैरे अनेक तऱ्हेच्या असतात. पांच थरांच्या मिळून एक हजार विटा होतात. प्रथमच्या खेपेस हजारच विटा मांडून चयन करावयाचा असून दुसऱ्या व तिसऱ्या खेपेस २००० व ३००० इष्टकांचा चयन क्रमानें मांडावयाचा असतो. पहिल्या खेपेचा चयन गुडघ्याइतक्या उंचीचा, दुसऱ्या खेपेचा बेंबीपर्यंत व तिसऱ्या खेपेचा मुखाइतका उंच होतो. पहिल्या खेपेस पांच थर, दुसऱ्या खेपेस १० थर व तिसऱ्या खेपेस चयनाचे १५ थर होतात. या चयनसंज्ञक ओट्यास त्याच्यावरच मुख्य अग्नीची स्थापना होत असल्यानें 'अग्नि' अशी संज्ञा आहे. या चयनावर स्थापन केलेल्या अग्नीवरच सोमरसाचें, पशूंच्या अंगांचें वगैरे हवन होत असतें. या चयनाबद्दल म्हणून सोमयागासंबंधाच्या पशूंबरोबरच ११ पशू जास्त मारावे लागतात.

**३३. चयन (किंवा चिति)** (सोमयागाला जोडून होणारें एक "इष्टकोपधानप्रधान"कर्म).

| | कां. | प्र. | अ. |
|---|---|---|---|
| संहिता | ४ | १ | १–१० |
| ,, | ४ | २ | १–१० |
| ,, | ४ | ३ | १–१३ |
| ,, | ४ | ४ | १–१२ |
| ,, | ४ | ५ | १–१२ |
| ,, | ४ | ६ | १–५ |
| ,, | ४ | ७ | १–१४ |
| ,, | ५ | २ | १–१० |
| ,, | ५ | ३ | १–१० |
| ,, | ५ | ३ | १–११ |
| ,, | ५ | ४ | १–११ |
| ,, | ५ | ५ | १–१० |
| ,, | ५ | ६ | १–१० |
| ,, | ५ | ७ | १–१० |
| ब्राह्मण | १ | ५ | १ |
| ,, | १ | ५ | ७ व ८ |

**३४. काठकचयन.**—कठमहर्षींनीं जे चयन प्रचारांत आणले त्यांनां 'काठक' अशी संज्ञा आहे. काठक ५ प्रकारचे आहेत. सावित्र, नाचिकेत, चातुर्होत्र, वैश्वसृज आणि अरुण-केतु हे ते पांच काठक होत. सावित्रापासून वैश्वसृजापर्यंतचे

चार काठकचयन भूमीवर एकाबाहेर एक अशीं वर्तुळें काढून त्यांच्यावर अगर एकाच मंडळावर विटांच्या ऐवजीं शिरगोळ्याचे (चुनखडीचे) खडे मांडून सिद्ध करावयाचे असतात. चुनखडीचे खडे याच काठकचयनांतील विटा होत. अरुणकेतु नामक ५ वा चयन निरनिराळ्या प्रकारच्या जल-बिंदुरूप इष्टका मांडून सिद्ध करावयाचा आहे. काठकचयन देखील कोणत्या तरी पशुयागाच्या अथवा सोमयागाच्या साह-चर्यानेंच केले जातात. ज्या यागांत उत्तरवेदी केली जाते अशा चातुर्मास्य यागासहि हे चयन जोडण्यांत येतात. काठकामध्यें मृत्युदेवतेसाठीं पशूच्या मांसरसाचा ग्रह (पेला) अग्नींत अर्पण करावयाचा असतो. चुनखडीचे खडे विटा म्हणून मांडण्यापेक्षां सोन्याच्या विटा अगर लहान लहान शकलें मांडावीं हा श्रुती-मध्यें मुख्य पक्ष सांगितला आहे. सोन्याच्या शकलांचें सामर्थ्य नसेल तर चुनखडीचे खडे तुपांत बुचकळून मांडावे असा प्रघात आहे. काठकचयन समाप्त जाहल्यावर त्याच्या सांगतेसाठीं सौत्रामणि अगर मित्रावरुणदेवतात्मक असा आमिक्षेचा याग करावयाचा असतो.

**३४. काठकचयन** (चितिविशेष).

| | कां. | प्र. | अ. |
|---|---|---|---|
| ब्राह्मण | २ | ५ | ७ |
| ,, | ३ | १० | १–११ |
| ,, | ३ | ११ | १–१० |
| ,, | ३ | १२ | १ |
| आरण्यक | – | १ | १–३१ |
| ,, | – | ३ | १–८ |

**३५. लोष्टचिति.**—ज्या अग्निहोत्र्यानें जिवंत असतांना चयन मांडलेला असतो त्या अग्निहोत्र्याच्या अस्थींवर कच्च्या मातीच्या ढेंकळांचा चयन मांडावयाचा असतो. तीन पळसाच्या लांकडाचे खुंटे तिवईसारखे पुरून त्यांच्यामध्यें मृत अग्नि-होत्र्याच्या अस्थी खापराच्या डेऱ्यांत घालून ठेवावयाच्या व त्यांच्यावर चाळणींतून दहींमध ओतावयाचा. श्मशानभूमि पळसाच्या डहाळीनें झाडून काढून त्या ठिकाणची जागा ६ बैली किंवा १२ बैली नांगरानें नांगरून काढावयाची आणि मग त्या नांगरटींत तो अस्थी ठेवलेला डेरा आणून ठेवावयाचा व त्यावर कांहीं धान्यबीजें टाकावयाचीं व चोहोंकडून चुनखड्यांनीं तो डेरा झांकून टाकावयाचा. नंतर मातीच्या ढेंकळांनीं त्या डेऱ्यासमीप चयन मांडण्याचा विधि व्हावयाचा असतो. चयनाच्या चारी बाजूंनां निरनिराळ्या तृणविशेषाचे स्तंब पुरण्यांत येतात. त्याचप्रमाणें निरनिराळ्या धान्यांचे शिजविलेले भात व पिठाचे रोडगेहि चयनाच्या ठिकाणीं ठेवले जातात. हल्लीं हा लोष्टचिति प्रायः लुप्त झाला आहे. ३० वर्षांपूर्वीं हा लोष्टचितिनामक विधि सातारा जिल्ह्यांत 'चिंधोली'नामक एका खेडेगांवीं झाला होता त्यावेळीं ज्ञानकोशांतील श्रौतविषयाचे उपसंपादक वे. शा. बापट दीक्षित हे तेथें हजर होते.



**३५. लोष्टचिति.**

| | कां. | प्र. | अ. |
|---|---|---|---|
| आरण्यक | – | ६ | ७–१२ |

**३६. मृताचा प्रेतविधि.**—अग्निहोत्री मृत झाल्यास त्याचा जो प्रेतसंस्कार होतो तो श्रौतविषयक पद्धतीनें होत असून त्याचें नांव **'ब्रह्ममेध'** असें आहे आणि अग्निहोत्र स्वीकारल्यावांचून मृत होणाऱ्याचा प्रेतविधि स्मार्तपद्धतीनें व्हावयाचा असून त्या पद्धतीचें नांव **'पितृमेध'** असें आहे.

**३६. मृताचा प्रेतविधि.**

(ब्रह्ममेध व पितृमेध).

**पितृमेध**

| | कां. | प्र. | अ. |
|---|---|---|---|
| आरण्यक | – | ६ | १–४ |

**ब्रह्ममेध**

| | कां. | प्र. | अ. |
|---|---|---|---|
| आरण्यक | – | ३ | १५–२१ |

**३७. सव.**—ज्या यज्ञांच्या शेवटीं यजमानास विशिष्ट रीतीनें अभिषेक करण्यांत येतो त्या यज्ञांनां 'सव' अशी संज्ञा आहे. सोमरसाच्या, पशूच्या अंगांच्या अगर पुरोडाशांच्या हवनप्रधान-कर्मानें हे 'सव'नामक यज्ञ संपादिले जातात.

**बृहस्पतिसव.**—हा एक अग्निष्टोमासारखाच सोमयाग आहे. शस्त्रस्तोत्रांच्या व्यवस्थेंत वगैरे थोडाबहुत फरक आहे. हा सव फक्त ब्राह्मणांनींच करावयाचा असतो. हा यज्ञ केला म्हणजे ब्राह्मणाच्या इतिकर्तव्यतेंतील अतिशय मोठी इति-कर्तव्यता केली असें समजण्यांत येतें. यज्ञाच्या शेवटीं कृष्णा-जिनावर यजमानाला बसवून त्यावर तुपाचा अभिषेक करण्यांत येतो.

**ब्राह्मणसव.**—हा यागहि ब्राह्मणांनींच करावयाचा आहे. या यागांत सोमरसाचें हवन होत नसून पुरोडाशांचेंच फक्त हवन होतें. यागाच्या शेवटीं यजमानाला कृष्णाजिनावर बसवून सोन्यानें ढवळून संस्कारित केलेल्या तुपानें अभिषेक करण्यांत येतो.

**वैश्यसव.**—हा फक्त वैश्यांनींच करावयाचा असतो. हाहि सोमयाग नव्हे. पशु व पुरोडाश या हविर्द्रव्यांच्या हवनानेंच हा यज्ञ संपादन केला जातो. शेवटीं बैलाच्या कातड्यावर यजमानास बसवून दह्याचा अभिषेक करण्यांत येतो. या वैश्य-सवाला 'स्थपतिसव' अशीहि संज्ञा दिलेली सूत्रग्रंथांतून आढळते.

**पृथिसव.**—इष्टीच्या योगानेंच संपादित केला जाणारा तो 'पृथिसव' होय. राजसूय यागामध्यें उत्तरवेदीशीं संबद्ध असलेलीं सर्व कर्में सोडून बाकी असलेलीं सर्व कर्में या पृथि-सवांत केलीं जातात. या यज्ञाच्याहि शेवटीं अभिषेक आहेच. या यागाचा उपदेश देवांनीं वेनराजाचा पुत्र 'पृथि' यास केला असल्यानें या यागाला 'पृथिसव' असें नांव पडलें. 'मनुष्यसव' असेंहि या यागास दुसरें नांव आहे.

**सोमसव.**—सोमदेवताप्रधान अशा या यागास 'सोमसव' हें नांव आहे परंतु या यागांतहि सोमरसाचें हवन वगैरे नाहीं. एकदां व्याल्यावर पुन्हां केव्हांहि गर्भ न राहिलेली शेळी मारून तिच्या अंगांचें हवन या यज्ञांत होत असतें. शेवटीं अभिषेक होतो.

**ओदनसव.**—या यागांत फक्त शिजलेल्या भाताचा होम मुख्य आहे. शिवाय ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र या चार वर्णांच्या चौघां पुरुषांनीं अनुक्रमें तुपांत, दुधांत, दह्यांत व पाण्यांत भाजक्या सातूंचें पीठ कालवून त्यानें भरलेलें एक एक पात्र एकेकानें यजमानास द्यावयाचें असतें. त्या चारी पात्रांनां हात लावून यजमानानें मंत्र म्हणावयाचे असतात. नंतर यजमान होमाचा उरलेला भात भक्षण करतो. शेवटीं पूर्वोक्त चार प्रकारच्या कालविलेल्या पिठाच्या मिश्रणांनीं यजमानाला अभिषेक करण्यांत येतो.

**गोसव.**—हा यज्ञ म्हणजे उक्थ्यनामक संस्थारूप सोमयागाच्या स्वरूपाचाच एक सोमयाग आहे. सामांच्या व शस्त्रांच्या बाबतींत कांहीं फरक आहे. कण्वरथंतर ह्या नावाचें साम या यज्ञांतील पवमानस्तोत्रप्रसंगीं म्हणावयाचें असतें. या यज्ञांत दहा हजार गाई दक्षिणा द्यावयाचा विधि आहे. शेवटीं दुधाचा अभिषेक यजमानाला करावयाचा असतो.

**३७. 'सव'** ( अभिषेकप्रधान सोमयागविशेष ).

| | | कांड | प्रपाठक | अनुवाक |
|---|---|---|---|---|
| बृहस्पतिसव | ब्राह्मण | २ | ७ | १ |
| ,, | ,, | २ | ५ | ६ |
| ब्राह्मणसव | ,, | २ | ७ | ३ |
| वैश्यसव | ,, | २ | ७ | २ |
| पृथ्विसव | ,, | २ | ७ | ५ |
| सोमसव | ,, | २ | ७ | ४ |
| ओदनसव | ,, | २ | ७ | ७–९ |
| गोसव | ,, | २ | ७ | ६ |

**३८. सोमयाग.**—( हीन, अहीन व सत्रात्मक. विशिष्टरूप ). सोमयागांमध्यें ३ प्रकार आहेत. एकच दिवसांत समाप्त होणारे जे सोमयाग ते एकाह किंवा हीन याग होत. दोन दिवसांपासून १२ दिवस चालणारे जे सोमयाग त्यांनां 'अहीन' अशी संज्ञा आहे. 'द्वादशाह' म्हणून जो क्रतु आहे तो 'अहीन व सत्र' असा उभयरूप आहे. १२ दिवसांपेक्षां जास्त दिवस चालणारे असे संवत्सरापर्यंतचे जे याग आहेत त्यांनां 'सत्र' अशी संज्ञा आहे. संवत्सरात्मक किंवा संवत्सरापेक्षांहि जास्त काळ चालत राहणाऱ्या सोमयागांनां अयनें म्हणतात. सोमयाग या नांवानें दर्शविलेल्या या सदरांत 'एकाह' म्हणजे एक दिवस चालणाऱ्या यागापासून तों ४९ दिवस चालणाऱ्या सोमयागापर्यंतचे यज्ञ दिले आहेत. हे सर्व अग्निष्टोमविकारच आहेत. या सदरांत द्विरात्र, त्रिरात्र अशा रीतीचीं रात्रशब्दघटित जरी यज्ञांचीं नांवें आलीं आहेत तथापि त्याचा अर्थ रात्र असाच न घेतां दिवस असा रूढीनें घ्यावा. सोमयागाची बरोबर कल्पना येण्यासाठीं अग्निष्टोमनामक प्रकृतिभूत सोमयागाचा साद्यंत प्रयोग निबंधरूपानें दुसऱ्या ठिकाणीं दिला आहे. त्रयोदशरात्र क्रतूपासून एकोनपंचाशत्-रात्रापर्यंतचे सर्व क्रतू जरी सत्ररूप आहेत तथापि पुष्कळ दिवस चालणाऱ्या यागांनांच 'सत्र' शब्द वापरण्याची विशेष रूढि आहे.

**३८. सोमयाग–हीन, अहीन व सत्रात्मक.**
( विशिष्टस्वरूप )

| | | कांड | प्रपाठक | अनुवाक |
|---|---|---|---|---|
| एकाह | संहिता | ७ | १ | ४ |
| द्विरात्र | ब्राह्मण | १ | ८ | १० |
| त्रिरात्र(गर्ग) | संहिता | ७ | १ | ५,६,८ |
| चतूरात्र | ,, | ७ | १ | ८ व ९ |
| पञ्चरात्र | ,, | ७ | १ | १० |
| षड्रात्र | ,, | ७ | २ | १ |
| सप्तरात्र | ,, | ७ | २ | २ |
| अष्टरात्र | ,, | ७ | २ | ३ |
| नवरात्र | ,, | ७ | २ | ४ |
| दशरात्र | ,, | ७ | २ | ५ |
| एकादशरात्र | ,, | ७ | २ | ६ |
| द्वादशाह | ,, | ३ | ३ | ५ |
| द्वादशाहाचे भेद | ,, | ७ | २ | ७ ते १० |
| द्वादशाह | ,, | ७ | ३ | १ व २ |
| ,, | ब्राह्मण | २ | २ | ६ |
| ,, | ,, | २ | ३ | ५ |
| ,, | ,, | ३ | ७ | १४ |
| द्वादशाहांतील काम्यग्रहविधान | संहिता | ७ | २ | ७ |
| त्रयोदशरात्र | ,, | ७ | ३ | ३ |
| चतुर्दशरात्र | ,, | ७ | ३ | ४ व ५ |
| पञ्चदशरात्र | ,, | ७ | ३ | ६ व ७ |
| सप्तदशरात्र | ,, | ७ | ३ | ८ |
| विंशतिरात्र | ,, | ७ | ३ | ९ |
| एकविंशतिरात्र | ,, | ७ | ३ | १० |
| चतुर्विंशतिरात्र | ,, | ७ | ४ | १ व २ |
| त्रिंशद्रात्र | ,, | ७ | ४ | ३ |
| द्वात्रिंशद्रात्र | ,, | ७ | ४ | ४ |
| त्रयस्त्रिंशद्रात्र | ,, | ७ | ४ | ५ |
| षट्त्रिंशद्रात्र | ,, | ७ | ४ | ६ |
| एकोनपञ्चाशद्रात्र | | ७ | ४ | ७ |

**३९. सत्रें.—( फार दिवस समुच्चयानें चालणारे सोमयाग ).** या 'सत्र'संज्ञक व कित्येक दिवसपर्यंत चालणाऱ्या सोमयागविकारांमध्यें सर्वच यजमान व सर्वच ऋत्विज असा व्यवहार असतो. तथापि सर्व सत्रात्मक कर्माचा नेता या नात्यानें सर्वांनीं मिळून एक गृहपति म्हणून ठरविलेला असतो

व त्याच्या पुरस्काराखालीं सर्व अनुष्ठान चालू असतें. निरनिराळ्या अग्निष्टोमविकारांच्या एक किंवा अनेक आवृत्ती कित्येक दिवस करीत राहणें हें सत्राचें मुख्य स्वरूप आहे.

या सदरांत दिलेलीं संदर्भस्थलें पाहिल्यास सत्राचें मुख्य वर्णन नाहीं तरी अर्थवादरूपानें सत्राचें स्वरूप लक्षांत येण्याजोगा खुलासा पहाण्यास मिळेल.

### ३९. सत्रें ( फार दिवस चालणारे याग ).

| | कां. | प्र. | अ. |
|---|---|---|---|
| ब्राह्मण | १ | ४ | ६–८ |
| ,, | २ | १ | १ |
| ,, | ३ | १२ | ९ |

**४०. संवत्सरसत्र (सोमयागात्मक).**—संवत्सरसत्र करणाऱ्या सर्व यजमानांनीं माघ कृष्ण अष्टमीस दीक्षा करावी लागते. कोणाच्या मतें शिशिर ऋतूंतले माघफाल्गुन हे दोन महिने वर्षाच्या अखेरचे दिवस होत म्हणून अखेरच्या-वर्षांताच्या-दिवसांत दीक्षा न करतां संवत्सरसत्राची आरंभनिमित्तक दीक्षा फाल्गुनी पौर्णिमेस करावी, कारण तो दिवस भावी संवत्सराचा आरंभदिवस होय. कांहींच्या दृष्टीनें असें करणें इष्ट नाहीं, कारण असा आरंभ केल्यास १२ दिवस दीक्षेचे व १२ दिवस उपसदिष्टींचे मिळून चोवीस दिवस उलटल्यावर चैत्र शुद्ध ९ मीस सोमयागाच्या उपक्रमास आरंभ होतो, व मग आश्विन शुद्ध अष्टमीच्या दिवशीं सहा महिन्यांचें एक संवत्सरपूर्वार्ध संपून नवमीच्या दिवशीं 'विपुवान्'नामक संधिदिनविशिष्ट सोमयाग करावा लागतो. यांच्या मतें घराच्या आढ्याच्या आश्रयावर जशीं दोन बाजूचीं दोन पाखीं स्थित झालेलीं असतात, त्याप्रमाणें 'विपुवान्'नामक सोमयागरूपी आढ्याच्या आश्रयावर संवत्सररूपी घराचीं षण्मासरूप दोन्हीं पाखीं स्थित झालेलीं असतात, यामुळें विपुवान् दिवस हा पावसाळा उलटतांक्षणीं लागलीच येणें बरें नाहीं; यासाठीं संवत्सरसत्राची दीक्षा चैत्री पौर्णिमेस करावी म्हणजे सहामाहीनंतरचा विषूवान् ऋतु कार्तिक शुद्ध ९ मीस पडतो. पाऊस येण्याची ह्या वेळीं भीति न उरल्यामुळें विपुवान्नामक संवत्सरमध्यवर्ती ऋतूस हा दिवस इष्ट होय. सोमयागात्मक अशा संवत्सरसत्रांत सोमयागांचा उपक्रम अग्निष्टोम किंवा अतिरात्र ऋतूपासून करण्यांत येतो. एकदां आरंभ झाल्यावर गोष्टोम, आयुष्टोम, ज्योतिष्टोम किंवा अशाच प्रकारच्या दुसऱ्या कांहीं क्रतूंचीं अनुष्ठानें विशिष्ट क्रमानें संवत्सरपर्यंत चालू राहतात. नंतर सत्रसमाप्ति होते. सत्राच्या समाप्तीस 'उत्थान' अशी संज्ञा आहे.

### ४०. संवत्सरसत्र ( सोमयागात्मक ).

| | कां. | प्र. | अ. |
|---|---|---|---|
| संहिता | ७ | ४ | ८–११ |
| ,, | ७ | ५ | १–४ |

**४१. गवामयन.**—गाईंनीं सत्र केलें असा अर्थवाद श्रुतीमध्यें आल्यावरून या संवत्सरात्मक सत्राचें 'गवामयन' असें नांव पडलें आहे. कांहीं गाईंनां दहा महिन्यांतच शिंगें फुटलीं अशा अर्थवादावरून दहा महिन्याचाहि गवामयनसंबंधीं एक पक्ष सांगितला आहे. हें सत्र सोमयागात्मक आहे.

### ४१ गवामयन ( सोमयागात्मक ).

| | कां. | प्र. | अ. |
|---|---|---|---|
| संहिता | ३ | ३ | ६ |
| ,, | ३ | ५ | १० |
| ,, | ७ | ५ | ५–७ |
| ब्राह्मण | १ | २ | २–५ |

**४२. स्वर्गसत्र.**—हें सत्र इष्ट्यात्मक आहे. दररोज १ याप्रमाणें बारा दिवस बारा इष्टी करून हें सत्र संपावयाचें असतें. वास्तविक १२ दिवसांत संपणाऱ्या यागाला सत्र शब्द ठीक दिसत नाहीं; तथापि द्वादशाहनामक सोमयाग अहीन व सत्र अशा उभयरूपानें असल्याच्या अतिदेशावरून बारा दिवसांच्या या 'स्वर्गसत्र' नामक यागास 'सत्र' शब्द योजण्यांत आला असावा. या बारा दिवसांच्या यागांत दोन विभाग आहेत. 'दिवःश्येन' व 'अपाघा' हे ते विभाग होत. पहिल्या भागांत आशा, काम, ब्रह्म, यज्ञ, आप, अग्निर्बलिमान् व अनुवित्ति या देवतांच्या इष्टी असून दुसऱ्या भागांत तप, श्रद्धा, सत्य, मन व चरण या देवतांच्या क्रमानें ५ इष्टी आहेत. स्त्रियांचे अलंकार या सत्रांत दक्षिणा म्हणून द्यावे लागतात. या इष्टींतील सर्व देवतांनां २।२ उपदेवता असतात.

### ४२. स्वर्गसत्र ( इष्ट्यात्मक ).

| | कां. | प्र. | अ. |
|---|---|---|---|
| ब्राह्मण | ३ | १२ | १–४ |

**४३. नक्षत्रसत्र.**—स्वर्गसत्राप्रमाणें 'नक्षत्रसत्र' हेंहि एक इष्टिसंघात्मकच 'सत्र' आहे. 'देवनक्षत्रें' व 'यमनक्षत्रें' असे २ विभाग नक्षत्रांमध्यें कल्पिले आहेत. कृत्तिकेपासून विशाखेपर्यंत १४ नक्षत्रें हीं देवनक्षत्रें असून अनुराधेपासून भरणीपर्यंत १४ नक्षत्रें हीं 'पितृनक्षत्रें' होत. या अठ्ठावीस नक्षत्रांच्या अधिष्ठानभूत देवतांच्या अठ्ठावीस इष्टी क्रमानें रोज व्हावयाच्या असतात. शिवाय चंद्रमा, अहोरात्र, उषा, नक्षत्रदेवता, सूर्य, अदिति व विष्णु या सात देवतांच्या इष्टी व्हावयाच्या असतात. यांतील पूर्वोक्त नक्षत्रदेवतांच्या इष्टीमध्यें २।२ उपदेवता असतात. एकंदर नक्षत्रसत्रांत ३५ इष्टी होतात.

### ४३ नक्षत्रसत्र ( इष्ट्यात्मक ).

| | कां. | प्र. | अ. |
|---|---|---|---|
| ब्राह्मण | ३ | १ | १–६ |

**४४. सहस्रतमी (गाई)चें दान.**—हजार गाई दक्षिणा ज्या यज्ञांत द्यावयाची असते, त्या यज्ञांत हजार गाईंपैकीं विशिष्ट लक्षणाची एक गाय ( १ वर्षाची, ४ वर्षांची अगर म्हातारी ) निवडून तिला सहस्रतमी ( हजारावी ) अशी संज्ञा देण्यांत येते व तिचें विशिष्ट विधीनें दान करण्यांत येतें. १ वर्षाची गाय सोमदेवतात्मक, ४ वर्षांची इंद्रदेवतात्मक व म्हातारी यमदेवता-

त्मक समजावी. या गाईच्या दानाच्या योगानें सहस्रगोदानात्मक अशा सोमयागांतील सर्व दोष नष्ट होऊन तो याग सांग होतो.

**४४. सहस्रतमीचें दान.**

| | कां. | प्र. | अ. |
|---|---|---|---|
| संहिता | ७ | १ | ७ |

**४५. श्रौतयज्ञाशीं संबद्ध होणारीं व स्वतंत्र अशीं निरनिराळीं कर्में किंवा विधी.**—या सदरांत निरनिराळीं कर्में अगर विधी १ ते १८ अंकापर्यंत क्रमानें दर्शित केले आहेत. पैकीं १४ ते १८ पर्यंतचीं कर्में श्रौतविधीनेंच पण स्वतंत्र होणारीं असून पहिलीं १–१३ पर्यंतचीं कर्में श्रौतयज्ञांच्या अनुषंगानें येणारीं आहेत. बहुतेक कर्मांचें स्वरूप त्यांच्या नांवांवरूनच लक्षांत येण्याजोगें आहे. कांहींचें तसें नाहीं. तथापि तीं कर्में लहानलहान असून विशेषशीं महत्त्वाचीं अगर भानगडीचीं नसल्यामुळें त्यांच्या स्वरूपाचें दिग्दर्शन येथें केलें नाहीं. जरूर असल्यास संदर्भस्थलें पहावीं.

**४५ श्रौतयज्ञाशीं संबद्ध होणारीं व स्वतंत्र अशीं निरनिराळीं कर्में व विधी.**

| | | कांड | प्रपाठक | अनुवाक |
|---|---|---|---|---|
| १ संकल्प | ब्राह्मण | २ | ५ | ३ |
| २ ऋत्विग्वरण | ,, | २ | ३ | ६ |
| ३ आत्मरक्षण<br>४ आग्नेय कर्म<br>५ मंथनाग्निप्रक्षेप | ,, | २ | ४ | २ |
| ६ वास्तुहोम | संहिता | ३ | ४ | १० |
| ७ प्रवासविधि | ,, | ३ | ७ | १ |
| ८ जयहोम | ,, | ३ | ४ | ४ |
| ९ अभ्यातानहोम | ,, | ३ | ४ | ५ व ६ |
| १० राष्ट्रभृद्धोम | ,, | ३ | ४ | ७ व ८ |
| ११ कूष्मांडहोम | आरण्यक | – | २ | ६–८ |
| ११ दक्षिणाप्रतिग्रह | ब्राह्मण | २ | २ | ५ |
| ,, | ,, | २ | ३ | २ |
| ,, | ,, | २ | ३ | ४ |
| १३ वपन | ,, | २ | ३ | ३ |
| १४ दशहोतृविधान | ,, | २ | २ | १–४ |
| १५ सप्तहोतृविधान | ,, | २ | २ | ७ |
| १६ होतृविधान | ,, | २ | २ | ११ |
| ,, | ,, | २ | ३ | १ |
| ,, | ,, | २ | ३ | २ |
| ,, | ,, | २ | ३ | ६–११ |
| १७ आत्मशुद्धि | संहिता | १ | ४ | ८ |
| १८ राज्याभिषेक | ,, | २ | ७ | १५–१७ |

**४६. कांहीं स्वतंत्र याग.—वृषालंभयाग.**—कळपांतील एखादा बैल म्हातारा अगर निरुपयोगी झाल्यास तो रुद्रदेवतेच्या उद्देशानें मारून हा याग करावयाचा असतो.

**नैर्ऋतयाग.**—चतुर्दशीयुक्त पौर्णिमेच्या दिवशीं हा याग निर्ऋति देवतेच्या उद्देशानें करावा लागतो. 'अनुमति'नामक देवतेसाठीं एक पुरोडाश हवि करावयाचा असतो. पुरोडाशाचें पीठ वाटतेवेळीं पाट्याच्या मागच्या बाजूस सांडलेल्या पिठाचा पुरोडाश निर्ऋति देवतेसाठीं करण्यांत येतो. प्रथम निर्ऋति देवतेचा याग करून मग अनुमतीचा करावयाचा असतो. अग्नीचें एक पेटलेलें कोलीत घेऊन दक्षिणदिशेस जावयाचें व जेथें खारलेली अगर आपोआप मेगळलेली जमीन दृष्टीस पडेल त्या ठिकाणीं निर्ऋति देवतेचा पुरोडाश समर्पण करण्यांत येतो. काळें वस्त्र अगर काळ्या रंगाची घोंगडी दक्षिणा म्हणून देण्यांत येते.

**सात्यदूत.**—अश्विनौ, सरस्वतीसत्यवाक् व सविता या देवतांच्या उद्देशानें केला जाणारा हा एक पौरोडाशिक याग आहे. तीन धनुष्यें व एक धनुष्याची दोरी या यागाची दक्षिणा म्हणून द्यावयाची असते.

**प्रयुजहवि.**—अग्नि, सविता इत्यादि देवतांच्यासाठीं करण्यांत येणारा हा एक इष्ट्यात्मक याग आहे. रथ ओढणारा बैल या यज्ञाची दक्षिणा आहे.

**४६. कांहीं स्वतंत्र याग.**

| | | कां. | प्र. | अ. |
|---|---|---|---|---|
| १९ वृषालंभयाग | संहिता | ३ | ३ | ९ व १० |
| २० नैर्ऋतयाग. | ब्राह्मण | १ | ६ | १ |
| २१ सात्यदूत | संहिता | १ | ८ | १९ |
| २२ प्रयुजहवि | ,, | १ | ८ | २० |
| २२ ,, | ब्राह्मण | १ | ८ | १–४ |

**४७. स्मार्तविषयक निरनिराळे विधी व याग.**—या सदरांत १ ते १० अंकांपर्यंतच्या चिन्हांनीं निरनिराळे स्मार्तविधी दर्शविले आहेत. यांतहि १–६ पर्यंतचे विधी वर्णाश्रमधर्मविशिष्ट असून ९,१० व १३ हीं केवल स्मार्त विधानें आहेत. ११ व १२ अंकांच्या चिन्हांनीं दर्शित केलेले याग हे स्मार्त विधानाचे असून त्या त्या देवतेच्या अनुग्रहार्थ करण्याचे आहेत. हे सर्व विधी व याग स्मार्त असून त्यांच्या त्यांच्या नांवांवरूनच त्यांचें स्वरूपाविष्करण होण्याजोगें असल्यामुळें येथें त्यांचें विवेचन केलें नाहीं.

**४७. स्मार्तविषयक निरनिराळे विधी व याग.**

| | | कांड | प्रपाठक | अनुवाक |
|---|---|---|---|---|
| संध्या | आरण्यक | – | २ | २–५ |
| ,, | ,, | ,, | २ | १९ व २० |
| ,, | ,, | ,, | २ | २३–३० |
| २ यज्ञोपवीतधा० | ,, | ,, | २ | १ |
| ३ पञ्चमहायज्ञ | ,, | ,, | २ | ९–१६ |
| ४ ब्रह्मयज्ञ प्र० | ,, | ,, | ७ | १० |
| ५ स्नानविधि | ,, | ,, | १० | १ |
| ६ भोजनविधि | ,, | ,, | १० | ३२–३७ |

| | कां. | प्र. | अ. |
|---|---|---|---|
| ७ त्रिसुपर्णमंत्र आर० | – | १० | ४८–५१ |
| ८ काम्यविधान ,, | ,, | १० | १ व ३–७ आणि २२ |
| ९ प्रायश्चित्तविधान,, | ,, | २ | ६–८ |
| ,, ,, | ,, | २ | १७ व १८ |
| १० प्रकीर्ण विधानें ब्राह्म० | २ | ५ | २–८ |
| ,, ,, | ,, | ५ | १–८ |
| ११ वैश्रवणयज्ञ आर० | – | १ | ३१ |
| १२ यमयज्ञ ,, | – | ६ | ५ |
| १३ सार्ताग्नीचे उपस्थानमंत्र ब्राह्म० | २ | ४ | १ |

**४८. उपासना व तत्त्वज्ञानविषयक.**—या सदरांत येणारे विषय संदर्भस्थलावरूनच अवलोकन करणें सोईचें होईल. विषयांच्या नांवावरून त्यांचा बोध साधारणपणें होण्याजोगा आहे. 'शिष्टानुशासन' हा शेवटला विषय निवळ उपदेशपर आहे.

**४८. उपासना व तत्त्वज्ञानविषयक.**

| | | प्रपाठक | अनुवाक |
|---|---|---|---|
| अध्यात्म (तत्वज्ञान) | आरण्यक | ७ | १–८ |
| ,, | ,, | ८ | १–९ |
| ,, | ,, | ९ | १–१० |
| ,, | ,, | १० | १,६,८–१४ |
| ,, | ,, | ,, | २०–२१,३२ |
| ,, | ,, | ,, | ३८–४२ |
| ,, | ,, | ,, | ४८,५१ |
| ,, | ,, | ,, | आणि ६४ |
| उपासना | ,, | १० | १०–१९ |
| नित्यकर्म व उपासना यांचा समुच्चय | ,, | ७ | ९ |
| सोपाधिक ब्रह्मोपासना | ,, | १० | १ |
| मूर्तिरूपदेवता | ,, | १० | १ |
| महाव्याहृति | ,, | १० | २ |
| शिष्टानुशासन | ,, | ७ | ११ |

याप्रमाणें तैत्तिरीय संहितेंतील प्रमुख विषयांची सूची दिल्यानंतर या संहितेची विस्तृत अनुक्रमणिका देणें उपयुक्त होईल.

## —तैत्तिरीय संहितेची विस्तृत अनुक्रमणिका—

(जाडे अंक अनुवाकांचे आहेत व बारीक आंकडे अनुवाकांतील मंत्रांचे आहेत).

### —प्रथम काण्ड—

**प्रथमप्रपाठक**–प्रजापतिऋषिः

दर्शपूर्णमासांतील क्रियांच्या प्रसंगीं म्हणावयाचे मंत्र.

**१.** गाईंच्यापासून वांसरें दूर नेऊन बांधणें.

**२.** वेदींत पसरण्याकरितां लागणारे दर्भ कापून आणणें.

**३.** गाईंची धार काढून निधालेलें दूध तापविणें व विरजणें.

**४.** पुरोडाश तयार करण्यासाठीं साळीचें भात अगर सातू मोजून घेणें.

**५.** भात अगर सातू कांडणें.

**६.** तांदूळ अगर सातू वाटून त्यांचें पीठ करणें.

**७.** पुरोडाश भाजण्यासाठीं एक अगर अनेक खापराचे तुकडे (कपालें) अग्निकुंडाच्या बाहेर अगर आंत जुळवून मांडणें.

**८.** भाजलेल्या पिठाचा चपटा लाडू (पुरोडाश) तयार करणें.

**९.** 'वेदी' खणून, चोपून तयार करणें.

**१०.** 'जुहू' वगैरे स्रुच्यां(पळ्यां)मध्यें तूप भरून घेणें. पत्नीच्या कंबरेस योक्त्र (मोळाची दोरी) बांधणें.

**११.** इध्म व बर्हि यांचें प्रोक्षण. बर्हि (दर्भ) वेदींत पसरणें. स्रुचा वेदींत मांडून ठेवणें.

**१२.** स्रुच्या उचलून घेऊन वेदीपलीकडे जाणें व आघारहोम.

**१३** स्रुच्या उचलून बाजूस ठेवणें. स्रुच्यांमध्यें असलेला तुपाचा अंश अग्नीमध्यें वितळविणें. 'समिष्टयजु' होम.

**१४.** प्रजा प्राप्त होण्यासाठीं, भाऊबंद किंवा नोकर यांच्यापासून होणाऱ्या तापापासून बचाव होण्यासाठीं, जमिनीसंबंधानें कांहीं तंटा वगैरे असल्यास त्यांत 'जय' मिळविण्यासाठीं, शत्रूचें सैन्य एकदम चाल करून आल्यामुळें नष्ट झालेलें धैर्य पुन्हां उत्पन्न होऊन लढाई जिंकतां यावी यासाठीं कराव्या लागणाऱ्या 'इंद्राग्नी'देवतात्मक इष्टीमध्यें म्हणाव्या लागणाऱ्या याज्या व पुरोनुवाक्या १–२. लढाईमुळें श्रम होऊन इंद्रियांची कमी झालेली ताकद पुन्हां येण्याकरितां, सभाधीटपणा येण्याकरितां, व इंद्रियांना बळकटी आणि सामर्थ्य येण्यासाठीं कराव्या लागणाऱ्या 'इंद्राग्नी' देवतात्मक इष्टीच्या याज्या व पुरोनुवाक्या ३–४. वरील इष्टींच्या बरोबरच कराव्या लागणाऱ्या 'पूषा' देवतात्मक एका इष्टीच्या याज्या व पुरोनुवाक्या ५-६. समाजामध्यें प्रतिष्ठितपणा मिळावयासाठीं 'क्षेत्रपति'देवतात्मक इष्टीच्या याज्या व पुरोनुवाक्या ७–८. दर्शपूर्णमासेष्टीच्या वेळीं प्रयोगांत चूक झाल्यास प्रायश्चित्तासाठीं कराव्या लागणाऱ्या 'अग्निःपथिकृत्'देवतात्मक इष्टीच्या याज्या व पुरोनुवाक्या ९–१०. अग्निहोत्री ब्राह्मणाच्या हातून व्रतस्थपणानें वागण्याच्या बाबतींत प्रमाद घडल्यास प्रायश्चित्त म्हणून कराव्या लागणाऱ्या 'अग्निर्व्रतपति'देवतात्मक इष्टीच्या याज्या व पुरोनुवाक्या ११–१२. याच 'व्रतपति' इष्टीच्या वैकल्पिक याज्या व पुरोनुवाक्या १३–१४.

**द्वितीय प्रपाठक (सौम्यकांड)**–चंद्रऋषिः

**१.** यजमानाचें दीक्षांगभूत वपन, स्नान, पवनपावन व यजमानाचा प्राग्वंशशालेंत प्रवेश.

**२.** दीक्षाहुति, दीक्षाग्रहणविधि.

**३.** व्रतदुग्धप्राशन, यज्ञासाठीं द्रव्य जमविण्यासाठीं माणसांची रवानगी. देवयजन (यज्ञभूमि) स्थलांत मुक्काम करणें.

४. सोमक्रयसंबंधीं आहुती व 'सोमक्रयिणी' गाय सोमक्रय करण्याच्या स्थलाकडे चालविणें.

५. सोमक्रयिणी गाईच्या सातव्या पावलाचें ग्रहण.

६. सोमवल्लीची खरेदी करण्यापूर्वी तिची मोजणी करणें.

७. मोबदल्याचे पदार्थ सोमवल्ली विकणाराला देऊन ती विकत घेणें.

८. सोमवल्ली प्राग्वंशशालेंत नेण्यासाठीं गाड्यावर चढविणें.

९. सोमवल्ली भरलेला गाडा प्राग्वंशशालेकडे घेऊन जाणें.

१०. सोमराजाच्या सन्मानार्थ आतिथ्येष्टि. तानूनप्त्र.

११. प्राग्वंशशालेंत ठेवलेल्या सोमराजावर (आप्यायन) उदकसिंचन, प्रस्ताराच्या ठिकाणीं 'निह्नव'नामक कर्म व 'उपसत्'.

१२. दुसऱ्या 'उपसत्' इष्टीनंतर उत्तरवेदी तयार करणें.

१३. हविर्धानसंज्ञक २ गाडे हविर्धानमंडपाकडे नेणें व हविर्धाननामक मंडप अध्वर्यु व प्रतिप्रस्थाता या दोघांनीं तयार करणें.

१४. राक्षसांच्या बाधेपासून रक्षण होण्यासाठीं कराव्या लागणाऱ्या 'अग्नी रक्षोहा' देवतात्मक इष्टीसंबंधाच्या 'सामिधेनी' १–१५. पुरोनुवाक्या १६. वैकल्पिक याज्या १७–१८.

**तृतीय प्रपाठक**–(प्रतिपाद्य विषय मुख्यतः) अग्नीषोमीय पशु.

१. 'औदुंबरी'संज्ञक मेढ भूमींत रोंवण्याचा विधि व 'सद'नामक मंडप करणें.

२. 'उपरव'नामक खळगे तयार करणें.

३. आग्नीध्रीया, सद व मार्जालीया यांमध्यें 'धिष्ण्या' घालणें.

४. वैसर्जनहोम, अग्नीषोमप्रणयन व अवांतरदीक्षाविसर्ग.

५. यूप तोडून आणणें.

६. उत्तरवेदीच्या पूर्वबाजूस यूप पुरावयाचा विधि.

७. पशूचें उपाकरण व अग्निमंथनविधि.

८. शामित्रशालेंत नेऊन मारण्याचा विधि.

९. पशु मेल्यावर त्याचें पोट फाडून 'वपा' काढणें व तिचा होम करणें.

१०. वसाहोमविधि.

११. गुदकांड किंवा 'उपयट्संज्ञक' होम.

१२. 'वसतीवरी'संज्ञक उदक घागरींत भरून आणणें.

१३. अभिषवाकरितां सोमवल्ली गाड्यावरून खालीं काढणें.

१४. शत्रूला मारण्यासाठीं कराव्या लागणाऱ्या 'अग्नीरुद्र-वान्'नामक देवतेच्या इष्टीमध्यें लागणाऱ्या याज्यापुरोनुवाक्या १–२. गाई, बैल अथवा घरांतील मनुष्यें अपमृत्यूमुळें मेलीं तर त्यांच्या शांतीकरितां किंवा स्वतःलाच एखाद्या रोगानें अपमृत्यु येईल अशी भीति वाटत असल्यास ती दूर होण्यासाठीं कराव्या लागणाऱ्या 'अग्निः सुरभिमान्' देवतात्मक इष्टीच्या याज्यापुरोनुवाक्या ३–४. क्षुधेची पीडा निवारण होण्यासाठीं, शत्रूवर जय मिळण्यासाठीं, आपल्या घरांतील भाऊ वगैरे एका मागोमाग मरूं लागले तर त्यांच्या शांतीकरितां व घर जळलें तर त्यासंबंधानें शांति येण्यासाठीं कराव्या लागणाऱ्या 'अग्निः-क्षामवान्'देवतात्मक इष्टीच्या याज्यापुरोनुवाक्या ५–६. मनःकामना पूर्ण होण्यासाठीं करावयाच्या 'अग्निःकाम' देवतात्मक इष्टीच्या याज्यापुरोनुवाक्या ७–८. भाऊबंदकीच्या भांडणांत भाऊबंदाची शक्ति कमी होऊन आपल्याला 'विजय' मिळावा म्हणून 'अग्नियविष्ठ'देवतात्मक इष्टि करावयाची तिच्या संबंधाच्या याज्यापुरोनुवाक्या ९–१०. शत्रूनें आपल्याला मारण्यासाठीं केलेला प्रयोग उलटून शत्रूलाच मरण यावें म्हणून याच देवतेच्या उद्देशानें कराव्या लागणाऱ्या इष्टीच्या याज्या-पुरोनुवाक्या ११–१२. शंभर वर्षांच्या मानवी आयुष्यमर्यादेचा पूर्णपणें उपभोग मिळावा म्हणून कराव्या लागणाऱ्या 'अग्नि-रायुष्मान्' देवतात्मक इष्टीच्या याज्यापुरोनुवाक्या १३–१४. ऐश्वर्यप्राप्तीसाठीं करावयाच्या 'अग्निर्जातवेद' देवतात्मक इष्टीच्या याज्या पुरोनुवाक्या १५–१६. शरीराला उत्कृष्ट कांति चढावी म्हणून 'अग्नीरुक्म'देवतात्मक इष्टि करावी लागते तिच्या याज्या पुरोनुवाक्या १७–१८. शरीरावर तेज चढावें म्हणून अथवा नियमनसामर्थ्य प्राप्त व्हावें म्हणून कराव्या लागणाऱ्या 'अग्निस्तेजस्वान्' देवतात्मक इष्टिच्या याज्यापुरोनुवाक्या १९–२०. अंगांत सहिष्णुता यावी म्हणून करावयाच्या 'अग्निः साहत्य' देवतात्मक इष्टीच्या याज्यापुरोनुवाक्या २१–२२. 'जवळ पुष्कळ अन्न असावें' या इच्छेनें 'अग्निरन्नवान्' देव-तात्मक इष्टि करावी लागते तिच्या याज्यापुरोनुवाक्या २३–२४. याच कामनेसाठीं 'अग्निरन्नाद' देवतेच्या उद्देशानें कराव्या लागणाऱ्या इष्टीमध्यें याच (२३–२४) याज्यापुरोनुवाक्या म्हणाव्या. दीर्घरोगापासून मुक्त होण्याकरितां व दृष्टि चांगली होण्याकरितां कराव्या लागणाऱ्या 'अग्निः पवमान' 'अग्निः पावक' व 'अग्निः शुचि' या देवतांच्या २ प्रकारच्या इष्टींमध्यें उपयोगांत आणावयाच्या याज्यापुरोनुवाक्या २५ ते ३९.

**चतुर्थ प्रपाठक (ग्रहकांड)**–चंद्रऋषिः

१. सोमवल्ली वरवंट्यानें कुटण्याचा विधि.

२. 'उपांशु'नामक ग्रह भरून घेऊन त्याचा होम करणें.

३. 'अंतर्याम'नामक सोमरसानें भरून घेतलेल्या ग्रहाचा होम.

४. 'ऐंद्रवायव'संज्ञक ग्रह सोमरसानें भरून घेणें व ठेवणें.

५. 'मैत्रावरुण'नामक ग्रह सोमरसानें भरून घेणें व ठेवणें.

६. 'आश्विन' नामक ग्रह सोमरसानें भरून घेणें व ठेवणें.

७. 'आश्विन' ग्रह सोमरसानें भरून घेण्याचा वैकल्पिक मंत्र.

८. 'शुक्र' नामक ग्रह सोमरसानें भरून घेऊन जाग्यावर ठेवणें.

९. मंथिनामक ग्रह सोमरसानें भरून घेऊन जाग्यावर ठेवणें.

१०. 'आग्रयण'नामक ग्रह भरून घेणें व ठेवणें.

११. 'आग्रयण'ग्रह घेण्याचा व ठेवण्याचा वैकल्पिक मंत्र.

१२. 'उक्थस्थाली' सोमरसानें भरून घेणें व ठेवणें.

१३. 'ध्रुवस्थाली' भरून घेणें व ठेवणें.

१४. 'ऋतुग्रह' भरून घेण्याचा व प्रचाराचा क्रम.

१५. 'ऐंद्राग्न' ग्रह भरून घेणें व आसादन करणें.

१६. 'वैश्वदेव' ग्रह भरून घेणें व ठेवणें.

१७. 'मरुत्वतीय' ग्रह भरणें व आसादन करणें.

१८. व १९. 'मरुत्वतीय' ग्रह भरून घेणें व ठेवणें.

२०. व २१. 'माहेंद्रग्रह' भरून घेणें व आसादन करणें.

२२. 'आदित्यग्रहस्थाली' भरणें व आसादन करणें.

२३. 'सावित्र'नामक ग्रह भरून घेणें व ठेवणें.

२४. व २५. 'सावित्र' नामक ग्रह भरणें व आसादन करणें.

२६. 'वैश्वदेव' ग्रह भरून घेणें व आसादन करणें.

२७. 'पात्नीवत' ग्रह भरणें व ठेवणें.

२८. 'हारियोजन' ग्रह सोमरसानें भरून घेणें व ठेवणें.

२९. अतिग्राह्य (आग्नेय) संज्ञक ग्रह घेणें व ठेवणें.

३०. अतिग्राह्य (ऐंद्र) संज्ञक ग्रह भरून घेणें व ठेवणें.

३१. अतिग्राह्य सौर्य नामक ग्रह भरणें व ठेवणें.

३२. प्रेतसंस्कार (आहिताग्नीचा). प्रेतदहन करावयाच्या स्थलासमीप एक खळगा खणावयाचा व त्यांत पाणी ओतावयाचें. तें पाणी प्रेतावर शिंपडावयाचा मंत्र.

३३. (प्रेताला) अवगाहन (स्नान घालण्याचा) करण्याचा मंत्र.

३४. प्रेताचें दहन करतेवेळीं म्हणावयाचे मंत्र. प्रेतदहन-समयीं प्रेतावर एक समिध द्यावयाची तिचा मंत्र. लोष्टचिती-मध्यें इष्टका (विटा) मांडावयाचे मंत्र.

३५. प्रेताला यमलोकीं पीडा करणाऱ्या देवतांनां (त्यांनीं प्रेताला पीडा देऊं नये म्हणून) आहुती द्यावयाचे मंत्र.

३६. राजगवीसंज्ञक पशुसंबंधीं हविर्भागाचें हवन करण्याचे मंत्र.

३७,३८,३९,४०,४१, व ४२. 'षोडशी' ग्रह भरून घेणें व ठेवणें.

४३. सोमयागामध्यें दक्षिणा द्यावयाच्या पूर्वीं करावा लागणारा 'दाक्षिण' होम.

४४. 'समिष्टयजु'संज्ञक होम.

४५. अवभृथोपयोगी मंत्र–आहवनीयावर समिधा द्यावयाचे मंत्र.

४६. काम्येष्टींच्या याज्यापुरोनुवाक्या. पुत्रकामेष्टी (पुत्र व्हावा या इच्छेनें 'अग्नि' व 'इंद्र' या देवांनां उद्देशून कराव्या लागणाऱ्या इष्टी) च्या याज्यापुरोनुवाक्या १–४. दूध, दहीं वगैरे रसांची प्राप्ति होण्यासाठीं 'अग्नीरसवान्' देवतेच्या उद्देशानें कराव्या लागणाऱ्या 'रसवती' नामक इष्टीच्या याज्यापुरोनुवाक्या ५–६. द्रव्य प्राप्त होण्याच्या इच्छेनें 'अग्निर्वसुमान्' देवतेला उद्देशून कराव्या लागणाऱ्या इष्टीच्या याज्यापुरोनुवाक्या ७–८. अन्नप्राप्तीसाठीं करावयाच्या 'अग्निर्वाजसृत्' देवतात्मक इष्टीच्या याज्यापुरोनुवाक्या ९–१०. उद्धरण केलेल्या आहवनीयाग्नीमध्यें यजमानाच्या घरांतील इतर पुरुषांनीं विसरणामुळें पुन्हां गार्हपत्यांतून उद्धरण केलेला अग्नि घातला तर दोष होतो (यजमानाचा नाश होतो), म्हणून त्या दोषाच्या निवृत्तीकरितां 'अग्निरग्निवान्' देवतेला उद्देशून कराव्या लागणाऱ्या इष्टीच्या याज्यापुरोनुवाक्या ११–१२. उद्धरण करून आहवनीयाच्या कुंडांत ठेवलेला अग्नि अग्निहोत्रहोम देण्यापूर्वींच विझला तर तो दोष निवारण्यासाठीं 'अग्निर्ज्योतिष्मान्' देवतेला उद्देशून कराव्या लागणाऱ्या इष्टीच्या याज्यापुरोनुवाक्या प्रतीकरूपानें दाखविल्या आहेत १३–१४. येथें 'ग्रहकांड' संपलें.

## पंचमप्रपाठक.

१. पुनराधानविधान. पुनराधानविषयक आख्यायिका. दक्षिणा म्हणून 'रुपें' देण्याचा निषेध.

२. पुनराधानसंबंधीं याज्या वगैरे अंगाचें विधान. पुनराधानसंबंधीं दक्षिणाविशेष. प्रथमचा अग्निहोत्रहोम देण्याचा विशिष्ट मंत्र.

३. गार्हपत्यादि अग्नींचें आधान करावयाचे मंत्र.

४. तिसऱ्या अनुवाकाचें 'ब्राह्मण' आख्यायिकेसह.

५. अग्नींचें उपस्थान. संवत्सरानंतर उपस्थानाचे मंत्र.

६. गृहोपस्थान. गोष्ठ्याचें उपस्थान. आहवनीयोपस्थान.

७. पांचव्या अनुवाकाचें ब्राह्मण.

८. सहाव्या अनुवाकांतील मंत्रांचें व्याख्यान.

९. अग्निहोत्रहोमविधान (उपस्थानासह.)

१०. प्रवासास निघालेल्या यजमानानें करावयाचें अग्न्युपस्थान. दर्शपूर्णमास यागाचे अंगभूत मंत्र. पयस्वती. कपाल फुटल्यास करावा लागणारा विधि.

११. कोणत्याहि प्रकारचें पातक केल्याचा आरोप आल्यास त्या आरोपांतून मुक्त होण्यासाठीं 'अग्निर्वैश्वानर' 'वरुण' व 'दधिक्रावा' या तीन देवतांच्या उद्देशानें कराव्या लागणाऱ्या इष्टीच्या याज्यापुरोनुवाक्या ('अग्निर्वैश्वानर' देवतेच्या वैकल्पिक याज्यापुरोनुवाक्या १ ते ८. 'वरुणा'च्या ९–१०. 'दधिक्राव्या'च्या ११–१२.). प्रजा प्राप्त व्हावी म्हणून हीच इष्टि करावयाची. पुत्र झाल्यावर त्या पुत्राला शुचिर्भूतपणा प्राप्त होण्यासाठीं व दर्शपूर्णमासाचा याग अंतरला तर त्या दोषाच्या निवारणार्थ फक्त 'अग्निर्वैश्वानर' या एक देवतात्मक इष्टीचें अनुष्ठान करावें. पुनराधान वगैरे न करतां कांहीं काल अग्निधारणरहित राहिलेल्या यजमानानें पुनराधान केल्यावर 'अग्निर्वैश्वानर' व 'अग्नि' या दोन देवतांनां उद्देशून कराव्या लागणाऱ्या इष्टीमध्यें 'अग्निदेवतेच्या' याज्यापुरोनुवाक्यांचें प्रतीक १३. प्रजा वगैरेनीं समृद्ध असा 'गांव' मिळावा म्हणून 'अग्निर्वैश्वानर' व 'मरुत्' या दोन देवतांनां उद्देशून कराव्या लागणाऱ्या इष्टीपैकीं 'मरुत्' देवतेच्या याज्यापुरोनुवाक्या १४–१५. मात्र या इष्टींत विशेष हाच कीं 'अग्निर्वैश्वानर' देवतेचा चरु (भात) आहवनीयावरच शिजवावयाचा. युद्धासाठीं कोठें जावयास निघाल्यास समरामध्यें विजय मिळावा म्हणून कराव्या लागणाऱ्या 'अदिति' देवतात्मक इष्टीच्या वैकल्पिक याज्यापुरोनुवाक्या १६–२९. युद्धभूमीवर प्राप्त झाल्यावर जय मिळण्याकरितां त्या भूमीवरच करावी लागणारी 'अग्निर्वैश्वानर'देवतात्मक इष्टि, एकमेकांस मारावयास टपलेल्या दोघां (परस्परशत्रू) च्या घरीं भोजन केल्याबद्दलचा दोष नाहींसा व्हावा म्हणून करावी लागणारी 'अग्निर्वैश्वानर' देवतात्मक इष्टि, एक वर्षपर्यंत एकमेकांशीं द्रोह न करितां मित्र-

त्यानें वर्तन करावयाचें अशी शपथ घेणाऱ्या दोहोंपैकीं ज्याच्या हातून शपथ प्रथम मोडली जाते त्याला दोष प्राप्त होतो तो नाहींसा होण्यासाठीं करावी लागणारी 'अग्निवैश्वानर'-देवतात्मक इष्टि, शेळी दान घेतल्यामुळें लागणाऱ्या दोषाच्या निवृत्तीकरितां करावी लागणारी 'अग्निवैश्वानर'देवतात्मक इष्टि करावयाची असते. खालीं व वरच्या बाजूस दांत असलेला पशु दान म्हणून घेतल्यास, धनप्राप्तीच्या इच्छेनें दात्याकडे जातांना व द्रव्य मिळवून परत आल्यावर 'अग्निवैश्वानर' देवतेला उद्देशून कराव्या लागणाऱ्या इष्टींमध्यें 'वैश्वानरो न ऊत्या' व 'पृष्टो दिवि' या अगर यापुढें वैकल्पिक म्हणून सांगितलेल्या याज्या-पुरोनुवाक्यांपैकीं कोणत्या तरी उपयोगांत आणाव्या. दात्यानें दिलेली गाय ज्या दोरीनें बांधून आपल्या घरीं आणली असेल ती दोरी भाऊबंद त्रास देत असेल तर त्याच्या घरच्या गोठ्यांत नेऊन टाकावी. ही दोरी म्हणजे त्या भाऊबंदाला क्लेश प्राप्त होण्यासाठीं पाठविलेली निर्ऋतिसंज्ञक राक्षसीच होय.

### षष्ठ प्रपाठक.

१. आज्यावेक्षण व आज्यग्रहण मंत्र.

२. परिधींचीं अनुमंत्रणें. प्रयाज, चक्षुषी व प्रधानदेवता यांचीं अनुमंत्रणें.

३. प्राशित्रावदान, यजमानभागावदान व इडा होत्याच्या हातीं देतांना म्हणावयाचे मंत्र. इडाभक्षणमंत्र. मार्जन. चतुर्धा-करणानुमंत्रण. अन्वाहार्यचरूचें अभिमंत्रण.

४. अनूयाजांचीं अनुमंत्रणें. स्रुग्व्यूहनमंत्र. शंयुवाकानु-मंत्रण. पत्नीसंयाजांचीं अनुमंत्रणें. वेदानुमंत्रण.

५. ध्रुवाप्यायन. प्रणीताविमोकाचे मंत्र.

६. आहवनीय, सूर्य इत्यादि देवतांचें उपस्थान. इष्टीचा उपसंहार.

याजमान ब्राह्मण ७–११

७. देवतापरिग्रह, व्रतग्रहणकाल, परिस्तरण घालणें व व्रतांगभूत भक्षण करावयाचे पदार्थ.

८. प्रणीताप्रणयन. पात्रासादन. हविर्निर्वापाभिमंत्रण. यज्ञयोग.

९. प्रजापतीपासून यज्ञांची उत्पत्ति (आख्यायिका). यज्ञ-पात्रांचें महत्त्व व उपयोग.

१०. दुसऱ्या अनुवाकांतील पूर्वभागाचें ब्राह्मण. परिधींचें अनुमंत्र. हविःपदार्थांचें आसादन. स्रुवाधार व स्रुच्याधार यांचें अनुमंत्रण.

११. आश्रावणादि मंत्र. आख्यायिका. आज्यभागादिकांचें अनुमंत्रण.

१२. (१) पशुप्राप्तीसाठीं, (२) पशुप्राप्तीसाठीं, (३) विद्वान लोकांतसुद्धां मान (ब्रह्मवर्चस) मिळावा म्हणून, (४) अन्नप्राप्ती-साठीं, (५) ऐश्वर्यप्राप्तीकरतां, (६) पातकनिवृत्ति व्हावी म्हणून, (७) शत्रूकडून अथवा परकीय राष्ट्राकडून घेरल्या गेलेल्या यजमानाच्या जयासाठीं, (८) सैनिकाच्या वेढ्यांत सांपडल्यास अथवा श्रृंखलाबद्ध झाल्यास सुटका होण्याकरितां, (९) राजसूय किंवा अश्वमेधासारखे महायज्ञ आपल्या हातून घडावे या हेतूनें कराव्या लागणाऱ्या इष्टींच्या याज्यापुरोनुवाक्या.

| इष्टीची देवता | हविर्द्रव्य | या. पु. वाक्या |
|---|---|---|
| (१) इंद्र १. | चरु १. | १–२. |
| (२) इंद्र इंद्रियावान् १. | पुरोडाश (११ कपाल) १. | ३–४. |
| (३) इंद्रधर्मवान् १. | पुरोडाश (११ कपाल) १. | ५–६. |
| (४) इंद्र अर्कवान् १. | पुरोडाश (११ कपाल) १. | ७–८. |
| (५) इंद्र इंद्रियावान् ३. इंद्रधर्मवान् व इंद्र इंद्रियवान् ३. | पुरोडाश (११-११-११) ३. | ९–१०. |
| (६) इंद्र अंऽहोमुक् १. | पुरोडाश (११ क०) १. | ११-१२-१३. |
| (७) इंद्रोवैमृध १. | पुरोडाश (११ क०) १. | १४-१५,१६-१७. |
| (८) इंद्रत्राता १. | पुरोडाश (११ क०) १. | १८–१९. |
| (९) इंद्र अर्काश्वमेध १. | पुरोडाश (११ क०) १. | २०–२१. |

इष्टिसंख्या ९. देवतांची संख्या ११. हविर्द्रव्यें ११. मंत्र सं० २१.

### सप्तम प्रपाठक.

याजमान ब्राह्मणशेष १–६

१. इडानुमंत्रण, इडाभक्षण, मार्जन व चतुर्धाकरण मंत्रव्याख्यान.

२. इडाप्रशंसन आख्यायिकेसह.

३. अन्वाहार्यचरूचें आसादन, अभिमंत्रण वगैरेचें व्याख्यान आख्यायिकेसह.

४. अनूयाजादिकांचीं अनुमंत्रणें.

५. ध्रुवेचे आप्यायनादि मंत्र. यजमानभागभक्षण. पूर्ण-पात्रनिनयन.

६. आहवनीयादि अग्नींचे उपस्थानमंत्र. यज्ञविमोक.

वाजपेयविषयक आध्वर्यवमंत्र ७–१२

७. दीक्षांगभूत सावित्रहोम, रथारोहण, घोड्यांनां धुण्याचा विधि. रथ चालविणें.

८. रथ पळविण्याचे मंत्र. चात्वालावर पुरलेल्या रथ-चक्रावर ब्रह्मयानें आरोहण करण्याचा विधि. दुंदुभिवादन. सोळा रथ दक्षिणारूपानें देणें. कृष्णल दान. इ.

९. तुपांत भिजलेलें वस्त्र नेसून यजमानानें यूपावर चढण्याचा विधि.

१०. अन्नहोममंत्र. अन्नहोमाचीं द्रव्यें. अभिषेकविधि.

११. उज्जितिमंत्रव्याख्यान.

१२. पंचजनोद्देशानें आग्रयणसंज्ञक ५ अतिग्राह्य ग्रह घेण्याचा विधि.

१३. ग्रामाधिपत्यप्राप्तीसाठीं 'इंद्र अनुवृजु' देवतेच्या उद्देशानें, स्वतःची सेना दुर्बल झाली असल्यास ती स्वकार्यक्षम व्हावया-करितां, संग्रामभूमीवर प्राप्त झाल्यानंतर जय मिळावा म्हणून, रोगानें अथवा द्रव्यहानीमुळें उद्विग्न झालेलें चित्त धैर्यसम्पन्न होण्यासाठीं, आपल्या प्रजेमध्यें दानत उत्पन्न होण्याकरितां,

आपल्या वांटणीचें द्रव्य आपला दायाद देत नसेल तर तें मिळावें म्हणून, राज्यावरून खालीं झाला असल्यास अथवा राज्यावरून खालीं होण्याचा प्रसंग आला असल्यास राजासनावर स्थैर्य येण्याकरितां, ऐश्वर्य मिळावें म्हणून आणि जो कुमार ऐश्वर्य-प्राप्तीला योग्य झाला असून सामान्य व्यक्तिसमुदायाबरोबरचा समजला जात असेल त्याला ऐश्वर्य व मोठेपणा मिळण्या-साठीं कराव्या लागणाऱ्या इष्टींच्या याज्यापुरोनुवाक्या. देवताः–(१) इंद्र अनुवृज्जु (२) इंद्राणी (३) इंद्रोमन्युमान् (४) इंद्रोमन्युमान् (३ ऱ्याच या. पु.) (५) इंद्रोदाता (६) इंद्रः प्रदाता (७) इंद्रःसुत्रामा (८) इंद्र. इष्टिसंख्या ९. हविर्द्रव्यें ९ (८ पुरोडाश १ चरु). याज्या व पुरोनुवाक्या १६ (कारण ३ ऱ्या इष्टीच्याच ४ थीला आहेत).

**अष्टम प्रपाठक**—राजसूय.

१. अनुमत्यादि याग. नैर्ऋत मंत्र.

२. चातुर्मास्यांतर्गत 'वैश्वदेवपर्व'संबंधीं याग, देवता वगैरे.

३. चातुर्मास्यांतर्गत 'वरुणप्रघास'नामक याग. देवता वगैरे.

४. चातुर्मास्यांतर्गत 'साकमेध'पर्व. अनीकवती, सांतपना व गृहमेधीया इष्टी.

५. महापितृयज्ञ, पिंडदान, गार्हपत्योपस्थान वगैरे.

६. साकमेधशेषभूत 'त्र्यंबक'पुरोडाशयाग.

७.'शुनासीरीय' पर्व. इंद्रतुरीययाग. अपामार्ग होम.

८. 'देविका हवीं'चा याग.

९. राजसूयामध्यें रोज करावयाचा 'रत्नि' संज्ञक देवतांचा याग. तत्संबंधीं विशिष्ट विधि.

१०. 'देवसुसंज्ञक' हवींचा याग. यजमानाचें हस्तग्रहण. विष्णुक्रम.

११. अभिषेकासाठीं आणावयाच्या पाण्यासंबंधीं मंत्र.

१२. अभिषेकासाठीं आणलेल्या पाण्याचे संस्कारमंत्र.

१३. दिशांचें व्यास्थापन. मारुतादि होम. आवेष्टिहोम. पार्थहोम. अभिषेक. पार्थहोम.

१४. अभिषेक. सिंहाचें कातडें पसरणें. नपुंसक पुरुषाला शिशाच्या गोळ्या मारणें. अभिषेकविधि. रुद्रशेषहोम.

१५. रथाच्या साहाय्यानें विजय मिळविण्याचा विधि [ दिग्विजय ].

१६. विजयप्राप्तीनंतर आसनाधिष्ठित झालेल्या सर्वसेव्य अशा राजाच्या ऐश्वर्याचें वर्णन. अक्षक्रीडा.

१७. 'संसृप' संज्ञक हवींचें हवन.

१८. 'दशपेय' किंवा 'सायस्क'नामक एक दिवसांत होणारा एक सोमयाग. यागविशिष्ट दक्षिणाद्रव्यें.

१९. आवेष्टि (दिक्संबंधीं). राजसूयव्यतिरिक्त आवेष्टींच्या हवनाचा विधि. सात्यदूत हवि.



२०. 'प्रयजु' नामक हविःपदार्थांचा याग. तत्संबंधीं दक्षिणा.

२१. सौत्रामणिनामक यागसंबंधीं 'सुरा' तयार करण्याचा विधि. 'दारु' (सुरा) गाळण्याचा प्रकार. ग्रहांचें स्थापन. पशूंचें उपाकरण. इ.

शत्रूला मारण्यासाठीं 'अग्नाविष्णू' 'सरस्वती' व 'बृहस्पति' या तीन देवतांच्या साठीं कराव्या लागणाऱ्या इष्टीच्या याज्या-पुरोनुवाक्या १–६. वैकल्पिक याज्या ७. केलेला अभिचार पुन्हां करणावरच उलटण्यासाठीं हीच इष्टि करावयाची. मात्र प्रत्येक देवतेच्या यागाचे वेळीं २।२ पुरोनुवाक्या म्हणावयाच्या. आपल्यावरचें फक्त मरण टळावें, अभिचार करणाराला शासन झालेंच पाहिजे असें नाहीं, असा एखाद्या पापभीरु यजमानाचा हेतु असल्यास हीच इष्टि करावयाची. आपल्याला यज्ञप्राप्ति व्हावी, आपल्या हातून यज्ञ व्हावे, अशी इच्छा असणाऱ्यानें 'अग्नाविष्णू' या देवताद्वयाला उद्देशून भाताचा याग करावयाचा. 'कावीळ' वगैरे रोगामुळें डोळे बिघडले असल्यास हीच इष्टि करावयाची. विशेष इतकाच कीं, भात तुपामध्यें शिजवावयाचा. आपल्या एखाद्या द्वेष्ट्या भाऊबंदानें यज्ञ वगैरे केल्यामुळें समाजा-मध्यें त्याचा बहुमान होत असावा व आपल्यास खालीं पहाव-यास लागावें हें टळून त्याच्या बरोबरीनें आपली योग्यता यज्ञ झाला नसला तरीहि व्हावी म्हणून सकाळीं, दुपारीं व संध्याकाळीं अग्नाविष्णू, सरस्वती व बृहस्पति या तीन देवतांनां उद्देशून याग करावा. सकाळच्या वेळचा हविर्निर्वाप, माणसांची हाल-चाल सुरू झाली नाहीं, पक्ष्यांची किलबिल सुरू झाली नाहीं, अशा वेळेस (पहाटे) करावा.

सारांश अग्नाविष्णू, सरस्वती व बृहस्पति या देवतात्रयाच्या याज्या इतक्या भिन्न भिन्न यागांत उपयोगांत आणावयाच्या आहेत.

अग्नाविष्णू इत्यादि देवतात्रयासंबंधानें शेवटीं जो 'अध्वर-कल्प' सांगितला तो केल्यावर आपला भाउबंद यज्ञाचें अवभृथ करून 'अनुबंध्या' याग करितात ते वेळीं आपण 'मित्रावरुण'— या जोडदेवतांनां उद्देशून एकफलात्मक पुरोडाशाचा याग करावा. त्याच्या याज्या पुरोनुवाक्या ८–९. हा याग पौष महिन्याच्या पूर्णिमेस करावयाचा. यागाच्या वेळीं वेदीच्या सभोंवतीं 'कूड' करावयाचा. या 'सोमारौद्र' यागाचे वेळीं 'सामिधेनी'संज्ञक ऋचांमध्यें सामील करून होत्यानें म्हणाव-याच्या धाय्यासंज्ञक ऋचा १०–१५. 'ब्रह्मवर्चस'–प्राप्तीकरितां 'सोमारौद्र'नामक देवतेच्या उद्देशानें चरूचा याग करावयाचा त्याच्या याज्या पुरोनुवाक्या १६–१७. गर्भाला स्थैर्य येऊन सुप्रजाजनन व्हावें म्हणून, वैऱ्याच्या नाशाकरितां, रोगानें पुष्कळ दिवस पछाडला गेला आहे त्यानें रोगमुक्तीसाठीं व आपल्या घरांत भाउबंदकी उत्पन्न व्हावी म्हणूनहि हा सोमारौद्र चरू करावयाचा त्याच्या याज्यापुरोनुवाक्या १६–१७. मला त्वग्रोग उत्पन्न होणार, अशी भीति वाटणारानें 'सोमापौष्ण' नामक चरूचा याग करावयाचा त्याच्या याज्यापुरोनुवाक्या १८–१९.

## —द्वितीय काण्ड—

**प्रथम प्रपाठक.**

१. ऐश्वर्यप्राप्ति, ग्रामाधिपत्व, प्रजाभिवृद्धि व रोगमुक्ति यांसाठीं 'वायुर्नियुत्वान्' देवतेकरितां पशुयाग करावयाचा त्याचा विधि.

प्रजा व पशूंची प्राप्ति व्हावी म्हणून 'प्रजापति' देवतेला उद्देशून पशुयाग करावयाचा व याच कामनेसाठीं 'सोमापौष्ण' नामक पशुयाग करावयाचा त्याचा विधि. 'प्रजापति' देवतात्मक यागासंबंधानें एक आख्यायिका.

२. जलोदर रोग झाला तर तो बरा होण्यासाठीं 'वरुण' देवतेकरितां पशुयाग, प्रजा व पशूंची समृद्धि होण्यासाठीं द्वादशादित्यांनां उद्देशून वांझ शेळीचा याग आणि श्रुताध्ययन, शील, रूप व ब्रह्मवर्चस् यांच्या प्राप्तीसाठीं अग्नि, इंद्र व बृहस्पति या देवतात्रयीच्या उद्देशानें तीन शेळ्यांचा याग, यांच्या अनुष्ठानांतील विधिविशेष. विद्वज्जनांच्या सभेंत मान मिळावयासाठीं 'सरस्वती' देवतेसाठीं मेंढीचा याग व तिचें लक्षण. रोगमुक्तीसाठीं अग्नि व सोम या दोन देवतांनां उद्देशून द्विपशुयाग, प्रजाकामेच्छूनें करावयाचा पूर्वोक्त अग्नि व सोम यांच्यासाठीं द्विपशुयाग व विद्वान लोकांची प्रीति संपादन व्हावी म्हणूनहि हाच याग कांहीं फरकानें करावयाचा त्याचा विधि. पौरोहित्यासाठीं स्पर्धा लागली असेल तर तींत जय मिळण्याकरितां अग्नि सोम व अग्नि या देवतांनां उद्देशून एक त्रिपशुयाग करावयाचा त्याचा विधि.

| ३. कामना | देवता | पशु |
|---|---|---|
| १ गृह, क्षेत्र इत्यादि- बद्दलच्या तंट्यांत जय मिळावा | १ विष्णु | (ठेंगणा) १ |
| २ संग्रामांत विजय मिळण्याकरितां | १ इंद्र (मन्युमान्) | कपाळावर पांढरा ठिपका असलेला.१ |
| ३ ग्रामप्राप्ति | १ इंद्र (मरुत्वान्) | मांड्यांवर पांढरा रंग असलेला १ |
| ४ अन्नलाभ | १ सोम | 'हरवन्या' वर्णाचा १ |
| ५ युवराजाला राज्य मिळावें | १ सोम | जुळ्यांतील मोठा १ |
| ६ शत्रुपीडेमुळें राज्यभ्रष्ट झाल्यास तें पुन्हां मिळावें | १ इंद्र (वृत्रतुर) | अणकुचीदार शिंगाचा १ |
| ७ पापक्षयार्थ | १ इंद्र (अभिमातिहा) | ,, |
| ८ राज्यप्राप्तीकरितां | 'इंद्र' (वज्री) | ,, |

| ४. कामना | देवता | पशु |
|---|---|---|
| १ ब्रह्मवर्चस्प्राप्ति | १ आदित्य* | ऋषभ १० |
| २ त्वग्रोगभयापासून मुक्तता | १ सोमापौष्ण | श्यामवर्ण बोकड १ |
| ३ भाऊबंदांचा पराभव | १ विष्णूवरुण* | अंडिल बैल १ व वांझ गाय १ |
| ४ पापमोचन | १ अग्नि व इंद्र* | बोकड १ व बैल १ |
| ५ गेलेलें राज्य पुन्हां मिळावें | १ द्यावापृथिवी | उशीरां विणारी गाय १ |

अशी * खूण केलेल्या ३ यागांच्या आख्यायिका.

| | | |
|---|---|---|
| ५. १ हजार पशूंची प्राप्ति | २ इंद्र व विष्णु† | उंच व ठेंगणा १ |
| २ प्रजाऽभिवृद्धि | १ ओषधि | गर्भ नाश करणारी गाय १ |
| ३ ऐश्वर्यप्राप्ति | १ इंद्र | एकदांच व्यायलेली व पुन्हां न विणारी गाय १ |
| ४ सोमपानाची परंपरा नष्ट झालेली पुन्हां चालू करावयाचा हेतु | १ इंद्राग्नी. | थकलेला बैल १ |
| ५ शत्रू मारावा (अभिचार) | १ ब्रह्मणस्पति | शिंगें नसलेला बोकड १ |

अशी † खूण केलेल्या यागाबद्दल आख्यायिका. कांहीं यागांचे विशेष विधी वगैरे.

| | | |
|---|---|---|
| ६. १ आपल्या गांवांत आपली प्रतिष्ठा व्हावी | १ बृहस्पति | उंचपाठीचा बोकड १ |
| २ अन्नप्राप्ति | १ पूषा | श्यामवर्ण बोकड १२ |
| ३ अन्नप्राप्ति | १ मरुत् | पाढऱ्या ठिपक्यांचा १ |
| ४ इंद्रियबल | १ इंद्र | अरुणवर्ण १ |
| ५ दुसऱ्याकडून आपल्याला कांहीं दान मिळावें | १ सविता | संकीर्णवर्ण १ |
| ६ अन्नलाभ | १ विश्वेदेव | निरनिराळ्या रंगाचे पट्टे असलेला १ |
| ७ ग्रामलाभ | ,, | ,, |
| ८ गुप्तव्याधिनिवारण | प्रजापति | मिशाळ व विन शिंगाचा १ |
| ७. १ ब्रह्मवर्चस | १ बृहस्पति | उंच पाठीची शेळी १ |
| २ पर्जन्य पडावा | १ मित्रावरुण | दोन रंगांची शेळी १ |
| ३ प्रजाभिवृद्धि | ,, | ,, |
| ४ अन्नलाभ | १ विश्वेदेव | अनेक रंगांची शेळी १ |
| ५ ग्रामलाभ | ,, | ,, |
| ६ ब्रह्मवर्चस | १ बृहस्पति | अंडिल बैल. १ |
| ७ शत्रुमारण | १ रुद्र | गळ्याशीं नीलवर्ण असलेली शेळी १ |
| ८. १ ब्रह्मवर्चस | १ सूर्य | पांढरी शेळी १ |
| २ शत्रुमारण | १ ब्रह्मणस्पति | पिंगलवर्ण कान असलेली शेळी १ |
| ३ यज्ञ व्हावा | १ विष्णु | ठेंगणा बोकड १ |

| | | |
|---|---|---|
| ४ पशुलाभ | १ त्वष्टा | घोडा १ |
| ५ तह घडून यावा | १ मित्र | पांढरा बोकड १ |
| ९. १ अन्नाद्यत्व | १ वरुण | काळी शेळी १ |
| २ अन्नाद्यत्व | २ मित्र व वरुण. | पांढरा बोकड १ व काळी शेळी १ |
| ३ फार दिवसांचा रोग नाहींसा व्हावा. | ,, | पांढरा व काळा शेळी |
| ४ पुष्टि | अश्विनीकुमार | जुळ्यामधील शेळी १ |
| १०. १ दौर्ब्राह्मण्य-परिहार | १ अश्विनौदेव | धुरकट रंगाचा बोकड १ |
| २ एखाद्या वाईट गोष्टीचा आळ आला तर | १ वायु | हरिणींच्या कळपांत राहणारा बैल १ |
| ३ आश्विनशस्त्र चालू असतांना तें संपण्यापूर्वीं सूर्योदय न होईल तर | १ सूर्य | चित्रविचित्र रंगाचा बोकड १ |

**११.** काम्येष्टींच्या याज्यापुरोनुवाक्या खालीं लिहिल्याप्रमाणें.

ग्रामलाभासाठीं इंद्र व मरुत् या देवतांकरितां कराव्या लागणाऱ्या इष्टीच्या याज्या पुरोनुवाक्यांचीं प्रतीकें ४ मिळून वाक्य १. राजा व प्रजा यांच्यामध्यें लागलेला कलह मिटावा म्हणून हीच इष्टि करावी व आपसांत लागलेलीं भांडणें मिटण्यासाठीं हीच इष्टि करावी. ग्रामलाभासाठीं इंद्र व विश्वेदेव यांनां उद्देशून कराव्या लागणाऱ्या इष्टीच्या याज्यापुरोनुवाक्या २–३. याच कामनेसाठीं 'मरुत्'देवतांनां उद्देशून कराव्या लागणाऱ्या इष्टींच्या याज्यापुरोनुवाक्या ४–५. आपआपसांतील अप्रियपणा नष्ट होण्याकरितां (१) अग्नि (वसुमान्) (२) सोम (रुद्रवान्) (३) वरुण (आदित्यवान्) या देवतात्रयीच्या उद्देशानें करावयाच्या इष्टीच्या याज्यापुरोनुवाक्या ६–७. वैकल्पिक याज्या ८ वी. याच इष्टीच्या स्विष्टकृताच्या याज्यापुरोनुवाक्या ९–१०. ऐश्वर्य मिळण्यासाठीं आदित्य देवांच्यासाठीं करावयाच्या इष्टीच्या याज्यापुरोनुवाक्या ११–१२. वैऱ्यांनीं एखाद्या राजाला राज्यांतून हांकून दिला असल्यास अथवा हांकून द्यावयाच्या बेतांत ते असल्यास त्या राजानें 'धारयद्वत्'संज्ञक आदित्यांची इष्टि करावी लागते तिच्या याज्यापुरोनुवाक्या १३–१४. जो राजा अजून हांकून दिलेला नाहीं पण हांकून दिला जाण्याचा संभव आहे अशा राजानें करावयाच्या विशिष्ट विधियुक्त 'आदित्य' देवताक इष्टींत आणखी एक 'वरुण' देवतेची भर घालून इष्टि करावयाची. मात्र याज्या व पुरोनुवाक्या आदित्याच्या बदलून म्हणावयाच्या त्या १५–१६. वैकल्पिक याज्या १७. 'वरुणा'च्या याज्यापुरोनुवाक्या १८–१९.

## द्वितीयप्रपाठक.

**१.** प्रजेची प्राप्ति, एखाद्या जमिनीच्या बाबतींत अगर भाऊबंदांमध्यें स्पर्धा लागली असेल तर तींत जय मिळविणें, रणांगणावर हतवीर्य झालेल्याला पुन्हां धैर्य व वीर्य प्राप्त होणें, जय मिळाल्यावरहि सामर्थ्याची वढती होणें, समाजांत मिसळलें जाणें, इंद्रियांनां बळकटी येणें, समाजांत मिसळल्यावर प्रतिष्ठितपणा मिळणें व याच कामनेसाठीं दुसऱ्या प्रकारानें कराव्या लागणाऱ्या इष्टींचीं विधानें सांगितलीं असून या सर्व इष्टींच्या देवता अनुक्रमें 'इंद्राग्नी' 'इंद्राग्नी' 'इंद्राग्नी' 'इंद्राग्नी' 'इंद्राग्नी' 'पूषा' 'क्षेत्रपति' व 'इंद्राग्नी' अशा ८ आहेत या सर्व इष्टींच्या याज्या पुरोनुवाक्या **काण्ड १** प्रपाठक १ अनुवाक १४ येथें पहा.

**२.** १ दर्शपूर्णमास याग अंतरल्यास प्रायश्चित्त म्हणून, २ आहिताग्नी नाणूस व्रतभ्रष्ट झाल्यास प्रायश्चित्तार्थ, ३ राक्षसांचा उपद्रव नष्ट होण्याकरितां, ४ शत्रूचा नाश व्हावा म्हणून, ५ गाई, माणसें मरूं लागलीं असतां तीं न मरावीं यासाठीं, ६ रणसंग्रामांत जय मिळावा याकरितां, ७ अल्पायुष्यत्व नष्ट होण्यासाठीं, व ८ घर वगैरे जळल्यास तच्छांत्यर्थ कराव्या लागणाऱ्या इष्टींचीं विधानें सांगितलीं आहेत. या इष्टींच्या देवता १ अग्निःपथिकृत् २ अग्निर्व्रतपति ३ अग्नीरक्षोहा ४ अग्नीरुद्रवान् ५ अग्निःसुरभिमान् ६,७ व ८ अग्निःक्षामवान्. या सर्व इष्टींच्या याज्यापुरोनुवाक्या **काण्ड १** प्र. २ व ३ यांतील शेवटच्या अनुवाकांत पहा.

**३.** १ मनांतली इच्छा पूर्ण होणें, २ चढाओढींत जय मिळणें, ३ शत्रूचा नाश होणें, ४ पूर्णायुषी होणें, ५ ऐश्वर्य मिळणें, ६ शरीरावर कांति चढणें, ७ तेजाची प्राप्ति होणें, ८ सहनशीलपणा प्राप्त होणें इत्यादि प्रकारच्या निरनिराळ्या ८ कामना पूर्ण व्हावयासाठीं कराव्या लागणाऱ्या इष्टींचीं विधानें सांगितलीं असून या सर्व इष्टींच्या देवता अनुक्रमें १ अग्निःकाम २ अग्निर्यविष्ठ ३ अग्निर्यविष्ठ ४ अग्निरायुष्मान् ५ अग्निर्जातवेद ६ अग्नीरुक्मन् ७ अग्निस्तेजस्वान् ८ अग्निः–साहंत्य अशा आहेत. या इष्टींच्या या० पुरो० **कां० १** प्र. ३ अ. १४ पहा.

**४.** १ आपल्याजवळ अन्नाचा पुरवठा पुष्कळ व्हावा, २ आपण अन्नाचा उपभोग पुष्कळ घ्यावा, ३ आपण अन्नाचे अधिपति व्हावें, ४ पुष्कळ दिवस जडलेल्या रोगांतून आपली मुक्तता व्हावी, ५ नेत्ररोग नाहींसा व्हावा व दृष्टि चांगली व्हावी, ६ प्रजेची प्राप्ति व्हावी, ७ आपल्याला सर्व रस प्राप्त व्हावे, ८ आपल्याला धन मिळावें, ९ रणसंग्राम होऊन गेल्यावर आपल्याजवळ धान्याचा भरपूर पुरवठा व्हावा, १० अग्नीमध्यें अग्नि मिसळल्यामुळें झालेल्या अपराधाची माफी व्हावी आणि ११ अग्नीचें उद्धरण केल्यावर अग्निहोत्रहोमाचें द्रव्य (दूध वगैरे) उतूं गेलें तर त्या दोषाची निवृत्ति व्हावी या निरनिराळ्या ११ कामना पूर्ण व्हावयाकरितां कराव्या लागणाऱ्या इष्टींचीं विधानें या अनुवाकांत सांगितलीं असून या इष्टींच्या देवता अनुक्रमें १ अग्निरन्नवान् २ अग्निरन्नाद ३ अग्निरन्नपति ४ अग्निःपवमान, अग्निःपावक व अग्निःशुचि ५ चौथ्या इष्टीच्याच देवता. ६ अग्निःपुत्रवान् १ इंद्रःपुत्रवान् २ ७ अग्नीरसवान् ८ अग्निर्वसुमान्. ९ अग्निर्वाजसृत् १० अग्नि रग्निवान् व ११ अग्निर्ज्योतिष्मान्. या इष्टींच्या याज्यापुरोनुवाक्या **कां. १** प्र. ३ अ.१४ व **कां. १** प्र.४ अ. ४० येथें पहा.

५. १ आपल्यावर कोणी अभिचार (मारणाचा प्रयोग) केला असल्यास त्यांतून बचाव व्हावा, २ आपल्याला प्रजा प्राप्त व्हावी, ३ आपल्याला पुत्र झाल्याचा आनंद व्यक्त करावा, ४ अमावास्येची अगर पौर्णिमेची इष्टी वेळेवर न झाली तर त्याबद्दलच्या दोषांमधून आपण मुक्त व्हावें, ५ अग्नि विझला तर त्याचें पुनः प्रज्वलन करण्याचा अधिकार प्राप्त व्हावा व ६ आपल्यास एखादा गांव इनाम मिळावा या कामनांची परिपूर्तता होण्यासाठीं कराव्या लागणाऱ्या इष्टींचीं विधानें या अनुवाकांत असून या सर्व इष्टींच्या देवता अनुक्रमें १ वैश्वानर, वरुण, व दधिक्रावा. २ पहिल्या इष्टीच्याच ३ देवता. ३ वैश्वानर. ४ वैश्वानर. ५ अग्निर्वैश्वानर ६ मरुत् व वैश्वानर या आहेत या इष्टींच्या याज्या पुरोनुवाक्या **कां० १** प्र. ५ अ. ११ येथें पहाव्या.

६. १ युद्धासाठीं रणांगणावर निघतांना विजय मिळावा म्हणून, २ समरभूमीवर पोंचल्यावर जय मिळण्यासाठीं, ३ आपल्या शत्रूच्या घरचें अन्न खाल्लें तर तद्दोषशांत्यर्थ, ४ एक-मेकांत वैरभाव करावयाचा नाहीं अशी शपथ वाहिल्यावर जर ती मोडली गेली तर तद्दोषनिवृत्ति व्हावी म्हणून, ५ शेळीचा दक्षिणा अगर दान म्हणून प्रतिग्रह घडल्यास तो दोष नाहींसा होण्याकरितां, ६ घोडा व माणूस यांचा प्रतिग्रह केल्याचा दोष नाहींसा व्हावा म्हणून, ७ दुसऱ्याकडून आपल्याला दान मिळावें या हेतूनें, ८ प्रवासास निघतांना प्रवासांत सुख व्हावें म्हणून व ९ प्रवासांतून घरीं आल्यावरहि सुख मिळावें या हेतूनें कराव्या लागणाऱ्या इष्टींचीं विधानें या अनुवाकांत असून या इष्टींच्या देवता अनुक्रमें १ अदिती २ वैश्वानर ३ वैश्वानर ४ वैश्वानर ५ वैश्वानर ६ वैश्वानर ७ वैश्वानर ८ वैश्वानर ९ वैश्वानर या आहेत. या इष्टींच्या याज्यापुरोनु-वाक्या **कां० १** प्र. ५ अ. ११ मध्यें पहाव्या.

७. १ पशूंची प्राप्ति व्हावी, २ पशूंचा लाभ व्हावा, ३ ब्रह्मवर्चस प्राप्त व्हावें, ४ अन्नलाभ व्हावा, ५ ऐश्वर्य मिळावें, ६ पापनिष्कृति व्हावी, ७ शत्रुपीडेचें निवारण व्हावें, ८ आपल्या सैन्याभोंवतीं शत्रूच्या सेनेचा पडलेला वेढा उठावा व ९ महा-यज्ञ हातून घडावे या कामना पूर्ण होण्यासाठीं करावयास सांगितलेल्या इष्टींचीं विधानें या अनुवाकांत आलीं आहेत. या इष्टींच्या देवता अनुक्रमें १ इंद्र २ इंद्र इंद्रियवान् ३ इंद्रो-घर्मवान् ४ इंद्र अर्कवान् ५ इंद्रोघर्मवान्, इंद्र अर्कवान्, इंद्र इंद्रियवान् ६ इंद्र अंहोमुक् ७ इंद्रोवैमृध ८ इंद्रस्त्राता व ९ इंद्र अर्काश्वमेधवान् या आहेत. या इष्टींच्या याज्यापुरोनुवाक्या **कां. १** प्र. ६ अ. १२ येथें पहा.

८. १ ग्रामलाभ व्हावा, २ पुष्कळ फौज पदरीं असावी, ३ संग्रामांत जय मिळावा, ४ नष्ट झालेलें धैर्य पुन्हां यावें, ५ सुखानें 'कर' देणारी प्रजा असावी, ६ दुसऱ्यानें आपल्याला द्रव्य द्यावें, ७ राज्यापासून च्युति झाली अगर होण्याचा संभव असला तर तो टळून पुन्हां राजपदाची प्राप्ति व्हावी आणि ८ सर्व तऱ्हेनें भरपूर संपत्ति प्राप्त व्हावी, या कामनांच्या पूर्णते-साठीं कराव्या लागणाऱ्या इष्टी या अनुवाकांत विधानासह सांगितल्या आहेत या इष्टींच्या देवता अनुक्रमें १ इंद्रोवृजवान् २ इंद्राणी ३ इंद्र ४ इंद्र ५ इंद्रोदाता ६ इंद्रः प्रदाता ७ इंद्रः सुत्रामा व ८ इंद्र अशा आहेत. याच्या या० पुरो० **कां० १** प्र. ७ अ. १३ येथें पहा.

९. १ आपल्या शत्रूवर मारणप्रयोग करावा, २ आपल्या शत्रूवर आपण उलट अभिचारप्रयोग करावा, ३ आपल्यावर कोणी मारणप्रयोग केला असल्यास त्यांतून बचाव व्हावा, ४ आपल्या हातून यज्ञ व्हावा, ५ दृष्टि चांगली व्हावी, ६ अध्वराची तयारी चटकन व्हावी या इच्छा पूर्ण होण्यासाठीं कराव्या लागणाऱ्या इष्टींचीं विधानें व ५ व्या इष्टीनंतर मित्रावरुण-देवतोद्देशानें आमिक्षायागाचें विधान या अनुवाकांत आहे. या इष्टींच्या देवता) १,२ व ३ इष्टींच्या प्रत्येकीं 'अग्राविष्णू' 'सरस्वती' व 'बृहस्पति' ४ अग्राविष्णू ५ अग्राविष्णू ६ व्या इष्टीच्या देवता पहिलीच्याच. ७ मित्रावरुण (आमिक्षायागाची देवता) या आहेत. यांच्या याज्या व पुरोनुवाक्या **कां० १** प्र. ८ अ. २२ येथें पहाव्या.

**१०.** १ ब्रह्मवर्चस प्राप्त व्हावें, २ त्वग्रोग उत्पन्न होण्याची भीति नष्ट व्हावी, ३ प्रजा प्राप्त व्हावी, ४ शत्रु मरावा, ५ फार दिवसांच्या रोगांतून मुक्तता व्हावी, ६ आपल्या घरांत किंवा राज्यांत तंटे उपस्थित व्हावे इत्यादि हेतू पूर्ण व्हावे म्हणून कराव्या लागणाऱ्या इष्टींचीं विधानें या अनुवाकांत आहेत या इष्टींपैकीं २ खेरीज बाकीच्या १ ते ६ पर्यंतच्या ५ इष्टींची देवता 'सोमारौद्र' ही असून २ ऱ्या इष्टीची देवता 'सोमापौष्ण' आहे. याज्या पुरोनुवाक्या **कां० १** प्र. ८ अ. २२ येथें पहा.

**११.** १ ग्रामलाभ व्हावा, २ क्षत्रिय व वैश्य या दोन जातींत तंटे व्हावे, ३ क्षत्रिय व वैश्य यांच्यामधला तंटा मिटावा, ४ ग्रामलाभ व्हावा, ५ गांव मिळावा, ६ परस्परांमधील वैर नष्ट होऊन ऐक्य व्हावें इत्यादि कामनांच्या सिद्धीसाठीं कराव्या लागणाऱ्या इष्टींचीं विधानें या अनुवाकांत आलीं आहेत. या इष्टींच्या देवता क्रमानें १ इंद्र व मरुत् २ पहिलीच्याच देवता ४ इंद्र व विश्वेदेव ५ मरुत् ६ 'अग्निर्वसुमान्' ८ 'सोमोरुद्रवान्' 'वरुण आदित्यवान्' व 'इंद्रोमरुत्वान्' या इष्टींच्या याज्या पुरोनुवाक्या **कां० २** प्र. १ अ. ११ येथें पहाव्या.

**१२.** या अनुवाकांत पुढील म्हणजे तृतीयप्रपाठकांतील दुसऱ्या अनुवाकांत आलेल्या इष्टींच्या याज्यापुरोनुवाक्या आहेत.

### तृतीय प्रपाठक.

**१.** १ भूति (ऐश्वर्यप्राप्ति) व्हावी, २ शत्रुसैन्याच्या वेढ्यांत सांपडल्यास त्यांतून मुक्तता व्हावी, ३ शत्रुसैन्याचा वेढा पडावयाचा संभव असल्यास तो टळावा म्हणून कराव्या लागणाऱ्या इष्टी विधानासह या अनुवाकांत आहेत. या इष्टींच्या देवताः १ आदित्य (भुवद्वत्) २ आदित्य (धारयद्वत्) ३ आदित्य व वरुण या आहेत यांच्या याज्यापुरोनुवाक्या **२.१,११.** पहा.

२. १ मृत्यूची भीति दूर व्हावी, २ ब्रह्मवर्चसप्राप्ति व्हावी, ३ हिरण्याचा लाभ व्हावा, ४ हिरण्याचा लाभ झाल्यावर त्या हिरण्याचा उपभोग घडावा, ५ हिरण्य हरवलें तर तें पुन्हां सांपडावें, ६ प्यालेला सोम ओकून पडल्यास तद्दोषनिवारण व्हावें व ७ पशूंचा लाभ व्हावा या हेतूंच्या परिपूर्णतेसाठीं

कराव्या लागणाऱ्या इष्टींचीं विधानें या अनुवाकांत आहेत. या इष्टींच्या देवता अनुक्रमें १ प्रजापति २ सूर्य ३,४ व ५ अग्नि व सूर्य ६ सोमेंद्र ७ अग्निर्दाता, इंद्रः प्रदाता व प्रजापति या आहेत. यांच्या याज्या व पुरोनुवाक्या **कां० २** प्र. २ अ. १२ मध्यें आहेत.

**३.** १ यज्ञापासून च्युत झाल्याबद्दलचा दोष जावा, २ मनांतील कामना पूर्ण व्हावी, ३ ब्रह्मवर्चस प्राप्त व्हावें, ४ नपुंसकत्वाचा परिहार व्हावा, ५ गांव मिळावा व ६ वैश्य जातींतील लोक धनगर्वामुळें ब्राह्मणांची बेपर्वा करूं लागल्यास तो प्रकार बंद पडावा या कामना पूर्ण होण्यासाठीं कराव्या लागणाऱ्या इष्टी या अनुवाकांत असून या इष्टींच्या देवता अनुक्रमें १ अग्नि, इंद्र, व सोम. २ अग्नीषोम १ अग्नीषोम ४ सोम ५ ब्रह्मणस्पति व ६ ब्रह्मणस्पति या आहेत. या इष्टींच्या याज्यापुरोनुवाक्या **कां० २** प्र. ३ अ. १४ येथें पहा.

**४.** १ स्वर्गलोक मिळावा, २ आपली प्रजा दानशील व्हावी, १ जनतेमध्यें श्रेष्ठता मिळावी, ४ जो राजा आपल्या भावंडांत धाकटा आहे त्याला मोठ्याप्रमाणेंच मान मिळावा, ५ याचप्रमाणें ब्राह्मणहि धाकटा असल्यास त्याला मोठेपणाचा मान मिळावा या इच्छांच्या पूर्तीसाठीं करावयाच्या इष्टी व त्यांचीं विधानें या अनुवाकांत आहेत. या इष्टींच्या देवता क्रमानें १,२ व ३ अर्यमा ४ व ५ इंद्र आनुषक् या आहेत. या इष्टींच्या या. पु. वाक्या **कां० २** प्र. ३ अ. १४ येथें पहाव्या.

**५.** क्षयरोगाची पीडा दूर व्हावी म्हणून 'आदित्य' देवतोद्देशानें एक इष्टि करावयाची तिच्या याज्यापुरोनुवाक्या या अनुवाकांत आहेत.

६. 'अन्नाद्यत्व' (समृद्धत्व) प्राप्त व्हावें म्हणून १ इंद्र (राजा) २ इंद्र (अधिराजा) १ इंद्र (स्वराट्) या तीन देवतांच्या उद्देशानें करावयाची इष्टि विधानासह या अनुवाकांत आहे. हिच्या याज्यापुरोनुवाक्या **कां० २** प्र. ४ अ. १४ येथें पहाव्या.

**७.** १ इंद्रियांनां बळकटी यावी व शरीराचें सामर्थ्य वाढावें, २ आपल्यावर एखाद्या वाईट गोष्टीविषयीं आळ आला असेल तर तो दूर व्हावा म्हणून करावी लागणारी 'सर्वपृष्ठा' नामक इष्टि विधानसह या अनुवाकांत आहे. या इष्टीच्या देवता १ इंद्र (रथंतर) २ इंद्र (बार्हत) ३ इंद्र (वैरूप) ४ इंद्र (वैराज) ५ इंद्र (शाक्वर) व ६ इंद्र (रैवत) या आहेत. या इष्टीच्या याज्या पुरोनुवाक्या **कां० १** प्र. ४ अ. २९ व **कां० २** प्र. ४ अ. १४ येथें पहा.

**८.** नेत्ररोग दूर होऊन दृष्टि स्वच्छ व्हावी म्हणून 'अग्निर्भ्राजस्वान्' 'सूर्य' व 'अग्निर्भ्राजस्वान्' या तीन देवतांनां उद्देशून इष्टि करावयाची तिचें विधान. हिच्या याज्यापुरोनुवाक्या **तै. सं.** २. ४,१४ येथें पहा.

९. सजातीयांपैकीं वृद्ध, बाल, तरुण व स्त्रिया या सर्वांचें आपल्यावर प्रेम बसावें म्हणून 'विश्वदेव' देवतात्मक एक 'सांग्रहणी' नामक इष्टि करावी. याज्या पुरोनुवाक्या. **तै. सं.** २. ४,१४ येथें पहा.

या इष्टीमध्यें परिधींचे विशिष्ट मंत्र व विशिष्ट होममंत्र आहेत.

**१०.** पुढें ११ व्या अनुवाकांत येणाऱ्या 'आयुष्कामेष्टि' संबंधाचे विशिष्ट विधीबद्दलचे मंत्र.

**११.** आपण पूर्णायुषी व्हावें म्हणून १ अग्नि २ सोम ३ वरुण ४ सरस्वती ५ अग्नाविष्णू यांच्या उद्देशानें इष्टि करावयाची. तिच्या याज्या पुरोनुवाक्या **तै. सं.** २ ५,१२ येथें पहा.

**१२.** 'अश्व' दान किंवा प्रतिग्रह करावयाचा असल्यास 'वरुण' व 'आदित्य' देवतांच्या उद्देशानें इष्टि करावी. तिचें विधान.

**१३.** पापानें घेरलेल्या माणसानें करावयाच्या इष्टीचें विधान सांगण्यापूर्वीं या इष्टींत उपयुक्त करावयाचे मंत्र.

**१४.** यज्ञच्युतिदोषनाशादि इष्टींच्या याज्यापुरोनुवाक्या.

**चतुर्थ प्रपाठक.**

१. भाऊबंदांच्या बरोबर लागलेल्या स्पर्धेत विजय मिळण्यासाठीं 'अग्निः प्रवान्' 'अग्निर्विबाधवान्' व 'अग्निः प्रतीकवान्' या तीन देवतांच्या उद्देशानें कराव्या लागणाऱ्या 'विजिति' नामक इष्टीचें विधान. याज्या पुरोनुवाक्या **तै. सं.** २. ५,१२.

२. अनुवाक, १ यांत सांगितलेल्या कामनेच्या पूर्तीसाठीं इंद्र (अंऽहोमुक्) इंद्र (वैमृध) इंद्र (इंद्रियावान्) या देवता त्रयाच्या उद्देशानें करावयाच्या 'विजिति' नामक इष्टीचें विधान याज्यापुरोनुवाक्या **तै. सं.** २.५,१२.

३. अनुवाक १ यांतील कामनापूर्तीसाठीं 'अग्निःसंवर्गदेवतात्मक एक इष्टि करावयाची तिचें विधान.

४. प्रजाभिवृद्धीकरितां 'प्रजापति' देवतात्मक व पशूंच्या समृद्धीसाठीं 'सोमापौष्ण' देवतात्मक अशा दोन इष्टी कराव्या लागतात त्यांचीं विधानें.

५. पुढें सहाव्या अनुवाकांत सांगितल्या जाणाऱ्या 'चित्रा' नामक इष्टीसंबंधीं उपहोम करावयाचे मंत्र.

६. चैत्री पूर्णिमेला 'पशूंचा लाभ व्हावा' म्हणून 'चित्रा' नामक इष्टि करावी लागते तिचा विधि. या इष्टीच्या देवता १ अग्नि २ सोम ३ त्वष्टा ४ सरस्वती ५ सरस्वान् ६ सिनीवाली व ७ इंद्र. या इष्टींच्या याज्यापुरोनुवाक्या **तै. सं. कां० ३** प्र. १ अ. ११ येथें पहा.

७. पर्जन्य पडावा म्हणून कराव्या लागणाऱ्या 'कारीरि'—नामक इष्टीसंबंधाचे विशिष्ट मंत्र.

८,९ व **१०.** या तीन अनुवाकांत 'कारीरीष्टी'चें संपूर्ण विधान सांगितलें आहे.

**११.** १ सहस्रदक्षिणाक यज्ञ करावयाचा असल्यास, २ सहस्रदक्षिणाक यज्ञ करावयाचा संकल्प करून न केल्यास, ३ मनांतील सर्व कामना पूर्ण होण्यासाठीं, ४ अभिचाराकरितां व ५ पशूंच्या लाभासाठीं कराव्या लागणाऱ्या 'इंद्राविष्णू' देवतात्मक 'त्रैधातवीया' नामक इष्टीचें विधान.

१२. त्रैधातवीयेष्टीची देवता 'इंद्राविष्णू' असल्यावद्दल एक आख्यायिका. सहस्रसंख्याक दक्षिणाद्रव्यविधान.

१३. शक्तीचें स्तंभन दूर होण्यासाठीं 'इंद्राबृहस्पति' देवतात्मक एक चरुयाग करावयाचा त्याचें विधान.

१४. पापनाशार्थ वगैरे इष्टींच्या याज्यापुरोनुवाक्या.

**पंचम प्रपाठक.**

१. पौर्णिमेस कराव्या लागणाऱ्या इष्टीमध्यें 'अग्नीषोम' देवतेचा याग करण्याचे विधीसंबंधानें 'विश्वरूपा'ची गोष्ट. रजस्वला स्त्रीनें पाळण्याचे नियम.

२. 'अग्नीषोम' देवतेच्या पुरोडाशाच्या विधीचा उपोद्घात. आज्यभागविधि. प्रजापतिदेवताविधान. वडील मुलाला सर्व द्रव्य द्यावें असें एक विधान.

३. इंद्रोवैमृधयाग. सान्नायविधि. पिंडपितृयज्ञविधि.

४. पौर्णमासयागप्रशंसा. अग्नाविष्णू देवतात्मक 'अनुनिर्वाप्येष्टि.' पशुलाभार्थ 'साकंप्रस्थायी'संज्ञक याग. सोमयागानंतर १ वर्षपर्यंत महेंद्रयागाचा निषेध. 'व्रातपति'.

५. सोमयागावांचून सान्नाय करण्याचा निषेध. 'सुमना' नामक इष्टि. दाक्षायण यज्ञ. अभ्युदयेष्टि. मैत्रावरुणी आमिक्षा.

६. दर्शपूर्णमास यागाचा सोमयागाशीं पूर्वापर संबंध. दर्शपूर्णमासयागप्रशंसा. दर्शपूर्णमासाचें व सोमयागाचें साम्य.

७. सामिधेनीसंबंधाचें व्याख्यान.

८. 'सामिधेनीं'च्या उत्पत्तीची परंपरा व विधान.

९. प्रवरमंत्र, निगद, स्रुगादापन वगैरेचें व्याख्यान.

१०. क्षत्रिय यजमानासाठीं नैमित्तिक व काम्य सामिधेनी. वैश्य यजमानासाठीं नैमित्तिक व काम्य सामिधेनी.

११. याग करणारांनीं अनुष्ठानकालीं 'उपवीत' करण्याचें विधान. सामिधेनीच्या बाबतींत होत्यानें पाळावयाचे नियम. अध्वर्यूनें आघार घालण्याविषयींचें विशिष्ट विधान. होत्याच्या प्रवराचें लक्षण.

१२. आयुष्कामेष्टि वगैरे इष्टींच्या याज्या पुरोनुवाक्या.

**षष्ठ प्रपाठक.**

१. प्रयाज. प्रयाजशेषानें हविःपदार्थांचें अभिघारण.

२. आज्यभाग. याज्यापुरोनुवाक्यालक्षण. वषट्कारलक्षण व प्रधानयागसंबंधीं व्याख्यान.

३. प्रधानभूत आग्नेय पुरोडाश. उपस्तरणाभिघारण. कपाल नष्ट झालें अगर फुटलें तर होणारा दोष.

४. स्तंबयजुर्हरणविधि. वेदीकरण.

५. इध्माबर्हीचें प्रोक्षण. बर्हीं आंथरणें. बर्हींनां तूप लावणें. अग्नींत प्रस्तराचा होम. अध्वर्यु व आग्नीध्र यांचा संवाद.

६. आघारसमिधेचें हवन. सांडलेल्या हविःपदार्थांचें अनुमंत्रण. उपांशुयागाचा अनुक्रम. 'स्विष्टकृत'संबंधीं अवदान घेण्याचा प्रकार. स्विष्टकृताची आहुति देण्याचें विशिष्ट स्थळ.

७. हौत्रशेष. उपाह्वानाच्या प्रसंगानें 'इडे'चें प्रशंसन.

८. इडाभक्षण, प्राशित्रावदान, प्राशित्राचें परिहरण व भक्षण. इडामार्जन.

९. अनूयाजयाग. सूक्तवाक.

१०. शंयुवाक मंत्राचें व्याख्यान, पत्नीसंयाज, आज्येडा आणि समिष्टयजु.

११. "संवर्गेष्टीच्या" सामिधेनी व याज्यापुरोनुवाक्या. उपहोम.

## —तृतीय काण्ड—

**प्रथम प्रपाठक.**

**( सोमशेष किंवा औपानुवाक्य कांड ).**

१. यजमानानें आचरावयाचे विशिष्ट नियम. 'दीक्षितवाद'-विधान. अमेध्यदर्शन झाल्यास म्हणावयाचा मंत्र. पाऊस फार पडूं लागल्यास, रथावर आरूढ होतांना व 'देवयजना'–मध्यें वस्तीकरितां प्रविष्ट होण्याचे वेळीं म्हणावयाचे मंत्र.

२. सोमराजाचें उपस्थान. तानूनप्त्र व प्रातःसवनादि 'स्तोत्रत्रया'चीं उपाकरणें.

३. सोमक्रयणीच्या पावलाखालील मातीचें 'वंगण'. पशूचें 'आलभन' करतांना करावयाचा कांहीं विशिष्ट काम्यप्रयोग.

४. पशूच्या 'उपाकरणा'चे मंत्र.

५. 'उपाकरण' मंत्रांचें ब्राह्मण.

६. 'सद' व हविर्धान या मंडपांनां अभिमर्शन करण्याचे व द्रोणकलश, उपांशु इत्यादि पात्रांनां स्पर्श करण्याचे मंत्र.

७. परस्पर मत्सरबुद्धीनें यागास प्रवृत्त झालेल्या यजमानांनीं करावयाचा कांहीं नैमित्तिक प्रयोग. प्रातरनुवाकापूर्वीं अध्वर्यूनें द्यावयाची एक आहुति ( क्रतूकरण ). पूर्वोक्त मत्सरानें आरंभिलेल्या यज्ञांत 'क्रतूकरणा'च्या आहुतीचे वैकल्पिक मंत्र. अशा प्रकारच्या मात्सर्ययुक्त यज्ञांत उद्गात्यानें करावयाचा प्रयोगविशेष. याच बाबतींत होत्याचें व यजमानाचें कांहीं कर्म.

८. दक्षिण बाजूच्या 'हविर्धान' शकटाच्या उत्तर बाजूवरील चाकोरीजवळ अध्वर्यूनें यजमानाकडून म्हणविण्याचे 'निग्राभ' मंत्र व 'सोमाभिषव.'

९. सवनाहुतिमंत्र. ग्रह घेतांना मंत्र म्हणावयाचे त्यावद्दल उच्चनीचध्वनिविशेष. प्रातःसवनादि तिन्ही सवनांच्या आहुती. पारिप्लवाधार. मंथिग्रहाचा सस्त्रावहोम आणि 'मनु' व त्याचा पुत्र 'नाभानेदिष्ठ' याची गोष्ट.

१०. प्रवृत्ताहुति. बहिष्पवमान'प्रसर्पण'.

११. 'पशुप्राप्तीसाठीं' कराव्या लागणाऱ्या 'चित्रायागा'च्या ( सात देवतांचा हा याग आहे ) पुरोनुवाक्या १४ व वैकल्पिक याज्यापुरोनुवाक्या व 'कारीरीष्टी' (पर्जन्यार्थ )च्या उपयोगी मंत्र.

**द्वितीय प्रपाठक.**

१. बहिष्पवमानापूर्वीं, बहिष्पवमान गाऊं लागल्यावर, माध्यंदिन पवमान गाण्याचे वेळीं आणि आर्भवपवमानगायन सुरू करतांना यजमानानें म्हणावयाचे 'होतृ'संज्ञक मंत्र. द्रोणकलश वगैरेचें 'अभिमर्शन'.

२. सोमयागसंबंधीं सवनत्रय. पूतभृत्, आहवनीय इत्यादि ग्रहांचें समंत्रक अवलोकन.

३. सोम, व 'उपांशु' इत्यादि ग्रहांचें समंत्रक अवलोकन.

४. महावेदी तयार करण्याचीं साधनें (स्फ्य, परशु वगैरे) यांचें उपस्थान. आस्तावस्थल, आहवनीयादि अग्नि, सर्वधिष्ण्या व ऋत्विज यांचें उपस्थान. सदामध्यें यजमानाचें उपवेशन.

५. सोमपानविधि, चमसाचें आप्यायन, शस्त्रप्रायश्चित्तें, हारियोजनभक्षण आणि वेदीमध्यें पितरांच्या साठीं 'पिंडदान'.

६. पृषदाज्यलक्षण, पृषदाज्य ग्रहण करण्याचा प्रकार आणि पृषदाज्य सांडल्यास प्रायश्चित्त.

७. ब्रह्मयानें सामगांनां साम म्हणावयासाठीं द्यावयाची आज्ञा. यजमानानें शस्त्राचें व स्तोत्राचें दोहन करावयाचे मंत्र.

८. माध्यंदिनसवनांतील विशिष्ट होमाचे मंत्र. आग्नीध्रीयेंत करावयाचा 'वैश्वकर्मण' होम. 'पूतभृतां'त 'आशिर' ओतणें व 'ध्रुवे'चें अवेक्षण.

९. प्रतिगरलक्षण. प्रतिगर देण्याचे काल प्रतिगरांच्या शेवटीं उच्चारावयाचे सवनभेदानुसार भिन्न मंत्र.

१०. द्विदेवत्य(ऐंद्रवायव, मैत्रावरुण व आश्विन)ग्रहप्रचार.

११. 'त्रैधातवीया' इष्टीच्या याज्यापुरोनुवाक्या.

### तृतीय प्रपाठक.

१. आग्नेय, ऐंद्राग्न व सौर्य या 'अतिग्राह्य'संज्ञक ग्रहांचा प्रचार.

२. स्तोत्रोपाकरणाचे व प्रतिगराचे भिन्न मंत्र.

३. 'अदाभ्य' व 'अंशु' ग्रहसंबंधीं मंत्र.

४. ३ ऱ्या अनुवाकांत गेलेल्या मंत्रांचें ब्राह्मण.

५. विकृतिरूप 'द्वादशाह' यागांतील शेषभूत असलेले 'पृश्निग्रह'.

६. 'गवामयन' नामक सत्रांतील 'पर' संज्ञक 'अतिग्राह्य' विशेष.

७. सोमाहुतींच्या अंगभूतत्वानें 'आश्रावय' इत्यादि मंत्रांचें विधान.

८. अवभृथांगहोम. विश्वलोपहोम. उपस्थान.

९. 'वृषालंभन'नामक एक विशिष्ट कर्म. (गाईच्या कळपांतला जुना वळू मारून त्याचा याग करावयाचा व कळपांत नवा वळू सोडावयाचा).

१०. पशुप्रायश्चित्तविशेष.

११. 'इंद्राबृहस्पति' यागाच्या, एकमेकांचे अग्नी एकमेकांच्या अग्नींत मिसळले असतां करावयाच्या 'विविची'नामक इष्टीच्या व 'देविका' संज्ञक हवींच्या याज्या पुरोनुवाक्या.

### चतुर्थ प्रपाठक.

१. शेळी मारल्यावर तिच्या पोटांत गर्भ सांपडल्यास त्या गर्भाचें 'शिपिविष्ट' देवतोद्देशानें हवन व विशिष्ट दक्षिणा.

२. ऐश्वर्यादि कामना पूर्ण होण्यासाठीं 'वशा'लंभनाचे मंत्र.

३. वशायागाचा अधिकार कोणास आहे याचा विचार.

४. लढाई चालू असतां शत्रुसैन्यावर जय मिळावयासाठीं होम.

५. 'अभ्यातान'होम.

६. 'अभ्यातान'संज्ञक होमाचें व्याख्यान आख्यायिकेसह.

७. 'राष्ट्रभृत्' होमाचे मंत्र.

८. 'राष्ट्रभृत्' होमाचा काम्यविधि, राष्ट्रप्राप्ति, ग्रामलाभ, ओजस्वीपणा व राष्ट्रचालन इ.

९. 'देविका'संज्ञक काम्ययाग 'राजसूय' यागांतर्गत.

१०. प्रयाण करावयाचें असल्यास अग्निहोत्र्यानें अग्नीचा समारोप करावयाचा विधि. वास्तुहोम व प्रवासविधि.

११. 'देवसु' हवींच्या याज्यापुरोनुवाक्या.

### पंचम प्रपाठक.

१. सोम व इष्टींचे शेष. दर्शपूर्णमासांगभूत 'अन्वारंभणीया' इष्टि. 'सारस्वत' होम.

२. सौमिक ब्रह्मत्व. वसिष्ठ ऋषींचें माहात्म्य. इंद्रानें वसिष्ठांनां 'स्तोमभाग'संज्ञक मंत्र दिल्याची हकीकत. सोमयागांत वसिष्ठकुलोत्पन्न मनुष्यास ब्रह्मत्व देण्याविषयीं नियम.

३. 'विष्णु'रूप यजमानानें विहारातिक्रमण करावयाचे मंत्र.

४. 'अतिमोक्ष'संज्ञक मंत्र व 'उदवसानीया' इष्टि.

५. 'आदित्य'ग्रहाचे मंत्र व यूपाचे उपस्थानमंत्र.

६. पत्नीच्या 'सन्नहन'प्रभृति कर्मांचे मंत्र.

७. दर्शपूर्णमासादि इष्टींत लागणाऱ्या जुहू वगैरे स्रुचा करावयास लागणारीं निरनिराळ्या वृक्षांचीं लांकडें.

८. दधिग्रहाचे मंत्र.

९. दधिग्रहसंबंधीं विधायक व्याख्यान.

१०. 'गवामयना'मध्यें घ्यावयाचे 'अतिग्राह्य' व 'प्राण' ग्रह.

११. पाशुक हौत्र. अग्निप्रणयन, अग्निमंथन वगैरे.

## —चतुर्थ काण्ड—

### प्रथम प्रपाठक.

आग्निक (चयन) काण्ड—अग्निऋषिः.

१. अग्निचित्यंगभूत होमाचे मंत्र. अभ्र्यादान.

२. विटा तयार करण्यासाठीं लागणारी माती असेल तेथें जाणें.

३. माती खणणें.

४. खणलेली माती घेऊन येणें.

५. उखानिर्माणसंस्कार.

६. उखेचें उद्धूपन.

७. चयनांगभूत वायव्यपशूच्या सामिधेनी.

८. आप्री.

९. अग्न्युत्पादन.

१०. अग्नीचें उद्धरण. यजमानानें आपल्या गळ्यांत रुक्म बांधावयाचें विधान.

११. चातुर्मास्ययागांतील 'वैश्वदेव'पर्वसंबंधीं याज्यापुरोनुवाक्या.

**द्वितीय प्रपाठक** (आग्नेयकाण्ड)–अग्निऋषिः

१. 'विष्णुक्रम' संज्ञक मंत्रांनीं करावयाचें विहाराक्रमण. शिक्य पाशमोचन. अग्न्याहरण व आसंदीवर अग्निस्थापन.

२. आसंदीवर ठेवलेल्या अग्नीचें 'वात्सप्र'संज्ञक मंत्रांनीं उपस्थान.

३. उखेंत ठेवलेला अग्नि चयनस्थलाकडे नेणें. अग्नीमध्यें समिधा देणें. अग्नि उचलणें. अग्नि गाड्यावर ठेवणें. अग्नीवर घृताक्त समिध देणें. क्षत्रिय यजमानाचे भिन्न मंत्र. भस्म पाण्यांत टाकणें. अग्नि पुन्हां उखेंत ठेवणें. उखेंतील अग्नि प्रज्वलित करणें. उख्याग्नीचें उपस्थान.

४. गार्हपत्यचिति. गार्हपत्यचितीच्या स्थलाची आंखणी. आयतन खणणें. वाळू पसरणें. खारी माती घालणें. खारी माती आणि वाळू यांचा मिलाफ. इष्टकांचें उपधान. विटांच्या थरावर मातीचा थर घालणें.

५. अग्निचयनाच्या स्थलाची नांगरणी. गार्हपत्यचितीवर उखेंतील अग्नि ओतणें. शिक्यातून 'उखा' बाहेर काढणें. 'निर्ऋति' इष्टकांचें उपधान व उपस्थान. नांगरणी करणाऱ्या लोकांना प्रैष. नांगरण्याची दुसरी पाळी. दोन नांगरटींच्या मधल्या स्थलाची नांगरणी.

६. नांगरून तयार केलेल्या स्थलांत 'वीं' पेरणें.

७. नांगरलेल्या स्थलांतील खडे अगर मातीचीं ढेंकळें फेंकणें. वाळू पसरणें.

८. रुक्माचें उपधान. अश्वाक्रमण. अश्वाच्या पावलाच्या ठिकाणीं कमलपत्राचें उपधान. रुक्माचें उपधान. पुरुषोपधान. पुरुषाभिमर्श. अमृन्मयी इष्टकांचें उपधान. (स्रुचा, उखळ इ. इ.) व्याघारण.

९. 'स्वयमातृण्णा' इत्यादि इष्टकांचें उपधान. दूर्वेष्टकेचें उपधान. अषाढोपस्थान. दहीं व मध यांनीं कांसवाला अभ्यंजन. कांसवाचें उपधान. इ.

१०. पशुशिराचें उपधान. पुरुषशिराचें उपधान. अश्वादि ४ शिरांचें उपधान. सर्पमन्त्रपठन.

११. चातुर्मास्यांतर्गत 'वरुणप्रघास'पर्वाच्या या०पु०.

**तृतीय प्रपाठक.**

१. अग्निचयनसंबंधीं पहिल्या प्रस्तराच्या 'अपस्या' नामक इष्टकांचें उपधान.

२. 'प्राणभृत्' इष्टकांचें उपधान.

३. 'अपानभृत्' इष्टकांचें उपधान.

४. दुसऱ्या प्रस्तराच्या आश्विनी, प्राणभृदाश्विनी, ऋतव्या आश्विनी, प्राणभृदाश्विनी व अपस्या( वृष्टिसनि )इष्टकांचें उपधान.

५. 'वयस्या'नामक इष्टकांचें उपधान.

६. तिसऱ्या प्रस्तरासंबंधीं 'स्वयमातृण्णा', 'दिश्या' व प्राणभृत् संज्ञक इष्टकांचें उपधान.

७. बृहती व वालखिल्यसंज्ञक इष्टकांचें उपधान.

८. चौथ्या प्रस्तराच्या 'अक्ष्णयास्तोमीया'नामक इष्टकांचें उपधान.

९. अवशिष्ट राहिलेल्या 'अक्ष्णयास्तोमीया'नामक इष्टकांचें उपधान.

१०. सृष्टी इष्टकांचें उपधान.

११. व्युष्टी इष्टकांचें उपधान.

१२. पांचव्या प्रस्तराच्या 'असपत्नी' व 'विराजा' नामक इष्टकांचें उपधान.

१३. चातुर्मास्यांतर्गत 'साकमेध' पर्वसंबंधीं याज्यापुरोनुवाक्या.

**चतुर्थ प्रपाठक.**

१. पांचव्या प्रस्तराच्या 'स्तोमभागा' नामक इष्टकांचें उपधान.

२. 'नाकसदा' इष्टकांचें उपधान.

३. 'चोडा' इष्टकांचें उपधान.

४. 'छंद' नामक इष्टकांचें उपधान.

५. 'सयुजा', 'कृत्तिका' व 'मंडला' इष्टकांचें उपधान.

६. 'विश्वज्योतिष,' 'वृष्टिसनि', 'आदित्या', 'घृतेष्टका' आणि 'यशोदा' नामक इष्टकांचें उपधान.

७. 'भूयस्कृद्', 'अग्नीष्टका,' 'द्रविणोदा', 'आयुष्या' व 'ऋतव्या' नामक इष्टकांचें उपधान.

८. 'इंद्रतनु' इष्टकांचें उपधान.

९. 'यज्ञतनु' इष्टकांचें उपधान.

१०. 'नक्षत्र' इष्टकांचें उपधान.

११. 'ऋतव्या' नामक इष्टकांचें उपधान.

१२. सहावा प्रस्तर.

१३. अश्वमेधांतर्गत 'सर्वपृष्ठा'नामक इष्टीच्या याज्यापुरोनुवाक्या.

**पंचम प्रपाठक.**

१. चित्याग्नीवर रुद्रहोम. शिवस्वरूपवर्णन. नमस्कार.

२,३ व ४. दोन्हीं बाजूंनीं नमस्कार असणारे मंत्र.

५,६,७,८,९ व १०. नमस्कारमंत्र.

११. रुद्रप्रार्थनेसाठीं कांहीं मंत्र.

१२. रुद्रप्रार्थनेचे मंत्र तीन यजूंच्या सह.

### षष्ठ प्रपाठक.

१. उदकधारेनें 'मांडलेल्या चयनाला' परिषेक. चयनाभोंवतीं प्रदक्षिण फिरणें. वेतसशाखा, शेवाळ व बेडूक या तीन पदार्थांचें चितीवर विकर्षण. अग्न्यधिरोहण. स्वयमातृण्णाव्याघारण. दहीं व मध मिश्रित करून दर्भमुष्टीनें चितीवर शिंपडणें. प्रत्यवरोहण. संचिताहुति.

२. वैश्वकर्मणहोम. उदकांजलिहोम.

३. अग्निप्रणयन, अग्नीचें उद्यमन( उचलणें ), अग्नि घेऊन जाणें, आग्नीध्रीयेमध्यें अश्मा ( धोंडा ) स्थापन करणें, चयनाच्या पुच्छप्रदेशाजवळ अग्नि घेऊन जाणें. इ.

४. अप्रतिरथ सूक्त.

५. अग्नीची स्थापना. चित्यग्नीवर चढणें. स्वयमातृण्णेच्या ठिकाणीं दह्यानें भरलेल्या उंबराच्या स्रुचीचा होम. स्वयमातृण्णेवर अग्निस्थापन. उंबराच्या अगर शमीच्या समिधांनें हवन. पूर्णाहुति व मारुतपुरोडाशहोम.

६. अश्वमेध करणाऱ्या यजमानानें कवच वगैरे धारण करणें. धनुष्य घेणें. धनुष्याच्या दोरीला स्पर्श करणें.

७,८ व ९. अश्वस्तोमीय होम.

### सप्तम प्रपाठक.

१–११. 'वसोर्धारा'नामक होम.

१२. वाजप्रसवीय होम. दुधाचा होम. वातनामांचें हवन. अग्निचयन करणाऱ्या यजमानानें पाळावयाचे व्रतनियम.

१३. अग्नियोग, अग्न्यभिमर्शन व पुनश्चितिविधान.

१४. धिष्ण्येष्टकांच्या उपस्थानाचे 'विहव्य'नामक मंत्र.

१५. अश्वमेधांतर्गत 'मृगारि' इष्टीच्या याज्यापुरोनुवाक्या.

## —पंचम काण्ड—

**प्रथम प्रपाठक** ( चतुर्थ काण्डाचें ब्राह्मण )—अग्निऋषिः

१. सावित्र होम. अभ्र्यादान.

२. 'उखा' करण्यासाठीं माती आणण्याकरितां घोडा घेऊन जाणें.

३. मृत्तिकेचें आक्रमण. भूसंस्कार.

४. माती खणणें व कृष्णाजिनावर ठेवलेल्या कमलपत्रावर माती घेणें.

५. भरून घेतलेली माती यज्ञभूमीच्या ठिकाणीं आणणें.

६. उखा तयार करणें.

७. उखेचे उद्धूपनादि संस्कार व उखा भाजून काढणें.

८. पुरुषशिराचा संस्कार व वायव्यपशूचें अनुष्ठान.

९. उखेंतील अग्नीचें प्रज्वलन.

१०. उख्याग्नीवर समिध देणें.

११. अश्वमेधसंबंधीं 'आप्री'संज्ञक ऋचा व याज्यापुरोनुवाक्या.

### द्वितीय प्रपाठक.

१. विष्णुक्रम. 'वात्सप्र'संज्ञक उपस्थान.

२. उख्याग्नीवर समिध देणें. प्रयाण. सांठलेलें भस्म काढून टाकणें.

३. गार्हपत्यचिति.

४. गार्हपत्यचितीवर माती पसरणें. 'निर्ऋति'नामक इष्टकांचें उपधान.

५. चयनस्थलाची मोजणी.

६. सिकतानिर्वपण. कमलपत्राचें उपधान.

७. रुक्म, पुरुष व अमृन्मयी इष्टकांचें उपधान. रुक्मावर व्याघारण करणें.

८. स्वयमातृण्णा, दूर्वा, अषाढा व कांसव यांचें उपधान.

९. पुरुषशिराचें उपधान. अश्वादिशिरांचें उपधान.

१०. अपस्या, प्राणभृत् व संयत् या इष्टकांचें उपधान.

११. अश्वमेधसंबंधीं अनुष्ठान. सुयांनीं मार्गाची कल्पना.

१२. अश्वशरीराचें 'विशसन' ( फाडणें ).

### तृतीय प्रपाठक.

१. अश्विनी, ऋतव्या, अपस्या, वयस्या व प्राणभृत् इत्यादि इष्टकांचें उपधान.

२. स्वयमातृण्णा, दिश्या, प्राणभृत्, छंद व वालखिल्य इष्टकांचें उपधान.

३. 'अक्ष्णयास्तोमीया' नामक इष्टकांचें उपधान.

४. 'अक्ष्णया' इष्टकांचें उपधान.

५. 'असपत्ना' इष्टकांचें उपधान.

६. 'स्तोमभागा' इष्टकांचें उपधान.

७. 'नाकसदा' 'चोडा' 'स्वयमातृण्णा' व विकर्णी इ० इष्टकांचें उपधान.

८. सहाव्या प्रस्तरासंबंधीं 'छंद'नामक इष्टकांचें उपधान.

९. 'सयुजा' 'नक्षत्र' 'मंडला' 'विश्वज्योतिष' इष्टकांचें उपधान.

१०. 'वृष्टिसनि' 'संयानी' व 'घृतेष्टका' इत्यादि इष्टकांचें उपधान.

११. 'आग्नेय्या' 'द्रविणोदा' 'आयुष्या' 'अग्निहृदया' व 'ऋतव्या' या इष्टकांचें उपधान.

१२. 'अश्वमेध'विधान.

### चतुर्थ प्रपाठक.

१. 'इंद्रतनू' 'यज्ञतनू' व 'ज्योतिष्मती' इष्टकांचें उपधान.

२. 'ऋतव्या' 'अधिपत्नी' यांचें उपधान. हजार सोन्याचे रज मिसळलेल्या जलानें 'चिती'चें प्रोक्षण.

३. 'शतरुद्रीय'होम व त्याचें विधान.

४. उदकानें भरलेल्या घड्याच्या धारेनें चितीला परिषेक. मंडूकविकर्षण, उपानहधारण व चित्यधिद्रवण.

५. चितीचें ( चयनाचें ) व्याघारण. मध मिसळलेल्या दह्यानें चितीचें अवोक्षण आणि 'वैश्वकर्मण' होम.

६. समिदाधान, अग्निप्रणयन व 'अप्रतिरथ' सूक्त.

७. चितीवर चढणें व त्या ठिकाणीं अग्नि स्थापन करणें.

८. 'वसोर्धारा' होम. धारेचा प्रकार.

९. 'वाजप्रसवीय' होम, आग्नीध्र व यजमान यांचे कांहीं नियम, राष्ट्रभृत् होम, वातनाम होम व त्याचा प्रकार.

१०. पुनश्चिति (अग्नियोग).

११. निरनिराळ्या कामनापरत्वें १८ प्रकारचे 'चिती' (चयन). विहव्योपस्थान (धिष्ण्योपस्थान).

१२. अश्वमेधसंबंधीं बहिष्पवमानांत गावयाच्या ऋचा, स्तोम व सामें.

## पंचम प्रपाठक.

'ब्राह्मण' (अग्निकांडांतील मंत्रशेष). 'उपानुवाक्य'.

१. 'चिति'संबंधीं उत्सृष्ट पशूंचा 'विधि'. वायव्यपशूचें विधान, साग्निचित्य क्रतूच्या दीक्षणीयेंतील विशेष व वैश्वानरयाग.

२. चयनाचें विधान, चयनाचें फल व 'उख्याग्नि'धारण.

३. पुरुषशिराचें उपधान. 'वामभृत्'चें उपधान.

४. 'रेतःसिक्'इष्टकोपधान. अग्निचयन करणाऱ्या यजमानानें पाळावयाचे नियम. संचिताहुतिहोम.

५. हिरण्येष्टका व स्वयमातृण्णा यांचें उपधान.

६. दिवसांचीं रूपें व लोकंपृणेष्टकेचें उपधान.

७. यूपैकत्वादि. चितीचें पुच्छ व आत्मा यांच्या संधीवर इष्टकोपधान व धनुष्यदान.

८. चित्यग्नीचें उपस्थान.

९. अन्नउदध इत्यादि पांच आहुती, आरोहावरोह जप. शेवटल्या इष्टकेवर 'गवीधुक्' चरूचें उपधान व संचिताग्नीचें प्रोक्षण.

१०. सर्पाहुति व अग्निविमोकाहुति.

११. अश्वमेधशेषभूत 'एकादशिन' पशु.

## षष्ट प्रपाठक (उपानुवाक्य).

१. कुंभेष्टकोपधान मंत्र.

२. कुंभेष्टकोपधानविधान व चरूपधान.

३. भूतेष्टकोपधान, देवसुहवि व अभिषेक.

४. दर्भांच्या टोंकावर द्यावयाच्या ५ आहुती व चित्यग्नीचें विधान.

५. तापश्चिति.

६. उपानहधारण विधान, वैश्वानर पुरोडाश व प्रशंसा.

७. दीक्षेचे विकल्प.

८. अन्वारोहण. चितीचें माप, द्विषाहस्रादिविधान, अग्निचयन केलेल्या यजमानानें पाळावयाचे नियम व 'रेतःसिक्' इष्टकेचें उपधान.

९. उख्याग्नि आसंदीवर ठेवणें, शिक्यलक्षण, उलूखलमुसलोपधान व उख्याग्नीवर समिदाधान.

१०. त्रिचितीकपंचचितीकादि विधान.

११–२३. अश्वमेधसंबंधीं शेषभूत असे 'एकादशिन'-संज्ञक पशु.

## सप्तम प्रपाठक.

१. चितीला अभिमर्श, चितीच्या दक्षिणोत्तर घोडे उभे करणें, हिरण्यपात्र मधानें भरून तें अवलोकन करणें व हुंगणें.

२. वृषभेष्टकांचें व प्राजापत्येष्टकांचें उपधान. उख्याग्नीवर काष्ठें घालणें, 'आज्य'संज्ञक ५ इष्टकांचें उपधान, आग्रयण-निर्वाप आणि हविःशेषभक्षण.

३. 'वज्रिणी' इष्टकांचें उपधान, शतरुद्रीयविधान, वसोर्धाराहोम, आज्यशेषांत 'ब्रह्मौदन'निर्वाप व त्याचें प्राशन.

४. आहुती. 'राष्ट्रभृत्' इष्टकांचें उपधान.

५. उख्याग्नीचा नाश झाल्यास काय करावें? पंचार्काहुति. प्रथम व द्वितीय चिति, दिश्येष्टका, तृतीय चिति, लोकंपृणा आणि चतुर्थ व पंचम चितींचें प्रशंसन.

६. अग्निचयनानंतर १ वर्षपर्यंत 'पक्षि'भक्षणाचा निषेध. चितीवर कोणत्या दिशेनें चढावें? हिरण्येष्टकोपधान. 'रुक्'नामक आहुति, स्वयंचितिजप व अग्निचयन केल्यावर स्त्रीसंग केल्यास प्रायश्चित्त म्हणून 'मैत्रावरुणी' आमिक्षा करावयाची.

७. वैश्वकर्मणहोम. आकूतिहोम.

८. स्वयंचितिजप. कूर्मोपधानसंबंधीं वैकल्पिक मंत्र. इष्टकांचें सर्ववर्णीकरण.

९. अग्नीचें ग्रहण. प्रश्नोत्तररूपानें चयनाची प्रशंसा. हिरण्येष्टकोपधान.

१०. पशुशिराच्या उपधानासंबंधीं विधानविशेष. (अग्निब्राह्मण समाप्त)

११–२६. 'शरीरहोमादि' मंत्र.

## —षष्ठ काण्ड—

### प्रथम प्रपाठक (सोममंत्रांचें ब्राह्मण).

१. प्राग्वंश निर्माण करणें, क्षुरकर्म व दीक्षासंस्कार.

२. दीक्षाहुति.

३. कृष्णाजिन, वस्त्र व मेखला यांनीं दीक्षा करणें व कृष्णविषाणानें खाजविणें.

४. दीक्षा घेतलेल्या यजमानाला दण्ड देणें, यजमानाचें मुष्टीकरण व वाङ्यमादि नियमांचें अनुष्ठान.

५. प्रायणीया 'इष्टि'.

६. तांबड्या रंगाची गाय देऊन सोम विकत घेणें.

७. सोमक्रयिणी गाईला घेऊन जाणें.

८. सोमक्रयिणीच्या पावलांचा संग्रह.

९. सोमवल्लीची मोजणी.

१०. दुसऱ्या पदार्थांनीं सोमाची खरेदी.

११. विकत घेतलेला सोम गाड्यांत घालून घेऊन जाणें.

### द्वितीय प्रपाठक.

१. आतिथ्येष्टि, मंथन.
२. तानूनप्त्र व अवांतर दीक्षा.
३. 'उपसत्' इष्टि.
४. महावेदीकरण.
५. व्रतनिर्णय.
६. कामनापरत्वें यागभूमि.
७. उत्तरवेदी.
८. उत्तरवेदीचें व्याघारण.
९. हविर्धान.
१०. सद तयार करणें.
११. उपरव तयार करणें.

### तृतीय प्रपाठक.

१. धिष्ण्या.
२. वैसर्जन होम व अग्नीषोमप्रणयन.
३. यूपच्छेदन व कामनापरत्वें यूपाचीं प्रमाणें.
४. यूपस्थापन.
५. अग्निमंथन.
६. पशूचें उपाकरण.
७. सामिधेनी, आघार व प्रयाज.
८. पशूचें पर्यग्निकरण व पशूचें संज्ञपन ( हिंसन ).
९. पशूच्या प्राणांचें आप्यायन व वपाहोम.
१०. पशुपुरोडाशाचा निर्वाप, याग व अंगयाग.
११. वसाहोम, पश्विडा व अनूयाज.

### चतुर्थ प्रपाठक.

१. गुदकांड (औपयाजिक) होम व हृदयशूलोद्वासन.
२. वसतीवरीचें ग्रहण, परिहरण आणि स्थापन.
३. सोमोपावहरण. प्रातरनुवाक.
४. सोमाचा 'अभिषव'.
५. उपांशु.
६. अंतर्याम.
७. ऐंद्रवायव.
८. मैत्रावरुण.
९. आश्विन.
१०. शुक्र व मंथी ग्रह सोमरसानें भरून घेणें व ठेवणें.
११. आग्रयण ग्रह सोमरसानें भरून घेणें व ठेवणें.

### पचम प्रपाठक.

१. उक्थ्यग्रह व उक्थ्यग्रहप्रचार.
२. ध्रुवस्थालीग्रहण. होतृचमसामध्यें ध्रुवस्थालींतील सोमरस ओतणें.
३. ऋतुग्रहविधान व ऋतुग्रहप्रचार.
४. ऐंद्राग्नग्रह व शुक्रपात्रांत 'वैश्वदेव'संज्ञक ग्रह भरून घेणें.
५. मरुत्वतीय ग्रह व माहेंद्र ग्रह.
६. आदित्यग्रहप्रचार.
७. सावित्र ग्रह व वैश्वदेव ग्रह.
८. पात्नीवतग्रह. नेष्ट्यानें पत्नीला घेऊन जाणें व पन्नेजनींतील उदकाचा स्राव करणें.
९. हारियोजन ग्रह.
१०. ग्रहांचें प्रशंसन व ग्रहग्रहणाचे वेळीं 'उपयाम' विधान.
११. ग्रह, चमस व स्थाली इत्यादिकांची प्रशंसा व सवनीय पुरोडाश.

### षष्ठ प्रपाठक.

१. दाक्षिणहोम, ब्राह्मणलक्षण व दक्षिणादान.
२. समिष्ट्यजुहोंम.
३. अवभृथयजुहोंम व अवभृथविधि.
४. यूपैकादशिनी.
५. पश्वैकादशिनी.
६. पात्नीवतपशु.
७. सौम्य चरु व मैत्रावरुणी वशा.
८. अतिग्राह्य.
९. अदाभ्य.
१०. अंशु.
११. षोडशी ग्रह आणि षोडशी शस्त्र विधान.

## —सप्तम काण्ड—

### प्रथम प्रपाठक ( सोमभेद काण्ड ).

१. अग्निष्टोमविधान, अग्निष्टोमाचें 'ज्योतिष्टोम' हें पर्यायनाम, अश्व, गर्दभ व अश्वतर (खेचर) यांची उत्पत्ति, चातुर्वर्ण्याची उत्पत्ति, प्रजा किंवा सर्व कामना प्राप्त होण्यासाठीं अग्निष्टोम, अग्निष्टोमाचें विराट् स्वरूप, अग्निष्टोमसंबंधीं प्रजापतीचें कर्तृत्व, अग्निष्टोमाची सृष्टिसाधनरूपता, स्तोमसंख्या, स्तोमांचें स्वरूप, सर्व संस्थांमध्यें अग्निष्टोम संस्थेचें प्राधम्य व अग्निष्टोम यज्ञाचें प्रकृतिरूप.

२. स्तोमांचें मुख्यत्व, त्रिवृदादि स्तोमांची उत्पत्ति, त्यांचें ज्योतिस्त्व, त्यांच्या अनुष्ठानानें मिळणारीं फलें व अग्निष्टोमाचें प्रतिष्ठितत्व.

३. सर्व क्रतूंमध्यें अग्निष्टोमाप्रमाणेंच 'अतिरात्र' क्रतूचें प्राधम्य. अतिरात्राचें विधान व अतिरात्राचें सर्वस्तोमत्व.

४. एकाह, अहीन व द्विरात्रादि क्रतू. 'अंगिरसांनीं' केलेला द्विरात्र क्रतु. त्यासंबंधीं आख्यान व राजानें करावयाचा 'व्युष्टिद्विरात्र' नामक क्रतु.

५. त्रिरात्र, तत्संबंधीं आख्यान, पृथिवीची उत्पत्ति, वराह अवताराची कल्पना, वस्वादि देवसृष्टि, या यागाची सहस्रदक्षिणा व 'सहस्रतमी' गाय.

६. 'सहस्रतमी' गाईची उत्पत्ति, सहस्रतमीची प्रशंसा व तदंगभूत होम.

७. सहस्रतमी ( गाई )चें दान. गर्गत्रिरात्र.

८. अत्रींनीं केलेला 'चतूरात्र'नामक क्रतु. त्यासंबंधीं आख्यायिका व चतूरात्रानें मिळणारें प्रजाप्राप्तिरूप फल.

९. जामदग्न्यांनीं केलेला 'चतूरात्र' याग, त्यासंबंधीं आख्यायिका, चतूरात्रयागाचें 'पुष्टि'रूप फल. जामदग्न्य हा 'पुष्टि'संप्रदायाचा प्रवर्तक. या यज्ञाच्या उपसत् इष्टींतील विशेष.

१०. प्रजेची प्राप्ति करून देणारा पंचरात्र यज्ञ, संवत्सराख्यान, ऋतूंची उत्पत्ति, सभेमध्यें वक्तृत्व प्राप्त होण्यासाठीं हा याग करावयाचें विधान.

अश्वमेधसंबंधी मंत्र ११–२०.

११. अश्वाला रशना ( दोरी ) बांधणें.

१२. अश्वाच्या उजव्या कानांत करावयाचा मंत्रजप व होम.

१३. उद्रावसंज्ञक होम.

१४. धृतिसंज्ञक होम, पूर्वसंज्ञक होम.

१५. पूर्वदीक्षा होम.

१६. पूर्वदीक्षा.

१७. एकविंशिनी दीक्षा.

१८. ऋतुदीक्षा.

१९. अश्वचरित होम.

२०. सावित्रहोम.

( या प्रपाठकांत 'पंचरात्रा'पर्यंत 'अहीन'संज्ञक क्रतू आले आहेत ).

**द्वितीय प्रपाठक.** ( षड्रात्रादि 'अहीन' क्रतू ).

१. षड्रात्र क्रतूचें 'देवसत्रत्व'. अनेक यजमानांनीं मिळून हा क्रतु करावा असा विधि. आग्नीध्रीय व हविर्धान हे दोन मंडप पिंपळाच्या लांकडांनीं बांधावयाचा विशिष्ट विधि. या यज्ञांतील यूपविशेष आणि कालभेदानें अनुष्ठानाचा प्रकार.

२. सप्तरात्र क्रतु. त्यासंबंधीं आख्यायिका. या यज्ञांत येणारे महाव्रतांतील कांहीं विशिष्ट धर्म. सहा दिवस 'बृहत्' व 'रथंतर' हीं सामें नित्य गावयाचा विधि.

३. अष्टरात्र क्रतु आख्यायिकेसह ( आठवा अतिरात्र ).

४. क्षुधेची पीडा निवारण होऊन पुष्कळ धान्य पिकावें म्हणून करावा लागणारा 'नवरात्र' क्रतु. ज्योति, गौ व आयु हीं ३ दिवसांचीं विशिष्ट नांवें. या दिनत्रयाच्या ३ आवृत्तींनीं हा क्रतु सिद्ध होतो. ह्या क्रतूलाच आणखी एक 'शल्ली पिशंग' असें पर्याय नांव.

५. प्रजोत्पादन व पापक्षय करणारा दशरात्र क्रतु. तदंगभूत होम व आख्यायिका. ह्या क्रतूचें 'अभिचारनाश' हेंहि एक फल आहे.

६. 'एकादशरात्र' क्रतूचें विधान. ऋतूंनीं केलेलें 'एकादशरात्र'नामक सत्र.

७. काम्यग्रहांचा अनुष्ठानप्रकार. द्वादशाहाचे समूढ व व्यूढ हे २ प्रकार.

८. समूढ व व्यूढ ह्यांचीं लक्षणें.

९. द्वादशाहांतर्गत एकादशाहापर्यंतचीं विहित कृत्यें. द्वादशाहाचे 'सत्र' व 'अहीन' हे दोन प्रकार.

१०. 'अहीन' द्वादशाहामध्यें पशुसंबंधीं हविःशेषभक्षणाचा व दक्षिणाप्रतिग्रहाचा निषेध. द्वादशाहाच्या शेवटल्या दिवशीं करावयाचा दीक्षाविशेष.

११. समविषम संख्यांनीं अन्नादि पदार्थांचा होम.

१२–२०. ११ व्या अनुवाकांतीलच विषय.

**तृतीय प्रपाठक** ( सत्रें ).

१. द्वादशाहाचा शेषभूत म्हणून दहाव्या दिवशीं करावयाचा विशेष विधि. भूमिस्तव. प्रतिगराचे वेळीं होत्यानें म्हणावयाचा चतुर्होतृसंज्ञक मंत्र.

२. 'अहीन' द्वादशाह क्रतु करणाऱ्याची प्रशंसा व या क्रतूंत आर्त्विज्य करणाराची निंदा.

३. त्रयोदशरात्र.

४. चतुर्दशरात्र.

५. चतुर्दशरात्र ( दुसरा ).

६. पंचदशरात्र.

७. पंचदशरात्र ( दुसरा ).

८. अन्नादत्व प्राप्त होण्यासाठीं 'सप्तदशरात्र'.

९. ब्रह्मवर्चस व अन्नाद्यत्व प्राप्त करून देणारा 'विंशतिरात्र'. तत्संबंधीं आख्यायिका.

१०. एकविंशतिरात्र अश्वमेधसंबंधी.

११. 'आप्ति'नामक होममंत्र.

१२. 'पर्याप्ति'नामक होममंत्र.

१३. 'आभू'नामक होममंत्र.

१४. 'अनुभू'नामक होममंत्र.

१५. 'वैश्वदेव'नामक होममंत्र.

१६. पश्वंगहोममंत्र.

१७ व १८. उपहोम मंत्र.

१९. 'ओषधि'नामक मंत्र.

१०. 'वृक्ष'नामक मंत्र.

**चतुर्थ प्रपाठक.**

१. चतुर्विंशतिरात्र.

२. चतुर्विंशतिरात्र ( दुसरा ), दारिद्र्यमोचन व पापमोचन करणारा.

३. ओषधि व वनस्पति उत्पन्न होण्यासाठीं व अन्नाद्यत्व प्राप्त होण्याकरितां 'त्रिंशद्रात्र'.

४. द्वात्रिंशद्रात्र.

५. त्रयस्त्रिंशद्रात्र.

६. षट्त्रिंशद्रात्र.

७. एकोनपंचाशद्रात्र.

'संवत्सर' सत्र ८–११.

८. दीक्षाकाल ( माघ शुक्ल ११ ).

९. दीक्षा व उपसत्.

१०. 'प्रायणीय' नामक पहिला दिवस.

११. मासगतकृत्यें [ हें देवचक्र होय ].

अश्वमेध संबंधीं मंत्र १२–२२.

१२. अपाव्यहोम.

१३. अपांहोम.

१४. अपांहोम.

१५. शुनप्रहार.

१६. यव्यनामक होम.

१७. गव्यनामक होम.

१८. ब्रह्मोद्य ( प्रश्नोत्तररूपानें ).

१९. मेलेल्या अश्वाकरितां राजपत्न्यांचा विलाप. राजपत्नीचा मृताश्वाशीं समागम.

१०. अश्वाचा ( मरण्यापूर्वीं करावयाचा ) उपचार.

११. अन्नहोमशेष.

१२. प्रमुक्तिनामक होम.

**पंचम प्रपाठक** ( संवत्सरसत्रांतील विशेष ).

१. 'संवत्सर'सत्राचें विधान.

२. दशमासद्वादशमासविकल्प.

३. पृष्ठ्यःपडहाचे 'पृष्ठ्यःपडह' व 'अभिप्लवःपडह' हे दोन प्रकार.

४. उत्तरपक्षामध्यें ( दुसऱ्या सहामाहींत ) अनुष्ठानाचा विशेष प्रकार.

५. परस्परमात्सर्यानें सुरू झालेल्या दोन गवामयनांमधील विशेष.

६. महिन्यामहिन्यास करावा लागणारा कांहीं अनुष्ठानाचा उत्सर्ग व त्याऐवजीं करावयाचें कांहीं अपूर्व अनुष्ठान.

७. तत्संबंधीं विशेष.

८. महाव्रत.

९. सामगायन, दुंदुभिवादन.

१०. 'वीणा'नामक तंतुवाद्य. दासींचें नृत्य.

११. पन्नास ( अन्नहोमाच्या ) आहुती.

१२. अन्नहोमाच्या एकावन्न आहुती.

१३. परिधिमंत्र.

१४. सर्वपृष्ठेष्टि.

१५. सर्वपृष्ठेष्टीसंबंधीं हवींची उत्पत्ति, विधान व प्रयोग. सोमाचा अभिषव करणाऱ्यानें दिग्विजय करावयाचा. दश दिशांच्या अधिपतींचा याग.

१६. रुप्यानें मढविलेला 'महिम'नामक ग्रह.

१७. सुवर्णानें मढविलेला 'महिम'नामक ग्रह.

१८. अन्नहोममंत्र. ब्रह्मवर्चसनामक होम.

१९. अश्वाचें अनुमंत्रण.

२०. अन्नहोमाचे दुसरे मंत्र.

२१. अश्वाला कांहीं रोग वगैरे झाल्यास प्रायश्चित्तार्थ कराव्या लागणाऱ्या इष्टी.

२२. अनुनिर्वाप्य 'मृगारि' इष्टि.

२३. सन्नतिहोम.

२४. यजमानवाचन.

२५. जगदात्मरूपानें अश्वाची स्तुति. विराट्रूपानें अश्वोपासनाप्रतिपादक विधान.

येथें तैत्तिरीय संहितेची अनुवाकवार विस्तृत अनुक्रमणिका संपली. यजुर्वेदांतील विषयांचें प्रास्ताविक वर्णन पूर्ण व्हावयास संहितेप्रमाणें ब्राह्मणाची व आरण्यकाचीहि अनुवाकवार अनुक्रमणिका देणें अवश्य आहे. म्हणून या अनुक्रमणिका पुढें देत आहों.

## —तैत्तिरीय ब्राह्मणाची अनुक्रमणिका—

### प्रथम कांड.

#### प्रथम प्रपाठक.

१. शुक्र व मंथी या ग्रहांच्या प्रचारासंबंधीं मंत्र.

२. ब्राह्मणादि वर्णपरत्वें विशिष्ट नक्षत्रावर व विशिष्ट ऋतूंमध्यें 'अग्न्याधान'कालविचार.

३. संभारप्रक्षेपमंत्र.

४. आयतनपरत्वें अग्नीचें स्थापन. अग्निस्थापनाचा अनुक्रम. यासंबंधीं आख्यायिका.

५. अग्न्याधानसंबंधीं कांहीं विशेष. 'पवमान' हवी.

६. पवमान हवींचा विस्तार, इतर हवी व दक्षिणा.

७. अग्न्याधान( स्थापन )मंत्र.

८. अग्न्याधान मंत्रांचें ब्राह्मण.

९. ब्रह्मौदन( चरु )संबंधीं विधान.

१०. 'पंचाग्न्याधान' विधान.

#### द्वितीय प्रपाठक.

१. आधानोपयुक्त मंत्र.

२. (गवामयनांतील विशेष). 'विषुवत्' नामक मुख्य दिवस व त्याच्या मागचे पुढचे ४१४ दिवस.

३. विषुवत् ( मध्यम ) दिवशीं घ्यावयाचे अतिग्राह्य.

४. 'दिवाकीर्त्य' नामक सामें.

५. पशूंसंबंधीं संख्या व विधान ( वैष्णवादि ९ पशू ).

६. महाव्रत. अध्वर्युप्रभृति ऋत्विजांचें सामगायन. ब्राह्मण व शूद्र यांमधील कलह.

#### तृतीय प्रपाठक.

१. पुनराधानसंबंधीं आज्यभागाविषयीं विशेष विधान सांगण्यासाठीं एक आख्यायिका.

'वाजपेय' ब्राह्मण २–९.

२. 'वाजपेय'विधान.

३. अतिग्राह्यादि विशिष्ट ग्रह.

४. ऋतुपशु व प्राजापत्यपशु विधान.

५. सावित्रहोम. रथसंबंधीं मंत्र.

६. रथारोहण. दुंदुभिवादन.

७. तार्प्य( तुपांत भिजविलेलें वस्त्र )वस्त्रपरिधान. वाजप्रसवीय होम. यूपारोहण.

८. अन्नहोम. अभिषेक.

९. उज्जिति मंत्र. अतिग्राह्य मंत्र.

१०. पिंडपितृयज्ञविधि.

### चतुर्थ प्रपाठक.

१. ग्रहग्रहणविधान, उपांशुग्रहहोम, इतर ग्रहांचें विधान आणि मृन्मय पात्रें व लांकडी पात्रें यांची उत्पत्ति.

२. 'सौत्रामणि'शेषभूत मंत्र.

३. अग्निहोत्र( होम )विषयक प्रायश्चित्तें (दोहाविषयीं).

४. अग्निहोत्रहोमसंबंधीं (अग्निविषयक) प्रायश्चित्तें.

५. सोमयागांतर्गत प्रातःसवनादि सवनत्रयगत सोमातिरेकप्रायश्चित्त.

६. एकाच गांवांत अनेक सोमयाग होत असतांना करावयाचे कांहीं विशिष्ट विधी. 'सत्रा'संबंधीं कांहीं विशेष. कोणी मृत झाल्यास पुढील तजवीज.

७. यूपाला पुन्हां अंकुर वगैरे फुटले, अग्नी विझले, अशा प्रकारच्या कांहीं दोषांचीं प्रायश्चित्तें.

८. आत्मशुद्धतेचे मंत्र (पवमान).

९. राजसूयांतर्गत 'चातुर्मास्य'यागशेष आख्यायिकेसह.

१०. चातुर्मास्यसंबंधीं विशेष विधि.

### पंचम प्रपाठक.

१. विकृतिरूप चयनांत उपयुक्त असे नक्षत्रेष्टकोपधान मंत्र.

२. कर्मानुष्ठानाकरितां पुण्यकालनिर्णय, देवनक्षत्रें व यमनक्षत्रें.

३. दिवसविभागपरत्वें पुण्यकालनिर्णय. प्रातःसंगवादि कालविभाग.

४. सोमग्रहणसाधनभूत पात्रांची प्रजापतीपासून उत्पत्ति.

५. चातुर्मास्यशेषभूत वपनमंत्र.

६. वपनाचा विधि.

७. अग्निचयनशेषभूत इष्टकोपधान मंत्र.

८. 'अथर्वशिर'नामक इष्टकांच्या उपधानाचे मंत्र.

९. सोमशेषभूत दीक्षा, प्रायणीया, आतिथ्या, उपसत् आणि बहिष्पवमानोपक्रम.

१०. सोमांगभूत त्रिवृदादि स्तोमांचीं रूपें.

११. सवनीयपशुपुरोडाश.

१२. सात छंदांचा विचार व छंदांची रथाकारता.

### षष्ठ प्रपाठक.

१. अनुमत्यादि इष्टी, नैर्ऋतयाग.

२. चातुर्मास्यांतर्गत वैश्वदेवपर्वसंबंधीं हवी.

३. वैश्वदेवपर्वशेष.

४. वरुणप्रघासपर्वसंबंधीं हवी.

५. वरुणप्रघासशेष.

६. अनीकवती, सांतपना व गृहमेधीया इष्टी.

७. क्रीडिनेष्टि.

८. महापितृयज्ञ.

९. महापितृयज्ञाचा अनुष्ठानप्रकार.

१०. 'त्र्यंबक' व 'आदित्य' याग.

### सप्तम प्रपाठक.

१. 'शुनासीरीय' पर्व. इंद्रतुरीय याग. पंचावत्तीय व अपामार्ग होम.

२. 'देविका' संज्ञक हवि.

३. 'रत्नि' नामक हवि.

४. देवसुहवि.

५. जलाहरण.

६. जलसंस्कार.

७. दिग्विजयध्यान.

८. अभिषेक.

९. रथारोहण.

१०. यजमानाचें सर्वसेव्यत्व.

### अष्टम प्रपाठक.

१. 'राजसूय'यागसंबंधीं 'संसृप'संज्ञक हवि.

२. दशपेय याग.

३. आवेष्टिसंज्ञक आहुति.

४. 'प्रयुज'संज्ञक हवि.

५. सौत्रामणि.

६. सौत्रामणिशेष.

७. पवित्र दिवस.

८. साम व मंत्र यांनीं अभिषेक.

९. अभिषेकविधिशेष.

१०. द्विरात्र ऋतु.

## —द्वितीय काण्ड—

### प्रथम प्रपाठक.

१. अग्निहोत्रहोमप्रशंसा, आख्यायिकेसह.

२. अग्निहोत्रहोमविधि.

३. अग्निहोत्रहोमसंबंधीं अधिश्रयणादि हविःसंस्कार.

४. हविःसंस्कार.

५. अग्निहोत्रसंबंधीं काम्य द्रव्यें व अवशिष्ट अंगविधी.

६. अभ्युद्रवण व होमाभावप्रतीकार.

७. अवस्थाभेदानें हविःपदार्थांचें सर्वदेवताप्रियत्व.

८. दोहनप्रकार.

९. अग्निहोत्रहोममंत्र.

१०. अग्नीच्या भिन्नभिन्न अवस्थांमध्यें होम केल्याचीं फलें.

११. कालभेदानें अग्नीचें परिषेचन.

## द्वितीय प्रपाठक.

१. प्रजाप्राप्त्यर्थ व अभिचारार्थ (क्रत्वर्थ व पुरुषार्थासाठीं) 'दशहोतृ'संज्ञक मंत्राचें हवन.

२. क्रत्वर्थ 'चतुर्होत्रादि' होतृमंत्रांचे होम. देवपत्न्याख्य मंत्रांचें विधान.

३. यजनकालविचार, चतुर्होतृ मंत्राचें हवन (प्रजाप्राप्त्यर्थ). स्वर्गलोकप्राप्तीसाठीं पंचहोतृसंज्ञक मंत्राचें हवन.

४. जगत्सृष्टिकथनाच्या मिषानें 'होतृमंत्र'प्रशंसा.

५. दक्षिणाप्रतिग्रहमंत्रानुवाक.

६. द्वादशाहक्रत्वंतर्गत दशमदिवशीं होतृमंत्रविधानांगभूत 'सर्पराज्ञि'संज्ञक मंत्रांनीं स्तवन.

७. काम्यफलसाधनभूत 'सप्तहोतृ' संज्ञक मंत्रांची प्रशंसा.

८. होतृमंत्रांचें सोमयागांगत्व.

९. सृष्टि निर्माण होण्यापूर्वी काय होतें ? सृष्टीची रचना.

१०. देवसृष्टीमध्यें इंद्राचें देवताधिपत्व.

११. होतृमंत्रांचे पुरुषार्थरूप कांहीं प्रयोग.

## तृतीय प्रपाठक.

१. सर्व 'होतृ'संज्ञक मंत्रांनां 'चतुर्होतृ' ही संज्ञा.

२. दक्षिणाप्रतिग्रहासंबंधीं कांहीं विशिष्ट विधी. होतृमंत्रांचे कांहीं नैमित्तिक विधी.

३. केशनिवर्तनविषयक ध्यानविशेष.

४. प्रतिग्रहमंत्रसंबंधीं अर्थज्ञानाची आवश्यकता.

५. द्वादशाहगत दशरात्र क्रतूच्या दहाव्या दिवशीं अध्वर्युप्रभृति ऋत्विज व यजमान यांच्यामध्यें होणारीं प्रश्नोत्तरें.

६. होतृमंत्रप्रशंसेसाठीं अग्निहोत्रादि कर्मांनीं प्रजापतीचें शरीर निर्माण झाल्याची हकीकत. कर्मविशेषानें ऋत्विग्विशेष.

७. अग्निहोत्र होमामध्यें सर्व क्रतूंचा अंतर्भाव होत असल्याबद्दलची प्रशंसा. प्रजापतिशरीररक्षक होतृमंत्र.

८. होतृमंत्रसामर्थ्यप्रशंसन. आसुर सृष्टीचें वर्णन. पितृसृष्टि, मनुष्यसृष्टि व देवसृष्टि.

९. होतृमंत्रांची 'वायु'रूपानें उपासना व तिचें फल.

१०. होतृमंत्रांचा एक काम्यप्रयोग उपाख्यानासह.

११. दशहोत्रादि मंत्रांनां 'दशहोता' इत्यादि नांवें पडण्याचीं कारणें.

## चतुर्थ प्रपाठक.

१. सार्तांग्नीच्या उपस्थानाचा मंत्र. वैमृधेष्टीच्या स्विष्टकृताची पुरोनुवाक्या. इंद्रदेवताक पशुयागांतील वपाहोमाची याज्या. तंतुमतीष्टीच्या स्विष्टकृताची याज्या. काम्येष्टीपैकीं अग्निदेवतेची वैकल्पिक याज्या. वृषोत्सर्गोपयुक्त पुरोनुवाक्या. इ.

२. अभिचारासाठीं केल्या जाणाऱ्या इष्टींमध्यें उपयोगांत आणावयाचे उपहोममंत्र १–९. आत्मरक्षणमंत्र १०. अग्निदेवतात्मक कर्मांत उपयुक्त करावयाचे मंत्र ११–१२. मंथनानें उत्पन्न केलेल्या अग्नीचें आहवनीयांत मिश्रण करावयाचा मंत्र १३. अग्निहोत्रविच्छेददोषपरिहारार्थ करावयाच्या तंतुमतीष्टीच्या याज्यापुरोनुवाक्या १४–१५. बंधनमुक्ततेसाठीं मंत्र १६. अग्न्युपस्थानांग मुखमार्जन मंत्र १७. 'इंद्राणी' देवतेच्या याज्यापुरोनुवाक्या १८–१९. वेढ्यांत सांपडल्यास अथवा वेढ्यांत सांपडण्याचा संभव असल्यास करावयाच्या 'इंद्रःसुत्रामा'–देवताक इष्टीच्या उपहोमाचे मंत्र.

३. आत्म (पुत्र)रक्षणार्थ मंत्र १. अंगहीन पशूच्या उपाकरणदोषनिबर्हणाकरितां प्रायश्चित्तोपयोगी मंत्र २. 'सरस्वती'देवताकपशुयागांतील पुरोनुवाक्या ३. यजमानानें युक्तस्थलीं जपावयाचा मंत्र ४. जयप्राप्त्यर्थ इंद्रदेवतात्मक यागाच्या याज्यापुरोनुवाक्या ५–६. मंथनजन्य अग्नीचें अभिमंत्रण करावयाचा मंत्र ७. दीक्षणीयेष्टीच्या याज्यापुरोनुवाक्या ८–९. 'विष्णु'देवतोद्देशानें करावयाच्या पशुयागांतील याज्यापुरोनुवाक्या १०–१३. आतिथ्येष्टीच्या स्विष्टकृताची पुरोनुवाक्या १४. इंद्रदेवतेच्या याज्यापुरोनुवाक्या १५–१६. आश्विनदेवतेच्या याज्यापुरोनुवाक्या १७–१८. रोगमुक्तीसाठीं 'सौम्य'देवतोद्देशानें करावयाच्या पशुयागाच्या याज्यापुरोनुवाक्या १९–२०. 'विष्णु'देवतेसाठीं जपावयाचा मंत्र २१. 'विष्णु'देवताक यागांत उपहोमासाठीं योजावयाचे मंत्र २१, २२ व २३. प्रातःसवनांतील उन्नीयमानसूक्तांत अंतर्भूत करावयाचा मंत्र २४. उपहोमकालीं किंवा 'विहृतषोडशी'–नामक स्तोत्रांत (सामांत) अंतर्भूत होणारा मंत्र २५. 'सौत्रामणि'संबंधीं 'ऐंद्र'पशूच्या यागाची पुरोनुवाक्या २६. माध्यंदिनसवनामधील शुक्रामंथिप्रचारापूर्वीच्या प्रस्थित याज्या २७–३१. आश्विन ग्रहाची पुरोनुवाक्या ३२. आश्विनदेवतेच्या वैकल्पिक याज्या ३३–३४.

४. श्वेतकुष्ठरोगनिवारणाकरितां सेवन करावयाच्या ओषधीच्या अभिमंत्रणाचे मंत्र १–५. विजयप्राप्त्यर्थ 'इंद्र'देवतोद्देशानें करण्याच्या इष्टींतील 'उपहोम' मंत्र ६. 'मरुत्'देवांच्या इष्टीच्या याज्यापुरोनुवाक्या ७–८. विजयार्थ करावयाच्या 'आग्नेय'यागास उपयुक्त मंत्र ९–१०. 'संज्ञान्या'नामक इष्टीमध्यें उपयोगांत आणावयाचे मंत्र ११–१५ 'आग्नेय'देवतोपयोगी मंत्र १६. 'सविता'देवासाठीं मंत्र १७. 'इंद्र'देवतेसाठीं मंत्र १८–१९. पापक्षालनार्थ करावयाच्या कर्मामध्यें उपयोगांत आणावयाचे मंत्र २०–२५.

५. इंद्रदेवताक अशा सौमिक कर्मांत उपयोगी पडणारे मंत्र १–६. महापितृयज्ञसंबंधीं या०पुरो० ७–८. वृष्टीसाठीं मित्रावरुणदेवतात्मक यागांत उपयोगी मंत्र ९–१०. 'सूर्य'-देवतोपयोगी मंत्र ११–१२. 'पर्जन्य'देवोपयोगी मंत्र १३–१६. 'अग्नि'देवोपयोगी मंत्र १७. 'शुनासीर'देवतोपयुक्त मंत्र १८–१९. सुत्याहाचे रात्रीं 'सद'मंडपाला अभिमर्शन

करण्याचा मंत्र २०. 'इंद्राग्नी' देवतेच्या यागांत उपयोगी पडणारे मंत्र २१–२२.

६. सारस्वती( मेषी )यागोपयुक्त याज्यापुरोनुवाक्या १–२. 'विष्णु'देवतात्मकयागोपयुक्त मंत्र ३–४. दारिद्र्यनाशार्थ 'आग्नेय'यागोपयुक्त मंत्र ५. 'सूर्य' देवताक मंत्र ६. मरुत्-देवताक मंत्र ७. सवितृदेवताक मंत्र ८–९. बृहस्पति देवतेचा मंत्र १०. 'मैत्रावरुण' शस्त्रांत अंतर्भूत करावयाचा मंत्र ११. बृहस्पतिदेवताककर्मोपयुक्त मंत्र १२. कन्यालाभार्थ जपावयाचे मंत्र १३–१४. कन्यारूप दक्षिणेच्या प्रतिग्रहाचे मंत्र १५–२०. वैश्वानरदेवतात्मक कर्मांत उपयोगी मंत्र २१–२२. 'लोकेष्टी'च्या याज्यापुरोनुवाक्या २३–२४. 'ब्रह्मा'देवतात्मक पशुयागांत उपहोमार्थ उपयोगी पडणारे मंत्र २५–२६. दुःस्वप्ननाशार्थहवनोपयुक्त मंत्र २७–२८. 'वाक्'देवतोद्देशानें पशुयाग करतेवेळीं उपयोगांत आणावयाचे मंत्र २९–३२. 'स्नुषाश्वशुरीय' इष्टीच्या याज्यापुरोनुवाक्या ३३–३४. 'आग्नेय' कर्मोपयुक्त मंत्र ३५.

७. आसादन केलेल्या ग्राव्यांच्या अभिमंत्रणाचा मंत्र १. कांहीं एका कर्मांत यजमानानें अभिमंत्रणार्थ उपयोगांत आणावयाचा मंत्र २. आशीर्वादोपयुक्त मंत्र ३. 'इंद्र'देवताक पशुयागामध्यें उपहोमासाठीं उपयुक्त असे मंत्र ४–७. विजयप्राप्त्यर्थ 'इंद्र'देवताककर्मोपयोगी मंत्र ८–९. 'आग्नेय'कर्मोपयोगी मंत्र १०–११. 'इंद्र'देवताककर्मोपयुक्त मंत्र १२–१४. जप करावयाचा मंत्र १५. प्रउगशस्त्रांत उपयोगी पडणाऱ्या ऋचा १६–१७. राजपुरोहितानें राजाला आशीर्वाद द्यावयाचे मंत्र १८–२२. स्वर्गसत्रांतर्गत 'दिवःश्येन' यागांतील 'अग्निर्वलिमान्' देवतेच्या याज्यापुरोनुवाक्या २३–२४. आग्नेयदेवतोपयुक्त मंत्र २५. 'ब्रह्मा' देवतेसाठीं ( ऋषभ )पशुयागांत उपयोगी पडणारे मंत्र २६–२७. यूपोपस्थान मंत्र २८. 'आग्नेय'कर्मोपयोगी मंत्र २९–३०.

८. आग्रयणेष्टीच्या धाय्या, याज्यापुरोनुवाक्या व आग्रयणांत इतर ठिकाणीं उपयोगी पडणारे मंत्र १–२१.

### पंचम प्रपाठक.

१. 'प्राण'देवतोपयुक्त मंत्र १–२. 'मन'देवतोपयुक्त मंत्र ३–४. वाग्देवतोपयोगी मंत्र ५–६. 'चक्षु'देवतोपयोगी मंत्र ७–८. 'श्रोत्र'देवतोपयोगी मंत्र ९–१०. बौधायनानें या दहा मंत्रांचा विनियोग जातकर्मामध्यें दहीं, मध व तूप यांचें मिश्रण सोन्याच्या 'चमच्यानें' मुलास प्राशन करविण्याकडे केला आहे.

२. अश्वमेधयागामध्यें 'अश्वाला' पाण्यामधून बाहेर काढावयाचे मंत्र १–८. अग्निदेवतोपयोगी मंत्र ९–१०. बौधायनानें या मंत्रांचा विनियोग विवाहांत केला आहे.

३. हरवलेलें द्रव्य सांपडण्यासाठीं 'इंद्र'देवतेसाठीं करावयाच्या कर्मांत उपयोगी पडणारे मंत्र १–२. पूर्वोक्त कर्मांत उपहोमार्थ लागणारा मंत्र ३. श्रौत कर्मांचा आरंभ करतांना संकल्पामध्यें उपयुक्त होणारे मंत्र ४–६. 'प्रायणीये'च्या स्विष्टकृताची पुरोनुवाक्या ७. पशूच्या संज्ञपनाच्या वेळीं यजमानानें जपावयाचे मंत्र अथवा 'दिवःश्येन'संज्ञक इष्टींमध्यें 'आशा'-देवतेच्या याज्यापुरोनुवाक्या ७–९. 'मित्रविंदा'नामक इष्टीच्या याज्यापुरोनुवाक्या १०–११.

४. 'इंद्र'देवतोपयुक्त मंत्र १–२. निष्केवल्य शस्त्रांत अंतर्भूत होणाऱ्या ऋचा ३–८. ब्राह्मणाच्या उजव्या हातावर करावयाच्या होमाचा मंत्र ९. अग्निदेवतोपयोगी मंत्र ९–११. 'अश्विनौ' व 'पूषा'देवतात्मक यागाच्या याज्यापुरोनुवाक्या १२–१३. 'सरस्वती सत्यवाक्' देवतेच्या याज्यापुरोनुवाक्या १४–१५.

५. 'दिवःश्येनी'नामक इष्टींमधील 'यज्ञ'देवतेच्या याज्यापुरोनुवाक्या १–२. 'भग'देवतोपयोगी याज्यापुरोनुवाक्या ३–४. 'प्रजापति'देवतोपयुक्त मंत्र ५. 'उषा'देव्युपयुक्त मंत्र ६–७. 'मरुत्'देवतोपयुक्तमंत्र ८–९. 'विष्णु'देवोपयुक्त मंत्र १०–११. 'बृहस्पति'देवताक श्वेतवर्ण पशुयागाच्या याज्यापुरोनुवाक्या १२–१३. 'पूषा' देवतेच्या याज्यापुरोनुवाक्या १४–१५. अरण्यवासी तपस्व्यांनीं आत्मरक्षणार्थ जपावयाचे मंत्र १६–२१.

६. 'इंद्र'देवतोपयुक्त याज्यापुरोनुवाक्या १–२. जातकर्मामध्यें मुलाला स्नान घालावयाचे मंत्र ३–७. 'बृहस्पतिसव' यागामध्यें यजमानाला अभिषेक करावयाचा मंत्र ८. 'इंद्र'-देवतोपयुक्तमंत्र ९. 'ओषधि'देवतेच्या याज्यापुरोनुवाक्या १०–११. 'दिवःश्येनी' नामक इष्टींमधील 'अनुवित्ति' देवतेच्या याज्यापुरोनुवाक्या १२–१३. 'उषा'देव्युपयुक्त मंत्र १४.

७. 'सावित्र'काठक चितींमध्यें होमोपयुक्त मंत्र १. आग्रयणामध्यें 'उपहोम' करण्याकडे विनियुक्त मंत्र २. हारियोजन यागानंतर यज्ञपुच्छामध्यें ( उपसंहारामध्यें ) उपयोगी पडणारा मंत्र ३. 'आयुष्कामेष्टी'मध्यें 'कुंडल' धारण करण्याचा मंत्र ४. सूत्रांतरांत विनियुक्त असलेले मंत्र ५–७. 'मित्रविंदा'-नामक इष्टींतील उपहोमांचे मंत्र ८–१७.

८. माध्यंदिनसवनांतील प्रस्थितयाज्येमध्यें अंतर्भूत होणारा मंत्र १. 'इंद्र'देवतोपयोगी मंत्र २–३. 'इंद्रःशुनासीर' देवतेच्या पुरोनुवाक्या (२) व याज्या (१) ४–६. सोमक्रयानंतर आपल्या मांडीवरील वस्त्र बाजूस करतेवेळीं यजमानानें म्हणावयाचा मंत्र ७. एका सोमयाग विकृतीमध्यें उपयोगांत आणावयाचा मंत्र ८. नेत्ररोगपरिहारार्थ जपावयाचा मंत्र ९. ब्रह्म्याच्या मांडीवर 'सोमराजा' ठेवण्याचा मंत्र १०. प्रवर्ग्यामध्यें होत्यानें उपयुक्त करावयाचा मंत्र ११. 'अब्देवतो'पयोगी मंत्र १२–१४. (१४) या मंत्राचा उपयोग अवभृथेष्टीच्या दुसऱ्या आज्यभागाकडेहि होतो. दर्शपूर्णमासयाजमानोपयुक्त मंत्र १५–१६. 'फल'संज्ञक चमसाच्या हवनांत उपयोगी पडणारा मंत्र १७. अभ्युपस्थानमंत्र १८. अरणींच्या ठिकाणीं अग्नीचा समारोप करण्याचा मंत्र १९. आत्मसमारोप करण्याचा मंत्र २०. समारोप केलेल्या अरणींमधून पुन्हां अग्निनिष्पादन करण्याचा मंत्र २१. 'इंद्र'देवतोपयोगी मंत्र २२. 'इंद्र'देवतात्मककर्मांत उपयोगी पडणारे मंत्र २२–२७. (२२) हा मंत्र 'षोडशी'नामक शस्त्रांतहि अंतर्भूत करावयाचा असतो. उत्तरवेदीवर अग्नि स्थापन करण्याचे मंत्र २८–२९. 'शुनासीर'-गुणविशिष्ट'इंद्र'देवतात्मक यागांत उपयुक्त होणारे मंत्र ३०–३२.

### षष्ठ प्रपाठक.

१. अंकुरित झालेलें साळीचें भात म्हणजे 'तोक्म'होय. थोडे भाजलेले सातू भरडून त्यांचें थोडेंसें जाड व पुष्कळसें बारीक असें दोन तऱ्हेचें पीठ करावयाचें; बारीक पीठ ताकांत कालवून दर्भानीं झांकून ठेवलें म्हणजे आंवतें तें 'मासर' आणि जाड पीठ मन्थामध्यें कालवून दर्भानीं झांकून ठेवलें म्हणजे तें 'नग्नहु' होय. तोक्म, मासर व नग्नहु हे तीन पदार्थ सुरेमध्यें मिश्रण करावयाचा मंत्र १. साव्यांचें पीठ सुरेवर विखरल्यानंतर त्यावर दुधाचा परिषेक करण्याचा मंत्र २. प्यालेला सोमरस ओकून पडल्यामुळें कराव्या लागणाऱ्या सौत्रामणि यागामध्यें पयोग्रह-संबंधीं दुधाचें अभिमंत्रण करावयाचा मंत्र ३. सुराग्रह मंत्र ४. पयोग्रह व सुराग्रह यांच्या याज्यापुरोनुवाक्या, उपस्थानमंत्र वगैरे.

२. उपस्थानमंत्र १–५

३. पयोग्रहाच्या होमाचा व सुराग्रहहोमाचा मंत्र, ग्रहांतील सोम पिण्याचे मंत्र, पितरांच्या उद्देशानें पयःशेष भूमीवर देण्याचे मंत्र, उपस्थान मंत्र, पितरांच्या उद्देशानें आहुती द्याव-याचे मंत्र व हविःशेषभक्षण मंत्र.

४. पशूचे खुर व खुरांच्या शेजारचे उपखुर शिजलेल्या मांसरसांत बुचकळून उपहोमसंज्ञक आहुती द्यावयाचे मंत्र.

५. हवनशेषभूत आज्यानें यजमानास अभिषेक करा-वयाचा विधि.

६. अवभृथांगभूत पांच आहुती, अवभृथाभिमंत्रण, स्नानविधि, उपस्थान, समिदाधान व उपस्थान यांचे मंत्र.

[ पूर्वींच्या १ ते ६ पर्यंतच्या अनुवाकांत सौत्रामणीचें आध्वर्यव सांगितलें. आतां येथून सौत्रामणीचें हौत्र सांगतात ].

७. 'कौकिल' सौत्रामणीच्या प्रयाजांचे मैत्रावरुणानें म्हणा-वयाचे प्रैष ११.

८. प्रयाजांच्या पुरोनुवाक्यांचे मंत्र ११

९. 'इंद्र'देवताक पशुसंबंधीं वपा, पुरोडाश व अंगयाग यांच्या याज्यापुरोनुवाक्या.

१०. अनूयाजसंबंधीं मैत्रावरुणाचे प्रैष ११.

११. आश्विन, सारस्वत व ऐंद्र या तीन प्रधान पशूंच्या प्रयाजांचे मैत्रावरुण प्रैष १२.

१२. प्रयाजांच्या याज्या (आप्री) १२.

१३. वपा, पुरोडाश व अंगें यांच्या याज्यापुरोनुवाक्या.

१४. अनूयाजांचे मैत्रावरुण प्रैष ११.

१५. सूक्तवाक प्रैष.

१६. पितृयज्ञविषयक मंत्र.

१७. सूत्रांत सांगितलेल्या 'इंद्रवयोधस्'देवतात्मक पशु-यागाच्या प्रयाजांचे मैत्रावरुणानें म्हणावयाचे प्रैष ११.

१८. पूर्वोक्त ऐंद्र पशूच्या प्रयाजांच्या (आप्री) याज्या ११.

१९. पूर्वोक्त पशूच्या वपा, पुरोडाश व अंगें यांच्या याज्या-पुरोनुवाक्या.



२०. पूर्वोक्त पशूच्या अनूयाजांचे मैत्रावरुण प्रैष ११.

### सप्तम प्रपाठक.

१. (एकाहक्रतु). 'बृहस्पतिसव'नामक क्रतूचें विधान. पृष्ठस्तोत्र नियम. बृहस्पतिसवाच्या अनुष्ठानांतील विशेष. पौरो-हित्यासाठीं हा यज्ञ करावा.

२. पुष्टिकाम अशा वैश्यानें करावयाचा 'वैश्यसव' यज्ञ. वैश्यसवाच्या देवता, हविर्द्रव्यें वगैरे.

३. ब्रह्मवर्चसप्राप्त्यर्थ ब्राह्मणानें करावयाचा 'ब्राह्मणसव' यज्ञ, त्याच्या देवता, त्याचे हविःपदार्थ आणि अभिषेक.

४. पशुयागरूप 'सोमसव' क्रतु.

५. 'पृथि'सवात्मक विधि.

६. 'गो'सव, गोसवमाहात्म्य, अनुष्ठानविशेष व अभिषेक.

७. 'ओदनसव', अन्नाद्यत्वप्राप्ति, ओदनसवाचा काल, ओदनसवाचा अनुष्ठानविशेष, होमाचे मंत्र वगैरे.

८. ओदनसवांगभूत रथारोहण करावयाचे मंत्र.

९. ओदनसवाचें विधान व त्यांतील विशेष गोष्टी. अभिषेक.

१०. पांच शरदृतूंत मिळून पांच वर्षें करावयाचा 'पंचशारदीय' विधि.

११. 'पंचशारदीय' क्रतूसंबंधानें 'साम'विशेष व पशुविशेष इ.

१२. 'अग्निष्टुत्'क्रतूसंबंधानें ग्रहग्रहण करावयाच्या वेळीं म्हणावयाच्या पुरोनुवाक्या.

१३. 'इंद्रस्तुत्'यागामध्यें ग्रह ग्रहण करतेवेळच्या पुरोनु-वाक्या.

१४. 'आप्तोर्याम'क्रतूचें विधान. तत्संबंधीं आख्यायिका.

१५. राजाला करावयाचा अभिषेक व त्याचा विधि.

१६. राज्याभिषेकांगभूत रथारोहणविधान.

१७. राज्याभिषेकांगभूत 'वपन'विधि.

१८. 'विघन'नामक एक दिवसांत करावयाचा यज्ञ. 'विघन' शब्दाचा अर्थ.

### अष्टम प्रपाठक.

(काम्य पशूसंबंधीं वपा, पुरोडाश व अंगांच्या याज्यापुरोनुवाक्या)

१. 'वायव्य' 'प्राजापत्य' 'सोमापौष्ण' व 'वारुण' पशूं-संबंधीं वपा, पुरोडाश व अंग यागाच्या याज्यापुरोनुवाक्या. 'आदित्य' पशूच्या याज्यापुरोनुवाक्या.

२. 'आदित्य'देवताक पशूच्या याज्यापुरोनुवाक्या. आग्नेयी, ऐंद्री व बार्हस्पत्या या मेंढ्यांच्या यागाच्या व 'सारस्वत' संबंधी मेषयागाच्या याज्यापुरोनुवाक्या.

३. आग्नेय व सौम्य पशुयागाच्या, 'वैष्णव' पशुयागाच्या, 'इंद्रमन्युमान्' पशूच्या, 'इंद्रमरुत्वत्' व 'इंद्रवृत्रतुर' देवतात्मक पशूंच्या याज्यापुरोनुवाक्या.

४. 'इंद्रोभिमातिहा', 'इंद्रोवज्री', 'विष्णूवरुण', 'द्यावा-पृथिवी' व 'ओषधि' देवतात्मक पशूंच्या याज्यापुरोनुवाक्या.

५. 'ऐंद्राग्न' 'ब्राह्मणस्पत्य' 'पूषा' 'मरुत्' व 'ऐंद्र' देवताक पशुयागांच्या याज्यापुरोनुवाक्या.

६. 'सविता' 'विश्वेदेव' 'मित्रावरुण' 'रौद्री' देवताक पशूंच्या याज्यापुरोनुवाक्या.

७. सूर्य, त्वष्टा, मित्र, आश्विन व अग्नीषोम देवतात्मक पशूंच्या याज्यापुरोनुवाक्या.

८. 'अन्नदेवता' 'वाग्देवी' 'श्रद्धादेवी' व 'ब्रह्म' देवतात्मक पशुयागांच्या याज्यापुरोनुवाक्या व उपहोम मंत्र.

९. सूर्य, चंद्र व आपदेवताक पशूंच्या याज्यापुरोनुवाक्या. उपहोम व 'भग' देवतात्मक पशूंच्या याज्यापुरोनुवाक्या.

## —तृतीय काण्ड—

### प्रथम प्रपाठक.

१. कृत्तिका, रोहिणी, मृगशीर्ष, आर्द्रा, पुनर्वसू, तिष्य (पुष्य), आश्लेषा, मघा, पूर्वा (फल्गुनी), उत्तरा (फल्गुनी), हस्त, चित्रा, स्वाती (निष्ट्या), विशाखा व पौर्णिमा देवतांच्या याज्यापुरोनुवाक्यांचे मंत्र (नक्षत्रसत्रयाग).

२. अनुराधा, ज्येष्ठा, मूल, पूर्वा (अषाढा), उत्तरा (अषाढा), अभिजित्, श्रोणा (श्रवण), श्रविष्ठा (धनिष्ठा), शतभिषक् (शततारका), प्रोष्ठपदा (पूर्वाभाद्रपदा), उत्तरा भाद्रपदा, रेवती, अश्विनी, भरणी इत्यादि नक्षत्रदेवता आणि अमावास्येची देवता यांच्या याज्यापुरोनुवाक्या.

३. चंद्रमा, अहोरात्र, उषा, नक्षत्रचरु, सौर्यचरु, आदित्यचरु व वैष्णवचरु यांच्या आणि आग्नेय व अनुमति या संचारदेवतांच्या याज्यापुरोनुवाक्या.

४. कृत्तिकादि देवनक्षत्रें व पौर्णिमा इत्यादिकांच्या इष्टींचीं विधानें व उपहोम वगैरे.

५. अनुराधादि यमनक्षत्रांच्या व अमावास्या यांच्या इष्टींचीं विधानें व अनुक्रमें उपहोम वगैरे.

६. चंद्रमसप्रभृति अनुमत्यंत देवतांच्या इष्टींचीं विधानें व उपहोम.

### द्वितीय प्रपाठक (दर्शपूर्णमास ब्राह्मण).

१. शाखाहरण व वत्सापाकरण.

२. बर्हिराहरण.

३. सान्नाय्यसंबंधीं सायंदोह.

४. संतति, प्रणीताप्रणयन व हविर्निर्वाप.

५. हविःप्रोक्षण, कंडण व त्रिष्फलीकरण.

६. हविःपेषण (वाटणें).

७. कपालोपधान.

८. पुरोडाशकरण, श्रपण व आप्यनिनयन.

९. स्तंबयजुर्हरण, वेदीकरण, पूर्वोत्तरपरिग्रह व प्रोक्षणीसंस्कार.

१०. इध्माबर्हिरासादन इत्यादि विधींचें ब्राह्मण.

### तृतीय प्रपाठक.

१. स्रुचांचा संमार्ग.

२. संमार्गदर्भप्रहरण.

३. पत्नीसन्नहन व आज्यावेक्षण.

४. आज्यासादन, अवलोकन व उत्पवन.

५. जुह्वादि चांमध्यें आज्यग्रहण.

६. प्रोक्षणी उचलणें, इध्माबर्हि व वेदी यांचें प्रोक्षण, बर्हिरास्तरण, परिधिपरिदान व स्रुच्यांचें आसादन.

७. परिधींचा व अग्नीचा संमार्ग, स्रुवाधार, स्रुच्याधार व ध्रुवादि समंजन.

८. इडोपाह्वान, चतुर्धाकरण, संमार्ग, सूक्तवाक व शंयुवाक.

९. स्रुग्व्यूहन, प्रस्तरप्रहरण, सस्स्राव, इध्मप्रव्रश्चन व फलीकरण होम व वेदतृणप्रतिपत्ति.

१०. पूर्णपात्रनिनयन.

११. उपवेषनिरसन.

### चतुर्थ प्रपाठक (पुरुषमेधप्रकरण).

१ पासून १९ अनुवाक अंखेर 'ब्रह्म'देवताप्रभृतींच्या उद्देशानें ब्राह्मणादि जातींच्या पुरुषांच्या उपाकरणाचें विधान. पुरुषमेधांतील निरनिराळ्या देवता व त्यांनां अर्पण करावयाचे पशू यांची यादी पुढें निराळी दिली आहे.

### पंचम प्रपाठक. (दर्शपूर्णमासादि इष्टींचें हौत्र).

१. होत्याचा जप.

२. सामिधेनी.

३. देवताह्वान.

४. स्रुगादापननिगद.

५. प्रयाजयाज्या.

६. चक्षुषींच्या (आज्यभागांच्या) याज्यापुरोनुवाक्या.

७. प्रधान देवतांच्या याज्यापुरोनुवाक्या.

८. इडोपाह्वान.

९. अनूयाजयाज्या.

१०. सूक्तवाक आशीर्वचन.

११. शंयुवाक.

१२. पत्नीसंयाज.

१३. आज्येडेचें उपाह्वान.

### षष्ठ प्रपाठक (पाशुक हौत्र).

१. यूपांजनाच्या वेळीं होत्यानें म्हणावयाच्या 'आंजनीया'—संज्ञक ऋचा, परिवीयमाणा ऋचा, धाय्या व परिधानीसंज्ञक ऋचा.

२. पाशुक प्रयाजांचे मैत्रावरुण प्रैष.

३. पाशुक प्रयाजांच्या याज्या (आप्री) १२.

४. पर्यग्निकरणीया ऋचा.

५. 'अध्रिगु'संज्ञक प्रैष देण्यासाठीं मैत्रावरुणाचा होत्याला प्रैष.

६. 'अध्रिगु' प्रैष.

७. स्तोकविषयक मैत्रावरुणाचें अनुवचन. (स्तोकीया).

८. वपा, पुरोडाश व स्विष्टकृत्संबंधीं मैत्रावरुणानें म्हणावयाच्या पुरोनुवाक्या व प्रैष.

९. पशुसंबंधीं वपा, पुरोडाश व स्विष्टकृत् यांच्या याज्या.

१०. 'मनोता'संज्ञक सूक्त.

११. अंगें, वनस्पति व स्विष्टकृत् यांच्यासंबंधीं मैत्रावरुणाच्या पुरोनुवाक्या व प्रैष.

१२. अंगें, वनस्पति व स्विष्टकृत् यांच्या 'याज्या.'

१३. पाशुक 'अनूयाज'संबंधीं मैत्रावरुणानें द्यावयाचे प्रैष.

१४. पाशुक 'अनूयाजां'च्या होत्यानें म्हणावयाच्या याज्या.

१५. सूक्तवाकविषयक मैत्रावरुणाचा प्रैष.

### सप्तम प्रपाठक.

१. अग्नीचें अन्वाधान झाल्यावर इष्टि होण्याचे पूर्वी प्रवासास जाण्याची जरूर पडल्यास यजमानानें करावयाचा होम. अन्वाधान झाल्यावर 'आहवनीय' नष्ट होईल तर पुनः प्रणयन करावयाचा विधि. अग्न्यायतनाबाहेर जोरानें शम्या फेंकला तर जितक्या लांबीवर तो जाऊन पडेल तितक्या हद्दीपर्यंत आयतनांतून अग्नि उसळून बाहेर पडल्यास तो पुन्हां आयतनांत टाकण्याचा मंत्र. पूर्वोक्त शम्यापाताच्या हद्दीपलीकडे अग्नि उडाल्यास पाथिकृतेष्टि करावयाचें विधान. दूर बांधलेलीं वांसरें सुटून गाईनां प्यायलीं तर वायुदेवतोद्देशानें करावयाचा 'यवागू'चा निर्वाप. सायंदोहाचें अगर प्रातर्दोहाचें दूध नष्ट झाल्यास करावयाचा विधिविशेष व प्रायश्चित्त. दहीं व दूध हे दोन्ही हविःपदार्थ नष्ट झाले तर इंद्रदेवताक चरु करावा लागतो त्याचें विधान. अन्वाधानानंतर पत्नी रजस्वला झाली तर तिला दूर ठेवून इष्टि करावयाची तिच्यांतील विशिष्ट विधि व चतुर्थ दिवशीं पत्नीशीं संभोग करतेवेळीं म्हणावयाचे मंत्र.

२. अग्निहोत्रहोमाचें द्रव्य अगर सान्नायसंज्ञक हविर्द्रव्य सांडेल तर करावयाचा विधि. हवनीय द्रव्यांत किडामुंगी वगैरे पडल्यास, दुसरा कांहीं पदार्थ हविर्द्रव्यांत मिसळला गेल्यास, अग्निहोत्रहोमाची पहिली आहुति दिल्यावर व दुसरी आहुति देण्यापूर्वी हविर्द्रव्य सांडल्यास आणि प्रयाजांच्या पूर्वी परिधींच्या बाहेर अग्नीचा अंगार येऊन पडल्यास करावा लागणारा विशिष्ट विधि.

३. अग्नि नष्ट झाल्यावर पुन्हां मंथन करून अग्नि पाडीत असतांहि तो न पडेल तर करावा लागणारा विशिष्ट विधि. दुसरीकडेहि कोठें अग्नि न मिळेल तर करावयाची तजवीज. अग्नी एकमेकांत मिसळले गेले तर आणि अग्निहोत्रस्थाली फुटली तर करावे लागणारे विधिविशेष.

४. (ऐष्टिक याजमानमंत्र). प्रणीतानुमंत्रण. अन्वाधानोपक्रमाच्या वेळीं जपण्याचा मंत्र. पळसाची शाखा तोडतांना भूमीवर पडलेला तुकडा उचलण्याचा मंत्र. सान्नाय्यपात्रांचें प्रोक्षण करतांना अभिमंत्रण करावयाचा मंत्र. आतंचन मंत्र. आहवनीयाच्या अन्वाधानाच्या वेळीं यजमानानें जपावयाचे मंत्र. आहवनीय व गार्हपत्य यांच्यामध्यें उभें राहून जपावयाचा मंत्र. गार्हपत्य व दक्षिणाग्नि यांच्या अन्वाधानाच्या वेळीं जपावयाचे मंत्र. सभ्य व आवसथ्य अग्नींच्या उपस्थानाचे मंत्र. पांचहि अग्नींचें अन्वाधान झाल्यावर जपावयाचा मंत्र. बर्हिराहरणापूर्वी यजमान व पत्नी यांनीं व्रताशन करावयाचा मंत्र. व्रतोपायन मंत्र. वत्सापाकरणाकरितां पळसाची शाखा आणण्याचा मंत्र. इध्माचा भारा बांधण्याचा मंत्र. परिस्तरणाकरितां दर्भ कापावयाचा मंत्र. बर्हिःसन्नहन मंत्र. पिंडपितृयज्ञामध्यें बर्हिरास्तरणाचा मंत्र. शाखापवित्रानुमंत्रण मंत्र. पवित्रकरण मंत्र. प्रस्तरामध्यें पवित्रक खोंचून ठेवण्याचा मंत्र. वेदनिष्पादन मंत्र. वांसरूं बांधावयाची दोरी घेण्याचा मंत्र. दूध तापविण्याची तपेली अग्नीवर ठेवण्याचा मंत्र. उपवेषकरण मंत्र. दोहाच्या भांड्यावर झांकण ठेवण्याचा मंत्र. सान्नाय्यपात्रांच्या अभिमंत्रणाचा मंत्र. सायंकालीं रानांतून घरीं येत असलेल्या गाईनां अवलोकन करण्याचा मंत्र. वत्सबंधन मंत्र. धार न काढलेल्या गाईच्या अभिमंत्रणाचा मंत्र. धार काढण्याच्या वेळीं होणाऱ्या शब्दघोषाच्या अनुमंत्रणाचा मंत्र. दूध घेऊन येणाऱ्या मनुष्याला अध्वर्यूचा प्रश्न. त्याचें उत्तर. अध्वर्यूनें वाग्विसर्जन करावयाचा मंत्र. अग्निहोत्रोच्छेषणप्रक्षेपमंत्र. तपेलीवर झांकण ठेवण्याचा मंत्र. परिवासनशकलप्रक्षेपण मंत्र. शाखापवित्र न हरवेल अशा ठिकाणीं ठेवण्याचा मंत्र. अग्निहोत्रोच्छेषणप्रक्षेपमंत्र. तपेलीवर झांकण ठेवण्याचा मंत्र. अग्नींनां परिस्तरणें घालीत असतां म्हणावयाचा मंत्र.

५. आहवनीयगृहांत किंवा गार्हपत्यगृहांत निजणाऱ्या यजमानानें जपावयाचे मंत्र. पुरोडाशावरील निखारे झाडून टाकण्याचा मंत्र. पुरोडाशाभिमंत्रण मंत्र. अभिघारण मंत्र. पात्रीमध्यें उपस्तरण करावयाचा मंत्र. पात्रीमध्यें पुरोडाश ठेवण्याचा मंत्र. पुरोडाश कपालावरून उचलावयाचा मंत्र. प्रातर्दोहाच्या अभिघारणाचा मंत्र. कपालांनां अंजन करण्याचा मंत्र. होतृप्रवराच्या व अध्वर्युप्रवराच्या वेळीं यजमानानें जपावयाचा मंत्र. हविःपदार्थांचें अवदान घेण्याचा मंत्र. प्रत्यभिघारणाचा मंत्र. प्राशित्रावदान मंत्र. इडावदान मंत्र. इडाभक्षण मंत्र. बर्हीवर ठेवलेल्या पुरोडाशाच्या अभिमर्शनाचा मंत्र. चार ठिकाणीं केलेल्या पुरोडाशाचें दिग्व्यूहन करावयाचे मंत्र. स्रुचांमध्यें प्रस्तर बुडवीत असतां यजमानानें अभिमंत्रण करण्याचा मंत्र. पत्नीनें जपावयाचा मंत्र. संपत्नीयहोममंत्र. नारिष्टहोममंत्र. पार्वणहोम मंत्र. अमावास्येच्या 'पार्वणहोमाचा मंत्र. होत्यानें बसावयास घेतलेल्या वेदतृणांचें वेदींत अभिस्तरण करावयाचा मंत्र.

६. दोहानंतर द्यावयाचा प्रैष. ब्रह्मवरण. ब्रह्म्यानें करावयाचा मंत्रजप. आग्नीध्रानें धरून ठेवलेल्या उत्करस्थलाच्या अनुमंत्रणाचा जप. वेदानें वेदी झाडून काढीत असतां अनुमंत्रण करण्याचा मंत्र. वेदी तयार करीत असतांना, स्तंबयजुर्हरण करतांना, बर्हीं अंथरतांना, बर्हीं वेदींत आंथरल्यावर, विधृती तिरकस ठेवतेवेळीं, प्रस्तर आसादन करतांना, जुहू, उपभृत् व ध्रुवा आणि स्रुवा आसादन करतांना अनुमंत्रण करावयाचे मंत्र. आज्यस्थालीच्या अनुमंत्रणाचा मंत्र. आग्नेय पुरोडाशाच्या अभिमंत्रणाचा मंत्र. दूध व दहीं ह्यांचें अभिमर्शन करण्याचे मंत्र. ध्रुवेच्या पुढें वेद ठेवल्यावर त्याचें अनुमंत्रण करण्याचा मंत्र. आसादन केलेल्या सर्व हविःपदार्थांचें एकदम अभिमर्शन करा-

वयाचा मंत्र. ऐंद्राग्न पुरोडाशाच्या अभिमंत्रणाचा मंत्र. अग्नि-संमार्ग मंत्र. आग्नीध्राच्या भागाचें विशिष्ट व्यूहन करण्याचा मंत्र. इडाभक्षणांग मार्जन करण्याचा मंत्र. अनूयाजसमिध दिलेल्या अग्नीचें अभिमंत्रण करावयाचा मंत्र. अग्निसंमार्ग मंत्र. संमार्गदर्भप्रहरणानुमंत्रण मंत्र. प्रस्तरतृणदाहानुमंत्रण मंत्र. शंयुवाकानुमंत्रण. तण्डुलप्रक्षालन. जलनिनयन. पिष्टलेपहोम. आदित्योपस्थान मंत्र. समिधनानंतर आहवनीयाच्या उपस्थानाचा मंत्र. अभिचारनिमित्तक उपवेषनिरसनाचा वैकल्पिक मंत्र.

७. (सोमांगभूत मंत्र). देवयजनप्राप्त्यर्थ देवतोपस्थान. क्षौम-वस्त्रपरिग्रह. पूर्णाहुतीचें अनुमंत्रण. कृष्णाजिनाला चारी दिशांनीं व मध्यें स्पर्श करणें. कृष्णाजिनारोहण. अध्वर्यूकडून कृष्णाजिनावर बसलेल्या यजमानाचें अभिमंत्रण. यजमानानें करावयाचें आहवनीयोपस्थान. प्रायणीयेष्टीच्या पूर्वी यजमानानें करावयाचें आहवनीयोपस्थान. सोमक्रयिणी गाय एक एक पाऊल टाकीत असतां यजमानानें एक एक मंत्र म्हणत तिच्या मागून जावयाचें व सातव्या पावलाच्या वेळीं 'सखाय' या मंत्राचा जप करावयाचा. सुब्रह्मण्य 'साम' म्हणूं लागला असतां त्याला यजमानाचा अन्वारंभ. सौमिक वेदीच्या मोजणीच्या वेळीं यजमानानें म्हणावयाचा मंत्र. वेदी तयार करणाऱ्यांनां प्रैष. सौमिक वेदीचें अभिमंत्रण. वेदीच्या आंत असलेलीं मातीचीं ढिखळें बाहेर टाकणें. संज्ञपन होणाऱ्या पशूपासून परावृत्त होतांना म्हणावयाचा मंत्र.

८. (पशुविषयक मंत्र). पशूनें उपाकरणानंतर शब्द केला, तो खालीं बसला, थरथर कांपूं लागला, किंवा मेला तर करावीं लागणारीं प्रायश्चित्तें. हवन झालेल्या सोमरसांत हवन न झालेला सोमरस मिसळला गेला तर त्याचें प्रायश्चित्त व त्या मिश्र सोमरसाचें प्राशन.

९. (अभिषवादिविषयक मंत्र). उपांशु ग्रहासाठीं अभिषव, आसादन केलेल्या ग्राव्यांचें अभिमंत्रण, माध्यंदिनसवनांतील अभिषवानंतर ग्राव्यांनां अनुमोदन देणें. स्रुचीमध्यें दधिघर्माकरितां घेतलेलें दहीं आग्नीध्रीयेंतील अग्नीवर तापत ठेवणें. दधिघर्महोम. दधिघर्मभक्षण. भक्षणोत्तर नाभिदेशाभिमर्शन. षोडशीग्रहाचें अभिमंत्रण. षोडशीग्रहहोम. विहारामध्यें अथवा विहाराबाहेर एखादें भय उत्पन्न झाल्यास तें शांत होण्यासाठीं होम. अवभृथास जातांना होम. सक्तुहोम. सौमिक वेदीच्या पूर्व किंवा उत्तर बाजूस 'उदवसानीया'नामक इष्टि करावयाच्या जागीं जाणें. 'महाव्रत' यज्ञामधें प्रतिगर देण्याकरितां सुवर्णमय कूर्चावर अध्वर्यूचें उपवेशन.

१०. (प्रायश्चित्तमंत्र). हविर्धान वगैरे मंडप कोसळून पडल्यास, वपा किंवा अंगांचें अवदान सांडल्यास, वरलेल्या ऋत्विजांस घालवून दिलें तर, एककपालपुरोडाश खालीं पडल्यास, यज्ञाला विघ्न करणारें भय उत्पन्न झाल्यास, चमसभक्षणापूर्वीच स्तोत्राचें (सामाचें) उपाकरण केलें गेल्यास व सोमरसांत पावसाचे थेंब पडल्यास करावीं लागणारीं प्रायश्चित्तें व विशिष्ट विधी.

११. दर्शपूर्णमास प्रायश्चित्तें.

१२. अग्निष्टोमाच्या आरंभीं पवनपावन संस्कार करावयाच्या वेळीं यजमानानें जप करावयाचे मंत्र.

१३. अवभृथ कर्मामध्यें दहीं व मध यांच्या मिश्रणानें सोमवल्लीच्या चोथ्याचें प्रोक्षण करावयाचे मंत्र.

१४. अवभृथनिमित्तक स्नान केल्यानंतर यजमानानें तीन ओंजळी पाणी उडवावयाचें विधान. जो आहिताग्नि ब्राह्मण स्वतः सोमयाग न करतां दुसऱ्याच्या सोमयागांत आर्त्विज्य करून सोमपान करील त्यानें करावयाचा होम. हुतशेष आज्याचें भक्षण. दक्षिणाग्नीवर होम. दधिदान (पितरांच्या करितां पिंडदानाप्रमाणें). द्वादशाहयज्ञामध्यें एकमेकांनां स्पर्श केलेल्या दीक्षितांनीं गार्हपत्य, दक्षिण व आहवनीय या अग्नींवर करावयाचा होम.

**अष्टम प्रपाठक** (अश्वमेध).

१. सांग्रहण्येष्टि व तिच्यासंबंधीं प्रयोगविशेष.

२. 'ब्रह्मौदन' चरु शिजविण्यासाठीं चार प्रकारचीं उदकें आणणें, चरुश्रपण, चरुहवन, हुतशेष चरूनें दर्भाची दोरी मृदु करणें, चार ऋत्विजांनीं ब्रह्मौदनचरूचें भक्षण करणें, शिजलेला भात व हिरण्मय दक्षिणा.

३. ब्रह्मौदनचरुशेषानें चोपडलेल्या दोरीनें अश्वाला बंधन करणें.

४. गळ्याशीं दोरी बांधलेल्या अश्वाला जलाशयावर नेऊन स्नान घालणें, अश्वावरोबर कुत्र्याचें स्नान, मुसळानें कुत्र्याला मारणें, कुत्र्याला घोड्याच्या पायाखालीं तुडविण्यास देणें, कुत्रें मेल्यावर त्याचें धड पाण्यांत फेंकून देणें व घोड्याला जलाबाहेर काढणें.

५. चार ऋत्विजांनीं चोहींकडून घोड्यावर पाणी उडविणें.

६. घोड्याच्या अंगावरून भूमीवर पडणाऱ्या जलबिंदूचें अनुमंत्रण.

७. एकट्या अध्वर्यूनें चारी बाजूंनीं घोडा धुऊन काढणें.

८. 'अश्वचरित'संज्ञक व 'अश्वरूप'नामक होम.

९. अश्वनामवाचन, होम, अश्वमोचन, अश्वपरिदान. अश्व स्वैरगतीनें चालला असतां त्याच्या संरक्षणासाठीं चिलखतें धारण केलेले १०० पासून ४०० पर्यंत शूर सैनिक रवाना करणें व प्रमादामुळें घोडा चोरीस गेला अगर कोणी नेला तर प्रायश्चित्त.

१०. अश्वमेधांगदीक्षा, अनुष्ठानविशेष, दीक्षाकालाची मर्यादा व पूर्णाहुति.

११. दीक्षेमध्यें होणाऱ्या 'वैश्वदेव'होमाचे मंत्र व तत्संबंधीं आख्यायिका.

१२. एक वर्षभर घोडा हिंडत राहिला असतां यज्ञमंडपामध्यें रोज कराव्या लागणाऱ्या तीन इष्टी.

१३. संवत्सरानंतर उखासंभरण व उख्याग्नीचें उपस्थान.

१४. आहवनीयाग्नीमध्यें सर्व रात्रभर अध्वर्यूनें तूप, मध, तांदूळ, पोहे, लाह्या, तुपांत कालविलेलें पीठ, भाजलेले सातू व तांदूळ, भाजलेल्या तांदुळांचें पीठ, मसूस्य (उत्तर हिंदुस्थानांत मिळतें) आणि राळे यांच्या मिश्रणानें करावयाचा अन्नहोम.

१५. अन्नहोमाचा विशिष्ट प्रकार.

१६. अन्नहोमाच्या आद्यंतानुवाकांचें विस्तृत व्याख्यान.

१७—१८. अन्नहोममंत्रानुवाकांचें व्याख्यान.

१९. ( त्रिरात्रात्मक अश्वमेधयागापैकीं पहिल्या रात्रीं करावयाचा अन्नहोम १७ व १८ या अनुवाकांत सांगितला त्याच्या आदले दिवशीं ) यूपांचें आहरण करावयाचा विधि. यूपांचे प्रकार. अवदानसाधनविशेष. यूपांनां ग्राम्यपशू बांधून ठेवणें. यूपांच्या मधल्या अंतरांत आरण्यपशू बांधून ठेवणें.

२०. यूपस्थापनविधि, हविःसादनप्रकार.

२१. एकवीस अग्नी प्रज्वलित करून ठेवण्याचा विधि.

२२. दुसऱ्या दिवशींच्या बहिष्पवमानासंबंधीं अनुष्ठानविशेष. अश्वाचें 'उद्गातृत्व' व 'घोडाघोडीचें गायन'

२३. पर्यग्निकरण केलेल्या पशूंची नियोजना.

**नवम प्रपाठक** ( अश्वमेध ).

१. अठरा पशूंच्या आलंभनाचें विधान. ग्राम्यपशूंचें सर्व अनुष्ठान.

२. चातुर्मास्यसंज्ञक पशूंचा प्रयोग.

३. रोहितादि पशूंच्या वपाहोमाचें साहित्य ( सर्व पशूंच्या वपांचा एकाच वेळीं होम ).

४. घोडा रथाला जुंपणें. रथावर ध्वजाची स्थापना. चिलखत चढविणें. धनुष्यबाणधारण. यजमानाचें रथारोहण. रथाला जोडण्यापूर्वी अश्वाला शृंगारणें. राजस्त्रियांनीं मणिभूषणांनीं घोडा शृंगारणें. यजमानाच्या स्त्रियांनीं घोड्याला काजळ घालणें व अश्वांनां चंदी देणें.

५. यूपाच्या दक्षिणोत्तर वसलेला होता व ब्रह्मा या दोघांचा प्रश्नोत्तररूप संवाद ( ब्रह्मोद्य ).

६. ( मेलेल्या अश्वाचे संस्कार ). मेलेल्या अश्वाला राजपत्न्यांनीं प्रदक्षिणा घालणें. प्रतिप्रस्थात्यानें राज पत्नीला घोड्याच्या जवळ नेणें. अध्वर्यूनें अश्व व पत्नी यांच्यावर शालजोडीचें पांघरूण घालणें. घोड्याच्या ओटीपोटावर राजपत्नीनें सोन्याच्या व लोखंडाच्या सुयांनीं खड्गप्रहाराच्या खुणा करणें.

७. मेलेल्या अश्वाच्या संस्काराचे शेष मंत्र.

८. अश्वमेध व तत्संबंधीं इतर पशूंच्या विधीची प्रशंसा.

९. त्रिरात्रापैकीं पहिल्या व दुसऱ्या दिवसाची प्रशंसा, तिन्हीं दिवसांच्या अनुष्ठानांतील विशेष.

१०. 'महिम'नामक २ ग्रह.

११. शरीरहोम व स्विष्टकृत्.

१२. शरीरहोम व स्विष्टकृत् यांच्या मध्यंतरीं करावयाचा अश्वस्तोमीय होम.

१३. संवत्सरपर्यंत रोज केलेल्या सवितृदेवतात्मक तिन्ही इष्टींच्या अनुष्ठानांचें विशेष स्वरूप.

१४. ब्राह्मण व क्षत्रिय यांचें 'गायन' व 'वीणावादन'.

१५. अश्वमेधांगभूत अवभृथसंबंधीं होमविशेष.

१६. उपाकरणमंत्रांचें व्याख्यान वगैरे. पश्विष्टिविशेष.

१७. अश्वाला कांहीं रोग वगैरे झाल्यास तन्निवारणार्थ इष्टि.

१८. ब्रह्मौदन चरु. शाखांतरोक्त ब्रह्मौदन व इष्टि यांचा विकल्प.

१९. विभुत्वादि द्वादश गुणांनीं अश्वाची प्रशंसा.

२०. अश्वसंज्ञपनाचा प्रकार. संज्ञपनकालीं प्रस्तोत्यानें **गायन.**

२१. निरनिराळ्या नांवांच्या व्युत्पत्तीसह अश्वाची प्रशंसा व उत्तरवेदीचा उपवाप ( निष्पादन ).

२२. प्रधानयागदिवसापूर्वीं संवत्सरपर्यंत करावीं लागणारीं प्रोक्षणादि कर्मं व ऋषभालंभ.

२३. अश्वाच्या निरनिराळ्या अवयवांची उपासना.

**दशम प्रपाठक.**

पंचकाठक ( चयन )–सावित्र काठक.

१. दिवस, मुहूर्त, पूर्वपक्षांतील रात्री, त्यांचे मुहूर्त, कृष्णपक्षाचे दिवस व त्यांचीं नांवें, त्यांचे मुहूर्त, कृष्णपक्षाच्या रात्री, त्यांचे मुहूर्त, १२ शुक्लपक्ष, १२ कृष्णपक्ष, १२ महिन्यांचीं नांवें, सिकता ( वाळू ), क्षुद्रमुहूर्तांचीं नांवें, यज्ञक्रतु, ऋतूंचीं नांवें, ऋतूंचीं व संवत्सराचीं चार नांवें इत्यादि संज्ञांकित इष्टकां ( शिरगोळे )चें उपधान.

२. स्वयमातृण्णोपधान.

३. अध्वर्यूनें करावयाचें चित्युपस्थान.

४. यजमानाचें चित्युपस्थान.

५. होत्याचें अनुशंसन.

६. शतरुद्रादिमंत्रसाध्य अशा आज्यशेषानें मुखविलेपन.

७. 'असु' इत्यादि आहुती.

८. मृत्युग्रह.

९. सावित्राग्निसंबंधीं ध्यानरूप विद्या, आख्यायिकेसह.

१०. मधुत्वसंपादनाच्या निमित्तानें सावित्रविषयक अनुष्ठानाच्या अवयवांच्या ज्ञानाची जरूरी.

११. अन्वयव्यतिरेकानें सावित्राग्निविधेचें सोदाहरण प्रशंसन. 'सावित्र' ह्या नांवाच्या उत्पत्तीचा प्रकार.

**एकादश प्रपाठक** ( नाचिकेत काठक ).

१. 'लोकादि'इष्टकोपधान.

२. शतरुद्रीय होम.

३. वसोर्धाराख्य होम.

४. अन्नहोम.

५. 'विश्वप्री'नामक होम.

६. काठक ( चित्यग्नि ) अग्नीचें अभिमर्शन. 'लोकंपृणा'-नामक इष्टकांचें उपधान व चितीवर माती पसरणें.

७. 'नचिकेत'नामक ( चितिसंबंधी ) अग्नीची उपासना, नचिकेताग्नीची हिरण्यरूपानें प्रतीकोपासना व पक्ष्याकारवायुदेवतात्वरूपानें नचिकेताग्नीची उपासना.

८. मृत्युभीतिनाशपूर्वकब्रह्मलोकप्राप्तिरूप फल. तत्संबंधीं आख्यान. नचिकेताग्नीच्या अनुष्ठानाच्या सांगतेसाठीं 'हिरण्य'-दक्षिणा.

९. चयन (काठक) प्रयोग. चयन करण्याच्या स्थलाचा निश्चय.

१०. नाचिकेतसंज्ञक चयनाची (अग्नीची) प्रशंसा व संवत्सर-रूपानें नचिकेताग्नी (चयना) चें ध्यान.

**द्वादश प्रपाठक** (वैश्वसृज काठक व चातुर्होत्र काठक).

१. 'विश्वसृज'नामक काठकांगभूत 'दिवश्येनी'नामक इष्टींच्या याज्यापुरोनुवाक्या.

२. दिवश्येनी (स्वर्गसत्र) इष्टींचीं विधानें.

३. अपाद्या अगर 'अपाधा' नामक इष्टींच्या याज्यापुरोनुवाक्या.

४. 'अपाधा'नामक इष्टींचीं विधानें.

५. चातुर्होत्र चयन. चातुर्होत्र मंत्रांची प्रशंसा, उपधान-विशेष. चयनस्थलाचें परिमाण. चातुर्होत्रचयनसंबंधीं कर्म-विशेषानें मिळणारें विशिष्ट फल. चयनाची दक्षिणा. विद्वान लोकांनां सन्मानार्थ दक्षिणादान. चयनांगभूत सौत्रामणी किंवा मैत्रावरुणी आमिक्षा करण्याविषयींचें विधान.

६. 'वैश्वसृज'चयन (काठक) इष्टकोपधान.

७–८. वैश्वसृजकाठकसंबंधीं इष्टकोपधान.

९. दक्षिणादानाच्या वेळीं ब्रह्मयानें सदामध्यें बसून पठण करावयाचे मंत्र. सहस्रसंवत्सर सत्राचें स्वरूप प्रतिपादन करणारे ब्राह्मण. सत्राचा विश्वनिष्पत्तिहेतु. संवत्सरसत्रप्रशंसा. सहस्र-दिनात्मकसत्र. इ.

## —तैत्तिरीय आरण्यकाची अनुक्रमणिका.—

**प्रथम प्रपाठक** (काठकशेष—आरुणकेतु काठक).

१. उण्णोदकरूप इष्टकांचें उपधान. ओषधींचें उपधान.

२. अब्रूपेष्टकोपधान. उपधानमंत्रांचें ब्राह्मण.

३. इष्टकोपधान व ब्राह्मण.

४. इष्टकोपधान व ब्राह्मण.

५. मरुत्सोदकरूप इष्टकांचें उपधान व ब्राह्मण. इंद्रधनुष्य.

६. 'ऋतुमंडल'संज्ञक इष्टकांचें उपधान व ब्राह्मण.

७. सूर्यनामक इष्टकांचें उपधान. सात सूर्य. सप्तसूर्यांचे द्रष्टे ऋषी. मेरुपर्वतावर जाण्याचा मार्ग. अनंत सूर्य.

८. अभ्र, अर्धमास, काल, अनवर्णा, वैष्णवी, मृत्युवती निरयवती इत्यादि इष्टकागणांचें उपधान व ब्राह्मण.

९. अष्टवसू, एकादशरुद्र, एकादशगंधर्व, गौरी, सप्तवायू इत्यादि इष्टकांचें अगर इष्टकागणांचें उपधान व ब्राह्मण. इ.

१०. संयानी, संग्राम इत्यादि इष्टकांचें उपधान व ब्राह्मण.

११. पवित्रवती, नक्षत्रा, वैश्वदेवी इत्यादि इष्टकांचें उपधान.

१२. आतनुष्वेत्यादि, आमंद्रेत्यादि व ब्रह्मसदनादि इष्टकांचें उपधान, ब्राह्मण, प्रशंसा. इ.

१३. दिश्या, ब्राह्मण, पुष्करपर्ण, रुक्म, हिरण्मयपुरुष व कूर्म यांचें उपधान.

१४. आयुष्यप्राप्त्यर्थ सूर्याचें उपस्थान.

१५. आदित्येष्टकोपधान.

१६. आरोगादि इष्टकांचें उपधान.

१७. प्रभ्राजमानादि इष्टकांचें उपधान.

१८. दिश्येष्टकोपधान.

१९. नरकवतीसंज्ञक इष्टकांचें उपधान.

२०. दिश्येष्टकांचें उपधान.

२१. 'अप्'संज्ञक इष्टकांचें उपाधान.

२२. आपप्रशंसा.

२३. सृष्टीच्या रचनाक्रमाच्या निमित्तानें 'आरुणकेतु' अग्नि (काठक अथवा चयन) व तदंगभूत 'उदकें' यांची प्रशंसा व महती.

२४. अप्संबंधीं इष्टकांचें विशेष अनुष्ठान.

२५. पुष्करपर्णाद्युपधान.

२६. अरुणकेतूसंबंधीं फलविशेष व व्रतविशेष.

२७, २८, २९ आणि ३०. 'अप्'इष्टकांचें उपधान.

३१. (वैश्रवण यज्ञ). वैश्रवणाचें आवाहन, वैश्रवणास बलिप्रदान, अग्निस्थापन, प्रज्वलन, वैश्रवण यज्ञाचा विशिष्टकाल. उपस्थान.

३२. 'अरुणकेतुक'चयनांग व्रतनियमाचरण.

**द्वितीय प्रपाठक.**

१. यज्ञोपवीतधारणविधान, तत्संबंधीं आख्यायिका. यज्ञाचीं 'प्रसृत' व 'अप्रसृत' अशीं दोन रूपें व यज्ञोपवीत-साधनद्रव्यें.

२. संध्योपासनविधि, आख्यायिका, जलप्रशंसा, अर्घ्यप्रदान व प्रदक्षिणाविधि.

३, ४, ५ व ६. कूष्मांडहोमविधान, पापक्षयरूप फल, कूष्मांडहोममंत्र, समिदाधान व अग्न्युपस्थान.

७. कर्माच्या आरंभीं कूष्मांडहोम करण्याचा विधि.

८. कूष्मांडसंबंधीं दीक्षा.

९. स्वाध्यायविधि सांगण्याकरितां उपाख्यान.

१०. पंचमहायज्ञ.

११. ब्रह्मयज्ञप्रयोग.

१२. अनुकल्पविधि.

१३. ब्रह्मयज्ञसंबंधीं कांहीं विशेष. ब्रह्मयज्ञाची इतर यज्ञांहून भिन्नता व ब्रह्मयज्ञदक्षिणा.

१४. अनध्याय व त्याचीं कांहीं कारणें.

१५. अनध्यायाचीं आणखीं कारणें.

१६. अयाज्ययाजनादिदोषपरिहारार्थ स्वाध्याय.

१७. आपत्तीमुळें अयाज्ययाजनादि दोष घडल्यास त्याचें अल्प प्रायश्चित्त.

१८. अवकीर्णीप्रायश्चित्त. सर्व यज्ञांच्या आरंभीं येणारें आयुष्य प्राप्त करून देणारें ब्रह्मोपस्थान.

१९. सर्वात्मक परमेश्वराचें 'शिशुमार'संज्ञक जलग्रहरूपानें ध्यान व उपस्थान.

२०. दिशांचें उपस्थान.

**तृतीय प्रपाठक** ( चातुर्होत्र चितीचे मंत्र ).

१. दशहोतृमंत्र व ग्रह.

२. चतुर्होतृमंत्र व ग्रह.

३. पंचहोतृमंत्र व ग्रह.

४. षड्ढोतृमंत्र व ग्रह.

५. सप्तहोतृमंत्र व ग्रह.

६. षड्ढोतृमंत्र ( दुसरा ) व ग्रह.

७. ब्रह्ममेधसंबंधीं अनुमंत्रणें.

८. चातुर्होत्रचितीमध्यें इष्टकोपधान. 'संभारयजु'-संज्ञक मंत्र.

९. देवपत्न्याऽख्यमन्त्र.

१०. दक्षिणाप्रतिग्रह मंत्र.

११. होतृहृदयनामक मंत्र.

१२. नारायणसूक्त किंवा पुरुषसूक्त.

१३. उत्तरनारायणसंज्ञक अनुवाकानें सूर्याचें उपस्थान.

१४. भर्तृसूक्त.

१५. मृत्युसूक्त.

१६. सूर्योपस्थान.

१७. अवटस्थजलसेचन मंत्र ( प्रेतदाहविषयक ).

१८. अवगाहन.

१९. प्रेतदाह.

२०. स्रुवाहुतिमंत्र.

२१. राजगवीच्या अंगांचा होम.

**चतुर्थ प्रपाठक** ( प्रवर्ग्य काण्ड ).

१. शांति.

२. महावीरनिर्माण.

३. महावीराचे उद्धूपनादि संस्कार.

४. प्रवर्ग्यसंबंधीं ब्रह्मादि ऋत्विजांना अध्वर्यूचा प्रैष.

५. खरावर घातलेल्या निखाऱ्यावर महावीर ठेवणें.

६. महावीराचें अभिमंत्रण.

७. महावीराचें अवेक्षण.

८. महावीरामध्यें दुग्धप्रक्षेपण व प्रवृंजन.

९. प्रवर्ग्यद्रव्याचा आहवनीयावर होम.

१०. प्रवर्ग्यद्रव्यशेषानें अग्निहोत्र होम.

११. प्रवर्ग्योद्वासन.

१२. महावीरामध्यें गाईचें दूध व दहीं ओतण्याचे (शिल्लक राहिलेले ) मंत्र.

१३. घर्म प्रायश्चित्तें.

१४. घर्माचें अनुष्ठान चालू असतां वीज पडली तर करावयाचा होम.

१५, १६. घर्मप्रायश्चित्तें.

१७. ( चयनप्रकरण ). घर्मेष्टकोपधान.

१८. कुलायिनी इष्टकेचें उपधान.

१९. अग्न्यभिमर्शन.

२०. महावीरसंबंधीं प्रायश्चित्तें.

२१. दधिघर्मभक्षण.

२२. घोरतनूंचें प्रतिपादन.

२३. ( अग्नीच्या ) घोरतनूंचें प्रतिपादन.

२४. मरुद्गणांचें प्रतिपादन.

२५. मरुद्गणप्रतिपादन.

२६. घर्माची गाय किंवा महावीर यांचा अपहार केला गेल्यास गार्हपत्यावर द्यावयाची आहुति.

२७. अभिचारासंबंधीं कठोर वाक्यें.

२८. घर्माचें अनुष्ठान चालू असतां लांडग्यानें उपद्रव दिला तर करावयाचें कृत्य.

२९ ते ३५. गिधाड, लांडगा, एडका, कावळी, गाढवी, घुबड व यक्षराक्षसादिकांची पीडा झाली तर तत्परिहारार्थ उपाय.

३६. घर्माच्या गाईच्या अंगावर गोचिड वगैरे कृमी उत्पन्न झाल्यास त्यांचें मारण.

३७. अभिचारसंबंधीं विशेष.

३८. शत्रूला शाप देणें.

३९. शत्रूचा नाश व्हावा म्हणून त्याच्या बिछान्याखालीं 'ओषधि' पुरून ठेवणें.

४०. उद्गाता 'साम' न गाईल तर अध्वर्यूनें 'साम' गाणें.

४१. अवांतर दीक्षांगविशेष.

४२. शांति ( प्रवर्ग्यस्तुति ).

**पंचम प्रपाठक.**

१. प्रवर्ग्याच्या उत्पत्तीसंबंधानें आख्यायिका, दीक्षित-नियम, प्रवर्ग्य, घर्म, महावीर व सम्राट् या शब्दांच्या व्युत्पत्त्या व अर्थ, महावीराच्या शिरोभागाची प्रशंसा.

२. सावित्रहोम. अभ्री कोणच्या लांकडाची करावी? अभ्र्यादान व मृत्तिका वगैरे संभाराचें ग्रहण.

३. महावीर तयार करण्याचें विशिष्ट स्थल, महावीराचें प्रमाण व लक्षण. महावीर तयार करणें, महावीराला घोड्याच्या लेंड्यांची धुरी देणें, महावीर भट्टींत भाजून काढणें, महावीरावर दूध शिंपडणें, महावीर कृष्णाजिनांत गुंडाळून नीट ठेवणें.

४. घर्मसंबंधीं प्रैषाचें तात्पर्य, प्रवर्ग्यसामग्रीचें प्रोक्षण. घर्मसंबंधीं आहुति, प्रवर्ग्यानुष्ठान, उपस्थान वगैरे.

५. घर्मरोचनमंत्रव्याख्यान.

६. प्रवर्ग्याचा काल, प्रवर्ग्याच्या आवृत्ती, वैकल्पिकपक्ष, प्रवर्ग्याचा व अग्निष्टोम क्रतूचा संबंध, क्रतुपरत्वें प्रवर्ग्यकरणाकरणविचार, प्रवर्ग्याची आदित्यरूपानें स्तुति, ऋतुरूपानें स्तुति व पत्नीसंबंधीं कांहीं विशेष.

७. रशनादान, घर्मधुधाह्वान, घर्मधुग्धेनुबंधन, वत्सबंधन, धार (दूध) काढणें, शफ व उपयमन यांचें आदान, महावीरांत दूध व दहीं ओतणें, वातनामकथन, हविर्द्रव्याहुति, रौहिणपुरोडाशहवन, हविर्द्रव्याहुति.

८. हविर्द्रव्यशेषहोम, अभिचारसंबंधीं विशेष, हुतशेष द्रव्यानें अग्निहोत्रहोम, हवि:शेषभक्षण व प्रवर्ग्यसामग्री घडवंचीवर नेऊन ठेवणें.

९. प्रवर्ग्योद्वासनाचें अनुष्ठान.

१०. प्रवर्ग्योद्वासनस्थलविशेष.

११. प्रवर्ग्यानुष्ठानज्ञानाचें फल.

१२. प्रवर्ग्यानुष्ठानाच्या दिवसांची संख्या व उपसत् इष्टि.

**षष्ठ प्रपाठक** (पितृमेध).

१. मृत यजमानाला अन्वारब्ध करून आहवनीयाग्नींत द्यावयाची आहुति, प्रेत ताटीवर ठेवून त्याच्यावर वस्त्र घालणें, प्रेत स्मशानांत घेऊन जाणें, राजगवीचें उपाकरण, राजगवीचें संज्ञपन अगर मोचन, चितेवर प्रेत टेवल्यावर त्याच्या शेजारीं पत्नीस निजविणें, पत्नीला चितेवरून पुन्हां उठविणें, चिता पेटविणें, पेटलेल्या चितेचें अनुमंत्रण. पङ्क्तोतृव्याख्यान, अजबंधन होम.

२. स्रुवाहुति.

३. 'यम'संज्ञक सूक्तानें उपस्थान. दहनस्थलाच्या उत्तरेस खळगे खणून त्यांत पाणी सांठवून त्या पाण्यानें ज्ञातिबांधवांनीं स्नानें वगैरे करणें.

४. अस्थिसंचयन.

५. यमयज्ञ.

६. पितृमेधशेषभूत लोष्टचितीचें अनुष्ठान.

७. चारी दिशांनां मातीच्या डिखळांचें उपधान.

८. चारी दिशांनां चरूंचें उपधान.

९. तिलमिश्रधाना विखरणें.

१०. गांव व स्मशान यांच्यामध्यें अग्नि प्रज्वलित करावयाचा व त्याच्या पश्चिमेस बैलाच्या कातड्यावर वेतसपुष्पांच्या माळा घातलेल्या ज्ञातिबांधवांनीं बसावयाचें. आनंद होम. अग्नीच्या उत्तरेस अनडुद्बंधन, अनडुहारब्ध, अनडुद्गमन, परिधिधारण, पत्नीनयन, काजळ घालणें, यवोदनश्रपण आणि यवोदनभक्षण.

११. आहुतिहोम.

१२. राजगव्युत्सर्ग आणि शांति.

**सप्तम प्रपाठक** (शिक्षा उपनिषत्).

१. आत्मरक्षणार्थ शांतिपाठ.

२. उपनिषदांचा यथार्थ बोध होण्यासाठीं अभ्यास करण्याविषयीं शिक्षापाठ (अध्ययनाचे नियम).

३. मंगलाचरणार्थ मंत्र. उपासनाबोधक महासंहिता. (पंचोपासना). लोकादि पंचोपासनेचे अवयव. पंचोपासनेचें प्रजादिसिद्धिरूप फल.

४. मेधाप्राप्त्यर्थ, अन्नाच्छादनलाभाकरितां, रोगमुक्तीसाठीं व आरोग्यसिद्धीकरितां जपण्याचे मंत्र. विद्यासंप्रदायप्रवृत्त्यर्थ शिष्यसंपादक होम आणि उपस्थान.

५. (ब्रह्मोपासना). अंगदेवतोपासन, अंगदेवताप्रतीकभूत व्याहृति, व्याहृतिचतुष्टयाच्या ठिकाणीं ठेवावयाची दृष्टि, व्याहृतींच्या ठिकाणची लोकदृष्टि, व्याहृतींच्या ठिकाणीं देवविशेषदृष्टि, प्राणदृष्टि आणि वेददृष्टि. व्याहृतींची उपासना.

६. उपास्यस्वरूप, उपासकाचा मार्गविशेष, उपासनेचें फल व उपासनेचें विधान.

७. मंदाधिकाऱ्याकरितां चक्षुर्गम्य अशा सगुण ब्रह्माची उपासना, आधिभौतिक गुणपंचकें, लोकपंचक, देवतापंचक, अध्यात्मगुणपंचकत्रय व उपासनाविधान.

८. उत्तमाधिकाऱ्याकरितां प्रणवनामक शुद्ध ब्रह्माची उपासना. उपास्यस्वरूप ॐकाराची ब्रह्मवाचकत्वयोग्यता, वैदिक व्यवहारांतील उदाहरणांनीं ॐकाराचा सर्वांशीं संबंध. सर्वव्यापकत्व व फलकथनमिषानें ब्रह्मोपासनेचा विधि.

९. नित्यकर्म व उपासना यांचा समुच्चय. मतभेद.

१०. ब्रह्मयज्ञफलसिद्ध्यर्थ जपण्याचा मंत्र.

११. विविदिषोत्पत्तिद्वारा केवल कर्मांचें मोक्षहेतुत्व. ईश्वराच्या आज्ञा. ईश्वराज्ञेविषयीं प्रमादनिषेध. माता, पिता, गुरु व अतिथि यांची देवभावनेनें पूजा. शिष्टाचारपालननियम. अपवाद. महापुरुषांच्या सेवेंतील विशेष. दानविशेष. संदिग्धधर्मनिर्णयोपाय. उपसंहार. शांति.

**अष्टम प्रपाठक** (ब्रह्मवल्ली उपनिषत्)

१. गुरुशिष्यानुकूलतासिध्यर्थ शांतिपाठ. सर्व उपनिषदांचें सूत्ररूपानें सार. पूर्वोक्त सूत्राचें व्याख्यान. आत्म्यापासून सृष्टिक्रमाचा उद्भव. ब्रह्मतत्त्वाचें विवेचन होण्यासाठीं पंचकोशाचें विवरण. अन्नमयकोश.

२. प्राणमयकोश.

३. मनोमयकोश.

४. विज्ञानमयकोश.

५. आनंदमयकोश.

६. पंचकोशांच्या ठिकाणीं आत्मभावना. ब्रह्माप्रमाणें जीवाचेंहि अविनाशित्व व ब्रह्माचें सत्स्वरूप.

७. ब्रह्मसद्भावप्रकाशकमंत्र. विद्वानाला निश्चयानें ब्रह्मप्राप्ति. अविद्वानाला ब्रह्मप्राप्तीचा अभाव. सगुण ब्रह्म जाणणारालाहि निर्गुण ब्रह्मज्ञान्याप्रमाणें मोक्ष.

८. ब्रह्मतत्त्वज्ञान नसणाऱ्याला भय. ब्रह्मानंदाची मीमांसा. ब्रह्मानंदाची कमाल. ब्रह्मानंदाचें फल. निर्भयता. उपसंहार.

**नवम प्रपाठक** ( भृगुवल्ली( वारुणी ) उपनिषत् )

१. भृगूचा वरुणाला (ब्रह्मोपदेशाविषयीं) प्रश्न व वरुणाचीं उत्तरें.

२. अन्नब्रह्म.

३. प्राणब्रह्म.

४. मनोब्रह्म.

५. विज्ञानब्रह्म.

६. आनंदब्रह्म. ब्रह्मोपासनेचें फल व उपसंहार.

७. उपासकानें पाळावयाचे नियम. उपास्य व उपासना.

८. उपास्य व उपासना.

९. (भिन्न) उपास्य व उपासना.

१०. व्रतचर्या. उपासनांचे भेद व आत्मानुभव. उपसंहार.

**दशम प्रपाठक** ( याज्ञिकी अथवा नारायणीया उपनिषत् )

१. ब्रह्मतत्त्वप्रतिपादक ऋचा, ब्रह्माचें सर्वजगदात्मकत्व, ब्रह्मापासून कालाची उत्पत्ति, परमात्म्याचा आकारविशेषाभाव, परमात्मोपलक्षक विराड्मूर्ति व जगत्, गंधर्वांचा वृत्तांत. परमेश्वराचें व्यावहारिकदृष्ट्या उपकारकत्व आणि पारमार्थिकदृष्ट्या मुक्तिप्रदत्व, ब्रह्मविद्योपसंहार, सोपाधिकब्रह्मोपासनमंत्र, ब्रह्मप्राप्त्यर्थ अंतर्यामिप्रार्थना, अग्निरूप औपाधिक परमेश्वराची प्रार्थना, गाई घोडे इत्यादिकांच्या रक्षणार्थ प्रार्थना, विश्वरूपधर रुद्राची प्रार्थना, मूर्तिधर रुद्र, मूर्तिधर विनायक, पक्षिराज देव, मूर्तिधरी दुर्गा, मूर्तिधर विष्णुदेव इत्यादि देवांची प्रार्थना. स्नानांगभूत मंत्र—दूर्वाभिमंत्रण, मृत्तिकाभिमंत्रण, जलाभिमंत्रण, जलाधिपतिप्रार्थना, जलांत राहणाऱ्या देवांना नमस्कार, दुष्टजलापनयन, स्नान, गंगादि नद्यांचें आवाहन, अघमर्षण, अवगाहन, आचमन, पुन्हां स्नान, गुप्तपापक्षयार्थ स्नानमंत्र, स्नानानंतर जप, अनिष्टपरिहारार्थ जप, इ. इ.

२. महाव्याहृतिमंत्र.

३. अन्नसमृद्धीकरितां महाव्याहृति.

४. पूजाकाम मनुष्यानें करावयाचा होम.

५. प्रतिबंधनिवारणपूर्वक मुमुक्षूला ज्ञानप्राप्ति होण्यासाठीं होम.

६. ज्ञानप्रतिपादक जप्यमंत्र.

७. पाठ केलेले वेद विसरूं नयेत म्हणून जपावयाचा मंत्र.

८. ज्ञानसाधनभूत तपःसिद्ध्यर्थ जप्य मंत्र.

९. विहितानुष्ठानरूप पुण्याची प्रशंसा व निषिद्धाचरणरूप पातकाची निंदा.

१०. शुद्ध अंतःकरणाच्या पुरुषाला 'तत्त्वज्ञाना'चा उपदेश, हृदयकमलाच्या ठिकाणीं महेश्वरस्वरूप उपास्य.

११. उपास्यगुणविशेष.

१२. उपास्य देवतेला नमस्कार.

१३. आदित्यमंडलाच्या ठिकाणीं परब्रह्माची उपासना.



१४. आदित्यपुरुषाचें सर्वात्मकत्व.

१५. उपासनेचें फल, उपासनेविषयीं असमर्थ असणाऱ्यानें जपावयाचा मंत्र.

१६ व १७. रुद्रदेवताक मंत्र.

१८. रुद्रदेवताक मंत्र.

१९. अग्निहोत्रहोमांत होमसाधनद्रव्यास कारण होणारा 'वृक्ष'.

२०. चित्तशुद्धीला कारण असा कर्मसंग्रह व त्याचा उपयोग. मोक्षप्रतिबंधनिवारक रक्षोघ्न मंत्र.

२१. भुक्तिमुक्तिप्रद पृथिवीदेवताक मंत्र.

२२. वृष्टिप्रतिबंधनिवारणमंत्र.

२३. माध्याह्नसंध्येंतील जलप्राशनाचा मंत्र.

२४. सायंकालच्या संध्येंतील जलप्राशनाचा मंत्र.

२५. प्रातःकालच्या संध्येंतील जलप्राशनाचा मंत्र.

२६. तिन्हीं संध्यांतील मार्जनोत्तर गायत्रीचें आवाहन करण्याचा मंत्र.

२७. प्राणायाममंत्र.

२८. प्राणायामाचा वैकल्पिक मंत्र.

२९. प्राणायामाचा आणखी एक वैकल्पिक मंत्र.

३०. गायत्रीविसर्जन.

३१. तत्त्वानुसरणभूत ब्रह्माचें उपासन.

३२. भोजनारंभीं आपोशन घ्यावयाचा मंत्र.

३३. प्राणाहुती.

३४. प्राणाहुतींसंबंधाचे वैकल्पिक मंत्र.

३५. भोजनोत्तर आपोशन घेण्याचा मंत्र.

३६. खाल्लेल्या अन्नाचें अनुमंत्रण.

३७. हृदयाभिमर्शन.

३८. चित्तविक्षेपरहित परमेश्वरस्वरूपानुसंधान करणारा मंत्र.

३९. जीवात्म्याचें अभेद ज्ञान होण्यासाठीं मेधादेवीची प्रार्थना.

४०. मेधाप्राप्त्यर्थ इंद्रादि देवतांची प्रार्थना.

४१. व ४२. मेधाप्राप्त्यर्थ मंत्र.

४३—४७. महादेवाच्या पश्चिम, उत्तर, दक्षिण, पूर्व व ऊर्ध्व दिशेस असणाऱ्या मुखांचे प्रतिपादक मंत्र.

४८. ज्ञानाला प्रतिबंध करणाऱ्या ब्रह्महत्यादि दोषांची निवृत्ति करणारे 'त्रिसुपर्ण' मंत्र.

४९. त्रिसुपर्ण.

५०. त्रिसुपर्ण, त्रिसुपर्णमंत्रमाहात्म्य.

५१. ज्ञानयोग्यतेसाठीं स्वावयव शुद्ध करणारा होम.

५२. अवयवशुद्ध्यर्थ होम.

५३—६१. विरजाहोम.

६२. ब्रह्मज्ञान साध्य होण्याचीं बारा उत्कृष्ट साधनें व उपसंहार.

येथें तैत्तिरीय आरण्यकाची अनुवाकवार अनुक्रमणिका संपली. तैत्तिरीय संहिता, ब्राह्मण व आरण्यक या ग्रंथांतील प्रमुख विषयांचें वर्णन व त्यांची सूची अगोदर देऊन तदनंतर या ग्रंथांची विस्तृत अनुवाकवार विषयानुक्रमणिका वाचकांपुढें ठेविली. या वर दिलेल्या माहितीवरून यजुर्वेद म्हणजे डोकेंफोड करावयास लावणारें शास्त्र आहे या आमच्या विधानाची सत्यता वाचकांस पटेल. असो. येथवर यजुर्वेदाचें स्थूल वर्णन झालें. आतां त्याच्या थोड्याफार सूक्ष्म विवेचनाकडे वळूं.

**कोऽयं वेदो नाम?**—यजुर्वेदासंबंधीं आमचें विवेचन देण्यापूर्वीं सायणांचें विवेचन सारांशानें देणें इष्ट होईल. सायणाचार्य एकंदर वेदविषयक प्रश्नांचा ऊहापोह यजुर्वेदाच्या प्रस्तावनेंतच करतात. कां कीं, यजुर्वेद हा मुख्य ग्रंथ आणि इतर वेद त्याचे साहाय्यक ग्रंथ अशी त्यांची वृत्ति आहे.

संस्कृत ग्रंथांच्या प्रारंभीं सर्व ग्रंथकारांचा "अनुबंधचतुष्टय" सांगण्याचा प्रघात आहे. ( १ ) विषय, ( २ ) संबंध, ( ३ ) प्रयोजन, ( ४ ) अधिकारी ह्या चतुरंगास "अनुबंधचतुष्टय" म्हणतात. यजुर्वेदाच्या भाष्याच्या आरंभीं सायणाचार्यांनीं देखील वरील पद्धतीप्रमाणें आपल्या भाष्यास एक छोटा उपोद्घात जोडला आहे, व त्यामध्यें बऱ्याच गोष्टींचा उलगडा केला आहे.

प्रारंभींच "कोयं वेदो नाम किंच तल्लक्षणं के वा तस्य विषयसंबंधप्रयोजनाधिकारिणः कथं वा तस्य प्रामाण्यं न खल्वेतस्मिन्सर्वस्मिन्नसति वेदो व्याख्यानयोग्यो भवति" अशी सुरुवात करून ( १ ) वेदाचें लक्षण, ( २ ) वेदाचा विषय, ( ३ ) वेदाचा संबंध, ( ४ ) वेदाचें प्रयोजन ( ५ ) वेदास अधिकारी कोण व ( ६ ) वेदप्रामाण्य ह्यांबद्दल विवेचन केलें आहे तें येणेंप्रमाणें.

( १ ) वेद लक्षणः—"इष्टप्राप्त्यनिष्टपरिहारयोरलौकिकमुपायं यो ग्रंथो वेदयति स वेदः", इष्ट वस्तूंची प्राप्ति व्हावी व अनिष्ट गोष्टींपासून त्रास न व्हावा यांविषयीं अलौकिक उपाय कळवून देणारा जो ग्रंथ अथवा जें ज्ञान त्यास "वेद" ही संज्ञा आहे. यावर अशी शंका निघेल कीं, मनुष्य सुवासिक पुष्पें, चंदन, सुंदर स्त्रिया इत्यादि सुखदायक वस्तूंचा अनुभव घेतो यास प्रत्यक्षच प्रमाण आहे किंवा कोणीहि प्राणी दुःखपरिहार हा प्रत्यक्षावरूनच करतो. स्वतःच अनुभव घेतला नसला तर दुसऱ्याच्या अनुभवावरून इष्टानिष्टांचें अनुमान करतां येतें. मग याप्रमाणेंच पुढील जन्मींचीं प्रत्येकाचीं सुखदुःखें काय आहेत हें देखील अनुमानानें कळणें शक्य आहे. तेव्हां त्याकरितां वेदाची काय जरूर?

वरील शंकेस उत्तर द्यावयाचें म्हणजे असें म्हणतां येईल कीं, इष्टानिष्टांच्या लौकिक व पारलौकिक उपायांची गोष्ट अगदीं निराळी आहे. ज्योतिष्टोमादि यज्ञकर्में हीं ऐहिक अथवा पारलौकिक इष्ट करणारीं आहेत व विषारी बाणांनीं टोंचलेलें मांस ( कलंज ) वगैरेसारखे निषिद्ध पदार्थ भक्षण करण्याचें वर्ज करणें हें अनिष्टाचा परिहार करणारें आहे हें ज्ञान केवळ जरी तर्कशास्त्रपारंगत मनुष्य असला तरी त्यास वेदज्ञानाशिवाय इतर लाखों अनुमानपरंपरांनीं होणार नाहीं. म्हणूनच वरील लक्षणांत "अलौकिक" हा शब्द घालण्याचें प्रयोजन आहे व इतरत्रहि वचन सांपडतें कीः—

प्रत्यक्षेणानुमित्या वा यस्तूपायो न बुध्यते ।
एनं विन्दति वेदेन तस्माद्वेदस्य वेदता ।

( २ ) वेदाचा विषयः—इष्टप्राप्ति व अनिष्टपरिहार यांसंबंधींचे अलौकिक उपाय हा वेदग्रंथांचा विषय आहे.

( ३ ) संबंध.—वेद आणि वेदाचे अधिकारी यांचा संबंध उपकारक आणि उपकार्य म्हणजे उपकार करणारा व उपकार करून घेणारा असा आहे.

( ४ ) प्रयोजन.—इष्टप्राप्ति आणि अनिष्टपरिहार यासंबंधीच्या अलौकिक उपायांचें ज्ञान करून देणें हें वेदाचें प्रयोजन आहे.

( ५ ) अधिकारी.–वरील प्रकारच्या ज्ञानाची लालसा धरणारा मनुष्य सदरहु वेदासंबंधीं अधिकारी आहे. या लक्षणानें स्त्रीशूद्रादिकहि अधिकारी ठरतात, कारण जसे त्रैवर्णिक पुरुष तसेच स्त्रीशूद्रादि खालच्या प्रतीचे लोक यांनां देखील अशा प्रकारच्या ज्ञानाची अपेक्षा आहे; इष्टाची प्राप्ति व्हावी व अनिष्टाचा परिहार व्हावा या प्रकारची इच्छा प्रत्येकाला असणारच, मग तो स्त्री असो वा शूद्र असो.

परंतु येथें 'ज्यांचें उपनयन होतें अशांनांच वेदाध्ययनाचा अधिकार आहे' हें वचन आडवें येतें. ज्यांचें उपनयन होत नाहीं त्यांस वेदाध्ययन अनिष्टकारक होतें असा या वचनांतून अर्थ निघतो; आणि म्हणून, ज्या अर्थी स्त्री व शूद्र यांनां उपनयन संस्कार केला जात नाहीं त्या अर्थीं त्यांस इष्टप्राप्ति व अनिष्टपरिहार यांसाठीं वेदाध्ययनाची कितीहि इच्छा असली तरी ते वेदाध्ययनास सर्वथा अनधिकारी समजले जातात. त्यांकरितां महाभारतादि पुराणग्रंथांचा उपयोग विहित आहे. कारण असें वचन आहेः—

स्त्रीशूद्रद्विजबंधूनां त्रयी न श्रुतिगोचरा ।
इति भारतमाख्यानं कृपया मुनिना कृतम् ॥

( ६ ) वेदप्रामाण्यविचारः—वेद हे इष्टानिष्टांच्या प्राप्तिपरिहाराचे अलौकिक उपाय दाखवून देणारे असल्यामुळें त्यांचें प्रामाण्य स्वतःसिद्ध आहे. पौरुषेय वाक्य जरी उपायबोधक असतें तरी वक्त्याच्या ठिकाणीं भ्रांतीचा

संभव असल्यामुळें त्यास अन्य मूलप्रमाण लागतें, परंतु वेद हे नित्य असल्यामुळें त्यांच्या ठिकाणीं वक्तृदोषाची शंका उद्भवत नाहीं व म्हणून या शंकेचें उत्तर असें आहे कीं, त्यास अपरप्रामाण्याची जरूर नाहीं.

ह्यावर वेद हे कालिदासभवभूत्यादिकांच्या वाक्यांप्रमाणेंच पौरुषेय (अर्थात् अनित्य) आहेत, कारण ते ब्रह्मापासून उत्पन्न झाले असल्याबद्दल "ऋचः सामानि जज्ञिरे" इत्यादि श्रुतीच प्रमाण आहेत, तसेंच "शास्त्रयोनित्वात्" (ब्र. सू. १·१,३) हें व्याससूत्रहि वेद ब्रह्मकार्य असल्याबद्दलच सांगतें. अशी शंका निघते.

या शंकेचें उत्तर असें आहे कीं, श्रुतिस्मृतींतून वेद हे नित्य असल्याबद्दल प्रमाणें आहेत. उदाहरणार्थ, "वाचा विरूपनित्यया" अशासारख्या श्रुती व "अनादिनिधना नित्या वागुत्सृष्टा स्वयंभुवा" इत्यादि स्मृती वेदनित्यत्व वर्णन करितात व बादरायण देखील देवताधिकरणांत "अतएव च नित्यत्वम्" (ब्र. सू. १·३,२९) या सूत्रानें वरील म्हणण्यास पुष्टि देतो.

वरील विवेचनावरून वेदनित्यत्वाबद्दल परस्परविरोधी श्रुती आहेत अशी शंका निघते. या शंकेस उत्तर म्हणजे हा विरोध अगदीं दिखाऊ आहे. कारण वेदांचें नित्यत्व जें आहे तें व्यावहारिक आहे. सृष्टीचें उत्पत्तिकार्य व तिचें विनाशकार्य या दोन कार्यांच्या मधील कालाला व्यवहारकाल म्हणतात. ह्या व्यवहारकालाच्या दृष्टीनें काल, आकाश इत्यादिक पदार्थ जसे नित्य आहेत तद्वतच वेद हे नित्य आहेत. कारण या व्यवहारकालांत वेद, काल, आकाश इत्यादिकांची उत्पत्ति व विनाश या दोन्ही क्रिया होत नाहींत. या व्यावहारिक नित्यत्वाशीं सृष्टीच्या उत्पत्तिप्रसंगीं ब्रह्मदेवानें त्यांस निर्माण केलें या गोष्टीचा अर्थातच खरा विरोध नाहीं.

याप्रमाणें परस्परविरोधी दिसणारीं श्रुतिवचनें हीं भिन्न-विषयप्रतिपादक आहेत असें ठरलें. असो. आतां शेवटीं पुन्हां एवढेंच सांगावयाचें कीं, वेदांचा कर्ता ब्रह्मदेव हा निर्दोष असल्यानें व वेद हे व्यवहारकालतः नित्य व अपौरुषेय असल्यानें ते वक्तृदोषरहित आहेत व म्हणून ते स्वतः-प्रमाण आहेत.

अशा रीतीनें वेदलक्षण, वेदप्रामाण्य, त्याचप्रमाणें विषय-संबंधप्रयोजनाधिकारिरूप अनुबंधचतुष्टय, इत्यादि सर्व गोष्टींचें विवरण करून वेदाची 'व्याख्यानयोग्यता' सिद्ध केल्यानंतर सायणाचार्य "स्वाध्यायोऽध्येतव्यः" हें विधिवाक्य घेतात. "स्वाध्यायोऽध्येतव्यः" या वाक्यावर अशी शंका निघते कीं, ह्यांतील "अध्येतव्यः" हा शब्द पाठमात्रवाचक कल्पिला आहे, व त्यास अनुसरून वरील नियमाचा अर्थ "वेदपठन करावें" इतकाच होईल, व म्हणून वेदार्थज्ञानाची बिलकूल उपयुक्तता दिसून येत नाहीं. यावर सायणाचार्य म्हणतात, या शंकेस भट्टमतानुयायी मीमांसकांनीं समर्पक उत्तर देऊन 'स्वाध्याय' शब्दांत ज्याप्रमाणें "पठन" त्याचप्रमाणें "बोधन" हा अर्थ कसा अंतर्भूत आहे याचें विवरण केलें आहे. वेदांतूनहि वेदार्थाचें ज्ञान करून घेतलें पाहिजे अशा प्रकारचे उल्लेख आहेत. उदाहरणार्थ, "स्थाणुरयं भारहारः किलाभूत्। अधीत्य वेदं न विजानाति योऽर्थम्॥ योऽर्थज्ञ इत्सकलं भद्रमश्नुते नाकमेति ज्ञानविधूतपाप्मा"॥

आतां "ब्राह्मणेन निष्कारणो धर्मः। षडङ्गो वेदोऽध्येतव्यो ज्ञेयश्च" या वाक्यांत अध्ययन करावें व ज्ञान करून घ्यावें असे वेगळे विधि असल्यानें अध्ययन म्हणजे पाठमात्र असेंच या ठिकाणीं ठरतें असें जे म्हणतील त्यांचें तेवढें म्हणणें आम्ही कबूल करूं. पण त्याबरोबरच त्यांनीं वेदाचें ज्ञान विधेय आहे हें कबूल केलें पाहिजे. केवळ पाठमात्रानें साध्य होणारें अनुष्ठान व वेदार्थज्ञान यांचीं फलें पृथक् पृथक् आहेत याबद्दल श्रुतींतून वर्णन आहे. उदाहरणार्थ, "सर्वं पाप्मानं तरति तरति ब्रह्महत्यां योऽश्वमेधेन यजते य उ चैनमेवं वेद"॥ त्याच-प्रमाणें "यदेव विद्यया करोति तदेव वीर्यवत्तरं भवति" इत्यादि वचनांत ज्ञानहीन अनुष्ठानापेक्षां ज्ञानयुक्त अनुष्ठान केल्यानें श्रेष्ठतर फल मिळतें असें म्हटलें आहे.

ब्राह्मणग्रंथांतूनहि निरनिराळ्या विधिवाक्यांमध्यें "य एवं वेद" असें वचन घालून वेदज्ञानाचें स्वतंत्र फल दर्शित केलें आहे. अशीं स्थळें केवळ अर्थवाद आहेत असें धरलें तरी देखील अशा वाक्यांचें स्वार्थाच्या ठिकाणीं प्रामाण्य मानलें पाहिजे. यावर अशी जर शंका काढली कीं, मग "ग्रावाणः प्लवन्ते" ह्या वाक्यामध्यें देखील स्वार्थप्रामाण्य संभवतें, तर या शंकेचें समाधान असें करतां येतें कीं, वरील वाक्यांतील अर्थ (दगडाचें तरणें) प्रत्यक्ष प्रमाणानें बाधित असल्यामुळें त्या ठिकाणीं स्वार्थप्रामाण्य मानतां येत नाहीं; परंतु, मूळ ब्राह्मणवाक्यांतून वेदज्ञानाचें स्वतंत्र फल सांगणारीं जीं वचनें आहेत त्यांना बाधक प्रमाणें नसल्यामुळें त्यांच्या ठिकाणीं स्वार्थप्रामाण्य मानलें पाहिजे. असो. इत्यर्थ हा कीं, वेदज्ञानापासून कांहीं स्वतंत्र फलप्राप्ति होते, एवढ्याकरितां वेदज्ञान सुलभ झालें पाहिजे, अर्थात् त्याकरितां वेदव्याख्यान झालें पाहिजे.

**वेदांतील विषयांचें विशेष स्पष्टीकरण.**—एकंदर वेदाचा विभाग दोन कांडांत केला आहे. पैकीं पूर्वकांडांत (१) नित्य, (२) नैमित्तिक, (३) काम्य व (४) निषिद्ध अशा चतुर्विध कर्मांचें प्रतिपादन केलें आहे. "तद्यथाऽऽम्रे फलार्थे निर्मिते छायागन्धावनूत्पद्येते एवं धर्ममपि चर्यमाण-मर्था अनूत्पद्यन्ते" या वचनाप्रमाणें नित्यनैमित्तिक कर्मापासून इच्छा नसतांहि अभीष्ट स्वर्गप्राप्ति होते. काम्यकर्मांच्या विधी-मध्येंच फलेच्छा मूलभूत असते. निषिद्धवर्जनापासून भावी

अनिष्टाचा परिहार होतो. यांपैकीं नित्यनैमित्तिक कर्मांपासून अनुषंगानें स्वर्गप्राप्ति होते इतकेंच नव्हे तर चित्तशुद्धि होऊन ब्रह्मज्ञानाचा मार्ग देखील खुला होतो.

अशा रीतीनें पूर्वकाण्डज्ञानानेंच पुरुषार्थप्राप्ति होते म्हणून उत्तरकाण्डाची आवश्यकता नाहीं असें मात्र नाहीं. कारण उत्तरकाण्डाच्या ज्ञानानें प्राप्त होणारा जो आत्यंतिक पुरुषार्थ त्याची प्राप्ति पूर्वकाण्डाच्या अध्ययनानें होणें शक्य नाहीं. हा आत्यंतिक पुरुषार्थ दोन प्रकारचा आहे तो (१) सद्योमुक्ति, व (२) क्रममुक्ति असा होय. वर्तमान जीवितक्रमांतून देहातीत झाल्यावर लागलीच मिळणारी ती 'सद्योमुक्ति' व उत्तरयानानें ब्रह्मलोकास जाऊन नानाप्रकारचे भोग उपभोगून नंतर ज्ञान होऊन ब्रह्मलोकाच्याहि पलीकडील श्रेयःप्राप्ति ती 'क्रममुक्ति' होय. ह्यावरून ब्रह्मोपदेश व तत्सिद्ध्यर्थ उपासना इत्यादि विषय 'उत्तरकाण्ड' या वेद-भागांत अंतर्भूत होतात.

**यजुर्वेदाचें प्राधान्य.**—एकंदर वेदत्रयींत, ऋग्वेद हा मंत्रप्रधान असून केवल अनेक ऋचांचा समुदाय आहे. यजुर्वेद हा यज्ञकर्मविवरणप्रधान असून सामवेदांत गायन-रूपानें स्तोत्रमंत्राचा संग्रह केला आहे. यजुर्वेद हा यज्ञ-प्रधान असल्यामुळें वेदत्रयीमध्यें तोच भित्तिस्थानीय मानला जातो, व त्या दृष्टीनें ऋग्वेद व सामवेद हे चित्रस्थानीय मानले जातात. यज्ञकर्माच्या दृष्टीनें मंत्रब्राह्मणात्मक यजुर्वेदासच प्राधान्य दिलें जातें. यजुर्वेदांत सांगितलेले दर्शपूर्णमासेष्टि मंत्र तीन प्रकारचे आहेत ते (१) आध्वर्यव, (२) याजमान व (३) हौत्र असे आहेत. ह्या तिन्हींमध्यें अध्वर्यूसंबंधीं मंत्र आधारभूत असल्यामुळें प्रथम तेच दिले आहेत व त्यांमागून यजमानसंबंधीं व हौत्रसंबंधीं मंत्र दिले आहेत. पहिल्या तेरा अनुवाकांत "इषेत्वा" इत्यादि मंत्रानें आरंभ होणारे मंत्र "आध्वर्यव" होत.

कृष्णयजुर्वेदांत यज्ञांचा एका दृष्टीनें उत्तान काल दिसतो, कां कीं, यांत यज्ञांचें वर्णन जितकें पूर्ण आहे तितकें इतर संहितांत नाहीं. महाव्रत, सत्रें, यांसारखे याग कृष्णयजुर्वेदांत आहेत ते इतर वेदांत सांपडत नाहींत. उलटपक्षीं, कृष्ण-यजुर्वेदामध्यें ब्रह्याचें काम फारच थोडें दिलें आहे, तें श्रौत-सूत्रांमध्यें अधिक विस्तृत दिलें आहे. विशेष विस्तृत असें यज्ञशास्त्र द्यावयाचें तर तें श्रौतसूत्रांतील दिलें पाहिजे. वेद-मंत्रांमधून प्राचीन धर्माचें जें स्वरूप दृष्टीस पडतें तें कांहीं अंशीं यजुर्वेदामध्यें आहे तसें निश्चित दिसतें, तर कांहीं अंशीं अत्यंत अनिर्बंध प्रकारचें दिसतें. कांहीं तरी मंत्र म्हणून आहुति द्यावयाची, सहजस्फूर्तीनें उपासनास्वरूपी किंवा यजनस्वरूपी जें कार्य होईल तें करावयाचें, अशा तऱ्हेचें यजनस्वरूप ऋग्वेद-मंत्रांतून व्यक्त होतें. ऋत्विजांचें होता उद्गाता अध्वर्यु आणि ब्रह्मा असें चतुर्विध वर्गीकरण किंवा ब्रह्मा गाळून होणारें त्रिविध वर्गीकरण ऋग्वेदांतील मंत्र ज्या काळांत तयार झाले त्या काळीं दिसत नाहीं. यज्ञशास्त्र हें क्रमाक्रमानेंच वाढलें. नवीनांस त्याचा इतिहास सांगण्यापूर्वीं एका विशिष्ट कालाचें चित्र दाखविलें पाहिजे; आणि तें जितक्या उत्तम कालाचें दाखवितां येईल तितकें चांगलें. वाचकांस यज्ञाचा विकास केवळ अधिकारी वाणीनें सांगण्याऐवजीं त्याचा त्या विषयांत क्रमशः प्रवेश करून देणें चांगलें.

सोमयागाचें वर्णन केलें म्हणजे त्याच्या अनुषंगानें अनेक यागांची माहिती त्यांत येतेच. इष्टि किंवा पशुयाग हीं सोमयागांत येतातच; आणि सोमयागाच्या मुख्य दिवसाच्या अनेक आवृत्त्या थोड्याबहुत फरकानें झाल्या म्हणजे सत्रें तयार होतात. या कारणानें सोमयागास मुख्य धरून त्यास लागणारे ऋत्विज, त्यांचीं कर्तव्यें आणि त्यांचे संभार वर्णन केले म्हणजे सर्व यागांशीं परिचय होण्यापुरती तयारी होते. याकरितां सोमयागांतील ऋत्विज व त्यांचीं कर्तव्यें पुढें दिलीं आहेत. प्रमाणें:—

## —सोमयागांतील ऋत्विज—

(१) अध्वर्युः—हा यज्ञांतील अत्यंत प्रमुख ऋत्विज होय. यज्ञांतील बहुतेक क्रियांची जबाबदारी याच्यावर पडते. यजमान हा जर आपण राजा कल्पिला तर अध्वर्यु हा त्याचा मुख्य प्रधान होय. हा फक्त यजमान व ब्रह्मा यांची अनुज्ञा घेतो व इतर सर्व ऋत्विजांस प्रैष (आज्ञा) देतो. यज्ञासंबंधीं कोणी चौकशी करूं लागला तर तेथें अध्वर्यु कोण होता ही चौकशी अगोदर होते. यजमानाला यज्ञ करणें झाल्यास तो प्रथम अध्वर्यूची योजना करून नंतर त्याच्या सल्ल्यानें इतर ऋत्विजांची योजना करतो असा बहुतेक सार्वत्रिक प्रचार आहे. कोणत्या यज्ञांत कोणत्या देवता घ्यावयाच्या व त्यांना कोणकोणते हवी द्यावयाचे यांसंबंधीं सर्व योजना शास्त्रानुसार अध्वर्यूलाच करावयाची असते. यज्ञामध्यें इकडून तिकडे जाण्याची व हातानें लहानमोठ्या अनेक क्रिया करण्याची जबाबदारी अध्वर्यूच्या मानानें इतर ऋत्विजांवर फारच कमी प्रमाणांत पडत असते. आपल्या क्रिया करीत असतांना अध्वर्यु जे मंत्र म्हणतो ते यजुर्वेदांतील मंत्रविभागापैकीं असून अध्वर्यूला करावयाच्या सर्व क्रिया व त्या कसकशा कराव्या यांविषयींचीं वाक्यें हीं यजुर्वेदापैकीं ब्राह्मणविभागांतील होत.

(२) ब्रह्माः—हा यज्ञांतील अत्यंत प्रमुख अधिकारी नसला तरी त्याची पदवी जवळ जवळ तितकीच थोर आहे. यज्ञांतील सर्व ऋत्विजांच्या क्रियेवर नजर ठेऊन अनुष्ठान प्रमाद-रहित होण्याची काळजी ब्रह्याला घ्यावी लागते. कांहीं कांहीं मुख्य प्रसंगीं अध्वर्यूला ब्रह्याची अनुमति विचारावी लागते. यज्ञांतील कोणत्याहि क्रियेबद्दल वादविवाद उत्पन्न झाल्यास त्याचा अखेर निर्णय करण्याची जबाबदारी मुख्यतः ब्रह्यावरच येऊन पडते. यज्ञक्रियेंत घडलेल्या प्रमादाच्या निरसनार्थ

प्रायश्चित्ताहुति घालावयाचें कामहि अध्वर्यूच्या खालोखाल ब्रह्मयाकडेसच असतें. हालचालीचें अगर हातानें क्रिया करण्याचें काम ब्रह्मयाकडे फार थोडें असतें. यज्ञानुष्ठानरूपी नौका शास्त्रानें आंखून दिलेल्या मार्गानेंच जाऊं देण्याची अगर आंखलेल्या मार्गापासून भलतीकडे भडकूं न देण्याची जबाबदारी असलेला असा ब्रह्मा म्हणजे सुकाणूंवालाच होय. याच्या हाताखालीं मदत म्हणून आणखी तीन ऋत्विज असतात. ब्रह्मयानें पठण करावयाचे मंत्र, तसेंच त्यानें करावयाच्या क्रिया आणि त्या कसकशा कराव्या या बद्दलचीं वाक्यें ऋग्वेद यजुर्वेद व सामवेद यांच्या संहिता, ब्राह्मणें व सूत्रें या ग्रंथांत पुष्कळशीं आहेत, तथापि ब्रह्मयाच्या कर्तव्यांचें संपूर्णपणें स्पष्टीकरण मुख्यतः अथर्ववेदाच्या संहितादि ग्रंथांत केलेलें आहे. वेदत्रयीचें संपूर्ण ज्ञान असलेल्या व त्यांतहि वसिष्ठगोत्रांत उत्पन्न झालेल्या ब्रह्मयाची योग्यता फारच श्रेष्ठ दर्जाची गणिली आहे.

( ३ ) होताः—हा यज्ञांतील एक प्रमुख अधिकारी होय. अध्वर्यूनें दर्शित केलेल्या यज्ञांतील देवतांनां आह्वान करण्याचें काम या ऋत्विजाला करावें लागतें, इतकेंच नव्हे, तर यज्ञांतील मुख्य देवतांनां अर्पण करण्यासाठीं अध्वर्यु हविर्द्रव्यें घेऊं लागला असतां व देवतांच्या उद्देशानें तीं हविर्द्रव्यें अग्नींत अर्पण करूं लागला असतां पुरोनुवाक्या व याज्यासंज्ञक मंत्रहि यानेंच पठण करावे लागतात. याज्यासंज्ञक मंत्राच्या शेवटीं "वौषट्" असें होता म्हणतो व अध्वर्यु अग्नींत हविर्द्रव्य समर्पण करतो. अग्निष्टोमासारख्या सोमयागांत आतां सांगितलेल्या क्रियेखेरीज मुख्य देवतांच्या स्तुतीनें भरलेले शस्त्रसंज्ञक मंत्रसंघ प्रामुख्यानें होत्याला पठण करावयाचे असतात. लक्षणेनें बोलावयाचें झाल्यास यज्ञांतील देवतांचा होता हा एक स्तुतिपाठक आणि आमंत्रक होय. यज्ञामध्यें होत्याकडे हालचालीची अगर निरनिराळ्या क्रिया करण्याची खटपट विशेष नसते. त्याच्या कर्तव्यांत मुख्य भर पठनाचा असतो. ह्याच्या हाताखालीं मदतगार म्हणून तीन ऋत्विज असतात. सोमयागाच्या अलीकडील म्हणजे दर्शपूर्णमास, पशु वगैरे यागांत होत्यानें म्हणावयाचे मंत्र व क्रियाबोधक वाक्यें यजुर्वेदसंहिता, ब्राह्मणें, सूत्रें आणि ऋग्वेदावरील आश्वलायनसूत्र या ग्रंथांतून आढळतात, पण सोमयागापासून सत्रापर्यंतच्या सर्व यज्ञांत होत्यानें पठण करावयाचे मंत्र; क्रिया व तद्बोधक वाक्यें हीं ऋग्वेदसंहिता, ऐतरेयादि ब्राह्मणें व आश्वलायनादि सूत्रें या ग्रंथांत साकल्यानें उद्धृत झालीं आहेत.

(४) उद्गाताः—हा ऋत्विजहि यज्ञांतील एक प्रमुख ऋत्विज होय. याचें मुख्य कर्तव्य म्हणजे यज्ञांतील मुख्य देवतांची गायनानें आळवून स्तुति करणें हें होय. अग्न्याधानप्रसंगीं कांहीं विशिष्ट क्रिया अध्वर्यु करीत असतां हा ऋत्विज गायन करीत असतो. या गायनास 'साम' असें म्हणतात. अग्न्याधानानंतर सोमयागांतील मुख्य प्रसंगावांचून हा ऋत्विज आपलीं गाणीं गात नाहीं. आपल्या हाताखालच्या तीन ऋत्विजांपैकीं प्रस्तोत्याची योजना अशा सामान्य प्रसंगीं गाण्याचे कामावर तो करीत असतो. यज्ञांतील पुरोडाशादि द्रव्यांचे अगर पशूच्या अंगांचे हविःशेष भक्षण करावयाच्या कामांत अध्वर्यु वगैरे ऋत्विजांप्रमाणें हा पडत नसून या ऋत्विजास आपल्या साथीदारांसह फक्त सोमपान करण्याचें कर्तव्य करावयाचें असतें. या ऋत्विजाला हालचालीच्या अगर हातानें करावयाच्या क्रिया अगदीं अल्प प्रमाणावर करावयाच्या असतात. याच्या कर्तव्याचा भर मुख्यत्वेंकरून ऋचांच्या आश्रयानें देवतांच्या स्तुतिपर गाणीं गाणें यावरच असतो. यज्ञामध्यें इतर ऋत्विजांपेक्षां या उद्गात्याची व त्याच्या साथीदारांची विशेष मिजास राखली जाते. सोमयागामध्यें उद्गात्याच्या सामगायनाची फारच महती मानली जाते. सोमयागांतील प्रधान देवतेची गायनपूर्वक स्तुति करण्याचा मान होत्याच्याहि आधीं उद्गात्याला मिळत असतो. अगोदर उद्गात्याचें गायन व्हावयाचें, नंतर होत्याचें स्तवन व्हावयाचें आणि मग अध्वर्यूनें सोमरसाची आहुति द्यावयाची असा अनुक्रम आहे. सामगायन नसलेल्या यज्ञांपेक्षां सामगायनयुक्त यज्ञांचें महत्त्व अधिक असल्यानें सामगान करणाऱ्या उद्गात्याचाहि दर्जा त्या मानानें ऋत्विज मंडळींत बराच उच्च प्रकारचा राखला जावा हें साहजिकच आहे.

( ५ ) प्रतिप्रस्थाताः—हा एक अध्वर्यूच्या हाताखालचा ऋत्विज आहे. याला नेहमीं अध्वर्यूच्या सन्निध असावें लागतें. अध्वर्यूच्या आज्ञेनें अध्वर्यूच्या बरोबर अथवा पृथक्पणानें ह्याला यज्ञांतील कित्येक क्रिया करावयाच्या असतात. हालचालीचें व हातांनीं करावयाचें काम अध्वर्यूच्या खालोखाल यालाच करावें लागतें. इतर ऋत्विजांनां प्रैष देण्याचें कार्यहि थोड्याफार अंशानीं प्रतिप्रस्थात्याला करावें लागतें. शिवाय कांहीं प्रधानदेवतांच्या आहुती समर्पण करण्याचें कार्य याच्यावर येऊन पडतें.

( ६ ) ब्राह्मणाच्छंसीः—हा वास्तविक ब्रह्मयाचा एक मदतनीस आहे, पण ब्रह्मयाला मदत करण्याचें काम याच्यावर पडत नाहीं म्हटलें तरी चालेल. याला होत्याच्या साहाय्यक ऋत्विजांत समाविष्ट होऊन सोमयागामध्यें कांहीं याज्यांचें व शस्त्रसंज्ञक मंत्रसमुदायांचें पठन करावें लागतें. क्वचित् प्रसंगीं कारणपरत्वें ब्रह्मा आपल्या कामावर आपल्या प्रतिनिधित्वानें ब्राह्मणाच्छंसीची नेमणूक करतो असा आढळ आहे.

( ७ ) मैत्रावरुण ( प्रशास्ता ):—हा होत्याच्या तीन साहाय्यक ऋत्विजांपैकीं एक प्रमुख आहे. हातांत दंड घेऊन वेदींत उभें रहावयाचें व होतृप्रभृति ऋत्विजांनां याज्या म्हणण्यासाठीं प्रैष द्यावयाचें हें त्याचें मुख्य काम आहे.

याखेरीज मुख्य देवतांच्या संबंधानें पुरोनुवाक्या म्हणावयाचें काम बहुंशीं मैत्रावरुणाकडेच येतें. होत्याप्रमाणेंच यालाहि देवतांच्या स्तुतिपर शस्त्रसंज्ञक मंत्रसंघ पठन करावे लागतात. याला हालचालीचें काम व किरकोळ हवनादि क्रिया थोड्या अंशानें कराव्या लागतात. भालदारानें 'कचेरी बरखास्त' असें म्हणतांच ज्याप्रमाणें सर्वांनां कचेरींतून उठून बाहेर पडावें लागतें, त्याप्रमाणें मैत्रावरुणानें 'सर्पत=चाला, चालूं लागा' असें म्हणतांच सदोमंडपांत असलेल्या सर्व ऋत्विजांनां आपल्या स्थानावरून उठून बाहेर पडावें लागतें.

( ८ ) प्रस्तोताः—हा उद्गात्याचा खास मदतनीस होय. सोमयागांतर्गत दीक्षणीया इत्यादि इष्टींच्या प्रधानयागाच्या वेळीं सामगायनानें देवतास्तवन करण्याचें काम प्रस्तोत्याकडे आहे. तसेंच 'घर्म'नामक अनुष्ठानप्रसंगीं अध्वर्यु निरनिराळ्या क्रिया करीत असतांना त्या त्या क्रियेशीं निबद्ध असलेल्या सामांचें गायन प्रस्तोता करीत असतो. सोमयागांतील मुख्य देवतांच्या स्तुतिपर जीं सामें गावयाचीं असतात, त्यांचा आरंभक ( प्रास्ताविक ) विभाग या ऋत्विजाला गावयाचा असतो व आपण हा भाग कितव्यांदा गात आहों याचें स्मरण राहण्यासाठीं आपल्यापुढें पसरून ठेवलेल्या वस्त्रावर उंबराच्या लांकडाची एक एक कांडी तो यथाक्रम मांडीत असतो.

(९) नेष्टाः—हा अध्वर्यूच्या तीन मदतनिसांपैकीं एक आहे. सोमवल्ली कुटण्यास साहाय्य करणें, अध्वर्यूच्या हुकमाप्रमाणें पत्नीला अनुष्ठानस्थलीं घेऊन येणें, अशासारखीं फारच थोडीं कामें अध्वर्यूचा मदतनीस म्हणून याला करावीं लागतात. पण यांखेरीज होत्याच्या साहाय्यक मंडळींत समाविष्ट होऊन याला देवतांच्या संबंधानें याज्या म्हणण्याचेंहि काम थोडेंसें करावें लागतें.

(१०) आग्नीध्रः—वास्तविक हा ऋत्विज ब्रह्म्याच्या साहाय्यकांपैकीं एक आहे. पण याचें खरें साहाय्य बहुंशीं अध्वर्यूलाच होत असतें. अग्नि पेटविणें, इध्मा बर्हि आणून योग्य ठिकाणीं ठेवणें, स्रुचांचा संमार्ग करणें अशीं लहानमोठीं पुष्कळच कर्में अध्वर्यूच्या हुकमतीनें याला करावीं लागतात. कोणत्याहि देवतेच्या यागाच्या वेळीं हा आपल्या हातांत स्फ्य ( वज्र ) धारण करून वेदींच्या सन्निध उभा असतो. सोमयागांतील मुख्य देवतांनां उद्देशून पुरोडाश तयार करण्याचेंहि काम अध्वर्यूच्या हुकमानें करण्याचा प्रसंग याला केव्हां केव्हां येतो. पशुयागांमध्यें पशूला शामित्रशालेंत ( मारण्यासाठीं ) नेतांना पशूच्या पुढच्या बाजूला आग्नीध्राला अग्नि घेऊन चालावें लागतें. आग्नीध्राच्या कांहीं कर्तव्यावरून हा ऋत्विज म्हणजे यज्ञसमयीं बंदोबस्तास नेमलेला एक शस्त्रधारी अधिकारी आहे असें दिसून येतें. अध्वर्यूच्या मदतीखेरीज होत्याच्या साहाय्यक ऋत्विजांत कांहीं काल समाविष्ट होऊन देवतांच्या याज्या म्हणण्याचें कामहि आग्नीध्राला करावें लागतें.

( ११ ) अच्छावाकः—हा होत्याच्या मदतनिसांपैकीं एक दुय्यम प्रकारचा मदतनीस आहे. याला मुख्य देवतांच्या संबंधानें याज्या व शस्त्रसंज्ञक मंत्रसंघ पठन करावे लागतात. हालचालीचें अगर हातानें करावयाच्या कामाचें प्रमाण या ऋत्विजाच्या बाबतींत अगदीं अल्प आहे.

( १२ ) प्रतिहर्ताः—हा उद्गात्याच्या मदतनिसांपैकीं एक आहे. मुख्य देवतांनां उद्देशून तिघां सामगायकांनीं जीं सामें गावयाचीं त्या सामांत शेवटचा तुकडा यानें गावयाचा असतो. या तुकड्यास 'प्रतिहार' अशी संज्ञा आहे. प्रतिहाराचें गायन करतो म्हणून याचें नांव प्रतिहर्ता असें आहे. यालाहि हाताची खटपट व हालचाल अगदीं थोडी करावयाची असते.

( १३ ) उन्नेताः—हा अध्वर्यूच्या हाताखालीं मदत करणारा एक होय. सोमवल्ली कुटण्यास मदत करणें, सोमरस या भांड्यांतून त्या भांड्यांत गाळणें व सोमरसानें चमस भरून हवनासाठीं तयार ठेवणें हीं याचीं मुख्य कर्तव्यें आहेत. याशिवाय अतिग्राह्य व हारियोजन असे दोन याग याच्या हस्तें व्हावयाचे असतात.

( १४ ) पोताः—हा ब्रह्म्याचा मदतनीस म्हणून आहे, पण याजकडून खरी मदत होत्यालाच होते. मैत्रावरुणाच्या प्रैषाप्रमाणें याला मुख्य देवतेसंबंधीं याज्या म्हणण्याखेरीज दुसरें कांहीं विशेषसें काम नाहीं.

( १५ ) ग्रावस्तुतः—हा होत्याच्या मदतीसाठीं असणारा एक ऋत्विज आहे. सोमवल्ली कुटण्याचें काम चालू असतां याला कांहीं सूक्तांचें पठन उभ्यानें व डोळे बांधून करावयाचें असतें. सोम हा औषधींचा राजा असल्यानें त्याला कुटण्याचें कठोर कार्य पहाण्याचें धैर्य नसल्यानें हा ऋत्विज त्यावेळीं आपले डोळे बांधून घेत असावा. या सूक्तपठनांत सोमवल्ली ज्या वत्त्यांनीं ( ग्राव्यांनीं ) कुटली जाते त्या वत्त्यांचेंहि स्तवन असणारे कांहीं सूक्तमंत्र हा म्हणत असल्यानें ह्याला 'ग्रावस्तुत' ( ग्राव्यांची स्तुति करणारा ) असें नांव पडलें आहे. सोमवल्ली कुटूं लागण्यापूर्वी सोमराजाला गुंडाळलेलें पागोटें यजमानाच्या अगर अध्वर्यूच्या हातून या ऋत्विजाला देणगीदाखल मिळत असतें.

( १६ ) सुब्रह्मण्यः—हा उद्गात्याच्या हाताखालचा एक ऋत्विज आहे. सोमवल्ली खरेदी केल्यावर सोमवल्ली भरलेला रथ हांकून प्राग्वंशमंडपाकडे नेण्याचें काम हा ऋत्विज करीत असतो. याखेरीज यज्ञांतील मुख्य देवता जो इन्द्र त्याला बोलावून आणण्याचें व त्याची स्तुति करण्याचें काम याला करावें लागतें. यानें जी स्तुति करावयाची ती सामगायन करूनच करावी लागते.

( १७ ) सदस्यः—हा एक मोठ्या दर्जाचा ऋत्विज आहे. याला चमसप्राशन व उपस्थानासारख्या कांहीं लहान लहान क्रिया करावयाच्या असतात असें जरी आहे तथापि हा ऋत्विज यज्ञकर्माचें संपूर्ण ज्ञान असणारा असला पाहिजे. यज्ञाचें अनुष्ठान अत्यंत विस्तृत व गुंतागुंतीचें असल्यामुळें ब्रह्म्याच्या लक्षांत न येणारे असे कांहीं प्रमाद अनुष्ठानांत घडतील अगर वादविवाद उत्पन्न होतील तर अशा प्रसंगीं योग्य त्या सूचना अभियुक्तपणें करण्याचा अधिकार या ऋत्विजाला असतो व म्हणूनच याचा दर्जा श्रेष्ठ प्रतीचा आहे.

यज्ञाच्या वरील शिष्ट अधिकारी मंडळीशिवाय परिचर्यास्वरूपी कर्म ज्यांच्यावर पडतें असे कित्येक ऋत्विज यज्ञास लागतात. यज्ञासाठीं द्रव्य मिळविणें, निरोप्याचें काम करणें, ऋत्विजांनीं सोमरस प्राशन करावयाच्या प्रसंगीं सोमाचे चमस नेऊन त्यांस देणें, कांडणें, गाईचें दूध काढणें, पशूंचें पालन करणें, हनन करणें इत्यादि कर्मे ज्या ऋत्विजांस करावीं लागतात अशा ऋत्विजांचीं नांवें ( पदव्या ) आणि कर्मे नियमांनीं ठरलीं आहेत.

( १ ) चमसाध्वर्युः—हे १० किंवा ११ उपऋत्विज असतात. ज्या सोमयागांत 'सदस्य' नामक ऋत्विज नियमित केला नसेल त्या सोमयागांत चमसाध्वर्यू १० च पुरतात. सोमयागांतील मुख्य देवतांनां उद्देशून अध्वर्यु पेल्याच्या आकाराच्या ग्रहसंज्ञक पात्रांत भरून घेतलेल्या सोमरसाची आहुति जेव्हां जेव्हां देईल तेव्हां तेव्हां या चमसाध्वर्यूंनीं पाळ्याच्या आकाराच्या चमसनामक पात्रांत भरून घेतलेल्या सोमरसाची आहुति द्यावयाची असते, व आहुति दिल्यानंतर होतृप्रभृति ऋत्विजांकडे ते हुतशेषभूत झालेले चमस प्यावयासाठीं नेऊन द्यावयाचे असतात. चमस पिणाऱ्या एकेका ऋत्विजास एकेक चमसाध्वर्यु नियमित केलेला असतो.

( २ ) उपगातेः—हेहि उपऋत्विजच होत. यांची संख्या ४ अगर त्याच्याहून जास्तहि असते. उद्गातृप्रभृति तिघे सामगायक ऋत्विज सामगायन करूं लागले म्हणजे मधून मधून 'हो' असें म्हणून त्या सामगायकांनां उत्तेजन देण्याचें काम यांच्याकडे असतें.

( ३ ) ध्रुवगोपः—हा एक उपऋत्विज आहे. सोमयागांमध्यें 'ध्रुव' नामक एक ग्रह ( सोमरसानें भरून ठेवलेल्या स्थालीच्या आकाराचा ) उत्तरहविर्धाननामक गाड्याच्या पुढच्या बाजूस ठेवलेला असतो. या ग्रहाचें संरक्षण करणें एवढेंच याचें कर्तव्य आहे.

( ४ ) पशुपालः—यज्ञांत हनन केले जाणारे पशू, दक्षिणा म्हणून देण्याकरितां असलेल्या गाई, घोडे, बैल, गाढव इत्यादि जनावरें व हविर्द्रव्यासाठीं दूध काढावयाच्या गाई यांचें संरक्षण करणारा वैश्यकुलोत्पन्न असा हा एक उपऋत्विज आहे.

( ५ ) प्रेष्यः—या नांवानें ओळखिले जाणारे कांहीं उपऋत्विज यज्ञांत असतात. यांचें काम म्हटलें म्हणजे अध्वर्यु, ब्रह्मा किंवा यजमान हे सांगतील तें करावयाचें असतें. यज्ञार्थ मदतीदाखल द्रव्य आणण्यासाठीं यजमान पाठवील त्यांच्याकडे जाणें व द्रव्य घेऊन येणें, यजमान व यजमानपत्नी यांची खाण्यापिण्याची तरतूद ठेवणें आणि यज्ञांत उत्पन्न होणारीं खटपटीचीं अनेक लहान मोठीं कामें करणें हें या प्रेष्यांचें कर्तव्य असतें. यज्ञाकरितां मदत म्हणून द्रव्य जमविण्यासाठीं ब्राह्मण क्षत्रिय व वैश्य या तिन्ही वर्गांचे प्रेष्य नियोजित करावयाचे असतात. सूत्रांत उल्लेखिलेले सनीहार ( द्रव्य आणणारे ) ते हेच तिन्ही वर्णांचे प्रेष्य होत.

( ६ ) दोग्धाः—यज्ञप्रसंगीं जमविलेल्या गाईंची नित्य धार काढण्याचें काम करणारा एक उपऋत्विज.

( ७ ) शमिताः—यज्ञांतील पशू मारतांना ते न ओरडतील अशा रीतीनें त्यांचें तोंड घट्ट दाबून धरून मारण्याचें कार्य करणारा एक धैर्यवान् माणूस.

( ८ ) हविष्कृतः—यज्ञांतील देवतांच्या उद्देशानें पुरोडाशादि हविर्द्रव्यें तयार करण्यासाठीं घेतलेलें भात अगर दुसरें धान्य सडणें, पाखडणें, निवडणें व त्याचें वाटून पीठ वगैरे करणें हें काम करणारा माणूस.

येणेंप्रमाणें सुमारें पंचवीस प्रकारचे ऋत्विज यज्ञास लागतात.

यज्ञामध्यें किती प्रकारचीं कर्मे गोंविलीं गेलीं आहेत याची कल्पना येण्यासाठीं खालील टीपा सोइस्कर होतील. या टीपांवरून यज्ञकालीं गायनवादन इत्यादि करमणुकीच्या कला, स्वयंपाक, दळणकांडण इत्यादि गृहकर्मे, कृषि, सोनारकाम, सुतारकाम इत्यादि शिल्पें व व्यवसाय यांसंबंधीं काय स्थिति होती तें थोडेंफार कळेल.

### —यज्ञांगभूत व यज्ञसंबद्ध कर्मे—

**अग्निमंथनः**—अग्नी उत्पन्न करण्यासाठीं केलें जाणारें जें मंथन अथवा घुसळण तें अग्निमंथन होय. अग्निहोत्रासाठीं जो अग्नि नित्य धारण करावयाचा असतो तो अग्नि मंथनानें उत्पन्न करतात. शमीच्या वृक्षावर यदृच्छेनें बीजप्ररोह होऊन जो पिंपळाचा वृक्ष वाढतो त्यास शमीगर्भ अशी संज्ञा आहे. या शमीगर्भ पिंपळाच्या झाडाची फांदी चांगली जाड पाहून तोडून आणावयाची व ती चांगली वाळल्यावर तिच्या फळ्या कापावयाच्या. हातभर लांब व टीचभर रुंद आणि ४ अंगुलें उंच अशा दोन

सारख्या फळ्या कापून काढतात त्यांस 'अरणी' म्हणतात. खांदी तोडून जमिनीवर पाडतेवेळीं तिची जी बाजू भूमीला लागलेली असेल त्या बाजूची फळी ही खालची म्हणजे 'अधरारणी' होय व वरच्या बाजूची फळी ती वरची किंवा 'उत्तरारणी' होय. उत्तरारणीचे फळींपैकीं तसूभर चौरस व आठ अंगुलें लांबीचा एक तुकडा शंकुकरितां काढावयाचा. एक 'सामता' तयार करून त्यांत तो शंकु फाळाच्या जागीं बसवावयाचा. नंतर अधरारणी भूमीवर ठेऊन तिच्या मधोमध किंकऱ्यानें थोडीशी गोल अशी पाव दोरी खोलीची खांच घ्यावयाची व तींत पूर्वोक्त शंकु बसविलेला सामता ठेवावयाचा. सामत्यावर भार पडण्यासाठीं एक आडवें लांकूड लाटण्यासारखें असतें तें एकानें दाबून धरावयाचें आणि एकानें सामत्याला दोरी लाऊन ती ताक घुसळतांना ओढतात तशी ओढावयाची म्हणजे खालच्या अरणीच्या खांचेंत शंकु फिरूं लागून घर्षणानें धूर निघूं लागतो. धूर निघूं लागल्यावर जरा जास्त ओढावें म्हणजे लवकरच पांढऱ्या स्वच्छ धुराचा लोट उत्पन्न होऊन अग्नि उत्पन्न होतो. अग्नि उत्पन्न होतांच मंथन बंद करावें लागतें. एखाद्या परळांत वाळलेल्या शेणींचा चुरा किंवा नारळाचें चोड तयार करून ठेवलेलें असतें त्यावर अरणींत उत्पन्न झालेला अग्नि झाडून घेतात म्हणजे कांहीं वेळानें त्या इंधनाच्या आश्रयानें तो चांगलाच प्रज्वलित होतो. नंतर त्याचा स्थापनेसाठीं उपयोग करण्यांत येतो.

मंथन करून अग्नि निर्माण करण्याची परंपरा आर्यलोकांत वैदिक काळापासून प्रचलित आहे. 'अथर्वा' नामक ऋषीनें अरणीपासून प्रथम अग्नि उत्पन्न केला व कमळाच्या पानावर त्याचें प्रज्वलन केलें असें वर्णन ऋग्वेद ६·१६,१३ या ऋचेंत आलें आहे व शमीगर्भ पिंपळाच्या लांकडांतून घर्षणानें अग्नि उत्पन्न करावा असें तैत्तिरीय ब्राह्मण, (१·१,९) ९ यांत सांगितलें आहे.

**कृषिः**—कृष् धातूचा अर्थ कर्षण करणें, ओढणें, असा आहे. शेती पिकविण्याला लायक अशी जमीन तयार करावयाची म्हणजे तिला प्रथम चांगली नांगरावी लागते. नांगरानें जमीन उकरली जाऊन माती इकडची तिकडे खेंचली जाते. नांगरानें मातीचें कर्षण केलें जातें व नंतर तींत बीज पेरलें जातें. जमीन नांगरल्यावांचून–कर्षण केल्यावांचून–बीज पेरतां येत नाहीं. म्हणूनच जमीन नांगरून तीस वळाला (बीज पेरण्याच्या लायकीस) आणणाऱ्यास कृषीवल–जमिनीस वळाला आणणारा–शेतकरी म्हणतात. शेतकीमध्यें नांगरट–जमिनीचें कर्षण–हें आद्यकर्म असल्यामुळें शेतकीस सामान्यतः कृषिकर्म म्हणण्याचा प्रघात आहे. कृषिकर्माची माहिती आर्य लोकांनां वैदिक कालापासून असल्याचें दिसतें. "बैल सुखानें नांगर ओढोत, नांगर हांकणारे कर्षक–शेतकरी–सुखानें नांगरणी करोत, नांगर सुखानें–न अडखळतां–चालो, बैलांच्या गळ्याला लावलेल्या 'आरुसा' न तुटतां नांगरणी होईपर्यंत टिकोत व बैलांनां मारावयाचा चाबुक एकसारखा उडत राहो"–( ऋ. ४·५७,४. ); "नांगरानें पडणाऱ्या हे रेषे ( तास ), तूं चांगली खोल अशी पडत जा, तुझ्या ठिकाणीं पेरलेलें बीं फोंपावून चांगलें उगवेल व आम्हांला धान्य पुष्कळ मिळेल अशी तूं हो. आम्ही तुला वंदन करतों"–(ऋ. ४·५७,६. ) असें वर्णन ऋग्वेदांत आलें आहे.

तैत्तिरीय संहितेंत 'अग्निचयन' प्रकरणामध्येंहि कृषिकर्माचा प्रकार आढळतो. अग्निचयनासाठीं कळकाच्या काठीनें जमीन आधीं मोजून घ्यावयाची असते. ही काठी दोन्ही हात वर करून उभ्या राहिलेल्या पुरुषाच्या उंचीइतकी घ्यावयाची. या काठीच्या मापाला 'पुरुष' (परूस) अशी संज्ञा आहे. चयनाच्या आत्म्या( मध्यभागा )साठीं ४ पुरुष व दोहों बाजूच्या पंखासाठीं १।१ पुरुष अशी जागा मोजून घेऊन मग ती जमीन नांगरावयाची असते. नांगराला ६ किंवा १२ बैल जुंपावयाचे असतात जितके अधिक बैल तितकी नांगरट चांगली होते हें मशहूरच आहे. ही नांगरट करणाऱ्या पुरुषांनां अनुलक्षून, "हे कर्षक हो ! ( नांगर हांकणाऱ्यांनों ! ) तुम्ही नांगराला जुंपलेल्या बैलांच्या गळ्याला चामड्याचे पट्ट ( वरत्रा ) काळजीपूर्वक अडकवा, बैल दमतील तेव्हां त्यांनां पिण्याकरतां पाण्याच्या डोण्या किंवा टांक्या( आहाव ) नीट भरून ठेवा. पाण्याचे हेळ उकरून ते गाळ वगैरे काढून साफ करा व स्वच्छ वाहूं लागूं द्या (तै. सं. ४·२,५); नांगरटीचें कामांत तरबेज असलेले पुरुष नांगर ( लांगल ) सज्ज करोत. त्याला बैल जोडावयाचीं 'जुवें' काळजीपूर्वक लावोत (तै. सं. ४·२,५ ); हे कर्षक हो ! नांगर जोडा. हा नांगर मोठमोठालीं डिखळें उकरून पुढें जावो; कारण त्याला तीक्ष्ण असा फाळ लावलेला आहे व बैलांला ओढावयास सोपा जाईल असा तो चांगला बनविलेला आहे (तै. सं. ४·२,६ ); अशा प्रकारचीं वर्णनें तैत्तिरीय संहितेंत आलीं आहेत.

**मसालाः**—नांगरट झाली म्हणजे त्या नांगरानें पडलेल्या भेगांमधून खूप चांगलें तूप ओतीत व एकवार चांगलें पाणी देत आणि नंतर त्या जमिनींत तीळ, उडीद, भात, सातू, राळे, वारकाचें भात, गहूं, हुलगे, सावे, रानतीळ इ. इ. धान्यें पेरीत.

**खाटकाचें काम.**—यज्ञामध्यें देवांनां हविर्भाग म्हणून जे पशू ( मेंढे, बकरे, मेंढ्या इ. इ. ) अर्पण केले जातात त्यांनां तोंड दाबून बुकलून मारण्याचें व ते मेल्यानंतर त्यांचीं शरीरें फाडून त्यांतून शास्त्रोक्त असे ठिकठिकाणचे भाग ( काळीज, जीभ, बरगडींतील मांसपिंड इ. इ. )

व्यवस्थेनें कापून काढण्याचें काम जो माणूस करतो त्यास 'शमिता' म्हणजे सोलणारा अशी संज्ञा आहे. देव जेव्हां यज्ञ करीत तेव्हां हें शमित्याचें काम 'अध्रिगु' व 'अपाप' या नांवाचे दोन पुरुष करीत होते. हल्लींच्या यज्ञांत हें काम असच्छूद्राकडून करविलें जातें. ह्या शमित्यांना-सोलणाऱ्यांना-अनुलक्षून 'मैत्रावरुण' नामक ऋत्विज आज्ञा करतो कीः-"हे शमिते हो! आपआपल्या कामाला लागा, आपआपल्या सुऱ्या पाजळा, पशु मारावयाच्या जागेवर गवताचा पेंढा पसरा, उत्तरदिशेस पाय करून पशूला आडवा पाडा व तोंड दाबून बुकलून त्याला मारा. मध्यें तुटूं न देतां त्याची कातडी सोलून काढा. नाभि कापण्यापूर्वीच वपा (कोठ्यावरील बारीक वेष्टण) नीट जपून काढा. पशूचें वक्षस्थल ससाण्यासारखें आहे तें संभाळून काढा. पशूचे पुढचे पाय छाटून निराळे करा. त्यांच्या पुढच्या बाजू छिलून सळईसारख्या करा. खांदे कांसवाच्या आकारासारखे असतात ते छाटा. मागच्या दोन्ही तंगड्या समग्र छाटून काढा. पशूच्या वरगड्यांचीं २६ हाडें उखळून काढा. प्रत्येक अंग (गात्र) काढाल तें समग्र काढा. छिन्न विच्छिन्न होऊं देऊं नका. सर्व अंगें यथाशास्त्र काढा. हें काम अवघड आहे, क्रूरपणाचें आहे, असें मनांत आणून तें करण्यास कचरूं नका," इ. इ. हवनासाठीं जीं जां पाहिजेत तीं तीं अंगें घेऊन राहिलेलें पशूचें शरीर भुईंत खळगा खणून त्यांत पुरून टाकतात. 'वपा' म्हणून जी कोठ्याला वेष्टण असलेली त्वचा काढण्यांत येते ती लांकडी तिकटीवर पसरून अग्नीवर भाजतात. नंतर ती सर्वच अग्नीमध्यें हवन करतात. बाकीचीं काढलेलीं काळीज, तंगड्या, इ. अंगें गवताच्या मुठ्यांत वांधून पाण्यांत घालून अग्नीवर खूप शिजवितात व नंतर त्यांचें हवन करितात (तैत्तिरीय ब्राह्मण ३·६,६ पहा).

**हजामत करणें.**—'चातुर्मास्य' नामक एक याग असून वैश्वदेव, वरुणप्रघास, साकमेध व शुनासीरीय असे त्या यागाचे ४ पोटविभाग किंवा 'पर्वें' आहेत. प्रत्येक पर्व संपल्यानंतर यागकर्त्या यजमानानें 'हजामत' करावयाची असते. ही हजामत कशी करावी याविषयीं नियम आहेत. नियमानुसार हजामत केल्यास तो याग देवांच्या यागाप्रमाणें होतो व नियम सोडून केल्यास त्या यागास आसुरी स्वरूप प्राप्त होतें. याविषयीं तैत्तिरीय ब्राह्मणांत आख्यायिका आहे ती अशीः—देवांनीं यज्ञांत जसें अनुष्ठान केलें तसेंच असुरांनीं केलें, पण हजामत मात्र देवांच्या पद्धतीप्रमाणें न करितां मनास वाटेल त्या रीतीनें केली. अगोदर कांखेंतील केंस काढावयास पाहिजेत हें त्या असुरांनां माहीतच नव्हतें. त्यांनीं (असुरांनीं) प्रथम डोक्यावरचे केंस काढले, नंतर मिशा काढल्या व नंतर कांखेंतले केंस काढले. अशा रीतीनें वरून खालीं अशा क्रमानें त्यांनीं हजामत केल्यामुळें ते अधोगतीला गेले व पराभव पावले. देवांनां हजामत कशी करावी हें नीट माहीत होतें. त्यांनीं हजामत करतेवेळीं अगोदर कांखेंतले केंस काढले, नंतर मिशा काढल्या आणि मग डोक्यावरील केंस काढले. खालून वर अशा क्रमानें देवांनीं हजामत केल्यामुळें देव विजयी होत्साते उन्नतीला पावले. असुरांसारखी हजामत करतील ते पराभूत होतील व देवांसारखी करतील ते विजयी होतील. मनूनें देव व असुर यांच्या रीतीपेक्षां हजामतीची एक तिसरीच तऱ्हा काढली. त्यानें आधीं मिशा काढल्या, नंतर कांखेंतील केंस काढले आणि शेवटीं डोक्यावरचे केंस काढले. अशा प्रकारच्या हजामतीमुळें मनु, प्रजा व पशू यांनीं संपन्न झाला. जो माणूस मनूप्रमाणें हजामत करवील तो मनूसारखा प्रजा व पशू यांनीं संपन्न होईल.

ताम्रमिश्रित लोखंडाच्या (तांबें व पोलाद यांचें मिश्रण) वस्तऱ्यानें हजामत करावी. 'सायाळ' अथवा साळु नांवाच्या एका जनावराच्या शेंपटीला मोठमोठाल्या कांट्यांचा झुवका असतो, त्यांपैकीं एक कांटा (साळीचा कांटा) ज्याच्यावर तीन पांढरे पट्टे आहेत असा घ्यावा व त्या कांट्यानें राखावयाचे असतील ते (शेंडीचे) केंस बाजूस करावे व नंतर पूर्वोक्त वस्तऱ्यानें हजामत करावी (तै. ब्रा. १·५,६ पहा). नंतर नखें काढावीं. डाव्या हाताचीं नखें आधीं काढून मग उजव्या हाताचीं नखें काढावीं. प्रथम करंगळीचें नख काढून क्रमानें अंगठ्यापर्यंतचीं नखें काढावीं. याच क्रमानें उजव्या हाताचीं नखें काढल्यावर डाव्या व उजव्या पायांचीं नखें करंगळीपासून अंगठ्यापर्यंतच्या क्रमानेंच काढावीं.

गृह्यकर्मामध्येंहि चौल, समावर्तन वगैरे संस्कारप्रसंगीं समंत्रक हजामत करावी लागते.

**दारू तयार करणें.**—'सौत्रामणि' नामक एक यज्ञ आहे. या यज्ञामध्यें सुरेचें-दारूचें-हवन आहे व त्यासाठीं दारू तयार करावी लागते. दारूमध्यें तीन प्रकार आढळतातः पैष्टी, गौडी, व माध्वी. धान्यापासून-पिठापासून-तयार होते ती दारू 'पैष्टी', गुळापासून जी दारू बनते ती 'गौडी' व फुलापासून किंवा फळापासून निघणाऱ्या मधुर रसापासून तयार केली जाणारी दारू ती 'माध्वी'. 'सौत्रामणि' यज्ञांत जी दारू तयार केली जाते ती 'पैष्टी'. जातीची दारू होय. ही दारू कशी करतात हें बौधायन कल्पसूत्राच्या आधारें येथें स्पष्ट करीत आहों.

साळीच्या भाताचें ओलें व कोंवळें तृण (तरू, तरवा) शिसें मोबदला देऊन विकत आणीत, तें नपुंसक माणसापासून विकत घ्यावें असें तैत्तिरीय ब्राह्मण १·८,५. या ठिकाणीं व कल्पसूत्रांत सांगितलें आहे. अग्नीवर खापर ठेऊन त्यांत भाताच्या लाह्या भाजून तयार करीत. ज्या भातकणांच्या लाह्या बनत नसत असे जे 'गणंग' ते निराळे काढून ठेवीत. नंतर खूप पाणी घालून पातळ भरभरीत असा तांदुळाचा भात शिजवीत.

मग तो पातळ भात लोंकरीच्या वस्त्रानें गाळून त्याची पेज निराळी काढीत व त्यांतील वलक (चोथा) निराळा एका भांड्यांत ठेवीत. पातळ भात गाळून निघालेली पेज (रसा) एका खापराच्या घागरींत ओतून त्यांत भातांतील न शिजतां निघालेले पाकड वगैरे असतील ते वाटून त्यांची भुकी टाकीत. शिवाय लाह्या न बनतां राहिलेले गणंगहि त्या रसांत टाकीत. भाताच्या पातळ रसांत हे दोन पदार्थ टाकून बनलेल्या मिश्रणास 'मासर' असें म्हणत. नंतर मोजण्यासाठीं कांहीं एका प्रमाणाच्या मापाचें भांडें तयार करून त्या मापानें एक माप विकत घेतलेलें भाताचें कोवळें गवत (शष्प), दोन मापें साळीच्या भाताला आलेले 'मोड' (तोक्म), तीन मापें लाह्या आणि चार मापें दुधांत कालविलेलें भाजक्या सातूचें पीठ दर्भांनीं झांकून अंबविलेलें असेल तें (नग्नहु) असे पदार्थ एकत्र घेऊन ते वाटून त्यांचें चूर्ण बनवीत व हें चूर्ण रसा सांठविलेल्या डेऱ्यांत टाकीत. नंतर एका चार पायाच्या व दोऱ्यांनीं विणलेल्या घडवंचीवर गवताची एक चुंबळ ठेऊन त्यावर ती रशाची घागर ठेवीत व त्याच्यावर कातड्यानें मढविलेलें बुरडी झांकण ठेवीत आणि झांकण व घागर यांचा संधिभाग पूर्वीं भाताचा रसा गाळल्यावर उरलेला चोथा ठेवलेला असतो त्या चोथ्यानें लिंपून बंद करीत. अशा रीतीनें बंद केलेली ती रशाची घागर तीन दिवस तशीच कायम ठेवीत व चवथ्या दिवशीं त्या घागरींतील रशाचें हवन करीत.

पूर्वोक्त प्रकारानें तीन दिवस आंवत ठेऊन बनविलेला तांदुळाचा रसा हीच 'पैष्टी' दारू होय. या दारूचें इन्द्र (सुत्रामा) देवतेसाठीं हवन सांगितलें आहे, पण हवनशेष दारूचें भक्षण सांगितलें नाहीं. तें पिण्यासाठीं पैसे देऊन एखादा ब्राह्मण बोलावीत व तो न मिळाल्यास ती हुतशेष दारू वारुळावर ओतून टाकीत. यज्ञामध्येंहि हुतशेष सुरेचें पान करावयाचें नाहीं ही लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट आहे. वाजपेयनामक यज्ञांतहि सुरेचे पेले भरून घ्यावयाचे आहेत पण ते रथांची शर्यत खेळणाऱ्यांनां उत्तेजनार्थ प्यावयास द्यावयाचे असतात. ही रथाची शर्यत खेळणारेहि ब्राह्मण नाहींत हें लक्षांत घेतलें म्हणजे वेदांतहि सुरापान निषिद्धच आहे हें उघड होतें.

(पहा तैत्तिरीय संहिता, १·८,२१; तै. ब्राह्मण १·८,५ व ६; तै. ब्रा. १·४,२ व बौधायन कल्पसूत्र १७·३२ ते ३८).

**स्वयंपाक करणें.**—'पाक' म्हणजे शिजविणें व 'स्वयं' म्हणजे स्वतः. यावरून स्वयंपाक म्हणजे स्वतः शिजविणें हा अर्थ निघतो. यज्ञांमध्यें अग्नीच्या ठिकाणीं जीं हवनीय द्रव्यें समर्पिलीं जातात त्या द्रव्यांमध्यें पुरोडाश, चरु (भात), धाना, करंभ, परिवाप, आमिक्षा, वाजिन इ. इ. द्रव्यें आहेत. यांपैकीं पुरोडाश व चरु या पदार्थांचें हवन ज्यास्त प्रमाणांत आहे.

चरुः—हा जरी प्रायः तांदुळाचा करावयाचा असतो तरी प्रसंगविशेषीं सातू, नीवार, सांवे, गवताचें बीं, राळे इ. अनेक द्रव्यांचे चरू शिजवावे लागतात. कांहीं ठिकाणीं दुधामध्यें चरु शिजवावयाचा असतो, तर कोठें कोठें तुपांत शिजवावयाचा असतो. आधानामध्यें ब्रह्मौदनसंज्ञक भात शिजवावयाचा तो दुधांत शिजवावा असें सांगितलें आहे (हि. सू. पहा), तर अग्निष्टोमामध्यें प्रायणीयेष्टींतील 'अदिति' देवतेसाठीं तुपांत चरु शिजवावा म्हणून सांगितलें आहे (हि. सू. पहा). भात पाण्यांत शिजविण्यापेक्षां दुधांत अगर तुपांत नीट रीतीनें शिजविणें विशेष कौशल्यावांचून कठिण आहे. शिवाय लौकिकामध्यें भात शिजवितांना तो कड येऊन उतूं गेला म्हणून कांहीं विघडत नाहीं, पण यज्ञांतील भात शिजवितांना तो उतूं न जातां शिजविण्याचा विधि आहे. उतूं गेल्यास प्रायश्चित्त करावें लागतें. अर्थात् भात उतूं न जातां शिजविणें कुशलतेचें काम आहे. चातुर्मास्य यागांत गृहमेधीयेष्टीमध्यें तांदुळाची खीर दुधांत तयार करावी लागते (तै. ब्रा. १·६,६ व ७). चरु शिजविण्याकरितां तांदूळ कुटण्याचें काम यजमानपत्नी करीत असते, पण शिजविण्याच्या कामांत तिचा संबंध नसतो. तें काम अध्वर्यु अगर नियोजित असलेला ऋत्विजच करीत असतो.

पुरोडाशः—सातू अगर तांदूळ वाटून पीठ करावयाचें व त्यांत अधणाचें कढत पाणी घालून गोळा तयार करावयाचा व तो एका अगर अनेक खापराच्या तुकड्यांवर ठेऊन त्याला निखाऱ्यांची खूप आंच देऊन कुशलतेनें तो गोळा न जळतां पक्क होईल असा तयार करावयाचा म्हणजे तो पुरोडाश सिद्ध झाला.

धानाः—ओले सातू अग्नीवर एका खापरांत खूप भाजावयाचे इतके कीं, त्यांतील कांहीं करपले गेले पाहिजेत. अशा भाजलेल्या यवांनां 'धाना' म्हणतात (तै· ब्रा. ३·८,१४).

करंभः—भाजलेल्या सातूचें पीठ तुपांत कालविलें म्हणजे त्याला करंभ म्हणतात (तै. ब्रा. ३·८,१४).

परिवापः—भाताच्या लाह्या (तै. ब्रा. ३·८,१४).

आमिक्षाः—आदल्या दिवशीं रात्रीं दूध विरजून त्याचें दहीं करून ठेवावयाचें. दुसऱ्या दिवशीं सकाळीं निराळें दूध कडकडीत तापवून त्यांत पूर्वीं तयार केलेलें दहीं घालून आंच द्यावयाची. हें मिश्रण गाळून खालीं पाणी पडतें त्यास 'वाजिन' व चोथा राहतो त्यास 'आमिक्षा' ही संज्ञा आहे.

पोहेः—अश्वमेधामध्यें अन्नहोम म्हणून सांगितला आहे त्यांत पोह्यांचें हवन आहे (तै. ब्रा. ३·८,१४).

भाजीपाले, कोशिंबिरी व इतर पक्वान्न वगैरे प्रकार वेदांत कोठें आढळत नाहींत.

**सोनारकाम**ः—यज्ञामध्यें प्रत्यक्ष सोनार येऊन एखादा दागिना किंवा कोणताहि जिन्नस बनवितो अशा प्रकारचा विधि आढळत नाहीं. तथापि सोनारांनीं बनविलेले पदार्थ यज्ञांत अनेक वेळां उपयोगांत आणण्याचें कारण पडतें. यज्ञामध्यें उपयोगी असेच जिन्नस ज्या अर्थी सोनाराकडून तयार केले जात, त्या अर्थी प्रत्यक्ष नाहीं तरी पर्यायानें यज्ञांत सोनारी कामाचा निकट संबंध येतो हें उघड सिद्ध होतें. सोनाराकडून तयार करवून यज्ञांत उपयोगांत आणावयाच्या पदार्थांपैकीं कांहीं येथें देतों.

१. अग्निष्टोमादि सोमयागांत 'प्रवर्ग्य' करणें असल्यास त्यांत १ रुप्याचा व १ सोन्याचा असे २ वाटोळे पत्रे ( रुक्म ) उपयोगांत आणावयाचे असतात.

२. चयनामध्यें यजमानाच्या गळ्यांत एकवीस ठिपके उठविलेलें एक सुवर्णपदक ( रुक्म ) बांधावयाचें असतें.

३. कृष्णयजुःसंहितेंत एक याग आला आहे. यागनिमित्तानें एकादी शेळी मारली गेली व तिचें पोट फाडल्यावर ती गर्भिणी आहे असें आढळून आलें तर त्या गर्भाचाहि याग करावा असें विधान तेथें आलें आहे. मारलेल्या शेळीचे चार पाय व गर्भाचे चार पाय मिळून आठ पाय होतात अशा रीतीनें सगर्भ शेळीचें हवन आठपायाच्या पशूचें हवन सिद्ध होतें व म्हणूनच या यागाची दक्षिणा म्हणून 'अष्टाप्रूड्ढिरण्य' ( आठ ठिपके उठवलेलें सोनें ) द्यावें असा विधि आहे.

४. वाजपेय यज्ञामध्यें सर्व ऋत्विजांनीं सोन्याच्या कंठ्या गळ्यांत घालाव्या व होत्यानें ज्या कंठींत सोन्याचीं 'वज्र'-नामक रत्नें जडविलेलीं १०० कमलपुष्पें आहेत अशी कंठी धारण करावी ( आ. श्रौ. सू. उ. षट्क ३·९ ).

५. राजसूयामध्यें सर्वांनीं सोन्याच्या फुल्या मारलेले पाट बसावयास घ्यावे ( आ. श्रौ. उ. ३·३ ).

६. अश्वमेधामध्यें 'पारिप्लव'नामक शंसन करावयाचें असतें. या प्रसंगीं शंसन करणारानें व प्रतिगर देणाऱ्या अध्वर्यूनें 'स्वर्णखचित' आसनावर बसावें (आ. श्रौ. उ. ४·७).

७. दशपेयनामक यज्ञांत उद्गात्याला सोन्याची कंठी द्यावी ( बौ. श्रौ. सू. १२·१८ ) दूणाशप्रणीत अग्निष्टोम यज्ञामध्यें 'निष्क'नामक एक सुवर्णालंकार होत्याला व एक सोन्याची कंठी उद्गात्याला दक्षिणा द्यावी असें सांगितलें आहे ( लाट्यायन श्रौ. सू. ८·१०,३ व ४ ). दशपेययागांत आश्वलायनानें होत्याला 'रुक्म'नामक सुवर्णालंकार द्यावा असें म्हटलें आहे ( आ. श्रौ. उ. ३·४ ). अध्वर्यु व प्रतिप्रस्थाता यांनां सोन्याच्या चौकटींत वसविलेले आरसे द्यावेत ( तै. सं. १·८,८ ) व आश्वलायनाच्या मतानें सोन्याचीं कुंडलें द्यावींत असें आहे ( आ. श्रौ. उ. ३·४ ). याच यज्ञांत उद्गात्यानें आपल्या गळ्यांत जिच्यामध्यें तीन सुवर्णकमलपुष्पें ओंवलीं आहेत अशी कंठी घालावी ( ला. श्रौ. ९·२,९ ).

८. राजसूय यज्ञांत एके ठिकाणीं द्यूत खेळण्याचा विधि आहे त्या प्रसंगीं खेळावयाचे 'फांसे' अगर 'कवडे' सोन्याचे करण्याचा विधि आहे ( बौ. श्रौ. १२·१५ ).

९. अतिरात्र क्रतूमध्यें ब्रह्याला सोन्याची वाटी मधानें भरून द्यावयाची असते.

१०. शत्रुपक्षीय राजाची शक्ति बंद पडावी म्हणून कराव्या लागणाऱ्या इष्टीमध्यें सोन्याचें 'दावें' दक्षिणा म्हणून द्यावें असा विधि आहे ( तै. सं. २·४,१३ )

**सुतारकाम**.—घरगुती सामान. घरगुती सामान म्हणजे गृहप्रपंचांत उपयोगी पडणारें सामान. अशा तऱ्हेचें सामान यज्ञप्रसंगानें वेदांत कसकसें उपयोगांत आणलें ह्याची स्पष्टता होण्यासाठीं यज्ञोपयोगी अशा घरगुती सामानाचें हें लहानसें टिपण लिहीत आहों.

तल्पः—'तल्प' म्हणजे मंचक ( पलंग ). महाव्रतामध्यें मंचकावर बसून उद्गात्यानें सामगान करावयाचें असतें. ( तै. ब्रा. १·२,५ ).

प्रेंखः—प्रेंख म्हणजे दोला ( झोंपाळा ). महाव्रतामध्यें झोंपाळ्यावर वसून होत्यानें शस्त्रें म्हणावयाचीं असतात.

आसंदीः—विणलेली घडवंची ( खुर्ची ). महाव्रतामध्यें उद्गात्यानें घडवंचीवर बसून गावें असें विधान आहे. ( तै. सं. ७·५,९ ).

उखळ–मुसळः—अग्निचयनामध्यें विटा मांडून श्येनपक्षी इत्यादि १८ प्रकारच्या आकृतींनीं युक्त असें हवनस्थल तयार करावयाचें असतें. जेथें हें स्थळ वनवावयाचें तेथें आधीं कांहीं वस्तू भूमींत पुरावयाच्या असतात. उदाहरणार्थ, जिवंत कांसव, सुचा इ. इ. या वस्तूंमध्यें धान्यांनीं भरलेलें लांकडी उखळ व त्याच्या शेजारीं मुसळ पुरावयाचें असतें. ( बौ. श्रौ. सू. १०·३३ ).

पळीः—यज्ञांतील हवनप्रसंगीं पुनः पुन्हां लांकडाच्या पळीनें तुपाचा होम करावा लागतो.

पाळीः—'स्थपतिसव'नामक यज्ञांत दह्याचा अभिषेक यजमानाच्या मस्तकावर करावयाचा असतो. अभिषेकाचें दहीं एका उंवराच्या लांकडाच्या पाळ्यांत घ्यावयाचें असतें. कौंडपायिननामक सत्रांत सोमपान विनदांड्याच्या पाळ्यांनीं करावयाचें असतें ( बौधा. सू. १०·२० ). अग्निष्टोमादि यज्ञांत सोमपान करावयाचें तें दांडा असलेल्या पाळ्यांनीं करावयाचें असतें. दांडा असलेल्या पाळ्याला 'चमस' म्हणतात.

मेक्षणः—मेक्षण म्हणजे लांकडी 'उलथनें'. याचा उपयोग पुरोडाशाचें पीठ ढवळण्याकडे इष्टीमध्यें करावयाचा असतो ( हि. श्रौ. सू. १·४ ).

मंडपाचें कामः—सोमयागामध्यें प्राग्वंश, सद, हविर्धान आग्नीध्रीय व मार्जालीय असे मंडप बांधावयाचे असतात.

प्राग्वंशः—ज्या मंडपाच्या आढ्याला पूर्वेस शेंडा करून कळक घातलेला असतो तो 'प्राग्वंश' होय. प्राग्वंश मंडपाची पूर्वपश्चिम लांबी १६ प्रक्रम असते. १५ अंगुलें म्हणजे पद. २ किंवा ३ पदें म्हणजे प्रक्रम. कोणी कोणी १ पदाचाहि प्रक्रम मानतात. या प्राग्वंश मंडपाची रुंदी १२ प्रक्रम असते. चारी बाजूंनां मधोमध २४ अंगुलें रुंदीचीं दारें ठेवावयाचीं असतात. प्रत्येक दाराच्या दोन्ही बाजूंस एक एक आणि मंडपाच्या चारी कोंपऱ्यांत एक एक असे खांब द्यावयाचे असतात. पूर्व बाजूचे खांब किंचित् उंच द्यावयाचे असतात, कारण प्राग्वंश मंडप पूर्वबाजूस थोडा उंच व पश्चिमेकडे थोडा सखल झाला पाहिजे. या मंडपावर ताडपत्र्या किंवा कशाच्या तरी झांकण्या टाकून मंडपाभोंवतीं कांबी वगैरे लावून कूड घालावयाचा असतो. चारी बाजूंनां धूर जाण्यासाठीं व प्रकाश येण्यासाठीं एक एक गवाक्ष ठेवावयाचें असून ईशान्य दिशेस एक पांचवें झरोकें ठेवावयाचें असतें.

सदः—सद म्हणजे सभास्थान. हा मंडप महावेदीच्या पश्चिम अंगास असतो. २४ अंगुलांच्या कांड्यानें या मंडपासाठीं दक्षिणोत्तर २७ कांडीं लांब व पूर्वपश्चिम ९ कांडीं रुंद असें स्थळ आंखून घेतात.

या मंडपाला ६।६ खांबांच्या दक्षिणोत्तर तीन ओळी असतात व त्याला पूर्वेस १ व पश्चिमेस १ अशीं दोन दारें प्राग्वंश मंडपाप्रमाणेंच करावीं लागतात. या मंडपाच्या वर ९ कळक उत्तरेस शेंडे करून घालावयाचे असतात व त्यांच्यावर ६ कळक पूर्वेस शेंडे करून घालावयाचे असतात. मंडपाच्या मधल्या ओळींतले खांब यजमानाच्या डोक्याइतके उंच असतात. पूर्व व पश्चिम या दोन ओळींतील खांब यजमानाच्या बेंबीइतके उंच असतात. या योगानें मंडप दुपाखी व सुंदर दिसतो. वर टाकलेल्या कळकांच्यामधून पांझरण घालून मंडप झांकून टाकलेला असतो. मंडपाच्या कडेनें कांबींचा कूड घालतात. पूर्वेच्या दाराच्या दोन्ही बाजूंच्या खांबांस दर्भ गुंडाळून त्यांनां दोरीचे वेढे दिलेले असतात.

हविर्धानः—हविर्द्रव्यें ठेवण्याचा जो मंडप तो हविर्धान मंडप. या मंडपाची लांबीरुंदी ठराविक नाहीं. जरूरीच्या दृष्टीनें त्याची लांबीरुंदी कमीअधिक धरतात.

या मंडपाची कृति विशेष पंचाइतीची नाहीं. याच्या वरतीं आढें व दुसरे कळक टाकतात. सभोंवतीं कूड घालतात. याला पूर्वेकडे एक व पश्चिमेकडे एक अशीं दोन दारें असतात. पूर्व दाराजवळच्या खांबास दर्भ गुंडाळतात.

आग्नीध्रीय व मार्जालीय.—हे दोन मंडप महावेदीच्या दक्षिणोत्तर असतात. आग्नीध्रीय उत्तरेस व मार्जालीय दक्षिणेस असतो. या मंडपांचा अर्धाअर्धा भाग महावेदीच्या आंत असतो व अर्धाअर्धा बाहेर असतो. हे दोन्ही मंडप हमचौरस १२० अंगुलांचे असतात. आग्नीध्रीय मंडपास दक्षिणेस तोंड करून एक दार असतें व मार्जालीय मंडपास उत्तरेस तोंड करून एक दार असतें. खांब किती द्यावेत वगैरेबद्दल नियम नाहीं.

इतर सामानः—गृहप्रपंचांत जरूर लागत नसून यज्ञांतच फक्त ज्या लांकडी पदार्थांचा उपयोग होतो असे पदार्थ येणेंप्रमाणेंः—स्रुक्, शफ ( सांडस ), ग्रह ( सोमरसाचे पेले ), स्फ्य ( तरवार ), आसंदी ( दर्भांनीं विणलेल्या घडवंच्या ), रथ, गाडे, वगैरे.

**कुंभारकाम.**—विटा व शेगड्याः—श्रौतप्रकरणांतील 'अग्निचयन' विधीमध्यें निरनिराळ्या आकृतींच्या विटांनीं वहिरी ससाण्याच्या आकृतीचें एक स्थंडिल तयार करावयाचें असतें. या स्थंडिलास श्येन'चिति' म्हणतात. या 'चितीच्या' रचनेस एकंदर १००० विटा लागतात. बौधायन सूत्रांतील पद्धतीप्रमाणें चतुर्थी, अर्ध्या, पाद्या, हंसमुखी, चोडा व नाकसदा अशा संज्ञा आकृतिभेदानें या विटांनां प्राप्त झाल्या आहेत. याशिवाय याच विटांमध्यें षोडशी, चतुरस्रपाद्या, असेहि अवांतर भेद आहेत.

विटांखेरीज अग्निचयनामध्यें तीन शेगड्या तयार करावयाच्या असतात. या तीन शेगड्या, तसेंच मंडला व ऋषभा नामक विटा ह्या तयार करण्यापासून तों भट्टी लावून भाजीपर्यंतचें सर्व काम अध्वर्यूच करीत असतो. बाकीच्या सर्व विटा नमुन्याप्रमाणें कुंभाराकडून भाजवून उपयोगांत आणावयाच्या असतात. निर्ऋति देवाच्या उद्देशानें तीन इष्टका स्वाभाविक रीतीनें भेग पडलेल्या भूमीवर मांडावयाच्या असतात. त्या धान्याच्या ( भाताच्या वगैरे ) कोंड्याची आंच देऊनच भाजावयाच्या असतात. कुंभारानें विटा भाजण्याचा प्रकार विधिदिष्ट नाहीं. शेगड्या व मंडला वगैरे विटा अध्वर्यूसच तयार कराव्या लागत असल्यामुळें त्याचा विधि म्हणजे पद्धति येथें देत आहों.

एक घोडें व एक गाढव घेऊन अध्वर्यु, यजमान, ब्रह्मा इत्यादि मंडळी माती आणण्यासाठीं मातीची खाण असेल तेथें जात. खाणीची जागा घोड्याकडून ओलांडवीत. नंतर तेथें तुपाची आहुति देऊन त्या खाणींतील माती कळकाच्या काठीनें खणीत. खणलेली माती हरणाच्या कातड्यावर एक कमळाचें पान ठेऊन त्याच्यावर भरून घेत. नंतर त्या मातीवर पुन्हां

एक कमळाचें पान झांकीत व हरणाच्या कातड्यांत त्या मातीचें गाठोडें बांधीत. नंतर तें मातीचें ओझें (गांठोडें) गाढवाच्या पाठीवर लादीत व यज्ञभूमीचे ठिकाणीं परत येत. आल्यानंतर तें गाठोडें सोडून त्यांत असलेल्या मातींत बेताचें पाणी ओतून ती माती चांगली कालवीत. मातीला चिकटपणा येण्यासाठीं खापराची भुकटी, चुनखडीची भुकटी, बोकडाचे केंस त्या मातींत मिश्र करून ती खूप कमावीत. याप्रमाणें माती चांगली चिकण झाली म्हणजे तिच्यापैकीं थोडी शिल्लक राखून बाकीचीचा एक मोठा गोळा तयार करीत. मग त्या एका गोळ्याचे तीन गोळे करीत. पुन्हां एकेका गोळ्याचे तीन तीन भाग करीत. मग त्या तीन भागांतला एक भाग उखा (शेगडी) तयार करणाऱ्या कारागिराच्या हातीं देत. तो त्या मातीनें शेगडीचें बूड तयार करी. नंतर दुसरा भाग देत. त्यानें तो शेगडीचा मध्य भाग बनवी. शेवटीं तिसरा भाग देत. त्या भागानें तो शेगडीचा वरचा भाग बनवी. या रीतीनें शेगडी तयार होई. ही शेगडी बाहेरून दिसण्यांत तिमजली, वीतभर उंच व जमेल त्या रीतीनें रुंद अशी बनत असे. ह्या शेगडीच्या वरच्या बाजूस ३।४ बोटें अंतर सोडून एक कंगोरा ठेवण्यांत येई. ही शेगडी अष्टकोनी आकाराची बने. शेगडीच्या तोंडाशीं प्रत्येक कोंपऱ्यास व कंगोऱ्याच्या प्रत्येक कोंपऱ्यास स्तनाच्या आकाराची एकेक बोंडशी शोभेसाठीं करीत.

याप्रमाणें ३ शेगड्या तयार करीत. नंतर ५ ऋषभेष्टका व ३ मंडलेष्टका शिलकी मातीच्या तयार करीत. मग शेगड्या व विटा सुकत ठेवीत. वाऱ्यानें अगर उन्हानें शेगड्या अगर विटा चिरटल्यास शिलकी मातीनें त्या चिरा बुजवून टाकीत व पुन्हां सुकवीत. शेगड्या व विटा वाळून तयार झाल्या म्हणजे त्या शेगड्यांनां आंतून व बाहेरून आणि विटांनां सर्व बाजूनें घोड्याच्या लेंड्यांची धुरी देत. मग यज्ञशालेच्या उत्तरेस मांड्याइतकी खोल अशी खांच खणीत व तींत पाचोळा, गोंवऱ्या इत्यादि 'जळण' पसरीत. नंतर त्या जळणावर त्या शेगड्या व विटा ठेवीत व पुन्हां त्यांच्यावर 'जळण' रचीत व वरून मातीचा सारखा लेप देऊन भट्टी बांधून काढीत. या भट्टीला ४ बोटें व्यासाचें भोंक भट्टी पेटवून देण्यासाठीं भट्टीच्या चारी बाजूंस राखीत नंतर चारी बाजूंनीं भट्टी पेटवून देत. सकाळीं भट्टी लावली तर संध्याकाळीं ती तयार होईल असें समजत व संध्याकाळीं भट्टी लावली असल्यास सकाळपर्यंत ती भट्टी भाजून निघण्याची मुदत मानीत. भट्टी भाजली म्हणजे गाईचें दूध, शेळीचें दूध, थापी (थापटणें), दगडाची भुकी, एक पातेलें, चिमटा, एक पाटी, एक शिंकें व हरणाचें कातडें असें सामान बरोबर घेऊन भट्टीजवळ येत. भट्टी खुली केल्यानंतर थापटण्यानें एका शेगडीवरील निखारे बाजूस सारीत व चिमट्यानें ती शेगडी उचलून पातेल्यांत ठेवीत (या पातेल्यास कुंभार लोक 'सतेल' म्हणतात). नंतर त्या शेगडीवर बाहेरून व आंतून शेळीचें दूध शिंपडीत व मागून गाईचें दूध शिंपडीत. याप्रमाणें सर्व गोष्टी करून बाकीच्या दोन्ही शेगड्या व विटा भट्टींतून पातेल्यांत काढून घेत. भट्टीच्या कमजास्त आंचेमुळें शेगडीला अगर विटांनां कोठें चीर गेली असल्यास किंवा एखाद्या ठिकाणाची खपली निघाली असल्यास बरोबर आणलेली दगडाची भुकटी शेळीच्या दुधांत कालवीत व त्या लुकणानें चिरटलेली अगर खपली पडलेली जागा दुरुस्त करून त्या भागास जळत्या अंगाराची आंच देत. नंतर हे सर्व पदार्थ मोठ्या पाटींत भरीत आणि त्यांजवर हरणाचें कातडें झांकण घालून यज्ञशालेंत योग्य ठिकाणीं ती पाटी शिंक्यावर टांगून ठेवीत असत. मग जरूर त्या वेळीं त्या शेगड्यांचा व विटांचा उपयोग करीत.

उतरंडीच्या आकाराचीं बोळकीं:—अग्निष्टोमादि यज्ञांत प्रवर्ग्य म्हणून एक कर्म असतें. त्यांत एका उतरंडीच्या आकराच्या बोळक्यांत तूप कडकडीत तापवून त्यांत गाईचें व शेळीचें दूध घालावयाचें असतें. या प्रवर्ग्य पात्रास—उतरंडीच्या आकाराच्या बोळक्यास—'महावीर' म्हणतात. या बोळक्याप्रमाणेंच तूप घेण्यासाठीं एक स्थाली (तोगलें) तयार करावयाचें असतें व दोन वांटोळीं कपालें तयार करावीं लागतात.

मडकीं (मोघे):—चयनक्षेत्रांत एक मोठा 'मोघा' व एक लहान मडकें पाण्यानें भरून तीं दोन्हीं मृत्पात्रें जमिनींत एका कोंपऱ्यांत पुरावयाचीं. याप्रमाणें राहिलेल्या तिन्ही कोपऱ्यांत पूर्वोक्त मृत्पात्राच्या जोड्या पुरावयाच्या.

घागरी व माठ (डेरा):—अग्निष्टोम यज्ञांत सोम कुटण्याच्या आदल्या दिवशीं सोम कुटतांना पाणी शिंपडण्याकरितां व दुसरीकडे पाणी उपयोगांत आणण्यासाठीं वाहत्या नदींतून एक मातीची घागर भरून आणून ठेवण्याची असते तिला वसतीवरी म्हणतात. दुसऱ्याहि लहान लहान मातीच्या घागरी यज्ञांत पाण्यासाठीं लागतात. त्यांनां 'एकधना' म्हणतात. प्रवर्ग्योद्वासन नामक कर्मांत एक मोठा 'डेरा' पाण्यानें भरून आपल्या खांद्यावर घेऊन आग्नीध्रनामक एक ऋत्विज उत्तरवेदीसभोंवतीं खांद्यावरील डेऱ्यांतील पाण्याची धार अखंड पाडवीत तीन प्रदक्षिणा घालीत असतो.

परळ:—अनेक प्रसंगीं चार ब्राह्मणांनां भात शिजवून खाऊं घालावयाचा असतो. या भाताला ब्रह्मौदन (ब्राह्मणांनीं खावयाचा भात) म्हणतात. अग्न्याधानांत असा ब्रह्मौदन शिजवावा लागतो. शिजविण्याचे तांदूळ मोजून घ्यावयाचे असतात. चौघां ब्राह्मणांच्यासाठीं ४ 'शराव' भरून तांदूळ घ्यावयाचे असतात. 'शराव' म्हणजे परळ. हा 'शराव' एका

ब्राह्मणास पुरेसे होतील इतके तांदूळ मावतील एवढा मोठा असतो.

**चांभारकामः**—यज्ञामध्यें प्रत्यक्ष चांभारानें येऊन कांहीं करावयाचा विधि नाहीं. पण चांभारानें तयार केलेल्या वस्तू यज्ञांत वापरावयाच्या असल्यामुळें पर्यायानें चांभारकामाचा संबंध यज्ञविषयांत येतो.

जोडेः—अग्निचयनामध्यें विटा मांडून श्येनाकृति निर्माण करण्याचें काम चालू असतां अध्वर्यु, यजमान व इतर विटा मांडणारांनीं हरणाच्या कातड्याचे तयार केलेले जोडे घालावयाचे असतात. मात्र या कातड्याला केंस कायम पाहिजेत व ते वरच्या बाजूस करून जोडा तयार केलेला पाहिजे. ( बौ. श्रौ. सू. १०·३७ ).

ओलें कातडें:—महाव्रतामध्यें ब्राह्मण व शूद्र यांच्यामध्यें कातड्याची ओढाओढी प्रश्नोत्तरें करून करावयाचा विधि आहे. वाटोळें कापलेलें एक ओलें कातडें एका बाजूनें ब्राह्मण व एका बाजूनें शूद्र ओढीत असतात. ( तै. ब्रा. १·२,६ ).

हल्लींच्या काळीं कातड्याचें काम करणारांत दोन भिन्न भिन्न जाती आहेत, एक चांभार व एक ढोर. जनावराच्या शरीरापासून कातडें सोलण्याचें काम ढोर किंवा चांभार हे दोघेहि करीत नाहींत. तें काम 'महार' करतात. ओलें कातडें किंवा वाळलेलें कातडें ढोर महाराकडून घेतात व तें कमावून, रंगवून उपयोगांत आणण्याच्या लायखीचें करतात. मग त्या पक्क्या कातड्याच्या वस्तू, कातडें वाटेल त्या रीतीनें कापून अगर शिवून चांभार तयार करतो. सारांश तयार कातड्याला उपयोगांत आणण्याचें काम चांभाराचें व कातडें कमविण्याचें काम ढोराचें.

निरनिराळ्या जनावरांचीं कमावलेलीं कातडीं:— वाजपेयांत यजमान यूपावरून खालीं उतरतांना एका घडवंचीवर पसरलेल्या बोकडाचे कातड्यावर पाय ठेऊन उतरतो ( तै. ब्रा. १·३,७ ).

वाघाचें कातडें:—राजसूय यज्ञांत वाघाच्या कातड्यावर यजमानास बसवून उदकानें त्याला अभिषेक करावयाचा असतो ( तै. ब्रा. १·७,८ ).

डुकराच्या कातड्याचे जोडेः—राजसूय यज्ञांत एका प्रसंगीं डुकराच्या कातड्याचे जोडे घालावे लागतात ( तै. ब्रा. १·७,९ ).

वादी व चामड्याच्या दोऱ्याः—तीन धनुष्यांच्या दानाबरोबर धनुष्यांनां लावण्याच्या दोरींचें दान राजसूय यज्ञांत एका प्रसंगीं आहे ( तै. ब्रा. १·८,४ ).

हरणाचें कातडें:—याचा उपयोग इष्टीसारख्या सामान्य यागापासून तों मोठमोठ्या यज्ञांपर्यंत होतो. हरिणाचें कातडें फार प्रसंगीं लागतें. बृहस्पतिसव यज्ञांत ब्राह्मण यजमानाला कृष्णाजिनावर म्हणजे हरणाच्या कातड्यावर बसवून अभिषेक करावयाचा असतो ( तै. ब्रा. २·७,२).

बैलाचें कातडें:—वैश्यसवांत वैश्याला ऋत्विजांनीं अभिषेक करणें तो बैलाच्या कातड्यावर करावा म्हणून विधि आहे ( तै. ब्रा. २·७,२ ).

पांघरावयाचें कातडें:—( चर्ममय आच्छादनपट ) अश्वमेध यागांत तुपांत भिजविलेल्या वस्त्रावर प्रावरणयोग्य कातडें पसरून त्यावर घोडा मारावा. ( तै. ब्रा. ३·९,२० ).

वाघाच्या कातड्याचे जोडेः—'मृत्युसव' नामक यज्ञांत 'वाघाच्या कातड्याचे जोडे' घालण्याचा विधि आहे ( बौ. श्रौ. १८·१६ ).

'अजिन संधायः'—चांभाराला उद्देशून तैत्तिरीय ब्राह्मणांत 'अजिन संधाय' हा शब्द आला आहे ( तै. ब्रा. ३·४,१५ ).

व्रात्यस्तोमामध्यें 'व्रात्य' वापरीत असलेले जोडे—काळ्यारंगाचे व पुढच्या दोहों बाजूंस कोपरे असलेले—देऊन टाकण्याचा विधि आहे ( लाट्यायन श्रौ. सू. ८·६,२३ ).

**कोष्टीकामः**—आपल्या इकडे कपडे विणण्याचें काम करणाऱ्या दोन जाती आहेत, एक साळी व दुसरी कोष्टी. कपडे विणणारांनां 'कुविंद' असें जुनें नांव आहे. कपड्यांचें काम यज्ञकर्मांत पुष्कळ ठिकाणीं पडतें. 'कपडा' म्हणजे 'वस्त्र'. वस्त्रांचा उल्लेख यज्ञांगानें वेदांत अनेक ठिकाणीं आला आहे.

नवीन विणलेल्या वस्त्राचा वाचक 'तसरं' हा शब्द तैत्तिरीय ब्राह्मणांत ( २·६,४ ) आला आहे व त्याच्या जवळच वस्त्र विणतांनां आडवा घातलेला ताणा ज्या एका लांकडी फळीनें ( हल्लींचा हात्या ) ठोकून बसवितात त्या हत्याराचा वाचक 'वेम' हा शब्द आला आहे. अग्निष्टोम यज्ञांत यज्ञोपयोगी पदार्थांची तरतूद जनतेकडून मागून आणून करावी लागते व त्यासाठीं लोकांकडे आपलीं माणसें पाठवून यज्ञकर्ता यज्ञिय वस्तू संपादन करतो. काय काय वस्तू तो मागतो याच्या यादींत वस्त्राचा उल्लेख आला आहे ( तै. सं. १·२,२ ). अग्निष्टोम यागांत यजमानानें नवें वस्त्र नेसून दीक्षा ग्रहण करावी असें विधान आहे. ( वाससा दीक्षयति–तै. सं. ६·१०,१ ).

तैत्तिरीय संहितेंत एके ठिकाणीं विणकामासंबंधानें विशेष स्पष्ट माहिती आहे. ( ६·१,१ ) 'शलाकोपधान' म्हणजे दोरे ( तंतू ) ओंवण्याची फणी. फणीमध्यें दोरे ओंवण्याच्या क्रियेस 'तूपाधान' शब्द आहे. खळीनें भिजलेले दोरे सुकविण्याच्या क्रियेस 'वातपान' म्हणत. आडवा ताणा ठोकण्याच्या हत्यारास म्हणजे पूर्वोक्त 'वेम'नामक वस्तूस 'प्रघात' असा पर्याय शब्द आला आहे. याला कोष्टीलोक 'हात्या' म्हणतात. वस्त्र विणण्याकरितां मागावर लावलेल्या उभ्या

ताण्यांनां 'प्राचीन तान' व आडव्या ताण्यांनां ( यांनां विणकर लोक 'वाणा' म्हणतात ) 'ओतु' असा शब्द आला आहे.

वाजपेय यज्ञामध्यें यूपाला ( पशु बांधावयाचा खांब ) 'वस्त्र' गुंडाळण्याचा विधि आहे ( तै. ब्रा. १·३,७ ). दर्भांचीं किंवा गवताचींहि वस्त्रें पूर्वकाळीं विणीत असावेत. पत्नीनें वाजपेयांत दर्भमय वस्त्र नेसावें असा विधि आहे ( तै. ब्रा. १·३,७ ). आधानामध्यें दक्षिणाद्रव्यांमध्यें 'वस्त्र' द्यावें असा उल्लेख आहे ( तै. ब्रा. १·१,६ ). अग्न्याधानाच्या प्रसंगीं यजमान व पत्नी या उभयतांनीं क्षौमवस्त्रें परिधान करावीं असा विधि आहे. 'क्षुमा'नामक एक तागासारखी वनस्पति आहे. तागाचा जसा वांक काढून त्याचे दोरे करतात व वस्त्रें तयार करतात त्याचप्रमाणें 'क्षुमा' म्हणजे 'अतसी'नामक वनस्पतीच्या दोऱ्यांचीं वस्त्रें विणीत असत. या 'क्षुमा'नामक वनस्पतीपासून 'नील' काढतात अशीहि प्रसिद्धि आहे. कोणाच्या मतें 'क्षौमवस्त्र' म्हणजे 'रेशमीवस्त्र' असाहि अर्थ आहे.

रंगवलेलीं वस्त्रें:—पाउस पडण्यासाठीं 'कारीरि' नामक एक याग करावा लागतो. त्या वेळीं यजमानानें काळ्या रंगाच्या दशा असलेलें वस्त्र नेसावें म्हणून विधि आहे ( तै. सं. २·४,९ ). लोंकरीच्या दोऱ्यानें कांबळें विणण्याचाहि उल्लेख ( तै. ब्रा. २·६,४ ) यांत आला आहे.

तांबड्या रंगाचीं धोतरें व पागोटीं:—शत्रूच्या मरणासाठीं करावयाच्या एका अभिचारक इष्टीमध्यें यजमानानें व ऋत्विजांनीं तांबड्या रंगाचीं धोतरें नेसावीं व तांबड्या रंगाचीं पागोटीं घालावीं असा विधि आहे ( लाट्यायन श्रौ. सू. ८·५,८ ).

तागाचीं वस्त्रें:—अग्निष्टोमादियागांमध्यें सामगायन करतांना खुणेसाठीं एका वस्त्रावर उंबराच्या लांकडाच्या काड्या मांडावयाच्या असतात. हें वस्त्र क्षौम, शाण अगर कार्पास असावें असें म्हटलें आहे. 'क्षौम' शब्दाचा वर अर्थ दिलाच आहे. 'शण' म्हणजे 'ताग'. तागाच्या दोऱ्यांचें बनलेलें वस्त्र तें 'शाण.' कार्पास म्हणजे कापसाच्या दोऱ्याचें ( ला. श्रौ. २·६,१ ).

काळ्या रंगाचीं पागोटीं:—व्रात्यस्तोमामध्यें 'व्रात्य' लोक काळ्या रंगाचीं पागोटीं घालीत असल्याचा उल्लेख आहे ( बौधायन श्रौत सूत्र १८·२४ ).

**लोहारकाम:**—लोहारानें तयार केलेल्या जिनसा यज्ञामध्यें उपयोगांत आणण्याचे अनेक प्रसंग आहेत. लोहारकामापैकीं कोणकोणत्या वस्तू यज्ञांत लागतात याची येथें माहिती देतों. घिसाडकामाचाहि यांत समावेश केला आहे. शिकलगार म्हणजे तरवार वगैरे हत्यारांनां धार लावणारा याच्या कामाचाहि उल्लेख या टिपणांत देत आहों.

नांगराचा फाळ:—याला 'फाळ' किंवा 'अष्ट्रा' हें नांव आहे. 'ओदनसव'नामक यज्ञांत नांगराचा फाळ वैश्याला दक्षिणा म्हणून देण्याचा विधि आहे ( तै. ब्रा. २·७,९ ).

वस्तरा:—'राजसूय' यज्ञांत राजानें हजामत करण्याचा विधि आहे. वस्तऱ्याला 'क्षुर' हें नांव आहे. तांबें मिसळलेल्या पोलादाचा हा वस्तरा बनविलेला असतो ( तै. ब्रा. १·५,६ ) व ( तै. ब्रा. २·७,१७ ).

लोखंडी झांकण्या:—दर्शेष्टीमध्यें 'सान्नाय' नामक हवि तयार करावयाचा असतो व त्यासाठीं आदले दिवशीं रात्रीं दूध विरजून ठेवावयाचें असतें. या विरजणाच्या भांड्यावर लोखंडी झांकण ठेवावें असा विधि आहे ( तै. ब्रा. ३·२,३ )

सुया:—अश्वमेधांत मारल्या जाणाऱ्या घोड्याच्या अंगावर कोठें कोठें तरवारीचे घाव मारावयाचे त्याचें ज्ञान होण्यासाठीं लोखंडी, रुप्याची व सोन्याची अशा ३ सुया करावयाच्या व त्या सुया टोंचून घोड्याच्या आंगावर खुणा करावयाच्या. ( तै. ब्रा. ३·९,६ ).

लोखंडी तुंबा:—( कमंडलू ) अश्वमेधांत शरीरहोम नामक कांहीं आहुती द्यावयाच्या आहेत. त्यांपैकीं ३ री आहुति लोखंडी कमंडलूनें द्यावी ( तै. ब्रा. ३·९,११ ).

चिमटे:—( संदंश ) चयनप्रकरणांत विटा व शेंगड्या वगैरे भट्टींतून काढण्यासाठीं लोखंडी चिमटा लागत असतो. ( बौ. श्रौ. १०·७,७ ).

पळी:—चयनप्रकरणामध्यें अग्निकुंडांत भस्म फार झालें असल्यास तें भस्म काढून टाकावयाचें तें लोखंडी पळीनें काढावयाचें असतें ( बौ. सू. १०·१७ ).

बाणाचें फळ:—चयनामध्यें चितीच्या स्थलामध्यें धनुष्यबाण हातीं घेऊन चारी बाजूला बाण मारावयाचे आहेत. बाणाची धार शिकलगार लावतो.

सुरी:—पशु मारल्यावर त्याचें शरीर फाडून अंगें काढावयास लागत असते. हिला 'स्वधिति' असें नांव आहे.

**शिवणकाम:**—यज्ञकर्मांत शिवणकलेचा उल्लेख प्रयोगरूपानें कोठें आढळत नाहीं, पण अप्रत्यक्ष रीतीनें या कलेचा उल्लेख आलेला आढळतो. "वस्त्राचें छिद्र जसें सुईनें शिवून दुरुस्त करतात त्याप्रमाणें यज्ञामधील उणीवरूपी छिद्र या 'धाय्या'-संज्ञक ऋचांनीं सांधून काढावें" ( ऐतरेय ब्रा. १२·७ ). "वस्त्राचे दोन भाग सुईनें जोडले जातात. माणसाच्या

डोक्याच्या कवच्या जशा एकमेकींशीं शिवलेल्या असतात, त्याप्रमाणें संवत्सराचेहि षण्मासात्मक दोन भाग शिवलेले असतात" ( ऐ. ब्रा. १८·८ ).

अग्निष्टोमामध्यें हविर्धानमंडपाच्या दाराजवळच्या खांबांना दर्भ गुंडाळून ते टिकण्यासाठीं दाभणांत दोरा ओंवून दर्भांना शिवण घालावी असा विधि आहे ( हि· श्रौ· सू· आनंदाश्रमप्रत ७·६ व बौधायन श्रौ. सू. अग्निष्टोम. ) सदोमंडपाचेहि खांब असेच दर्भ गुंडाळून दाभणदोऱ्यानें शिवावयाचे असतात ( इंद्रस्य स्यूरसीति सीव्यते हि. श्रौ. ७·७ ).

**पशुपालनः—**यज्ञकर्माचा विचार केल्यास त्यांत 'पशुपालन' हें बरेंच प्रामुख्यानें येतें. यज्ञामध्यें हवनीय पशू जमा केले असतील त्यांची व्यवस्था ठेवण्याचें काम 'पशुपाल' नामक ऋत्विजच करीत असतो. हा 'पशुपाल' वैश्य जातीचा असतो. दक्षिणा म्हणून द्यावयाच्या गाई व इतर पशू यांचेंहि संरक्षण हा ऋत्विज करीत असतो. शिवाय 'पुरुषमेध' नामक यज्ञांत जे मानवी पशू सांगितले आहेत त्यांत 'हस्तिप' 'अश्वप' 'गोपाल' 'अजपाल' 'अविपाल' इत्यादिकांचा उल्लेख आहे. यावरून यज्ञकालांत 'पशुपालन' हा एक स्वतंत्र धंदाहि लोक करीत असावेत. हत्ती पाळून विकणारे, घोड्यांचा धंदा करणारे, कारवान, गाईविके, शेळ्या-बोकड विकणारे व मेंढपाळ ( धनगर ) या लोकांचा यज्ञाच्या भरभराटीच्या काळांत चांगला धंदा चालत असावा. हिरण्य. श्रौ. सू. आनंदाश्रमप्रत, ११·१ पहा ).

**सोमक्रयः—**सोमयाग करावयाचा असतो तेव्हां सोमवल्ली विकत घेण्याचा विधि आहे. सोम विकणाऱ्या माणसास 'सोमविक्रयी' असें म्हणतात. सोम विकत घ्यावयास अध्वर्यु, यजमान वगैरे जातात. पण खरेदीचा सर्व व्यवहार अध्वर्यूच्या हातून चालतो. अध्वर्यु 'सोमविक्रयी'-जवळ गेल्यावरोबर सोमवल्लीच्या दहा जुडग्या मोजून घेऊन एका वस्त्रांत त्यांचें गांठोडें बांधतो व तें सोमविक्रयी-जवळ देऊन त्याला विचारतो कीं मी निवडून घेतलेला सोम विकणार काय ? तो म्हणतो विकणार. नंतर सोमवल्लीची किंमत म्हणून अध्वर्यु त्याला दहा वस्तू देतोः १ गाय, २ नुकती व्यालेली गाय, ३ कालवड, ४ खोंड, ५ गाडीला चालणारा बैल, ६ व ७ गाईबैलाचें जोडपें, ८ वस्त्र, ९ सोनें, १० शेळी. यजमान श्रीमंत असेल तर आणखीहि २।३ गाई जास्त देतो. गरीब यजमान असेल तर एकच गाय देण्यांत येते. २१ गाई ज्या यज्ञांत दक्षिणा म्हणून दिल्या जाणार असतात त्या यज्ञांत सोमवल्लीची किंमत १ च गाय देण्यांत येते. ६० गाई दक्षिणा असल्यास ३ गाई किंमत देत. १००० गाई दक्षिणा असल्यास २७ गाई व खेरीज सोनें, शेळी व वस्त्र अशा ३० जिनसा अगर नुसत्याच तीस गाई सोमवल्लीची किंमत म्हणून सोम विकणारास देत असत. सोम विकणारा इतक्या किंमतीवरहि नाखूष होऊन सोमवल्ली देण्यास कुरकुरेल तर त्याच्यापासून सोमवल्ली जबरीनें घेत व त्याला बैलाच्या जुंपणीच्या चामडी पट्ट्यानें अगर मातीच्या ढेंकळानें ठोक देऊन हांकून लावीत. वाजपेय यज्ञासाठीं सोम खरेदी करावयाचा असल्यास ९७ गाई व ३ वस्त्रें, राजसूयामध्यें १९७ गाई व ३ वस्त्रें आणि अश्वमेध यज्ञांत ९९७ गाई व ३ वस्त्रें याप्रमाणें यजमानाच्या ऐपतीवर अगर यज्ञाच्या लहान मोठ्या प्रमाणावर किंमत देण्यांत येई, इतकेंच नव्हे तर दिलेल्या किंमतीनें सोमविक्या खूष न होईल तर आणखीहि म्हैस, घोडा वगैरे त्याला देण्यांत येई. सोमवल्लीची किंमत म्हणून सोनें व दुसरे वर लिहिलेले पदार्थ सोम विकणाऱ्यास दिल्यावर त्यांपैकीं सोनें त्याच्यापासून परत घेत असत.

**सोम कुटणें.—**सोमयागामध्यें सोमरसाचें हवन मुख्य आहे. सोमवल्ली कुटून तिचा रस कसा काढतात ह्याविषयीं खुलासा येथें करीत आहों. 'उपरव'नामक चार खळगे असणारें एक स्थल तयार केलेलें असतें; आणि त्यावर 'अधिषवण'संज्ञक दोन फळ्या झांकलेल्या असतात. या फळ्यांवर एक हरणाचें कातडें सारखें पसरलेलें असतें. या कातड्यावर अध्वर्यु एक वरवंटा उभा मांडतो व त्यावर थोड्या थोड्या सोमवल्लीच्या कांड्या दहा वेळां काढून सांठवितो. नंतर या सोमवल्लीपैकीं एक पेलाभर सोमरस निघेल इतक्या वेताची वल्ली कातड्यावर एका बाजूस काढून तिजवर एका घागरींतील व एका चमसांतील पाणी शिंपडतो आणि वरवंट्यानें ८ घाव मारून ती कुटतो. निघालेला सोमरस ओंजळीनें तो आपल्या साथीदाराच्या हातांत असलेल्या पात्रांत भरतो. नंतर पुन्हां एक पेलाभर सोमरस निघेल इतकी सोमवल्ली घेऊन पाणी शिंपडून १० घाव मारून कुटतो व निघालेला रस साथीदाराचे हातीं असलेल्या पात्रांत ओंजळीनें भरतो. अध्वर्यु वरील प्रमाणें एकदां पुन्हां सोमवल्ली घेऊन ती १२ घावांत कुटतो व निघालेला रस सोबत्याचे पात्रांत पूर्ववत् ओततो. यानंतर साथीदाराच्या हातांतील पात्रांत सांठलेल्या सोमरसाचें आहवनीयाग्नींत तो हवन करतो.

सोमवल्ली कुटण्याचा मुख्य विधि हें हवन झाल्यावर सुरु होतो. या विधीला 'महाभिषव' अशी संज्ञा आहे. या वेळीं अध्वर्यु आपल्या मदतीस तीन साथीदार घेतो. 'उपरवा'-( सोम कुटण्याचें स्थळ )भोंवतीं हे चौघे ऋत्विज पूर्वेला अध्वर्यु, उत्तरेला उन्नेता, दक्षिणेस प्रतिप्रस्थाता व पश्चिमेस नेष्टा या क्रमानें बसतात. नंतर आपल्याला पुरे इतकी सोमवल्ली हे चौघे काढून घेतात व तीवर पाणी शिंपडतात. सोमरस निघेल तो 'उदचन'नामक पात्रांत ओतण्यांत येतो व 'उदचनपात्रां'तून

तो सोमरस 'आधवनीय' नामक डेऱ्यांत ओतला जातो. असें त्रिवार करण्यांत येतें. नंतर सोमवल्लीचा उरलेला चोथा 'दशापवित्र'नामक फडक्यानें गाळून निघालेला सोमरसहि वरील 'आधवनीय' नामक डेऱ्यांत ओतण्यांत येतो. नंतर कुटावयास घेतलेले वरवंटे एकमेकांकडे तोंडें (मोठी बाजू) करून एकेका दिशेस एक असे कातड्यावर मांडून ठेवण्यांत येतात व त्या प्रत्येक वरवंट्यावर थोडथोडा सोमवल्लीचा चोथा ठेवण्यांत येतो. उद्गातृप्रभृति सामगायक ऋत्विज त्या वरवंट्यावर एक लांकडी 'दोणी' आणून ठेवतात व तीवर फडकें पसरून आधवनीयनामक डेऱ्यांतील सर्व सोमरस त्या दोणींत गाळण्यांत येतो. नंतर एकएका देवतेच्या उद्देशानें एकएक पेला सोमरस भरून ठेवण्याचें काम अध्वर्यु करतो. (हि. श्रौ. सू. प्रश्न ८ पटल ३ व ४ आनंदाश्रमप्रत).

**गवंडीकाम.**—दर्शपूर्णमासेष्टीच्या वेळीं ज्या वेदीचें काम लागतें तिला 'दार्शिकवेदी' असें पर्यायनाम आहे. इची पूर्वपश्चिम लांबी ९६ अंगुलें असते. रुंदी नियमित नाहीं. यज्ञपात्रें मावतील अशा बेताची रुंदी ठेवावयाची. मात्र दोन्ही बाजूंस बांक पाहिजे. पूर्वेस व पश्चिमेस बांक पाहिजेच असा नियम नाहीं. ही वेदी ४ अंगुलें खोल खणावी असें सांगितलें आहे. नंतर तो खाडा बारीक कोरड्या मातीनें भरून काढावा असा विधि सांगितला आहे.

**पाशुकवेदी.**—ऐंद्राग्न इत्यादि पशुयागासाठीं जी वेदी तयार करावयाची असते तिची पूर्वपश्चिम लांबी १८८ अंगुलें असावी लागते. ही वेदी पश्चिम बाजूस १०४ अंगुलें व पूर्व बाजूस ८६ अंगुलें रुंद करावी लागते. पूर्वपश्चिम लांबी ६ अरत्नी व पश्चिम बाजूस ४ अरत्नी रुंद आणि पूर्व बाजूस ३ अरत्नी रुंद अशींहि या वेदीचीं मापें घेतात. या वेदीमध्यें एक चतुष्कोणी उत्तरवेदी असते. ही चतुष्कोणी ३६ अंगुलें उंच व त्या मानानें रुंद अशी ओट्यासारखी करावी. ही उत्तरवेदी ३६ अंगुलें लांबीरुंदीचा एक खड्डा (चात्वाल) वेदीच्या बाहेर जवळच असतो त्या खड्ड्यांतून अध्वर्यूनें माती काढून त्या मातीनें बनवावयाची असते. अर्थात् ३६ अंगुलें उंचवटा करून त्याची रुंदी मातीच्या अनुमानानें जितकी धरतां येईल तितकीच करावयाची असते. या उत्तरवेदीवर गाईच्या पावलाएवढा एक लहानसा उंचवटा टीचभर हमचौरस असतो त्याचें नांव 'नाभि'.

**सौमिकवेदी.**—अग्निष्टोम वगैरे सोमयागांत जी वेदी करावी लागते तिची आकृति पाशुकवेदीसारखीच असते, पण लांबीरुंदी अधिक असते. पूर्वपश्चिम लांबी ३६ पावलें (१५ अंगुलांचें एक पाऊल), पश्चिमबाजूस रुंदी ३० पावलें आणि पूर्वबाजूस रुंदी २४ पावलें असते. या वेदीमध्येंहि पाशुकवेदीप्रमाणें 'उत्तरवेदी'संज्ञक उंचवटा असतो. ह्या उंचवट्याची लांबीरुंदी सारखीच म्हणजे चौरस १०।१० पावलें असते. पश्चिमबाजूस रुंदी १२ पावलें आणि पूर्वबाजूस रुंदी ८ पावलें असावी असें दुसरें एक मत आहे. या वेदीस 'महावेदी' म्हणतात.

**चिति.**—चिति हा शब्द 'चि' या धातूपासून झाला आहे. या धातूचा अर्थ मांडणें किंवा रक्षण करणें असा होतो. विटा मांडून जी आकृति तयार होते तिला चिति म्हणतात. विटांच्या विशिष्ट आकृतीच्या स्थंडिलावर अग्नीचें रक्षण करावयाचें असल्यामुळें रक्षणार्थानेंहि 'चिति' शब्द सार्थ होऊं शकेल. पण श्रौतप्रकरणांत विटा मांडून तयार होणाऱ्या आकृतीला अनुसरून 'चिति' शब्द वापरण्याचा प्रघात आहे.

चितीच्या एका प्रकाराला 'श्येनचिति' अशी संज्ञा आहे. २०० विटा मांडून ही आकृति सिद्ध करतात. 'श्येन' (ससाणा) या आकृतीचा जो चिती तो श्येनचिति. श्रौतांत या श्येनचितीला इतर चितींहून अधिक मान आहे. ह्या श्येनचितीचे एकावर एक असे पांच थर (प्रस्तर) असतात. पांच थरांच्या मिळून हजार विटा होतात. विटाहि निरनिराळ्या आकृतीच्या असतात (विटांवरील टिप्पण पहा).

'श्येनचिती' खेरीज आणखी १७ प्रकारचे चयन म्हणजे चिती आहेत. या चितींचीं नांवें: (१) छंदश्चिति (२) कंकचिति (३) अलजचिति (४) प्रउगचिति (५) उभयतः प्रउगचिति (६) रथचक्रचिति (७) द्रोणचिति (८) समूह्यचिति. (९) परिचाय्यचिति (१०) स्मशानचिति व ७ प्रकारचे विहव्यचिती. या विहव्यचितींनां 'धिष्ण्या' असेंहि म्हणतात. सात धिष्ण्यांच्या जवळ सहा होते वसावयाचे असतात. छंदश्चिति म्हणजे छंदोबद्ध अशाच तेवढ्या मंत्रांनीं मांडला जाणारा चिति. कंकचिति व अलजचिति हे दोन चिती श्येनचितीचेच भेद आहेत. प्रउगचिति म्हणजे गाडीच्या जोखडासारखा चिति. 'उभयतः प्रउगचिति' म्हणजे दोहों बाजूंनीं गाडीच्या जोखडाचा आकार असलेला चिति. अशा रीतीनेंच बाकीचे चिती कांहीं विशिष्ट आकृतीचे करावयाचे असतात. या अठरा प्रकारच्या चितींखेरीज पांच प्रकारचे 'काठक'संज्ञक चिती आहेत. कठमुनींनीं हे चिती प्रचारांत आणले म्हणून त्यांनां 'काठक' म्हणतात. सावित्र, नाचिकेत, चातुर्होत्र, वैश्वसृज व अरुणकेतु हे पांच काठकसंज्ञक चिती होत. या काठकचितींत विटा मांडावयाच्या नसतात. या चितींत एकाला एक वेष्टणारीं अशीं नऊ मंडलें काढून या नऊहि मंडलांवर विटांच्या ऐवजीं चुनखडीचे खडे मांडावयाचे असतात.

(घरें बांधण्याचा प्रकार श्रौतकर्मांत कोठें आढळत नाहीं.)

**दळण कांडण.**—यज्ञकर्मामध्यें कोणत्याहि धान्याचा दळून बारीक केलेला जिन्नस उपयोगांत आणण्याचा विधि

दिसत नाहीं. फक्त कुटणें म्हणजे कांडणें व वाटणें ( वाटून पीठ करणें ) या दोनच क्रिया दृष्टीस पडतात. कांडण्याच्या कामीं लागणारीं उखळ व मुसळ आणि वाटावयास लागणारीं पाटा आणि वरवंटा हीं साधनें विधिदृष्ट आहेत. अर्थात् दळणाबद्दल कांहीं लिहितां येण्याजोगें नसल्यामुळें फक्त कांडणें व वाटणें या दोनच क्रियांच्या संबंधानें येथें खुलासा करीत आहों:—

कांडण.—भात कांडावयाचें असो कीं दुसरें कांहीं कांडावयाचें असो, प्रथम जमिनीवर हरणाचें कातडें आंथरावयाचें व त्यावर उखळ ठेऊन त्यांत भात किंवा कांडावयाचा काय पदार्थ असेल तो घालावयाचा आणि नंतर मुसळानें तो जिन्नस कांडावयाचा. अध्वर्यूनें थोडा घाव लावला म्हणजे तें काम तो पत्नीकडे किंवा दासीकडे सोंपवितो. मग ती पत्नी अगर दासी तें धान्य कांडण्याचें काम पुरें करते. कांडलेले तांदुळ कोंड्यासह सुपांत ओतले जाऊन पाखडण्यांत येतात, व त्यांनां दुसरी 'सड' देण्यांत येते. यानंतर ते पुन्हां एकदां सुपानें पाखडले जाऊन त्यांनां तिसरी 'सड' देण्यांत येते. अशा रीतीनें तांदुळ तिसऱ्यांदा पाखडून कणी निघून स्वच्छ झाले म्हणजे ते उपयोगांत आणण्यास योग्य ठरतात. नंतर ते तांदुळ धुऊन टाकण्यांत येतात व धुवण वेदींत अगर उत्करनामक स्थळीं ओतून टाकण्यांत येतें. कांडावयास घेतलेलें उखळ लांकडी असतें. मुसळ लांकडीच असतें पण त्याला वेडणी ( लोखंडी पट्टी ) नसते. 'सातू'सारखें धान्य कोरडें असतां नीट कुटलें जात नाहीं म्हणून तें धान्य कांडण्यापूर्वी कांहीं वेळ ओलविण्यांत येतें व नंतर त्याला कुटण्यांत येतें.

वाटणें:—कोणत्याहि पदार्थाचें पीठ करावयाचें तें वाटून करावयाचा विधि प्रायः आढळतो. दर्शपूर्णमासांत जसें सातू अगर भात कांडून तांदुळ करावयाचे असतात त्याप्रमाणें पुढें त्या तांदुळाच्या अगर सातूच्या पिठाचा पुरोडाश करावयाचा असतो. पीठ करावयाचें तें जात्याच्या साहाय्यानें दळून करण्यांत येत नसून पाट्यावरवंट्याच्या साहाय्यानें करण्यांत येतें.

**दोऱ्या वळणें.**—दोरी वळण्याचा विधि यज्ञकर्मांत दृष्ट आहे. दर्शपूर्णमास यागामध्यें वेदींत अंथरण्यासाठीं जे दर्भ कापून आणावयाचे असतात त्याचप्रमाणें अग्निप्रज्वलनासाठीं ज्या समिधा तोडून आणावयाच्या असतात त्या दर्भांचा व समिधांचा भारा बांधण्यासाठीं अध्वर्यूला दोऱ्या वळाव्या लागतात. ह्या दोऱ्या दर्भांच्याच वळलेल्या असतात. या दोऱ्यांनां तीन सांधे असतात. प्रथम दोन पेड घेऊन ते वळीत जावयाचे, व शेवटास आणखी दोन पेड जोडून पुढें वळावयाचें, असेंच पुन्हां एकदां दोन पेड लावून वळावयाचें म्हणजे तीन सांध्यांची दोरी होते. या त्रिसंधि दोरीस 'शुल्ब' किंवा त्रिसन्नहन म्हणतात. या त्रिसन्नहनांखेरीज इतरत्र अध्वर्यु स्वतः दोऱ्या वळीत असल्याचें दृष्ट नाहीं. दोऱ्यांचा उपयोग मात्र यज्ञांत पुष्कळ ठिकाणीं येतो. या वेळीं धंदेवाईक दोऱ्या वळणारांनीं तयार केलेल्या दोऱ्याच उपयोगांत घेतल्याचें दिसतें. सान्नायासाठीं दूध काढतांना गाईच्या मागच्या दोन पायांनां भाला घालण्यासाठीं दोरी लागते. चयनामध्यें माती आणावयास जातांना घोड्याच्या व गाढवाच्या गळ्याला दोऱ्या बांधावयाच्या असतात. पशूच्या अनुष्ठानांत यूपाला गुंडाळण्यास व पशूच्या गळ्याला बांधण्यास दोरीची जरूर असते. तीन सांधे जोडून नियमित लांबीची वळलेली दोरी तें 'शुल्ब' व वाटेल तितकी कमजास्त वळलेली व अनियमित सांधे असलेली ती 'रज्जु' किंवा 'रशना' होय.

इष्टीच्या वेळीं पत्नीच्या कंबरेला बांधावयाच्या दोरीस 'योक्त्र' म्हणतात. या योक्त्राला एका बाजूस फांस म्हणजे 'मुदन' केलेली असते. या वरील वस्तूंशिवाय 'शिंकीं' व 'दावीं' ह्या वस्तू यज्ञकर्मांत लागतात. सान्नायाचें दूध विरजत ठेवण्यास, चयनामध्यें उखानामक शेगड्या वगैरे सुरक्षित ठेवण्यास 'शिंकीं' लागतात, तर घर्माच्या वेळेस गाईस व शेळीस बांधण्यास 'दाव्यांची' जरूर लागते. घर्माच्या वेळचीं दावीं 'मुंज' गवताचीं म्हणजे मोळाचीं तयार करतात. अश्वमेधांगभूत 'सांग्रहणी' म्हणजे जनतेचा संग्रह घडवून आणणारी एक इष्टि करावयाची असते तिजमध्यें १२।१३ हात लांबीची 'मोळाची' दोरी उपयोगांत आणावयाची असते. चयनामध्यें 'उखा'नामक एक शेगडी असते. तिच्यांत अग्नि घालून यजमानाच्या गळ्यांत अडकविण्यासाठीं जें शिंकें उपयोगांत आणावयाचें त्यास ६ किंवा १२ पदर केलेले असतात. पशुयागामध्यें यूपाला गुंडाळण्याची दोरी तीन पेडी व पशूला बांधण्याची दोरी दुपेडी असते.

['**शुल्ब**' ( बौ. श्रौ. सू. १·२ ) '**रज्जु**' ( तै. ब्रा. ३·७,४ ), '**रशना**' ( तै. सं. ४·१,२ ), '**दाम**' म्हणजे दावें ( बौ. श्रौ सू. ९.५ ), '**शिक्य**' शिंकें ( बौ. श्रौ. १०·८; म्ह० शिंकें ६ अथवा १२ पदराचें बौ. श्रौ. १०·१२ ) **दुपेडी व तिपेडी. दोऱ्या** ( बौ. श्रौ. ४·१. ) ]

**गवत कापणें.**—'गवत' हें नांव आपण व्यवहारांत कोणत्याहि जातीच्या 'तृण'वर्गास लावतों. या अर्थानें दर्भ, मोळ इत्यादि तृणें यांनां सुद्धां 'गवत' म्हणण्यास हरकत नाहीं. दर्भ किंवा मोळ या जातीचें 'तृण' यज्ञांत पुष्कळच लागतें. मोळापेक्षांहि दर्भाची जरूर जास्त. पितृकार्य व प्रवर्ग्य वगैरे कांहीं विशिष्ट यज्ञकर्मांत मोळ लागतो, बाकी सर्व काम दर्भावरच चालतें. पितृदेवांच्या उद्देशानें जेथें दर्भ आणावयाचे असतात तेथें ते मुळांसकट अथवा एका छेदानें कापले जातील तेवढेच उपयोगासाठीं घ्यावयाचे असतात.

यज्ञकालीं दर्भ वगैरे कापून आणतांना सुरीचे ऐवजीं घोड्याच्या बरगडीची 'अस्थि' प्राचीन कालीं उपयोगांत

आणीत असें तैत्तिरीय ब्राह्मणावरून दिसतें. पुढें सुरीचा उपयोग करूं लागले. यज्ञकर्माकरितां अध्वर्यु जो दर्भ कापावयास जाई तो पूर्वदिशेस अगर उत्तरदिशेस जेथें दर्भाचीं बेटें असतील तेथें जाई व तेथून आपल्यास लागतील तेवढे दर्भ कापून आणी. असे दर्भ कापतेवेळीं पशूंच्यासाठीं कांहीं दर्भ राखून ठेवण्याची पद्धति असे. दर्भ कापीत ते सुद्धां बुडखे राखून कापीत. आपल्याला पाहिजे तितक्या दर्भाच्या मुष्टी कापून झाल्या म्हणजे अध्वर्यु शुल्ब तयार करी व त्या दोरीनें (शुल्बानें) दर्भाचा भारा बांधून तो डोक्यावरून घरीं घेऊन येई आणि यज्ञशाळेंत योग्य स्थळीं बंदोबस्तानें ठेवी.

**लांकडें तोडणें.**—यज्ञकर्मामध्यें लांकूड तोडण्याचा विधि प्रत्यक्ष यजमानाच्या किंवा अध्वर्यूच्या हातून होत नसे. हें लांकडें तोडण्याचें काम लांकडें तोडण्याचा धंदा करणाऱ्या माणसाकडून करवीत असत असें दिसतें. ऐंद्राग्न पशूमध्यें 'यूप' (पशु बांधण्याचा खांब) करण्यासाठीं पळस, खैर, बेल किंवा रगतरोडा यांपैकीं एकाद्या झाडाची मोठी खांदी तोडून आणावयाची असते. ती तोडण्यासाठीं जातांना लांकूडतोड्या माणसाला कुऱ्हाड घेऊन आपल्याबरोबर येण्यासाठीं बोलावीत किंवा त्याला आपल्या जवळची कुऱ्हाड लांकूड तोडण्यास देत बौ. श्रौ. सू. ४·१ व हि. श्रौ. सू. ४·१ या ठिकाणीं "तक्षाणम् आहूय" अशी सूत्रांत अक्षरें आहेत त्यावरून 'तक्षा' म्हणजे लांकूड तासणारा हा 'सुतार' असावा अशी शंका येते, परंतु ही शंका फार वेळ टिकत नाहीं. यूप तोडण्याचें काम अध्वर्यूनें करावें व यूप तासून अष्टधारी करणें तो 'तक्षा'नें करावा असा कर्मभेद पुढें सूत्रांत कोठें दिसत नाहीं. यावरून तक्षा म्हणजे सुतारच घेतल्यास यज्ञोपयोगी लांकडें तोडण्याचें काम त्या वेळीं सुतारच करीत असावेत असें गृहीत धरणें भाग आहे. पण तसें गृहीत न धरलें तर 'तक्षा' म्हणजे लांकूडतोड्या माणूस असा अर्थ घेणें सयुक्तिक होईल. लांकडें तोडण्याच्या धंद्यांत जो चांगला वाकबगार असतो तो साधारणपणें लांकडाला गोल चौरस किंवा आठधारी आकार देऊं शकेल हें हल्लींच्या दृष्ट व्यवहारावरूनहि समजून येण्यास हरकत नाहीं. अध्वर्यु फक्त संस्कार करीत असे व लांकूड पूर्णपणें तोडण्याचें काम 'तक्षा' करीत असे. अध्वर्यु ज्या वृक्षाचा यूप काढावयाचा त्या वृक्षाजवळ जाई व जेथून 'यूप' तोडावयाचा त्या ठिकाणीं (वृक्षशाखेला) सभोंवतीं तूप लावी. नंतर त्या ठिकाणीं एक दर्भ ठेऊन तो कुऱ्हाडीनें तोडून टाकी व मग लांकूडतोड्या (तक्षा) ती खांदी तोडीत असे. शाखा जेथून तुटली असेल तेथें राहिलेल्या बुडख्यावर अध्वर्यु सोनें ठेऊन त्यावर एक तुपाची आहुति देई. यानंतर यूपासाठीं तोडलेल्या लांकडाच्या बारक्या बारक्या फांद्या तोडून साफ करण्यांत येत आणि यूप जसा हवा तसा तासून घेण्यांत येई. (हि. श्रौ. सू. ४·१)

अश्वमेधयज्ञासाठीं अत्यंत विस्तीर्ण अशी यज्ञभूमि तयार करतांना तेथें असलेले वृक्ष तोडून टाकून जमीन साफसूफ करावयाची असते. हीं झाडें तोडून टाकण्याचें काम लांकूडतोड्या धंदेवाइकाकडून करवीत असत असें दिसतें (बौ. श्रौ. सू. १५·१).

अश्वमेधांत २१ यूप पुरावयाचे असतात. सगळ्यांत मुख्य जो यूप असतो तो श्लेष्मातक वृक्षाचा असून त्याच्या दोहों बाजूंनां दोन 'देवदार' वृक्षाचे यूप पुरावयाचे असतात. यांखेरीज ६ बेलाचे, ६ खैराचे व ६ पळसाचे असे एकंदर २१ यूप असतात. कोणकोणत्या जातीचीं कितीकिती लांकडें यूपासाठीं तोडलीं जातात हें समजण्यासाठीं मुख्यत्वेंकरून वरील खुलासा दिला आहे. शिवाय अश्वमेधामध्यें एके प्रसंगीं एका दासीपुत्राकडून एक कुत्रें मारण्याचा चमत्कारिक विधि आहे. हें कुत्रें मारतांना शिसवीचें मुसळ (सोटा) घेऊन मारावयाचें विधान आहे. अर्थात् शिसवीचें लांकूड आगाऊ तोडून आणून त्याचें मुसळ तयार करून ठेवीत असतील हें उघड आहे. शिवाय दर्शपूर्णमासेष्टीपासून तों मोठमोठ्याल्या क्रतूंमध्यें लागणारीं कित्येक पात्रें तयार करण्यासाठींहि पिंपळ, उंबर, वेकली, शिवण इत्यादि वृक्षांचीं लांकडें तोडून आणविण्याची जरूर पडे. (हिरण्यकेशी श्रौत सूत्र १·४ व त्यावरील टीका पहा.)

**रथ वापरणें.**—यज्ञांगानें रथ वापरण्याचें काम कोठें कोठें पडतें तें खालीं दिलें आहे.

'पुनराधान'प्रसंगीं, वापरलेला व एकदां मोडला असून पुन्हां दुरुस्त केलेला 'रथ' दक्षिणा म्हणून द्यावयाचा विधि आहे (बौ. श्रौ. ३·२–३ आणि तै. सं. १·५,२).

चयनप्रकरणामध्यें रथाच्या दांड्यांच्या टोंकांवरून अग्नींत आहुती द्यावयाचें विधान आहे (तै. सं. ५·४,९).

वाजपेय यज्ञांत १७ रथ उपयोगांत आणावयाचे असतात. यज्ञभूमीपासून १७ बाणांच्या टप्प्यावर एक हद्द केलेली असते व त्या हद्दीपर्यंत घोडे जोडलेले १७ रथ पळवून त्यांची शर्यत लावावयाची असते. या १७ रथांत एक रथ तीन घोडे जोडलेला असतो. या रथाला 'प्रष्टिवाही' अशी संज्ञा आहे. 'देवरथ' असेंहि बहुमानदर्शक नांव या रथाला आहे (तै. सं. १·७,७ पहा).

आधानप्रयोगांत गार्हपत्यापासून आहवनीयापर्यंत ब्रह्म्यानें रथाचें चाक इकडून तिकडे असें ३ वेळ फिरवावें म्हणून विधि आहे. (तै. ब्रा. १·१,६), तसाच वाजपेयामध्यें चात्वालाजवळ रथाचा कणा उभा पुरून त्यावर १७ आरे असलेलें रथाचें चाक गरगर फिरवावयाचें असतें.

(तै. ब्रा. १·३,६) राजसूय यज्ञामध्येंहि 'प्रष्टिवाही' असा रथ दक्षिणा म्हणून देण्याचा विधि आहे (तै. सं. १·८,१५).

'अश्वमेध'यज्ञांतहि रथाचा उपयोग प्रामुख्यानें केला जातो. अश्वमेधयज्ञांत जो घोडा हिंडवावयाचा असतो व शेवटीं हवनार्थ मारावयाचा असतो तो घोडा रथाला जोडण्याचा विधि आहे. या घोड्याखेरीज दुसरे दोन घोडे त्याच रथाला जुंपावयाचे असतात. तीन घोडे जोडल्यावर त्या रथावर विजयध्वज स्थापन करण्यांत येतो व त्या रथांत 'अश्वमेध' यज्ञ करणारा यजमान (राजा) बसून पाण्याच्या प्रवाहापर्यंत जातो (तै. ब्रा. ३·९,४).

**खड्डे करणें.**—खड्डे अगर खळगे करण्याचे प्रसंग यज्ञामध्यें कोठें येतात याचें येथें थोडक्यांत दिग्दर्शन करतों.

केवलपशुयागांत पाशुकी वेदी व अग्निष्टोमादि यज्ञयागांत महावेदी जिला म्हणतात त्या वेदीच्या ईशान्येस 'चात्वाल' नांवाचा एक खड्डा खणावयाचा असतो. हा खळगा ३६ अंगुलें चौरस असून तीन वितीं किंवा गुडघ्याइतकी या खड्ड्याची खोली असते. (हि. श्रौ. सू. ४·१). या खड्ड्याची अगोदर आंखणी करण्यांत येते व नंतर कळकाच्या काठीनें तो खणतात.

कोणताहि खड्डा खणण्यापूर्वी त्याची आंखणी अगोदर करावयाची असा नियम आहे.

पशुहनन ज्यांत आहे अशा कोणत्याहि यागांत पशु बांधण्यासाठीं एक अष्टधारी खांब पुरावयाचा असतो व त्यासाठीं वेदीच्या आंत अर्धा भाग व बाहेर अर्धा भाग होईल असा खड्डा खणावा लागतो.

अध्वर्यु खड्ड्याची आंखणी करतो नंतर तो आग्नीध्राला खड्डा खणण्याचें काम सांगतो. त्याच्या आज्ञेप्रमाणें आग्नीध्र यूपाचा २४ अंगुलें बुडखा आंत राहून शिवाय २।३ बोटें जास्त अवकाश राहील इतका खोल तो खड्डा खणतो (हि. श्रौ. सू. ४·२).

**संगीत वाद्यें.**—यज्ञांमध्यें जसें सामगायन विहित आहे त्याचप्रमाणें वाद्यांचें वादनहि विहित आहे. वाद्यांमध्यें तत, घन, सुषिर (पोकळ) व नद्ध (चामड्यांनीं मढविलेलीं) असे चार प्रकार आहेत. 'वीणा' हें 'तत' म्हणजे तंतू लावलेलें वाद्य होय. उखळ हें घन वाद्य असून पावा हें सुषिर वाद्य होय. मृदंग, दुंदुभि (नगारा), समेळ इ. वाद्यें नद्ध होत. अश्वमेधामध्यें एका ब्राह्मणानें वीणा वाजवून दिवसा गावें व रात्रीं एका क्षत्रियानें "वीणा" वाजवून गावें असा विधि आहे (तै. ब्रा. ३·९,१४). वाण हें एक शंभर तारांचें तंतुवाद्य आहे. सोमपान करून त्याचा कैफ आल्यावर 'मरुत्' हें 'वाण' नामक वाद्य वाजवीत (ऋग्वेद १·८५,१०). याला शंभर तारा असल्याबद्दलचा उल्लेख तैत्तिरीय संहितेंत आहे (७·५,९). 'वाण'वाद्याला जो भोंपळा लावलेला असतो तो तांबड्या रंगाच्या बैलाच्या कातड्यानें मढवून काढावयाचा असतो. दांडा उंबराच्या लांकडाचा घालावयाचा असून तारा ओंवण्यासाठीं हल्लीं तंबोऱ्याच्या तबलीला असतात त्याप्रमाणें भोंपळ्याच्या कडेला दहा भोंकें पाडावयाचीं. त्या प्रत्येक भोंकांत दहा दहा तारा मुंज व किंवा दर्भ यांच्या कमावून तयार केलेल्या ओंवून त्या घोडीवर घेऊन पुढें व्यवस्थेनें लावावयाच्या. शांडिल्य ऋषीच्या मतें भोंपळ्याच्या कडेला–तबलीला–तीनच भोंकें पाडावीं व त्यांत दोन्ही बाजूंच्या भोंकांत ३३।३३ व मधल्या भोंकांत ३४ तारा ओंवून त्या पुढें घोडीवर न्याव्यात असें आहे. हें 'वाण'नामक तंतुवाद्य वाजविण्यासाठीं कंस लावलेल्या गजाऐवजीं एक 'इषीका' अगर 'वेतस' नामक वेलीचा तुकडा आपोआप वांकून धनुष्याकार झालेला घेऊन त्याला कंस लावून तयार करून घ्यावयाचा व त्यानें हें 'वाण'वाद्य वाजवावयाचें. याखेरीज अलाबुवीणा, वक्रावीणा, कपिशीर्षा, महावीणा व शीलवीणा अशीं ५ प्रकारचीं वीणावाद्यें सामवेदांत उल्लेखित आहेत.

शिवाय स्त्रियांनीं वाजविण्याचीं विशिष्ट वाद्यें आहेत त्यांपैकीं 'पिच्छोरा' व 'कांडवीणा' हीं दोन वीणावाद्यें उल्लेखित झालीं आहेत (लाट्यायन श्रौ. सू. ४·२,८). या दोन्ही प्रकारच्या 'वीणा'वाद्यांना 'अपघाटिला' असेंहि म्हणत असत. 'पिच्छोरा' हें वाद्य वांकड्या दांड्याचें व दांडीच्या शेवटाला मोराचीं पिसें लावलेलें असावें. तैत्तिरीय संहितेच्या भाष्यांत सायणाचार्यांनीं (आनंदाश्रमप्रत पृष्ठ ४७१७) सूत्रवचन दिलें आहे त्यांत 'तुंबरुवीणा' या वाद्याचाहि उल्लेख आहे. सूत्रकार वेदद्दष्ट गोष्टींवांचून स्वकल्पित गोष्टी उल्लेखित नाहींत हें लक्षांत घेतल्यास कोणत्या तरी वेदशाखेंत 'तुंबरुवीणा' त्यांना दृष्ट झाली असली पाहिजे हें निश्चित आहे. 'वीणा' या वाद्याचा विचार करतेवेळीं मुद्दाम सुचवावयाचें आहे तें हें कीं, कित्येक लोक 'तंबोरा' या वाद्यालाच 'वीणा' अगर 'विणा' म्हणतात. पण ती चूक आहे. 'वीणा' म्हणजे 'बीन'. तंबोऱ्याला फक्त चारच तारा असून त्यांतील मधल्या दोन जोडाच्या षड्ज स्वरांत लावलेल्या, पहिली पंचम स्वरांत लावलेली व शेवटची—चौथी–खालच्या षड्जांत–खरजांत–लावलेली असते. म्हणजे तंबोऱ्याचा उपयोग गायकाला षड्जपंचमस्वरांत सूरभरणा सारखा ठेवण्याच्या पलीकडे होत नाहीं. सप्तस्वरांचें कोमलतीव्र स्वरानुरोधानें अपेक्षित पद्धतीस धरून वादन करण्यास 'बीन' अगर त्याचीच नक्कल असलेलें 'दिलरुबा,' तर्फांची सतार, 'सारंगी' अशा प्रकारचेंच वाद्य जरूर आहे.

**घन वाद्यें.**–उखळ किंवा उखळी वाजविण्यासंबंधानें अग्निष्टोम यज्ञांत विधि आहे (बौधायन, अग्निष्टोम पहा). झांज,

करताळ वगैरे वाद्यें हीं घनवाद्यें आहेत, पण यांचा वैदिक वाङ्मयांत कोठें आढळ होत नाहीं.

सुषिर (पोकळ) वाद्यें:—या वाद्यांत अलगूज, शंख, पावा, सनई इत्यादि वाद्यें येतात. यमाच्या घरांत 'नाळी'-नामक वेणुवाद्य वाजवीत असत (ऋग्वेद १०·१३५,७). 'तूणव' नामक एक अलगुजासारखें वेणुवाद्य (कळकाचें) असून त्याचा उल्लेख व 'शंख' या वाद्याचा उल्लेख (तैत्तिरीय ब्रा० ३·४,१४) आहे.

नद्धवाद्यें.—तांब्यासारख्या धातूचीं टोपणें तयार करून तीं चामड्यांनीं मढवून तयार केलेलीं अगर लांकडाची पोकळ खोडें घेऊन तीं चामड्यांनीं मढवून तयार केलेलीं जीं वाद्यें तीं 'नद्ध'वाद्यें होत. जसें:—नगारा, समेळ, मृदंग किंवा 'पडघम्' हें आंग्लवाद्य, इ. इ. वेदामध्यें वाजपेय प्रकरणांत दुंदुभि (नगारा किंवा चौघडा) या वाद्याचा उल्लेख आहेच. पण त्याशिवाय 'भूमिदुंदुभि' म्हणून एका प्रकारच्या वाद्याचा उल्लेख आहे (तै. सं. ७·५,९). आग्नीध्र मंडपाच्या पश्चिमेस एक खळगा खणावयाचा व त्यावर बैलाचें ओलें कातडें पसरून बसवावयाचें. तें कातडें हालूं नये म्हणून लांकडी शंकूसभोंवतीं ठोकून बसवावयाचें म्हणजे 'भूमि-दुंदुभि' तयार झाली. जनावराच्या शेंपटीच्या बुडख्यानें ही दुंदुभि वाजवावयाची. तैत्तिरीय आरण्यकांत (१·११,६) 'पणव' उर्फ मृदंग या वाद्याचा उल्लेख आहे.

गायनवादनाव्यतिरिक्त करमणूक:—

१. वाजपेयनामक यज्ञांत महावेदीच्या चारी कोंपऱ्यांना ५+५+४+३ मिळून १७ दुंदुभी (चौघडे) टांगून ठेवावयाचे असतात.

२. याच यज्ञांत घोडे जोडलेल्या १७ रथांची पळण्याची शर्यत व्हावयाची असते. बाण जोरानें मारल्यावर जितक्या अंतरावर जाऊन पडतो त्या ठिकाणास 'प्रव्याध' म्हणतात. एकापुढें एक असे १७ 'प्रव्याध' अंतरावर उंबराची मेढ खुणेकरतां रोंवावयाची. ही शर्यत जिंकण्याकरितां नेमलेली हद्द होय. यज्ञभूमीपासून दौडत निघालेल्या १७ रथांपैकीं जो रथ या हद्दीपर्यंत सर्वांच्या आधीं येऊन पोंचेल त्यानें शर्यत जिंकली असें समजावें. शर्यत चालू असतांना टांगलेल्या चौघड्यांचा मोठा ध्वनि सुरू ठेवावयाचा असतो.

३. तुपांत भिजलेलें वस्त्र यजमान नेसतो व पत्नी दर्भाचें विणलेलें वस्त्र नेसते अगर नेसलेल्या वस्त्रावरून दर्भनिर्मित वस्त्राची ओढणी वेष्टन करिते.

४. १७ हात लांबीचा यूपस्तंभ पुरलेला असतो. त्यावर यजमान चढतो व ऋत्विज रुईच्या पानांत माती भरून तयार केलेल्या गोळ्यांनीं त्याला मारतात.

५. वाजपेय यज्ञांत 'चात्वाल' म्हणून एक महावेदीजवळ खड्डा असतो. त्या खड्ड्यांत अगर त्याच्याजवळ एक खांब पुरून त्यावर रथाचें चाक १७ आरे असलेलें बसवावयाचें असतें व त्यावर ब्रह्मा आरोहण करीत असतो. तो रथचक्रावर चढला म्हणजे स्फ्यनें (लांकडी तलवार) तें चाक गरगर फिरवावयाचें असतें. सर्कशींतल्या खेळासारखा हा प्रकार आहे.

६. अग्निष्टोम यज्ञामध्यें सोम कुटण्याचें काम चालू असतां 'ग्रावस्तुत्'नामक एक ऋत्विज् कांहीं सूक्तें म्हणत असतो. सोम कुटणें म्हणजे सोमदेवतेला एक प्रकारें त्रास देणें आहे व तें पाहणें निर्दयपणाचें आहे अशा शास्त्रीय समजुतीनें तो ऋत्विज् आपले डोळे पागोट्यानें बांधून स्तोत्रें म्हणण्यास उभा राहतो. डोळ्यावरून पट्ट्या घेऊन डोक्याला पागोटें गुंडाळलेला तो ऋत्विज् पाहून प्रेक्षकांस आंधळ्या कोशिंबिरींतील खेळाची आठवण होते.

७. अग्निष्टोमामध्यें 'विप्रुट्होम' नांवाची क्रिया आहे. ही करण्याकरितां अध्वर्यु, प्रस्तोता, उद्गाता, ब्रह्मा, होता, मैत्रावरुण, प्रतिप्रस्थाता हे ऋत्विज आहवनीयाकडे जातांना अध्वर्यु सर्वांच्या पुढें होतो व त्याला बाकीचे ऋत्विज आंधळ्यांच्या माळकेप्रमाणें एकामागें एक असे उभे राहून उजव्या हातानें पुढच्या उभे राहणारास स्पर्श करून जातात. विप्रुट्होम आटपल्यावर ही डोळस ऋत्विजांची माळका आंधळ्यांच्या माळकेप्रमाणें चात्वालासन्निध असलेल्या 'आस्ताव'नामक स्थलापर्यंत चालत जात असते व सर्वांच्या पुढें असलेला अध्वर्यु शास्त्रानुसार आपल्या हातांत घेतलेली उपाकरणदर्भमुष्टि हलवीत हलवीत चालत असतो. यावेळीं मोठी मौज दिसते.

८. अग्निष्टोमांत 'अग्नीषोमप्रणयन'नामक कर्म असतें. अग्नि व सोम हे मोठ्या मंडपांत घेऊन जाणें यालाच अग्नीषोमप्रणयन म्हणतात. यावेळीं मराठ्यांच्या लग्नांत तंबूप्रमाणें मध्यें एक काठी उभी केलेल्या एका कापडी चांदव्याखालीं उभें राहून वरवधूंकडील माणसें देवकार्याकरितां जातात त्याप्रमाणें मध्यें काठी मात्र नसलेलें एक लांबलचक वस्त्र डोक्यावर अधांत्री धरून त्याखालून अध्वर्यु, यजमान व पत्नी व त्यांच्या कुटुंबांतील इतर मुलेंमाणसें यांनां चालत जावयाचें असतें. तेव्हांहि थोडी मौज दिसते.

९. महाव्रतनामक यज्ञांत एका बाजूस ब्राह्मण व दुसऱ्या बाजूस शूद्र यांनीं धरून ओलें कातडें एकमेकांकडे ओढण्याचा विधि आहे. ओढाओढीच्या खेळासारखा हा प्रकार दिसतो.

१० महाव्रतांतच मार्जालीय मंडपामध्यें डोक्यावर पाण्याच्या घागरी घेतलेल्या दासींनीं नृत्य करावयाचें असतें. फेर धरल्याप्रमाणें सर्व दासींनीं मंडलाकार उभें राहून डोक्यावर पाण्याच्या घागरी घ्यावयाच्या. एकवार वाटोळें–मंडळाकार–सर्वांनीं फिरावयाचें व उजव्या मांडीवर थाप मारून 'इदं मधु' असें म्हणावयाचें. याप्रमाणें तीन फेऱ्या करावयाच्या. हाहि प्रकार प्रेक्षकांची अत्यंत करमणूक करतो.

आतांपावेतों कृष्णयजुर्वेदांतील विषयांसंबंधाची जी माहिती दिलेली आहे तिच्यांत अश्वमेध व पुरुषमेध या यागांत ज्या अनेक देवतांचें आवाहन केलें जातें व त्यांच्यासाठीं जे नानाविध पशु मारले जातात किंवा धरून सोडले जातात त्यासंबंधाच्या तपशीलवार यादीची भर टाकून आपण शुक्लयजुर्वेदाकडे वळूं.

## अश्वमेधशेषभूत एकादशिनसंज्ञक पशू.

### संघ १ ला.

१ इंद्रराजा — डुकर.
१ वरुणराजा — काळवीट.
१ यमराजा — एका जातीचें हरिण.
१ ऋषभराजा — मानेखालीं पाळी नसते असा गाईसारखा पशु.
१ शार्दूलराजा — पांढरा किंवा तांबडा हरिण.
१ पुरुषराजा — वानर.
१ क्षिप्रश्येन (शकुनिराजा) चिमणीसारखेंच एकपांखरूं.
१ नीलंगुः ( निलवर्णसर्पांचाराजा ) शेणकिडा.
१ सोमराजा — कर्णकटु अवाज असणारा 'चित्रक' नांवाचा पशु.
१ समुद्रराजा — मगर.
१ हिमवान् ( पर्वतराजा ) हत्ती.

### संघ २ रा.

१ प्रजापति — रानमोर.
१ धाता — घुबड, हिरव्या अगर काळ्या रंगाची चिमणी व मांजर.
१ सरस्वती — तांबड्या रंगाची बोलकी साळुंकी.
१ सरस्वान् — पांढरा बोलका राघू.
१ पूषा — कवडा, मुंगूस व माशी किंवा लांब कानाचा हरिण.
१ वाक् — क्रौंच-(करकोचा).

### संघ ३ रा.

१ अपांनपात् — माशासारख्या तोंडाचा मगर.
१ अकूपार ( समुद्र ) — लांबट तोंडाचा मगर किंवा लांब शेपटीचा मासा व वळविलेल्या तोंडाचा मगर आणि पुष्कळ पायांचा एक जातीचा मासा.
१ वाक् — लाल डोळ्यांचा भारद्वाजपक्षी किंवा चकोर.
१ भग — समुद्रकावळा.
१ वायु — हरिणी किंवा चापपक्षी, पाठीवर लहानसा शंख वाहणारा एक जंतु व पाणकोंबडा.
१ दिशा — चक्रवाक.

### संघ ४ था.

१ वल — अजगर.
१ मित्र — उंदीर, नीलवर्ण मक्षिका किंवा पांढरासर्प व सरडा.
१ मृत्यु — कृष्णसर्प.
१ मन्यु — आपोआप बिळांत उत्पन्न होणारा सर्प.
१ त्वष्टा — झोंपाळूसर्प, भ्रमर व तांबुस पांढुरका साप.
१ प्रतिश्रुत्का — फुरसें.

### संघ ५ वा.

१ चंद्रमा — माणसाच्या तोंडासारख्या तोंडाचा हरिण.
१ वनस्पति — घोरपड, सरडा व झाडाच्या ढोलींत राहणारा कोंबडा.
१ अहः — हरिणी.
१ रात्रि — काळवीट.
१ अर्यमा — कोकिळ, लालतोंडाची वानरी व काळ्या डोक्याची वानरी.
१ धाता — खेंकडा.

### संघ ६ वा.

१ सूर्य — बगळी.
१ गंधर्व — हरिण, मोर व ससाणा.
१ वसू — चातक किंवा कवडा.
१ रुद्र — तित्तिर नामकपक्षी (माणसासारख्या स्वराचा).
१ अप्सरा — रोही, घूस व फिकट पिवळ्या रंगाचा 'ताजवा'नामक पक्षी.
१ अरण्य — पांढऱ्या शेपटीचा गवा.

### संघ ७ वा.

१ विश्वेदेव — पांढऱ्या ठिपक्यांचा हरिण.
१ अनुमति — व्याघ्र, हरिण व कश नांवाचें हरिण.
१ अर्धमास — अन्यवाप जातीचें हरिण.
१ मास — कश्यप जातीचें हरिण.
१ सिनीवाली — क्वयि (?), कुटरु व पाणकोंबडा.
१ बृहस्पति — मांजरासारखा एक प्राणी.

### संघ ८ वा.

१ भूमि — माशी.
१ पितर — पांत्र नांवाचा पक्षी, कश नांवाचा पक्षी व पाणकोंबडा.
१ ऋतू — बिळांत राहणारा कोल्हा.

| | |
|---|---|
| १ संवत्सर | स्मशानांत राहणारा घुबड किंवा कावळा. |
| १ निर्ऋति | होलगड, घुबड व ससा. |
| १ सविता | रानकोंबडा. |

**संघ ९ वा.**

| | |
|---|---|
| १ रुद्र | रोही. |
| १ शरव्या | सरडा, कावळा व पिप्पका नांवाचा पक्षी. |
| १ मरुत् | हरिण. |
| १ ब्रह्मा | रानचिमणी. |
| १ इतरजन | गाढवाच्या आकाराचा वाघ, डोळ्यांवर ठिपके असलेला कुत्रा व गर्दभ. |
| १ अग्नि | पांढरी कावळी. |

**संघ १० वा.**

| | |
|---|---|
| १ अंतरिक्ष | भासनामक पशु. |
| १ आप | पाणमांजर, पाणकावळा व एक जातीचा वानर. |
| १ अदिति | पांढऱ्या रंगाचा हंस. |
| १ इंद्राणी | कुंभारीण नामक पांखरूं. |
| १ द्यौ | गिधाड, पांढऱ्या पोटाचा गिधाड व खड्गमृग. |
| १ द्यावापृथिवी | साळु नांवाचा पशु. |

**संघ ११ वा.**

| | |
|---|---|
| १ पर्जन्य | गरुड. |
| १ इंद्र | हंस, लांडगा व एका जातींचें मांजर. |
| १ आप | पाणमांजर. |
| १ अर्यमा | कोल्हा. |
| १ महेंद्र | सिंह, मुंगूस व वाघ. |
| १ काम | रेडा. |

**संघ १२ वा.**

| | |
|---|---|
| १ अग्नि | मानेवर काळा रंग असलेला बोकड. |
| १सरस्वती | मेंढी. |
| १ सोम | पिंगटवर्णाचा बोकड. |
| १ पूषा | श्यामवर्ण बोकड. |
| १ बृहस्पति | पांढऱ्या पाठीचा बोकड. |
| १ विश्वेदेव | अनेकवर्णी बोकड. |
| १ मरुत् | काळ्या ठिपक्यांचा बोकड. |
| १ इंद्राग्नी | काळ्या पांढऱ्या मिश्र रंगाचा बोकड. |
| १ सविता | काळ्या पांढऱ्या पोटाचा बोकड. |
| १ वरुण | आंड बडविलेला मेंढा. |

**संघ १३ वा.**

| | |
|---|---|
| १ प्रजापति | घोडा, शिंगें नसलेला बोकड व गवा. |
| १ अग्नि | काळ्या रंगाच्या मानेचे दोन बोकड. |
| १ त्वष्टा | मांड्यांवर पुष्कळ केंस असलेले दोन बोकड. |
| १ बृहस्पति | पांढऱ्या पाठीचे दोन बोकड. |
| १ धाता | पोटावर पांढरे ठिपके असलेला बोकड. |
| १ सूर्य | पांढऱ्या रंगाचा आंड बडविलेला बोकड. |

**संघ १४ वा.**

| | |
|---|---|
| १ अग्निरनीकवान् | लिंगावर तांबडावर्ण असलेला बोकड. |
| १ सविता | पांढऱ्या व काळ्या मिश्र वर्णाच्या पोटाचे दोन बोकड. |
| १ पूषा | पांढऱ्या रंगाच्या बेंबीचे दोन बोकड. |
| १ विश्वेदेव | गोरोचनाच्या रंगाचे दोन बोकड. |
| १ मरुत् | बिनशिंगांचे दोन बोकड. |
| १ अग्नि | काळ्या ठिपक्याचा बोकड. |

## अश्वमेधांगभूत अष्टादशिन पशुसंघ.

**संघ १ ( पशू १८ )**

| | |
|---|---|
| १ प्रजापति | तांबड्या वर्णाचा बोकड, फिकट तांबडा बोकड व काळाकुळकुळीत बोकड. |
| १ रुद्र | पिंगट पांढरा बकरा, तांबुसपिंगट बोकड व पोपटी रंगाचा बोकड. |
| १ पितर | तांबड्या रंगाचा बोकड, लाल डोळ्यांचा बोकड व तांबड्या मानेचा बोकड. |
| १ वरुण | काळ्या रंगाच्या तीन शेळ्या. |
| १ सूर्य | पांढऱ्या रंगाच्या तीन शेळ्या. |
| १ मित्राबृहस्पती | बिनशिंगांच्या व कपाळावर धुरकट रंगाचें पान असलेल्या तीन शेळ्या. |

**संघ २ रा.**

| | |
|---|---|
| १ मरुत् | पांढरे ठिपके असलेला पांढरा बोकड, पांढऱ्या रंगाचे आडवे पट्टे असलेला बोकड व पांढरे उभे पट्टे असलेला बोकड. |
| १ सरस्वती | मिठाच्या रंगाचा बोकड, तांबूस केसांचा बोकड व पांढऱ्या रंगाची शेळी. |

| | |
|---|---|
| १ विश्वेदेव | पांढऱ्या ठिपक्यांची, मोठाल्या पांढऱ्या ठिपक्यांची व लहान लहान पांढऱ्या ठिपक्यांची अशा तीन शेळ्या. |
| १ पूषा | काळ्या रंगाच्या तीन शेळ्या. |
| १ मित्र | तांबड्या रंगाच्या तीन शेळ्या. |
| १ इंद्राबृहस्पती | तांबड्या रंगाचें कपाळावर पान असलेल्या तीन शेळ्या. |

**संघ ३ रा.**

| | |
|---|---|
| १ इंद्रवायू | एका वाहुट्यावर एक ठिकाणीं पांढरा रंग असलेला, दुसऱ्या वाहुट्यावर पहिल्याहून निराळ्या जागीं पांढरा वण असलेला व सर्व वाहुटे पांढरे असलेला असे तीन बोकड. |
| १ मित्रावरुण | पांढऱ्या रंगाचा भोंवरा असलेले तीन बोकड. |
| १ अश्विनौ | शेंपटाचा कांहीं भाग पांढरा असलेला, सर्व शेंपूट पांढरें असलेला व काळ्या पांढऱ्या अशा मिश्र रंगाच्या शेंपटाचा असे तीन बोकड. |
| १ विश्वेदेव | नानारंगाच्या शेळ्या तीन. |
| १ परमेष्ठी | पांढऱ्या रंगाच्या शेळ्या तीन. |
| १ सोमापौष्ण | कपाळावर भस्मासारखी श्यामवर्णाची खूण असणाऱ्या शेळ्या तीन. |

**संघ ४ था.**

| | |
|---|---|
| १ इंद्रावरुण | उंच पाठीचा, तरुण व ठेंगणा असे तीन बोकड. |
| १ इंद्राबृहस्पती | पांढऱ्या वशिंडाचा, पांढऱ्या पाठीचा व पांढऱ्या ढुंगणाचा असे तीन बोकड. |
| १ इंद्राविष्णू | पांढऱ्या पायांचा, पांढऱ्या ओठांचा व पांढऱ्या भिवयांचा असे तीन बोकड. |
| १ विश्वकर्मा | पांढऱ्या पायांच्या व भुऱ्या अंगाच्या तीन शेळ्या. |
| १ धाता | पोटावर ठिपके ठिपके असणाऱ्या तीन शेळ्या. |
| १ इंद्रापोष्ण | कपाळावर पांढरें पान असणाऱ्या तीन शेळ्या. |

**संघ ५ वा.**

| | |
|---|---|
| १ यम | कान छाटलेल्या तीन शेळ्या. |
| १ सोम | पांढऱ्या पायांच्या तीन शेळ्या. |
| १ अग्नियविष्ठ | मुंगसासारख्या रंगाच्या तीन शेळ्या. |
| १ वसू | तांबुसवर्णाच्या व दीड वर्षाच्या उमरीच्या तीन शेळ्या. |
| १ रुद्र | अरुणवर्णाच्या व दोन वर्षें वयाच्या तीन शेळ्या. |
| १ सोमेंद्र | पिंगटवर्णाचें पान कपाळावर असणाऱ्या तीन शेळ्या. |

**संघ ६ वा.**

| | |
|---|---|
| १ विष्णु | तीन ठेंगू बोकड |
| १ विष्णुउरुक्रम | कानावर कान वाढलेले तीन बोकड. |
| १ विष्णु उरुगाव | लांब शेंपटाचे तीन बोकड. |
| १ आदित्य | साडेतीन वर्षें वयाचे तीन बोकड. |
| १ अंगिरस | तीन वर्षें वयाचे तीन बोकड. |
| १ इंद्राविष्णू | कपाळावर गौरवर्णाची खूण असणारे भुंडे तीन बोकड. |

**संघ ७ वा.**

| | |
|---|---|
| १ अदिति | तांबुस पिंवळ्या रंगाचे पशू ३. |
| १ इंद्राणी | काळे तांबुस वर्णाचे पशू ३. |
| १ कुहू | गर्द तांबूस रंगाचे पशू ३. |
| १ राका | गाई ३. |
| १ अग्नाविष्णू | कपाळावर तांबुस पान असलेले ३ बोकड. |
| १ सिनीवाली | बैल ३. |

**संघ ८ वा.**

| | |
|---|---|
| १ इंद्रराट् | पांढऱ्या पाठीचे पशू ३. |
| १ इंद्राधिराट् | पांढऱ्या वशिंडाचे पशू ३. |
| १ इंद्रस्वराट् | पांढऱ्या ढुंगणाचे पशू ३. |
| १ साध्य | ४॥ वर्षें उमरीच्या शेळ्या ३. |
| १ विश्वेदेव | ४ वर्षें वयाच्या शेळ्या ३. |
| १ अग्नींद्र | काळ्या शेंपटीचे पशू ३. |

**संघ ९ वा.**

| | |
|---|---|
| १ सोम | गोरोचनवर्णाचे पशू ३. |
| १ सोमराजा | सारंगवर्णाचे पशू ३. |
| १ पर्जन्य | काजळीवर्णाच्या ३ शेळ्या. |
| १ इंद्राणी | गळ्याशीं स्तनें असलेल्या शेळ्या ३. |
| १ अदिति | मेंढ्या ३. |
| १ द्यावापृथिवी | मोठ्या शरीराच्या शेळ्या ३. |

**संघ १० वा.**

| | |
|---|---|
| १ वरुण | काळ्या रंगाचें पान कपाळावर असणारे पशू ३. |
| १ वरुणराजा | तांबुस रंगाचें पान कपाळावर असलेले पशू ३. |

| | |
|---|---|
| १ वरुणरिशादस | अरुण रंगाचें पान कपाळावर असलेले पशू ३. |
| १ विश्वेदेव | नानावर्णांचे पशू ३. |
| १ सर्वदेवता | ठिपक्याठिपक्यांचे पशू ३. |
| १ इंद्रसूर | पांढऱ्या शेंपटाचे पशू ३. |

## पशूंच्या जोड्या.

| | |
|---|---|
| १ सोमस्वराट् | गाडी ओढणाऱ्या बैलांची जोडी. |
| १ इंद्राग्नी ( ओजोद ) | गाडी ओढणाऱ्या उंटांची जोडी. |
| १ इंद्राग्नी ( बलद ) | नांगर ओढणाऱ्या व शेळीसारख्या लहान खुरांच्या बैलांची जोडी. |
| १ भूमि | दोन गाई. |
| १ दिशा | दोन घोड्या. |
| १ भूमि | गाई दोन. |
| १ विराट् | मानवी स्त्रिया २. |
| १ भूमि | गाईची जोडी. |
| १ वायु | माणसांच्या गाडीला जोडण्याचे बैल २. |
| १ वरुण | काळवीटजातीच्या दोन हरणी. |
| १ द्यु | ज्यांच्या अगोदरचे व पाठचे भाऊ मेले आहेत अशा बोकडांची जोडी. |

## अश्वमेधाच्या शेवटच्या दिवशीं होणाऱ्या अतिरात्रामध्यें मारावयाचे असलेले पशू.

| | |
|---|---|
| १ प्रजापति | गाईच्या आकाराचे एका जातीचे पशू ११. |
| १ त्वष्टा | बोकडाचें पिलूं काळ्यापांढऱ्या रंगाचें, तित्तिरपक्षी व एक प्रकारचा कोंबडा. |
| १ सूर्य | पांढऱ्या रंगाच्या वांझ शेळ्या ९. |

याशिवाय आहवनीयाकडे ज्याची एक कोर केलेली असते त्या उंच व मुख्य यूपाच्या ठिकाणीं अग्नि, ऐंद्राग्न, आश्विन या ३ देवांच्या उद्देशानें ३ पशू मारण्यांत येतात.

## ऋतुपशु.

| | |
|---|---|
| १ वसन्त | गोरोचनाच्या रंगाचे ३ पशू. |
| १ ग्रीष्म | सारंगवर्णाचे ३ पशू. |
| १ वर्षा | निरनिराळ्या रंगांतील ठिपक्यांचे पशू ३. |
| १ शरद् | पांढऱ्या रंगाचे पशू ३. |
| १ हेमंत | पांढऱ्या कंबरेचे पशू ३. |
| १ शिशिर | मिश्रवर्णांनीं युक्त असे पशू ३. |
| १ संवत्सर | उतरत्या छातीचा पशु १. |



## पुरुषमेध.

| देवता | जाति |
|---|---|
| १ ब्राह्मणजात्यभिमानी देव. | १ ब्राह्मणजातीय ब्रह्मवर्चसयुक्त पुरुष. |
| २ क्षत्रियजात्यभिमानी देव. | २ क्षत्रियजातीय पुरुष. |
| ३ वैश्यजात्यभिमानी देव ( मरुत् ). | ३ वैश्यजातीय पुरुष. |
| ४ कृछ्रादिदुःखरूपतपाचा देव. | ४ शूद्र जातीचा पुरुष. |
| ५ अंधकाराचा देव. | ५ अंधकारप्रिय असा चोर. |
| ६ नरकाधिपति देव. | ६ अग्नीचें उद्वासन करणारा. |
| ७ पापाधिपति देव. | ७ नपुंसक माणूस. |
| ८ सर्व पदार्थांच्या विक्रीचा अधिपति देव. | ८ आयोगू–अशास्त्र वर्तनाचा माणूस. |
| ९ कामदेव. | ९ पुंश्चलु–साधारण स्त्री. |
| १० अतिनिंदित देव. | १० मागध–मगधदेशीय अथवा क्षत्रिय स्त्रीस वैश्यापासून झालेला. |
| ११ गीताभिमानी देव. | ११ सूत–ब्राह्मणस्त्रीच्या ठिकाणीं क्षत्रियबीजानें झालेला, अथवा गायनावर पोट भरणारा माणूस. |
| १२ नृत्ताभिमानी देव. | १२ शैलूष–दुसऱ्याला आपली बायको देऊन पोटाला पैसे मिळविणारा माणूस. |
| १३ धर्माभिमानी देव. | १३ नेहमीं सभेंत जाऊन धर्मविषयावर प्रवचन करणारा सभाचर. |
| १४ विनोदाभिमानी देव. | १४ रेभ–बुद्धिवान्, मधुरभाषी. |
| १५ दुसऱ्याच्या जीवावर अवलंबून राहणारी पारतंत्र्याभिमानी देवता. | १५ भीमल–भित्रा व चपल नेत्र असा मनुष्य. |
| १६ हास्याभिमानी देव. | १६ कारी–नाचत नाचत वेडें वाकडें चालणारा माणूस. |
| १७ आनंदाभिमानी देव. | १७ स्त्रियांच्या मनांत भरणारा पुरुष–स्त्रीषख. |
| १८ अत्यंतहर्षाभिमानी देव. | १८ कुमारीपुत्र–मुलीचा मुलगा. |
| १९ ग्रंथार्थधारणाऽभिमानी देवता. | १९ रथकार–रथ तयार करणारा हुषार माणूस. |
| २० धैर्याभिमानी देव. | २० तक्षा–वर्धकी–लांकडें तासणारा माणूस. |
| २१ श्रमाभिमानी देव. | २१ कौलाल–कुंभाराचा मुलगा. |

| | |
|---|---|
| २२ विचित्रक्रियाशक्तिदेवता. | २२ कार्मार–लोहार. |
| २३ काळ्या गोऱ्या रंगाचा अभिमानी देव. | २३ मणिकार–मण्यांचें व मोत्यांचें काम करणारा. |
| २४ चांगल्याचा अभिमानी देव. | २४ वप–बीं पेरणारा. |
| २५ बाणसमूहाभिमानी देवता. | २५ इषुकार–बाण तयार करणारा. |
| २६ आयुधाभिमानी देवता. | २६ धन्वकार–धनुष्याचें काम करणारा. |
| २७ हालचालीचा अभिमानी देव. | २७ ज्याकार–धनुष्याच्या दोरीचें काम करणारा. |
| २८ भवितव्याभिमानी देव. | २८ रज्जुसर्ग–दोऱ्या वळणारा माणूस. |
| २९ मरणाभिमानी देव. | २९ मृगयु–हरिणादि पशूंना मारणारा. |
| ३० प्राणापहारी देव. | ३० श्वनित–कुत्र्याबरोबर खेळ खेळण्यावर पोट भरणारा. |
| ३१ संघट्टनाभिमानी देवता. | ३१ जार–परस्त्रीगामी पुरुष. |
| ३२ गृहाभिमानी देव. | ३२ उपपति–नवऱ्याला माहित असलेला जार. |
| ३३ निर्ऋतिदेवता. | ३३ परिवित्त–वडील भावाच्या पूर्वींच आपलें लग्न करणारा धाकटा भाऊ. |
| ३४ दुःखदेवता. | ३४ परिविविदान-प्रथम विवाहशील म्हणजे आधीं माझें लग्न करा असें म्हणणारा. |
| ३५ कार्यसिद्धिप्रतिबंधाभिमानिनी देवता. | ३५ दिधीषूपति–दोनदां लग्न करणाऱ्या बायकोचा नवरा. |
| ३६ शुद्धाभिमानी देव. | ३६ वैद्य. |
| ३७ कालज्ञानाभिमानी देवता. | ३७ ज्योतिषी. |
| ३८ कार्यनिष्पादनाभिमानी देवता. | ३८ सोनाराची स्त्री. |
| ३९ बलाभिमानी देवता. | ३९ अन्न देऊन घेतलेली कन्या. |
| ४० शुक्लकृष्णवर्णाभिमानी देव. | ४० दुसऱ्याच्या तंत्रानें चालणारा माणूस. |
| ४१ नदीदेवता. | ४१ कैवर्त–कोळी जातीचा माणूस |
| ४२ शून्यस्थलाची देवता. | ४२ निषादजातीचा माणूस. |
| ४३ श्रेष्ठत्वाचा अभिमानी देव. | ४३ अत्यंत मदांध मनुष्य. |
| ४४ युद्ध करणारी देवता. | ४४ उन्मत्त प्रकृतीचा माणूस. |
| ४५ गंधर्व व त्यांच्या अप्सरा. | ४५ शास्त्रीयसंस्कारहीन पुरुष अथवाव्रात्य. |
| ४६ सर्पाभिमानी व इंद्रजालाभिमानी देवता. | ४६ संस्कारांना अयोग्य मनुष्य. |
| ४७ रक्षणाभिमानी देवता. | ४७ द्यूतासक्त मनुष्य–कितव. |
| ४८ अन्नसमृद्ध्यभिमानी देवता. | ४८ द्यूतादिव्यसनरहित माणूस. |
| ४९ देवयोनिविशेष. | ४९ बुरूड जातीचा माणूस. |
| ५० राक्षसांपैकीं एका जातीचा देव. | ५० बागेभोंवतीं कांट्यांचें कुंपण करणारा मनुष्य. |
| ५१ कार्यविनाशाभिमानी देव. | ५१ कुबडा माणूस. |
| ५२ हर्षाभिमानी देव. | ५२ खुजा माणूस. |
| ५३ द्वाराभिमानी देव. | ५३ रोगी मनुष्य. |
| ५४ स्वप्नाभिमानी देव. | ५४ आंधळा माणूस. |
| ५५ पापाभिमानी देव. | ५५ बहिरा माणूस. |
| ५६ सम्यग्ज्ञानाभिमानी देव. | ५६ औषधींनीं किंवा मंत्रोपायांनीं आपल्या नवऱ्याला कामेच्छा उत्पन्न करणारी स्त्री. |
| ५७ बहुप्रलापाभिमानी देव. | ५७ सभेंत बसून व्यर्थ बडबड करणारा मनुष्य. |
| ५८ वेदशास्त्राविषयीं अल्पपरिज्ञानाभिमानिनी देवता. | ५८ शास्त्रार्थाविषयीं शंका घेऊन प्रश्न करणारा. |
| ५९ वेदशास्त्रपरिचयाभिमानी देवता. | ५९ शंका निवारण करणारा माणूस. |
| ६० शास्त्रार्थव्यवस्थाभिमानिनी देवता. | ६० दुसऱ्याच्या प्रश्नाचें विचारपूर्वक उत्तर देणारा मनुष्य. |
| ६१ चौर्यकर्म करून पळून जाण्याची अभिमानी देवता. | ६१ चोरी करण्यांत पटाईत माणूस. |
| ६२ वीरहत्याभिमानी देव. | ६२ चहाडखोर माणूस. |
| ६३ विशेषलाभाभिमानिनी देवता. | ६३ सारथि. |
| ६४ राजभांडाराभिमानी देव. | ६४ भांडारखान्यावरील अध्यक्ष. |
| ६५ बलाभिमानी देव. | ६५ चाकरमाणूस. |
| ६६ महत्त्वाभिमानी देव. | ६६ हुजरेगिरी करणारा माणूस |
| ६७ प्रियाभिमानी देव. | ६७ मृदुभाषणी माणूस. |
| ६८ अहिंसाभिमानिनी देवता. | ६८ घोडेस्वार. |
| ६९ यज्ञबुद्ध्यभिमानी देव. | ६९ परटाची स्त्री. |
| ७० प्रकृष्टकामाभिमानी देव. | ७० रंगाऱ्याची स्त्री. |
| ७१ दीप्त्यभिमानिनी देवता. | ७१ मोळीविक्या. |
| ७२ अत्यंतदीप्त्यभिमानिनी देवता. | ७२ अग्नि पेटविणारा मनुष्य. |
| ७३ स्वर्गाभिमानी देव. | ७३ राज्याभिषेककर्ता माणूस. |
| ७४ आदित्य लोकाचें पालन करणारा देव. | ७४ भांडीं घांसणारा माणूस. |

| | |
|---|---|
| ७५ देवलोकाभिमानी देव. | ७५ शांततेच्या ठिकाणीं वैर उकरून काढणारा मनुष्य. |
| ७६ मनुष्यलोकाभिमानी देव. | ७६ एकत्र असणारांत बिघाड आणणारा मनुष्य. |
| ७७ सर्वलोकाभिमानी देव. | ७७ वैर शमविणारा माणूस. |
| ७८ आपत्तिरूपवधाभिमानी देव. | ७८ आपण होऊन वैर उत्पन्न करणारा. |
| ७९ स्वर्गलोकाभिमानी देव. | ७९ प्रजेपासून राजाचा वसूल घेणारा अधिकारी. |
| ८० अतिशय उंच अशा स्वर्गाचा अभिमानी देव. | ८० वाढपी–जेवणाची पंगत वाढणारा माणूस. |
| ८१ गतिविशेषाभिमानी देव. | ८१ महात. |
| ८२ वेगाभिमानी देव. | ८२ चाबुकस्वार. |
| ८३ पुष्ट्यभिमानी देव. | ८३ गुराखी. |
| ८४ तेजोभिमानी देव. | ८४ शेळ्या पाळणारा धनगर. |
| ८५ वीर्याभिमानी देव. | ८५ मेंढ्या राखणारा मेंढपाळ. |
| ८६ अन्नाभिमानिनी देवता. | ८६ नांगर हाकणारा. |
| ८७ जलाभिमानी देव. | ८७ पिण्याची दारू तयार करणारा मनुष्य. |
| ८८ कल्याणाभिमानी देव. | ८८ घराची राखण करणारा. |
| ८९ श्रेयोभिमानी देव. | ८९ धनसंरक्षक. |
| ९० प्रत्यक्षकारणाभिमानी देव. | ९० सारथ्याचा जोडीदार –सैस. |
| ९१ मानसकोपाभिमानी देव. | ९१ लोहार. |
| ९२ बाह्यकोपाभिमानी देव. | ९२ वध्य लोकांना बाहेर हांकून लावणारा. |
| ९३ शोकाभिमानी देव. | ९३ रथापुढें धांवणारा माणूस. |
| ९४ अपेक्षेपेक्षां जास्त लाभ होण्याचा अभिमानी देव व अपेक्षेहून कमी लाभाचा अभिमानी देव. | ९४ पायांनीं किंवा काठीच्या साहाय्यानेंहि चालतां न येणारा माणूस. |
| ९५ अलब्धलाभाभिमानी देव. | ९५ रथाचे घोडे जुंपणारा. |
| ९६ प्राप्तधनाचा रक्षणाभिमानी देव. | ९६ रथाचे घोडे सोडणारा. |
| ९७ शरीराभिमानी देव. | ९७ सुंदर रूपाकडेच मन गुंतवून ठेवणाराचा पुत्र. |
| ९८ शीलाभिमानी देव. | ९८ डोळ्यांत काजळ घालणारा माणूस. |
| ९९ पापदेवता. | ९९ भाता फुंकणारी कुशल स्त्री. |
| १०० प्राणापहारक देव. | १०० वन्ध्या स्त्री. |
| १०१ यमाची स्त्री. | १०१ जुळीं मुलें होणारी स्त्री. |
| १०२ अथर्वशाखाभिमानी देवता. | १०२ गर्भस्राव होणारी स्त्री. |
| १०३ संवत्सराभिमानी देव. | १०३ उशीरां प्रसूत होणारी स्त्री. |
| १०४ द्वितीयसंवत्सराभिमानी देव. | १०४ पहिल्या खेपेची बाळंतीण. |
| १०५ तृतीयवर्षाभिमानी देव. | १०५ योग्य मुदतीच्या आंतच प्रसूत होण्याची संवय लागलेली स्त्री. |
| १०६ चतुर्थवर्षाभिमानी देव. | १०६ मुदतीच्या बाहेर प्रसूत होण्याची संवय लागलेली स्त्री. |
| १०७ पंचमवर्षाभिमानी देव. | १०७ बाळंतपणामुळें म्हातारपण आलेली स्त्री. |
| १०८ जगताचें आच्छादन करणारा वर्षाभिमानी देव. | १०८ पूर्ववयांत म्हातारपणाचीं चिन्हें असलेली स्त्री. |
| १०९ वनाभिमानी देव. | १०९ अरण्यरक्षक माणूस. |
| ११० एकाच बाजूच्या अरण्याचा अभिमानी देव. | ११० वणव्याचें संरक्षण करणारा माणूस. |
| १११ सरोवराभिमानी देव. | १११ मासे धरणारा धीवर. |
| ११२ डबक्यांचा अभिमानी देव. | ११२ गळानें मासे पकडणारा. |
| ११३ झाडांच्या आळ्यांमधून सांचलेल्या पाण्याचा अभिमानी देव. | ११३ जाळ्यानें मासे पकडणारा माणूस. |
| ११४ गवताळ प्रदेशांत सांठलेल्या पाण्याचा अभिमानी देव. | ११४ मासे मारण्याकरितां गळाला लावण्याचें आमिष तयार करून त्याच्यावर उपजीविका करणारा. |
| ११५ परतीराभिमानी देव. | ११५ पाण्याच्या तीरावर मासे जमवून मारणारा कोळी. |
| ११६ अलीकडच्या तीराचा अभिमानी देव. | ११६ हातांनीं मासे पकडून मारणारा माणूस. |
| ११७ उतरण्याच्या जागेचा अभिमानी देव. | ११७ खुंट्या ठोकून, जाळें लावून मासे धरणारा. |
| ११८ कोणीहि वस्ती करीत नाहीं अशा स्थानाचा देव. | ११८ जाळीं विणून उपजीविका करणारा. |
| ११९ सशब्दजलाभिमानिनी देवता. | ११९ विषारी पान पाण्यावर टाकून मासे पकडणारा माणूस. |
| १२० गुहाभिमानी देव. | १२० किरात–रानशिकारी, हरणें मारणारा. |
| १२१ पर्वतशिखराभिमानी देव. | १२१ जांभया देण्याची संवय असणारा माणूस. |

| | |
|---|---|
| १२२ पर्वताभिमानी देव. | १२२ वनवासी गायक. |
| १२३ प्रतिध्वन्यभिमानी देव. | १२३ हेराचें काम करणारा. |
| १२४ ध्वन्यभिमानी देव. | १२४ असंबद्ध भाषण करणारा. |
| १२५ अंतवंत शब्दांचा अभिमानी देव. | १२५ फाजील बोलण्यांत हुषार. |
| १२६ अनंतशब्दाभिमानी देव. | १२६ मुका माणूस. |
| १२७ मंजुळ ध्वनीविषयीं अभिमानी देव. | १२७ वीणावादनकुशल. |
| १२८ मोठ्यानें ओरडण्याचा अभिमानी देव. | १२८ अलगुज वाजविणारा. |
| १२९ सभोंवार घुमत राहणाऱ्या शब्दघोषाचा अभिमानी देव. | १२९ नगारजी. |
| १३० लहानमोठ्या आवाजाचा अभिमानी देव. | १३० शंख वाजविणारा माणूस. |
| १३१ ऋतूंच्या अभिमानी देवता. | १३१ कातडीं शिवण्यावर उपजीविका करणारा. |
| १३२ कालसाद्गुण्याभिमानी देव. | १३२ वीणा वगैरे वाद्यांच्या गवसणी तयार करणारा. |
| १३३ दुष्ट वस्तूविषयींच्या तिटकाऱ्याचा अभिमानी देव. | १३३ अतिशय खालच्या जातीचा माणूस. |
| १३४ ऐश्वर्याभिमानी देवता. | १३४ सावधानवृत्तीचा माणूस. |
| १३५ दारिद्र्याभिमानिनी देवता. | १३५ झोंपाळू मनुष्य. |
| १३६ तराजूचा अभिमानी देव. | १३६ दुकानदार वाणी. |
| १३७ रत्नाप्रमाणें चमकण्याच्या अभिमानिनी देवता. | १३७ जडावाचे अलंकार करणारा. |
| १३८ विश्वेदेव. | १३८ कुष्टरोगी मनुष्य. |
| १३९ कुष्टव्यतिरिक्तरोगाभिमानी देव. | १३९ किडकिडीत माणूस. |
| १४० गल्यभिमानिनी देवता. | १४० लोकांची निंदा करणारा. |
| १४१ समृद्धीच्या अभावाची अभिमानिनी देवता. | १४१ नेभळट वृत्तीचा मनुष्य. |
| १४२ नाशाभिमानी देव. | १४२ एकदम एक घाव दोन तुकडे करणारा माणूस. |
| १४३ उपहासाभिमानी देव. | १४३ खैरिणी स्त्री. |
| १४४ गीताभिमानी देव. | १४४ वीणावादनकुशल व स्वरमात्रागणनकुशल माणूस. |
| १४५ जलचरप्राण्यभिमानी देव. | १४५ शबलवर्ण शरीराची स्त्री. |
| १४६ प्रियवचनाभिमानी देव. | १४६ सुलक्षण शरीराची स्त्री. |
| १४७ नृत्याभिमानी देव. | १४७ तोंडानें शीळ वाजविणारा, ग्रामाधिपति (पाटील) व हातांनीं ताल धरणारा माणूस. |
| १४८ हर्षाभिमानी देव. | १४८ नाच चालला असतांना त्या ठिकाणीं लोकांना बोलाविणारा मनुष्य. |
| १४९ आनन्दाभिमानी देव. | १४९ काहल नामक वाद्य वाजविणारा माणूस. |
| १५० खेळण्याच्या फांशांचा अभिमानी देव. | १५० द्यूत खेळण्यांत पटाईत माणूस. |
| १५१ कृतयुगाभिमानी देव. | १५१ जुगाराच्या अड्ड्यांत बैठक घालून बसणारा मनुष्य. |
| १५२ त्रेतायुगाभिमानी देव. | १५२ जुगार पाहणारा. |
| १५३ द्वापरयुगाभिमानी देव. | १५३ जुगाराच्या अड्ड्याबाहेर बसणारा. |
| १५४ कलियुगाभिमानी देव. | १५४ खेळ चालू नसला तरी सुद्धां अड्ड्याच्या जागेंत बसून राहणारा माणूस. |
| १५५ दुर्घट कार्य करण्याचा अभिमानी देव. | १५५ कळकावर कसरत करणारा कोलाटी, गोपाळ वगैरे. |
| १५६ मार्गाभिमानी देव. | १५६ उपनीत मनुष्य. |
| १५७ पिशाचदेवता. | १५७ डोंगरांत राहून लोकांची लुटालूट करणारा माणूस. |
| १५८ पानेच्छाभिमानिनी देवता. | १५८ गाईंचा पाळा जमविणारा. |
| १५९ पापदेवता. | १५९ गोघातकी मनुष्य. |
| १६० क्षुद्राभिमानिनी देवता. | १६० गाईची चामडी सोलणारा. |
| १६१ क्षुत्तृष्णाभिमानिनी देवता. | १६१ गाईचें चामडें सोलून मांस काढणाऱ्याजवळ तें मांस दारिद्र्यामुळें पोटासाठीं मागणारा. |
| १६२ भूमिदेवता. | १६२ पांगळेपणामुळें लांकडी कुबडीच्या आश्रयानें चालणारा मनुष्य. |
| १६३ अग्नि. | १६३ बळकट मनुष्य. |

| | |
|---|---|
| १६४ वायु. | १६४ चांडाळ जातीचा मनुष्य. |
| १६५ अंतरिक्ष. | १६५ वेळूवर कसरत करणारा डोंबारी. |
| १६६ द्युलोकदेवता. | १६६ टक्कल पडलेला माणूस. |
| १६७ सूर्य. | १६७ घाऱ्या डोळ्यांचा मनुष्य |
| १६८ चंद्र. | १६८ डोळे मिचकवण्याची संवय असणारा मनुष्य. |
| १६९ नक्षत्रदेवता. | १६९ कोडाचे पट्टे अंगावर उठलेला. |
| १७० अहर्देवता. | १७० गोरा व पिंगळ्या डोळ्यांचा. |
| १७१ रात्रिदेवता. | १७१ काळा व पिंगळ्या डोळ्यांचा. |
| १७२ वाग्देवता. | १७२ लठ्ठ माणूस. |
| १७३ वायु. | १७३ पूर्वोक्त माणसाचे पंचप्राण. |
| १७४ सूर्य. | १७४ पूर्वोक्त मनुष्याचें चक्षुरिंद्रिय. |
| १७५ चंद्र. | १७५ पूर्वोक्त माणसाचें मन. |
| १७६ दिशा. | १७६ पूर्वोक्त मनुष्याचें श्रोत्रेंद्रिय. |
| १७७ प्रजापति. | १७७ पूर्वोक्त माणसाचा जीवात्मा. |
| १७८ कुत्सितरूपाभिमानिनी देवता. | १७८ १ अतिशय ठेंगू. |
| | २ अति उंचट. |
| | ३ अति किडकिडीत. |
| | ४ अति लठ्ठ. |
| | ५ अति गौरवर्ण. |
| | ६ अतिशय काळा. |
| | ७ अति सुंदर. |
| | ८ अति केंसाळ. |
| | ९ थोड्या दांतांचा. |
| | १० उंचउंच दांतांचा. |
| | ११ डोळे मिचकावणारा. |
| | १२ वटारलेल्या डोळ्यांचा. |
| १७९ आशाभिमानिनी देवता. | १७९ विटाळ गेलेली स्त्री. |
| १८० प्रतीक्षाभिमानिनी देवता. | १८० अविवाहित मुलगी. |

या वरील पशूंसंबंधानें यज्ञशास्त्रांतील व्यवस्था अशी आहे कीं, अश्वमेधासंबंधीं जे पशू आहेत त्यांपैकीं 'आरण्य' पशूंचें 'उपाकरण' झाल्यावर त्यांनां सोडून देण्यांत येतें व शिल्लक राहिलेले 'ग्राम्य'पशू मारण्यांत येतात. पुरुषमेधांत मारण्याचा विधि मुळींच नाहीं. पुरुषमेधांतील सर्वच मनुष्यपशू उपाकरणानंतर सोडून देण्याचा विधि आहे. असो.

यजुर्वेदापैकीं तैत्तिरीयशाखांतर्गत श्रौतकर्मांची ही क्रमवार आणि विषयवार मांडणी झाली. तथापि यजुर्वेदाच्या निरनिराळ्या शाखांमध्यें काय फरक आहे आणि या वेदांतील मंत्र कोणत्या प्रकारचे आहेत याची माहिती दिल्याशिवाय या वेदाची साकल्यानें कल्पना होणार नाहीं. निरनिराळ्या संहितांची तुलना करून सूक्ष्म भेद दावयास येथें अवकाश नाहीं. सामान्यतः एवढें सांगतां येईल कीं कृष्णांच्या आणि शुक्लांच्या श्रौतधर्मांत फारसा फरक नाहीं; क्रिया त्याच व मंत्रहि जवळजवळ तेच; फरक असला तर कृष्णांच्या मंत्राचा एखादा तुकडा तोडून त्याला शुक्लांनीं प्रसंगीं निराळे शब्द लावले आहेत इतकाच.

शुक्लांची आणि कृष्णांची सूक्ष्म तुलना केली असतां ज्या महत्त्वाच्या ऐतिहासिक गोष्टींवर प्रकाश पडतो त्यांची कल्पना प्रसंगतः दिली जाईलच. यांच्यामधील भेद थोडक्यांत सांगावयाचा म्हटल्यास असें म्हणतां येईल कीं, कृष्णयजुर्वेद संहितेंत श्रौतकर्म जितकें विस्तृत आहे तितकें शुक्लयजुर्वेदांत नाहीं. तथापि जें आहे तें जुनेंच आहे. त्याची कल्पना येण्यासाठीं शुक्लयजुर्वेदाची रूपरेखा येथें देतों. ही देतांना तिच्याच अनुषंगानें मंत्रार्थाकडेहि थोडेंसें लक्ष पुरवूं.

यजुर्वेदाच्या निरनिराळ्या शाखांचा विस्तृत विचार श्रौतधर्माच्या इतिहासाची आणखी फोड करतांना येईल.

शुक्लयजुर्वेदसंहितेस वाजसनेय अथवा वाजसनेयि संहिता म्हणतात. याज्ञवल्क्यांनीं ही संहिता वाजीपासून (म्हणजे सूर्यापासून) घेतली म्हणून हिला 'वाजसनेयि संहिता' हें नांव प्राप्त झालें असें विष्णुपुराणांत सांगितलें आहे (अं. ३ अ. ५).

**वाजसनेयि संहिता.**—वाजसनेयि संहितेचे चाळीस अध्याय आहेत, परंतु त्यांपैकीं शेवटचे १५ (कदाचित् शेवटचे २२ हि) मागाहूनचे आहेत. पहिल्या २५ अध्यायांत अत्यंत महत्त्वाच्या महायज्ञांचे मंत्र दिलेले आहेत. पहिल्या दोन अध्यायांत दर्शपूर्णमासाचे मंत्र दिले आहेत, व त्यांखेरीज पिण्डपितृयज्ञाचेहि मंत्र दिले आहेत. तिसऱ्या अध्यायांत नित्य अग्निकर्म, अग्निप्रतिष्ठा, आणि प्रातःसायंकालीन अग्निहोत्रांतील हवन, तसेंच चारचार महिन्यांनीं करावयाचे चातुर्मास्ययज्ञ, यांविषयीं माहिती दिली आहे. ४ ते ८ अध्यायांत सामान्यतः सोमयज्ञ व त्यांतील पशुयज्ञ यांविषयीं मंत्र आहेत. सोमयज्ञांपैकीं कांहीं एकच दिवस, व कांहीं बरेच दिवस चालणारे यज्ञ आहेत. एक दिवसाच्या यज्ञांपैकींच 'वाजपेय' हा आहे. हा यज्ञ मूळ योद्धे व

राजे रथांच्या शर्यतीच्या वेळीं करीत असावे. त्यांत सोम व सुरा सेवन करीत असत; इतरत्र असा सुरेचा उपयोग करण्याबद्दल ब्राह्मणधर्मशास्त्रानें मनाई केलेली आहे. फक्त राजांकरतां असा एक 'राजसूय' यज्ञ असे. लष्करी स्वारी, सोंगट्यांचा खेळ व इतर जादूचे प्रकार वगैरे अनेक लोकप्रिय प्रसंगीं हा यज्ञसमारंभ करीत असत. ९ व १० अध्यायांत या दोन प्रकारच्या सोमयज्ञांतील मंत्र दिले आहेत.

नंतर ११ ते १८ अध्यायांत अग्निचयनविधि व त्याचे मंत्र दिले आहेत. त्यापुढें १९ ते २१ अध्यायांत सौत्रामणि विधि सांगितला आहे. यामध्येंहि सोमाच्या ऐवजीं सुराच घेतात आणि अश्विनी, सरस्वती व इंद्र यांनां ती समर्पण करितात. जुनी वाजसनेयि संहिता जेथें संपते त्या शेवटच्या २२ ते २५ अध्यायांत अश्वमेधयज्ञाचे मंत्र आहेत. पृथ्वीपति, बलाढ्य, जेता, किंवा मोठा पराक्रमी राजा यांनींच हा यज्ञ करावयाचा असे. वाजसनेयि संहितेच्या २२ व्या अध्यायांत अश्वमेधयज्ञाचें कारण फार सुंदर रीतीनें वर्णन केलें आहे. ती प्रार्थना अशीः—

**आ ब्रह्मन्ब्राह्मणो ब्रह्मवर्चसी जायतामा राष्ट्रे राजन्युः शूर इषव्योऽतिव्याधी महारथो जायतां दोग्ध्री धेनुर्वोढानड्वानाशुः सप्तिः पुरंध्रिर्योषा जिष्णू रथेष्ठा सभेयो युवास्य यजमानस्य वीरो जायतां निकामे निकामे नः पर्जन्यो वर्षतु फलवत्यो न ओषधयः पच्यन्तां योगक्षेमो नः कल्पताम् ॥ वाज. २२·२२.**

हे ब्रह्मन्! ब्रह्मतेजानें युक्त असा ब्राह्मण (वर्ग) या राष्ट्रांत निर्माण होवो. या राष्ट्रांत शूर, तिरंदाजींत प्रवीण, मृगयेंत निपुण व महारथी असा क्षत्रिय (वर्ग) निर्माण होवो. त्याचप्रमाणें येथें भरपूर दूध देणारी गाय, गाडी चांगली ओढणारा बैल, वेगवान् घोडा, दक्ष गृहिणी निर्माण होवो. या यजमानाला जयशाली, रथप्रवीण, सभापंडित असा वीरपुत्र होवो. आमच्या इच्छेनुसार येथें पाऊस पडो. आमचीं फळझाडें फलयुक्त होवोत. आमचा योगक्षेम चालो.

शेवटचे १५ अध्याय मागाहून झालेले आहेत यांत शंका नाहीं. २६ ते ३५ अध्यायांनां 'खिल', म्हणजे पुरवण्या, असें प्राचीन परंपरेंतहि नांव दिलेलें आहे. ३० वा अध्याय मागाहून जोडलेला आहे हें त्या अध्यायावरूनच स्पष्ट होतें; कारण त्यांत आध्वर्यव मंत्र मुळींच नसून पुरुषमेधयज्ञामध्यें* निरनिराळ्या अनेक देवतांनां किंवा शक्तिवाचक देवतांनां जे लोक बळी द्यावयाचे त्यांचीं नांवें फक्त दिलेलीं आहेत. येथें बळी, यज्ञ वगैरेचा कांहींतरी लाक्षणिक अर्थ असून पुरुषमेधयज्ञ अश्वमेधयज्ञाहूनहि श्रेष्ठ आहे अशी कल्पना दिली आहे; हा यज्ञ नुसता यज्ञमीमांसारूप व यज्ञरहस्यदर्शक आहे; प्रत्यक्ष असा यज्ञ क्वचितच कोणी केला असेल. या म्हणण्याला ३१ व्या अध्यायांतहि आधार आहे; कारण त्या अध्यायांत ऋग्वेदांतील (ऋग्वेद, १० वें मंडल सूक्त ९०) पुरुषसूक्त दिलेलें असून त्यांत पुरुषयज्ञ केल्यानें विश्वोत्पत्ति झाली, व पुरुष आणि विश्व एकच असें सांगितलें आहे; पुरुषमेध यज्ञामध्यें ब्रह्मा हें सूक्त म्हणतो व ह्या सूक्ताला उपनिषद् म्हणजे गूढतत्त्व असें नांव दिलें आहे. तसेंच ३२ वा अध्यायहि त्याची रचना व विषय यांवरून पाहतां एक उपनिषदच आहे. सृष्टिकर्ता प्रजापति याचा दर्जा पुरुष व ब्रह्मा यांच्या इतका आहे असें यांत सांगितलें आहे. ३४ व्या अध्यायांतील पहिल्या सहा ऋचांचीहि गणना उपनिषदांत करतात. या उपनिषदाचें नांव शिवसंकल्पोपनिषद्. ३२ ते ३४ अध्यायांतील मंत्रांचा उपयोग 'सर्वमेध' यज्ञांत करतात. हा सर्वश्रेष्ठ यज्ञ होय. यांत यजमान ऋत्विजांनां यज्ञदक्षिणा म्हणून आपलें सर्वस्व दान करतो, आणि स्वतः वानप्रस्थ बनून अरण्यांत जातो व तेथें आपले आयुष्याचे उरलेले दिवस घालवितो.* ३५ व्या अध्यायांत मृतोत्तरक्रियेसंबंधाचे ऋग्वेदांतीलच कांहीं मंत्र दिलेले आहेत. ३६ ते ३९ अध्यायांत प्रवर्ग्य दिलें आहे; वाजसनेयि संहितेचा शेवटचा चाळीसावा अध्याय एक उपनिषद् आहे; हें मोठें महत्त्वाचें ईशोपनिषद् होय; हें सर्व उपनिषद्ग्रंथांमध्यें आढळतें; याबद्दल पुढें उपनिषदांच्या भागामध्यें विवेचन करूं.

शेवटच्या अध्यायांतील विषयांवरूनच ते अध्याय मागाहूनचे असावेत असें ठरतें; शिवाय या मताला बळकटी आणणारी एक अशी गोष्ट आहे कीं, कृष्णयजुर्वेदसंहितेंतील मंत्रांसारखे मंत्र वाजसनेयिसंहितेंतील पूर्वार्धांत मात्र आहेत.†

आतां या संहितेंत प्रार्थना व यज्ञविधी जे आहेत त्यांत कांहीं ऋचा आहेत व कांहीं गद्यात्मक मंत्र आहेत. या गद्यात्मक मंत्रांनां 'यजू' असें म्हणतात; आणि त्यांवरूनच यजुर्वेदाला 'यजुर्वेद' ही संज्ञा प्राप्त झाली हें पूर्वीं सांगितलेंच आहे. हे गद्य मंत्र कांहीं तालबद्ध आहेत व कित्येक ठिकाणीं फार प्रासादिक झाले आहेत. यांतील बहुतेक ऋचा ऋग्वेदसंहितेंत आहेत. यजुर्वेदांत जे विविध पाठ दिलेले आहेत, ते ऋग्वेदांतील मूळ पाठांहून जुने खास नाहींत; ऋचांतील हे भिन्न पाठ

* हिंदुस्थानांत प्राचीनकाळीं पुरुषयज्ञ खास करीत असत; आणि अगदीं अलीकडेहि कांहीं जातींत मनुष्यप्राण्यांचे बळी दिलेले आहेत. परंतु पुरुषमेध म्हणजे असाच माणसांचा बळी देण्याचा प्रकार असे असें म्हणतां येत नाहीं.

* या सर्व यज्ञसमारंभांची माहिती Hillebrandt's 'Ritual-Literatur' या ग्रंथांत सांपडते. † शुक्लयजुर्वेदांतील शतपथब्राह्मणांत वाजसनेयिसंहितेचे पहिले १८ अध्याय शब्दशः देऊन त्यांचें स्पष्टीकरण केलें आहे.

यज्ञांतील कर्मांशीं त्यांचा मेळ बसावा म्हणून हेतुपुरःसरच भिन्न केलेले आहेत. ऋग्वेदांतील ऋचा संपूर्ण जशाच्या तशाच यजुर्वेदांत घेतलेल्या फार क्वचित् आहेत; ज्या घेतल्या आहेत त्या बहुतेक एकेरी ऋचा असून त्या यज्ञांतील कोणत्याना कोणत्यातरी प्रसंगाला साजेशा अशा पाहून घेतल्या आहेत व त्यांचा आध्वर्यवांत समावेश केला आहे. म्हणून या ऋचांचा आपणांस ऐतिहासिक दृष्ट्या फार थोडा उपयोग होतो. यजुर्वेदांतील विशिष्ट भाग म्हणजे गद्यात्मक प्रार्थना व विधिमंत्र हे होत.

सर्वांत सोपी प्रार्थना म्हणजे यज्ञांतील हवनाची आहुति ज्या देवतेस द्यावयाची तिचें नांव उच्चारून आहुति देण्याची ऋचा. हिला याज्या असें म्हणतात. अशा तऱ्हेच्या ऋचा यजुर्वेदांत पुष्कळच आहेत.

नित्य प्रातःसायंकाळीं अग्निहोत्र करतांना जे सोपे साधे मंत्र उच्चारतात त्यांपेक्षां अधिक सोप्या तऱ्हेची ईश्वराची प्रार्थना कोणी करित असेल अशी कल्पना करणेंहि कठिण आहे. त्या प्रार्थना अशाः—"सायंकाळीं अग्नि तेज आहे, आणि तेज अग्नि आहे; सकाळीं सूर्य तेज आहे व तेज सूर्य आहे". तसेंच एखाद्या धार्मिक कृत्याचें प्रयोजन काय हेंहि अगदीं थोडक्या शब्दांत सांगितलेलें असतें; उदाहरणार्थ, ऋत्विज् जेव्हां वत्सापाकरणासाठीं एखादी झाडाची शिपटी मोडतो तेव्हां तो म्हणतोः—"तूं रसाकरितां, तूं बलाकरितां" इ०. कोठें एखाद्या पवित्र कृत्याचा हेतु सांगून त्यावरोबर इच्छा प्रदर्शित केलेली असते; उ०, अग्नि पेटविण्याकरतां समिध अर्पण करतांना पुढील मंत्रोच्चार करतात, "हे अग्ने ही तुला प्रज्वलित करिते. इच्यामुळें तुझी वाढ होवो व आमचीहि वाढ आणि भरभराट होवो."

यज्ञांतील एखाद्या वस्तूपासून कांहीं वाईट परिणाम होईल असें वाटल्यास तो टाळण्याकरतां एक लहानसा मंत्र म्हणतात; उ०, ज्या दोरीनें खांबाला यज्ञपशु बांधलेला असतो, त्या दोरीला उद्देशून म्हणतात, "सर्प होऊं नकोस, अधम होऊं नकोस". यज्ञाची दीक्षा घेण्यापूर्वी ज्या वस्तऱ्यानें यजमानाची श्मश्रू करतात, त्या वस्तऱ्यास उद्देशून ऋत्विज म्हणतो, 'हे सुरी, इजा करूं नकोस'. यज्ञदीक्षा घेतांना राजा खालीं जमिनीकडे पाहून प्रार्थना करतो, "पृथ्वीमाते, तूं मला इजा करूं नकोस, व माझ्याकडून तुला इजा न होवो."

या यज्ञविधींमध्यें नेहमीं देवतांची स्तुति किंवा प्रार्थनाच असते असें नाहीं; तर पुष्कळ वेळां यज्ञपात्रें व यज्ञकर्मे यांचा देवतांशीं संबंध दाखवून दिलेला असतो. उदाहरणार्थ, यजमानपत्नीला योक्त्रानें वेष्टून ऋत्विज् म्हणतो; "तूं अदितीकरतां बंधन आहेस." सोमयज्ञ करतांना स्वतःला दर्भसूत्रानें बांधून घेऊन ऋत्विज् म्हणतोः—"अंगिरसांची तूं शक्ति आहेस, लोंकरीप्रमाणें मऊ आहेस; तूं मला शक्ति दे."* नंतर आपल्या धोतराला गांठ मारून तो म्हणतो "तूं सोमाची गांठ आहेस." नंतर डोक्याला पागोटें गुंडाळून किंवा उपरणें बांधून म्हणतो, तूं विष्णूचें त्राण आहेस, ऋत्विजाचें त्राण आहेस." काळ्या काळविटाचें शिंग आपल्या अंगवस्त्राच्या टोंकांत गुंडाळून म्हणतोः "तूं इंद्राचा गर्भाशय आहेस." गाडींतून यज्ञान्न घेतांना पुढील शब्द उच्चारतो, "तूं अग्नीचा देह आहेस; विष्णूकरतां तुला; तूं सोमाचा देह आहेस; विष्णूकरतां तुला." जेव्हां ऋत्विज् एखादें यज्ञपात्र आपल्या हातांत घेतो, तेव्हां तो नेहमीं येणारा पुढील मंत्र म्हणतो, "सूर्यदेवतेच्या प्रेरणेनें अश्विनींच्या बाहूंनीं पूषणाच्या हातांनीं तुला घेतों."†

पवित्र यज्ञवह्नि पुरातन पद्धतीनें म्हणजे अरणी आणि मंथ्यानेंच पेटविला पाहिजे.‡ अग्नि उत्पन्न करण्याच्या क्रियेची ऋग्वेदांत प्रत्यक्ष जननक्रियेशींच तुलना करून खालच्या लहान फळीला अग्निबालकाची माता, व घर्षणकाष्ठाला त्याचा पिता असें मानलें आहे.¶

सोमयज्ञामध्यें अग्नि उत्पन्न करण्याचा जो विधि सांगितला आहे तो पुढीलप्रमाणें आहे. (यांत घर्षणकाष्ठांनां आयूला जन्म देणारें पुरूरवस्§ व उर्वशी हे प्रणयी जोडपें असें म्हटलें आहे.) ऋत्विज खालची अरणी घेतांना पुढील शब्द म्हणतोः—"तूं अग्नीची जन्मभूमि आहेस." नंतर तिजवर दोन दर्भ ठेवतो व म्हणतो, "तुम्ही दोन वृषण आहां." नंतर ती फळी खालीं ठेऊन म्हणतो, "तूं उर्वशी आहेस." नंतर दोहोंचा स्पर्श करून म्हणतो, "तूं आयू आहेस." मग "तूं पुरूरवस् आहेस" असें म्हणून तो अरणीवर मन्था ठेवतो व दोघांचें घर्षण करतांना पुढील मंत्र म्हणतो, "गायत्री

---

* अंगिरस हे प्राचीन वह्निपूजक व अभिचारक ऋत्विज. यांनां यक्षकिन्नरांसारखे मानीत. † वाजसनेयि संहिता १. ३०; ४. १०; ५. १; ६. ३०. ‡ दोन घर्षणकाष्ठांचा मिळून अरणी व मंथा अथवा खालचा आणि वरचा अरणी होतो. त्यांपैकीं एक जरा रुंदट असून दुसऱ्याला चांगलें टोंक असतें; हें टोंकाचें काष्ठ दुसऱ्यावर ज्वाला उत्पन्न होईपर्यंत फिरवितात. अद्यापहि रानटी लोकांमध्यें ह्या साधनाचा अग्नि उत्पन्न करण्याकडे उपयोग करतात; उ०, एस्किमो लोकांत हें साधन उपयोगांत आणतात. मानवजातीनें अत्यन्त प्राचीन काळापासून उपयोगांत आणलेल्या साधनांपैकीं हें एक आहे.

¶ इंडोनेशियामधील मलायीलोक अद्याप या वारक्या फळीला 'माता' अथवा 'स्त्री' असें म्हणतात; आणि ज्यानें या फळीवर अग्नि पेटवितात त्या दांड्याला 'पुरुष' म्हणतात. प्राचीन अरब लोकांतहि अग्नि घर्षणानें उत्पन्न करण्याकरतां अशा काठ्या घेत असत; त्यांपैकीं एक स्त्री व एक पुरुष अशी कल्पना असे. § मागील पान ४२ पहा.

छंदानें तुझें घर्षण करतों; त्रिष्टुभ् छंदानें घर्षण करतों; जगती छंदानें घर्षण करतों."*

तथापि या शेवटल्या मंत्रांतील छंदांच्या उल्लेखावरून कांहीं खोल लाक्षणिक अर्थ त्यांत शोधूं लागण्यांत अर्थ नाहीं. ते फक्त शब्द आहेत. शब्दांशिवाय त्यांत कांहीं नाहीं आणि इतर कोणत्याहि शब्दांनीं जें काम होणार तेंच या शब्दांनींहि होत आहे. असले अल्पार्थी किंवा अर्थहीन विधिमंत्र यजुर्वेदांत पुष्कळच आहेत. क्वचित् ठिकाणीं लांब लांब गद्यमय प्रार्थना आढळतात; त्यांमध्यें साध्या शब्दांमध्यें यजमानानें देवतेला मागण्या केलेल्या असतात; असली एक सुंदर प्रार्थना मागें अश्वमेधयज्ञासंबंधानें सांगतांना दिलेली आहे. सूत्रवत् प्रार्थना ब-याच आहेत व त्यांत अर्थहि चांगला असतो; उदाहरणार्थः—

तनूपा अंग्नेसि तन्वं मे पाह्यायुर्दा अंग्नेऽस्यायुर्मे देहि वर्चोदा अंग्नेसि वर्चो मे देहि । अग्ने यन्मे तन्वा ऊनं तन्म आपृण ॥ वाज. ३·१७.

"हे अग्ने, तूं शरीर संरक्षण करणारा आहेस; माझ्या शरीराचें रक्षण कर. हे अग्ने, तूं आयुर्दाता आहेस, मला आयुष्य दे. हे अग्ने, शक्ति देणारा तूंच आहेस; मला शक्ति दे. हे अग्ने, माझ्या शरीरांतील सर्व उणेपणा तूं भरून काढ." (वाजसनेयि सं० ३. १७)

आयुर्यज्ञेन कल्पतां प्राणो यज्ञेन कल्पतां चक्षुर्यज्ञेन कल्पताꣳश्रोत्रं यज्ञेन कल्पतां पृष्ठं यज्ञेन कल्पतां यज्ञो यज्ञेन कल्पताम् । वाज. ९·२१.

"या यज्ञानें आयुष्याची वाढ होवो! यानें प्राणवायु वाढो! डोळे चांगले होवोत; यानें कान चांगले होवोत! पाठीची वाढ होवो; यज्ञानें यज्ञाची वाढ होवो." (वाजस० ९. २१)

परंतु अनेक मंत्र असे आहेत कीं त्यांत अर्थ फार गौण असतो; उदा०,

अग्निरेकाक्षरेण प्राणमुदंजयत्तमुज्जेषमश्विनौ द्व्यक्षरेण द्विपदो मनुष्यानुदंजयतां तानुज्जेषं विष्णुस्त्र्यक्षरेण त्रींल्लोकानुदंजयत्तानुज्जेषꣳसोमश्चतुरक्षरेण चतुष्पदः पशूनुदंजयत्तानुज्जेषम् ॥ ३१ ॥

पूषा पञ्चाक्षरेण पञ्च दिश उदंजयत्ता उज्जेषꣳसविता षडक्षरेण षडृतूनुदंजयत्तानुज्जेषं मरुतः सप्ताक्षरेण सप्त ग्राम्यान्पशूनुदंजयँस्तानुज्जेषं बृहस्पतिरष्टाक्षरेण गायत्रीमुदंजयत्तामुज्जेषम् ॥ ३२ ॥

मित्रो नवाक्षरेण त्रिवृतꣳस्तोममुदंजयत्तमुज्जेषं वरुणो दशाक्षरेण विराजमुदंजयत्तामुज्जेषमिन्द्र एकादशाक्षरेणत्रिष्टुभमुदंजयत्तामुज्जेषं विश्वेदेवा द्वादशाक्षरेण जगतीमुदंजयँस्तामुज्जेषम् ॥ ३३ ॥

वसवस्त्रयोदशाक्षरेण त्रयोदशꣳस्तोममुदंजयंस्तमुज्जेषꣳरुद्राश्चतुर्दशाक्षरेण चतुर्दशꣳस्तोममुदंजयंस्तमुज्जेषमादित्याः पञ्चदशाक्षरेण पञ्चदशꣳस्तोममुदंजयंस्तमुज्जेषमदितिः षोडशाक्षरेण षोडशꣳस्तोममुदंजयत्तमुज्जेषं प्रजापतिः सप्तदशाक्षरेण सप्तदशꣳस्तोममुदंजयत्तमुज्जेषम् ॥ ३४ ॥

"अग्नीला एका अक्षरानें प्राणाची प्राप्ति झाली, तशी मला होवो! अश्विनींनां दोन अक्षरांनीं द्विपाद मानवाची प्राप्ति झाली, तशी मला होवो! विष्णूला तीन अक्षरांनीं त्रिजगताची प्राप्ति झाली, तशी मला होवो! सोमाला चार अक्षरांनीं चतुष्पाद गुरांची प्राप्ति झाली, तशी मला होवो! पूषाला पांच अक्षरांनीं पांच दिशांची प्राप्ति झाली, तशी मला होवो! सवित्याला सहा अक्षरांनीं षड्ऋतूंची प्राप्ति झाली, तशी मला होवो! मरुतांनां सात अक्षरांनीं सात माणसाळलेल्या पशूंची प्राप्ति झाली, तशी मला होवो! बृहस्पतीला आठ अक्षरांनीं गायत्रीची प्राप्ति झाली, तशी मला होवो!... अदितीला सोळा अक्षरांनीं षोडशांग स्तोमाची प्राप्ति झाली, तशी मला होवो! प्रजापतीला सतरा अक्षरांनीं सप्तदशांग स्तोमाची प्राप्ति झाली, तशी मला होवो!" (वाजस० अ. ९ ऋ. ३१–३४).

ह्या प्रार्थना व हे मंत्र म्हणजे अर्थशून्य शब्दसमुच्चय आहेत असें आपणांस पुष्कळ वेळां वाटतें. याचें मुख्य कारण असें आहे कीं, यजुर्वेदामध्यें पुष्कळ ठिकाणीं एकमेकाशीं कांहीं संबंध नाहीं अशा वस्तूंची तुलना व संयोग केलेला असतो. उदाहरणार्थ, स्वयंपाकाचें भांडें चुलीवर ठेवतांना पुढील मंत्र म्हणतात.

वसोः पवित्रमसि द्यौरसि पृथिव्यसि मातरिश्वनो घर्मोऽसि विश्वधा असि । वाज. १·२.

"तूं आकाश आहेस, तूं पृथ्वी आहेस, तूं मातरिश्वाची कढई आहेस."*

जिनें सोम विकत घेतात त्या गाईला (वाग्देवतेला) उद्देशून ऋत्विज् म्हणतोः—

चिदसि मनासि धीरसि दक्षिणासि क्षत्रियासि यज्ञियास्यदितिरस्युभयतः शीर्ष्णी । सा नः सुप्राची सुप्रतीच्येधि मित्रस्त्वा पदि बध्नीतां पूषाध्वनस्पात्विन्द्रायाध्यक्षाय ॥ वाज. ४·१९.

* वाजसनेयि सं. ५. २ शतपथब्राह्मण ३. १. ४,२०. इ.

*मातरिश्वा म्हणजे वायुदेवता; आणि 'मातरिश्वाची कढई' म्हणजे 'आकाश'.

"तूं चित्त आहेस, मन आहेस, बुद्धि आहेस, यज्ञाचें मूल्य तूं आहेस; तूं श्रेष्ठत्वाला योग्य आहेस; तूं यज्ञाला योग्य आहेस; तूं दोन डोक्याची अदिती आहेस." (वाजस० अ० ४, ऋ० १९.)

अग्निस्थंडिल रचित असतांना पात्रांत घालून जो अग्नि इकडेतिकडे नेत असतात, त्याची प्रार्थना पुढील प्रमाणें करावयाची असतेः—

सुपर्णोऽसि गरुत्माँस्त्रिवृत्ते शिरो गायत्रं चक्षुर्बृहद्रथन्तरे पक्षौ। स्तोम आत्मा छंदाᳬंस्यङ्गानि यजूᳬंषि नाम। साम ते तनूर्वामदेव्यं यज्ञायज्ञियं पुच्छं धिष्ण्याः शफाः। सुपर्णोसि गरुत्मान्दिवं गच्छ स्वः पत॥ १२.४.

"हे अग्ने, सुंदर पंख असलेला तूं पक्षी आहेस; त्रिवृत् प्रार्थनामंत्र हें तुझें डोकें आहे; गायत्री छंद तुझा डोळा; बृहत् आणि रथन्तर हे दोन छंद तुझे पंख; स्तोम तुझा आत्मा आहे; छंद हे तुझे अवयव; यजुर्मंत्र तुझें नांव; वामदेव्य छंद (साम) हें तुझें शरीर; यज्ञायज्ञिय छंद तुझें पुच्छ; अग्निकुंडें हे तुझे खूर आहेत. सुंदर पंखांचा तूं पक्षी आहेस. तूं स्वर्गांत जा; तूं प्रकाशाकडे जा." (वाजस. अ. १२, ऋ० ४)

नंतर तें अग्निपात्र घेऊन ऋत्विज् तीन पावलें टाकतो आणि म्हणतोः—

विष्णोः क्रमोऽसि सपत्नहा गायत्रं छंद आरोह पृथिवीमनु विक्रमस्व विष्णोः क्रमोऽस्यभिमातिहा त्रैष्टुभं छन्द आरोहान्तरिक्षमनु विक्रमस्व विष्णोः क्रमोऽस्यरातीयतो हन्ता जागतं छंद आरोह दिवमनु विक्रमस्व विष्णोः क्रमोऽसि शत्रूयतो हन्तानुष्टुभं छंद आरोह दिशोऽनु विक्रमस्व॥

"तूं विष्णूचा शत्रुघातक पदविन्यास आहेस; गायत्रीपदावर आरोहण कर, पृथ्वीवर संचार कर. तूं विष्णूचा डाकूविघातक पदविन्यास आहेस, त्रिष्टुभछंदावर आरोहण कर, आणि वातावरणांत संचार कर. तूं द्वेष्टाविघातक पदविन्यास आहेस, जगती छंदावर आरोहण कर, आणि आकाशांत संचार कर. तूं मत्सरीघातक पदविन्यास आहेस, अनुष्टुभ् छंदावर आरोहण कर, आणि दशदिशा संचार कर." (वाजस० अ० १२ ऋ० ५)

असल्या प्रार्थनामंत्रांसंबंधानें लिओपोल्ड व्हॉन श्रोडर म्हणतोः—"बरेच वेळां एखाद्याला खरोखर असा संशय येतो कीं, आपण शुद्धीवर असलेल्या माणसांचेच विचार वाचीत आहों किंवा कसें. आणि यासंबंधानें मोठी मौजेची गोष्ट अशी आहे कीं, डोकें फिरलेल्या वेड्या माणसांच्या स्थितीविषयीं जी ग्रंथांतरीं माहिती मिळते, तींत एकाच गोष्टीची अथवा कल्पनेची वरील प्रार्थनांतल्याप्रमाणें निरनिराळ्या तऱ्हेनें कंटाळवाणी पुनरुक्ति करीत बसणें हा वेडाचा एक विशेष म्हणून सांपडतो." पुढें त्यानें मानसिक रोग बरे करणाऱ्या डॉक्टरांनीं संगृहीत केलेल्या मानसिक रोग्यांच्या माहितीचा भाग दिला आहे. या माहितीचें यजुर्वेदांतील पुष्कळ प्रार्थनामंत्रांशीं मोठें चमत्कारिक साम्य आहे*. आपण हें विसरतां कामा नये कीं, येथें आपण अथर्ववेदांत आणि कांहीं अंशीं यजुर्वेदांत सांपडणाऱ्या इतिहासपूर्वकालीन लोकप्रचारांतील अभिचारविधिमंत्रांसंबंधानें बोलत नाहीं; तर ऋत्विजांनीं जे असंख्य यज्ञविधी उपस्थित करून त्यांकरतां लागणारे जे असंख्य मंत्रतंत्र तयार केले त्यांविषयीं बोलत आहों.

यजुर्वेदांतील कांहीं प्रार्थना म्हणजे खरोखर गद्यमय अभिचारमंत्रच आहेत. आपण अथर्ववेदांत पाहिले तसल्या प्रकारचे भूतपिशाचनिवारणमंत्र आणि शापमंत्र यजुर्वेदांतील प्रार्थनामंत्रांत आपणांस आढळतात. शत्रूला अपकार करावयाचा असल्यास त्याकरितांहि कांहीं प्रकारचे यज्ञ सांगितलेले आहेत. उदाहरणार्थ, यज्ञपात्रें ज्या गाड्यांत ठेवीत असत त्याच्या जोखडाला उद्देशून ऋत्विज् म्हणतोः—"तूं जूं आहेस, दुसऱ्याला गुलाम करणाऱ्याला तूं गुलाम बनव. आम्हाला गुलाम करणाऱ्याला तूं गुलाम कर. आणि आम्ही ज्यांना गुलाम बनवतों त्यांना तूंहि गुलाम कर." (वाजस० अ० १ ऋ० ८ †)

मैत्रायणी संहितेंतील अशा प्रकारच्या यज्ञप्रार्थनांचीं एल्. व्हॉन श्रोडरनें‡ पुढील उदाहरणें दिलेलीं आहेतः—

"जो कोणी आमचा विरोधी आहे, जो आमचा द्वेष करतो, जो आम्हांस तुच्छ लेखतो व आम्हांस अपकार करूं इच्छितो, त्या सर्वांचा तूं मातींत चुराडा करून टाक."

"हे अग्ने, जो आमचा द्वेष करतो व आम्ही ज्याचा द्वेष करतों त्याला तूं आपल्या दाहानें दग्ध करून टाक. हे अग्ने, जो आमचा द्वेष करतो व ज्याचा आम्ही द्वेष करतों त्याला तूं आपल्या ज्वालांनीं भाजून टाक. हे अग्ने, जो आमचा द्वेष करतो व आम्ही ज्याचा द्वेष करतों त्याला तूं आपल्या किरणांनीं जाळून टाक. हे अग्ने, जो आमचा द्वेष करतो व आम्ही ज्याचा द्वेष करतों त्याला तूं आपल्या बलाढ्य शक्तीनें बांधून टाक!"

"मृत्युदेवता, संहार करणारी देवता यम आमच्या शत्रूंना बद्ध करील!"

*L. V. Schroeder, Indiens Litteratur und Kultur.

† हा मंत्र शब्दावरील कोट्यांचें उदाहरण म्हणूनहि फार प्रसिद्ध आहे. मूळ पाठ असाः—

धूरसि धूर्व धूर्वन्तं धूर्व तं योऽस्मान् धूर्वति। तं धूर्वयं वयं धूर्वामः॥ ८॥ अध्याय १.

‡ Indiens Litteratur und Kultur.

ज्याप्रमाणें हे पिशाचनिवारणमंत्र अगदीं प्राचीन लोकप्रचारांतील असे दिसतात, त्याचप्रमाणें आज उपलब्ध असलेल्या यजुर्वेदांतील कोड्यांत कांहीं फार जुनीं लोकप्रचारांतील कोडीं आपणांस आढळतात. शिवाय लोकांत ब्रह्मज्ञान किंवा धर्मज्ञान थोडेंफार पसरलेलें होतें असें ज्यांवरून स्पष्ट दिसतें असलीं 'ब्रह्मोद्य' या सार्थ नांवाचीं धार्मिक कोडींहि या वेदांत आहेत. ऋग्वेदांत आणि अथर्ववेदांत असल्या अगदीं प्राचीन वाङ्मयासंबंधानें आपणांस अगोदरच माहिती झालेली आहे. यजुर्वेदावरून हे कोड्यांचे खेळ कोणत्या प्रसंगीं चालत असत, आणि कोणत्या समारंभांत ते अवश्य असत याबद्दलची माहिती आपणांस होते. उदाहरणार्थ, प्रसिद्ध प्राचीन अश्वमेध यज्ञाच्या वेळीं ऋत्विज ज्या कोड्यांनीं आपली करमणूक करीत असत तीं कोडीं वाजसनेयि संहितेच्या* २३ व्या अध्यायांत दिलेलीं आहेत. या कोड्यांपैकीं कांहींवरून आपणांस मुलांच्या कोड्यांची आठवण होते, तर कांहीं कोड्यांचा यज्ञरहस्याशीं व उपनिषदांतील तत्त्वज्ञानाशीं संबंध आहे. अशा कोड्यांचीं उदाहरणें म्हणून वाजसनेयि संहितेंतील अध्याय २३ यांतील कांहीं ऋचा पुढें दिल्या आहेतः—

कः स्विदेकाकी चरति क उ स्विज्जायते पुनः ।
किᳬं स्विद्धिमस्य भेषजं किंवावपनं महत् ॥ ४५ ॥

होता-मार्गानें एकटाच कोण भ्रमण करीत असतो? पुनः पुनः नवीन जन्माला कोण येतो? थंडीला उपाय काय? व मोठ्या धान्यपात्रांनां काय म्हणतात?

सूर्य एकाकी चरति चन्द्रमा जायते पुनः ।
अग्निर्हिमस्य भेषजं भूमिरावपनं महत् ॥ ४६ ॥

अध्वर्यु—एकटाच आपल्या मार्गानें सूर्य जात असतो, पुनः पुनः जन्माला चंद्र येत असतो; थंडीला उपाय अग्नि; पृथ्वी ही मोठें धान्यपात्र आहे.

किᳬं स्वित्सूर्यसमं ज्योतिः किᳬं समुद्रसमᳬं सरः ।
किᳬंस्वित्पृथिव्यै वर्षीयः कस्य मात्रा न विद्यते ॥ ४७ ॥

अध्वर्यु—सूर्याप्रमाणें तेज कोणतें? समुद्रासारखा जलप्रवाह कोणता? पृथ्वीपेक्षां मोठें असें काय? आणि ज्याचें माप नाहीं असें काय?

ब्रह्म †सूर्यसमं ज्योतिर्द्यौः समुद्रसमᳬं सरः ।
इन्द्रः पृथिव्यै वर्षीयान् गोस्तु मात्रा न विद्यते ॥ ४८ ॥

होता—ब्रह्म सूर्यासारखें तेजस्वी आहे; आकाश समुद्रासारखें आहे; पृथ्वीपेक्षां मोठा देव इंद्र आहे; गायत्रीला माप नाहीं.

केष्वन्तः पुरुष आविवेश कान्यन्तः पुरुषे अर्पितानि ।
एतद्ब्रह्मन्नुपवल्हामसि त्वा किᳬं स्विन्नः प्रतिवोचास्यत्र ॥ ५१ ॥

उद्गाता—कोणत्या वस्तूंत पुरुष शिरलेला आहे? कोणत्या वस्तू पुरुषांत समाविष्ट आहेत? ब्रह्मन्, हें कोडें तुला सोडवावयास देतों; याचें तूं काय उत्तर देतोस?

पञ्चस्वन्तः पुरुष आविवेश तान्यन्तः पुरुषे अर्पितानि ।
एतत्त्वात्र प्रतिमन्वानो अस्मि न मायया भवस्युत्तरो मत् ॥ ५२ ॥

ब्रह्मा.—पांचांमध्यें हा पुरुष* शिरलेला आहे; हे पांच पुरुषामध्यें सांठलेले आहेत; हें उत्तर तुझ्याकरतां मी योजून ठेविलें आहे; ज्ञानाच्या अद्भुत शक्तींत तूं मजपेक्षां श्रेष्ठ नाहींस.

प्रार्थना व यज्ञविधींप्रमाणेंच देवतांच्या पूजेमध्येंहि कोड्यांचे खेळ हा महत्त्वाचा भाग आहे. 'देवांची पूजा' या शब्दानें यज्ञांतील प्रार्थना व विधी यांचा हेतु बरोबर व्यक्त केला जात नाहीं. अर्ध्याअधिक यज्ञसमारंभांचा व यजुमंत्रांचा उद्देश नुसती देवतांची पूजा करणें इतकाच नसून देवांच्या वर भार टाकून यजमानाच्या मनकामना पूर्ण करण्यास त्यांनां भाग पाडणें हा असतो. देवांनांहि भक्तांचें हें धोरण प्रिय असतें; नुसतें भोजन मिळावें इतकीच त्यांची इच्छा नसते, तर त्यांनां तशीच करमणूकहि लागते; गूढ कोडीं व सूचक गोष्टी यांपासून त्यांनां विशेषच आनंद होतो असें वेदांत अनेकदां † सांगितलेलें आहे.

मागाहूनच्या काळांत फारच प्रचलित झालेला असा देवाला प्रसन्न करण्याचा एक प्रकार यजुर्वेदांत आढळतो; तो प्रकार असा कीं, जेव्हां एखाद्या देवापासून कांहीं प्राप्त करून घेणें असेल तेव्हां त्या देवाचीं सर्व नांवें व विशेषणें यांचें आवर्तन करावयाचें, आणि त्यायोगें आपली भक्ति दाखवावयाची. याप्रमाणें नंतरच्या वाङ्मयांत विष्णुसहस्रनाम किंवा शिवसहस्रनाम असल्या पोथ्या झाल्या आहेत, आणि या सहस्रनामांचा

* तैत्तिरीय संहिता ३. ४, १८ या सूक्तांत अशींच कोडीं सांपडतात. † या शब्दाचा अर्थ अस्पष्ट आहे 'ऋत्विज ब्रह्मा' किंवा 'ब्रह्म ज्ञान', दोन्ही अर्थ होतील.

* पुरुष म्हणजे 'मनुष्यप्राणी' अथवा व्यक्ति; तसेंच 'आत्मा', किंवा 'परमात्मा' हेहि पुरुष याचे अर्थ आहेत. 'पांच' म्हणजे पंच इंद्रियें. तीं मनुष्यदेहांत असतात; आणि विश्वात्म्यांतहि असतात. † गूढ, सूचक असें देवांनां आवडतें असें वाक्य 'ब्राह्मणांत' वरचेवर येतें. शतपथ ब्राह्मण ६·१·१,२; २·२·३;७·४·१,१०. बृहदारण्यक उपनिषद् ४·२,२ येथें 'देवांनां गुह्य व सूचक असें आवडतें, स्पष्टोच्चाराचा त्यांनां तिरस्कार आहे' असें वाक्य आढळतें.

पाठ करणें हा मोठा उच्च व फलदायी मार्ग असें मानतात. अशा प्रकारच्या भक्तिमार्गाचा आरंभ आपणांस वाजसनेयि संहितेंतील सोळाव्या अध्यायांत आणि तैत्तिरीय संहितेच्या चवथ्या अध्यायांत 'शतरुद्रीय' नांवाच्या रुद्रदेवाच्या शंभर नांवांच्या उच्चारांत आढळतो.

शेवटीं, यजुर्वेदांत आढळणाऱ्या प्रार्थनांच्या आणखी एका प्रकारासंबंधानें कांहीं सांगितलें पाहिजे. या प्रकाराचाहि पुढील काळांत पुष्कळ दुरुपयोग करण्यांत आला. हा प्रकार म्हणजे ज्यांना कांहीं अर्थ नाहीं किंवा ज्यांचा अर्थ लागत नाहीं परंतु यज्ञामध्यें कित्येक ठिकाणीं ज्यांचा मोठ्या गंभीरपणें उच्चार करतात आणि ज्यांना फार पवित्र मानतात असलीं एकटीं अक्षरें किंवा शब्द. उदा०, "स्वाहा" ही यज्ञगर्जना. 'स्वाहा' म्हणून देवांनां आहुती देतात; आणि 'स्वधा' असें पितरांनां आहुती देतांना म्हणतात. अशाच प्रकारचे दुसरे 'वषट्' 'वेट्' 'वाट्' इत्यादि अर्थविहीन उद्गार काढतात. या सर्वांत श्रेष्ठ शब्द म्हणजे ॐ*. या अक्षराचा मूळ अर्थ 'हो'कारार्थी आहे. परंतु या अक्षराला भारतीय लोक हजारों वर्षे व अद्यापि सुद्धां अत्यन्त पवित्र व गूढार्थदर्शक असा मानीत आहेत. उपनिषदांत 'ॐ' याला ब्रह्माइतकें म्हणजे विश्वात्म्याइतकें उच्च मानलें आहे; आणि ॐ म्हणजे परमोच्च ध्यानविषय आहे, अशी बुधजनांनां शिफारस केली आहे. कठोपनिषदांत (२. १६) त्यावद्दल असें म्हटलें आहे:—

"हें अक्षर म्हणजे प्रत्यक्ष ब्रह्म आहे; हें सर्वश्रेष्ठ अक्षर आहे; आणि ज्याला ॐ या अक्षराचा अर्थ कळला, त्याच्या कोणत्याहि इच्छा पूर्ण होतात." या 'ॐ' शब्दाला तीन 'महाव्याहृती' जोडल्या जातात त्या भूर्, भुवः, स्वर् या होत. त्यांचा अर्थ भारतीय "पृथ्वी, वायु, आकाश" असा करतात. परंतु ह्या अर्थाबद्दल शंका आहे. या व्याहृतींबद्दल एका प्राचीन ग्रंथांत (मैत्रायणी सं १.८,५) म्हटलें आहे कीं,

"व्याहृती ह्याच ब्रह्म, सत्य, तथ्य आहेत; त्यांच्याशिवाय यज्ञच नाहीं."

यानंतर कित्येक शतकांनीं स्थापन झालेल्या नवीन 'तंत्र' नांवाच्या संप्रदायग्रंथांत या असल्या गूढ अक्षरांचा व शब्दांचा इतका उपयोग केला आहे कीं, पुष्कळ वेळां पानेंच्या पानें नुसते अम्, आम्, ह्रीम्, ऊम्, एम्, क्रोम्, फट्, अः हे व असेच दुसरे अर्थहीन उद्गार दिलेले असतात. तसेंच हें लक्ष्यांत घेण्यासारखें आहे कीं, मंत्र

* ऐतरेयब्राह्मणांत (अ० ७, १८) ॐ चा अर्थ देवांच्या भाषेत बोलतांना 'तथा,' 'तसेंच होवो', 'होय' असा आहे. छांदोग्य उपनिषदांत 'ॐ' म्हणजे 'हो'कारदर्शक शब्द आहे. 'ॐ' आणि हिब्रू 'आमेन' यांत उच्चारसाम्य व अर्थसाम्य आहे, हा केवळ काकतालीय न्याय दिसतो.

या शब्दाचा मूळ अर्थ वेदसंहितांमध्यें 'ऋक्' आणि 'यजु' असा आहे; परंतु पुढें त्याचा अर्थ 'अभिचारविधि' असा झाला. यजुर्वेदांतच या शब्दाचा मूळ 'प्रार्थना' हा अर्थ असून पुढें त्याचा 'अभिचारमंत्र' असा अर्थ झाल्याचें दिसून येतें.

केवळ साहित्यग्रंथ या दृष्टीनें वाचणाऱ्याला यजुर्वेदसंहिता ह्या जरी नीरस आणि कंटाळवाण्या वाटल्या, तरी ज्याला वैदिकधर्मावरीलच फक्त नव्हे तर धर्म या विषयाच्या सामान्य शास्त्रावरील आधारग्रंथ अशा दृष्टीनें त्यांचा अभ्यास करावयाचा असेल त्याला या संहिता अत्यंत महत्त्वाच्या व चित्ताकर्षक आहेत. धर्माच्या इतिहासांत प्रार्थनापद्धतीचा आरंभ व वाढ आणि महत्त्व यांबद्दल ज्याला संशोधन करण्याची इच्छा असेल–आणि धर्मविषयाच्या इतिहासांत प्रार्थनापद्धति हा एक अत्यन्त मनोरम भाग आहे–त्यानें यजुर्वेदांतील उपासनाभागाची माहिती करून घेण्याकडे कोणत्याहि कारणास्तव दुर्लक्ष करतां कामा नये.

शिवाय भारतीय लोकांतील नंतरचे उपासनापंथ आणि तत्त्वज्ञानविषयक ग्रंथ यांचें नीट ज्ञान होण्यासहि या संहिताग्रंथांचें ज्ञान अपरिहार्य आहे. कारण यजुर्वेद समजल्याशिवाय ब्राह्मणग्रंथ समजणें शक्य नाहीं आणि ते समजल्याशिवाय आरण्यकें व उपनिषदें समजणार नाहींत. असो. आतां अगोदर सामवेदाचा परामर्श घेऊन मग ब्राह्मणें, आरण्यकें व उपनिषदें यांजकडे वळूं.

---

## प्रकरण ५ वें.

### वेदप्रवेश–सामवेद.

सामवेदाच्या एका काळीं अनेक संहिता होत्या. यांच्या एक हजार संहिता होत्या असें पुराणांत सांगितलें आहे*. या संहितांपैकीं फक्त एक आपणांस आज उपलब्ध आहे. या सुरक्षित राहिलेल्या सामवेद संहितेंत† दोन भाग आहेत: एक 'आर्चिक' अथवा 'ऋचा(साम)संग्रह'; आणि दुसरा 'उत्तरार्चिक' अथवा 'दुसरा ऋचा–संग्रह.' या दोन्ही भागांत ज्या ऋचा आहेत त्या बहुतेक सर्व ऋग्वेदांत आलेल्याच आहेत. एकंदर १८१० ऋचांपैकीं, किंवा

* R. Simon याचेंहि सामवेदाचे एक हजार पंथ (Schools) आहेत असें म्हणणें आहे. Cf. R. Simon, Beitrage zur Kenntnis der Vedischen Schulen (Contributions to the Knowledge of the Veda) (Kiel 1889) See 27, 30, etc † सर्व वेदसंहितांपैकीं या संहितेचेंच प्रथम जर्मनमध्यें संपूर्ण भाषांतर झालें. जर्मन ग्रंथाचें नांव Die Hymnen des Sama-Veda, by Theodor Benfey (Leipzig 1848).

ऋचांच्या पुनरुक्ती सोडल्या तर एकंदर १५४९ ऋचांपैकीं पंचाहत्तर ऋचा खेरीज करून बाकी सर्व ऋग्वेदसंहितेंत आहेत, आणि त्या बहुतेक ऋग्वेदसंहितेच्या आठव्या व नवव्या मंडळांत आहेत. या ऋचांपैकीं बहुतेक गायत्री छंदांत आहेत, अथवा गायत्रीपंक्ती आणि जगतीपंक्ती मिळून झालेल्या प्रगाथ छंदांत आहेत. या छंदांमध्यें केलेल्या या ऋचा गाण्याच्या सुरावर म्हणण्याचाच निःसंशय प्रथमपासून हेतु होता.* ज्या पंचाहत्तर ऋचा ऋग्वेदांत आलेल्या नाहींत, त्या कांहीं इतर संहितांत सांपडतात, व कांहीं निरनिराळ्या विधिग्रंथांत सांपडतात. कांहींचें मूळ आपणांस माहीत नसलेल्या आवृत्तींत कदाचित् आढळेल. परंतु कांहीं ऋग्वेदांतील निरनिराळ्या ऋचांतून तुकडे घेऊन अर्थाकडे न पाहतां ते एकत्र जुळवून बनविल्या आहेत. सामवेदांत ऋग्वेदांतील ऋचा कांहीं पाठभेदानें आढळतात; या पाठांपैकीं सामवेदांतील पाठ कोठें कोठें अधिक जुना असावा अशी कांहीं लोकांची समजूत आहे.

परंतु थिओडोर आफ्रेक्टनें (Theodor Aufrecht) † असें दाखविलें आहे कीं, सामवेदांतील निरनिराळे पाठ कांहीं यदृच्छेनें, कांहीं हेतुपुरःसर व कांहीं चुकीनें झालेले आहेत; आणि गाण्याकरतां शब्दरचना करतांना दुसऱ्या ठिकाणीं सुद्धां असे फरक केलेले आढळतात. सामवेदांतील आर्चिक व उत्तरार्चिक यांमधील शब्द हे केवळ साधनभूत आहेत; मूळ साध्य म्हणजे गाण्याचे राग. हे राग शिकविणें हाच दोन्ही भागांचा हेतु आहे. सामवेदाच्या पाठशाळेंत उद्गाता होण्याकरतां ज्या विद्यार्थ्यास शिक्षण घेणें असेल त्यास प्रथम रागरागिण्या शिकाव्या लागत; या रागरागिण्या आर्चिकावरून शिकत. आर्चिक तयार झाल्यानंतर मग शिकणाराला यज्ञाच्या वेळीं म्हणावयाचीं स्तोत्रें पाठ करतां येत असत; आणि त्या कामाला उत्तरार्चिकाचा उपयोग होई.

सामवेदाच्या पहिल्या भागांत म्हणजे आर्चिकांत एकेरी अशा ५८५ ऋचा आहेत; त्यांतच यज्ञामध्यें उपयोगांत येणारे निरनिराळे छंद आले आहेत. गायनाकडे उपयोग करण्याकरतां केलेल्या या ग्रंथाला 'साम' (वेद) हें जें नांव देतात त्याचा मूळ अर्थ 'स्वर' किंवा 'छंद' असा आहे.

यूरोपीय म्हणतात कीं, 'अमक्या स्वरांत पद्य म्हटलें;' त्याच्या उलट भारतीय लोक म्हणतात कीं, 'अमक्या पद्यांत अमका राग (साम) म्हटला.' म्हणजे वेदवेत्ते ऋचा म्हणजे पद्य व राग यांचा संबंध जो समजतात तो असा कीं, ऋचेमधून राग निघाला आहे. याकरितांच ऋचेला 'योनि' अशी संज्ञा आहे. जरी स्वभावतः एक छंद अनेक ऋचांनां लावतां येतो, तरी कांहीं ठराविक ऋचांनां ठराविक छंदांच्या योनी मानण्याचा प्रघात आहे. एवंच आर्चिक म्हणजे ५८५ योनींचा अथवा एकेरी ऋचांचा संग्रह. या ऋचा तितक्या निरनिराळ्या सुरांत म्हणतात. या संग्रहाला प्रत्येक पद्याची पहिली ऋचा त्या त्या रागाची आठवण होण्याकरितां ज्यांत दिलेली आहे असें एक गाण्याचें पुस्तकच म्हणतां येईल.

सामवेदाचा दुसरा भाग उत्तरार्चिक. यांत तीनतीन ऋचांचें एक अशीं चारशें गानें* आहेत. त्यांमधून मुख्य यज्ञांच्या वेळीं गावयाचीं जीं स्तोत्रें तीं तयार केलेलीं असतात. आर्चिकामध्यें वृत्तानुरोधानें ऋचांचा क्रम लावला आहे, तर उत्तरार्चिकांत त्यांचा क्रम ज्या देवांनां उद्देशून त्या ऋचा केल्या आहेत त्या देवांनां अनुसरून लावला आहे; उदाहरणार्थ, अग्नि, इंद्र, सोम या मुख्य देवांच्या क्रमानुसार उत्तरार्चिकामधील गानांचा क्रम बसविला आहे.† बहुतकरून तीन किंवा अधिक ऋचा मिळून एक स्तोत्र होतें. एका स्तोत्रांतील सर्व ऋचा एकाच सुरांत–आर्चिकांत सांगितलेल्या सुरांपैकीं–म्हणतात.

उत्तरार्चिक म्हणजे संपूर्ण पद्यें दिलीं आहेत असें पद्यांचें पुस्तक. छंद अगोदरच आर्चिकावरून माहित झालेले आहेत असें मानावयाचें. आर्चिकानंतर उत्तरार्चिक झालें असावें असें साधारणपणें वाटतें. कारण उत्तरार्चिकांतील गानांत आलेल्या नाहींत अशा पुष्कळ योनी आणि छंद आर्चिकामध्यें आहेत; उलट उत्तरार्चिकात कांहीं पद्यें आहेत त्यांचे छंद आर्चिकामध्यें सांगितलेले नाहींत. तथापि आर्चिक पूर्ण होण्यास उत्तरार्चिकाची आवश्यकता आहे; उद्गात्याच्या शिक्षणांतील आर्चिक हा पहिला भाग, आणि उत्तरार्चिक हा दुसरा भाग होय.

शब्द जसे उच्चारले जातात तसेच संहितेच्या दोन्ही भागांत दिलेले आहेत. छंद अगदीं प्राचीन काळीं तोंडानें व कदाचित् वाद्यावरहि शिकवीत असावेत. गानांचीं अथवा पद्यांचीं पुस्तकें (उत्तरार्चिक) मात्र अलीकडच्या काळांत झालीं आहेत; त्यांत सूर दिलेले असतात; आणि गातांना जसे म्हणतात तसे शब्द म्हणजे अक्षरें लांबवून, पुनरावृत्ति व प्रक्षेप

* गै (प्रगै) म्हणजे 'गाणें' या धातूपासून झालेले 'गायत्री' आणि 'प्रगाथ' या नांवांवरून हें सिद्ध होतें.
† 'ऋग्वेदांतील सूक्तें' या पुस्तकाच्या प्रस्तावनेंत. II. p. 38 (2nd. edition, Bonn 1877)

* २८७ पद्यें प्रत्येकीं तीन ऋचांचीं आहेत; ६६ प्रत्येकीं दोन, १३ प्रत्येकीं एक, १० प्रत्येकीं सहा, ९ प्रत्येकीं चार, ४ प्रत्येकीं पांच, ३ प्रत्येकीं नऊ व ३ प्रत्येकीं दहा, २ प्रत्येकीं सात व दोनच प्रत्येकीं बारा ऋचांचीं; आणि एक ८ ऋचांचें आहे.
† सामवेदांतील स्तोत्रें व त्यांचा यज्ञांत उपयोग, यासंबंधींत Cf. A Hillebrandt, Rittual–Literatur. p. 99 &c in the "Grundriss" III पहा.

करून जशीं शब्दांचीं रूपें होतात तशींच रूपें त्यांत लिहिलेलीं असतात; त्यांना 'स्तोभ' म्हणतात; उ०, होयी, हुवा, होई, इत्यादि. (हे स्तोभ कांहीं अंशीं पाश्चात्त्यांमधील आनंदोद्गार, जे 'हुजा' (Huzza) त्यांहून निराळे नाहींत.) अगदीं प्राचीन सूरलेखनपद्धति त, का, ण इत्यादि अक्षरांच्या साह्यानें केलेली आहे. परंतु पुष्कळ वेळां सप्तस्वरांकरितां सात आंकडे १,२,३,४,५,६,७ योजितात; तत्समानार्थी अक्षरें पाश्चात्त्यांच्या पद्धतीमध्यें F, E, D, C, B, A, G हीं आहेत व आपल्या अर्वाचीन पद्धतींत सा, री, ग, म, प, ध, नि हीं आहेत. सामवेद गातांना ब्राह्मण आपल्या हातांच्या व बोटांच्या चलनानें निरनिराळ्या स्वरांवर जोर देतात.* गांवामध्यें होणाऱ्या सोमयज्ञामध्यें गावयाचे छंद आणि अरण्यांतील ऋषींच्या यज्ञांतील छंद निरनिराळे असत असें दिसतें; कारण आर्चिकामध्यें 'ग्रामगेयगान' आणि 'अरण्यगेयगान' असे दोन प्रकार आहेत. आर्चिक म्हणजे छंदांची अथवा वृत्तांचीं पुस्तकें असें म्हटलें, तर उत्तरार्चिक म्हणजे संगीताचीं पुस्तकें असें आपणांस म्हणतां येईल; कारण उत्तरार्चिकांत शब्दांतील अक्षरें गातांना जशीं लांबवून व पुनरुक्ती करून म्हणतात तशीं तीं निरनिराळ्या सुरांसह लिहिलेलीं आहेत.

छंदांची संख्या† बरीच मोठी असली पाहिजे; आणि अगदीं प्राचीन काळीं सुद्धां प्रत्येक छंदाला स्वतंत्र नांव होतें. पुष्कळ वेळां ब्राह्मणांत व सूत्रग्रंथांत त्यांचीं नांवें दिलेलीं असतात; शिवाय त्यांचे निरनिराळे लाक्षणिक अर्थहि देतात. या छंदांमुळें ब्राह्मणें, आरण्यकें आणि उपनिषदें हीं गूढ व रहस्यमय झालेलीं आहेत; विशेषतः ऋग्वेदांत पूर्वीच आलेले 'बृहत्' आणि 'रथंतर' हे दोन छंद व असे आणखी कांहीं छंद रहस्यमयता उत्पन्न करण्यास कारणीभूत झालेले आहेत. ऋत्विज आणि धर्मगुरु यांनीं स्वतः हे छंद नवीन खात्रीनें बनविले नाहींत. त्यांपैकीं अगदीं जुने छंद बहुतकरून लोकप्रचारांतील असून ते इतिहासपूर्वकालीन संक्रान्तीचा सण‡ व इतर राष्ट्रीय उत्सव यांतील धार्मिक पद्यांचे छंद असावेत. इतर कांहीं छंद प्राचीन संस्कृत लोकांतील जादूगार, वैद्य व शामन लोकांसारखे जे ब्राह्मणपूर्वकालीन अभिचारी पुरोहित त्यांचीं गानें व मंत्र ज्या गोंधळी संगीतांत म्हटले जात त्यांतील असावेत. सामरागांचा उगम सामान्य लोकांच्या संगीतांत असल्याविषयींची चिन्हें वर सांगितलेल्या स्तोभांमध्यें किंवा आनंद–आलापांमध्यें दिसून आलीं आहेत; आणि विशेषतः ब्राह्मणकालीं सामवेदांतील रागांमध्यें कांहीं अद्भुत जादूची* शक्ति आहे असें मानीत असत या गोष्टीवरूनहि तेंच दिसतें. सामविधानब्राह्मण नांवाचें जें एक सामवेदाचें ब्राह्मण आज उपलब्ध आहे, त्यांतील दुसरा भाग म्हणजे एक निव्वळ अभिचारकर्मपर पुस्तक आहे, व त्यांत निरनिराळ्या अभिचारकर्मांत निरनिराळ्या सामांचा कसा उपयोग करावा हेंच सांगितलेलें आहे. शिवाय सामाचा स्वर ऐकतांच ऋग्वेद व यजुर्वेदाचें पठण एकदम बंद करावें असें ब्राह्मण धर्मशास्त्रांत सांगितलें आहे. उदाहरणार्थ, आपस्तंब–धर्मसूत्रांत† कुत्रा, गाढव, लांडगा, कोल्हा, घुवड यांचें ओरडणें, वाद्यांचा आवाज, रडणें आणि सामघोष इत्यादि ऐकतांच वेदपठण बंद करावें असें सांगितलें आहे. या गोष्टीवरूनहि सामवेदांतील राग आणि ब्राह्मणपूर्वकालीन लोकसमज व अभिचारकल्पना यांच्यामधील संबंधाची साक्ष पटते.

येणेंप्रमाणें सामवेदसंहितेचा यज्ञकर्म आणि अभिचार यांचा इतिहास समजण्यास थोडाबहुत उपयोग आहे. त्यांतील गानें तर भारतीय संगीतशास्त्राचा इतिहास जाणण्यास फारच महत्त्वाचीं आहेत; परंतु आतांपर्यंत या दृष्टीनें त्याचा कांहींहि उपयोग करण्यांत आलेला नाहीं. वाङ्मयाच्या दृष्टीनें मात्र आपणांस या संहितेचा कांहीं उपयोग नाहीं.

---

## प्रकरण ६ वें.

### वेदप्रवेश–ब्राह्मणें.

वेदग्रंथांचा संहितांनंतर दुसरा मोठा वर्ग जो ब्राह्मणांचा, त्याविषयीं मॅक्समुल्लरनें एके ठिकाणीं असें म्हटलें आहे कीं, भारतीय वाङ्मयाच्या क्षेत्रांतील संशोधकांनां हे ब्राह्मण ग्रंथ कितीहि हृदयंगम वाटले तरी, सामान्य सुशिक्षित लोकांनां ते अगदींच नीरस वाटतात. ह्या ग्रंथांत नुसती वडवड, आणि त्याहीपेक्षां वाईट म्हणजे पारमार्थिक वडवड, ह्याखेरीज दुसरा

---

* या हिंदुलोकांच्या अत्यन्त प्राचीन संगीताबद्दलच्या अधिक माहितीसाठीं A. C. Burnell यांचें आर्षेय ब्राह्मण (सामवेदांतील)–मंगळूर १८९६ उपोद्घात पृ. २७,४१–४८ पहा. † ग्रंथकर्त्यानें सामांची संख्या ८००० दिली आहे. ‡ A Hillebrandt, Die Sonnwendfeste in Alt–Indien (प्राचीन हिंदुस्थानांतील सूर्यसंक्रमणाचे उत्सव) M. Bloomfield चें इंद्रदेवता आणि सामवेद, in WZKM XVII 1903.

* साम शब्दाचा मूळ अर्थ बहुतकरून 'प्रार्थनापर पद्य', 'सुर व असुरांनां शांत करण्याचें साधन' असा असावा. 'सौम्यपणा', 'मैत्रीचें धोरण' अशा अर्थानेंहि साम शब्द वापरतात. प्राचीनतर वाङ्मयांत सामवेदाचा उल्लेख करतांना 'छंदोग म्हणतात' असें शब्द योजीत; छंदोग म्हणजे 'छंद गाणारा'; आणि 'छंद' शब्दांत 'जादूचा मंत्र', 'पवित्र ग्रंथ' आणि 'वृत्त' हे अर्थ येतात. या शब्दाचा मुख्य महत्त्वाचा अर्थ म्हणजे 'सुस्वर भाषण.' त्याचा संबंध 'छंद' म्हणजे 'आनंद देणें, संतुष्ट करणें, किंवा आनंद देण्यास लावणें', या धातूशीं लावतां येईल. † १·३.१३,१९.

विषय नाहीं. भारतीय वैदिक संस्कृतीच्या इतिहासांत ह्या ब्राह्मणग्रंथांचा केवढा दर्जा आहे हें ज्याला म्हणून माहीत नाहीं, त्याला तर पुरतीं दहा पानें वाचून झालीं नाहींत तोंच पुस्तक मिटून ठेऊन द्यावें असें वाटल्यावांचून राहणार नाहीं.* हे ग्रंथ यजुर्वेदापेक्षांहि वाचण्याला कंटाळवाणे वाटतात हें जरी खरें असलें तरी भारतीय लोकांचें अलीकडच्या काळांतील सर्व धार्मिक व तात्त्विक वाङ्मय आकलन करण्याच्या कामीं ह्यांचीच कांस धरणें जरूर पडतें व शिवाय सामान्य धर्मशास्त्राच्या दृष्टीनेंहि ह्यांचें फार महत्त्व आहे. धर्मशास्त्राचें अध्ययन करणाराला स्तोत्रांचा इतिहास जाणण्यास यजुर्वेदसंहितांकडे ज्याप्रमाणें धांव घ्यावी लागते, त्याप्रमाणें त्याला यज्ञयाग व पौरोहित्य यांच्यासंबंधीच्या इतिहासाचें ज्ञान करून घेण्यास ब्राह्मण ग्रंथांना अगदीं प्रमाणभूत मानावें लागतें.

ब्राम्हण ह्या शब्दाचा मूळ अर्थ, यज्ञकर्मामधील एखाद्या मुद्द्यावरील विद्वान् याज्ञिकाचें विवेचन असा आहे; व ह्या शब्दाचा समुदायविषयक अर्थ घेतल्यास, यज्ञकर्मावरील याज्ञिकांच्या अशा चर्चांचा व विवेचनांचा एक संग्रह, असा अर्थ निघतो. कारण, यज्ञकर्माला फारशा पोषक नाहींत अशा जगदुत्पत्तिविषयक गोष्टी व इतर जुनीं कथापुराणें जरी या ग्रंथांतून पुष्कळ सांपडतात, तरी ह्यांत यज्ञयागाशिवाय चर्चेचा दुसरा विषय नाहीं. ह्यांत वाजसनेयि संहितेप्रमाणें मोठमोठाले यज्ञ सांगितले आहेत, त्यांविषयीं निरनिराळे विधी व संस्कार दिले आहेत व निरनिराळ्या यज्ञकर्मांतील संबंध व त्यांतील शस्त्रें व स्तोत्रें या सर्वांचें कधीं अक्षरशः तर कधीं थोडक्यांत निरूपण केलेलें आहे. वरील गोष्टींना विधींची सांकेतिक योजना, त्यांचीं कारणें व तसेंच त्यांचा स्तोत्रकर्मांशीं संबंध हीं जोडण्यांत आलेलीं आहेत. विधिसंस्कारांच्या मुद्द्यांवर जेथें विद्वान् लोकांत निरनिराळीं मतें आहेत तेथें एका मतास पुष्टि देऊन, इतर मतांचा अनादर करण्यांत आला आहे. कांहीं ठिकाणीं निरनिराळ्या प्रदेशांना निरनिराळे संस्कार घालून दिले आहेत व कांहीं विशिष्ट प्रसंगीं यज्ञसंस्कारांत नुदां फेरबदल केलेला आढळतो. यज्ञकर्मांत याज्ञिकांना किती दक्षिणा द्यावी हें बरोबर रीतीनें प्रत्येक वेळीं सांगण्याची कधींहि कसूर झालेली दिसत नाहीं. त्याचप्रमाणें, यजमानाला अमुक अमुक यज्ञकर्मसंस्कारापासून ह्या जन्मीं किंवा पुढील जन्मीं अमुक अमुक फळ मिळतें हें विस्तृत रीतीनें सांगण्यांत आलें आहे. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे, जर पारमार्थिक ज्ञानाला "शास्त्र" असें म्हणतां येईल तर ह्या ब्राह्मणग्रंथांचें "यज्ञशास्त्रग्रंथ" असें आपणांला सार्थ नामाभिधान करतां येईल.

* Essays by Max Muller p. 105.

पूर्वीं ह्या ब्राह्मणग्रंथांसारखे पुष्कळ ग्रंथ असावेत, कारण उपलब्ध असलेल्या ब्राह्मणग्रंथांतून अनुपलब्ध ब्राह्मणग्रंथांतील पुष्कळसे उतारे सांपडतात. हे अनुपलब्ध ग्रंथ सोडून दिल्यास राहिलेले ब्राह्मणग्रंथहि कांहीं थोडेथोडके नाहींत. हे सर्व ग्रंथ भारतीय वाङ्मयाच्या महाग्रंथपंक्तींत येऊन बसतात. चार वेद निरनिराळे आहेत हें त्यांच्या संहितांवरून दिसून येतें. ह्या प्रत्येक वेदापासून व त्याच्या शाखांपासून निरनिराळे पुष्कळ ब्राह्मणग्रंथ तयार झाले. कृष्णयजुर्वेदसंहितेंत मंत्रांखेरीज यज्ञाचा उद्देश व कार्य ह्यांसंबंधी चर्चा व अभिप्राय ह्यांचाहि अंतर्भाव केलेला आहे. यजुर्वेदसंहितेंत जे अशा प्रकारचे ब्राह्मणग्रंथांसारखे घटकावयव आहेत, त्यांपासून हें ब्राह्मण वाङ्मय तयार झालें. कृष्णयजुर्वेदांत मंत्रांशीं संबद्ध असलेले यज्ञकर्मविधी व अर्थवाद ह्यांचा जो उपन्यास केलेला आहे त्याचा आधार घेऊन एकामागून एक वैदिक संप्रदायांनीं आपले भिन्न भिन्न ग्रंथ तयार केले; व पुढें पुढें तर असा नियमच ठरल्यासारखा झाला कीं, प्रत्येक वैदिक संप्रदायाला त्याचा स्वतःचा असा एक ब्राह्मण ग्रंथ पाहिजे. या गोष्टी लक्ष्यांत घेतल्या असतां, ब्राह्मणग्रंथांची संख्या इतकी मोठी कशी झाली, कांहीं ग्रंथ त्यांतील विस्तार व विषय ह्यांवरून पाहतां ब्राह्मण ह्या नांवाला अपात्र असतांना व पुष्कळ अर्वाचीन असतांना ब्राह्मणग्रंथ ह्या सदराखालीं कसे आले हें समजून येतें. "ब्राह्मण" ह्या नांवांनीं ओळखले जाणारे पुष्कळसे सामवेदाचे ग्रंथ वरील प्रकारचे आहेत; त्यांना वेदांगें हेंच नांव सार्थ होईल. त्याचप्रमाणें अथर्ववेदाचा "गोपथ ब्राह्मण" ग्रंथ ह्या ग्रंथांत अगदीं अलीकडच्या काळांत जे कांहीं वेदविषयक ग्रंथ निर्माण झाले आहेत त्यांपैकीं एक होय. प्राचीन काळीं अथर्ववेदाचा ब्राह्मणग्रंथ मुळींच नव्हता. पुढें जेव्हां प्रत्येक वेदाचा एखादा तरी ब्राह्मणग्रंथ पाहिजे अशी कल्पना रूढ झाली, तेव्हां ही उणीव भरून काढण्याचा प्रयत्न केला गेला.

आतां, जुन्या ब्राह्मण ग्रंथांत जे अगदीं महत्त्वाचे असे आहेत त्यांपैकीं कांहींची ओळख करून घेऊं:—

ऐतरेय ब्राह्मण.—हें ऋग्वेदाचें ब्राह्मण आहे. ह्यांत आठ पंचिका व प्रत्येक पंचिकेंच पांच अध्याय, असे एकंदर चाळीस अध्याय आहेत. महिदास ऐतरेय हा ह्या ग्रंथाचा कर्ता असावा असें म्हणतात; पण वास्तविक तो फक्त ह्याचा संग्राहक किंवा प्रकाशक होतासें दिसतें. ह्यांत प्राधान्यानें सोमयाग (अग्निष्टोम), अग्निहोत्र व राजसूय यांचें वर्णन आलेलें आहे. शेवटले १० अध्याय पाठीमागून ह्या ब्राह्मणास जोडले आहेत असें मानण्यांत येतें.

कौषीतकी ब्राह्मण.—कौषीतकी किंवा शांखायन ब्राह्मण हें ऋग्वेदाचें दुसरें ब्राह्मण होय. यांत तीस अध्याय आहेत. पहिल्या सहा अध्यायांत अग्न्याधान, अग्निहोत्र,

दशपूर्णमासाच्या इष्टी, ऋतुयाग वगैरेसंबंधीं माहिती दिली आहे; व सात ते तीसपर्यंतच्या अध्यायांत अगदीं ऐतरेय ब्राह्मणांतल्यासारखें सोमयागाचें वर्णन दिलें आहे.

पंचविंश किंवा ताण्ड्य ( महा ) ब्राह्मण.—हा पंचवीस अध्यायांचा एक सामवेदाचा ब्राह्मणग्रंथ आहे. अतिप्राचीन ब्राह्मणांपैकीं हा एक आहे. यांत जुन्या महत्त्वाच्या कथा सांपडतात. याच्या १७ व्या अध्यायांत व्रात्य–यक्ष–स्तोमाचें जें वर्णन आलें तें विशेष वहारीचें आहे. ह्या यज्ञसंस्कारानें हीन, पतित व बहुधा अनार्य जातींच्या लोकांना पावन करून ब्राह्मणवर्णांत घेत असत.

षड्विंश ब्राह्मण.—हें पंचविंश ब्राह्मणाचें पूरक किंवा परिशिष्टच आहे म्हटल्यास चालेल. पंचविंश ब्राह्मणांत २५ अध्याय आहेत, तेव्हां हा त्याचा २६ वा अध्यायच आहे असें पाहिजे तर म्हणावें. ह्यांतील शेवटच्या म्हणजे सहाव्या अध्यायास "अद्भुत ब्राह्मण" म्हणतात. ह्यांत शकुन, अपशकुन, अरिष्ट वगैरेंचें वेदांग ग्रंथाप्रमाणें विवेचन आहे.

जैमिनीय ब्राह्मण.—हें सामवेदाचें ब्राह्मण आहे. हें फारसें प्रख्यात नाहीं.

तैत्तिरीय ब्राह्मण.—हा ग्रंथ तैत्तिरीय कृष्णयजुर्वेदाच्या संहितेचा उत्तरभागच म्हणतां येईल. कृष्णयजुर्वेदाच्या संहितेंत ब्राह्मण आलेलें आहे. त्यावरून तैत्तिरीय–ब्राह्मणांतील भाग तैत्तिरीय संहितेला मागाहून जोडण्यांत आला आहे हें उघड होतें. ह्या तैत्तिरीय ब्राह्मणांत आलेलें पुरुषमेधाचें वर्णन आपण प्रथम येथेंच पाहतों. अशा प्रकारचा यज्ञ संहितेंत कोठेंहि नाहीं. यज्ञशास्त्राची घटना नवीन आहे अशाबद्दलच्या अनेक पुराव्यांपैकीं हा एक पुरावा आहे.

शतपथ ब्राह्मण.—हा शुक्लयजुर्वेदाचा प्रमुख ब्राह्मणग्रंथ आहे. ह्याचे १०० अध्याय आहेत, म्हणून ह्याला "शतपथ" असें नांव पडलें. सर्व ब्राह्मण ग्रंथांत हा फार महत्त्वाचा व प्रसिद्ध असा ग्रंथ आहे. वाजसनेयि संहितेप्रमाणें ह्या ब्राह्मणाच्याहि दोन शाखा आहेत, एक कण्वाची व दुसरी माध्यंदिन. माध्यंदिन–शाखीय ब्राह्मणांत १०० अध्यायांचीं १४ कांडें आहेत. पहिल्या नऊ कांडांत वाजसनेयि संहितेंतील १८ अध्यायांत सांगितलेल्या कर्मानुष्ठानांवर सविस्तर विवेचन केलेलें आहे. हीं पहिलीं नऊ कांडें शेवटल्या पांच कांडांपेक्षां जुनीं आहेत यांत शंका नाहीं. यांतील पहिलीं पांच कांडें एकमेकांशीं बरींचशीं संबद्ध आहेत. त्यांत वारंवार याज्ञवल्क्याला आचार्य असें संबोधून त्याचें म्हणणें प्रमाणभूत मानलें आहे. चवदाव्या कांडाच्या शेवटीं त्याला अखिल शतपथ ब्राह्मणाचा कर्ता असें म्हटलें आहे. तेंच ६ ते ९ कांडांत याज्ञवल्क्याचें नुसतें नांव सुद्धां दृष्टीस पडत नाहीं. त्याच्या ऐवजीं अग्निचयनादि कर्मासंबंधानें शांडिल्य हाच प्रमाणभूत मानून त्याचे आधार दाखविले आहेत. दहाव्या कांडांतल्या अग्निरहस्याचा प्रख्यापक तो हाच शांडिल्य. ११ ते १४ हीं कांडें मागील भागाला परिशिष्टांसारखीं असून शिवाय ह्यांत कांहीं अध्याय साधारणतः ब्राह्मण ग्रंथांत न येणाऱ्या अशा विषयांवर आहेत. उदाहरणार्थ उपनयन हा विषय, यांत विद्यार्थ्याला धार्मिक ग्रंथांचें गुरूजवळ अध्ययन करावयाचें असतें ( ११,५,४ ); स्वाध्याय, हा ब्रह्मदेवाप्रीत्यर्थ यज्ञ म्हणून मानला जाई ( ११,५,६-८ ); उत्तरक्रिया व समाधि बांधणें ( १३,८ ). १३ व्या कांडांत अश्वमेध, पुरुषमेध व सर्वमेध हे विषय आहेत व १४ व्यांत प्रवर्ग्यसंस्कार आहे. ह्या विस्तृत ग्रंथाचा शेवट जुन्या पण महत्त्वाच्या बृहदारण्यक उपनिषदामध्यें झाला आहे.

निरनिराळ्या वेदांच्या ब्राह्मणांतील फरक असा मांडतां येतो कीं, ऋग्वेदाच्या ब्राह्मणांत एकंदर यज्ञविधीचें विवेचन करितांना, होत्यानें म्हणजे ऋग्वेदाच्या ऋचा म्हणणारानें जो विधि करावयाचा त्याचें समग्र वर्णन दिलें आहे; सामवेदाच्या ब्राह्मणांत उद्गात्यांची म्हणजे सामवेदगायकांचीं जीं कर्तव्यकर्में आहेत तीं तपशीलवार दिलीं आहेत; आणि यजुर्वेदाच्या ब्राह्मणांत अध्वर्यूनें जीं जीं यज्ञसंबंधीं कामें करावयाचीं असतात त्यांविषयीं साद्यंत माहिती सांगितली आहे. त्यांतील महत्त्वाच्या मुद्द्यांविषयीं पाहतां सर्व ब्राह्मणें जवळजवळ सारखींच आहेत असें म्हटल्यास चालेल. त्यांच्यांतील मुद्द्याचा विषय बहुधा एकच असतो व म्हणून सर्व एकाच साच्यांतले आहेत. हें वाङ्मय निर्माण होऊन त्याचा विस्तार होण्याला बरींच शतकें लागलीं असावींत. हा दीर्घ काळ लक्षांत घेतां वरील सादृश्य विशेष चित्त वेधक होतें. ५०।६० आचार्यांच्या वंशावळीवर* जर आपला विश्वास असेल तर मग सदरील काल १००० वर्षांच्या पलीकडे आहे असें म्हणतां येईल.

* "वंश ब्राह्मण" म्हणून सामवेदाला जोडून एक ब्राह्मण ग्रंथ आहे. त्यांत ४३ आचार्यांची एक वंशावळी आहे. शेवटचा आचार्य जो कश्यप ह्याला अग्निदेवापासून ही वंशावळी मिळाली असें सांगतात. शतपथब्राह्मणामध्यें चार निरनिराळे वंशवृक्ष दिले आहेत. त्या ग्रंथाच्या शेवटीं दिलेल्या एका वंशवृक्षाच्या प्रारंभीं असें वाक्य आहे कीं, "हें ब्राह्मण आम्हांला भारद्वाजी पुत्रापासून प्राप्त झालें आहे, भारद्वाजी पुत्राला वात्सिमांडवीपुत्रापासून ..." इ०. ४० आचार्यांच्या मातृप्राप्त नांवांची यादी ह्यापुढें आलेली आहे. या यादींतील ४५ वा याज्ञवल्क्य आहे. उपनिषदांत ज्याचा उल्लेख आलेला आहे तो उद्दालक ऋषि ह्याचा गुरु असें येथें सांगितलें आहे. शेवटचा ( ५५ वा ) मानव आचार्य जो कश्यपनैध्रुवि त्याला प्रत्यक्ष वाग्देवीनें हें ब्राह्मण शिकविलें. वाग्देवीला तिचा पिता जो अंभृण ह्याजपासून व अंभृणाला आदित्यापासून या ब्राह्मणाचा उपदेश झाला.

या वंशावळींचा हेतु यज्ञाचा उगम, ब्रह्मन्, प्रजापति किंवा आदित्य अशासारख्या देवतांपासून झालेला आहे हें दाखविण्याचा असतो. असें जरी आहे तरी त्यांतील पुष्कळ नांवें खरोखरी अस्तित्वांत असलेल्या घराण्यांतल्या नांवांशीं जुळतात; तेव्हां तीं सर्व काल्पनिक आहेत असें म्हणणें वाजवी होणार नाहीं. या सर्व आचार्यांच्या वंशावळी सोडून दिल्या तरी ब्राह्मणग्रंथांतून ज्यांनां प्रमाणभूत मानलें आहे अशा पुष्कळ आचार्यांचीं नांवें कायम राहतात. ब्राह्मणसंग्राहक यज्ञशाखांचा उत्पत्तिकाल भूतकालाच्या पोटांत फार खोल आहे असें जें मानतात तें खरें असलें पाहिजे. यज्ञशास्त्राच्या विकासाला पुष्कळ शतकांची आवश्यकता होती. ब्राह्मणवाङ्मयाच्या विस्तारास लागलेलीं हीं शतकें कोणचीं असा जर प्रश्न आला तर संहितांच्या कालाप्रमाणें या ठिकाणींहि निश्चित काल सांगतां येणार नाहीं. यासंबंधांत निश्चित गोष्टी आहेत त्या ह्या कीं, ऋग्वेदमंत्ररचना ब्राह्मणवाङ्मयाच्या फार पूर्वींच पुरी झाली होती व सूक्तकाव्य हें स्तोत्र आणि यज्ञ यांचें मिळून एक निराळें "शास्त्र" बनविण्यास सुरवात झाल्याच्या वेळचें आहे. त्याचप्रमाणें हेंहि बहुधा निश्चित आहे कीं, अथर्ववेदांतील बहुतेक अभिचारमंत्र व विधी हे ब्राह्मणविधानांच्या फार पूर्वींचे आहेत. असें दिसतें कीं, अथर्ववेदसंहिता आणि यज्ञविषयक संहिता (म्हणजे यजुर्वेद व सामवेद) यांचा शेवटचा संग्रह व ब्राह्मणवाङ्मयाचा प्रारंभींचा संग्रह बहुधा समकालीन असावेत, म्हणजे या संहितांचा अगदीं शेवटचा शेवटचा भाग व ब्राह्मणांचा अगदीं पहिला भाग, हे दोन्ही एकाच काळीं रचले असावेत. एका बाजूला यजुर्वेद, सामवेद व अथर्ववेद यांच्या संहिता व दुसऱ्या बाजूला ब्राह्मणें घेऊन, या दोहोंतील देशविभाग व लोकस्थिति यांचें ज्ञान करून देणाऱ्या गोष्टींची ऋग्वेदांतील तशाच जातींच्या गोष्टींशीं तुलना करून पाहिल्यास हेंच सिद्ध होतें. ऋग्वेदकाळांत आर्यलोक सिंधुनदीच्या आसपासच्या प्रदेशांत वास्तव्य करीत होते, पण अथर्ववेदकाळांत ते पूर्वेकडे गंगा व यमुना या नद्याकांठच्या प्रदेशांपर्यंत आले होते असें दिसतें. ब्राह्मणें व यजुर्वेदसंहिता ह्यांतून उल्लेखिलेला प्रदेश हा कुरूंचा व पांचाळांचा प्रदेश होय. महाभारतांत वर्णन केलेल्या किंवहुना महाभारतरचनेस स्फूर्तिदायक झालेल्या मोटमोठ्या लढाया ह्या कुरु व पांचाळ ह्या दोन वंशांत झालेल्या घनघोर लढाया होत. कुरुक्षेत्राच्या पवित्र भूमींत स्वतः देव यज्ञयाग करीत असत असें मानण्यांत येतें. कौरवांचें राज्य जें कुरुक्षेत्र तें गंगायमुना यांच्या पश्चिमेकडील भागांत सरस्वती व दृषद्वती या दोन लहान नद्यांमधील प्रदेशांत वसलें होतें व शेजारचें पांचाळांचें राज्य गंगा व यमुना या नद्यांमधील प्रदेशांत वायव्येकडून आग्नेयीकडे पसरलें होतें. हिंदुस्थानांतील हा विशिष्ट प्रदेश ज्याला गंगा व यमुना यांमधील "दुआब" म्हणतां येईल व जो दिल्लीपासून मथुरेपर्यंत पसरला आहे तो अजून देखील "ब्रह्मावर्त" (ब्राह्मणभूमि) या नांवानें प्रसिद्ध आहे. ब्राह्मणधर्मशास्त्राप्रमाणें येथील चालीरीती सर्व हिंदुस्थानदेशभर पाळण्यांत याव्या असें आहे. यजुर्वेदसंहितांचें व ब्राह्मणांचें उगमस्थान म्हणूनच हें स्थान पूज्य व प्रसिद्ध आहे असें नव्हे, तर हें सर्व ब्राह्मण संस्कृतीचें माहेरघर आहे. ब्राह्मण संस्कृति येथूनच सर्व देशभर पसरली.

ऋग्वेदकालानंतर धार्मिक व सामाजिक स्थित्यंतरें बरींच झालीं. अथर्ववेदांतल्याप्रमाणेंच यजुर्वेदसंहिता व ब्राह्मणें ह्यांतून देखील ऋग्वेदांतील देव सांपडतात; पण त्यांचें सामर्थ्य कमी झालेलें दिसून येतें. त्यांच्या वांट्याला जें कांहीं सामर्थ्य येतें तें यज्ञापासून. ह्याच्या उलट, विष्णु, रुद्र, शिव ह्यांसारखे ऋग्वेदांतील गौण देव यज्ञविषयक संहिता व ब्राह्मणें ह्यांतून प्रामुख्यानें भाग घेतात. या ग्रंथांत प्रजापति हा श्रेष्ठ देव म्हणून मानण्यांत आला. देव व त्याचप्रमाणें असुर या सर्वांचा तो पिता होय. असुर हा शब्द—अवेस्तांत ह्याला समानार्थी "अहुर" असा शब्द आहे—ऋग्वेदांत देव ह्या अर्थी असून, तो वारंवार वरुण देवाला उद्देशून योजला आहे; पण पुढें त्याला "दानव" असा अर्थ आला. ब्राह्मणांत वारंवार देव व असुर ह्यांच्यांत लढाई जुंपत असल्याचें सांगितलें आहे. पण ह्या लढाया ऋग्वेदांतील इंद्र व वृत्र यांच्या लढाईप्रमाणें घनघोर नसत. देव व असुर एकमेकांवर चढाई करण्याकरितां यज्ञाची कांस धरीत. ब्राह्मणांत असें सांगितलें आहे कीं, देवांनां सुद्धां आपल्या कार्यसिद्धीकरितां यज्ञ करावे लागतात. ब्राह्मण ग्रंथांतून यज्ञाला जितकें महत्त्व दिलें आहे तितकें दुसऱ्या कशालाहि दिलेलें नाहीं. या ठिकाणीं यज्ञ हा इष्टसिद्धीचें साधन या दृष्टीनेंच केवळ वर्णिलेला नसून हा स्वतःच आपल्या ठिकाणीं एक साध्य म्हणून किंवहुना उच्चतम जीवितसाध्य म्हणून मानलेला आहे. यज्ञ ही एक सर्वांनां भारी अशी शक्ति आहे; इतकेंच नव्हे तर ही सृष्टीची उत्पादक शक्ति आहे; व म्हणून सृष्ट्युत्पादक प्रजापति हा यज्ञतुल्य आहे किंवा यज्ञ हा प्रजापतितुल्य आहे, कसेंहि म्हटल्यास वावगें होणार नाहीं. "प्रजापति हा यज्ञ आहे" हें वाक्य ब्राह्मणांमध्यें पुष्कळ ठिकाणीं आढळून येतें. "यज्ञ हा सर्व वस्तूंचा व सर्व देवांचा आत्मा आहे." "सर्वं वा एषोऽभि दीक्षते । यो दीक्षते यज्ञं ह्यभिदीक्षते यज्ञं ह्येवेदं सर्वं मनु तं यज्ञं सम्भूत्य यमिममभिदीक्षते सर्वमिदं विसृजते ॥"

यज्ञाशीं संबंध येत असलेली प्रत्येक गोष्ट किंवा वस्तु सारखीच महत्त्वाची व मंत्रप्रभावाची असते; मंत्र व विधी, ऋचा व त्यांचे छंद, गीतें व त्यांचे स्वर, या गोष्टी व यज्ञपात्रें हीं सर्व सारख्याच दर्जाचीं व महत्त्वाचीं आहेत. प्रत्येक यज्ञकर्म फार फार विस्तारानें सांगितलें आहे. क्षुल्लक बाबीला सुद्धां

फार महत्त्व देण्यांत आलें आहे. एखादें कर्म उजव्या अंगाला करावें कीं डाव्या, यज्ञभूमीवर एखादें भांडें मांडावयाचें झालें तर तें या जागीं मांडावें कीं त्या जागीं, दर्भाचें टोंक उत्तरेला करावें कीं ईशान्येला, होत्यानें अग्नीच्या पुढून पदन्यास करावा कीं मागून, त्यानें तोंड कोणच्या दिशेला करावें, यज्ञाच्या अन्नाचे किती भाग पाडावेत, अग्नींत तूप टाकावयाचें तें त्याच्या उत्तरार्धांत कीं दक्षिणार्धांत किंवा मधोमध, कोणत्या वेळीं मंत्राचा पुनः पुनः उच्चार करावयाचा, कोणत्या वेळीं कोणतें स्तोत्र म्हणावयाचें ह्या सर्व गोष्टींचा एकामागून एक अशा असंख्य यज्ञाचार्यांनीं विस्तृतपणें विचार केलेला दिसतो व ब्राह्मणांत यासंबंधाचें फारच शोधक बुद्धीनें निरूपण केलें आहे. याजकाचें बरेंवाईट सर्व ह्या गोष्टींविषयींच्या त्याच्या ज्ञानावर अवलंबून असतें. याविषयीं शतपथ ब्राह्मणांत खालीलप्रमाणें म्हटलें आहेः—

"होय. हीं यज्ञांतील अरण्यें व ओसाड जागा आहेत. यांतून पलीकडे जाण्यास शेंकडों दिवस गाडींत वसून जावें लागतें. जे या अरण्यांत कांहीं माहिती नसतांना प्रवेश करितात त्यांची, अरण्यांत फिरणाऱ्या मूर्ख मनुष्यांची क्षुधा व तृषा लागल्यामुळें किंवा दुष्ट व राक्षस पाठीस लागल्यामुळें जशी अवस्था होते तशी अवस्था होते. परंतु जे ज्ञाते आहेत ते एका नदीच्या प्रवाहापासून दुसऱ्या नदीच्या प्रवाहाकडे किंवा एका सुरक्षित जागेपासून दुसऱ्या सुरक्षित स्थळाकडे जावें त्याप्रमाणें एका देवतेपासून दुसऱ्या देवतेकडे जातात व याप्रमाणें मोक्ष व स्वर्ग मिळवितात."*

यज्ञविद्यारूपी अरण्यांतून मार्गदर्शक होणारे "ज्ञाते" लोक म्हणजे याज्ञिकच; तेव्हां याज्ञिक ब्राह्मणवर्णाचा अधिकार त्या वेळीं अमर्यादित असल्यास नवल नाहीं. ब्राह्मणवर्ण असें जें म्हटलें तें चुकीचें नाहीं; कारण ब्राह्मणांतून व त्याचप्रमाणें अथर्ववेदाच्या कांहीं खंडांतून अशा तऱ्हेचा वर्ण आढळतो. त्या वेळीं वर्णाश्रमधर्मपद्धति अस्तित्वांत होती. "†ब्राह्मण हे प्रत्यक्ष देवच आहेत" असें वारंवार म्हटलेलें पाहण्यांत येतें. शतपथब्राह्मणांत तर असें सांगितलें आहे कीं,

द्वया वै देवा देवाः । अहैव देवा अथ ये ब्राह्मणाः शुश्रुवांसोऽनूचानास्ते मनुष्यदेवास्तेषां द्वेधा विभक्त एव यज्ञ आहुतय एव देवानां दक्षिणा मनुष्यदेवानां ब्राह्मणानांशुश्रुवुषामनूचानानामाहुतिभिरेव देवान् प्रीणाति दक्षिणाभिर्मनुष्यदेवान् ब्राह्मणाञ्छुश्रुवुषोऽनूचानांस्तऽएनमुभये देवाः प्रीताः सुधायां दधति ॥ शतपथ ब्रा. २.२.२,६.

* शतपथ ब्रा. १२.२.३,१२. † तैत्तिरीय सं. १.७.३,१.



देव दोन तऱ्हेचे आहेत. पहिले देव म्हणजे स्वर्गांतले देव. विद्वान् व अध्ययन करणारे जे ब्राह्मण ते मनुष्यांतले देव. यांच्यामध्यें यज्ञाची पुढील दोन तऱ्हेनें वांटणी केली आहे. देवांनां आहुति देण्यांत येते; व विद्वान् आणि अध्ययन करणाऱ्या ब्राह्मणांनां दक्षिणा देण्यांत येते. यजमान (यज्ञ करणारा) देवांनां आहुती देऊन संतुष्ट करतो व विद्वान् व अध्ययन करणाऱ्या ब्राह्मणांनां दक्षिणा देऊन संतुष्ट करतो. ह्या योगानें हे उभय तऱ्हेचे देव त्याला स्वर्गलोकांत आनंदाप्रत नेतात.

ब्राह्मणग्रंथांतून ब्राह्मणांचीं चार कर्तव्यें सांगितलीं आहेत. तीं ब्राह्मणपरंपरा चालविणें, शील राखणें, (ज्ञान मिळवून) कीर्ति संपादन करणें व "लोकांनां पक्वदशेला आणणें" (यज्ञ करून लोकांनां परलोकास पात्र करून ठेवणें) हीं होत. त्याचप्रमाणें, "परिपक्व" झालेल्या लोकांनीं ब्राह्मणांशीं कसें वागावें ह्याबद्दल चार नियम केले आहेत. अशा लोकांनीं ब्राह्मणांनां मान द्यावा, पारितोषिकें द्यावीत, त्यांच्यावर जुलुम करूं नये व त्यांनां ठार मारूं नये. राजानें केव्हांहि ब्राह्मणाच्या संपत्तीला शिवतां कामा नये. राजानें आपलें सर्व राज्य व राज्यांत जें कांहीं असेल तें जरी यज्ञदक्षिणा म्हणून ऋत्विजांनां देऊन टाकलें तरी ब्राह्मणांची संपत्ति त्या दानांत येऊं शकत नाहीं. आतां राजाला ब्राह्मणांवर जुलूम करतां येईल, पण त्यानें तसें केल्यास त्याचें कल्याण होणार नाहीं. राज्याभिषेकाच्या वेळीं उपाध्याय खालील अर्थाचे मंत्र म्हणतो. "लोकहो! हा मनुष्य तुमचा राजा आहे; आम्हां ब्राह्मणांचा राजा सोम आहे." ह्यावर शतपथ ब्राह्मणांत अशी टीका आहे. "या विधीच्या योगानें उपाध्याय सर्व राष्ट्राला राजाचें भक्ष्य करून सोडतो; तो फक्त ब्राह्मणांनां वगळतो; म्हणून राजानें ब्राह्मणाला आपलें भक्ष्य करूं नये; कारण तो त्याचा राजा नसून सोम हा त्याचा राजा आहे.*" फक्त ब्राह्मणाचा खून हाच खरा खून. ब्राह्मण व अब्राह्मण यांच्या भांडणांत न्यायाधीशानें ब्राह्मणाच्या वतीनेंच नेहमीं निकाल दिला पाहिजे, कारण ब्राह्मणाला कधीं विरोध करतां कामा नये.† मृत मनुष्याच्या क्रियेच्या वेळीं लागणारा अश्मा व मृत्तिकापात्रें, अग्निहोत्राकरितां पाळलेली गाय नाठाळ किंवा रोगी असेल तर ती, अशांसारख्या इतरांनां देण्याला निषिद्ध मानलेल्या गोष्टी, ब्राह्मणांनां देऊन टाकाव्या असें आहे; विशेषतः यज्ञांत उरलेलें अन्न व इतर पदार्थ ब्राह्मणांखेरीज इतरांनां निषिद्ध आहेत; ब्राह्मणानें मात्र त्यांचा यथेच्छ उपभोग घ्यावा, कारण "ब्राह्मणाचें पोट कशानेंहि दुखत नाहीं किंवा बिघडत नाहीं."‡

* शतपथ ११.५.७,१; १३.५,२४; १३.१.५,४; ५.४.२,३. † शतप० १२.३.५,३. तैत्तिरीय सं. २.५.११,९. ‡ तैत्तिरीय सं. २.६.८,७.

याप्रमाणें शेवटीं असा सिद्धांत निघतो कीं, ब्राह्मण हा स्वर्गातल्या देवांच्या तोडीचा मृत्युलोकींचा कोणी देव आहे असें नसून, त्यानें स्वतःच आपणाला देवकोटींत घालून टाकलें आहे. शतपथब्राह्मणांत तर म्हटलें आहे कीं,* 'ब्राह्मण हा एका ऋषीचा वंशज असून त्याच्या ठिकाणीं सर्व देव एकाकार झाले आहेत.' ब्राह्मणग्रंथांच्या प्रारंभीं दिसून येणारें अशा प्रकारचें ब्राह्मणवर्गाचें धार्ष्ट्य व त्याचा अहंकार हें केवळ संस्कृतीच्या इतिहासांतलें ब्राह्मणी औद्धत्याचें एक मजेदार उदाहरण नसून, सबंध भारतीय प्राचीन कालांत दिसून येणाऱ्या, किंबहुना अतिप्राचीन आर्य लोकांच्या मनोभूमींत चांगल्या रुजलेल्या अशा भावनांचें† हें एक बाह्यचिह्न आहे असें म्हणतां येईल. उदाहरणार्थ, एकीकडे एक हिब्रू कवि असें म्हणतो कीं, "हा मनुष्य मनुष्य तरी कोण, कीं ज्याविषयीं तूं नेहमीं सावधान असतोस व हा पावन मनुष्य तरी कोण कीं तूं ज्यास भेटूं इच्छितोस" तर दुसरीकडे एक ग्रीक कवि असें लिहितो कीं, "जगांत सामर्थ्यवान् अशा पुष्कळ गोष्टी आहेत पण त्या सर्वांत जास्त सामर्थ्यवान् असा मनुष्यच". एक जर्मन कवि, ज्यानें फॉस्ट म्हणून एक अति बलवान् मनुष्य कल्पून त्याला भूतलोकाच्या द्वारावर जोरानें लत्ताप्रहार करावयास लावलें आहे तो 'प्रॉमेथियस' या काव्यांत, प्रॉमेथियसच्या तोंडीं असे शब्द घालतोः—

"देवांनों! ह्या पृथ्वीवर तुमच्यासारखे दीनवाणे व कंगाल कोणीहि नसतील!"

ब्राह्मणग्रंथांतून असें आढळून येतें कीं, यज्ञप्रभावामुळें याज्ञिकाला देवांच्याहि वरचा दर्जा प्राप्त होतो. महाकाव्यांतून तर असें वाचण्यांत येतें कीं, उग्र तप आचरिल्यानें तपस्व्यांचा एवढा मोठा बडेजाव वाढतो कीं, देवांनां आपली गादी कायम राहते कीं नाहीं अशाविषयीं संदेह उत्पन्न होतो. बौद्धधर्मांत तर सर्व देव व त्यांचा राजा इंद्र ह्यांचें महत्त्व अगदीं कमी करून टाकण्यांत आलें आहे. इतर मर्त्यांपेक्षां ह्यांच्यांत अधिक कांहीं असेल तर ती त्यांची बऱ्यापैकीं राहणी व तीसुद्धां ते बुद्धभक्त आहेत तोंपर्यंतच. त्यांच्यावर फक्त बुद्धदेवच आहे असें नाहीं तर, जगाला तुच्छ मानून व सर्व प्राण्यांच्या ठायीं प्रेमबुद्धि ठेवून जो अर्हत् म्हणजे साधु बनला आहे असा प्रत्येकजण बुद्धदेवाप्रमाणेंच या देवांच्या वर असतो.

यावरून असें दिसून येतें कीं, बौद्धधर्माचा उगम ज्या मोठ्या धार्मिक चळवळीपासून झाला आहे, तिचें बीज या ब्राह्मणग्रंथांतून अगोदरच रुजलेलें होतें. जुनीं अस्सल ब्राह्मणें हीं बौद्धकालापूर्वींचीं आहेत याविषयीं शंका नाहीं. ब्राह्मणग्रंथांत बौद्धधर्माचा मागमूसहि लागत नाहीं,* पण बौद्धग्रंथांतून ब्राह्मणवाङ्मयाचा उल्लेख केलेला आढळतो. यावरून आपल्याला असें सप्रमाण म्हणतां येईल कीं, हीं ब्राह्मणें व यज्ञविषयक संहिता ज्या शतकांत तयार झाल्या, त्या शतकांचा काल ऋग्वेदसंहिता व स्तोत्रप्रबंध हीं पुरीं झाल्यानंतरचा व बौद्धधर्म प्रचारांत येण्यापूर्वींचा आहे.

ब्राह्मणग्रंथांतून कोणकोणत्या विषयांचें प्रतिपादन केलें आहे याची कल्पना येण्याकरितां, त्यांतील कांहीं थोडीं उदाहरणें घेणें बरें. ब्राह्मणांतील विषयांचे दोन मुख्य वर्ग करण्यांत येतात, एक विधि व दुसरा अर्थवाद. विधि म्हणजे "नियम, निर्देश" व अर्थवाद म्हणजे "अर्थासंबंधीं विवेचन". आरंभीं ब्राह्मणांत एक एक विधि कसा करावयाचा याविषयीं नियम घालून दिले आहेत व नंतर यज्ञकर्म व मंत्र यांतील हेतु, अर्थ यांचें विवेचन व निरूपण त्यांपुढें जोडलें आहे. उदाहरणार्थ शतपथब्राह्मणांत सुरुवातीलाच, यजमानानें दर्शपूर्णमासेष्टीच्या आदल्या दिवशीं जें व्रत करावयाचें असतें त्याचे विधी सांगितले आहेत ते असेः—

व्रतमुपैष्यन्। अन्तरेणाहवनीयञ्च गार्हपत्यञ्च प्राङ्तिष्ठन्नपऽउपस्पृशति तद्यदपऽउपस्पृशत्यमेध्यो वै पुरुषोयदनृतं वदति तेन पूतिरन्तरतो मेध्या वाऽआपो मेध्यो भूत्वा-व्रतमुपायानीति पवित्रं वाऽआपः पवित्रपूतो व्रतमुपायानीति तस्माद् वा अपऽउपस्पृशति ॥ १ ॥ श० १.१,१.

"व्रत करणारा मनुष्य पूर्वाभिमुख होऊन आहवनीय व गार्हपत्य ह्या अग्नींच्या मध्यें उभा राहून पाण्यामध्यें आपले हात बुडवितो. त्याचें कारण असें कीं मनुष्य खोटें बोलतो म्हणून अपवित्र आहे आणि अपवित्र आहे म्हणून तो अंतःशुद्धि करतो, पाणी हें यज्ञाला योग्य (पवित्र) आहे. यजमान असा विचार करतो कीं, "मी यज्ञाला योग्य (पवित्र) झालों म्हणजे व्रत करीन. पाणी हें एक शुद्ध करण्याचें साधन आहे. ह्या साधनानें शुद्ध होऊन व्रत करीन. आणि म्हणून तो पाण्याला स्पर्श करतो."

ह्या साध्या विधिनिर्देशाला कांहीं बाबतींत निरनिराळ्या आचार्यांची टीका जोडली आहे. कांहीं वादग्रस्त प्रश्नांचा या टीकेंत ऊहापोह केलेला आहे. उदाहरणार्थ, हें विशिष्ट व्रत आचरतांना यजमानानें उपवास करावा कीं नाहीं ह्याविषयीं वाद उत्पन्न झाला आहे, तो असाः

* शत. ब्रा. १२.४.४,६.

† अविद्वांश्चैव विद्वांश्च ब्राह्मणो दैवतं महत्। मनु. ९.३१७

\+ + + + +

सर्वथा ब्राह्मणाः पूज्याः परमं दैवतं हि तत्। मनु. ९.३१९

* वाजसनेयी–संहितेंत (अ. ३०) पुरुषमेधाच्या यादींत मठवासी, परिव्राजिका किंवा बुद्धभिक्षु यांपैकीं कोणाचाहि उल्लेख नाहीं, हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. ही यादी जुन्या ब्राह्मणांच्या मागाहूनच्या काळांतली आहे.

अथातोऽशनानशनस्यैव । तदु हाषाढः सावयसोऽनशनमेव व्रतं मेने मनो ह वै देवा मनुष्यस्याजानंति तऽएनमेतद्व्रतमुपयन्तं विदुः प्रातर्नो यक्ष्यतऽइति तेऽस्य विश्वे देवा गृहानागच्छन्ति तेऽस्य गृहेषूपवसन्ति सऽउपवसथः ॥ ७ ॥

तन्वेवानवक्लृप्तम् । यो मनुष्येष्वनश्नत्सु पूर्वोऽश्नीयादथ किमु यो देवेष्वनश्नत्सु पूर्वोऽश्नीयात् तस्मादु नैवाश्नीयात् ॥ ८ ॥

तदु होवाच याज्ञवल्क्यः । यदि नाश्नाति पितृदेवत्यो भवति यद्युऽअश्नाति देवानत्यश्नातीति स यदेवाशितमनशितं तदश्नीयादिति यस्य वै हविर्न गृह्णन्ति तदशितमनशितंस्स यदश्नाति तेनापितृदेवत्यो भवति यद्यु तदश्नाति यस्य हविर्नगृह्णन्ति तेनो देवान्नात्यश्नाति ॥ ९ ॥

स वाऽआरण्यमेवाश्नीयात् । या वाऽरण्याऽओषधयो यद्वा वृक्ष्यं..............॥ शत० ब्रा० १·१·१.

"आतां भक्षण व उपवास यांचा विचार. आषाढसावयस नामक ऋषीचें भक्षण न करावें हेंच व्रत आहे असें मत आहे. कारण देवांनां मनुष्याचें मन कळतें. जो कोणी हें व्रत आचरितो तो दुसऱ्या दिवशीं सकाळीं आपल्यास आहुती देईल हें देवांस माहीत असतें. म्हणून सर्व देव त्याच्या घरीं जातात व त्याच्याच घरीं राहतात (उपवसन्ति). यासाठींच या दिवसास उपवसथ (उपवास) असें म्हणतात.

आतां घरीं आलेल्या अतिथीच्या सुद्धां अगोदर जेवणें जर अगदीं अनुचित आहे, तर प्रत्यक्ष देव आपल्या घरीं आले असतां आधीं भक्षण करणें जास्तच अनुचित होईल. म्हणून कांहीं झालें तरी व्रत करणारानें भक्षण करूं नये.

याज्ञवल्क्य ऋषि म्हणतात, जर त्या यजमानानें भक्षण केलें नाहीं तर पितर हेच आपले देव असें समजून त्यांची पूजा करणाऱ्या मनुष्यासारखा तो होईल. परंतु जर त्यानें भक्षण केलें तर देवांच्या अगोदर भक्षण केल्याचा आरोप त्याजवर येतो. तेव्हां जें खाल्लें असतांना, न खाल्ल्यासारखें होतें तेंच भक्षण करावें. ज्या जिनसांचा यज्ञाकडे अन्न म्हणून उपयोग करीत नाहींत अशा जिनसा खाल्ल्या असतां न खाल्ल्याप्रमाणेंच होतें. अशा भक्षणापासून तो पितृदेवत्य होणार नाहीं व देवांनांहि दुखवणार नाहीं कारण ह्याच्यापासून कोणचेंहि यज्ञिय अन्न तयार होत नाहीं. तेव्हां अरण्यांत उत्पन्न होणारे पदार्थ खावे. कंदमुळेंफळें कांहींहि चालेल."

वरील "उपवसथ" शब्दासारख्या व्युत्पत्ती ब्राह्मणांतून पुष्कळ आढळतात. शिवाय, एखादी व्युत्पत्ति जर बरोबर नसली तर तें विशेष फायदेशीर आहे असें मानण्यांत येतें; कारण देवांनां जें गूढ असें असेल तेंच आवडतें. उदाहरणार्थ, असें सांगतात कीं, इंद्रदेवाचें नांव "इंध्" म्हणजे चेतवणें, प्रदीप्त करणें ह्या धातूवरून पडलें आहे; इंद्राचें पूर्वीचें खरें नांव इंध असें होतें पण पुढें त्याला इंद्र असें संबोधण्यांत आलें; कारण जेवढें प्रच्छन्न असेल तेवढें देवांनां प्रिय. त्याचप्रमाणें "उलूखल" म्हणजे उखळ हा शब्द "उरु करोति ।" ह्या वाक्यापासून अपभ्रंशानें झालेला आहे; "उरुकर" ह्या साध्या शब्दापासून "उलूखल" हा गूढव्यंजक शब्द तयार झाला, असें म्हटलें आहे.* या व्युत्पत्तीकरणाप्रमाणें ब्राह्मणांतून यजुर्वेदसंहितांपेक्षांहि अधिक स्वैर समीकरण व संज्ञाकरण केलेलें आढळून येतें; म्हणजे यांत, नाना प्रकारच्या भिन्न गोष्टी एकत्र आणून त्यांची सांगड घालून देण्यांत आली आहे. खालील उतारे उदाहरणांदाखल दिले आहेत.

अथ तृणैः परिस्तृणाति । द्वन्द्वं पात्राण्युदाहरति शूर्पञ्चाग्निहोत्रहवनीञ्च स्फ्यञ्च कपालानि च शम्याञ्च कृष्णाजिनं चोलूखलमुसले दृषदुपले तद्दश दशाक्षरा ब्वैविराड्विराड्वै यज्ञस्तद्विराजमेवैतद्यज्ञमभिसम्पादयत्यथयद् द्वन्द्वं वै वीर्यं यदा वै द्वौ सᳲरभेतेऽअथ तद्वीर्यं भवति द्वन्द्वं वै मिथुनं प्रजननं मिथुनमेवैतत्प्रजननं क्रियते ॥

शत० १·१·१,२२.

"तो भूमीवर गवत पसरतो. प्रत्येकीं दोन दोन अशीं यज्ञपात्रें आणतो. सूप आणि अग्निहोत्रहवनीय (यज्ञांतील एका भांड्याचें नांव), लांकडी सुरी, खापरें, लांकडी दांडा, हरणाचें कातडें, उखळ, मुसळ, पाटा, वरवंटा, एकंदर सर्व मिळून दहा. विराट् हा दहा अक्षरांचा छंद आहे, यज्ञसुद्धां विराट् (तेजस्वी) आहे. तेजस्वीपणाच्या योगानें यज्ञ विराट्छंदासारखा होतो. तो तीं पात्रें जोडीजोडीनें आणतो, कारण जोडी ही वीर्याची द्योतक आहे. जेव्हां दोघेजण एखादें काम हातांत घेतात तेव्हां तें वीर्यशाली द्वंद्व म्हणजे मिथुन व प्रजोत्पत्ति तेव्हां हीं पात्रें जोडीनें आणल्यानें मैथुनास व प्रजोत्पत्तीस मदत होते."

पुरुषो वै यज्ञः । पुरुषस्तेन यज्ञो यदेनं पुरुषस्तनुतऽएष वै तायमानो यावानेव पुरुषस्तावान्विधीयते तस्मात्पुरुषोयज्ञः ॥ १ ॥

तस्येयमेव जुहूः । इयमुपभृदात्मैव ध्रुवा तद्वाऽआत्मनऽएवेमानि सर्वाण्यंगानि प्रभवन्ति तस्मादु ध्रुवाया एव सर्व्वोयज्ञः प्रभवति ॥ २ ॥

प्राणऽएव स्रुवः । सोऽयं प्राणः सर्व्वाण्यंगान्यनुसञ्चरति तस्मादु स्रुवः सर्व्वाऽअनु स्रुचः सञ्चरति ॥ ३ ॥

तस्यासावेव द्यौर्जुहूः । अथेदमन्तरिक्षमुपभृदियमेव ध्रुवा तद्वा अस्याऽएवेमे सर्व्वे लोकाः प्रभवन्ति तस्मादु ध्रुवाया एव सर्व्वो यज्ञः प्रभवति ॥ ४ ॥

---

* शत० ६·१,२; ७·५·१·२२.

अयमेव स्रुवो योऽयं पवते । सोऽयमिमान्त्सर्व्वाँल्लोकाना नुपवतेतस्माद् स्रुवः सर्व्वा अनु स्रुचः सञ्चरति ॥ ५ ॥
शत० ब्रा० १·३.२.

"यज्ञ हा पुरुषच होय. कारण पुरुषच ( वेदीवर बसून ) यज्ञाचीं साधनें पसरतो. ह्या तऱ्हेनें केला जाणारा यज्ञ मनुष्याच्याच आकाराचा होतो. म्हणून यज्ञ हा पुरुष होय.

ह्या यज्ञरूपी पुरुषाचा जुहू उजवा हात व उपभृत् हा डावा हात होय. ध्रुवा हा आत्मा होय. ह्या आत्म्यापासून सर्व अवयव उत्पन्न होतात आणि म्हणून सर्व यज्ञसुद्धां ध्रुवेपासूनच उत्पन्न होतो.

स्रुव ( तुपाची पळी ) हा प्राण होय. सर्व अवयवामध्यें प्राण सञ्चार करतो. म्हणून स्रुव एका यज्ञाच्या पळीकडून दुसरीकडे संचार करतो.

आकाश हें यज्ञरूपी पुरुषाची जुहू होय. आणि अंतरिक्ष ( हवा, वातावरण ) हें उपभृत् होय. ही पृथ्वी हीच ध्रुवा होय. सर्व जग हिच्यापासून उत्पन्न झालें. म्हणून ध्रुवेपासूनच सर्व यज्ञाचा उगम होतो.

हा स्रुव म्हणजे जो सर्वत्र वाहतो असा वायु होय. हा सर्व लोकांमध्यें वाहतो म्हणून स्रुव ( तुपाची पळी ) एका यज्ञिय पळीकडून दुसरीकडे जातो."

ब्राह्मणांतून अनेक वेळां अनेक ठिकाणीं यज्ञाला विष्णु व प्रजापति यांच्या जोडीला बसविलें आहे. त्याचप्रमाणें संवत्सरालाहि प्रजापतितुल्य लेखिलें आहे. ह्याशिवाय, वेदी बांधण्याला एक संवत्सर लागतें म्हणून अग्नीला संवत्सर असें कल्पिलें आहे तें निराळेंच. "अग्नि हा संवत्सर आहे, व संवत्सर म्हणजे सर्व ब्रह्मांडें आहेत" व ह्यापुढें लगेच "अग्नि हा प्रजापति आहे व प्रजापति संवत्सर आहे" अशा अर्थाचे श्लोक आहेत. आणखी "प्रजापति तर यज्ञ व संवत्सर आहे, अमावास्या हें त्याचें द्वार आहे व चंद्र ही त्या द्वाराची खिटी आहे"* अशी एक ऋचा आहे.

ह्या ग्रंथांत संख्यांची सांकेतिक योजना प्रमुखत्वानें केलेली दिसून येते. जसें:—

चतुर्भिरपादत्ते । तद्ये चतुष्पादाः पशवस्तैरेवैनमेतत् सम्भरत्यथोऽअन्नं वै पशवोऽन्नेनैवैनमेतत् सम्भरति त्रिभिरभ्यवहरति तत् सप्तसप्तचितिकोऽग्निः सप्तर्तवः संवत्सरः संवत्सरोऽग्निर्यावानग्निर्यावत्यस्य मात्रा तावत्तद्भवति ॥ ७ ॥
श. ६·८·२.

"चार ऋचा म्हणून तो थोडीशी राख उचलतो. त्या योगानें तो यजमानाला सर्व चतुष्पाद पशूंचा पुरवठा करतो. पशू अन्न आहेत, म्हणून पशूंचा पुरवठा करण्यांत तो अन्नाचा पुरवठा करतो. तीन ऋचा म्हणून ती राख तो पाण्याजवळ आणतो. एकूण सात ऋचा म्हणतो; कारण सात थरांची यज्ञवेदी केली असते. सात ऋतू म्हणजे वर्ष आणि वर्ष म्हणजे अग्नि. अग्नीच्या आकाराच्या मोठेपणावर त्याचा मोठेपणा अवलंबून आहे. जेवढा अग्नि मोठा तेवढा तोहि मोठा आहे."

कोठें कोठें अशा प्रकारचें रुक्ष निरूपण थोडें रसभरित झालेलें आहे. ज्या वेळीं ब्राह्मणकालांतील सामाजिक परिस्थिति व नैतिक दृष्टि ह्यांवर वरील प्रकारचें निरूपण कांहीं प्रकाश पाडतें तेव्हां तें किंचित् चित्तवेधक होतें. ह्याला उदाहरण द्यावयाचें म्हणजे, सोमयागाच्या वेळीं अग्नीला 'पत्नीवत्' म्हणून जो सोम दिला जातो तत्संबंधीं निरूपण. या निरूपणांत असें सांगितलें आहे कीं, सदरील अर्पणद्रव्य इतर सोमरसाहून कांहीं बाबतींत वेगळें पडतें, व ह्या बाबतींत जें शास्त्रातिक्रमण होतें त्याला कारण स्त्रीजातीचें दौर्बल्य आहे.*

वाजपेय यज्ञांत बायकोचें नवऱ्याशीं असणारें नातें वहारीनें वर्णिलेलें आहे. त्या ठिकाणीं असा एक विधि असतो कीं, यज्ञस्थाणूला लावलेल्या शिडीवर यजमान बायकोसह चढूं लागतो तेव्हां तो तिला कांहीं प्रश्न विचारतो व ती त्याला उत्तर देते.

स रोक्ष्यन् जायामामंत्रयते । जायऽएहि स्वो रोहावेति रोहावेत्याह जाया तद् यज्जायामामन्त्रयतेऽर्द्धो ह वाऽएष आत्मनो यज्जाया तस्माद्यावज्जायां न विन्दते नैव तावत् प्रजायतेऽसर्वो हि तावद्भवत्यथ यदैव जायां विन्दतेऽथ प्रजायते तर्हि हि सर्व्वो भवति सर्व्व एतां गतिं गच्छानीति तस्माज्जायामामन्त्रयते ॥ शतपथ ब्रा. ५·२·१,१०.

"स्वर्गामध्यें जातांना तो आपल्या बायकोला म्हणतो, 'भार्ये' इकडे ये आपण स्वर्गांत जाऊं या'. त्याची पत्नी 'ठीक आहे चलावें' असें उत्तर देते. वरील प्रश्न विचारण्याचें कारण असें कीं पत्नी हा त्याचा ( स्वर्गारोहण करणाराचा ) अर्धा भाग आहे. जोंपर्यंत त्याला पत्नी नाहीं तोंपर्यंत, तो प्रजोत्पत्ति करीत नाहीं व पूर्णहि होत नाहीं. जेव्हां तो भार्या संपादन करतो तेव्हां तो प्रजोत्पत्ति करतो व त्यायोगें तो पूर्ण होतो. मी पूर्ण व्यक्ति होऊन स्वर्गारोहण करावें असें त्याला वाटतें म्हणून तो पत्नीला पूर्ववत् प्रश्न विचारतो".

ब्राह्मण संकेतपद्धतींत वेदी ही स्त्री म्हणून मानलें आहे व वेदीच्या प्रतिष्ठापनेसंबंधींच्या खालील सूचनांवरून, त्या काळीं स्त्री सौंदर्याविषयीं काय कल्पना होती हें चांगलें कळून येतें:—

सा वै पश्चाद्वरीयसी स्यात् । मध्ये संह्वारिता पुनः पुरस्तादुर्व्येवमिव हि योषां प्रशंसन्ति पृथुश्रोणिर्विमृष्टान्तरांसा मध्ये सङ्ग्राह्येति जुष्टामेवैनामेतद्देवेभ्यः करोति ॥

* श० ८·२·२,१७–१८; ११·१·२,१.

* श० ४·४·२,१३.

पश्चाद्भागीं ती वरीच रुंद असावी, मध्यें वक्र असावी आणि पुरोभागीं पुन्हां रुंद असावी. जघनांच्या ठिकाणीं जी पृथु, दोन्ही खांद्यांनीं व्याप्त केलेला प्रदेश जिचा वारीक, जिची कटि फारच वारीक, अशा स्त्रीची पुरुष प्रशंसा करतात. अशा तऱ्हेनें ती तयार करून तो देवांनां संतुष्ट करतो.

एका ऋतुयागांत एक लाजिरवाणा व पशुतुल्य यज्ञविधि सांगितला आहे त्यावरून त्या काळची वैवाहिक नीति कशी होती ह्याबद्दल चांगला उलगडा होतो; तो विधि असाः—

अथ प्रतिप्रस्थाता प्रतिपरैति । स पत्नीमुदानेष्यन् पृच्छति केन चरसीति वरुण्यं वाऽएतत् स्त्री करोति यदन्यस्य सत्यन्येन चरतीत्यथोनेन्मेंऽन्तः शल्याजुहवदिति तस्मात् पृच्छति निरुक्तं वाऽएनः कनीयोभवति सत्यꣳहि भवति तस्माद्वेव पृच्छति सा यन्न प्रतिजानीत ज्ञातिभ्यो हास्यैतदहितꣳस्यात्॥

शत० ब्रा० २.५.२,२०.

“नंतर प्रतिप्रस्थाता यजमानाची पत्नी बसली असेल त्या जागेकडे जातो, आणि तिला आणतांना विचारतो कीं तूं कोणावरोबर व्यभिचार करतेस? कारण एकाशीं लग्न लागलेली स्त्री जर दुसऱ्यावरोबर व्यभिचार करील तर ती वरुणाचा मोठा अपराध करील. असें विचारतांना प्रतिप्रस्थात्याचा उद्देश ‘मनामध्यें कोणतीहि गोष्ट जाचत असतां यज्ञ करणें दोषावह आहे’ हें तिला समजावें असा आहे. म्हणून तो असा प्रश्न विचारतो. आपलें पाप कबूल केलें असतां कमी होतें कारण मग तें सत्यच होतें. याच कारणास्तव तो तिला विचारतो. जें पाप ती कबूल करणार नाहीं त्याचे परिणाम तिच्या नातेवाईकांस भोगावे लागतील.”

ब्राह्मणग्रंथांतून नीतीविषयींचा विचार फारच थोड्या ठिकाणीं उल्लेखित केलेला आहे; अशा ठिकाणांपैकीं हें एक होय. एरव्हीं, ह्या ग्रंथांचें धोरण, नीतिअनीतीचा विचारच करावयाचा नाहीं असें दिसतें. अपरंपार धार्मिक गोष्टींची सांगड अत्यल्प नैतिक व्यवहाराशीं जी कधीं कधीं घालण्यांत येते त्याचीं फार चांगलीं उदाहरणें ह्या ग्रंथांतून जागजागीं आढळून येतात. धार्मिक कृत्यें, यज्ञ व विधी हेच कायते विषय अशा विशाल ग्रंथांतून विचारणेकरतां घेतलेले असतात; यांत नीतिविषयक गोष्टींनां अजीवात फांटा दिलेला दृष्टीस पडतो.* यजमानाच्या भौतिक इच्छा देवांनीं तृप्त कराव्या म्हणूनच केवळ यज्ञकर्में करण्यांत येत असें नाहीं तर पुष्कळ वेळां शत्रूचें निर्दलन करण्याकरतां म्हणूनहि हे यज्ञ होत. शिवाय ऋत्विजांकरितां अशा तऱ्हेचे मंत्र ह्या ब्राह्मणांत आहेत कीं, त्यांनां पुरेशी दक्षिणा किंवा दान न मिळाल्यास ज्या यजमानानें त्यांनां नेमलें असेल त्याच्या हातूनच त्याचा नाश व्हावा. अशा यजमाननाशाकरितां कांहीं फार दगदग पडत नसे; फक्त ठराविक विधि उलटीकडून करावयाचा किंवा ज्या ठिकाणचे मंत्र त्या ठिकाणीं न वापरतां दुसरीकडे मुद्दाम चुकीनें वापरावयाचे; एवढें झालें म्हणजे यजमानाचा पुरा नाश झाला.

येथवर भानगडीच्या यज्ञशास्त्राचें विवेचन झालें; ब्राह्मणांत असणारे महत्त्वाचे विषय यासंबंधींच आहेत. आपल्या सुदैवानें अर्थवादाच्या एका भागांत इतिहास, आख्यानें व पुराणें कांहीं विधींची उपयुक्तता दाखविण्याकरितां म्हणून दिलेलीं आहेत. ज्यू लोकांचा तलमुद हा धर्मग्रंथ व आमचीं ब्राह्मणें ह्यांच्यांत कांहींसें साम्य आहे. तलमुदच्या ‘हलचा’ (Halecha) या भागांतलें पारमार्थिक गोष्टींचें हस्तलाघव कंटाळवाणें होतें तर त्याच्या “हगदा” या कथापुराणांच्या भागांत मनाचें रंजन होतें. तसेंच ब्राह्मणांत पारमार्थिक तर्कवितर्कांच्या रुक्ष वाळवंटांतून आपण मार्ग आक्रमण करीत असतांना, मधून मधून जींत ऐतिहासिक किंवा सृष्टिरचनाविषयक गूढ काव्यपुष्पें बहरलीं आहेत अशी ओलवण दृष्टीस पडून आपलें मन प्रफुल्लित होतें.

ऋग्वेदगायकांच्या तोंडीं घातलेली जुनी पुरूरवा व उर्वशी यांची कथा शतपथब्राह्मणांत जी दिलेली आहे ती वर वर्णन केलेल्या ओलवणींपैकीं एक होय. उर्वशी अप्सरेचें राजा पुरूरव्यावर कसें प्रेम जडलें, पत्नीपदारूढ होतांना तिनें त्याला कशा अटी घातल्या व गंधर्वांनीं राजाला त्यांपैकीं एक अट कशी मोडायला लावली, हें सर्व त्या कथेंत सांगितलें आहे. ह्यापुढची कथा थोडक्यांत सांगावयाची म्हणजे, राजानें तिची एक अट मोडल्यावरोबर ती त्याला सोडून गेली; तेव्हां पुरूरव्यानें तिची येण्याची पुष्कळ वाट पाहिली, तिच्याबद्दल बराच शोक केला व शोकानें वहकून जाऊन सबंध कुरुक्षेत्रभर भटकतां भटकतां तो पद्मसरोवरावर आला. त्या सरोवरांत हंसांचीं रूपें घेऊन अप्सरा क्रीडा करीत होत्या. त्यांच्यांत उर्वशीहि होती. ह्या वेळीं त्या दोघांचें जें भाषण झालें तें ऋग्वेदाच्या आख्यानऋचांतून दिलेलें आपणांस पूर्वींच माहीत झालेलें आहे; तें असेंः तिच्या हृदयांत त्याच्याविषयीं दया उत्पन्न

* ‘या ग्रंथरचनेंत नीतिविषय असा मुळींच सांपडत नाहीं. ईश्वर व मनुष्य यांचा परस्परसंबंध जोडून देणारें यज्ञकर्म म्हणजे केवळ एक यांत्रिक कर्म होऊन बसलें होतें. तें मनुष्याच्या अंतःप्रभावास चलन देण्याकरितां असे. आचार्यांच्या मंत्रप्रयोगानें सृष्टीच्या हृदयांत दडून बसलेला हा अंतःप्रभाव बाहेर पडे⋯ ⋯ब्राह्मणांतल्या अध्यात्मज्ञानापेक्षां दुसरें कांहीं अधिक अडाणी व पशुतुल्य असेल अशी कल्पनाहि करणें कठिण आहे; त्यांतील विचार–पुढें हे आचारांत आल्यावर सुसंस्कृत व नैतिक बनले ही गोष्ट निराळी–पाहून तेव्हांच्या लोकांच्या अडाणी वस्तुवादाविषयीं आश्चर्य वाटल्यावांचून राहत नाहीं.’ असें एक पाश्चात्त्य ग्रंथकार म्हणतो.

होऊन ती म्हणाली: 'आजपासून बरोबर एक वर्षानें तुम्ही (येथें) या; मग तुम्हांला एक रात्रपर्यंत मजजवळ राहतां येईल. तोंपर्यंत माझ्या गर्भांत असलेला तुमचा मुलगा जन्म पावेल.' एक वर्ष लोटल्यावर पहिल्या रात्रीं राजा तेथें येऊन पाहतो तों तेथें एक सुवर्णमंदिर उभें. "येथें आंत शिरा" एवढेंच सर्वांनीं (?) त्याला सांगितलें. नंतर त्यांनीं उर्वशीला त्याच्याकडे धाडून दिलें. पण ती म्हणाली: 'उद्यां गंधर्व कृपाळू होऊन तुम्हांला एक वर मागायला सांगतील, तेव्हां काय वर मागावयाचा तें ठरवा!' 'तूंच माझ्याकरितां ठरीव' असें राजानें उत्तर केलें. 'मला तुमच्यासारखें व्हावेंसें वाटतें असें तुम्ही म्हणा!' असें उर्वशीनें सुचविलें. दुसऱ्या दिवशीं सकाळीं गंधर्वांनीं त्याला 'काय इच्छा आहे म्हणून विचारलें. तो म्हणाला: 'मला तुमच्यासारखें व्हावेंसें वाटतें'. नंतर, ज्याच्या योगानें मनुष्य गंधर्वरूप होतो असा एक विशिष्ट प्रकारचा अग्नियाग गंधर्वांनीं त्याला पढविला.

याच ब्राह्मणामध्यें एक जलप्रलयाची कथा आहे. ती एका सेमिटिक भाषेंतील कथेसारखी दिसतेः—

"हल्लीं ज्याप्रमाणें कोणी आपल्याला हात धुण्याकरितां पाणी आणून देतात त्याप्रमाणें सकाळीं ते मनूकडे पाणी घेऊन आले. तो हात धूत असतांना त्याच्या हातांत एक मासा आला व तो मनूला म्हणाला: 'मला जीवदान द्या म्हणजे मीहि तुमचें रक्षण करीन.' 'तूं कशापासून माझें रक्षण करणार?' असें विचारलें असतां 'एक मोठा जलप्रलय होऊन, तो सर्व प्राण्यांनां घेऊन जाईल; तेव्हां त्यापासून मी तुम्हांला वांचवीन' असें माशानें उत्तर केलें. "मी तुला कोणत्या प्रकारानें जीवदान देऊं?" असें मनूनें विचारिलें असतां तो मासा म्हणाला: 'आम्ही जोंपर्यंत लहान असतों तोंपर्यंत आम्हांला मृत्यूचें फार भय असतें; कारण एक मासा दुसऱ्याला गट्ट करतो. तेव्हां प्रथम तूं मला एका भांड्यांत ठेव व मी त्यांत मावेनासा झाल्यावर एक खड्डा खणून मला त्यांत ठेव व जेव्हां त्यांतहि माझा समावेश होईनासा होईल तेव्हां तूं मला समुद्रांत सोड, म्हणजे मग मला मृत्यूचें भय राहणार नाहीं.' माशानें सांगितल्याप्रमाणें मनु त्याचें संगोपन करूं लागला. तो लवकरच झष मासा म्हणजे सर्वांत जास्त वाढीचा मासा झाला. नंतर तो मनूला म्हणाला: 'अमुक अमुक वर्षीं जलप्रलय होईल, म्हणून तूं एक नाव तयार कर व माझी वाट पाहत राहा. जेव्हां जलप्रलय होईल तेव्हां नावेंत चढ व पुढें मी तुझें रक्षण करीन.' त्यानें सांगितल्याप्रमाणें मनूनें त्याचें संगोपन केलें व शेवटीं त्याला समुद्रांत सोडलें. माशानें सांगितलेल्या वर्षीं मनूनें स्वतः नाव तयार केली व तो त्याची वाट पाहत बसला. जेव्हां जलप्रलय सुरू झाला तेव्हां तो नावेंत चढला व तो मासाहि त्याच्याकडे पोहत आला. त्यानें नावेची दोरी माशाच्या शिंगाला (?) बांधली व त्याच्या साह्यानें झट्दिशीं ह्या (?) उत्तरेकडच्या टेंकडीवर येऊन पोंचला. नंतर मासा त्याला म्हणाला: 'मीं तुला आतां वांचविलें. नाव एका झाडाला बांध. जोंपर्यंत तूं टेकडीवर आहेस तोंपर्यंत तरी पाण्यानें तूं वाहून जात नाहींस हें खास, पाणी उतरूं लागलें म्हणजे हळू हळू टेंकडीवरून खालीं उतर.' त्याप्रमाणें तो सावकाश उतरला. उत्तरेकडच्या पर्वतांवरील ह्या विशिष्ट स्थानाला अद्यापीहि "मनूचा उतार" असें म्हणण्याचा प्रघात आहे. ह्या जलप्रलयानें एकंदर सर्व प्राण्यांचा संहार झाला; फक्त मनु बाकी राहिला."

अशा तऱ्हेची जुनी कथा आहे. मनूपासून पुढें मानववंश कसा वाढला ह्याविषयींचें कथानक शतपथब्राह्मणांत असें दिलें आहे कीं, वंशविस्तार होण्यासाठीं मनूनें एक यज्ञ केला. या यज्ञांतून एक स्त्री वर आली व तिच्यापासून मानवी वंशविस्तार झाला. ह्या मनूच्या कन्येचें इडा असें नांव आहे; व इडा नांवाचें यज्ञदान व त्याचें माहात्म्य कळून येण्यासाठीं हा इतिहास ह्या ग्रंथांत गोंविला आहे.

उपलब्ध असलेल्या भारतीय गद्य इतिहासांचीं फार जुनीं उदाहरणें या नात्यानें वरील प्रकारच्या वृत्तांतांचा फार उपयोग व महत्त्व आहे.

प्राचीन आर्ष काव्यांत गद्याबरोबर पुष्कळ वेळां पद्यरचनाहि असते. पुरूरवा व उर्वशी यांच्या कथानकांतलीं पद्यें ऋग्वेदसंग्रहांत असलेलीं दिसून येतात. त्यांची भाषा व छंद हीं अतिशय जुन्या वैदिक प्रबंधांसारखीं आहेत. शुनःशेपाच्या ऐतरेयब्राह्मणांतील आख्यानांत, गद्य व गाथा (पद्य) हीं दोन्हीहि असून, त्याची भाषा व छंद हीं वरील पुरूरवा व उर्वशी ह्या कथानकासारखीं आहेत. हें* शुनःशेपाचें आख्यान अनेक प्रकारें चटकदार झालें आहे. तें आख्यान असें: "इक्ष्वाकु वंशांतील वेधसाचा पुत्र हरिश्चंद्र हा अपत्यरहित होता. त्याला शंभर स्त्रिया होत्या तरी एकीपासूनहि त्याला संतति झाली नाहीं. एके दिवशीं नारद व पर्वत हे दोघे त्याला भेटावयास आले असतां राजानें नारदाला विनंति केली: "नारदा! शाहणे व त्याचप्रमाणें मूर्ख असे सर्व लोक पुत्रप्राप्तीची इच्छा करितात; तेव्हां पुत्रप्राप्ति कशानें होईल हें मला सांगा.' असें एका श्लोकांत राजानें विचारलें असतां, नारदानें त्याचें उत्तर दहा श्लोकांत दिलें: 'जिवंत जन्म पावलेल्या पुत्राचें मुखावलोकन ज्या पित्याला होतें, त्याचें (पितृ) ऋण फिटून, तो पुत्ररूपानें अमर होतो†. पुत्राच्या योगानें पित्याला सर्व दुःखांचें निवारण करतां येतें; पुत्राच्या रूपानें स्वतः तो नवीन जन्म घेतो व तो पुत्र म्हणजे संकटसमयीं त्याला नदी तरून जाण्याला उपयोगी अशा नावेप्रमाणें

* ऐतरेय ब्राह्मण ७.१३.१८. † तै. सं ६.३.१०,५. तै. ब्रा. १.५.५,६.

आहे. मलापासून (गृहस्थाश्रमापासून) तुम्हांला काय सुख आहे, अजिना (ब्रह्मचर्याश्रमाचें द्योतक) पासून तुम्हांला काय फायदा आहे, दाढी वाढवून (वानप्रस्थाश्रम स्वीकारून) कोणचा पुरुषार्थ आहे, किंवा तप आचरून (परिव्राजक होऊन) कोणती सिद्धि मिळेल? तेव्हां विप्रांनों (क्षत्रियादि लोक हो)! पुत्राची इच्छा धरा; तोच तुमचा मोक्ष आहे. अन्न हा प्राण आहे, घर ही निवाऱ्याची जागा आहे, सोन्याचे अलंकार म्हणजेच रूप, विवाह हा गोधनदायी* आहे, स्त्री हा मित्र आहे, †दुहिता ही केवळ दुःखकारिका आहे पण पुत्र हा उंच आकाशांतली एक ज्योति होय. पति स्त्रीमध्यें प्रवेश करतो, व तिच्या पोटांत गर्भरूपानें राहतो; ती त्याला दहाव्या महिन्यांत पुन्हा या जगांत आणून सोडते, जन्म देते.'......अशा तऱ्हेनें पुत्रमाहात्म्य वर्णन केल्यावर तो राजाला म्हणालाः "तूं वरुण राजाकडे जा व 'मला पुत्रप्राप्ति होऊं दे, मी तुला तो पुत्र यज्ञांत अर्पण करीन.' असें म्हण." 'बरें तर' असें बोलून राजा वरुणाकडे गेला व त्यानें त्याची अशी प्रार्थना केलीः 'मला पुत्रपाप्ति होऊं दे, मी तुला तो पुत्र यज्ञांत अर्पण करीन.' 'तथास्तु' असें वरुण म्हणाला. पुढें राजाला रोहित नांवाचा पुत्र झाला. तेव्हां वरुण त्याला म्हणाला 'आतां तुला पुत्र झाला आहे, तर तो मला यज्ञांत अर्पण कर.' त्यावर राजानें उत्तर केलें: 'दहा दिवसांचा झाल्याखेरीज पशु यागयोग्य होत नाहीं. तेव्हां माझ्या पुत्राला दहा दिवस होऊं देत म्हणजे मग तुला तो यज्ञांत अर्पण करीन.' 'बरें तसें कर' असें वरुण म्हणाला. तो दहा दिवसांचा झाला तेव्हां वरुण पुन्हा त्याला म्हणालाः 'आतां हा दहा दिवसांचा होऊन गेला आहे, तर आतां तो मला यज्ञांत अर्पण कर.' पण ह्यावर राजानें उत्तर दिलें: 'पशूला दांत येईपर्यंत तो यागयोग्य असत नाहीं. ह्याला दांत येऊंदेत म्हणजे मी तुला त्याचा यज्ञ करीन.' 'बरें, तसें होऊं दे' असें वरुण म्हणाला. ह्याप्रमाणें रोहित मोठा होईपर्यंत हरिश्चंद्रानें वरुणाला दाद दिली नाहीं. पुढें एकदां त्यानें यज्ञ करण्याचा विचार केला, पण या वेळीं रोहित रानांत पळून गेला व तिकडेच एक वर्षभर भटकत राहिला. तेव्हां वरुणानें राजाला शिक्षा करण्याकरितां म्हणून जलोदर नांवाचा रोग त्याच्या ठिकाणीं उत्पन्न केला. रोहितानें जेव्हां हें ऐकिलें तेव्हां तो परत येण्यास निघाला, पण ब्राह्मणरूपानें इंद्र आडवा आला व त्यानें त्याच्याजवळ पर्यटनापासून काय काय फायदे असतात, प्रवासी मनुष्याला कोणकोणचीं सुखें मिळतात वगैरे वर्णन करून त्याला पूर्वीप्रमाणेंच फिरत राहण्याचा उपदेश केला. दुसऱ्या, तिसऱ्या, चवथ्या, पांचव्या वर्षी तो तसाच अरण्यांत भटकत राहिला व जेव्हां जेव्हां म्हणून तो परत राजधानीस फिरण्याचा विचार करी, तेव्हां तेव्हां इंद्र पुन्हा त्याला आडवा येऊन आणखी तसाच फिरत राहण्याविषयीं आग्रह करी. फिरावयाला लागल्यापासून सहाव्या वर्षी एके दिवशीं त्याला अजीगर्त ऋषि भेटला. तो क्षुधेनें व्याकुळ होऊन अरण्यांत इकडे तिकडे हिंडत होता. शुनःपुच्छ, शुनःशेप व शुनोलाङ्गूल असे त्याला तीन पुत्र होते. त्यांतील एक वरुणाला आपल्याबद्दल दान करून आपली सुटका करून घ्यावी अशा हेतूनें त्यानें अजीगर्ताला शंभर गायी देऊन त्यांच्या बदला त्याचा मधला मुलगा–कारण सर्वांत मोठा जो होता त्याला बापाच्या मनांतून दूर करावयाचा नव्हता व सर्वांत धाकट्याला आईच्या मनांतून दूर करावयाचा नव्हता, तेव्हां राहिला मधला–शुनःशेप विकत घेतला. त्याला बरोबर घेऊन रोहित आपल्या पित्याकडे गेला. शुनःशेपाचा बळी आपल्यास कबूल आहे असें वरुणानें म्हटलें; कारण त्यानें असें पाहिलें कीं, क्षत्रियापेक्षां ब्राह्मण जास्त चांगला. तेव्हां राजसूय यज्ञाच्या वेळीं पशूच्या जागीं शुनःशेपाला बळी द्यावयाचें ठरलें. यज्ञाची सर्व कांहीं तयारी झाली पण यज्ञबळी यूपाला बांधून टाकण्यास कोणी मिळेना. तेव्हां अजीगर्त म्हणालाः "मला आणखी शंभर गायी द्या म्हणजे मी याला बांधून टाकीन." त्याप्रमाणें आणखी शंभर गायी दिल्यावर त्यानें मुलाला यूपाशीं बांधलें. आणखी शंभर गायी घेऊन मुलाला ठार करण्यास तो उद्युक्त झाला व एक तीक्ष्ण खड्ग घेऊन पुढें सरसावला. तेव्हां शुनःशेपानें विचार केलाः "मला मानुषेतर समजून हे मला ठार करण्यास उद्युक्त झाले आहेत; बरें तर, आतां देवांनां शरण जावें." त्यानें ओळीनें वेदकाळांतल्या प्रमुख देवतांचीं अनेक स्तोत्रें म्हणून प्रार्थना केली. [हीं स्तोत्रें ऋग्वेदसंहितेंत दिलीं आहेत.] सरतेशेवटीं त्यानें उषेची करुणा भाकली व तीन स्तोत्रें म्हणून तिची चांगली प्रार्थना केली. ही प्रार्थना करीत असतां एकामागून एक त्याचे पाश गळूं लागले व हरिश्चंद्राचें उदर लहान लहान होऊं लागलें. शेवटचें स्तोत्र पुरें झाल्याबरोबर तो पुरा बंधमुक्त झाला व हरिश्चंद्राचा रोग (जलोदर) पार नाहींसा झाला. इतकें झाल्यावर ऋत्विजांनीं त्याला आपल्या राहिलेल्या यज्ञकृत्यांत घेतलें व शुनःशेपानें त्या वेळीं एक विशिष्ट प्रकारचा सोमयाग अवलोकन केला. ह्या हरिश्चंद्राच्या यज्ञांत विश्वामित्र होत्याच्या कामावर होता; त्यानें आपल्या औरस शंभर मुलांनां बाजूस ठेऊन या शुनःशेपाला दत्तक घेऊन आपला वारस केला".

शेवटीं या कथेंत असें म्हटलें आहे. "शुनःशेपाचें आख्यान असें आहे. याचीं शंभरांहून अधिक ऋग्वेद–स्तोत्रें व गाथा

* मुलीबरोबर पूर्वीं गायी आंदण देत. प्राचीन ग्रीक लोकांतहि अशी चाल होती.

† "When a daughter is born, all the four walls weep"

संभवे स्वजनदुःखकारिका संप्रदानसमयेऽर्थहारिका ।
यौवनेऽपि बहुदोषकारिका दारिका हृदयदारिका पितुः ॥

आहेत. राजसूय यज्ञांत राजाला अभिषेक केल्यानंतर होता ही कथा राजाला निवेदन करतो. सुवर्णतंतूंनीं विणलेल्या गादीवर ( कशिपूवर ) बसून होता हें आख्यान सांगतो व अध्वर्यूहि सुवर्णकशिपूवर बसून हें श्रवण करतो. सुवर्ण हें यशाचें द्योतक आहे, म्हणून तें राजाचें यश वृद्धिंगत करतें. अध्वर्यूनें ऋचेला अनुमोदन "ओम्" असें म्हणून द्यावयाचें व गाथेला "तथा" असें म्हणून द्यावयाचें. 'ओम्' हें दैवी आहे व 'तथा' हें मानुषी आहे. अशा रीतीनें हें अध्वर्यूचें अनुमोदन त्याला देवलोक व मनुष्यलोक यांतील पाप व अरिष्टें यांपासून मुक्त करितें. ज्या राजाला विजयी व्हावेसें वाटतें त्यानें—मग तो यजमान किंवा राजसूयक्रतुपति नसला तरी चालेल—हें शुनःशेपाचें आख्यान श्रवण करावें; म्हणजे त्याच्या ठिकाणीं पापाचा लवलेशहि राहणार नाहीं. आख्यात्याला म्हणजे होत्याला एक हजार गायी द्याव्या, अध्वर्यूला म्हणजे प्रतिगर ( अनुमोदन ) देणाऱ्याला शंभर द्याव्या व प्रत्येकाला त्यांचीं सुवर्ण आसनेंहि द्यावींत; ह्याशिवाय होत्याला खेचरें जोडलेला एक रौप्यरथ अर्पण करावा. ज्यांनां पुत्रप्राप्तीची इच्छा असेल त्यांनीं हें आख्यान श्रवण करावें म्हणजे त्यांनां निःसंशय पुत्रलाभ होईल."

हें शुनःशेपाचें आख्यान ऐतरेय ब्राह्मणाच्या संपादकांनां किंवा संग्राहकांनां पुरातन कथा म्हणून विशेष माननीय होतें व राज्याभिषेकाच्या वेळीं ह्या कथेचें निवेदन अभिषेकसंस्काराचा एक आवश्यक भाग म्हणून गणला जात असे यावरून ही कथा कितीतरी जुनी असली पाहिजे हें सिद्ध होतें. ही कथा फार पुरातन काळची असली पाहिजे ह्याला आणखी पुरावा म्हणजे ह्यांत मनुष्ययज्ञाचें स्मृतिचित्र काढलेलें आहे हा होय. श्रौतसूत्रें व ब्राह्मणें यांतून राज्याभिषेकाच्या वेळीं मनुष्ययज्ञ करीत असल्याचा उल्लेख जरी नाहीं तरी प्रागैतिहासिक काळांत राजसूय यज्ञाच्या वेळीं मनुष्य बळी देत असले पाहिजेत असें दिसतें. ही शुनःशेपाची कथा, ऋग्वेदाशीं ताडून पाहतां, त्यापेक्षां अर्वाचीन असावी असें दिसून येतें. कारण, ऐतरेयब्राह्मणांत जीं* सूक्तें शुनःशेपाला "दिसलीं" असें म्हटलें आहे तीं कांहीं अंशीं अशीं आहेत कीं, तीं एखाद्या शुनःशेप नांवाच्या ऋषीनें दुसऱ्या एखाद्या ऋषीप्रमाणें केव्हांहि तयार केल्यासारखीं दिसतात; पुन्हां त्यांत प्रस्तुत कथेशीं जुळेल असा भाग अगदीं थोडा आहे; शिवाय कांहीं अंशीं हीं सूक्तें अशीं आहेत कीं, आपल्या या कथेंतल्या शुनःशेपाच्या तोंडीं तीं मुळींच शोभणार नाहींत. उदाहरणार्थ, ऋग्वेदांतील १·२९ हें सूक्त. ह्यांत प्रत्येक ऋचेचें पालुपद "आतून इंद्र शंसय गोष्वश्वेषु शुभ्रिषु सहस्रेषु तुवीमघ ।" ( हे उदार इंद्रा ! आम्ही एक हजार पाणीदार घोडे व बैल मिळण्याची अपेक्षा करतों ), असें आहे. तसेंच ऋग्वेद १·२४ हें सूक्त. या सूक्ताच्या ऋचा ऐतरेयब्राह्मणांतल्या शुनःशेपानें म्हणणें शक्य नाहीं. कारण या सूक्तांत असें म्हटलें आहे कीं, शुनःशेपाला बांधलें तेव्हां त्यानें ज्याला राजा वरुण अशी हांक मारली. तो आम्हांला सोडवो. "शुनःशेपानें त्याला जेव्हां धरून तीन यूपांनां बांधण्यात आलें तेव्हां आदित्याचा धांवा केला" असेंहि या सूक्तांत आहे. ह्या ऋचा दुसऱ्याच निराळ्या प्राचीन शुनःशेपाच्या आख्यानासंबंधींच्या असल्या पाहिजेत. हीं सूक्तें ऐतरेयब्राह्मणांतल्या शुनःशेपाच्या तोंडीं घातलीं आहेत यावरून फक्त असें म्हणतां येईल कीं, शुनःशेपाची कथा मुळींच विश्वसनीय नाहीं. ऐतरेयब्राह्मणांतल्या अनुक्रमणिकेंत हीं सूक्तें कोणा शुनःशेप नांवाच्या ऋषीनें केलेलीं आहेत असें आरंभींच दिलें आहे. तेव्हां कालानुक्रमाप्रमाणें पाहतां, वेदांतल्या इतर कोणत्याहि प्रबंधापेक्षां ऋग्वेदसूक्तें हीं फार अगोदरचीं आहेत याचें पुन्हां येथें प्रत्यंतर येतें.

दुर्दैवानें, ब्राह्मणांतलीं फार थोडीं कथानकें ह्या शुनःशेपाच्या कथानकाइतकीं समग्र व परिपूर्ण अशीं आहेत. बहुतेक सारीं यज्ञविधींचें निरूपण व दोषमुक्ति करण्याकरितांच जुळविलेलीं असतात, व पुष्कळ वेळां त्यांतील जुन्या कथापुराणांचें बीज कोणतें हें समजण्यास फार प्रयास पडतात. याशिवाय, ब्राह्मणांत आलेल्या सर्व कथानकांनां मूळ जुन्या कथापुराणांचा आधार असतोच असें नाहीं. पुष्कळ वेळां कांहीं यज्ञविधींचें निरूपण अथवा समर्थन करण्यासाठीं म्हणून अशीं कथानकें नवीन जुळविलेलीं असतात. कांहीं कांहीं वेळां या नवीन रचलेल्या कथा फार मजेदार असतात. उदाहरणार्थ, प्रजापतीला यज्ञदान करण्याच्या वेळीं मंत्र हळू कां म्हणावे, याचें निरूपण करण्यासाठीं म्हणून खालील लाक्षणिक कथा दिली आहेः—

एकदां, मन आणि वाचा यांच्यांत आपणां दोघांत श्रेष्ठ कोण ह्याविषयीं भांडण उत्पन्न झालें. "मी श्रेष्ठ आहें" असें दोघेंहि म्हणूं लागलीं. मन म्हणालेंः "खरोखर पाहतां, मी तुझ्यापेक्षां श्रेष्ठ आहें; कारण मीं जें आधीं योजून ठेवतें तेंच तूं बोलतेस, पदरचें कांहींच नाहीं; माझ्या कृतीचें तूं फक्त अनुकरण करतेस, तूं फक्त मला अनुसरतेस; तेव्हां, केव्हांहि मी तुझ्यापेक्षां श्रेष्ठच आहे." यावर वाचा बोललीः "असें आहे तरी मीच तुझ्यापेक्षां श्रेष्ठ आहे; कारण तुला जें कळतें, तें मी प्रथम कळवितें, निवेदन करतें." हें भांडण मिटावें. या उद्देशानें दोघें प्रजापतीकडे गेलीं. प्रजापति मनाच्या बाजूनें निकाल देतांना वाचेला म्हणालाः "मन तुझ्यापेक्षां श्रेष्ठ आहे, कारण तूं त्याची केवळ कृतानुकरी व अनुचरी आहेस." आपल्या विरुद्ध निकाल झाल्यामुळें वाचा भग्नवीर्य झाली, ह्या क्षोभाचा तिच्यावर परिणाम होऊन तिचा गर्भपात झाला. ती प्रजापतीला बोलली कीं, "तूं माझ्या

* ऋग्वेद १·२४-३०; ९·३.

विरुद्ध निकाल दिला आहेस तेव्हां मी कधींहि तुझ्या हव्य-वहनाला हेतुभूत होणार नाहीं." म्हणून यज्ञांत प्रत्येक प्रजापति-देवताकर्म मुकाट्यानें करतात, कारण प्रजापतीच्या हव्याचें वहन वाचा करीत नाहीं.

पुष्कळ कथानकांतून वाचेचा प्रामुख्यानें उल्लेख आलेला आहे. त्यांतून तिला स्त्रियांचा नमुना असें मानण्यांत आलें आहे. ह्याचें उदाहरण ब्राह्मणांतून वारंवार येणाऱ्या सोम-चौर्याच्या कथानकांत सांपडेल. हें कथानक येणेंप्रमाणेंः पहिल्यानें सोम स्वर्गांत असे. गायत्री पक्षिरूप होऊन त्याला पृथ्वीवर घेऊन येऊं लागली, तेव्हां वाटेंत एका गंधर्वानें तिच्यापासून त्याला पळविलें. तेव्हां देवांनीं एकत्र जमून चोरून नेलेला सोम परत मिळविण्याचा विचार चालविला. त्यांनीं असें ठरविलें कीं, गंधर्व हे बायकांचे लोभी आहेत, तेव्हां वाचेला त्यांच्याकडे धाडून द्यावी म्हणजे ती सोम पुन्हां परत घेऊन येईल. त्याप्रमाणें देवांनीं तिला गंधर्वांकडे पाठविली व तिनें सोम परत आणला. पण गंधर्व तिच्यामागें आले व म्हणालेः "तुम्ही सोम घ्या पण वाचेला आमच्या ताब्यांत द्या." यावर देवांनीं उत्तर केलेंः "बरें, तुमच्या म्हणण्याप्रमाणें करूं; पण ती होऊन जर आमच्याकडे परत आली तर मात्र तुम्हांला तिला बळजबरीनें नेतां येणार नाहीं. आपण चढाओढ लावून तिला कोण वश करतो तें पाहूं या." नंतर त्यांनीं वाचेला वश करण्यासाठीं चढाओढ सुरू केली. गंधर्वांनीं तिच्यापुढें वेदपठण केलें व "हो, आम्ही हें जाणतों, तें जाणतों" वगैरे वेदघोष सुरू केला. इकडे देवांनीं वीणा निर्माण करून ते वाजवीत व गात बसले आणि त्यांनीं वाचेला "आम्ही असें तुला गावून दाखवूं, अशा रीतीनें तुला तुष्ट करूं." अशा रीतीनें बोलून खूष केलें, तेव्हां ती देवांकडे वळली. ती निरर्थक गोष्टीला भुलली. जे प्रशंसना व स्तवन करीत होते त्यांनां धिक्कारून, जे गात होते, नाचत होते त्यांच्याकडे ती गेली. म्हणून अजून देखील स्त्रियांचा निरर्थक व क्षुल्लक गोष्टींकडे धांव घेण्याचा स्वभाव कायम आहे. तेव्हां या गोष्टीचें सार काय कीं, स्त्रिया, जो चांगला गातो व नाचतो त्याला भुलतात व त्याच्या आधीन होतात."*

ही लहानशी गोष्ट ज्याप्रमाणें स्त्रियांचा एक स्वभावधर्म निरूपण करण्याकरितां मुद्दाम योजिली आहे, त्याप्रमाणें पुष्कळ कथा एखाद्या गोष्टीचें किंवा संप्रदायाचें 'मूळ' कशांत आहे हें दाखविण्याकरितां घातल्या आहेत. अशा मूळविषयक कथांत उत्पत्तिविषयक कथाहि येतात, व इतिहास किंवा आख्यानें ह्यांपासून या कथा भिन्न आहेत हें दाखविण्याकरितां, प्राचीनांनीं यांनां पुराणें† अशी संज्ञा दिली आहे.

या 'पुराणां' पैकीं, कांहीं पुराणें अध्यात्मज्ञान्यांनीं रचलीं आहेत, कांहीं अगदीं प्राचीन कथापुराणांपैकीं आहेत, तर कांहीं यज्ञशास्त्राला जोडून असलेल्या दंतकथांचा आधार घेऊन तयार केलेलीं आहेत.

ब्राह्मणांत चारी वर्णांचा मूळ इतिहास वारंवार दिलेला आढळतो. ऋग्वेदांतील पुरुषसूक्तासारख्या* तत्त्वज्ञान-विषयक सूक्तांतून, देवांनीं यज्ञांत बळी दिलेल्या पुरुषाच्या मुखापासून ब्राह्मण कसे उत्पन्न झाले, बाहूंपासून क्षत्रिय, मांड्यांपासून वैश्य व पायांपासून शूद्र कसे आले याविषयीं वर्णन दिलें आहे. पण ब्राह्मणांत, प्रजापतीनें आपल्या मुखापासून ब्राह्मण व त्याबरोबर अग्निदेव उत्पन्न केला, आपल्या हृदयापासून व बाहूंपासून क्षत्रिय व इंद्र, शरीराच्या मध्यभागापासून वैश्य व इतर सर्व देव, व पायांपासून शूद्र निर्माण केले अशी कथा आहे. शूद्रांबरोबर कोणीहि देव निर्माण झाला नसल्यानें, त्यांनां यज्ञाचा अधिकार नाहीं. वरील प्रकारांनीं उत्पत्ति झाली असल्यानें, ब्राह्मणवर्ण आपलें धार्मिक कृत्य मुखानें करतो; क्षत्रिय बाहूंनीं; वैश्यवर्ण, ब्राह्मण व क्षत्रिय हे त्याच्यापासून आपला वाटेल तितका फायदा करून घेत असतांहि, कांहीं एक करीत नाहीं; शूद्राला फक्त उच्च वर्णांतील लोकांचे पाय धुणें एवढेंच धार्मिक कृत्य करण्याचा अधिकार पोहोंचतो, कारण तो पायांपासून उत्पन्न झाला आहे.†

मैत्रायणी संहितेमधील रात्र व पक्षधारी पर्वत यांच्या उत्पत्तिविषयक दोन कथा मौजेच्या आहेत.‡ त्या खालीलप्रमाणेंः

**यमो वा अम्रियत ते देवा यम्या यममपाब्रुवंस्तां यदपृच्छन्त्साब्रवीदद्यामृतेति तेऽब्रुवन्नवा इयमिममित्थं मृष्यते रात्रिं सृजावहा इत्यहर्वाव तर्ह्यासीन्न रात्रिस्ते देवा रात्रिमसृजंत ततः श्वस्तनमभवत्ततः सा तममृष्यत तस्मादाहुरहोरात्राणि वावाघं मर्षयंतीति. मै. सं. १.५,१२.**

"यम जेव्हां वारला, तेव्हां देवांनीं त्याची सावत्र बहीण यमी हिची पुष्कळ समजूत घातली. तरी तिला त्याचा विसर म्हणून पडेना. देवांच्या पृच्छेला ती यम आजच वारला असें म्हणत दुःख करीत राहिली, तेव्हां देवांनीं विचार केलाः "अशा रीतीनें तिला विसर पडणें शक्य नाहीं; तर आपण रात्र उत्पन्न करूं." त्या वेळीं फक्त दिवस असे, रात्र म्हणून नसे. देवांनीं रात्र निर्माण केली; तेव्हां अर्थातच दुसरा दिवस अस्तित्वांत आला; व नंतर तिला त्याचा विसर पडला. म्हणून म्हणतात कीं, "दिवस व रात्र हीं दुःख विसरवितात" (मैत्रा. सं. १.५, १२.)

---

* शत. ब्रा. ३.२.४,२-६; ३.१.१९. † पुराण म्हणजे "जुनें", त्यापासून "जुनी कथा", "जुना इतिहास" (विशेषतः जगदुत्पत्ति व जगच्छास्त्रविषयक) असा अर्थ निघाला. पुढें कांहीं विशिष्ट ग्रंथांनां "पुराणें" अशी संज्ञा प्राप्त झाली.

* ऋ १०.९०,१२. † तै. सं. ७.१. १, ४–६. ताण्ड्य ब्रा. ६.१,६–११. ‡ Indiens Literatur und Kultur P. 142. by L. Von Schroeder.

प्रजापतेर्वा एतत् ज्येष्ठं तोकं॰ यत्पर्वतास्ते पक्षिण आसंस्ते परापातमासत यत्र यत्राकामयन्ताथ वा इयं तर्हि शिथिरासीत्तेषामिंद्रः पक्षानछिनत्तैरिमामदंहच्ये पक्षा आसंस्ते जीमूता अभवंस्तस्मादेते सपदि पर्वतमुपप्लवंते.
मै. सं. १·१०,१३.

" पर्वत हे प्रजापतीचीं पहिलीं मुलें होत. तेव्हां त्यांनां पंख असत* म्हणून ते लागेल तेथें उडून जात, लागेल तेथें मुक्काम करीत. त्या वेळीं पृथ्वी ही स्थिर झाली नव्हती; ती इकडे तिकडे फिरत असे. इंद्रानें त्या पर्वतांचे पंख छेदिले व त्यांच्या (पर्वतांच्या) साधनानें ही पृथ्वी अचल केली. मग ते पंख ढग होऊन पर्वतांवर नेहमीं लोंबत राहूं लागले." (मैत्रा. सं. १·१०, १३.)

ब्राह्मणांतून उत्पत्तिविषयक कथा फार आहेत. साध्या यज्ञकर्मविषयक सूचना देतांना आध्यात्मिक विचारहि त्यांत प्रकट केले आहेत. मोठमोठ्या महत्त्वाच्या यज्ञकर्मांपैकीं अग्निहोत्र हें एक आहे. त्यांत अग्नीला दररोज सकाळ-संध्याकाळ दूध अर्पण करावें लागतें. या यज्ञकर्माची उत्पत्ति व महत्त्व शतपथब्राह्मणांत खालीलप्रमाणें दिलें आहेः—

"मुळारंभीं फक्त प्रजापतीच काय तो एकटा होता. प्रजा कशी उत्पन्न करावी?" हा त्याला विचार पडला. त्यानें तपाचरण केलें, शरीराला पुष्कळ कष्ट दिले.† आपल्या मुखापासून त्यानें अग्नि निर्माण केला. अग्नीला त्यानें मुखापासून उत्पन्न केलें म्हणून अग्नि हा अन्नाद म्हणजे अन्न भक्षण करणारा झाला. ज्याला खरोखरीच अग्नि हा अन्नाद म्हणून माहीत आहे, तो स्वतःच अन्नाद होतो. सर्व देवांत त्याला पहिल्यानें उत्पन्न केलें म्हणून त्याला अग्नि—अग्नि (अग्रे जातत्वात् अग्निः)-असें नांव दिलें. यानंतर प्रजापतीला असा विचार पडला "मीं अग्नीला अन्नाद म्हणून उत्पन्न केलें. पण येथें माझ्याखेरीज दुसरें अन्न नाहीं, तेव्हां तो मलाच खाणार नाहीं का!" कारण त्या वेळीं पृथ्वीवर कांहीं एक नव्हतें. झाडें वनस्पति वगैरे कांहीं नव्हतें. म्हणून प्रजापतीला मोठें संकट पडलें. अग्नि तर इकडे आ वासून त्याच्या अंगावर आला; तेव्हां प्रजापतीला भय वाटलें व त्याचा महिमा त्याला सोडून गेला. पण त्याचा महिमा म्हणजे त्याची वाणी, तेव्हां त्याची वाणी नाहींशी झाली. (ह्यापुढें असें सांगितलें आहे कीं, प्रजापतीला स्वतःच्या शरीरांतच आहुति देण्याची इच्छा झाली व हातावर हात घांसून त्यानें घृत, पय निर्माण केलें. यापासून ओषधी झाल्या. दुसऱ्यांदा जेव्हां हात घांसून घृत किंवा पय निघालें, तेव्हां या द्रव्यापासून सूर्य व वायु उत्पन्न झाले).

अशा रीतीनें हवन करण्यांत एक तर त्यानें प्रजा उत्पन्न केली व दुसरें, त्यानें आपल्याला गिळंकृत करण्याच्या बेतांत असलेल्या मृत्यूपासून म्हणजे अग्नीपासून आपलें संरक्षण केलें. जो हें जाणून अग्निहोत्राहुती देतो, तो प्रजापतीप्रमाणें प्रजा उत्पन्न करतो व खाण्याला टपलेल्या काळापासून आपलें संरक्षणहि करून घेतो. तो जेव्हां मरण पावतो व त्याला चितेवर ठेवण्यांत येतें तेव्हां तो अग्नीपासून पुन्हां जन्म घेतो. अग्नि फक्त त्याचें शरीर दहन करतो,* व आईपासून किंवा बापापासून जसा जन्म घ्यावा तसा तो या ठिकाणीं अग्नीपासून जन्म पावतो. जो अग्निहोत्रहोम करीत नाहीं त्याला पुन्हां नवीन जन्म मिळत नाहीं. म्हणून प्रत्येकानें अग्निहोत्र करावें." (यापुढें, प्रजापतीनें उत्पन्न केलेले अग्नि, वायु व सूर्य ह्या देवांनीं कसें अग्निहोत्र केलें व गाईला कसें निर्माण केलें याविषयीं सविस्तर वर्णन आहे).
"या गाईची इच्छा धरून अग्नीनें असा विचार केला कीं आपण हिच्याशीं गमन करावें. त्याप्रमाणें तिच्याशीं गमन करून त्यानें आपलें बीज (रेत) तिच्या ठिकाणीं घातलें. त्यापासून दुध झालें. म्हणून गाय थंड असते तरी दूध ऊन ऊन असतें. कारण कीं दूध हें अग्नीचें रेत आहे; व म्हणून दूध काळ्या किंवा तांबड्या गाईचें असलें तरी सुद्धां तें नेहमीं पांढरें व अग्नीसारखें तकतकीत असतें; कारण हेंच कीं तें अग्नीचें रेत आहे; व म्हणून तें धार काढतांनाच ऊन असतें, कारण तें अग्नीचें रेत आहे."

---

* ही पक्षधारी पर्वतांची कथा ऋग्वेदगायकांनां अगोदरच माहीत आहे व त्या पुढील काळांतील कवींचा हा एक आवडता विषय होऊन राहिला आहे. Cf. Pischel Vedishe Studien I, 174. † ब्राह्मणांतील बहुतेक उत्पत्तिविषयक कथांचा असाच प्रारंभ असतो. ज्याप्रमाणें देहदंड करून व तप आचरून मांत्रिकाला मंत्र हस्तगत करून घ्यावयाचे असतात व याज्ञिकाला यज्ञाची सिद्धि प्राप्त करून घ्यावी लागते, त्याचप्रमाणें प्रजापतीला सुद्धां सृष्टिकर्मासाठीं अशी तयारी करावी लागते. श्रम् ह्या धातूपासून श्रमण म्हणजे तपस्वी हा शब्द आला. हा बौद्ध वाङ्मयांत जागजागीं येतो. तपस् ह्याचा मूळ अर्थ ताप. पुढें तपश्चर्येसाठीं ताप करून वेणें व शेवटीं, तपश्चर्या हा अर्थ त्यास प्राप्त झाला. तपस् ह्या शब्दांत तपश्चर्येचे पुष्कळ प्रकार असा अर्थ ध्वनित आहे; पण पुरातन काळीं व आजहि तपश्चर्या म्हणजे ताप (तपस्) हाच अर्थ प्रामुख्यानें पुढें येतो. Cf. the excellent dissertations on Tapas by Oldenberg, Religion des Veda, p. 402. शतपथ ब्रा. १०·४·४,१ इ. वरून पाहतां, प्रजापतीनें एकदां १०,००० वर्षेपर्यंत तप आचरलें व शेवटीं त्या तपश्चर्येच्या "तापा" पासून असें झालें कीं, त्याच्या रोमरंध्रांतून प्रकाशकिरण निघाले यांच्याच चांदण्या झाल्या.

* अशा प्रकारचें मृत्यूनंतर नवीन जन्माचें वर्णन ब्राह्मणांत फारच थोड्या ठिकाणीं आलेलें आहे.

ज्याप्रमाणें ह्या उत्पत्तिविषयक क्रियांचा आरंभ प्रजापतीच्या तपश्चरणांत व देहदंडनांत झालेला आपणांस दिसतो त्याच प्रमाणें आपणांस असें आढळून येतें कीं, उत्पत्ति केल्यानंतर तो अगदीं अशक्त होतो, दमून जातो व पुढें त्याला अवसान रहात नाहीं. म्हणून त्याच्या वीर्यवर्धनासाठीं कांहीं यज्ञ सांगितला आहे. एकदां देवांनीं हा यज्ञ केला तर दुसऱ्या वेळीं अग्नीनें हा यज्ञ करून प्रजापतीवर उपकार केला व आणखी एका वेळीं प्रजापतीनें स्वतःच सूक्तें गाऊन व तप आचरून यज्ञपशू निर्माण केले व त्यांनां यज्ञांत बळी दिले.* त्यांतल्या त्यांत आश्चर्य हें, कीं, हा विश्वस्रष्टा प्रजापति, जो ब्राह्मणांत सर्वश्रेष्ठ देव म्हणून मानला आहे, त्याच्या ठिकाणीं श्रेष्ठपणा तर मुळींच आढळून येत नाहीं; उलट कांहीं कांहीं वेळां त्याची करुणाजनक स्थिति मात्र होते. एकदां तर देवांनीं खुद्द त्यालाच यज्ञांत बळी द्यावयास काढला होता!† एका कथेंत, (ही कथा पुष्कळ ठिकाणीं आलेली आहे) त्याच्यावर व्यभिचाराचा आरोप केला आहे; कारण त्यानें उषा व द्यौ या आपल्या कन्यांशीं गमन केलेलें आहे. या अपराधाला शिक्षा म्हणून देवांनीं आपल्या उग्र रूपांपासून रुद्र देव निर्माण केला. त्यानें आपल्या बाणानें प्रजापतीला विद्ध केलें, तेव्हां मृग व इतर राशिनक्षत्रें उत्पन्न झालीं.‡ यूरोपांत ज्याप्रमाणें बायबल-मधील कथानकांनां लोकांची थोडीबहुत मान्यता मिळते त्याप्रमाणें ब्राह्मणांतील व वेदांतील सुद्धां उत्पत्तिविषयक कथा-पुराणांनां उत्तरकालीन ग्रंथांत मान्यता नाहीं. वरील प्रकारचें एकहि कथानक सर्वमान्य नसावें, हें विशेष आहे. अशा पुष्कळशा कथानकांतून विचित्र कल्पना व एकमेकांशीं न जुळणारीं मतें ग्रथित केलेलीं दृष्टोत्पत्तीस येतात. ह्याचें उदाहरण द्यावयाचें म्हणजे, शतपथब्राह्मणांत वर दिलेल्या कथानकाच्या लगेच पुढें वेगळ्याच तऱ्हेची उत्पत्तिकथा दिलेली आहे. या ठिकाणींहि असेंच म्हटलें आहे कीं,¶ प्रजा निर्माण करण्या-करितां प्रजापतीनें उग्र तपश्चर्या केली. त्यानें प्रथम पक्षी, नंतर सरपटणारे प्राणी, नंतर सर्प अशा प्रकारें प्राणी उत्पन्न केले. पण त्यांनां उत्पन्न करून थोडा वेळ झाला नाहीं तोंच ते पुन्हां नाहींसे झाले, व प्रजापति पहिल्यासारखाच एकटा राहिला. असें होण्याचें कारण काय असावें ह्याचा बराच विचार केल्यावर त्याच्या असें लक्ष्यांत आलें कीं हे प्राणी अन्नान्न करून मेले. तेव्हां त्यानें पुन्हां नवीन प्राणी उत्पन्न करून त्यांच्या स्तनांत दूध निर्माण केलें, व म्हणून ते जिवंत राहिले. याच ब्राह्मणांत दुसऱ्या एका ठिकाणीं $ प्रजापतीनें आपल्या प्राणांपासून (प्राण असणाऱ्या अवयवां-पासून) पशू निर्माण केल्याचें सांगितलें आहेः मनापासून पुरुष, डोळ्यापासून अश्व, प्राणापासून (श्वासापासून) गाय, कानापासून मेष, वाचेपासून अज. पुरुष प्रजापतीच्या मनापासून उत्पन्न झाला आहे व मन हें सर्व प्राणांमध्यें श्रेष्ठ (पहिलें) आहे म्हणून पुरुष हा सर्व पशूंमध्यें श्रेष्ठ व पराक्रमी आहे.

बहुतेक कथांतून प्रजापति नुसता स्रष्टा म्हणजे निर्माण करणारा असें मानण्यांत येतें. त्याच्यापासून विश्व व प्राणी निर्माण झाले आहेत. पण ब्राह्मणांत कांहीं कांहीं जागीं असेंहि दिलें आहे कीं, प्रजापति हा देखील सृष्ट वस्तूंपैकींच आहे व आद्य सृष्टि म्हणजे जल किंवा असत् किंवा ब्रह्मन्. शतपथ ब्राह्मणांत (११·१, ६) अशी कथा आहेः

"प्रथम या विश्वांत, जलांखेरीज कांहीं एक अस्तित्वांत नव्हतें. या जलांनां आत्मसदृश असें कांहीं निर्माण करण्याची इच्छा होऊन त्यांनीं देहदंडनाला व*तपा-चर-णाला सुरुवात केली. त्याचें फळ म्हणून त्यांच्या ठिकाणीं एक सुवर्णाचें अंडें उत्पन्न झालें. त्या काळीं संवत्सर अशी कालगणना नव्हती; तरी पण जवळ जवळ वर्षभर हें अंडें पाण्यावर तरंगत राहिलें. एका वर्षानंतर त्याच्यांतून एक पुरुष बाहेर आला. तो प्रजापति होय. म्हणून स्त्री, किंवा गाय, किंवा घोडी एक वर्षांत बाळंतीण होते; कारण प्रजापति एक वर्षांत जन्म पावला. त्यानें जेव्हां तें अंडें फोडलें तेव्हां त्याला बाहेर उभें रहावयाला जागा नव्हती. म्हणून तो ज्या अंड्यांत उत्पन्न झाला, तें वर्षभर तसेंच पाण्यावर तरंगत राहिलें. वर्षानंतर तो बोलूं लागला व त्यानें "भूः" असा उच्चार केल्याबरोबर पृथ्वी निर्माण झाली; "भुवः" म्हटल्याबरोबर सभोंवतालीं वातावरण उत्पन्न झालें, व "स्वर्" या उच्चारा-बरोबर आकाश झालें. म्हणून वर्षानंतर मूल बोलूं लागतें, कारण प्रजापति वर्षानंतर बोलूं लागला. प्रजापतीनें प्रथम एक अक्षरी, दोन अक्षरी शब्द म्हणण्यास सुरुवात केली, म्हणून मूल जेव्हां बोलूं लागतें तेव्हां प्रथम प्रथम एकअक्षरी शब्द, दोनअक्षरी शब्द म्हणण्यास सुरुवात करतें. भूः, भुवः, स्वर् ह्यांपासून प्रजापतीनें वर्षाचे पांच ऋतू केले, म्हणून पृथ्वीवर पांच ऋतू असतात. अशा प्रकारें निर्माण केलेल्या सृष्टीवर तो एक वर्षानें उभा राहिला; म्हणून, एक वर्षानें मूल उठून उभें राहतें, कारण प्रजापति उठून उभा राहूं लागला. हजार वर्षे आयुष्य बरोबर घेऊन तो जन्मला. ज्याप्रमाणें आपणाला लांबून नदीचें पलीकडचें तीर दृष्टीस पडतें त्याप्रमाणें त्याला आयुष्याची दुसरी कड दृष्टीस पडत

---

* शत. ब्रा. ४·६·४,१;७·४·१,१६;६·१·२,१२;३·९·१.
† शत. ब्रा. १०·२·२. ‡ ऐत० ब्रा० ३·३३ cf. शत. ब्रा. १·७·४,१;२·१·२,८;६·१·३,८. ¶ शत. ब्रा. २·५·१, १–३. $ शत. ब्रा. ७·५·२,६.

* तपस् म्हणजे तपाचरण किंवा उष्णता. तेव्हां "जलांनीं तपाचरण केलें" याचा अर्थ "त्यांच्या ठिकाणीं उष्णता उत्पन्न झाली" असाहि होऊं शकेल. ह्या ठिकाणीं शब्द मुद्दाम बह्वर्थी वापरले आहेत.

होती. प्रजापतीनें जन्म घेतला, तेव्हां मृत्यु हा त्याच्या पाठीमागें आहेच. त्याला प्रजा उत्पन्न करण्याची इच्छा होती. तेव्हां तो स्तोत्रें म्हणत व तप आचरीत काळ घालवूं लागला. प्रजननशक्ति आपणांत आणून त्यानें मुखानें देव उत्पन्न केले ......... देव उत्पन्न केल्यावर त्याला दिनप्रकाश (दिवा) दिसूं लागला व देवांतील देवपणा तो हाच कीं, प्रजापतीनें त्यांनां निर्माण केल्यावर त्याला दिनप्रकाश दिसला. नंतर, त्यानें आपल्या प्राणवायूपासून असुर निर्माण केले ......... त्यांनां निर्माण केल्यावर, त्याला अंधार दिसूं लागला. त्यानें ओळखलें कीं, "आपण आपल्याकरितां अरिष्ट उत्पन्न केलें आहे; कारण ह्यांनां उत्पन्न केल्यावरोवर अंधार झाला." तेव्हां या पूर्वावस्थेंत देखील त्यानें असुरांवर अरिष्टें आणून त्यांचा वींमोड केला व त्यावेळींच त्यांची गति खुंटली. म्हणून असें म्हणण्याची वहिवाट आहेः "अन्वाख्यानांत व कांहीं इतिहासांत देव व असुर यांच्या मधील लढायांचें जें वर्णन केलें आहे तें खरें नाहीं, कारण मागेंच प्रजापतीनें ज्या वेळीं त्यांचा पार वींमोड केला त्याच वेळीं त्यांचा ऊर्जित काळ संपला." ......... देवांनां उत्पन्न केल्यावर जो प्रकाश पडला, त्याचा दिवस केला व असुरांनां उत्पन्न केल्यावर जो अंधार पडला, त्याची रात्र केली. तेव्हांपासून दिवस व रात्र असा कालक्रम अस्तित्वांत आला." (शतप. ब्रा. ११·१. ६, १–११.)

यापेक्षांहि विलक्षण व वरीच दुर्बोध अशी दुसरी एक उत्पत्तिविषयक कथा आहे (शतपथ. ब्राह्मण ६·११,१) तिची सुरुवात अशी आहेः—

"असद्वाऽइदमग्रऽआसीत्।" "प्रथम येथें फक्त 'असत्'चें अस्तित्व होतें" पण लागलेंच पुढें असें म्हटलें आहे कीं, हें 'असत्' म्हणजे ऋषी होते. ह्या ऋषींनीं देहदंडन व तप करून सर्व कांहीं निर्माण केलें. हे ऋषी म्हणजे दुसरे कोणी नसून प्राण होते. त्यांनीं पहिले सात पुरुष निर्माण केले—कसे केले तें माहीत नाहीं—व त्यांचें एकीकरण करून एक पुरुष प्रजापति निर्माण केला.

"ह्या पुरुषाला म्हणजे प्रजापतीला प्रजा उत्पन्न करण्याची इच्छा झाली. त्यानें देहदंड व तपश्चर्या केली. हीं केल्यावर, त्यानें त्रयी विद्या (ब्रह्म) उत्पन्न केली. हा त्याचा (पुढील सृष्टीचा) पाया (प्रतिष्ठा) झाला. म्हणून असें म्हणण्यांत येतें कीं, "ब्रह्म ही सर्वांची प्रतिष्ठा आहे." या कारणानें वेदाभ्यास झाल्यावर मनुष्याचा पाया भक्कम होतो, कारण ब्रह्म (वेद) हाच मूळ पाया आहे."

पुढील कथा अशी आहे कीं, ह्या ब्रह्मप्रतिष्ठेवर उभें राहून प्रजापतीनें तपाचरण केलें व प्रथम जल निर्माण केलें. नंतर वेदाच्या साह्यानें त्यानें एक अंडें उत्पन्न केलें; त्यापासून अग्नि झाला व त्याची कवची जी होती तिची पृथ्वी झाली व पुढें अमुक अमुक झालें इत्यादि वर्णन आहे. त्यांत फार पाल्हाळ व गोंधळ आहे. यांत महत्त्वाचा भाग हा कीं, ब्रह्माचा मूळ अर्थ स्तोत्र किंवा मंत्र असा होता; पुढें त्याला पवित्र ज्ञान किंवा वेद असा अर्थ आला, व या ठिकाणीं तर त्याचा अर्थ अस्तित्वांत असलेल्या सर्व वस्तूंची प्रतिष्ठा असा केलेला आहे. ह्याच्या पुढचीच पायरी म्हणजे, ब्रह्म हेंच उत्पत्तिकारण आहे या ब्रह्मवादाची· हें मत (शतप. ब्राह्मण ११·२·३,१) यापूर्वींच आलेलें आहे; त्या ठिकाणीं असें म्हटलें आहेः—

"विश्वाच्या आरंभीं, फक्त ब्रह्मच काय तें होतें. त्यानें पुढें देव निर्माण केले व तदनंतर त्यानें त्यांस राहण्याकरितां ह्या सृष्टी वांटून दिल्या—अग्नीला पृथ्वी दिली, वायूला अंतरिक्ष व सूर्याला स्वर्ग दिला."

अशा रीतीनें, ज्या कल्पनांचा आरण्यकें व उपनिषदें यांत पहिल्याप्रथमच पूर्ण विकास झालेला आहे अशा सर्व कल्पनांची ब्राह्मणग्रंथांतून, अगोदरच सिद्धता होती, हें आपल्या चांगलें दृष्टोत्पत्तीस येतें, भारतीय तत्त्वज्ञानाच्या इतिहासांत ब्राह्मणांनां जें फार महत्त्व आहे तें या कारणामुळेंच आहे. शांडिल्यानें म्हटल्याप्रमाणें, उपनिषदांचें मूलतत्त्व जें आहे तें शतपथब्राह्मणांत अगोदरच आलें आहे.

---

## प्रकरण ७ वें.

### वेदप्रवेश–आरण्यकें व उपनिषदें.

आर्. गार्ब ह्यानें ब्राम्हणांनां "अप्रवुद्ध काळांतील तत्त्वज्ञानोत्पादक विद्वत्ताप्रचुर ग्रंथ" अशी संज्ञा दिली आहे. परंतु विंटर्निट्झचें मत याहून थोडेंसें भिन्न आहे. त्याचें म्हणणें असें आहे कीं, ऋग्वेद संहितेंतील अनेक गोष्टींवरून प्राचीनकालचे भारतीय अप्रबुद्ध दिसत नसून बुद्धिमान् व सर्वगुणसंपन्न दिसतात. तेव्हां त्या वेळच्या कांहीं वर्गानें यज्ञयागादिकांवर इतकें शब्दसामर्थ्य खर्च केलें असतां त्या वेळचे क्षत्रिय व इतर बाकीच्या वर्गाचे लोक यांनीं कांहींच म्हटलें किंवा लिहिलें नसेल अशी कल्पना करणें फार कठीण आहे. सायणानें जें स्पष्ट रीतीनें म्हटलें आहे त्यावरून आणि इतर ग्रंथांतर्गत पुराव्यावरून पहातां खुद्द ब्राह्मणांतहि कल्प (धर्मकृत्यादि संबंधींच्या आज्ञा) आणि त्या वरील स्पष्टीकरणार्थ टीकांखेरीज पुराणें, इतिहास, गाथा व नाराशंसी हीं सांपडतात. हेंच पर्यायानें सांगावयाचें म्हटलें म्हणजे आर्षकाव्यांचा आरंभ ब्राह्मणकालापासून आहे असें दिसतें. त्या वेळचे लोक बुद्धिमान् असून दीर्घोद्योगी होते म्हणूनच ब्राह्मणांत सांगितलेले मोठमोठे खर्चाचे महायज्ञ त्या वेळीं होणें शक्य होतें हें उघडच आहे. त्या वेळच्या योद्ध्यांनीं,

वैश्यांनीं, कृषीवलादि गोपाल ह्यांनीं किंवा शिल्पज्ञांनीं किंवा मजूर वर्गांनीं कांहींच काव्यें गाइलीं नसतील किंवा कांहींच कथा सांगितल्या नसतील असें आपणांस मानून चालावयाचें नाहीं. परंतु एवढें खरें कीं त्या वेळीं हिंदुस्थानांत जीं काव्यें झालीं किंवा ज्या कथा सांगितल्या गेल्या त्यांतील, खुद्द वेदवाक्यांत, फारच थोडा भाग आढळतो (उदाहरणार्थ, शुनःशेपाची कथा) व पुष्कळसा भाग पुढें लिहिल्या गेलेल्या पुराणांत व काव्यांत दृष्टीस पडतो. ब्राह्मणांप्रमाणें, व्याकरण, शिक्षा, ज्योतिषादि ज्या शास्त्रांचें पुढें वेदांग म्हणून स्वतंत्र रीतीनें अध्ययन होऊं लागलें त्या शास्त्रांची उत्पत्तीहि फार पूर्वीच्या कालीं झाली असावी असें दिसतें.*

तत्त्वज्ञानाची उत्पत्तीहि ब्राह्मणकालाच्या नंतरची नसून त्या पूर्वींची आहे. ऋग्वेदांतील कांहीं सूक्तांवरून देवब्राह्मणादींवरील लोकांच्या श्रद्धामय भावनेंत संशयकार्पण्यादि विकार कसे उत्पन्न झाले हें आपण वर दाखविलेंच आहे. प्राचीन हिंदुस्थानांतील हे पहिले तत्त्ववेत्ते व संशयस्थलीं विचार करणारे 'ब्रह्मवादी' एकाकी न राहतां त्यांनीं एक संघ तयार करून आपल्या मतांचा प्रसार केला असावा हें अथर्ववेदांतील कांहीं तत्त्वज्ञानात्मक सूक्तांवरून व यजुर्वेद संहितांतील कांहीं तुटक तुटक भागांवरून सिद्ध होतें असें विंटरनिट्झला वाटतें. आरण्यकांत तत्त्वज्ञानी लोकांच्या मतांचें ठोकळ स्वरूप तेवढें दृष्टोत्पत्तीस येतें.† तथापि ह्या ठोकळ स्वरूपावरून सुद्धां एवढें सिद्ध होतें कीं यज्ञशास्त्राची प्रगति होत असतां देखील त्याच काळीं तात्त्विक विचारहि प्रगल्भ होत जात होते.

प्राचीन हिंदुस्थानांतले हे पुरातन तत्त्वज्ञानी केवळ ब्राह्मणवर्गांतलेच होते हें बहुधा शक्य दिसत नाहीं. कारण देव अनंत आहेत इत्यादि मतांच्या विरुद्ध प्रतिपादन करणारे त्यांचे विचार हे ब्राह्मणवर्गाच्या जीवनहेतूला अगदीं विरोधक होते. जे ब्राह्मण यज्ञयागादींवर आपला निर्वाह करीत असत त्यांच्यांतच, इंद्र आहे किंवा नाहीं किंवा देवांनां हवि वगैरे देण्यांत कांहीं अर्थ आहे किंवा नाहीं‡ असे प्रश्न उपस्थित करणारे कोणी असतील ही कल्पना संभवनीयच नाहीं. ब्राह्मणांच्या विरुद्ध असणाऱ्या लोकांतच ज्यांचा कशावरहि विश्वास नव्हता असे कृपण, यज्ञयागादि न करणारे व ब्राह्मणांस दानें न देणारे असे संशयी व मनन करणारे लोक होते हें जास्त शक्य आहे. उपनिषदांतील पुष्कळ उताऱ्यांवरून व त्या पूर्वींच्या ब्राह्मणांवरून प्राचीन काळच्या क्षत्रिय वर्गाचाहि विद्याभिरुचि व ज्ञानार्जनादींत कालक्रमणा करण्याकडे कांहींसा कल होता असें दिसतें. कौषीतकी ब्राह्मणांत प्रतर्दन राजाचा यज्ञशास्त्रासंबंधीं ब्राह्मणाशीं झालेला संवाद दिलेला आहे. शतपथ ब्राह्मणाच्या अकराव्या काण्डांत विदेह देशचा राजा जनक ह्यानें आपल्या ज्ञानानें सर्व ब्राह्मणांची गाळण उडविल्याचें वारंवार सांगितलेलें आहे. अग्निहोत्र कसें पाळतात ह्याविषयीं श्वेतकेतु, सोमशुष्म, व याज्ञवल्क्य ह्या ऋषींस जनकानें विचारलेल्या प्रश्नावरून पुष्कळ बोध होण्यासारखा आहे. कोणासहि ह्या प्रश्नाचें समाधानकारक उत्तर देतां आलें नाहीं. तथापि याज्ञवल्क्य ह्यासहि जरी अग्निहोत्राचा अर्थ पूर्णपणें कळला नव्हता तरी त्यानें ह्यासंबंधीं पुष्कळ गहन विचार केला असल्यामुळें त्याला शतगोदान देण्यांत आलें. राजा निघून गेल्यावर "ह्या क्षत्रियानें आपल्या वाणीनें आपणांस गोंधळून टाकिलें, असो, आपण पुन्हां त्याच्याशीं ब्रह्मोद्य प्रतिपक्ष करूं" असा त्या ऋषींनीं आपसांत विचार केला. तथापि "आपण ब्राह्मण आहों तो केवळ एक क्षत्रिय आहे. आपण त्याला जिंकलें तर त्या जयाचें श्रेय आपणांस काय? परंतु जर त्यानें आपणांस हरविलें तर क्षत्रियानें ब्राह्मणांवर ताण केली असें लोक आपणांस म्हणतील. तेव्हां हा विचार सोडून द्या" असें सांगून याज्ञवल्क्यानें त्यांनां ह्या नादापासून परावृत्त केलें व दुसऱ्या दोन्ही ऋषींनीं तें मान्य केलें. याज्ञवल्क्यानें स्वतः जनकाकडून तत्त्वज्ञान श्रवण केलें.* यज्ञाची रचना करणारा व शौल्वायन† ह्यास शिकविणारा अयस्थूण ह्यास सायणानें "ऋषि" म्हटलें आहे तथापि तो ब्राह्मण होता किंवा नाहीं ह्याची शंकाच आहे. परंपरेप्रमाणें ज्या ऋषींनीं ऋग्वेदाचीं सूक्तें रचिलीं ते सुद्धां सर्वच ब्राह्मण वर्गांतील होते असें नाहीं. कवष मुनीविषयीं असें सांगतात कीं तो अब्राह्मण असून दासीपुत्र होता. एका महायज्ञाचे वेळीं हा त्यांत आला तेव्हां ऋत्विजमंडळींनीं, अरण्यांत जाऊन क्षुत्पिपासाकुल होऊन मरण यावें म्हणून त्याला हांकून लाविलें. परंतु "जल" (देवता) व सरस्वती ह्यांस त्याची कींव आली, व त्यास एक सूक्त दृष्ट झालें नंतर ऋषीमंडळींनीं त्यास ऋषि समजून परत आपणांत येऊं दिलें.‡

उपनिषदांत राजांनींच काय पण स्त्रिया व हीन वर्णांतील लोकांनीं सुद्धां तत्त्वज्ञानादि विद्वत्तापूर्ण विषयांत गति करून घेतल्याचें आढळत असून त्यांनां उच्चप्रतीचें ज्ञान असल्याचें दिसून येतें. बृहदारण्यक उपनिषदांत वचक्नूची मुलगी गार्गी हिनें याज्ञवल्क्यास दृश्य जगाच्या उत्पत्तीविषयीं इतके प्रश्न केले आहेत कीं, शेवटीं याज्ञवल्क्यानें "गार्गी इतकें विचारूं नकोस, नाहीं तर हें ज्ञान तुझ्या डोक्यांत न संपादल्यामुळें तें फुटेल, देवताविषयीं कोणीहि फार खोल प्रश्न करूं

* ब्राह्मणांतील वेदांगाची उत्पत्ति ह्यावर मोक्षमुल्लरचें History of Ancient Sanskrit Literature पान ११० पहा.
† पृष्ठ. ६६, व १४६ पहा. ? ‡ वर पान ४१ पहा.

* शतपथब्राह्मण ११.६,२;११.३.१,२–४;११.६,३.
† शतपथब्रा. ११.४.२,१७–२०. ‡ ऐतरेयब्रा. २. १९.

नयेत, फार फार विचारतेस तेव्हां इतकें विचारण्याचें सोडून दे" असें म्हटलें. एका ठिकाणीं हीच गार्गी वादविवाद करणाऱ्या महापंडितांच्या सभेंत प्रसिद्ध अध्यापक याज्ञवल्क्यासमोर उभी राहून असें म्हणाली कीं "जसा एखादा काशीचा किंवा विदेहाचा वीरपुत्र आपल्या धनुष्याची दोरी ओढून हातांत दोन अरिविघातक तीक्ष्ण बाण घेऊन सज्ज होतो त्याप्रमाणें मी तुझ्याविरुद्ध हे दोन प्रश्न विचारून प्रतिपक्ष करावयास सिद्ध आहे तेव्हां ह्या प्रश्नांचीं उत्तरें दे." त्याच उपनिषदांत याज्ञवल्क्यानें आपली पत्नी मैत्रेयी हिला आत्म्याविषयींचें गहन ज्ञान करून दिल्याचें सांगितलें आहे.* अशा प्रकारचें उत्कृष्ट प्रतीचें ज्ञान म्हणजे केवळ ब्राह्मणांनांच होतें असें नसल्याबद्दलचें दुसरें ठळक उदाहरण सयुग्वा रैक्व याचें होय. हा आपल्या शकटाखालीं बसून त्याची धाण खरडून काढीत होता तरी त्याला आपल्या श्रेष्ठ प्रतीच्या ज्ञानाबद्दल राजासारखा अभिमान होता. दानशूर संपत्तिमान् जनश्रुति हा नम्रपणें त्याचे जवळ येऊन त्याला आपणांस ज्ञान देण्याबद्दल विनंति करूं लागला. रैक्वानें त्याला शूद्र म्हणून त्याच्या मौल्यवान् पारितोषकांचा तिरस्कार केला. जेव्हां त्यानें (जनश्रुतीनें) त्याला आपली सुंदर मुलगी अर्पण केली तेव्हां तो त्याला शिकविण्यास तयार झाला. खालीं दिलेली गोष्टहि तितकीच मनोरंजक व बोधप्रद आहे.

सत्यकाम जाबाल आपली आई जबाला हिला म्हणाला "हे महाभागे, मला ब्राह्मण छात्राची दीक्षा घेण्याची इच्छा आहे. माझा जन्म कोणत्या कुळांत झाला तें सांग" ह्यावर ती म्हणाली "मुला, तुझा जन्म कोणत्या कुळांत झाला हें मला ठाऊक नाहीं. मी तरुण असतां मोलकरीण (दासी) म्हणून सर्वत्र फिरत असें, आणि अशा रीतीनें तूं मला झाला आहेस. मला जबाला असें म्हणतात आणि तुझें सत्यकाम असें नांव आहे. म्हणून तुझ्या वडिलांच्या नांवाचा संबंध न आणतां मी तुला जबालेचा मुलगा सत्यकाम असें म्हणतें." नंतर तो गौतमानुयायी हारिद्रुमत याचेकडे गेला व म्हणाला "हे महातपोनिधे मला आपल्या बरोबर ब्रह्मचर्याची दीक्षा घावयास आपण कबूल अहांत काय? यावर त्यानें त्यास विचारलें "तूं कोणत्या कुळांत जन्मला आहेस?" जाबालानें उत्तर दिलें "हे गुरो माझा जन्म कोणत्या कुळांत झाला हें मला ठाऊक नाहीं. मी माझ्या आईला विचारिलें व ती म्हणाली "मी माझ्या लहानपणीं दासी होत्यें; अशा रीतीनें तूं मला झाला आहेस, तुझा जन्म कोणत्या कुळांत झाला हें मला सुद्धां माहीत नाहीं; मला जबाला म्हणतात व तुला सत्यकाम असें म्हणतात" म्हणूनच, हे गुरो, मी आपल्याला जबालापुत्र सत्यकाम असें म्हणतों" ह्यावर तो त्यास म्हणाला "ब्राह्मणाशिवाय इतकें स्पष्ट कोणाला बोलतां येणार? जा, बेट्या, थोडेसें इन्धन आण (हें त्या विधीला लागतें) तूं खरें बोललास त्या अर्थी मी तुला आश्रय देतों.*

ह्या एका उदाहरणावरून पूर्वींच्या काळीं ब्राह्मणकुलांतील उत्पत्ति वगैरे गोष्टी किती क्षुल्लक समजत असत हें स्पष्ट होतें तथापि पुढील काळांतील न्यायशास्त्रादि ग्रंथांत ब्राह्मणांनींच वेद शिकवावा व वरच्या तीन वर्णांनींच फक्त वेदाध्ययन करावें ह्या गोष्टींचें पुन्हां पुन्हां समर्थन केलें आहे. उपनिषदांत मात्र असें पुष्कळ वेळां सांगितलें आहे कीं राजे व क्षत्रिय यांनां उत्तम प्रतीचें ज्ञान असून ब्राह्मण त्यांच्याकडे शिकण्याकरितां जात. ह्याला अनुसरूनच श्वेतकेतूचा बाप जो ब्राह्मण गौतम तो पारलौकिक ज्ञान संपादण्याकरितां प्रवाहण राजाकडे गेला. राजाला गौतमाच्या ह्या इच्छेबद्दल मोठें विचित्र वाटलें. कारण जें तत्त्व त्याला प्रतिपादन करून सांगावयाचें होतें तें ब्राह्मणांनां मुळींच अवगत झालेलें नव्हतें; आणि म्हणूनच सर्व जगांत क्षत्रिय वर्णाचें वर्चस्व प्रस्थापित झालें होतें. शेवटीं तें तत्त्व राजानें त्याला सांगितलें. ज्या तत्त्वाचें स्पष्टीकरण ह्या ठिकाणींच प्रथमतः नीटपणें झालेलें दिसतें व ज्याचे आद्यप्रवर्तक क्षत्रिय असून जें पूर्वी याज्ञिकांच्या ब्रह्मज्ञानांत नव्हतें† तेंच "आत्म्याचा पुनर्जन्म किंवा देहांतर" इत्यादि संबंधीचें तत्त्व होय. सर्वत्र एकस्वरूप अस्तित्वांत असणाऱ्या आत्म्यासंबंधींचें उपनिषदांतील जें दुसरें प्रमुख तत्त्व, तेंहि अयाज्ञिक वर्गांतच उत्पन्न झालें हें दुसऱ्या एका भागावरून सिद्ध होतें. ह्या ठिकाणीं पांच महाविद्वान् ब्राह्मण महाप्रबुद्ध उद्दालक आरुणी ह्याचेकडे आत्म्यासंबंधींचें तत्त्व शिकण्याकरितां गेले होते. तथापि त्या महात्म्याला असें वाटलें कीं "हे महाविद्वान् पंडित लोक मला प्रश्न करतील आणि कदाचित् मला त्यांच्या सर्व प्रश्नांचीं उत्तरें देतां येणार नाहींत. ठीक आहे मी त्यांनां दुसऱ्या कोणाकडे तरी लाऊन देतों" मग त्यानें त्यांस अश्वपति कैकेय राजाकडे जाण्यास सांगितलें व ते शिकण्यासाठीं त्याच्याकडे गेले.‡

---

* बृह. उप. ३·६; ३·८; २·४; ४·५.

* पॉल् डॉयसेन् ह्यानें भाषांतर केलेलें छांदोग्य उपनिषद् ४·४. Sechzig Upanishadas des Veda. P. 121 ff. शतपथब्राह्मणांतील अध्यापक वर्गाच्या वंशावळींत पुष्कळ नावें त्यांच्या मातृनामावरून दिलेलीं आहेत.

टीपः—सत्यकाम ह्याचा अर्थ सत्य म्हणजे खरें ह्याच्यावर ज्याची भक्ती आहे तो.

† छांदोग्य उप. ५·३. बृहदारण्यक उप. ६·२. कौषीतकी उपनिषदांत (१·१.) क्षत्रिय चित्रानें आद्य ब्राह्मण अरुणी ह्यास पारलौकिक ज्ञान सांगितलेलें आहे. ‡ छांदोग्य उप. ५·११ ही कथा पर्यायानें (अन्यरूपानें) शतपथब्रा. १०·६,१ ह्यांतहि आढळते.

काहीं वर्ग आपल्या नीरस यज्ञशास्त्रांत प्रगति करीत असतां दुसरे वर्ग इतर उच्च प्रश्नांचा विचार करीत होते व हेच प्रश्न पुढें उपनिषदांत उतक्या सुंदर रीतीनें गोंवले गेले. ब्राह्मणवर्गापासून दूर अशा ह्या दुसऱ्या वर्गांतूनच मोठे मोठे अरण्यवासी तपोनिधी असे ऋषी निघाले. ह्यांनीं जगाचा व त्यांतील सुखांचा त्याग केला एवढेंच नसून ब्राह्मणांच्या यज्ञयागादि विधींपासून हे अगदीं अलिप्त राहत असत. ह्याच वर्गांतून पुढें ब्राह्मणांच्या विरुद्ध असे दुसरे वर्ण ( जाति ) निघाले व ह्यापैकीं बौद्ध लोकांचा वर्ग पुढें एवढ्या प्रसिद्धीस आला. ह्या नवीन मतांचा व विशेषतः बौद्धसंप्रदायाचा एवढा प्रसार झाला ह्यावरूनच त्यावेळच्या तत्त्वज्ञान्यांनीं ह्या धर्माचें बीज अशा जागीं पेरलें कीं त्याला लागलीच अंकुर फुटले व यज्ञयागादींच्या विरुद्ध अशीं जी धर्मतत्त्वें होतीं त्यांस लोकांचाहि जबरदस्त आश्रय मिळाला. पुरातन कालापासून ब्राह्मण वर्गहि इतका चाणाक्ष होता कीं त्यांनीं ही नवीन लोकप्रवृत्ति आपणांस अनुकूल करून घेण्याच्या कामीं मुळींच दुर्लक्ष केलें नाहीं. त्यांनीं चार आश्रमाच्या तत्त्वाचा पुरस्कार करून संन्यासवृत्ति वगैरे हीं ब्राह्मणाच्या धर्माचरणाचें एक अवश्य अंग करून टाकिलीं. ह्या मताचें तत्त्व म्हटलें म्हणजे प्रत्येक आर्य मनुष्यानें किंवा वरच्या तीन वर्णांतील प्रत्येक मनुष्यानें आपल्या आयुष्यांत चार आश्रमांतून गेलेंच पाहिजे. पहिल्यानें ब्रह्मचारी म्हणून आपल्या गुरूजवळ राहून वेदाध्ययन करावें. अशा तऱ्हेनें विद्यार्जनाचा काल घालविल्यावर पुढें घर करून गृहस्थ म्हणून प्रजोत्पादन करावें व देवतांच्या नांवानें यज्ञ वगैरे करून हवि अर्पण करावे. वृद्धापकाल समीप आल्यानंतर त्यानें गृहादींचा त्याग करावा व वानप्रस्थ आश्रम स्वीकारून अरण्यांत यज्ञयागादि मित प्रमाणांत करून त्यांतील गूढ तत्त्वें व विशिष्ट गुण ह्यांचें मनन करण्यांत काल घालवावा. अंतकाल समीप आला आहे असें पाहून यज्ञयाग, ध्यान वगैरे सोडून सर्व चांगल्या गोष्टींचा त्याग करावा व संन्यस्तवृत्तीनें जगाला मागें टाकून विश्वाचें आदितत्त्व ब्रह्म ह्याचेकडे वृत्ति लावावी व ब्रह्मप्राप्तीचा प्रयत्न करावा.

ब्राह्मणांमध्यें उच्च प्रतीच्या आयुष्यक्रमाचा द्योतक जो भाव आहे त्याच्या जोडीलाच ब्राह्मणांमध्यें "आरण्यकें" म्हणून कांहीं भाग आहेत. आरण्यकें म्हणजे वानप्रस्थाश्रमांत अरण्यवासी असतांना अध्ययन करण्याचे ग्रंथ.* ब्राह्मणवर्गाच्या शिक्षणांतील इतर विषयांशिवाय हेहि भाग त्यांस जोडलेले होते. ह्या आरण्यकांमधील मुख्य विषय म्हणजे यज्ञयागादि कृत्यें किंवा त्यांचें विधिवत् आचरण ह्यांचे नियम वगैरे नसून यज्ञाचीं मूलतत्त्वें, त्यांतील गूढार्थ व ब्राह्मणवर्गीय तत्त्वज्ञान हे होत.

अंशतः 'यज्ञ' याच नावानें व अंशतः यज्ञापासून अविभक्त असें पवित्र "ब्रह्म" यानावानें सर्व चराचराचें आद्य उत्पत्तिस्थान म्हणून गणलें जाणारें, आणि ब्राह्मणें आणि आरण्यकें ह्यांत सांपडणारें जें 'आदितत्त्व' त्याविषयींच्या तत्त्वज्ञानाला आणखी एका तत्त्वाची जोड मिळाली; हें तत्त्व म्हणजे सर्वांच्या ठायीं एकस्वरूपानें वास्तव्य करणारा अंतःस्थायी आत्मा ह्या संबंधींचें होय ह्याची उत्पत्ति यज्ञांचें तत्त्व ओळखणाऱ्या यज्ञांस कंटाळलेल्या किंवा यज्ञाविरुद्ध वर्गांत झाली असावी व खरें पाहिलें तर हें यज्ञधर्माला प्रतिकूल दिसतें. हें जें अस्वाभाविक विचित्र संमिश्रण झालें त्याच्यापासूनच उपनिषदें निघालीं. परंतु चार आश्रमासंबंधीचें जें तत्त्व त्याच्या योगानें या उपनिषदांना वेदाचें अंग म्हणून समजण्यांत येऊं लागलें.

संन्याशांनीं शेवटच्या आश्रमांत अध्ययन करण्याचीं जीं कांहीं धर्मवाक्यें आहेत त्यांनांच अंशतः जोडलेलीं व आरण्यकांत अंशतः अंतर्भूत असलेलीं कांहीं प्राचीन उपनिषदें आपणांस आढळतात. पुष्कळ अंशीं ह्यांनांच वेदांत* अशी संज्ञा आहे. ह्यांतील पुष्कळ धर्मवाक्यें बऱ्याच नंतरच्या काळीं अस्तित्वांत आलीं व कालानुक्रमावरून तीं वेदकाळाच्या शेवटीं शेवटीं लिहिलीं गेलीं असावीं असें दिसतें. शिवाय आपण हें विसरतां कामा नये कीं, हें वेदकालीन वाङ्मय हस्त लिखित पुस्तकांतून ग्रथित केलेलें नसून केवळ ऋत्विजांच्या संप्रदायांत मुखद्वारें परंपरागत होतें. म्हणूनच प्राचीनांच्या पुस्तकांत किंवा ज्याला आपण ग्रंथ असें म्हणतों त्यांत आपणांस जें कांहीं आढळतें तें म्हणजे निरनिराळ्या अध्यापकवर्गाचे अध्यापनाचे विषय होत. हा एक विषय कांहीं ठराविक काळांत विद्यार्थ्यांनां

* अरुणेय उपनिषदांत असें सांगितलें आहे कीं ( Deussen Sechzig Upanishadas des Veda. p. 693 ). वानप्रस्थ आश्रमांत सर्व वेदांपैकीं आरण्यकें आणि उपनिषदें ह्यांचेंच अध्ययन करावें. उपनिषदांचे आरंभीं आरण्यकासारख्या भागांत जे यज्ञविधी वगैरे सांगितलेले आहेत त्यासंबंधीं रामानुज ह्यानें त्यांचें अरण्यांत अध्ययन करावें असें म्हटलें आहे ( Sacred Books of the East Vol 48 p. 645. ) मोक्षमुल्लर ह्याचें History of Sanscrit Literature पहा. ओल्डनबर्गचे मताप्रमाणें ( Die Hymnen des Rigveda 1, Berlin 1888 p. 291. ) आरण्यकें असें नांव पडण्याचें कारण छात्रवर्गाला ह्यांची शिक्षा गांवांत न देतां अरण्यांत देत असत कारण त्यांतील तत्त्वें फार गूढ व पवित्र असत. हा भाग अरण्यांत शिकवीत असत हें खरोखरीच शक्य आहे ( शांखायन गृह्यसूत्र २. १२, ११. वरूनहि असें अनुमान निघतें. ) सांप्रतहि यांचें अध्यापन देवळांत वगैरे करितात.

* प्रथमतः उपनिषदांनांच वेदांत म्हणत असत. ह्यानंतर कांहीं कालानें उपनिषदांवरून रचिलेली तत्त्वज्ञानपद्धति असा अर्थ होऊन त्याला वेदान्त अशी संज्ञा देण्यांत आली.

शिकविला जात असे—अर्थात् गुरुगृहीं राहून विद्यार्जन करण्यास जो काळ लागे तो कित्येक वर्षांचा असे.—म्हणूनच समजण्यास कठीण असे जे विषय असत ते अर्थातच ह्या काळाच्या अगदीं शेवटीं शेवटीं शिकविले जात. हे विषय म्हटले म्हणजे उपनिषदांतील व आरण्यकांतील गहन व दुर्गम अशीं तत्त्वज्ञानाचीं तत्त्वें होत. शिवाय वेदपठणांत पवित्र कृत्य व धार्मिक कर्तव्य ह्या दृष्टीनें हीं धर्मवाक्यें शेवटीं येत. नंतरच्या काळच्या तत्त्वज्ञांच्या मताप्रमाणें हीं उपनिषदांतील तत्त्वें म्हणजे वेदांचा "शेवटचा भाग" नसून वेदांचें "अंतिम ध्येय" होत.* आरण्यकें किंवा जुनीं उपनिषदें हीं वेदांत ह्या नात्यानें पुष्कळ वेदांच्या शाखांतून आढळतात. वास्तविक पाहिलें तर हीं ब्राह्मणांचीं अंशभूत अंगें होत.

ह्याला अनुसरूनच ऋग्वेदांतील ऐतरेय ब्राह्मणांत ऐतरेय आरण्यक असून त्यांतच ऐतरेय उपनिषद् गोवलेलें आहे. ऋग्वेदांतील कौषीतकी ब्राह्मणाच्या शेवटीं कौषीतकी आरण्यक असून कौषीतकी उपनिषद् हा त्याचा एक भाग आहे. कृष्णयजुर्वेदांत तैत्तिरीय ब्राह्मणाच्यापुढें तैत्तिरीय आरण्यक असून त्याचे शेवटीं तैत्तिरीय उपनिषद् व महानारायण उपनिषद् हीं आहेत. शुक्लयजुर्वेदाचा मोठा भाग जो शतपथ ब्राह्मण त्यांतील चौदाव्या काण्डाचा पहिला एक तृतीयांश भाग आरण्यक असून ह्या काण्डाचा शेवटचा भाग सर्व उपनिषदांत श्रेष्ठ असें बृहदारण्यक उपनिषद् होय. सामवेदाच्या बहुधा ताण्ड्यमहाब्राह्मणांत छांदोग्य उपनिषद् आहे व ह्याचा पहिला भाग म्हणजे केवळ एक आरण्यकच आहे. जैमिनीय उपनिषद् ब्राह्मण† म्हणून जें आहे तें सामवेदांतील जैमिनीय किंवा तलवकार पंथाचें एक आरण्यकच असून त्याच्याच दुसऱ्या भागाला केन उपनिषद् किंवा तलवकार उपनिषद् असें म्हणतात.

तैत्तिरीय आरण्यकाला मागाहून जोडलेलें महानारायण उपनिषद् खेरीज करून वर सांगितलेलीं सर्व उपनिषदें हीं ह्या जातीच्या ग्रंथांत जुन्यांत जुनीं आहेत. ज्या ब्राह्मणांशीं तीं संलग्न आहेत किंवा ज्यांचीं तीं अंगें आहेत त्यांच्या व ह्यांच्या भाषापद्धतींत भेद नाहीं. या ग्रंथाची भाषा जरा ओबडधोबड गद्य असून सौंदर्याचीहि ह्यांत—विशेषतः कथाभागांत—मुळींच उणीव नाहीं. अर्धे केन उपनिषद् फक्त वृत्तबंध असून वर निर्दिष्ट केलेल्या उपनिषदांत हें अगदीं अखेरचें आहे. डॉयसेन* ह्याचे म्हणण्याप्रमाणें ह्या मोठमोठ्या उपनिषदांपैकीं प्रत्येकांत जुनीं व नवीं वाक्यें एकत्र आढळत असल्यामुळें प्रत्येक भाग केव्हां लिहिला गेला हें निरनिराळ्या रीतीनें शोधून काढिलें पाहिजे. परंतु एकंदरींत पहातां कालानुक्रमाप्रमाणें एकामागून एक येणारे चार काळ आपणांस स्पष्ट ओळखतां येण्यासारखे आहेत, व ह्या निरनिराळ्या काळांत लिहिलीं गेलेलीं उपनिषदें प्रत्येकीं अमुक काळांत झालीं असें म्हणण्यास कांहीं बाधा नाहीं. आतांपर्यंत सांगितलेलीं उपनिषदें हीं पहिल्या आणि प्राचीन काळांतलीं होत व डॉयसेनच्या मताप्रमाणें त्यांचा कालमानाप्रमाणें अनुक्रम खालीं लिहिल्याप्रमाणें आहे.

१ बृहदारण्यक उपनिषद्.
२ छांदोग्य उपनिषद्.
३ तैत्तिरीय उपनिषद्.
४ ऐतरेय उपनिषद्.
५ कौषीतकी उपनिषद्.
६ केन उपनिषद्.

ह्या प्राचीन उपनिषदांशीं संलग्न असे दुसरे लेखसंग्रह आहेत. हेहि कांहीं विवक्षित वैदिक पंथाचे आहेत अशी परंपरा आहे. तथापि त्या त्या पथांशीं ह्यांचा फार दूरचा संबंध असल्यामुळें ह्या विधानाबद्दल शंका घेण्याला जागा आहे असें काहींचें मत आहे. हीं उपनिषदें वृत्तबद्ध असून ह्यांत आरण्यकांतील यज्ञादिकांचीं गहन तत्त्वें मुळींच नाहींत. हीं नंतरच्या काळीं लिहिलीं गेलीं आहेत. डॉयसेन ह्यानें मानलेल्या कालानुक्रमाप्रमाणें हीं खालीं लिहिल्याप्रमाणें आहेत.

७ काठक उपनिषद्, हें कृष्णयजुर्वेदांत आहे.

८ ईश उपनिषद्, हें शुक्लयजुर्वेदाचा भाग आहे कारण हें वाजसनेयी संहितेंत आलेलें आहे.

९ श्वेताश्वतर उपनिषद्, हें कृष्णयजुर्वेदाचा भाग आहे असें म्हणतात.

१० मुण्डक उपनिषद् हें अथर्ववेदांतील आहे.

११ महानारायण उपनिषद् हें कृष्णयजुर्वेदांत आहे (तैत्तिरीय आरण्यक).

ह्याच्यापुढें उपनिषदांचा एक तिसरा वर्ग असून ह्यांतील सर्व गद्यांत लिहिलेलीं आहेत. हीं उपनिषदेंहि कांहीं विवक्षित वैदिक शाखांच्या लोकांनीं तयार केलीं असें समजतात तथापि भाषा, रचना व विषय ह्यावरून पहातां हीं नंतरच्या काळीं रचिलीं गेलीं असावीसें दिसतें. हीं खालीं दिल्याप्रमाणें आहेतः—

---

* Cf. P. Deussen, System des Vedanta, p. 3. etc Allgemeine Geschichte der Philosophie I, 2. p. 5.

† हॅन्स् ओएर्टल ह्यांनीं तयार केलेला जैमिनीय अथवा तलवकार उपनिषद् याचा मूळग्रंथ भाषांतर व स्पष्टीकरणार्थ टीपा इ. सह अमेरिकन् ओरिएन्टल् सोसायटीच्या जर्नल (पुस्तक १६.१८९६) मध्यें छापला आहे.

* Allgemeine Geschichte der Philosophie I. 2 p. 22.

१२ प्रश्नोपनिषद् हें अथर्ववेदांत आहे.

१३ मैत्रायणीयोपनिषद् हें कृष्णयजुर्वेदांत आहे.

१४ माण्डूक्योपनिषद् हें अथर्ववेदांत आहे.

हीं चौदा उपनिषदें जरी निरनिराळ्या काळीं झालेलीं आहेत तरी तीं उपनिषदीय वाङ्मयाच्या अभिवृद्धीचा प्रथम उपक्रम होत. हिंदुस्थानच्या प्राचीन तत्त्वज्ञानाचें नांव निघालें म्हणजे प्रथमतः हींच आपल्या डोळ्यांसमोर उभीं राहतात व अबाधित नियम म्हणून ह्यांचीच जास्त ख्याति आहे. खरीं वेदान्ततत्त्वें म्हणून जीं आहेत तीं जशींच्या तशींच ह्या उपनिषदांतून सांपडतात.

**"अथर्ववेदीय उपनिषदें."**—उपनिषदांचा आणखीहि एक चवथा वर्ग आहे. परंतु वर सांगितलेल्या तीन वर्गांतील उपनिषदांचाच वैदिक शाखांशीं किती संबंध आहे हीच गोष्ट कित्येक संशोधकांस संशयित वाटत आहे. ह्या नवीन वर्गांत जीं पुष्कळशीं उपनिषदें आहेत त्यांचा वैदिक पंथाशीं कांहीं संबंध नसेलसें वाटतें. वेदांचा आणि नंतरचीं उपनिषदें ह्यांचा कांहींच संबंध नसावा. भारतीयांच्या परंपरेप्रमाणें हीं सर्व उपनिषदें अथर्ववेदाचीं आहेत. वास्तविक पाहतां अथर्ववेदाचीं उपनिषदें ह्या नांवाखालीं मोडणाऱ्या ह्या उपनिषदांत वेदाच्या बाहेरील व पुष्कळ पुढील काळच्या निरनिराळ्या तत्त्वज्ञांचीं व निरनिराळ्या पंथांचीं मतें व विचार दृष्टोत्पत्तीस येतात. हीं अथर्ववेदांतील आहेत अशी समजूत होण्याचें कारण इतकेंच कीं, अथर्ववेद श्रौतधर्माबाहेरील विषयांचा संग्रह असल्यामुळें जें जें रूढशास्त्र-संमत विशिष्ट गोष्टींनां धरून नव्हतें तें तें सर्व अथर्ववेदांतील आहे असें म्हणण्याचा परिपाठ पडला. शिवाय वर सांगितल्या-प्रमाणें अथर्ववेद हा मंत्रतंत्र आणि अभिचार ह्यांचा वेद होय. उपनिषदाचा खरा अर्थ गुप्ततत्त्वें असा असून हा अर्थ अबाधित आहे. अथर्ववेद म्हणजेच गूढ तत्त्वांचा संग्रह असें असल्यामुळें उपनिषदें किंवा गूढ तत्त्वें ह्या नांवाचे जे जे अनेक ग्रंथ निर्माण झाले ते ते सर्व अथर्ववेदाला जोडले गेले हें अगदीं साहजिक दिसतें.*

**उपनिषद् शब्दाची व्युत्पत्ति.**—उपनिषद् हा शब्द उप+नि+सद् म्हणजे कोणाच्याजवळ बसणें ह्या धातू-पासून निघाला आहे. † ह्याचा मूळ अर्थ गूढज्ञानाची शिक्षा घेण्यासाठीं छात्रानें अध्यापकाच्या अगदीं निकट बसणें हा होय. म्हणून एकांत बैठक किंवा गुप्तबैठक असा अर्थ झाला. ह्या गुप्तबैठकीच्या कल्पनेवरूनच अशा गुप्त ठिकाणीं शिकविलेलीं गुप्ततत्त्वें अशी कल्पना वृद्धिंगत झाली. भारतीयांच्या परंपरेप्रमाणें उपनिषद् हा शब्द (रहस्यम्) ह्या शब्दाशीं समानार्थक आहे व ह्याचा अर्थ गुप्तगोष्ट असा आहे. उपनिषदांच्या ग्रंथांतूनहि "इति रहस्यम्" व "इति उपनिषद्" हे शब्द ठिकठिकाणीं उपयोगांत आल्याचें आढळतें. पुष्कळ वेळां उपनिषदांतून हीं तत्त्वें अयोग्य मनुष्याला शिकवूं नयेत इत्यादि अर्थाची सूचनाहि दिलेली आहे. असें म्हटलें आहे कीं, "हीं ब्रह्मतत्त्वें बापानें आपल्या वडील मुलास किंवा विश्वासू विद्यार्थ्यास शिकवावीं, दुसऱ्या कोणी नानारत्ना

---

*संग्रह या स्वरूपांत कोणताहि उपनिषदांचा संग्रह फार जुना नाहीं. कारण इ. सन ८०० च्या सुमारास होऊन गेलेले शंकराचार्य ह्यांनीं अमुक ब्राह्मणाचे भाग म्हणून पुष्कळ उपनिषदें दिलीं आहेत परंतु ह्यांच्या एकीकरणासंबंधीं कांहींच लिहिलेलें नाहीं. एक तर त्यांनीं उपनिषदांनां श्रुति असें म्हटलें आहे किंवा तीं ज्या वैदिक पंथाचीं उपनिषदें होतीं त्यांचीं नावें दिलीं आहेत. इ. स. १२ व्या शतकांत होऊन गेलेला रामानुज ह्यानेंहि ह्या निरनिराळ्या पंथांतील उपनिषदांसंबंधीं लिहितांना छंदोग, वाजसनेयिन् व कौषितकिन् अशीं नांवें दिलीं आहेत. ह्याचा अर्थ इतकाच कीं हे वेदाचे भाग होते, विशिष्ट स्वरूपाचे संग्रह नव्हते. निःसंशयपणें अगदीं अलीकडील म्हणतां येईल अशा मुक्तिका उपनिषदांत १०८ उपनिषदांची यादी दिली आहे. हीं सर्व एका ठिकाणीं संग्रथित होतीं. (Deussen Sechzig Upanishadas p. 532 etc) इ. स. १६५६ त फारशी भाषेंत तरजुमा झालेल्या संग्रहांत ५० उपनिषदें आहेत. उपनिषदांचे मूळग्रंथ हिंदुस्थानांत पुष्कळ वेळां प्रसिद्ध झाले. आनंदाश्रम, निर्णयसागर व गणपत कृष्णाजी यांच्या आवृत्त्या आहेतच. बृहदारण्यक व छांदोग्य हीं उपनिषदें Bothlingk ह्यानें बरोबर तपासून छापविलीं असून (सेंट पीटर्सबर्ग आणि लिप्झीग् १८८९) त्यांचें जर्मन भाषांतरहि झालें आहे. ह्याच शोधकानें कठ ऐतरेय व प्रश्नोपनिषद्हि तपासून जर्मन भाषेंत त्यांचें भाषांतर केलें आहे. [Reports of the Royal Saxon Society of Sciences] मुख्य मुख्य उपनिषदांचें इंग्रजी भाषांतर मोक्षमुल्लर ह्यांनीं (Vols I & 15 of the Sacred books of the East 1879 and 1884) केलें आहे. पॉल् डॉयसेन ह्यानें केलेल्या उत्तम जर्मन भाषांतरावरूनहि यूरोपीयांस उपनिषदांचें सहज ज्ञान होईल (Sechzig Upanishadas des Veda Leipzig 1897.) ह्याच शोधकानें Allgemeine Geschichte der Philosophie Leipzig 1899 ह्या ग्रंथाच्या पहिल्या पुस्तकाच्या दुसऱ्या भागांत उपनिषदांतील तत्त्वज्ञान ह्याचें चांगलें विवेचन केलें आहे. मराठी भाषांतरकारांत रा. रा. भागवत, ह. र. भागवत, चिं. गं. भानु इत्यादि लेखक प्रसिद्ध आहेत.

† डॉयसेन ह्यानें (Allgemeine Geschichte der Philosophie I. 2. p. 14) असें दाखविलें आहे कीं Kollegiu ह्या शब्दाचा मूळ अर्थ सभा किंवा परिषद् असा आहे पण पुढें "reading a kolleg" "hearing a kolleg" हा उपनिषद् याशीं सदृश इतिहासाचा शब्द आहे. ह्या शब्दांचा अर्थ विद्यालयांत दिलेल्या किंवा सभेंत सांगितलेल्या व्याख्यानांचा विषय असा झाला. उपनिषद् ह्याचा अर्थ "पूजा" आहे असें जें ओल्डेन्बर्ग ह्याचें मत आहे (Z. D. M. G. Vol. 50. 1896, p. 458 etc) तें आधार देऊन डॉयसेन ह्यानें खोडून काढलें आहे.

व जलपरिवेष्टिता वसुंधरा जरी अर्पण केली तरी त्यास शिकवूं नयेत"* उपनिषदांत पुष्कळ वेळां असेंहि सांगितलेलें आहे कीं, आचार्यास कोणतीहि विद्या शिकविण्याची विनंति केली असतां विद्यार्थ्यानें पुष्कळ आर्जव केल्यावरच आचार्यानें त्यास आपलीं तत्त्वें शिकविलीं आहेत.

"उपनिषद्" शब्दाच्या ह्या जुन्या अर्थाला अनुसरून जुन्या उपनिषदांत पुष्कळ भिन्नजातीय गोष्टी आढळतात. शिवाय उपनिषदें म्हणजे गहन ज्ञान असल्यामुळें जीं तत्त्वें सर्वसाधारण लोकांस शिकविण्यासारखीं नसत तीं कांहीं विशिष्ट अधिकाराच्या लोकांस शिकविलीं जात असून त्यांसहि उपनिषदें असें म्हणत; मग हीं तत्त्वें म्हणजे एखादा गहन सिद्धान्त असो, किंवा एखादा निरुपयोगी मंत्र असो, किंवा एखादें अभिचारविषयक गूढ रहस्य असो, अथवा एखादा अभिचारमंत्र असो या सर्वांस उपनिषद् असें म्हणत.

हें सर्व आपणांस जुन्या उपनिषदांतून एकाच ठिकाणीं संमिश्रित झालेलें आढळून येतें व ही गोष्ट अथर्ववेदीय उपनिषदांत तर विशेषतः प्रत्ययास येते. शृंगारावरील ग्रंथांत संभोगरंगरागादि संबंधीं सर्वप्रकारच्या वनस्पतींची माहितीहि उपनिषद् म्हणून दिली आहे.

कौषीतकी उपनिषदांत मानसशास्त्र, आध्यात्मिक शास्त्र किंवा परलोकविषयक शास्त्र ह्यांचे सिद्धान्त असून शिवाय ज्या विधींनीं चांगली गति मिळते किंवा एखादा प्रेममंत्र टाकतां येतो त्या विधींचीं वर्णनें, बालपणीं येणारा मृत्यु टाळण्याकरितां विधी वगैरे असून शिवाय एक उपनिषद् किंवा "गूढविद्या" आहे. त्यांत शत्रूचा नाश करण्याचे मंत्रतंत्रादि दिलेले आहेत. त्याचप्रमाणें छांदोग्य उपनिषदांतहि अशाच गोष्टी दिलेल्या आहेत; त्यांत जगदुत्पत्ती-संबंधीं गहन तत्त्वज्ञान, विश्व व आत्मा, "ओम्" ह्या अक्षरांतील गूढ ज्ञान व रोगहारक गुप्त विधी वगैरे येतात.

अथर्ववेदीय उपनिषदांत गारुड उपनिषद्¶ नांवाचें एक उपनिषद् आहे, ह्यांत सर्पासंबंधीं मंत्र वगैरे असून त्याला अथर्ववेदसंहितेंत घातलें तरी चालेल.

**उपनिषदीय तत्त्वज्ञान.**—'उपनिषदांतील तत्त्वज्ञान' किंवा उपनिषत्संग्रह असें म्हटलें म्हणजे एका विशिष्ट संप्रदायाचीं मतें अशी कल्पना होणें शक्य आहे, पण तशी गोष्ट नाहीं. उपनिषदीय तत्त्वज्ञानपद्धति ह्याचा फार कोता व परिमित अर्थ आहे. कारण उपनिषदांत उपलब्ध असलेलीं मतें किंवा विचार हीं एकाच तत्त्वज्ञाचीं किंवा एकाच आचार्यापासून निघालेल्या तत्त्वज्ञांच्या पंथाचीं नसून उपनिषदाच्या कांहीं भागांतील तत्त्वज्ञान म्हणजे निरनिराळ्या लोकांचें निरनिराळ्या काळचें पण आज एक दिसणाऱ्या संग्रहांतलें व कांहीं अंशीं सदृश असें ज्ञान होय.

उपनिषदांतील ठळक तत्त्वांत एकसूत्रीपणा दिसण्याला कारणीभूत झालेलीं कांहीं मूलतत्त्वें आहेत व डॉयसेनच्या मताप्रमाणें केवळ ह्यांनां उद्देशूनच व तेंहि मितप्रमाणानें, आपणांस "उपनिषदीय तत्त्वज्ञानपद्धति" असें म्हणतां येईल. म्हणून उपनिषदांतील प्रत्येक भागांत आपल्याला गहन ज्ञान मिळेल, किंवा प्रत्येक उपनिषदांत प्लेटोच्या संप्रदायाप्रमाणें विचारपरिपूर्ण संभाषणें आपणांस आढळतील असें मुळींच नाहीं. उपनिषदांतील कांहीं जुन्या व सुंदर भागांतून मोठमोठ्या ग्रीक तत्त्ववेत्त्यांच्या ग्रंथांतील संवादासारखे संवादहि आढळून येतात. ज्याप्रमाणें प्लेटोच्या संवादावरून आपणांस प्राचीन ग्रीक लोकांच्या जीवनक्रमाची बरोबर कल्पना होते त्याप्रमाणें जुन्या उपनिषदांवरून प्राचीन काळांतील हिंदुस्थानच्या राजे लोकांच्या दरबारांतील कार्यक्रमाचें आपणांस फारच उत्तम ज्ञान होतें. ह्या दरबारांत ब्राह्मण, सदा फिरत राहणारे अध्यापक, व विदुषी स्त्रिया पुष्कळ येत. ह्यांनीं राजाचे समोर वादविवाद करण्यासाठीं यावें व राजानें त्यांच्याशीं तत्त्वज्ञानात्मक व धर्मशास्त्रविषयक संभाषण करून आपल्या ज्ञानानें विद्वान् ब्राह्मणांसहि गोंधळून टाकावें असे प्रकार वर्णिले आहेत. एखाद्या प्रसिद्ध आचार्यांचीं प्रवचनें ऐकण्याकरितां नाना देशांतून लांब लांब प्रवास करणारे छात्रगण येत. उपनिषदांत येणेंप्रमाणें त्या वेळची अध्ययन-पद्धति अंशेंकरून व्यक्त होते*. परंतु ह्या गहन तत्त्वज्ञानाचे कांहीं भाग व प्लेटोच्या संभाषणाशीं समान असे कांहीं भाग वगळले तर उपनिषदांत असा पुष्कळ भाग आढळून येईल कीं तत्त्वज्ञान किंवा वाङ्मय ह्या नात्यानें तो बराच कमी दर्जाचा आहे.

**ब्रह्म.**–उपनिषदांत ब्रह्म व आत्मा यांविषयींच्या दोन कल्पनांचा सविस्तर विचार केलेला आहे; उपनिषदांतील तत्त्वज्ञान

---

* छांदोग्य उपनिषद् ३, ११, ११, ५; डॉयसेन पान १२ पहा. †उपनिषद् हा शब्द उपनिषदांतहि आढळतो. ह्याचे तीन निरनिराळे अर्थ आहेत (१) "गूढ अर्थ" ओम् ह्या शब्दाचा गूढार्थ (२) "गुप्त शब्द" असे कांहीं शब्द किंवा वाक्यें आहेत कीं त्यांचा अर्थ ज्यांचा त्यांत प्रवेश झाला असेल त्यांसच कळतो. जसें "तज्जलान्" त्याचे ठिकाणीं वृद्धिंगत होणारा, त्याचे ठिकाणीं गमन करणारा व त्याचे ठिकाणीं वास करणारा किंवा "सत्यस्य सत्यम्" म्हणजे श्रेष्ठ विभूतीचें एक नांव (३) "गूढ विषय" म्हणजे गुप्तज्ञान आणि "एकांतोपदिष्ट तत्त्वें." डॉयसेन् पान १६ पहा. ¶ Deussen, Sechzig Upanishadas des Veda p. 627 etc.

* तैत्तिरीय उपनिषद्. १.३.

समजून घेण्यासाठीं या दोन कल्पना पूर्णपणें समजून घेतल्या पाहिजेत. 'ब्रह्मन्' या शब्दाची व्युत्पत्ति वादग्रस्त आहे. "जीवात्म्याची पूर्णता दर्शविणारी व ईश्वरसन्निध जाऊं इच्छिणारी जी निष्ठा" त्या निष्ठेस पिटर्सबर्गच्या संस्कृत शब्दकोशांत ब्रह्मन् असें म्हटलें आहे. "पवित्र व दैविक अशी उच्चवस्तु मिळविण्यासाठीं धडपड करणारी मानवी इच्छा" असा 'ब्रह्मन्' या शब्दाचा अर्थ डॉयसेन* यानें केला आहे. आजच्या सुधारलेल्या जगाच्या देवाविषयींच्या कल्पनांशीं जुळणारीं अशीं हीं उपनिषदांवर रचलेलीं पाश्चात्त्य स्पष्टीकरणें आहेत. परंतु संहिता व ब्राह्मण या ग्रंथांमध्यें देव व मानव यांच्या संबंधाची जी प्राचीन कल्पना दिलेली आहे त्या कल्पनेहून हीं स्पष्टीकरणें भिन्न आहेत. 'ब्रह्म' या शब्दाची व्युत्पत्ति बरोबर माहित नाहीं. 'प्रार्थना गाणें किंवा मांत्रिक-नियम'या अर्थानें 'ब्रह्मन्' हा शब्द अगणित वेळां आलेला आहे; देवांपासूनच कांहीं तरी प्राप्त करून घेण्यासाटीं त्यांच्यावर वर्चस्व मिळविण्याच्या इच्छेनें किंवा कांहीं तरी देण्याचें त्यांना भाग पाडण्याच्या इच्छेनें उच्चारिलेलीं सूक्तें किंवा ऋचा या अर्थानें 'ब्रह्मन्' हा शब्द नेहमीं वापरलेला आहे. कालांतरानें तीन वेदांमध्यें जेव्हां या मांत्रिक नियमांचा व प्रार्थनांचा समावेश करण्यांत आला, तेव्हां यांना 'त्रयी विद्या' किंवा थोडक्यांत 'ब्रह्मन्' असेंहि म्हणूं लागले. वेद किंवा ब्रह्मन् हे दोन्ही शब्द अगदीं एकाच अर्थानेंहि वापरलेले आहेत. यांची ईश्वरापासून उत्पत्ति झालेली आहे अशी कल्पना असल्यामुळें, व भारतीयांच्या कल्पनेप्रमाणें, दैविक शक्ति असलेल्या यज्ञाची उत्पत्ति वेदापासून झाल्यामुळें, किंवा वेदामध्यें त्याचा अन्तर्भाव† होत असल्यामुळें, 'ब्रह्मन्' या शब्दाचा अर्थ अखेरीस 'ईश्वराची उक्ति' किंवा पवित्र ज्ञान असा होऊं लागला. कारण ब्रह्मदेवाची उत्पत्ति सर्वांत अगोदरची ( ब्रह्म प्रथमजम् ) असून शेवटीं त्याच्याच योगानें सर्वांची उत्पत्ति व्हावयाची होती. 'ब्रह्मन्' हें ईश्वरी आदितत्त्व ब्रह्म स्वयंभु आहे ही पुरोहितांच्या तत्त्वज्ञानाची कल्पना असून प्रार्थना व यज्ञविषयक‡ अशा ब्राह्मणांच्या कल्पना आहेत त्या कल्पनांशीं ही कल्पना जुळविण्यांत आली आहे.

**आत्मा.**—'आत्मन्' या शब्दाचा इतिहास यापेक्षांहि साधा आहे; याचीहि उत्पत्ति अनिश्चित आहे. 'अन्' ( श्वासोच्छ्वास करणें ) या धातूपासून हा शब्द निघाला असून, "उच्छ्वास, श्वास, आत्मा" वगैरे त्या शब्दाचा अर्थ आहे असें कांहीं लोकांचें मत आहे.

'आत्मन्' हा शब्द दोन सर्वनामविषयक धातूंपासून निघाला असून त्याचा मूळ अर्थ 'हा मीं' असा आहे असें डॉयसेन* वगैरे लोकांचें मत आहे. लोकांचें मत कांहींहि असो, 'आत्मन्' या शब्दावरून केवळ तत्त्वज्ञानविषयक कल्पनेचा बोध होत नसून, तो शब्द संस्कृतमध्यें नेहमीं येणारा असून त्याचा अर्थहि अगदीं स्पष्ट आहे. त्याचा अर्थ 'स्वत' असा होतो; अनेक वेळां कर्तृवाचक सर्वनामासारखा याचा उपयोग करण्यांत येतो, जेव्हां नामासारखा याचा उपयोग करण्यांत येतो, तेव्हां देहापासून व्यक्तींचें अस्तित्व पृथक् मानून तें अस्तित्व व्यक्त करण्यासाठीं हा शब्द वापरण्यांत येतो.

उपनिषदांतील तत्त्वज्ञानांत, ब्रह्मन् व आत्मन् या दोन कल्पनांचा मिलाफ केलेला आहे. "हें सर्व ब्रह्म आहे" असा शांडिल्याच्या प्रसिद्ध उक्तीचा प्रारंभ असून, तिच्या शेवटीं आत्म्याचें वर्णन असून, ब्रह्म व आत्मा हे एक असल्याचें सांगितलें आहे. "माझ्या हृदयांतील हा माझा आत्मा तण्डुलकणापेक्षां, यवाच्या दाण्यापेक्षां किंवा मोहरी वगैरे-पेक्षांहि सूक्ष्म आहे.† परंतु, हा माझा आत्मा पृथ्वीपेक्षां, वातावरणापेक्षां, आकाशापेक्षां व सर्व ग्रहां-पेक्षांहि मोठा आहे. सर्व कृत्यें, इच्छा, सुगंध व अभिरुचि त्याच्या ठिकाणीं वास करितात; या सर्वांना त्यानें आपल्या ठिकाणीं कोंडून ठेविलें आहे. तो बोलत नाहीं व त्याला कशाचीहि अपेक्षा नाहीं. माझ्या हृदयांतील आत्मा म्हणजेच ब्रह्म होय. या जीवितापासून आत्म्याची जेव्हां ताटातूट होईल तेव्हां मीं त्याच्याशीं मिसळून जाईन. त्याला अशा प्रकारचें ज्ञान प्राप्त झालें आहे, यांत संशय नाहीं." अशा प्रकारची शांडिल्याची उक्ति होती.‡

उपनिषदांतील ही मुख्य कल्पना, थोडक्यांत चमत्कारिकपणानें डॉयसेन खालील शब्दांत व्यक्त करितोः—"जो सर्व

* System des Vedanta, p. 128. Allgemeine Geschichte der Philosophie I. 1. p. 241 &c.

† शतपथ ब्राह्मण. ५.५.५,१०. "तीन वेदांइतकें सर्व यज्ञाचें महत्त्व आहे." "मंत्रांमध्यें म्हणजे वेदामध्यें याज्ञिक कृत्यें सांगितलेलीं आहेत". छांदोग्य-उपनिषद्, ७.४, १.

‡ Weber has compared ब्रह्मन् with the logos-idea in neo-Platonism and in Christianity. Thus also Deussen, system des Vedanta p. 51 and Max F. Hecker, Schopenhauer und die Indische Philosophie (Cologne 1897), p. 3. Deussen desires to bring ब्रह्मन् into accord with the "Will" of Schopenhauer, but, as Hecker (p. 82) mildly expresses it, is forced "to offer some violence to the conception of ब्रह्मन्." असें विंटरनिट्झ म्हणतो.

* Allg. Geschichte des Philosophie I, 1, p. 285.

† आपल्या केंसाळ पांढऱ्या कुत्र्याला 'आत्मन्' असें शोपेनहावर यानें नांव दिलें होतें. वेदांतांतील मताला अनुसरून, मनुष्याचा व पशूचा आत्मा हे समान आहेत हें दर्शविण्याची त्याची इच्छा होती. ‡ 'सर्वं खल्विदं ब्रह्म'। अणीयान्व्रीहेर्वा यवाद्वा सर्षपाद्वा श्यामाकाद्वा श्यामाकतण्डुलाद्वा एवं म आत्मा...छान्दोग्य उपनिषद् ३.१४.

प्राण्यांच्या देहांत वास करितो, जो सर्व प्राण्यांनां उत्पन्न करून त्यांचें पालनपोषण करून आपल्यामध्यें जो विलीन होण्यास लावितो तो अनाद्यनन्त, व दैविक ब्रह्मदेव, व बाह्य वस्तूंचा त्याग करणारा व जो आमच्या हृदयांतील खरा प्राण* आहे तो आत्मा हे दोन्ही एकच आहेत." हें तत्त्व उपनिषदामध्यें फार सुज्ञपणें व स्पष्टपणें व्यक्त केलें आहे. 'तत्त्वमसि' म्हणजे अखिल विश्व व ब्रह्म हीं दोन्ही तूंच आहेस; किंवा जगाची जोंपर्यंत तुला जाणीव आहे तोंपर्यंत जग अस्तित्वांत राहील या वाक्यानें लाखों भारतीय आपले आध्यात्मिक विचार प्रकट करित असत; या वाक्याचा शोपेनहावरनें अनेक वेळां उल्लेख केला आहे. विश्व व ब्रह्म, ब्रह्म व आत्मा† हे एक आहेत ही कल्पना तत्त्वज्ञानी कवींनीं कशी विशद करून सांगितली आहे तें पाहूं.

**आत्म्याचें सर्वव्यापित्व.**—"श्वेतकेतु हा उद्दालक आरुणीचा पुत्र होता. एखाद्या गुरूजवळ वेदांत शिकण्यासाठीं तूं जा कारण वेद शिकल्याशिवाय 'ब्राह्मण' हें नांवहि धारण न करण्याची आपल्या कुलामध्यें चाल आहे." असें श्वेतकेतूस त्याच्या पित्यानें सांगितलें; अशा प्रकारें शिष्य या नात्यानें तो आपल्या वयाच्या बाराव्या वर्षी एका गुरूजवळ गेला व वयाच्या चाळिसाव्या वर्षी वेदांतील सर्व गोष्टी शिकून तो परत आला; परंतु तो गर्विष्ठ व हट्टी बनून आपल्याला मोठा विद्वान् समजूं लागला. नंतर त्याचा पिता त्यास म्हणाला, "हे श्वेतकेतु, तूं गर्विष्ठ व हट्टी असून आपल्या विद्वत्तेची तुला घमेंड आहे, तर ज्या तत्त्वाच्या योगानें जें अश्रुत असतें तें श्रुत होतें, ज्याची पूर्वी कल्पना नसते त्याची कल्पना येते व जें आपल्याला अवगत नसतें तें अवगत होतें, त्या तत्त्वाची तूं चवकशी केली आहेस किंवा नाहीं तें मला सांग; या तत्त्वाचें स्वरूप कोणत्या प्रकारचें आहे? ज्याप्रमाणें मातीच्या एका गोळ्यावरून सर्व प्रकारच्या मातीच्या वस्तूंची कल्पना होते; नांवें निराळीं असलीं तरी ती सर्व मातीच असते, व ज्याप्रमाणें एका तांब्याच्या वस्तूवरून तांब्याचे एकंदर गुणधर्म समजतात, फक्त नांवांमध्यें भिन्नता असते, परंतु तें सर्व तांबेंच असतें; व ज्याप्रमाणें कातरीवरून लोखंडाची सर्व माहिती कळते, फक्त नांवांत भिन्नता असते, परंतु तें सर्व लोखंडच असतें, त्याचप्रमाणें या तत्त्वाची गोष्ट आहे." पुत्र म्हणाला, "माझ्या परमपूज्य गुरूंनां या तत्त्वाची खास माहिती नसली पाहिजे; कारण त्यांनां माहिती असती तर खात्रीनें त्यांनीं ती माहिती मला दिली असती; तर मग मला ती माहिती आपण द्या" असें त्यानें आपल्या पूज्य पित्यास सांगितलें. "माझ्या लाडक्या, ठीक आहे" असें म्हणून त्याचा पिता सांगूं लागला, 'एकमेवाद्वितीयम्' असें फक्त सत्तत्त्व आरंभीं होतें; परंतु 'एकमेवाद्वितीयम्' असें फक्त असत्तत्त्व प्रारंभीं होतें असें अनेक लोकांचें म्हणणें आहे; व या असत्तत्त्वापासून सत्तत्त्वाची उत्पत्ति झाली. "परंतु ही गोष्ट कशी घडावी? अर्थात् 'एकमेवाद्वितीयम्' असें फक्त सत्तत्त्व प्रारंभीं होतें." या सत्तत्त्वानें उष्णता उत्पन्न करून त्या उष्णतेच्या योगानें जल उत्पन्न झालें व जलाच्या योगानें अन्नरस उत्पन्न झाला व या तीन आदितत्त्वांमध्यें शिरून त्या सत्तत्त्वानें स्वतःपासून इंद्रियें उत्पन्न केलीं. तेज, आप व अन्न किंवा तेज, आप व अग्नि या तत्त्वांमध्यें सर्वस्वाचा लय कसा होतो, हेंहि निद्रा, क्षुधा व तृष्णा यांच्यासंबंधानें बोलतांना त्यानें सांगितलें. हीं तीन तत्त्वें सत्तत्त्वांवर अवलंबून आहेत असेंहि त्यानें सांगितलें. परंतु आत्म्याप्रमाणेंच या सत्तत्त्वाला जीवात्मा असून त्याचा सर्व प्राण्यांमध्यें शिरकाव झालेला आहे; व हीच गोष्ट आपल्या जीवात्म्याची आहे; सबब मनुष्य मरण पावल्यावर तो आपल्या मूळच्या स्थितीप्रत जाऊन ज्या सत्तत्त्वापासून त्याची उत्पत्ति झाली होती त्या सत्तत्त्वाशीं त्याचा मिलाफ होतो. सत्तत्त्व, जीवात्मा व विश्व हीं एकच आहेत असें दर्शविणारें वर्णन केलेलें आहे. "ज्याप्रमाणें वेगवेगळा रस जमवून तो मधमाशा अशा रीतीनें एकत्र करितात कीं, त्या रसांत भिन्नता न राहिल्यामुळें हा रस या झाडाचा असून तो त्या झाडाचा आहे असें म्हणतां येत नाहीं, त्याचप्रमाणें जेव्हां सर्व प्राणी सत्तत्त्वांशीं एक होतात, तेव्हां अशा रीतीनें आपला मिलाफ झाला आहे हें त्यांस बिलकूल ओळखितां येत नाहीं; व्याघ्र किंवा सिंह, लांडगा किंवा डुकर, कीटक किंवा पक्षी, माशी किंवा मच्छर या प्राण्यांपैकीं ते कोणीहि असले तरी त्या सर्वांचा सत्तत्त्वामध्यें लय होतो. सर्व प्राण्यांमध्यें, सत्यामध्यें, आत्म्यामध्यें व तुझ्यामध्यें हेंच सत्त्व आहे" असें श्वेतकेतूच्या पित्यानें त्यास सांगितलें. "उपदेशाच्या आणखी गोष्टी मला सांगा" असें श्वेतकेतु म्हणाला. "माझ्या लाडक्या, बरें आहे" असें त्यास उत्तर मिळालें. "पलीकडच्या अंजिराच्या झाडाचें एक फल आण, कारण तें सात्त्विक आहे" असें पिता म्हणाला. "बापाच्या आज्ञेवरून त्यानें तें फोडिल्यावर व आंत काय आहे असें विचारिल्यावर त्यांत फार चिमुकले कण आहेत असें श्वेतकेतूनें सांगितलें; व या बारीक कणांमध्यें काय आहे असें विचारिल्यावर "त्यांत कांहीं नाहीं" असें पुत्रानें उत्तर केलें. "जें सत्त्व तुला दिसत नाहीं त्या सत्त्वाच्या योगानेंच हें अंजिराचें मोठें झाड अस्तित्वांत आहे. हे श्वेतकेतु, सर्व प्राण्यांमध्यें, सत्यामध्यें, आत्म्यामध्यें व तुझ्यामध्येंहि हेंच सत्त्व आहे असें समज" असें पिता म्हणाला. "मला आणखी उपदेशामृत पाजा" असें श्वेतकेतूनें

* Allgemeine Geschichte der Philosophie I, 2, p. 37. † छांदोग्य-उपनिषद् ६.

सांगितल्यावर, "फार चांगलें" असें पिता म्हणाला. "हा मिठाचा खडा पाण्यामध्यें टाकून उद्यां सकाळीं तूं माझ्याकडे ये" असें श्वेतकेतूच्या पित्यानें त्यास सांगितलें.

"पित्याच्या आज्ञेप्रमाणें श्वेतकेतु दुसऱ्या दिवशीं त्याच्याकडे गेल्यावर, पाण्यांत टाकलेलें मीठ आणण्यास त्यानें त्यास सांगितलें; तो तें शोधूं लागला, परंतु त्यास तें सांपडलें नाहीं; तें नाहींसें झालें होतें. एका बाजूचें पाणी चाखून त्याची चव कशी आहे तें सांग असें बापानें विचारिल्यावर, 'तें खारट आहे' असें श्वेतकेतूनें उत्तर दिलें. दुसऱ्या बाजूचें व मध्यभागचें पाणी चाखून त्याची चव कशी आहे असा पित्यानें प्रश्न केल्यावर, 'तेंहि खारट आहे' असें श्वेतकेतूनें सांगितलें. त्या पाण्याबरोबर कांहीं तरी खाण्यास त्यास सांगण्यांत आलें. त्यानें तसें केलें, परंतु खारटपणा कायम असल्याचें त्यानें सांगितलें. त्यावर त्याचा पिता म्हणाला "माझ्या लाडक्या, या देहामध्यें सत्तत्त्व असल्याचें जरी तुला दिसत नाहीं, तरी तें तेथें आहे; हे श्वेतकेतू, सर्व प्राणी, सत्य, आत्मा व तूं स्वतः या सर्वांच्या ठिकाणीं हें सत्तत्त्व आहे."

ईश्वरी तत्त्व किंवा ज्याला जर्मन तत्त्ववेत्ता कँट केवल-वस्तु (Ding-an-sich) असें म्हणतो त्याचा शोध लावण्याचा प्रयत्न प्राचीन भारतीय तत्त्ववेत्त्यांनीं कळकळीनें व उत्साहानें केला मग, ते त्या ईश्वरी तत्त्वाला 'एकच एक' किंवा 'सत्' असें म्हणोत, किंवा ब्रह्म अथवा आत्मा असें म्हणोत. गार्ग्य बालाकि या नांवाचा एक गर्विष्ठ विद्वान् ब्राह्मण, काशीचा राजा अजातशत्रु याजकडे येऊन, त्यास त्यानें 'ब्रह्म' समजावून देण्याचें कबूल केलें, ही गोष्ट दोन निरनिराळ्या स्वरूपांत* दोन उपनिषदांत आलेली आहे. सूर्यांतील, चंद्रांतील, विद्युल्लतेमधील, आकाशांतील, वायूंतील, अग्नींतील व जलांतील पुरुषाचें म्हणजे परमात्म्याच्या तेजाचें त्यानें विवरण केलें; व नंतर प्रतिध्वनि, ध्वनि, स्वप्न, मानवी देह किंवा नेत्र यांमध्यें जें तेज, प्रतिबिंब किंवा छाया म्हणून दिसतें तें ब्रह्म आहे असें त्यानें सांगितलें. परंतु अजातशत्रूचें वरील स्पष्टीकरणानें समाधान न झाल्यामुळें, त्या विद्वान् ब्राह्मणानें 'ब्रह्म' समजावून देण्याविषयीं राजास सांगितलें; 'पुरुषा'मध्यें म्हणजे आत्म्यामध्येंच खरें ब्रह्म आढळतें असें राजानें त्या ब्राह्मणास सांगितलें. "ज्याप्रमाणें आपल्या अंगापासून कोळी आपलें जाळें तयार करितो, अग्नीपासून लहान लहान ठिणग्या सर्वत्र पसरतात, त्याचप्रमाणें सर्व प्राणवायु, सर्व जगत्, सर्व देव व सर्व भूतें या आत्म्यापासून निघालेलीं आहेत."

**परमात्मा व जीवात्मा.**—उपनिषदांतील एका प्रसिद्ध उताऱ्यांत परमात्मा व जीवात्मा यांमधील भेद सांगितला आहेः—

"ज्याला असत् कधीं शिवत नाहीं, कालाची ज्याला बाधा होत नाहीं, जो अमर असून ज्याला कोणत्याहि प्रकारची काळजी नाहीं, जो क्षुधाविरहित व तृष्णाविरहित आहे, ज्याच्या इच्छा खऱ्या असतात, त्या आत्म्याचा शोध करून त्याची ओळख करून घेण्याचा प्रयत्न करावा; त्या आत्म्याचा शोध लावून एखाद्यानें त्याला ओळखिल्यास सर्व लोक त्याला प्राप्त होतात व त्याच्या सर्व इच्छा सफल होतात" असें प्रजापतीचें वचन आहे. हें वचन सुरासुरांनीं श्रवण केल्यावर ते म्हणाले, "ज्याचा शोध लाविल्यानें सर्व लोक प्राप्त होऊन सर्व इच्छा सफल होतात, त्या आत्म्याचा आपण शोध लावूं." नंतर देवांपैकीं इन्द्र व असुरांपैकीं विरोचन हे दोघे पूर्वी ठरविल्याशिवाय *हातांत इंधन घेऊन प्रजापतीकडे गेले.

"ते त्याच्यापाशीं बत्तीस वर्षें राहिल्यानंतर प्रजापति त्यांस म्हणाला, "कोणत्या इच्छेनें शिष्य होऊन तुम्हीं येथें राहिलां आहांत?" ते म्हणाले, "असत् ज्याला स्पर्श करूं शकत नाहीं, कालाचा ज्यावर परिणाम होत नाहीं, जो अमर व वीतचिंत आहे, जो क्षुधाविरहित व तृष्णाविरहित आहे, ज्याच्या इच्छा खऱ्या असून ज्याचा निश्चय डळमळीत नसतो त्या आत्म्याची ओळख करून घेण्याचा प्रत्येकानें प्रयत्न केला पाहिजे; त्याचा तपास करून त्याची ओळख करून घेतल्यास सर्व लोक प्राप्त होऊन, सर्व इच्छा परिपूर्ण होतात, हें आपलें भाषण आम्हीं ऐकिल्यामुळें, या आत्म्याची ओळख करून घेण्याच्या इच्छेनें आपले शिष्य होऊन आम्हीं येथें राहिलों आहोंत." नेत्रांमधील किंवा प्रतिबिंबांतील 'पुरुषास' आत्मा असें म्हणतात, असें प्रजापतीनें त्यांस सांगितलें. वरील विधानानें विरोचनाचें समाधान होऊन तो असुरांकडे परत गेला, व देह हाच आत्मा आहे, यास्तव सर्व लोक प्राप्त करून घेण्यासाठीं काळजीपूर्वक फक्त शरीराचें रक्षण केलें पाहिजे असें त्यानें त्यांस सांगितलें. परंतु प्रजापतीनें आत्म्याची माहिती मनःपूर्वक सांगितली नाहीं, असें इन्द्राला वाटल्यामुळें त्याचें समाधान न होतां तो प्रजापतीपाशीं शिष्य म्हणून पुन्हां बत्तीस वर्षें राहिला. नंतर त्याला प्रजापति म्हणाला, "जो स्वप्नामध्यें† यथेच्छ विहार

* कौषीतक्युपनिषत् ४ व बृहदारण्यक उप. २·१.

* शिष्याला गुरूपाशीं रहावें लागत असून, होमाची तयारी करणें वगैरे गोष्टींत त्याची सेवा करावी लागत असे. म्हणून, हातांत इन्धन घेऊन जाणें याचा अर्थ, एखाद्याचा शिष्य होऊन त्याजकडे शिकण्यासाठीं जाणें. † नेत्रांतील, प्रतिबिंबांतील, छायेंतील व स्वप्नांतील पुरुषाच्या प्राथमिक कल्पनेवरून, उपनिषदांप्रमाणेंच आत्म्याच्या कल्पनेचा संबंध परमात्म्याशीं जोडिला आहे; व त्याच्याशींच प्राणाचा संबंध नेहमीं जोडण्यांत येतो. श्वासोच्छ्वास, प्रतिबिंब, छाया, स्वप्नें, या आत्म्यावर विश्वास ठेवण्याच्या आद्य पायऱ्या आहेत याविषयीं प्राचीन लोकांचें विलक्षण एकमत आहे. (cf. E. B.

करितो, तोच आत्मा होय; तो अमर व आपत्तिविरहित असून त्यालाच ब्रह्म असें म्हणतात." नंतर संतुष्ट होऊन इन्द्र निघून गेला. परंतु देवांजवळ जाऊन पोहोंचण्यापूर्वीच स्वप्नचित्र हाहि खरा आत्मा असूं शकणार नाहीं असें इन्द्रास वाटल्यामुळें तो प्रजापतीकडे पुन्हां येऊन त्याच्याजवळ आणखी बत्तीस वर्षें राहिला. स्वप्नविरहित गाढ निद्रेंतील आत्मा हाच खरा आत्मा होय असें प्रजापतीनें इन्द्रास सांगितलें. परंतु या गोष्टीवरूनहि इन्द्राचें समाधान न झाल्यामुळें तो परत आला; प्रजापतीनें त्यास आणखी पांच वर्षें ठेवून घेतलें; व सरतेशेवटीं खऱ्या आत्म्याचें स्वरूप त्यानें त्यास सांगितलें. 'हे इन्द्रा, हा देह विनाशी असून याच्यावर मृत्यूचा ताबा आहे; अमर व विदेही अशा आत्म्याचें तें वसतिस्थान आहे. देहाच्या उपाधीनें बद्ध झालेला हा आत्मा, वासना व द्वेष यांहीं युक्त आहे; जोंपर्यंत देहाशीं हा बद्ध झालेला असतो, तोंपर्यंत वासना व द्वेष यांचा प्रतिकार त्यास करितां येत नाहीं; परंतु हा देहविरहित झाला म्हणजे वासना व द्वेष यांची यत्किंचितहि त्याला बाधा होत नाहीं. आपण आकाशाकडे दृष्टि लाविली असतां तो आत्मा नेत्रांतील तेज ( पुरुष ) बनतो व नेत्र हे निमित्तमात्र पहाण्याचें यंत्र होतात. "याचा मीं सुवास घेईन" हें जाणणारा आत्मा तो हाच;' नाक हें निमित्तमात्र आहे. "मीं असें भाषण करीन" असें जाणणारा आत्मा तो हाच; ध्वनि निमित्तमात्र होय. "हें मीं श्रवण करीन" असें जाणणारा तो हाच आत्मा; कान निमित्तमात्र असतात. "याचा मीं विचार करीन" असेंहि जाणणारा आत्मा हाच असून मन हा त्याचा दिव्य चक्षु असतो. जेव्हां मनानें किंवा दिव्य चक्षूनें इच्छित वस्तू दृष्टीस पडतात तेव्हां हाच आत्मा संतुष्ट होतो. ब्रह्मलोकामध्यें याच आत्म्याची देव उपासना करितात; या उपासनेच्या योगानें देवांनां सर्व लोक प्राप्त होऊन त्यांच्या सर्व इच्छा परिपूर्ण होतात. या आत्म्याची चौकशी करून त्याला जो पूर्णपणें ओळखितो त्याला सर्व लोक प्राप्त होऊन त्याच्या सर्व इच्छा सफल होतात' असें प्रजापतीनें * इन्द्रास सांगितलें."

**आत्मा व जगत्.**—या ठिकाणींहि ज्ञाता व विवेकी असा जीवात्मा म्हणजेच परमात्मा असेंच सांगितलें आहे; परंतु हा आत्मा व जगत् हीं एकच आहेत व ज्या प्रमाणांत एखादी वस्तु ज्ञात्याच्या ज्ञानाचा विषय असते त्या प्रमाणांत त्या वस्तूला अस्तित्व असतें, असें याज्ञवल्क्य व मैत्रेयी यांच्या सुंदर भाषणांत सांगितलें आहे. तपस्वी होऊन आपलें आयुष्य अरण्यांत घालविण्यासाठीं याज्ञवल्क्य आपलें घर सोडण्याच्या बेतांत असल्यामुळें आपल्या दोन्ही बायकांनां नेमणूक करून देण्याची त्याला इच्छा झाली, व हा आपला विचार त्यानें मैत्रेयी नांवाच्या आपल्या पत्नीस सांगितला.

मैत्रेयी म्हणाली, "महाराज, जर ही पृथ्वी व तिच्यांतील सर्व धन मला प्राप्त झालें, तर त्यामुळें मी अमर होईन का?" याज्ञवल्क्य म्हणाला, "मुळींच नाहीं; परंतु तुला सुखवस्तु मनुष्याप्रमाणें राहतां येईल; धनाच्या योगानें अमर होण्याची बिलकुल आशा नको." नंतर मैत्रेयी म्हणाली, "ज्याच्या योगानें अमरत्व प्राप्त होत नाहीं, तें घेऊन मला काय करावयाचें आहे ? याच्या ऐवजीं, तुम्हांला जें ज्ञान प्राप्त झालेलें आहे, तें मला द्या." याज्ञवल्क्य म्हणाला, "खरोखर तूं मला प्रिय असून, तूं जें म्हणतेस तेंहि मला प्रिय आहे; येथें बैस; व मीं जें सांगतों तें तूं सावधान चित्तानें श्रवण कर. केवळ पतीसाठीं पतीवर प्रेम केलें जात नसून, आपल्या स्वतःच्या हितासाठीं पत्नी आपल्या पतीवर प्रेम करीत असते; पति आपल्या पत्नीवर जें प्रेम करितो तें तिच्यासाठीं नसून, आपल्या स्वतःसाठीं असतें; पुत्रांवर आईबाप जें प्रेम करितात तें पुत्रांसाठीं नसून, आपल्या स्वतःसाठीं असतें; देवांवर जें प्रेम करण्यांत येतें तें देवांसाठीं नसून, आपलें स्वतःचें कल्याण व्हावें म्हणून असतें; भूतांवर दया जी दाखविण्यांत येते तीहि त्यांच्यासाठीं नसून आपल्या स्वतःसाठींच असते; व तसेंच अखिल जगतावरील प्रेमहि जगतासाठीं नसून आपल्या स्वतःसाठीं ( आत्म्यासाठीं ) असतें; हे मैत्रेयी, हा जो आत्मा त्याचें दर्शन घेतलें पाहिजे, त्याचें श्रवण केलें पाहिजे, त्याची ओळख करून घेतली पाहिजे, व त्याच्यासंबंधीं विचार केला पाहिजे; इतकें झालें असतां, सर्व जगाची पूर्णपणें माहिती* होते.

**आत्मा व प्राण.**—उपनिषदांमध्यें आत्म्याला 'प्राण' अशी संज्ञा वारंवार दिलेली आढळते; उपनिषदांतील बराच भाग या "प्राणा"संबंधाचा आहे; व प्राण याचा अर्थ येथें आत्मा किंवा इंद्रियशक्ति असा आहे. ( या अर्थी प्राण हा शब्द बहुवचनीं असतो ). वाक्, श्वसन, चक्षु, श्रोत्र व मन या पांच इंद्रियांचें अग्नि, वायु, सूर्य, दिशा व चंद्र या पंचमहाभूतांशीं साम्य आहे. यांचा एकमेकांवर कसा परिणाम होतो, याचा उपनिषदांत वारंवार उल्लेख आलेला आहे. येथेंच आपणांस उपनिषदांतील मानसशास्त्र आढळतें (मानसशास्त्र व अध्यात्मविद्या हीं निराळीं करतां येत नाहींत).

Tylor, Die Anf"ange der Kultur Leipzig, 1873, I. P. 422 &c. Fritz Schultze, Psychologie der Naturvolker, Leipzig, 1900. P. 247 &c.)

* छांदोग्योपनिषत् ८·७–१२. "Die Belehrung der Gotter" या नांवानें या भागाचें पद्यात्मक भाषांतर Luise Hitz यानें केलें आहे Munich 1893.

* बृहदारण्यकोपनिषत् २·४. Translation by P. Deussen, Sechzig Upanishadas p. 416. &.

मुख्य इंद्रियांच्या वर्चस्वाबद्दलच्या तंट्याची नेहमीं सांगण्यांत येणारी मानसशास्त्रासंबंधाची गोष्ट सर्वांच्या परिचयाची आहे. प्राण किंवा जीवनाधार इंद्रियें यांमध्यें वर्चस्वाबद्दल कसा तंटा लागला होता हें त्या गोष्टींत सांगितलें आहे; आपल्या तंट्याचा निकाल लावून घेण्यासाठीं तीं इंद्रियें प्रजापतीकडे गेलीं. "तुम्हांपैकीं ज्याच्या विरहानें शरीर फार निकृष्टावस्थेस जाईल, तें इंद्रिय सर्वांत श्रेष्ठ होय" असें प्रजापतीनें सांगितलें. नंतर 'वाक्' इंद्रिय एक वर्षपर्यंत दूर जाऊन राहिलें; नंतर परत येऊन तें म्हणालें, "माझ्याशिवाय तुम्हीं कसे जिवंत राहूं शकलां?" प्राणी म्हणाले, "ज्याप्रमाणें मुकीं माणसें नासिकेच्या योगानें श्वासोच्छ्वास करितात, चक्षूंच्या योगानें पहातात, कर्णेंद्रियाच्या योगानें श्रवण करितात, मनाच्या योगानें विचार करितात व अशा प्रकारें त्यांनां बोलतां येत नसतांहि तीं जिवंत राहतात, त्याचप्रमाणें आम्हांला जिवंत राहतां आलें." नंतर वाक् इंद्रियानें पुन्हां शरीरांत प्रवेश केला. नंतर चक्षु निघून गेले व एक वर्षानंतर परत येऊन त्यांनीं विचारलें, "माझ्याशिवाय तुम्हाला कसें जिवंत राहतां आलें?" "एखादा अंध मनुष्य जरी त्याला दिसत नसतें तरी तो श्वासोच्छ्वास करूं शकतो, बोलूं शकतो, त्याला ऐकूं येतें व विचारहि करितां येतो, त्याचप्रमाणें दृष्टी-विरहित आम्हांला राहतां आलें" असें त्यांनां उत्तर मिळालें; इतकें ऐकिल्यावर चक्षूंनीं शरीरांत पुनः प्रवेश केला. नंतर कर्णेंद्रिय एक वर्षपर्यंत दूर जाऊन राहिल्यानंतर, परत येऊन, "माझ्याशिवाय तुम्हांला कसें राहतां आलें" असा त्यानें प्रश्न केला. "एखाद्या बहिऱ्याला जरी ऐकूं येत नाहीं, तरी इतर इंद्रियांच्या योगानें त्याला श्वासोच्छ्वास करितां येतो, बोलतां येतें, पाहतां येतें, व मननहि करितां येतें, त्याचप्रमाणें आम्हीं केलें" असें त्यास उत्तर मिळालें. इतकें झाल्यावर कर्णेंद्रियानें पुन्हां देहप्रवेश केला. नंतर मन एक वर्षपर्यंत दूर राहिलें व नंतर परत येऊन, "माझ्या-शिवाय तुमचें कसें चाललें" असा त्यानें प्रश्न केला. "ज्याला विचारशक्ति नसते असा एखादा भोळसर मनुष्य श्वासोच्छ्वास करूं शकतो, बोलूं शकतो, अवलोकन करूं शकतो, व श्रवण करूं शकतो, त्याचप्रमाणें आम्हींहि केलें" असें उत्तर त्यास मिळालें. नंतर मनानेंहि शरीरप्रवेश केला. परंतु एखादा उमदा घोडा आपलीं बंधनें ज्याप्रमाणें तोडून टाकितो, त्याप्रमाणें, श्वसनेंद्रिय प्राणानें निघून जातेवेळीं, इतर इंद्रियें तोडून टाकिलीं, तेव्हां तीं सर्व इंद्रियें प्राणाकडे येऊन म्हणालीं, "हे पूजार्ह, ये, आम्हां सर्वांमध्यें तूंच श्रेष्ठ आहेस. तूं जाऊं नकोस..." म्हणूनच इंद्रियांनां, वाक्, चक्षु, कर्ण किंवा मन असें न म्हणतां 'प्राण' असें म्हणण्यांत येतें; कारण, प्राण हेंच* त्यांचें सर्वस्व आहे.

**कर्मवाद.**—(एक) प्राण व (अनेक) प्राण यांच्या तत्त्वाचा आत्म्याच्या मुख्य तत्त्वाशीं संबंध आहे; यामुळें उपनिषदांतील तत्त्वज्ञानी कवींनां त्याच तत्त्वाच्या योगानें तत्त्वज्ञानविषयक सुंदर काव्य लिहिण्याला स्फूर्ति झाली. मनुष्य किंवा दुसरा एखादा प्राणी जागृत असतां, स्वप्नांत असतां, निद्रेंत असतां किंवा मरण पावला असतां, त्याचा आत्मा कोणत्या स्थितींत असतो, तसेंच तो ब्रह्मांत पूर्ण मिसळून जातो तेव्हां तो कसा असतो, वगैरे गोष्टींविषयीं त्या कवींनीं काव्य केलेलें आहे. परंतु बृहदारण्यकोपनिषदा (४·३–४) मध्यें आत्म्याच्या व्यापाराविषयीं जें चित्र रेखाटलेलें आहे त्याविषयीं डॉयसेन* म्हणतो कीं, भाषासौंदर्याच्या दृष्टीनें तें भारतीय वाङ्मयांत किंबहुना सर्व राष्ट्रांच्या वाङ्मयांत अद्वितीय आहे यांत संशय नाहीं. या ठिकाणीं आत्म्याच्या पुनर्जन्माच्या मताचाहि उल्लेख आहे व त्याच्याशीं अगदीं निकट संबंध असलेल्या कर्माच्या नैतिक तत्त्वाचेंहि प्रथमतःच विवरण केलें आहे. या तत्त्वाप्रमाणें कर्माचें फल निसर्गतः बिनचुक मिळतें. हा कर्मवाद उत्तरकालांत प्रत्येक रस्त्यांतून व गल्लींतून (विशेषतः बौद्ध लोकांत) शिकविला गेला. परंतु उपनिषदांत यासंबंधानें थोडें गूढच आहे. आर्तभागानें याज्ञ-वल्क्याला विचारिलें, "मनुष्याच्या मरणानंतर त्याचें वागिंद्रिय अग्नीमध्यें प्रवेश करितें, त्याचा प्राण वायूमध्यें शिरतो, त्याचे चक्षु सूर्यामध्यें जातात, त्याचें मन चन्द्रामध्यें प्रवेश करितें, श्रोत्र दिशांमध्यें प्रवेश करितें, त्याचें शरीर पृथ्वीमध्यें प्रवेश करितें, त्याचा आत्मा आकाशांत जातो, लोम ओषधींत, केश वनस्पतींत व लोहित व रेत हीं पाण्यामध्यें जातात; तर मग त्या मनुष्याचें काय होतें?" याज्ञवल्क्य म्हणाला, "हे आर्तभागा, माझा हात धर, वरील प्रश्न जाणण्याची आपणां दोघांची इच्छा आहे; यांत लोकांचा कांहीं एक संबंध नाहीं." नंतर ते दोघे बाहेर गेले व कर्माविषयीं त्यांनीं वादविवाद करून कर्माची स्तुति केली; "सत्कर्मानें मनुष्य पुण्यवान् होतो व दुष्कर्म केल्यानें दुष्ट होतो."†

देहामधून आत्मा निघून जातो त्या क्रियेचें ज्या ठिकाणीं सुंदर वर्णन केलेलें आहे त्याच ठिकाणीं या कर्मवादाचेंहि सविस्तरपणें वर्णन केलेलें आहे.

"हृदयाग्र चकाकूं लागल्यावर, पडलेल्या प्रकाशांत, चक्षूं-मधून, डोक्यांतून किंवा इतर कोणत्या तरी इंद्रियांतून आत्मा निघून जातो, व तो जात असतां, प्राणहि त्याच्या पाठोपाठ जातो व नंतर जीवनाधार अशीं इतर इंद्रियें निघून जातात; नंतर संवेदना निघून जाते, परंतु आत्मा मात्र युक्तज्ञान असतो. फक्त पूर्वजन्मींचें ज्ञान व कर्म हीं त्याच्या आत्म्याशीं

* छांदोग्योपनिषद् ५·१. बृहदारण्यकोपनिषद् ६·१, ७–१४ पहा.

* Sechoig Upanishads. p. 463 † बृहदारण्यकोप-निषद् ३·२, १३ इ.

नेहमीं रहातात. ज्याप्रमाणें एखादी कशिदा काढणारी स्त्री, कशिद्याचा थोडासा भाग उसवून, त्या जागीं अगदीं नवीन व सुंदर असा दुसरा नमुना घालते. त्याप्रमाणें, पूर्वीचा देह व अविद्या टाकिल्यानंतर हा आत्मा, अगदीं नवीन व अधिक सुंदर असें पितराचें, गंधर्वाचें ब्रह्मयाचें, प्रजापतीचें, किंवा दुसऱ्या एखाद्या प्राण्याचें रूप धारण करितो. जसें त्यानें आचरण केलें असेल, तशी स्थिति त्याला प्राप्त होते; ज्यानें सत्कृत्य केलें असेल तो पुनः साधु पुरुष होतो, ज्यानें दुष्कर्मे केलीं असतील तो पुनः दुष्ट होतो. सत्कृत्याच्या योगानें चांगला जन्म मिळतो, दुष्कर्माच्या योगानें वाईट जन्म प्राप्त होतो. म्हणून असें म्हटलें आहे, "वासनेप्रमाणें निश्चयात्मक इच्छा असते, निश्चयात्मक इच्छेप्रमाणें कर्म घडतें व कर्माप्रमाणें त्याची भवितव्यता असते; अशा प्रकारें जशी वासना असेल तसा मनुष्य होत असतो.*"

**नैतिक तत्त्वें.**—हा कर्मवाद लक्षांत घेतां ब्राह्मणग्रंथांपेक्षां उपनिषदांत, नैतिक भाग अधिक आहे. तथापि, उपनिषदांतहि प्रत्यक्ष नैतिक तत्त्वज्ञानास फारशी जागा मिळालेली नाहीं. शेवटची भेट घेणाऱ्या एका शिष्यास त्याचा गुरु तैत्तिरीय उपनिषदांत (१·११) जसा उपदेश करीत आहे, तशीं नैतिक वचनें उपनिषदांतून फारशीं आढळत नाहींत असें म्हटलें तरी चालेल.

"सत्यं वद, धर्मं चर, वेदाध्ययनाची उपेक्षा करूं नको; आचार्याला प्रिय असलेली वस्तु त्याला दिल्यानंतर (तुझा शिक्षणकाल संपल्यानंतर), संततीच्या अभावानें तुझा वंश बुडणार नाहीं असें कर...देवांच्या व पितरांच्या कार्यामध्यें कसर करूं नको; माता, पिता, आचार्य, अतिथि हे सर्व देव आहेत असें समज." वगैरे, वगैरे.

या नैतिक उपदेशापेक्षां अधिक मनोरंजक, व उपनिषदाशीं अधिक सादृश्य असणारा, असा एक नैतिक उतारा बृहदारण्यकोपनिषदांत आहे (५·२).

"देव, मनुष्य व असुर असे प्रजापतीचे तीन प्रकारचे पुत्र आपल्या पित्यापाशीं शिष्य या नात्यानें राहिले. कांहीं काल राहिल्यानंतर, "आम्हांला कांहीं तरी उपदेश करा" असें देव म्हणाले. नंतर प्रजापतीनें 'द' हें अक्षर उच्चारून "माझा उपदेश तुम्हांला समजला का?" असें त्यांनां विचारिलें. ते म्हणाले, "समजला; दम्यत (आत्मसंयमन करा) असें आपण सांगितलेंत" तो म्हणाला, "होय, तुम्हांला माझा उपदेश बरोबर समजला." नंतर मनुष्य त्याला म्हणाले, "महाराज, आम्हांला कांहीं तरी उपदेश करा" नंतर त्यानें 'द' हेंच अक्षर उच्चारून, "तुम्हांला त्याचा त्याचा अर्थ समजला का?" असें त्यांस विचारिलें. ते म्हणाले, "हो, समजला; दत्त (दान करीत जा) असें आपण म्हणालांत." तो म्हणाला, "तुम्हांला, माझें म्हणणें नीट समजलें." नंतर असुर त्याला म्हणाले, "महाराज, आम्हांलाहि कांहीं तरी उपदेश करा." त्यानें पुनः 'द' हेंच अक्षर उच्चारिलें, व "अर्थ समजला का" असें त्यांस विचारिलें. ते म्हणाले, "समजला, दयध्वम् (प्राण्यांवर दया करीत जा) असें आपण सांगितलें." तो म्हणाला, "तुम्हांला समजलेला अर्थ बरोबर आहे." आणि द, द, द, म्हणजे दम्यत, दत्त व दयध्वम् अशीच आकाशवाणी होते. म्हणून, प्रजापतीच्या आज्ञेप्रमाणें, दम, दान, व दया या तीन गोष्टी करण्यास प्रत्येकानें शिकावें."

तथापि, उपनिषदांत, नैतिक तत्त्वें क्वचितच आढळतात, ही गोष्ट सहज पटण्यासारखी आहे. ब्रह्माशीं एकरूप होणें हें सर्वांत उच्च ध्येय आहे असें उपनिषदांचें मत आहे. ज्ञान प्राप्त करून अविद्या सोडून दिल्यानेंच वरील ध्येय प्राप्त करून घेतां येतें. ईश्वर व आत्मा हे एकच आहेत याचें ज्ञान ज्याला प्राप्त झालें आहे त्यासच ब्रह्माशीं पूर्णपणें एकरूप होतां येईल. परंतु हें उच्च ध्येय मिळविण्यासाठीं सत्कर्मे व दुष्कर्मे अशा सर्व कर्मांचा त्याग केला पाहिजे. यज्ञयाग व धर्मकृत्यें यांच्या योगानें फक्त पुनर्जन्माचा फेरा चुकत नाहीं. फक्त ज्ञानाच्या योगानें जन्ममरणाच्या फेऱ्यांतून सुटका होऊन शाश्वत पद प्राप्त होतें. "ज्याप्रमाणें पद्मपत्राला पाणी चिकटून रहात नाहीं, त्याचप्रमाणें ज्याला ही गोष्ट माहीत आहे, त्याच्यावरहि दुष्कर्मांचा परिणाम होत नाहीं.*" यज्ञयागाचें ज्याला एखादें गुप्त तत्त्व माहीत असेल, ("ज्याला हें माहीत आहे") त्याचें कसें कल्याण होतें याचा ब्राह्मणांमध्यें व आरण्यकांमध्यें वारंवार उल्लेख आलेला आहे. "ज्याला याचें ज्ञान झालेलें आहे" त्याचा मोबदला म्हणून, तो सुखी व धन्य होईल, त्याला पृथ्वीवरील सर्व प्रकारचें सुख मिळून स्वर्गसुख प्राप्त होईल अशीं वचनें उपनिषदांत वारंवार दिलेलीं आहेत. याशिवाय त्यांत दुसरें कोणतेंहि वैशिष्ट्य नाहीं. ज्ञान ही एक शक्ति आहे एवढेंच नव्हे तर स्पृहणीय असें तें एक उच्च ध्येय आहे असें उपनिषदांत सर्वत्र सांगितलेलें आढळतें. एकशेंएक वर्षे शिष्य या नात्यानें प्रजापतीजवळ इंद्र राहिला होता, याचाच फक्त उल्लेख केलेला आहे असें नाहीं तर, गुरूपासून कांहीं तरी ज्ञान प्राप्त करून घेण्यासाठीं मनुष्यहि एखाद्या गुरूची अनेक वर्षेपर्यंत सेवा करीत असत असेंहि उपनिषदांत सांगितलेलें आहे.

* बृहदारण्यकोपनिषत् ४·४.

* छांदोग्योपनिषत् ४·१४,३. कौषीतक्युपनिषत् १·४; ३·८ पहा.

जो ब्राह्मण परमात्म्याचें किंवा ब्रह्माचें तत्त्व स्पष्ट करून सांगे त्यास हजारों गाई, किंवा हजारों सुवर्णमुद्रा देण्यास राजे तयार असत. अनेक वेळां राजांनां उच्च प्रकारचें ज्ञान असे. अशा राजांनां ब्राह्मणहि नमून असत. उच्च प्रकारचें ज्ञान असलेल्या भिकाऱ्यांशींहि त्यांच्या ज्ञानासाठीं धनवान् लोक नमून असत. नचिकेताच्या प्रसिद्ध कथेंत या ज्ञानलालसेबद्दल अत्यंत हृदयंगम असें वर्णन केलेलें आहे. हें काव्य काठकोपनिषदांत आलें आहे.

नचिकेतस् एकदां अधोलोकांत गेला असतां, यमानें त्याला कृपाळूपणानें तीन वर मागण्यास सांगितलें. मीं सुखरूपपणें आपल्या पित्याकडे परत जावें हा पहिला वर त्यानें मागितला. स्वर्गसुख मिळण्याबद्दल त्यानें दुसरा वर मागितला. नंतर तो म्हणाला, "मनुष्याच्या मरणानंतर त्याची काय स्थिति असते याबद्दल निश्चित मत नाहीं; कोणी म्हणतात त्याला अस्तित्व असतें, कोणी म्हणतात त्याला अस्तित्व नसतें; तेव्हां हेंच तुम्हीं मला समजावून द्यावें, हाच मीं तिसरा वर मागतों."

'मरणानंतर मनुष्याचें काय होतें हा प्रश्न इतका अवघड आहे कीं याबद्दल एकदां देवांचेंहि मन साशंक झालें होतें; यास्तव हा वर मागूं नको' अशी यमानें त्याला विनंति केली. "शतायुषी पुत्र व पौत्र, अनेक जनावरें, गज, अश्व, बहुत सुवर्ण व मोठी दौलत वगैरे मागून तूं स्वतः वाटेल तितकीं वर्षें जिवंत रहा. हा वर तूं मागितलेल्या वराच्या योग्यतेचा नसेल तर संपत्ति व दीर्घायुष्य मागून घेऊन, हे नचिकेता, तूं पृथ्वीवर नांव मिळीव; मीं तुला सर्व सुखें देतों. जी दुर्लभ गोष्ट असेल ती माग. तुला वाटतील तीं सुखें माग. मनुष्याला न मिळणाऱ्या अशा सुंदर स्त्रिया येथें रथांत बसून वादन करीत आहेत त्या पहा; तुझ्या सेवेसाठीं त्या स्त्रिया मी तुला देतों; परंतु हे नचिकेतस्, फक्त मृत्यूसंबंधीं तूं मला विचारूं नको."

परंतु या ऐहिक वस्तूंच्या प्राप्तीबद्दलच्या वचनानें नचिकेताचा निश्चय ढळला नाहीं. तो म्हणाला, "हे यमराज, दुसऱ्या दिवसाच्या काळजीनें आम्हांला दिलेल्या इंद्रियांची शक्ति क्षीण होते; मनुष्याचें पूर्ण आयुष्यहि अपुरेंच होतें; तुझे ते रथ, नाचरंग व क्रीडा तूं आपल्यापाशींच ठेव (ते मला नकोत). धनाच्या योगानें मनुष्याला सुख होणार नाहीं; तुझ्या दृष्टीकडे पाहिल्यावर द्रव्याचा लोभ कोणाला होईल? तुला वाटेल तितक्या कालापर्यंत मला तूं जिवंत ठेव, परंतु मीं मागितलेली गोष्टच वर म्हणून तूं मला दे......मरणानंतर काय होतें याबद्दल पृथ्वीवरील लोकांचीं मनें साशंक आहेत तर त्याबद्दल तूं मला माहिती दे. ज्याच्या योगानें मला या रहस्याचा शोध लागून त्याचा उलगडा होईल असा वर मला दे; दुसरा कोणताहि नको."



नंतर मृत्यूचा राजा यम यानें सुख न मागतां ज्ञान मागितल्याबद्दल नचिकेताची स्तुति केली; व अखेरीस आत्मा* अमर आहे हें तत्त्व त्यानें त्यास समजावून दिलें.

ज्ञानलालसेनें ऐहिक सुखें तुच्छ वाटून सर्व जगाबद्दलहि कसा तिरस्कार वाटूं लागतो हें दुसऱ्या एका उपनिषदांत दाखविलें आहे; भारतीय वाङ्मयांत वारंवार आढळणारा निराशावाद प्रथमतः या उपनिषदांत दृष्टीस पडतो. त्या ठिकाणीं असें लिहिलें† आहेः—

शरीर अनित्य व अशाश्वत आहे असें ज्ञान झाल्यामुळें बृहद्रथ नांवाच्या राजाला वैराग्य उत्पन्न झालें व तो आपल्या पुत्रास सर्व राज्याधिकार देऊन स्वतः तपाचरण करण्यास अरण्यांत निघून गेला. त्या अरण्यामध्यें दोन्ही हात वर करून सूर्याकडे टक लावून पाहत उभा राहून दुष्कर कायशोषलक्षण तपाला त्यानें सुरुवात केली. हजार दिवसांनंतर त्यास आत्मज्ञानी भगवान् शाक्यायनाचें दर्शन झालें. तेव्हां शाक्यायन राजास म्हणाला, "ऊठ, ऊठ, वर माग." राजानें मुनीस नमस्कार केला व म्हणाला, "भगवन्, मला आत्म्याचें ज्ञान प्राप्त झालें नाहीं. आपणांस आत्म्याचें पूर्ण ज्ञान झालें आहे असें आमच्या कानीं आलें आहे तेव्हां आपण तें ज्ञान कथन करावें. हा वर मागून न घेण्याविषयीं त्या ब्राह्मणानें राजाचें मन वळविण्याचा प्रयत्न केला व त्यास त्याव्यतिरिक्त दुसरा एखादा वर मागण्यास आज्ञा केली. तेव्हां राजा म्हणाला, "भगवन्! अस्थि, चर्म, स्नायू, मज्जा, मांस, शुक्र, शोणित, श्लेष्मा, अश्रु, मूत्र, वात, पित्त, कफ, नेत्रमल, दुर्गंध वगैरेंनीं युक्त असलेल्या या शरीराला कोणत्या प्रकारें सुख लागणार? काम, क्रोध, लोभ, मोह, भय, विषाद, ईर्ष्या, मत्सर, इष्टवस्तूचा वियोग, अनिष्टसंप्रयोग, तसेंच तहान, भूक, जरा, मृत्यु, रोग, शोक इत्यादि त्रासदायक वस्तूंनीं युक्त असलेल्या शरीरास सुख कसें लागेल? गोमाशी व गांधिलमाशी, तृण, वनसती व वृक्ष ज्याप्रमाणें अस्तित्वांत येतात व नाहींसे होतात, त्याप्रमाणेंच हें सर्व जग क्षणभंगुर व नाशवंत आहे. (पुढें इतिहासपूर्वकालीन चक्रवर्ति राजांचीं नांवें व महाधनुर्धर शूरवीरांचीं नांवें देऊन सुरासुरांचींहि नांवें दिलीं आहेत व त्या सर्वांचा नाश झाला असें वर्णन दिलें आहे.) याच गोष्टींचा काय, पण यांखेरीज अनेक वस्तूंचा नाश झालेला आहे. महार्णवांचें शोषण, महान् गिरींचें प्रपतन, ध्रुवाचें प्रचलन......पृथ्वीचें निमज्जन, सुरांचें स्थानापसरण झालेलें दिसतें. अशा या संसारांत

* वरील अर्थाचे श्लोक डॉयसेन्नें भाषांतर केलेल्या जर्मन उपनिषदांत (पा. २७०) आहेत. † लुईज हिझनें या श्लोकांची एक सुंदर रसमय प्रतिकृति केलेली आहे (Munich 1893). या कवयित्रीनें मूळांतील असंबद्ध तुकडे भावार्थ न बदलूं देतां, ठाकठीक करून, सुसंबद्ध केले आहेत.

मानवाला नुसतें सुखच कसें प्राप्त होईल? ज्यांची तृप्ति झाली आहे त्यांची पुनःपुनः कामोपभोगाकडे वृत्ति वळलेली दिसते म्हणून मला उद्धरा. या संसारामध्यें पडलेला मी एक निर्जल कूपांत पडलेला मण्डूक आहे. भगवन्, आपणच आमचे आश्रयदाते आहांत."

या प्रकारचा भाग उत्तरकालीन उपनिषदांत आहे. असेंच वर्णन अर्वाचीन लौकिक संस्कृतवाङ्मयांत व तसेंच बौद्धग्रंथांत आलेलें आढळतें.

मैत्रायण उपनिषदाची भाषापद्धति वैदिक वाङ्मयांतील भाषेपेक्षां लौकिक संस्कृतांतील भाषेप्रमाणें आहे. हें उपनिषद् खात्रीनें बौद्ध कालानंतरचें आहे.*

**नैराश्यवाद.**–प्राचीन वैदिक उपनिषदांत जग असत् व मिथ्या आहे असें तत्त्व प्रथम प्रतिपादलेलें आहे. नैराश्यवादाचा प्रारंभ प्रथम उपनिषदांत झाला आहे. ब्रह्मच फक्त सत् आहे. यासच आत्मा किंवा परमात्मा असें म्हणतात. हा आत्मा क्षुत्पिपासा, आधिव्याधी, जरामृत्यु, यांपासून अलिप्त आहे. परमात्म्याशिवाय दुसरें सर्व दुःखमूलक आहे. (अतोअन्यदार्तम्).† ब्रह्माशिवाय दुसरें कांहींहि सत् नाहीं म्हणून संसारव्याधी सुद्धा सत् नाहींत. ज्यास परमात्मा एकच आहे असें ज्ञान प्राप्त झालें आहे त्यास भय नाहीं व दुःख नाहीं. ज्याला ब्रह्मज्ञान प्राप्त झालें आहे त्याला भीति नाहीं. एकत्वाचा साक्षात्कार झालेल्यास मोह व शोक कोठून राहणार? ब्रह्मासच "आनंद" म्हणतात. परमात्मा आनंदमय आहे. उपनिषदांतील वाक्यें प्रवृत्तिमार्गाच्या विजयवाक्यांप्रमाणें गर्जत आहेत. ब्रह्म आनंद आहे. कारण आनंदापासून प्राणिमात्र उत्पन्न झाले व उत्पन्न झाल्यानंतर ते "आनंदांतच" राहतात व नाश पावल्यानंतर आनंदमयच होऊन जातात.‡

उपनिषदांतील हीं तत्त्वें नैराश्यवादात्मक नाहींत. पण जग मिथ्या आहे ह्या कल्पनेची पहिली पायरी उपनिषदांत आहे. या तत्त्वापासूनच पुढें हलके हलके जगाचा तिरस्कार उत्पन्न झाला. जों जों ब्रह्मानंदाचें महत्त्व जास्त जास्त वर्णिलें गेलें तों तों संसारजीवित असार आहे, व्यर्थ आहे, अशी कल्पना वाढत गेली.¶ याप्रमाणें अर्वाचीन भारतीय तत्त्वशास्त्रांतील नैराश्यात्मक विचारांचा मूळारंभ उपनिषदांत झालेला आहे.

* बौद्ध लोक नास्तिक आहेत याविषयींच्या कथा मैत्रायण उपनिषदांत आल्या आहेत मै. उ. ७,८. † बृहदारण्यक उपनिषद ३,५. ‡ तै. उप. २,९;३,९;३,६. ईशा. उप. ७. ¶ M. F. Hecker. Schopenhauer und die Indische Philosophie p. 116–120.

वास्तविक सर्वच अर्वाचीन भारतीय तत्त्वशास्त्रांचा उगम उपनिषदांपासून झालेला आहे. बादरायणाचीं वेदांतसूत्रें* उपनिषदांवरूनच लिहिलीं गेलीं. या ग्रंथाविषयीं एका अर्वाचीन ग्रंथकाराचें मत असें आहे कीं, सर्व वेदांतग्रंथांत बादरायण सूत्रग्रंथ प्रमुख आहे. इतर सर्व ग्रंथ त्याच्या परिपूरणार्थ लिहिले आहेत. मोक्षाची इच्छा करणाऱ्यानें याचा गौरव करावा. या सूत्रांवरून रामानुज व शंकराचार्य यांनीं ब्रह्मतत्त्वें प्रतिपादिलीं. या आचार्यांचे अजून लक्षावधि अनुयायी आहेत. पुढील सर्व शतकांतील आध्यात्मिक तत्त्वज्ञान उपनिषदांवरून लिहिलें गेलें. पुष्कळ पाखंडांनीं उपनिषदांतील विचार घेतले आहेत. बौद्धांचा धम्महि पुष्कळसा उपनिषद्ग्रंथांत व्यक्त झालेल्या कल्पनांवरून तयार झाला. उपनिषदें ईश्वरनिर्मित आहेत या कल्पनेनें कांहीं त्यांजकडे लोकांचें मन इतकें आकर्षित झालें नाहीं तर त्यांतील भाषेची हृदयंगम व प्रबुद्ध मोडणी फारच सुंदर आहे व तिच्यामुळेंच लोकांचीं मनें फार आकर्षित झालीं. या विधानास इतकें प्रमाण पुरे आहे कीं, ईश्वरनिर्मित ही समजूत उपनिषदांप्रमाणें साधीं वेदसूक्तें व गचाळ ब्राह्मणभाग यांजसंबंधानेंहि होती. परंतु त्यांजकडे उपनिषदांइतकें लोकांचें चित्त वेधलें गेलें नाहीं. असो.

शोपनहावर म्हणतो, उपनिषदांत मानवी ज्ञानाचें व बुद्धीचें उच्चतम फल व मनुष्याच्या शक्तीच्या बाहेरच्या दैविक कल्पना आल्या असल्यामुळें या ग्रंथकारांची गणना मानवजातींत क्वचितच करतां येईल.† उपनिषदांनां हजारों वर्षें झालीं व अजूनहि आपणांस शास्त्रज्ञांच्या कल्पनांशीं उपनिषदांतील कल्पना अविरुद्ध वाटतात. डॉयसेनच्या मताप्रमाणें उपनिषद्ग्रंथकारांस शास्त्रदृष्ट्या पद्धतशीर रीतीनें जरी 'जीवनरहस्य' कळलें नाहीं तरी त्यांचें त्या विषयाशीं तादात्म्य झाल्यामुळें त्यांनीं त्या विषयावर लख्ख प्रकाश पाडला. वेदग्रंथ ईश्वरनिर्मित आहेत ही प्राचीन भारतीय कल्पना सयुक्तिक आहे असें वेदांतील ज्ञानकांडानें दाखविलें. उपनिषदांत जगांत कोठेंहि न सांपडणारें असें तत्त्वज्ञान आहे.‡ या वरील गोष्टींमुळेंच उपनिषद्ग्रंथांचें महत्त्व आहे असें नाहीं, तर सत्यज्ञान मिळविण्याचा केलेला भगीरथ प्रयत्न व तत्त्वज्ञान संपादन करतांना निघालेले हृदयंगम ओजस्वी विचार या योगानें त्या ग्रंथांनां फार महत्त्व प्राप्त झालें. उपनिषदांत ईश्वरविषयक थोतांडी आणि ईश्वराच्याच नांवावर लादलेल्या कल्पना नाहींत, तर सत्याजवळजवळ जाण्याकरितां केलेला केवळ निकराचा मानवी प्रयत्न आहे. म्हणूनच यांचें महत्त्व आपणांस जास्त आहे.

एकंदर मानवी विचारांच्या इतिहासकारास उपनिषद्ग्रंथ फार महत्त्वाचे आहेत. उपनिषदांतील गुह्य तत्त्वांचा एक

* मधुसूदन सरस्वती (in Weber's "Indische Studien" I p. 9) † Hecker p. 7. ‡ Deussen system des Vedanta p. 50. 99 &c.

प्रवाह इराण देशांतील सुफीसंप्रदायामध्यें तसाच ग्रीसमधील निओप्लेटोनिक तत्त्ववेत्त्यांच्या स्फूर्तितत्त्वांत, अलेक्झांडरच्या वेळच्या ख्रिस्ती लोकांपासून तों इकर्त व टौलर यांच्या गुह्यतत्त्वांत व तसाच १९ व्या शतकांतील शोपनहावर नांवाच्या जर्मनतत्त्ववेत्त्यानें प्रतिपादिलेल्या तत्त्वांत गेलेला दिसतो. भारतीय लोकांचे जर्मन लोक किती ऋणी आहेत हें वारंवार शोपनहावरनें सांगितलें आहे. प्लेटो, कँट व वेद (शोपनहावर उपनिषदांस कधीं कधीं वेद म्हणत असे.) माझे गुरू आहेत असें शोपनहावर म्हणत असे. विश्वविद्यालयांत व्याख्यान देण्याकरितां लिहिलेल्या एका लेखांत शोपनहावरनें म्हटलें आहे कीं, "वेदामध्यें सांगितलेली जीवनरहस्याची अतिप्राचीन कल्पना व आज तुमचेपुढें मांडण्यास तयार केलेली माझी कल्पना या जवळ जवळ सारख्याच आहेत. "या शतकांतील सर्वांत मोठी देणगी म्हणजे संस्कृत वाङ्मयाचें पुनरुज्जीवन होय" असें शोपनहावरचें म्हणणें असे. पाश्चात्त्य देशांत भारतीय एकेश्वरवादाचें तत्त्व चोहोंकडे लोकप्रिय होईल असें शोपनहावरचें भविष्य आहे. शोपनहावरास उपनिषद्ग्रंथांतील तत्त्वें व त्यानें शोधून काढलेलीं तत्त्वें हीं एकच आहेत याचें राहून राहून आश्चर्य वाटे. निश्चित मत उपनिषदांत कांहीं नसलें तरी निरनिराळीं उपनिषदांतील वाक्यें एकेका विषयावरील ठाम बनवलेलीं मतें आहेत असें त्यास वाटे. तो नेहमीं आपल्या मेजावर ठेवलेल्या उपनिषद्ग्रंथांचें वाचन करी व निजतेवेळीं त्यांतील वाक्यें म्हणे. तो म्हणतो "सर्व जगामध्यें वाचनीय ग्रंथ म्हटले तर तीं उपनिषदें होत. माझ्या जीवाची शांति व मरतेसमयींची शांति या ग्रंथांत आहे."* अज्ञानदोषदर्शन व एकत्वतत्त्वाचा अपरंपार विचार हें शोपनहावरच्या मतें उपनिषद्ग्रंथांचें प्रमुख कार्य आहे.

परमेश्वरविषयक एकत्ववाद म्हणजे सर्व दृश्य विविधता असत् आहे व परमात्म्याचे नाना तऱ्हेचे कितीहि असंख्य दृश्य विभाग झाले तरी सर्व भूतलांत एकच परमेश्वर भरलेला आहे हें तत्त्व होय.† आधुनिक ईश्वरवाद्यांच्या तत्त्वज्ञानांत एकत्व म्हणजे ईश्वर एकच आहे असें मानिलें आहे. विश्वांतील सर्व गोष्टींचें एकत्वहि आधुनिक तत्त्वज्ञानानें मानलें आहे.‡ प्राचीन भारतीय लोकांच्या तत्त्वज्ञानानें तीन हजार वर्षांपूर्वींच हा आधुनिक पाश्चात्त्य तत्त्वज्ञानाचा पल्ला गांठला होता.

---

* Parerga und Paralipomena published by Frauenstädt, II, p. 427; Hecker, p. 6; &c.
† Schopenhaner Grundlage der Moral § 22 Works publ. by J. Frauenstädt IV p. 268 &c.
‡ Supplement to the Neue Freie Presse July 10. th 1904.

## प्रकरण ८ वें.

## वेदप्रवेश–वेदांगें.

मुण्डकोपनिषदांत दोन प्रकारच्या विद्या कथन केल्या आहेत. एक परा व दुसरी अपरा. परा विद्येनें अक्षर ब्रह्माच्या ज्ञानाची प्राप्ति होते. अपरा विद्येंत ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद, अथर्ववेद, शिक्षा, कल्प, व्याकरण, निरुक्त, छन्द आणि ज्योतिष यांचा समावेश होतो.* यांस वेदांचीं षडंगें किंवा उपग्रंथ असें म्हणतात. पूर्वी या ग्रंथांस कोणत्याहि तऱ्हेचे विशिष्ट ग्रंथ किंवा शाखा ग्रंथ समजत नव्हते. वेदग्रंथांचें बिनचूक व यथार्थ ज्ञान व्हावें म्हणून वेदशाळेंतून या ग्रंथांचा अभ्यास करण्याचा पाठ असे. वेदांगांचा प्रारंभ ब्राह्मणांत व आरण्यकांत झालेला दिसतो. या ग्रंथांत यज्ञयागादि प्रकरणें असून मधून मधून शिक्षा, व्याकरण, निरुक्त, छन्द आणि ज्योतिष इत्यादि विषयांचे उल्लेख आलेले आहेत. कालांतरानें प्रत्येक वैदिक उपग्रंथाची निरनिराळी स्वतंत्र शाखा बनली व वेदशाळेंतून प्रत्येक शाखेचा स्वतंत्र रीतीनें पद्धतशीर अभ्यास होऊं लागला.

शिक्षण देण्यास व ध्यानांत ठेवण्यास सुलभ जावें म्हणून गद्यात्मक सूत्रें रचण्यांत आलीं. सूत्र शब्दाचा धात्वर्थ दोरा असा आहे व नंतर थोडक्या शब्दांत कथन केलेला लघु नियम असा त्याचा अर्थ बनला. लहान लहान धागे एकत्र विणल्यानें जसें वस्त्र तयार होतें, तशीं लहान लहान सूत्रें एकत्र केलीं असतां एक पद्धतशीर ग्रंथ बनतो. अशा तऱ्हेचीं अनेक सूत्रें असलेल्या ग्रंथास 'सूत्रग्रंथ' अशी संज्ञा दिलेली असते. हे ग्रंथ केवळ व्यावहारिक दृष्टीनें लिहिले आहेत. विद्यार्थ्यांनां पाठ करण्यास सुलभ जावें म्हणून सूत्रग्रंथांत कोणतें तरी शास्त्र पद्धतशीर रीतीनें थोडक्यांत सूत्ररूपानें निवेदन केलेलें असतें. भारतीय लोकांच्या सूत्रांसारखी कल्पना जगांतील कोणत्याहि वाङ्मयांत आढळत नाहीं. सूत्रग्रंथकर्त्यांचें मुख्य काम म्हणजे कोणत्याहि गोष्टींचा उल्लेख शक्य तितक्या थोड्या अक्षरांत करणें हें होय. यामुळें कित्येक वेळां हीं सूत्रें अर्थावगमास फारच कठिण होतात. अक्षरांच्या काटकसरीसंबंधानें व्याकरणकर्ता पतञ्जली म्हणतो कीं, सूत्रकारास एखादी अर्धमात्रा कमी करून जर सूत्र रचतां आलें तर त्यास पुत्रजन्माइतका आनंद होतो.

विद्यार्थी संक्षिप्त सूत्रेंच फक्त म्हणतात. सूत्राचें आवश्यक स्पष्टीकरण आचार्यद्वारा शिकावें लागतें. कालांतरानें आचार्यांनीं सूत्रांच्या स्पष्टीकरणार्थ टीका लिहिल्या. या टीका

---

* मुण्डकोपनिषद् मु. १ ख. १ श्लो. ५.
तत्रापरा ऋग्वेदो यजुर्वेदः सामवेदोऽथर्ववेदः ।
शिक्षा कल्पो व्याकरणं निरुक्तं छन्दो ज्योतिषमिति ॥

वाचल्यानें सूत्रग्रंथ समजण्यास सुलभ जातो. या सूत्रग्रंथांवरील टीका वंशपरंपरेनें राखून ठेवलेल्या आहेत. या टीका जर उपलब्ध नसत्या तर सूत्रग्रंथ दुर्बोध झाले असते. ब्राह्मणांतील गद्यानुसार लिहिलेली ही विशिष्ट तऱ्हेची सूत्रपद्धति दिसते. ब्राह्मणांतील गद्यामध्यें लहान लहान वाक्येंच प्रामुख्यानें सांपडतात. कांहीं सूत्रें संवादरूपानें घातलेलीं आहेत. प्रधानवाक्यांची संगति क्वचित् ठिकाणीं संबंधी संकेतार्थी वाक्यानें मोडलेली दिसते. वाक्यांचा एकसूत्रीपणा कांहीं ठिकाणीं भंग पावलेला दिसतो. पुनरुक्तीनें आलेला गौणपणा सोडून दिला तरी अशीं पुष्कळ संवादरूपानें दिलेलीं बोधप्रद वाक्यें आहेत कीं, त्यांचा अर्थ सांगतेवेळीं स्पष्टीकरणार्थ पदरचे वरेचसे शब्द घालावे लागतात. सूत्रामध्यें ज्याप्रमाणें धातुसाधित संबंधी शब्दांनीं तुटक तुटक वाक्यें जोडलेलीं सांपडतात त्याप्रमाणेंच ब्राह्मणांतील गद्य भागांतील वाक्यें धातुसाधित शब्दांनीं जोडलीं असतां जास्तजास्त सुलभ होत जातात.

शब्द कमी लागावे म्हणून नवीन तऱ्हेची संक्षिप्त वाक्यरचनेची योजना केलेली आहे. सूत्रामध्येंच प्रथम लांबलचक समास दृष्टीस पडतात; व ही समासपद्धति लौकिक संस्कृतांत जास्त जास्तच वाढत चाललेली दिसते व उत्तरोत्तर ही एक लिहिण्याची उत्तम तऱ्हेची मोडणी समजली गेली. ब्राह्मणांतील गद्याला अनुसरूनच सूत्रपद्धति निघाली आहे हें सूत्रांत घेतलेल्या ब्राह्मणांतील अवतरणांवरून व ब्राह्मणांतील गद्यानुसार लिहिलेल्या सूत्रभागांवरून स्पष्ट होतें.*

**कल्पसूत्रें (श्रौत, गृह्य, धर्म).**—प्राचीन सूत्रग्रंथांतील विषय व ब्राह्मणें आणि आरण्यकें यांमधील विषय एकच आहे म्हणून या ग्रंथांचें विशेष साम्य आहे. ऐतरेय आरण्यकांत असे पुष्कळ भाग आहेत कीं, त्यांस जवळजवळ सूत्रेंच म्हणतां येईल. हे भाग आश्वलायन व शौनक सूत्रकारांनीं लिहिले आहेत अशी परंपरा आहे.† सामवेदाचे कांहीं ग्रंथ ब्राह्मण या संज्ञेनें प्रसिद्ध आहेत, पण ती संज्ञा चुकीची आहे. कारण वास्तविक ते सूत्रग्रंथ आहेत. त्यांतील विषयाचें परीक्षण केलें असतां या ग्रंथांचा वेदांग वाङ्मयांत समावेश करावा लागतो. ब्राह्मणांतील प्रतिपाद्य विषय समाविष्ट केलेले कल्पग्रंथ ते वेदांगें होत. यांत यज्ञविधींचें संगतवार वर्णन दिलेलें असतें. या ग्रंथांस कल्पसूत्रें असें म्हणतात. ऋत्विजांच्या सोयीकरितां व यज्ञयागादि नियमांचे मंत्र ध्यानांत ठेवण्यास सुलभ जावें म्हणून थोड्या सांकेतिक शब्दांत पद्धतशीर रीतीनें केलेलीं सूत्रें अतिशय जरूर भासल्यामुळें हे ग्रंथ लिहिण्यांत आले. ब्राह्मणांत सांगितलेले श्रौतसंस्कार किंवा दररोज व्यवहारांत लागणारे गृह्यसंस्कार किंवा विधी ज्या कल्पसूत्रांत आले असतील त्यांस विषयानुसार श्रौतसूत्र किंवा गृह्यसूत्र अशी संज्ञा प्राप्त होते.

श्रौतसूत्रांत तीन अग्नींवर करावयाचीं कार्यें व त्यांचे मंत्र दिलेले आहेत व तसेंच अमावास्येस व पौर्णिमेस करावयाच्या इष्टी, ऋतुयज्ञ, पशुयज्ञ व निरनिराळ्या तऱ्हेचे सोमयज्ञ यांना आवश्यक असे मंत्र दिलेले आहेत. भारतीय यज्ञसंस्काराची माहिती मिळविण्यास हे ग्रंथ फार उपयुक्त आहेत पण धर्मेतिहासाच्या दृष्टीनें तर ते विशेषच महत्त्वाचे आहेत.* श्रौतसूत्रांचें जनकत्व त्रयीकडे जातें व गृह्यसूत्रांचें अथर्ववेदाकडे जातें.

गृह्यसूत्रांतील विषय विविध असून फार मनोवेधक आहेत.† भारतीय लोकांच्या एकाग्नीवरील गृह्य विधींची व जुन्या चालीरीतींची माहिती या सूत्रांत दिली आहे. जन्मसंस्कारापासून तों अंत्यसंस्कारापर्यंतचे सर्व तऱ्हेचे संस्कार या सूत्रांत दिलेले आहेत. कांहीं सूत्रोक्त संस्कार आजपर्यंत चालू आहेत आणि कांहीं (शूलगव, मांसमधुपर्क इ.) नष्ट झाले आहेत.

---

* शांखायन–श्रौतसूत्रांतील कांहीं कांहीं भाग ब्राह्मणांतील गद्यपद्धतीनुसार लिहिलेले आहेत. (Weber Indische Litteratur geschichte, p. 59. Hillebrandt in the preface to his edition of the शांखायन–श्रौतसूत्र) बौधायन सूत्रांत अशाच तऱ्हेचे पुष्कळ भाग आढळतात. † Max Muller, History of Ancient Sanskrit Literature पान ३१४ व ३३९ पहा.

* श्रौतसूत्राचें पाश्चात्त्य भाषांत भाषांतर अजून झालेलें दिसत नाहीं तरी पण कांहीं भागांचें भाषांतर खालील पुस्तकांत दिलेलें आहे. Hillebrandt Das altindichse Neu–und Vollmoud opfer Jena 1879; Julius Schawb, Das altindische Treopfer Erlangen 1886. संपूर्ण कल्पवाङ्मयांतील श्रौत व गृह्य सूत्रांतील विधींचें मुख्य वर्णन सविस्तर रीतीनें खालील पुस्तकांत दिलें आहे. A. Hillebrandt in the Grundriss Vol III Book. 2. (Ritual–Litterature Vedische opfer und Zauber strassburg 1897). खालील ग्रंथांत श्रौतसूत्रांचें धर्मशास्त्रदृष्ट्या महत्त्व मानलें आहे. H. Hubert and M. Marss in their "Essai sur la nature et la fonction du sacrifice" (Annee Sociologigue Paris 1897–1898 pp. 29, 13–8.) † खालील प्रतींत गृह्यसूत्रांचें भाषांतर दिलेलें आहे व त्यामुळें तीं चांगलीं समजतात. Indische Hausregeln, published in Sanskrit & German by A. F. Stenzler. I. Acvalâyan Leipzig 1864-65. II Pâraskara.–Leipzig 1876 & 1878. (Abhandlungen für die Kundedes Morgenlandes III, IV & VI). The शांखायनगृह्य (Sanskrit & German) by H. Oldenberg (in Vol 15 of the Indische Studien). Frudrich Knauer याचें "the Gobhilagirhya sūtra". Dorpat 1884 & 1886. Cf. also M. Bloomfleld Das Grhyasamgraha Paricishta des Gobhilasutra (in Z. D. M. G. Vol XXXV and P. V. Bradke ūbar das Mānava-grihya sutra (in Z. D. M. G. Vol XXXVI). गृह्यसूत्राचें इंग्रजी भाषांतर H. Oldenberg नें Sacred Books of the East" Vols 29 & 30 मध्यें दिलें आहे.

गर्भाधान, पुंसवन, अनवलोभन, सीमंतोन्नयन, जातकर्म, नामकरण, निष्क्रमण, अन्नप्राशन, चौल, उपनयन, वेदारंभ, उपनिषद्व्रत, समावर्तन, प्रणय व विवाह वगैरे विधी गृह्यसूत्रांत दिलेले आहेत. शतपथ ब्राह्मणांत ( ११·५,६. ) कथन केलेले पंचमहायज्ञ सविस्तर रीतीनें गृह्यसूत्रांत दिले आहेत. वास्तविक हे पांच यज्ञ म्हणजे प्रत्येक व्यक्तीचीं कर्तव्यें होत. ब्राह्मणांमध्यें यांचें विशेष प्रतिपादन केलेलें आहे. प्रत्येक घरांतील मोठ्या मनुष्यानें दररोज हे पंचमहायज्ञ धर्माचरणांचें मुख्य अंग म्हणून केले पाहिजेत. हे रोजचे विधी जरी क्षुल्लक असले व दानें जरी हलक्या प्रतीचीं असलीं तरी त्यांस धर्मदृष्ट्या मोठें महत्त्व आहे. देवयज्ञ, पितृयज्ञ व असुरयज्ञ यांनां फक्त अग्निकुंडांत टाकण्याकरितां समिधा, भाताचे पिण्ड व जल लागतें. चौथा यज्ञ मनुष्ययज्ञ. यांत अतिथीस अन्नदान द्यावें लागतें. पांचवा ब्रह्मयज्ञ. यांत वेदाच्या भागाचें वाचन करावें लागतें. सायंप्रातर्यज्ञ, पौर्णिमा व अमावास्येच्या दिवशींच्या इष्टी, वार्षिक यज्ञयागादि महोत्सव गृह्यसूत्रांत दिलेले आहेत. महोत्सवांत अग्निहोत्र, दर्शपूर्णमास व चातुर्मास्य वगैरे येतात. गृह्यबंधन, गोपालन, क्षेत्रकर्मविषयक व तसेच अपशकुन व रोगपरिहारक मंत्र व वशीकरणविद्या वगैरे मंत्रतंत्र या ग्रंथांत दिले आहेत. याशिवाय गृह्यसूत्रांत अंत्यसंस्कार व श्राद्धविधी आहेत. श्राद्धाचें महत्त्व वाढल्यामुळें श्राद्धकल्पें लिहिण्यांत आलीं.* गृह्यापैकीं बहुतेक भाग अथर्ववेदांतून घेतला आहे आणि कांहीं आरण्यकांतून घेतला आहे.

उच्च वाङ्मय या दृष्टीनें गृह्यसूत्रें जरी कमी प्रतीचे ग्रंथ आहेत तरी प्राचीन भारतीय लोकांच्या जीवनक्रमाविषयीं यांवरून पुष्कळच ज्ञान मिळतें.

सुधारणेच्या इतिहासाचें संशोधन करणाऱ्यास हे ग्रंथ अमूल्य आहेत. वरील ग्रंथांचें महत्त्व (भिन्न भिन्न ग्रंथांवरून प्राचीन ग्रीक व रोमन लोकांच्या जीवनक्रमाचा इतिहास शोधण्यास लागणारी मेहनत लक्षांत घेतां) सहज दिसून येतें.

भारतीय यज्ञविधी व संस्कार यांचें ज्ञान देणारे हे सूत्रग्रंथ बाह्यतः कितीहि हलक्या प्रतीचे दिसले तरी प्राचीन भारतीय संस्कारांची प्रत्यक्ष रूढ कर्तव्यात्मक माहिती यांत आली आहे, म्हणून या ग्रंथांस प्राचीन भारतीय ऐतिहासिक वाङ्मयांत बरेंच उच्च स्थान देण्यास हरकत नाहीं. प्राचीन भारतीय लोकांचा आचार कसा होता हें या ग्रंथांवरून चांगलें समजतें. भारतीय लोकांचे सर्वच आचारविचार पारमार्थिक कल्पनांनी बद्ध असल्यामुळें सामान्य ग्रंथ परीक्षकास भारतीयांची सामान्य प्राचीन संस्कृति, आचार, वगैरेविषयीं विचार करण्यास हे ग्रंथ फार उपयुक्त आहेत. गृह्यसूत्रांत दिलेले मंत्र व विधी यांचें दुसऱ्या लोकांच्या आचारांशीं बरेंच साम्य असल्यामुळें इंडो-जर्मन लोकांच्या मूळच्या चालीरीती त्यांत पहावयास मिळतात, म्हणून या ग्रंथांचें विशेष महत्त्व आहे. गृह्यसूत्रांतील विवाहसंस्कार व विधी व इतर इंडो-जर्मन ( आर्यन् ) लोकांतील म्हणजे ग्रीक, रोमन, जर्मन व स्लाव्ह लोकांतील लग्नविधी यांचें साम्य पाहिलें म्हणजे या लोकांचें नुसतें भाषासादृश्यच होतें असें नाहीं तर या लोकांचें आचारविचारांचेंहि सादृश्य होतें असें पटतें व इतर प्रागैतिहासिक काळची माहिती कल्पावयास मिळते.*

गृह्यसूत्रांच्या तोडीचेच आणखी तिसऱ्या तऱ्हेचे ग्रंथ आहेत. यांचा संबंध गृह्यसूत्रांशीं बराच आहे, कारण सूत्रग्रंथांतील मंत्रांचेंच स्पष्टीकरण या ग्रंथांत आहे. या ग्रंथांस धर्मसूत्रें म्हणतात. या ग्रंथांत धर्माविषयीं माहिती असल्यामुळें यांनां धर्मग्रंथ म्हणतात. धर्म या शब्दांत न्यायतत्त्वें, कर्म, स्मृती, विधी, चारहि वर्णांचे आचार वगैरेंचा समावेश होतो. हिंदुस्थानांत या धर्मसिंधूंतून व्यावहारिक न्यायतत्त्वें व धार्मिक म्हणजे नैतिक व

* अंत्य संस्कार व प्राचीन भारतीय कल्प वाङ्मयानुसार ठरविलेलें पूर्वकालीन ज्ञान खालील ग्रंथांत चांगलें दिलें आहे. über Totenverehrung bei einigen der indogermanischen Vôlker" ( इंडो-जर्मन लोकांतील 'अंत्य संस्कार ) Amsterdam 1888. Altindischer Ahnenkult Leiden 1893. Die altindischen Todten and Bestattungs-gebräuche, Amsterdam 1896.

* Cf. *E. Hass* and *A. We ber*, Die Heiratsgebräuche der alten Inder, nach den Grihyasūtra (गृह्यसूत्रानुसार प्राचीन भारतीय विवाहसंस्कार). (in the fifth volume of the "Indische Studien)." *L. V. Schroeder*, Die Hochzeitsgebräuche der Esten and einiger anderer finnischugrischer Võlkar–Schaften in Vergleich mit deren der indogermanischen Uôlker ( इंडोजर्मन लोकांच्या विवाह रीतींशीं एस्थोनिअन आणि दुसरीं कांहीं फिनिश–ड्गोनियन राष्ट्रें यांच्या विवाहरीतींची तुलना ) Berlin 1888. *B. W. Leist*, Altarische ugusg entium. Jena.1888, *M. Winternitz* Das altindische Hochzeitsrituell nach dem Âpastambiya Grīhyasûtra and einigen anderen Verwandten werken. Mit vergleichung der Hochzeits gebräuche bei den übrigen indogermanischen Völkern ( आपस्तंबीय गृह्यसूत्र व इतर पुस्तकानुसार प्राचीन) भारतीय विवाह संस्कार· इतर हिंदू–जर्मन लोकाच्या विवाह संस्कारांशीं तुलना ( Denkschriften der Kais Akademie der Wessenschaften in Wien Phil-Hist. Kl. vol XL Vienna 1892 ) M. *Winternitz*, भारतीय व युरोपीय आचारांची तुलना व विशेषतः विवाह संस्कारांची तुलना· (The internatonal Folk-lore Congress 1891, papers and Transactions. London 1892, pp. 267–291 ). O. *Schröder*, Reallexikon der indogermanischen Altertumskunde, Strassburg 1901. p. 353 &c. Th. Zachariae, Zum altindischen Hochzeitsrital (in the Wiener Zeitschrift) für die Kunde des Morgenlandes, vol XVII p. 135 & 211 &c.

आध्यात्मिक तत्त्वें लिहिलेलीं आहेत. या सर्व तत्त्वांचा एकच ग्रंथ असतो. निरनिराळ्या विषयांचे निरनिराळे ग्रंथ सांपडत नाहींत. यांत चतुर्वर्णांचे नियम, धर्म व तसेच आश्रम वर्णिलेले असतात. या ग्रंथांचा आधार घेऊन उत्तरकालीन ब्राह्मणांनीं आपल्याला हितावह असे प्राचीन भारतीय नियम, विधी, संस्कार वगैरे वदलले व आपला पगडा चोहोंकडे वसविला असा त्यांवर आक्षेप आहे. धर्मसूत्रांचा सविस्तर विचार आपण धर्मयवाङ्मयाचा विचार करतांना करूं. धर्मसूत्रांचा या ठिकाणीं उल्लेख करण्याचा प्रसंग एवढाच कीं, वेदशाळेंतच गृह्यसूत्र व श्रौतसूत्राप्रमाणें यांचाहि उगम झाला. धर्मसूत्रें कल्पसूत्रांचाच एक भाग आहे.

शुल्बसूत्रांचाहि कल्पसूत्रांतच समावेश होतो. यांचा श्रौतसूत्रांशीं विशेष संबंध दिसतो. महत्त्वमापनाचे नियम, वेदीची रचना व अग्निकुंडाची रचना या ग्रंथांत दिली आहे. शुल्ब याचा अर्थ मोजण्याची काठी. शास्त्रांच्या इतिहासाच्या दृष्टीनें भारतीय भूमितीवरचे हे अतिप्राचीन ग्रंथ फार महत्त्वाचे आहेत.

वेदांचा अर्थ लावण्यास श्रौत व गृह्यसूत्रांचा फार उपयोग होतो, यामुळें त्या ग्रंथांस विशेष महत्त्व आलें आहे. यांत नुसते यज्ञयागादिकांचे नियमच नसून मंत्रांचे विनियोगहि दिलेले आहेत. वैदिक संहितांतून दिलेले मंत्र या सूत्रग्रंथांत घेतलेले आहेत व कोणकोणत्या यज्ञाच्या वेळीं कोणकोणते मंत्र म्हणावयाचे हें सर्व सविस्तर रीतीनें सांगितलेलें आहे.

तथापि पुष्कळ मंत्र असे आहेत कीं, त्यांचा यज्ञाशीं विलकुल संबंध नसतो. कित्येक ठिकाणीं एखादें कार्य साधण्याकरितां ज्या मंत्रांचा उपयोग केलेला दिसतो त्या कार्याशीं त्यांचा विलकुल संबंध नसतो. कांहीं प्रसंगीं मंत्रांचा अर्थहि भलताच केलेला व त्यांत वाटेलतसा फेरवदल केलेला सांपडतो. परंतु एकंदरींत विधिनिषेधांचा इतिहास समजण्यास हे मंत्र अतिशय उपयुक्त आहेत. मंत्रांच्या विनियोगानें वेदांतील कठिण भाग समजण्यास सुलभ जातात. हे ग्रंथ म्हणजे वेदग्रंथांची एक प्रकारें किल्लीच आहेत.

**सूत्रांतील मंत्र व प्रतीकें.**—सूत्रांतच कांहीं संपूर्ण मंत्र आज आपणांस प्रथमच दिसतात व परिचित असलेल्या मंत्रांची आद्याक्षरेंच ( प्रतीकें ) नुसतीं सूत्रांतून दिलेलीं असतात.

कल्पसूत्रांतील मंत्रांचें परीक्षण केलें असतां कांहीं विशिष्ट वैदिक शाखेशीं असलेला त्यांचा संबंध उघडपणें लक्षांत येतो. उदाहरणार्थ, कृष्णयजुर्वेद संहितेंतील मंत्रांप्रमाणें मंत्र कृष्णयजुर्वेदी श्रौत व गृह्यसूत्रांत सांपडतात. पूर्ण मंत्र पाठ आहेत असें गृहीत धरून सूत्रांत यजुःशाखेंतील मंत्र देतांना संहितेंतून घेतलेल्या मंत्रांचीं फक्त आद्याक्षरें दिलेलीं आहेत; व त्यांच्या स्पष्टीकरणार्थ अथर्ववेद किंवा ऋग्वेद यांतील पूर्ण मंत्र जोडलेले आहेत. संहितांत न सांपडणारे असे पुष्कळ मंत्र सूत्रग्रंथांत आहेत. सूत्रग्रंथांपेक्षां भिन्न मंत्र असलेलीं दोन गृह्यसूत्रें आहेत व ज्यांस मंत्रब्राह्मण* म्हणतात असे त्यांचे दोन मंत्रपाठ आहेत. मंत्रब्राह्मणांत आपस्तंबीय गृह्यसूत्रांतील मंत्रपाठाचा† व गोभिल गृह्यसूत्रांतील मंत्रांचा अंतर्भाव होतो. कृष्णयजुर्वेदीय आपस्तंब व बौधायन शाखेचीं श्रौत, गृह्य, धर्म व शुल्ब अशीं चार प्रकारचीं सूत्रें आहेत. या चार ग्रंथांचा इतका निकट संबंध आहे कीं, हे ग्रंथ कांहीं अंशीं एकाच मोठ्या ग्रंथाचे चार भाग आहेत असें सहज सिद्ध करतां येईल.

या संपूर्ण चारहि कल्पसूत्रांचे कर्ते प्रत्यक्ष बौधायन व आपस्तंबच केवळ नसतील हेंहि शक्य आहे. परंतु हीं दोन्ही शाखांतील श्रौत–गृह्य–धर्म–शुल्ब–सूत्रें एकाच पद्धतीनें लिहिलेलीं आहेत.‡ आपस्तंब शाखेच्या सूत्रांशीं हिरण्यकेशी शाखेच्या सूत्रांचा निकट संबंध आहे. या दोन शाखांचीं श्रौतसूत्रें व गृह्यसूत्रें एकच आहेत.¶ परंतु दोन्ही शाखांच्या धर्मसूत्रांत थोडासा फरक आहे. या सर्व सूत्रांचा तैत्तिरीय संहितेशीं निकट संबंध आहे. कृष्णयजुर्वेदीय मानवशाखेचा§ श्रौत–गृह्य–शुल्ब सूत्रांचा संबंध मैत्रायणी संहितेशीं सांपडतो व काठक गृह्यसूत्रांचा मानव गृह्यसूत्रांशीं संबंध आढळतो. बौधायन व आपस्तंब शाखांचीं जशीं चार प्रकारचीं सूत्रें आहेत तशीं सूत्रें प्रत्येक वैदिक शाखेला आहेत असें सांगतां येत नाहीं. कृष्णयजुर्वेदीय शाखा सोडून दिल्या तर इतर शाखांमध्यें एखाद्या शाखेचें गृह्यसूत्र तर दुसऱ्या शाखेचें श्रौतसूत्र अशीं फुटकळ सूत्रें सांपडतात. शुक्लयजुर्वेद व ऋग्वेद यांच्या शाखांच्या सूत्रांचा एकमेकांशीं विशेष संबंध दिसत नाहीं.

* Das Mantra Brāhmana 1 Prapāthaka (Sanskrit & German) by Heinrich Stonner Halle. A. S. 1901 (Inaugural dissertation). † The Mantrapātha on the Prayer Book of the Apastambins, Edited by M. Winternitz, Oxford (Anecdota Oxoniensia) 1897. ‡ खालील पुस्तकें पहा. Âpastambīya S'rautsūtra by R. Garbe in the Bibliotheca Inidca Calcutta 1882 &c. The Apastambīya Grhyasūtra by M. Winternitz, Vienna 1887. The Âpastambīya Dharmasūtra by G. Bûhler, second Edition (Bombay Sanskrit Series 1892 & 1894.) The Āpastanbīya S'ūlvasūtra with German translation by Alberton Burk (in Z. D. M. G. vol 55 & 56 1901–2). बौधायन शाखेच्या शुल्ब सूत्राचें भाषांतर. इंग्रजी भाषेंत C. Thebaut नें केले आहे (in the "Pandit" Vol IX &c). बौधायनश्रौतसूत्राची प्रत W. Caland प्रसिद्ध करीत आहे. ¶ हिरण्यकेशी गृह्यसूत्र J. Kirste नें (Vienna 1889) प्रसिद्ध केलें आहे. § Das Mānava Grhya-Sūtra publ. by F. Knauer, St Petersburg 1897. Das Manava S'rauta-Sūtra. publ. by F. Knauer I to V St. Petersburg 1900 &c.

शुक्लयजुर्वेदाचीं कात्यायन श्रौतसूत्र,* पारस्कर गृह्यसूत्र व कात्यायन शुल्बसूत्र, ऋग्वेदाचीं आश्वलायन श्रौतसूत्र †, आश्वलायन गृह्यसूत्र, शांखायन श्रौतसूत्र‡ व शांखायन गृह्यसूत्र व सामवेदाचीं लाट्यायन¶ श्रौतसूत्र, गोभिल गृह्यसूत्र व खादिर$ गृह्यसूत्र अशीं सूत्रें आहेत. ऋग्वेद, यजुर्वेद व सामवेद या तीन वेदांइतकें महत्त्व अथर्ववेदास आणण्याकरितां वैतान‖ श्रौतसूत्र लिहिलें, परंतु तें फार उशीरां लिहिलें गेलें. अथर्ववेदाचें महत्त्वाचें असें दुसरें एक कौशिकसूत्र आहे. कांहीं अंशीं इतर गृह्यसूत्रांप्रमाणेंच हें एक गृह्यसूत्र आहे. यांत घरगुती दररोजचे विधी सांगितले असून अथर्ववेदांतील जादूटोण्याविषयीं असलेले मंत्रतंत्रादिकांचे विधी सविस्तर दिलेले आहेत. अथर्ववेद संहितेचें यथार्थ ज्ञान देणारा कौशिकसूत्र हा मोठा महत्त्वाचा ग्रंथ आहे. यावरून प्राचीन भारतीय लोकांच्या जादूटोण्याविषयींची कल्पना चांगली करतां येते. सूत्रग्रंथांतच सामवेदाच्या सामविधान§ ब्राह्मणग्रंथाचा समावेश होतो. हा एक जादूवर लिहिलेला फार मजेदार ग्रंथ आहे.

यज्ञयागादि विधींच्या वाङ्मयांत नुसते सूत्रग्रंथच येत नसून वेदकालानंतर वेदांच्या उपनिषद्ग्रंथांनां जोडलेले ग्रंथहि येतात व या ग्रंथांची अर्वाचीन कालापर्यंत सारखी वाढ झालेली आहे.

**परिशिष्टें.**—श्रौत व गृह्यसूत्रांनंतर परिशिष्टें लिहिलीं गेलीं. या परिशिष्टांत सूत्रग्रंथांत थोडक्यांत दिलेल्या मंत्रांचें स्पष्ट विवरण केलेलें आहे. या नंतर प्रयोगपद्धति व कारिका लिहिल्या गेल्या. या ग्रंथांत कोणत्या तरी एका वैदिक शाखेचे यज्ञयागादि विधी दिलेले असतात. फार करून एकाच शाखेच्या विधींचे निरनिराळे भाग केलेले असतात. विशेष महत्त्वाचे ग्रंथ म्हटले म्हणजे विवाहसंस्कार, श्राद्ध व अंत्यसंस्कार यांवरील होत. या ग्रंथांपैकीं कांहीं हस्तलिखित व कांहीं छापलेले आहेत.

**विवरणात्मक वेदांगें.**—शिक्षेसंबंधाचीं सूत्रें हीं कल्पसूत्रांइतकीं तरी जुनीं असावीं. कल्पसूत्रें हीं वेदांतील ब्राह्मणांनां केवळ पुरवणीदाखल आहेत, परंतु वेदांग—शिक्षेंतील सूत्रांचा व वेदांतील संहितांचा अगदीं निकट संबंध आहे.

**शिक्षा आणि प्रातिशाख्यें.**—शिक्षा ह्याचा अर्थ "शिकणें", विशेषतः पठण करणें (संथा घेणें) म्हणजे स्पष्ट उच्चार करून आघात वगैरे देऊन संहिता म्हणणें हा होय. या वेदांगाचा प्रथमतः तैत्तिरीय उपनिषदांत नामनिर्देश आला आहे. (तैत्ति० १, २) ह्या ठिकाणीं शिक्षेचे सहा भाग सांगितलेले आहेत ते असे. शब्द व त्यावरील आघात, पदप्रमाण किंवा शब्दावयव व त्यावरील आघात आणि म्हणण्यांतील स्वरमाधुर्य व शब्दसंधि. धर्मकर्म किंवा धार्मिक विधी शिकविण्याप्रमाणें धर्माच्या दृष्टीनें शिक्षेचीहि आवश्यकता वाटली. कारण एखादें यज्ञकृत्य बरोबर करावयाचें म्हटलें म्हणजे त्यांतील कर्म माहीत असणें अवश्य असून शिवाय संहितांतून परंपरेनें आलेलीं पवित्र सूक्तें जशींचीं तशींच विनचूक बरोबर उच्चार करून म्हणावीं लागत. परंतु ह्यावरून असें गृहीत धरल्यासारखें होईल कीं, ज्या वेळीं शिक्षेवरील ग्रंथ अस्तित्वांत आले त्या वेळेच्या पूर्वींपासूनच वेदांतील संहिता ह्या पवित्र मानल्या जात असून शिक्षाध्यापक आचार्यांनीं त्यांनां (संहितांनां) विशिष्ट स्वरूप आणिलें होतें. परंतु वास्तविक पहातां असें दिसतें कीं ऋग्वेद संहितेंतील सूक्तें पूर्वींच्या कवींनीं जशीं तयार केलीं तशीं आज सांपडत नाहींत. जरी परंपरागत अध्यापकांनीं त्यांतील शब्द बदलले नाहींत तरी उच्चार, शब्दाचे अंत्य व आरंभींचे स्वर, अर्धवट व्यक्त भाग गाळून टाकणें वगैरे बाबतींत त्यांनीं पूर्वींच्या पठनपद्धतींत विकार व भेद होऊं दिला. उदाहरणार्थ, एका संहितेंत "त्वंह्यग्ने" असें लिहिलेलें आढळतें, परंतु वृत्ताच्या आधारावरून असें स्पष्ट सिद्ध होतें कीं जुने पाठक "त्वंहि अग्ने" असें म्हणत असत. ह्यावरून वेदांतील संहिता ह्याच अगोदर झाल्या असल्या पाहिजेत. परंतु संहितापाठाशिवाय, शिक्षेंत सांगितल्याप्रमाणें म्हणावें लागत असल्यामुळें पदपाठ म्हणून एक निराळा आहे. ह्यांत संहितापाठांत दिसून येणारे स्वर एकमेकांस जोडून न देतां प्रत्येक शब्द निरनिराळा लिहिला आहे. संहितापाठ व पदपाठ ह्यांतील भेद दाखविण्यासाठीं एक उदाहरण पुरें आहे. ऋग्वेद संहितेंतील एक मंत्र खालीं लिहिल्याप्रमाणें आहे.

अग्निः पूर्वेभिर्ऋषिभिरीड्यो नूतनैरुत । स
देवाँ एह वक्षति ॥२॥

पदपाठाप्रमाणें हाच श्लोक खालीं लिहिल्याप्रमाणें आहे.

अग्निः । पूर्वेभिः । ऋषिऽभिः । ईड्यः ।

---

* Publ. by A. Weber as third volume of his "White Yajurvedā. † Publ. in the "Bibliotheca Indica" Calcutta. ‡ Publ. by A. Hillebrandt in the Bibliothea Indica. Calcutta 1888 &c. ¶ Publ. by H. Oldenbeg in Secred Books of the East. vol 29. $ जर्मन भाषेंत भाषांतर R. Garbe नें केलें London and Strassburg, 1878. ‖ Publ. by M. Bloomfield. New Haven 1890. अथर्ववेदाच्या निवडक सूक्तांचें इंग्रजींत भाषांतर देतांना पुष्कळ सूत्रें उतार्‍यांदाखल Bloomfield नें दिलीं आहेत. (Sacred books of the East vol. XLII.) W. Caland नें कौशिकसूत्रांत जादूविषयीं असलेलीं सूत्रें भाषांतर केलीं आहेत. Altindisches Zanberritunal Amsterdam 1900. § Publ. by A. C. Burnell London 1873. जर्मन भाषेंत Stein Konow नें भाषांतर केलें आहे. Das Sāmvidhān-brāhmana ein altindisches Handbuch der Zanberei Halle a S. 1893.

नूतनैः । उत । सः । देवान् । आ । इह ।
वक्षति ॥ २ ॥

पदपाठ हें अर्थात् शिक्षासंपन्न धर्मकारांचें, पक्षीं वैयाकरणी लोकांचें काम आहे. कारण त्यांत संहितामंत्र व्याकरणदृष्ट्या परिच्छेद करून दिलेले आहेत. तरीहि पण हे फार जुने आहेत. ऐतरेय आरण्यकांत ज्याचें नांव आलेलें आहे त्या शाकल्य नांवाच्या आचार्यांनीं ऋग्वेदाचा पदपाठ लिहिला असें म्हणतात.

ह्यावरून शिक्षापंथाचें जुन्यांत जुनें काम म्हणजे संहितापाठ व पदपाठ हें होय. ह्या वेदांगाचे जुन्यांत जुने आज आपणांस उपलब्ध असणारे ग्रंथ म्हणजे प्रातिशाख्यें होत. ह्यांत पदपाठावरून संहितापाठ कसे तयार करावयाचे ह्यासंबंधीं नियम आहेत. अर्थात् ह्यामध्यें उच्चार, आघात शब्दसंधींतील व वाक्यांतील आरंभींच्या किंवा अंत्य शब्दांचे स्वरांतील उच्चारभेद ह्यांची माहिती दिली आहे, किंवा थोडक्यांत सांगावयाचें म्हटलें म्हणजे संहिता म्हणण्याच्या पद्धतीचें पूर्ण विवेचन केलेलें आहे. संहितेच्या प्रत्येक शाखेला अशा तऱ्हेचें एक पाठपुस्तक होतें; ह्यावरूनच त्यास प्रातिशाख्य असें नांव आलें. ऋग्वेदप्रातिशाख्य* म्हणून एक आहे; हें आश्वलायनाचा गुरु शौनक ह्यानें लिहिलें असावें. हा ग्रंथ पद्यमय असून पूर्वींच्या एखाद्या सूत्रपाठाची ही सुधारून वाढविलेली आवृत्ति असावी. हस्तलिखित ग्रंथांतून व उताऱ्यांमधून त्यास "सूत्र" अशीच संज्ञा आहे. तैत्तिरीय प्रातिशाख्यसूत्र† हें तैत्तिरीय संहितेचें सूत्र आहे.

वाजसनेयी संहितेला कात्यायन ह्यानें केलेलें वाजसनेयी प्रातिशाख्यसूत्र‡ व अथर्ववेद संहितेला शौनकपंथांपैकीं कोणी तरी केलेलें अथर्ववेद प्रातिशाख्यसूत्र¶ हीं जोडलेलीं आहेत.

ह्या ग्रंथांचें दोन दृष्टींनीं महत्त्व आहे. प्रथमतः ह्या प्रातिशाख्यांपासून हिंदुस्थानांतील व्याकरणशास्त्राच्या अध्ययनास आरंभ झाला म्हणून हीं महत्त्वाचीं आहेत. जरी हे प्रत्यक्ष व्याकरणावरील ग्रंथ नाहींत तरी व्याकरणासंबंधीं विषयांचें ह्यांत विवेचन केलेलें आहे. ह्यांत पुष्कळ वैयाकरणांचे उतारे आढळत असल्यामुळें त्या वेळींहि व्याकरणाचें अध्ययन जोरांत होतें असें ह्यावरून सिद्ध होतें. दुसऱ्या बाजूनेंहि ह्यांचें महत्त्व आहे तें असें कीं, त्यांच्यामुळें आज उपलब्ध असलेला संहितापाठ प्रातिशाख्यांच्या रचनाकालापासून तों आजपर्यंत कित्येक शतकें जशाचा तसाच राहिला आहे असें सिद्ध होतें. ऋग्वेदप्रातिशाख्यांतील नियमांत असेंच गृहीत धरिलें आहे कीं, ऋग्वेदसंहितेंतील दहा मंडलें आज आहेत तशींच असलीं पाहिजेत, एवढेंच नव्हे तर त्यांतील सूक्तांचा अनुक्रम आज जसा आहे तसाच असला पाहिजे. शौनकाच्या अत्यंत बारीक नियमांवरून आज उपलब्ध असलेल्या छापील आवृत्तीमध्यें ऋग्वेदसंहिता पदशः व शब्दशः जशी आहे तशीच ती त्या काळीं होती ह्याविषयीं शंका रहात नाहीं.

हीं प्रातिशाख्यें म्हणजे वेदांगशिक्षेचीं फार जुनीं उदाहरणें होत. ह्यांशिवाय शिक्षेवर अलीकडील पुष्कळ लहान लहान ग्रंथ आहेत. ह्यांनांहि शिक्षा असेंच नांव दिलेलें असून भारद्वाज, व्यास, वसिष्ठ, याज्ञवल्क्य वगैरे ह्यांचे कर्ते म्हणून दिलेले आहेत. ज्याप्रमाणें वैदिक धर्मसूत्रांच्या मागून मोठमोठ्या प्रसिद्ध ग्रंथकारांचीं लेखक म्हणून नांवें देऊन धर्मशास्त्रांवरील पद्यमय ग्रंथ निघाले, तद्वतच प्रातिशाख्यांमागून हीं पुस्तकें निघालीं. त्यांतल्यात्यांत ह्यांतील कांहीं शिक्षा बऱ्याच जुन्या असून कोणत्याना कोणत्यातरी प्रातिशाख्याशीं अगदीं संलग्न आहेत; उदाहरणार्थ तैत्तिरीय प्रातिशाख्यावरील व्याससूत्र*. परंतु दुसरे कांहीं ग्रंथ फार पुढील काळीं तयार झाले असून व्याकरण किंवा वैदिकग्रंथेतिहास ह्या दृष्टीनें कांहींच महत्त्वाचे नाहींत.

प्रातिशाख्यकारांत शौनक व कात्यायन ह्यांचींहि नांवें आहेत; त्यांनीं दुसरे कांहीं ग्रंथ लिहिले आहेत असा समज आहे. ह्या ग्रंथांचा वेदाङ्गवाङ्मयाशीं निकट संबंध आहे, कारण ह्या ऋषींनींहि वैदिक संहितांच्या अभ्यासाचें कांहीं काम केलेलें आहे. तरी पण ह्या ग्रंथांनां वेदांगें म्हणून म्हणत नाहींत. ह्यांनां अनुक्रमणी अशी संज्ञा असून वैदिक संहितांच्या निरनिराळ्या भागांत कोणत्या विषयांचें विवेचन केलें आहे तें ह्यांत दिलें आहे. शौनकानें वैदिकसूक्तांतील ऋषिवर्गाची एक अनुक्रमणी, त्याचप्रमाणें छंदांची, देवतांची व सूक्तांची अशा याद्या तयार केल्या आहेत. ऋग्वेदांतील सर्व गोष्टींची "सर्वानुक्रमणी†" नांवाची कात्यायन ह्यानें केलेली एक याद

* ऋग्वेद प्रातिशाख्य, (Das Älteste Lehrbuch der Vedischen Phonetik.) स्पष्टीकरण, टीपा व भाषांतरासहित पाठ मोक्षमुल्लर ह्यांनीं तयार केलें (लिप्झिग् १८५६–६९). † तैत्तिरीय प्रातिशाख्य. पाठ टीपा व भाषांतर ह्यांसह डब्ल्यु. डी. व्हिटने, न्यूहॅवन् १८८१ (Journal of the American Oriental Society Vol IX). ‡ शुक्लयजुर्वेदीय कात्यायनाचें प्रातिशाख्य पी. वाय्. पाठक ह्यांनीं छापिलें आहे. बनारस १८८३-१८८८. ¶ अथर्ववेद प्रातिशाख्य किंवा शौनकीय चतुरध्यायिका–पाठ, भाषांतर व टीकासमेत डब्ल्यु. डी. व्हिटने ह्यांनीं तयार केलेलें न्यूहॅवन् १८६२ (Journal of the American Oriental Society. Vol VII)

* एच् लूडर्स Die Vyāsa-Ciksha besonders in Ihrem Verhaltnis zum Taittirīya Prātishākhya Kiel. 1895) ह्यांशीं तुलना करून पहा. † ए. ए. मॅकडोनेल ह्यानें छापिली आहे ऑक्सफोर्ड (Anecdota Oxoniensia) १८८६.

उपलब्ध आहे. ह्या ग्रंथांत सूत्रपद्धतीनें, प्रत्येक सूत्राचा आदिशब्द, ऋचांची संख्या, ज्या ऋषीनें त्या ऋचा लिहिल्या असतील त्याचें नांव व गोत्र, ज्या देवतांप्रीत्यर्थ त्या ऋचा तयार केल्या गेल्या असतील त्यांचीं नावें किंवा ज्या छंदांत अथवा वृत्तांत ऋचा लिहिली असेल तें वृत्त ह्या गोष्टी दिलेल्या आहेत. बृहद्देवता व ऋग्विधान हे दोन्ही वृत्तग्रंथहि शौनकानेंच लिहिले आहेत. बृहद्देवता* म्हणजे ऋग्वेदांतील सूत्रांतून ज्या देवतांस आह्वान केलें आहे त्यांची एक सविस्तर याद होय. ह्याबरोबरच त्या ग्रंथांत त्या त्या देवतांसंबंधींच्या पौराणिक दंतकथा असल्यामुळें भारतीय कथावाङ्मयाच्या दृष्टीनें हा ग्रंथ फार महत्त्वाचा आहे. ऋग्विधानांत† ऋग्वेदसंहितेंतील प्रत्येक मंत्र म्हटल्यावर त्यापासून होणारा परिणाम किंवा निरनिराळ्या ऋचांचा परिणाम ह्या गोष्टी व्यवस्थित रीतीनें दिल्या आहेत. वर निर्दिष्ट केलेल्या सामविधान ब्राह्मणाशीं ह्याचें पुष्कळ साम्य आहे.

अनुक्रमणी व तत्संबंधींचे दुसरे ग्रंथ ह्यांचें एवढें महत्त्व असण्याचें कारण इतकेंच कीं, त्यांवरून वैदिक संहितापाठ, श्लोकसंख्या, रचना व स्वरूप ह्या बाबतींत आज जसा आहे तसाच फार प्राचीन काळीं होता हें सिद्ध होतें.

यास्क यांच्या ‡निरुक्ताविषयींहि हीच गोष्ट आहे. वेदांगनिरुक्तांपैकीं आज आपणांस उपलब्ध असलेला एवढाच ग्रंथ आहे व ह्यांतहि ऋग्वेदसंहिता आज आपणांस जशी सांपडते तशीच ती होती असें गृहीत धरलें आहे. "निघण्टु" हा कोशहि यास्कानेंच तयार केला असावा अशी समजूत आहे, पण ती चुकीची आहे असें कोणी म्हणतात.

वास्तविक यास्काचा ग्रंथ म्हणजे ह्या शब्दकोशावर केलेली टीका होय. यास्कानें स्वतः असें म्हटलें आहे कीं, हा ग्रंथ प्राचीन ऋषींच्या वंशजांनीं तयार केला आहे. व ही टीका बदललेला पाठ लवकर समजावा म्हणून केलेली आहे. निघण्टूचे पांच निरनिराळे कोश असून त्याचे तीन विभाग आहेत. नैघण्टुककांड ह्या नांवाच्या पहिल्या भागांत तीन शब्दसंग्रह असून ह्यांत वेदांतील शब्द त्यांच्या मुख्य अर्थांनां अनुसरून एकत्र ग्रथित केले आहेत. उदाहरणार्थ ह्यांत "पृथ्वी" ह्या शब्दास एकवीस समानार्थक शब्द, "सुवर्ण" शब्दास पंधरा, "हवा" शब्दास सोळा, "पाणी" शब्दास एकशेंएक व "जाणें" ह्या शब्दास एकशेंबावीस समानार्थक शब्द दिलेले आहेत; तसेच "जलद" ह्या शब्दाशीं सव्वीस समानार्थक विशेषणें व क्रियाविशेषणें असून "पुष्कळ" ह्यास बारा समानार्थक शब्द दिलेले आहेत. नैगमकांड किंवा ऐकपदिक नांवाच्या दुसऱ्या भागांत वेदांतील विशेष कठिण व द्व्यर्थी शब्दांचा निराळा संग्रह दिलेला असून दैवतकांड नांवाच्या तिसऱ्या भागांत भूलोक अंतरिक्ष व स्वर्ग ह्या तिन्ही लोकांतील देवतांचें निरनिराळें वर्गीकरण केलेलें आहे. अशा तऱ्हेचे शब्दसंग्रह लिहिल्यामुळेंच वेदविवरणाला सुरुवात झाली; व पुढें कठिण कठिण वेदसूक्तांचें स्पष्टीकरण मधून-मधून देणाऱ्या निरुक्तासारख्या शब्दसंग्रहावरील टीका वगैरे केल्या गेल्या. यास्काचे पूर्वींहि पुष्कळ टीकाकार झाले ही गोष्ट खरी आहे. तथापि जरी ह्याचा ग्रंथ वेदविवरणात्मक ग्रंथांत जुन्यांत जुना आहे तरी वेदांगनिरुक्तविषयक वाङ्मयांत हा शेवटचाच व अप्रतिम ग्रंथ आहे असें म्हणावयास हरकत नाहीं.

छंदःशास्त्र व ज्योतिःशास्त्र ह्या वेदांगांसंबंधीं जुन्या शास्त्रीय वाङ्मयाच्या कांहीं कांहीं भागाचा एकेक ग्रंथ उपलब्ध आहे. पिंगल ह्यानें लिहिलेला छंदःशास्त्रावरील ग्रंथ ज्याला ऋग्वेदाचें—किंवा पाहिजे तर यजुर्वेदाचें म्हणा—वेदांग म्हणतात, त्याचे दोन निरनिराळे पाठ असून हें अगदीं अलीकडचें पुस्तक आहे; कारण अगदीं अलीकडील वृत्तांविषयींहि ह्यांत माहिती दिलेली आहे.

वेदांगज्योतिष हा ज्योतिःशास्त्रावरील एक लहान पद्यमय ग्रंथ आहे; ह्यांतील यजुर्वेद पाठांत त्रेचाळीस श्लोक असून ऋग्वेदपाठांत छत्तीस श्लोक आहेत. ह्यांत संक्रमणाच्या वेळीं सूर्य आणि चंद्र ह्यांचीं स्थानें व सत्तावीस नक्षत्रांच्या स्थानांतील अमावास्या व पौर्णिमा देऊन तद्विषयक गणिताचे नियम दिलेले आहेत. हा ग्रंथ श्लोकबद्ध लिहिला असल्यामुळें व त्याचें स्पष्टीकरण बरोबर होत नसल्यामुळें तो अलीकडे लिहिला गेला असें दिसतें.

व्याकरणावरील जुनीं वेदांगाचीं पुस्तकें उपलब्ध नाहींत. वेदविवरणाशीं निकट संबंध असल्यामुळेंच हें शास्त्र निघालें व वैदिक पंथांनीं याचा पुरस्कार केला. आरण्यकांतून आपणांस क्वचित् ठिकाणीं व्याकरणांतील पारिभाषिक शब्द आढळतात. परंतु पाणिनीचें अतिप्राचीन व सर्वोत्कृष्ट असें व्याकरणशास्त्रावरील जें पुस्तक आज उपलब्ध आहे, त्यांत वेदभाषेचा प्रामुख्यानें विचार केला नसून केवळ एक उपाङ्ग ह्या दृष्टीनें विचार केलेला आहे. कोणत्याहि वेदपंथाशीं ह्याचा निकट संबंध नसून धर्मशास्त्र खेरीज करून व्याकरण विषयाचें ज्या काळीं स्वतंत्र रीतीनें अध्ययन होत असे अशा काळीं तो ग्रंथ लिहिला गेलेला आहे. हिंदुस्थानांत देखील प्रथमतः धर्मशास्त्रांत गुरफटून गेलेल्या शास्त्रीय विषयांचें पुढें हळू हळू स्वतंत्र रीतीनें अध्ययन होऊं लागलें.

---

* राजेंद्रलाल मित्र ह्यांनीं Bibliotheca Indica Calcutta 1892 ह्यांत प्रसिद्ध केलें आहे. † ऋग्विधानम् edited cum praefatione Rudolf Meyer Berolini, 1878. ‡ निरुक्त हें आर् रॉथ् ह्यानें प्रथम छापिलें (गॉटिन्जेन १८५२). भरपूर टीका व सूची ह्यासह छापलेली एस्, सामाश्रमी ह्यांची आवृत्ति Bibliotheca Indica Calcutta 1882–91 त प्रसिद्ध झाली.

# प्रकरण ९ वें.

## वेदकालीन इतिहास—वेदकालनिर्णय.

वैदिक वाङ्मयाचें त्याच्या अगदीं शेवट शेवटच्या शाखांपर्यंत आपण येथवर पर्यालोचन केलें. आतां ही सामान्य रूपरेखा समजल्यानंतर या अवाढव्य वाङ्मयाच्या कालनिर्णयाचा प्रश्न घेऊन त्यावर झालेल्या परिश्रमाचें फल थोडक्यांत दिलें पाहिजे. वेदकालनिर्णयावर थोर सामान्य आणि कनिष्ठ अशा सर्व प्रकारच्या लेखकांनीं लिहिलें आहे. त्यांतील महत्वाच्या लेखकांच्या परिश्रमाचा तेवढा आढावा येथें घेतला आहे. अत्यंत तुटपुंज्या परिश्रमानें हा विषय हातीं घेतात असे लोक पुष्कळ आहेत. त्यांनीं लहान तोंडी मोठा घास घेण्यापलीकडे कांहीं केलें नाहीं असें म्हणावें लागतें. अशा प्रकारचें एक अर्वाचीन उदाहरण म्हणजे पहिल्या प्राच्यविद्यापरिषदे (पुणें) पुढें वाचलेला डा० बूलनर याचा निबंध पहावा. ऋग्वेद किंवा अथर्ववेद यांतील अत्यंत प्राचीन सूक्तांचा काळ शतकांच्या अजमासांत जरी ठरवितां आला असता, कालनिर्णयाच्या संबंधांत थोड्यावहुत शतकांची जरी चूक राहिली असती तरी देखील या कालनिर्णयाचा प्रश्न बराचसा सुटला असें म्हणतां आलें असतें आणि या प्रश्नाला स्वतंत्र प्रकरण देण्याची जरूर नव्हती; परंतु असा ठोकळ अजमास सुद्धां करतां येणें अशक्य झालें आहे. अजमास करतां आला असता तर वेदाचा अजमासकाळ थोडक्या शब्दांत सांगून मोकळें होतां आलें असतें. परंतु कितीहि वाईट वाटलें तरी वस्तुस्थिति आहे ती सांगितली पाहिजे; व ती ही कीं, ऋग्वेदाच्या कालनिर्णयाचे बाबतींत विद्वान् संशोधकांच्या मतांत शेंकड्यांचाच नव्हे तर सहस्रांचा सुद्धां फरक पडलेला आढळतो. कोणी म्हणतात ऋग्वेदसूक्तें श. पू. १००० च्या अलीकडील नव्हत, तर कोणी म्हणतात हीं सूक्तें श. पू. ३००० ते २५०० च्या दरम्यान झालीं असावीं. विद्वान् संशोधकांत सुद्धां एवढा तीव्र मतभेद आढळतो त्या अर्थी अगदीं सामान्यवाचकांकरितां लिहिलेल्या पुस्तकांत नुसता अजमासाचा वेदकाळ देऊन भागणार नाहीं. सामान्य वाचकांस देखील वेदकालनिर्णयाची इमारत निरनिराळ्या संशोधकांनीं कोणत्या आधारावर रचिलेली आहे हें समजणें जरूरीचें आहे. या कालनिर्णयाच्या प्रश्नाशीं इंडो-आर्यन संस्कृतीच्या उगमाचा प्रश्न निगडित झाला असल्यानें या कालनिर्णयाची माहिती होणें अधिकच जरूरीचें होतें; कारण, इंडो-आर्यन संस्कृतीच्या उगमाचा प्रश्न प्रत्येक इतिहासभक्तास, भाषाशास्त्रज्ञास व पुराणवस्तुसंशोधकास अत्यंत जिव्हाळ्याचा आहे. शिवाय जगाचा इतिहास लिहिण्याचा प्रयत्न करून प्राचीन काळच्या सुधारलेल्या देशांतील लोकांचा परस्पर संबंध हुडकणाऱ्या संशोधकास देखील, प्राच्यसंस्कृतीचीं मूळपीठें जीं बाबिलॉन, इजिप्त व चीन यांचा हिंदुस्थानाचा या बाबतींत संबंध कशा प्रकाराचा आहे, याचें ज्ञान असणें कमी महत्त्वाचें नाहीं.

अशा स्थितींत, या प्रश्नाच्या चर्चेचा इतिहास सामान्य लोकांपुढें मांडणें जरूरीचें आहे व संशोधकांस आजपर्यंत ज्ञात अशा गोष्टी किती व अज्ञात अशा किती यांचा शक्य तेवढा खुलासा करून घेणें अगत्याचें आहे.

हिंदु वाङ्मयाशीं प्रथमच परिचय झाल्याबरोबर त्या वाङ्मयांतला प्रत्येक ग्रंथ अत्यंत प्राचीन म्हणून ठरविण्यांत आला. फ्रेडरिक श्लेगेल यानें "आजपर्यंन्त अज्ञात अशा जगाच्या संस्कृतीच्या इतिहासावर भारतीय वाङ्मय प्रकाश पाडील" असें म्हटलें आहे. जी. वेबर यानें १८५२ सालीं आपल्या ग्रंथांत लिहिलें आहे कीं "भारतीय वाङ्मय आज उपलब्ध असलेल्या जगाच्या वाङ्मयांत अत्यंत प्राचीन होय असें म्हणण्यांत येतें व त्यांत बरेंचसें सत्य आहे" व आपल्या ग्रंथाची त्यानें १८७६ सालीं जी आवृत्ति काढली त्या आवृत्तींत त्यानें वरील विधानास "जुन्या अवशिष्ट लेखांच्या बाबतींत इजिप्तमधील चर्मपत्रें किंवा नवीन सांपडलेलें असीरिअन वाङ्मय यांच्यामुळें कदाचित् बाध आला तर येईल" अशी पुस्ती जोडली आहे. "भारतीय वाङ्मयाचा बराचसा अवशिष्ट लेखी भाग आपणांस उपलब्ध आहे व त्यावरून हिंदुवाङ्मय अत्यंत प्राचीन आहे असें म्हणणें अगदीं वाजवी होय" या विधानाच्या पुष्ट्यर्थ वेबरनें जीं प्रमाणें दिलीं आहेत तीं कांहीं भौगोलिक व धार्मिक इतिहासासंबंधींचीं आहेत. ऋग्वेदाच्या जुन्या जुन्या भागांच्या रचनेच्या वेळीं हिंदी राष्ट्र पंजावांत येऊन स्थित झालें होतें असें दिसतें. वैदिक वाङ्मयाच्या उत्तर भागांत, हे लोक क्रमाक्रमानें पूर्वेकडे गंगानदीकडे कसे आले याचें चित्र आहे. यानंतर पौराणिक वाङ्मयांत दक्षिणेकडे ब्राह्मणधर्माचा प्रवाह कसा वहात गेला याचें चित्र सांपडतें. असल्या अफाट प्रदेशांत, व विशेषतः तेथें राहणाऱ्या आडदांड व सकस लोकांत, ब्राह्मणधर्माचा प्रसार होण्यास व त्याचा तेथें पगडा बसण्यास शतकेंचीं शतकें लागलीं असतील हें उघड आहे. ऋग्वेदांत सांपडणाऱ्या नुसत्या सृष्टिपूजेपासून उपनिषदांतर्गत तत्त्वज्ञानात्मक विवेचनापर्यन्त व तेथून सुमारें ख्रि. पू. ३०० त मेगास्थिनीसला हिंदुस्थानांत आढळून आलेल्या निरनिराळ्या पंथांपर्यन्त व देवभक्तीपर्यन्त मजल गांठण्यास हिंदु परंपरेस कैक शतकें लागलीं असलीं पाहिजेत. वेबरनें वैदिकवाङ्मयाची निश्चित मर्यादा आंखण्याचा प्रयत्न केलेला नाहीं इतकेंच नव्हे, तर अशा तऱ्हेची मर्यादा घालतां येणें अशक्य आहे असें त्यानें स्पष्ट विधान केलें आहे.

प्राचीन हिंदुवाङ्मयाचा एक प्रकारचा कालानुक्रम बांधण्याचा प्रथम प्रयत्न मॅक्समूलर यानें आपल्या १८५९ सालीं प्रसिद्ध झालेल्या 'प्राचीन संस्कृतवाङ्मयाचा इतिहास' या पुस्तकांत

केला आहे. बुद्धधर्माचा उदय, शिकंदर बादशहाची स्वारी, वगैरे जीं हिंदी वाङ्मयाच्या कालानुक्रमाचीं ठळक ठळक साधनें आज आपणांस उपलब्ध आहेत त्यांच्यापासून सुरुवात करून पुढें त्यानें असा सिद्धान्त बांधला आहे कीं, बुद्धसंप्रदाय ही ब्राह्मणधर्मविरुद्ध सुरू केलेली एक मोहीम होय. बौद्धसंप्रदायाच्या उदयापूर्वी सूक्तें, ब्राह्मणें, आरण्यकें, उपनिषदें वगैरे सर्व वाङ्मय अस्तित्वांत होतें, ही गोष्ट मोक्षमूलर गृहीत घेऊन चालला आहे. त्याच्या मागें हें सर्व वाङ्मय बुद्धपूर्वकालीन असलें पाहिजे म्हणजे ख्रिस्तपूर्व ५०० च्या पूर्वी उदयास आलें असलें पाहिजे. त्याच्या मतानें वेदांगवाङ्मय किंवा सूत्रवाङ्मय हें बुद्धवाङ्मयाशीं फार झालें तर समकालीन असूं शकेल. तो या सूत्रवाङ्मयाचा उगम ख्रि. पू. ६०० ते २०० या कालांत धरतो, या तारखा अजमासानें बसविलेल्या असल्याकारणानें यांतच मोक्षमूलरची चूक आहे. सूत्रवाङ्मय ब्राह्मणवाङ्मयाचें अस्तित्व गृहीत घेऊन चाललेलें आहे. पण ब्राह्मणांतहि कांहीं ब्राह्मणें प्राचीन व कांहीं अर्वाचीन असा भेद दिसतो व अर्वाचीन ब्राह्मणांत प्राचीन ब्राह्मणें ज्या परंपरेनें चालत आलीं ती गुरुपरंपराहि दिलेली आहे. या सर्व विकासाला अर्थात् दोनशें वर्षांपेक्षां अधिक काळ लागला नसावा असें धरून मोक्षमूलरनें अशी कल्पना केली कीं, या गद्यवाङ्मयाचा उदयकाळ ख्रि. पू. ८००–६०० पर्यंत धरिला पाहिजे. यानंतरची मोक्षमूलरची विचारसरणी येणेंप्रमाणें:—'ब्राह्मणवाङ्मयानें संहितावाङ्मय गृहीत घेतलेलें आहे. याच्या रचनेला ख्रि. पू. १००० ते ८०० एवढा काळ लागला असावा. तेव्हां हा सूक्तांची संहिता बनण्याचा काल म्हटल्यास हरकत नाहीं. परंतु या कालांत हीं सूक्तें अगोदरच पवित्र होऊन बसलीं होतीं, व सर्वमान्य अशीं यज्ञसूक्तेंहि झालेलीं होतीं. तेव्हां यांचा उदय लौकिक किंवा धार्मिक वाङ्मय या नात्यानें होण्याचा काल याच्याहि पूर्वी असला पाहिजे, म्हणजे ख्रि. पू. १००० च्या मागें याचा काल जातो.' ब्राह्मणकालाला जशीं मोक्षमूलरनें २०० वर्षें दिलीं, व मंत्रकालाला जशीं २०० वर्षें दिलीं तशींच याहि कालाला–सूक्तांच्या उदयकालाला–२०० वर्षें देऊन मोक्षमूलर यानें इ. स. १२०० ते १००० हा सूक्तांचा उदयकाल ठरविला आहे. मात्र २०० या संख्येबद्दल मॅक्समूलरचा विशेष आग्रह नाहीं.

या सर्व विवेचनावरून हें उघड आहे कीं, वैदिकवाङ्मयाचे जे निरनिराळे विभाग पडतात त्यांच्या रचनाकालाला प्रत्येकीं २०० वर्षांचा दिलेला काळ अगदींच अनमानधपक्याचा आहे व स्वतः मोक्षमूलर याचाहि उद्देश वेदविभागांच्या रचनेला किमानपक्षीं २०० वर्षें काल लागेल व ख्रि. पू. १००० च्या पूर्वी तरी निदान ऋग्वेदसंहिता पुरी झाली असली पाहिजे इतकेंच म्हणण्याचा आहे. त्यानें जो ख्रि. पू. १२०० ते १००० हा काल ठरविला आहे तो काल म्हणजे त्याच्या मतें ऋग्वेदाच्या अर्वाचीनत्वाची कमालमर्यादा होय, व १८९० सालीं "भौतिकधर्मा"वर त्याचीं जीं व्याख्यानें झालीं त्यांत त्यानें ऋग्वेदाच्या प्राचीनत्वाची कमालमर्यादा निश्चित होण्याची आशा नको असें स्पष्ट विधान केलें आहे. "वैदिकसूक्तें ख्रिस्तीशकापूर्वी १०००, १५००, २००० अगर ३००० वर्षें निर्माण झालीं याचा निश्चय करण्याचें सामर्थ्य पृथ्वीवरील कोणाहि माणसाच्या अंगीं नाहीं" असें तो म्हणतो. शास्त्रीय विषयांत सुद्धां कल्पनांचा पगडा किती चालतो हें यावरून चांगलें व्यक्त होतें. गृहीतकृत्याप्रमाणें घेऊन चाललेल्या व केवळ कल्पनामय अशा या मॅक्समूलरनें ठरविलेल्या वैदिककालाला कालगतीनें बरेंच महत्त्व आलें व तो एक शास्त्रीय शोध होऊन बसला, व पुराव्यावांचूनच त्याला शास्त्रसिद्ध सिद्धान्ताचें स्वरूप आलें. ख्रि. पू. १२०० ते १००० हा ऋग्वेदकाल म्हणून मॅक्समूलरनें सिद्ध केलें आहे असें म्हणण्याची संवयच पडून गेली आहे. व्हिटने या गृहस्थानें या गोष्टीचा निषेध केला आहे. एल्. व्हान्. श्रॅडरसारख्या कांहीं कांहीं संशोधकांनीं मात्र १५०० किंवा २००० पर्यंत भीत भीत आपली मजल नेली आहे. कांहीं वर्षांपूर्वी एच्. याकोबी यानें ख्रि. पू. तिसऱ्या सहस्रकांत जेव्हां वेदकाल नेला व आपल्या म्हणण्याचा पुष्ठ्यर्थ जेव्हां ज्योतिर्विषयक गणिताचा आधार दिला तेव्हां तर तज्ज्ञ पंडितांत मोठीच खळवळ उडाली व या कालनिर्णयपद्धतीला त्यांनीं वेडाच्या लहरींत काढलें. आजच्या काळांत देखील याकोबी या पंडितानें वेदकालासंबंधाचें असलें अतिशयोक्तिपूर्ण विधान करण्याचें साहस केल्याबद्दल व त्याच्या त्या तऱ्हेबद्दल लोकांच्या अंगावर शहारे आल्यासारखें होतें. आतांपर्यंत "शास्त्रीय सिद्धान्त" "शास्त्रीय सिद्धान्त" म्हणून इतक्या काळजीनें पोटाशीं बाळगिलेला आजपर्यंत चालत आलेला सिद्धान्त कसल्या शुष्क पायावर उभारलेला होता हें हे लोक अजीच विसरले ही आश्चर्याची गोष्ट होय.

प्राचीन भारतीयवाङ्मयाचा कालानुक्रम बसविण्याच्या कामीं व त्याविषयीं सिद्धान्त बांधण्याच्या कामीं ज्योतिर्विषयक माहितीची मदत घेण्याचा प्रकार आजचा नवा नाहीं. लुडविग् यानें सूर्यग्रहणांच्या माहितीच्या आधारें असला प्रयत्न केलेला आहे. पूर्वीच्या काळीं ऋत्विज् लोकांनां यज्ञाच्या वेळा निश्चित करावयाच्या असत व ते रोमन पॉंटिफिसेस्प्रमाणें पंचांगकर्तेच बनलेले होते. त्यांनां यज्ञाच्या वेळा नक्की ठरविण्यासाठीं वरचेवर आकाशांत पहावें लागे. म्हणून ब्राह्मणग्रंथ व सूत्रग्रंथ यांत सुद्धां आपल्याला ज्योतिषविषयक व पंचांगविषयक माहिती बरीच सांपडते. यांच्यांत नक्षत्रांचा भाग फार आहे. सर्व नक्षत्रांतून एक प्रदक्षिणा करण्यास चंद्रास २७ अहोरात्र लागतात, व प्रत्येक रात्रीं चंद्र निरनिराळ्या नक्षत्रांजवळ असतो. क्रांतिवृत्तापासून फारशा अंतरावर नसलेल्या या नक्षत्रांचें एक नक्षत्रचक्र बनविण्यांत आलें; हें

नक्षत्रचक्र म्हणजे त्या त्या भागांत असणाऱ्या २७ नक्षत्रांची एक क्रमवार मालिकाच होय. या चांद्र नक्षत्रचक्राचा उपयोग विशिष्ट कालीं चंद्र कोठें आहे हें समजण्याकडे करण्यांत आला. उदाहरणार्थ, वैदिक वाङ्मयांत "अमुक नक्षत्राखालीं" म्हणजे "चंद्र अमुक नक्षत्राला असतांना" अमुक एक यज्ञिय क्रिया करावयाची असे अनेक उल्लेख सांपडतात. पूर्णचंद्राचा व नक्षत्रांचा विशिष्ट तऱ्हेनें संबंध जोडल्याचीं उदाहरणें तर अनेक आहेत. प्राचीन वाङ्मयांत २७ नक्षत्रांपैकीं बाराच नक्षत्रांचा संबंध अशा तऱ्हेनें पूर्ण चंद्राशीं जोडलेला आढळतो. बारा नक्षत्रांवरून महिन्यांचीं नांवें जीं ठेविलेलीं आहेत त्यांचीहि उपपत्ति लागते. हीं महिन्यांचीं नावें प्रथमतः चांद्र महिन्यांनां लावण्यांत आलीं व नंतर हीं नांवें सौरवर्षाच्या बारा महिन्यांस लावण्यांत आलीं. चांद्रवर्ष व सौरवर्ष यांचा मेळ घालण्याचा प्रयत्न वैदिक काळांत यापूर्वीच केला गेला आहे म्हणून कांहीं कांहीं चांद्र पौर्णमास्य नक्षत्रांच्या व ऋतूंच्या संबंधावरून किंवा वर्षारंभ पद्धतीवरून कांहीं सिद्धान्त बांधावे कीं नाहीं असा प्रश्न उपस्थित होतो. अशा तऱ्हेचे सिद्धान्त बांधण्याचा प्रयत्न १८९३ सालीं केला गेला आहे व याचीं फलितेंहि मोठीं आश्चर्यकारक आहेत. हा प्रयत्न एच्. याकोबी यानें बॉन (जर्मनी) येथें व बाळ गंगाधर टिळक यांनीं पुण्यास एकाच काळीं पण स्वतंत्र रीतीनें केला.

या दोघां विद्वान् संशोधकांनीं निरनिराळ्या पद्धतीनें असें मत स्थापित केलें आहे कीं, 'ब्राह्मण'कालीं कृत्तिका हें नक्षत्रमालेंतील आद्य नक्षत्र होतें व कृत्तिकानक्षत्र (कार्तिक महिना) आणि मेषसंपात (वसंतारंभ) एका वेळीं येत असत; आणि वेदग्रंथांतहि त्या वेळच्या प्राचीन पंचागपद्धतीबद्दल जे आधार सांपडतात त्यावरून त्या काळीं मेषसंपात मृगशीर्षनक्षत्रांत (मार्गशीर्षमासांत) येत असे. अयनचलन–काल ठरविण्याच्या गणितावरून असें दिसतें कीं, मेषसंपात कृत्तिकांमध्यें इ. सनापूर्वी २५०० चे सुमारास आणि मृगशीर्षामध्यें ४५०० चे सुमारास होता. परंतु इकडे टिळक कांहीं वेदग्रंथांचा काल इ. सनापूर्वी ६००० वर्षे मागें नेतात; तर तिकडे याकोबी, ऋग्वेदांतील ऋचा ज्या आर्यसंस्कृतीच्या कालांत झाल्या त्याचा आरंभ इ. सनापूर्वी ४५०० वर्षे होतो, इतकेंच मानतो. त्याच्या मतानें हा संस्कृतिकाल म्हणजे इ. सनापूर्वी ४५०० ते २५०० वर्षे. आणि आपणांस उपलब्ध असलेला ऋचा–संग्रह ह्या कालाच्या उत्तरार्धांत झाला असें त्याचें मत पडतें.

याकोबीच्या या मताला ज्योतिषशास्त्रांतील दुसऱ्या एका गोष्टीवरून पुष्टि मिळालेली आहे. गृह्यसूत्रामध्यें प्राचीन हिंदुस्थानांतील विवाहकर्मांतील असा एक विधि दिलेला आहे कीं, वधूवरांनीं गृहप्रवेश केल्यानंतर एका वृषभचर्मावर स्वस्थ बसून रहावयाचें, आणि सायंकाळीं नक्षत्रें दिसूं लागलीं कीं, वरानें वधूस 'ध्रुव' तारा (अढळ तारा) दाखवावयाचा, आणि पुढील वाक्य म्हणावयाचें, "तूंहि माझ्या घरांत अशीच अढळ (पतिनिष्ठ) रहा व वैभवशाली हो"; आणि त्यावर वधूनें उलट सांगावयाचें कीं "तुम्हीं अढळ (पत्नीव्रत) आहां, मीहि आपल्या पतीच्या गृहांत अढळ (पतिव्रता) राहीन." 'ध्रुव' म्हणजे 'अचल तारा' असें जें विवाहविधींत या ताऱ्याचें नांव दिलेलें आहे त्याचें विशेष महत्त्व आहे; या सर्व विवाहसंस्कारांत वैवाहिकनीति अथवा ब्रह्मचर्य याची 'ध्रुवतारा' ही प्रतिमाच मानीत, याचें कारण हें कीं, ध्रुवतारा अचल आहे अशी त्या काळीं समजूत होती; निदान त्याचें चलन झालेलें कोणींहि पाहिलेलें नव्हतें. ज्या कालीं खध्रुवाच्या अगदीं जवळचा एखादा तेजस्वी तारा पाहणाराला अगदीं अचल असा दिसे त्या कालापासून ध्रुव हें नामाभिधान आणि तो विधि चालत आलेला असला पाहिजे.

आतां अयन-चलनाचा आणखी असा परिणाम होतो कीं, खमध्यरेषेच्या हळूहळू होणाऱ्या फरकाबरोबर त्याचा उत्तरध्रुवहि फिरत असतो, आणि त्याची वस्तुतः सुमारें २६००० वर्षांनीं २३½ अंशाच्या त्रिज्येची क्रांतिवृत्ताच्या अचलध्रुवाभोंवतीं एक वर्तुलप्रदक्षिणा होते. यामुळें एकामागून एक असा एकेक तारा उत्तरध्रुवासमोर येतो व उत्तरतारा अथवा ध्रुवतारा बनतो; परंतु एक विशिष्ट तेजस्वी तारा पुन्हां पुन्हां इतका ध्रुवाजवळ येतो कीं, सामान्य व्यवहारांत त्यालाच ध्रुवतारा असें मानतां येतें. सांप्रत ध्रुवपुच्छांतील (Little Bear) दुसऱ्या नंबरचा 'आल्फा' याला उत्तरगोलार्धांत ध्रुवतारा असें मानतात. आतां अर्थात् वेदकालीन ध्रुवतारा म्हणजे हा 'आल्फा'च असणें शक्य नाहीं, कारण फक्त २००० वर्षांपूर्वींच हा तारा ध्रुवापासून इतका दूर होता कीं, त्याला 'अचल' (ध्रुवतारा) असें नांव पडणें हें बहुतेक शक्यच नव्हतें. इ. सनापूर्वी २७८० मध्यें 'अचल' या नांवास पात्र असा दुसराच एक ध्रुवतारा आपणांस आढळतो. त्या कालीं ५०० वर्षेपर्यंत आल्फा ड्रेकॉनीस हा तारा इतका ध्रुवाजवळ होता कीं नुसत्या डोळ्यानें (दुर्बिणीशिवाय) पाहणारांनां तो अचल वाटत असला पाहिजे. तेव्हां 'ध्रुव' या नांवाचा आरंभ व तसेंच विवाह-दिन-सायंकालीं वधूला वैवाहिक व्रताची प्रतिमा म्हणून 'अचल' (ध्रुव) तारा दाखविण्याच्या विधीचा आरंभहि ज्या काळीं आल्फा ड्रेकानीस हा ध्रुवतारा होता त्या काळीं म्हणजे इ. सनापूर्वी तिसऱ्या सहस्रकाच्या पूर्वार्धांत झाला असें आपणांस मानतां येतें. आतां ऋग्वेदांतील विवाहमंत्रांत हा विधि कोठेंहि आलेला आढळत नाहीं यावरून याकोबीचें मत असें झालें आहे कीं, "विवाहसंस्कारांत ध्रुवाचा उपयोग ऋग्वेदकालीं करीत नसत, तर त्यानंतरच्या कालांत हा विधि सुरू झाला; आणि

यावरून आर्यसंस्कृतींतील ऋग्वेदकाल हा इ. सनापूर्वी तिसऱ्या सहस्रकाच्या पूर्वींचा आहे."

मागें सांगितलेंच आहे कीं, याकोबीच्या या सिद्धांतावर जोराचे हल्ले झाले; आणि ते हल्ले विशेषतः ज्योतिःशास्त्र-विषयक पुराव्याच्या पहिल्या भागावर झाले. निरनिराळ्या सहस्रकांतील वर्षारंभकालाच्या प्रश्नाचा हा विषय मोठा भानगडीचा आहे; आणि हा प्रश्न सोडविणें विशेषच अवघड जाण्याचें कारण हिंदुस्थानांत अगदीं पुरातनकाळापासून निरनिराळे वर्षारंभ प्रचलित होते हें होय. वर्षारंभ केव्हां वसंतऋतूंत, केव्हां हिंवाळ्यांत, केव्हां पावसाळ्यांत* धरीत असत. तसेंच प्राचीन काळीं भारतीय लोकांनां संपातांबद्दलची माहिती होती कीं नाहीं, याबद्दलहि वाद आहे. दुसरे पक्षीं, ध्रुवताऱ्याच्या आधारानें जो दुसरा पुरावा पुढें मांडला आहे तो खोडण्याकरितां परीक्षणांत टिकेल असें थोडेंच पुढें मांडण्यांत येतें. तथापि या प्रश्नाचा यापक्षीं अगर त्यापक्षीं कायम निकाल लागला असें मात्र म्हणतां येत नाहीं. आतां पुढें प्रश्न असा आहे कीं, प्राचीन भारतीय ज्योतिःशास्त्र व वैदिकपंचांग या विषयांतील नवीन शोधांनीं याकोबीच्या सिद्धांतांनां पुष्टि मिळते कीं नाहीं?

या बाबतींत एक गोष्ट निश्चित आहे. हिंदुस्थानच्या इतिहासाच्या दृष्टीनें पाहतां वैदिक वाङ्मय हें ख्रिस्तपूर्व तिसऱ्या सहस्रकांतलें आहे, आणि प्राचीन आर्यसंस्कृति ही चवथ्या सहस्रकांतील आहे याबद्दल वाद नाहीं; उलटपक्षीं वेदकाल म्हणजे इ. स. पूर्वी १२०० किंवा फार तर १५०० वर्षें हें मोक्षमुल्लरादि विद्वानांचें मत, प्राचीन हिंदुस्थानाबद्दलच्या राजकीय, वाङ्मयीन आणि धार्मिक इतिहासाबद्दलच्या आजच्या आपल्या माहितीशीं मुळींच सुसंगत नाहीं, याबद्दलहि वाद नाहीं. हें आतां जी. बुल्हरनें व इतर पंडितांनीं अगदीं खात्रीलायक सिद्ध केलें आहे.

इ. पू. तिसऱ्या शतकांत उत्तरेकडील भारतीयांनीं दक्षिण हिंदुस्थान जिंकला, आणि तेथें ब्राह्मणसंस्कृतीनें चढाई केली, असें शिलालेखांवरून सिद्ध होत आहे, तथापि बौधायन आणि आपस्तंब अशा कांहीं वेदशाखा दक्षिण हिंदुस्थानांत निघाल्या या गोष्टीवरून असें दिसतें कीं, आर्यन् लोकांचा दक्षिणविजय पुष्कळ आधीं म्हणजे इ. पू. ७ व्या किंवा ८ व्या शतकांत किंवा त्यापूर्वी झाला असला पाहिजे. कारण विजयानंतर तावडतोब सर्व प्रदेशांत आर्यन् लोकांची वसाहत होऊन दक्षिणेंत वेदशाखा उत्पन्न होण्याइतकें ब्राह्मणांचें महत्त्व प्रस्थापित झालें असें मानणें सयुक्तिक दिसत नाहीं.

तसेंच इ. पू. १२०० चे किंवा १५०० चे सुद्धां सुमारास भारतीय आर्यन् हिंदुस्थानच्या अगदीं वायव्य कोंपऱ्यांत (पंजाबांत) आणि पूर्वअफगाणिस्तानांत रहात असत या मताचा त्यांनीं दक्षिण-हिंदुस्थान इ. पू. ६०० किंवा ७०० चे सुमारास जिंकला या म्हणण्याशीं मेळ मुळींच घालतां येत नाहीं. बुल्हर म्हणतोः "ज्यांच्यामध्यें अनेक जाती होत्या व नेहमीं आपआपसांत ज्यांचीं युद्धें चालू असत अशा वेदकालीन भारतीय आर्यन् वंशानें पांचसहा किंवा फारतर आठ शतकांत हिंदुस्थानांतील (पंजाब, आसाम व ब्रह्मदेश खेरीजकरून) सुमारें १२३,००० चौरस मैल इतका प्रदेश जिंकला असावा व तेथें राज्यें स्थापन करून एकाच नमुन्यावर सर्वत्र व्यवस्था केली असावी, ही कल्पनाच अगदीं हास्यास्पद दिसते; आणि शिवाय ह्या प्रदेशांत सर्वच रानटी जातींची वस्ती नव्हती, तर जेत्या आर्यन् लोकांच्या पेक्षां सुधारणेंत फारसे कमी नाहींत अशा कांहीं लोकांचीहि तेथें वस्ती होती, ही गोष्ट लक्षांत घेतली म्हणजे तर वरील कल्पना अधिकच हास्यास्पद ठरते."

सातशें वर्षांचा काल इतक्या पुष्कळ उलाढालींनां पुरेसा आहे हें ओल्डेनबर्गचें मत ग्राह्य आहे असें म्हणतां येत नाहीं. ओल्डेनबर्ग म्हणतोः "उत्तर व दक्षिण अमेरिकेंतील अफाट मैदानांत केवळ चारशें वर्षांत केवढें मन्वंतर झालें आहे हें लक्षांत घ्यावें." तथापि ही केलेली तुलना पोकळ आहे. अमेरिकेंत ज्या जातींचा आणि संस्कृतींचा एकमेकींशीं संबंध आला त्यांमध्यें आणि हिंदुस्थानांतील ज्या जाती व संस्कृतींबद्दल आपणांस विचार करावयाचा आहे त्यांच्यामध्यें फार फरक आहे. प्राचीन हिंदुस्थानांतील राजकीय परिस्थितीचा विचार करतां ऋग्वेदांतील व आर्षकाव्यांतील कांहीं श्लोकांवरून आपणांस अशी माहिती मिळते कीं, हिंदुस्थानच्या अर्वाचीन इतिहासांत जसा प्रकार आढळतो, तसाच सतत आपसांत लढाया चालू असण्याचा प्रकार प्राचीन आणि अत्यंत प्राचीन काळींहि निरनिराळ्या आर्यन् जातींमध्यें चालू असे. अशा परिस्थितींत देशभर आर्यन् भाषा, लोक, आणि संस्था यांच्या प्रसाराचें काम क्रमाक्रमानें अत्यंत सावकाशच चाललें असलें पाहिजे. तसेंच हिंदी वाङ्मयांतील दोन अगदीं जुन्या भागांची एकमेकांशीं जर आपण तुलना केली तर आपणांस प्रत्यक्ष असें दिसतें कीं, आर्यनांची पुढें पूर्वेकडे व दक्षिणेकडे चाल फार आस्तेआस्ते झाली. ऋग्वेदांतील ऋचांवरून आपणांस असें दिसतें कीं, हिंदी आर्यन् लोक त्या काळीं हिंदुस्थानच्या अगदीं वायव्य कोंपऱ्यांत (पंजाबांतच) फक्त राहत असत, आणि ज्या काळांत ऋग्वेदांतील ऋचा मूळ तयार झाल्या तो काळ बऱ्याच शतकांचा असला पाहिजे.

ऋग्वेदांतील ऋचांचे प्राचीनतम आणि प्राचीन असे जे निरनिराळ्या प्रकारचे विभाग पडतात त्यांवरून हें सिद्ध होतें; आणि अनुक्रमणींमध्येंच फक्त नव्हे तर ब्राह्मण ग्रंथांमध्येंहि ज्या ऋषींनां 'मंत्रद्रष्टे' असें म्हटलें आहे

* शतपथब्राह्मणांत (१२,८,२,३५) म्हटलें आहेः— 'सर्व ऋतु पहिले, सर्वच मधले, सर्वच शेवटले."

त्यांनांच इतिहासपूर्वकालीन 'द्रष्टे' असें खुद्द ऋचांमध्येंहि मानलें आहे आणि ऋचांच्या कर्त्यांनीं 'जुन्या ऋचा,' 'जुन्या पद्धतीनुसार केलेल्या ऋचा' असा पुष्कळ वेळां उल्लेख केलेला आहे, जणूं काय अशा ऋचांचा प्रचार अनादि कालापासूनच चालू आहे. परंतु वेदवाङ्मयांतील इतर ग्रंथांपेक्षां ऋग्वेद हा किती जुना आहे हें आपण या भागांत पुनः पुन्हां पाहिलेंच आहे. तसेंच वेदांतील गद्य-ग्रंथांच्या भाषेपेक्षां ऋचांची भाषा फारच आर्ष आहे. धार्मिक विधि व सांस्कृतिक स्थिति हींहि अगदीं निराळीं आहेत. ब्राह्मणांत, आरण्यकांत आणि उपनिषदांत ऋग्वेदांतील ऋचांनांच केवळ नव्हे तर इतर वेदसंहितांतील स्तोत्रमंत्रांनांहि आद्य पवित्र ग्रंथ असें गृहीत धरलें आहे. इतकेंच नव्हे तर त्या जुन्या ऋचा-मंत्रांचा अर्थहि पुष्कळ वेळां कळत नसे. जुन्या दंतकथाहि विसरून गेल्या होत्या. ऋग्वेदांतील ऋचा आणि ऐतरेय ब्राह्मणांतील शुनःशेपाची कथा यांच्यामध्यें देखील कालाचें अंतर फार मोठें आहे.

हे ग्रंथ लेखी असते तर जो काल लागला असता त्यापेक्षां पाठपद्धतीमुळें बराच मोठा काल मध्यंतरीं गेला, असें गृहीत धरलें पाहिजे. निरनिराळ्या वेदशाखांतील आज अस्तित्वांत असलेल्या व पुष्कळ नष्ट झालेल्या ग्रंथांनां त्यांचें विशिष्ट स्वरूप प्राप्त होईपर्यंत मध्यन्तरीं शिष्य आणि आचार्यांच्या कित्येक पिढ्या होऊन गेल्या असतील. म्हणून भाषा, वाङ्मय आणि संस्कृति या सर्वांच्या आधारें पाहतां आपणांस असेंच मानलें पाहिजे कीं, अगदीं जुन्या ऋचांचा काल आणि संहिता अथवा 'संग्रह' ग्रंथांमध्यें त्या ऋचा एकत्र केल्या 'गेल्या तो काल–कारण ऋग्वेदसंहितेनेंहि लांबच्या एका गत कालाचा शेवट दर्शविला जातो–यांच्यामध्यें, आणि तसेंच ऋग्वेदसंहिताकाल आणि ब्राह्मणकाल यांच्यामध्यें बरींच शतकें गेलीं होती. त्याचप्रमाणें ब्राह्मण-ग्रंथ त्यांतील अनेक शाखा व उपशाखा आणि त्यांतील असंख्य गुरुपरंपरा व आद्य गुरूंचा उल्लेख ह्या सर्व गोष्टी अस्तित्वांत येण्यासहि कित्येक शतकांचा काल लागला असला पाहिजे. हें सर्व वाङ्मय, आणि तसेंच ब्राह्मणी संस्कृतीचा प्रसार आणि त्याजबरोबर प्रस्थापित होणारें भिक्षुकवर्गाचें वर्चस्व या सर्व गोष्टींनांहि कांहीं शतकांचा काल लागला असला पाहिजे. तसेंच उपनिषदांकडे पाहिलें तर तींहि निरनिराळ्या कालांतील असून त्यांतहि मोठी लांब परंपरा व आचार्यांच्या पिढ्या होऊन गेल्याचें दिसतें. त्याप्रमाणें असेंहि दिसतें कीं, एवढ्या मोठ्या कालांत म्हणजे वेदवाङ्मयाच्या सुरुवातीपासून तों त्याच्या सर्व शाखा उपशाखा पडेपर्यंतच्या एकंदर कालांत भारतीय आर्यन् लोकांनीं त्या मानानें अगदींच लहान प्रदेश म्हणजे सिंधुनदीपासून गंगानदीपर्यंतचा उत्तर हिंदुस्थानचा प्रदेश जिंकून घेतला होता. जर हिंदुस्थानच्या वायव्य कोंपऱ्यापासून पूर्वेकडील गंगानदीच्या प्रदेशापर्यंत मुलूख काबीज करण्यास इतका मोठा काल लागला तर सर्व मध्य व दक्षिण हिंदुस्थान जिंकून घेण्यास कितीतरी शतकें लागलीं असलीं पाहिजेत. आणि याप्रमाणें आपण विचार केला तर ७०० वर्षांचा काल म्हणजे फार मोठा असें मुळींच वाटणार नाहीं.

ह्याच्याबरोबरच दुसऱ्याहि गोष्टींचा विचार केला पाहिजे. इ. पू. ५०० वर्षांच्या सुमाराच्या बौद्धसांप्रदायिक वाङ्मयांत वेदवाङ्मय पूर्णपणें अस्तित्वांत असल्याचें गृहीत धरलें आहे ही गोष्ट निर्विवाद रीतीनें दाखवून दिल्याबद्दलचें श्रेय मोक्षमुल्लर साहेबांनां आहे. आतां तर आपणांस बौद्धवाङ्मयाबद्दल पुष्कळ माहिती झालेली आहे; आणि त्यावरूनहि बौद्धांनां वेदांचीच काय पण वेदांगें व ब्राह्मणीय वाङ्मय व शास्त्रें यांच्या विस्तृत वाढीबद्दलचीहि माहिती होती असें दिसतें. तीस चाळीस वर्षांपूर्वीं अशी समजूत होती कीं; बौद्धधर्माच्या सुरुवातीपर्यंतच्या हिंदुस्थानांतील धार्मिक इतिहासाची संपूर्ण वाढ सातशें वर्षांच्या अवधींतच झालेली आहे. परंतु प्राचीन हिंदुस्थानांतील धार्मिक इतिहासाच्या स्थितीबद्दल तीसचाळीस वर्षांपूर्वीं जी माहिती होती त्यापेक्षां आज बरीच अधिक माहिती आपणांस उपलब्ध झालेली आहे. बौद्धसंप्रदाय निघण्याच्या पूर्वींहि हिंदुस्थानांत वेदांनां पवित्र ग्रंथ न मानणारे कांहीं पंथ होते, असें बुल्हरनें जोरानें प्रतिपादन केलें आहे. अशा पंथांपैकीं एका म्हणजे जैनपंथाची आजपर्यंतची परंपरा सनावलीवरून इतकी विश्वसनीय ठरली आहे कीं, या पंथाचा आद्यप्रवर्तक गुरु इ० पू० ७०० च्या सुमारास होऊन गेला, ही गोष्ट खरी असें आपणांस बहुतेक मानण्यास हरकत नाहीं. तसेंच बुल्हरला असेंहि वाटत होतें कीं, वेद आणि ब्राह्मणधर्म यांच्या विरुद्ध असलेले इतर पंथहि, आजपर्यंत मानीत असत त्यापेक्षांहि बऱ्याच मागील काळापासून चालत आलेले आहेत, असें सिद्ध करतां येईल. परंतु दुर्दैवानें असा सिद्धान्त पुढें मांडण्यास त्यास सवड मिळाली नाहीं.

आतांपर्यंत केलेल्या विवेचनाचें तात्पर्य असें कीं, कालनिर्णयाच्या प्रश्नाची स्थिति नुकतीच पूर्वीं सांगत असत तितकी बिकट नाहीं. वेदांतील अगदीं जुन्या ऋचांचा काळ म्हणजे इ. पू. १२०० किंवा १५०० वर्षें, या विधानास टिळक व याकोबी यांचा विरोध आहे. तथापि वेदकाल म्हणजे अनादिकालापासून इ. पू. ५०० पर्यंत हा होय, यापेक्षां अधिक माहिती खरोखर कोणासच नाहीं. वेदविषयाच्या वाङ्मयांत बहुतेक ठिकाणीं दिलेले वेदकालाबद्दलचे सन म्हणजे इ. पू. १२००–५०० किंवा १५००–५०० किंवा २०००–५०० यांपैकीं कोणताहि खरा मानण्यास आधार नाहीं. फक्त इ. पू. ५०० हा अंतिमकालाचा सन असें मानतां

येतें आणि गेल्या दहा वर्षांतील शोधांचें तात्पर्य असें कीं, या इ. पू. ५०० वर्षे सनाबद्दल इ. पू. ८०० वर्षे असें म्हणावें लागेल; आणि आरंभकाल दुसऱ्या सहस्रकाऐवजीं तिसऱ्या सहस्रकांत जातो, हें म्हणणें अधिक सयुक्तिक होईल. परंतु विषयाच्या स्वरूपानुसार जेथें नक्की सन सांगतां येणें शक्य नाहीं, तेथें कोणतेंहि नक्की विधान न करण्याबद्दल आपण खबरदारी घेतली पाहिजे.

येथपर्यंतचें विवरण विंटर्निट्झ याच्या मतानुरोधानें केलेलें आहे. विंटर्निट्झशीं आमचा कांहीं मतभेद आहे तो पुढें स्पष्ट करूं.

वेदकालनिश्चयाला कांहीं मदत करून, प्राचीन आर्यसुधारणेवर जास्त प्रकाश पाडावा या उद्देशानें कै. लोकमान्य टिळकांनीं ओरायन नांवाचा ग्रंथ लिहिला आहे. त्यांत ते म्हणतातः—

मॅक्स मुल्लरसारख्या पंडितांनीं भाषाशास्त्रपद्धतीचा उपयोग करून दोनशें वर्षांचा एक, असे छंदमंत्रकालादि वेदकालाचे चार विभाग केले आहेत. तेव्हां त्यांच्या मतें वेदकाल बुद्धकालापूर्वी ८०० वर्षे, म्हणजे इ. स. पू. १२०० हा आहे.

या कालनिर्णयाच्या पद्धतीवरून अनेक निरनिराळी विसंगत अनुमानें निघत असल्यानें ही पद्धति चुकीची आहे.

ज्योतिषपद्धतीला कांहीं संस्कृतज्ञ पंडितांनीं निरर्थक ठरविलें आहे तें वास्तविक बरोबर नाहीं. या पद्धतींत बऱ्याचशा अडचणी आहेत तरी योग्य प्रयत्न झाल्यास तिचा चांगला उपयोग होईल. नुसता पुराणांतील गोष्टींवर व शब्दव्युत्पत्तीवर भर न ठेवतां, ऋग्वेदसंहिता व ब्राह्मणें यांतील ऐतिहासिक व भौगोलिक आधारांवरून भारतीय वाङ्मयाचें प्राचीनत्व पूर्णपणें स्थापितां येतें.

वेदकालीं कालमापनाची व्यवस्था कशी होती हें पाहूं जातां, चंद्राचे वृद्धिक्षय, ऋतूंचे बदल, सूर्याचीं दक्षिणोत्तर अयनें, हीं त्यांचीं साधनें असावींतसें दिसतें. सत्रें सूर्याच्या सांवत्सरिक गत्यनुरोधानें बसविलीं असल्याकारणानें, सत्रें आणि संवत्सर यांतील मुख्य गोष्टी एकच असत; सत्राचा अंत तोच संवत्सराचा अंत; म्हणून सत्र किंवा यज्ञ आणि संवत्सर हे शब्द समानार्थी बनले होते. जसें: "संवत्सरः प्रजापतिः । प्रजापतिर्यज्ञः ।"* "यज्ञो वै प्रजापतिः । संवत्सरः प्रजापतिः ।"† इ.

चांद्र व सौर वर्षांचा मिलाफ करण्यासाठीं अधिक मास धरण्याची पद्धत ऋग्वेदकालापासूनची आहे; "वेद मासो धृतव्रतो द्वादश प्रजावतः । वेदा य उपजायते ।" असें ऋग्वेदांत (१. २५,८.) म्हटलें आहे. त्यावेळीं वर्षमान नाक्षत्र होतें व ऋतुचक्राशीं मेळ ठेवण्यासाठीं सुमारें दर २००० वर्षांनीं वर्षारंभ बदलीत असत. आतां वर्षारंभ केव्हां धरीत याविषयीं शोध लावितां असें दिसतें कीं, वैदिककाळीं वसंतसंपातीं वर्षारंभ होत असे पण पुढील काळांत तो मकरसंक्रमणीं होऊं लागला. या फरकाबरोबर उत्तरायणाचा मूळ अर्थ जो वसंतसंपातापासून शरत्संपातापर्यंत होणाऱ्या वसंत, ग्रीष्म, व वर्षा या ऋतूंच्या सहा महिन्यांचा काळ, तो बदलून वर्षाच्या आयनिक विभागाचा तो दर्शक झाला. या नवीन वर्षारंभाबरोबर वार्षिक सत्रांचा आरंभहि मकरसंक्रमणीं होऊं लागला. तथापि पूर्वीचा वर्षारंभ अजीबात न टाकतां, त्याचा यज्ञकर्मांत उपयोग करीत व इतर व्यवहाराला नवीन वर्षारंभ धरीत असत.

वैदिक ऋषींनीं क्रान्तिवृत्ताचे २७ भाग गणिताप्रमाणें केले असतील हें संभवत नाहीं; ते मुख्य मुख्य तारांच्या खुणांवरून ढोबळ प्रमाणावर केले असावेत. म्हणून नक्षत्रें समविभागात्मक न समजतां, त्या नांवांचे नक्षत्रपुंज समजले पाहिजेत.

वेदांगज्योतिष सोडून तैत्तिरीयसंहिता व ब्राह्मण यांत आढळणाऱ्या चार निरनिराळ्या वचनांवरून वसंतसंपात कृत्तिकांमध्यें होता हें स्पष्ट दाखवितां येतें. तीं चार वचनें येणेंप्रमाणें. एक, *नक्षत्रचक्रास व तदधिष्ठित देवतांस कृत्तिकांपासून आरंभ केला आहे असें सांगणारें वचन. दुसरें, †कृत्तिका नक्षत्रांचें मुख आहे असें स्पष्ट वचन. तिसरें, ‡कृत्तिका देवनक्षत्रांचा आरंभ आहे हें वचन. व चवथें, ¶माघपौर्णिमेला उदगयनारंभ होत असे असें स्पष्ट सांगणारें सत्रारंभदिवसाविषयींचें विवेचन.

कृत्तिका नांवाचा तारकापुंज वर्षाचें आरंभस्थान धरून तैत्तिरीयसंहितेचा काळ इ. स. पू. सुमारें २३५० वर्षे इतका येतो.

वर्षारंभ माघांत होत होता असें मानलें तर त्याशीं क्रान्तिवृत्तांतील अयनादि प्रधान बिंदूचीं नक्षत्रासंबंधीं स्थानें बरोबर जुळतात. आतां वैदिककाळीं फाल्गुनी पौर्णिमेला उदगयनारंभीं वर्षारंभ होत असे कीं काय हें पाहूं. उदगयनारंभ जर माघांत न होतां फाल्गुनांत झाला तर वसंतसंपातहि कृत्तिकांच्या पुढें दोन नक्षत्रें (ऋतु एक महिना मागें यावयास वसंतसंपात दोन नक्षत्रें मागें आणला पाहिजे) म्हणजे मृगशीर्षांत येईल. मृगशीर्षाचें दुसरें नांव आग्रहायणी. आग्रहायणी नक्षत्रांचें मुख होतें असें कोठें कोठें वैदिक ग्रंथांत म्हटलें आहे. मार्गशीर्षी पौर्णिमेला पूर्वी एकदां वर्षारंभ होत असे व त्या पौर्णिमेच्या नांवावरून मृगशीर्षाला आग्रहायणी हें नांव पडलें अशी पुष्कळांची कल्पना आहे. पण ती निराधार दिसते. मार्गशीर्ष पौर्णिमेला वर्षारंभ होत असे असें धरल्यास, त्याला "§मासानां मार्गशीर्षोऽस्मि ऋतूनां कुसुमाकरः।" या गीतावचनाखेरीज दुसरा आधार दिसत नाहीं. हें वचन आग्रहायणी शब्दाच्या चुकीच्या व्युत्पत्तीवर लिहिलें गेलें असावें व त्याचाच अनुवाद सर्व विद्वानांनीं केलेला दिसतो. या चुकीच्या कल्पनेमुळें ज्योतिषसिद्धांत चुकीचे निघूं लागले व त्यांना संगति आणण्यासाठीं दुसऱ्या नवीन कल्पना लढवाव्या लागल्या. यावरून आग्रहायणी याचा सध्यां प्रचलित असलेला अर्थ घेऊन चालावयाचें नाहीं हें उघड दिसतें. या नांवाच्या नक्षत्रामध्यें सूर्य असतांना वर्षारंभ होत असे असें मानल्यास बराचसा उलगडा होणार आहे; मग त्या नक्षत्राचें नांव आग्रहायणी असो कीं, अग्रहायण असो. तें

---

* ऐ. ब्रा. २·७; ४·२२. † तै. सं. २·५,७,३; ७·५. ७,४; ७.२.१०,३.

* तै. सं. ४·४·१०. तै. ब्रा. ३·१·१,६;१·१,२. † तै. ब्रा. १·१·२,१;१·१·२,६. ‡ तै. ब्रा. १·५·२,७. ¶ तै. सं. ७·४,८. § भ. गी. १०–३५.

नक्षत्र वर्षामध्यें पहिलें एवढाच मुद्याचा प्रश्न आहे. अग्रहायण म्हणजे मृगशीर्षनक्षत्र असें धरून चालू या. उदगयन फाल्गुनी पौर्णिमेला झालें म्हणजे अर्थात् दक्षिणायन किंवा पितृयान भाद्रपदी पौर्णिमेला येणार हें उघड आहे. तेव्हां भाद्रपदाचा कृष्णपक्ष हा पितृयानाचा पहिला पंधरवडा किंवा पितृपक्ष झाला. पारशी लोकांचाहि पितृपक्ष याच वेळेस होतो. पारशांचें व आपले सर्व बाबतींत उलटें असल्यानें आपला वर्षारंभ उत्तरायणीं झाला तर त्यांचा दक्षिणायनीं होतो; पण पितृपक्ष मात्र पवित्र गोष्ट म्हणून स्थानभ्रष्ट केली गेली नाहीं.

याप्रमाणें तैत्तिरीयसंहिता व ब्राह्मणें यांत असलेल्या "फाल्गुनीपूर्णमास वर्षाचें मुख होतें" या वचनाचा स्वाभाविकपणें संदर्भावरून होणारा–म्हणजे त्या दिवशीं उत्तरायण होत असे–असा अर्थ घेतल्यास, व मृगशीर्षवाचक अग्रहायण शब्दाचा "वर्षारंभ करणारें" असा खरा अर्थ घेतल्यास, त्या नक्षत्रामध्यें एकदां वसंतसंपात होता हें उघड दिसतें. पितृपक्षाच्या काळावरूनहि असेंच दिसतें. कृत्तिकांमध्यें वसंतसंपात होता ही गोष्ट अशाच पुराव्यावरून सिद्ध केली आहे. मृगशीर्षपुंजांत व्याधासह पांच पहिल्या प्रतीचे तारे आहेत, दुसऱ्या प्रतीचे बरेच आहेत व बाजूला आकाशगंगा आहे. यांतील ताऱ्यांचे अनेक आकार कल्पिलेले असून त्यांवर बरीच रूपकें बसविलीं आहेत. या पुंजांत सबंध मृगाची आकृति न पाहतां फक्त त्याचें शीर्षच कल्पिणें बरोबर होईल. कॅनिस, ओरायन व आर्सा हे तारकापुंज मूळचे आर्यन् लोकांचेच आहेत व आर्यन् जातीच्या तीनहि शाखांमध्यें या पुंजांविषयीं सारख्या गोष्टी आढळतात स्वर्गद्वाराचें श्वानांकडून रक्षण, यमलोकाच्या वाटेंत असलेली (वैतरणी) नदी, ती तरून जाण्याकरितां असलेली नाव, आकाशगंगा वगैरेंच्या कथा ग्रीक, पर्शु व भारतीय या तीनहि आर्यन् शाखांतून आढळतात व वसंतसंपात मृगशीर्षांत होता असें मानल्यानें या रूपकांचा चांगला मेळ बसतो; व आपल्या पुराणांतील मुख्य मुख्य देवतांचें मूळ व स्थान त्या तारकापुंजांत किंवा त्याच्या आसपास असलेलें स्पष्ट दिसून येतें.

अमरकोशकारानें दिलेल्या मृगशीर्षवाचक आग्रहायणी शब्दाची परंपरा पाणिनीच्या पूर्वी वैदिककालापर्यंत म्हणजे आग्रयणी या वैदिक शब्दाशीं लावितां येते. मृगशीर्षाला पूर्वी यज्ञकर्मांत आग्रयण म्हणत असावें असा बराच संभव दिसतो. मूळ आग्रयणेष्टि या प्रत्येक अयनारंभदिवशीं करावयाच्या असत, परंतु संपातचलनामुळें ऋतु मागें मागें येऊन या इष्टी अयनारंभीं न होतां कोणत्यातरी दुसऱ्या वेळीं होऊं लागल्या. तेव्हां आग्रयणेष्टींचा खरा अर्थ लोपल्यावर आग्रहायण किंवा आग्रयण या शब्दाचा अयनारंभीचें नक्षत्र असा अर्थ जाऊन तो शब्द ज्या महिन्यांत ती इष्टि होते त्या महिन्याचा वाचक झाला व त्यावरून "मासानां मार्गशीर्षोऽहम्" वगैरे कल्पना निघाल्या.

आर्यन् लोकांच्या शाखांतील ओरायनसंबंधाच्या विलक्षण कथासाम्यावरून, या कथा उत्पन्न झाल्यावर व आग्रयण उर्फ ओरायन याचें स्वरूप ठरून गेल्यावर या शाखा एकमेकांपासून विभक्त झाल्या असाव्यात असें निश्चित दिसतें.

ऋग्वेदांत पहिल्या मंडळांत (१·१६१,१३) एक ऋचा आहे; तींत "एक श्वान ऋभूनां संवत्सराच्या शेवटीं जागे करी" असा मजकूर आहे. या ठिकाणीं ऋभु म्हणजे ऋतु व श्वान म्हणजे मृगपुंजाजवळील श्वानपुंज असा अर्थ घेतल्यास, या तारकापुंजाशीं सूर्य आला म्हणजे ऋतुदेवता जाग्या होऊन नव्या वर्षास सुरुवात होते, असा वरील ऋचेचा चांगला अर्थ निघतो. म्हणजे वसंतसंपात त्या वेळीं श्वानपुंजाजवळ होता, अर्थातच उत्तरायणारंभ फाल्गुनी पौर्णिमेला होत असे व मृगशीर्ष नक्षत्रमालेच्या आरंभीं असे. वसंतसंपात मृगांत होता हें तैत्तिरीय संहिता व ब्राह्मण यांतील वचन सिद्ध करून दाखविण्यास ऋग्वेदांतील हें स्थान योग्य आहे. असेंच दुसरें एक स्थान म्हणजे दहाव्या मंडळांतील वृषाकपीचें सूक्त.* या ठिकाणीं वृषाकपीचा अर्थ मृगशीर्षांत वसंतसंपात असतांना शरत्संपातीं असलेला सूर्य असा घेतला म्हणजे हें सूक्त चांगलें समजतें. या सूक्तांत मृगशीर्ष व श्वानपुंज यांचेंच केवळ वर्णन आहे असें नाहीं, तर सूर्य ज्यावेळीं विषुव वृत्ताच्या दक्षिणेस किंवा उत्तरेस येऊं लागतो तेव्हांची त्याची स्थितीहि स्पष्टपणें त्यांत वर्णिली आहे. या गोष्टीशीं ऋभूंची गोष्ट जोडली म्हणजे आपणांला या गोष्टी केव्हां रचल्या गेल्या तो काळ निश्चित करतां येतो.

चित्रापूर्णमासीं वर्षारंभ होत असे असें तैत्तिरीय संहितेंत दुसरें एक स्पष्ट वचन आहे. फाल्गुनी पौर्णिमेला दक्षिणायन झाल्यास वसंतसंपात ज्याप्रमाणें मृगशीर्षांत येतो, त्याचप्रमाणें चैत्रीपौर्णिमेला जर दक्षिणायन झालें तर वसंतसंपात पुनर्वसूंत होईल. हा काळ फार प्राचीन आहे: वेदांमध्यें याला स्पष्ट पुरावा फारसा आढळत नाहीं; इतर आर्यन् शाखांतून तर याविषयीं कांहींच सांपडत नाहीं. यज्ञग्रंथांत पुनर्वसूंच्या प्राचीन स्थितीच्या कांहीं खुणा आहेत अदिति ही पुनर्वसूंची अधिष्ठात्री देवता. यज्ञ देवांपासून निघून गेला असतांना तिनें यज्ञारंभ करून दिला. याचा अर्थ असा दिसतो कीं, या काळापूर्वी यज्ञ वाटेल तेव्हां करीत परंतु तेव्हांपासून ते अदितीपासून करावे असें ठरलें. म्हणजे अदिति ही यज्ञाची उर्फ संवत्सराची आरंभक झाली. तिचें अधिष्ठान वसंतसंपातीं आहे. तेव्हां सूर्याचा वार्षिक क्रम अदितीपासून सुरू होत असे. यावरून पुनर्वसूंमध्यें वसंतसंपात असतांना वर्षारंभ मानणारें पंचांग होतें हें निश्चित ठरतें.

आतांपर्यंत तीन प्रकारच्या प्राचीन पंचांगकालांसंबंधीं विवेचन केलें. त्यापैकीं अगदीं पहिला काल तो अदितिकाल किंवा मृगशीर्षपूर्वकाल. याची मर्यादा अजमासें इ. स. पूर्वी ६००० ते ४००० पर्यंत. या कालीं ऋचा पूर्ण झाल्या नव्हत्या. या कालाविषयींचें स्मारक फक्त भारतीयांत आढळतें.

दुसरा, मृगशीर्षकाल. याची मर्यादा इ. स. पूर्वी ४००० ते २५०० पर्यंत. या कालांत ऋग्वेदाचीं बरींच सूक्तें झालीं व इतर गोष्टी रचल्या गेल्या. या कालाच्या उत्तरभागांत आर्यशाखा विभक्त झाल्या.

तिसरा, कृत्तिकाकाल. याची मर्यादा इ. स. पूर्वी २५०० ते १४०० पर्यंत. हा तैत्तिरीयसंहिता व ब्राह्मणांचा काल होय. ऋक् सूक्तें या कालीं समजत नाहींशीं झालीं होतीं.

* ऋ. १०·८६.

चवथा, प्राचीन संस्कृत वाङ्मयाचा काल. इ. स. पूर्वी १४०० ते ५०० पर्यंत. याला बुद्धकाल म्हणतात. सूत्रें व षड्दर्शनें या कालांत झालीं.

हे वर दिलेले काल स्थूलमानानें बरोबर आहेत. सर्वांत जुना जो अदितिकाल, त्या वेळीं आर्यसुधारणेचा आरंभ नसून ती यापूर्वी किती तरी काल सुरू झाली होती हें त्या वेळच्या पंचांगाच्या आवश्यकतेवरून उघड होतें.

पंचांगांत फेरफार अर्वाचीन कालापर्यंत चालू आहेत. याच्या खुणा त्या त्या वेळच्या ग्रंथांतून आढळून येतात. हा इतक्या प्रमाणांवरून ठरविलेला वेदकाल प्राचीन व अर्वाचीन विद्वानांच्या मतांशीं विरुद्ध नाहीं.

याप्रमाणें वेदकाल इ. स. पूर्वी ४००० वर्षांच्या सुमारास जर निश्चित केला तर वेदासंबंधींच्या सर्व गोष्टींचा समाधानकारक उलगडा होतो.

[ टिळकांच्या वेदकालाच्या समर्थनार्थ आणखी पुरावे रा. व्यंकटेश बापूजी केतकर यांनीं आणले आहेत (परिशिष्ट पहा) ].

---

## प्रकरण १० वें.

### वैदिक वाङ्मय, ब्राह्मण जाति आणि यज्ञसंस्था.

**वेदाभ्यास आणि यज्ञसंस्था.**—या दोहोंचा संबंध लक्षांत घेऊन वेदकालीन स्थितीचें आकलन केलें पाहिजे. वेदांचा ऐतिहासिक अर्थ कसा लावावयाचा यासंबंधीं जो प्रयत्न झाला त्याचा इतिहास प्रसंगानुसार मागें दिलाच आहे. आम्हांस येथें एवढेंच सांगावयाचें आहे कीं, संशोधकांच्या चालू पद्धतींत आम्हांस फारसें नवें घालावयाचें नाहीं. प्रचलित ऐतिहासिक पद्धतीच अधिक सविस्तर वापरावयाची आहे. सायणाचार्यांचे व निरुक्तकारांचे जे अर्थ व्यक्त झाले आहेत त्यांचा प्रधानहेतु आमच्या हेतूहून भिन्न आहे. वरील दोन आचार्यांचा हेतु यज्ञसंस्थांचें रक्षण करण्याचा होता व त्यामुळें वेदांचा यज्ञपर अर्थ कसा लावावा ही जबाबदारी त्यांच्यावर पडली होती. अर्वाचीन पंडितांवर ही जबाबदारी नाहीं. ज्या काळीं जें वाक्य बोललें गेलें असेल त्या काळीं त्या वाक्याचा अर्थ काय असेल हें अर्वाचीन पंडित पाहूं पाहतात. त्यांच्या इच्छेविषयीं आमची सहानुभूति आहे. परंतु आमचें येवढेंच मत आहे कीं, त्या अर्थापत्तीसाठीं धडपड करण्यापूर्वी जितक्या तयारीनें जाणें पंडितांचें कर्तव्य होतें तितक्या तयारीनें पंडित गेले नाहींत व ऐतिहासिक अर्थ लावण्याची त्यांनीं फार घाई केली. अर्वाचीन पंडित जी गोष्ट विसरतात ती ही कीं, वेदवाक्यांचा अर्थ पूर्णपणें हातीं येण्यासाठीं तीं वेदवाक्यें यज्ञसंस्थेच्या भट्टींतून संस्कारिलीं गेलीं असल्यामुळें त्या संस्कारित स्थितींतील अर्थाचें व ते संस्कार करणाऱ्या भट्टीचें, म्हणजे यज्ञसंस्थेचें, सहकारित्वानें व साकल्यानें ज्ञान झाल्याशिवाय मूळ अर्थाकडे पोहोंचतांच येणार नाहीं. यज्ञसंस्थेमुळें वाक्यें निवडलीं गेलीं, गोळा केलीं गेलीं, आणि तदनंतर त्यांचे अर्थ ठरविले गेले आणि त्यांचा अनुक्रम, व त्यांचे ऋषी हेहि निर्णीत झाले. वेदवाक्यांचा अर्थ यज्ञसंस्थेच्या संदर्भानेंच समजून घेतला पाहिजे आणि तो अर्थ पूर्णपणें आपल्या हस्तगत करून घेण्यासाठीं संहितेंतील यज्ञमूलक क्षेपांचें दूरीकरण करून मूळ अर्थ काढण्याचा प्रयत्न केला पाहिजे. सूत्रकारांपासून सायणाचार्यापर्यन्तचे ग्रंथकार वेदांचा यज्ञविषयकच अर्थ पहात होते व आम्हीहि बऱ्याच अंशीं तोच पहात आहों; तथापि त्यांच्या व आमच्या दृष्टींत फेर आहे. यज्ञांचें मूलस्वरूप व विकास हीं न पाहतां चालत आलेली यज्ञपद्धति कायम राखण्यासाठीं अर्थ लावण्याच्या प्रयोजनानें त्यांचे विचार व अर्थनिष्पत्तीची पद्धति हीं बद्ध झालीं होतीं. आम्हांस ऐतिहासिक पद्धतीनें यज्ञसंस्थेसाठीं माल गोळा झाला हें लक्षांत घेऊन तो माल तपासावयाचा आहे. ऋचांच्या मूळ अर्थाचें संशोधन होण्यापूर्वी ज्या यंत्रानें ऋचांवर परिणाम घडविला तें यंत्र संपूर्णपणें तपासल्याशिवाय मूळ अर्थाकडे जाऊं पाहणें म्हणजे मधली अत्यंत महत्त्वाची पायरी वगळणें होय. अर्वाचीन संशोधकांची ही अत्यंत महत्त्वाची पायरी चुकली असल्यामुळें त्यांचें झालेलें संशोधन योग्य आहे किंवा दुष्ट आहे हें देखील सांगणें कठिण आहे; व त्यांच्या सर्व संशोधनसमुच्चयाची आज किंमतहि सांगतां येणार नाहीं. ही पायरी ज्या संशोधनभागांत चुकली आहे तें संशोधन आम्हांस पुष्कळसें वगळणें भाग आहे. जी दृष्टि आम्ही पुढें मांडीत आहों त्या दृष्टीचा अवलंब करून झालेल्या संशोधनाचा पुन्हां विचार करावा लागेल; आणि त्यांत संशोधकांची एक पिढी खर्ची पडेल. अर्वाचीन संशोधकांच्या पद्धतींतील महत्त्वाचीच पायरी गळाली असल्यामुळें ते बरोबर आहेत कीं चुकले हें सांगण्यापेक्षां पुन्हां स्वतंत्रपणेंच संशोधन केलेलें बरें. थोड्याबहुत सूचना प्राप्त होण्यासाठीं पूर्वगत संशोधकांचें अर्थनिर्णायक वाङ्मय वाचण्यास हरकत नाहीं अशी आमची भावी अभ्यासकांस शिफारस आहे.

चारहि वेदांचा व त्यांच्या ब्राह्मणांचा व आरण्यकांचा प्रतिपाद्य विषय यज्ञ होय असें अट्टहासानें वारंवार मीमांसाकार व सूत्रकार सांगत असतांहि वेदांचा ऐतिहासिक उपयोग करावयाचा तो यज्ञांगें समजण्यासाठीं करून घ्यावयाचा अजीबात वगळून त्या साहित्याचा स्वतंत्र तऱ्हेनें अर्थ लावण्याची पाश्चात्त्यांची जी प्रवृत्ति झाली त्या प्रवृत्तीस दोन कारणें झालीं. एक तर यज्ञाचें प्राथमिक किंवा उत्तान स्वरूप वेदांवर परिश्रम करणाऱ्या पाश्चात्त्यांपैकीं एकाहि ग्रंथकारास दूरस्थितीमुळें समजलें नाहीं; आणि दुसरी गोष्ट अशी कीं, वेदांचा प्रतिपाद्य विषय यज्ञ आहे असें सांगण्यांत भिक्षुकांची स्वार्थमूलक लटपट होती अशी पाश्चात्त्य ग्रंथकारांची प्रामाणिक समजूत झाली. संहितांतील मंत्रांचा सामाजिक स्थितीच्या

ज्ञानासाठीं, भाषेच्या अगर भाषांच्या इतिहासाच्या ज्ञानासाठीं यूरोपीय पंडितांनीं उपयोग केला, भारतीय व यूरोपीय यांची एकत्र वसती असतां असलेलीं दैवतें, शब्द, आचार, विचार, भाषा, गीतें इत्यादि शोधण्यासाठीं तौलनिक पद्धतीनें अभ्यास करण्याकडे प्रवृत्ति ठेविली. या प्रकारच्या अभ्यासास अगोदर भारतीय संस्कृतीचा अभ्यास यज्ञांगानें केल्याशिवाय पूर्णता व निर्दोषता येणार नसली तरी तो अभ्यास या तयारीशिवाय मुळींच करतां येत नाहीं असें नसल्यामुळें, यज्ञसंस्था समजून घेतल्याशिवाय अत्यंत प्राचीन कालच्या स्थितीचें ज्ञान मिळविण्याची खटपट सुरू झाली.

यज्ञसंस्थेच्या अभ्यासाचा उपयोग यूरोपीयांच्या पैतृक स्थितीच्या ज्ञानासाठीं अल्प, व भारतीय सामाजिक व सांस्कृतिक इतिहास समजून घेण्यासाठीं विशेष आहे. यामुळें यज्ञसंस्थेचा अभ्यास पाश्चात्त्य पंडितांस फारसा मनोरंजक नाहीं. यज्ञासाठीं ज्या ऋचा वापरण्यांत आल्या त्यांचा क्रियेशीं अनुरूप अर्थहि नसे. क्रियेशीं बाह्य स्वरूप जुळवितां आल्यास बरें अशा वृत्तीनें मंत्रांचा विनियोग झालेला दिसतो. असो.

यज्ञसंस्थेचा इतिहास निरनिराळीं संहितीकरणें कोणत्या यज्ञविषयक म्हणजे भिक्षुकी कारणामुळें झालीं या प्रश्नावर प्रकाश पाडतो. प्रथम सध्यांच्या संहिता ज्या स्वरूपांत आहेत त्या स्वरूपावर म्हणजे संहितीकरणावर विचार करूं.

संहितीकरणाची चळवळ कोणच्या कालांत झाली असावी याचें दुसरी एक प्रसिद्ध राजकीय घडामोड घेऊन तिच्याशीं सापेक्षतेनें स्पष्टीकरण पुढें केलें आहे. येथें यज्ञसंस्थेच्या इतिहासाच्या दृष्टीनें कोणत्या कालांत संहितीकरण घालतां येईल हा एक महत्त्वाचा प्रश्न संक्षेपतः पाहूं.

(१) संहिता ज्या वेळेस झाल्या त्या वेळेस सोमयाग हा पशु आणि इष्टी यांनीं मिश्रित झाला होता आणि ऋचांच्या संहितीकरणाचा पहिला प्रयत्न सोमयागमूलक असावा.

(२) संहितीकरणाच्या काळीं घरोघरचें अग्निहोत्र नष्ट झालें होतें, सोम दुर्मिळ होत होता.

(३) सत्रें बंद झालीं होतीं; कां कीं, त्यांचें स्वरूप कांहीं यजूंच्या संहितांत नाहीं, आणि तैत्तिरीय संहितेंत देखील माहिती अत्यंत त्रोटक आहे.

(४) यज्ञ करणाऱ्या ऋत्विजांमध्यें तट पडले असून ते तट अध्वर्युप्रमुख होते.

(५) अथर्ववेदी लोकांविषयीं विरुद्धभाव नाहींसा झाला होता व त्यांसहि त्रैविद्यांच्या यज्ञसंस्थेंत स्थान मिळालें होतें.

याविषयीं अधिक विवेचन पुढें येईल.

यज्ञसंस्थेचा इतिहास आणि संहितीकरण याचा निकट संबंध आहे हें स्पष्ट केलेंच आहे.

यज्ञसंस्था समजावून घ्यावयाची आणि तिच्या अनुषंगानें संहिता व ब्राह्मणें समजावून घ्यावयाचीं. वेदांचा प्रतिपाद्य विषय यज्ञ हा असल्यामुळें वेदांची घटना समजण्यासाठीं यज्ञसंस्थेची वृद्धि व तिचा संपूर्ण इतिहास जेव्हां चांगला लक्षांत येईल तेव्हांच वेदांची घडणहि समजेल. कोणता यज्ञ कसा आणि केव्हां उत्पन्न झाला, निरनिराळ्या शाखांचे लोक कोणते यज्ञ करीत व कोणत्या यज्ञाची माहिती कोणत्या ग्रंथांत आहे, याचें सूक्ष्म ज्ञान तर अवश्य आहेच, पण अग्निष्टोमासारखे यज्ञच तयार कसे झाले, उत्तरक्रतु कसे बनले, सत्रें कशीं तयार झालीं यांची जेव्हां माहिती अवगत करून घ्यावी, तेव्हांच प्रत्येक कार्यप्रयोजनामुळें ग्रंथावर कसे कसे परिणाम झाले हेंहि समजावयास लागेल, आणि यज्ञयोजकांचे सहायक जे मंत्रांचीं व ब्राह्मणवाक्यांचीं स्वतंत्र गांठोडीं बांधणारे संहिताकार ते कोणत्या हेतूनें प्रेरित झाले याचा पत्ता लागेल. कोणत्याहि कल्पनांच्या म्हणजे रचनांच्या इतिहासांत असें आढळून येतें कीं, सामान्य गोष्टीस अनेक आनुषंगिक गोष्टी चिकटून मोठी कल्पना बनते. त्याचप्रमाणें एखादी मोठी प्रचंड कल्पना तयार करतांना तिचीं अंगें म्हणून अनेक कल्पना तयार होतात. पुढें, मोठ्या कल्पनेच्या अंगानें ज्या जन्मास आल्या तथापि ज्यांचें अस्तित्व पृथक्पणें शक्य आहे अशा कल्पना स्वतंत्रपणें अस्तित्वांत येतात. यज्ञसंस्थांची जी वाढ झाली ती या दोन्ही प्रकारांनीं होत गेली काय? तसें असल्यास ती कशी होत गेली याचें प्रथम आकलन करून नंतर या दोनहि प्रकारांचा ऋचांच्या आणि वाक्यांच्या संचयावर आणि त्यांच्या मांडणीवर परिणाम कसकसा होत गेला हें पाहिल्याशिवाय वेदांची घटना कशी होत गेली हें सांगणें साहसाचें आणि इतिहासशास्त्रदृष्ट्या सर्व प्रकारें गर्ह्य आहे असें आम्हीं समजतों; एवढेंच नव्हे तर आतांपर्यंत झालेल्या संशोधनाच्या शुद्धतेविषयीं संशय व्यक्त करितों.

यज्ञसंस्थेचा इतिहास जितका क्लिष्ट व कोरड्या नियमांनीं आणि वेचव विधींनीं भरला आहे तितकाच तो एकदां क्लिष्टतेची हद्द ओलांडून गेलें असतां उपयुक्त व मनोरंजक आहे. यज्ञेतिहासज्ञानानंतरच वेदांच्या घटनेचा इतिहास ज्ञेय होईल ही गोष्ट जरी बाजूला ठेवली तरी दुसऱ्या एका दृष्टीनेंहि यज्ञसंस्थेचा अभ्यास करणें अवश्य आहे. ज्याप्रमाणें एखादी प्रचंड आणि गोंधळांत पाडण्यास समर्थ इतक्या अवयवांनीं युक्त अशी इमारत पाहून ती इमारत कशी काय घडविली याचें ज्ञान कल्पकास हितावह होईल, त्याचप्रमाणें यज्ञसंस्थेचें ज्ञानहि प्रचंड कल्पनांचा अवगम करून घेणाऱ्यासहि हितावह होईल. क्रिया करणाऱ्या अनेक अवयवांनीं युक्त असें साम्राज्य असो किंवा एखादी युद्धासारखी क्रिया करण्याकरितां बनवलेली

घटना असो अथवा दुसरा कोणताहि एखादा मोठा कारभार असो, या सर्वांची घटना करण्यामध्यें सामान्यतः एकाच प्रकारचीं कार्यतत्त्वें दृग्गोचर होतात. अगडबंब विधी स्वर्गास नेवोत अथवा न नेवोत, यज्ञांत मारलेले पशू स्वर्गांत जावोत अथवा न जावोत, एखाद्या मोठ्या प्रदर्शनानें त्याचें सांगितलेलें इष्टफल जें औद्योगिक अभिवृद्धि तें प्राप्त होवो अगर न होवो तथापि कर्तृत्वाची, हुषारीची व दक्षतेची ओळख पटविण्यास हे सर्व कृतिसमुच्चय उपयोगीं पडतात.

मनुष्याचें अगर समाजाचें हित साधावयाचा बाणा अगर बहाणा करणारे जे जे विधी सर्व जगांत उत्पन्न झाले आहेत त्यांमध्यें विस्ताराच्या अगर वैविध्याच्या दृष्टीनें भारतांतील यज्ञसंस्थेच्या सदृश दुसरे कोणतेच नाहींत. ज्याप्रमाणें तेल विकणाऱ्या स्टॅन्डर्ड ऑइल कंपनीची घटना व्यापारी विद्येचा कळस होय, ज्याप्रमाणें ब्रिटिश साम्राज्य ही मोठी शासन-संस्था निर्माण करण्याच्या प्रयत्नाचा कळस होय, त्याचप्रमाणें पारमार्थिक कार्याकरितां जे नैमित्तिक विधी आजपर्यंत जगांत करण्यांत आले त्यांमध्यें यज्ञसंस्थेंतील अग्निष्टोम, महाव्रत किंवा सत्रें हीं अत्युच्च होत, आणि या बाबतींत जगास आम्हीं कांहीं तरी अपूर्व करून दाखविलें म्हणून यज्ञसंस्थेबद्दल जरी नसला तरी तिच्या कर्त्यांबद्दल आदर प्रत्येक नास्तिक भारतीयासहि वाटलाच पाहिजे. हें विधान यज्ञसंस्थेची अधिक माहिती झाल्यानंतर स्पष्ट होईल.

वेदकालीन स्थिति समजावयास यज्ञसंस्थेचें ज्ञान अवश्य आहे ही गोष्ट संस्कृत ग्रंथकारांनीं वारंवार पुढें मांडली आहे, तथापि यज्ञाभ्यासपूर्वक वेदाभ्यासाकडे लोकांचें लक्ष जावें तितकें अजून गेलें नाहीं. पाश्चात्त्य पंडितांस यज्ञविषयक वाङ्मय वाचून एक तऱ्हेची जुगुप्सा उत्पन्न झाली आहे, आणि ब्राह्मण-ग्रंथ वाचले आणि त्यांतील वडाची साल पिंपळास लावणारी विचारपद्धति दिसूं लागली म्हणजे पुष्कळ लोकांस असें वाटूं लागतें कीं, हे ग्रंथ लिहिणारे लेखक लिहितांना शुद्धीवर तरी होते किंवा नव्हते. एका पंडितानें तर असे उद्गार काढले आहेत कीं, मनुष्यप्राण्यानें या ग्रंथांत जेवढा वाष्कळपणा केला आहे तितका वाष्कळपणा केल्याचें उदाहरण जगांत कोठेंहि नसेल. जगदुत्पत्तीविषयीं किंवा दुसऱ्या कोणत्याहि विषया-संबंधानें परस्परसंगति ठेवण्याचा किंतु मनांत यत्किंचित्हि न वाळगतां लिहिलेली माहिती, यज्ञांतील कोणचा विधि कसा केल्यामुळें जय आला, पराजय कोणता विधि कसा चुकीनें केला म्हणून उत्पन्न झाला; याविषयीं बुद्धीस न पटणाऱ्या जागोजाग आलेल्या गोष्टी, हें सर्व पाहून पाश्चात्त्य पंडित तर अगदीं चिडून गेले. लोकांच्या बुद्धीस पटेल अशा विचाराचा पूर्ण अभाव यज्ञाचें समर्थन करणाऱ्या या वाङ्मयांत जितका दिसतो तितका दुसरीकडे कोठेंच दिसत नाहीं. ब्राह्मण वाङ्मय सोडून आरण्यकांकडे किंवा उपनिषदांकडे वळलें म्हणजे वाष्कळ विचारांच्या तडाक्यांतून सुटून आतां महत्त्वाच्या वाङ्मयाकडे आपण जाऊं लागतों असें वाटून पंडितांस आह्लाद वाटूं लागतो आणि उपनिषदांत मन अधिक रमतें. ज्यूलियस एगेलिंग यानें आपल्या शतपथ ब्राह्मणाच्या प्रस्तावनेमध्यें दाखविलें आहे कीं, यज्ञसंस्थेचा उपयोग ब्राह्मणांचा धंदा कठिण बनविण्यास आणि त्या वर्गांत स्थान मिळविणें कठिण करण्यास तेवढा झाला. यज्ञकर्म शिकणें फार कठिण झालें. ऋक्संहितेंतील सूक्तें कवींनीं बनविलीं पण कविता करणाऱ्यांचें कालांतरानें महत्त्व कमी झालें. समाजांतील महत्त्व पुढें ईश्वरास आळवण्यासाठीं कविता करणाऱ्या कवीं-कडून उठून जुन्या कवितेचा उपयोग यज्ञाकडे करणाऱ्या यज्ञ-कर्त्याकडे गेलें. यज्ञ करणें ही गोष्ट कठिण झाली होती. ते करण्यासाठीं पुष्कळ दिवसांची उमेदवारी लागत असे. कां कीं, महिना महिना वर्ष वर्ष करावीं लागणारीं सत्रें करण्यासाठीं पूर्वतयारी बरीच करावी लागावयाची. यज्ञसंस्थेंतील अत्यंत साधा विधि जो दर्शपूर्णमास त्याचा प्रयोग म्हणजे विशेषतः आध्वर्यव शिकण्यास सहा एक महिने लागतात आणि या प्रकारच्या पद्धतीनें परमार्थासाठीं स्वतः उद्यम करणें हें व्यक्तीस अशक्य होऊं लागलें आणि परमार्थसाधनासाठीं म्हणजे स्वर्गासाठीं प्रयत्न जर कोणास करावयाचा झाला तर त्यास तो ब्राह्मणांच्या साहाय्यावांचून अशक्य झाला. यामुळें यज्ञ-संस्थेचा जर कांहीं उपयोग झाला असेल तर तो भिक्षुकांचें महत्त्व वाढविण्यापुरताच झाला, त्याचा दुसरा कांहीं एक उपयोग झाला नाहीं, अशा प्रकारची विचारमालिका तयार होत गेली. पाश्चात्त्य पंडितांनीं या प्रकारची आपली समजूत करून घेतल्यामुळें त्यांस यज्ञसंस्थेचें खरें सामाजिक स्वरूप लक्षांत आलें नाहीं. यज्ञांचा उपयोग ब्राह्मणांचें महत्त्व वाढविण्याकडे झाला नाहीं असें नाहीं. तथापि या उपबृंहित झालेल्या यज्ञसंस्थेचा परिणाम समाजाच्या विकासाकडे झाला एवढेंच नव्हे, तर त्यापासून अनेक तऱ्हेचे ज्ञानविषयक आणि समाजघटनाविषयक फायदे झाले. त्यांच्याकडे संशोधकांचें लक्ष गेलें नाहीं. आपल्याकडच्या पंडितांचें पांडित्य बरेंचसें पाश्चात्त्य विचारसंप्रदायाच्या धोरणानेंच चालत असल्यामुळें आणि यज्ञसंस्थेच्या अभ्यासकाठिन्यामुळें आपल्या लोकांनीं देखील याचा चांगला विचार केला नाहीं. महाराष्ट्रांतील पंडितांपैकीं यज्ञांकडे सहानुभूतिपूर्वक दृष्टीनें पाहून त्यांतील मर्म समजावून घेण्यासाठीं जर कोणी प्रयत्न केला असेल तर तो कै० महादेव मोरेश्वर कुंटे यांनीं केला. त्यांच्या भारतीय संस्कृतीच्या इतिहासांत (व्हिसिसिट्यूडस ऑफ इंडियन सिविलिझेशन) त्यांनीं यज्ञांचें सामाजिक स्वरूप दाखविण्याचा पुष्कळ प्रयत्न केला आहे. असो.

यज्ञसंस्थांचें मर्म समजावून घेण्यासाठीं एक गोष्ट लक्षांत घेतली पाहिजे ती ही कीं, ब्राह्मणांनीं यज्ञसंस्था वाढविली ही केवळ आपल्या महत्त्वासाठीं वाढवावयाची म्हणून वाढविली

असें नाहीं. जे धर्म सर्वसामान्य असतील त्यांत ब्राह्मणांनीं स्वेच्छेनें हवेतसे फेरफार करणें शक्य नव्हतें. यज्ञसंस्था त्रैवर्णिकांची होती. सर्व वर्ण अत्यंत प्राचीन कालापासून यज्ञ करीत होतेच. उपासनेंत ब्राह्मणांनीं केवळ लोभमूलक फेरफार केले असते तर इतर वर्णांनीं तसे फेरफार चालूं दिले नसते. सुशिक्षितांची लौकिक भाषा आणि यज्ञासाठीं वापरली जाणारी भाषा यांत फारसें अंतर पडलें नव्हतें, आणि जुन्या उपासनेंत ब्राह्मणांनीं केवळ पदरच्या गोष्टी केवळ स्वार्थासाठीं घातल्या असल्या तर त्यांस जनतेची फारशी सहानुभूति नसती. ब्राह्मणांनीं ही यज्ञसंस्था इतर लोकांस बनविण्यासाठींच वाढविली असती तर ते स्वतः बनले गेले नसते. प्रकार पहावा तर उलट आहे. यज्ञ करणारी मंडळी म्हणजे यज्ञांतले यजमान ब्राह्मणच पुष्कळ असत. ते आपल्या गळ्याभोंवतीं पुरोहितवर्गानें तयार केलेलें लिगाड कशासाठीं अडकावून घेते? क्षत्रियांनीं यज्ञांस विरोध करावयाच्या ऐवजीं यज्ञ करण्यामध्यें चुरस दाखविली आहे. या प्रकारच्या परिस्थितीमुळें आपणांस यज्ञसंस्था जर समजावून घ्यावयाची असेल तर ब्राह्मणांनीं केवळ स्वार्थासाठीं ही संस्था वाढविली या प्रकारच्या मतानें बुद्धीस विकार होऊं न देतां तिचा अभ्यास केला पाहिजे.

यज्ञसंस्थेच्या इतिहासाकडे दुर्लक्ष केल्यामुळें जे दोन इतिहास पाश्चात्त्यांस मुळींच समजले नाहींत त्यांपैकीं एक इतिहास म्हटला म्हणजे सामाजिक होय; दुसरा न समजलेला इतिहास संहितीकरणाचा होय. वाङ्मयाच्या घटनेचा इतिहास लावतांना वापरावयाची पद्धति म्हटली म्हणजे शेवटीं झालेल्या क्रिया अगोदर शोधीत मागें मागें जात जात जावयाचें, ही होय. आजच्या सामाजिक स्थितीपैकीं ज्या गोष्टींचीं मुळें या मंत्ररचनाकालापासून संहितीकरणापर्यंतच्या कालांत शोधावयाचीं त्या सामाजिक गोष्टींचा निर्देश प्रथम केला पाहिजे. भारतीय समाजघटनेच्या इतिहासाच्या प्राचीन भागासंबंधानें ज्या मुख्य गोष्टी आपणांस स्पष्ट झाल्या पाहिजेत त्या येणेंप्रमाणें.

(१) चातुर्वर्ण्याची कल्पना.
(२) ब्राह्मण जातीची स्थापना व तींत झालेले भेद.
(३) गोत्रें, प्रवर इत्यादि संस्थांची स्थापना.
(४) प्रजापतिसंस्था अथवा पितृपुत्रपरंपरा.
(५) मातृकन्यापरंपरा.
(६) यूथावस्था.
(७) गृहस्थधर्माची स्थापना.

या अनेक गोष्टींपैकीं पहिल्या तीन गोष्टींचें विवेचन मुख्यत्वेंकरून वैदिक वाङ्मयाच्या साहाय्यानें होईल आणि इतर विषयांच्या अभ्यासास महाभारतादि ग्रंथ उपयोगीं पडतील. यासाठीं या तीन सामाजिक संस्थांचा अभ्यास वेदाभ्यासाशीं जोडून देतां येईल.

वरील तीन सामाजिक संस्थांचा परिणाम वैदिक वाङ्मयावर झाला आहे तसा इतर चार संस्थांचा झाला नाहीं.

ब्राह्मणजातीच्या इतिहासाशीं वैदिक इतिहासाचा कसा संबंध येतो हें ब्राह्मणजातीच्या आजच्या आणि कालच्या स्थितीकडे पाहिलें असतां सहज समजून येणार आहे.

सर्वांत अतिशय परिचित वेदशाखा म्हटल्या म्हणजे ऋग्वेदाची शाकलशाखा, कृष्णयजुर्वेदाची (आपस्तंब आणि सत्याषाढ सूत्रांची) तैत्तिरीयशाखा आणि शुक्लयजुर्वेदाच्या माध्यंदिन व काण्वशाखा होत. या शाखांचे लोक सर्वत्र आहेत, तथापि काण्वशाखेचे लोक महाराष्ट्राच्या पश्चिम भागांत कमी आहेत.

वरील शाखांशिवाय इतर शाखांचेहि लोक महाराष्ट्रांत आढळतात. मैत्रायणीय शाखेचे लोक भडगांव येथें दिसतात. मैत्रायणीय हे कृष्णयजुर्वेदी आहेत. भंडारा येथील एका मैत्रायणीय शाखेच्या ब्राह्मणानें (रा. रा. विष्णुपंत जकातदार यांनीं) आपली मुलगी कऱ्हाड्यास दिली असून कऱ्हाड्याची मुलगी आपल्या मुलास केली आहे. चरक शाखेची वस्ती मध्यप्रांतांत विशेष आढळून येते. पुष्कळ अज्ञानी लोकांस चरक ही शाखाच ठाऊक नसल्यामुळें त्यांच्या ब्राह्मण्याविषयीं देखील कधीं कधीं संशय प्रदर्शित केला गेला आहे. चरक हे कृष्णयजुर्वेदी ब्राह्मण आहेत. चरकांतील भेद जो कठ त्या कठांची संहिताहि प्रसिद्ध आहे. चरकांमधील एक प्रसिद्ध घराणें म्हणजे बुटींचें होय. या घराण्याशीं एका कृष्णयजुर्वेदी कोंकणस्थ घराण्यानें देखील संबंध केला आहे.

याशिवाय एक महाराष्ट्रांतील अल्पसंख्याक शाखा म्हणजे जाबालांची होय. या शाखेस लौकिक व्यवहारांत नार्मद म्हणजे नर्मदाकांठचे ब्राह्मण म्हणतात. कांहीं नार्मद हिंदी बोलणारे देखील आहेत. या जाबाल शाखेचा संबंध उपनिषदांतील सत्यकाम जाबाल याच्याशीं जोडण्यांत आलेला आहे आणि कोणी जबलपूर या शहराशीं देखील संबंध जोडतात. कठाळे, पांचखेडे, वगैरे आडनांवें या जातींत आढळतात.

सर्व कऱ्हाडे ब्राह्मण ऋग्वेदी आहेत. तसेंच कुडाळदेशकर आणि सारस्वत हे दाक्षिणात्य गौड देखील ऋग्वेदीच आहेत. देशस्थ ब्राह्मणांत ऋग्वेदी, कृष्णयजुर्वेदी आणि शुक्लयजुर्वेदी या तीनहि प्रकारचे ब्राह्मण आढळतात. आणि कोंकणस्थांमध्यें ऋग्वेदी आणि हिरण्यकेशी (कृष्णयजुर्वेदी) हे दोन्ही प्रकार आढळून येतात. पळशे आपणांस माध्यंदिन ब्राह्मण म्हणवितात. माध्यंदिन ब्राह्मणांपैकीं कांहींनीं यांच्याशीं लग्नव्यवहारहि केला आहे.

महाराष्ट्रांत कांहीं कांहीं ठिकाणीं अथर्ववेदी लोकांची वस्ती असल्याचें सध्यांहि आढळून येतें. मात्र इतर वेदानुयायांच्या तुलनेनें अथर्ववेदीयांचें प्रमाण फारच अल्प आहे. मराठी ग्रंथकार ज्योतिपंत दादा महाभागवत हे अथर्ववेदी होते. सातारा शहरापासून ४ मैलांवर कृष्णा व वेण्णा यांच्या संगमाजवळ 'माहुली' या क्षेत्राच्या ठिकाणीं १५।२० वर्षांपूर्वी नागेशभट्ट या नांवाचा एक आथर्वण वैदिक ब्राह्मण राहत होता व तो स्वशाखीय लोकांचें पौरोहित्य करीत असे. सातारा व वांई यांच्या दरम्यान कृष्णाकाठीं 'चिंधोली' या खेड्यांत असणारे जोशी कुलकर्णी अथर्ववेदी आहेत व त्यांचें गोत्र 'भालंदन' आहे. यांच्या घरचीं धर्मकृत्यें त्यांच्या शाखेप्रमाणें पूर्वोक्त नागेशभट्ट हे करीत. हल्लीं त्यांचीं सर्व कृत्यें ऋग्वेदी लोकांकडूनच करवून घेतलीं जातात. यांच्यापैकीं हल्लीं हयात असलेल्या एका गृहस्थास आपल्या शाखेची संध्या वगैरे येत आहे असें म्हणतात परंतु बाकीचे आथर्वण ऋग्वेदी लोकांचीच संध्या पाठ करून आपला नित्यविधि पार पाडतात. श्राद्धामध्यें श्राद्धकर्त्यानें आपल्या पितृत्रयीचा उच्चार करावा लागतो हा साधारण नियम आहे; परंतु अथर्ववेदीय लोक बाप आजा, व पणजा, अशा क्रमानें त्रयीचा उच्चार न करतां पणजा, आजा, व बाप अशा क्रमानें करीत असल्याची माहिती मिळते. पुणें प्रांतात शिरवळ गांवच्या आसपास कांहीं गांवीं अथर्ववेद्यांची वस्ती असल्याचें समजतें. त्याचप्रमाणें सातारा जिल्ह्यापैकीं खटाव तालुक्यांतहि अथर्ववेदीयांची वस्ती असल्याचें कळतें. खटावकडील अथर्ववेदीयांनां 'आम्ही अथर्ववेदी आहों' या पलीकडे हल्लीं कांहींच माहिती नाहीं. हे लोक आतां जवळजवळ ऋग्वेदी लोकांतच सामील झाले आहेत म्हटलें तरी चालेल. सुमारें २५ वर्षांपूर्वी ऋग्वेदी (देशस्थ) व अथर्ववेदीयांच्यामध्यें परस्पर फक्त रोटीव्यवहार होई परंतु बेटीव्यवहार बहुधा होत नसे. देशस्थ ऋग्वेदी अडचणीच्या प्रसंगीं गौणपक्ष म्हणून अथर्ववेदीयांची मुलगी करीत, परंतु आपली मुलगी अथर्ववेदीयांच्या घरीं देण्यास मुळींच तयार नसत. परंतु हल्लीं हाहि प्रतिबंध फारसा राहिला नाहीं. ऋग्वेदी देशस्थांनीं आथर्वणांच्या घरीं आपली मुलगी दिल्याचींहि उदाहरणें हल्लीं थोडींतरी दृष्टीस पडतात. अशा प्रकारें ऋग्वेदीयांनीं आथर्वणांच्या घरीं आपली मुलगी दिल्याचें एक उदाहरण चिंधोली गांवांतच आढळतें. अथर्ववेदीयांचा आथर्वणपणा कमी कमी होत जाऊन ते लोक देशस्थ ऋग्वेदीय पुरोहिताकडून आपलीं गृहकृत्यें सररहा करून घेऊं लागले यामुळें ऋग्वेदी व आथर्वण यांच्या मधील परस्पर वैषम्य कमी होऊन आतां बरोबरीनें रोटीबेटीव्यवहार करावयास त्यांनां हरकत वाटेनाशी झाली असावी असें दिसतें. आज जातिदृष्ट्या अथर्ववेदी ही निराळी जात राहिलीच नाहीं. देशस्थ जातींतील कांहीं कुलें अथर्ववेदी आहेत असें म्हणण्यास हरकत नाहीं. ठाणें जिल्ह्यांत थोडेसे सामवेदी जातिरूपानें आहेत.

ब्राह्मणांच्या निरनिराळ्या शाखांचा आणि कुलांचा हिशोब घेण्यास पंढरपूर नाशिक येथील भिक्षुकांच्या वह्या धुंडाळल्या पाहिजेत. तें कार्य झालें म्हणजे निरनिराळ्या शाखांच्या अस्तित्वासंबंधानें आणि पैतृक शाखा सोडून निराळ्या शाखेचा परिग्रह करणें या प्रवृत्तीमुळें किती शाखा नष्ट झाल्या यासंबंधानें बराच शोध लागणें शक्य आहे.

शाखा म्हणजे अभ्यासाचा विशेष प्रकार. त्यामुळें जात निराळी पडते असें मुळींच नाहीं. ऋग्वेदी म्हणजे ज्यांचे पूर्वज हौत्रकर्माचें शिक्षण घेऊन यज्ञामध्यें होत्याचें काम करावयास योग्य होते ते. शाखांचा अर्थ जरी एवढाच तरी शाखांमुळें जाती पडल्या हें खरें. काण्व, माध्यंदिन, मैत्रायणीय, जाबाल, चरक इत्यादि सूत्रांच्या मंडळींनीं आपल्या निराळ्या जाती बनविल्या आहेत आणि ते स्वशाखीयांखेरीज इतरांशीं लग्नव्यवहार करीत नाहींत. आपस्तंब आणि हिरण्यकेशी हे मात्र ऋग्वेदीयांशीं लग्नव्यवहार करतात.

**पितृमूलक शाखेंत बदल.**—वेदभेदाचें मूळ प्रयोजन एवढेंच कीं, प्रत्येकानें आपआपला धंदा करण्यास समर्थ व्हावें. ज्यास आध्वर्यव करावयाचें आहे त्यानें यजुर्वेदाचा अभ्यास करावा, ज्यास हौत्र करावयाचें असेल त्यानें ऋग्वेदाचा अभ्यास करावा आणि ज्यास यज्ञांत औद्गात्र करावयाचें असेल त्यानें सामें अभ्यासावीं. बाप तोच शिक्षक त्यामुळें बापाची शाखा तीच मुलाची शाखा हा प्रकार अर्थात् स्वाभाविक आहे आणि जे केवळ अभ्यासवैशिष्ट्यमूलक संघ होते ते कालांतरानें जाती बनले. जाती केवळ वेदावरून म्हणजे ऋत्विजांच्या प्रकारावरून पडल्या नाहींत तर शाखाभेदावरूनहि पडल्या. आणि पुढें शाखेंतल्या शाखेंत ज्या सूत्राचा अभ्यास होई त्यावरून पडल्या. श्रौतकर्म जवळ जवळ लुप्त झालें. तें काय आहे याची व्यक्तीस आठवणहि बुझाली. तथापि श्रौतकर्ममूलक जें अध्ययनवैशिष्ट्य तें आणि त्या अध्ययनवैशिष्ट्यामुळें पुढें जे जातिसमुच्चय उत्पन्न झाले ते मात्र टिकले आणि अध्ययनग्रंथांच्या अभिमानाऐवजीं जात्यभिमान उत्पन्न झाला. अध्ययन आणि जाती यांची फारकत पूर्ण झाली आहे हें दर्शविणारी एक गोष्ट येथें देतों. जेव्हां एखाद्या यजमानास विशिष्ट सूत्राचा आपल्या अग्निहोत्रासाठीं परिग्रह करावयाचा असतो तेव्हां कर्म त्याच्या सूत्राप्रमाणें चालतें, परंतु तें कर्म चालविण्यास आणलेले ऋत्विज त्या त्या शाखेचेच असतात असें मात्र नाहीं. प्रयोग आपस्तंब किंवा बौधायन सूत्राप्रमाणें असेल परंतु आध्वर्यव हिरण्यकेशीहि चालवील. प्रसंगीं आध्वर्यव ऋग्वेदी ब्राह्मण देखील करील आणि इष्टीपुरतें हौत्र ऋग्वेदीयाच्या घरीं देखील यजुर्वेदी करील. विद्या आणि जाति यांची असंगति

एवढ्यावरूनच दिसत नाहीं. कण्वशाखी, जाबालशाखी, किंवा चरकशाखी लोकांस आपल्या मुलाची मुंज करतेवेळेस दुसऱ्या शाखेचा आचार्य ( स्वशाखीय न मिळाल्यामुळें ) घ्यावा लागतो आणि त्यामुळें मुलगा प्रसंगीं निराळ्याच शाखेची संध्या शिकतो, परंतु आपणांस आपल्या बापाच्या शाखेचाच म्हणवितो. आज पुष्कळ ब्राह्मणलोक संध्याच करीत नसल्यामुळें पैतृक शाखेशीं अध्यापनविषयक संबंध कायम ठेवणारा एकुलता एक दुवा देखील नष्ट झाला आहे आणि अध्ययनमूलक भिन्नत्व केवळ जातिमूलक भिन्नत्वाच्या रूपानें शिल्लक उरलें आहे.

जातीचें पृथक्त्व जर अध्ययनमूलक आहे तर अध्ययनांत बदल झाल्यास किंवा परंपरागत अध्ययन नष्ट झाल्यास सामाजिक पृथक्त्व तरी कां रहावें? राहतें हें खरें. आणि तें केवळ वैदिक कारणासाठीं नसून लौकिक कारणासाठीं राहतें असें म्हणणें प्राप्त आहे. तथापि जेव्हां जात्यंतर्गत कुल आपली अध्ययनपरंपरा सोडून नवी परंपरा घेतें तेव्हां तें कुल पूर्वीच्या शाखेचें न राहतां दुसऱ्या शाखेचें बनतें. माध्यंदिन कुलांतील व्यक्ति काण्वकुलांत मोडली जात नाहीं याचें कारण लौकिक जातिभेद होय. तथापि देशस्थ म्हणविणाऱ्या व परस्पराशीं मोकळेपणानें लग्न करणाऱ्या मोठ्या जातीमध्यें बौधायन कुलें, आपस्तंब किंवा ऋग्वेदी देखील बनलीं आहेत. या प्रकारचीं कुलें कर्नाटकांत व दक्षिणमहाराष्ट्रांत पुष्कळ आहेत. कोंकणस्थ पूर्वी कृष्णयजुर्वेदी असून त्यांतील कांहीं पुढें ऋग्वेदी बनले असा समज बऱ्याच जुन्या पंडितांत आहे. ज्ञानकोशमंडळांतील हौत्रवेत्ते चिंतामण भट्ट दातार ह्यांचें घराणें पूर्वी कृष्णयजुर्वेदी असून त्यांच्या कोणत्या तरी एका पूर्वजास त्यांच्या ऋग्वेदी मामानें वाढविलें व पढविलें असल्यामुळें सांप्रत ऋग्वेदी बनलें आहे. तसेंच आपल्या पारमार्थिक गुरुविषयींच्या भक्तीमुळें बापट उपनांवाचें एक हिरण्यकेशी ( कृष्णयजु ) गृहस्थ सातारा येथें ऋग्वेदी वैदिक तयार झाले आहेत. उलटपक्षीं हरभट केळकर या नांवाचा एक ऋग्वेदीकुलोत्पन्न जन्मांध कृष्णयजुर्वेदी वैदिक म्हणून थोड्या वर्षांपूर्वी पुण्यास प्रसिद्ध असे.

सर्व हिंदुस्थानांतील सध्यां अस्तित्वांत असलेल्या ब्राह्मणांच्या सात आठशें जातींपैकीं कोण कोणत्या वेदाचे व कोण कोणत्या शाखेचे यांविषयीं आपणांस फारच थोडी माहिती उपलब्ध आहे. ब्राह्मणांमध्यें जे जातिभेद पडले ते सर्व वेदाध्ययनवैशिष्ट्यमूलक नाहींत. कांहीं भेद स्थानमूलक आहेत, कांहीं सोंवळ्याओंवळ्याच्या कल्पना बऱ्याच लाडावल्यानंतर अधिक सोंवळे राहणारांनीं कमी सोंवळ्यावर बहिष्कार घालावयाचा या क्रियेमुळें उत्पन्न झाल्या आहेत, कांहीं उपास्यमूलक आहेत आणि कांहीं मतमूलक आहेत. अभ्यासक्रमाच्या भेदांमुळें किंवा यज्ञ करतांना कोणतें सूत्र वापरावें या विचारामुळें कांहीं प्रसंगीं जातिभेद उत्पन्न झालेला दिसला तर कांहीं प्रसंगीं श्रौताचारभिन्नता राहूनहि जातिभेदाचा अभाव दिसतो. कांहीं जातींत शाखा किंवा सूत्र हें केवळ कुटुंबविशिष्ट होय किंवा व्यक्तिविशिष्ट होय ही भावना दिसते. उदाहरणार्थ, कोंकणस्थांत ऋग्वेदी व कृष्णयजुर्वेदी ( हिरण्यकेशी ) या दोन्ही शाखांचीं अभ्यासक कुटुंबें आहेत आणि लौकिक व्यवहारामध्यें या भेदाचें महत्त्व कांहींच नाहीं. फक्त श्रावणीच्या वेळेस अमुक घराणें कोणच्या शाखेचें आहे हें विचारण्याचें प्रयोजन पडतें. कोंकणस्थांत लग्न जुळविण्याच्या वेळेस वेदाची म्हणजे शाखेची चौकशी कोणीहि करीत नाहीं. उलटपक्षीं चरक, जाबाल, काण्व, मैत्रायणीय, माध्यंदिन या सर्व यजुर्वेदाच्याच शाखा असून त्या एकमेकांशीं लग्न न करणाऱ्या भिन्न भिन्न जाती बनल्या आहेत.

जाती व वेदशाखा यांची संगति किंवा वेदशाखा व त्यांचा प्रचार यांचा हिशोब घेण्याचें काम महार्णवकारांनींच काय तें केलें. महार्णवकारांची माहिती आज अत्यंत अपुरी आणि वस्तुस्थितीस न जुळणारी अशी भासते. चरणव्यूहाच्या टीकाकारांनीं महार्णवांतूनच उतारा घेऊन आपला प्रसंग भागविला आणि आचारभूषणकार ( आनंदाश्रम ग्रंथ ५७ ) त्र्यंबकशास्त्री ओक यांनीं तोच उतारा आपल्या ग्रंथांत उद्धृत केला. तो उतारा व त्यावरील त्र्यंबकशास्त्री यांचें भाष्य यांचा गोषवारा येणेंप्रमाणें:—

**देशपरत्वें शाखाविभाग व यज्ञकन्यासंबंध.—** 'भरतवर्ष' या संज्ञेनें प्रसिद्ध असलेल्या भूप्रदेशाच्या मध्य भागांतून 'नर्मदा' नदी वहात असल्यामुळें तिला भरतवर्षाची मध्यरेषा म्हटलें आहे. या मध्यरेषेच्या दक्षिण व उत्तर बाजूस चतुर्वेदांच्या कोण कोणत्या शाखा विभागरूपानें अस्तित्वांत असलेल्या आढळतात हें सांगतों. मध्यरेषेच्या म्हणजे नर्मदानदीच्या दक्षिणेकडील प्रदेशांत यजुर्वेदाची आपस्तंबी, ऋग्वेदाची आश्वलायनी, सामवेदाची राणायनी व अथर्ववेदाची पैप्पलादी या चार शाखा अस्तित्वांत असून या चारी शाखांचें अध्ययन करणारे ब्राह्मण परस्परांत ऋत्विजांचीं कामें करतात व रोटीबेटीव्यवहारहि करतात. आपस्तंबी शाखा म्हणजे यजुर्वेदाच्या तैत्तिरीय शाखेवरील सूत्रभेदानें झालेल्या सहा शाखांपैकीं एक असून आश्वलायनी म्हणजे ऋग्वेदाची 'शाकल' या नांवानें प्रसिद्ध असलेली शाखा होय.

नर्मदेच्या उत्तरेकडील प्रदेशांत शुक्लयजुर्वेदापैकीं माध्यंदिनी, ऋग्वेदाची शांखायनी, सामवेदाची कौथुमी आणि अथर्ववेदाची शौनकी या चार शाखा अस्तित्वांत असून या चार शाखांचें अध्ययन करणाऱ्या ब्राह्मणांत परस्पर आर्त्विज्यसंबंध व रोटीबेटीव्यवहार होतो. ऋग्वेदामध्यें बाष्कल म्हणून एक शाखाभेद असून या शाखेचें कल्पसूत्र शांखायन नांवानें

प्रसिद्ध आहे आणि म्हणूनच शांखायन सूत्रानुसारी ब्राह्मण-समाजास त्यांच्या सूत्रभेदावरून शांखायनी शाखेचे ब्राह्मण म्हणतात.

तुंगभद्रा, कृष्णा व गोदा या नद्यांच्या सभोंवतालच्या म्हणजे सह्याद्रिपर्वतापासून आंध्र (तेलंग) देशापर्यंत विस्तारलेल्या प्रदेशांत, ज्या शाखेवर आश्वलायन सूत्र लिहिलें गेलें आहे अशी, ऋग्वेदाची शाकलशाखा अस्तित्वांत असून या ऋग्वेदीय शाखेचा 'ऐतरेय' म्हणून ब्राह्मणग्रंथ प्रसिद्ध आहे.

गुजराथ प्रांतापैकीं उत्तरेकडील भागांत बह्वृच म्हणजे ऋग्वेदाची शांखायनी किंवा बाष्कल नामक शाखा अस्तित्वांत असून या शाखेचा 'कौषीतकी' नांवानें प्रसिद्ध असलेला ब्राह्मणग्रंथ आहे.

गोदावरी नदीच्या दक्षिण दिशेस व आग्नेय दिशेस म्हणजे तैलंगणापासून समुद्रापर्यंत विस्तारलेल्या प्रदेशांत कृष्ण यजुर्वेदापैकीं तैत्तिरीय शाखेवर प्रसिद्ध असणाऱ्या सहा सूत्रांपैकीं आपस्तंबसूत्रानुयायी लोकांची आपस्तंबी म्हणून प्रसिद्ध असलेली शाखा अस्तित्वांत आहे.

सह्याद्रिपर्वताच्या पायथ्यापासून नैर्ऋत्य दिशेस समुद्रापर्यंतच्या प्रदेशांत व परशुरामक्षेत्रासन्निध कृष्णयजुर्वेदावरील सूत्रभेदानें प्रसिद्ध असलेली हिरण्यकेशी नामक शाखा अस्तित्वांत आहे.

मयूरपर्वता (?) पासून गुजराथच्या सरहद्दीपर्यंत यजुर्वेदापैकीं मैत्रायणी नामक शाखा अस्तित्वांत असून तिचा फैलाव उपर्युक्त प्रांताच्या वायव्येकडील सरहद्दीपर्यंत झालेला आहे.

अंग (विहार), वंग (बंगाल), कलिंग (ओरिसा), कानीन (?) व गुजराथेंतील पूर्वोक्त प्रदेशाखेरीजचा भाग या सर्व ठिकाणीं शुक्लयजुर्वेदाची 'माध्यंदिन' उर्फ 'वाजसनेयी' शाखा अस्तित्वांत आहे.

याज्ञवल्क्य ऋषीनें शुक्लयजुर्वेदापैकीं 'काण्व' नामक प्रथमशाखेचा विस्तार सर्व देशांत केला.

नर्मदेच्या उत्तर भागांत असलेल्या पूर्वोक्त 'मध्यंदिनी' 'शांखायनी,' 'कौथुमी, 'शौनकी' व वर सांगितलेली 'काण्व' नामक शाखा या पांचहि शाखा 'गौड' या नांवानें ओळखल्या जाणाऱ्या ब्राह्मणवर्गांत प्रचलित आहेत व नर्मदेच्या दक्षिण भागांत प्रचलित असणाऱ्या पूर्वोक्त आपस्तंबी, आश्वलायनी, राणायनी, पैप्पलादी व मैत्रायणीनामक पांचहि शाखा 'पंचद्राविड' नांवानें प्रसिद्ध असलेल्या ब्राह्मणवर्गांत प्रचलित आहेत.

**चालू श्रौतधर्म.**—आजच्या कालांत वेद आणि श्रौतधर्म हा केवळ ब्राह्मणांच्या नामधारी शाखाभेदानें राहिला आहे असें नाहीं. वैदिक कर्मे थोडींबहुत अजूनहि होतात. वैदिक धर्माविषयीं आणि यज्ञसंस्थेविषयीं थोडीशी जिज्ञासा आतां वाढूं लागली आहे आणि खुद्द पुण्यांत आतां दोन अग्निहोत्रें स्थापन झालीं आहेत.

सध्यां श्रौतधर्म चालू आहे म्हणजे वर्षादोन वर्षांनीं एखादा याग कोठें तरी ऐकूं येतो. कधीं कधीं पांच वर्षांत एकहि याग महाराष्ट्रांत होत नाहीं. अलीकडे कोणते याग होतात आणि कोणते होत नाहींत याचें कोष्टक येणेंप्रमाणें.–

होतात.—दर्श, पूर्णमास, चातुर्मास्य, निरूढपशु, सौत्रामणी, (कौकिल) अग्निष्टोम, सर्वपृष्ठाऽप्तोर्याम, वाजपेय,* अतिरात्र, साद्यस्क,* नक्षत्रसत्र, स्वर्गसत्र, अग्निहोत्र, सौत्रामणी, (चरक) विश्वजित्, (अतिरात्र)* अत्यग्निष्टोम, अग्निचयन, पंचकाठक.

होत नाहींत.—दाक्षायण, पौंडरीक, महाव्रत, द्वादशाह, द्विरात्र, त्रिरात्र, चतुरात्र, व्युष्टिद्विरात्र, गर्गत्रिरात्र, जामदग्न, चतुरात्र, पंचरात्र, षड्रात्र, सप्तरात्र, अष्टरात्र, नवरात्र उर्फ शललीपिशंग, दशरात्र, एकादशरात्र, त्रयोदशरात्र, चतुर्दशरात्र, पंचदशरात्र, सप्तदशरात्र, विंशतिरात्र, चतुर्विंशतिरात्र, त्रिंश्शद्रात्र, द्वात्रिंश्शद्रात्र, त्रयस्त्रिंश्शद्रात्र, षट्त्रिंश्शद्रात्र, एकोनपंचाशद्रात्र, संवत्सरसत्र, गवामयन, साकंप्रस्थायी, इन्द्रतुरीय, अश्वमेध, राजसूय, बृहस्पतिसव, वैश्यसव, ब्राह्मणसव, सोमसव, पृथिसव, गोसव, ओदनसव, पंचशारदीय, अग्निष्टुत्, इन्द्रस्तुत्, विघन, सर्वतोमुख, लोष्टचिति इ०.

**वेदांचें संहितीकरण.**—वेदांचा उपयोग ऐतिहासिक माहिती काढण्यासाठीं करावयाच्या पूर्वी आपणांस ज्या अनेक गोष्टी विचारांत घेतल्या पाहिजेत. त्यांतील एक महत्त्वाची गोष्ट म्हटली म्हणजे मंत्रांचा कालनिश्चय करण्यापूर्वी संहितीकरणाचा कालनिश्चय केला पाहिजे ही होय. संहितीकरणानंतर मंत्ररचनांच्या पौर्वापर्याकडे धांव घेतां येईल. संहितीकरण ही उत्तरकालीन क्रिया होय. या क्रियेची व तिच्या अनुषंगानें होणाऱ्या चळवळींची यथार्थ कल्पना आल्यास इतिहासांतील एक महत्त्वाचा धागा जोडतां आला असें होईल. संहितीकरणाचा विचार करतांना उपस्थित होणारे प्रश्न आणि त्यांस उत्तरें येणेंप्रमाणें:—

(१) मंत्रांच्या संहिता कोणत्या प्रयोजनानें बनल्या? याला उत्तर हेंच कीं, ऋत्विजांस आपला अभ्यासग्रंथ स्वतंत्र पाहिजेच असे यामुळें संहितीकरणार्थ प्रथम प्रयत्न झाला.

(२) संहिता बनल्या त्यांत जीं अनेक सूक्तें आलीं आहेत तीं कवींनीं जशीं बनविलीं तशींच आज आपणांस

---

* खुणा केलेले क्रतु अलीकडे ३०–३५ वर्षांत झालेले नाहींत; त्यापूर्वी झालेले आहेत. पैकीं वाजपेयक्रतु पुणें येथील रा. सदाशिवपंत कानिटकर यांनीं पुणें येथें व वे. शा. सं. अनंत दीक्षित बापट पांचवडकर यांनीं अलीबाग येथें केला होता.

उपलब्ध आहेत किंवा जुळवाजुळव करतांना निरनिराळ्या कवींनीं कदाचित् निरनिराळ्या काळीं बनविलेल्या ऋचा पुढें दुसऱ्या कोणींतरी एकत्र करून सूक्तें तयार केलीं आहेत? म्हणजे ज्याप्रमाणें अनेक मंत्रद्रष्ट्यांचीं सूक्तें एकत्र होऊन ऋग्वेदसंहिता बनली त्याप्रमाणें अनेक ठिकाणच्या ऋचा एकत्र करून मंत्रद्रष्ट्यांनीं आपलीं सूक्तें बनविलीं आहेत काय? याला उत्तर हेंच कीं, जुना मंत्रसंग्रह नवीन याज्ञिक क्रियेसाठीं वापरला गेल्यामुळें नवीन कार्यासाठीं विकृत होण्याचा संभव आहे. तथापि ऋग्वेदांतील बरींचशीं सूक्तें मूळ कवींनीं केलीं तशींच उपलब्ध झालीं आहेत असा आज संशोधकांचा समज आहे. परंतु बरींचशीं सूक्तें अनेक ठिकाणच्या ऋचा एकत्र घेऊन केलीं असावींत. यजुर्वेदांतील यजु आणि मंत्र पहातां ते ज्या अर्थीं विशेष प्रयोजनासाठीं लावावयाचे आहेत त्या अर्थीं एकसारखी क्रमानें त्यांची रचना झाली आणि ती कायम राहिली हें शक्य नाहीं. अथर्ववेदांत ( २० कांड पहा ) तर ऋग्वेदांतील ऋचा हौत्रासाठीं निवडून त्या यज्ञांत म्हणण्याच्या क्रमानें लावल्या आहेत.

( ३ ) संहितीकरणाच्या काळीं अनेक काळच्या ऋचा एकत्र केल्या गेल्या असल्या तर आपणांस इतिहासज्ञान मिळविण्याच्या अभ्यासास कांहीं क्षेत्र आहे कीं नाहीं? संहितेमध्यें ऋचांचा अगर सूक्तांचा कालनिर्णय करणें शक्य नाहीं अशा स्थितींत वेद हें साहित्य इतिहासकारास केवळ त्याज्य आहे काय? त्याज्य नाहीं असें उत्तर या प्रश्नास देतां येईल. वेदांचा अभ्यास करतांना सूक्तांच्या कालभेदाकडे दुर्लक्ष करून सर्व वेद म्हणजे एकच ग्रंथ धरून आपणांस ऐतिहासिक अभ्यास कांहींसा करतां येईल. जेथें वेदांतर्गत कालामध्येंच पौर्वापर्य पहावयाचें नाहीं पण केवळ संहितीकरणाचा काल ही ज्या युगाची अंतिम मर्यादा आहे त्या प्राचीन युगाची परिस्थिति स्थूलपणें पहावयाची आहे तेथें वेदांतील सूक्तांचा काल अनिश्चित आहे ही गोष्ट आडवी येणार नाहीं. या मर्यादेंत पाश्चात्यांनीं केलेला वेदाभ्यास उपयोगी आहे. परंतु ऋचांत व्यक्त होणाऱ्या समाजस्थितींचें पौर्वापर्य मात्र लावतां येणार नाहीं. आज ऐतिहासिक पंडितांना वेदोक्तता याचा अर्थ संहितीकरणाच्या कालापूर्वीं अस्तित्व एवढाच आहे पण संहितीकरणाच्या कालाइतका पूर्वींचा इतिहास समजणें ही गोष्ट देखील लहान सहान नाहीं. कां कीं, संहितीकरणाचा काल सुदैवानें बराचसा निश्चित आहे.

संहितीकरणाच्या कालाचें आणि प्रयोजनाचें स्पष्टीकरण करण्यासाठीं मंत्र आणि ब्राह्मण यांचा परस्परसंबंध व्यक्त केला पाहिजे.

यूरोपीय संशोधकांनीं आणि विशेषेंकरून वाङ्मयाच्या इतिहासलेखकांनीं उदाहरणार्थ विंटरनिट्झनें वाङ्मयाच्या घटनेसंबंधानें असें एक मत प्रतिपादिलें आहे कीं, संहिता उर्फ मंत्रभाग जवळजवळ संपूर्ण तयार झाल्यानंतर ब्राह्मणें तयार झालीं. मंत्रभागांतील मंत्रांचा जन्म ब्राह्मणांतील विधिवाक्यांच्या जन्मापूर्वींचा आहे हें स्थूलपणानें म्हणण्यास हरकत नाहीं. पण मंत्रभागाचें संहितीकरण झाल्यानंतर ब्राह्मणभागाचा जन्म झाला असेल असें संशोधकांचें मत असल्यास तें आम्हांस मान्य नाहीं. ब्राह्मणरचना आणि संहितीकरण या दोन्ही क्रिया समकालीन व अन्योन्याश्रयी आहेत असें आम्ही म्हणतों. तैत्तिरीय, कठ इत्यादि संहिता मंत्रब्राह्मणमिश्रित आहेत एवढेंच नव्हे तर तैत्तिरीय ब्राह्मणहि मंत्रमिश्रित आहे. ही केवळ बाह्य दृष्टि झाली. पण संहिता बनविण्याचें प्रयोजन लक्षांत घेतलें म्हणजे संहितेचीं व ब्राह्मणांचीं जुडगीं जवळजवळ एकाच काळांत तयार झालीं असें भासूं लागेल. पुष्कळ मंत्र ब्राह्मणकालीनहि असतील. मंत्र आणि ब्राह्मणें भिन्नकालीन आहेत हें सिद्ध करण्यास भाषा हें प्रमाण देखील आणतां येणार नाहीं. उत्तरकालीं देखील प्राचीन भाषेंत काव्य करतां येतें आणि जेव्हां उत्तरकालीन काव्यांत प्राचीन काळच्या काव्यांतील शब्द पुनरुक्त होतात तेव्हां तर भाषेचें प्रमाण दुर्बल ठरतें. आध्वर्यवास पोषक असा जेव्हां मंत्र असेल तेव्हां तो जुन्या भाषेंत मुद्दाम लिहिला जाण्याचा संभव असतो. यज्ञांना उत्तानस्वरूपता येण्यापूर्वीं कृष्णयजुर्वेदाच्या मंत्रांचा समुच्चय करण्याची क्रियाहि शक्य नाहीं. जेव्हां यज्ञसंस्था संपूर्ण तयार झाली तेव्हांच कृष्णयजुर्वेदाची संहिता बनली आहे. शुक्लयजुर्वेद तर त्या नंतरचा.

ज्या अर्थीं वैदिक मंत्रांची मांडणी सहेतुक आहे, आणि ज्याअर्थीं वेदांच्या ऋचांचा विनियोग ब्राह्मणांत केला आहे त्या अर्थीं मंत्र आणि ब्राह्मणांतर्गत विधिवाक्यें यांचें पौर्वापर्य काळजीपूर्वक ठरविलें पाहिजे. सूक्तांचें अस्तित्व अगर त्यांची मांडणी सहेतुक आहे हें विधान सर्व वेदांस थोड्याबहुत अंशानें लागू पडणार आहे तथापि तें यजुर्वेदास विशेषेंकरून लागू पडणार आहे. मंत्र आणि क्रिया यांचें नातें अध्वर्यूनें जितकें निकट ठेवलें पाहिजे तितकें होत्यानें ठेवण्याचें कारण नाहीं. होत्याच्या मंत्रांशीं संलग्न अशीं विविध कार्यें यज्ञांत नाहींत. त्याला शंसन तेवढें करावयाचें. आप्रीसूक्तादि अपवाद सोडले तर असें म्हणतां येईल कीं, होत्यानें अमुक मंत्रा ऐवजीं तमुक मंत्र म्हटला तर मोठें बिघडेल असें नाहीं पण अध्वर्यूची तशी गोष्ट नाहीं. त्याला विशिष्ट मंत्र म्हणावयाचा आणि विशिष्ट कृति त्यानंतर किंवा तो म्हणणें चालू असतां करावयाची. यामुळें अध्वर्यूचे मंत्र अधिक अनुरूप असावे लागतात आणि यामुळेंच ते मंत्र आणि कार्यबोधक विधिवाक्यें यांच्यामध्यें कालाचें अंतर फारसें नसणें शक्य आहे.

ब्राह्मणांतर्गत विधिवाक्य हें केवळ मंत्राचें विनियोगकारी नसून उत्पादकहि असण्याचा संभव आहे. मंत्र व ब्राह्मणें

यांपैकीं काय जुनें असावें तें ठरविण्याचे स्थूल नियम येणेंप्रमाणें:—

(१) ब्राह्मणवाक्यांपैकीं विधिवाक्यें मंत्रांपेक्षां जुनीं असणें शक्य आहे. कां कीं, कांहीं मंत्रांची उत्पत्ति क्रतु-प्रयोजनामुळें झाली असेल आणि प्रयोजन म्हणजे विधिवाक्य अगोदर उत्पन्न झालें असेल.

(२) जेव्हां एखाद्या विधीशीं म्हणजे कृतीशीं जोडलेल्या मंत्राचा अर्थाअर्थीं संबंध नसेल तेव्हां मंत्रवाक्य प्राचीन व त्यामुळें अगोदरच सोंवळें झालेलें असें असावयाचें आणि त्या मंत्राचा विनियोग करून घेण्याची जबाबदारी यज्ञयोजकांवर पडल्यामुळें त्यांनीं त्या मंत्राची क्रियेशीं संगति जोडली असावी.

(३) मंत्र आणि प्रयोगांतर्गत क्रिया यांची संगति जितकी सुंदर व बेमालूम तितका तो मंत्र प्राचीनत्वाच्या बाबतींत संशयास्पद समजावा. तथापि सुंदर संगति हेंच अर्वाचीनत्वाचें चिन्ह समजूं नये.

या तत्त्वांनीं यजुर्वेदाचें परीक्षण केलें असतां मंत्रांच्या कालाविषयीं बरीच माहिती उपलब्ध होण्यासारखी आहे. व संहितीकरणाच्या क्रियेचीं बरींच रहस्यें बाहेर पडतील असें वाटतें. असो.

संहितीकरणाच्या इतिहासांत तीन काल अथवा प्रयत्न दिसतात. जेव्हां ऋत्विजांचीं कार्यें भिन्न होऊं लागलीं आणि प्रत्येकाची विद्याहि भिन्न झाली तो संहितीकरणाचा प्रथम काल अथवा प्रयत्न होय. आजच्या स्वरूपांत संहिता दिसतात त्याप्रमाणें जेव्हां प्रथम बनल्या तो तृतीय किंवा अंतिम काल अथवा प्रयत्न होय. याच्या अगोदरचा प्रयत्न म्हणजे संहितांच्या आजच्या स्वरूपांतील नवीन घातलेला भाग वगळला असतां संहितांचें जें स्वरूप होतें तें होय. प्रत्येक संहितेंतील व ब्राह्मणांतील नवीन भाग काढतां येतो. शुक्लयजुर्वेदांत पुरवण्यांसारखे जे भाग आहेत ते आणि शतपथब्राह्मणांतील उत्तरकालीन भाग हे भारती युद्धानंतर कांहीं पिढ्या उलटून गेल्यानंतर जोडले गेले असावेत. तसेंच अथर्ववेदाचें २० वें कांडहि बरेंच उत्तरकालीन असावें. ऋग्वेदांतील दहावें मंडल उत्तरकालीन असावें इत्यादि शोध पूर्वींच्या संशोधकांनीं केलेच आहेत. या प्रत्येक वेदास असलेल्या नवीन पुरवण्या सोडून दिल्या तरी प्रत्येक वेदाचें पृथक् अस्तित्व कल्पितां येतें. त्या स्थितींत जेव्हां वेद होते तेव्हां संहितीकरणाचा द्वितीय काल होता असें म्हटलें पाहिजे.

ज्या व्यासांनीं महाभारत तयार केलें त्याच व्यासांनीं म्हणजे कृष्णद्वैपायन उर्फ वेदव्यास यांनींच वेदांच्या संहिता बनविल्या अशी कल्पना पूर्वींच्या संस्कृत ग्रंथकारांच्या परंपरेंत अनेक प्रसंगीं व्यक्त झाली आहे. व्यासांनीं संहिता बनविल्या असोत अगर नसोत, आपणांस आज हें स्पष्ट दिसत आहे कीं, कौरवपांडवांचें जें घोर युद्ध झालें त्या युद्धाच्या फार तर ५० वर्षें अगोदर किंवा नंतर या संहिता बनल्या असाव्यात म्हणजे ही मंत्रांचीं जुडगीं तयार झालीं असावींत. कदाचित् असें असेल कीं, यज्ञविस्ताराची आणि द्वितीय संहितीकरणाची चळवळ कुरुयुद्धापूर्वीं शेंपन्नास वर्षें सुरू झाली असून या युद्धानंतर एक दोन पिढ्यांत या संहिता बांधून पडल्या असाव्यात आणि ब्राह्मणेंहि त्याच सुमारास तयार झालीं असावींत. भारती युद्धाचा काल कोणताहि असो, भारती युद्धापासून संहितीकरणाचा तृतीय कालहि फारसा दूर नाहीं. संहितीकरण बरेंचसें व्यासांनीं करून त्यांच्या शिष्यांनीं पूर्ण केलें असणें शक्य आहे. संहितीकरणाच्या इतिहासांतील दुसरा प्रयत्न व्यासांचा असावा. प्रस्तुत विधानांस प्रमाणें येणेंप्रमाणें:–

(१) धार्तराष्ट्रांचा उल्लेख कठसंहितेंत येतो.

(२) परीक्षिताचा उल्लेख अथर्ववेदांत येतो.

(३) तैत्तिरीय संहिता करणारा तित्तिर हा वैशंपायनाच्या शिष्याचा शिष्य. वैशंपायन हा भारती युद्धाशीं समकालीन असून जनमेजयाशीं समकालीन होता.

(४) याज्ञवल्क्य हा शुक्लयजुर्वेदाचा म्हणजे वाजसनेयी या नांवानें प्रसिद्ध असलेल्या एका नवीन अध्वर्युसंप्रदायाचा उत्पादक असून हाहि जनमेजयाशीं संभाषण करतांना दाखविला आहे. हा वैशंपायनाचा शिष्य असून पुढें भांडून दूर झाला अशी आख्यायिका आहे.

(५) वैशंपायन हा पांडवांचा व कौरवांचा पितामह जो व्यास त्याचा शिष्य होता.

(६) तैत्तिरीय संहिता, ब्राह्मण, आरण्यक हीं एकाच्याच हातचीं आहेत. कां कीं, त्यांचा एकमेकांशीं इतका निकट संबंध आहे कीं, एक ग्रंथ लिहितांना दुसऱ्या ग्रंथाची योजना मनांत असल्याशिवाय सांप्रत जशी रचना झाली आहे तशी रचना होणेंच शक्य नाहीं. ऋग्वेदाची ज्याप्रमाणें संहिता एकाची आणि ब्राह्मण भलत्याचें तशी गोष्ट तैत्तिरीय शाखेची नाहीं. वरील विवेचनावरून असें सिद्ध होतें कीं, तैत्तिरीय संहिता, अथर्ववेदसंहिता, तैत्तिरीय ब्राह्मण, कठसंहिता आणि वाजसनेय संहिता हीं जवळ जवळ एकाच वेळेस झालीं. काण्व व माध्यंदिन शाखा या वाजसनेय संहितेचेच भेद असल्यामुळें त्या त्याच सुमारास झाल्या.

आतां ऐतरेय ब्राह्मण, शाकल संहिता व सामवेद यांचा प्रश्न उरला. या संहिता आणि ऐतरेयादि ब्राह्मणग्रंथहि त्याच सुमारास झाले होते काय हा प्रश्न उद्भवतो. ऐतरेय ब्राह्मणांत पारीक्षित जनमेजयाचा उल्लेख दोनदां आला आहे. तसेंच कृष्णाचा सासरा विदर्भ देशाचा राजा भीम याचा उल्लेख

आला आहे. त्यावरून ऐतरेय ब्राह्मण हें तैत्तिरीय संहितेच्या फारसें अगोदर पडणार नाहीं; नंतरच पडलें तर पडेल.

या संहिता परस्परांशीं सापेक्ष अशा दिसत असून ऋक्, यजुः, साम यांच्या हेतुभिन्नत्वामुळें व हेतूंच्या अन्योन्याश्रयामुळें यांचें प्रथम, तसेंच द्वितीय आणि तसेंच अंतिम संहितीकरण जवळजवळ एकाच काळीं झालें असावें. तिन्ही संहिता जर समकालीन असून त्यांत हेतूंचा अन्योन्याश्रय आहे तर या तिहींचा काल व तसाच हेतुहि एकच असला पाहिजे आणि तो हेतु यज्ञकल्पना हा होय. संहिता यथार्थच अवतरल्या या प्राचीनांच्या म्हणण्याचा भावार्थ हाच कीं, त्यांचें संहितीकरण यज्ञहेतुमूलक आहे.

मंत्र यज्ञार्थ उत्पन्न झाले असें नाहीं. ऋषींचें नांव मंत्रद्रष्टे आहे. मंत्रदेवता भौतिक रूप घेऊन ऋषींस दिसल्या असें म्हणणें ही रूपकात्मक भाषा झाली आणि रूपकाचा भावार्थ न समजल्यामुळें गैरसमज होऊन अर्वाचीनांनीं मंत्रद्रष्टे याचा अर्थ मंत्रकर्ते असा केला. असें झालें असावें कीं, कांहीं मंत्र जुने असावेत व कांहीं नवे असावेत. ज्यांच्यापाशीं मंत्र सांपडले ते मंत्रांचे रक्षक असावेत किंवा कर्तेहि असण्याचा संभव आहे. अशा दोन शक्यता प्राचीनांसहि वाटत असल्यामुळें त्यांनीं मंत्रद्रष्टे असा शब्द मुद्दाम वापरला असावा. कांहीं ऋषी मंत्र गोळा करणारेच होते. कोणते मंत्र कोणीं गोळा केले याचें श्रेय वैदिक परंपरेनें योग्य मनुष्यास दिलें आहे. हें शक्य आहे कीं, एकच सूक्त दोघांनीं पैदा केलें तेव्हां दोघांसहि श्रेय देणें योग्य असल्यामुळें मंत्रद्रष्टे म्हणून दोन ऋषींचीं नांवें त्या त्या सूक्तासंबंधानें दिलीं गेलीं.

द्वितीय संहितीकरणाच्या कालीं शाखाभेद उत्पन्न झाले नसावेत आणि तृतीय संहितीकरणाच्या कालीं ते जोरांत असावेत. भारती युद्धाच्या कालीं यजुर्वेदसंहिता पूर्ण स्थितींत दिसत आहे आणि आध्वर्यवासंबंधानें तंटे उपस्थित होऊन निरनिराळीं आध्वर्यवें तयार झालेलीं दिसतात. हाच काल आध्वर्यवास फांटे फुटण्याचा, यज्ञसंकोचाचा आणि आजच्या संहिता बनविण्याचा होय. संहितांची, म्हणजे यज्ञप्रयोगांच्या पुस्तकांची, अंतिम आवृत्ति बनण्यास यज्ञसंस्थेची पूर्ण वाढ झालेली आहे, यज्ञसंस्था सर्व नियमबद्ध झाली आहे आणि तिला थोडीशी उतरती कळा लागली आहे असाच काल स्वाभाविक होय. अंतिम संहितीकरणास उतरता काळ पाहिजे; कां कीं, पुढें यज्ञसंस्था अधिक वृद्धिंगत होऊन तींत आणखी फेरफार होण्यास जेव्हां सवड असणार तेव्हां संहितेचें स्वरूपहि बदलणार. भारती युद्धाच्या सुमारास लोकांचें मतांतर होत असावें. यज्ञावरील विश्वास कमी होत जाऊन तत्त्वज्ञानाकडे लक्ष लागत असावें.

लोकांची श्रद्धा एकवटेल असें दैवत तयार झालें नाहीं, विष्णु किंवा शिव यांचेंहि ईश्वरत्व पूर्णपणें स्थापित झालें नाहीं, पण सुशिक्षितांत "ब्रह्मज्ञाना"ची आवड वाढली आहे अशा कालांत अंतिम संहितीकरण झालें असावें.

वेदव्यासांनीं प्राचीन धर्म एकत्र केला त्याप्रमाणें महाभारतरूपी इतिहासग्रंथाचाहि पाया घातला. संहिताग्रंथ फेरबदल झाल्याशिवाय राहिले पण भारत व पुराणें यांची तशी स्थिति राहिली नाहीं. त्यांचें स्वरूप कालांतरानें बदलत गेलें. या परिस्थितीची कारणमीमांसा पुढें दिली आहे.

संहितीकरणाचा द्वितीय काल तृतीय कालाच्या फारसा पाठीमागें जात नाहीं. द्वैपायन व्यास यांचा काल तो द्वितीय काल आणि त्यांच्या शिष्यानुशिष्यांचा काल म्हणजे तृतीय काल. पहिला काल दुसऱ्या कालापासून किती दूर होता हें आज नक्की सांगतां येत नाहीं. पुरुषसूक्तांत ऋक्, यजुः, साम, या तीन समुच्चयांचा उल्लेख आहे. हा उल्लेख त्या कालीं वेदविद्येचें पृथक्करण झालें होतें असें दर्शवितो; अर्थात् हें सूक्त संहितीकरणाची क्रिया सुरू झाल्यानंतरचें आहे. पण हें सूक्त त्या क्रियेच्या प्रथम प्रयत्नानंतरचें आहे कीं द्वितीय प्रयत्नानंतरचें आहे हें सांगतां येत नाहीं. या सूक्ताचा रचनाकाल वैदिक वाङ्मयाच्या दृष्टीनें बराच अर्वाचीन होय हें सर्वमान्य आहे. हें सूक्त दहाव्या मंडलांत आहे आणि दहावें मंडल तर अर्वाचीनच आहे.

संहितीकरणाची क्रिया यज्ञांतील ऋत्विजांच्या सोईसाठीं झालेली. संहितांचा इतिहास पहावयाचा म्हणजे ऋत्विजांचें वर्गीकरण कसें झालें, विशिष्ट वर्गाच्या ऋत्विजांत भेद कसे उपस्थित झाले, त्यांचे वेदांच्या संहितीकरणावर शाखाभेदरूपानें कसे परिणाम झाले हें पहावयाचें. वैदिक वाङ्मयाचा इतिहास ब्राह्मण जातीच्या घडामोडींशीं बराच गुंतलेला आहे.

शाखाभेद हे केवळ यज्ञ करण्याचे भिन्न प्रकार म्हणून राहिले नाहींत. ते ब्राह्मणांचे जातिभेद झाले. जातिभेद झाले ते केवळ शाखानुसार झाले असेंहि नाहीं. श्रौतधर्म शाखेप्रमाणें भिन्न होता तो पुढें आणखी भिन्न झाला आणि त्या भेदामुळें भिन्न श्रौतसूत्रें तयार झालीं आणि त्या भिन्न श्रौतसूत्रांनुसार पुढें ब्राह्मणांत नवीन पोटजाती तयार झाल्या. याप्रमाणें श्रौतवाङ्मयाचा म्हणजे संहिता, ब्राह्मणें, आणि श्रौतसूत्रें, यांचा ब्राह्मणजातीच्या स्थित्यंतराशीं निकट संबंध आहे. असो.

वैदिक वाङ्मयाचा व कालाचा इतिहास हा ब्राह्मणजातीच्या स्थित्यंतराशीं जुळवून लिहिला पाहिजे आणि तो लिहिण्यासाठीं ब्राह्मणजातीच्या आजच्या स्थितीकडेहि अवलोकावें लागेल, तसेंच महाभारत व इतिहास पुराणें यांकडेहि धांव घ्यावी लागेल.

**श्रुति व पुराणें यांचा संबंध.**—वेदांच्या प्रत्येक संहितेमध्यें दुसऱ्या संहितांच्या ज्ञानाची अपेक्षा ठेवलेली आहे त्या अर्थी सर्व वेदांच्या संहिता जवळ जवळ एकाच

कालीं झाल्या हें उघड आहे. तसेंच इतिहासपुराणांचा उल्लेख वेदांत आहे त्यामुळें संहितीकरणाच्या कालांत इतिहासपुराणें कोणत्या तरी स्वरूपांत होतीं. वेदकाल म्हणजे ऋग्वेदांतील अत्यंत जुन्या सूक्तांच्या कालापासून भारती युद्धाच्या कालापर्यंत पसरलेला अनिश्चित कालविभाग होय. या कालविभागाचें ऐतिहासिक ज्ञान मिळण्यासाठीं जें साहित्य उपलब्ध आहे त्याचे खालील वर्ग पाडतां येतील.

(१) वैदिक वाङ्मय.
(२) इतिहास आणि पुराणें.
(३) अर्वाचीन काळची माहिती.

वेद हे सर्व लोकांचें वाङ्मय नसून विशिष्ट देवतांना आणि यज्ञांच्या विस्तृत स्वरूपाला महत्त्व देणाऱ्यांचें वाङ्मय आहे. जी गोष्ट वेदोक्त नाहीं ती उत्तरकालीन ही विचारपद्धति या कारणामुळें उपयोगीं पडण्याजोगी नाहीं. अर्वाचीन वाङ्मयांतच दिसणाऱ्या किंवा वाङ्मयांत मुळींच दृग्गोचर न झालेल्या ज्या गोष्टी प्रत्यक्ष आयुष्यामध्यें दृष्टीस पडतात त्या केवळ अर्वाचीन कालीं उत्पन्न झालेल्या असें खात्रीपूर्वक म्हणतां येणार नाहीं. वैदिक वाङ्मयाची तत्कालीन इतिहासाचें संपूर्ण ज्ञान देण्याची असमर्थता त्या वाङ्मयाच्या याज्ञिकी स्वरूपावरूनच ठरते. संपूर्ण इतिहासचित्र रेखाटावयास त्याच्या जोडीला इतिहास आणि पुराणें हीं घातलीं पाहिजेत. त्यांशिवाय मंत्ररचनाकालाचेंहि स्वरूप समजणार नाहीं.

वेद हें वाङ्मय सर्वजनव्यापी नाहीं तर समाजांतील एका विशिष्ट वर्गाचें आहे आणि तें यज्ञ करणारांनीं आपल्या धंद्याच्या साधनेसाठीं एकत्र जुळविलेलें आहे. ही एकत्र जुळणी करतांना त्यांनीं बरेंचसें जुनें वाङ्मय उपयोगांत आणलें, आणि त्यामुळें वाङ्मयास थोडी विविधताहि प्राप्त झाली आहे. ज्या गोष्टींचें बाहुल्य या वाङ्मयांत दिसतें त्यांचें सर्वव्यापित्व आणि ज्यांचा केवळ जातांजातां उल्लेख होतो अशांचा महत्त्वाभाव हीं आपण कल्पितां कामा नयेत. उपासनाविषयक बाबतींत तर अधिकच जागृत राहिलें पाहिजे. कां कीं, या बाबतींमध्यें दुसऱ्याच्या कार्यक्षेत्रास गौणत्व देण्याची किंवा त्या क्षेत्रासंबंधानें मूकवृत्ति दाखविण्याची इच्छा यज्ञाच्या स्तोत्यांस किंवा प्रचारकांस अधिकच असावयाची. ज्या अनेक दैवतांचा अथर्ववेदांत उल्लेख येतो आणि जीं इतर वेदांतून मधूनमधून डोकावतात आणि जे उपासनेचे प्रकार यज्ञांगानें न दिसतां स्वतंत्र दृष्टीस पडतात ते श्रौतसूत्रांतर्गत कल्पनेंत जरी यज्ञांगानें दाखविलेले असले तरी त्यांचें पृथक्त्व वेदांत अनेक ठिकाणीं दिसून येतें आणि यामुळें ज्या गोष्टी यज्ञांगानेंच केवळ दृष्टीस पडतात त्या पृथक्पणें असणें इतर गोष्टींतहि शक्य आहे अशी कल्पना करण्यास अवकाश आहे.

वेदकालीन स्थितीचा इतिहास जुळविण्यासाठीं जें साहित्य आपणांस उपलब्ध आहे त्यांत इतिहासपुराणांतर्गत कथांचा उल्लेख प्रामुख्यानें केला पाहिजे. इतिहास व पुराणें हे बरेच उत्तरकालीन ग्रंथ होत. तथापि ते ग्रंथ ज्या व्यक्तींचा इतिहास देऊं पाहतात त्या व्यक्तींपैकीं अनेक व्यक्तींचा उल्लेख वेदांतच येतो; व प्रत्यक्ष इतिहास व पुराणें हे शब्द वैदिक वाङ्मयांत आहेत. ज्या वेळेस इकडे ब्राह्मणें तयार होत होतीं त्या वेळेस देशांतील अनेक राजांचीं व वीरपुरुषांचीं चरित्रें (कदाचित् निराळ्या वर्गाकडून) जमा होत होतीं असें दिसतें. आणि त्यांचें थोडेंबहुत संकलनहि बऱ्याच जुन्या कालीं झालें असावें. संहिता जितक्या लवकर बुकें बांधून पडल्या तितक्या लवकर इतिहासपुराणें ग्रंथबद्ध झालीं नाहींत, आणि असें होण्यास कारणहि होतें. श्रौतविषय अगोदरच अप्रिय होऊन बसला होता. त्यांत ढवळाढवळ करण्याची तरी फिकीर कोण करतो? परंतु पुराणांची गोष्ट तशी नव्हती. कवींस पुराणांतील कथा गावयाच्या होत्या आणि नवीन इतिहासहि आंत ढकलावयाची लोकांची इच्छा होती, आणि त्यामुळें जे संस्कार आजचीं जुडगीं बनण्यापूर्वीं वेदास झाले तेच पुढें मोठ्या प्रमाणावर इतिहासपुराणांस झाले. वेदांच्या पवित्रत्वामुळें ते अक्षरभ्रष्टत्वापासून सुटले असें नाहीं. कां कीं, अक्षरभ्रंशाचीं उदाहरणें आपणांस जागोजाग दिसतात. ऋग्वेदांतील जे अनेक मंत्र अथर्ववेदांत दृग्गोचर होतात त्यांत आपणांस शब्दांचा फरक पुष्कळ दिसतो आणि तो सर्व बुद्धिपुरःसर म्हणजे कांहीं विशिष्ट गोष्टी साधण्यासाठीं केलेला दृष्टीस पडतो. हे जे फरक दृष्टीस पडतात त्यांचा हिशोब घेऊन पाहिलें तर त्यांच्या पाठीमागें पुष्कळ इतिहास लपलेला आपल्याला दिसेल. यजुर्वेदाच्या अनेक शाखांची तपासणी केल्यास आपणांस असें दिसून येईल कीं अर्धेच मंत्र घेणें, एका मंत्रास दुसऱ्या मंत्राचा तुकडा जोडणें, हरणीचा पाय कापून तेथें कुतरीचा पाय लावणें यांसारखे अनेक फरक केले आहेत. असें जर आपणांस दिसत आहे तर वेद हे अक्षरभ्रष्टतेपासून बरेचसे बचावले त्याचें कारण वेदांविषयीं भयमिश्रित पूज्यबुद्धि लोकांच्या मनांत वागत होती असें जें मानतात तें संभवनीय नाहीं. सामान्य लोक वेदांत फिरवाफिरव ती काय करणार? व कशाकरितां? ऋग्वेदांतले जे मंत्र हौत्राकरितां म्हणावयाचे. त्या मंत्रांच्या मूळ अर्थाकडे लक्ष नसे. आध्वर्यव करतांना यजूंतील मंत्रार्थाकडे लक्ष नसे. याज्या आणि पुरोनुवाक्या अर्थापेक्षां ऐकण्याच्या तरवावरच निवडलेल्या असत. मूळग्रंथामध्यें नवीन वाक्यें घुसडून देणाऱ्या मनुष्यास वेदांचें अपौरुषेयत्व किंवा जैमिनीनें अकांड तांडव करून सिद्ध केलेली शब्दांची नित्यता खास आडवी येणार नाहीं. वेदांतील शब्दांत फिरवाफिरव करून सोय कोणाची होणार? फार तर यज्ञ करणाऱ्या ऋत्विग्मंडळाची. ऋत्विग्मंडळास फिरवाफिरव करावयाची झाल्यास ब्राह्मणांतर्गत विधिवाक्यांची फिरवाफिरव करण्यांत

फायदा होईल. मंत्रवाक्यांत फिरवाफिरव करण्याची आवश्यकता काय? कुटण्यासाठीं जर कोंबड्याच्या स्तुतीचा मंत्र वापरतां येण्यास लोकांचें वेदभाषेविषयींचें अज्ञान मोकळीक करून देतें, म्हणजे वाटेल तो मंत्र व वाटेल ती क्रिया यांची सांगड जोडतां येते, तर मंत्रांत फेरबदल करण्याचे परिश्रम करण्याइतका महामूर्ख कोण आहे? याशिवाय यज्ञविषयक ज्या प्रयोगाच्या सोई करावयाच्या त्या सोई सूत्रकारांनींच करून दिल्या आणि त्या सोई प्रयोगग्रंथलेखकांनीं आणखी वाढविल्या, यामुळें वेदांचीं अक्षरें भ्रंशापासून बरीचशीं अलिप्त राहिलीं. इतिहास-पुराणांची गोष्ट तशी नव्हती. आपणांस अनुकूल असा इतिहास मिळविण्यासाठीं इतिहासग्रंथांत फेरबदल करविण्याकडे मनुष्याची अधिक प्रवृत्ति होते. यामुळें इतिहास-ग्रंथांत फेरबदल पुष्कळ झाले, आणि पुराणांस पुष्कळसा अर्वाचीनपणा आला. तथापि पुराणांचीं मुळें वेदकाला-पर्यंत जाऊन पोंचतात हें खास.

वैदिकवाङ्मयांत ज्यांचें अस्तित्वहि आढळून येत नाहीं, तथापि उत्तरकालीन वाङ्मयांत ज्यांचा विकास दृष्टीस पडतो अशीं कांहीं शक्य किंवा कल्पनानिर्मित विचारांगें भारतीय वाङ्मयांत दृष्टीस पडतात. उदाहरणार्थ जैनवाङ्मयास ज्या ज्या कारणांनीं विशिष्टत्व आलें तीं अंगें घ्या. जैन वाङ्मयामध्यें जे जे विचार दृष्टीस पडतात ते कांहीं अंशीं आरण्यकांतून दृष्टीस पडतात. शिवाय आरण्यकविचाराशीं सदृश असे विचार ब्राह्मणांत व मंत्रभागांतहि दृष्टीस पडतात. याप्रमाणें जैन विचारांची परंपरा वेदांतील विचारांशीं जरी जुळली तरी जैनांच्या ज्या सृष्टिविषयक कल्पना आहेत त्यांची पूर्वपरंपरा वेदांत सांपडत नाहीं. जैनग्रंथांत विद्याधरांचें बरेंच महत्त्व वर्णिलें जातें पण विद्याधरांचा मागमूस वेदांत बिलकूल नाहीं. यक्षकिन्नरांचा उल्लेख वेदांत क्वचितच दिसतो. जैनेतर वाङ्मयामध्यें विद्याधरकिन्नरांचें अस्तित्व नाहीं असें नाहीं. कथासरित्सागरामध्यें विद्याधरांचें अत्यंत प्रामुख्य वर्णिलें आहे आणि विद्याधरांचा राजा होणें हें ध्येय दाखविलें आहे. कथा-सरित्सागरामध्यें जैनांची निंदा करणाऱ्या राजमंत्र्यास एका ठिकाणीं उपहासस्थान केलें आहे त्यावरून कथासरित्सागरास देखील जैननिर्मित ग्रंथ म्हणण्यास कोणी प्रवृत्त होईल; तथापि विद्याधरकिन्नरांचें अस्तित्व पुराणांतहि आहे. 'गन्धर्वस्य ध्रुवेपदे' इत्यादि तुटक वाक्यें व 'सोम गंधर्वाकडून आणला' इत्यादि तुटक कथा गंधर्वांचें अस्तित्व वेदवक्त्या ऋषींस मान्य होतें किंवा परिचित होतें असें भासवितात, तथापि त्यांस यज्ञसंस्थेच्या अभिमान्यांनीं हविर्भाग मिळूं दिला नाहीं. आयुष्यसूक्तांत 'वसून्रुद्रानादित्यान् मरुतोथ साध्यान्‌ऋभून्यक्षान्गंधर्वांश्च पितॄंश्च विश्वान्। तेभ्यो जुहोमि बहुधा घृतेन मानः प्रजां॑ रीरिषो मोत वीरान्' ॥ या मंत्राखेरीज गंधर्वांस हवी मिळूं देण्याचे प्रसंग यज्ञसंस्थेच्या अभिमान्यांनीं उद्भूत होऊं दिले नाहींत आणि हा मंत्र देखील तैत्तिरीयांनीं आपल्या संहितेंत शिरूं दिला नाहीं. थोडक्यांत सांगावयाचें म्हटलें म्हणजे कांहीं मोठ्या व लठ्ठ देवांनां मोठेपणा देऊन लहानसहान देवतांनां क्षुद्र करून टाकण्याकडे यज्ञसंस्थेच्या अभिमान्यांची प्रवृत्ति होती. उलट आरण्यककारांची व पुराणांची प्रवृत्ति कोणत्या तरी एका देवास किंवा तत्त्वास मोठेपणा देऊन मोठ्या देवांस हीनतेज करण्याकडे आणि सर्वच देवांनां थोडीबहुत मान्यता देण्याकडे होती. तथापि सर्वव्यापी एकेश्वरी कल्पना, बृहद्देव-राज्यकल्पना आणि देवबाहुल्यकल्पना यांचींहि मुळें वेद-काळापर्यंत जातात हें खास. मंत्ररचनाकाल हा देवबाहुल्य-कालाच्या क्षीणतेचा व बृहद्देवमहत्त्वाच्या प्रारंभाचा काल होय. यजूंचा उर्फ अध्वर्यूंचा काल हा बृहद्देवांच्या प्राधान्याचा काल होय आणि आरण्यकाचा काल हा एकेश्वरी कल्पनेच्या प्रारंभाचा व सर्व देवांस एकाच मापानें विकण्याचा काल होय.

हवन किंवा यज्ञ ही मनांत कल्पना आली म्हणजे कंटाळवाण्या विधींची, घरभर पसरलेल्या धुराची आणि अश्रुपात करणाऱ्या यजमान व यजमानपत्नीची कल्पना मनांत येते, आणि असले यज्ञ पाहण्यासाठीं लोक चोहों-कडून जमत ते केवळ भिक्षुकी खटपटीनें आणि मूढ भक्तीनें विचारशक्ति किंवा रसिकता नष्ट झालेले लोक होते कीं काय असा विचार मनांत येतो. सामान्यतः यज्ञांत ज्या दिवशीं पशुहनन असेल त्या दिवशीं प्रेक्षकांची गर्दी जमते तर रक्तपात पाहण्यासाठीं जनता सतृष्ण झाली होती कीं काय आणि तिला खूष करण्यासाठीं क्रौर्याशिवाय यज्ञसंस्थेपाशीं दुसरें कांहीं नव्हतें कीं काय असाहि विचार मनांत येतो; परंतु यज्ञसंस्थेच्या अनेक अंगांकडे लक्ष्य दिलें तर असें दिसून येईल कीं, बहुतेक सर्व इंद्रियें रिझवि-ण्याचीं साधनें यज्ञसंस्थेंत होतीं. सोमरसाचे एकामागून एक चमस पिण्याचा हक्क जरी ऋत्विजांनीं आपल्याकडेच ठेवला होता तरी सामान्य जनांस ओढतील अशा गोष्टी त्या संस्थेंत अनेक होत्या ही गोष्ट श्रौतवाङ्मय वाचूं लागलें असतां अधिका-धिक पटावयास लागते.

आज विसाव्या शतकांत असलेल्या आपणांस प्राचीन काळीं यज्ञयाग कसे चालत होते, त्यांच्या ठायीं श्रद्धा कशी रहात होती वगैरे गोष्टींबद्दल प्रथम विस्मय वाटतो. यूरोपीयांस तर याज्ञिक वाङ्मय म्हणजे एक पद्धतशीर अगडबंब मूर्ख-पणा वाटतो आणि या बेट्या लबाड भिक्षुकांनीं लोकांच्या डोक्यावर काय लादलें हें त्यांनीं पाहिलें म्हणजे सैतानाची वाईट पण महत्त्कृत्याबद्दल जशी तारीफ करावी तशी या यज्ञकर्त्यांची तारीफ करावी असें देखील क्वचित्प्रसंगीं त्यांच्या मनांत येतें. श्रद्धेची जोड आज निरर्थक वाटणाऱ्या विधींनां उत्पन्न कशी झाली हें कोडें उकललें पाहिजे. प्रस्तुत

प्रश्नाविषयीं जिज्ञासा उत्पन्न झाली असतां खालील विचार मनांत येतात.

प्रथमतः, अग्नीबद्दल असलेली पूज्यबुद्धि आणि तो देवांचा दूत, पुरोहित, हव्यवाहक आहे या कल्पना दृष्टीस पडतात, आणि जर देवांनां कांहीं पोंचवावयाचें असलें तर तें अग्नीमार्फतच पोंचविलें पाहिजे हे लक्षांत आलें म्हणजे तें अग्नीसच समर्पण कां करावयाचें हें कळतें.

शिवाय बळीची मुख्य कल्पना म्हणजे स्वर्गांतील देवतांस संतुष्ट करण्यासाठीं आपलें सर्वस्व समर्पण करण्याऐवजीं दुसऱ्या कोणास तरी पाठविणें. कर्मवादास म्हणजे जो करील तो भरील या कल्पनेस प्राधान्य उत्तरकालीं म्हणजे उपनिषदांत दृष्टीस पडतें. त्याच्या अगोदरची लोकप्रिय कल्पना आपल्या ऐवजीं देवतांकडे प्रतिनिधि पाठविणें ही दिसते. ही कल्पना चोहोंकडे दृष्टीस पडते. ख्रिस्ती व ज्यू या दोघांसहि मान्य असलेल्या जुन्या करारांत अब्राहाम हा प्रथम देवाला संतुष्ट करण्यासाठीं आपला मुलगा बळी देत होता आणि पुढें त्यानें मेंढा बळी देऊन देवास तुष्ट केलें अशी कथा आहे. शुनःशेपाच्या आख्यानांत प्रतिनिधीची कल्पना आली आहे. ही कथा बरीच जुनी असावी; कां कीं, शुनःशेपाचें सूक्त ऋग्वेदांत आहे. हरिश्चंद्र हा दाशरथी रामाचा बराच पिढ्यांपूर्वीचा पूर्वज होता. शुनःशेपाचा बळी वरुणास संतुष्ट करण्यासाठीं होता आणि वरुण ही फार जुनी आणि प्राचीन महत्त्वाची पण पुढें महत्त्व कमी झालेली देवता होती असें मानतात, या दोन गोष्टींवरूनहि शुनःशेपाचें आख्यान प्राचीन समजण्यास हरकत दिसत नाहीं.

यज्ञांतील पशु किंवा बलि हा प्रतिनिधीरूप असतो हें सिद्ध होतें. सोमयागामध्यें देखील सोम हा पुरुष आहे म्हणून कल्पना केली आहे. त्याला राजा म्हटलें आहे आणि पुढें जेव्हां ब्राह्मणांस क्षत्रिय राजापासून आपलें स्वातंत्र्य सिद्ध करावेसें वाटलें तेव्हां त्यांनीं आपला राजा सोम ठरविला.

प्रतिनिधिकल्पनेच्या पुढची पायरी म्हणजे रूपकात्मक होय. यज्ञांत अनेक गोष्टी रूपकात्मक आहेत आणि यज्ञ सिद्ध करण्यासाठीं जी विचारपद्धति आली आहे ती देखील रूपकात्मकच आहे. दर्श–पूर्णमास म्हणून जी दर पंधरा दिवसांनीं इष्टि करावयाची असते ती रूपकात्मकच आहे. त्यांत नाद करून असुरांस पळवून लावणें, झाडणीच्या स्वरूपांत असलेल्या वेदानें वेदीरूप पृथ्वी झाडणें, इत्यादि गोष्टी आणल्या आहेत. वेदानें पृथ्वी झाडून निष्कंटक होत नाहीं म्हणून स्तंवयजुर्हरण म्हणजे यजुष्मंत्रांनीं गवताच्या ठोंबांच्या रूपांत असलेले राक्षस 'स्फ्य'च्या रूपांत असलेल्या इन्द्राच्या वज्रानें ठार मारणें इत्यादि विधी आहेत. जादूटोण्यामध्यें शत्रूचा प्रतिनिधि कांहीं तरी धरून त्या प्रतिनिधीचें हनन करावयाचें असतें. जो द्वेष 'इफिजी' म्हणजे पुतळा करून जाळण्यांत दृष्टीस पडतो तोच जादुगारींत विरुद्ध पक्षाच्या प्रतिनिधिरूप पदार्थावर मांत्रिक क्रिया करीत असला म्हणजे त्याच्या ठायीं ज्याच्या हितासाठीं क्रिया होत असेल त्याचें चित्त अडकवितो. कै० महादेव मोरेश्वर कुंटे यांनीं सोमयागाचें पूर्णस्वरूप म्हणजे भारतीयांच्या स्थलांतरावर रूपक आहे असें एका परिशिष्टांत सोमयागाचें पृथक्करण करून दाखविलें आहे. असो.

यज्ञसंस्थेमध्यें सामान्य जनांवर छाप टाकणारे किंवा त्या संस्थेवर श्रद्धा उत्पन्न करणारे जे भाग होते त्यांचा विचार पुढें होईल.

अमानुष शक्तीशीं संबंध ठेवणारे, स्तोत्रें करणारे आणि यज्ञयाग व चेटुकें करणारे जे लोक होते त्या लोकांच्या चळवळी, आपआपसांतील भांडणें आणि स्पर्धेमुळें त्यांनीं उत्पन्न केलेले विधी व एकमेकांपासून एकमेकांनीं घेतलेले विधी आणि वाङ्मय व वाङ्मयांत केलेले फेरफार या सर्व गोष्टींचा परस्पर संबंध असून त्या सर्वांचा देशांत ब्राह्मणांस प्राप्त झालेल्या प्रामुख्याशीं निकट संबंध आहे. भिक्षुकी चळवळ आणि भिक्षुकी भांडणें ज्यांस समजणार नाहींत त्यांस वेदांचें ऐतिहासिक स्वरूपच समजणार नाहीं आणि यज्ञविधींचें ब्राह्मणांतर्गत उपबृंहण आणि सूत्रकारांनीं हे विधी इतके लट्ट बनले असतांना आणखी लट्ट बनविण्याचा कां प्रयत्न केला याचें कोडें उकलावयाचें नाहीं. देशामध्यें ज्या स्पर्धांनीं वैदिक वाङ्मयावर आणि पुढें पौराणिक वाङ्मयावरहि परिणाम घडविला त्या स्पर्धांमध्यें ब्राह्मण व ब्राह्मणेतर (विशेषे करून क्षत्रिय) यांची स्पर्धा, राजपौरोहित्याबद्दल स्पर्धा आणि लोकांकडून वर्गणी ओढूं पाहणाऱ्या स्वयंसिद्ध पुरोहितांची आपल्या वर्गांतच चाललेली स्पर्धा या सर्वांची प्रामुख्यानें गणना केली पाहिजे. ज्याप्रमाणें दोन मंत्र्यांच्या आपआपसांतील स्पर्धेमुळें सर्व राष्ट्रांच्या सौख्यासौख्यावर परिणाम घडतो त्याचप्रमाणें भिक्षुकी भांडणाच्या योगानें आणि भिक्षुकांच्या वर असलेल्या सामान्य जनांच्या श्रद्धेमुळें सर्व जनतेवर आणि कधीं कधीं अनेक राष्ट्रसमुच्चयांवर परिणाम घडतो. त्यांत हेच भिक्षुक ग्रंथकार आणि तत्त्ववेत्ते म्हणून पुढें आले म्हणजे ते आपल्या विचारपरंपरेचा छाप भविष्यकालीन वाङ्मयावर मारतात आणि सर्व संस्कृति त्या पूर्वींच्या तात्पुरत्या भिक्षुकी कारणामुळें उपस्थित झालेल्या भेदांनीं व्याप्त होते. भिक्षुकी प्रयत्न एक तर लोकांस दुसऱ्याकडे जाऊं न देतां आपल्याकडे ओढण्यासाठीं होतील किंवा दुसऱ्याच्या चालू कार्यांतच आपलेहि हात धुवून घेतां येतील तर पहावें या इच्छेनें होतील. भिक्षुकांतील जीवनार्थ कलह या दोन्ही अंगानीं दृष्टीस पडतो व तो वाङ्मयावर परिणाम घडवितो. एकानें लोकांवर छाप ठेवण्यासाठीं अमुक प्रयत्न केला तर दुसऱ्यासहि त्याच प्रकारचा प्रयत्न करावा लागतो.

एकानें एखादा विधि निर्माण केला तर दुसऱ्यास आपलें अस्तित्व त्याच्या चालू विधींत घुसडण्याची इच्छा उत्पन्न होते. कधीं कधीं एकानें एक प्रयत्न सुरू केला असला तर सर्वेचा संशय गिऱ्हाइकांस उर्फ भाविक मंडळीस येऊं न देण्यासाठीं प्रतिपक्षाची किंवा त्याच्या प्रयत्नांची स्तुति करून आपला क्रयविक्रय अधिक महत्त्वाचा आहे असा बोध करण्याचाहि कांहीं चतुर योजकांकडून प्रयत्न होतो. वेळेस त्यार्थ मयार्थ वृत्ति वापरावयाची, वेळेस दुसऱ्याची नालस्ती करावयाची किंवा स्पर्धा करीत असलेल्या कर्माची तारीफ करावयाची पण कर्मकर्त्याची निंदा करावयाची, हे सर्व प्रकारचे प्रयत्न प्राचीन लोकसंग्रह करणाऱ्या भिक्षुकांत दिसून येत असत.

सध्यां महाराष्ट्रांत किंवा हिंदुस्थानांत अथर्ववेद्यांचें अस्तित्व जवळ जवळ नष्ट झालें आहे असें म्हटले तरी चालेल. तथापि अथर्ववेद्यांनीं जे प्रकार पुढें आणले ते प्रकार मात्र नष्ट झाले नाहींत. अशिक्षित मांत्रिकांचा जादूटोणा, जादूटोण्यांतूनच बाहेर पडलेले बारीकसारीक संस्कार आणि जादूटोण्यांस श्रौतमंत्रांचा सोनेरी मुलामा चढवून बनलेलीं ऋग्विधानांतर्गत कर्में, निरनिराळ्या प्रकारच्या शांत्या आणि संस्कारांबरोबर येणारे लौकिक आचार व जादूटोणा यशस्वी व्हावा आणि त्यावर विश्वास रहावा म्हणून त्याच्या अनुषंगानें आलेलें वैद्यक, अनेक प्रकारचीं शिल्पकर्में आणि फलज्योतिष, कौल, शकून यांवर भरंवसा आणि त्या भरंवशावर पोट भरणारे लोक या सर्वांचें अस्तित्व आहेच. शास्त्र खेरीज करून जो अथर्वमूलक भाग आहे त्याची आवश्यकता सध्यांचा मूठभर सुशिक्षितवर्ग वगळला तर इतरांस हजारों वर्षांपूर्वीं जशी होती तशीच आहे.

अथर्वविज्ञानाचा इतिहास बराच मनोरंजक आहे. अथर्व हे अत्यंत पुरातन भिक्षुक होत. इराणी लोक यांस "अथ्रवन्" म्हणत. मात्र यांच्या भिक्षुकीस व्यवस्थितपणा श्रौतवाङ्मयाचा आणि श्रौतकर्माचा पूर्ण विकास होण्यापूर्वीं आला नव्हता असें दिसतें. यांचे मंत्र पाहिले तर ते भाषेवरूनच उत्तरकालीन दिसतात आणि तंत्रापेक्षां मंत्रांच्या शब्दांस गौरव प्राप्त झाल्यानंतर आणि तो गौरव त्रयीवाल्यांनीं उत्पन्न केल्यानंतर बनविलेले अगर जमा केलेले दिसतात. श्रौतकर्मवाल्यांस परंपरागत वाङ्मयाचा उपयोग करावयाचा होता आणि तो उपयोग करण्यासाठीं विधिबोधक ब्राह्मणें तयार झालीं. परंतु अथर्व्यांपुढें तो प्रश्न नव्हता. त्यांचें तंत्र तयारच होतें आणि त्या तंत्रांत बसविण्यासाठीं मंत्रच तयार करावयाचे होते आणि आपल्या ग्राम्य दिसणाऱ्या जादूटोण्यांस गौरव आणावयाचा होता. अर्थात् त्यांस ब्राह्मणग्रंथांची आवश्यकता नव्हती. मंत्र आणले पण समाजांत स्थान मिळविण्यासाठीं श्रौती मंडळींत त्यांस शिरकाव करून घ्यावयाचा होता. तो शिरकाव करून घेण्यासाठीं त्यांचे पुढचे प्रयत्न होते.

त्रयी आणि अथर्ववेद यांच्यामध्यें एक फरक प्रयोजनमूलक आहे. त्रयी म्हणजे तीन वेद मिळून होणारें एक वाङ्मय आहे. आणि अथर्ववेद म्हणजे अनेक दृष्टींनीं स्वतंत्र वाङ्मय आहे. अथर्ववेद हें वाङ्मय गरीब म्हणजे कमी कर्तृत्ववान्, तथापि अव्याहत अस्तित्व कायम राखणाऱ्या आणि राजाचा अगर गृहस्थांचा आश्रय शोधून त्यांचीं गृह्यकर्में चालविणाऱ्या आणि त्यांच्या आजारीपणांत, अडचणींत किंवा दुसऱ्या लौकिक इच्छांच्या पूर्तीसाठीं घरोघर जाऊन आपली भिक्षुकी चालविणाऱ्या कांहीं जादूटोणा, मंत्र, औषध यांनीं परिचर्या करणाऱ्या पुरोहितवर्गाचें आहे. त्रयी हें वाङ्मय त्यांहून कर्तृत्ववान्, कोणा विशेष व्यक्तीच्या आश्रयानें कर्में न चालवितां आपण आपलीं कर्में स्वतंत्रपणेंच पण लोकाश्रयावर करून लोकांस आपल्या कर्मांतील देखाव्यांनीं, अगडबंब विधींनीं, सामगायनांनीं, लांबलचक शस्त्रांस्तोत्रांनीं आपल्या यज्ञाकडे लोकांस ओढणाऱ्या अशा कांहीं कुशल योजकांचें वाङ्मय आहे. जो दुसऱ्या कांहीं लोकांच्याकडे जाऊन आपली उपजीविका चालवितो त्यापेक्षां जो आपल्या अपूर्व कृतीनें लोकांस आणि त्याच्या पैशास आपल्याकडेसच ओढतो त्यास आपल्या स्वतःच्या वर्गाबद्दल अभिमान आणि दुसऱ्याच्या कर्माबद्दल तुच्छता हीं स्वाभाविकपणेंच वाटणार. अशीच तुच्छता श्रौतकर्माच्या अभिमान्यांस अथर्वणांबद्दल वाटत होती. अथर्व्यांच्या विद्येस वेदच म्हणत नसत. वेदास प्रतिशब्द म्हणून त्रयी असाच शब्द वापरीत. त्रेताग्नीवर श्रौतकर्में करणारे समाजाच्या अस्तित्वास अनावश्यक आणि जीं केवळ देखाव्यांच्या स्वरूपाचीं आहेत अशा कर्मांत गढले होते, आणि त्यांच्या कर्मांची लोकप्रियता कमी झाली तेव्हां त्यांची विद्याहि कमी कमी उपयोगाची होत गेली. समाजांतील वैयक्तिक आणि राष्ट्रीय संस्कारांचा बोध त्रयी करीत नसून अथर्ववेद करतो. तथापि जेव्हां त्रैविद्यांचें कर्म संपुष्टांत येत चाललें तेव्हां हे त्रैविद्यहि मूळ पदावर आले आणि त्यांनीं अथर्ववेदांतील कांहीं कर्में आपल्या वेदांत किंवा निदान सूत्रग्रंथांत तरी घेऊन आपलें अस्तित्व कायम राखलें. आज अथर्ववेदी ब्राह्मण दिसत नाहींत. तथापि इतर तीन वेदांचे ब्राह्मण अधिक दिसतात. याचें एक मुख्य कारण म्हटलें म्हणजे अथर्ववेद्यांची कर्में त्रैविद्यांनीं आपापल्या कर्मांत घुसडलीं आणि अथर्व्यांस नामशेष केलें हेंच होय.

वैयक्तिक आणि सामाजिक अशीं कर्में अथर्ववेद बोधितो हें अथर्ववेद साधारणपणें चाळून पाहिला असतां समजेल. यांत राजाला राज्यारोहणासाठीं उपयोगीं पडणारे वगैरे अनेक मंत्र आहेत. सार्वजनिक विधी हेच होत. वैयक्तिक विधी म्हणजे संस्कार यांचे देखील मंत्र यांतच आहेत. म्हणजे

अथर्ववेद समाजास अवश्य अशा क्रियांचा संग्रह होता याविषयीं शंका उरत नाहीं.

अथर्ववेदांत ज्या क्रिया सांगितल्या आहेत त्या त्रयींतील क्रियांपेक्षां अधिक जुन्या आहेत यांत शंका नाहीं. त्रयीचा धर्म म्हणजे यजुर्वेदधर्म उर्फ श्रौतधर्म म्हणजे निवडक कृत्यांचा सुशिक्षितांचा सामुच्चयिक धर्म होय. अथर्ववेदांतील धर्म त्रयीच्या धर्मापेक्षां जुना आहे, पण त्यांतील वाङ्मय पहातां अथर्ववेद हें ऋग्वेदापेक्षां जरा नवीन वाङ्मय आहे. अथर्व्यांच्या जुनाट क्रिया पाहून ब्लूमफील्ड इत्यादिकांस हा अधिक जुना ग्रंथ भासूं लागला. असो.

वेदकालीन धर्म सामुच्चयिक होत चालला. श्रौतकर्मे एकाग्नीवर न होतां तीन अग्नीवर होत; आणि तीं कर्में करण्यास अनेक ऋत्विज लागत. त्रेताग्निसाध्य यज्ञ कोणत्याहि काळांत प्रत्येक व्यक्ति करी असें समजण्यास आधार नाहीं. जें कर्म लांबलचक आहे आणि जें अनेकांच्या संघशक्तीनें व्हावयाचें तें घरोघर होई अशी कल्पनाच करणें चूक होईल. समाजामध्यें ज्याप्रमाणें आज गणपतिउत्सव कांहीं व्यक्तींकडून किंवा संस्थांकडून होतो आणि सामान्य गणपतिपूजन प्रत्येक घरीं होतें त्याप्रमाणें यज्ञ कांहीं व्यक्तींकडून होत आणि फार तर नित्याचा अग्निहोत्रहोम हा मात्र प्रत्येक घरीं होत असावा. गणपतिउत्सवाचे भिक्षुक म्हणजे एका वेळचे पुण्यांतील सुशिक्षित लोक, हे गणपतिपूजन करणाऱ्या रामभट, गोपाळभट यांसारख्या भिक्षुकांपेक्षां स्वतःस शिष्टच समजणार आणि हे उत्सव सार्वजनिक वर्गणीवर चालविणार. गणपतिउत्सव कालांतरानें कमी होतील पण गणपतिपूजन मात्र पूर्वीप्रमाणेंच चालू राहील. तशीच स्थिति यज्ञांची झाली. यज्ञ घरोघर होत नसत हें दाखविणारा पुरावा यज्ञाच्या इतिकर्तव्यतेंतच आहे. यज्ञासाठीं पैसे गोळा करण्यासाठीं सनीहार म्हणजे द्रव्य गोळा करणारे लोक जात आणि वर्गणी मागत. कार्याची कांहीं अपूर्वता नसली तर त्यास वर्गणी कोण देतो? ऋत्विजांना आमंत्रण करण्याचा विधि आहे त्यांत ऋत्विज कोणते आहेत, दक्षणा काय, म्हणून प्रश्न विचारीत. असले प्रश्न प्रत्येक घरीं जर यज्ञ होत असते तर कोणीं विचारले असते? श्राद्धाला एका ब्राह्मणास बोलाविलें असतां दुसरे ब्राह्मण कोण आहेत याची चौकशी कोणी करीत नाहीं. यावरून यज्ञ जेव्हां होत तेव्हां देखील ते विशेष कार्य म्हणूनच समजलें जाई यांत शंका नाहीं.

अथर्ववेद ही संहिता बऱ्याच कालानंतर तयार झाली. आथर्वण एकाग्नीवर क्रिया करीत असें म्हणतात पण याला फारसें प्रमाण नाहीं. त्यांचें कर्म गृह्य आणि यामुळें ते एकाग्नीवरील कर्म करणारे असा बोभाटा झाला असावा. अथर्व्यांचा उपयोग त्रेताग्नीवर होणाऱ्या तीन वेदांच्या अनुयायांच्या कर्मात अवश्य नाहीं. तथापि पुढें एका ठिकाणीं यज्ञांतील ब्रह्मत्व म्हणजे अध्यक्षपद हें स्थान अथर्ववेदी ब्राह्मणास द्यावें असें म्हटलें आहे. खरोखर पाहिलें असतां हें स्थान फार महत्त्वाचें आहे आणि यावर यज्ञांतील सर्व कर्में यथासांग जाणून कर्माच्या अनुक्रमांत अगर क्रियेंत कांहीं चूक झाली तर ती दुरुस्त करण्यास समर्थ अशा मनुष्याची योजना करावी लागते. असें असल्यानें अथर्वणाची योजना त्रेताग्नीवर होणाऱ्या यज्ञाच्या ब्रह्मत्वावर करावी म्हणून शिफारस ब्राह्मणग्रंथांत केली हें आश्चर्यकारक वाटेल, पण हें खरोखर विलक्षण नाहीं. 'ब्रह्मत्व' हें पदच असें विचित्र आहे कीं, या पदावर योजना एक तर फार हुषार मनुष्याची केली पाहिजे किंवा एखाद्या प्रतिष्ठाखोर बैलोबाची तरी केली पाहिजे. अत्यंत हुषार मनुष्याची योजना केली तर अर्थात् अध्वर्यूची जबाबदारी व तेज हीं दोन्ही कमी होणार, पण यज्ञ सुरळीत चालेल. उलटपक्षीं ज्यास कांहीं समजत नाहीं अशा एखाद्या मनुष्याची या पदावर योजना केली म्हणजेहि यज्ञ सुरळीत चालेल व अध्वर्यूस रस्ता मोकळा राहील. क्रियेमध्यें कांहीं दोष झाल्यास तो ब्रह्म्यानें दाखवून द्यावयाचा आणि त्याप्रमाणें दोष कांहीं झाला असल्यास त्याबद्दल प्रायश्चित्त करावयाचें हें ब्रह्म्याचें यज्ञांत कर्तव्य आहे. यामुळें चुका फार झाल्या असें ब्रह्म्यास दिसून आलें तर प्रायश्चित्तें घेतां घेतां यज्ञच बाजूला राहील. अध्वर्यूस ब्रह्म्याचें वचन सर्वथा प्रमाण वाटलें नाहीं तर त्यांच्यामध्येंच वादविवाद उत्पन्न व्हावयाचा. यज्ञांच्या बृंहितसंस्थांपासून अलिप्त राहिलेला व कदाचित् रुसलेला अथर्वण बृंहितसंस्थेंत अडकविला पाहिजे आणि तो अडकविण्यासाठीं कांहीं मानाची जागा त्याला दिली पाहिजे पण त्याला स्थान दिल्यानें कार्यें सुरळीत चालतील असें झालें पाहिजे, या तऱ्हेची परिस्थिति लक्षांत घेतली असतां अथर्वणाची योजना ब्रह्मत्वाच्या स्थानीं झाली हें योग्यच झालें असें म्हणावें लागेल. आजच्या एखाद्या सार्वजनिक समारंभांत मानाच्या जागीं जर कोणी योजकांनीं शालजोडी पांघरणाऱ्या जुन्या शास्त्रीबोवाची योजना केली तर योजकाला कोण दोष देईल?

त्रयीपासून अथर्ववेदाचें पृथक्त्व हें अथर्ववेदांतर्गत अभिचारकर्मामुळें नाहीं. जारणमारणादिक क्रिया ज्याप्रमाणें अथर्वेदांत आहेत त्याप्रमाणें यजुर्वेदांतहि आहेत. अनेक यज्ञांचा हेतु शत्रूंस मारणें हाच आहे, आणि सामान्य यज्ञस्वरूपांत शत्रुनाशासाठीं अनेक मंत्र आहेत.

अभिचार किंवा काम्यसाधन करण्यासाठीं कार्य आणि कारण यांच्या बाबतींत असंबद्ध असे तथापि फार सोपे उपाय कोणीं वापरले तर तसले उपाय वापरणारे लोक हलकट मांत्रिक दिसतात, तथापि कार्य आणि कारण यांच्या दृष्टीनें असंबद्ध पण दिसण्यांत फार अगडबंब असे विधी कोणी

केले तर ते करणें हें फारसें थोतांड वाटत नाहीं आणि करणाराहि फारसा हलकट वाटत नाहीं. एखाद्याचा आजार बरा व्हावा म्हणून जो तीन चार तास लांबेल असा होम करील तो हलकट दिसावयाचा नाहीं, पण जो ४।५ मिनिटेंच कांहीं क्रिया करील तो केवळ छाछू करणारा मांत्रिक ठरेल, हा लोकस्वभाव आहे. इष्टफलप्राप्त्यर्थ अथर्वणाच्या क्रिया फार सोप्या, फार विविध आहेत आणि फार क्षुल्लक अडचणींसाठीं आहेत; आणि त्रयीवाल्यांच्या अधिक कठिण असून सोप्या प्रकारच्या अथर्वण भिक्षुकीस उत्तेजन देण्याचें ध्येय नसलेल्या आहेत.

अथर्ववेदाविषयीं द्विधावृत्ति बराच कालपर्यंत समाजांत राहिली असावी असें सायणाचार्यांच्या अथर्ववेदाच्या प्रस्तावनेवरून दिसून येतें.

**अथर्ववेदावरील सायणभाष्याच्या प्रस्तावनेचें सार.**—'ऋचः सामानि जज्ञिरे यजुस्तस्मादजायत' (ऋ. १०.९०,९) यद्वै यज्ञस्य साम्ना यजुषा क्रियते शिथिलं यद् ऋचा तद्दृढम् (तै. सं. ६.५. १०,३) (ऐ. ब्रा. ५.३२; तै. ब्रा. ३.१२.९, १;१. २. १, २६) इत्यादि वाक्यांवरून यज्ञामध्यें अथर्ववेदाचा कांहीं संबंध नाहीं व याचा त्रयी वेदामध्यें उल्लेखहि नाहीं म्हणून त्याच्या व्याख्येची जरूरी नाहीं.

वरील आक्षेपावर सायणाचार्यांचें उत्तर.—ब्रह्मयाचें काम अथर्ववेदाशिवाय करतां येत नाहीं. इतर वेदांत 'ब्रह्मा'याच्या कर्माची माहिती आहे परंतु ती अपूर्ण आहे. 'हौत्रामर्शाः समाम्नाताः न तान् कुर्यात्' (आश्व. ८. १३) या सूत्रावरून अपूर्ण माहिती घ्यावयाची नाहीं व अपूर्ण माहितीवरून कर्महि करावयाचें नाहीं. त्याप्रमाणें यज्ञाचें अर्ध शरीर त्रयीवेदानें सिद्ध होतें व दुसरा अर्धा भाग 'अथर्वाङ्गिरोभिर्ब्रह्मत्वं (गो. ब्रा. ३. २) अथर्ववेदानें सिद्ध होतो, असें म्हटलें आहे. पहा (गो. ब्रा. २.२४; २.२४; ३,२). "स त्रिभिर्वेदैर्विधीयते" या स्मृतीची व्यवस्था त्रयीवेदांत जें 'ब्रह्मत्व' प्रतिपादित आहे त्यानेंहि-अथर्ववेदाशिवाय-काम केलें तरी चालेल अशा अभिप्रायानें हें स्मृतिवचन लावलें असतां लागते. 'त्रय्या विद्ययेति ब्रूयात्' (ऐ. ब्रा. ५. ३३) हेंहि वचन वरील प्रमाणेंच आहे.

पुढील स्थलीं अथर्ववेदाचा उल्लेख आहे. (बृ. आ. ४.४.१०; नृसिंहपूर्वता. १; मुण्डक. १.१.)

'यम् ऋषयस्त्रयीविदा विदुः । ऋचः सामानि यजूंषि' (तै. ब्रा. १.२.१.२६) वगैरे ठिकाणीं जे भेद केले गेले आहेत ते वेदगत मंत्राभिप्राय आहेत. म्हणजे वेदांचे भेद नसून ते वेदगत मंत्राचे भेद आहेत. यावरून अथर्ववेदाचेंहि नांव ऋग्, यजुस् किंवा साम यांपैकीं एक असावयास पाहिजे परंतु अथर्वा नांवाच्या महर्षीनें हा वेद पाहिला असल्यामुळें अथर्ववेद असें त्यास नांव पडलें. आख्यायिका (गो. ब्रा. १.४) पहा. हा वेद ब्रह्मकर्तव्यपर असल्यानें 'ब्रह्मवेद' असेंहि यास म्हणतात. (गो. ब्रा. १.९;३.४;२.१४)

अथर्ववेद सिद्धमंत्र आहे. (प. २.५)

अथर्ववेदाचे पांच उपवेद आहेत. सर्पवेद, पिशाचवेद, असुर वेद, इतिहासवेद, पुराणवेद (गो. ब्रा. १.१०).

यज्ञांतील ब्रह्मयाचें काम ज्याप्रमाणें अथर्ववेदांत आहे त्याप्रमाणेंच शान्तिकपौष्टिक, राजकर्म, तुलापुरुषमहादानादि कर्में अथर्ववेदांतीलच आहेत.

पौरोहित्य तर अथर्ववेदांतच विशेष रीतीनें आहे.

यानंतर सायणाचार्यांनीं भावनाविचार म्हणजे 'स्वाध्यायोऽध्येतव्यः' या वाक्याच्या अर्थासंबंधीं वगैरे विचार केला आहे, त्यांत अध्ययनविधि अर्थज्ञानाकरितां कीं स्वर्गाकरितां आहे इत्यादि विवरण केलें आहे, व अर्थाकरितां आचार्यकरणविधि कोठेंहि नाहीं. असें म्हटलें आहे.

उपनयन आणि आचार्यक यांचा अङ्गाङ्गिभाव नाहीं. 'अष्टवर्षं ब्राह्मणं उपनयीत' या वाक्यांतील 'उपनयीत' येथील आत्मनेपदावरून स्वात्मसमीहितसाधनाची प्रतीति होते. उपनयन अध्ययनाङ्ग आहे. अध्यापनाचा विधि नाहीं. अध्ययनाचा विधि आहे.

यानंतर वेदांचें प्रामाण्य व अपौरुषेयत्व यासंबंधीं विवेचन करून सायणाचार्य म्हणतात कीं, एकंदरींत वेद स्वतःप्रमाण व अपौरुषेय आहेत म्हणून त्यांची व्याख्या करणें उचित आहे.

स्वतःप्रामाण्यवाद, त्यावरील आक्षेप व त्यांचें खंडन.

वेदापौरुषेयत्ववाद. 'भारताप्रमाणें वेद पौरुषेय असावयास पाहिजेत.' 'कर्ता उपलब्ध नाहीं, म्हणून वेदास कर्ता नाहीं.' तस्माद् यज्ञात्सर्वहुतः (ऋ. १०.९०,९), अनन्तरं च वक्त्रेभ्यः (ऐ. ब्रा ५.३६) इत्यादि ऋचा अर्थवादरूप आहेत. वेद अपौरुषेय आहेत म्हणूनच ते नित्य आहेत. शब्द (स्फोट) नित्यवाद, वेद हा अपौरुषेय, नित्य व विवक्षित-अर्थप्रतिपादक असल्यामुळें त्याचें व्याख्यान करणें उचित आहे.

सर्वत्र अथर्ववेदाचा निर्देश शेवटीं असल्यामुळें सर्व वेदाच्या शेवटीं याची व्याख्या केली आहे. (गो. ब्रा. १.१६ १७;२०; तै. आ. २.१०.)

अथर्ववेदाचे नऊ भेद आहेतः—

१ पैप्पलादाः २ तौदाः, ३ मौदाः, ४ शौनकीयाः, ५ जाजलाः, ६ जलदाः, ७ ब्रह्मवदाः, ८ देवदर्शाः, ९ चारणवैद्याः इति.

यांपैकीं शौनकीय, जाजल, जलद व ब्रह्मवद या चार शाखांतील सूक्त, अनुवाक, ऋचा यांचा विनियोग गोपथब्राह्मणाला अनुसरून कौशिक, वैतान, नक्षत्रकल्प, आङ्गिरसकल्प व शान्तिकल्प या पांच सूत्रांनीं सांगितला आहे. 'कौशिक' सूत्राचें नांव 'संहिताविधि' असेंहि असावें असें उपवर्षाचार्यांच्या कल्पसूत्राधिकरणामध्यें लिहिल्यावरून दिसतें.

वरील पांच सूत्रांत भिन्न भिन्न तऱ्हेनें संगृहीत झालेलीं कर्में कळण्यास कठिण आहेत म्हणून त्यांची यादी सायणाचार्यांनीं दिलेली आहे त्यांतील तात्पर्य.

कौशिकसूत्रांत.—दर्श-पूर्णमासविधि, कांहीं संस्कार, अभिचार, जादुटोणा, कांहीं काम्ययाग, रोगनाशकमन्त्र, पिण्डपितृयज्ञ वगैरे.

वैतानसूत्रांत.—यागविषयाला प्राधान्य असून तदनुरोधानेंच दर्शपूर्णमासापासून राजसूय, अश्वमेधापर्यंत अथर्ववेदाचा संबंध दाखविला आहे.

नक्षत्रकल्पांत.—कृत्तिका नक्षत्राच्या पूजेपासून आरंभ करून अनेक शान्तीच सांगितल्या आहेत.

आङ्गिरसकल्पांत.—अभिचारकर्माला प्राधान्य असून अभिचारकर्म करणारांचें संरक्षण. अभिचाराला उपयुक्त देश, काल, मण्डप, दीक्षा वगैरे संभारांचें निरूपण. परकृत अभिचारनिवारण.

शान्तिकल्पांत.—वैनायकग्रहगृहीतांचीं लक्षणें. शान्ति वगैरे. नवग्रहयज्ञादिक.

परिशिष्टांत.—राज्याभिषेक, राजचिन्हप्रदान वगैरे राजासंबंधी कर्में. कपिला, तिलधेनु, भूमिदान वगैरे. अनेक होम, व्रतें वगैरे. नित्य नैमित्तिक, काम्य वगैरे भेद.

कौशिकसूत्रांत आङ्गिरसकल्पाचा उल्लेख आला आहे. 'आहत्य आङ्गिरसम्' (कौ. ६·१) 'आङ्गिरसकल्पोक्तमित्यर्थः' असा सायणाचार्य अर्थ करितात.

पाकयज्ञ शब्दानें 'आथर्वण' कर्माचा उल्लेख होत असतो त्याचे दोन प्रकार आहेत. आज्यतन्त्र व पाकतन्त्र.

आज्यतन्त्र व पाकतन्त्र यांतील भेद व अनुष्ठानक्रम वगैरे सायणाचार्यांनीं दिले आहेत.

**वैयक्तिक उपासनेचा संकोच, व श्रौताची वृद्धि.**– वेदग्रंथांचें साहित्य जमा होण्यास आणि त्यांचें वर्गीकरण होण्यास यज्ञसंस्थेची वाढ व व्यवस्थितपणा हीं कारण झालीं. आणि यज्ञसंस्थेची वाढ होण्यास सामुच्चयिक कर्मांची वाढ कारण झाली. सामुच्चयिक कर्मांची वृद्धि तपासतांना साधारणपणें एक नियम आढळून येतो तो हा कीं, वैयक्तिक कर्में जशींजशीं कमी होत चाललीं तशींतशीं सामुच्चयिक कर्में वाढत चाललीं. अग्निहोत्रहोम प्रत्येकाकडून होईनासा झाला तेव्हां त्याला अपूर्वता आली आणि अग्न्याधानाचा लांबलचक विधि आला. शिवाय कर्मांची सामान्यता जेव्हां कमी होत जाते आणि कित्येक विशिष्ट धंदेवाईक लोकांच्या हातांत तीं कर्में जातात तेव्हां असा परिणाम होतो कीं, कर्मामध्यें ठाकठिकी येते, त्याचे नियम ठरतात; आणि या गोष्टी झाल्यामुळें सामान्य जन कर्मास अधिकाधिक पारखा होऊं लागतो. व्यक्तीच्या हातून पारमार्थिक कर्म होईनासें झालें म्हणजे प्रथम तें प्रतिनिधीच्या द्वारें होऊं लागतें. घरच्या देवांची पूजा ब्राह्मणामार्फत करविणें हा प्रकार त्यांतलाच होय. प्रतिनिधीचा खर्च एकव्यास सोसेनासा झाला म्हणजे जो तें कर्म करीत किंवा करवीत असेल त्यासच द्रव्यद्वारें मदत करावी आणि आपण तें कर्म चाललें असतां घटकाभर जाऊन बसावें असा प्रकार सुरू होतो. श्रौतधर्माचें एकंदर स्वरूप असें बनत चाललेलें दिसतें कीं, त्यांत व्यक्तीचें कर्तव्य थोडें होऊन धर्म सामुच्चयिक होत होते. या स्वरूपाची वाढ होण्यास कारण घरोघरचें अग्निकर्म सुटलें आणि तें सुटण्याचें मुख्य कारण उष्ण देशांतील अग्नीच्या जोपासनेची अस्वाभाविकता होय.

वेदकालांत आणि त्यानंतरच्या स्मृतिकालांत जी अग्निसान्निध्यानें उपासना दृष्टीस पडते ती फारशी घरोघर असल्याचें दिसत नाहीं. अग्निसान्निध्यानें घरोघर प्रसंगीं संस्कार होत असतील, तथापि प्रत्येक घरीं अग्नीचें नित्य अस्तित्व केव्हांच गेल्याचें दिसून येत आहे. आपल्या पूर्वजांची वसती ज्या वेळेस हिंदुस्थानच्या सरहद्दीवर म्हणजे गांधारादि देशांत किंवा त्याहीपलीकडे कोठें तरी थंड ठिकाणीं होती तेव्हां अग्निसान्निध्यानें घरोघर कर्में होत असावींत. अग्नीची सेवा हा भारतांतील भूमीवर टिकणारा धर्म दिसत नाहीं. भारतांतील उष्ण हवेंत अग्नीवर इतकें प्रेम करण्याची आणि त्याचें सातत्य उपदेशिण्याची लौकिक आवश्यकता नाहीं. आजच्यापेक्षां प्राचीन काळची हवा अधिक थंड असेल असें म्हणतां येत नाहीं. पंजाबसारख्या प्रदेशांत हिंवाळ्यांत थंडी बरी पडते, तथापि उन्हाळे फारच उष्ण आहेत. एकंदरींत हवा वऱ्हाडच्या हवेपेक्षां फारशी भिन्न दिसत नाहीं. अशा प्रदेशांत अग्नीचें कोडकौतुक करण्याची बुद्धि अस्वाभाविक होय. प्रत्येक घरांत अग्निहोत्रकर्म रहाणें कठिण होतें. उलट अग्निसाधन ही एक आनंदाची चीज न रहातां भविष्यत्कालीं "पंचाग्निसाधन" हें एक देहदंडनाचें तप समजलें गेलें. हिंदुस्थानच्या उष्ण हवेंत जो पांच अग्नींस जवळ करतो तो खरा तपस्वी आणि देहदंडन करणारा. अग्नीचा उपयोग तो आनंदाचें स्थान समजून न होतां देहदंडनाचें साधन म्हणून करण्यांत आला. आमची अशी समजूत होते कीं अग्नीच्या उपासनेचा वैयक्तिक पण सार्वत्रिक धर्म घरोघरच्या आचरणांतून ऋग्वेदमंत्रकालींच पार निघून गेला असावा. अग्नीचें पूजन हिंदुस्थानच्या भूमीवर रुजलेंच नाहीं. पारशांचें कर्म एकाग्नीवरील आहे. भारतीयांत जें त्रेताग्नीवर कर्म सुरू झालें तें समाजांतील कित्येक निवडक व्यक्तींच्या किंवा धंदेवाईक आर्त्विज्य करणारांच्या घरचें असावें. त्रेताग्नीवर कर्म करणारांमध्यें देखील अजस्रपक्ष आणि उद्धरणपक्ष म्हणजे नेहमीं तीन अग्नी ठेवणारांचा आणि नेहमीं एकच अग्नि ठेवावयाचा आणि त्याचे वेळेवर तीन करावयाचे असें करणारांचा असे दोन पक्ष असल्यानें त्रेताग्नीच्या सार्वत्रिकतेविषयीं संशय उत्पन्न होतो.

यज्ञसंस्थेच्या इतिहासांत अग्न्याधान म्हणून जी एक संस्था आहे तिचें अस्तित्व वैयक्तिक उपासनालोपाचें निदर्शक आहे. सप्त हविःसंस्था म्हणून ज्या सात संस्था आहेत त्यांतील अग्न्याधान ही प्रथम संस्था धरली जाते. आज अग्निहोत्राचा स्वीकार करतात तो अग्न्याधानानंतर करावयाचा असा रिवाज आहे. तथापि यज्ञांच्या वाढीच्या इतिहासांत असें दिसून येतें कीं, अग्न्याधानानंतर अग्निहोत्र घ्यावयाचें हा प्रकारच नवीन आहे. विवाहानंतर खरोखर फार थोडक्या दिवसांत म्हणजे पंधरा दिवसांच्या आंतच अग्निहोत्रस्वीकार आहे. तथापि अग्न्याधानाच्या प्रयोगांत हा भावी अग्निहोत्री

त्रेहेव्याच्या बियांनीं आपल्या पुत्रांबरोबर एकीबेकीचा जुगार खेळतो असें दाखविलें आहे. म्हणजे अर्थात् तो त्या वेळेस म्हातारा नसला तरी बऱ्याच वयाचा असला पाहिजे हें उघड आहे. म्हणजे ज्या काळांत अग्निहोत्र घेणें ही स्वाभाविक विवाहोत्तर क्रिया नाहींशी होऊन समाजांतील थोडके लोक आणि ते देखील आपल्या उतार वयांत अग्निहोत्र घेऊं लागले अशा काळांत या संस्काराची स्थापना झाली हें उघड आहे. आणि अग्निहोत्रस्वीकार ही गोष्ट याप्रमाणें जराशी अपूर्व झाल्यामुळेंच त्याच्या स्वीकाराचा विधि वाजत गाजत ( विधीमध्यें घोडा वगैरे आणून ) करण्याची प्रवृत्ति होणार. अग्न्याधान हा प्रयोगच अशा कालीं बसविला गेला कीं, त्या वेळेस दर्शपूर्णमासाचा प्रयोग तयार होता. अग्न्याधानाच्या मंत्रांत दर्शपूर्णमासाचें नांव आलें आहे आणि अग्न्याधानाची फलश्रुति दर्शपूर्णमास करण्याची संधि असें दाखविलें आहे. म्हणजे अग्न्याधान हा विधि "दर्शपूर्णमास" उत्पन्न ( दृष्ट ) झाल्यानंतरच दृष्ट झाला.

अग्न्याधानाचें विधान प्रत्यक्ष यजुर्वेदांतच आहे त्यामुळें यजुर्वेदाच्या घटनेच्या कालीं अग्निहोत्राचा स्वीकार कमी होत होता आणि सोमहि दुर्मिळ झाला होता हें अन्यत्र दाखविलें आहे.

**यज्ञसंस्थेचें प्राचीनकाळीं राष्ट्रीय आयुष्यांत स्थान.**—वैदिक राष्ट्रें लहान लहान टोळ्यांसारखीं होतीं. त्यांस एकत्र जोडणाऱ्या संस्थेचा अभाव होता. ती उणीव यज्ञांनीं भरून काढली. त्या काळच्या समाजाच्या चरित्रांत यज्ञप्राधान्य कोणत्याहि प्राचीन ग्रंथांत किंवा प्राचीनकालविषयक 'इतिहास' ग्रंथांत दिसून येणार आहे. वैदिक वाङ्मयापैकीं मंत्रवाङ्मय एका काळच्या सामान्य लोकांचेंच वाङ्मय होतें. तशीच वैदिक भाषाहि सामान्य होती. यज्ञादि धर्म किंवा यज्ञविषयक मूलधर्म हाहि सामान्य होता. हवनाखेरीज इतर उपासनाप्रकार प्राचीनकालीं होते, ते श्रौतधर्मांत शिरले नाहींत पण नष्टहि झाले नाहींत. ते उत्तरकालीन वाङ्मयांत दिसतातच. वैदिक वाङ्मय व यज्ञसंस्था यांचें संवर्धन ब्राह्मणांनीं यज्ञसंस्था वाढवून केलें.

पुरुषसूक्तांत हविः, यज्ञ, आज्य, इध्म, बर्हिःप्रोक्षण, संभार, पृषदाज्य, पशु इत्यादि यज्ञावयवांचा उल्लेख आहे. तसेंच ऋचांचा यजूंचा व सामांचा उल्लेख आहे. त्यांवरून असें दिसून येईल कीं, ऋग्वेदसंहिता यज्ञसंस्था बरीच प्रगल्भ झाल्यानंतर संपूर्ण झाली; आणि ऋग्वेदसंहिता तयार होत असतांच मंत्रांचें समुच्चयीकरण आणि कोणत्या ऋत्विजांकडून कोणते मंत्र म्हटले जातात तें पाहून त्याप्रमाणें वर्गीकरण वरेंचसें झालें होतें. पुरुषसूक्तांत धर्म यज्ञांगानेंच आहे हें तत्त्व ओळखलें गेलें–( यज्ञेन यज्ञमयजन्त देवास्तानि धर्माणि प्रथमान्यासन् ). ऋग्वेदाचे मंत्र तयार होण्याचें कार्य संपूर्ण होण्यापूर्वी एक असा काल आला कीं, त्यांत घरोघरचें अग्निहोत्र किंवा साग्निक वैयक्तिक धर्माचरण कमी कमी होऊं लागलें, आणि यज्ञाची किल्ली अध्वर्यू व होते यांनीं फिरवावी आणि लोकांनीं तमाशा पहावा म्हणजे धर्म झाला, या प्रकारची स्थिति उत्पन्न झाली. यज्ञसंस्था बऱ्याच वाढल्यानंतर संहिता तयार झाल्या. अनेक यज्ञांच्या प्रसंगीं कांहीं प्रश्न उपस्थित होत. त्यांचा निर्णय होई व तो पुढें नियम बने. या प्रकारची क्रिया आपणांस ब्राह्मणांत दिसते. शिवाय कांहीं नवीन प्रघात कोणीं सुरू केला तर त्याचें नांवहि यज्ञास चिकटे. या तऱ्हेनें कांहीं यज्ञसंस्था व यज्ञांगें व्यक्तींच्या नांवावर पडलीं आहेत.

उदाहरणार्थ कृष्णयजुर्वेदांत कोणत्या ऋषीच्या नांवावर कोणकोणते याग प्रचलित झाले याबद्दलचें टिपण येथें देतों.

| ऋषी | याग | स्थल |
|---|---|---|
| अंगिरस | द्विरात्र | सं. ७–१–४ |
| गर्ग | त्रिरात्र | सं. ७–१–७ |
| अत्रि | चतूरात्र | सं. ७–१–८ |
| जमदग्नि | चतूरात्र | सं. ७–१–९ |
| उद्दालकपुत्र 'कुसुरुबिंद' | सप्तरात्र | सं. ७–२–२ |
| बृहस्पति | अष्टरात्र | सं. ७–२–३ |
| बृहस्पति | चतुर्विंशतिरात्र | सं. ७–४–१ |
| वसिष्ठ | एकोनपंचाशद्रात्र | सं. ७–४–७ |
| उदन्युपुत्र 'मुंडिभ' | अश्वमेधानंतरच्या अवभृथसंबंधीं होत्रापैकीं एका मंत्राचा विनियोग | ब्रा. ३–९-१५ |
| अरुणी व त्यांपातऋषीचा पुत्र दृश | सावित्रचयनसंबंधीं प्रश्नोत्तरें | ब्रा. ३–१०-९ |
| गौतमगोत्री देवभाग ऋषी | सावित्राग्नीचा साक्षात्कार | ब्रा. १०–९ |
| वृष्णिपुत्र शूष | सावित्रोपदेश | ब्रा.३–१०-१० |
| भरद्वाज | सावित्रप्राप्ति | ब्रा. ३-१०-११ |
| नाचिकेता | नाचिकेतचयनाचा प्रवर्तक | ब्रा. ३–११–८ |
| वृष्णिपुत्र गोबल | नाचिकेताग्नीपैकीं विशिष्टपद्धतीचा पुरस्कर्ता | ब्रा. ३–११–९ |
| शंड व मर्क | शुक्रामंथिग्रह ग्रहण करण्याचा प्रचार यांच्याकरितां पडला | सं. ६–४–१० |
| वसिष्ठ | स्तोमभागसंज्ञक मंत्रसमुदायाचा प्रवर्तक | सं. ३–५–२ |
| अथर्वा | अग्निमंथनाचा प्रचार | सं. ३–५–११ |
| कण्व | सामगायक आचार्य | सं. ४–३–१३ |

ऋग्वेदमंत्राच्या आरंभीं व मध्यकालीं, ब्राह्मण हा वर्ग पूर्णपणें निर्माण झाला नव्हता, तो ऋग्वेदमंत्ररचनेच्या अंतिम कालीं झाला.

ब्राह्मणांचें महत्त्व यज्ञांनीं वाढविलें, कां कीं, यज्ञकर्म करण्यास बरेच दिवसांची उमेदवारी लागे, व समाजांतील अनेक क्रिया मिळून होणारें कार्य यज्ञाशिवाय दुसरें नव्हतें. असलेंच तर राज्य हांकण्याचें.

ऋचांच्या संहिता बनविणें, त्यांचा अभ्यास करून वेदांगें काढणें, या क्रियांस कारक यज्ञसंस्थाच होय, दुसरें नाहीं.

ऋचांचा अभ्यास आणि वेदांगांचा पूर्व प्रयत्न हा ब्राह्मणांत आहे, आणि त्यामुळें, ब्राह्मणें हा प्रथमचा वेदाभ्यास होय.

अध्वर्यू म्हणजे यजुर्वेदी हे मुख्य लटपटे, कर्तृत्ववान्, आणि ब्राह्मणांस पुढारीपण आणणारे होत, आणि यांनींच व्यवस्थापकत्व (आध्वर्यव) आपल्याकडे घेतलें. होता, सामक, ब्रह्मा इत्यादि मानाच्या जागा दुसऱ्यांकडे ठेवून किल्ल्या आपल्या हातीं ठेविल्या. भांडणें लागावयाचीं तीं स्यानेजरीकरितां. वसिष्ठ विश्वामित्राचें भांडण पौरोहित्याबद्दल. कांहीं भांडणें यज्ञांतील स्थानाबद्दल. यजुर्वेदाच्या अनेक शाखा व अनेक सूत्रकार असण्याचें कारण हेंच कीं, त्यांच्यामध्यें यज्ञविषयक संस्थास्थापक निरनिराळे पुरुष उपजले. ऋग्वेद ही केवळ गाण्यांची संहिताच आहे. परंतु यजुर्वेद म्हणजे इतिकर्तव्यतांचा ग्रंथ आहे. इतिकर्तव्यता प्रयोगकर्त्यांच्या वैविध्याप्रमाणें विविध असणार. एका नाटककंपनींतून भांडणें होऊन जशी दुसरी नाटककंपनी निघावयाची, त्याच क्रियेनें, शुक्ल व कृष्ण यजुर्वेदीयांचें मूळ भांडण झालें, आणि त्यामुळेंच यजुर्वेदांत एकाच मजकुराची पण भिन्न मांडणीची विविधता आली.

श्रुति यज्ञार्थच अवतरल्या असें प्राचीन पंडित म्हणत आहेत आणि तें खरें आहे. वेदांतर्गत सर्व काव्यें यज्ञाकरतां तयार झालीं असें नव्हे. तथापि यज्ञाकरतां गोळा करावीं लागलीं आणि त्यांचा विनियोग यज्ञाकरतां झाला हें खास एवढें सत्य असतां श्रुति यज्ञार्थ अवतरल्या असें विधान केवळ स्वाभाविक गौरव होय. यज्ञविवेचकांस आपल्या धंद्यांच्या गौरवासाठीं तसें व्यावहारिक बोलणें बोलावें लागलें. संहिताकरणावर, म्हणजे मंत्राचीं जुडगीं बांधण्याच्या क्रियेंत यज्ञयोजकांच्या बोटांच्या रेषा स्पष्ट उमटल्या आहेत.

वेदांगें यज्ञसंस्था पूर्ण दशेला पावल्यानंतर निर्माण झालीं, ती यज्ञसंस्थेनें, आयुष्याच्या तसेंच समाजाच्या विद्यासंचयाच्या कोणकोणत्या भागावर परिणाम घडविले त्यांचीं निदर्शक आहेत. प्रयोजनाशिवाय ज्ञानाची किंवा कशाचीच व्यवस्थित मांडणी अनवस्य आहे. यज्ञसंस्थेचा चढ, मध्य व उतार हीं ऋग्वेदांतील मंत्रांत दृष्ट होणाऱ्या संहिताकरणार्थ प्रयत्नाच्या कालापासून वेदांगकालापर्यंत दिसून येतात.

यज्ञसमारंभ सुरू कोण करितो, त्यास पैसा कसा आणितो, ऋत्विज गोळा कसे करितो इत्यादि इतिकर्तव्यता यजुर्वेदांत वर्णिल्या आहेत.

यजुर्वेदांत यज्ञसंस्था पूर्ण प्रगल्भ झालेली दृष्टीस पडते. तींतील यज्ञसंस्था पाहिली म्हणजे असें दिसतें कीं, यागांचे इष्टि, पशु, सोमयाग आणि चयन हे मुख्य सांच्यासारखे प्रकार असून इतर प्रकार थोड्या बहुत फरकानें यांसारखेच आहेत.

यज्ञांत लौकिक भाग व उपासना यांचें मिश्रण आहे. लौकिक भागांचे पुढें "विधि" बनविले. यज्ञसंस्थेंत उपासनेखेरीज आलेल्या अवांतर गोष्टींमध्यें कांहीं मनोरंजनाच्या, कांहीं खाद्यपेयांच्या व पाकशास्त्राच्या, कांहीं रचनाप्रकारांच्या, कांहीं जत्रेच्या स्वरूपांच्या, कांहीं स्त्रीविषयक–वेश्या पुंसली इत्यादिकांच्या आहेत. यज्ञासंबंधीची प्रेक्षक मंडळी, व त्यास दिलेलीं स्थानें यावरहि ग्रंथांत विवेचन आहे. यज्ञांतील व्याख्यानें, वादविवाद इतिहासपुराणें हा पुढील संस्कृतीच्या संवर्धनास कारण झालेला भाग होय. समाजांतील निरनिराळे वर्ग आणि त्यांचा यज्ञांशीं संबंध हा एक मोठा महत्त्वाचा विषय होईल. यज्ञाविषयीं असंतुष्ट होणारा वर्ग त्या कालीं होता याला प्रमाणें यज्ञविषक वाङ्मय वाचतांना वारंवार दृष्टीस पडतात. (१) उपनिषदवाले, (२) क्षत्रिय (३) आचरणाचें महत्त्व सांगणारे–बौद्ध जैनादि (४) भक्तिसंप्रदायी (५) इतिहास पुराणांचे भाट यांची विरुद्धता आपणांस परिचित आहेच, पण या वर्गाचें अस्तित्व मंत्रकालांतच दिसून येतें. जैमिनीचें मीमांसाशास्त्र यज्ञाच्या उतरत्या काळांतलें आहे. कां कीं त्याशिवाय इतक्या अट्टाहासानें यज्ञसिद्धि करण्याचें प्रयोजन नव्हतें. जैमिनी बऱ्याच अंशी यज्ञघातक आहे, कां कीं मीमांसेमुळें यज्ञ ही क्रिया स्वतंत्र राहिली नाहीं तर नियमांनीं जखडली गेली आणि यज्ञ म्हणजे, लोकप्रवृत्ति बदलेल त्याप्रमाणें जो समारंभ बदलत नाहीं असा समारंभ किंवा नाटक करण्याचा रिवाज स्थापन झाला.

**यज्ञसंस्थांचे परिणाम.**—भोंवतालच्या सामाजिक आयुष्यांतील ज्या विविध आणि परस्परांशीं असंबद्ध अशा गोष्टी होत्या त्यांची यज्ञसंस्थांनीं संगति लाविली. उदाहरणार्थः

(१) लोकांच्या गोत्रप्रवरांची यादी करणें आणि पैतृक परंपरेशीं संबंध राखणें. हें यज्ञांनीं केले आणि त्यामुळें सत्रांचें विवेचन करतांना आश्वलायनाच्या श्रौतसूत्रांत गोत्रप्रवरांचें विवेचन करावें लागलें.

(२) नृत्य. हें अर्थात् लौकिकच पण तें श्रौतांत शिरलें तसेंच

( ३ ) संगीत. नृत्य व संगीत हीं महाव्रतांत दिसून येतातच.

( ४ ) शिल्पकला ही यज्ञांत अनेक कारणामुळें येते तिचें सविस्तर विवेचन मागें केलेंच आहे.

( ५ ) प्राणिशास्त्र हेंहि यज्ञांच्या अनुषंगानें वाढलें हें अश्वमेधाशीं संबद्ध अशा पशूंच्या यादीवरून दिसून येईलच.

( ६ ) व्याख्यानें.

( ७ ) इतिहासपुराणें. यज्ञाच्या प्रसंगीं जी मंडळी जमत तेथें या प्रकारची बौद्धिक करमणूक असे असें अनेक पुराणांतील कथांच्या व उपनिषदांच्या प्रसंगावरून दिसून येईल.

( ८ ) रानटी जातींच्या रीतीरिवाजांचा आर्यांच्या आयुष्यांत समावेश झाला असणें शक्य आहे. "निषादस्थपतिं यजेत" या विधिवाक्यावरून परकीय लोक आणि देश्य लोक यांचें धार्मिक एकीकरण होत होतें असें दिसतें.

( ९ ) जत्रा ह्याहि यज्ञप्रसंगानें उपस्थित झालेल्या दिसतात.

असंतुष्टांनीं यज्ञसंस्थेवर हल्ला केला, सात्वतप्रमुख भागवतांनीं भक्तिसंप्रदाय स्थापन केला आणि यज्ञावर कुरघोडी केली. यज्ञांतील मौज दुसऱ्या समारंभांनीं घेतली. यज्ञ शुष्क झाले. यज्ञाचे आज तागाईत अवशेष शोधावयाचे झाल्यास वर्गीकरण करावें लागेल तें असें कीं, गर्दी जुळविणारे मौजेचे प्रकार कोणीकडे गेले आणि यज्ञांचे विधि कोणीकडे गेले.

( १ ) वेचव यज्ञ, ( २ ) यज्ञसंक्षेप उर्फ स्मार्त. हे एका बाजूचे अवशेष होत. दुसऱ्या बाजूचे अवशेष म्हटले म्हणजे ( १ ) बौद्धजैनादि संप्रदायांचे उत्सव, ( २ ) शैववैष्णवादि संप्रदायांचे उत्सव, ( ३ ) मुसलमानी मोहरम, ( ४ ) व सध्यांच्या काँग्रेसच्या चळवळीसारखे प्रसंग होत.

यज्ञ सर्व व्यवहारांचा समुच्चय असल्यामुळें त्यांतूनच बराचसा व्यवहारधर्महि निघाला असणें शक्य आहे.

यज्ञ ही मोठी सर्वांचें उत्पन्न एकत्र करण्याची व सांघिक संपत्तीचा एकत्र उपभोग घेण्याची संस्था होती. यामुळें कांहीं सांघिक कल्पना व धर्म प्रसारांत आले.

यज्ञामुळें नवीन वसाहती स्थापन झाल्या. जंगलांत जावयाचें तेथील भूमि नांगरावयाची, आणि तेथें हा मोठा उत्सव करून लोक आणावयाचे, आणि कांहीं तात्पुरती मोठी वस्ती उत्पन्न करावयाची; अशा आशेनें कीं, पुढें कायमची वस्ती उत्पन्न होईल.

वैश्यादि वर्गास यज्ञामुळेंच बरकत येणार. कारण माल खपण्याची यज्ञभूमि हें मोठें स्थान होतें. त्यामुळें वैश्याचे हितसंबंध यज्ञाशीं बांधले गेले.

"निषादस्थपतिं यजेत" या विधिवाक्यामुळें कांहीं निषाद राजासहि आपलें राष्ट्र एकदम संस्कृत करण्यास तेथें नागरिक बोलावण्यास उत्तम निमित्त होतें. त्यामुळें आर्य आणि अनार्य क्षत्रिय हे दोघेहि सदृश झाले. निषादांचा नाश करून आर्यांचा विस्तार न करतां जंगली लोकांस क्षत्रिय करून विस्तार करतां येईल. या कल्पनेच्या प्रसारास वाव मिळाली. नवीन वसाहत करण्यास क्षत्रियांच्या अगोदर ब्राह्मणहि जात ही गोष्ट अगस्त्यादिकांच्या उदाहरणांवरून सिद्ध आहे.

अनेक राजे येथें जमावयाचे त्यामुळें अग्रपूजा कोणाची प्रथम स्थान कोणाचें याचा संबंध येथेंच येतो. राजांचे तंटे येथेंच व्हावयाचे आणि त्यामुळेंच सार्वराष्ट्रीय धर्मशास्त्र (इंटरन्याशल ला) येथेंच उत्पन्न झालें.

यज्ञ म्हणजे मनुष्य नसलेली व्यक्ति होय. ही अशी मोठी संस्था असल्यामुळें, संस्थानविषयक आणि संस्थाविषयक कायदे येथेंच निर्माण झाले. सर्व द्रव्य यजमानास अर्पण होई पण यजमान तें वांटून टाकी. त्यामुळें द्रव्य संस्थेचें, त्यांतील निर्वाहापुरता खर्च यजमानानें ध्यावा, बाकी सर्व वांटून टाकावें, या कल्पना प्रथम येथेंच उद्भूत झाल्या.

यज्ञाचें एक कार्य समाजाच्या विस्ताराचें होतें त्यामुळें जेव्हां हिंदुस्थानांत वसाहत चोहोंकडे झाली तेव्हां यज्ञ संपुष्टांत येत चालले.

यज्ञ करणाऱ्या लोकांमध्यें क्षत्रिय तसे ब्राह्मणहि आहेत. सर्वच यज्ञ सनीहारार्जित द्रव्यावर होत असतील असें नाहीं. कांहीं यज्ञ ब्राह्मण स्वतःच्या पैशानें करीत असावेत. ब्राह्मणांच्या संपत्तीची कल्पना आपणास स्पष्ट असल्याशिवाय हें विधान पटणार नाहीं. वेदकालीन ब्राह्मण सुखवस्तु व क्षत्रियांपेक्षां देखील बरे असावेत. बऱ्याचशा प्रसंगीं त्यांचें अग्रस्थान सर्व लोकांच्या मनावर स्पष्टपणें ठसेल असे प्रसंग यज्ञांमुळें वारंवार उत्पन्न होत.

**यज्ञांचे लौकिक हेतु व यज्ञांचे अभिमानी.—** स्वर्गविषयक फलश्रुति यज्ञांसंबंधानें विवेचन करतांना किती जरी सांगितली तरी ती कार्यप्रवर्तक होत नाहीं. "स्वर्गकामो यजेत" इत्यादि विधिवाक्यें पारलौकिक फल दाखवून चोदना उत्पन्न करितात तथापि काम्य म्हणजे विशेष इच्छा मनांत धरून केलेलीं हवनें थोडीं थोडकीं नाहींत. दर्शपूर्णमासेष्टिच घ्या. इचे कामनापरत्वें झालेले भेद आहेत. प्रवृत्तिकारक कामना येणेंप्रमाणें.

(१) प्रजेच्या प्राप्त्यर्थ (२) जमीनीच्या तंट्यांत व भाऊबंदकींत जय मिळविण्यासाठीं (३) रणांगणांत हतवीर्यास धैर्यप्राप्त होण्यासाठीं (४) जय पावणाराच्या सामर्थ्यवृद्धीसाठीं (५) समाजांत मिसळण्यासाठीं (६) इंद्रियांस बळकटी येण्यासाठीं (७) समाजांत प्रतिष्ठा मिळण्यासाठीं (८) प्रायश्चित्तार्थ

(९) राक्षसांचा उपद्रव नष्ट होण्यासाठीं (१०) शत्रूचा नाश व्हावा म्हणून (११) गाई व माणसें यांचा रोगापासून बचाव होण्यासाठीं (१२) रणांत जय मिळविण्यासाठीं (१३) अल्पायुष्यत्व नष्ट होण्यासाठीं (१४) घर वगैरे जळल्यास तच्छांत्यर्थ (१५) मनांतील इच्छा पूर्ण होण्यासाठीं (१६) चढाओढींत जय होण्यासाठीं (१७) ऐश्वर्यप्राप्तीसाठीं (१८) शरीरावर कांति चढण्यासाठीं (१९) तेजोवृद्धीसाठीं (२०) सहनशीलता प्राप्त होण्यासाठीं (२१) अन्नाचा पुरवठा पुष्कळ व्हावा म्हणून (२२) अन्नाचा आपण पुष्कळ उपभोग घ्यावा म्हणून (२३) अन्नाचे अधिपति व्हावें म्हणून (२४) पुष्कळ दिवस जडलेल्या रोगांतून आपली मुक्तता व्हावी म्हणून (२५) नेत्ररोग नाहींसा होऊन दृष्टि चांगली व्हावी म्हणून (२६) सर्व रस प्राप्त व्हावे यासाठीं (२७) धनप्राप्त्यर्थ (२८) संग्रामोत्तर धान्याचा पुरवठा व्हावा म्हणून (२९) अभिचारापासून होणारा अपाय टाळण्यासाठीं (३०) पुत्रप्राप्त्यर्थ आनंद व्यक्त करण्यासाठीं (३१) गांव इनाम मिळावा म्हणून.

इष्टीचे कामनापरत्वें भेद पाहिले म्हणजे लौकिकांत कोणकोणत्या सामान्य आकांक्षा जागृत झाल्या असतां यज्ञसंस्थेच्या पिशवींतून उपाय पुरविले गेले आहेत याची चांगली कल्पना येते. केवळ कर्तव्य म्हणून समाजांत कर्म फार थोडें येतें पण काम्य कर्म अधिक होतें. यासाठीं कर्मांची लोकप्रियता रहावी म्हणून लौकिक आकांक्षा आणि कर्मकर्तृत्व यांची सांगड घालावी लागते. ती सांगड घालण्यास यज्ञप्रयोगाचे पुरस्कर्ते मुळींच चुकले नाहींत. असो.

नुसती कामनापूर्ति कर्मास जोडून कर्म लोकप्रिय होत नाहीं. कर्म केल्यानें कामनापूर्ति झाली अशी प्रसिद्धि होऊन नंतर तें कर्म लोकप्रिय होतें असें नाहीं. कां कीं, कामनाप्रेरित मनुष्य कामनापूर्तिसाठीं अनेक कर्मे करितो. आजारी नवऱ्यासाठीं किंवा पुत्र व्हावा म्हणून स्त्रिया औषधें घेतील, दानें देतील, पंचाक्षऱ्याकडे जातील, ग्रहशांती करतील, व्रतें आणि वैकल्यें आचरतील आणि नवसहि करतील. इतकें करून परिणाम होईल असें नाहींच, झाला तर त्याचें श्रेय कोणत्या उपायास यावें यासंबंधीं प्रश्नच पडणार. एवंच कोणत्याहि अदृष्टफल उपायांची प्रसिद्धि गुणांवर अवलंबून नसून जाहिरातींवर अवलंबून असते. यज्ञसंस्थेंत जाहिरात करणाऱ्यांस स्थान मिळालेंच आहे.

यज्ञसंस्था जिवंत ठेवण्यास समाजांत यज्ञाची तारीफ करणारे कांहीं लोक लागतात. सिद्धसाधकांच्या जोडीशिवाय कोणत्याहि लोकांस आपलेसें करणें अदृष्टफल कर्मास शक्य नसतें. पूर्वींचे हिंदू राजे ( उदाहरणार्थ नागपूरकर भोंसले ) आपल्या अभीष्टचिंतनार्थ ब्राह्मणांस वृत्त्या देत असत. यज्ञाविषयीं समाजामध्यें अनुकूलता उत्पन्न करणारा एक वर्ग आहेच त्यास प्रसर्पक म्हणतात. प्रसर्पकास छायामंडपाच्या आंत स्थान दिलें असतें. प्रसर्पक म्हणजे ऋत्विज नसतो तर यज्ञकर्मांचें रहस्य आपण जाणतों असा वाणा वाळगणारा असतो. प्रसर्पकांस दक्षिणा देणें हा एक विधि केला आहे. हिरण्यकेशीय म्हणजे सत्याषाढाच्या सूत्रांत यजमान दक्षिणेसाठीं स्वतःच्या शरीराचे भाग लोकांस देतो. त्याजकडून, ब्रह्म्यास मी मन देतों चक्षु उद्गात्यास देतों त्याप्रमाणें प्रसर्पकास शरीरावरील लोम देतों अशा अर्थाचीं वाक्यें वदविलीं आहेत. अर्थात् मन देतां येत नाहीं म्हणून दुसऱ्या कांहीं लौकिक द्रव्याची योजना झाली असते. यज्ञसिद्धीसाठीं ऋत्विजांखेरीज कांहीं खटपटी मंडळी अवश्य आहेत. प्रत्येक समारंभांत कांहीं प्रत्यक्ष कांहीं पडद्यामागें काम करणारी मंडळी असतात त्यांस जर खूष ठेवलें नाहीं तर व्यवहार चुकेल. सध्यां तर असें झालें आहे कीं यज्ञसंस्था जितकी समजण्यास कठिण झाली आहे तितकी तिच्यांतल्या मर्मज्ञतेची पदवी अधिक महत्त्वाची झाली आहे. गृहस्थवर्गाच्या सहानुभूतीशिवाय यज्ञ तर होणारच नाहीं. गृहस्थांस कांहीं मान्यता यज्ञामार्फत मिळाली नाहीं तर त्यांची सहानुभूति मिळणार नाहीं. अशा प्रसंगीं जर कोणता मान गृहस्थांच्या पदरीं बांधावयाचा असेल तर तो प्रसर्पकत्वाचा होय.

प्रसर्पकांपैकीं कोणास तरी अग्रपूजेचा मान द्यावयाचा असतो. ज्यास अग्रपूजेचा मान मिळतो त्यास "आत्रेय" म्हणतात. यज्ञांत जमलेल्या मंडळींत तो श्रेष्ठ असावा, आणि तो जर अत्रिगोत्रोत्पन्न असला तर विशेष चांगलें. अग्रपूजेची यज्ञप्रसंगीं वेळ आली म्हणजे "क आत्रेयः" म्हणून यजमान पृच्छा करतो आणि "अहमात्रेयः" म्हणून विशिष्ट प्रसर्पक पुढें होतो. आत्रेयानंतर ऋत्विजांची पूजा होते आणि त्यांच्या नंतर इतर प्रसर्पकांची होते.

ऋत्विज म्हणून ज्यांची योजना होते ते सर्व लोक चांगल्या तऱ्हेचे श्रौती असतात असें नाहीं, तर कांहीं अपंडितांस आर्त्विज्याचा मान मिळावा म्हणून यज्ञांत थोडीबहुत सोय आहे. सुब्रह्मण्य, पोता, उन्नेता या नांवानें जे ऋत्विज ओळखले जातात तेथें सामान्य शिक्षिताचाहि प्रवेश होणें शक्य असतें. आणि त्यामुळें कांहीं कमी शिक्षित तथापि प्रसंगीं उपयोगीं पडतील अशीं माणसें यज्ञसंस्थेस साधक होतात.

**ब्रह्मवादी.**—यज्ञास सहायक तथापि विशिष्ट प्रसंगीं यज्ञांत प्रत्यक्ष अंग नसलेला असा एक वर्ग यज्ञप्रसंगीं किंवा समाजांत दिसून येतो. तो ब्रह्मवादी किंवा मीमांसकाचा होय. यज्ञ चालू असतां यांच्या हातून निर्णय होत असे किंवा नसे हें सांगतां येत नाहीं. कां कीं, यज्ञाच्या कार्यप्रसंगीं त्वरित निर्णयाची आवश्यकता असते आणि अशा प्रसंगीं वादविवादास फारसा अवकाश देतां

येत नाहीं. ब्रह्म्याची योजना यासाठींच केली जात असे. अशा वेळेस एक तर जो निश्चय होई आणि तावडतोब अमलांत आणला जाई तो पुढील ऋतूंच्या प्रसंगीं पूर्वविधान म्हणून उपयोगी पडे. किंवा कांहीं प्रश्नांचा (आणि बहुतकरून ते महत्त्वाचे असत.) निश्चय चार माणसें एकत्र जमवून करावा लागे. त्या वेळेस जो वादविवाद होई त्यास ब्रह्मवाद म्हणत.

आज ब्रह्मवाद हा शब्द जगद्विषयक सूक्ष्म किंवा सर्वव्यापी अशा प्रश्नाच्या तात्त्विक वादास लावतात. हा अर्थ ब्रह्म याचा जो अर्थ उपनिषदांत निश्चित झाला त्यावरून झाला आहे, तथापि जे यज्ञविषयक प्रश्न ब्रह्मवादास कारणीभूत झाले त्यांस ब्रह्मवाद असें म्हणण्याचें कारण एवढेंच असावेंसें दिसतें कीं, यज्ञांत ब्रह्म्याचें काम जें संशयनिर्णय किंवा वादनिश्चय तें काम करणारा वाद या स्वरूपांत 'ब्रह्मवादा'स प्रारंभ झाला असावा. ब्रह्म याचा मूळ अर्थ जो स्तोत्र त्याशीं "ब्रह्मवादिनो वदंति" या शब्दांतील ब्रह्म याचा संबंध नाहीं. ब्रह्मविषयक कर्म म्हणजे यज्ञांतील सर्व कृत्यें जाणून संशयनिर्णय करण्याचें काम. आणि तद्विषयक प्रश्न म्हणजे ब्रह्मवाद. अध्वर्यू इत्यादि ऋत्विजाचें काम काय करावयाचें तें ठरलें म्हणजे, प्रत्यक्ष करणें. अध्वर्यूस सर्ववेदज्ञानापेक्षा नाहीं. ब्रह्म्यास सर्ववेदज्ञानापेक्षा आहे. त्यासच तात्त्विक विचार करावा लागणार. तें ब्रह्म्याचें कर्म सामुच्चयिक तऱ्हेनें लोकांनीं पार पाडणें अधिक स्वाभाविक होय. त्याचें कर्तव्यस्थान म्हणजे विद्वानांची बैठक (ब्रह्मवादिनः). त्या ठिकाणींच तात्त्विकवाद उपस्थित होत जाऊन वेदांतज्ञानाची स्थापना व्हावयास उपक्रम झाला.

सुरेसंबंधाचा ब्रह्मवाद एका यागांत आला आहे. हवन करून अवशिष्ट राहिलेल्या सुरेचा पुढें उपयोग काय करावा हा प्रश्न पुढें येतो. कां कीं, बहुतेक सर्व यज्ञोच्छिष्ट ऋत्विजच भक्षण करीत. ऋत्विज किंवा यजमान आणि क्वचित् प्रसंगीं यजमानपत्नी यांखेरीज कोणासच यज्ञोच्छिष्ट मिळत नाहीं. असें असतां सुरेचा उपयोग काय करावयाचा. ऋत्विजांनीं सुरा प्यावी हें तर त्यांच्या शिष्टाचाराविरुद्ध. एक प्रसंगीं पहाण्यास जमलेल्या लोकांपैकीं वैश्यवर्गास द्यावी असा आदेश आहे. कदाचित् हे वैश्य यज्ञसेवेलाच (छकडे वगैरे हांकण्यास) उपयोगी पडले असावेत. तथापि असें करण्यांत यज्ञोच्छिष्ट ब्राह्मणेतरांस देण्याचा प्रसंग येतो. असल्या प्रकारच्या प्रसंगास तोड म्हणून एक ब्रह्मवाद आला आहे त्यांत असें सांगितलें आहे कीं, यज्ञोच्छिष्ट सुरा प्राशन करण्यासाठीं कोणी तरी (मद्यपी) ब्राह्मण पहावा व त्याला सुरा पिण्याबद्दल पैसे देऊं करावेत आणि त्यास सुरा पाजावी. पैसे देऊनहि ब्राह्मण न मिळाल्यास ती सुरा वारुळावर ओतून टाकावी.

**भिक्षुकी भांडणें.**—वेदग्रंथांमध्यें जे अनेक भिक्षुकी कलह दिसून येतात त्यांत कांहीं कलह फारच मोठे व परिणामकारक दिसतात. वसिष्ठ व विश्वामित्र या दोघां राजपौरोहित्याबद्दल धडपडणाऱ्या ऋषींचा कलह हा ऋग्वेदांत फार प्रमुखपणें दिसून येतो. या कलहाचेंच पौराणिक रूपांतर झालें, त्यांत मात्र बरीचशी कवींची कल्पना शिरली. पौराणिकांनीं यास जें स्वरूप दिलें तें बरेंचसें निराधार असलें तरी या दोघां भिक्षुकांचें अकांडतांडव बरेंच मोठें असावें असें दिसतें. यांत तत्त्व नव्हतें, यज्ञविषयक प्रश्न होता आणि हें भांडण केवळ व्यक्तिविषयक किंवा फारतर कौलिक होतें.

सामान्य भिक्षुकीकरतां भांडणें थोडींथोडकीं दिसत नाहींत. ऐतरेय ब्राह्मणांतील भार्गवेयरामाची कथा ही केवळ कौलिक स्पर्धाच दर्शविते. त्याच ग्रंथांत सांगितलेली कवषऐलूषाची गोष्ट व्यक्तिविषयक मत्सर आणि त्या मत्सरामुळें इतर भिक्षुकांनीं काय काय खेळ केले, त्यांची तत्त्वाशीं जोड कशी करून दिली हें स्पष्ट करिते. या प्रकारच्या भिक्षुकी भांडणांतून आपल्या भिक्षुकीच्या सिद्ध्यर्थ अधिक हुषारांनीं तत्त्वें काढून तीं समाजाच्या बोकांडीं बसविलीं आहेत. आपल्या कुलांत भिक्षुकी राखण्यासाठीं सोमपान करण्याची राजे लोकांची चालू रीति भयप्रद आहे अशी दीक्षित राजाची समजूत करून देऊन त्या राजास सोमरसाच्या ऐवजीं पिंपळाच्या किंवा वडाच्या डिऱ्यांचा रस पाजला आहे आणि तशीच चाल पुढें प्रसृत केली आहे.

जुन्या चळवळीमध्यें एका बाजूनें वसिष्ठ व दुसऱ्या बाजूनें विश्वामित्र अशी जी स्पर्धा दाखविली आहे त्या स्पर्धेशिवायच देव आणि असुर यांच्या स्पर्धाविषयक कथा दिसतात. परपक्षास असुर म्हणावयाचें व स्वपक्षास देव म्हणावयाचें या सामान्य योजनेंत ज्या लोकांकडे असुरत्व लादलें गेलें तो पक्ष म्हटला म्हणजे विश्वामित्र होय. व्यक्तींचीं भांडणें सामुच्चयिक स्वरूपाचीं होतात, त्या वेळेस निरनिराळ्या कारणांनीं अनेक व्यक्ति किंवा कुळें स्पर्ध्यमान व्यक्तींचें भांडण स्वतःचें करून घेतात. भृगू, अंगिरस, अथर्व आणि कण्व यांचीं नांवें सामान्यतः त्रैविद्यांच्या विरुद्ध बाजूस दृष्टीस पडतात आणि या भांडणांच्या योगानें प्राचीन वाङ्मयामध्यें बऱ्याच दंतकथा उत्पन्न झाल्या आहेत. अथर्वे त्रैविद्यांस मान्य नव्हते असें मुळींच नाहीं. प्रत्येक संहितेंत सांपडणारा "अथर्वा त्वा प्रथमो निरमन्थदग्ने" हा मंत्र अथर्व्यांच्या त्रैविद्यांमध्यें असलेल्या मान्यतेची कबूली देत आहे. आंगिरसदेखील अप्रिय होते अशांतला भाग मुळींच नाहीं. कण्वांगिरसांचीं आणि घोरांगिरसांचीं व इतर कित्येक आंगिरसांत मानले जाणाऱ्या सूक्तकारांचीं सूक्तें शाकलसंहितेंत पुष्कळ आलीं आहेत. "अंगिरसांविशाम्" अशा रीतीनें अंगिरसास गौरवानें उल्लेखिणारीं वचनें देखील ऋग्वेदांत आढळतात. हीं वचनें एकतर आंगिरस आणि आंगिरसांच्या पक्षाचे विरुद्ध लोक यांच्यांत द्वैत उत्पन्न होण्या-

पूर्वींचीं असावींत किंवा दोहोंचा समेट झाल्यानंतर संहिती-करणाच्या प्रसंगीं त्यांस महत्त्व देण्याकरितां संहितेंत घातलीं असावींत. अथर्व आणि आंगिरस यांचा इतरांपासून पृथक्पणा वरवर ऋग्वेद वाचणारास देखील दिसल्यावांचून राहणार नाहीं. तंट्यापूर्वीची संयुक्त स्थिति, तंटा चालू असतां निर्माण झालेलें वाङ्मय आणि तंटा संपल्यानंतर समेटाच्या घालमेली दाखविणारे उल्लेख यांचे ठसे वेदग्रंथाच्या प्रत्येक पानावर उमटले आहेत असें म्हटल्यास अतिशयोक्ति होणार नाहीं.

जेव्हां समाजामध्यें तंटेबखेडे उत्पन्न होतात तेव्हां निर-निराळे पक्ष स्पर्ध्यमान व्यक्तीशीं खाजगी हितसंबंध अडकल्या-मुळें किंवा विशेष तात्त्विक भांडणांच्या कारणांमुळें उत्पन्न होतील. व्यक्तींचीं भांडणें हीं पक्षविषयक बनलीं म्हणजे व्यक्ती स्मशानांत गेल्या तरी आपल्याबरोबर भांडणें न नेतां तीं पुढच्या पिढीसाठीं शिल्लक ठेवतात. दोन तट तयार झाले म्हणजे पक्षांमध्यें भेद कायम राखणारे नवीन मतभेद दृष्टीस पडतात आणि ते मतभेद म्हणजे पूर्वी असलेल्या पक्षांचें सातत्य राखणारे धागे म्हणून इतिहासकारांनीं समजावे. जो सुधारणेच्छु असेल तो राजकीय किंवा सामाजिक बाबतींत देखील सुधारणेच्छु होईल. तथापि सामाजिकसुधा-रणेच्या पक्षाला राजकीय नेमस्तपणाची आणि राजकीय सुधारणाविषयीं अधिक अपेक्षा करणाऱ्या संप्रदायास सामा-जिक सुधारणाविषयक औदासीन्याची जोड महाराष्ट्रांत दृष्टीस पडते. यांत तात्त्विक किंवा प्राकृतिक कारणांपेक्षां वैयक्तिक कारणें आहेत असें आपणांस दिसत नाहीं काय? एका नव्या बाबतींत पूर्वींच्या दोन पक्षांपैकीं एकानें अनुकूल पक्ष धरला म्हणजे दुसऱ्या पक्षानें त्याच्याविरुद्ध पक्ष धरलाच पाहिजे, या तऱ्हेची प्रवृत्ति आपणांस नेहमीं दिसते. वैदिक-वाङ्मयांत जीं भिक्षुकी भांडणें किंवा सामाजिक भांडणें आपणांस दिसतात त्यांत कांहींच्या परंपरेचे धागे सांपडतात ते धागे शोधण्यासाठीं स्वतंत्र विवेचन पुढें येईल.

वैदिक ग्रंथांत निरनिराळ्या भागांत जे आपणांस युध्यमान पक्ष दिसतात त्यांतील कांहीं येणेंप्रमाणें.

| | |
|---|---|
| विश्वामित्र विरुद्ध हरिश्चंद्र.<br>जमदग्नि विरुद्ध वसिष्ठ. | असुर, राक्षस, पिशाच } विरुद्ध { देव, मनुष्य, पितर |
| बृहस्पति विरुद्ध शुक्र. | सर्प विरुद्ध जनमेजय. |
| विश्वामित्र विरुद्ध वसिष्ठ. | परशुराम विरुद्ध क्षत्रियकुलें. |
| अंगिरस विरुद्ध आदित्य. | इंद्र विरुद्ध अंगिरस, शंबर, |
| याज्ञवल्क्य विरुद्ध वैशंपायन. | कृष्ण, नवग्व, भृगु, रुद्र, |
| अथर्व विरुद्ध त्रैविद्य. | अथर्व, राक्षस. |

वरील द्वैतांमध्यें राजकीय कारणमूलक द्वैतें कोणतीं होतीं सृष्टिद्वैतांवरील किंवा भिक्षुकी भांडणांवरील रूपकें कोणतीं होतीं याविषयीं विवेचन करण्यास फार सूक्ष्म शोध करावा लागेल.

ज्या वेळेस श्रौत म्हणजे त्रेताग्नीवरील कर्म ऋत्विजांचे संघ करीत होते, त्या वेळेस सामान्य जनांचें कर्तव्य कोणतें असावें? यज्ञ सर्वांसच शक्य नाहींत; ते खर्चाची गोष्ट होत, आणि ते करण्यास देखील सनीहार पाठवून द्रव्य गोळा करावें लागत असे. अशा कालीं केवळ श्रौतधर्माच्या दृष्टीनें सामान्य जनांचें कर्तव्य केवळ यज्ञास वर्गणी देणें आणि यज्ञ पहाणें एवढेंच होतें काय? एवढेंच असेल तर वैदिककालासारखा कोणताच समाज बंधनरहित नव्हता असें म्हणावें लागेल. आणि सामान्य जनांवर भिक्षुकांचा पगडा फारसा नसावा अशीच कल्पना करावी लागेल. परंतु समाज अमानुष शक्तींच्या भयापासून तितका मुक्त असलेला दिसत नाहीं. सर्व वैदिक वाङ्मयाचें अवलोकन केलें तर तत्कालीन जनता आजच्या जनतेपेक्षां देखील अधिक खुळी आणि अधिक अज्ञानामुळें अधिक भ्याड अशी दिसते. शिवाय केवळ विधींच्या अवडंबरानें कोणत्याहि समाजाचें नियमन होणार नाहीं. व्यावहारिक नीतिकल्पना, शृङ्गारवात्सल्यादि समाज-रक्षक मनोविकार आणि त्यामुळें होणारें समाजनियमन, तसेंच परमार्थासाठीं आपण स्वतः कांहीं तरी करावें ही इच्छा यापासून अलिप्त अशा समाजाची आपणांस कल्पना करतां येत नाहीं. श्रौतधर्म म्हणजे परमार्थासाठीं होणाऱ्या प्रयत्नांचें सर्वस्व होतें असें दिसत नसून लोकांपासून वर्गणी काढून खेळ करणाऱ्या कांहीं व्यक्तींचें वाङ्मय होतें; आणि तेवढेंच वाङ्मय त्या व्यक्तींच्या परंपरेच्या अविच्छिन्नत्वामुळें सुरक्षित राहिलें; आणि समाजाच्या इतर हालचाली वाङ्मयरूपानें एक तर अवतरल्या नसाव्यात किंवा असल्यास त्यांचें वाङ्मय मेलें असावें किंवा त्यांपैकीं कांहीं श्रौती लोकांनींच आपल्या वाङ्मयांत समाविष्ट करून इतर वाङ्मय मरूं दिलें असावें असें दिसतें.

ऋग्वेदाचें पृथक्करण करतां त्यांत अनेक प्रकारचें केवळ लौकिक वाङ्मय दिसून येतें. इतिहासपुराणांचा उल्लेख वेदांत पुष्कळ ठिकाणीं आहे, अतिथिसत्कार व्यक्त करणारे आणि तपाचरणाचें महत्त्व दाखविणारे उल्लेख वारंवार दृष्टीस पडतात.

**अथर्ववेद्यांचा इतिहास.**—अथर्ववेदाचें अथर्व्यांच्या भिक्षुकीच्या दृष्टीनें पृथक्करण केलें असतां त्यांत खालील प्रकार दिसून येतात.

१ भुतें घालविणें आणि त्यासाठीं मंत्र म्हणणें.

२ अमानुष शक्ति, उदाहरणार्थ–अदृश्य होण्याची शक्ति आपल्या अंगीं स्थापित करण्याचा प्रयत्न करणें यासाठीं उपयोगांत आणावयाचे मंत्र.

३ राजाचे उपयोगी मंत्र; उदाहरणार्थ–त्याच्या अभि-षेकाचे मंत्र, त्याची सत्ता लोकमान्य व्हावी यासाठीं मंत्र, त्याला युद्धांत जय मिळावा म्हणून मंत्र, इत्यादि.

४ रोगनिवारणासाठीं मंत्र. विषविमोचक मंत्र.

५ नवीन वर्ष किंवा निराळा ऋतू, पौर्णिमा अमावास्या इ. वेळीं म्हणावयाचीं गाणीं.

६ प्रेम; प्रेमार्जनाची प्राप्ती व्हावी, प्रेमसर्धेत जय व्हावा, म्हणून उपयोगांत आणावयाचीं गाणीं.

७ देवतांस उद्देशून असलेलीं सूक्तें आणि यज्ञविषयक सूक्तें.

८ व्रात्यस्तोम; म्हणजे वाह्यांचा स्वीकार करण्यास उपयोगी पडणारीं सूक्तें.

९ तात्त्विक सूक्तें.

याशिवाय बेकार भिक्षुकाची ओरड (७।१०९); यासारखीं कांहीं लौकिक सूक्तेंहि दृष्टीस पडतात.

वरील वर्गीकरणावरून यज्ञास मदत करणें हा अथर्व्यांचा प्रयत्न फारच अल्प प्रमाणानें होता याची सिद्धता करील. कौशिक सूत्र आणि वैतान सूत्र हीं जरीं यज्ञकर्म करण्यासाठीं अथर्ववेदांतील सूक्तें लावण्याचा प्रयत्न करतांना दृष्टीस पडतात आणि त्या प्रयत्नानें उत्तरकालीन अथर्व्यांची यज्ञसमारंभाचे अवयव होण्याची आस्था व्यक्त होते तरी मंत्राच्या अर्थाकडे लक्ष सहज जात असल्यामुळें आणि मंत्रार्थ व विनियोग यांची असंगति फारच असल्यामुळें अथर्व्यांचा प्रयत्न त्रैविद्यांच्या कर्मास मदत करण्यासारखा नव्हता हें सिद्ध होण्यास अडचण पडणार नाहीं.

यज्ञांच्या विरुद्धहि प्रयत्न अथर्ववेदांत दिसून येतो. तो प्रयत्न म्हटला म्हणजे यज्ञफल अधिक सोप्या उपायांनीं मिळतें असें लोकांस दाखविणें. यजू जर काम्य फल प्राप्त करून घेण्यासाठीं ४।५ तास वेळ मोडावयास लावणारी इष्टि करावयास लावील तर अथर्वा पांच मिनिटांच्या मंत्रांतच आपला उपाय करून देईल. आणि यामुळें खर्चाच्या आणि वेळाच्या दृष्टीनें काम्यकर्मासाठीं लोकांचें लक्ष अथर्वाच ओढील. सर्व याग विशिष्टकामनामूलक असतात असें नाहीं. कांहीं केवळ पारलौकिक हितासाठीं असतात. केवळ पारलौकिक श्रेयासाठीं जो कर्म करणार त्यास पारलौकिक श्रेयासाठींच त्रेताग्नियागाविरहित दुसरें कोणतें तरी कर्म दाखवून दिलें पाहिजे आणि त्याची योग्यता बुद्धीसहि पटली पाहिजे. अथर्व्यांनीं यज्ञाच्या ऐवजीं यज्ञफलदायी कर्म जें शोधून काढलें, तें आतिथ्य हें होय.

नवव्या कांडांतील 'यो विद्याद्ब्रह्म प्रत्यक्षं०' हें आतिथ्याची प्रशंसा करणारें आणि आतिथ्य हाच एक यज्ञ होय असें दाखविणारें सूक्त त्रैविद्यांशीं करीत असलेल्या सर्धेंत त्रैविद्यांची उपयुक्तता कमी करण्यासाठीं अथर्व्यांनीं योजिलेला उपाय आतिथ्यमहत्त्ववर्धन हा होता असें दाखवितें.

ज्यास आज आपण गृह्यकर्म म्हणतों तें बरेंचसें व्यवस्थित आणि मंत्रयुक्त करण्याचें श्रेय अथर्व्यांस आहे. गृह्यसूत्रांत व्यक्त झालेलीं कर्में हीं श्रौत संस्थांपेक्षां अधिक जुनीं असावीं आणि तींच वाढवून वाढवून पुढें त्यांचे मोठे यज्ञ बनविले असावेत अशी कल्पना कै. महादेव मो. कुंटे यांनीं आपल्या ग्रंथांत व्यक्त केली आहे. ही कल्पना बरीचशी बरोबर आहे. फरक एवढाच कीं, गृह्यकर्मांचें तंत्र केवळ श्रौतकर्मांच्या पूर्वीचें असून त्याची मंत्रयुक्तस्थिति श्रौतकालोत्तर आहे. आश्वलायन सूत्रांतील पाकयज्ञ पाहिले तर ते त्रेताग्नीवरील कर्मांची लहान आवृत्ति दिसतात. कर्म लहान पण स्वयंसिद्ध असलें म्हणजे कर्मास भोंवतालचें अवडंबरहि लहानच असतें; आणि तें कर्मानुरूपच तयार झालेलें असतें. तथापि जेव्हां एखादें कर्म मोठ्या अगडबंब विधीची लहानशी आवृत्ति असते तेव्हां जुन्या परिस्थितीचा परिवार बराचसा कायम राहतो. चक्षुषी, स्विष्टकृत् यांसारखीं मंत्रांनां दिलेलीं पारिभाषिक नांवें कर्मांच्या ज्या स्वरूपांत दृष्टीस पडतात तें स्वरूप जुनें कसें म्हणावें ?

गृह्यकर्मांचें नातें श्रौताशीं जितकें आहे त्यापेक्षांहि तें अथर्ववेदाशीं अधिक आहे. वैश्वदेव, सर्पबलि, पंचमहायज्ञ, विवाहादिसंस्कार, कुमारीपरीक्षणासारखे विभाग, हे सर्व अथर्ववेदमूलक आहेत.

अथर्ववेदसंहिता ही जरी फारशी जुनी नाहीं तरी श्रौतसूत्रांपेक्षां ती बरीच जुनी असावी. कां कीं, बरेच अथर्ववेदांतील मंत्र श्रौतसूत्रांत घेतले असून अथर्ववेद्यांचें ब्रह्मत्वहि टाळण्याचा प्रयत्न श्रौतसूत्रास ब्रह्मत्वविवेचक पुरवण्या जोडून केला आहे.

**श्रौतकर्मसंकोचानंतरच्या भिक्षुकी चळवळी.**– श्रौतकर्म दिवसानुदिवस नष्ट होत चाललें तथापि लोकांचा जगांतील अमानुष शक्तींवर, मुहूर्तांवर, संस्कारांवर आणि वेदमंत्रांवर विश्वास नाहींसा झाला नव्हता. अथर्व्यांचें गृह्यकर्म पूर्वींपासून तसें चाललेंच होतें आणि यासाठीं त्यांचेंच कर्म करून श्रौतकर्मोपजीवी लोकांस भाकरी मिळवावयाची होती. यज्ञ लोकांस अप्रिय झाले, आतां बेकार झालेल्या त्रैविद्यांनां अनेक निरनिराळ्या धंद्यांत शिरलें पाहिजेच, या प्रकारच्या परिस्थितीमुळें ब्राह्मणकुळांत जन्म झाला असून श्रौतकर्मांत नसलेला असाहि वर्ग वाढणें स्वाभाविक होतें. द्रोणाचार्यासारखे ब्राह्मण असल्या प्रकारचे वर्ग असल्याचीच साक्ष देतात. श्रौतकर्मज्ञांपासून उत्पन्न झालेला हा सुशिक्षित वर्ग सामान्यतः इतर लोकांपेक्षां अधिक संपन्न असावयाचा आणि परंपरागत वैदिक वाङ्मयाच्या अभिरुचीमुळें वैदिक कर्मांचा अधिक आश्रयदाता बनावयाचा. या वर्गाच्या अस्तित्वामुळें इतर लोकांचें पौरोहित्य करून जें

द्रव्यसाधन करावयाचें त्याच्या ऐवजीं भिक्षुकी पेषा न घेतलेल्या ब्राह्मणांचेंच पौरोहित्य करून त्यांच्यावरच अवलंबून राहण्याची प्रवृत्ति उत्तरकालीन भिक्षुकांत सुरू झाली असावी आणि त्यामुळें भिक्षुकवर्गास इतर जातींची अधिकाधिक घाण येऊं लागण्यास प्रारंभ झाला असावा. त्याबरोबरच ज्यांचे पूर्वज विशिष्ट वेदांचें किंवा विशिष्ट शाखांचें अध्ययन करणारे असतील त्यांस दुसऱ्या शाखेच्या मनुष्याकडून किंवा दुसऱ्या शाखेनें सांगितलेलीं कर्में तुम्ही करूं नका अशा तऱ्हेचा उपदेश स्वशाखीयांस करण्याची बुद्धि झाली असें दिसतें. पारस्कर म्हणतोः—'बह्वल्पं वा स्वगृह्योक्तं यस्य यावत् प्रकीर्तितं । तस्य तावति शास्त्रार्थे कृते सर्वः कृतो भवेत्' अर्थात् त्रयीपैकीं प्रत्येक वेदास स्वतंत्रपणें अस्तित्वच नाहीं, आणि प्रत्येकाचें श्रौतकर्म दुसऱ्याच्या आश्रयानेंच झालें पाहिजे; आणि कोणासहि ऋग्वेदी किंवा यजुर्वेदी म्हणण्यास त्यांचें नवीन चोरलेलें गृह्य कारण नसून इतर वेदावर अवलंबून असणारें श्रौतच कारण आहे, या ठळक गोष्टींची आठवण भिक्षुकी वृत्तीमुळें विसरणें भिक्षुकांस हितावह वाटलें. एका श्रौतधर्माचे तिन्ही वेदांचे अभ्यासक हे निरनिराळे अवयव होते ती स्थिति नाहींशी होऊन हे अभ्यासक जेव्हां एकमेकांस अनवश्य समजणारे बनले, तेव्हां ब्राह्मण जातींत विद्यामूलक असलेला परस्पराश्रय जाऊन पोटजाती पडण्यास सुरवात झाली असावी. कालांतरानें गृह्यकर्ममूलक भेदहि विशिष्ट शिक्षणांच्या अभावानें नष्ट झाला, पण जातिभेद मात्र उरला. ही क्रिया कशी झाली याचें महाराष्ट्रापुरतें सविस्तर विवेचन केलेंच आहे.

लोकांचें भिन्नत्व रक्षिण्यावर भिक्षुकांची मिळकत जेव्हां अवलंबून रहाणार तेव्हां त्या लोकांस भिन्न राखण्यासाठीं भिक्षुक खटपट करणारच.

यज्ञांतर्गत कार्यांच्या भिन्नत्वामुळें उपस्थित झालेल्या समुच्चयभिन्नत्वाचा फायदा घेऊन यज्ञक्रियेस अनवश्य असें आचारभिन्नत्व आणि शिक्षणभिन्नत्व उपस्थित करण्यांत आलें. आचारभिन्नत्व स्थापन करण्याचा व तें रक्षिण्याचा जो प्रयत्न झाला, त्यांत आपणांस एक प्रकारची भिक्षुकी हुषारी दिसते. जगभर पसरलेल्या मनुष्यप्राण्याच्या समूहामध्यें आपणांस असें दिसून येईल कीं, कांहीं प्राणी विशिष्ट आचारामुळें, किंवा विशिष्ट दैवतामुळें किंवा विशिष्ट शासनसंस्थेमुळें एकमेकाशीं सदृश आणि इतरांपासून भिन्न झालेले असतात.

प्रत्यक्ष आचारविषयक विचारामुळें समाजांतील व्यक्तींमध्यें सादृश्य किंवा असादृश्य फारसें होत नसून पारमार्थिक विचारामुळें किंवा समाजांत जीं स्पर्धाविषयक ध्येयें पसरलेलीं असतात त्यांमुळें अनेक प्रकारचे निरनिराळ्या स्पर्धमान समूहांस लागू पडणारे आचारनियम उत्पन्न होतात, आणि



नियमांमुळें समाजांतील निरनिराळ्या लोकांमध्यें विविधता उत्पन्न होते. विशिष्ट आचार ज्या शासनसंस्थेमुळें उत्पन्न होतो ती संस्थाच कधीं कधीं लयास जाते आणि तिनें उत्पन्न केलेला आचार मात्र टिकतो व याप्रमाणें पूर्वीच्या शासनसंस्थेखालीं त्या शासनसंस्थेच्या जीवनार्थ असलेलें किंवा उत्पन्न केलेलें परंतु उत्तरकालीं कुचकामाचें व तापदायक होणारें आचारविशिष्टत्व जिवंत राहतें. ज्या संस्थेच्या जीवनार्थ जें आचारविशिष्टत्व असेल तें रक्षिण्यासाठीं त्या संस्थेच्या अनुयायी मंडळींत त्या विशिष्टत्वाबद्दल आदर, प्रेम व भीतियुक्त अवलंबन उत्पन्न करावें लागतें. लोकांस नियमाचा कार्याशीं असलेला अन्वय समजण्याची शक्ति नसल्यामुळें किंवा संस्थेच्या मंत्र्यांची स्वार्थबुद्धि लपविण्यासाठीं उपर्युक्त विशिष्ट नियमास केवळ धर्म म्हणूनच माना असा उपदेश होत असल्यामुळें संस्थेच्या किंवा चालकवर्गाच्या हितासाठीं उत्पन्न झालेल्या आचारासच सोंवळेपणा येऊं लागतो; आणि मग प्रयोजनापासून पृथक् झाल्यामुळें वेडगळ दिसणाऱ्या आचारांचें समर्थन करणें कठिण होत जातें. श्रद्धायुक्त समाजांस त्या आचारांचें प्रयोजन व मार्मिकता दुसऱ्यातिसऱ्या कारणांमुळें सिद्ध करून देणारे तत्त्ववेत्तेहि उत्पन्न होतात. हिंदुस्थानांत सध्यां शास्त्रीय बाबतींत अज्ञान असल्यामुळें आणि विशेषेंकरून 'इलेक्ट्रिसिटि'सारख्या वस्तूंच्या गुणधर्मांचेंहि अज्ञान असल्यामुळें जुन्या चालत आलेल्या पुष्कळ आचारांची उपयुक्तता इलेक्ट्रिसिटीच्या साहाय्यानें सिद्ध करून देणाऱ्या अत्यंत हुषार उपदेशकांचा उपदेश पुष्कळ महाराष्ट्रीयांनीं ऐकला असेल. असो. आचार प्रचारांत असून त्यांचें प्रयोजन गेलें आहे अशा जुन्या आचारांस नव्या सृष्टींत स्थान देणारें सूत्रें व ऋग्विधान यांसारखें वाङ्मय श्रौतकर्म संपल्यानंतरच्या काळांत सपाटून झालें असून त्या प्रकारच्या प्रयत्नांची परंपरा विसाव्या शतकापर्यंत चालू आहे. असो.

श्रौतकर्म प्रथमतः जरी बरेंचसें स्वेच्छ होतें तरी त्यास कालांतरानें नियमबद्धता प्राप्त झाली. गृह्यकर्म होतें तेंहि हळूहळू नियमबद्ध होऊं लागलें. गृह्यकर्म नवीन होतें आणि श्रौतकर्म जुनें होतें असें नव्हे. गृह्यकर्म श्रौताहूनहि जुनें असावें. श्रौताऐवजीं गृह्यासच त्याच्या सार्वत्रिकतेमुळें नियमबद्धता अधिक अवश्य आहे. पण ती त्यास एकदम आली नाहीं, तर श्रौतधर्मांच्या विकासानंतर आली असावी.

श्रौतकर्म हें समाजास अवश्य असें कर्म दिसत नाहीं. ज्याप्रमाणें मनुष्यास कमी आवश्यक मालास विकण्यासाठीं जाहिरात मोठी करावी लागते, त्याप्रमाणें जनतेस कमी आवश्यक असा जो श्रौतधर्म त्याच्या आचरणासाठीं किंवा प्रचारासाठीं श्रौतधर्मांच्या अभिमान्यांस अधिक विद्वत्ता खर्च करणें भाग झालें.

श्रौतकर्माच्या सान्निध्यानें सामाजांत गृह्यकर्म असलेंच पाहिजे यांत शंका नाहीं. कोणताहि समाज लग्नाशिवाय किंवा मार्तिकाशिवाय कसा राहील? हीं कर्में कशीं करावीं हें बोधण्याचें काम त्रयी मुळींच करीत नाहीं. त्रयी हें समाजास मधून मधून लागणाऱ्या पक्कान्नांचें पाकशास्त्र होय; आणि गृह्यसूत्रें किंवा अथर्ववेद हें रोजचें नेहमींचें जेवण करण्याचें पाकशास्त्र होय. ज्याप्रमाणें पक्कान्नें करणारा वर्ग नेहमींचें जेवण करणाऱ्या वर्गास हलका समजतो, त्याचप्रमाणें त्रैविद्य अथर्व्यांस हलके समजत यांत नवल नाहीं. ज्या गोष्टी करण्यास कौशल्य बरेंच लागतें, पदार्थ अनेक लागतात आणि ज्या करण्याचें काम नित्य पडत नाहीं त्या करण्यासाठींच मोजमाप व विधिनियम हीं प्रथम उद्भवतात. तथापि मोजमाप करण्याची आणि ती क्रिया नियमबद्धतेनें करण्याची संवय लागली म्हणजे नियमबद्धता सामान्य व्यवहारांतहि येऊं पहाते. या कारणामुळें नित्य गृह्यकर्मास नियमबद्धता येण्यापूर्वींच जाड्या यज्ञांस नियमबद्धता आली यांत नवल नाहीं.

गृह्यकर्मांमध्यें आचारभिन्नता जी शिरली तिच्या मुळाशीं केवळ आपल्या शाखेच्या लोकांची भिक्षुकी आपल्यामध्येंच रहावी हाच हेतु प्राधान्येंकरून होता असें सर्व आचारभिन्नतेसंबंधानें म्हणतां येणार नाहीं. कां कीं, मनुष्याच्या आचारास भिन्नत्व आणणाऱ्या ज्या गोष्टी आहेत त्यांत कुलोपदिष्ट आचारच केवळ नाहींत. जनपदधर्म, देशधर्म, ग्रामधर्म, यांचेंहि अस्तित्व फार जुन्या काळापासूनचें आहे आणि यांची मान्यता आचारधर्म सांगणाऱ्या ग्रंथकारांनीं केली आहे. लग्नाच्या वेळेस जनपदधर्म आणि ग्रामधर्म पाळावेत म्हणून आश्वलायन गृह्यसूत्र म्हणतें. पुष्कळदां असें दिसून येतें कीं, एका शाखेस न बोधिलेला आचार त्या शाखेच्या लोकांत प्रचारांत आहे तथापि तो आचार दुसऱ्या कोणत्या तरी स्मृतींनीं स्मरला आहे. उदाहरणार्थ कळसवणी म्हणजे लग्नांत वधूवरांनां न्हाऊं घालतांना चारी कोंपऱ्यांवर पूर्वी मांडून ठेवलेले जलपूरित कलश (घडे) शेवटीं वधूवरांच्या मस्तकावर ओतावयाचे ही चाल घ्या. ही चाल आपस्तंब व गोभिल यांच्या गृह्यसूत्रांत उल्लेखिलेली आहे, तथापि ही चाल या शाखांच्या लोकांखेरीज इतरांच्या घरीं देखील दृष्टीस पडते, येवढेंच नव्हे तर महाराष्ट्रांत ही चाल जवळजवळ सार्वत्रिक आहे व कोणत्याहि सूत्राचा परिग्रह करण्याचें ज्यांस प्रयोजन नाहीं अशा शूद्रांत देखील ती आहे. विशिष्ट शाखेनें कर्माचा उपदेश करावा आणि चाल मात्र सार्वत्रिक असावी याची संगति दोन तऱ्हांनीं लागते. एकतर स्थानिक चाल ग्रंथकारांनीं आपल्या स्वशाखीय प्रयोगग्रंथांत घेतली असावी किंवा एका विशिष्ट सूत्राचें अवलंबन करणाऱ्या संस्कर्त्यांचें म्हणजे भिक्षुकांचें प्रामुख्य विवक्षित ठिकाणीं झाल्यामुळें त्या चालीस तेथें सार्वत्रिकपणा आला असावा. स्थानाचा परिणाम ग्रंथांवर किती झाला आणि ग्रंथांचा परिणाम स्थानावर किती झाला हें ग्रंथांच्या वारंवार होणाऱ्या बृंहणामुळें आणि मनुष्याच्या चालीरीतींत वारंवार फरक होत असल्यामुळें सांगतां येत नाहीं. ग्रंथाचें बृंहित स्वरूप आणि चालीरीतींची हल्लींची स्थिति हींच आपणांस आज दिसतात. ग्रंथाबाहेरील चाली लोकांत शिरतात यासहि कारण आहे. सामान्य लोक केवळ शास्त्रच पहात नाहींत, तर शास्त्र आणि रूढि या दोहोंसहि यथाशक्ति महत्त्व देतात.

शास्त्रें आणि रूढि यांची वारंवार एकमेकांशीं विसंगतता दाखविण्यांत येते आणि यांच्यापैकीं अधिक बलवान् कोण, जनतेनें महत्त्व कशास द्यावें, याविषयींचे एकमेकांविरुद्ध विचार वारंवार दृष्टीस पडतात. "शास्त्राद्रूढिर्बलीयसी" हें सत्य आहे म्हणजे शास्त्र किंवा परंपरागत उपदेश बाजूला ठेवून लोक रूढ असलेलींच कर्में करितात आणि त्यामुळें रूढि बलवान् ठरते. बलवान् ठरते म्हणजे बलवान् असली पाहिजे व रूढीकडेच लक्ष द्यावें असें मात्र नाहीं. रूढीकडेच जर लक्ष द्यावयाचें तर ग्रंथ कशाला? वेदोक्तता कशाला? वेदांपासून तों आजकालच्या पुस्तकांपर्यंत सर्व तत्त्ववेत्त्यांचे ग्रंथ जाळून टाकण्यास हरकत नाहीं, कारण रूढीच तेवढी पाळावयाची. धर्म, नीति इत्यादि तत्त्वज्ञानें, अर्थशास्त्रें व कर्मांच्या परिणामांवरून योग्यायोग्यता दाखविणारे इतिहास यांचाहि उपयोग नाहीं. मनुष्याच्या बुद्धीला शिरकूं द्यावयासहि सवड ठेवावयाची नाहीं असें रूढीसच आचारनिर्णायकता द्यावयाची असें ठरविल्यास करावें लागेल, कां कीं, बुद्धीचा उपयोग झाला कीं कालांतरानें शास्त्राचा जन्म झालाच. अर्थात् केवळ रूढीचें अवलंबन भयंकर आहे. रूढि पाळावयाची म्हणजे चांगली कोणती व वाईट कोणती याचाहि विचार नको. जंगली लोकांनीं माणसें बळी देण्याचें काम अव्याहत चालवावें आणि रजपुतांनीं मुलींच्या हत्या होत्या तशाच चालू ठेवल्या पाहिजेत. अमुक चाली ठेवाव्या आणि अमुक बंद कराव्या असेंहि म्हणतां येणार नाहीं. कां कीं, तसें केलें म्हणजे शास्त्र उत्पन्न होऊं लागतें. यासाठीं रूढींचें अवलंबन करा हा उपदेश मनुष्यांस व्यवहारोपयोगी नाहीं. उलटपक्षीं रूढींची आणि त्यांच्या अवलंबनाची आवश्यकता आहेच. कां कीं, मनुष्याच्या इतिहासांत रूढी अधिक प्राचीन होत आणि वाङ्मय उत्तरकालीन होय. अडचण आली म्हणजे मनुष्य तोड काढतो. कार्य करावयाचें झालें म्हणजे त्याची पद्धति बसवितो. म्हणजे रूढी प्रथम उत्पन्न होतात आणि धर्मवाङ्मय नंतर उत्पन्न होतें. प्रत्येक विषयावर धर्मविषयक वाङ्मय, कायद्यासंबंधाचें वाङ्मय, किंवा नीतिविषयक वाङ्मय असतेंच असें नाहीं. पण लोकरीति मात्र अनेक गोष्टींसंबंधानें निश्चित असते. जेव्हां लोकरीति ही धर्मशास्त्रपंडितांच्या, न्यायाधीशांच्या किंवा नीतिवेत्त्यांच्या अवलोकनाचा विषय होते तेव्हां लोकरीतीस धर्मनियमाचें,

कायद्याचें किंवा नीतिनियमाचें स्वरूप येतें. व्यवहारामध्यें पुष्कळदां ग्रांथिक वचनापेक्षां लोकरीतीच अधिक उपयोगीं पडते. ग्रांथिक नियम व्यवहारास अपूर्ण आहेत एवढेंच नव्हे तर तेहि लोकरीतीचें अनुकरण करणारे आहेत. ते अधिक जुन्या काळीं परिचित असलेल्या लोकरीतीवरूनच निघालेले असतात. लोकरीती प्रसंगाच्या वैविध्यामुळें अधिक विविध असते. जेव्हां आचारनियम कोर्टांत झालेल्या निवाड्यांवरून निघूं लागले तेव्हां लोकरीतीस कायद्याचें स्वरूप येऊं लागलें. जेव्हां धर्मशास्त्रकार लौकिक विधिसंस्कार चालू असतां निरनिराळ्या लोकविधींशीं परिचित झाले तेव्हां त्यांपैकीं कांहींस मान्यता देऊं लागले. लौकिकविधीस ग्रांथिक वाक्यांनीं मान्यता देण्याचा काल म्हणजे गृह्यसूत्रांचा काल होय. या काळांत त्रैविद्यांनीं श्रौतसूत्रें व गृह्यसूत्रें तयार करून अथर्ववेद्यांचा पूर्णपणें पाडाव केला. ग्रंथरचना करतांना प्राचीन धर्माचा म्हणजे विधिनिषेधांचा त्रैविद्यांनीं हिशोब घेऊन जें ठेवावेंसें वाटलें तें ठेवलें आणि बाकीच्या जुन्या धर्मास म्हणजे रीतींस रजा दिली. या काळामध्यें जे ग्रंथ झाले त्यांचें अवलोकन करितां ब्राह्मणांच्या सच्छील वर्तनाबद्दल व अज्ञानाचा घात व्हावा या व्यक्त होणाऱ्या इच्छेबद्दल आणि दयालुत्वाबद्दल तारीफ केल्यावांचून राहवत नाहीं. भिक्षुकी चालावी ह्या इच्छेखालीं देखील वरील तीन गुण दडपले गेले नाहींत. लोकांच्या चाली जंगली असतील तशाच ठेवणें, लोकांच्या अज्ञानाचा फायदा घेऊन जादूटोणा करणें, इत्यादि गोष्टी अथर्वमूलक असतां हीं गृह्यसूत्रें बनण्याच्या वेळेस ब्राह्मणांनीं त्या आंत शिरकूं दिल्या नाहींत. अथर्वांत सतीचे, जारणमारणाचे, बायका फसविण्याचे, मंत्र आहेत पण त्यांस गृह्यसूत्रांत स्थान मिळालें नाहीं. उलटपक्षीं पुष्कळ लौकिक विधी गृह्यसूत्रांत समाविष्ट केले आहेत. सोळा संस्कारांतील गर्भाधान, पुंसवन व सीमंतोन्नयन, हे संस्कार जरी जादूटोण्यासारखे म्हणजे समाजास अनवश्यक दिसतात तरी ते निरुपद्रवी आहेत आणि त्या कालीं लोकांस उत्सवाचे प्रसंग घरांत अधिकाधिक हवे असल्यास त्यांस संधि देणारे आहेत.

सूत्रकालीन परिस्थितीचें स्वरूप व्यक्त करण्यासाठीं आश्वलायन गृह्यसूत्रावर कांहीं तुटक विचार येथें देतों. आश्वलायन गृह्यसूत्रामध्यें जो मजकूर आला आहे त्याचें पृथक्करण करतां आपणांस खालील घटक आढळून येतात.

( १ ) पाकसंस्था.
( २ ) संस्कार.
( ३ ) व्यावहारिक ज्ञान व उपदेश.
( ४ ) काम्येष्टींचे संक्षेप.
( ५ ) बलि.
( ६ ) ब्राह्मणभोजन, आतिथ्य इत्यादि.

पौराणिक धर्माची छटा आश्वलायन गृह्यसूत्रांतील खालील उपदेशांत पुष्कळच दिसून येते.

( १ ) जनपदधर्म आणि ग्रामधर्म यांचें विवाहांत अवलंबन करावें. १·७·१.

( २ ) ऋग्वेदाचें अध्ययन केलें असतां दुधाच्या नद्या, यजुर्वेदाचें अध्ययन केलें असतां तुपाच्या नद्या, सामाचें अध्ययन केलें असतां सोमरसाच्या नद्या व ब्राह्मणें, सूत्रें, गाथा, नाराशंसी, इतिहास-पुराणें यांचें अध्ययन केलें असतां अमृताच्या नद्या अध्ययनकर्त्यांच्या पितरांस प्राप्त होतात. ( ३·३·३. )

या विधानांत स्वर्गाची मधुभौतिक कल्पना आणि इतिहास-पुराणांच्या अभ्यासास वेदाध्ययनापेक्षां दिलेलें महत्त्व या गोष्टी लक्षांत ठेवण्याजोग्या आहेत.

जनपदधर्म आणि ग्रामधर्म यांचें अवलंबन म्हणजे कांहीं स्थानिक दैवतें किंवा थोर पुरुष यांचे उत्सव किंवा पूजन असावें. स्थानिक दैवतें आलीं याचा अर्थ मूर्तिपूजा आली. तथापि जनपदधर्म आणि ग्रामधर्म यांचा अर्थ गांवांतील चाली व रिवाज असाहि होईल आणि यासाठीं जागेस चिकटलेलीं दैवतें होतीं असें विधान करण्यास आणखी पुरावा आणला पाहिजे.

प्रस्तुत सूत्रांत "चैत्ययज्ञ" या विषयावर तीन सूत्रें ( १·१२ ) लिहिलीं आहेत. तीं स्थानिक दैवतांचीं उत्पत्ति दाखवितात.

यज्ञार्थ पशुहननाविषयींची जुगुप्सा केवळ स्मार्तधर्मांतच आहे असें नाहीं. श्रौतधर्मांतहि पशुहत्येपासून निवृत्ति व्हावी असा भाव दृष्टीस पडतो. उदाहरणार्थ, दर्श-पूर्णमास ही इष्टीची प्रकृति म्हणजे नमुना आहे. ऐंद्राग्न ही पशुयागाची प्रकृति आहे. इष्टींमध्यें पशुहनन नाहीं. तसेंच अग्न्याधानांत देखील पशुयज्ञ नाहीं. तथापि या दोहोंतहि पशुहोमाचे अवशेष शिल्लक राहिले आहेत. अग्न्याधानांतील पुरोडाश हा गाईच्या आकाराचा बनवावयाचा असतो आणि त्यावेळेस म्हणावयाचे जे मंत्र आहेत ते देखील गोविषयकच आहेत. दर्शपूर्णमासामध्यें पुरोडाश कूर्माकृति करावा लागतो. तथापि पुरोडाश कूर्माकृति करण्याचें कारण असें आहे कीं, तो अभंग राहिला पाहिजे. जेव्हां प्रतिकृति उपयोगांत आली नसून मूळची कल्पना वहिवाटींत असेल त्या वेळेस कूर्माचा याग न होतां दुसरा एक मोठा पशु हुत होत असावा याचीं सूचकें त्या विधींत आहेत. प्रतिकृति ज्याची होते तो प्राणी प्रथम हुत होत असावा आणि प्राण्याऐवजीं पुढें त्याची पिष्टमय प्रतिकृति येत असावी, हा साधारणपणें नियम समजावा. तथापि या नियमास देखील कांहीं अपवाद आहेत. अग्निष्टोम यागांतील

प्रवर्ग्यांत मडक्यांच्या उतरंडीच्या आकाराचा 'महावीर' असतो. हा पुढें छिन्नभिन्न करावा आणि नंतर सोमपान करावें असा इतिकर्तव्यतांचा गोषवारा आहे. महावीर यजमानाचेंच रूपक होय. अर्थात् प्रत्यक्ष यजमानाचाच होम अशक्य आहे म्हणून होमांत ज्याची प्रतिकृति होते तो मूळचें होमद्रव्य होय या नियमास कांहीं मर्यादा उत्पन्न होते.

पशुहनन आणि यज्ञ यांचा निकट संबंध आहे असें नाहीं. ज्या वेळेस पशुयाग प्रचारांत होता त्या वेळेस इष्टी पशुहोमाशिवाय होत असत. शिवाय पशुहनन केवळ यज्ञांगानेंच होत असे असेंहि नाहीं. जें लोकांचें भक्ष्य तेंच देवास द्यावयाचें किंवा अग्नीस समर्पण करावयाचें. पशुहनन यज्ञाखेरीज इतर प्रसंगींहि होत असे याचीं उदाहरणें गृह्यसूत्रांत आहेत.

मधुपर्क मांसाखेरीज होत नाहीं हें तत्त्व आश्वलायन गृह्यसूत्रांत व त्याप्रमाणेंच कांहीं धर्मसूत्रांतहि व्यक्त केलें गेलें आहे. त्या प्रसंगीं असें सांगितलें आहे कीं, मधुपर्कासाठीं गाईचा मेध करावा आणि गाईचा मेध जर करावयाचा नसेल तर गाय सोडून द्यावी आणि दुसरें कसलें तरी मांस ऋत्विजांस अगर स्नातकास मधुपर्कप्रसंगीं द्यावें. गोमेधासंबंधानें प्रश्न शतपथब्राह्मणकालीं देखील निघाला आणि तेथें याज्ञवल्क्यानें तें चांगलें लागतें म्हणून मी खातों असें उत्तर देऊन आपला दांडपणा व्यक्त केला आहे.

गोमेध ज्याप्रमाणें मधुपर्कप्रसंगीं (आ० सू० अ० १ खं० २४) कर्तव्य केलें आहे त्याप्रमाणें अग्निहोत्र्याच्या और्ध्वदेहिकाच्या प्रसंगींहि तें कर्तव्य केलें आहे. (आ० सू० अ० ४ खं० २.) अनुस्तरणी करावी म्हणून विधि आहे. अनुस्तरणी म्हणजे ज्या स्त्रीपशूनें प्रेताचें आच्छादन करितात तो पशु. अनुस्तरणी करावयाचा विधि म्हणजे गाईस किंवा शेळीस विदारण करून तिचे अवयव प्रेताच्या अवयवांवर ठेवणें. गाय किंवा शेळी यांची अनुस्तरणी करणें वैकल्पिक आहे म्हणून पुढील वृत्तिकार अर्थ काढीत आहेत. मृताच्या पत्नीस प्रेताजवळ नेऊन निजवावयाचें आणि मग दिरानें किंवा दासानें तिला उठवावयाचें हा विधि झाल्यानंतर अनुस्तरणी करण्याचा विधि आहे. यावरून अनुस्तरणी देखील स्त्रीच्या प्रतिनिधिरूप असावी असा संशय उत्पन्न होतो.

श्रौतधर्म आणि स्मार्तधर्म यांमध्यें जे अनेक फरक आढळून येतात त्यांचें साकल्यानें पण संक्षिप्त वर्णन करावयाचें झाल्यास थोडक्यांत असें सांगतां येईल कीं, यज्ञजुगुप्सा उत्पन्न होऊन यज्ञसंकोच झाला व यज्ञेतर कर्मांनां मान्यता प्राप्त होऊन भक्तितत्त्वाचा व मूर्त दैवतांचा उदय झाला आणि परंपरेच्या प्रचारांनीं पवित्र झालेला शब्द जो यज्ञ तो इतर प्रकारच्या परमार्थोद्यमांस लागला.

पशुयज्ञांविषयींची जुगुप्सा सामान्यजनांत पुष्कळच उत्पन्न झाली होती. वेदानुयायी व यज्ञकर्माचा पुरस्कार करणाऱ्यांसहि थोडीबहुत जुगुप्सा उत्पन्न झाली होती याला अनेक प्रमाणें आहेत. जेव्हां धर्माचरण चोरून करावें लागतें तेव्हां असें समजावें कीं, तेथें धर्म जनतेस अप्रिय आहेत. शूलगवाचा म्हणजे बैल मारण्याचा जो विधि आश्वलायन सूत्रांत (४.९) सांगितला आहे त्यांत तो "असंदर्शने ग्रामात्" म्हणजे जेथून गांव दिसत नाहीं किंवा गांवांतील लोकांनां आपण दिसत नाहीं अशा स्थळीं जाऊन करण्यास सांगितला आहे.

पितृमूलक धर्मांचा पुरस्कार करणारांमध्येंच पशुहननासंबंधानें आणि विशेषेंकरून गाईचा वध करावा आणि तिचे मांस खावें या कर्तव्यासंबंधानें प्रतिकूल मत उत्पन्न होऊं लागलें होतें असें यावरून दिसतें.

आश्वलायन गृह्यसूत्रांत गोमांसाच्या मधुपर्काचा, अनुस्तरणी म्हणून गाईचें विदारण करण्याचा किंवा शूलगवाचा केलेला उपदेश हें गृह्यसूत्र ज्या कालांत लिहिलें गेलें त्या कालापेक्षां बराच जुना असावा असें दिसतें. प्रस्तुत सूत्राच्याच कालांतील गोवधाविषयींचे उल्लेख त्याकाळीं गोवधाविषयीं प्रतिकूल मत होत असावें असें दाखवितात. लोकमताची प्रतिकूलता शूलगव गांवाबाहेर करावा या आदेशावरून स्पष्ट होत आहे, आणि पुत्रादिकांस बरोबर घेण्यासंबंधाचा निषेध या सूत्रकारानेंच केलेला आहे. शिवाय गोमांसाहारासंबंधानें प्रतिकूल मत उद्भवूं लागलें होतें असें दिसतें. शूलगवांत बैलाचा वध जरी केला तरी त्याचा हुतशेष खावा (४.९.३५) या मताबरोबरच खाऊं नये (४.९.३२) असेंहि विधान केलें आहे. त्याप्रमाणेंच स्नातकास अगर ऋत्विजांस करावयाच्या मधुपर्कासंबंधानें जें गोहनन करावें लागे त्याऐवजीं गाईचा उत्सर्ग करून दुसरें कसलें तरी मांस भोजनास द्यावें अशी देखील अनुज्ञा दिली आहे (२.२४.२५). तसेंच अनुस्तरणी म्हणून गाय मारण्याऐवजीं अजा मारावी (४.२.६) किंवा अनुस्तरणी करण्यामध्यें देखील विकल्प आहे (४.३.२३) अशी कल्पना मांडली आहे.

प्रतिमापूजनाचा आरंभ या गृह्यसूत्रांत थोडाबहुत दिसतो. पहिल्या सूत्रांत चैत्याला बलि द्यावयाचा तो स्विष्टकृत् नांवाच्या आहुती देण्यापूर्वी द्यावा असें सांगितलें आहे. दुसऱ्या व तिसऱ्या सूत्रांत जर चैत्य विदेशीं असेल तर तो बलि कसा पाठवावा हें सांगितलें आहे. दूतानें पळसाची कावड घ्यावी, यत्र वेत्थ० (३.८.२१) ही ऋचा म्हणावी व दोन बली करून त्या कावडींत ठेवून दूतास ती कावड द्यावी आणि सांगावें कीं, हा बलि त्याला (चैत्याला) दे आणि हा बलि तूं घे. या दूताला मार्गांत भय होईल असें वाटलें तर एखादें लहान हत्यार त्या दूताजवळ द्यावें आणि मध्यंतरीं मोठी नदी वगैरे असेल तर एखादें लहानसें तरून जाण्याचें साधन (भोंपळा वगैरे) 'अनेन तरितव्यम्' असें म्हणून त्या दूताजवळ द्यावें.

आश्वलायन सूत्राच्या कालीं यज्ञ कमी होत चालले होते यास प्रमाणेंः—

( १ ) यज्ञ हा शब्द अधिक व्यापक केला म्हणजे वेदाध्ययन आणि अतिथिसत्कार यांसहि यज्ञ या सदरांत घेतलें.

( २ ) अनेक पाकसंस्था सूत्रकारांनीं उपदेशिल्या आहेत त्या श्रौतसंस्थांचा संक्षेप आहेत. उदाहरणार्थ, पार्वण स्थालीपाक घ्या. हा दर्शपूर्णमासाचा संक्षेप आहे. तो दर्शपूर्णमासाप्रमाणेंच पौर्णिमा व अमावास्या या दोन पर्वकालीं करावयाचा आहे. याला आदल्या दिवशीं त्या श्रौत इष्टीप्रमाणेंच उपवास आहे. यांत दर्शपूर्णमासाप्रमाणेंच इध्म व बर्हि यांचें संहनन आहे. निर्वाप, प्रोक्षण, कंडण, श्रपण, होम, आघार, चक्षुषी, स्विष्टकृत् इत्यादि क्रिया यांत आल्या आहेत, आणि दर्शपूर्णमासाचा अतिदेश ज्याप्रमाणें इतर इष्टींत आहे त्याचप्रमाणें इतर पाकयज्ञांत स्थालीपाकतंत्राचा अतिदेश आहे.

( ३ ) बलिदान व ब्राह्मणभोजन यांसहि पाकयज्ञ म्हटलें आहे.

( ४ ) शिवाय भक्तीचें महत्त्व वाढविलें आहे, आणि प्रयोगाच्या ठाकठिकीचें महत्त्व कमी केलें आहे. कोणी श्रद्धाबुद्धीनें जर एक समिधा किंवा एक आहुति अर्पण केली किंवा वेदाध्ययन केलें तर यज्ञाचें फल मिळतें हाहि उपदेश केला आहे. ( १·२·५ )

(५) सोमयागास तर अजीवात फांटा दिला आहे. तथापि सोमयागाच्या अभावामुळें सामगायनाचा जो अभाव उत्पन्न झाला तो टाळण्यासाठीं सीमन्तोन्नयनासारख्या स्त्रीसंस्काराच्या प्रसंगीं वीणा वाजविणारे व गाथा म्हणणारे आणले आहेत.

श्रौतधर्मांचा इतिहास तयार करावयाचा झाल्यास आपणांस साहित्य अनेक प्रकारचें सांपडतें, आणि त्यांतून निरनिराळ्या काळांचा इतिहास सांपडतो. भारतीय आणि इराणी या दोन संस्कृतींचा तौलनिक अभ्यास करतां येईल. हा अभ्यास अत्यंत प्राचीन काळचा यज्ञधर्म आपणांस बोधील. तसेंच ब्राह्मणवाङ्मयाचे व सूत्रवाङ्मयापर्यंतचे धागे जोडतां येतील. हे जोडतांना जी तुलना करावी लागेल ती यज्ञधर्माची अत्यंत जोरानें वाढ चालू असतां काय फरक होत गेले हें कळवील. सूत्रोक्त श्रौतधर्म अंतिम वाढीचें पण अत्यंत नियमबद्ध स्वरूप दाखवितो. ब्राह्मणें पूर्ण विकास झालेलें पण यज्ञयोजकांचें स्वातंत्र्य बरेंच कायम आहे अशा स्थितींतलें यज्ञस्वरूप दाखवितात.

संहितांचा मंत्रभाग तपासून त्यांत येणाऱ्या उल्लेखांवरून, ब्राह्मणांतील विधिवाक्यांनीं जी यज्ञसंस्था दर्शविली जाते तिच्या पाठीमागें देखील जातां येईल. पर्शूंच्या यज्ञसंस्थेशीं ब्राह्मणदृष्ट यज्ञसंस्थेचा संबंध जोडतांना, मंत्रदृष्ट श्रौतधर्म ही अत्यंत महत्त्वाची पायरी होय.

यज्ञसंस्थेचा तौलनिक अभ्यास करावयाचा झाल्यास त्या अभ्यासाचीं अंगें अनेक आहेत.

(१) पर्शूंचा आणि भारतीयांचा धर्म.
(२) मंत्रदृष्ट श्रौतधर्म आणि ब्राह्मणदृष्ट श्रौतधर्म.
(३) भिन्नशाखादृष्ट धर्म.
(४) वेददृष्ट आणि सूत्रदृष्ट धर्म.
(५) भिन्नसूत्रदृष्ट धर्म.

यांची तुलना जितकी अधिक होत जाईल तितका प्राचीन सामाजिक इतिहास खुला होत जाईल. या इतिहासाचा पूर्ण उलगडा होण्यासाठीं अनेक ग्रंथांची तुलना केली पाहिजे. हें करण्यास संशोधकास अनेक वर्षें लागतील किंवा सबंध आयुष्य खर्च करावें लागेल. या महत्त्वाच्या कामापैकीं कांहीं काम आणि त्याचें फल मात्र येथें दिलें आहे. ग्रंथांची तुलना करून काय निघतें याचीं कोष्टकें पुढें येतील.

यज्ञसंस्थेंत दोन निरनिराळ्या गोष्टी समाविष्ट झालेल्या दिसतात. लोकविनोदार्थ होणारे उत्सव व खेळ आणि पारमार्थिक बुद्धीनें केलेलें हवन. खेळांस आणि उत्सवांस धार्मिक स्वरूप दिलें गेलें अथवा उपासनेस खेळ चिकटविले हें नेहमींच सांगतां येण्याजोगें नसतें. ऋग्वेदमंत्रांच्या रचनेच्या कालीं अश्वमेधासारखे मोठे उत्सव असतील, पण ते यज्ञच होते असें म्हणतां येत नाहीं. त्या कालीं इष्टि असेल, काम्यपशु असेल किंवा कसाबसा सोमयाग देखील असेल. पण कांहीं तरी मंत्र म्हणून आहुति देणें यापलीकडे त्याचें स्वरूप नसावें.

यज्ञसंस्थेचे कालभाग पाडतांना पहिला काल म्हटला म्हणजे अमंत्रक हवनें करणाऱ्या अथर्व्यांचा काल होय.

अमंत्रक अथर्व्यांच्या कालापासून सुरवात करून ज्या कालामध्यें कर्मांच्या भेदामुळें ब्राह्मणांचे प्रथम होता, अध्वर्यु, सामक इत्यादि भेद पडले आणि नंतर त्यांच्यामध्येंहि आणखी पक्ष पडून निरनिराळीं आध्वर्यवें उत्पन्न झालीं, त्यांची शेवटीं संगति लावली जाऊन श्रौतसूत्रोक्त श्रौतधर्म तयार झाला त्या सर्व कालाचा इतिहास हा यज्ञसंस्थेचा इतिहास होय.

अमंत्रक अथर्व्यांच्या कालानंतर श्रौतधर्मांच्या उपबृंहणाच्या दिशेनें पहिली क्रिया झालेली दिसते ती ही कीं, हवन हें एकट्यानें न करतां २०।२५ जणांचे आवाज एकत्र मिळवून करावें.

समुच्चयांनीं एकत्र जमून जे यज्ञ करावयाचे त्यांत देखील क्रियाविभागणी फारशी नसून सगळ्यांनीं एकत्र जमून कांहीं तरी मंत्र गावेत व आहुती टाकाव्यात असा, म्हणजे आज ज्याप्रमाणें मंत्रपुष्प म्हणून देवावर फुलें टाकतात त्याप्रमाणें, प्रकार होता असें दिसतें.

या प्रकारांत प्रथम जो फरक झाला असेल तो गाण्याच्या चालीवरून किंवा वृत्तावरून झाला असावा. 'गायंति त्वा गायत्रिणः' हें सूक्त या विधानास पुष्टि देईल.

यज्ञप्रयोग वैयक्तिक कमी करून ते सांघिक करावेत ही प्रवृत्ति मंत्रद्रष्ट्या ऋषींच्या कालांतच तयार झाली होती.

सांघिक श्रौतकर्म आणि मनोरंजक खेळ अगर उत्सव हीं एकत्र जोडण्याचा प्रयत्न अमंत्रक अथर्वकाल आणि श्रौत धर्माच्या ठाकठिकीचा अध्वर्युकाल यांच्या मध्यंतरींच्या काळांत झाला असावा.

या मधल्या काळांत एक महत्त्वाचा उपकाल येतो तो काल म्हटला म्हणजे ब्रह्माध्वर्युभेदकाल होय.

गायत्री, अर्की, होते, ब्रह्मे इत्यादि लोकांच्या स्पर्धेमध्यें होते आणि ब्रह्मे टिकले व अर्की, गायत्री हे लयास गेले असें दिसतें.

होता याचा अर्थ हवन करणारा असाच असावा. अध्वर्यु हवन करीत असतां "होता" हा शब्द अध्वर्यूस कां लावतात अशी पृच्छा प्राचीन काळीं देखील केली आहे आणि होता याचा अर्थ आह्वान करणारा असा शास्त्रार्थ सांगून ही शंका मिटविण्यांत आली आहे. 'होता' या नांवानें स्पष्ट होणारें कर्म म्हणजे जें अध्वर्यु करतो तेंच कर्म होय. यावरून अध्वर्यु हा होत्यांतलाच कमी विद्वान् पण लटपट्या व दांडगा वर्ग असावा असें दिसतें. अध्वर्यु या शब्दावरून कोणत्याहि यज्ञकर्माचा बोध होत नसल्यामुळें तो होत्यांतून निघाला नसल्यास दुसऱ्या कोणांतून तरी निघाला असावा.

ब्रह्म्याचे सहायक स्वतंत्र आहेत. त्या सहायकांत हौत्र आणि आध्वर्यव करणारेहि आहेत. यावरून असें दिसतें कीं, भिक्षुकीची जोपासना करण्याच्या संस्थेमध्यें दोन परस्परांशीं स्पर्धा करणारे बलवान् समुच्चय होते. एक अध्वर्युप्रमुख व दुसरा ब्रह्मप्रमुख.

ब्रह्म्यांच्या यज्ञसंस्थेमध्यें औद्गात्र फारसें नसावें आणि हा औद्गात्राचा अभाव त्यांची यज्ञसंस्था दुर्बल करण्यास कारणीभूत झाला असावा.

ब्रह्म्यांची यज्ञसंस्था बरीचशी राजाश्रयानें चालत असावी आणि अध्वर्यूंची लोकाश्रयानें चालत असावी.

ब्रह्मकर्म आणि आध्वर्यव यांत वस्तुतः फारसा भेद नाहीं. दोघेहि व्यवस्थापकच. एकीकडचा व्यवस्थापक जो ब्रह्मा तो जास्त सुखावलेला आणि म्हणून त्यास आग्नीध्रासारखा पटाईत हस्तक लागे.

अध्वर्यूस ब्रह्म्यांशीं तडजोड करण्याचें कारण ब्रह्म्यांचें राजपौरोहित्य असावें.

ब्रह्म्यांस अध्वर्यूंशीं सलोखा करण्याचें कारण लोकाश्रयावर राहणाऱ्या अध्वर्यूंनीं बृंहण केलेल्या यज्ञसंस्थेंत आणलेला लोकाकर्षक भाग असावा.

असा एक काल आला असावा कीं, ज्या वेळेस लोकांस श्रौतधर्माविषयीं औदासीन्य उत्पन्न झालें होतें आणि श्रौतधर्म टिकला म्हणजे श्रौत्यांची भिक्षुकी चालली तर ती केवळ राजाश्रयानेंच चालणें शक्य होतें, सनीहारार्जित द्रव्यावर चालणें शक्य नव्हतें. अर्थात् हा काल म्हटला म्हणजे यजुरथर्वैक्यकाल होय. हाच काल संहितीकरणाचा होय.

संहितीकरणामध्यें दोन किंवा तीन क्रिया झालेल्या आहेत. मंत्रब्राह्मणवाक्यांचे संचय करणें ही एक क्रिया होय. प्रयोग करणाऱ्या ऋत्विजांस उपयोगीं पडणारें वाङ्मय निराळें करावयाचें या दृष्टीनें पृथक्करण करणें ही दुसरी क्रिया होय. तिसरी क्रिया म्हणजे एकस्वरूपी वाङ्मयाचें उपबृंहण आणि व्यवस्थीकरण ही होय. आध्वर्यवाच्या संहिता अनेक आहेत आणि अथर्ववेदाची संहिता आणि कृष्णयजुर्वेद हीं परस्परापेक्षी आहेत. यांवरून हें उघड आहे कीं, अंतिम संहितीकरणाच्या पूर्वीं शुक्लकृष्णांचें भांडण झालें होतें, आणि अथर्व्यांशीं यजूंचा समेट झाला होता. हा समेट होतेवेळेस प्रथमतः तो शुक्लयजू व अथर्वें यांच्यामध्यें झाला असावा आणि होत्यांमधील कांहीं अप्रमुख समुदाय त्यांस मिळाला असावा; आणि पुढें कालांतरानें म्हणजे एखादी पिढी उलटल्यानंतर कृष्णयजुर्वेदी व अथर्वें यांचेंहि सख्य जुळलें असावें. शुक्लांचा आणि अथर्व्यांचा परस्परस्नेह प्रथम जुळला असावा हें शुक्लयजूंच्या पारस्कराचा उल्लेख कौशिक आणि वैतान या सूत्रांनीं केला आहे त्यावरून दिसून येतें.

श्रौतकर्माची वृद्धि झाली तिच्या पायऱ्या येणेंप्रमाणें असाव्यात. सत्रें, अश्वमेधादि यज्ञ, आणि दैनिक अग्निहोत्र हीं नित्य आणि नैमित्तिक कर्में अत्यंत प्राचीन असावींत. सोमाचा उपयोग दैनिक कृत्यांत होत असून सोमयाग हा नवीन शिरला असावा, आणि बृहत्सोमयाग अध्वर्यूंनीं योजिल्यानंतर हौत्रक अधिक शिस्तवार झालें असावें व ऋग्वेदघटना व्हावयास लागली असावी. इष्टी आणि पशु हीं केवळ अग्निहोत्रासारखींच अत्यंत सामान्य कर्में असावींत. त्यांचें बृंहण अध्वर्यूंनींच केलें असावें आणि अध्वर्यू जर होत्यांतूनच निघाले असले तर त्यांच्या हौत्राच्या ज्ञानाची पुंजी इष्टी व पशु यांमध्येंच खर्च झाली असावी. सोमयाग ही जी कृति अध्वर्यूंनीं नवी आणली तींत सामगायन त्यांनीं लोकप्रियता मिळविण्यासाठीं आणलें. सोमयाग हीच अध्वर्यूंची विशिष्ट कृति असल्यामुळें याची अनावश्यकता सिद्ध करण्याची ब्रह्म्यांस इच्छा उत्पन्न होऊन 'यो विद्यात् ब्रह्म प्रत्यक्षं' हें आतिथ्यधर्म आचरला असतां सोमयागाचें श्रेय

येतें असें सांगणारें सूक्त निर्माण करण्याची त्यांस स्फूर्ति झाली असावी. सोमयागांत इष्टी आणि पशू घुसडून देण्याचें कारण हें कीं, अध्वर्यूंच्या विद्येशिवाय सोमयाग होऊं नये. अग्न्याधान तर बोलून चालून नवेंच. म्हातारपणीं पेनशन घेतल्यानंतर धर्मकार्य करण्याची जेव्हां कोणाला स्फूर्ति होईल तेव्हां त्यास वाजतगाजत अग्निहोत्री करण्याची ही क्रिया. ही अर्थात् श्रौतधर्माचा पूर्ण लोप होण्याचे वेळीं आलेली. अत्यग्निष्टोम, उक्थ्य, षोडशी, अतिरात्र, अप्तोर्याम व वाजपेय हे तर सगळे सोमयागाचेच विकार. सप्तहविःसंस्थांपैकीं ज्याप्रमाणें इष्टी व पशू हे यजूंचे त्याप्रमाणेंच सौत्रामणिहि यजूंचाच. सौत्रामणीच्या प्रसंगीं होत्यांची यजूंनीं विशेष फिकिर केलेली दिसत नाहीं. सौत्रामणि म्हणजे निरूढपशु. याज्यापुरोनुवाक्या मात्र निराळ्या आणि त्या याज्यापुरोनुवाक्या हौत्रकांकडे सूत्रदृष्ट आहेत, ब्राह्मणदृष्ट नाहींत. म्हणजे हविःसंस्थांची वृद्धि होईपर्यंत हविःसंस्था चालविण्यासाठीं यजूंनीं म्हणजे अध्वर्यूंनीं होत्याची पर्वा मुळींच केली नाहीं.

अथर्व्यांचा आणि यजूंचा समेट झाल्यानंतर जी क्रिया झालेली दिसते ती ही कीं, जीं कर्में लौकिक महत्त्वाचीं होतीं तीं देखील यजूंनीं म्हणजे त्रैविद्यांनीं म्हणजे अध्वर्युप्रमुखांनीं आपल्याकडे खेंचावयास सुरुवात केली. जीं श्रौतांत जातील तीं श्रौतांत घालविलीं, जीं श्रौतांत शिरण्याजोगीं नसतील तीं स्मार्तांत घातलीं आणि कांहीं श्रौतांत व स्मार्तांत अशीं दोहोंकडे ठेवलीं. जर मोठें कर्म पाहिजे असेल तर तें करण्यास त्रैविद्य तयारच. एखाद्या यजमानास धाकटें कर्म करावयास पाहिजे असलें तरी तें करण्यास यजू तयारच. परिणाम असा झाला कीं, मोठ्या यागाचें कर्म अथर्व्यांकडून स्वतंत्रपणें होऊं नये आणि त्रैविद्यांस तर तें करतां यावें, आणि लहान सहान कर्मेंदेखील त्यांस करतां यावीत. व्रात्यस्तोम हा मूळचा अथर्व्यांचा. तैत्तिरीयसंहितेंत त्याचें नांव देखील नाहीं. पण त्यास देखील त्रैविद्यांच्या सूत्रकारांनीं (उदाहरणार्थ, बौधायन, लाट्यायन यांनीं) श्रौत स्वरूप दिलें. लहानशा विधीनें समाजांत प्रविष्ट होण्यापेक्षां एखाद्या मोठ्या लट्ठ आणि अगडबंब विधीनें समाजप्रविष्ट झालेलें व्रात्यांस कां आवडणार नाहीं? आणि सोमयागाच्या अनुषंगानें होणाऱ्या व्रात्यस्तोमांत जर आपण समाजप्रविष्ट झालों तर पुष्कळ अधिक ऋत्विजांच्या सहानुभूतीनें आपण समाजप्रविष्ट झालों असें स्वाभाविकपणेंच व्रात्यांस वाटणार. यामुळें सामान्य तंत्राचा व्रात्यस्तोम बाजूस सारून अधिक अगडबंब व्रात्यस्तोम जो यजूंनीं तयार केला त्यांत अथर्व्यांचे अनुयायी देखील इतके सांपडले कीं, वैतानसूत्रामध्यें व्रात्यस्तोमासंबंधाच्या पंधराव्या कांडाचा व्रात्यस्तोमाकडेच उपयोग केला नसून अथर्व्यांनीं ऋग्वेदांतून उसन्या घेतलेल्या विसाव्या कांडांतील 'आत्वेता निषीदत' व 'अधाहींद्रगिर्वणः' ह्याच तृचांचा विनियोग दिला आहे. यावरून वैतानसूत्राच्या प्रसंगीं व कदाचित् अथर्ववेद संहितारूप पावला त्या प्रसंगीं व्रात्यस्तोम अथर्व्यांच्या विद्येतून अजीवात नाहींसा होऊन त्रैविद्यांच्या श्रौताच्या अनुषंगानेंच जिवंत राहिला होता असें दिसतें.

श्रौतकर्माच्या इतिहासांत, श्रौतधर्माच्या माध्यान्हकालीं जी क्रिया केवळ स्मृतिरूप राहिलेली दिसते परंतु जी क्रिया श्रौतधर्माच्या यजूंनीं केलेल्या घटनेपूर्वीं चालू असावी ती क्रिया म्हटली म्हणजे पुरुषमेध होय. या क्रियेचें स्वरूप इतकें संदिग्ध आहे कीं, याजविषयीं विधिवाक्यें निश्चितपणें सांपडत नाहींत. पुरुषमेध हा कसा करावयाचा? तो सोमयागासारखा करावयाचा कीं निरूढ पशूसारखा करावयाचा? त्या वेळेस मंत्र कोणते म्हणावयाचे? त्या वेळेस सामगायन असावें कीं नसावें? होत्यानें कोणतीं शस्त्रें म्हणावयाचीं? याविषयीं सर्व अध्वर्युसंहिता व ब्राह्मणें गुपचुप बसलीं आहेत असें दिसतें. ऋग्वेदांत आढळून येणाऱ्या शुनःशेपाख्यानावरून पुरुषमेध हा निरूढपशूसारखा होत असावा ही कल्पना स्पष्ट होते. तथापि आध्वर्यव ग्रंथांमध्यें मात्र या संबंधानें अत्यंत मूकभाव आहे. जुन्या एका यज्ञाची आठवण ठेवावी यापलीकडे अध्वर्यूंचा आपल्या संहितेंत अगर ब्राह्मणांत पुरुषमेधाचा अंतर्भाव करण्यांत कांहीं एक हेतु दिसत नाहीं. वाजसनेयांनीं पुरुषमेधास जो मंत्र जोडला आहे तो नेहमींचें पुरुषसूक्त होय, आणि तें देखील रहस्य व उपनिषद् आहे अशीं विधानें त्यांनीं केलीं आहेत. वाढलेल्या यज्ञसंस्थेच्या कालांत पुरुषमेध यज्ञास तात्त्विक किंवा आध्यात्मिक स्वरूप देऊन तात्पुरती मौज उत्पन्न करावी आणि ती मौज उत्पन्न होण्याकरितां शेंकडों प्रकारचीं माणसें एखाद्या समारंभांत सामील करावीं, त्या समारंभासच यज्ञ हें नांव द्यावें, आणि पशु न मारतां होणारा हा यज्ञ तेव्हां तो अर्थात् रहस्यमय यज्ञ होय असें त्याचें वर्णन करून बऱ्याचशा प्रकारच्या लोकांस यज्ञसंस्थेच्या शोभेसाठीं करमणूक उत्पन्न करून द्यावी, अशा प्रकारची परिस्थिति अध्वर्युप्राधान्यकालीं उत्पन्न झाली असावी.

यज्ञसंस्थेचा इतिहास लिहितांना यजुर्वेदोक्त सोमयागाचा काल निश्चित केला पाहिजे. यजुर्वेदोक्त सोमयाग हा ऋग्वेदांत दृष्ट होणाऱ्या सोमकर्माहून बराच भिन्न दिसतो. ऋग्मंत्रांत सोम दैनिक अग्निहोत्रांत आणिला आहे आणि त्याचा विधिविहीन खाण्याकडेहि उपयोग दाखविला आहे. ऋग्वेदसंहितेंत सोमकर्माविषयीं जे जे उल्लेख दृष्टीस पडतात त्यांत पशुयाग जोडलेला दृष्टीस पडत नाहीं व सोमाचा उपयोग त्यांत प्राचुर्यानें दाखविला आहे त्यावरून सोम त्या वेळीं विपुल होता असें दृष्टीस पडतें. यजुर्वेदोक्त सोमयागांत सोम इतका दुर्मिळ दाखविला आहे कीं, तो मिळविण्यासाठीं जी ठकवाठकवी किंवा ठोकाठोकी व्हावयाची तिची नक्कल सोमयागाच्या

विधींतच दाखविली आहे. सोम गंधर्वांपासून गायत्रीनें कसा आणला याच्या कथा दिल्या आहेत आणि श्येन-पक्षांनीं दूर ठिकाणाहून सोमवल्ली आपल्या पायाच्या नखांत धरून आणली अशा तऱ्हेचे उल्लेख दिले आहेत. शिवाय सोम यज्ञाशिवाय कोणी पिऊं नये असे निर्बंध करून ऋत्विजांची सोय लावली आहे. तसेंच यज्ञामध्यें सोमाचा तुटवडा आला तर काय करावें, सोम चोरीस गेला तर काय करावें सोमाच्या ऐवजीं दुसऱ्या कोणत्या वल्ली वापराव्या याविषयीं तैत्तिरीय संहिता व ब्राह्मण यांत नियम दिले आहेत आणि एकदोन पिढ्या सोमपान न झाल्याबद्दल शाप दिलेला आहे. ही सर्व परिस्थिति सोमाच्या विपुलतेची द्योतक नाहीं आणि या परिस्थितीचा सोमयागास आजचें स्वरूप देण्याकडे परिणाम झाला असावा.

सोमयागामध्यें दोन गोष्टी लक्षांत ठेवण्याजोग्या आहेत त्या गोष्टी म्हटल्या म्हणजे जी ऋचा सामकांनीं म्हणावयाची तीच ऋचा व त्यापुढील ऋचा होत्यानें म्हणाव्या असा नियम आहे. दुसरी गोष्ट अशी कीं, यज्ञांतील पुरोडाशाचें व पशूचें भक्षण होत्यास व अध्वर्यूस विहित आहे सामकास नाहीं. याशिवाय ही गोष्ट लक्षांत ठेवली पाहिजे कीं, इष्टि व पशु यांत सामकांची जरूर नाहीं; त्यांतील हौत्राकरितां याजुष मंत्र चालतात म्हणजे हौत्रवेदाचीहि जरूर नाहीं. या परिस्थितीचा अर्थ असा होतो कीं, होते व सामक यांच्या ऋचा एकच आणि सामकांचे आचार मात्र जरासे भिन्न आणि असे हे दोन्ही समुच्चय आपल्या वाढत्या खटपटींत अध्वर्यूंनीं एकाच वेळेस म्हणजे सोमयागप्रसंगीं आणले. या कालीं सोमरस दुर्मिळ झालेला असल्यामुळें सोमग्रहपानधर्मास महत्त्व देणारे 'होते' व 'सामक' अध्वर्यूस सामील झाले असावेत.

ऋग्वेदाच्या मंत्रांच्या कालांतील श्रौतधर्म आणि अध्वर्यूंचा श्रौतधर्म यांमध्यें एक सहज डोळ्यांत भरण्यासारखा फरक म्हटला म्हणजे चयनाचा होय. चयनाचा उल्लेख संबंध ऋग्वेदांत कोठेंहि नाहीं. चयनांत हौत्रहि थोडेंच आहे आणि ऋग्वेदावर अवलंबून रहाणें चुकविलें आहे. होत्यानें जर उपस्थानाचे मंत्र म्हणावयाचे नाकबूल केले तर ते यजमानानेंच म्हणावेत असा विधि आहे. चयन ही पूर्वी कांहीं तरी लौकिक गोष्ट असून पुढें अध्वर्यूंच्या करामतीनें ती क्रिया श्रौतकर्मांत घुसडलेली दिसते. महाव्रताचाहि प्रकार तोच. यांत येणारें नृत्य आणि ब्रह्मचारी व पुंसली यांचें मैथुन हे प्रकार पहातां समाजांतील एखाद्या चालू कृत्यास अध्वर्यूंनीं श्रौतधर्माचें स्वरूप दिलें नसेलना असा संशय उत्पन्न होतो.

ऋग्वेदांतील मंत्रांत दिसून येणारा श्रौतधर्म आणि अध्वर्यूंचा श्रौतधर्म यांत जमीनअस्मानाचें अंतर असल्यामुळें असें दिसून येतें कीं, अध्वर्यूंनीं ज्या वेळेस आपले क्रियाकलाप बनविले त्या वेळेस त्या क्रियाकलापांस रंग आणण्यासाठीं जीं गाणीं (ऋग्वेद व सामवेद) त्या क्रियाकलापामध्यें दुसऱ्या कोणाकडून म्हणविलीं तीं गाणीं पुष्कळच प्राचीन होतीं आणि केवळ सोमयागाचें स्थूल खोकें आणि परंपरेनें परिचित अशीं पाक्षिक हवनें व पशुयाग हीं हातीं घेऊन त्यांतच अनेक कृतींची भर टाकीत टाकीत आजचा यजुर्वेद्यांचा श्रौतधर्म बनविला, असें दिसतें.

यज्ञसंस्थेचें अत्यंत विस्तृत स्वरूप भारती युद्धाच्या कालांत तयार झालेंच होतें एवढेंच नव्हे तर त्यास उतरती कळा लागली होती. महाभारत ज्यावेळेस तयार झालें त्या कालांत तर श्रौतधर्म अजीबात पुसटून गेल्याचा पुरावा देखील सांपडतो. श्रौतधर्मच काय पण त्याची कल्पना देखील सुशिक्षितांस व पुढाऱ्यांस नव्हती असें अनेक गोष्टींवरून मनावर ठसतें. महाभारताच्या रचनेच्या कालीं तर लोक श्रौतधर्म अजीबात विसरले होते. एक तर सत्रें म्हणजे काय याची वास्तविक कल्पना जाऊन काव्यमय कल्पना लोकांस येऊं लागली आणि सत्रें केव्हांच बंद पडलीं असल्यामुळें त्यांच्याविषयीं हव्या तशा कल्पना लोकांत पसरवितां आल्या. जनमेजयाच्या सर्पसत्राचीच कल्पना घ्या. या सत्राचें ज्याप्रकारचें वर्णन महाभारतांत आहे तें सत्राच्या स्वरूपाशीं मुळींच जुळत नाहीं. सत्राचें एक मुख्य स्वरूप जें "सर्वच यजमान आणि सर्वच ऋत्विज्" तें लक्षण जनमेजयाच्या सत्रास मुळींच लागू पडत नाहीं. सत्रांत कांहीं तरी गोष्टींचा मोठ्या प्रमाणावर संहार करावयाचा असतो ही कल्पना जनमेजयाच्या सर्पसत्रावरून आणि पुढील पुराणग्रंथांत उल्लेखिलेल्या पराशराच्या राक्षससत्रावरून होते. जनमेजयाचें सर्पसत्र अगोदर रूपकात्मक दिसतें. कां कीं, असें दाखविलें आहे कीं, हें सत्र त्यानें तक्षशिलेस जाऊन केलें. सत्रांत केलेल्या आह्वानामुळें नाग जर जेथें असतील तेथून निघून मंत्रसामर्थ्यामुळें अग्निकुंडांत पडणार तर तक्षकांची राजधानी जी तक्षशिला तेथें जाऊन हें सर्पसत्र करण्याचें प्रयोजन काय होतें, तें हस्तिनापुरांतच म्हणजे स्वतःच्याच राजधानींत केलें असतें म्हणजे झालें असतें. शिवाय स्वारी करून देश काबीज केल्याशिवाय जनमेजयास तक्षशिलेस म्हणजे परकीय हद्दींत आणि तेथील राजसत्तेच्या विरुद्ध सत्र तरी कसें करतां आलें? यज्ञ चालू असला म्हणजे क्षत्रियास तर धनुष्यबाणाचा त्याग करून तापसवृत्ति आचरावी लागते. तक्षशिला ही नागांची राजधानी असून तेथें मोठमोठे अजगर पाळीत आणि त्यांचें पूजन करीत ही गोष्ट उत्तरकालीन तक्षशिलेचा राजा पोरस याचा पराभव करणाऱ्या ग्रीकांनीं लिहून ठेवली आहे.

सर्पसत्रविषयक ऐतिहासिक भाग एवढाच दिसतो कीं परीक्षितीस नागराज तक्षक यानें ठार मारलें असावें व त्याचा सूड

घेण्यासाठीं जनमेजयानें तक्षशिलेवर स्वारी केली असावी, तेथें सर्व नागांचा संहार मांडला असावा आणि तो आस्तिक ऋषीनें थांबविला असावा. नाग हे साप नसून एक राष्ट्र असलें पाहिजे आणि त्यांचे वंशज आजहि महारांमध्यें असावेत असें दाखविण्यासाठीं कै. राजाराम रामकृष्ण भागवत यांनीं विविधज्ञानविस्तारांतील लेखांत बरींच प्रमाणें आणलीं आहेत आणि त्यांचेंच रा. वि. का. राजवाडे यांनीं उपबृंहण कोंकण व नागलोक या इतिहाससंग्रहांतील लेखांत केलें आहे. नाग हे माणसें नसते तर नागाच्या जरत्कारुनामक कन्येचें जरत्कारु ऋषीबरोबर लग्न होऊन आस्तिकाची उत्पत्तीच कशी झाली असती? एवंच जनमेजयाचें सर्पसत्र हें मुळींच सत्र नसून शत्रुसंहाराचें रूपक आहे. यज्ञ आणि युद्ध हे इतके एकमेकांशीं सदृश विषय आहेत व रणयज्ञांत आहुति पडल्या या प्रकारचें रूपक कवी इतकें सहज वापरतात कीं, आपण त्यांत रूपक करीत आहोंत याचें त्यांस भानहि नसतें. सर्पसत्रविषयक रूपकावरून ज्या गोष्टी सिद्ध होतात त्या येणेंप्रमाणें.

(१) सत्रें बंद पडून सत्रविषयक गोष्ट ज्या काळांत लिहिली गेली त्या काळांत सामान्य लोकांस किंवा कदाचित् कवीसहि सत्र म्हणजे काय याची कल्पना नसावी.

(२) सत्रें नष्ट झाल्यामुळें त्यांचे प्रयोग परंपरेनें जाणणारे आणि करणारे लोकहि नष्ट झाले असावेत, त्याशिवाय सत्रप्रयोगांवर मोठ्या शक्तीचा आरोप होणार नाहीं.

एवढें खरें कीं, यज्ञसंस्थेच्या इतिहासांत जनमेजयाचें नांव मोठें आहे. हा शेवटचाच मोठा यज्ञकर्ता राजा होऊन गेला. त्यानें विजयहि केले. पौराणिकांनीं या दोहोंचा संबंध जोडला. ज्या कालांत कोणत्याहि उपायाचें फल अत्यंत अतिशयोक्तीनें वर्णिलें जातें तेव्हां पुष्कळदां असें समजावें कीं, त्या उपायांचें अस्तित्व समाजांतून नाहींसें होत असलें पाहिजे एवढेंच नव्हे तर जर कोठें तो उपाय चालू असेल तर त्यावरहि आघात करण्याचा अतिशयोक्तीचें वर्णन हा प्रयत्न होय. कर्म करून दाखविणारा जो वर्ग असेल त्याला तें प्रत्यक्ष करून दाखवून अतिशयोक्तीनें वर्णिलेलें फल दाखविण्याची जबाबदारी पडणार. मत्सरसंपन्न जगांत दुसऱ्यास फायदा उत्पन्न करून देणारी कोणी कोणाची स्तुति करीत नाहीं. जेथें स्पर्धेचा संभव नाहीं तेथेंच फाजील स्तुति आणि माहात्म्यवर्णन संभवतें. यज्ञप्रयोग करणाऱ्याच्या धंद्यास ज्यानें बरकत येईल अशी स्तुति कवी कशास करीत बसतील. सत्रें करणारे ऋत्विज् आणि यजमान जर हयात असते तर स्तुतीच फारशी झाली नसती. पुष्कळ प्रसंगीं स्तुति लबाडीची आणि धंद्यास बुडविणारी असते. सत्रांतील मंत्रांनीं अनेक नाग आपल्या स्थानावरून ओढून यज्ञकुंडांत पाडतां येतात असें मंत्रांत सामर्थ्य आहे अशी जर लोकांची समजूत करून दिली तर लोकांस उलट असें वाटेल कीं सत्रप्रयोग जाणणारे ऋषी केव्हांच नष्ट झाले. आजचे सत्रप्रयोगकार कोणी थोतांडी आहेत. येणेंप्रमाणें कोणत्याहि कर्माची अत्यंत स्तुति करावयाची, तीं कर्में प्रत्यक्ष करीत असतील त्यांस नालायक ठरवावयाचें आणि या रीतीनें एकीकडे कर्माविषयीं आस्तिक्यबुद्धि दाखवून तीं कर्मेंच मारून टाकावयाचीं हा प्रकार येथें दिसतो. संस्थांस असलें स्तुतिरूप विष पाजण्याची पद्धति पुष्कळदां परमार्थसाधनाच्या धंद्यांत मुत्सद्दीगिरी करणारांनीं अंगिकारली आहे. जनमेजयाच्या सर्पसत्राचें वर्णन या अनेक गोष्टींचा विचार करतां यज्ञांचा नाशकाल सुचविणारें आणि यज्ञसंस्थेंत थोडाबहुत जीव कोठें असल्यास त्यावरहि आघात करणारें दिसतें.

इतिहासपुराणग्रंथांची एकंदर यज्ञविषयक वृत्ति अशीच आहे. यज्ञाच्याठायीं अद्भुत फलाचा आरोप करावयाचा आणि लोकांचीं अंतःकरणें मात्र अनेक कथा सांगून आणि भक्तीचें माहात्म्य गाऊन निराळ्या मार्गांकडे वळवावयाचीं. रामायणामध्यें इन्द्रजिताच्या यज्ञांतून विजयरथ बाहेर पडत होता पण रामाच्या सैनिकांनीं यज्ञ विध्वंसून विजयरथ त्यास मिळूं दिला नाहीं अशा तऱ्हेचें वर्णन केलें आहे. तसेंच यज्ञांतील पिंड बायकांस द्यावयाची पद्धति देखील पुराणग्रंथांतून वर्णिली आहे. खरोखर पहातां ही पद्धति एकंदर यज्ञसंस्थेच्या घटनेच्या विरुद्ध आहे. यज्ञांत हविःशेष भक्षण करण्याची परवानगी यजमानास आणि ऋत्विजांसच आहे, आणि क्षत्रिय यजमान असले तर त्याला सोमपानहि नाहीं. यजमानपत्नीस हविष्यान्नाचा भाग देणें हें कोठेंहि सांगितलेलें नाहीं. तथापि हविष्यान्नाचा भाग पुराणांत स्त्रियांसहि देवविला आहे आणि त्याचे मोठे परिणाम वर्णन केले आहेत. त्यांच्या योगानें स्त्रियांस पुत्र उत्पन्न करून दिले आहेत. दशरथाच्या यज्ञाच्या वेळेस यज्ञांत अंग असलेल्या स्त्रियांसच केवळ पुत्रोत्पत्ति झाली असें नाहीं तर एक पिंड घारीनें उचलला तो अंजनेच्या हातांत पडला आणि त्यामुळें अंजनेस पुत्रप्राप्ति झाल्याचें वर्णन आहे. पिंडाच्या अंगीं गुणविशिष्टत्व मंत्रसामर्थ्यानें इतकें स्थापन करतां येतें कीं, जी स्त्री तो पिंड खाईल तीस त्या पिंडांत अडकवून ठेवलेल्या गुणांचा पुत्र होईल. ब्राह्मणपत्नी रेणुका हिला क्षत्रियगुणांकित परशुरामाची उत्पत्ति करून देण्यास आणि क्षत्रिया गाधिपत्नी हीस ब्राह्मणगुणांकित पुत्र विश्वामित्र प्राप्त होण्यास कारण पिंडांची अदलावदल हें दाखविलें आहे.

शंभर यज्ञ केले म्हणजे इन्द्रपद प्राप्त होतें आणि इन्द्रास शतक्रतु ही पदवी त्यामुळेंच पडली ही कथा शतक्रतु शब्दावर रचली आहे तथापि तीस वेदांत आधार नाहीं. ही गोष्ट केवळ पौराणिक आहे.

विश्वामित्रानें त्रिशंकूस सदेह स्वर्गास पोंचविण्याची खटपट यज्ञसाहाय्यानेंच केली आणि तींत त्यास जवळजवळ यश आलें होतें असें यज्ञसंस्थेचें माहात्म्य वर्णिलें आहे.

यज्ञावर आघात जैनांनीं केले, चार्वाकांनीं केले तथापि यांचे आघात बाहेरून झाले व ते फारसे परिणामकारी झाले नाहींत; तथापि पुराणें तयार करणारांनीं घरांत शिरून एकीकडे यज्ञाची तारीफ करून तथापि लोकांच्या विचारांस व पारमार्थिक प्रवृत्तीस निराळें क्षेत्र उत्पन्न करून देऊन लोक आपल्या बाजूस ओढण्याची जी खुबी केली तिच्या योगानें आपण परंपरेस चिकटून रहाणारे आहों असा बाणा अगर बहाणा करून श्रौतधर्म संकोचांत आणले. यांनींच काव्याच्या साहाय्यानें राम कृष्ण यांसारख्या सामान्य ऐतिहासिक व्यक्तींच्या मुखांभोंवतीं तेजोवलयें निर्माण करून त्यांच्या उत्सवांसंबंधाचे धर्म बनविले. येणेंप्रमाणें पौराणिकांच्या क्रिया अधिक यशस्वी झाल्या.

यज्ञसंकोचकाल म्हणजे ज्ञान व भक्ति या दोन तत्त्वांचा उदयकाल होय. या कालास वैधेतिहासामध्यें श्रौतास संक्षेप देऊन जें गृह्य बनलें त्याचा उदयकाल म्हणतां येईल, या कालांतच स्मृती डोकावूं लागल्या आणि धर्मशास्त्रांस प्रारंभ होऊन श्रौतमुक्त ब्राह्मणांस राजव्यवहारामध्यें अधिकाधिक कार्यक्षेत्र मिळावयास प्रारंभ झाला.

आतां ब्राह्मण जातीच्या इतिहासाकडे वळूं.

ब्राह्मणजातीचा इतिहास हा भारतीय इतिहासाचा एक महत्त्वाचा भाग आहे. यज्ञसंस्थेचें आतांपर्यंत जें विवेचन झालें आहे त्यांत या जातीच्या इतिहासाचा कांहीं भाग आलाच आहे, तथापि या विषयाचें स्वतंत्र विवरण अवश्य आहे. ब्राह्मणजातीच्या घटनेच्या इतिहासांतील मुख्य पायऱ्या येणेंप्रमाणें दिसतात.

भारतीय राष्ट्रें आणि इराणांतील राष्ट्रें हीं एकत्र असतां आणि कदाचित् यूरोपीय राष्ट्रें व पर्शुभारतीय राष्ट्रें एकत्र असतां त्यांमध्यें चातुर्वर्ण्याची कल्पना म्हणजे समाजांत कर्मविशिष्ट चार वर्ग असतात ही कल्पना होती. प्रत्येक प्राचीन राष्ट्रांत या चातुर्वर्ण्याच्या कल्पनेचे अवशेष सांपडतात. आवेस्तामध्यें* तर स्पष्टच उल्लेख आहेत. ग्रीसमध्यें समाजांत चार समुच्चय होते असे स्ट्राबो, प्लुटार्च वगैरे ग्रंथकारांनीं उल्लेख केले आहेत. हे ग्रीक समाजांतील समुच्चय चार निरनिराळे मानववंश आहेत कीं चार वर्ग आहेत असे प्रश्न कांहीं संशोधकांनीं उपस्थित केले आहेत.†

समाजांतील चार वर्गांची कल्पना जरी जुनी आहे तरी नांवें मात्र नवीन दिसतात. इराणांत ब्राह्मणाच्या ऐवजीं अथ्रवन् हें नांव दिसतें. इराणी परंपरेंत चवथा वर्ग दासांचा नसून शेतकऱ्यांचा ठरविला आहे. हिंदुस्थानांत चवथ्या वर्गाचें कर्म दास्य ठरविलें आहे आणि त्या वर्गास शूद्र हें नांव दिलें आहे. या शूद्र नांवाची आणि त्याच्या दास्यत्वाची उपपत्ति हापकिन्स अशी लावतो कीं, आर्यन् अफगाणिस्तानांतून आले तेव्हां तेथें "सूद्राय" म्हणून एक जात होती त्या जातीस आर्यन् लोकांनीं जिंकलें आणि दास बनविलें. हापकिन्सच्या या कल्पनेविषयीं ती विचारार्ह आहे असें सांगून मोकळें होण्यापलीकडे कांहींएक करतां येत नाहीं. ही कल्पना ग्राह्य ठरविण्यास किंवा त्याज्य ठरविण्यास इतर पुरावा कांहींच नाहीं.

हिंदुस्थानांत आर्यन् राष्ट्रें आलीं त्या वेळेस त्यांमध्यें चातुर्वर्ण्याची कल्पना आणि अथर्व्यांचें (अथ्रव्यांचें) पौरोहित्य या गोष्टी दिसतात. अथर्व्यांचें पौरोहित्य जाऊन एका निराळ्या वर्गाचें–बहुतांशीं अथर्व्यांच्याच वर्गांतून निघालेल्या वर्गाचें–पौरोहित्य येण्यास बृंहित यज्ञसंस्था कारण झाली. ऋत्विजांचा वर्ग जो तयार झाला त्यांत निरनिराळ्या वंशांतून लोक आलेले दिसतात. त्यांत कांहीं दासीपुत्र व कांहीं वेश्यापुत्रहि असण्याचा संभव आहे.

सर्वच वैदिक ऋषी यज्ञयागांचे ऋत्विज नसावेत, तथापि कांहीं असावेत असें दिसतें. वासिष्ठ ज्याप्रमाणें स्तोत्रकर्ते आहेत त्याप्रमाणें पुरोहितहि आहेत. ते कदाचित जुन्या अथर्व्यांपैकीं असणें शक्य आहे. संहितीकरणाच्या अंतिमकालीं ब्राह्मण हा स्वतंत्र वर्गच केवळ तयार झाला नव्हता, तर त्यांच्यांत वेदांप्रमाणें व शाखांप्रमाणेंहि फरक झालेला असला पाहिजे. तथापि तो जातिस्वरूपांत असेल असें खात्रीनें म्हणतां येत नाहीं.

भारती युद्धाच्या कालीं अशी परिस्थिति दिसते कीं, कुरुपांचाल प्रदेशांत ब्राह्मण ही जात झाली असावी, तथापि पंजाबांत ते केवळ वर्ग या स्वरूपांतच असावे. याला प्रमाण असें देतां येईल कीं, भारती युद्धामध्यें चमकलेले द्रोणाचार्य व कृपाचार्य हे वीर ब्राह्मणी धंदा टाकून क्षत्रियाचा धंदा करीत असतां देखील ते समाजांत ब्राह्मण ही पदवी भोगीत होते. जेव्हां मनुष्य भिन्न वर्गाचें कर्म करून देखील आपल्या बापाच्या वर्गांतच मोडतो तेव्हां तो वर्ग अथवा समुच्चय वर्ग राहिला नसून जात झाला असें समजावें. उलटपक्षीं पंजाबांत ब्राह्मण हा वर्ग राहिला होता असें कर्णशल्यसंवादावरून दिसून येतें. कर्ण शल्यास टोंचून बोलतो कीं, 'तुझा देश रे कसा ? तुझ्या देशामध्यें ब्राह्मण क्षत्रिय बनतो, क्षत्रिय वैश्य बनतो आणि न्हावी पुन्हां ब्राह्मण बनतो.' यावरून पंजाबांत म्हणजे आरट्टवाहीकांत ब्राह्मणेतरांस ब्राह्मण होणें शक्य होतें असें दिसतें.

* काइप् पिष्त्राइप्? आथ्रव, रथएष्थाओ, वास्र्योफ्श्युयस् हूइति. (पिष्त्राइप् कोण? आथ्रव, रथाधिष्ठ, शेतकरी, कारागिर) यस्न १९.१७. † Greenidge - A Handbook of Greek Constitutional History, p.127.

पंचगौड ब्राह्मणांमध्यें ( सारस्वताः कान्यकुब्जा गौडा मैथिल उत्कलाः । पंचगौडाः समाख्याता विन्ध्योत्तरनिवासिनः ) अत्यंत पश्चिमेकडील ब्राह्मण म्हणून सारस्वतांचें नांव दिलें आहे. सरस्वती नदी लुप्त झाली ती यमुना व झेलम यांच्यामध्यें होती आणि तिच्या सभोंवतालच्या प्रदेशास सारस्वत क्षेत्र म्हणत अशी प्राचीन परंपरा आहे. सारस्वतांचें पंचगौडांत प्रथमस्थान हें पंजाबकडे ब्राह्मण ही जात बनली नव्हती आणि मध्यदेशांत ती बनली होती या कल्पनेस सहायक आहे.

ब्राह्मणांमध्यें परक्यांचा शिरकाव बहुतांशीं बंद झाला होता तथापि अशक्य झाला नव्हता, ही गोष्ट सत्यकाम जाबालाच्या कथेवरून दिसते. जाबालास अपवाद म्हणून ब्राह्मणांत घेतलें हें पाठीमागें दिलेंच आहे.

याज्ञवल्क्यानें ज्या शाखा नवीन तयार केल्या त्यांत बहुतांशीं नवीनच लोक घेतले असावेत. शतपथ ब्राह्मणामध्यें जे शुक्ल यजुर्वेद्यांचे अनेक आचार्य दिले आहेत त्यांचें ते अमक्या आईचे मुलगे असें वर्णन आहे. शुक्ल यजुर्वेदीय ब्राह्मणांचा विवाहदृष्ट्या प्रवेश जुन्या ब्राह्मणांत झाला नाहीं. आपस्तंब व हिरण्यकेशी यांचीं ऋग्वेद्यांबरोबर लग्नें होतात तशीं शुक्ल यजुर्वेदाच्या शाखांतील ब्राह्मणांचीं होत नाहींत, एवढेंच नव्हे तर शुक्ल यजुर्वेद्यांतल्या पोटशाखांचीं आपआपसांतहि लग्नें होत नाहींत. 'ष' चा 'ख' आणि 'य'चा 'ज' असा उच्चार आणि अतिशयोक्तीनें स्पष्ट उच्चार करावयास शिकविणारें शुक्ल यजुर्वेद्यांचें प्रातिशाख्य यांवरून अशी एक कल्पना निघते कीं, या नवीन ब्राह्मणांस वैदिक मंत्रांचा उच्चार करणें फार कठिण झालें असावें. असो.

ब्राह्मण जातीच्या इतिहासांत वेदाप्रमाणें ब्राह्मणभेदाचा इतिहास देणें अवश्य आहे. तो इतिहास पुढें येईल. सध्यां एवढेंच लक्षांत ठेवलें पाहिजे कीं, यज्ञसंस्थेच्या ब्राह्मणभेदकारक काळांत ब्राह्मण हे जात बनले नसून केवळ वर्गरूपानें होते. हा प्रथम संहितीकरणाचा म्हणजे श्रौतविकासाचा काळ होय.

---

## प्रकरण ११ वें.

### विषयांतर—वेदोक्त इतिहास व आख्यायिका.

अज्ञांत विषयामध्यें वाचकांस नेऊन सोडण्याचे प्रकार दोन आहेत. एक, काय सिद्ध झालें असेल तें अधिकारी वाणीनें सांगून त्यास पुढें अवश्य पडेल तेथें प्रमाणें द्यावयाचीं, व दुसरा प्रकार म्हणजे वाचकांस ज्ञातापासून अज्ञाताकडे हळूहळू न्यावयाचें. दोन्ही प्रकार कधीं कधीं लेखकास अवलंबावे लागतात. वेदांचा इतिहास समजावून देण्यासाठीं यज्ञसंस्थेचा स्थूल इतिहास देणें अवश्य झालें. यज्ञसंस्थेचा इतिहास सांगतांना प्रत्येक विधानास प्रमाणें दिलीं नाहींत. तथापि मुख्य मुख्य विधानें मुबलक पुरावा पुढें मांडून सिद्ध करणें अवश्य आहे. यज्ञांच्या इतिहासाची स्थूल रूपरेषा दिली तरी यज्ञेतिहासविषयक आख्यायिकांचा परामर्श घेतां आला नाहीं. आतां त्या आख्यायिकांकडे वळलें पाहिजे. यज्ञविषयक आख्यायिका ह्या ब्राह्मण ग्रंथांतील एकंदर कथांचा एक महत्त्वाचा भाग आहेत, यासाठीं केवळ यज्ञसंस्थेची चौकशी थांबवून ब्राह्मणांतील "इतिहासपुराणें" व आख्यायिका यांजकडे आतां वळतों. आपणांस सर्व इतिहास ज्ञेय आहे त्या अर्थीं प्रथम ज्या आख्यायिकांस प्राचीन इतिहास म्हणून समजत असत तो येथें मांडण्यास हरकत नाहीं.

**तैत्तिरीय संहितेंतील आख्यायिका.**—देव आणि अग्नि.—देव व दैत्य एकदां भांडत होते. तेव्हां दैत्यांकडून आपला पराभव झाला तरी आपली संपत्ति व ऐश्वर्य सुरक्षित रहावें म्हणून देवांनीं आपलें सर्व ऐश्वर्य अग्नीच्या ठिकाणीं ठेविलें. त्या ऐश्वर्याचा अग्नीस लोभ सुटून अग्नि देवांपासून दूर निघून गेला. परंतु देवांनीं दैत्यांचा पराभव केला व अग्नीपासून आपलें ऐश्वर्य परत घेण्याची त्यांस इच्छा झाली, व त्यांनीं अग्नीचा शोध लावून त्याजपासून आपली ठेव परत घेण्याची पराकाष्ठा केली. अग्नि रडूं लागला, व त्या वेळीं त्यास 'रुद्र' संज्ञा प्राप्त जाहली. त्या वेळीं खालीं पडलेल्या अश्रूंपासून रुप्याची उत्पत्ति झाली म्हणून रुपें ही धातु दानकर्मास अप्रशस्त मानतात. अशा रीतीनें देव जेव्हां अग्नीपासून सर्व ऐश्वर्य परत घेऊं लागले, तेव्हां अग्नीनें त्यापैकीं कांहीं वांटा देण्याबद्दल प्रार्थना केली. देवांनीं 'पुनराधान' हें अग्नीस दिलें व नंतर त्याच्या योगानें पूषन्, त्वष्टृ, मनु, धातृ, वगैरेनीं यज्ञकर्में करून आपली भरभराट करून घेतली.

( तै. सं. १.५,१ )

दिवस हा देवांनां दिला होता व रात्रीवर असुरांची मालकी होती. परंतु देवांच्या सर्व ऐश्वर्यासह दैत्यांनीं रात्रींत प्रवेश केला. तेव्हां रात्र ही अग्निदेवतेची, गुरें हीं अग्नीचींच असल्यामुळें अग्नीची स्तुति करण्याचा देवांनीं विचार केला. देवांनीं अग्नीची स्तुति केल्यावर, अग्नीनें देवांचीं गुरें, संपत्ति वगैरे त्यांस असुरांपासून मिळवून दिली. (तै. सं. १.७,१)

सूर्याला भूमीवर उदय पावल्यावर मृत्यूचें फार भय वाटलें, कारण भूमीवरील प्रत्येक वस्तु नाशवंत आहे. तेव्हां त्यानें अग्नीची स्तुति केली व तो अमर्त्य झाला.

इडा.—देवांनीं यज्ञापासून स्वर्ग व अमृतत्व याचें दोहन केलें. यज्ञानें असुरांपासून सर्व ऐश्वर्य मिळवलें व म्हणूनच ऐश्वर्यविहीन झालेल्या असुरांचा पराभव झाला. यज्ञकर्मांनीं

देवांनीं मात्र स्वर्ग मिळवला. त्या वेळीं मनु हा यज्ञकृत्यें करीत होता. एकदां इडा मनूकडे गेली, तेव्हां देवांनीं प्रत्यक्षपणें व असुरांनीं अप्रत्यक्षपणें इडेस आव्हान केलें. तेव्हां ती देवांकडे गेली. त्यामुळें एकंदर प्राणीहि देवांकडे गेले व त्यांनीं असुरांचा त्याग केला. (तै. सं. १.७,१)

प्राजापत्य याग.—प्रजापति प्रथम एकटाच होता. त्यानें प्रजोत्पत्तीची इच्छा करून आपल्या शरीरांतील मांस काढून त्याची अग्नींत आहुति दिली. तेव्हां अग्नीपासून शृंगविहीन असा बोकड उत्पन्न झाला. (तै. सं. १.७,१)

प्रजापतीनें प्रजोत्पत्ति केली. उत्पन्न झालेले सर्व प्राणी वरुणाकडे गेले, तेव्हां प्रजापतीनें त्यांस परत बोलाविलें, परंतु वरुण कबूल होईना. नंतर प्रजापतीनें जेव्हां एक पांढरा खूर असलेला असा कृष्ण पशु त्यास देण्याचें ठरविलें तेव्हां वरुणानें सर्व प्राण्यांची मालकी सोडली.

स्वर्भानु नामक असुरानें सूर्यास तमाच्या योगानें भोंसकलें, तेव्हां त्याबद्दल देवांनीं भरपाई मिळावी अशी इच्छा व्यक्त केली. देवांनीं प्रथम ज्या अंधकाराचा नाश केला त्याचा एक काळा मेंढा बनला, दुसऱ्या खेपेस तेजस्वी वर्णाचा व तिसऱ्या खेपेस पांढरा बनला. नंतर जबड्याच्या वरच्या हाडकापासून एक मेंढी उत्पन्न झाली, तेव्हां देवांनीं त्या मेंढीची आदित्या-करितां आहुति दिली. त्यामुळें पूर्वीं जी ही भूमि अतिशय लहान व वृक्षलताविहीन अशी होती तीच पुष्कळ रुंद झाली व तिच्या पृष्ठभागावर मोठमोठे अजस्र वृक्ष, लता इत्यादींची विपुलता उत्पन्न झाली. (तै. सं. १.१,२)

वामनावतार.–देवदैत्यांचें ह्या तिन्हीं लोकांकरितां भांडण झालें, तेव्हां विष्णूनें आपल्या वामन स्वरूपाची आपणांस आहुति दिली, व अशा रीतीनें तीनहि लोक जिंकले.

(तै. सं. २.१,३)

इन्द्र व वृत्र.—इंद्रानें वृत्रास मारलें, तेव्हां वृत्र सोळा रज्जूंनीं जखडलेला असा पडला होता. तेव्हां वृत्राच्या डोक्या-पासून विदेह देशांतील गाई उत्पन्न झाल्या त्या गाईपाठीमागून एक बैल धावूं लागला. तेव्हां इंद्रानें कृष्णवर्णयुक्त मानेचा बैल पाहून अग्नीस समर्पण केला. तेव्हां अग्नीनें वृत्राच्या रज्जूचे १६ भाग जाळून टाकले व अशा रीतीनें त्यानें इंद्राच्या ठिकाणीं तेज व शक्ति उत्पन्न केली. (तै. सं. २.१,४)

सोमास क्षय.—प्रजापतीला तेहतीस मुली होत्या. त्या सर्वांचीं त्यानें सोमराजाशीं लग्नें लावून दिलीं. परंतु सोम हा सर्वांपेक्षां रोहिणीवर फार प्रेम करून तिच्या समागमांत सुख मानीत असे. त्यामुळें इतर बहिणींनां फार राग आला व त्या सर्व प्रजापतीकडे निघून आल्या, तेव्हां सोम हा त्यांच्यामागें आला व त्यांस परत देण्याबद्दल प्रजापतीची प्रार्थना करूं लागला. तेव्हां प्रजापतीनें सोमास "मी सर्वांवर सारखी प्रीति करून सर्वांच्या समागमांत राहीन" अशी शपथ घेण्यास सांगितलें, व सोमानें त्याप्रमाणें केल्यावर सर्व मुली पुनः त्याच्या स्वाधीन केल्या. परंतु पुनः तो एकट्या रोहिणी-बरोबरच क्रीडा करूं लागला. तेव्हां त्यास एक वाईट प्रकारचा रोग (राजयक्ष्मा) झाला. ह्यामुळेंच राजांस स्त्रियांपासून होणाऱ्या रोगास सदरहू नांव आहे. अशा रीतीनें रोगपीडित सोमराजा सर्व स्त्रियांकडे गेला व त्यानें त्यांची क्षमा मागितली. तेव्हां त्यांनीं आपणा सर्वांवर सारखी प्रीति करण्याचें त्याजकडून कबूल करून घेऊन, आदित्य-देवांनां रोगनाशार्थ आहुती दिल्या. तेव्हां आदित्यांनीं त्यास रोगापासून मुक्त केलें. (तै. सं. २.३,५)

देवासुर युद्ध.—देव, पितर व मानव हे एका बाजूस असून दैत्य, राक्षस व पिशाच्च हे दुसऱ्या बाजूस होते. एखाद्याच्या शरीरांतून असुर जें रक्त काढीत तें सर्व राक्षस रात्रीचेवेळीं विषयुक्त करीत, व त्यामुळें उषःकालाचे पूर्वींच तो मृत्युमुखांत पडत असे. हें सर्व कृत्य राक्षसांचें असावें हें देवांनीं जाणलें. तेव्हां देवांनीं राक्षसांस आपणाकडे बोलावलें. राक्षसांनीं देवांजवळून, असुरांपासून होणाऱ्या लुटींतून आपणांस भाग देण्याबद्दल कबूल करून घेतलें. पुढें असुरांचा पराभव झाला. नंतर देवांनीं राक्षसांस हांकलून दिलें. राक्षसांनीं देवांच्या कपटाबद्दल आरडाओरड केली. परंतु देवांनीं अग्नीस पुढें करून राक्षसांस पराजित केलें. अशा रीतीनें असुरपक्षामध्यें भेद करून देवांनीं आपलें काम करून घेतलें. (तै. सं. २.४,१)

वृत्रकथारहस्य.—आपला पुत्र मारला गेल्यामुळें त्वष्ट्यानें इन्द्राखेरीज सर्व देवांस सोमरस समर्पण केला. इन्द्रास आपणांसहि सोमरसाचा वांटा मिळेल अशी आशा होती परंतु ती निष्फळ ठरल्यामुळें त्यानें यज्ञाचा विध्वंस करून बळजवरीनें सोमपान केलें. तें अवशिष्ट त्वष्ट्यानें अग्नींत टाकून त्यापासून वृत्र (सर्व जगास व्यापणारा) याची उत्पत्ति केली. त्याचें तें भयंकर सामर्थ्य व जगड्व्याळ स्वरूप पाहून इन्द्र, त्वष्टा वगैरे देवांस देखील भीति वाटली. तेव्हां वृत्राची जास्त वाढ होऊन आपणास तो त्रास देईल या भीतीनें विष्णूनें आपले तीन भाग करून एक पृथ्वीवर, एक वायुलोकांत व एक स्वर्गांत असे ठेवले व अशा रीतीनें इन्द्रानें ह्या विष्णूच्या तीन स्वरूपांच्या मदतीनें वृत्रासुरास वाढूं दिलें नाहीं. तेव्हां वृत्रानें इन्द्राचे शरीरांत शिरण्याविषयीं इन्द्रास विचारलें, व सांगितलें कीं, मी तुला संतुष्ट करीन. इन्द्रानें कबूल केलें व वृत्रासुरानें त्याच्या शरीरांत प्रवेश केला व तो इन्द्राचें उदर झाला. भूक हा प्रत्येक प्राण्याचा शत्रु आहे कारण वृत्र हा इन्द्रशत्रु आहे.

तै. सं. (२.४,१२)

त्वष्ट्याचा पुत्र विश्वरूप हा देवांचा अग्निहोतृ व असुरांचा भागिनेय होता. यज्ञांत देवांनां तो समक्ष व असुरांनां गुप्तपणें असे हविर्भाग देत असे. तेव्हां हा इन्द्रपद बळकावील ह्या भीतीनें इन्द्रानें त्याचीं तिन्ही शिरें आपल्या वज्रानें कापलीं व त्याचा वध केला. सर्व प्राणी इन्द्रास "ब्रह्मघ्न" म्हणूं लागले. आपणावरील दोषाचे तीन भाग करून त्यानें पृथ्वी, वृक्ष व स्त्रिया यांमध्यें खणणें, खुडणें व रजस्राव होणें या तीन रूपांनीं वांटून दिला. ह्याकरितां रजस्वला स्त्रीबरोबर कधींहि सहवास करूं नये, नाहीं तर त्याची संतती दोषयुक्त होईल. (तै. सं. २.५,१)

उशना काव्य.—अग्नि हा देवांचा दूत असून उशना काव्य हा असुरांचा कुलगुरु व अध्वर्यु होय. अग्नि व उशना काव्य हे दोघे प्रजापतीकडे गेले तेव्हां प्रजापतीनें उशना काव्य याजकडे पाठ फिरवून अग्नीचीच निवडणूक केली त्यामुळें देवांची सरशी झाली व असुरांचा पराजय झाला. (तै. सं. २.५,८)

अग्नीचें पलायन.—अग्नीचे त्याजपेक्षां वडील असे तीन भाऊ होते. ते तिघेहि देवांकडे यज्ञांतील हविर्भाग पोहोंचविण्याचें काम करीत असतां नाश पावले. त्यासारखीच आपली दशा होईल अशी अग्नीस भीति वाटून तो दूर जाऊन पाण्यांत दडून बसला. त्याला शोधण्याचा देवांनीं पुष्कळ प्रयत्न केला. पाण्यांतील मत्स्य वगैरेंनीं अग्नि हा पाण्यांत दडला असल्याबद्दलची गुप्त बातमी देवांस सांगितली. तेव्हां अग्नीनें "लोक मजेखातर वाटेल तेव्हां तुमचा प्राण घेतील" असा मत्स्यांस शाप दिला. नंतर देवांनीं अग्नीस बाहेर काढून यज्ञांतील हविर्भाग पोहोंचविण्याची कामगिरी त्यास दिली. तेव्हां त्यानें वर मागितला कीं "थोडा भाग मला मिळावा." (तै. सं. २.६,६)

नाभानेदिष्ठाची कथा.—मनूनें आपली सर्व संपत्ति पुत्रांनां वांटून दिली. परंतु ब्रह्मचर्याश्रमांत शिकत असलेल्या नाभानेदिष्ठास मात्र त्याचा हिस्सा दिला गेला नाहीं. तेव्हां तो बापाकडे आला व म्हणाला कीं "मला माझा हिस्सा कां मिळाला नाहीं"? बापानें सांगितलें, तुझा हिस्सा मी काढून घेतला नाहीं. आंगिरस सत्र करीत आहेत, परंतु त्यांस स्वर्लोकाचें दर्शन होत नाहीं. तेव्हां हें ब्राह्मण त्यांस शिकीव व ते स्वर्गास जातांनां ते आपली संपत्ति तुला देतील. त्याप्रमाणें आंगिरसांनां नाभानेदिष्ठानें विद्या सांगितल्यावर ते स्वर्गलोकास जातांनां त्यांनीं आपली संपत्ति नाभानेदिष्ठास दिली. त्यावेळीं रुद्रानें तेथें येऊन यज्ञभूमीवरील द्रव्य तें आपलें असल्याबद्दल सांगितलें. परंतु नाभानेदिष्ठानें तें आपणांस आंगिरसांकडून मिळालें असल्याबद्दल सांगितलें परंतु रुद्रानें आपणांस यज्ञांत हविर्भाग देण्याचें कबूल करून घेऊन त्या पशूवरील आपला अधिकार सोडून दिला. (तै. सं. ३.१,९)

वरुण व जलें.—हीं जलें वरुणाच्या पत्न्या होत. परंतु अग्नीला त्यांजबरोबर समागमाची इच्छा झाली. तेव्हां त्याचें रेतस्खलन झालें, तेव्हां त्यापासून पृथिवी झाली. पुनः दुसऱ्यांदा स्खलन झालें, त्यापासून आकाशोत्पत्ति झाली. (तै. सं. ५.५,४)

वराहावतार व सृष्ट्युत्पत्ति.—आरंभीं सर्व जलमय होतें. ह्या जलमय समुद्रांत प्रजापति हा वायुरूपानें फिरूं लागला. तेव्हां त्यानें पृथ्वी पाहिली व वराहाचें स्वरूप धारण करून पृथ्वी धरली. तो विश्वकर्मा असल्यामुळें त्यास तिनें आपला ओलसरपणा पुसला. नंतर ती पृथु (विस्तृता) झाली, व म्हणून तीस पृथ्वी म्हणूं लागले. प्रजापतीनें तपश्चर्या करून तिच्यापासून, देव, वसु, रुद्र, आदित्य वगैरेंची उत्पत्ति केली. नंतर देवांनां प्रजोत्पादनाची इच्छा उत्पन्न झाली तेव्हां त्यांनीं प्रजापतीच्या सांगण्यावरून तपश्चर्या करून अग्नीच्या आश्रयानें एका गाईची उत्पत्ति केली. त्या गाईकरितां सर्व देवांनीं प्रयत्न करून अग्नीस संतुष्ट केलें व नंतर गाईपासून प्रत्येकास ३३३ देव झाले व अशा रीतीनें असंख्यात प्रजा उत्पन्न झाली. (तै. सं. ७.१,५)

चतूरात्रयाग.—अत्रीनें पुत्रप्राप्तीची इच्छा असलेल्या और्वास चतूरात्रयागाच्या योगानें पुत्रोत्पादनाची शक्ति, दिली. त्यामुळें त्यास चार पुत्र झाले. जमदग्नीनें देखील चतूरात्रसंज्ञक यज्ञ करून आपली भरभराट करून घेतली. (तै. सं. ७.१,८)

शंड व मर्क यांची हकीकत.—बृहस्पति जसा देवांचा पुरोहित होता तसे शंड व मर्क हे दोघे असुरांचे पुरोहित होते. दोन्ही बाजूंस पुरोहित हुषार असल्यामुळें देव अगर असुर यांपैकीं कोणीहि कोणाचा पराभव करूं शकेना. तेव्हां देवांनीं असुरपुरोहित शंड व मर्क यांनां आपल्या यज्ञांत सोम पिण्यास देण्याची लालूच दाखवून फितुर केले. अर्थात् त्यांच्याकडून असुरांनां सल्ला बरोबर न मिळाल्यामुळें त्यांचा पराभव झाला व देव विजयी झाले. पुढें देवांनीं यज्ञ सुरू केल्यावर त्यांनीं कबूल केलेल्या वचनास अनुसरून पूर्वीप्रमाणेंच शुक्र व मंथीनामक पात्रांतील सोमरस आपल्यास प्यावयास मिळेल या आशेनें शंडामर्क त्या यज्ञांत येऊन दाखल झाले. पण देवांनीं विचार केला कीं, आपलें काम होण्यासाठीं आपण एकदां यांनां सोमरस दिला खरा तथापि आतां या दोघां फितुर होणाऱ्या पुरोहितांनां आपल्यांत समाविष्ट होऊं देणें बरें नव्हे. शेवटीं त्या दोघां

असुरपुरोहितांनां देवांनीं आपल्या यज्ञांत सोमरसाचा भाग न देतां फजीत करून हांकून लावलें. ( तै. सं. ६.४,१० ) ( तै. ब्रा. १.१,१ )

कालकंज असुरांची गोष्ट.—'कालकंज' नामक असुर होते. त्यांनीं स्वर्गप्राप्तीकरितां अग्निचयनाचें अनुष्ठान आरंभिलें. त्या असुरांचा पाडाव व्हावा म्हणून इंद्र वेषांतर करून त्यांच्याजवळ आला व त्यांनां म्हणाला, हे असुर हो, मी ब्राह्मण आहें. मला तुमच्या अनुष्ठानांत घ्या, मलाहि स्वर्गाला यावयाचें आहे. असुर 'बरें' म्हणाले. त्या असुरांपैकीं प्रत्येकजण चयनसंबंधीं विटा ( इष्टका ) मांडीत होता. त्यावरोबरच इंद्रानें आपलीहि एक वीट मांडली व मनामध्यें 'ही माझी चित्रानामक वीट' अशी खूण ठेवली. अनुष्ठान संपल्यावर त्या मांडलेल्या चयनावर आरोहण करून ते असुर स्वर्गाला जावयाला निघाले इतक्यांत त्या मांडलेल्या चयनांतून इंद्रानें आपली वीट हलकेच काढून घेतली त्यावरोबर स्वर्गलोकांत उड्डाण करणारा तो चयनरूप श्येनपक्षी ढांसळून खालीं पडला. अर्थात् असुरांचाहि स्वर्गास जाण्याचा मार्ग खुंटला. कांहीं असुरांनीं अर्धवट स्वर्गाचा पल्ला गांठला होता पण ते चयन ढासळण्याच्या दोषामुळें 'कोळी'नामक सहा पायांचे किडे झाले. दोघेजण असुर श्रद्धातिशयतेमुळें स्वर्गापर्यंत जाऊन भिडले पण शेवटीं चयनभ्रष्टतेच्या पापामुळें ते दोघेहि देवलोकांमध्यें दोन कुत्रे झाले. ( तै. ब्रा. १.१,२ )

वराहावताराचें मूळ.—या सृष्टीच्या पूर्वीं पर्वत, समुद्र, नद्या वगैरे कांहीं नव्हतें. फक्त सर्वत्र पाणी होतें. तेव्हां प्रजापतीनें जग निर्माण करण्यासाठीं विचाररूप तप केलें. तेव्हां त्या अफाट पसरलेल्या जलसमूहांत प्रजापतीला लांब अशा देंठाला चिकटून असलेलें एक कमळाचें पान दृष्टीं पडलें. त्यावरोबर त्यानें तर्क केला कीं, या कमळाच्या देंठाला आश्रयभूत अशी वस्तु पाण्याच्या तळाशीं असावी. मग प्रजापतीनें डुकराचें रूप धारण करून त्या कमळाच्या देंठाच्या रोंखानें पाण्यांत बुडी मारली. पाण्याच्या तळाशीं गेल्यावर त्याच्या हाताला भूमि लागली तेव्हां त्यानें आपल्या तीक्ष्ण दाढेनें त्या भूमीपैकीं कांहीं चिखलासारखा भाग उकरून मोकळा करून घेतला व त्यासह तो उसळी मारून पाण्याच्या वर आला आणि त्यानें खालून आणलेला भूमीचा अंश पूर्वीं दिसलेल्या कमळाच्या पानावर पसरून ठेवून दिला. अशा रीतीनें कमळाच्या पानावर भूमी पसरली गेली ( प्रथन पावली ) तेव्हांपासून भूमीला पृथ्वी हें नांव पडलें. ( तै. ब्रा. १.१,३ )

मनूची इडा.—मनूची संबंधी व यज्ञतत्त्वाचें प्रकाशन करणारी 'इडा' नामक एक स्त्री होती तिनें असुरांनीं अग्न्याधान केल्याची खबर ऐकली. तेव्हां ती असुरांच्या येथें गेली व त्यांनीं केलेली अग्नीची स्थापना क्रमदृष्ट्या चुकली आहे असें तिला आढळून आलें. देवांनीं अग्न्याधान केलेलें समजलें तेव्हां तेथेंहि ती गेली. त्याठिकाणींहि देवांच्या अग्निस्थापनेचा क्रम चुकला असलेला तिनें पाहिला तेव्हां ती मनूकडे येऊन त्याला म्हणाली कीं, मी तुझा अग्न्याधानसंस्कार करतें व देव आणि दैत्य यांनीं अग्निस्थापनेच्या क्रमांत चूक केल्यामुळें त्यांचा फलादेश फुकट गेला तसा तुझा न जाईल अशा रीतीनें तुझ्या अग्न्याधानांत अग्नीच्या स्थापनेचा क्रम मी अमलांत आणतें. मग मनूनें त्या इडेच्या करवीं अग्न्याधानसंस्कार केला. त्यांत इडेनें प्रथम गार्हपत्य, मग दक्षिणाग्नि व नंतर आहवनीय अशा क्रमानें अग्नीची स्थापना केली. त्यायोगानें मनूचा अग्न्याधानसंस्कार सफल होऊन तो प्रजा, पशू इत्यादिकांनीं संपन्न झाला. शतपथब्राह्मणांत मनूची व इडेची गोष्ट आहे ती अगदीं निराळी आहे. (तै. ब्रा. १.१,४)

देवासुर युद्ध.—देव व असुर यांचें युद्ध जुंपलें. विजयाची इच्छा करणाऱ्या देवांनीं आपला पैसा अडका अग्नीच्या स्वाधीन केला व लढाईस गेले. त्यांच्या मनांतील विचार असा कीं आपल्याला असुरांनीं जर जिंकलेंच तर आपल्या आपत्कालांत अग्नीजवळ आपण देऊन ठेवलेला आपला पैसा आपल्याला निर्वाहास उपयोगीं पडेल. अग्नीला तो सर्व पैसा सांभाळण्याचें अवघड काम होईना, तेव्हां त्यानें पशु, उदक व सूर्य या तीन देवतांच्या स्वाधीन त्यांतलें थोडथोडें द्रव्य केलें व जपून ठेवण्यास सांगितलें. सुदैवानें देवांचा लढाईत जय झाला व असुर पराभूत झाले. देव येऊन अग्नीजवळ आपला पैसा परत मागूं लागले पण त्यानें तो पश्वादि तिघांच्या स्वाधीन केला असल्याचें सांगून त्यांजकडून आपला पैसा घेण्याविषयीं सांगितलें. देवांनीं त्या त्रिवर्गाकडे मागणी केली. त्यांनीं दाद दिली नाहीं. शेवटीं देवांनीं अग्नीलाच खुप करून त्याच्या खटपटीनें पश्वादि देवतांपासून आपला पैसा परत मिळविला. (तै. ब्रा. १.१,४)

अदितीपासून देवांची उत्पत्ति.—पुत्रप्राप्तीची इच्छा असलेल्या अदितीनें साध्य नामक देव आपल्या पोटीं यावे म्हणून 'ब्रह्म' देवतेच्या उद्देशानें भात शिजविला. त्या भाताची आहुति दिल्यावर शिल्लक राहिलेला भात अदितीनें भक्षण केला. त्या योगानें ती गरोदर राहिली व त्या पहिल्या खेपेस तिला धाता व अर्यमा हे दोन जुळे मुलगे झाले. अदितीनें पुन्हां भात शिजविला व त्याची आहुति देऊन अवशेष राहिलेला भक्षण केला. पुन्हां ती गरोदर राहिली व त्या दुसऱ्या खेपेस तिला मित्र व वरुण हीं दोन जुळीं मुलें झालीं. तिनें तिसऱ्या खेपेस भात शिजवून हवनपूर्वक भक्षण केला त्या वेळीं ती गरोदर राहून तिला त्या खेपेस अंश व भग हे जोडे मुलगे झाले. अदितीनें शेवटच्या चौथ्या खेपेस पुन्हां भात शिजविला

आणि त्याचें हवन झाल्यावर शेष राहिलेला जेव्हां तिनें भात खाल्ला तेव्हां ती चौथ्या खेपेस गरोदर राहिली आणि तिला इंद्र व विवस्वान् हीं दोन जुळीं मुलें झाली. अदितीचे हे बारा मुलगे म्हणजेच द्वादशादित्य किंवा साध्य नामक देव होत. (तै. ब्रा. १.१,९)

देवासुरयुद्ध (प्रह्लाद, कयाधू यांचा उल्लेख).—देवांची व असुरांची लढाई सुरू झाली तेव्हां प्रजापतीनें आपला पुत्र जो इंद्र त्याला रणभूमीवरून काढून एका गुप्तस्थळीं नेऊन ठेवलें. हेतु हा कीं बलवान् अशा असुरांच्या हातून आपला दुर्बल पुत्र इंद्र मारला जाऊं नये. इकडे 'हिरण्यकशिपु' नामक असुराची स्त्री 'कयाधु' हिचा पुत्र 'प्रल्हाद' यानेंहि आपल्या असुरसेनेचा एक अधिपति असा आपला पुत्र 'विरोचन' ह्यालाहि रणभूमींतून पळवून एका गुप्तस्थळीं नेऊन ठेवलें. त्याचाहि हेतु असा कीं, आपल्या विरोचनाला देवांनीं केव्हांहि मारूं नये. पण या प्रजापतीच्या व प्रह्लादाच्या कृत्यामुळें देवांच्या व असुरांच्या सैन्यांवर सैनापत्य करावयास कोणीच राहिला नाहीं. तेव्हां देव प्रजापतीकडे आले व म्हणाले कीं, सेनापतीखेरीज सैन्यानें लढणें हें खरें युद्ध नव्हे. आपल्याला धीर देणारा अधिकारी नसल्यामुळें सैन्यांत प्रसंगीं पळापळहि सुरू होण्याचा संभव असतो. यामुळें आम्हाला अधिपतीची–इंद्राची फार जरूर आहे. आम्ही त्याला सारखे शोधीत आहों. प्रजापतीनें सांगितलें कीं, तुमचे तुम्ही त्याला शोधून काढा. मला कांहीं माहित नाहीं. मग देवांनीं इष्टी वगैरे करून इंद्राला शोधला. इंद्र सांपडला. तो सेनापतित्वाचें काम पाहूं लागला. शेवटीं देवांचा त्या लढाईंत विजय होऊन असुरांचा मोड झाला. (तै. ब्रा. १.५,९)

आंगिरसांचें सत्र.—चवथ्या वेदाचा प्रवर्तक अंगिरस याच्या कुळांतील ऋषींनीं 'सत्र' केलें. यज्ञामध्यें धर्मसंबंधीं अनुष्ठानासाठीं दूध काढण्याकरितां त्यांनीं एक पांढऱ्या रंगाची गाय बाळगिली होती. अवर्षणामुळें त्या गाईला रानांत चारा मिळेनासा झाला. फक्त यज्ञांत कुटलेल्या सोमवल्लीचा चोथा खाऊन त्या गाईनें आपल्या जीवाचा बचाव केला होता. त्या गाईचे असे हाल पोटापाई होत असलेले पाहून कृपाळू आंगिरसांनीं आपआपसांत बोलणें सुरू केलें कीं, अहो! आमच्या गाईच्या पोटापुरता चारा उत्पन्न करण्याची जर आमच्या अंगांत ताकद नाहीं तर आम्ही सत्र तरी कशाला करतों आहों? समृद्धिसंपादन करणाऱ्या महत्त्वाकांक्षी लोकांनींच सत्रासारखे मोठे यज्ञ करावे. आमच्या अंगांत गाईचा चारा मिळविण्याइतकें सामर्थ्य नाहीं ते आम्ही समृद्धि तरी कसली संपादन करणार? नंतर त्या ऋषींनीं पर्जन्यवृष्टीसाठीं 'कारीरि' नामक इष्टि केली त्याबरोबर खूप पर्जन्य पडला! जिकडेतिकडे हिरवागार चारा होऊन अवर्षणाची छाया पार नाहींशी झाली. परंतु नव्या उत्पन्न झालेल्या चाऱ्यामध्यें पितरांनीं एक प्रकारचा विषार उत्पन्न केला. आंगिरसांच्या गाईनें तो विषारदुष्ट असा चारा खाल्ल्यामुळें ती रोगट दिसूं लागली. आंगिरसांनीं तिची अवस्था पाहून हिला काय झालें असावें असा शोध चालविला. त्यांनां पितरांच्या कृतीनें विषारी झालेला चारा हिच्या पोटांत गेला आहे हें कळून आलें. मग त्यांनीं पितरांनां हविर्भाग देण्याचें कबूल करून संतुष्ट करून घेतलें तेव्हां पितरांनीं चाऱ्यांतला विषार काढून घेतला. मग आंगिरसांच्या गाईला उत्कृष्ट चारा मिळूं लागला व तीहि धर्मासाठीं खूप दूध देऊं लागली. (तै. ब्रा. २.१,१)

प्रजापतीपासून देव, असुर व इंद्र यांची उत्पत्ति.—प्रजापतीनें देव व असुर उत्पन्न केले परंतु देवांचा किंवा असुरांचा राजा (इंद्र) उत्पन्न केला नाहीं. मग देवांच्या विनंतीवरून इंद्र निर्माण केला. इंद्राच्या हातांत त्रिष्टुप् देवतेच्या अनुग्रहानें १५ धारांचें एक वज्र उत्पन्न झालें आणि त्या वज्रानें इंद्रानें असुरांचा पराभव केला. देवांनां स्वर्गाची प्राप्ति झाली पण स्वर्गांत देवांनां खावयास मिळेना. त्यांनीं विचार केला कीं, स्वर्ग ही भोगभूमि आहे कर्मभूमि नव्हे. यासाठीं भूलोकामध्यें कर्मं करून आपल्याला हविर्भाग देण्यासाठीं 'अयास्य' या अंगिरस गोत्रांतील ऋषीस भूमीवर एका यज्ञाच्या अनुष्ठानाची कल्पना देऊन पाठविला. नंतर त्या अयास्यानें भूलोकावर यज्ञानुष्ठान करून देवांस हविर्भाग देण्याचा प्रचार सुरू केला. (तै. ब्रा. २.२,७)

जगत्सृष्टि.—सध्या जें आपल्याला स्थावरजंगमात्मक जग दिसतें हें पूर्वीं कांहींएक नव्हतें. विधात्याच्या मनांत जग उत्पन्न करावें असें आलें. त्यानें जगदुत्पत्तीसाठीं मोठें तप केलें. तेव्हां त्या जगत्स्रष्ट्या परमेश्वराच्या मनःसंकल्पापासून एक प्रकारचा धूर उत्पन्न जाहला. नंतर पुनः तप केलें तेव्हां अग्नि, नंतर ज्योति, ज्वाला, प्रभा इ. इ. उत्पन्न झालें पण हें सर्व धूर वगैरे मिळून एक घट्ट गोळा झाला. हाच प्रजापतीचा बस्ति (मूत्राशय) होय. पुढें तो बस्ती परमेश्वरानें फोडला तेव्हां 'समुद्र' निर्माण झाला. मूत्राशयापासून समुद्राची उत्पत्ति असल्यामुळें त्याचें पाणी खारट असतें व तें कोणी पीत नाहीं. जलमय अशा समुद्रापासूनच प्रजापतीनें पृथ्वी, अंतरिक्ष, द्यौ हीं क्रमानें उत्पन्न केलीं. मग प्रजापतीनें आपल्याच शरीरापासून असुर निर्माण केले. मग दिवसरात्र व अहोरात्रांचा संधिकाल वगैरे निर्मिलीं. दिवसापासून देव व रात्रीपासून असुर निर्मिले. अशा रीतीनें सर्व प्रकारची प्रजा प्रजाप्रतीनें निर्माण केली. (तै. ब्रा. २.२,९)

प्रजापतीकडून इंद्राला देवांचें आधिपत्य मिळतें.–प्रजापतीनें देव उत्पन्न केले व त्या देवांच्या मागून–सर्व देवांत धाकटा–इंद्र उत्पन्न केला. नंतर प्रजापति त्याला म्हणाला

कीं, "हे इंद्रा, तूं स्वर्गांत जा, तेथें देव आहेत त्यांच्यावर तूं तेथें माझ्या आज्ञेनें आधिपत्य कर." इंद्र "बरें" म्हणाला व स्वर्गाला गेला तेव्हां देवांनीं त्याला विचारलें कीं, "तूं कोण"? तेव्हां इंद्र म्हणाला कीं, "मला प्रजापतीनें तुमच्यावर आधिपत्य करण्यासाठीं पाठविलें आहे, माझें नाव इंद्र." देव म्हणाले "आम्ही तुझ्यापेक्षां मोठे आहों तर तूं आमचा अधिपति कसा होणार? व तुझ्या योगानें आम्हीं आपलें कल्याण तरी काय करून घेणार?" देवांचें बोलणें ऐकून इंद्र ओशाळला व स्वर्गांतून परत प्रजापतीजवळ आला व देवांनीं केलेलें सर्व भाषण त्यानें प्रजापतीला निवेदन केलें. प्रजापतीजवळ एक प्रकारचें विलक्षण तेज ( सूर्याप्रमाणें ) होतें तें लक्षांत घेऊन इंद्र प्रजापतीला म्हणाला कीं, हें तेज तूं मला दे म्हणजे मी या तेजानें संपन्न होत्साता देवांचें आधिपत्य करण्यास लायक होईन. प्रजापति म्हणाला वा! हें तेज तुला जर मी देऊन बसलों तर मग माझी काय थोरवी राहणार? मला कोण विचारणार? मग मी कोण? इंद्र म्हणाला तूं 'कः' ( कोण? )=क=या नावानेंच प्रसिद्ध होशील. क म्हणजे प्रजापतिच तूं जरी मला आपल्या जवळचें तेज दिलेंस तथापि तुझें प्रजापतित्व कायम राहील. नंतर प्रजापतीनें आपल्या जवळचें तेजाचें एक 'पदक' तयार करून इंद्राच्या मस्तकावर बांधलें तेव्हां प्रजापतीनें पदक बांधलेला तो इंद्र देवांचें आधिपत्य करण्यास समर्थ झाला. ( तै. ब्रा. २.२,१० )

प्र जा प ति क न्या सी ता सा वि त्री चा सो मा शीं विवाह.– प्रजापतीनें सोम उत्पन्न केला व त्याच्या पाठीमागून तीन वेद उत्पन्न केले. सोमानें ते तीन वेद आपल्या मुठींत झांकून ठेवले होते. प्रजापतीची 'सीतासावित्री' नांवाची एक मुलगी होती. तिच्या मनांत आलें कीं, सोम आपला पति व्हावा. पण सोमाच्या मनांत प्रजापतीची 'श्रद्धा'नामक मुलगी भरली होती व तिच्याशीं आपलें लग्न व्हावें अशी सोमाची इच्छा होती. सीतासावित्री प्रजापतीकडे गेली व तिनें आपल्या मनांत सोमाशीं विवाह व्हावा अशी इच्छा असल्याचें त्याला सांगितलें. सोमाची मर्जी सीतेवर नसून श्रद्धेवर आहे हें प्रजापतीस माहीत होतें म्हणून सीतासावित्रीला सोम वश व्हावा यासाठीं प्रजापतीनें एक वशीकरणाचा प्रयोग केला तो असा कीं, 'स्थागर'नामक एक सुगंधी वनस्पति उगाळून तिचें गंध तयार केलें व तें मंत्रांनीं भारलें. मग त्या गंधाचा सीतासावित्रीच्या कपाळीं टिळा लावला. मग सीतासावित्री सोमाकडे गेली, सोम तिला पाहतांच मोहित झाला व तिला माझ्याजवळ ये म्हणून लाडीगोडीनें सांगूं लागला. सीतासावित्री त्या सोमाचें प्रेम आपल्यावर कितपत बसलें आहे याचा अंदाज घ्यावयासाठीं त्याला म्हणाली कीं, मी तुझ्याजवळ येईन पण तूं सर्वदा मला एकटीलाच भोगलें पाहिजेस, शिवाय तुझ्या मुठींत तूं काय जपून ठेवलें आहेस तें मला निष्कपटपणानें सांगशील तर मी तुझ्याजवळ येईन. सोम तिच्या प्रेमानें वेडा होऊन गेल्यामुळें तिच्या म्हणण्यास कबूल झाला व आपल्या हातांतील अमूल्य असे तीन वेद त्यानें त्या सीतासावित्रीला खुषीनें देऊन टाकले. सोमाचें व सीतासावित्रीचें लग्न झालें व तीं उभयतां प्रेमानें सुख भोगूं लागलीं. सीतासावित्रीप्रमाणेंच चतुर स्त्रिया आपल्या प्रियपतीकडून इच्छित वस्तूचा लाभ करून घेतात. 'स्थागर' वनस्पतीच्या गंधाच्या टिळ्यानें सीतासावित्रीला पति वश करण्यांत जसा गुण आला त्याचप्रमाणें जी स्त्री आपल्या पतीनें आपल्यावर प्रेम करावें असें वाटून ह्या वनस्पतीचा वशीकरण प्रयोग करील ती स्त्रीहि सीतासावित्रीप्रमाणें आपल्या पतीला वश करून घेऊन त्याचें प्रेम संपादन करील. (तै. ब्रा. २.३,११)

स्व र्ग प्रा प्ति वि ष यीं स्प र्धा.—पूर्वी एकदां आदित्यगण व आंगिरस महर्षी यांची स्वर्गलोकाच्या प्राप्तीविषयीं स्पर्धा लागली. आदित्यांनीं प्रथम स्वर्गाचा पल्ला गांठला. तेव्हां आंगिरस थोडेसे वरमले व आपल्यालाहि स्वर्ग मिळावा म्हणून आदित्यांचीं आर्जवें करूं लागले. त्यांनीं आदित्यांनां एक पांढरा घोडा दक्षिणा म्हणून बक्षिस दिला. आपल्याला जगत्प्रकाशक असा जो सूर्य दिसतो तोच आंगिरसांनीं दिलेला घोडा होय. हा घोडा इतर वारा आदित्यांनीं आंगिरसांपासून ग्रहण केला व ते त्यांनां म्हणाले कीं, हे आंगिरसहो, तुम्हीं जो घोडा आम्हाला दक्षिणा म्हणून दिलात तो आतां श्रेष्ठ झाला आहे. (तै. ब्रा. ३.९, २१)

इ न्द्र भ र द्वा ज सं वा द.—प्राचीनकाळीं भरद्वाज ऋषीनें सर्व वेदांचें अध्ययन करण्याचा प्रयत्न केला पण त्यास यश न आल्यामुळें त्यानें इन्द्राला प्रसन्न करून घेतलें. १००।१०० वर्षांपर्यंत आयुष्य असलेले तीन जन्म त्यानें इन्द्रापासून संपादन केले व त्या तिन्ही जन्मांत तो एकसारखा गुरुकुलामध्यें वेदाध्ययनच करीत राहिला. तिसऱ्या जन्मांत भरद्वाज अगदीं म्हातारा होऊन अंथरुणावर पडून राहिला असतां इन्द्र तेथें आला व त्याला म्हणाला, हे भरद्वाजा, जर तुला मी १०० वर्षें आयुष्याचा ४ था जन्म दिला तर त्या जन्मांत तूं काय करून आपला पुरुषार्थ साधशील? भरद्वाजानें उत्तर दिलें कीं, आपण जर पुन्हां १०० वर्षें जगण्याचा जन्म मला दिलात तर त्या पुढच्या जन्मांतहि मी मरेपर्यंत वेदाध्ययनच करीत राहीन. नंतर सर्व वेदांचें अध्ययन करण्याचा इरादा करणें अविचाराचें आहे असें भरद्वाजाच्या लक्षांत येण्यासाठीं इन्द्रानें आपल्या योगसामर्थ्यानें वेदांचे तीन पर्वताकार ढीग उत्पन्न केले व त्यांपैकीं एक एक मूठ वेदमंत्र आपल्याजवळ घेऊन तो त्या भरद्वाजाला म्हणाला, हे भरद्वाज, हे पर्वतप्राय तीन वेद पाहा. यांच्यामधला एकेक कण म्हणजे एक एक वेद आहे असें समज. तात्पर्य, वेद अनंत आहेत, तेव्हां सर्व वेदांचें अध्ययन करण्याचा हट्ट तूं सोडून दे. तुझ्याच्यानें सर्व

वेदांचें अध्ययन होणें अशक्य आहे. तूं आज तीन जन्मांत गुरुगृहीं जें अध्ययन केलें आहेस तें सरासरी मजजवळ असलेल्या या तीन मुठींच्या इतकेंच आहे. बाकीचे हे पर्वतप्राय वेदराशी तुला अजून ठाऊकसुद्धां नाहींत. सर्व वेदाध्ययन एका व्यक्तीच्या हातून होणें अशक्य आहे. आतां तुला सर्व वेदांचें अध्ययन केल्याचें श्रेय मिळेल असा 'सावित्राग्निचयन' मी तुला सांगतों. मग इन्द्रानें त्याला सावित्राग्नीचा उपदेश केला व तदनुसार आचरण केल्यामुळें भरद्वाजहि शेवटीं स्वर्गाचा अधिकारी झाला. ही सावित्राग्निविद्या विदेह देशाचा राजा जनक याला अहोरात्राभिमानी देवतांनीं उपदेशिली. (तै. ब्रा. ३.१०, ९–११)

कुमार नचिकेता.—अन्नदान करणाऱ्यांत सुप्रसिद्ध असा एक गौतमगोत्रोत्पन्न उद्दालक नांवाचा ऋषि असून त्यास 'नचिकेता' नामक एक पुत्र होता. उद्दालकानें एकदां विश्वजित् नामक यज्ञ करून आपलें सर्वस्व ऋत्विजांस दक्षिणा म्हणून देऊन टाकलें. त्या वेळीं 'नचिकेता' लहान—कुमार—होता. तरी त्याची बुद्धि अत्यंत विचारी व चलाख असल्यामुळें आपल्या बापाच्या हातून जी सर्वस्व दक्षिणा दिली जाणार ती यथाशास्त्र दिली जावी अशी त्याच्या मनांत श्रद्धा उत्पन्न झाली. त्या मुलानें असा विचार केला कीं, कर्म सफल व्हावें म्हणून जर माझा बाप सर्वस्व देऊन टाकीत आहे तर त्यानें माझेंहि दान केलें पाहिजे, कारण मी तर त्याच्या सर्वस्वापैकीं एक मुख्य आहें. मग तो आपल्या बापाला जाऊन म्हणाला, "हे तात, मला आपण कोणत्या ऋत्विजास देणार आहां?" मुलाचा हा प्रश्न बापानें ऐकून घेतला पण हा अजून बाल आहे याला कांहीं कळत नाहीं असा विचार करून त्यानें नचिकेत्याचे प्रश्नास उत्तर कांहींच दिलें नाहीं. नचिकेत्यानें पिच्छा न सोडतां आणखी दोन वेळ पूर्वोक्त प्रश्न विचारला. तेव्हां उद्दालक मुनीस वाटलें कीं, हा लहान आहे पण फार धूर्त आहे तर याला दरडावलाच पाहिजे. मग त्यानें त्या मुलाला मागें ढकलून रागाच्या आवेशांत वजाऊन सांगितलें कीं, "तुला मी मृत्यूला देऊन टाकतों." त्या वेळीं नचिकेत्याला उद्देशून आकाशवाणी झाली कीं 'हे गौतमकुमारा, तुझ्या पित्याचा उद्देश असा आहे कीं, तूं मृत्यूच्या घरीं जावेंस, पण तूं असें कर कीं, 'यम' घरीं नसून प्रवासास गेला असल्याची बातमी ठेऊन तूं त्या यमाच्या—मृत्यूच्या—घरीं जा. यम घरीं नसल्यामुळें त्याच्या घरच्या बायकामुलांनीं तुझी जेवणाखाण्यासाठीं प्रार्थना केली तरी तूं तीन दिवस कांहीं एक न खातां उपाशी रहा. इतक्यांत यम घरीं येऊन 'मुला, तुला येथें येऊन किती रात्री झाल्या? असा प्रश्न विचारील तर तूं त्यास 'तीन रात्री' असें सरळ व स्पष्ट उत्तर दे. नंतर त्यानें पहिल्या दिवशीं तूं काय खाल्लेंस? असा प्रश्न विचारला तर त्याला 'तुझी प्रजा खाल्ली' असें उत्तर दे. त्या योगानें एक दिवस अतिथि आपल्या घरीं उपोषित राहिला तर आपल्या प्रजेचा क्षय होतो ही गोष्ट त्याच्या लक्षांत येईल. दुसऱ्या व तिसऱ्या दिवशीं काय खाल्लेंस? म्हणून 'यम' विचारील तर 'तुझे पशू व तुझें सुकृत खाल्लें' असें उत्तर दे. त्या योगानें घरीं आलेला अतिथि २ ऱ्या व ३ ऱ्याहि दिवशीं उपाशी राहिल्यास आपल्या पशूंची व सुकृताची हानी होते हें त्याच्या लक्षांत येईल.

नंतर आकाशवाणीनें सांगितल्याप्रमाणें 'यम' प्रवासास गेला असतांना नचिकेता त्याच्या घरीं गेला व तीन दिवस उपाशीं राहिला. चवथ्या दिवशीं 'यम' घरीं आल्यावर आकाशवाणीनें सुचविल्याप्रमाणें 'मुला, तूं पहिल्या दिवशीं काय खाल्लेंस?' वगैरे प्रश्न यमानें त्याला विचारले व त्या प्रश्नांचीं उत्तरेंहि त्या नचिकेत्यानें आकाशवाणीनें सांगितल्याप्रमाणें दिलीं. त्याबरोबर हा मुलगा मोठा अधिकारी ज्ञानी आहे अर्थात् त्याला मारणें योग्य नाहीं असें यमाच्या मनांत येऊन तो नचिकेत्याला मोठ्या आदरानें म्हणाला, "भगवन्! मी प्रसन्न झालों आहें, तुला वाटेल ते वर मागून घे." नचिकेत्यानें 'मी जिवंत परत जाऊन आपल्या बापास भेटावें', 'माझ्या हातून घडणारीं श्रौतस्मार्त कृत्यें अक्षय्य होवोत' व 'मृत्यूवरहि जय मिळावा' हे तीन वर मागून घेतले व कृतकृत्य होत्साता तो कुमार नचिकेता स्वगृहीं परत आला. (तै. ब्रा. ३.११, ८)

गंधर्वगण.—१ स्वान, २ भ्राज, ३ अंघारी, ४ बंभारी, ५ हस्त, ६ सुहस्त, ७ कृशानु, ८ विश्वावसु, ९ मूर्धन्वान्, १० सूर्यवर्चा, ११ कृति.

अहल्येचा जार इन्द्र.—मेधातिथि नामक एक कण्वऋषीचा मुलगा होता. त्याला इन्द्रानें मेंढ्याचें रूप घेऊन पळवून नेलें. 'वृषणश्व' ऋषीची मुलगी 'मेनका' हिचा इन्द्रानें अभिलाष केला. एका प्रकारच्या *हरिणाचें रूप घेऊन इन्द्रानें यज्ञभूमींत प्रवेश केला व सोमरसाचें प्राशन केलें. गौतम ऋषीची स्त्री अहल्या हिच्याशीं इन्द्रानें जारकर्म केलें. कौशिक नांवाच्या ब्राह्मणाजवळ इन्द्र ब्राह्मणवेष घेऊन आला. गौतम ऋषीचा क्रोध शांत व्हावा व तो प्रसन्न व्हावा म्हणून इन्द्रानें त्याची स्तुति केली. (तै. सं. ७.९८,१;४.२१,८)

अष्टपुत्रा अदिति.—अदितीला आठ पुत्र झाले. त्यांपैकीं सात पुत्रांनां घेऊन ती देवांजवळ आली. आठवा पुत्र जो 'मार्तांड' त्याला तिनें टाकून दिलें. कारण आपल्यास सातच पुत्र व्हावे म्हणून तिनें आपल्या पतिसमागमाच्या वेळीं इच्छा धारण केली होती. अर्थात् सातच पुत्रांच्या योगानें आपल्याला वाटेल तेवढी प्रजावृद्धि होईल असें तिला वाटून तिनें सातच पुत्रांनां आपल्या

*गौरमृग कोणतें जनावर हें ठरत नाहीं. 'गवा' हें जनावर असावें काय?

बरोबर घेऊन देवलोकीं प्रयाण केलें. आठवा पुत्र 'मार्तांड' हा 'जगो किंवा मरो' त्याची कांहींच काळजी करावयाची नाहीं असें तिनें ठरविलें. मृत झालेल्या-फुटलेल्या-अंडापासून जन्माला आला म्हणून आठव्या पुत्राचें 'मार्तांड' असें नांव पडलें. 'मार्तांड' म्हणजे सर्वांनां प्रत्यक्ष असणारा सूर्य हाच होय. याचें खरें नांव 'विवस्वान्'. १ मित्र, २ वरुण, ३ धाता, ४ अर्यमा, ५ अंश, ६ भग, ७ इन्द्र व पूर्वोक्त विवस्वान् हे अदितीचे आठ पुत्र होत. ( अदितीच्या-देवमातेच्या-उदाहरणावरून सौभाग्यवती स्त्रियांनां 'अष्टपुत्रा-सौभाग्यवती भव' असा आशीर्वाद देण्याचा प्रघात पडला असावा काय? ) ( तै. आ. १.१३ )

देवांचे व असुरांचे यज्ञ.—स्वर्गलोकाचें आधिपत्य मिळविण्याच्या महत्त्वाकांक्षेनें जेव्हां देवांनीं यज्ञाला आरंभ केला त्याच वेळीं असुरांनींहि त्याच महत्त्वाकांक्षेनें यज्ञाला आरंभ केला. दोघांचेहि यज्ञ विस्तृत असे होते. असुरांनीं आपल्या यज्ञाचा प्रारंभ शास्त्राचा विचार वगैरे न करितां केवळ बाहुबलाच्या जोरावर केला होता. अर्थात् त्यांच्या यज्ञानुष्ठानाच्या वेळीं ब्रह्मचर्यादि नियम ते बिलकुल पाळीत नसत. तशी देवांची गोष्ट नव्हती. देवांनीं आपल्या यज्ञाचें अनुष्ठान यथाशास्त्र व ब्रह्मचर्यादि नियम पाळून चालविलें होतें. मौर्ख्यपरवशतेमुळें कर्तव्याकर्तव्याची ओळख न बाळगतां चालविलेल्या यज्ञाचें असुरांनां फल मिळालें नाहीं अर्थात् त्यांनां स्वर्गप्राप्तिहि झाली नाहीं. देवांच्या सशास्त्र अनुष्ठानानें त्यांनां यज्ञाचें फल मिळालें व ते स्वर्गाला गेले. ( तै. आ. २.१ )

राक्षसांचें सूर्याशीं युद्ध.—फार प्राचीन काळीं राक्षसांनीं उग्र तप केलें. त्यायोगानें प्रजापति संतुष्ट झाला आणि राक्षसांजवळ येऊन तो त्यांनां म्हणाला 'वर मागा'. राक्षस म्हणाले कीं, "सूर्याशीं आमची लढाई व्हावी." प्रजापति म्हणाला ठीक आहे. तुम्हीं सूर्याबरोबर लढा. तेव्हांपासून राक्षस दररोज सूर्य उगवल्यापासून मावळेपर्यंत त्याच्याशीं लढत असतात व त्याच्या गतीला अडथळा करीत असतात. त्या राक्षसांचें निवारण करण्यासाठीं ब्रह्मवादी ऋषी पूर्वाभिमुख उभे राहून गायत्रीमंत्रानें मंतरलेलें पाणी आकाशांत फेंकतात. त्या पाण्याचे बिंदू वज्ररूप बनून सूर्याशीं लढणाऱ्या राक्षसांनां लागतात व त्यामुळें पराभूत झालेले राक्षस मंदेह राक्षसांचा देश जो 'अरुणद्वीप' त्या ठिकाणीं पळून जातात. ( तै. आ. २.२ )

देवांचें युद्ध.—( कुरुक्षेत्र, खांडव, व मारवाड या देशांचा उल्लेख ) प्राचीन काळीं देवांनीं यशःप्राप्तीसाठीं अनेक साधनांनीं समृद्ध असें एक मोठें सत्र केलें. सत्राला आरंभ करतांना सर्व देवांनीं आपआपसांत असा करार केला कीं, या सत्राच्या योगानें जें कांहीं कीर्तिरूप-यशोरूप-फल मिळेल तें सर्वांचें आहे. त्या यशांत सर्वांचा सारखाच वांटा आहे. त्यांत अमक्या एकाचा अंश मोठा व अमक्याचा कमी असें करावयाचें नाहीं. सर्वांचा अधिकार त्या यशोरूप फलाच्या बाबतींत सारखाच मानावा. याप्रमाणें परस्परांत करार करून त्या देवांनीं सत्राला आरंभ केला. सत्रांत जमलेल्या देवांच्या व त्यांच्या अग्निहोत्रांच्या योगानें बराच मोठा प्रांत आक्रमिला गेला. पुराणप्रसिद्ध असा कुरुक्षेत्राचा प्रांत हाच त्यांच्या सत्रांतील वेदीचा भाग होता. कुरुक्षेत्ररूप अशा त्या पुण्यमय वेदीच्या दक्षिणेस खांडव देशाची हद्द लागली होती. पश्चिमेस 'परीणत्' नामक देशाची सीमा येऊन चिकटली होती आणि त्या कुरुक्षेत्ररूप वेदीच्या उत्तरेस 'तूर्घ्न' ( तुर्क ? ) देशाची सरहद्द येऊन भिडली होती. जलरहित व रखरखलेला असा जो 'मरु' ( मारवाड ) देश तो ह्या देवांच्या सत्रांतील उत्कर ( उकिरडा ) होता. सत्रामध्यें सर्वच यजमान व सर्वच ऋत्विज असा न्याय असल्यानें सत्रयागाच्या बाबतींत कर्तृत्वाचा अगर भोक्तृत्वाचा मान जरी सर्वांनां सारखाच असतो तथापि त्यामध्यें सर्वांच्या मतानें एकाला गृहपति म्हणून ठरविलें जातें व तो गृहपति हा आपल्यांतील एक नियंत्रणाधिकारी मानला जातो. अनुष्ठानाच्या बाबतींत कांहीं विशिष्ट गोष्टी करण्याचा मान सर्वानुमतें या एकट्या गृहपतीलाच ( पुढारी म्हणून ) मिळत असतो. देवांच्या सत्रांत गृहपतीचा मान विष्णूला मिळाला होता. सर्व देव सारखेच होते तरी प्रेक्षकांच्या दृष्टीनें गृहपति विष्णु हा अधिक श्रेष्ठ समजला गेला व जिकडेतिकडे लोकांच्या तोंडीं 'विष्णूनें सत्र केलें विष्णूनें सत्र केलें' असा बोभाट झाला. वास्तविक अशा वेळीं विष्णूनें आपल्या कार्यांत व फलांत इतर देव सारखेच वांटेकरी आहेत असें लोकांत प्रांजलपणें जाहीर करणें जरूर होतें पण आपल्या एकट्याच्याच नांवावर ह्या कृत्याचें कर्तृत्व लोकांनां वाटावें अशा प्रकारची बुद्धि विष्णूला झाली व तो आपल्या बरोबरीच्या देवमंडळीशीं ताठून वागूं लागला. लवकरच तो देवांचा उघड वैरी बनला. मूळचा करार मोडून सत्राच्या यशाचा, कीर्तीचा, कर्तृत्वाचा मान हा विष्णूच उपटून बसला हें देवांनां दुःसह झालें व आपल्या यशाचा वांटा त्याजकडून हिसकावून घेण्याकरितां व आपला वांटा त्यास कबूल करण्यास लावण्याकरितां ते सर्व देव एकत्र जमून विष्णूवर हल्ला करण्यासाठीं धांवून आले. देव येऊन विष्णूवर तुटून पडणार इतक्यांत विष्णूच्या इच्छामात्रेंकरून त्याच्या डाव्या हातांत एक धनुष्य उत्पन्न झालें ! उजव्या हातांत बाण उत्पन्न झाले ! ज्याच्या यज्ञप्रभुत्वामुळें धनुष्यबाण इच्छेबरोबर उत्पन्न झाले तो विष्णु म्हणजे 'यज्ञजन्मा'च होय. यज्ञ हाच विष्णु. यज्ञ व विष्णु यांच्यांत फरक नाहीं. धनुर्बाणाचा जन्म यज्ञजन्मा विष्णु यापासून झाल्यामुळें तींहि 'यज्ञजन्मा'च होत. धनुर्बाण धारण करणाऱ्या त्या एकट्या यज्ञपुरुषाला-विष्णूला पाहतांच बिनहत्यारी अशा त्या बहुसंख्याक देवांची गाळण झाली व त्यांच्यानें विष्णूवर हल्ला करवला नाहीं. आपल्याला पाहतांच

देव गर्भगळित झालेले पाहून त्यास स्वतःच्या थोरपणाचा विशेषच गर्व वाटूं लागला व त्यानें देवांची निर्भर्त्सना करण्याच्या उद्देशानें विकट हास्य केलें. पण अशा गर्विष्ठपणामुळें आतां आपल्यापेक्षां शक्तिमान् ऐश्वर्यवान् कोणी नाहीं असें त्याला वाटूं लागल्यामुळें तो बेफिकीर झाला व त्याच्या हातून स्वरक्षणाच्या कामीं प्रयत्नांची शिथिलता होऊं लागली. त्याच्या अंगांतलें पूर्वीचें तें यज्ञतेज निघून गेलें. तें तेज पुनः केव्हां-तरी विष्णु संपादन करील तर तें त्यास घेतां येऊं नये म्हणून त्याच्या शत्रूंनीं–देवांनीं–तें तेज कांहीं ओषधींत लपवून ठेवलें. त्या तेजाच्या सान्निध्यामुळें ओषधींनांहि तेज चढलें. अशा तऱ्हेनें तेजःसंपन्नतेला चढलेल्या त्या ओषधी म्हणजेच श्यामाक–स्मयाक–अगर 'सांवे' होत. स्मय म्हणजे हंसणें. विष्णूच्या हास्यामुळें ( स्मयामुळें ) जन्मले म्हणून ते 'श्यामाक' किंवा 'स्मयाक' होत. गर्वानें दुसऱ्याच्या तुच्छतेसाठीं हंसल्यानें विष्णूचें तेज नष्ट झालें. तसें आपलें न जावें म्हणून यज्ञ करणाऱ्या दीक्षितानें हंसूं नये. हंसूं आलेंच तर तोंडावर पदराचें झांकण घेऊन हंसावें म्हणजे आपलें हंसें दिसत नाहीं व तेजहि जात नाहीं.

आपल्यास सशस्त्र पाहून देव इकडेतिकडे पांगलेले विष्णूनें पाहतांच तो आपलें धनुष्य उभें, व ( त्याच्या वरच्या टोंकाचा ताण आपल्या हनुवटीला बसेल अशा रीतीनें ) टेंकून धरून सहज उभा राहिला होता. इतक्यांत त्याचा नक्षा उतरण्यासाठीं देवांनीं वाळवीच्या किड्यांनां बोलावून सांगितलें कीं, आमच्या कामांत तुम्ही साहाय्य करा. ते किडे म्हणाले आम्ही तुमचा फायदा करूं पण आम्हाला एक देणगी तुम्ही दिली पाहिजे ती ही कीं, आम्ही आपल्या चिमुकल्या तोंडानें जेथें थोडेंसें खणूं त्या ठिकाणीं जमिनींत ओलावा उत्पन्न झाला पाहिजे. देव म्हणाले ठीक आहे. नंतर आपल्या मुखानें खणल्याबरोबर ओलावा उत्पन्न करण्याचा वर मिळविलेले ते वाळवीचे किडे भूमीवरून हळू हळू चालत विष्णूनें टेंकलेल्या धनुष्याची ढिली झालेली दोरी थोडीशी जमिनीला चिकटली होती तेथें गेले व त्यांनीं आपल्या मुखांनीं ती दोरी कुरतडून टाकिली. दोरी तुटल्याबरोबर धनुष्याच्या कांबीटाचा विष्णूच्या हनुवटीला बसलेला ताण एकदम खुला झाला व त्याच्या झटक्यासरशीं त्या यज्ञपुरुषाचें–विष्णूचें–शिर धडापासून तुटून वेगळें झालें व लांबवर आकाशांत उडालें! त्या शिराचा वर उडण्याचा वेग सरतांच तें खालीं परत येऊं लागलें त्यामुळें त्या शिराला 'प्रवर्ग्य' असें नाव प्राप्त झालें. ज्या वेळीं तें यज्ञपुरुषाचें शिर भूमीवर 'घ्राँ३' असा आवाज करीत आदळलें त्या वेळीं त्याला 'घर्म' हें नांव मिळालें. महान् पराक्रमी अशा यज्ञपुरुषाच्या धडापासून तुटून निघालेलें तें सारभूत शिर असल्यामुळें त्याला 'महावीर' असें नांव प्राप्त झालें. देवांनीं तें शिर उचलून घेऊन ते धन्य झाल्यामुळें त्या-शिराला सम्राट् असें नांव पडलें.

शिरावेगळें असें त्या यज्ञपुरुषाचें धड तीन देवांनीं वांटून घेतलें. अग्नीनें प्रातःसवनात्मक शरीरभाग, इंद्रानें माध्यंदिन-सवनात्मक भाग व विश्वेदेवांनीं तृतीयसवनात्मक यज्ञशरीर भाग वांटून घेतला. पण प्रवर्ग्यरहित अर्थात् शिरोरहित असें तें यज्ञशरीर वांटून घेतल्यानें देवांनां कोणच्याच कर्मांचें अपेक्षित फळ मिळालें नाहीं व स्वर्गाचीहि प्राप्ति झाली नाहीं. यज्ञाचें शरीर शिरोभागरहित घेतल्यामुळें विफलहेतु झालेले ते देव अश्विनीकुमारांनां म्हणाले कीं, तुम्ही आमच्यांतले उत्कृष्ट वैद्य आहां तर हें एवढें यज्ञपुरुषाचें शिर त्याच्या धडाला पूर्ववत् चिकटवा. अश्विनीकुमार म्हणाले कीं, आम्ही शिर चिकटवूं पण तुम्ही यज्ञामध्यें आपल्या बरोबर आमच्या-साठींहि सोमरसाचा पेला भरला पाहिजे. देवांनीं ती गोष्ट कबूल केली. नंतर अश्विनीकुमारांनीं यज्ञपुरुषाचें शिर धडाला पुन्हां पूर्ववत् चिकटविलें! यज्ञशरीर सशिर झाल्यामुळें देवांनां त्यांच्या कर्मांचें यथार्थफल व स्वर्ग यांची प्राप्ति झाली.

( तै. आ. ५.१ )

**नरक व त्यांचीं स्थानें.**—१ विसर्पी, २ अविसर्पी, ३ विषादी, व ४ अविषादी असे चार नरक आहेत. आग्नेयी दिशेस विसर्पी, नैर्ऋत्येस अविसर्पी, ईशान्येस विषादी व वायव्येस अविषादी नांवाचा नरक आहे. विसर्पी नरकांत असलेला पापी दुःखवेदनेनें गडबडां लोळतो अगर इकडून तिकडे धांवत सुटतो. अविसर्पी नरकांतला पापी माणूस दुःखाच्या अतिशय वेदनेनें जागच्या जागीं निपचित पडून राहतो. विषादी नरकाची शिक्षा भोगीत असलेला अपराधी प्राणी 'आपण कोणीकडून असें पातक केलें?' असा पश्चात्ताप करीत असतो. अविषादी नरकांत पडलेल्या प्राण्याला अतिशयच दुःख भोगावें लागत असल्यानें पश्चात्तापसुद्धां करण्याची त्याच्या अंगांत कुवत रहात नाहीं. तो मुकाट्यानें पडून राहतो. ( तै. आ. १.१९ )

**ऐतरेयब्राह्मणांतील ऐतिहासिक व इतर परि-स्थितिदर्शक उल्लेख.**–अग्नि व विष्णु.–ऐतरेयब्राह्मणाच्या सुरवातीलाच "अग्निर्वै देवानामवमो विष्णुः परमस्तदन्तरेण सर्वा अन्या देवताः" ह्या मंत्रानें, त्या कालीं अग्नि व विष्णु हेच दोन मुख्य देव असल्याबद्दल सांगितलें आहे. सर्व देवता अग्नि व विष्णु या दोन देवतांमध्यें अंतर्भूत होत असत. प्रसंगानु-रोधानें इतर देवतांनांहि मधूनमधून प्रामुख्य दिलेलें आढळतें. द्वितीय पञ्चिका, खंड ३६ यांत "इंद्राग्नी वै देवानामोजिष्ठौ बलिष्ठौ सहिष्ठौ सत्तमौ पारयिष्णुतमौ", इंद्र व अग्नि हे सर्वांत सामर्थ्यवान्, शक्तिवान् वगैरे असल्याबद्दल वर्णन आहे. चतुर्थ पञ्चिका, खंड १८ यांत सूर्यदेवतेबद्दल "स वा एष उत्तरोऽस्मात्सर्वास्माद्भूताद्भविष्यतः सर्वमेवेदमतिरोचते यदिदं किंचोत्तरो भवति", हाच सर्वांत श्रेष्ठ असल्याचें वर्णन आहे. तरी देखील एकंदर सर्व देवता हीं अग्नीचींच रूपें असल्याबद्दल तृतीयपञ्चिका खण्ड ४ यांत वर्णन आहे. त्यांत

अग्नि हा इंद्रवायू, मित्रावरुण, अश्विनीकुमार, इंद्र, विश्वेदेव, सरस्वती इत्यादींचीं रूपें कशीं घेतो हें वर्णन केलें आहे.

देवासुरयुद्ध.—यांत आठदां देवासुरयुद्धाचे उल्लेख आले आहेत. ह्या सर्व उल्लेखांवरून असें दिसतें कीं, देव हे निरनिराळे यज्ञ करीत असतां असुरांनीं त्यांत विघ्न करण्याचें योजून हल्ले केले व युद्ध आरंभिलें, परंतु देवांनां यज्ञामुळें अपार सामर्थ्य प्राप्त होऊन त्यांनीं असुरांचा विध्वंस केला. कांहीं कांहीं ठिकाणीं, देवांचीं यज्ञकर्में पाहून असुरांनीं त्याप्रमाणें केलें, परंतु कित्येक गूढ मंत्र व क्रिया त्यांनां न समजल्यामुळें त्यांचा पराभव झाल्याचें वर्णन आहे. ह्यावरून 'देव' संज्ञा धारण करणाऱ्या आर्यांच्या कांहीं टोळ्यांत यज्ञसंबंधीं क्रिया चालत असत, व त्याच क्रिया 'असुर' संज्ञक लोकांस माहीत नव्हत्या असें दिसतें. वरील उल्लेखांत, असुरांनां धान्याचा कोंडा किंवा रक्तमांस इत्यादि वाईट पदार्थ यज्ञांत हविर्भाग म्हणून द्यावेत असें म्हटलें आहे. असुरांपेक्षां देवांनां जास्त सामर्थ्य प्राप्त होण्याचें कारण अग्निदेवाची योग्य स्तुति होय असेंहि सांगितलें आहे. ( १.१४; १.२३; २.७; २.११; २.३१; ३.३९; ४.५; ६.४ )

सोमोत्पत्तीचे उल्लेख.—यज्ञकाण्ड हें आर्यांच्या कांहीं विशिष्ट जातींत प्रचलित होतें. यज्ञकर्मास अत्यावश्यक असा जो सोम त्याच्या उत्पत्तीबद्दल ऐतरेय ब्राह्मणांत बरीच मनोरंजक माहिती आहे. "सोमो वै राजा गन्धर्वेष्वासीत्तं देवाश्च ऋषयश्चाभ्यध्यायन्कथमयमस्मान्सोमो राजाऽऽगच्छेदिति........" ह्यांत सर्व देव, ऋषी वगैरेंनीं सोमराजा आपल्या यज्ञकर्मांत कसा येईल असा विचार केला, त्या वेळीं सोम हा गंधर्वांत रहात असे तेव्हां वाक् ( वाणीची देवता ) हिनें स्त्रीचें रूप धारण करून सोमास देवलोकांत आणल्याचें वर्णन आहे. सर्व देव व ऋषी यांनीं गायत्री वगैरे छंदांनां सोमास परलोकाहून आणण्यास सांगितल्यावरून सर्व छंद पक्ष्यांचीं रूपें धारण करून परलोकीं गेले. म्हणून सोमाहरणप्रतिपादक स्तोत्रांस 'सौपर्ण' म्हणतात असें वर्णन आहे. एकदां यज्ञांत सोमरस पिण्याबद्दल देवसमुदायांत तेढ पडली तेव्हां त्यांनीं ठरविलें "यो न उज्जेष्यति स प्रथमः सोमस्य पास्यति—" जो कोणी ही पळण्याची शर्यत जिंकील तोच प्रथम सोमरसपान करील. सरतेशेवटीं वायू व इन्द्र प्रथम आले व नंतर मित्रावरुण आले, इत्यादि वर्णन आलें आहे. सोमापहरणास ईशान्य दिशा चांगली, कारण त्याच दिशेला देवांस असुरांवर जय मिळवतां आला, इत्यादि वर्णन यांत आहे. ( ऐ. ब्रा. १.२७; ३.२५; २.२५; १.१२ )

यामध्यें सोमाला अनुलक्षून एक मजेदार आख्यायिका दिली आहे. तिचा सारांशः प्रजापतीनें सूर्यासावित्रीनामक दुहिता 'सोम' राजास देण्याचें ठरविलें, व "हजार ऋचांचा समुदाय" ज्यास आश्विनशस्त्र म्हणून म्हणतात त्याचा पण लावला. सर्व देवांमध्यें ह्यामुळें अहमहमिका सुरू झाली व सरतेशेवटीं त्यांनीं गार्हपत्य अग्नीपासून सूर्यापर्यंत पळण्याची शर्यत लाविली, त्या सर्वांत अग्नि प्रथम पळाला तेव्हां आश्विनांनीं त्यास दूर सारून शर्यत जिंकली व ऋक्सहस्र संपादन केलें. पळण्याचे शर्यतींत अग्नीनें आपल्या रथास खेंचरें जुंपलीं होतीं, उषा देवतेनें अरुण वर्णाचे बैल जुंपले होते, आश्विनांनीं आपल्या रथास गर्दभ जुंपले होते अशा तऱ्हेचें वर्णन आहे. सध्यां गर्दभ सर्व प्राण्यांत अतिशय मठ्ठ, सावकाश चालणारा कां झाला याचें कारण त्यावेळीं गर्दभाला आश्विनांनीं रथास जुंपलें व शर्यत जिंकली परंतु गर्दभाचा वेग मात्र गेला व दूध नाहींसें झालें. फक्त आश्विनांनीं त्याच्या ठिकाणीं गर्दभाश्वतर जातिद्वयोत्पादक शक्ति ठेविली आहे, अशा तऱ्हेचें वर्णन आहे. (ऐ. ब्रा. ४.७)

यज्ञदेवता.—ऐतरेय ब्राह्मणांत, यज्ञदेवता देवांपासून दूर निघून गेल्याचे पुष्कळ ठिकाणीं उल्लेख आहेत. यज्ञदेवता गेल्यामुळें देवांनीं 'अदिती'ची प्रार्थना करून ती पुनः संपादन केल्याचें सांगितलें आहे. यज्ञदेवता देवांपासून दूर गेल्यामुळें देवांनां पुरतें अन्न मिळेना तेव्हां "आश्विनौ" देवतांनीं यज्ञदेवतेस पुष्ट केली, कारण "अश्विनौ वै देवानां भिषजावश्विनावध्वर्यू" अश्विन् हे देवांचे अध्वर्यू, वैद्य होत, असें वर्णन आहे. "यज्ञेन वै देवा ऊर्ध्वाः स्वर्गं लोकमायंस्तेऽबिभयुरिमं नो दृष्ट्वा मनुष्याश्च ऋषयश्चानु प्रज्ञास्यन्ति" यज्ञानेंच देव स्वर्गास गेले व त्यांनां भीति वाटली कीं, कदाचित् मानव, ऋषी वगैरे आपले यज्ञ पाहून स्वर्गास येतील म्हणून त्यांनीं 'यूप' हा खालीं तोंड करून पुरला. परंतु मानव, ऋषी इत्यादिकांनीं ही देवांची लबाडी ओळखली व देवांप्रमाणें यज्ञ करून स्वर्ग मिळविला. ( ऐ. ब्रा. १.७, १८; २.१ )

ह्यावरून एकंदर यज्ञाची उत्क्रांति कसकशी होत गेली असावी याचें उत्तम दिग्दर्शन होतें. प्रथम 'देव' नामक आर्य हे 'नरमेध' करीत असावेत, व त्यावरून पुढें 'अश्वमेध' करण्याचें त्यांनीं ठरविलें असावें असें दिसतें. "अश्वमेधां"तून 'गवालंभ,' गवालंभापासूनच पुढें 'अजालंभ' यज्ञ, ज्यांत 'अजापुत्र' बळी देत असत, त्याचा प्रघात पडला व हा प्रघात बराच काळपर्यंत प्रचलित होता असें "सोऽजे ज्योक्तमामिवारमत तस्मादेष एतेषां पशूनां प्रयुक्ततमो यदजः" या वाक्यावरून दिसतें. परंतु ऐतरेय ब्राह्मणकालींच ह्या सर्व यज्ञांची व्रीहियज्ञांत उत्क्रांति झाली होती असें या ठिकाणींच दिसून येतें. ( ऐ. ब्रा. २.८ )

ह्यांत "त्रयस्त्रिंशद्वै देवाः सोमपास्त्रयस्त्रिंशदसोमपाः", तेहतीस देव सोम पिणारे आहेत, व तेहतीस न पिणारे

आहेत, असें सांगून, आठ वसू, अकरा रुद्र, बारा आदित्य, प्रजापति व वषट्कार हे तेहतीस सोम पिणारे व अकरा प्रयाज, अकरा अनुयाज व अकरा उपयाज मिळून तेहतीस सोम न पिणारे देव होत असें वर्णन आहे. ( ऐ. ब्रा.२. १८)

शूद्र ऋषीचा स्वीकार.—ह्यांत एक शूद्र ऋषीची कथा आहे. भृगु, अंगिरा वगैरे ऋषी सरस्वती नदीचे तीरावर सत्र करीत असतां इलूषाचा पुत्र कवष ऋषिहि त्यांमध्यें बसला होता. भृगु, अंगिरा वगैरेंनीं हा कवष शूद्रापुत्र, जुगारी असल्यामुळें सत्रदीक्षेस योग्य नाहीं असा विचार करून त्यास दूर हांकलून दिलें व त्यास पाणीदेखील प्यावयास न मिळतां तो मरो, असा त्यांनीं विचार केला. परंतु कवषानें तसल्या निर्जन प्रदेशांत "अपोनप्त्रीय" सूक्त म्हणून सरस्वती नदीचा धांवा केल्यामुळें सरस्वती आपण होऊनच त्याकडे वळली. अजून ती जागा परिसारक या नांवाचें पवित्रक्षेत्र होऊन राहिली आहे. नंतर ऋषींनींहि त्यास परत बोलावलें. या कथेचा पूर्वी उल्लेख केलाच आहे. ( ऐ. ब्रा. २.१९ )

एका दीर्घजिह्वी नामक असुर स्त्रीनें प्रातःकालीं देवांकरतां तयार केलेले चरू चाटून अपवित्र केले परंतु आश्विनांनीं पुनः त्यांस शुद्ध करून यथासांग यज्ञकर्म होऊं दिलें असें वर्णन आहे. ( ऐ. ब्रा. २.२२ )

एका स्थळीं "देवरथो वा एष यज्ञः" यज्ञ हा देवांचा स्वर्गास नेणारा रथ आहे असें म्हटलें आहे. ( ऐ. ब्रा. २. ३७ )

बेदाचा मुलगा हिरण्यदन् याचें 'वषट्कार' या शब्दांतील सहा (षट्) वस्तू कोणत्या याबद्दल मत दिलें आहे. त्या सहा वस्तूंविषयीं विधान असें:– "द्यौरन्तरिक्षे प्रतिष्ठिताऽन्तरिक्षं पृथिव्यां पृथिव्यप्स्वापः सत्ये सत्यं ब्रह्मणि ब्रह्म तपसि–" आकाश हें वायूवर, वायू पृथिवीवर, पृथिवी पाण्यावर, पाणी सत्यावर, सत्य ब्रह्मावर, व ब्रह्म तपावर अधिष्ठित आहे. ( ऐ. ब्रा. ३.६ )

अग्नि हा देवांचा होता असतांना त्याला मारण्यास टपून बसलेला मृत्यु त्यानें कसा टाळला याचें वर्णन आहे. ( ऐ. ब्रा. ३.१४ )

देवत्व प्राप्ति.—ह्यांत ऋभू नामक मानवांनीं तप, यज्ञ वगैरे करून देवांच्या बरोबरच सोमपान करण्याचा मान मिळवला. परंतु कोणी देव त्यास आपल्याबरोबर घेईनात. सरतेशेवटीं प्रजापतीच्या सांगण्यावरून ऋभूंनां सूर्याबरोबर सोमपान करण्याचा मान मिळाला, तरी देखील "तेभ्यो वै देवा अपैवाबीभत्सन्त मनुष्यगन्धात्" सर्व देव, त्यांच्या ठिकाणीं मनुष्यत्वाचा किंचित् वास येतो, म्हणून ऋभूंचा फार तिरस्कार करूं लागले. (ऐ. ब्रा. ३. ३०)

यांत अशी आख्यायिका आहे कीं, देवांनीं अग्निष्टोमांत प्रवेश केला व असुरांनीं उक्थ्यांत प्रवेश केला, परंतु कृश, उंच, व फिकट रंगाच्या भरद्वाज ऋषीनें तें पाहून अग्नीस सांगितलें व अग्नीनें शुभ्र घोड्याचें रूप घेऊन असुरांस हांकललें, त्याचप्रमाणें, इंद्रानें वरुणाच्या मदतीनें असुरांस पळवून लावलें. ( ऐ. ब्रा. ३.४९–५० )

गाईंनीं देखील सत्र करून दहा महिन्यांचे अवधींतच खूर, व शिंगें प्राप्त करून घेतल्याचें वर्णन आहे. त्याचप्रमाणें स्वर्गांत आधीं कोणी प्रवेश करावा ह्याबद्दल आदित्य व अंगिरा यांजमध्यें तंटा असल्याचा उल्लेख आहे. ह्यांत दैत्यांच्या त्रासानें देवांनीं घोड्याचीं रूपें घेऊन दैत्यांचा नाश केल्याचें वर्णन आहे. ( ऐ. ब्रा. ४.१७;५.१ )

विश्वोत्पत्ति.—ह्यांत विश्वोत्पत्तीसंबंधीं वर्णन आहे. एकदां प्रजापतीला आपली मुलगी "द्यौ" किंवा "उषस्" हिला पाहून कामवासना उत्पन्न झाली. प्रजापतीनें ऋष्यनामक मृगाचें रूप धारण करून "रोहित" मृगीचें रूप धारण कारणाऱ्या आपल्या दुहितेशीं तो संग करण्यास प्रवृत्त झाला. तेव्हां प्रजापतीचें दुहितृगमनरूपी निषिद्धाचरण पाहून सर्व देवांनीं त्याच्या ठिकाणचा पापपुरुष मारण्याकरितां आपलीं भयंकर स्वरूपें एकत्र करून "भूतवान्" नांवाचा भयकारक पुरुष निर्माण केला. त्यानें प्रजापतीचा पापयुक्त मृगदेह मारला. "तमभ्यायत्याविध्यत्स विद्ध ऊर्ध्व उदप्रयतत्तमेतं मृग इत्याचक्षते य उ एव मृगव्याधः स उ एव स या रोहित्सा रोहिणी यो एवेषुस्त्रिकाण्डा सो एवेषुस्त्रिकाण्डा"—म्हणजे अशा रीतीनें भूतवानानें विगतासु केलेला प्रजापतीचा मृगदेह तोच सध्यां आपणांस मृगनक्षत्ररूपानें दिसतो. रोहिणीची तारा हीच प्रजापतीची कन्या होय व व्याध हाच रुद्र असून त्याच्या बाणाचें टोंक, मध्य, फाळ हे देखील आपणांस सध्यां आकाशांत दिसतात. त्या वेळीं प्रजापतीचें जें रेत पडलें त्याच्या निरनिराळ्या भागापासून निरनिराळ्या प्राण्यांची उत्पत्ति झाली. प्रजापतीला विश्वोत्पत्ति करण्याची इच्छा झाल्यावरून त्यानें प्रखर तप केलें व तीन लोक उत्पन्न केले, व त्यापासून आपल्या तपाच्या तेजानें अग्नि, वायु, आदित्य, तीन वेद, त्यापासून भूर्भुवःस्वः, त्यापासून अ, उ, म् हीं तीन अक्षरें उत्पन्न केलीं व अशा रीतीनें सर्व स्थावर जंगम प्राणी उत्पन्न झाले. ( ऐ. ब्रा. ३.३३; ५.३२ )

इंद्र व मरुत्.—ह्यामध्यें इंद्रदेवतेबद्दल बऱ्याच आख्यायिका आहेत. इंद्रानें एकदां वृत्रासुरास मारण्याचा बेत ठरवून सर्व इतर देवांस आपल्या मदतीस येण्यास सांगितलें. इतर सर्व देवांनीं वृत्रावर हल्ला केला. वृत्रानें आपल्यावर सर्व देव हल्ला करीत असलेले पाहून त्यांस भिवविण्याकरितां जोरानें श्वास सोडला, त्याबरोबर

सर्व देव भिऊन पळाले. मरुतांनीं मात्र इंद्राची पाठ न सोडतां त्यास वृत्रास मारण्याबद्दल धीर दिला. ह्याबद्दल इंद्रानें फक्त मरुतांनां आपले मित्र समजून यज्ञांत आपल्या-बरोबर त्यांस हविर्भाग देवविला.

हजारों युद्धांत दैत्यांचा पराभव केल्यावर व बलाढ्य वृत्रासुराचें हनन केल्यावर, इंद्रास आपण मुख्य देवता होऊन प्रजापतीचा मान आपणांस मिळावा अशी महत्त्वाकांक्षा उत्पन्न झाली. तेव्हां प्रजापति वगैरे सर्व देवांनीं त्यास 'महेंद्र' नांव दिलें.

इंद्राची 'प्रासहा' नामक वावाता जाया होती. सर्व देव तिच्याकडे गेले व त्यांनीं इंद्राच्या कृतसंकल्पाबद्दल तिजजवळ विचारलें, तेव्हां तिनें, "ह्यनुरात्रं पत्याविच्छते", स्त्री आपल्या पतीस रात्रीचे वेळीं हकीकत विचारते, त्याप्रमाणें मी विचारीन; नंतर सकाळीं मी तुम्हांस कळवीन असें सांगितलें, व त्याप्रमाणें तिनें देवांस इंद्राच्या बेतांची माहिती दिली. "सेना" हीच इंद्राची प्रासहा नामक जाया होय, व प्रजापति हा तिचा श्वशुर होय. (ऐ. ब्रा. ३.२०, २२)

सा म्रा ज्या भि षे क.—यांत इन्द्राच्या महाभिषेकाचें गंभीर उदात्त वर्णन आहे. प्रजापतिप्रमुख सर्व देवांनीं अतिशय बलवान्, ओजस्वी, शूर अशा इन्द्रदेवास आपला राजा करण्याचें ठरविलें तेव्हां प्रथम त्यांनीं राज्याभिषेक समारंभ करण्याचें ठरवून 'ऋच' नांवांच्या निरनिराळ्या वेदमंत्रांनीं विणलेलें व कित्येक देवतांनीं धरलेलें असें सिंहासन तयार केलें, प्रथम इंद्रानें सिंहासनास प्रणाम करून व सर्व देवतांचें त्याच्या ठिकाणीं अधिष्ठातृत्व कल्पून देवांच्या साम्राज्यपदाचा स्वीकार केला. तदनंतर इतर देवांनीं त्यास अभिषेक करून आपापल्या विशिष्ट शक्ती अर्पण केल्या. त्या अभिषेकोत्सवानें अभीष्ट वस्तू प्राप्त करून घेण्याची इंद्राचे अंगीं शक्ति आली व सरतेशेवटीं त्यानें मृत्यूवर देखील जय मिळविला. (ऐ. ब्रा. ८.१२; १४)

ह्यांत कोणत्या ऋषींनीं कोणत्या राजांस महाभिषेक केले त्यांची ऐतिहासिक माहिती आली आहे.

परीक्षितीचा मुलगा जनमेजय, ह्यास कवषाचा मुलगा 'तुर' नामक महर्षि ह्यानें अशा प्रकारानें राज्याभिषेक केला व जनमेजयानें त्यायोगानें संपूर्ण पृथिवी हस्तगत करून घेतली.

मनूचा मुलगा शार्यात राजा, ह्यास भृगुऋषीचा पुत्र च्यवन महर्षि यानें अभिषेक केल्यामुळें, त्यानें साम्राज्यदर्शक अश्वमेध करून देवांच्या यज्ञांत देखील गृहपति होण्याचा मान मिळवला.

सत्राजिताचा मुलगा शतानीक नांवाचा राजा ह्यास वाजरत्नाचा मुलगा सोमशुष्मा यानें अशाच रीतीनें अभिषेक केला व साम्राज्य मिळवण्यास समर्थ केलें. अशाच रीतीनें नारदपर्वतांनीं आंबष्ठ्य राजास साम्राज्याभिषेक केला, व त्याचप्रमाणें उग्रसेनाचा पुत्र युधांश्रौष्टि ह्यास अभिषेक केला.

ह्याच रीतीनें भुवनाचा मुलगा विश्वकर्मा यास कश्यप महर्षीनें महाभिषेक केला.

वसिष्ठ महार्षींनीं देखील पैजवन सुदास नांवाच्या राजास ह्याच प्रकारें अभिषेक केला.

अङ्गिरसाचा मुलगा संवर्तमहर्षि यानें याच प्रकारें अविक्षिताचा पुत्र मरुत्त यास अभिषेक केला.

अत्रिमहर्षीचा पुत्र उदमय ह्यानें अशाच रीतीनें अंगराजास अभिषेक केला व त्यांत अंगाचा पुरोहित उदमय हा दानें देतां देतां थकून गेला.

दीर्घतमस् महर्षीनें अशाच प्रकारें दुष्यन्तपुत्र भरत यास राज्याभिषेक केला व भरतानें हजारों अश्वमेध करून सर्वांनां मागें सारलें.

बृहदुक्थऋषीनें दुर्मुखनामक पांचाल देशाचे मालकास महाभिषेक समारंभाचें गुह्य निवेदन केलें व त्यामुळें तो सम्राट् झाला.

जानंतपय अत्यराति नामक ब्राह्मणास वसिष्ठगोत्रोत्पन्न सत्यहव्यनांवाच्या ऋषिपुत्रानें महाभिषेकांतील गूढ निवेदन केल्यामुळें तो सम्राट् झाला. परंतु पुढें अत्यराति यानें देवक्षेत्र 'उत्तर कुरु' हा देश देखील जिंकण्याची इच्छा केली तेव्हां सत्यहव्यानें त्याची वाईट महत्त्वाकांक्षा ओळखून त्याचें तेज काढून घेतलें व त्यामुळें शुष्मिण शैब्य राजानें अत्यरातीचा वध केला. एवढ्याकरतां *क्षत्रियानें ब्राह्मणांशीं द्रोह करूं नये. (ऐ. ब्रा. ८.२१)

न र मे ध.—यांत नरमेधाविषयीं निषेध दाखविणारी अशी शुनःशेपाची आख्यायिका सविस्तरपणें आली आहे. वेधसनामक इक्ष्वाकुवंशांतील हरिश्चंद्रनामक राजाचे पोटीं, शंभर बायका असून देखील संतान नव्हतें म्हणून एकदां पर्वतनारद असे दोन महर्षी त्याच्याकडे आले असतां त्यांनीं हरिश्चंद्र यास पुत्रप्राप्तीकरितां वरुणराजाची प्रार्थना करण्यास सांगितलें. तेव्हां त्यानें वरुणाकडे जाऊन पुत्रप्राप्तीबद्दल याचना केली व वरुणानें, जन्मल्याबरोबर तो पुत्र यज्ञांत देवांस द्यावा या अटीवर ती मान्य केली. पुढें त्यास 'रोहित' नामक पुत्र झाला. तेव्हां वरुणानें त्यास यज्ञांत देण्याची आठवण केली, तेव्हां हरिश्चंद्रानें, त्यास दहा दिवस होऊं देत, नंतर दांत येऊं दे, नंतर क्षत्रियत्व संस्कार मिळूं दे अशा अटींवर पुत्रयज्ञ करण्याचें वरचेवर लांबणीवर टाकलें. रोहितानें धनुष्य घेऊन वनांत पलायन केलें, व वरुणाशीं

* येथें जानंतपय यास अभिषेक होण्यापूर्वीं ब्राह्मण व नंतर क्षत्रिय म्हटलें आहे ही गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे.

लबाडी केल्यामुळें हरिश्चंद्रास 'जलोदर' रोग होऊन त्याचें पोट फुगलें. पुढें इंद्राचे सांगण्यावरून तो रोहित सहा वर्षे अरण्यांत फिरत होता. इतक्यांत त्यास अजीगर्त नामक ऋषि भेटला व त्याच्या तीन पुत्रांपैकीं एकास, आपल्याबद्दल वरुणास देण्याकरितां त्यानें विकत मागितलें. अजीगर्त थोरला मुलगा देईना व धाकटा त्याची माता देईना, म्हणून मधील जो शुनःशेप नामक पुत्र, तो रोहितानें शंभर गाईस विकत घेतला व त्यासह हरिश्चंद्राकडे येऊन त्यानें वरुणयज्ञ करून शुनःशेपास बळी देण्यास सांगितलें. वरुणानें क्षत्रियापेक्षां ब्राह्मण उत्तम म्हणून शुनःशेपाचा स्वीकार करण्याचें कबूल केलें. राजसूय यज्ञप्रसंगीं विश्वामित्र ऋषि यांनीं होत्याचें कार्य घेतलें. दुसरा कोणी हनन करण्यास तयार होईना, तेव्हां अजीगर्तानें शंभर गाई घेऊन आपला मुलगा शुनःशेप यास मारण्याचें काम अंगावर घेतलें. शुनःशेपास जेव्हां आपणांस यज्ञांत बळी देणार असें कळलें तेव्हां त्यानें वरुणाची व इतर देवतांची स्तुति केली व त्याचे एकेक पाश गळून पडले. यानंतर सर्व ऋषींनीं त्यास आपणांत अंतर्भूत केलें व विश्वामित्रानें त्यास आपला पुत्र म्हणून घेतलें, परंतु त्याच्या शंभर पुत्रांपैकीं थोरल्या पन्नास मुलांस शुनःशेपाचें बंधुत्व मान्य न झाल्यामुळें विश्वामित्रानें तुमची प्रजा चांडाल होईल असा त्यांस शाप दिला व मधुच्छंदादि धाकट्या बंधूंनीं शुनःशेपास मान्य केलें. अजीगर्तानें शुनःशेपाची आपल्या कुलांत येण्याबद्दल प्रार्थना केली परंतु शुनःशेपानें पूर्वीच त्याचें प्रेम ओळखलें होतें! ( ऐ. ब्रा. ७.१३–१८ )

**क्षत्रिय आणि यज्ञ.**—प्रजापतीनें चोहोंकडे यज्ञप्रसार केला व ब्रह्म ( ब्राह्मणजाति ) व क्षत्र ( क्षत्रियजाति ) हीं दोन्हीं उत्पन्न झालीं. यानंतर यज्ञावशिष्ट खाणारे व न खाणारे असे दोन तऱ्हेचे प्राणी उत्पन्न झाले, व ते ब्राह्मणजातींत, आणि क्षत्रियजातींत अनुक्रमें प्रविष्ट झाले. परंतु यज्ञदेवता त्या दोहोंपासून दूर गेली, तेव्हां ब्रह्म व क्षत्र, तिच्यामागें लागले. त्या वेळीं ब्रह्माचीं उपकरणें म्हणजे यज्ञकर्मास लागणारी सामग्री व क्षत्राचीं उपकरणें म्हणजे, धनुष्य, बाण, अश्व, रथ, चिलखत वगैरे होतीं. ब्रह्माचीं उपकरणें पाहून यज्ञदेवता ब्रह्माजवळ आली परंतु क्षत्राचीं उपकरणें पाहून त्यांपासून यज्ञदेवता दूर गेली. तेव्हां क्षत्रानें यज्ञकर्मांत आपणांस घेण्याबद्दल ब्रह्मयाची प्रार्थना केली. ब्रह्मयानें, तूं आपलीं उपकरणें टाकून, यज्ञकर्माचे वेळीं ब्रह्माचीं उपकरणें धारण करावींस असें सांगितलें. म्हणूनच क्षत्रियानें राजसूय यज्ञ करतांना आपल्या पुरोहिताचे प्रवर वगैरे घ्यावेत व तात्पुरतें ब्राह्मण बनावें. ( ऐ. ब्रा. ७.१९ )

सुपद्माचा पुत्र विश्वंतर यानें स्यपर्णांपासून आपलें पौरोहित्य काढून घेतलें. तरी देखील स्यपर्णांनीं यज्ञभागीं आपली जागा बळकावली. तेव्हां विश्वंतरानें त्यांस चाकरांकडून घालवून दिलें. तेव्हां त्यांपैकीं राम मार्गवेय नामक शूर पुरुषानें विश्वंतरास, इंद्रानें एकदा विश्वरूपास हांकलून दिल्यामुळें, वृत्रास मारल्यामुळें, अरुर्मघांनां मारल्यामुळें, बृहस्पतीची अवहेलना केल्यामुळें, त्यास सोमपानास कसें मुकावें लागलें, व त्यामुळें इतर क्षत्रियांस सोमपानाची कशी बंदी झाली हें सर्व राजास सांगितलें, व क्षत्रियानें सोमाबद्दल न्यग्रोधिक वृक्षाचा रस कां प्यावा याबद्दल उपदेश केला. ( ७.२७ )

**मंत्र म्हणण्यांत व्यत्यय.**—ऐतश नांवाच्या ऋषीनें "अग्नीचें आयुष्य" या नांवाचे कांहीं मंत्र पाहिले. त्यानें आपल्या मुलांस सांगितलें कीं, बाबांनों, मी जें म्हणत आहें त्यामध्यें व्यत्यय आणूं नका, कारण हे मंत्र यज्ञांत होणाऱ्या सर्व चुका, व्यंग्यें नाहींसे करणारे आहेत. परंतु हे मंत्र म्हणत असतांनां मध्येंच त्याचा 'अभ्यग्नि' नामक पुत्र आला व बाप वेडा झाला आहे असें म्हणून त्यानें ऐतश याचे तोंडावर हात ठेवला. तेव्हां बापानें त्यास 'तुला महारोग होईल' असा शाप दिला. ( ऐ. ब्रा. ६.३३ )

**नाभानेदिष्टाची गोष्ट.**—मनूचा मुलगा नाभानेदिष्ट हा गुरुगृहीं असतांना त्याच्या भावांनीं त्याची वांटणी आपापसांत वांटून घेतली, तेव्हां तो बापाकडे जाऊन कुरकुरूं लागला. बापानें सांगितलें कीं, कांहीं हरकत नाहीं, तूं आंगिरसांकडे जा व त्यांनां यज्ञकर्मांतील सहाव्या दिवशीं कोणते मंत्र म्हणतात ते सांग? तो आंगिरसांकडे गेला व त्यानें त्यांस यज्ञक्रियेचें मर्म सांगितलें. तेव्हां त्यांनीं यज्ञार्थ जमविलेलें सहस्र धन स्वर्गास जातेवेळीं ह्या नाभानेदिष्टास दिलें, पुढें रुद्रानें येऊन तें माझेंच आहे असें सांगितलें, व शंका असेल तर बापास विचार असेंहि सांगितलें, तेव्हां त्यानें बापाला विचारलें असतां मनूनें तें धन रुद्र या स्थानदेवतेचेंच आहे असें सांगितलें व नाभानेदिष्टानें येऊन तसेंच सांगितलें. तेव्हां रुद्रानें प्रसन्न होऊन त्यास तें धन देऊन कृतार्थ केलें. ( ऐ. ब्रा. ५.१४ )

**काद्रव अर्बुदाची गोष्ट.**—कद्रूचा मुलगा अर्बुद नांवाचा नागऋषि यानें यज्ञांचीं न्यूनें कशीं सुधारावींत व सोमरस कसा काढावा ह्याबद्दल ज्ञान सांगितलें. ( ऐ. ब्रा. ६.१ )

**विश्वामित्र व वामदेव.**—विश्वामित्र व वामदेव यांच्यामध्यें 'संपात ऋचा' कोणी पाहिल्या याबद्दल वाद आहे. विश्वामित्रानें सदरहू ऋचा पाहिल्या परंतु वामदेवानें सर्व लोकांस त्या माहीत केल्या. तेव्हां विश्वामित्रास दुसऱ्या कांहीं ऋचा दृष्ट झाल्या. ( ऐ. ब्रा. ६.१८ )

**देवभगाचें ज्ञान.**—यज्ञपशूच्या शरीराचे निरनिराळे भाग कोणाकोणांस द्यावेत हें ज्ञान श्रुताचा पुत्र देवभग यास झालें. त्यानें दिवंगत होण्याचे वेळीं हें गूढज्ञान दुसऱ्या

कोणास सांगितलें नाहीं. परंतु एका अमानुष व्यक्तीनें हें ज्ञान बभ्रूचा मुलगा गिरिज यास सांगितलें. ( ऐ. ब्रा. ७.१ )

पैंग्य व कौषीतकी.–पौर्णिमा व अमावास्या इष्टीवरील पैंग्य व कौषीतकी यांचीं निरनिराळीं मतें आहेत.(ऐ. ब्रा. ७.११)

जाबाल सत्यकाम व उद्दालक अरुणि यांचीं मतें.– राजांस अभिषेक करतांना मंत्र म्हणण्याबद्दल सत्यकाम व अरुणि यांचीं भिन्न मतें दिलीं आहेत. ( ऐ. ब्रा. ८.७ )

सुब्रह्मण्य वाक्.—वाक् हीच सुब्रह्मण्य आहे. कारण सोमास आणतांना ऋत्विज सुब्रह्मण्याह्वान करतात. म्हणून सोम हा सुब्रह्मण्यपुत्र आहे. ( ऐ. ब्रा. ६.३ )

**शतपथब्राह्मणांतील आख्यायिका.**—'अग्नि देवता–' वेदांचे अंगभूत जे ब्राह्मणग्रंथ त्यांमध्यें तत्कालीं प्रचलित अशा सर्व यज्ञविधींचें सांगोपांग विवेचन आहे, व त्यामुळें सर्व ब्राह्मणग्रंथांतून 'अग्नि' ह्या यज्ञिय देवतेलाच प्रामुख्य दिलेलें दिसून येतें. ( श. ब्रा. काण्ड, अध्याय, ब्राह्मण, कंडिका. १.१. १, २; १.५. १, ६; १.५. १, १०; १.५. १, ११ )

शतपथब्राह्मणाच्या सुरवातीलाच ( प्रथम काण्ड १.१,२ ह्यामध्यें) "अग्निर्वै देवानां व्रतपतिः" अग्नि हाच सर्व यज्ञ-व्रतें वगैरेंचा शास्ता आहे, असें वर्णन आलें आहे. त्याच-प्रमाणें ( प्रथम काण्डांतील ५. १, ६; ५. १, ८; ५. १, १०; ५. १, ११ ) ह्या उल्लेखांतून "अग्निर्वै देवानामद्धातमाम्", "अग्निर्वै देवानां मृदुहृदयतमः", "अग्निर्वै योनिर्यज्ञस्य" म्हणजे सर्व देवतांमध्यें अग्नि हाच मृदु अंतःकरणाचा असून, यज्ञाची जन्मदात्री देवता असल्याबद्दल वर्णन आहे. इतकेंच नव्हे तर "अग्निर्वै सर्वा देवताः" म्हणजे सर्व देवता अग्निमय असल्याबद्दल सांगितलें आहे. भुवपति, भुवनपति, भूतानां-पति, अशींहि अग्नीस नांवें दिलेलीं आहेत. "अग्निर्वै देवाना-मनीकं सेनाया वै सेनानीः" म्हणजे अग्नि हा देवांचा सेनानायक असून, पूर्वी देवांचा होता व दूत होता असें वर्णन आहे. वरुण, यम, रुद्र हीं देखील अग्नीचींच स्वरूपें आहेत असेंहि शतपथब्राह्मणांतून उल्लेख आहेत.

अग्नीच्या कथा.—खालील पहिल्या उल्लेखांत अग्नीनें आपलीं चार शरीरें विभागलीं व त्यांपैकीं तीन शरीरें नाहींशीं होऊन एका शरीरानें नंतर तो पाण्यांत दडून बसला असतां त्यास देवांनीं हुडकून काढलें तेव्हां अग्नीनें पाण्यास शाप दिला असें वर्णन आहे. दुसऱ्या दोन उल्लेखांत देवांनीं अग्नीची होतृपदावर स्थापना केली परंतु अग्नीचीं तीन्ही शरीरें मृत झाल्यामुळें अग्नि भ्याला; परंतु पुढें त्यानें आपणांस प्रथम हविर्भाग मिळेल या अटीवरच देवांचें होतृत्व मान्य केलें. चौथ्या उल्लेखांत, अग्नीच्या साह्यानेंच देवांनीं यज्ञाची कायम स्थापना केल्या-बद्दल वर्णन आहे. पांचव्या उल्लेखांत, मनुष्यास अग्नि हा यज्ञ करून पोसण्याबद्दल प्रार्थना करीत असल्याचें वर्णन आहे. शेवटच्या उल्लेखांत अग्नीनें केलेल्या कायमच्या यज्ञ-स्थापनेचा उल्लेख आहे. ( १.२. ३, १; १.३. ३, १३; १. ४. २, १; १.५. ३,२१; २.३. ३, १; ४.१. १, ६; )

प्रजापति व सृष्ट्युत्पत्तीच्या कथा.—"प्रजापतिर्वै यज्ञः" या ब्राह्मणवाक्यांत यज्ञासच प्रजापति हें नांव लाविलें आहे. परंतु कांहीं ठिकाणीं "द्वादश वै मासाः संवत्सरस्तस्य पञ्चर्तवः एष एव प्रजापतिः सप्तदशः" ह्यासारख्या वाक्या-वरून बारा महिने; म्हणजे वर्षभर काल ह्यासच "प्रजापति" म्हणतात. कांहीं स्थळीं "संवत्सरो वै पिता वैश्वानरः प्रजापतिः" असें म्हटलें आहे. प्रजापतिदेवतेबद्दल पुष्कळ कथा सांपड-तात. खालील पहिल्या दोन उल्लेखांत प्रजापतीचे सांधे खिळखिळे झाल्यामुळें देवांनीं यज्ञाच्या योगानें त्यास बरें केल्याचें वर्णन आहे. तिसऱ्या उल्लेखांत प्रजापतीनें आपल्या दुहितेबरोबर मैथुन करून प्रजोत्पत्ति केली व खालीं पडलेल्या रेतापासून उक्थांची उत्पत्ति झाल्याचें वर्णन आहे. चौथ्या उल्लेखांत मृत्यू हा प्रजापतीस मारण्याकरितां टपून बसला असतां प्रजापतीनें युक्तीनें त्याच्या वाटा बंद करून अमृतत्व मिळवलें असें वर्णन आहे. (२.४. २, १) ह्यांत प्रजापतीनें देव, पितर, मानव, असुर वगैरे निर-निराळीं अन्नें, देवांस यज्ञ, पितरांस स्वधा, मानवांस सकाळ संध्याकाळीं अशा रीतीनें अन्नें व ज्योति वांटून दिल्या.

पांचव्या उल्लेखांत प्रजापतीनें मुखापासून अग्नि प्रथम उत्पन्न केला व नंतर इतर देव, ओषधी, मनुष्य उत्पन्न केले असें वर्णन आहे. सहाव्यांत प्रजापतीनें 'दाक्षायणयज्ञ' किंवा ज्यास 'वसिष्ठयज्ञ' असेंहि म्हणतात तो करून प्रजोत्पत्ति केल्याचें वर्णन आहे. सातव्यांत प्रजापतीनें मानव, पक्षी, सर्प उत्पन्न केले परंतु अन्न नसल्यामुळें सर्वांचा नाश झाला तेव्हां त्यानें दूध उत्पन्न केलें त्यामुळें त्याच्या प्रजा जगूं लागल्या असें वर्णन आहे. आठव्या उल्लेखांत असें वर्णन आहे कीं, प्रजोत्पादन करून आलेला शीण घालवण्याकरितां प्रजापतीनें ११ बली देण्यास योग्य प्राणी निवडून त्यांच्या आहुती दिल्या. नंतर षष्ठ काण्डांतील चारी उल्लेखांतून सृष्ट्युत्पत्तीचें सांगोपांग वर्णन आहे. सृष्टीचे पूर्वी फक्त नाम-विकृतिरहित असें 'सत्' होतें, नंतर त्यापासून विराट् पुरुषाची उत्पत्ति झाली व त्यापासून प्रजापति उत्पन्न होऊन त्यानें पंचमहाभूतांची उत्पत्ति केली व इतर मानव, पशु, पक्षी इत्यादिकांची उत्पत्ति झाली. पुढील दोन उल्लेखांत देखील अशाच प्रकारची सृष्ट्युत्पत्ति वर्णन केली आहे. ( १.६. ३, ३५; ७.१. २, १; १.७. ४, १; १०.४. ४, १; २.२. ४,१; २.४. ४, १; २.५. १, १; ३.९. १, १; ६. १. १, १; ६. १. ३, १; ६. २. १, १; ६.२. ३, १; १०.१. ३, १; १०.५. ३, १; )

जलप्रलयाची कथा, व मत्स्यावताराची मूळ कल्पना.—सृष्ट्युत्पत्तीबद्दल अत्यंत महत्त्वाची आख्यायिका ह्यांत आली आहे. सूर्यवंशांतील मनुप्रजापति एका प्रातःकाळीं संध्यावंदन करीत असतां अर्घ्यांत एक मत्स्य आला व तो अर्घ्य टाकणार इतक्यांत मत्स्यानें मनूला भावी जलप्रलयाची साग्र हकीकत सांगून, त्यास उत्तरगिरि पर्वतावर पोहोंचविण्याचें आश्वासन देऊन आपणांस मोठा होईतोंपर्यंत संभाळण्याची प्रार्थना केली. मनूनें तो मत्स्य मोठा झाल्यावर महासागरांत सोडला. पुढें जेव्हां जलप्रलय झाला तेव्हां सर्व पृथ्वीवरील प्राणी वाहून गेले. परंतु मनूनें एका नावेंत बसून पूर्वीच्या मत्स्याचे साह्यानें उत्तरगिरीचे बाजूस प्रयाण केलें व पाणी उतरल्यावर त्या ठिकाणीं वसाहत करून आपण स्वतःच यज्ञापासून उत्पन्न केलेल्या मानवी इडादेवीबरोबर विवाह करून, यज्ञदेवतेस संतुष्ट करून प्रजोत्पादन केलें व म्हणूनच सांप्रत मनुष्यांस 'मानव' अशी संज्ञा प्राप्त झाली. पुराणांतील मत्स्यावताराची कल्पना सदरहु आख्यायिकेवरच वसविली असावी असें दिसतें. (१.८.१,१)

यज्ञांची उत्क्रांति.—वरील मनुप्रजापतिसंबंधानें आणखीहि पुष्कळ उल्लेख आहेत. त्यांपैकीं खालील पहिल्या उल्लेखांत मनूची यज्ञसंबंधीं आख्यायिका आली आहे. मनूचा एक बैल होता, त्याच्या डरकावणीस भिऊन दैत्यांनीं आपल्या 'खिलत' व 'आकुलि' या नांवांच्या दोन पुरोहितांकडून त्या बैलास मारविलें. तेव्हां वृषभांतील असुरभयोत्पादक यज्ञवाक् मानवीच्या शरीरांत शिरून दैत्यांनां मानवीच्या शब्दापासून फार भीति वाटूं लागली. तेव्हां त्या दोन दैत्यपुरोहितांनीं तिचा वध केला. ह्यावर ती यज्ञवाक् यज्ञसंभारांत प्रविष्ट झाली, तेव्हां मात्र दैत्यांचें कांहीं चालेना. दुसऱ्या उल्लेखांत यज्ञार्हत्व हें नरांतून अश्वांत, नंतर बैलांत, नंतर मेंढ्यांत व नंतर बकऱ्यांत अशा रीतीनें उत्पन्न झालें असल्याबद्दल वर्णन आहे.

पुढील तीन उल्लेखांत यज्ञ देवांपासून पळून गेल्यामुळें दैत्य देवांस कसा त्रास देऊं लागले व जेव्हां यज्ञदेवता देवांनीं वश केली तेव्हां त्यांस असुरांवर जय कसा मिळवितां आला इत्यादि वर्णन आहे. सहाव्या उल्लेखांत यज्ञ अदृश्य झाल्यामुळें देवांनीं आपआपसांत पळण्याची शर्यत लावून हविर्भागाची वांटणी केल्याचें वर्णन आहे. त्याचप्रमाणें सातव्या उल्लेखांत सर्व देवांनीं अग्नि, वरुण व इंद्र यांस अनुक्रमें राजा करून यज्ञविद्या संपादन केली असें लिहिलें आहे. आठव्यांत, देवांचे सांगण्यावरून अग्नीनें वाणीस तीनदां आह्वान केलें परंतु सरतेशेवटीं ती वाणी अग्नीकडे आली असतां देवांनीं तिचें ग्रहण केल्यामुळें सर्व असुर "हेऽरयो हेऽरयः" ह्या ऐवजीं "हेलवो हेलवः" असे विकृत उच्चार करूं लागले असें वर्णन आहे. नवव्या उल्लेखांत देवांनीं प्रथम यजु मंत्रानेंच यज्ञकर्में केल्याबद्दल वर्णन आहे. दहाव्या उल्लेखांत, सत्यासत्यांपैकीं देवांनीं सत्याचा आश्रय केल्यामुळें त्यांस यज्ञाची प्राप्ति झाली व असुरांनीं असत्य ग्रहण केल्यामुळें त्यांचा पराभव झाला असें वर्णन आहे.(१. १. ४, १४;१.२. ३,६; १. २. १, ७; १. ५. ४, ६; १. ७. २, २२; २. ४. ३, २; २. ६. ४, १; ३. २. १, १९; ४. ६. ७, १३; ९. ५. १, १३; १. २. ५, १.)

वामनावताराचें मूळ.—प्रथमकाण्डांत वामनावतारास आधारभूत अशी एक कथा आढळते. देवासुरयुद्धांत देवांचा पराभव झाल्यामुळें ते पळून गेले असतां असुरांनीं आपआपसांत पृथ्वीची वांटणी करण्याचें ठरविलें. हें ऐकून आपणांसहि पृथ्वीची वांटणी मिळावी या इच्छेनें यज्ञस्वरूपी विष्णुदेवतेस अग्रेसर करून देवांनीं असुरांकडे पृथ्वीची मागणी केली. परंतु असुरांनां मत्सर उत्पन्न झाल्यामुळें वामनस्वरूपी विष्णूनें आक्रमिलेल्या प्रमाणाइतकीच भूमि देवांस देण्याचें त्यांनीं ठरविलें, परंतु विष्णूनें आपलें विराट् स्वरूप धारण करून सर्व पृथ्वी व्यापिली, व अशा रीतीनें देवांनां त्रैलोक्याची मालकी मिळाली. ( १.२. ५, १. )

सोमोत्पत्ति व इंद्रसंबंधीं आख्यायिका.—यज्ञकर्मास आवश्यक अशा सोमरसाची उत्पत्ति पहिल्या उल्लेखांत दिली आहे. सोमराजा हा गंधर्वलोकांमध्यें रहात असे. सोमरसाच्या प्राप्तीबद्दल देवांनां इच्छा झाल्यामुळें त्यांनीं लबाडीनें गंधर्वांस स्त्रियांची फार आवड आहे हें जाणून वाणीस गंधर्वांकडे जाण्यास सांगून सोमास इकडे आणविलें. परंतु त्यांची खात्री होती कीं, वाणी पुनः देवांकडेच परतेल; व त्याप्रमाणें ती देवांकडे आली. दुसऱ्या उल्लेखांत गायत्री सोमाहरणाकरितां गेल्याचा उल्लेख आहे. कारण तिसऱ्या उल्लेखांत सांगितल्याप्रमाणें यज्ञकर्मांत सोमरसाची इंद्रदेवास फारच आवश्यकता होती. चौथ्या उल्लेखांत सोमाहरणाकरितां जात असलेल्या गायत्रीचा पंख तुटून पडल्यामुळें तोच पर्णवृक्ष झाला असें वर्णन आहे. ( ३.२. ४, १; ३.६. २, २; १.६. ४, १; १.७. १, १. )

इन्द्र व वृत्र.—पहिल्या उल्लेखांत इंद्र व वृत्रासुर ह्यांच्या युद्धाचें वर्णन आहे, पुढील उल्लेखांत हें युद्ध त्रिककुद पर्वतावर झाल्याबद्दल सांगितलें आहे. तिसऱ्या उल्लेखांत वृत्राच्या मरणाची बातमी द्रुतगति वायु ह्यानें देवांस सांगितल्यामुळें त्यास यज्ञांत हविर्भाग मिळाला असें वर्णन आहे. चौथ्या उल्लेखांत इंद्राचें नमुचि दैत्याबरोबर युद्ध झाल्याबद्दल वर्णन आहे. शेवटच्या दोन उल्लेखांत अशी कथा आहे कीं, हे सर्व वेद व यज्ञविद्या प्रथम असुरांनीं आपल्या हस्तगत करून घेतली, परंतु पुढें देवांनां असुरांपासून अत्यंत त्रास होऊं लागल्यामुळें इंद्रानें विश्वकर्म्याचा मुलगा वृत्र नांवाचा

ब्राह्मण याजपासून ऋक्, यजुः व साम हे तिन्ही प्रकारचे मंत्र हिरावून घेतले व त्यांच्या जोरावरच देवांनीं असुरांवर जय मिळविला. (१. १. ३, ४; ३. १. ३, १२; ४. १. ३, १; ५. ४. १, ९; ५. ५. ४, १; ५. ५. ५, १.)

रुद्रोत्पत्ति.—प्रजापतीचें अंग खिळखिळें झालें. तेव्हां मन्युखेरीज सर्व देव दूर पळाले व प्रजापतीला रडें आलें, त्यावेळीं पडलेल्या अश्रूंमुळें मन्यु हा हजार मस्तकांचा, अनंत नेत्रांचा असा झाला. जे अश्रुबिंदू खालीं पडले त्यांपासून हजारों रुद्रांची उत्पत्ति झाली. देवांनां फार भय वाटलें परंतु "शतरुद्रीय" स्तोत्रानें त्यांनीं रुद्रांची शांतता केली हें या प्रथम उल्लेखांत सांगितलें आहे; व नंतर त्यांस यज्ञांत हविर्भाग देऊं लागले असा दुसरा उल्लेख आहे. (९.१. १, ६; १. ७. ३, १.)

माधव विदेघाची कथा.—माधव विदेवनामक राजा आपल्या मुखांत सर्व विश्वास हितकर असा अग्नि धारण करीत असे. रहूगणाचा पुत्र गौतम ऋषि हा त्याचा पुरोहित होता. गौतमानें राजास कांहीं विचारलें असतां, अग्नि आपल्या मुखांतून बाहेर निघून जाईल या भीतीनें विदेघ हा कांहींच प्रत्युत्तर देत नसे. गौतमानें अग्नीची पुष्कळ स्तुति केली, परंतु व्यर्थ. मात्र एकदां स्तुति करतांना गौतमाच्या मुखानें "घृत" शब्द म्हटला गेल्यावरुन तो अग्नि विदेघाच्या मुखांतून बाहेर पडून चोहोंकडे प्रसार पावूं लागला. विदेघ व गौतम ह्यांनां देखील अग्नि दहन करूं लागला, तेव्हां माधवानें अग्नीच्या तापाचें शमन होण्याकरितां सदानीरा नदींत बुडी मारली. राजा व पुरोहित असे दोघेहि अग्नीमागें जाऊं लागले. त्या अग्नीनें पृथ्वीवरील सर्व नद्या कोरड्या पाडल्या, परंतु उत्तर दिशेकडून वाहणाऱ्या सदानीरा नामक नदीपुढें त्याचें कांहीं एक चाललें नाहीं व म्हणूनच तीस हें नांव प्राप्त झालें. ह्या नदीच्या पूर्वेकडील प्रदेशांत पवित्र ब्राह्मणसमुदाय रहात असतो व त्यामुळें आतां देखील सदरहु स्थान अति पवित्र मानलें जातें. (१. ४. १, १०.)

नक्षत्रांच्या आख्यायिका.—एका स्थलीं अग्न्याधानास प्रशस्त अशीं नक्षत्रें सांगून त्याजसंबंधीं आख्यायिका सांगितल्या आहेत. पैकीं प्रथम कृत्तिका नक्षत्राबद्दल माहिती आहे. (२. १. २, १.)

कृत्तिका ह्या षट्संख्येवर अधिष्ठित असून शिवाय अग्निनक्षत्र असल्यामुळें अग्न्याधानास हेंच नक्षत्र योग्य होय. पूर्वीं कृत्तिका ह्या सप्तर्षींच्या पत्न्या होत्या. परंतु पुढें सप्तर्षि उत्तर दिशेस उगवूं लागले व ह्या पूर्व दिशेस उगवतात, तरी पुरुषसंयोगाशिवाय ह्यांची वृद्धि होते म्हणून ह्या नक्षत्रीं अग्न्याधान करूं नये.

रोहिणी नक्षत्रावर अग्न्याधान केलें असतां मनुष्यांस आपल्या भोग्यवस्तूंची प्राप्ति करतां येते. प्रजापतीनें प्रजावृद्धीची इच्छा मनांत धरुन प्रथम अग्न्याधान रोहिणी नक्षत्रावरच केलें.

मृगशीर्ष हें प्रजापतीचें अयज्ञिय, निर्वीर्य असें शरीर आहे, तेव्हां मृगशीर्षावर आधान करूं नये.

फल्गुनी नक्षत्रावर अग्न्याधान अवश्य करावें. कारण ह्या नक्षत्राची देवता इंद्र असून फल्गुन हें इंद्राचें गुप्त नांव आहे व त्यावरून तत्संबंधीं नक्षत्रास "फल्गुनी" असें नांव मिळालें.

पुनः ज्यांस अग्नीचें आधान करावयाचें आहे त्यांस पुनर्वसु नक्षत्र प्रशस्त होय.

क्षत्रियांनां अग्न्याधान करण्यास "चित्रा" नक्षत्र योग्य आहे. कारण एकदां देव व असुर हे सर्धेनें स्वर्गारोहणाची इच्छा करीत होते. असुरांनीं 'रौहिण अग्नि' प्रसन्न करण्याचा उद्योग आरंभला. तेव्हां असुर हे आतां देवांनां जिंकतील म्हणून इंद्रास काळजी पडली. तेव्हां त्यानें एक युक्ति असुरांचा अधःपात होण्याकरितां योजली. असुर यज्ञ करीत असतां ब्राह्मणरूपानें इंद्र तेथें जाऊन मी आपलीहि इष्टिका ह्या तुमच्या अग्नीसच देतों असें म्हटलें तेव्हां देवांनीं 'बरें' म्हटलें. परंतु यज्ञसमाप्तीनंतर इंद्रानें आपली इष्टिका अग्नींतून उपसली व त्या योगानें असुरांचा यज्ञिय अग्नि ढांसळला व त्यामुळें असुरहि पराभव पावले. तेव्हां ही चित्रहेतुयुक्त इष्टिका पुढें चित्रानक्षत्र झाली.

हीं सर्व नक्षत्रें पूर्वीं वीर्यशाली क्षत्रिय होते. परंतु सूर्यानें त्यांचें वीर्य काढून घेतलें तेव्हां हीं सर्व 'नक्षत्र' संज्ञेस पात्र झालीं. तेव्हां सर्व नक्षत्रांपेक्षां सूर्योदयसमयींच आधान करणें हें प्रशस्ततर होय. ह्या नक्षत्रावर एखाद्या पुण्यकर्मेच्छूनें अग्न्याधान केलें असतां, सर्व नक्षत्रांचें त्यास फळ मिळतें.

भार्गवच्यवान व सुकन्या यांची कथा.—चतुर्थ काण्डांत भार्गवच्यवानाचें संपूर्ण आख्यान आलें आहे. भार्गवच्यवान नामक ऋषि अरण्यांत तपश्चर्या करीत बसला असतां समाधिस्थितींत होता. त्याच अरण्यांत शर्याताचे पुत्र शिकार करण्याकरितां आले असतां त्यांनीं ऋषीच्या अंगावर पुष्कळ मातीचीं ढेंकळें मारलीं. त्यामुळें शर्याताचे राज्यांत अतिशय भयंकर दुष्काळ पडून लोक हवालदिल झाले. पुढें शोध करितां त्यास च्यवान ऋषीसंबंधीं हकीकत कळली. तेव्हां त्यानें आपली सुकन्या नांवाची सुस्वरूप कन्या च्यवानास दिली. सुकन्या आपल्या वृद्ध पतीची उत्तम प्रकारें सेवा करीत असतां एकदां देवांचे वैद्य अश्विनीकुमार ह्यांनीं तीस पाहिलें व तिला वृद्ध पतीस टाकून आपल्याबरोबर चालण्यास सांगितलें, व "तुझा पति वृद्ध आहे व तूं अतिशय सुंदर आहेस" असें म्हणाले. सुकन्येनें ती हकीकत च्यवानास सांगितली. तेव्हां त्यानें पुनः जेव्हां अश्विनी भेटतील तेव्हां "तुम्ही तरी कोठें अजून पूर्ण आहांत"? असें म्हणण्यास सांगितलें. पुन्हां जेव्हां अश्विनी भेटले तेव्हां

त्यांनीं सुकन्येचें भाषण ऐकलें व यज्ञांत हविर्भाग मिळण्याकरितां च्यवानास तारुण्य दिलें व नंतर च्यवान व सुकन्या यांनीं उत्तम प्रकारें भोग भोगून परलोक संपादन केला व अश्विनींना तेव्हांपासूनच यज्ञांत हविर्भाग मिळूं लागला. कारण ह्यापूर्वी हे अश्विनी मनुष्यप्राण्याशीं फार संबंध ठेवतात म्हणून सर्व देवांनीं त्यांस यज्ञांतून हविर्भाग बंद केला होता. ( ४.१.५, १. )

शांडिल्यायन व दायांपति यांचा 'अग्निहोतृवाद.—यांत शांडिल्यायन यानें दायांपतीनें विचारल्यावरून अग्नीची स्थापना कशी करावी हें सांगितलें आहे. (९.५.१, ६४.)

देवांनीं विचारल्यावरून तुर कावषेय यानें वेदीची उपपत्ति सांगितली. ( ९.५.२, १५. )

शांडिल्य व साप्तरथवाहनी यांचा "प्रजापतीचा आकार" ह्यावर संवाद आहे. ( १०.१.४, १४. )

महाशाल जाबालाकडे धीर सातपर्णेय जाऊन 'वाक्' अग्नीची माहिती घेतो. ( १०.३.३, १. )

श्वेतकेतु आरुणेय याचा बापाशीं संवाद आहे. ( १०.३.४, १. )

औपवेश अरुण ह्याचे घरीं, सत्ययज्ञ पोलुशी, महाशाल जाबाल, बुडिल अश्वतरश्वी, इंद्रद्युम्न भाल्लवेय व गर्णसर्कराक्ष्य यांची सभा वर्णन केली असून विषय "अग्नि" होता. ( १०.६.१, १. )

**शतपथ ब्राह्मणाची ज्ञानपरंपरा**

ब्रह्मन्,
|
प्रजापति,
|
तुरकावषेय,
|
यज्ञवचस् राजस्तंबायन,
|
कुश्रि,
|
शांडिल्य,
|
वात्स्य,
|
माहित्थी वामकक्षायण,
|
कौत्स,
|
माण्डव्य,
|
माण्डूकायनि,
|
संजीविपुत्र,

ब्राह्मणांतील कथा मंत्रभागांतील कथांचें पर्यवसान होत. कांहीं अंशीं यजुर्वेद व अथर्ववेद यांतील कथा याहि ऋग्वेदमंत्रांतील कथांचें उत्तरकालीन पर्यवसान होत. कथासूत्रांचा प्रारंभ पहावयाचा झाल्यास तो ऋग्वेदांतच पाहिला पाहिजे. आख्यायिका व इतिहास यांचीं मुळें ऋग्वेदांत शोधावयाचीं तीं शोधणें म्हणजे दैवतेतिहासशास्त्रांत प्रवेश करणें होय. ऋग्वेदाकडे आणि तदंतर्गत दैवतेतिहिसाकडे वळण्यापूर्वी उत्तरकालीन स्वरूप म्हणजे ब्राह्मणांतील स्वरूप येथें दिलें आहे. त्या स्वरूपास अथर्ववेदांतील कथांचें थोडेंसें परिशिष्ट जोडलें म्हणजे ऋग्वेदांतील गूढें उकलवयास आपणांस उन्मुखता प्राप्त होईल. अथर्ववेदांतील पौराणिक कथांचीं पूर्वस्वरूपें दाखविणारे उल्लेख येथें देतों.—

**अथर्ववेदांतील ऐतिहासिक व पौराणिक कथांचीं बीजदर्शक स्थळें.**–"दाक्षायणऋषींनीं ज्याप्रमाणें शतानीकाला सोन्याचा ताईत बांधला." ( १.३५, १. )

"वेनानें गूढ परब्रह्म पाहिलें व पृश्नीनें जायमानांना दोहिलें." ( २.१, १. )

"गंधर्व (आदित्य?) आम्हांला परब्रह्म सांगो. तीन पाउलें गूढ आहेत." ( २.१, २. )

"ज्या अप्सरा विश्वावसुगंधर्वाच्या बरोबर असतात." ( २.२, ४. )

"इंद्रानें वृत्राला, ज्याप्रमाणें त्यानें यतींना मारलें, त्याप्रमाणें मारलें." ( २.५, ३. )

"सोमानें जुहूला घरीं नेली असतां, बृहस्पतीनें ब्रह्मचाऱ्याच्या मदतीनें तिला–आपल्या पत्नीला–परत आणली." ( ५.१७, ५. )

"वैतहव्यांनीं ब्राह्मणाची गाय खाल्ली म्हणून त्यांचा नाश करण्यांत आला," (अनुशासनपर्वांत वीतहव्य राजाला ब्राह्मणत्व स्वीकारावयाला लावल्याची गोष्ट आहे). ( ५.१८, १०. )

"वीतहव्याचे पुत्र सृञ्जय फार बलिष्ठ झाले, ते जवळजवळ स्वर्गाला जाऊन भिडले; पण त्यांनीं भृगूचा अपराध केला व नाश पावले," ( अनुशासनपर्वांतील कथेंत भृगूनें वीतहव्य राजाला आश्रय दिल्याची कथा आहे ). (५.१९,१.)

"ज्या तीन कालकञ्जांना स्वर्गांत देवांप्रमाणें उच्चस्थान दिलें." ( ६.८०, २. )

"या चारहि ऋचांत विष्णूनें त्रिपादभूमि आक्रमिल्याचा उल्लेख आहे." ( ७.* २७, १; ३; ४; ५. )

"ज्या भाषेच्या योगानें आसुरीनें ( वेबरच्या मतें ही विलिस्तेंगा व सायणाच्या मतें पुलोमा असुराची मुलगी शची असावी ) इंद्राला देवांमधून खालीं ओढलें." (७.३९, २.)

* Griffith मध्यें हें २६ वें सूक्त आहे.

"या ऋचा वसिष्ठ ऋषीनें कल्मषपाद ( सौदास ) राजाला उद्देशून म्हटल्या आहेत असें सायण म्हणतो. महाभारतांत कल्मषपाद राजाची कथा ( १.१७६ ) आहे त्याचें हें बीज दिसतें. भारतीय कथेहून ही भिन्न आहे." ( ८.४, १२-१६. )

"या इंद्रजालाच्या योगानें मी सर्वांना अंधकारानें आवृत करतों. महाभारतांत इंद्रजाल हें अर्जुनाचें एक दिव्य अस्त्र होतें असें म्हटलें आहे. ( ८.८, ८. )

"मायेपासून मातलि निर्माण झाला." ( ८.९, ५. )

"तिचा–विराज मायेचा–प्रान्हादि विरोचन म्हणून एक वत्स होता······द्विमूर्धा अर्त्व्यानें तिला दोहिलें. ( विरोचन, द्विमूर्ध हे असुर भागवतांत आलेले आहेत) वैवस्वतमनु तिचा वत्स व पृथिवी तिचें पात्र होतें." ( ८.१३, १. )

"वेनाचा पृथी ( पृथु ) यानें तिला ( विराजेला ) दोहिलें" ( पृथुराजाची कथा भागवतांत आहे. त्यानें स्वायंभुव मनूला वत्स करून पृथ्वीचें दूध काढलें स्कं. ४ भागवत. अ. १८ वा ) ( ८.१३, १; ११. )

"सूर्यवर्चसाचा मुलगा चित्ररथ पुण्यगंधेचा ( विराजेचें गंधर्व लोकांतील, नांव ) वत्स झाला व पुष्करपर्ण पात्र झालें. सूर्यवर्चसाचा वंशज वसुरुचि यानें तिला दोहिलें." ( ८.१४, ६; ७. )

"ती ( विराट् ) सर्पांकडे गेली तेव्हां त्यांनीं तिला 'विषवति' म्हणून संबोधिलें, तिचा वत्स वैशालेय तक्षक बनला, ऐरावत धृतराष्ट्रानें तिला दोहिलें."(८.१४,१३–१५.)

आठव्या कांडाच्या १० व्या सूक्तापासून पुढें विराज ही प्रत्येक लोकीं गेली आहे व तेथें तिला अमुक वत्स होऊन अमक्यानें तिला दोहिली वगैरे कथा आहेत त्यांतील वरींचशीं नांवें पुराणांतून आढळतात व कांहीं गोष्टीहि जुळतात; उदाहरणार्थ पृथु राजाची गोष्ट होय.

अपां फेनेन नमुचेः शिर इन्द्रोदवर्तयः ।

इंद्रानें पाण्याच्या फेंसाचें वज्र करून त्यानें वृत्राला मारिलें. ही कथा अनेक पुराणांतून आलेली आहे. पाण्याच्या फेंसांत विष्णूनें प्रवेश केला असें पुराणांत अधिक वर्णन असून वृत्र-हत्येचें पातक ब्रह्महत्या इंद्राच्या पाठीस लागली व तो पाण्यांत लपून बसला, नंतर अग्नीनें देवांचें दौत्य पतकरून त्याला परत स्वर्गांत आणिलें असें वर्णन आहे. ( २०.२९, ३. )

इन्द्रो दधीचो अस्थिभिर्वृत्राण्यप्रतिष्कुतः ।
जघान नवतीर्नव ॥ १ ॥

दधीची ऋषीच्या हाडांचें वज्र तयार करवून त्याच्या साहाय्यानें इंद्रानें वृत्राला मारिलें अशीहि कथा पुराणांतून सांपडते. ( वनपर्व अ. १००–१०१ ) (२०.४१, १.)

आविर्भुवत् सरमा पूर्व्यं ते ।

ह्या सरमा देवशुनीची गोष्ट महाभारतांत जनमेजयाच्या सत्राचे वेळीं आलेली आहे. ( २०.७७, ८. )

आतां दैवतेतिहासाकडे वळूं.

---

## प्रकरण १२ वें.

### वेदकालीन इतिहास—दैवतेतिहास.

वेदांत अनेक देवता आहेत. त्यांतील अनेक आजच्या प्रचलित देवतांहून भिन्न आहेत. आज ज्या देवतांचें महत्त्व समाजांत आहे त्यांपैकीं कितींचें महत्त्व किंवा त्यांचा निदान उल्लेख वेदांत आहे, जर कांहीं देवता वेदकालास आणि आजच्या कालास सामान्य असतील तर आजच्या देवतांस आज जें स्वरूप आहे तेंच वेदकालीं होतें काय, तसेंच वेदकाल म्हणून जो दीर्घ काल आपणांस दृष्टीस पडतो त्या कालांतल्या कालांतच दैवतांचें स्वरूप कितपत बदललें, तसेंच आर्यन् महावंशाच्या ज्या भारताबाहेर शाखा आहेत त्या शाखांमधील प्राचीन दैवतकल्पना वैदिक कल्पनांशीं कितपत जुळतात, शिवाय प्राचीन बाह्य आर्यन् लोकांच्या दैवतकल्पना आणि वैदिक दैवतकल्पना या दोन्ही त्यांहून अतिशय प्राचीन अशा दैवतकल्पनांचें पर्यवसान आहे काय, अशा प्रकारच्या प्रश्नांस उत्तरें देण्यासाठीं जें संशोधन करावें लागतें तें दैवतेतिहास या शास्त्रासाठीं केलेलें संशोधन होय.

हा अभ्यास थोडाबहुत झाला आहे. वैदिक कालांत ज्या देवता आपणांस दृग्गोचर होतात त्यांची यादी अगोदर करून त्या कालापुरतें अगोदर स्पष्टीकरण करावें आणि त्या स्पष्टीकरणानंतर आजची स्थिति आणि प्राचीन भारतीयेतर आर्यन् वंशांतर्गत राष्ट्रांची स्थिति यांची वेदकालीन दैवतात्मक स्थितीशीं तुलना करावी.

आतां वेदकालीन दैवतांचीच यादी पुढें ठेवतों. ही यादी करतांना प्रथमतः दैवत म्हणजे काय याची या विवेचनापुरती व्याख्या दिली पाहिजे.

येथें केवळ प्राचीन व्याख्या घेतली नाहीं. तर देव, देवयोनी, आणि राक्षस या सर्वांचा एकत्र समावेश केला आहे. लोक विरुद्ध झाले म्हणजे ज्या दैवतांस एकदां देवपण असतें त्यांसच राक्षसपणा देतात. यासाठीं दोहोंची एकत्र मिसळ करून यादी केली आहे. त्यांत देवता आणि राक्षसपिशाचादि वर्ग हा मागाहून निराळा काढतां येईल. वाईट करणारा तो राक्षस व चांगलें करणारा तो देव अशी सरसकट व्याख्याहि उपयोगीं पडत नाहीं.

येथें दिलेल्या यादींत प्राचीनांनीं मानलेले देव घेतलेच आहेत पण यास्क, सायण इत्यादि वेदबोधक आचार्यांनीं

ज्यांनां देवता ही पदवी दिली त्यांचाहि अंतर्भाव यांत केला आहे.

'या तेन उच्यते सा देवता' या नियमाप्रमाणें देवतांची केलेली निवड या यादींत समाविष्ट केली आहे. अर्थात् मंत्रांत ज्या देवतांचा उल्लेख आला आहे त्या देवता या यादींत स्वीकारल्या आहेत. यास्क, सर्वानुक्रमणी व सायणभाष्य यांमध्यें कांहीं देवतांविषयीं मतभेद आहे. तो खालीं टिपण करून जोडला आहे. देवतांचे सामान्य प्रकार 'द्युस्थ', 'अन्तरिक्षस्थ', 'भूमिस्थ,' 'गणदेवता', 'देवपत्न्यः' असे करितां येतात. ते यास्कानें देवताकाण्डांत दिले आहेत. त्यांत जोडदेवताहि पुष्कळ आहेत.

अथर्ववेदांत विशेषतः मणि, वृक्ष, सर्प, रोग, भूतपिशाच, इत्यादिकांचा देवतांतच संग्रह झाला आहे. त्या देवताहि संगृहीत केल्या आहेत.

यास्क व सायण यांचे दैवतविषयक मतभेद अगोदर देतों.

## यास्काचार्य व सायणाचार्य यांच्यांतील ऋग्वेदीय देवताविषयक मतभेद.

| देवतेचें नांव | यास्काचार्य | सायणाचार्य |
|---|---|---|
| **पृथ्वीवरच्या देवता.** | | |
| शकुनि २.४२,१. | शकुनि. | कपिञ्जलरूपी इन्द्र. |
| द्रुघण १०.१०२.९. | द्रुघण. | इन्द्र. |
| रात्रि १०.१२७,१. | ऋग्वेदांतील उदाहरण यास्कानें दिलें नाहीं. परंतु ऋग्वेदांत ती देवता आहे असें सायणावरून स्पष्ट दिसतें. | रात्रिदेवता. |
| हविर्धाने २.४१,२१. | हविर्धाने | द्यावापृथिवीदेवत्यौवा |
| शुनासीरौ ४.५७,५. | वाय्वादित्यौ | इन्द्रवायू व इन्द्रादित्यौ ४.५७,८. इन्द्रवायू आणि वाय्वादित्यौ. |
| शुन ४.५७,५. | देवता. | शुनाख्यो वाय्विन्द्रयोरन्यतरो देवः |
| **मध्यस्थानासंबंधीं देवता.** | | |
| अग्नि ४.५८,८. | वैद्युदग्नि. | वैद्युत् आणि पार्थिव. |
| अग्नि १०.८५,४०. | धर्म. | अग्नि. |
| क १०.१२१,१-८. | देवता. | कः, प्रजापतिः |
| तार्क्ष्य १०.७८,१. | देवता. | सुपर्ण*— |
| वात १०.१८६,१. | वात. | वायु— येथें महत्त्वाची गोष्ट ही आहे कीं, वात आणि वायु ह्यामध्यें यास्क भेद मानितो परंतु सायण किंवा अनुक्रमणीकार तसा भेद मानीत नाहींत. |
| ऋत ४.२३,८. | देवता. | इन्द्रो वा आदित्यो वा सत्यं वा यज्ञो वा |
| अहिर्बुध्न्य ७.३४,१७ | ,, | अग्नि. |
| विश्वानर १०.५०,१. | विश्वानर. | वैकुण्ठ इन्द्र. |
| ,, ७.७६,१. | वायु. | सर्वेषां नेता (सविता). सविता पद मन्त्रांत आहे. |
| विधाता १.१६७,३. | देवता. येथें यास्क फक्त विधाताच देव घेतो. व धाता ही देवता सांगतांना ऋग्वेदांतील उदाहरण न घेतां अथर्ववेदांतील उदाहरण घेतो. (अ० ७.१७,२.) | धाता व विधाता हीं दोनहि पदें आलीं असून सायण दोनहि देवतावाचक घेतो. |
| **मध्यस्थानाः देवगणाः** | | |
| रुद्राः ५.५७,१. | देवता | मरुतः |
| अंगिरसः १०.६२,५. | ,, | विश्वेदेवा अंगिरसो वा |
| आप्त्याः १०.१२०,६. | इन्द्र देवताक सूक्तांत गौण देवता. | इन्द्रसूक्तांत आप्त्यानां=आप्त्यव्यानाम् असें आहे |
| **मध्यस्थानाः स्त्रियः** | | |
| सरस्वती १.३.१२. | माध्यमिका वाक् | नदी. |
| अनुमतिः १.५९,६. | यास्क ऋग्वेदांतील उदाहरण देत नाहीं. | देवता. १०.५९,६ येथेंहि देवता घेतो. |

* १०.१३४,४. येथें 'सुपर्ण' ही स्वतंत्र देवता आहे. यास्कास 'सुपर्ण' ही देवता 'तार्क्ष्यापेक्षां वेगळी आहे ही गोष्ट मान्य आहे. सायणांनींहि—१०.११४,४. येथें 'सुपर्ण' ही मध्यस्थानांतील स्वतंत्र देवता असें मानिलें आहे. असा भेद असतां सायणांनीं 'तार्क्ष्य' या पदाचा अर्थ 'सुपर्ण' असा केला आहे हें विचारणीय आहे.

| | | |
|---|---|---|
| *स्वस्ति १०.६३,१६. | देवता. | विशेषण ( पृथिवीचें ) |
| *पथ्या १०.६३,१५. | उदाहरण देत नाहीं. | पथि योग्य सोदकदेश. |
| इळा ५.४१,१९. | देवता | भूमि गोरूपधरा मनोः पुत्री माध्यमिका वाक्. |
| उर्वशी १०.९५,१०. | ,, | या स्थलीं सायण उर्वशी देवता घेतो परंतु ५.४१,१९. येथें ' माध्यमिकी वाक् ' किंवा 'आदित्याख्या द्युस्थाना देवता असा अर्थ करितो अथवा अंतरिक्षस्थाना देवता असें म्हणतो. |

### द्युस्थानदेवताः

| | | |
|---|---|---|
| सविता १०.१४९,१. | आदित्य. | मध्यस्थाना देवता |
| सरण्यू १०.१७,२. | देवता. | मध्यमस्थाना. |
| वृषाकपायि १०.८६,१३. | आदित्यस्यपत्नी. | इन्द्राणी. |
| वृषाकपि १०.८६,२१. | आदित्य. | वृषाकपि; देव. |
| समुद्र ९.७३,४. | द्युस्थाना देवता. | अन्तरिक्षस्था. |
| दध्यङ्ङनुः अथर्व० १.८०,१६. | देव. | ऋषि. |

**ऋग्वेद आणि अथर्ववेद यांतील देवता.**—आतां देवतांची यादीच देतों. खालील यादींत ऋग्वेद, व अथर्ववेद यांतील सामान्य देवतांपूर्वी शून्याची ( ० ) खूण घातली आहे आणि फक्त अथर्ववेदांत आढळणाऱ्या देवतांपूर्वी फुली ( + ) घातली आहे. फक्त ऋग्वेदांत दृष्ट होणाऱ्या देवता चिन्हविरहित आहेत. या यादींत मतभेदास जागा असणें शक्य आहे.

०अंश
+अंशु
०अकूपार
०अक्ष
०अग्नायी
+अग्नाविष्णु
०अग्नि
अग्नीपर्जन्यौ
०अग्नीषोमौ
अघ्न्या
अङ्गिरसः
+अज
०अजएकपात्
+अत्रिन्
०अथर्वा
०अथर्वाणः
०अदिति
+अनड्डह्
+अनुपलाल
०अनुमति
+अनुम्रोक
+अनुराधा
+अनुसर्प
+अंतक
+अंतरिक्ष
०अपांनपात्
+अपोदक
०अप्वा
०अप्सरस्
+अभिजित्
अभीशु
+अमावास्या
+अरणि
अरण्यानी
अरमति
+अररु
+अराति
अरु
+अरुंधती
+अर्क
+अर्काश्वमेधौ
+अर्जुनि
अर्धदेव
+अर्बुद
+अर्बुदि
०अर्यमा
+अलिंश
+अलीक
+अश्वः
+अश्वयुजस्
अश्वाजनि
०अश्विनी
०अश्विनौ
+असित
असु
असुनीति
अहना
०अहि
०अहिर्बुध्न्य
+अहोरात्रे
+आङ्गिरस
+आंजन
आदितेयम्
०आदित्य
आदित्याः
०आपः
+आप्त्य
+आवयु
आर्ली
+आर्द्रा
+आलिगी
+आशा
+आशापाल
+आशारैपी
+आश्रेष
+आश्लेषा
+आसुरी
+आहवनीय
०इंदु
०इन्द्र
इन्द्रनासत्या
०इन्द्रपत्नी
+इन्द्रपुत्र
०इन्द्रवायू
इन्द्राकुत्सा
०इन्द्राग्नी
०इन्द्राणी
इन्द्रापर्वता
०इन्द्रापूषणा(अ० इन्द्रापूषणौ)
इन्द्राबृहस्पती
इन्द्राब्रह्मणस्पती
इन्द्रामरुतः
०इन्द्रावरुण
इंद्राविष्णू
०इंद्रासोमा ( अ० इंद्रासोमौ )
+इरावती
इषु
इषुधि
०इळा ( अ० इडा )
+ईशान
+ईश्वर
+उग्रजित्
+उग्रंपश्या
+उदुम्बल(र)
+उद्वाचन
+उपजीक
+उपतृण्य
+उपब्दा
+उपोह
+उरुगूला
०उर्वशी
०उलूखल
०उलूखलमुसल
०उषा
०उषासानक्ता
+ऊर्जा
ऊर्जानी
ऋत
+ऋतावरी
ऋतु
+ऋतुपति
०ऋभवः ( अ० ऋभु )
ऋभुक्षाः
ऋक्षः
+ऋक्षग्रीव

* वरील दोनहि देवता अनुक्रमणीकारास मान्य आहेत.

+एकवाद्या
+एकाष्टका
+ऐरावत
+ओदन
०ओषधि
+औक्षगंधि
०क
+ककुभ
+कंकपर्वन्
+करुम
+कैरत
+कर्षफ
+कशोक
+कश्यप
+कावव
+काम
+काल
+किमीदिन
+किष्किण
+कुकुन्ध
+कुकूरभ
+कुक्षिल
+कुबेर
+कुंभमुष्क
+कुष्ठ
+कुसूल
+कुहू
+कृत्तिका
०कृत्या
कृशानु
+कृष्णद्र
+केशवा
०केशी–केशिनः(अ० केशिन्)
+कोक
क्रंदनु
क्रंदसी
+क्रव्याद्
क्षेत्रस्यपति
+खलज
०गंधर्व
+गंधर्वाप्सरस्
+गंधर्वी
+गरुत्मान्
गांधर्वी
+गायत्री
+गार्हपत्य
गुंगू
+गुल्गुलु
०गौः
गौरी
०ग्नाः
ग्नास्पति
+ग्रह
ग्रावा
०ग्राहि
+ग्रीष्म
+घर्म
+चंड
चमू
चंद्रमाः ( अ० चंद्र )
चरण्यु
+चित्ररथ सौर्यवर्चस्
+चित्रा
+जंगिड
+जम्भ
०जातवेद
+जिघत्स्व
+जूर्णि
ज्या
+ज्येष्ठघ्नी
ज्येष्ठा
+तक्मन्
+तक्षक
+तक्षक वैशालेय
+तंगल्व
०तनूनपात्
+तरणि
+तावुव
०तार्क्ष्य
+तिरश्चिराजि
+तुंडिक
+तुंडेल
+तैमात
+तौबिलिक
+त्रायमाणा
०त्रित
+त्रितआप्त्य
त्र्यंबक
०त्वष्टा
त्वाष्ट्र
दक्ष
०दक्षिणा
०दधिक्रावा
दध्यङ्
+दर्भ
+दशवृक्ष
+दस्यु
दानव
दानु
+दास
+दिति
+दिवाकर
दुन्दुभि
+दुर्णामा
देव
देवजन
+देवत्य
०देवपत्नी
+देवमणि
+देष्ट्री
दैव्याहोतारा
०द्यावा ( अ० द्यौ )
द्यावाक्षामा
०द्यावापृथिवी
०द्यावाभूमी
०द्रविणोदाः
द्रुघण
+द्रुह
द्वारः ( देवी )
धनुः
०धाता
+धिषण
+धृतराष्ट्र
+धृष्णु
धेनु
नक्तोषसा
+नग्नक
०नराशंसः
+नलदी
+नारद
०नासत्यौ ( अ० नासत्या )
+निद्रा
+निराल
०निर्ऋति
+निलिम्प
+निःसाला
०निष्ट्रिग्री
+न्यर्बुदी
पक्ष्या
पणि
०पतंग
०पथ्या
+परमेष्ठिन्
+पराशर
पर्जन्य
+पर्जन्यपत्नी
+पर्णमणि
०पर्वत
+पलाल
+पलीजक
+पवमान
+पवीनस
+पशुपति
+पाप्मन्
०पितरः
पितु
०पिशाचि ( अ० पिशाच )
+पीला
+पुनर्वसु
पुरंधी
०पुरुष
पुरूरवस्
+पुष्य
+पूतिरज्जु
+पूर्वाफल्गुनी
+पूर्वाषाढा
०पूषन्
०पृथिवी
पृथिवीद्यावा
+पृदाकु
०पृश्नि
+पृश्निबाहु
+प्रचेतस्
०प्रजापति
+प्रमदिनी
+प्रमीलिन
+प्रस्व
+प्राण
+प्रोष्ठपदस्
+फल्गुनी
+बभ्र
+बभ्रु
बर्हिस्
+बलास
+बार्हत्सामा
बृसय
०बृहस्पति
बृहद्दिवा
+ब्रध्न
+ब्रह्मचारी
०ब्रह्मणस्पति
+ब्रह्मा
०ब्राह्मणासः
०भग
+भरणी
+भरुजि
+भव
+भवारुद्रौ
+भवाशर्वौ
भानु
०भारती
+भूतपति
+भूमि
भृगवः

+मकक
+मर्गुदि
+मघा
+मत्मट
+मणि
+मधुला
०मण्डूक–की
मनः
मनु
०मन्यु
+मरीमृश
०मरुत्
+मलिम्लुच
+महादेव
+महायम
+मही
०मातरिश्वन्
+मातली
+माया
मार्तांड
+माही
+मिति
०मित्र
०मित्रावरुण
+मूरदेव
+मूळ
+मृगशिरस्
०मृत्यु
+मेखला
+मेधा
+म्रोक
+यक्ष
+यज्ञ
०यम
+यमिनि
०यमी
+यातु
०यातुधान
यातुमावान्
रक्षस्
+रजतनाभि
०राका
+राजन्
०राट्
+राति
०रात्री
+राधः
+राष्ट्रभृत्
+राहु
+रुण्ड
०रुद्र
रुद्रिय
+रेवती
+रोहिणी
+रोहित
०रोदसी
+लक्ष्मी
+वघापति
+वत्सप
०वनस्पति
+वराह
०वरुण
०वरुणानी
वर्मन्
+वर्षा
+वव्रिवांसस्
+वसंत
+वसुरुचि सौर्यवर्चस्
वसहा
०वसु
वसोष्पति
वाक्
+वाचस्पति
०वाज
वाजिनः
+वाणी
०वात
०वातापर्जन्या (अ० वाता-पर्जन्यौ)
०वायु
०वास्तोष्पति
+विचृतौ
विधाता
विपाट्शुतुद्री
०विभावरी
विभ्वन्
+विलिंगी
०विवस्वान्
+विशर
+विशाखा
०विश्वकर्मन्
+विश्वजित्
+विश्वानर
०विश्वावसु
०विश्वेदेव (अ० विश्वदेव)
+विषफ
+विष्कंध
०विष्णु
+वृत्र
+वृश्चिक
०वृषभ
०वृषाकपायि
०वृषाकपि
+वेधस्
०वेन
+वैयाघ्र
०वैवस्वत
+वैश्रवण
०वैश्वानर
व्रा
शंयु
+शकधूम
+शकधूमज
शकुनि
+शकंभर
०शक्र
+शंख
०शची
०शचीपति
+शताभिषक्
+शतौदना (गाध)
+शमी
शमीनहुषी
+शरद
+शर्कु
+शर्व
+शांति
+शालुड
+शितिंग
+शितिकावती
+शितिपदी
+शिमिदा
+शिशिर
+शुक्र
+शुन
०शुनासीर
+शेरभ
+शेरभक
+शेवृध
+शेवृधक
श्येन
०श्रद्धा
+श्रवण
+श्रविष्ठा
+श्वित्र
+संवसु
+सदान्व
सपत्नी
+सप्तर्षि
०समुद्र
+समूह
सरण्यू
०सरमा
०सरस्वान्
०सरस्वती
+सर्प
सलिलः
ससर्परी
०सविता
०साध्याः
+सायक
+सावित्री
सिचौ
०सिनीवाली
सिन्धु
+सिलाची
+सीता
+सीर
+सुनामा
सुपर्ण
+सुमणि
सुत्रेआपि
सुसमिद्ध
सुसारथि
+सूनृता
सूर
०सूर्य
+सूर्यपत्नी
०सूर्या
०सूर्याचंद्रमसौ
०सूर्यामासा
सूर्यावसू
०सोम
सोमापूषणौ
०सोमारुद्रौ
सोम्यासः
+स्कंभ
+स्तम्बज
+स्विम
+स्वज
+स्वधा
+स्वराज
स्वस्ति
+स्वाति
स्वाहाकृति
+हस्त
०हिरण्यगर्भ
+हेमन्त

फुली केलेल्या अथर्ववेदांतील अनेक देवतांचा ऋग्वेदांतहि उल्लेख आला आहे पण त्यांस ऋग्वेदांत देवता मानलें नाहीं.

देव, स्वर्ग, निर्वाण, पुनर्जन्म, आत्मा इत्यादिकांचें विवरण ज्या शास्त्रांत येतें त्या शास्त्रास परमार्थसाधनशास्त्र म्हणतां येईल. परमार्थविषयक अत्यंत सामान्य कल्पना म्हणजे देवाच्या घरीं किंवा लोकांत जाणें. देवाविषयींच्या कल्पना ज्याप्रमाणें भिन्न त्याप्रमाणें पारमार्थिक कल्पना भिन्न असतात. दैवत-कल्पना निरनिराळ्या लोकांत निरनिराळ्या काळीं कशा उद्भवल्या, त्यांचे एकमेकांवर परिणाम कसे झाले, हा दैवतेतिहास शास्त्राचा विषय होय. या इतिहासाचें ज्ञान परमार्थसाधन-शास्त्रास फार महत्त्वाचें आहे. इष्टस्थान जें देवसंनिधि, मोक्ष किंवा निर्वाण तदर्थ उपासना व यज्ञादिकर्मे यांचा अभ्यास हा त्या शास्त्राचा दुसरा भाग होय. दैवतेतिहासांत देव आणि योद्धे यांच्यासंबंधीं कथा, आणि त्यांची उत्पत्ति, स्वभाव, कृत्यें आणि भोंवतालची परिस्थिति यांचें वर्णन येईल. मनुष्याच्या डोळ्यासमोर असणाऱ्या निरनिराळ्या नैसर्गिक शक्ती व वस्तू यांची प्राचीन शास्त्रीय उपपत्ति ज्या कालांत लावणें शक्य नव्हतें अशा कालांत मानवी बुद्धीनें उपपत्ति लावण्याचा केलेला जो प्रयत्न तोच अतिमानुष सृष्टिविषयक कथांचा उगम होय. प्राचीन अनुमानशक्तीचें या कथांच्या योगानें चांगलें दिग्दर्शन होतें. जीं विधानें अतिशय सुधारलेल्या मनाला रूपकें वाटतील तीं एका काळीं खरींखुरीं स्पष्टीकरणें वाटत असावींत. ग्रहतारादि खगोलस्थांच्या गती, अशनिपाता-सारखे प्रसंग, बाह्य जगाच्या उत्पत्तिघटनेविषयीं विचार इत्यादि बौद्धिक अडचणींनां कथारूप उत्तरें प्राचीन कल्पनामय बुद्धीनें दिलेलीं आहेत. सजीव भूतांच्या समुदायानें सर्व निसर्ग भरला आहे ही मनाची प्राचीन समजूत अशा अनेक कथांच्या बुडाशीं असते. जेव्हां एखादी नैसर्गिक गोष्ट मानवी कृत्यासारखी आहे अशी कल्पना होते, तेव्हां तद्विषयक अलौकिक कथा उद्भवते. जसें, चंद्र सूर्याच्या मागून त्याला न गांठतां जात असतो हें पाहिल्यावर, कोणी कुमारिका तिला झिडकारणाऱ्या पुरुषापाठीमागून जात आहे अशा तऱ्हेची गोष्ट रचणें साहजिक आहे. पुढें अशा तऱ्हेची गोष्ट चांगल्या कल्पक लोकांच्या हातीं पडते तेव्हां ती काव्यप्रसाधनानीं आणखी सुशोभित होते. ती गोष्ट एकाच्या तोंडून दुसऱ्याच्या तोंडीं जात असतांना, दर कवीच्या वैयक्तिक कल्पनांची तिच्यांत भर पडून ती अनेक लक्षणांनीं युक्त होते. तींत मानवी विकारांचा पूर्णपणें प्रवेश झाल्यावर तींतील नैसर्गिक विषय हळूहळू दृष्टीआड होऊं लागतो, आणि वर्णन केलेल्या व्यक्ती ऐतिहासिक स्त्रीपुरुष तर नसावेत ना असा संशय उत्पन्न होतो किंवा आहेत अशी दृढ समजूत होते. जेव्हां कथेचा नैसर्गिक उगम स्मरणांतून जातो, तेव्हां मूळ अर्थाशीं अगदीं असंबद्ध अशीं नवीं किंवा दुसऱ्या कथांतून उद्धृत केलेलीं पुटें तिजवर चढविण्यांत येतात. या वाढीच्या फार पुढच्या अवस्थेंत त्या कथेकडे पाहिल्यास, मूळ रूपाशीं असंबद्ध अशा दुसऱ्या गोष्टींच्या भरीनें ही इतकी बदलून गेलेली असते कीं, तिचें मूलसत्याच्या शोधार्थ पृथक्करण करणें फार अवघड होतें, इतकेंच नव्हे तर तें केव्हां केव्हां अशक्यहि होतें. यावरून, वैदिक देवतांचीं कृत्यें किंवा त्यांचे स्वभाव यांतील मूळ नैसर्गिक बीजें हुडकून काढणें किती अवघड आहे, हें दिसून येईल.

**वैदिक दैवतेतिहासाचीं लक्षणें.**—पारमार्थिक विचारांच्या इतिहासाच्या अभ्यासांत वैदिक दैवतेतिहासाला फार महत्त्वाचें स्थान दिलें पाहिजे. त्याच्या अतिशय प्राचीन उगमामुळें, नैसर्गिक दृग्विषयांची उपासना व त्यांच्यावर मानवी गुणांचा आरोप करणें येथून आरंभ झालेल्या पारमार्थिक समजुतींच्या विकासाची प्रथमावस्था, जगांतील दुसऱ्या कोणत्याहि प्राचीन विचारांच्या स्मारक-भूत वाङ्मयापेक्षां यांत आपणांला चांगली पाहण्यास मिळते. अर्वाचीन भारतीयांची श्रद्धा मूळ कोणत्या रूपांत होती व पुढें ती कशी होत गेली हें भारत-यूरोपीय उर्फ आर्यन् महावंशाच्या कोणत्याहि दुसऱ्या शाखेंत पहावयास सांपडत नाहीं. कारण त्या शाखांनीं बऱ्याच शतकांपूर्वी आपला पूर्वीचा निसर्गाची उपासना करण्याचा संप्रदाय सोडून मूलकल्पनासंहारक परका 'एकेश्वरी'पंथ स्वीकारला. वैदिक दैवतेतिहास कांहीं लोकांच्या कल्पनांप्रमाणें अतिप्राचीन नसला तरी, ज्या मनुष्यगुणारोपाच्या क्रियेमुळें नैसर्गिक विषयाला देवत्व प्राप्त झालें ती क्रिया स्पष्टतेनें पाहण्यास सांपडेल इतका प्राचीन तो खास आहे. दुसऱ्या वाङ्मयांतून ही क्रिया चांगलीशी दृग्गोचर होत नाहीं. पुष्कळ बाबतींत देव आणि त्याचें नांव या दोघांचा भौतिक आधार अत्यंत पारदर्शक आहे; किंबहुना अनेक स्थळीं मानवी गुणांचा अध्यारोप प्राथमिक स्थितींत दृष्टीस पडतो. उदाहरणार्थ उषस् हें प्रातः-संध्येचें नांव असून उषस् ही मनुष्यगुणारोपाचा पातळ बुरखा घेतलेली देवीहि पण आहे; तसेंच जेव्हां अग्नि हें देवाचें नांव म्हणून येतें तेव्हां या देवाच्या व्यक्तित्वांत भरलेलीं जड मूलतत्त्वें स्पष्ट ओळखूं येतात.

मनुष्याच्या सभोंवार असणारे सर्व नैसर्गिक दृग्विषय व नैसर्गिक घटना हीं सचेतन व दैवी आहेत ही फार प्राचीन काळापासून चालत आलेली श्रद्धा वैदिक दैवतसृष्टीच्याहि बुडाशीं आहे. मनुष्याच्या मनावर भीतीचें दडपण टाकणारी किंवा त्याचें बरेंवाईट करण्यास समर्थ म्हणून मानली जाणारी प्रत्येक गोष्ट वैदिक काळांत अर्चनेचा व प्रार्थनेचा विषय बनली होती. द्यावापृथिवी, पर्वत, नद्या, वनस्पती, वगैरे दैवी शक्ती म्हणून पूजिल्या जात. तसेंच, घोडा, गाय, शकुनबोधक पक्षी आणि इतर प्राणी आराधिले जात; अस्त्रें, रथ, दुंदुभी, नांगर, तसींच सोम कुटण्याचे पाटे, यूप इत्यादि उपकरणीं, यांसारख्या मनुष्यनिर्मित वस्तूंचें सुद्धां अर्चन होई.

वेदांतील देव अत्यंत बलवान् पण माणसेंच आहेत असें दाखविलें आहे. त्यांच्या मनोवृत्ती व त्यांचे हेतू माणसांसारखेच असल्याचें दिसतें. वैदिक देव मनुष्यांसारखेच जन्मतात, मात्र ते अमर असतात. निसर्गामध्यें ज्या अनेक घटना येतात व ज्या अनेक शक्ती आहेत त्यांचेच प्रतिनिधिभूत सर्व वैदिक देव आहेत. ह्या विधानाला अपवाद क्वचितच आढळतो. भौतिक शक्तींचें व घटनांचें हें मानवीकरण निरनिराळ्या प्रसंगीं निरनिराळ्या प्रमाणांत झालेलें दिसतें. देवतेचा मूल पाया जी नैसर्गिक शक्ति अगर घटना असेल त्या शक्तीच्या अगर घटनेच्या नांवासारखेंच त्या देवाचें नांव असेल तर हा देव सृष्ट शक्तींचें अगदीं प्राथमिक स्वरूपाचें रूपांतर आहे असें समजावें. अशा देवदेवतांचीं उदाहरणें म्हणजे द्यौः, पृथ्वी, सूर्य व उषस् हीं होत. ह्या नांवांवरून निसर्गघटनांचा बोध होतो व त्याचप्रमाणें ह्या घटनांच्या मागें असणाऱ्या मनुष्यसदृश चैतन्यांचा बोध होतो. अग्नि आणि सोम ह्या ज्या यज्ञसंस्कारांत दृष्टीस पडणाऱ्या देवता आहेत त्यांसंबंधानें हीच गोष्ट आहे. अग्नि आणि सोम हे दृश्य व स्पृश्य पदार्थ आहेत. अर्थात् ह्यांच्या प्रतिनिधिभूत देवतांसंबंधाच्या कल्पना ह्यांच्या आधिभौतिक दृश्य स्पृश्य गुणांमुळें स्वभावतः मर्यादित झालेल्या आहेत. विवक्षित देवतेचा आधिभौतिक पाया जसा तिच्या नांवाहून दूर असेल त्याप्रमाणें त्या देवतेसंबंधाची कल्पना त्या मूलभूत आधिभौतिक पदार्थापासून दूरदूर जाऊं लागते, आणि तिच्याठायीं मानवी गुणांचा अध्यारोप अधिकाधिक होऊं लागतो. ह्याचें उदाहरण मरुत् देव होत. ह्या देवतांचा व वायुदेवाचा दोहोंचाहि पायाभूत निसर्गपदार्थ म्हणजे वायु. परंतु मरुद्देवांचें स्वरूप वायुदेवाच्या स्वरूपाहून दोहोंचा एकच पाया जो निसर्ग वायु त्याजपासून दूर गेलेलें आहे. तथापि वैदिक कवी वायु व मरुत् देव ह्यांच्यामध्यें असलेलें नातें नीटपणें लक्षांत ठेवतांना दिसतात, मात्र हें नातें कधीं कधीं अस्पष्ट होत जातें. एखाद्या देवतेच्या नांवांत वर दिल्याप्रमाणें मूलभूत पदार्थाच्या नांवापासून भिन्नता असून शिवाय वेदपूर्वकालांतून जर त्या देवतेची कल्पना आलेली असेल तर मग मूलभूत निसर्गपदार्थ व तज्जन्य देवता ह्यांमधील नातें अजीबात तुटून देखील जातें. ह्या गोष्टीचें उदाहरण म्हणजे वरुण देवता होय. ह्या वरुणाच्या बाबतींत आधिभौतिक पायापासून त्याच्या दैवी स्वरूपाची कल्पना इतकी दूर गेली आहे कीं, वरुण म्हणजे उच्च दर्जाचें एकेश्वरीमत मानणाऱ्या संप्रदायांतील जगच्छासक देवच झालेला आहे. हें मागें दिलेल्या (पृ. ३१) वरुणसूक्तांवरून दृष्टीस पडेल. ह्या वरुण देवाचा मूळपाया आधिभौतिक घटनेंत आहे हें केवळ त्याजसंबंधींच्या कथांमध्यें पुरातन कालापासून ज्या आधिभौतिक घटनांचा संबंध आलेला सांपडतो त्यांवरून अनुमानावें लागतें. पाश्चात्त्य लेखक उदाहरणार्थ डॉ० ग्रिसवल्ड (कार्नेल यु.) यांनां वरुणसूक्तें ऋग्वेदांतील भक्तिमय स्तोत्रांचें उच्च स्वरूप दाखवितात असें वाटतें.* परंतु याप्रमाणें मानवी गुणांचा अध्यारोप वैदिक देवकथांमध्यें कितीहि दिसत असला तरी ग्रीकांचे देव जितके मानवी झालेले आहेत तितके कांहीं वैदिक देव झालेले नाहींत. वैदिक देवांमध्यें, विशिष्ट वैयक्तिक गुण थोडेफार असतात. पण हे फारच थोडे असून सर्व देवांनां सामान्य असेच गुण त्यांत फार असतात. ह्याचें कारण एक असें आहे कीं, ज्या निसर्गघटनावर्गाशीं त्यांचा संबंध येतो त्या वर्गांत पुष्कळशा गोष्टी सर्वांनां साधारण अशाच असतात. उदाहरणार्थ, मेघराज इंद्र, विद्युद्रूपांतील अग्निदेव आणि प्रभंजनप्रतिनिधिभूत मरुद्देवता ह्यांचें वर्णन साधारणतः एकाच प्रकारें होणार; कारण वैदिक कवींच्या दृष्टीनें या सर्वांचें मुख्य कार्य म्हणजे वृष्टि करण्याचें होय. असो. बऱ्याच देवांसंबंधानें असें दिसतें कीं, त्यांचें मूळ एक देवता असून या एकीच्या ज्या अनेक देवता झाल्या त्या, गुणवाचक नांवांनां हळूहळू स्वतंत्र व्यक्तीचें अथवा व्यक्तींचें अस्तित्व अध्यारोपानें प्राप्त झालें म्हणून झाल्या. आदित्य देवतेसंबंधानें असा प्रकार झाला आहे. वैदिक कवींच्या देवतावर्णनासंबंधानें ही एक गोष्ट लक्षांत ठेवली पाहिजे कीं, हे कवी देवतांच्या पराक्रमांचें वर्णन करतात तें असंदिग्ध नसतें. ह्या देवतापराक्रमासंबंधींच्या कथा ते सर्वत्र विस्तारानें व विशदपणें सांगत नाहींत. त्यांचा केवळ कमीअधिक निर्देश मात्र ते करतात. आणखी हेंहि लक्षांत घेतलें पाहिजे कीं, ह्या कवींचे जे देवतांच्या पराक्रमासंबंधाचे निर्देश आहेत ते कांहीं एकच नसून भिन्न काळांतील भिन्न कवींचे आहेत व हा कालहि लहान नसून बराच लांबलचक आहे. असें असल्यानें ह्या भिन्न निर्देशांमध्यें तितकी एकवाक्यता दिसून येणें दुर्घट आहे.

वैदिक देवासुरकथांचा प्रधान सांठा म्हणजे ऋग्वेद. त्यांत ज्या कथा आलेल्या आहेत त्या कथांकडे पाहिलें असतां ह्यांतील देव कमीअधिक सदृश अशा निसर्गघटनांचे प्रतिनिधिभूत असून त्यांच्या उपासकांच्या दृष्टीनें कमी अधिक महत्त्वाचे होते, असें दिसून येतें.

ऋग्वेदमंत्ररचनाकाल जसा संपत आला तशी निसर्गघटनांवर मानवी गुणांचा अध्यारोप करण्याची वृत्ति सारखी वाढत गेली व ह्या वृत्तीच्या योगानें तत्कालीन बहुदेवतामतांतून एक प्रकारचें 'एकेश्वरवादी' मत व थोड्याबहुत प्रमाणानें 'सर्वत्र ईश्वरवादी' मत उदयाला येऊन ऋग्वेदाच्या शेवटच्या मंडळांत ह्या मतांचें प्रतिबिंब आलेलें आहे. ह्या मंडळांतील सूक्तें यज्ञाच्या, विशेषतः सोमयागाच्या, दृष्टीनें रचलेलीं असल्यामुळें त्यावेळीं प्रचलित

* Griswold–God Varuṇa in Rigveda, Ithaca N. Y. 1910.

असलेल्या अद्भुत कथांपैकीं कांहींनां यांत फारच जागा दिली असून कांहींनां मुळींच दुर्लक्षिलेलें आहे. सोमयागांत ज्या देवता विशेष महत्त्वाचें स्थान व्यापतात आणि ज्यांची उपासना धनसंपन्न लोक करतात त्यांचें ह्या मंडळांत विशेष प्रामुख्यानें वर्णन आलेलें आहे. परंतु पिशाचवर्ग, मंत्रतंत्र, मरणोत्तरस्थिति यासंबंधींच्या कथा ह्या मंडळांत बहुतेक नाहींतच. पण लोकांत ज्या अनेक देवता प्रचलित होत्या त्यांचे उल्लेख या वाङ्मयांत लपत नाहींत हें मागें जोडलेल्या यादीवरून दृष्टीस पडेल. कथा नाहींत ह्याचें कारण सोमयागविषयक सूक्तांत पिशाचादिकांसंबंधींच्या मतांचा कांहींच संबंध येत नाहीं. तसेंच या सूक्तांत त्या त्या देवतांचें स्वभाववर्णन जरीं विस्तारानें केलेलें आढळतें तरी त्यांचीं कृत्यें–विशेष महत्त्वाचे पराक्रम खेरीज करून–फारशीं स्पष्टपणें वर्णिलेलीं आढळत नाहींत. जी कविता केवळ यज्ञविषयक आहे, तिच्यांत देवतांच्या कृत्यांचें वर्णन फारच थोडें आढळतें, तिजवरून दैवतेतिहासशास्त्राला केवळ तुटकतुटक व इतस्ततः विखुरलेल्या भागांपलीकडे कांहीं उपयुक्त अभ्याससाहित्य मिळत नाहीं हें साहजिक आहे. ऋग्वेदाच्या इतर मंडळांत पिशाचवर्ग व असुरांचा कनिष्ठ वर्ग आणि मरणोत्तर स्थिति यासंबंधाची माहिती अपुरीच आहे, व ऋग्वेदाचें शेवटलें मंडळ ही उणीव फारशी भरून काढीत नाहीं. उदाहरणार्थ दुष्ट लोकांनां मरणोत्तर कोणती स्थिती प्राप्त होते, ह्या संबंधानें ह्या मंडळांत क्वचितच एखादा उल्लेख सांपडतो. ऋग्वेदांत देवतांच्या उपासनेखेरीज पितरांची उपासना आणि थोडीफार अचेतन वस्तूंची उपासना सांपडते.

वैदिक देवकथांचा अभ्यास करतांना सामवेदाचें कांहींच महत्त्व नाहीं. ( या वेदांत ऋग्वेदांत न आढळणाऱ्या फक्त ७५ ऋचा आहेत ).

अथर्ववेदांत विशेषतः गृह्यसंस्कार व मंत्रतंत्रविधी आहेत. अथर्ववेदांतील मंत्रतंत्रविषयक भाग व तद्विषयक कौशिकसूत्रें यांजमध्यें असुरपिशाचादि वर्गासंबंधानें भरपूर माहिती मिळते. अथर्ववेदामध्यें ऋग्वेदापेक्षां अधिक प्राचीन कल्पनांचा अंतर्भाव झालेला आहे. उच्चदर्जाच्या परमार्थविषयक भागासंबंधानें अथर्ववेदांतील गोष्टी मात्र उत्तरकालीन स्थितीच्या द्योतक आहेत. अथर्ववेदांतील परमार्थविषयक कल्पना 'सर्वेश्वरी' आहे. त्यांतील देवता उत्तरकालीन विचारविकासाच्या दर्शक असून ह्या वेदांत कांहीं नवीन भावनांनां देवतारूप आलेलें आहे. वैयक्तिक देवतांच्या स्तुतिपर अशीं सूक्तें या वेदांत विरळ आहेत. बऱ्याच देवता एकाच वेळीं बोलावण्याचा प्रकार ह्यांत विशेष आढळतो. ऋग्वेदांतल्या वर्णनांप्रमाणेंच येथें देवतांच्या पराक्रमांचें ठरींव सांच्याचें वर्णन आढळतें. प्राचीन ऋग्वेदवाङ्मयांत सांपडत नाहीं अशी महत्त्वाची देवकथा या वेदांत क्वचितच आढळते. यजुर्वेदांत फार थोड्या देवतांचा उल्लेख येतो त्या उल्लेखित देवता येणेंप्रमाणें.

## कृष्णयजुर्वेदांतील देवतांची यादी.*

| | | |
|---|---|---|
| अंहस्पति. | चंद्रमा. | मेनका. |
| अकूपार. | चात्वाल. | मैत्रावार्हस्पत्य. |
| अग्नि. | चित्रा. | यम. |
| अग्नाविष्णू. | तिष्य. | यमी. |
| अग्नीषोम. | त्र्यंबक. | राका. |
| अग्नीवरुण. | त्वष्टा. | रुद्र. |
| अंगिरस. | दक्ष. | रेवती. |
| अंधारि ( गंधर्व ). | दक्षक्रतू. | रोहिणी. |
| अथर्वा. | दधिक्रावा. | लक्ष्मी. |
| अदिति. | दूर्वा. | वसतीवरी. |
| अनुमति. | द्यावापृथिवी. | वसु. |
| अनुराधा. | धुतान ( मरुत् ). | वरुण. |
| अप्सरा. | द्रविणोद. | वाक्. |
| अंबा. | धाता. | वायु. |
| अंबालिका. | धूः | वास्तोष्पति. |
| अंबिका. | धेना (बृहस्पतिस्त्री). | विवस्वान्. |
| अरमति. | नक्तोषासा. | विश्वकर्मा. |
| अर्यमा. | पर्जन्य. | विष्णु. |
| आदित्य. | पुरूरवा. | वृषाकपि. |
| इडा. | पूतभृत्. | शुक्र. |
| इन्द्रापौष्ण. | पूषा. | सद. |
| इन्द्राबृहस्पती. | पृथिवी. | समुद्र. |
| इन्द्रावरुण. | प्रजापति. | सूर्याचंद्रमस्. |
| उर्वशी. | प्राची. | सरस्वती. |
| उषा. | प्रोष्ठपदा. | सविता. |
| उषासानक्ता. | बृहस्पति. | सिनीवाली. |
| ऋतू. | ब्रह्मा. | सूर्याग्नी. |
| ऐन्द्रवायव. | भग. | सूर्यपत्नी. |
| औदुम्बरी. | भृगु. | सोम. |
| कद्रू. | मंथी. | सोमापूषन्. |
| कुहू. | मरुत्. | सोमारुद्र. |
| कृत्तिका. | मरुत्वतीय. | सोमेंद्र. |
| क्षेत्रपति. | मारुती. | स्वधा. |
| ग्ना. | मित्रावरुण. | हविर्धान. |
| घर्म. | | |

* यज्ञामध्यें लागणारे अनेक प्रकारचे यज्ञसंभार, यज्ञिय पशू, यूपादि उपकरणें करावयासाठीं तोडावयाचे वृक्ष, वगैरे वस्तूंची त्या त्या प्रसंगीं देवता समजून पूजा करावयाची असते. अशा वस्तूंची यादी फारच मोठी होईल व त्यांचें इतकें प्रस्तुत विषयास महत्त्व नसल्यामुळें अशा बहुतेक वस्तू वरील यादींत घेतल्या नाहींत.

यजुर्वेदाचा मुख्य विषय यज्ञ असल्यामुळें त्यांत देवांच्या पराक्रमांसंबंधीं वगैरे कथा कमी आहेत. यजुर्वेदांतील देवतावर्णनाचा अभ्यास करतां त्यांत प्रजापति हा मुख्य देव दिसतो. विष्णूला विशेष महत्त्व आलेलें दिसतें, आणि ऋग्वेदांतील एक जुना देव रुद्र शिव या नव्या नांवाखालीं यांत आलेला आहे. परंतु एकंदरीनें या वेदामध्यें विधींचें महत्त्व अधिक व देवांचें कमी असें असल्यानें दैवतशास्त्र-विषयक माहिती यामध्यें फारच थोडी सांपडते. अथर्ववेदानंतरच्या कल्पनाविकासाचें चित्र श्रौतधर्मांत सांपडतें.

यजुर्वेद आणि ब्राह्मणें यांत ऐतरेय आणि शतपथ प्रमुख आहेत. यांत फारसें अंतर नाहीं. या ग्रंथांत मुख्य विषय यज्ञयाग हाच असल्यानें देवतांचे वैयक्तिक गुण येथें अस्पष्ट होत गेले आहेत. कांहीं देवतांचें मूळस्वरूप बदललें गेलें आहे व कांहींचें महत्त्व कमी होऊन कांहींचें वाढलें आहे. इतर बाबतींत ब्राह्मणग्रंथांतून आढळणारा देवतासमूह बहुंशीं ऋग्वेद आणि अथर्ववेद यांप्रमाणेंच असून अचेतनोपासना या ग्रंथांतूनहि आढळते. ऋग्वेदसंहितेंतील दैवतेतिहास व ब्राह्मणग्रंथांतील दैवतेतिहास यांमध्यें महत्त्वाचा फरक आहे तो हाच कीं, ब्राह्मणग्रंथांत प्रजापति हा मुख्य देव मानलेला आहे तसा तो ऋग्वेदांत मानलेला नाहीं. ब्राह्मणांत सर्वेश्वरी मत विशेष असंदिग्ध रीतीनें मांडलेलें आहे हाहि एक दुसरा फरक आहे. उदाहरणार्थ 'प्रजापति सर्व आहे' असें म्हटलें आहे. ( शतपथ ब्राह्मण १.३.५,१०; १.६.४,२; ४.५.७,२. )

देवांचे विशिष्ट गुण लुप्त झाल्याचे योगानें त्यांचे निरनिराळे वर्ग करण्याची पद्धति सुरू झाली. ब्राह्मणग्रंथांच्या कालाचा हा विशेष आहे कीं, या कालांत अतिमानुष कोटींतील व्यक्तींमध्यें दोन परस्परविरोधी वर्ग उत्पन्न झालेले होते. एका बाजूला देव नांवानें संबोधिल्या जाणाऱ्या व्यक्तींचा वर्ग, व दुसऱ्या बाजूला असुर नांवाच्या व्यक्तींचा वर्ग. शिवाय देववर्गाचेहि आणखी तीन पोटवर्ग होते; पैकीं वसु नांवाच्या भूस्थदेवांचा पहिला पोटवर्ग; दुसरा रुद्र नांवाच्या आकाशस्थ देवांचा पोटवर्ग व तिसरा आदित्य नांवाच्या द्यौमधील देवांचा पोटवर्ग होय. त्यांत अग्नि, वरुण व सूर्य या तीन देवतांचा समूह सर्वांत महत्त्वाचा आहे. तसेंच या ग्रंथांतील विधिविषयक भागांत देवतांच्या निरनिराळ्या गुणांवर व्यक्तिलाचा अध्यारोप करून एका देवतेच्या अनेक देवता बनविलेल्या आढळतात. उदाहरणार्थ अन्नाचा पति अग्नि, स्तोमाचा पति अग्नि, अशा तऱ्हेनें निरनिराळ्या प्रकारचे अग्नि देव कल्पिलेले आहेत.

ब्राह्मणांमध्यें त्यांच्या मुख्य विषयाचें स्पष्टीकरण करण्यासाठीं अनेक प्राचीन व्यक्तींविषयींच्या अनेक कथा घातलेल्या आहेत. यांपैकीं थोड्याच कथांचा संहितांत उल्लेख आढळतो. ज्या कथा याप्रमाणें जुन्या वाङ्मयांत आढळतात त्यांचें ब्राह्मणांतील स्वरूप मूळ कथांवर प्रकाश पाडणारें नसून त्या कथांचें निरनिराळ्या कल्पनांनीं भरलेलें परिणत स्वरूप असतें आणि जुन्यांतजुन्या वैदिक काळांतील अतिमानुष व्यक्तींच्या कल्पना आणि वेदोत्तर काळांतील कल्पना यांच्यामधील दुवा एवढ्याच नात्यानें या ब्राह्मणग्रंथांतील कथा संशोधकांस उपयोगीं पडतात.

**अभ्यासपद्धति.**—वैदिक वाङ्मयांतील देवादिकांच्या कथा ज्या काळांत आणि ज्या सामाजिक व आधिभौतिक परिस्थितींत उत्पन्न झाल्या ती परिस्थिति व तो काळ आजच्याहून फार भिन्न तऱ्हेचा होता. या कथांसंबंधानें आणखी एक गोष्ट लक्षांत ठेवली पाहिजे ती ही कीं, यांजमध्यें वर्णिलेल्या गोष्टी खरोखरी घडलेल्या नसून त्या केवळ कवींच्या प्रतिभेंतून निघालेल्या कल्पना आहेत व ते कवीहि असे कीं, ज्यांची निसर्गाकडे पाहण्याची दृष्टि आपल्याहून थोडीफार किंवा बरीच भिन्न होती. ह्या वैदिक वाङ्मयांत आढळणारी माहिती गुंतागुंतीची आणि पूर्वकालीन विचारस्थिति दर्शविणारी असल्यानें तिचा अभ्यास करणें सहजच अवघड जातें; व त्यांतच ज्या काव्यांतून ही माहिती काढावयाची असते त्या काव्याचें विशिष्ट स्वरूप अभ्यासकाला आणखी अडचण उत्पन्न करतें. शास्त्रीय पद्धतीनें अभ्यास करण्याजोगे असे जे विषय आहेत त्या विषयांत रसिकता, सावधानता व विवेक यांचा उपयोग अत्यंत आवश्यक असणारा असा विषय प्रस्तुत कथांखेरीज दुसरा क्वचितच आढळेल. वेदांतील प्राचीन कथांचें संशोधन निर्दोष विवेचक पद्धतीनें अद्यापि विशेष झालेलें नाहीं. पद्धतीचा दोष आणि अभ्यासविषयाचा अंगभूत अपरिहार्य संकीर्णपणा व अस्पष्टपणा यांमुळें वेदपंडितांत महत्त्वाच्या प्राचीन कथांविषयक बाबींसंबंधानें महत्त्वाचे व पुष्कळ मतभेद झालेले आहेत. वेदाभ्यासाच्या पहिल्यापहिल्या दिवसांत प्राचीन कथांचा अभ्यास करतांना निरनिराळ्या देशांतील कथांची तुलना करून त्यांत जीं सारखीं नांवें सांपडतील तेथून या अभ्यासाला आरंभ करण्याची वहिवाट होती. भिन्नदेशीय कथांमध्यें सारख्या नांवाच्या ज्या व्यक्ती सांपडतात त्यांचें मूळ एकच असें गृहीत धरून वेदांतील प्राचीन कथांचा अर्थ लावण्याचा प्रयत्न होत असे. नामसाम्यावरून बसविलेलीं हीं ऐक्यें आतां कोणी बरोबर धरून चालत नाहीं. ज्याप्रमाणें व्युत्पत्तीचा आधार पूर्वी विशेष घेतला जात असे त्याप्रमाणें समोर असलेला पुरावा बारकाईनें न चाळतां, त्यांतील गौण व क्वचित् आढळणारे विशेष कोणते व प्रधान विशेष कोणते हा विवेक न करतां, सगळ्यांनां सारखें महत्त्व देऊन आपली उपपत्ति बसविण्याचा प्रयत्न वारंवार होत असे. तसेंच कथांचा अर्थ लावतांना एखाद्या विशेष अभ्यासतत्त्वाला प्राधान्य दिलें जाऊन दुसऱ्या महत्त्वाच्या तत्त्वांकडे गैरवाजवी दुर्लक्ष होत

असे. या दुर्लक्षामुळें पुष्कळशा देवदेवतांच्या संबंधानें तद्विषयक कल्पना केवळ अरुणोदय, विद्युत्, सूर्य व चंद्र या भौतिक गोष्टींपासून निघाल्या आहेत असें अयथार्थ विधान केलें गेलें आहे. अशा प्रकारचा अभ्यासतत्त्वविषयक पूर्वग्रह जेथें असतो तेथें उपलब्ध माहितीचा उपयोग नकळत कां होईना, पण करावा तसा केला जात नाहीं.*

वरीलप्रमाणें अभ्यासांत वैगुण्य राहूं नये म्हणून कांहीं सूचना खालीं दिल्या आहेत. शास्त्रीय अभ्यास करतांना विशेष ज्ञात अशा गोष्टींपासून आरंभ करून कमी प्रमाणांत ज्ञात असलेल्या गोष्टींकडे जावें, या तत्त्वाचा अवलंब करणें प्रशस्त आहे; व या दृष्टीनें वैदिक वाङ्मयांतील देवदेवतांचे गुण व कृती यांचें यथातथ्य वर्णन जर करावयाचें असेल तर पाश्चात्त्यांच्या 'तुलनात्मक प्राचीन कथाशास्त्रा'च्या असिद्ध सिद्धांतांपासून आरंभ न करतां, भारतीय वाङ्मयांत उपलब्ध होणाऱ्या माहितीपासूनच आरंभ करावा. म्हणजे भारतीय आर्यन् व ग्रीक या दोहोंच्या सामान्य पूर्वजांचे देव व त्यांचें स्वरूप समजण्यासाठीं एका ठिकाणचें पण अत्यंत मुबलक असें वाङ्मय जे वेद त्यांपासून सुरवात करावी असें पाश्चात्त्य पंडितांसहि वाटूं लागलें आहे. या वाङ्मयांत ऋग्वेदकालापासून तों अर्वाचीन कालापर्यंत भारतीयांच्या देवासुरकथांची माहिती अत्रुटित स्वरूपांत सांपडते. कोणत्याहि देवतेसंबंधाची किंवा कथेसंबंधाची जेवढी माहिती मिळेल तेवढी एकत्र केली पाहिजे. मिळविलेल्या माहितींतील सारख्या दिसणाऱ्या भागांची तुलना करून त्यांचे निरनिराळे गट केले पाहिजेत, आणि नंतर काय निर्णय काढावयाचा तो काढला पाहिजे. ह्याप्रकारें संशोधन करतांना ज्या प्रधान गुणांच्या योगानें एखाद्या पदार्थावर अथवा घटनेवर व्यक्तित्वाचा आरोप केलेला असेल ते गुण व्यक्तित्वारोपानंतर आणखी लादलेल्या गुणांपासून वेगळे केले पाहिजेत.

एखाद्या निसर्गशक्तीच्या जागीं कल्पनेनें एखादी व्यक्ति उभी केली म्हणजे पुढें ही कल्पना सदरील व्यक्तीसंबंधानें द्वितीय स्वरूपाची अलौकिक कथा तयार करूं लागते, आणि या दुसऱ्या स्वरूपांत त्या व्यक्तीच्या मुळाशीं जी कल्पना होती तिजपासून अत्यंत भिन्न अशा गोष्टी कोठून तरी घेऊन हळूहळू अडकवून दिल्या जातात. अशा एखाद्या कथेसंबंधाची माहिती पुष्कळ असेल तेव्हां तिच्यांतील मूलभूत आणि प्रधान गोष्टी कोणत्या हें, कोणत्या गोष्टींचा उल्लेख पुनःपुनः येत आहे त्यावरून ठरवितां येतें. ज्यांचा उल्लेख वारंवार येतो त्या गोष्टी मूलभूत समजाव्या. याप्रमाणें इन्द्रकथेंत वृत्राशीं त्याची झालेली लढाई ही पुनःपुनः वर्णिली जाते. ही लढाई ह्या इन्द्रकथेंतील मूलभूत गोष्ट आहे. उलटपक्षीं वृत्राच्या मातेला इन्द्र आपल्या वज्रानें मारतो. (ऋ. १.३२,९) ही एकाच ठिकाणीं आलेली गोष्ट कथेंत रंग भरण्याकरितां कोणी तरी कवीनें मागाहून घातलेली असणें शक्य आहे. तसेंच 'वृत्राला मारणारा' हें विशेषण मूळांत इन्द्रालाच लाविलेलें असलें पाहिजे. परंतु ऋग्वेदांत हें विशेषण सोमदेवतेसहि पुष्कळ वेळां लावलेलें आढळतें. हें मूळ सोमाचें विशेषण नसून तें इन्द्राकडून सोमाकडे गेलें आहे. हें खालील प्रकारच्या विधानावरून स्पष्ट होतें. सोम हा वृत्राला मारणारा मादक वनस्पतिविशेष आहे. या वनस्पतीचा रस इन्द्र युद्धापूर्वी नियमानें पीत असतो. (ऋ. ६.१७,११) ऋग्वेदामध्यें याप्रमाणें एका व्यक्तीचें विशेषण दुसऱ्या व्यक्तीला लावण्याची पद्धति पुष्कळ आहे. कारण ऋग्वेदांतील कवी देवतांचें जोडीजोडीनें वर्णन करण्याला उत्सुक दिसतात. अर्थात् अशा वर्णनांत ह्या जोडींतील देवतांचे वैयक्तिक गुण व पराक्रम एकटीचेच नसून दोहींचेहि आहेत अशी सहज कल्पना होते. कोणत्या देवतेचे प्रधान गुण कोणते हें ठरवितांना ह्याप्रकारें उसने लावलेले गुण वगळले पाहिजेत. जे गुण व ज्या नैसर्गिक शक्ती पुष्कळ देवांमध्यें सारख्याच प्रमाणानें आरोपित केलेल्या आहेत त्याहि वरीलप्रमाणें अप्रधान म्हणून बाजूस काढल्या पाहिजेत. ज्या शक्ती व जे गुण एखाद्या देवतेसंबंधानें विशेष जोरानें आणि पुनरुक्तीनें सांगितलेले असतील तेच तेवढे त्या देवतेचे प्रधानगुण आहेत असें आपण समजलें पाहिजे. अशा ठिकाणीं हे गुण प्रथम विशिष्ट देवतेचे असून नंतर हळूहळू इतर देवतांनां ते लाविले गेले असावेत असें मानतां येतें. या प्रकारच्या तुलनेंत ही एक गोष्ट लक्षांत ठेवली पाहिजे कीं, कांहीं देवतांचें गुणकीर्तन पुष्कळच सूक्तांतून पुनःपुनः केलेलें आहे व कांहींनां फारच थोडीं सूक्तें मिळालीं आहेत. तेव्हां निरनिराळ्या देवतांनां लावलेल्या विशेषणांच्या पुनरुक्तींवरून त्यांचें प्रधान विशेष्य ठरवितांना त्या त्या देवतेसंबंधाच्या सूक्तांची संख्याहि लक्षांत ठेवली पाहिजे. उदाहरणार्थ, जर एखादें विशेषण वरुणाला व इन्द्राला सारख्याच वेळां लावलेलें सांपडलें तर त्यावरून असा निष्कर्ष काढणें सयुक्तिक होईल कीं, तें विशेषण प्राधान्यानें वरुणाचें असावें. कारण वरुणाच्या दसपट सूक्तें इन्द्राला दिलेलीं आहेत. कोणत्याहि भागाचा पुराव्याच्या दृष्टीनें उपयोग ठरवितांना तो भाग ज्या सूक्तांत आला असेल त्या सूक्तांचा काळ लक्षांत घेतला पाहिजे. उदाहरणार्थ, एखाद्या उत्तरकालीन भागांत प्रथमच आलेलें विधान कदाचित् जुनीच एखादी कल्पना सांगत असेल. परंतु जुन्या सूक्तांत त्याच विषयासंबंधानें एखादें विधान असून तें जर वरील विधानाहून भिन्न असेल तर असें समजण्यास हरकत नाहीं कीं, उत्तरकालीन विधानांतील कल्पना ही या जुन्या कल्पनेचें नंतरचें परिणत स्वरूप आहे. ऋग्वेदाचें दहावें मंडळ आणि पहिल्या मंडळाचा बराच भाग ह्याप्रमाणें इतर मंडळांतील कल्पनांहून अलीकडील

* Mac donell Vedic Mythology.

कल्पनांनीं भरलेला आहे असें दिसतें. नववें मंडळ सोमपवमानाचेंच वर्णन करीत असल्यानें दुसऱ्या एका मंडळांतील कथाभागाला या मंडळांतील कथाभागानें कांहीं वेगळेंच स्वरूप येण्याचा संभव आहे. विवस्वत् आणि त्रित यांचा या मंडळांत सोम तयार करण्याच्या कामाशीं कांहीं विशेष प्रकारचा संबंध आलेला आहे. ब्राह्मणग्रंथांतील इतिहासदृष्ट्या जुन्या कल्पना धुंडाळतांना फार काळजीनें वागलें पाहिजे. कारण, या ग्रंथांत कल्पनेच्या भराऱ्या बऱ्याच मारलेल्या असून यांत दिलेलीं साम्यें बरींच दूरान्वयी आहेत. हें मागील प्रकरणांत दिलेल्या आख्यायिकांवरून दिसून येईलच.

सदृश दिसणारे भाग पुरावा म्हणून पुढें करतांना संदर्भाकडे लक्ष दिलें पाहिजे. या भागांच्या पुढेंमागें जो मजकूर असेल त्याचा बारीक विचार करून व या एकंदर मजकुरांतील सूत्रभूत कल्पनांचा परस्परसंबंध लक्षांत घेऊन नंतरच सारख्या वाटणाऱ्या विभागांची पुरावा या नात्यानें खरी किंमत ठरवितां येईल. कोणत्याहि प्राचीन कथेसंबंधानें वेदांतील अंतर्गत पुरावा नीट तपासून व त्याला उत्तरकालीन भारतीय वाङ्मयांत काय पोषक माहिती मिळत असेल ती मिळवून नंतर भारतीय दैवतेतिहासाशीं सदृश असा जो इराणी लोकांचा देवतेतिहास आहे त्याचा उपयोग वैदिक कथा नीट समजण्यासाठीं करावा. इराणी कथांशीं भारतीय कथांची तुलना केल्यानें केवळ भारतीय माहितीवरून काढलेले सिद्धांत दृढ होतील किंवा जेथें भारतीय माहिती निर्णायक नाहीं तेथें वैदिक कल्पनांचें प्राचीनत्व किंवा अर्वाचीनत्व ठरविण्याच्या कामीं अथवा त्या कल्पना नीट समजून घेण्याच्या कामीं ही तुलना आपणांस उपयोगी पडेल. उदाहरणार्थ; अवेस्ताच्या मदतीशिवाय 'मित्र' या देवतेचें मूळ स्वरूप कोणतें होतें या संबंधानें निश्चित सिद्धांत कांहींच स्थापित करतां येणार नाहीं.

वैदिक दैवतेतिहासाच्या अभ्यासकाला अवेस्तांत मिळणाऱ्या पुराव्याकडे दुर्लक्ष करून चालणार नाहीं. अतिप्राचीन अवेस्ताभाषा व वेदभाषा यांजमध्यें कोश, वाक्यरचना, लिहिण्याची मोडणी, छंद व सामान्य काव्यसरणी या बाबतींत इतकें जवळचें नातें आहे कीं, केवळ वर्णविपर्ययांचे व अपभ्रंशांचे नियम नीट लावून अवेस्तांतील श्लोकचे श्लोक वेदभाषेंत शब्दशः उतरतां येतात व असें करतांना त्या काव्यांतील रसांत किंवा रूपांत फारसा बदल होत नाहीं. देवासुरकथांसंबंधानें मात्र वेद व अवेस्ता यांचें इतकें साम्य नाहीं. झरथुष्ट्रानें जी सुधारणा केली तिच्या योगानें जुन्या दैवतविषयक कल्पना पुष्कळशा नाहींशा झाल्या व पुष्कळशा बदलल्या गेल्या. जर ऋग्वेदवाङ्मयाइतकें जुनें असें अवेस्ता वाङ्मय आपणांस उपलब्ध असतें, तर या देवताविषयक कथांचे बाबतींतहि बरीच सदृशता आपणांस दिसली असती. तरी पण आहे त्या स्थितींतहि विधिसंस्कारविषयक बाबतींत आणि देवासुरकथांचे बाबतींत सारख्या असणाऱ्या गोष्टी या दोन वाङ्मयांत कांहीं थोड्याथोडक्या नाहींत. विधिविषयक परिभाषेचे शब्दच केवळ घेतां खालील साम्यें आपणास दिसतात. यज्ञ=यस्न, होतृ=झओतर, अथर्वन्=अथ्रवन्, सोम=हओम, इत्यादि. झरथुष्ट्राच्या संप्रदायांतहि वैदिक संप्रदायाप्रमाणें सोमरस देवतांना प्राधान्यानें अर्पिला जात असे. सोम पिळणें, गाळणें, दुधाशीं मिसळणें या क्रिया दोहोंतहि आहेत, व दोहोंतहि सोमाला वनस्पतींचा राजा, पर्वतांवर वाढणारा व गरुडाकडून खालीं आणला जाणारा असें म्हटलें आहे. आतां देवासुरकथाविषयक आश्चर्यजनक साम्यांकडे वळूं. दोन्ही संप्रदायांत सर्वांत उच्च दर्जाच्या देवांना असुर ( अहुर ) असें म्हटलें आहे. हे देव म्हणजे पराक्रमी राजे आहेत. त्यांच्या युद्धरथांना अति वेगवान् अश्व जोडले असून हे रथ अंतरिक्षमार्गानें चालतात. या राजांचा स्वभाव परोपकारी, कपटरहित असा असतो व त्यांच्यामध्यें अनीतीचा लवलेशहि नसतो. इराणी व भारतीय दोघेहि अग्न्युपासना करीत, अग्नीचीं नांवें मात्र अग्नि आणि आतर् अशीं भिन्न असत. दोघेहि जलदेवांची ( आपः=आपो ) उपासना करीत. वेदांतील मित्र म्हणजे अवेस्तांतील मिथ्र ( सूर्यदेवता ) होय. आदित्य भग हा अवेस्तामध्यें भग या नांवानें सांपडतो. अवेस्तांत भग याचा सामान्य अर्थ 'देव' असा आहे. वाऱ्याची देवता वायु, जलपुत्र अपांनपात् हे दोहींकडे आहेत. सोम ( हओम ) याशीं संबद्ध अशा स्वर्गीय व्यक्ती गंधर्व ( गंदरेव ) व कृशानु ( केरेशानि ) ह्याप्रमाणें सांपडतात. वेदांतील त्रित आप्त्य यासारखे अवेस्तांतील प्राचीन पुरुष थृत व आथ्व्य हे होत; आणि इन्द्र वृत्रहन् याच्या जोडीला अवेस्तांत 'असुर इन्द्र' व विजयाची देवता वेरेथ्रघ्न या सांपडतात.

विवस्वत्पुत्र यम हा वेदांत मृतांचा राजा आहे, व अवेस्तांतील यिम, विवङ्हन्त याचा पुत्र असून हा नंदनवनाचा राजा आहे. हे दोन्ही एकच होत. वेदांतील वरुणासारखी अहुरमज्द ही देवता आहे. दोन्ही संप्रदायांत पिशाचादिकांचीं कांहीं नांवें सारखीं आहेत. उदाहरणार्थ द्रुह ( द्रुज ) व यातु.

**तुलनात्मक दैवतशास्त्र.**—इंडोयूरोपीय कालासंबंधीं आपणांला निश्चित सिद्धांत काढण्याला फार थोडा वाव सांपडतो. संशोधनाच्या पहिल्या उत्साहांत पुष्कळशीं नामसादृश्यें एकत्रित केलीं गेलीं व हीं सादृश्यें जरी प्रथम बहुतांनीं मान्य केलीं तरी यांतील पुष्कळशीं आतां अमान्य झालेलीं आहेत; आणि जीं थोडींशीं अजून कांहीं पंडित मान्य करतात त्यांनांहि फारसा बळकट आधार राहिलेला नाहीं. द्यौस्=झ्युस् हें सादृश्य मात्र अजून निर्विवाद समजलें जात आहे. वरुण=ओरेनोस् या समीकरणामध्यें जरी कांहीं

वर्णविपर्ययविषयक अडचणी असल्या तरी हें थोडेंफार बरोबर आहे असें मानतां येतें. पर्जन्य आणि लिथुएनियन् लोकांचा पेर्कुनस् या दोहोंमध्यें अर्थदृष्ट्या साम्य आहे. परंतु या ठिकाणीं वर्णविपर्ययविषयक नियमांच्या अडचणी वरच्याहून जास्त आहेत; 'भग' हा शब्द स्लॅव्हानिकमधील 'बोगू' व अवेस्तामधील 'भग' यांशीं समान आहे. व ज्या अर्थी या समान शब्दांचा अर्थ सामान्यतः देव असा आहे त्या अर्थी वेदांतील इन्डोयूरोपीय 'भग' शब्दाचा विशिष्ट देवतापर अर्थ नसावा. 'उषस्' हें नांव व्युत्पत्तिदृष्ट्या 'आरोरा' आणि 'होस्' या शब्दांजवळ आहे. तरीपण उषेची उपासना हा भारतांतील विशेष प्रकार आहे. इन्डो-यूरोपीय कुलाच्या निरनिराळ्या शाखांमध्यें मेघदेवताविषयक जे गुण प्राचीन कथांतून उल्लेखिलेले आहेत त्या गुणांच्या ऐक्यावरून असें अनुमान काढलेलें आहे कीं, इन्डोयूरोपीय काळांत अशी एक प्रकारची देवता होती. मात्र या देवतेचें नांव निरनिराळ्या शाखांमध्यें निरनिराळें होतें. स्वभाव-गुणांच्या ऐक्यावरून बसविलेल्या समीकरणांमध्यें एकदोन समीकरणें खरीं दिसतात. प्रकाशाशीं व स्वर्गाशीं संबंध असणाऱ्या उच्च दर्जाच्या देवतांची कल्पना इन्डोयूरोपीय काळांत तयार झालेली होती, हें ( संस्कृत ) देवः, ( लिथु-एनिअन ) देव, ( लॅटिन् ) द्युस्, या निरनिराळ्या शाखांतील सारख्या नांवांवरून उघड होत आहे. पृथ्वी ही माता, आकाश हा पिता ( संस्कृत) द्यौस्पितर्, (ग्रीक) झ्यू पाटेर्, ( लॅटिन् ) ज्युपिटर्, या कल्पना वरील कल्पनेपेक्षांहि जुन्या आहेत असें वाटतें. कारण चीन व न्यूझीलंड यांच्या दैवतेतिहासांत पृथ्वी व स्वर्ग हे जगताचे मातापितर असल्याची कल्पना आहे, व इजिप्तच्या इतिहासांतहि ही कल्पना सांपडते. वेदामध्यें जे मंत्रतंत्र आढळतात व जी अचेतन वस्तूंची उपासना सांपडते, ती देखील मनुष्यजातीच्या मनोविकासाच्या वरीलप्रमाणें पुरातन प्राथमिक स्थितींत उत्पन्न झाली असावी असें निःसंशय दिसतें. मात्र आर्यन् लोक भारतांत आल्या-नंतर भारतांतील देश्य जातींच्या या बाबतींतील कल्पनांचा त्यांजवर थोडाफार परिणाम झाला असावा हेंहि त्याजबरोबर कबूल केलें पाहिजे.

भारतीय दैवतशास्त्राबद्दल सामान्य विचार झाला. या विषयावर अधिक विचार व्यक्त करण्यापूर्वी आपण कांहीं उदाहरणें सविस्तर घेऊन पुढें अधिक विचार करूं.

वैदिक दैवतांमध्यें ज्या दैवतावर अधिक ऋचा तयार झाल्या अशी देवता इन्द्र होय. तर आपण आतां त्या देवतेकडेच वळूं.

इन्द्राविषयीं पुढें दिलेली सर्व माहिती ऋग्वेदांतून घेतली आहे. ब्राह्मणांतील व यजुर्वेदांतील कल्पनांची ऋग्वेदांतील कल्पनांपेक्षां ज्यास्त प्रगति झाली असल्यामुळें त्या कल्पना व ऋग्वेदांतील कल्पना एकत्र करण्याचा प्रयत्न केल्यास गोंधळ उडेल. ऋग्वेदांत न आढळणारीं अशीं सामवेदांत फारच थोडीं सूक्तें आढळतात व त्यांत महत्त्वाची कांहींच हकीकत आढळत नाहीं. अथर्ववेदांत ऋग्वेदांत आढळणाऱ्या माहितीपेक्षां निराळी माहिती आढळत नाहीं.

इन्द्रासंबंधीं पुढें जो मजकूर लिहिला आहे त्याचे चार भाग केले आहेतः—

( १ ) भारतीय लोकांच्या इन्द्राविषयींच्या मूळ कल्पना व मानवत्वारोपित इन्द्रानें दर्शविल्या जाणाऱ्या सृष्टींतील शक्ती. ( २ ) इन्द्राच्या मातापितरांविषयीं हकीकत व इन्द्राच्या जन्माविषयीं दंतकथा व वर्णनपर गोष्टी. ( ३ ) मानवी जग व मनुष्यातीत जग, जड सृष्टि व नैतिक जग यांतील इन्द्राचे व्यापार. ( ४ ) इन्द्र हा खरा मनुष्यच आहे अशी कल्पना व त्या कल्पनेमुळें वेदांत आढळणारें इन्द्राचें वर्णन.

**इन्द्राविषयींच्या मूळकल्पना.**—संस्कृतज्ञ पंडितांच्या मतें इन्द्र हा निरभ्र व स्वच्छ अशा आकाशाचा देव किंवा पाऊस पडत असतां आकाश ज्या स्थितींत असतें तशा आकाशाचा देव आहे.

रोटचें एके वेळीं असें मत होतें कीं, इन्द्र हा निरभ्र अशा सूर्योदयापासून सूर्यास्तापर्यंतच्या आकाशाचा देव आहे. बेनफे असें म्हणतो कीं, पाऊस पडण्याच्या वेळीं आकाश जसें असतें तशा आकाशाचा देव इन्द्र होय. मॅक्समुल्लर म्हणतो कीं, जुपिटर ज्विहअस व इन्द्र ह्या एकच देवता आहेत व त्या पर्जन्यदेवता आहेत. लुड्विग म्हणतो कीं, इन्द्र हा आकाशाचा देव आहे; त्याच्या संरक्षणाखालीं व नेतृत्वा-खालीं एका बाजूस सूर्य व तारे आहेत व दुसऱ्या बाजूस वादळ किंवा विजेचा पाऊस आहे. वर्गेननें इन्द्राला युद्ध-देवता म्हटलें आहे.

पेरीसाहेबांचें मत *या सर्व मतांहून निराळें आहे. इन्द्र हा अंतरिक्षांतील देवतांपैकीं एक देवता आहे असें ते म्हणतात. ग्रीक लोकांचा झ्युस हा देव, इटॅलिअन लोकांचा जुपिटर हा देव व इन्द्र हे एकच असें समजल्यामुळें इन्द्राला आकाशाच्या देवांपैकीं एक देव म्हणण्यांत आलें असें पेरीसाहेब म्हणतात. झ्युसप्रमाणेंच इन्द्रालाहि युद्ध करावें लागलें आहे ही गोष्ट खोटी नाहीं. अविभक्त अशा इण्डो-यूरोपियन कथांत ढगरूपी राक्षसांनां "द्यु"नें जिंकलें अशी कथा आहे; व यावरून "द्यु"चे जागीं इन्द्र आला असें आपणांस म्हणावें लागतें. परंतु मुळांत इन्द्र ही आकाशाची देवता होती असें म्हणणें बरोबर होणार नाहीं. फार तर इतकें म्हणतां येईल कीं, मेघरूपी राक्षसांनां जिंकणारी व आकाशाचीच एक देवता जी "द्यु" तिचे मूळ व्यापार ते भारतीय लोकांनीं निराळ्याच

* अमेरिकन ओरिएण्टल सोसायटीचें जर्नल, पु. ११.

प्रकारच्या इन्द्र नांवाच्या देवतेला दिले. ही देवता हळू हळू द्युदेवतेच्या बरोबरीनें प्रतिष्ठा पावली होती.

वेदांत इन्द्र हा वादळाचा देव आहे ही गोष्ट त्यांतील अनेक उताऱ्यांवरून सिद्ध होतें.

उदाहरणार्थ पहा (१.५५,४; ५.३२,१०; १.५५,१; २.१२,१३; ६.३१,२; ६.१८,२; १०.९२,८; १.५२,८;)

इन्द्र हा वादळाचा देव होय असें जरी वरील उताऱ्यांवरून आपणांस दिसतें तथापि आकाशाच्या देवतांपैकीं तो एक नव्हता असें आपणांस म्हणतां येणार नाहीं.

वरील वादळाचा चमत्कार कोठें होतो याविषयीं भारतीय लोकांचे वेदकालीन विचार काय होते हें आपण पाहूं. तत्कालीन भारतीय विश्वाचे तीन निरनिराळे भाग कल्पीतः—१ पृथ्वी २ अन्तरिक्ष ३ आकाश. वेदांत अन्तरिक्ष व आकाश हे भिन्न प्रदेश मानले आहेत. वेदकालीन लोकांच्या पूर्वीं स्वर्गांत जे चमत्कार घडतात अशा समजुती असत ते चमत्कार अन्तरिक्षांत घडतात असें वेदकालीन लोक समजूं लागले. मूळ समजुतींत किंवा कल्पनांत हा जो फेरफार झाला तो इतर आर्य जातींपासून हिंदुस्थानाकडे आलेले आर्य लोक जेव्हां विभक्त झाले तो काल. वेदसूक्तें रचलीं गेलीं तो काल यांच्या दरम्यान केव्हां तरी झाला असावा. कारण वेदांत स्वर्ग, अन्तरिक्ष व पृथ्वी हे अगदीं भिन्न ठेविले आहेत व ते अशा रीतीनें कीं, अन्तरिक्षाची कल्पना स्वर्ग व पृथ्वी यांच्यानंतर उत्पन्न झाली असें वेद वाचणाऱ्या कोणत्याहि मनुष्याचे लक्षांत यावें. स्वर्ग व पृथ्वी यांना विश्वाचे मायबाप वेदांत म्हटलें आहे. स्वर्ग व अन्तरिक्ष किंवा पृथ्वी व अन्तरिक्ष यांना आईबाप कोठेंहि म्हटलेलें नाहीं. यावरून सुद्धां अन्तरिक्षाची कल्पना स्वर्ग व पृथ्वी यांच्यानंतरची आहे हें उघड दिसतें.

द्यौ, अन्तरिक्ष व पृथ्वी हे विश्वाचे तीन निरनिराळे भाग आहेत अशी जी कल्पना ती वर्धमान होत असतां इन्द्र नांवाच्या देवतेची कल्पना वृद्धिंगत होत होती. इन्द्राची मूळ कल्पना कशापासून उत्पन्न झाली हें वेदावरून समजणें कठीण आहे कारण वेदांत त्याला सर्वांत श्रेष्ठ किंवा सर्वांत बलवान् देव असें म्हटलें आहे. अवेस्ता भाषेंत इन्द्र किंवा अन्द्र शब्द आढळतो व स्लॅव्ह भाषेंत जेड्रु=वेगवान् असे शब्द आढळतात त्यावरून हिंदुस्थानांतील आर्य लोकांची इतर आर्य लोकांपासून फाटाफूट होण्यापूर्वी एकंदर आर्यसमूहांत इन्द्राविषयीं कांहीं ओबडधोबड कल्पना अस्तित्वांत असावी असें दिसतें.

वेदकालीन भारतीयांच्या मतें इन्द्राचे व्यापार अन्तरिक्षांत चालतात. त्यांच्यामतें स्वर्गांत भांडणें, युद्ध वगैरे कदापि होत नाहींत. तेथें अक्षय्य प्रकाश व शांति वास करितात. तेथें अक्षय्य जलाशय आहेत. तेथें पवित्र व देदीप्यमान आदित्य राहतात. अन्तरिक्षांत पापी जीव राहतात. आदित्यांहून अधिक बलवान् अशा इन्द्रानें त्यांचा पराभव केला. पापी जीवांशीं लढण्यास इन्द्र स्वर्गांतून अन्तरिक्षांत उतरला नाहीं, कारण तत्पूर्वींच तो अन्तरिक्षांत होता. पवित्र किंवा शुद्ध जीव व पापी जीव यांचेमध्यें वादळांत युद्ध झालें त्या युद्धाची इन्द्र देवता आहे. सर्व राक्षसांचें वसतिस्थान जें अन्तरिक्ष तें रणक्षेत्र होतें.

इंद्र हा स्वर्गाचा देव कल्पीत नसत याला दुसरा पुरावा यास्काच्या निरुक्तांत आढळतो.

**इंद्राची उत्पत्ति.**—वादळें व त्यापासून होणारे चांगले व वाईट परिणाम ह्यांच्याच ठिकाणीं फक्त दैविकल्पना करून वेदकालीन ऋषींची तृप्ति होईना, एवढेंच नव्हे तर त्यांनीं सृष्टींतील इंद्राचें कार्यक्षेत्र बरेंच वाढविलें व त्याची मूळची कल्पना अशा तऱ्हेनें वाढविली कीं, शेवटीं इंद्र मर्त्य जगांत वावरूं लागला, ताऱ्यांचे मार्ग आडवूं लागला व त्रैलोक्याच्या हालचाली करूं लागला. दुसऱ्या कोणत्याहि वेदकालीन दैविक कल्पनेपेक्षां त्यांनीं इंद्राला जास्त मानवी केला परंतु तसा मानवी करतांना मूळ दैवी कल्पनेला मात्र बाध येऊं दिला नाहीं. सरतेशेवटीं इंद्राचें जन्म इतर देवांपासून झालें असून तो इतर देवांचें अस्तित्व असलेल्या जगांत प्रविष्ट झाला अशी समजूत रूढ झाली.

इन्द्राच्या अवतारासंबंधीं ऋग्वेदांत बऱ्याच ठिकाणीं उल्लेख आलेला आहे; त्याबद्दलच्या वर्णनाचे मुख्यतः चार भाग पाडतां येतील. पहिल्या भागांत इन्द्राचें शारीरिक वर्णन येईल, दुसऱ्या भागांत इन्द्राचें जनन साधारण मनुष्याप्रमाणेंच झाल्याचा उल्लेख आहे, तिसऱ्या भागांत इन्द्राच्या मातापितरांसंबंधीं उल्लेख आहे परंतु त्यांचीं नांवें अगर स्वभाव यासंबंधीं कांहीं उल्लेख नाहीं, व चवथ्या भागांत वरील तीनहि भागांतील उल्लेखाला विसंगत दिसणार नाहींत अशा अलीकडील समजुती आहेत.

इन्द्राच्या वंशवृक्षासंबंधीं संगतवार हकीकत आढळत नाहीं. इन्द्राच्या मातापितरांविषयीं उल्लेख आढळतो खरा, परंतु तो अगदीं त्रोटक अथवा उडत उडत केलला आढळतो. इतका कीं, त्या मातापितरांची नांवेंसुद्धां आढळत नाहींत. ऋग्वेदांत इन्द्राच्या बापाचे 'द्यु' असें नांव आढळतें परंतु आईचीं मात्र निरनिराळीं नांवें आढळतात. इन्द्राच्या आईला पृथ्वी म्हटलेलें आढळतें. त्याचप्रमाणें ढगहि म्हटलेलें आढळतें. पुष्कळ ठिकाणीं ह्या मातापितरांसंबंधीं ती केवळ कल्पना आहे अशा तऱ्हेनें विचार केलेला आढळतो. इन्द्र हा अदितीचा पुत्र आहे ह्या समजुतीविषयींचें विवेचन पुढें येईल.

वरील समजुतींच्या समर्थनासाठीं खालीं दिलेल्या ऋचांचा विचार केलेला आहे.

(१) सृष्टिविषयक कल्पना.—एका ऋचेंत इंद्राचें जन्म म्हणजे एक अलंकार आहे असें म्हटलें आहे, कारण वादळ सुरू झालें म्हणजेच इंद्राचें जन्म झालें असें मानतात.

(४.१७,४) मध्यें असें म्हटलें आहे कीं, "इंद्राचा पिता म्हणजे आकाश; इंद्राचा उत्पादनकर्ता मोठा कुशल कारागीर असला पाहिजे, कारण पृथ्वीप्रमाणें अचल असें जें वज्र तें वज्र हा इंद्र सहज धारण करतो. त्याच सूक्तांत दुसऱ्या एका ऋचेंत म्हटलें आहे कीं, तुझ्या आवेशाच्या भीतीनें आकाश थरारलें, तुझ्या रागाच्या भीतीनें पृथ्वी थरारली. पर्वत चलन पावले, क्षेत्रें थरारलीं व पाणी पसरलें." आणखी एका ऋचेंत म्हटलें आहे कीं, इंद्र आपल्या मातेची मुळींच पर्वा करीत नाहीं तशीच आपल्या बापाचीहि पर्वा करीत नाहीं. ह्या ऋचेचा अर्थ असा दिसतो कीं, ज्या अर्थी वादळामुळें आकाश व पृथ्वी यांनां अतिशय त्रास होतो त्या अर्थी इंद्र आपल्या आईबापांची मुळींच पर्वा करीत नाहीं. दुसऱ्या एका ऋचेंत असेंच वर्णन आहे. (४.२२,४.) यांत असें म्हटलें आहे कीं, इंद्राच्या जन्माच्या वेळीं प्रत्येक पर्वत, आकाश व पृथ्वी कंपायमान झाली. इंद्र ज्या वेळीं आपल्या मातापितरांनां गाईजवळ म्हणजे मेघांजवळ आणतो त्या वेळीं वारे घोंघाउं लागतात.

या ऋचेंत देखील वादळाचेंच वर्णन आहे. बहुतेक सर्व ऋचांतून वादळाचें वर्णन आहेच. कांहीं ऋचांत जास्त सविस्तर आहे. ८.६,२८ ते ३० पर्यंत एका उषःकालीन वादळाचें वर्णन आहे त्यांत असें म्हटलें आहे कीं, पावसासाठीं प्रार्थना करणारांच्या प्रार्थनेला उत्तर म्हणून वादळ धाडलें व या वादळांतच इन्द्राचें जन्म झालें. १.६,३ मध्यें असें म्हटलें आहे कीं, काळोखाचा निःपात करून अदृश्य वस्तूंनां दृश्य करणारा जो तूं त्या तुझें जन्म उषःकालाच्या समयीं झालें.

याच कल्पनेला पोषक अशी दुसरी एक कल्पना इतरत्र आढळते त्या ठिकाणीं इन्द्रानें उषेच्या रथाचा उच्छेद करून उषेला भयभीत केलें अशा तऱ्हेचीं वर्णनें आढळतात. परंतु त्या कल्पनांचा प्रस्तुत विषयाशीं तसा फारसा संबंध नाहीं.

(२) इन्द्राच्या मनुष्याकारत्वाच्या कल्पना.—चवथ्या मंडळांतील १८ व्या सूक्तांत इन्द्राविषयीं वर्णन आलेलें आहे. ह्या सूक्ताचे रोट निरनिराळे भाग पाडतो. (१) जगांत येण्याचेवेळीं निसर्गसिद्ध मार्गानें न येतां इन्द्र आपल्या मातेच्या बरगड्यांतून बाहेर येण्याचा बेत करतो (४.१८,). इन्द्र आपल्या मातेच्या उदरांत एक हजार महिने व अनेक वर्षे होता, त्याच्यासारखा कोणीहि झाला नाहीं व होणारहि नाहीं (४.१८,४). (२) इन्द्र जन्माच्यावेळीं अगदींच अशक्त असल्यामुळें त्याच्या मातेनें त्याला टाकून दिलें होतें येवढेंच नव्हे तर त्याला तिनें कुशवा नदींत बुडविलें. परंतु त्याचा जीव वांचून तो पुढें सशक्त व विजयी झाला. (३) नुक्ताच जन्मलेला इन्द्र आपला पराक्रम दाखवितो. (४.१८,५) (४) इन्द्र स्वतःच्या बापाला ठार मारतो (४.१८,१२).

रोटच्या ह्या वर्गीकरणाशिवाय या सूक्तांतील ऋचांचा संबंध नीटसा लागत नाहीं.

जन्मल्याबरोबरच इन्द्रानें सोमरसाचें पान केलें. इन्द्राच्या पराक्रमाबद्दल इन्द्राच्या मातेला भरंवसा होता असें एका ऋचेंत म्हटलें आहे व एकांत तितकासा विश्वास नव्हता असें म्हटलें आहे.

१०.१५३,१ मध्यें इन्द्राच्या जन्मानंतर त्याच्याभोंवतीं दासी जमल्या आहेत असें वर्णन आहे. ह्या वर्णनानें इंद्राच्या कल्पनेला पुष्कळच मानवी स्वरूप दिलेलें आहे. त्या ऋचेंत म्हटलें आहे कीं, "बायकांनीं इंद्राला पाळण्यांत घातला व इंद्राचा पराक्रम जागा केला." दुसरे एके ठिकाणीं इंद्राची दाई म्हणजे स्वर्गंगा होय असें म्हटलें आहे.

(३) इंद्राचीं मातापितरें–इन्द्राच्या मातापितरांसंबंधीं वारंवार उल्लेख येतो परंतु त्यांचीं नांवें मात्र आढळत नाहींत. उदाहरणार्थ, १०.२८,६ "मी पृथ्वीवर एकदम हजारों फेंकतों, कारण माझ्या पित्यानें मला अशत्रु निर्माण केला आहे." "युद्ध करण्यासाठीं एका असामान्य पुरुषानें एक असामान्य पुरुष उत्पन्न केला. एका वीरपत्नीच्या पोटीं एक वीर जन्मला" (७.२०,५).

८.५८,१५ ह्या ठिकाणीं इंद्राच्या बाल्यावस्थेसंबंधीं उल्लेख आलेला आढळतो. त्या ठिकाणीं असें म्हटलें आहे कीं, "इंद्र बालक असतांना रथावर चढला व त्यानें आपल्या आईबापांसाठीं एक मोठा बैल भाजला." 'बहुतकरून आपल्याला ह्या ठिकाणीं हट्टी व बलाढ्य मुलाचें विचित्र वर्णन आढळतें.'

इन्द्राच्या मातेबद्दल उल्लेख आढळतो परंतु पुन्हां तिचें नांव कोठेंहि स्पष्ट आढळत नाहीं.

६.५९,१ ह्या ठिकाणीं म्हटलें आहे कीं "इन्द्र व अग्नि यांचीं मतापितरें देवांनीं मारलीं परंतु इंद्र व अग्नि मात्र जिवंत राहिले त्यांचे पराक्रम सोमपानाचे समयीं वर्णन करण्यांत येतील" लडविग ह्या ऋचेचा असा अर्थ लावतो कीं, "इन्द्रानें आपलीं मातापितरें ईश्वरद्रोही असल्यामुळें ठार मारलीं." पुन्हां ऋ. २ मध्यें म्हटलें आहे कीं, तुम्ही

जुळे भाऊ आहां. तुमचा बाप एकच होता परंतु "आया मात्र वेगवेगळ्या ठिकाणीं होत्या.'

( ४ ) तर्कानें अनुष्ठित केलेल्या इन्द्राच्या उत्पत्तीविषयीं निरनिराळ्या कल्पना—बहुतेक सर्वांच्या मतानें इन्द्र हा युद्ध व वादळ यांची देवता आहे. एका ठिकाणीं इन्द्राला सत्यसूनु असेंहि म्हटलें आहे ( ८.५८,४ ).

१०.१०१,१२ मध्यें इन्द्राला निष्टिग्रीचा मुलगा म्हटलें आहे. निष्टिग्री हा शब्द फक्त येथेंच आढळतो व त्याच्या अर्थाबद्दल अजून बराच मतभेद आहे. सायण निष्टिग्रीचा अर्थ अदिति असा लावतो ( निष्टिम् गिरति ) परंतु तो अर्थ बरोबर नाहीं. कारण सायण निष्टि व दिति एकच आहेत असें म्हणतो; परंतु निष्टिग्री शवसीप्रमाणेंच केवळ काल्पनिक व्यक्ति कशावरून नाहीं हा प्रश्न राहतोच.

अशा ऋचांच्या विस्तारशः परिशीलनानें इन्द्राच्या मातापितरांविषयींचा प्रश्न जास्तच दुर्बोध होऊं लागतो. म्हणून एकंदर जुन्या मताचा विचार करतां असा निष्कर्ष निघतो कीं, पृथ्वी व आकाश हींच सर्वमान्य अशीं इंद्राचीं मातापितरें आहेत. इंद्राच्या पित्याला द्यु असें म्हटलें आहे (४.१७,४) व (४.१८,१२). त्याचप्रमाणें १०.५४,३ मध्यें देखील इंद्राचीं मातापितरें म्हणजे आकाश व पृथ्वीच होत असें मूरनें म्हटलें आहे.

१०.७३,१० मध्यें इंद्राच्या बापाला घोडा म्हटलें आहे परंतु त्या ठिकाणच्या 'अश्व' शब्दाचा अर्थ १.१६३,२ मधील अश्व शब्दाच्या अर्थाप्रमाणेंच सूर्य होतो. परंतु इंद्राचा बाप सूर्य होता ह्या कल्पनेला आधार मुळींच नाहीं. अश्व व वृषभ हे दोन अतिशय शक्तिमान् पशु असल्यामुळें पराक्रमी इंद्र अश्वापासून उत्पन्न झाला अशी एखाद्या कवीनें कल्पना केलेली दिसते.

६.५९,२ मध्यें इंद्र व अग्नि हे जुळे भाऊ आहेत असें म्हटलें आहे व १०.४५,८ मध्यें अग्नीला 'द्यु'चा मुलगा म्हटलें आहे, व ३.३,११ व २५,१ आणि १०.१,२ मध्यें अग्नीला पृथ्वी व आकाश ( द्यावापृथिवी ) यांचा मुलगा म्हटलें आहे ह्यावरून इंद्राचींहि मातापितरें तींच होतात.

६.५९,२ वरून पाहतां इन्द्राची माता पृथ्वी ठरत नाहीं. इन्द्राच्या मातापितरांसंबंधीं तर्कापेक्षां अग्नीच्या मातापितरांसंबंधींचे तर्क नानाविध व जास्त घोंटाळ्याचे असल्यामुळें त्या तर्कांवरहि इन्द्राच्या मातापितरांसंबंधीं केलेला तर्क उभारतां येणार नाहीं.

या कारणामुळें भारतीय लोकांनीं आपल्या आवडत्या देवतेसंबंधीं या बाबतींत निरनिराळे तर्क करावे यांत नवल नाहीं. इन्द्राच्या आवेशामुळें व पराक्रमामुळें शवसीला मानवी आकार देण्यांत आला. पुराणकालीं वीरपुत्र आपल्या पित्याबरोबरच पराक्रम करीत. इन्द्रानें गायी म्हणजे ढग पादाक्रांत केले म्हणून त्याला गोषन् हें अभिधान मिळालें. ह्यावरून इंद्राला गाई पादाक्रान्त करणाऱ्याचाहि पुत्र समजूं लागले. आकाशाला गोषन् हाहि एक प्रतिशब्द आहे.

**इंद्राचें कार्यक्षेत्र, शत्रू, इतर देवांशीं त्याचा संबंध, इंद्र व त्याचे भक्त.**—इंद्रकार्य समजावून द्यावयाचें म्हणजे त्याचे पराक्रम वर्णन करावयाचे व त्याचे शत्रू सांगावयाचे. वृत्रकथा प्रत्येक वेदग्रंथांत व पुराणांत आलेली आहे, या कथेचें मूळ काय हा प्रश्न यास्काच्या काळीं जितका वादग्रस्त होता तितकाच आजहि आहे. वृत्रविषयक यास्कवाक्यें येणेंप्रमाणें.

तत्को वृत्रो, मेघ इति नैरुक्ताः, त्वाष्ट्रोऽसुर इत्यैतिहासिकाः अपां च ज्योतिषश्चमिश्रीभावकर्मणो वर्षकर्म जायते तत्रोपमार्थेन युद्धवर्णा भवंत्यहिवत्तु खलु मंत्रवर्णा ब्राह्मणवादाश्च विवृद्ध्या शरीरस्य स्रोतांसि निवारयांचकार तस्मिन्हते प्रसस्यंदिर आपः । वृत्रो वृणोतेर्वा, वर्ततेर्वा, वर्धतेर्वा, यदवृणोत्तद्वृत्रस्य वृत्रत्वमिति विज्ञायते, यदवर्तत तद्वृत्रस्य वृत्रत्वमिति विज्ञायते, यदवर्धत तद्वृत्रस्य वृत्रत्वमिति विज्ञायते. ( नि. पू. २.१६ )

वृत्राच्या कल्पनेचें मूळ जितकें अनिश्चित आहे तितकेंच इन्द्राबद्दलच्या कल्पनेचेंहि आहे व यास्कानें इन्द्राची व्युत्पत्तीहि अनेक प्रकारें दिली आहे.

इन्द्रः, इरां दृणाति, इरां ददाति, इरां दधाति, इरां दारयते, इरां धारयते, इन्दवे द्रवति, इन्दौ रमते, भूतानि इन्धे, यत् एनम् प्राणैः समैंधन् तदिन्द्रस्य इन्द्रत्वम्, इदंकरणादिति आग्रायणः, इदंदर्शनात् इति औपमन्यवः, इन्दति इति, इन् शत्रूणां दारयिता वा द्रावयिता वा, दरयिता च यज्वनाम् ।

( नि० उ० ४.८ )

आतां प्रथमतः इन्द्राच्या अनेक शत्रूंची माहिती थोडक्यांत देऊन नंतर त्याच्या कांहीं पराक्रमांचें सविस्तर वर्णन करूं.

**इन्द्राच्या विरुद्ध लढणारे राक्षस.**—ह्या राक्षसांबद्दल इतका त्रोटक उल्लेख आलेला आहे कीं, ते राक्षस पाऊस चोरणाऱ्या जातींपैकीं आहेत कीं, दुसऱ्याच कोणत्यातरी बाबतींत मनुष्यांनां हानिकारक आहेत हें नीट समजत नाहीं.

अ न र्श नि.—ह्या दैत्याचें नांव फक्त ८.३२,२. मध्येंच आढळतें. ह्याचें स्वरूपवर्णन नीटसें आढळत नाहीं. हें नाम कोणच्या धातुपासून झालें हेंहि नीट कळत नाहीं. 'अन्' आणि 'अर्श' ( =ऋश ) अशीं पदें पाडलीं तर त्याचा अर्थ, 'निरुपद्रवी' असा होतो. हा अर्थ कविकल्पनेला सहायक होत नाहीं.

अर्णव.—हें राक्षसाचें नांव नाहीं. सेंटपीटर्स० कोश व ग्रासमन १०.६६,११; ६७,१२; १११,१४ ह्या उताऱ्यांचा दाखला घेऊन हें नांव एका राक्षसाचेंच होतें असें ठरवूं पाहतात. ६७,१२ मधील 'अर्णवस्य' हें 'अर्बुदस्य' याचें विशेषण आहे.

अर्बुद.—१.५१,६ मध्यें म्हटलें आहे कीं, 'त्वां मोठ्या-थोरल्या अर्बुदाला पायाखालीं तुडविलेंस' त्याच ऋचेंत शुष्ण व शंबर यांचींहि नांवें आहेत. १०.६७,१२ मध्यें अर्बुदाला अर्णव हें विशेषण लावलेलें आहे. त्यावरून अर्बुदाची सर्पाकृति असावी असा बोध होतो. इन्द्र याचा शिरच्छेद करतो. सें. पीटर्स० कोशांत त्याचा अर्थ दोन्ही वेळीं 'सर्प' असाच दिला आहे. हा अर्बुद म्हणजे खालील अर्बुदच होय.

अर्बुद.—२.११,२० मध्यें म्हटलें आहे कीं, "त्रितानें दिलेल्या पेयानें ताजातवाना झाल्यानंतर त्यानें अर्बुदाला खालीं पाडलें." २.१४,४ मध्यें अर्बुदावरोबरच 'उरणा'चा उल्लेख आहे. ८.३२,२६ मध्यें इन्द्र त्याच्यावर बर्फाचा मारा करून त्याचा पराभव करतो असें वर्णन आहे. ३ ऱ्या ऋचेंतहि अर्बुदासंबंधींच उल्लेख आहे. ८.३,१९ मध्यें वर्णन आहे कीं, "त्वां अर्बुदाच्या डोंगरांतून गाईंनां सोडविलेंस."

अहि.—याचा अर्थ सर्प अथवा दैत्य असून शिवाय विलक्षण प्राणी असाहि आहे. 'अहिर्बुध्न्य' म्हणजे पाताळांतील सर्प असा अर्थ होतो. बहुतेक प्रसंगीं हा अहि म्हणजे वृत्र असाच उल्लेख आढळतो. १.५१,४; ४.१७,७; ६.७२,३; १०.११३, ३ व १.३२ ताइन पहा. ह्या शब्दांत 'अह्' हा धातु आहे.

अहिशुव.—ह्या दैत्याचा उल्लेख सृबिन्द, अनर्शनि, व पिप्रु यांच्याबरोबर ८.३२,२ मध्यें आलेला आहे. २६ व्या ऋचेंत "और्णवाभम् अहिशुवम्" असे शब्द आहेत त्यांचा अर्थ ग्रासमन 'कोळ्याच्या जातीचा अहिशुव' असा लावतो. त्याचप्रमाणें ८.६६,२ मध्यें तोच अर्थ आहे. १०.१४४,३ मध्येंहि ह्या अहिशुवाचा उल्लेख आलेला आहे. ह्या ऋचेवरून ग्रासमन अहिशुव व ४.२७,३ मधील 'अस्ता कृशानस्' हे एकच असें म्हणतो. ह्याच दैत्याला वंसग म्हटलेलें आहे. तो आपल्या ढगरूपी गाईंमध्यें असल्यामुळें त्याला आपल्या कळपांतील बैल म्हटलेलें आहे.

अहिशुवाच्या व्यतिरिक्त असा और्णवाभ हा शब्द फक्त २.११,१८ मध्येंच आढळतो. 'कोळ्याच्या जातीचा' हें रूपांतर असयुक्तिक नाहीं.

अश्न (लोभी).—ह्या दैत्याचें नांव २.२०,५ व २.१४,५ मध्यें आढळतें. त्या ऋचांतून इन्द्रानें अश्न दैत्याचें निवासस्थान उद्ध्वस्त केलें अशा तऱ्हेचें वर्णन आहे. ६.४,३ मध्येंहि अश्न दैत्याचा उल्लेख आहे. सूर्याला उगविण्यास लावून इन्द्रानें ह्या दैत्याच्या आश्रयस्थानाचा विध्वंस केला असा हा लोभी कोण होता? ह्या लोभी प्राण्यानें पाऊस चोरल्याचा जरी २.१४,५ मध्यें उल्लेख आलेला आहे तरी हा प्राणी अंधकाराचा दैत्य असावा.

इलीविश.—ह्या दैत्याचें नांव फक्त १.३३,१२ मध्येंच आढळतें. त्या ठिकाणीं इन्द्रानें इलीविशाचे किल्ले जमीनदोस्त केले अशा तऱ्हेचा उल्लेख आहे. या इलीविश शब्दाचा अर्थ 'पाण्याला अडविणारा' असा यास्काचार्यांनीं निरुक्तांत (६.१९) सांगितला आहे.

उरण.—२.१४,४ मध्येंच ह्याचें नांव आढळतें. सें. पीटर्स. कोशांत याचा अर्थ मेष असा दिला आहे तो ढगांच्या आकृतीशीं जुळता आहे; कारण ढगांच्या आकृती पुष्कळ प्रसंगीं मेंढासारख्या दिसतात.

और्णवाभ 'अहिशुव' पहा.

करंज.—ह्याच्या नांवाचा उल्लेख 'पर्णय'बरोबर १.५३,८ मध्यें आणि पर्णय व वृत्राबरोबर १०.४८ मध्यें आढळतो. ह्या दोघांचाहि पराभव इन्द्रानें केला त्या वेळीं इन्द्राबरोबर अतिथिग्व होता. अतिथिग्व हें दिवोदासाचें पैतृक नांव होतें. ह्या दिवोसाकरितां इन्द्रानें शंबराला मारिलें अशी कथा आहे. 'पर्णय' या शब्दाचा उघड अर्थ पंख असलेला असा होतो. करंज हा शब्दाची व्युत्पत्ति करंज म्हणजे कोणता रंग? म्हणजे काळा अशी असावी.

कुयव.—हा शब्द जरी वारंवार शुष्णाचा विशेषणात्मक वापरला जातो तथापि हें एक विशेषनाम आहे. उदाहरणार्थ, १.१०३,३ मध्यें हा शब्द विशेषणात्मक वापरलेला नाहीं. वृत्राचें हें एक टोपण नांव असावें. १.१०४,३ मध्यें ह्या कुयवाला दोन बायका होत्या असें वर्णन आहे.

[कुयवाक् हा शब्द फक्त १.१७४,७ मध्येंच आढळतो. सें. पीटर्स. कोशांत त्याची व्युत्पत्ति कुय (कु) वाक्='वाईट बोलणारा' अशी दिलेली आहे. परंतु कुय म्हणजे कु असें घेण्यास प्रमाण नाहीं तथापि ही व्युत्पत्ति अर्थ लावण्यास उपयोगीं पडते. कारण त्या ऋचेंत फक्त पृथ्वीवरील शत्रूंचा त्यांतल्यात्यांत निंदकांचा उल्लेख आहे.]

कौलितर.—'शंबर' पहा.

किवि.—कातड्याची पिशवी अथवा बाटली म्हणजे पाण्यानें भरलेला ढग. २.१७,६ आणि २.२२,२ व वालखिल्य ३.८ मध्यें याचा उल्लेख आलेला आहे. हें एका दैत्याचें नांव दिसतें.

चुमुरि.—हा साधारणतः धुनीबरोबर असतो या दोघांनांहि इन्द्रानें निजविलें. दभितिसाठीं इन्द्रानें त्यांचा वध केला. ६.२६,६ मध्यें एकटा चुमुरीच आढळतो. ह्या ऋचेंत

धुनीचा उल्लेख नाहीं. बाकी सर्व ठिकाणीं चुमुरी व धुनि या दोघांची जोडी आढळते.

दानव.—५.१९,४ मध्यें इन्द्रानें दानवाला मारला असें वर्णन आहे. दानव हा शब्द नदीला लावलेला आहे (५.३२,१; २.११,१०.)

दृभीक.—हे नांव २.१४,३ मध्यें आलें आहे. ह्याचा अर्थ कदाचित् 'जो एके ठिकाणीं गोळा करतो' असा असेल. सेंट पीटर्स. कोशावरून दृभ् हा धातु ब्राह्मणांत आढळतो.

धुनि.—'चुमुरी' पहा.

नमुचि.—ह्या शब्दाची व्युत्पत्ति 'न मुचि (म्हणजे जो पाऊस पडूं देत नाहीं) अशी पाणिनि देतो. १०.१३१,४ मध्यें अश्विनी व नमुचि यांचा संबंध आला आहे. त्याचा अर्थ अजून कळत नाहीं. त्या ऋचेंत नमुचि राक्षसाबरोबर अश्विनींनीं सोमपान केल्यानंतर त्यांनीं इन्द्राला मदत केली असें वर्णन आहे. बाकी सर्व ठिकाणीं नमुचि हा पाऊस चोरणारा दैत्य आहे.. ५.३०,७;८; व ६.२०,६ मध्यें इन्द्र त्याचा शिरच्छेद करतो असें वर्णन आहे. ५.३०,९; ८.१४,१३ मध्यें पाण्याचा फेंस मारून इन्द्र त्याला ठार करतो असें वर्णन आहे.

नववास्त्व.—'ज्याचें वसतिस्थान नवें आहे तो' १.३६, १८ व ६.२०,३१ मध्यें तें एका माणसाचें नांव आहे असा स्पष्ट उल्लेख आहे. पहिल्या उताऱ्यांत तें अग्नीच्या मित्राचें नांव आहे. दुसऱ्या उताऱ्यांत इन्द्राचा मित्र जो उशना त्याच्या दुसऱ्या मुलाचें नांव आहे. १.३६,१८ मध्यें त्याला बृहद्रथ म्हणजे ज्याचा रथ मोठा आहे असें म्हटलेलें आहे. १०.४९,६ मध्यें इन्द्रानें त्याचे तुकडे तुकडे केल्याचें वर्णन आहे.

नार्मर.—हें नांव फक्त २.१३,८ मध्येंच आढळतें. 'नार्मरं सहवसुम्' म्हणजे नार्मर स्वतःच्या परिवारासह असा अर्थ करावयाचा. सायणाचार्य सहवसु हें एका असुराचें नांव होतें असें म्हणतात.

पदगृभि.—पाय धरतो तो. हा १०.४९,५ मध्येंच आढळतो. ज्याच्या ताब्यांत इन्द्र या पदगृभीला देतो त्या सव्याचा नामनिर्देश इतरत्र केलेला आढळत नाहीं.

पर्णय.—'करंज' पहा.

पिप्रु.—हा शब्द परधातूपासून झालेला आहे. त्याचे अर्थ दोन होतात. दुसऱ्याला जिंकणारा अथवा स्वतःजवळ असलेल्या गोष्टीनें तृप्त असलेला. १.१०१,२ मध्यें पिप्रूला अव्रत म्हणजे कायदे मोडणारा म्हटलेलें आहे. हे कायदे म्हणजे वरुणानें घालून दिलेले कायदे होत. ४.१६,१३ मध्यें त्याला 'जगड्व्याळ राक्षस' म्हटलें आहे. इन्द्राकडून तो मारला जातो. तो शुष्ण व शंबर ह्या दोन राक्षसांबरोबर असतो. त्यांच्याप्रमाणेंच त्याचे किल्ले अनेक असतात. हे किल्ले म्हणजे ढग असावेत.

पिशाची.—फक्त १.१३३,५ मध्यें या नांवाचा नामनिर्देश आहे. दैत्यांच्या उच्चाटनार्थ सर्व सूक्त आहे. पिशा+अच अशी ह्या शब्दाची व्युत्पत्ति ग्रासमन लावतो. ह्याला 'वेताळाची दिवटी' असें नांव आहे.

मख.—हा देवांचा शत्रु असून ह्याच्या नांवाचा ९.१०१,१३ व १०.१७१,२ मध्यें उल्लेख आलेला आहे. पहिल्या उताऱ्यांत मख हा शत्रु मानलेला असून दुसऱ्या उताऱ्यांत मख हा लढवय्या आहे.

मृग.—वन्य पशु. वृत्र हा वन्य पशूचें रूप धारण करतो असें १.८०,७ मध्यें वर्णन आहे. ५.२९,४;३२,३;३४,२; ८.८२,१४ सेंट पीटर्स० कोशामध्यें तसेंच आहे. मृगय हा शब्द फक्त ४.१६,१३ मध्यें पिप्रूसंबंधीं योजलेला आहे. ८.३,२९ मध्यें अर्बुदासंबंधीं योजलेला आहे. १०.४९,५ मध्यें तें विशेषनाम आहे.

रुधिक्रा.—फक्त २.१४,५ मध्यें आढळतोः रुधि (रुधिर) व क्र (किर् धातु) म्हणजे रक्तस्राव करणारा अशी ह्या शब्दाची ग्रासमन व्युत्पत्ति लावतो. परंतु रुधिक्रा हा पाऊस चोरणाऱ्या दानवांपैकींच एक आहे मग ह्याला एकदम रक्ताचा स्राव करणारा असें कां म्हटलें?

रौहिण.—नैघंटुक १.१० मध्यें आढळतो. मेघाला हा प्रतिशब्द आहे. १.१०३,२ मध्यें पाऊस चोरणाऱ्या इतर दानवांबरोबरच त्याचाहि संहार झाल्याचें वर्णन आहे. २.१२,१२ मध्यें त्याला 'द्यामारोहन्त' म्हटलेलें आहे. ग्रासमन रोहिणीपासून हा शब्द झाला असें म्हणतो.

वनगृह.—फक्त १.५३,८ मध्येंच ह्याचा उल्लेख आहे. इन्द्र याचे हजार किल्ले उडवून देतो.

वर्चिन्.—याचा चार ठिकाणीं उल्लेख आलेला आहे. २.१४,६; ४.३०,१५; ६.४७,२१; व ७.९९,५ या चारीहि ठिकाणीं तो शंबराबरोबर असतो असें वर्णन आहे. एक लाख सैन्य घेऊन तो इन्द्रावर चालून जातो परंतु तो ठार होतो. ह्या शब्दांतील धातु वर्च् आहे असें ग्रासमन म्हणतो. रोट त्याचा संबंध वर्चस्शीं जोडतो.

वल.—याचा अर्थ गुहा असा आहे. ह्या गुहेंत वारिधारारूपी गाईंना दडवून ठेविलें असावें. नंतर त्या गुहेंत जो दैत्य रहात असे त्यालाहि 'वल' हेंच नांव प्राप्त झालें असावें. गुहा ह्या अर्थानें 'वल' शब्द ६.३९,२ मध्यें वापरलेला आहे. त्या ठिकाणीं गुहा फोडून इन्द्रानें पणींचा पराभव केल्याचें वर्णन आहे. त्याचप्रमाणें १०.६२,२; १३८.१; २.१२,३

ताइून पहा. १०.६८,६ मध्यें 'वल' हें विशेषनाम आहे. त्या ठिकाणीं बृहस्पतीनें वल राक्षसाचें राहण्याचें ठिकाण उद्ध्वस्त केलें अशा तऱ्हेचें वर्णन आहे. ६.१८,५; ८.१४,८ ताइून पहा. पुष्कळ ठिकाणीं या दोन अर्थांमध्यें विशेषसा भेद दिसून येत नाहीं. ज्या ठिकाणीं 'वल' हें विशेषनाम आहे अशीं ठिकाणें फारच क्वचित् आहेत.

वृकद्वरस.—२.३०,४ मध्येंच फक्त हें नांव आढळतें. वृत्राचेंच हें एक नांव असावें असें दिसतें. 'लांडग्यासारखा क्रूर' असा ह्या शब्दाचा अर्थ रोट व ग्रासमन लावतात.

वृशशिप्र.—बैलाप्रमाणें ज्याचे ओंठ आहेत असा ७.९९,४ मध्येंच कायतो हा शब्द आढळतो. इन्द्र व विष्णु ह्यांनीं ह्या दैत्याचा पराभव केला. तथापि हा शब्द केवळ विशेषण असावा असें वाटतें.

व्यंस.—रुंद खांद्याचा–४.१८,९ मध्यें तो इन्द्राला जखमी करतो असें वर्णन आहे. पिप्रु, शुष्ण, नमुचि, वगैरे दैत्यांबरोबर त्याचें नांव पांच सहा ठिकाणीं आढळतें. यापेक्षां त्याच्यासंबंधीं विशेषशी माहिती उपलब्ध नाहीं. १.१०१,२;१०३,२;२.१४,५;३.३४,३ ताइून पहा. १.३२,५ मध्यें व्यंस हें वृत्राचें विशेषण दिसतें.

चण्डिक.—२.३०,८ मध्यें अनेकवचनी रूप आहे. हे मनुष्य नसून राक्षस दिसतात. असुरांचा अध्वर्यु जो चण्ड त्याचेच हे पुत्रपौत्र असें सायणाचार्य म्हणतात.

शंबर.—याचें नांव पुष्कळ ठिकाणीं आढळतें. वाजसनेय संहितेंत हा दैत्यांचा अधिपति आहे. हा इन्द्राचा एक प्रबळ शत्रु होता. १०.४२,७ मध्यें इन्द्राच्या हातांतील आयुध शंब म्हणून असे असा उल्लेख आहे. हें शंब म्हणजे वज्रच असावें. शंबर हें एका राक्षसाचें नांव असून तें जातिवाचक आहे असें गृहीत धरलें तर इन्द्राचें आयुध धारण करणाऱ्या दैत्याचें उदाहरण ऋग्वेदांत हें एकच आढळतें. ४.१८,९ मध्यें व्यंसाबद्दल निविविश्वान ही शब्दयोजना असल्यामुळें दैत्यांच्या हातांत एक प्रकारचीं शस्त्रें होतीं असें दिसतें. अनार्य लोकांच्या अनेक टोळ्यांपैकीं एका टोळीचें शंबर हें कुलनाम असावें असें रोट आणि झिमर म्हणतात.

शंबराच्या बाबतींत खालील उतारे महत्त्वाचे आहेत. ६.४७,२१ मध्यें दुसऱ्या एका राक्षसाबरोबर इन्द्रानें शंबराचा वध केला असें वर्णन आहे. २.१२,११ मध्यें शंबर पर्वतांवर रहात असे असें वर्णन आहे, मग हे पर्वत पृथ्वीवरील असोत अथवा अंतरिक्षांतील ढग असोत. ७.१८,२० मध्यें शंबर स्वतःला एक देवच समजत होता असें वर्णन आहे. ६.२६,५ वरून शंबर हें अनार्य लोकांच्या टोळीचें एक नांव असावें असें दिसतें.

ढग हे शंबराचे किल्ले होत. इन्द्रानें असे नव्याण्णव अगर शंभर किल्ले उद्ध्वस्त केले असें ९.६१,१२; २.१४,६ मध्यें व ४.२६,३ मध्यें दिवसा ९९ किल्ले व शंभरावा किल्ला रात्रीं उद्ध्वस्त केला असें वर्णन आहे. हें सर्व इन्द्रानें दिवोदासासाठीं केलें. २.१२,११ मध्यें इन्द्राला शंबर चाळीस वर्षांनीं सांपडला असें वर्णन आहे. ह्यावरून चाळीस वर्षेंपर्यंत वादळ चालू होतें असें दिसतें. ४.३०,१४ मध्यें शंबराला कौलितर म्हटलेलें आहे.

शुष्ण.—वृत्राच्या खालोखाल शुष्ण हाच इन्द्राचा मोठा प्रतिस्पर्धी होता. पृथ्वीवर अवर्षण पाडणारा हा दैत्य होता. ५.३२,४ मध्यें याबद्दल उल्लेख आहे. त्या ऋचेंत इन्द्रानें आपल्या वज्रानें शुष्णाचा वध केला असें वर्णन आहे. कुयव हें विशेषण शुष्णाला लावलेलें आढळतें, हें विशेषण शुष्ण सार्थ करतो. १०.२२,१४ व वाल. ३.८ मध्यें शुष्णाबद्दल उल्लेख आहे. शुष्णाला अशुषहि म्हटलेलें आहे. (१.१७४.३) मध्यें त्याला मायिन्हि म्हटलेलें आहे. त्याचप्रमाणें शृंगिन्हि म्हटलेलें आहे; अमानुष व व्रन्दिन म्हटलेलें आढळतें. (१.३३,१२; १०.२२,७; १.५४,५). १.१०३,८; ८.१,२८ मध्यें त्याच्या ढगरूपी किल्ल्यांचें वर्णन आहे. ८.४०,१०–११ मध्यें ह्या दैत्याचा पुत्रपौत्रांसकट नाश करण्यासाठीं इन्द्राची प्रार्थना केलेली आहे. कुत्स आर्जुनेयासाठीं इन्द्रानें या दैत्याला मारलें. १.६३,३; ४.१६,१२; ६.२६,३; ३१,३; १.१९,२ ताइून पहा.

सेंट. पीटर्स. कोशामध्यें ह्या शब्दाची व्युत्पत्ति दिलेली आहे. हें नांव शुश् म्ह० श्वस् ह्या धातूपासून झालें आहे असें तेथें म्हटलेलें आहे. ग्रासमन शुष् वाळणें ह्या धातूपासून झालेलें आहे असें म्हणतो. १.५४,५ मध्यें रोट श्वसन म्ह० डुरकण्या फोडणारा असा अर्थ लावतो.

स्वर्भानु.—५.४० मध्येंच हें नांव आढळतें. सूर्याला अडवून धरणारा हा दैत्य होता. अत्रीकरितां इन्द्रानें ह्याचा वध केला.

वेदांत इंद्राचे जे अनेक पराक्रम वर्णन केलेले आहेत त्यांपैकीं जास्त प्रामुख्यानें वर्णन केलेला त्याचा पराक्रम म्हणजे पावसाला अडवून धरणारीं अंतरिक्षांतील जीं भूतपिशाचें आहेत त्यांचें निर्दालन हा होय. ह्याच एका पराक्रमाचें निरनिराळ्या ठिकाणीं निरनिराळ्या प्रसंगीं निरनिराळ्या शब्दांत वर्णन आलेलें आढळतें. हाच पराक्रम त्यानें पुन्हां पुन्हां करावा म्हणून त्याची प्रार्थना करण्यांत येते. याखेरीज इंद्र ही युद्धाचीहि देवता आहे. पाऊस पाडणाऱ्या दैत्याशीं इंद्रानें प्रथम युद्ध केलें नंतर त्यानें सर्व दैत्यांबरोबर युद्ध केलें, सरतेशेवटीं इंद्र हा अतिशय पराक्रमी योद्धा मानला गेला. इंद्राचें साहाय्य त्याचा प्रत्येक भक्त प्रार्थूं लागला.

इंद्राच्या पराक्रमाच्या वर्णनाचा नीट अर्थ समजून घेण्यास अगोदर हिंदुस्थानांतील–विशेषतः उत्तरेकडील पर्वतश्रेणींतील–वादळाचें स्वरूप लक्षांत घेतलें पाहिजे व नंतर पावसासंबंधीं वेदकालीन कल्पना मनांत आणिली पाहिजे. त्या काळीं पाणी अतिशय उंच ठिकाणीं आहे व त्या ठिकाणचा राजा वरुण असून तो पृथ्वीवर पाऊस पाडतो अशी कल्पना होती ( २.२८,४ ). परंतु अंतरिक्षांतील दैत्य व दानव त्या पावसाच्या धारांस जमिनीवर पडूं देत नाहींत. ह्या पावसाच्या धारा कवींनीं गाई कल्पिलेल्या असून ह्या गाई ते दानव आपल्या गुहेंत नेतात अशी समजूत आहे. ह्या गाई सोडविण्यासाठीं इंद्राला देवांकडून धाडण्यांत येतें. इंद्र दानवांनां जर्जर करून गाई सोडवितो, व पर्जन्याच्या धारा इंद्राच्या सख्या ज्या नद्या त्यांसमवेत पृथ्वीतलावर अप्रतिहत अशा येतात ( १०.९९,४ ). ह्या लढाईनंतर सूर्य व उषा आकाशांत प्रस्थापित होतात. रणसंग्रामानें स्तिमित होऊन दडून राहिलेले देव पुन्हां निर्भय चित्तानें आपापल्या जागीं येऊन राहिले. इंद्रानें दैत्यांचा शेवटपर्यंत पाठलाग केला व जगावर पुन्हां शांतता व समृद्धि नांदूं लागली.

पर्जन्याच्या ह्या साध्या कल्पनेभोंवतीं वेदकालीन कविकल्पनेचें जाळें अडकविलें गेलें. इंद्र आणि त्याचे शत्रू यांचीं वर्णनें मनुष्य व त्याचे शत्रू यांच्या वर्णनाप्रमाणेंच आहेत. इंद्राचें दानवांबरोबर झालेलें युद्ध, कवी ज्या राष्ट्रांतील असत त्या राष्ट्रांच्या इतरांबरोबर चाललेल्या युद्धाप्रमाणेंच आहे असें त्या वेदकालीन ऋषींनां वाटलें.

पाऊस लपवून ठेवणाऱ्या दैत्यांपैकीं प्रमुख दैत्य वृत्र हा होय; ह्या त्याच्या नामाभिधानावरूनच त्याच्या कृतीचें कित्येक दिग्दर्शन करूं पहातात. संस्कृत 'वृत्र' व अवेस्तांतील वेरेथ्र ह्या शब्दाचे निरनिराळे अर्थ आहेत. वृत्र या शब्दाचा अर्थ अन्तराय, रक्षण ( अवेस्ता–वेरेथ्र ) असा होतो, त्याचप्रमाणें 'जो दूर करण्यास योग्य आहे' म्हणजे शत्रु असाहि होतो. ३.३२,७ मध्यें म्हटलें आहे कीं, 'ज्या दुर्जनानें स्वर्गंगेला अडविली तो.' त्याचप्रमाणें ७.२१,३ मध्यें त्यासंबंधीं म्हटलें आहे–'पाण्याभोंवतीं वेष्टन घालून बसलेला महासर्प'. इत्यादि वर्णनावरून पाहतां वृत्र या शब्दाचा अर्थ झांकण घालणारा असाच केवळ होत नाहीं. निरुक्तकारांनीं केलेले अर्थ पूर्वीं दिलेच आहेत.

बहुतेक ऋचांतून वृत्र व अहि हे एकच होत असें म्हटलें आहे. १.३२ मध्यें पुढील वर्णन आलेलें आहेः—

"जन्मास आल्याबरोबर हे इंद्रा, तूं सर्व राष्ट्रांनां चळचळां कांपावयास लाविलेंस; हे उदारा, तूं आपल्या वज्रानें डोंगरपठारावर निजलेल्या अहीचा वध केलास." असेंच वर्णन ४.१७,७ मध्येंहि आलेलें आहे. त्याच सूक्तांत त्या अहीला वृत्र म्हटलें आहे. तसेंच १०.११३,३ मध्यें म्हटलें आहेः "सशस्त्र होत्साता तूं वृत्र अहीसमोर युद्धासाठीं ठाकलास". त्याचप्रमाणें ६.७२,३ व २०,२ मध्यें वर्णन आहे. एका ठिकाणीं त्याला 'वराहारं' वराहभक्षी असें म्हटलें आहे. "हे वीरपुरुषा, तूं आपल्या वज्रानें वृत्र रानडुकराचा निःपात केलास तो रानडुकर नदीमध्यें निजला होता." परंतु ५.३२,३ मध्यें इंद्रानें आपलें शस्त्र त्या महान् पशूवर फेंकिलें" असें वर्णन आहे म्हणजे त्या वृत्राला ह्या ठिकाणीं 'मृगवत् शीघ्रगामी' असें म्हटलें आहे.

इतर लहान लहान दैत्यांनां ज्याप्रमाणें अनेक नांवें असतात त्याप्रमाणें ह्या ढगाला तो नाना तऱ्हेच्या आकृतींत दृश्यमान होतो म्हणून नाना तऱ्हेचीं नांवें प्राप्त झालेलीं दिसतात. ढगांनां फक्त दैत्यच म्हटलेलें नाहीं तर २.११,७ मध्यें त्यांनां पर्वत अशीहि संज्ञा आहे. २.२०,८ मध्यें तर ढगांनां दैत्यांचे किल्ले म्हटलेलें आहे. १.५५,६ मध्यें ह्या कुशलतेनें रचलेल्या बचावाच्या ठिकाणांचा इंद्रानें विध्वंस केला असें वर्णन आहे. ज्या गुहांतून पर्जन्यधारारूपी गाई दडवून ठेविल्याचें वर्णन आहे, अथवा गाई ज्यांतून दुग्धस्राव म्हणजे पर्जन्यवृष्टि करतात अशा त्यांच्या कासा म्हणजे दुसरें तिसरें कांहींहि नसून हे ढगच होत. सारांश अंतरिक्षांत दिसणारे व वादळामुळें विकृत स्वरूप पावलेले निरनिराळे देखावे त्या कालीं मनुष्यांनां पृथ्वीवर भेटणाऱ्या निरनिराळ्या हिंस्र श्वापदांप्रमाणें भासले. पृथ्वीवर हिंस्र श्वापदांचा संहार करण्याचे व रानटी लोकांवर हल्ले करण्याचे जे जे प्रसंग आले त्या त्या प्रसंगांनां त्यांनीं अंतरिक्षांत घडून येणाऱ्या उलाढालींचें रूप दिलें, असें स्पष्टीकरण करतां येईल.

वृत्राबरोबर जें इंद्राचें युद्ध झालें तें निरनिराळ्या कवींनीं वर्णिलें आहे तीं वर्णनें चमत्कृतिजनक असल्यामुळें त्यांतील वेंचक भाग खालीं दिला आहे.

२.३०,३ मध्यें तो अहि धुक्यांत दडून बसल्याचें वर्णन आहे. धुक्यानें स्वतःला गुंरफटवून घेऊन तो इंद्रावर चालून गेला. ५.३२,४ मधील 'मिहोनपात्' हें विशेषण वृत्राचेंच आहे. १०.७३,५ मध्यें तो प्रतिपक्षाच्या अंगावर धूम्रास्त्र फेंकतो असें वर्णन आहे. १.३२,१३ मध्यें गडगडाट, विद्युल्लता यांच्या योगानें तो स्वतःचें संरक्षण करण्याचा प्रयत्न करतो असेंहि वर्णन आहे. १.८०,१२ मध्यें असें वर्णन आहे कीं, इंद्र वृत्राच्या गडगडाटालाहि भ्याला नाहीं.

४.१९,१,१ मध्यें म्हटलें आहे कीं, इतर देव वृत्रापुढें ठाकण्यास भीत होते म्हणून देवांच्या सांगण्यावरून इंद्रानें वृत्राला आह्वान केलें. २.२०,८; ४.१७,१ व १०.२८,७ मध्येंहि अशाच तऱ्हेचीं वर्णनें आलेलीं आढळतात.

४.१८,११ मध्यें असें वर्णन केलें आहे कीं, इंद्राचें ज्या वेळीं वृत्राबरोबर युद्ध सुरू झालें त्यावेळीं इंद्राच्या मदतीसाठीं

म्हणून आलेल्या देवांनीं भीतीनें समरांगणावरून पळ काढला. ८.८२,१४;१६ व ८.८५,७ मध्येंहि असेंच वर्णन आहे. परंतु तशा स्थितींतहि इंद्रानें आपलें स्थान न सोडतां वृत्रासुराचा पराभव केलेला त्यांनीं पाहिला, त्या वेळीं आनंदभरित अंतःकरणांनीं त्यांनीं इंद्राचीं स्तुतिस्तोत्रें गाइलीं असें १०,११३,८ मध्यें वर्णन आहे. ७.२१,३ मध्यें म्हटलें आहे कीं, इंद्र व वृत्र ह्यांमधील युद्ध इतकें तुमुल झालें कीं, पृथ्वी, आकाश व इतर चराचर वस्तू थरथर कांपूं लागल्या. इंद्राच्या विद्युल्लतेच्या तडाक्यामुळें स्वर्ग हादरला (६.१७,९), त्वष्ट्यानें जरी स्वतः वज्र घडलें होतें तरी त्याचे परिणाम पाहून तो भीतीनें मूर्च्छित पडला (१.८०,१४). ५.२९,३,७; ३.४३,७;६.४४,१४ व २.१९,२ मध्यें म्हटलें आहे कीं, जर इंद्रानें लढाईस जाण्यापूर्वीं सोमरसाचें आकंठ पान केलें नसतें तर खुद्द त्याचासुद्धां वृत्रासमोर टिकाव लागला नसता. सोमपानामुळेंच त्याला धैर्य व वीर्य प्राप्त झालें. १०.११३,८ मध्यें एक कवि असें म्हणतो कीं, सोमपानामुळेंच भेदरलेल्या देवांनां थोडें धैर्य आलें, व जे अगदींच भ्यालेले होते त्यांनां मद चढून त्यांची स्मरणशक्तीच नाहींशी झाली. ६.१८,१४ मध्यें म्हटलें आहे कीं, "सोमपानानें उन्मत्त झालेले देव इंद्राची स्तुति करूं लागले" त्याचप्रमाणें "मुक्त झालेल्या स्वर्गंगाहि इन्द्राचा स्तुतिपाठ गाऊं लागल्या (४.२२,७). *तशाच तऱ्हेचें वर्णन १.६१,८ मध्येंहि आहे.

इंद्राचें शस्त्र म्हणजे त्वष्ट्यानें तयार केलेलें वज्र (५.३१,४) अगर अद्रि, अश्मन्, पर्वत इत्यादि; किंवा फेंकण्यासाठीं खडकाचा तुकडा. विद्युल्लता हेंहि इंद्राचें एक शस्त्र आहे असें वारंवार म्हटलें आहे. १.८४,१३ मध्यें दधीचीच्या अस्थींनीं इंद्रानें आपल्या ९९ शत्रूंनां मारलें असें वर्णन आहे. ज्याचा ज्याचा म्हणून सूर्याशीं अगर उषेशीं संबंध येत नाहीं त्याचा विद्युल्लतेशीं संबंध लावून देण्याचा पुराणसंशोधकांचा परिपाठ दिसतो. ८.४५,४;६६,६;११;१०.१०३,२;३ मध्यें इंद्राच्या हातीं धनुष्यबाण होते असेंहि वर्णन आहे. १.१६९,३ मध्यें त्याच्या हातांत भाला (ऋष्टि) होता असें वर्णन आहे. वृत्राबरोबर जो संग्राम झाला त्यांत कोठेंहि हीं शस्त्रास्त्रें उपयोगांत आणल्याचें दिसत नाहीं. पण तो नमुचि दैत्याला आंधळा करण्यासाठीं म्हणून त्याच्या तोंडावर फेंस फेंकतो (शतपथब्राह्मणकारांची टीका १२,७,३ पहा); ८.३२,२६ मध्यें तो अर्बुद दैत्यावर वर्फ (गारा) फेंकतो व दोघांच्याहि अंगावर तो ढग फेंकतो अशीं वर्णनें आहेत.

इंद्र जवळ जाऊन पाहतो तों त्याला अहि जलामध्यें स्वस्थ पडलेला आढळतो (५.३,२) एवढेंच नाहीं तर तो स्वस्थ झोंपी गेलेला असतो (४.१९,३). कारण वृत्र स्वतःला अजिंक्य व अमर समजतो (५.३२,३)* इंद्र त्याला वज्राच्या स्पर्शानें उठवितो (१.१०३,७). अहि युक्तिप्रयुक्ति योजून स्वतःचें रक्षण करण्याचा प्रयत्न करतो; परंतु इंद्र त्याचे सर्व प्रयत्न फोल ठरवितो (५.३०,६). तसेंच १०.१११,६ मध्येंहि वर्णन आहे. आपल्या वज्रानें इंद्र वृत्राचें शीर धडापासून वेगळें करतो (८.६,६). वृत्राच्या शरीराचे तुकडे करतो (ऋ. १३) व त्याला आपल्या घोड्याच्या पायांखालीं तुडवितो. नंतर इंद्र दडवून ठेवलेल्या वारिसंचयाकडे वळतो (१.१३०,१३). सुतार ज्याप्रमाणें झाड तोडतो त्याप्रमाणें इंद्र ढग विदीर्ण करून वारिधारांनां मुक्त करतो. ८.१२,६ मध्यें असें वर्णन आहे कीं, इंद्र पाऊस पाडतो. युद्ध समाप्तीनंतर इंद्र इतक्या गडबडीनें समरभूमि सोडून जातो कीं जणूं काय तो भिऊन पळच काढीत आहे (१.३२,१४). ह्याचा अर्थ असा दिसतो कीं, झंझावात आकाशमार्गानें अत्यंत वेगानें निघून जात असतो व तुफानास सुरुवात झाल्यापासून लवकरच आकाश शांत व निरभ्र होतें.

पावसाला अडवून धरणाऱ्या दैत्यांबरोबर झालेल्या संग्रामाचें वर्णन दिल्यानंतर इतर दैत्यांबरोबर इन्द्राची जी लढाई झाली त्या लढाईचें वर्णन देण्याची विशेष जरूरी नाहीं. पाऊस थांबवून धरणाऱ्या राक्षसांचा ज्याप्रमाणें इंद्रानें निःपात केला त्याप्रमाणेंच उजेडास प्रतिबंध करणाऱ्या राक्षसांचाहि त्यानें समाचार घेतला. कारण वादळ सुरू झालें म्हणजे दाही-दिशा अंधकारानें धुंद होतात व वादळ नाहींसें होतांच पूर्ववत् प्रकाश दिसूं लागतो; ह्याचेंच वेदकालीन कवी इंद्राचें निरनिराळ्या राक्षसांशीं युद्ध झालें असें वर्णन करितात. हीच कल्पना पुढें चालवून काळोख्या रात्रीं नाना तऱ्हेचीं भूत पिशाचें मानवजातीला उपसर्ग देतात त्यांचाहि इंद्रानें पाठलाग केला अशा तऱ्हेचीं वर्णनें आढळतात.

(१) "सूर्य ढगांनीं व्याप्त होण्यापूर्वीं हे वीरा, ढगाचा निःपात कर." (१.१२१,१०), "सोमपानासाठीं मरुत्सखा जो इंद्र त्याच्या पराक्रमाचें फळ हा प्रकाश होय" (८.६५,४ त्याचप्रमाणें ५.४०,६); प्रकाश जिंकणाऱ्या इंद्रानें आपल्या अनुयायांसमवेत मोठा विजय संपादन केला. हा सूर्य त्यानेंच मनुष्यजातीच्या उपयोगासाठीं उत्पन्न केला. अखिल मनुष्यजातीचा आनंद असा जो हा प्रकाश तो इंद्रानेंच उत्पन्न केला (१.१७१,५;२.१२,७; १०.२७,२४).

(२) ६.२२,४ मध्यें इंद्राला असुरघ्न म्हटलें आहे; १०.९९,३ मध्यें इंद्र शिश्नदेवांनां (अब्रह्मचर्यान्) ठार करतो;†

* नदीविमोचनाबद्दल लोक स्तुति करूं लागले असाहि अर्थ करतां येईल.

* इंद्रानें वृत्रास मारल्यामुळें त्यापासून अजिंक्य असा असुर उत्पन्न झाला असा सायणाचा अर्थ आहे. † कदाचित् शाक्त संप्रदायाचे सूचक हे शब्द असावेत.

१० व्या ऋचेंत एका चतुष्पाद दैत्याचा इंद्रानें पराभव केला; इंद्र दस्यूंनां मारतो ( ८.६५,११ ). दासांनां मारतो ( ६.४७,२१ ) व राक्षसांचा संहार करतो ( ६.१८,१० ). इंद्रानें फक्त आपल्या हुंकारानें त्या राक्षसांनां ( स्वशत्रून् ) ठार केलें ( १०.२३,५ ). त्याचप्रमाणें १०.४८,६; ८.८५,९;१.३३,७; ८.१२,९ मध्येंहि असेंच वर्णन आहे.

वेदकालीन कवींनां दैत्य किती निरनिराळ्या स्वरूपांत दिसले त्यांचें ७.१०४,२२ मध्यें वर्णन आलेलें आहे. घुबड, कुत्रा, चक्रवाक, गिधाड अशीं नानातऱ्हेचीं रूपें दैत्य धारण करतात. १.२९,५ मध्यें दैत्य गाढवाचेंहि* रूप धारण करतात.

खालील तीन ऋचांत स्त्रीलिंगी दैत्यांचें वर्णन आलेलें आहे. १.१३३,१–३ मध्यें स्त्रीलिंगी राक्षसांचा उल्लेख आहे. डाकिणींचीं डोकीं आपल्या पायांखालीं तुडीव, सर्व डाकिणींनां उकिरड्यावर फेंकून दे.

४.२३,७ मध्यें ध्वरस नांवाची डाकिणी आढळते, त्याचप्रमाणें २.२०,७ मध्यें व १०.१५५,४ मध्यें काळ्या मांड्यांच्या† डाकिणींचीं वर्णनें आढळतात.

पावसाच्या धारारूपी गाई चोरणाऱ्या पणींचा इंद्रानें केलेला पराभव ज्या कथेंत वर्णन केलेला आहे त्या कथेला निरनिराळीं रूपें मिळत गेलीं. वेदकालीन गायक जे आंगिरस त्यांच्या समवेत स्वतः इंद्र आंगिरस यांसाठीं आपली स्त्री प्रतिहारी सरमा इला पणींनीं दडवून ठेवलेल्या गाईंनां शोधण्यासाठीं पाठवतो. सरमेस त्यांचा सुगावा लागतो व इंद्र तिच्या सांगण्यावरून पणीलोकांच्या गुहेंत शिरून गाईंनां मुक्त करतो. १.८३,४ मध्यें आंगिरसांनीं पराक्रम करून गाई-घोड्यांचीं खिल्लारें जिंकलीं असें वर्णन आहे. तसेंच ८.१४, ८;५२,३ मध्येंहि वर्णन आढळतें. १.६२,३ मध्यें आंगिरसांचा नेता इंद्र होता, सरमेनें आपल्या पुत्रपौत्रांकरितां दुधाची योजना केली व बृहस्पतीनें ( इंद्रानें ) पर्वत फोडून गाई मुक्त केल्या असें वर्णन आहे. ४.१६,८ मध्यें इंद्रानें ज्या वेळीं गाई मुक्त केल्या त्या वेळीं सरमा प्रकट झाली व आंगिरस इंद्राबरोबर होते असें वर्णन आढळतें.

ह्याच कथेचें सुंदर व कल्पक रूपांतर १० व्या मंडलांतील १०८ व्या सूक्तांत आढळतें. ह्या सूक्तांत असें वर्णन आहे कीं, सरमेला पणींनीं गाई चोरून नेल्याचा सुगावा लागून ती पणींजवळ रदबदली करण्यासाठीं जाते परंतु पणी गर्वानें उन्मत्त होऊन तिला दाद देत नाहींत. ह्या सर्व उन्मत्तपणामुळें तुम्ही नाश पावाल असें सरमेनें त्यांस निक्षून सांगितलें. पणी तिला "गाई आम्ही हटवून आणल्या परंतु त्या गाई लपवून ठेवल्या असून तूंहि आमच्याच जवळ सुखांत रहा" असें सांगून भेद करण्याचा प्रयत्न करतात. परंतु सरमेनें त्यांचें न ऐकतां त्यांनां गाई सोडून द्या असें परोपरीनें सांगितलें. परंतु तें पणींनां पटलें नाहीं. शेवटच्या ऋचेंत सरमेनें भाकित केल्याप्रमाणें त्यांचा नाश कसा झाला ह्याचें वर्णन आढळतें.*

राक्षसाशीं झालेल्या ह्या इंद्रयुद्धामुळें इंद्राचा प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष असा इतर देवांशीं संबंध जोडतात.

**इंद्र व त्रित एक कीं भिन्न.**—ज्या ऋचांत त्रितासंबंधीं उल्लेख आलेला आहे अशा ऋचांचा जर सांगोपांग विचार केला तर त्रित व इंद्र यांचा संबंध काय होता हें आढळून येईल. प्रथम असें दिसून येतें कीं, इंद्रानें करावयाचे पराक्रम त्रित करतो. इंद्र व त्रित यांचें साहचर्य मुळींच नसून त्या दोघांच्या नांवांचा उल्लेख प्रार्थनेंत एकदम केलेला आढळत नाहीं. ह्यावरून कदाचित इंद्राचेंच त्रित हें दुसरें नांव असावें असें वाटेल. ३ ऱ्या ४ थ्या व ७ व्या मंडलांत त्रिताचें नांव सुद्धां आढळत नाहीं. कदाचित् एखाद्या विवक्षित संप्रदायाच्या कवींनीं इन्द्राला त्रित असें नांव दिलें असेल. ह्या विधानाच्या स्पष्टीकरणार्थ खालील आधार देतां येतील. १.१८७,१ मध्यें त्रितानें अमेय अशा वृत्राचा वध केला असें वर्णन आहे. ८.७,२४ मध्यें मरुतांनीं त्रिताचा जयघोष केला तो त्रित वृत्रवधाचे वेळीं इन्द्राबरोबर होता असें म्हटलें आहे; ९ व्या मंडलांत त्रिताचा सोमरसाबरोबर वारंवार उल्लेख केलेला आढळतो; १०.४६,३ मध्यें लपलेल्या अग्नीचें त्रित उद्घाटन करतो; १०.४२,६ मध्यें हीच गोष्ट इन्द्रानें केल्याचें वर्णन आहे; १०.१२०,६ मध्यें त्रिताला उद्देशून वापरलेलें नामाभिधान आप्त्य हें इन्द्राला मिळतें.

ह्या दाखल्यावरून वारिधारा चोरणाऱ्या दैत्यांचा पराजय करणाऱ्या इंद्राचेंच त्रित हें पर्यायनाम असावें असें गृहीत धरण्यास आधार मिळतो. परंतु दुसरेहि असे दाखले मिळतात कीं, त्या ठिकाणीं ह्या दोन देवतांचा स्पष्ट व अलग उल्लेख केलेला आढळतो. ह्या दाखल्यांवरून त्रित व इंद्र हे निरनिराळे देव असून त्यांच्या विशेषामुळें एकच असे भासतात.

शिवाय ज्या ज्या वेळीं इंद्राबरोबर त्रित असतो त्या वेळीं त्याचा दर्जा इन्द्रापेक्षां हलका असतो. उदाहरणार्थ त्रित इन्द्राला सोमरस देतो. २.११,२०. मध्यें अशा अर्थाचें

* गाढव हें विशेषण इंद्राची निंदा करणाऱ्या 'अनार्य' माणसांनांहि लावलें असावें. † शब्द 'कृष्णयोनि' असा आहे. सायण याचा अर्थ काळ्या जातीचे लोक असा करतात.

* राजारामशास्त्री भागवत पणी व सरमा यांची कथा ऐतिहासिक धरतात. त्यांचें स्पष्टीकरण देखील महत्त्वाचें आहे तें पुढें येईल.

वर्णन आहे. ८.१२,१६ मध्यें वर्णन आहे कीं, "हे इन्द्रा, तूं त्रित, विष्णु व मरुताच्या समोर सोमरसाचें पान करून ताजातवाना होतोस. इन्द्र त्रिताला प्रोत्साहन देऊन लढाईत पाठवितो, असें वर्णन २.११,१९;१०.८,७;९९,६ मध्यें आलेलें आहे. १०.४८,२ मध्यें त्रितासाठीं इन्द्र गाईंना मुक्त करतो असें वर्णन आहे. ह्या कथांमुळें अर्वाचीन संशोधनकारांनीं त्रित हा कोणी ऋषि असावा व ह्या ऋषीनें पुष्कळ सूक्तें लिहिलीं असावीं असा शोध (!) लावला आहे. ह्या शोधांत विशेष कांहीं नाहीं. कारण, सायणांनीं त्रिताचा ऋषि असाहि अर्थ दिला आहे.

त्रित हा गृत्समद गोत्राचा मूळपुरुष असावा असें आणखी कांहीं उताऱ्यांवरून आढळतें. "आमचा मूळपुरुष जो त्रित त्याच्या हातीं तूं त्वष्ट्याचा पुत्र जो विश्वरूप त्याला दिलेंस" (२.११,१९). २.३४,१४ मध्यें त्रित हा यजमान आहे असा उल्लेख आढळतो; १०.८,७–८ वरून पाहतां तो इन्द्राचा पुत्रच ठरतो. १०.४६,३ मध्यें त्रिताला वैभुवस म्हणजे विभुवसाचा मुलगा असें म्हटलें आहे. परंतु ९.७२,७ मध्यें व ९.८६,१० मध्यें विभुवसु हे अनुक्रमें इन्द्राचें व सोमाचें विशेषण आहे.

ऋग्वेदांत त्रितासंबंधींच्या ४१ ऋचा आलेल्या आहेत त्या ऋचांत त्रिताचे गुणदोष आले आहेत ते फक्त इन्द्राच्या बाबतींतच आलेले आहेत. खास त्रितासंबंधीं अशी माहिती दिलेली नाहीं. अवेस्तावरून त्रित हा भारतीय पुराणकथांपेक्षांहि जुना आहे असें दिसून येतें. रोटचा या बाबतींतील निबंध पहा. तो म्हणतोः "इन्द्र व अश्विनीकुमार यांच्याबद्दल जशी माहिती आढळते तशी त्रिताबद्दल आढळत नाहीं. पुराणकथांमध्यें त्रित आप्त्य यांचें वर्णन पूर्वींच येऊन गेल्यामुळें कदाचित् त्याबद्दलचें विस्मरण पडलें असावें······तो फार प्राचीन असल्यामुळेंच त्याबद्दलची आठवण पुसटपुसट होत गेली. त्रिताबद्दल ३,४ व ७ ह्या मंडलांतहि कोठें उल्लेख नाहीं ही वस्तुस्थितीहि वरील उताऱ्यांचें समर्थन करते. दहाहि मंडलांपैकीं सातवें मंडल कथारसांनीं परिप्लुत असल्यामुळें व तें वरेंच मोठें मंडल असल्यामुळें त्यांतहि त्रितासंबंधीं उल्लेख येऊं नये हें चमत्कारिक आहे. १.१०५,९ मध्यें त्रिताचा उल्लेख आहे. १.१६३,२–३ मध्येंहि सूर्योत्पत्तीच्या वर्णनांत त्रिताचा उल्लेख आढळतो. अहिर्बुध्न्य व अजएकपाद् यांच्याबरोबर त्रिताचेंहि नांव आढळतें. (२.३१,६) मध्यें 'आकाशाचा त्रित' असा उल्लेख आहे. ५.४१,४; ५.४१,१०;१०.४६,६; ११६,४ मध्यें त्रितालाच अग्नि म्हटलें आहे; ८.४१,६ मध्यें त्याला वरुण म्हटलें आहे; ५.९,५;५४,२;९.८६,२०;१०.६४,३ मध्यें त्याला वात म्हटलें आहे. या ऋचांचा अन्य अर्थहि होऊं शकेल. त्रित हें वरुणाचें विशेषण धरून त्याचा अर्थ 'त्रिस्थान' करतां येईल. ह्या सर्व ठिकाणीं त्रित ह्याचा अर्थ तिन्ही लोकांमध्यें प्रसिद्ध असा सायणांनीं धरला आहे.

ह्या सर्व उताऱ्यांवरून त्रित हा इन्द्रापेक्षांहि प्राचीन असा वादळाचा देव असून इन्द्रसंप्रदायापुढें त्रित मागें पडला असावा असें कित्येक लेखक म्हणतात. ही समजूत गृहीत धरल्यास इन्द्राचा जसा इतर देवांशीं संबंध आहे तसाच ह्या त्रिताचाहि असावयास पाहिजे. तरी हा संबंध नीटसा लावतां येणार नाहीं. कारण प्रत्येक देवतेबद्दलच्या अलंकारिक कल्पना नेहमीं बदलत असतात. इन्द्राप्रमाणें त्रिताला राक्षसांसमोर युद्धास कोणत्या काळीं ठाकावें लागलें तो काल अजून नक्की सांगतां येत नाहीं. इन्द्र व वरुण ज्या वेळीं खांद्याला खांदा भिडवून लढत होते त्या वेळीं त्या देवतांसंबंधींच्या कल्पना निश्चित स्वरूपाच्या झालेल्या होत्या. त्रित पुष्कळसा वायूसारखा आहे. पुढें इन्द्र व वायु हे एकच मानूं लागले. त्रिताचा सोमाशीं इन्द्रासारखाच निकट संबंध आहे. लढाई जिंकल्यानंतर मरुत् ज्याप्रमाणें इन्द्राची स्तुति करतात त्याप्रमाणें ते त्रिताचीहि करतात (८.७,२४ पहा). वरुण व त्रित यांच्या संबंधाबद्दल सांगतां येईल कीं ८.४१,६ मध्यें त्रित व वरुण हे एकच असें म्हटलें आहे. ९.९५,४ मध्यें सोम व त्रित हे एक आहेत असें म्हटलें आहे. ह्याचें कारण येवढेंच दिसतें कीं इन्द्र व वरुण या दोघांच्याहि पेक्षां त्रित जुना असावा.

२.३४,१० मध्यें त्रिताच्या विजयाबद्दल व त्याच्या इन्द्राशीं असलेल्या अगदीं नम्रपणाच्या वर्तनाबद्दल वर्णन आलेलें आहे. दुसऱ्या मंडलांत त्रिताचा जरी अनेकवेळां उल्लेख आलेला आहे तरी त्याचा दर्जा हलक्या प्रतीचाच आहे. २.११,१९ मध्यें ज्या गृत्समद गोत्रासाठीं इन्द्रानें वृत्राचा पराभव केला त्या गोत्राचा त्रित हा मूळपुरुष होता असें म्हटलें आहे. त्याच्याच पुढच्या ऋचेंत तो इन्द्राला सोमरस देतो असें वर्णन आहे. ३१,६ मध्यें फक्त त्याचा नामनिर्देश आहे. ३४,१४ मध्यें पांच ऋत्विजांचें आह्वान आहे तरी इन्द्राचीच स्तुति पुष्कळ आहे. ज्या कवींनीं इन्द्राबद्दल इतकें लिहिलें त्या कवींनां त्रिताच्या पराक्रमाचा अगदींच विसर पडावा हें शक्य दिसत नाहीं व त्यामुळेंच मरुतांनीं आपला पूर्वींचा नेता सोडून ते इन्द्राची स्तुति करूं लागले असें वर्णन केलेलें आहे.

याच बाबतींत विश्वरूपाच्या प्राणहरणाच्या दंतकथेचा विचार होणें जरूर आहे. विश्वरूप हा त्वष्ट्याचा मुलगा असून तो गाई चोरणारा राक्षस होता. इन्द्र व त्रित यांनीं त्याला ठार केलें १०.८,९. त्रिताला विश्वरूपजेता अशी संज्ञा आहे. इन्द्राच्या असंख्य जयांबद्दल जीं वर्णनें आलीं आहेत त्यांत त्रिताचें नांव नाहीं परंतु विश्वरूपहननाच्या वेळींच इन्द्रानें त्रिताला मदत केली हें वर्णन चमत्कारिक दिसतें. अवेस्ता

भाषेंतील त्रिताच्या कथेंत त्रितानें एकट्यानेंच विश्वरूपाला मारलें असें म्हटलें आहे. त्याच कथेंत इन्द्राला आणलें आहे ह्यावरून त्रितानंतर इन्द्राचें महत्त्व वाढलें होतें व त्रित नामशेष होत चालला होता हें स्पष्ट दिसतें.

ही विवेचनपद्धति लक्षांत घेतां वेदांत इन्द्र व त्वष्टा या दोघांमधील संबंधाच्या वर्णनांत वरवर दिसणाऱ्या भेदभावाचा उलगडा होतो. ब्राह्मणकारांनीं ह्या भेदभावाचें खापर इन्द्राच्या माथीं मारलें आहे. त्वष्टा हा पुण्यपुरुष असून देव व मानवांबद्दल त्याच्या मनांत सहानुभूति असे. वृत्राला मारण्याचें हत्यार त्वष्ट्यानेंच बनविलें असें वर्णन आहे. त्याच-प्रमाणें विश्वरूपासारखा अत्यंत दुष्ट राक्षसहि त्वष्ट्याचा मुलगा असून त्याचा वध इन्द्रानें केला असेंहि वर्णन आहे. ह्यावरून इन्द्र व त्वष्टा या दोघांमध्यें वैमनस्य होतें व तें वैमनस्य इन्द्राला कलंक लावणारें होतें असा पुष्कळांचा समज आहे. ह्याच समजुतीला पुष्टी देणारें इन्द्रानें त्वष्ट्याचा सोमरस पिऊन टाकला असें विधान केलेलें आहे. इन्द्र व सोम याबद्दलचा जो भाग आहे त्या भागांत ह्या विधानाचें स्पष्टीकरण आहे; त्याचप्रमाणें इन्द्र, विश्वरूप दुष्ट राक्षस असल्यामुळें त्याचा वध करतो हेंहि परंपरेला धरून आहे. ह्या वधामुळें तो त्वष्ट्याचा द्वेष करीत होता असें ठरत नाहीं. देवांच्या विश्वासांतील त्वष्टा विश्वरूप राक्षसासारख्या दुष्ट लोकांचा पिता होता ही समजूत कशी रूढ झाली असावी हा प्रश्न आहे. तसेंच त्वष्ट्यांत अशी कोणती विशेष गोष्ट होती कीं, जीमुळें त्वष्ट्याच्या ठायीं राक्षसपितृत्व स्थापन झालें. हाहि दुसरा प्रश्न उद्भवतो.

नांवाप्रमाणेंच अनंत रूपें धारण करणारा वेदांमधील विश्वरूप त्याचें वर्णन यश्त ९,८ मधील त्रियेना ज्या राक्षसाला ठार मारतो त्या राक्षसाच्या वर्णनाशीं ताडून पाहतां असें आढळून येतें कीं, दोन्हीहि वर्णनें तंतोतंत जुळतात. १०.८,८ मध्यें विश्वरूपाला 'त्रिशीर्षन्' व 'सप्तरश्मि' म्हटलें आहे. १०.९९,६ मध्यें पुन्हां त्रिशीर्ष व षळक्ष म्हटलें आहे. यश्तामधील त्रियेनाचा शत्रूहि तीन तोंडांचा (त्रितयाचा) तीन डोक्यांचा व तीन डोळ्यांचा होता. एका सप्तरश्मींशिवाय सर्व वर्णन बरोबर जुळतें. विश्वरूप म्हणजे हजारो रूपें धारण करणारा असा अर्थ होतो तसाच अवेस्ता भाषेंतील त्याच्या नांवाचा अर्थ होता. ह्या-वरून असें सिद्ध होतें कीं, वेदांतील अशा राक्षसाच्या युद्धाची कथा व अवेस्तांतील तशाच राक्षसाच्या युद्धाची कथा या दोन्हीहि कथा एकाच कथेवरून घेतल्या असाव्यात. हें जर खरें असेल तर विश्वरूप हें एका प्राचीन विश्वरूपाचें एक रूप असावें असें ठरतें. विश्वरूपाचें वर्णन आर्यन् म्हणजे पर्शुभारतीयकालीन आहे, फक्त नांव मात्र भारतीय आहे. त्याचप्रमाणें त्वष्टा त्याचा बाप होता हीहि कल्पना भारतीयच दिसते.

त्वष्टा हा निरनिराळ्या आकृतींचा व रूपांचा जनक आहे असें वेदांत म्हटलें आहे· तैत्तिरीयब्राह्मण १.४,७ मध्यें अशा तऱ्हेचा उल्लेख आहे. "ज्याअर्थीं त्वष्टा सर्व आकृतींचा जनक आहे त्याअर्थीं त्यानेंच पशू निर्माण केले आहेत" असें ऋग्वेद (१.१८८,९) म्हणतो. ८.९१,४ मध्यें अशाच अर्थाचा उल्लेख आहे. ह्यापेक्षांहि ३.५५,१९ मध्यें स्पष्ट म्हटलें आहे कीं "सर्वांना प्राणदान करणारा त्वष्टा सर्व जीव-मात्रावर सत्ता चालवून सर्व जीवांना त्यानेंच उत्पन्न केलें म्हणून अखिल जीवमात्र त्याचेच आहेत". १.१३,१० व १०.१०,५ मध्यें 'विश्वरूप'. हें विशेषणहि त्याला लाविलें आहे.

ह्यावरून पाहतां ज्या वेळीं अतिबलाढ्य विश्वरूप व विश्वकर्मा त्वष्टा एकाच ठिकाणीं सांपडले त्या वेळीं त्वष्ट्याला विश्वरूपाचा बाप ठरविणें साहजिक दिसतें. स्वतः विश्वरूप नानातऱ्हेचीं रूपें धारण करण्यांत कुशल होता. त्वष्टा तर अशा सर्व तऱ्हेचीं रूपें देण्यांत प्रति ब्रह्मदेवच होता; ह्यामुळें बापाचे गुण मुलांत दिसणें हें लौकिक समजु-तीला धरूनच आहे. इन्द्राला अशा तऱ्हेनें 'गोषणोनपात्' असें नांव मिळालें आहे.

वरील विवेचनावरून त्वष्टा देवांचा प्रिय असून विश्वरूपा-सारख्या देवद्वेष्ट्या दानवाचाहि तो कसा बाप ठरला याची कल्पना येईल. ह्याप्रमाणें त्वष्टा एकदां एका सूक्तांत विश्व-रूपाचा बाप ठरल्यावर त्या सूक्त रचणाऱ्या कवींनीं कोणचा अर्थ मनांत धरून तशी शब्दयोजना केली असावी हें नंतरचे कवी विसरले असावेत. विश्वरूपाच्या वधामुळें इन्द्र व त्वष्टा यांच्यामध्यें तेढ उत्पन्न झाल्याचींच पुढें वर्णनें आहेत. ती तेढ मात्र प्राचीन कथेंत नव्हती.

**इन्द्राचा आदित्यांशीं असलेला संबंध व इन्द्रकथेची परिणतावस्था.**—आलफ्रेड हिलेब्रँटनें इन्द्राचा संबंध अदिति व तिचे मुलगे आदित्य यांच्याशीं कसा आला त्याचप्रमाणें वरुण व मित्र यांच्याशींहि त्याचा संबंध कसा आला हें सविस्तर वर्णन केलें आहे.

(१) ४.१८ या सूक्तास सायणांनीं अदिति व वामदेव यांच्याशीं झालेला संवाद असें म्हटलें आहे त्या म्हणण्यास अनुक्रमणीचाच काय तो आधार आहे, नाहीं तर त्या सूक्तांतील ऋचा निरनिराळ्या व्यक्तींनीं संवादरूपानें कशा उचारल्या हेंच ठरविणें अवघड आहे. हिलेब्रँट सायणांवर विश्वासून पुढें चालतात. गौतम कुलाच्या कौटुंबिक दृश्यांपैकीं हेंही एक दृश्य आहे असें धरून सायण अधिक स्पष्टीकरण करतात. वामदेव गर्भांत असतांनाच निसर्गनिर्मित मार्गानें जगांत येण्याच्या विरुद्ध असून तो आपल्या मातेच्या बरगड्यां-तून वाट काढण्याचा विचार ठरवितो. त्यावर सायणाच्या मतानें इन्द्र (ऋ. १) त्याला सांगतो कीं, मनुष्यांनींच नव्हे

तर देवांनींसुद्धां हा निसर्गनिर्मित मार्गच आजपर्यंत पसंत केला आहे. तर तूं हा भलतासलता विचार सोडून दे. परंतु वामदेव केवळ इन्द्रवाक्य म्हणून प्रमाण मानण्यास तयार नसतो इतकी त्याची बुद्धि त्या वेळीं सुद्धां तरतरीत झालेली असते, व तो असा निराळाच मार्ग पूर्वी कोणी अवलंबिला होता कीं नाहीं ह्याचा विचार करूं लागतो. विचार करतांना एकदम त्याला असें स्मरतें कीं, खुद्द इन्द्रानेंच ह्या मार्गाचें स्वतःच्या जन्मकाळीं अवलंबन केलें होतें. इन्द्रानें सुद्धां त्याच्या दृष्टीनें भलत्यासलत्या मार्गाचें अवलंबन केलें असून तो सुद्धां अगदीं असामान्य असा सद्गुणांचा पुतळा नव्हता. जो इन्द्र त्याला उपदेश करण्याचा आव घालीत होता, त्यानेंच त्वष्ट्याच्या घरीं जाऊन त्याची शाब्दिक परवानगी घेण्याचेंहि दाक्षिण्य न दाखवितां सोमरसाचें पान केलें. (ऋचा ३ री). परंतु अदितीला स्वतःच्या मुलाचें (म्हणजे इन्द्राचें) असें छिद्रान्वेषण पसंत पडलें नाहीं. मुलाच्या कीर्तीला कालिमा लागूं नये म्हणून तिनें त्याची बाजू सांवरून धरली (ऋ. ४–७). तरी सुद्धां वामदेव स्वतःच्या जन्माचा प्रश्न सोडून देऊन इन्द्राच्या आयुःक्रमांतील इतर गोष्टींचा उल्लेख करून आपल्या विधानांची सत्यता पटविण्याचा प्रयत्न सोडीत नाहीं.

सायणाचार्यांचें हें विषयांतर मनोरंजक व कुशलतेचें असलें तरी त्याला सूक्तांत अथवा अनुक्रमणींत कोठेंहि आधार नाहीं. इतर प्रसंगीं सायणांनीं इन्द्राला एक आदित्यच मानल्यामुळें (१०.१०१,१२ मध्यें इन्द्राला निष्टिग्रीचा मुलगा म्हटलें असून निष्टी म्हणजे दितीच असें सायण म्हणतात) सायणाचार्यांचें हें स्पष्टीकरण खपून जातें. परंतु भिन्न मतहि व्यक्त करण्यांत आलें आहे. इंद्राचें अदितिपुत्रत्वच अमान्य केल्यास वरील वामदेवसूक्तावर उभारलेल्या कोणत्याहि विधानास मजबुती येणें शक्य नाहीं. तरी सुद्धां अदिति ही इन्द्राची माता होती असा इतरत्र उल्लेख आढळल्यास येथेंहि ती इंद्राची माता ठरण्यास अडचण पडणार नाहीं, कारण इन्द्राच्या मातेचें नांव कोठेंहि आढळत नाहीं. परंतु तशा तऱ्हेचा उल्लेख कोठें सांपडतो तें प्रथम शोधून काढलें पाहिजे.

(२) ४.१८. ह्या सूक्तांत इन्द्रानें स्वतःच्या पित्याला ठार मारलें व इन्द्राच्या मातेनें त्याचा त्याग केला होता अशा तऱ्हेचीं वर्णनें आहेत. त्यांचा हिलेब्रँट असा अर्थ करतो कीं, "इन्द्राचीं हीं मातापितरें म्हणजे द्यावापृथिवी होत; इन्द्र जन्मतांच दोघांनांहि ढगांनीं व्याप्त करतो." तसेंच पुढें तो म्हणतो कीं, "इन्द्र आपल्या पित्याला मारतो म्हणजे तो सूर्याला ढगानें आच्छादून टाकतो. हे ढग सूर्याच्या किरणांनींच एकत्रित केलेले असतात. त्याची माता इन्द्राचा त्याग करते म्हणजे निरभ्र आकाश त्याचे जन्माचे वेळीं अभ्राच्छादित होतें." हा अर्थ पुष्कळांस मान्य नाहीं; कां कीं, यांत एकावेळीं इन्द्राचा बाप द्यौ तर दुसऱ्या वेळीं सूर्य असा प्रकार होतो.

(३) सातव्या मण्डलांतील ८५ व्या सूक्तांतील ४ थी ऋचा इन्द्र व वरुणाला अनुलक्षून आहे. संहितेंत 'आदित्य' असें संबोधनाचें एकवचन दिसतें परंतु येथें 'आदित्य' हें द्विवचन आहे तें छांदस असल्यामुळें त्याचें असें रूप झालें आहे असें धरून पदपाठ 'आदित्या' असा पाठ देतो. ह्याशिवाय आणखी एके ठिकाणीं (वाल. ४,७ मध्यें) इन्द्रासंबंधीं आदित्य अशी शब्दरचना आहे. हें सूक्त बरेंच अर्वाचीन असल्यामुळें ७.८५,४ शीं तें समकालीन आहे असें म्हणतां येणार नाहीं. ८४,४ मध्यें इन्द्र व वरुण या दोघांचेंहि स्तवन आहे. ४.४२,४ मध्यें वरुण स्वतःला आदित्य म्हणून इन्द्राहून स्वतःचा दर्जा उच्च ठरविण्याचा प्रयत्न करतो. वेदकालीन कवींनां जर इन्द्राला अदितीचा पुत्रच मानावयाचा असता तर त्याचा उल्लेख फक्त या दोन ठिकाणींच यावा हें चमत्कारिक दिसतें. पदपाठ लिहिणारांची सुद्धां पदपाठ लिहिण्यांत चूक झाली नसावी असें मानतां येत नाहीं. दोन देवतांनां उद्देशून लिहिलेल्या ऋचेंत एकवचनी संबोधन चमत्कारिक दिसत असल्यामुळें पदपाठांत त्याचें आदित्या असें द्विवचनी रूप केलें असणें संभवनीय आहे. शिवाय तसें करण्यानें मूळांतील प्रासहि बिघडत नाहीं असें असतांना मूळ कवीला आदित्या असें द्विवचन घालावयाचें असतांना त्यानें आदित्य असें एकवचनच कां घातलें? आदित्या असें द्विवचनीं रूप गृहीत धरलें तरी वेदांत ज्या देवतेसंबंधीं कल्पना ठळक झाल्या आहेत त्या देवतेबद्दल फक्त एकेच ठिकाणीं आदित्य हें संबोधन कसें घ्यावयाचें?

(४) हिलेब्रँण्ट ८.१२,१४ (इन्द्राची स्तुति करण्यासाठीं अदितीनें एक स्वरक्षणार्थ गाणें रचिलें) व ७.९८,३ (तुझ्या मातेनें तुझा मोठेपणा वर्णन केला) हे दोन उतारे एके ठिकाणीं करून ते ४.१८,४;७ शीं जोडतो. परंतु ४.१८ त वर्णन केल्याप्रमाणें इंद्र हा अदितिपुत्र आहे हें सिद्ध केल्याशिवाय वरील दाखले व्यर्थ होत. कारण इन्द्राचीं स्तुतिस्तोत्रें पुष्कळ देवांनीं व देवींनीं गाइलीं आहेत त्याचप्रमाणें अदितीनेंहि गाइलीं असतील तेवढ्यावरूनच ती त्याची आई ठरणार कशी? ह्याखेरीज ८.४५,४;५ ह्यांत 'इन्द्रमातेला प्रश्न विचारीत आहे' असें वर्णन आहे. आणि इन्द्राच्या आईनें त्याची स्तुति केलेली आहे. ह्या ठिकाणीं अदितीच्या नांवाचा प्रश्न सुद्धां येत नाहीं. या विवेचनावरून ८.१२,१ व ७.९८,३ ह्या ऋचा एकत्रित करून इन्द्र हा अदितीचा मुलगा होता हें सिद्ध होत नाहीं.

येथपर्यंत हिलेब्रँण्टच्या सायणानुवर्ति विधानांची चिकित्सा झाली. वेदकालीन इन्द्राला आदित्य कां म्हणतां येणार नाहीं. यावद्दलचीं कारणें खालीं दिल्याप्रमाणें आहेत.

"ब्राह्मणकारांच्या मताप्रमाणें इन्द्र बारा आदित्यांपैकीं एक नसावा, कारण देवांची तेहेतीस ही संख्या पूर्ण करण्यासाठीं इन्द्राचा निराळा नामनिर्देश केलेला आहे."

१.१०७,२ मध्यें फक्त इन्द्राचाच उल्लेख आहे, नंतर आदित्य व अदिती यांचा उल्लेख आहे. तसेंच ४.५४,६ मध्येंहि वर्णन आहे. ५.५१,१० मध्यें अग्नीस उद्देशून म्हटलें आहे कीं, "आदित्य व वसुसमवेत; इन्द्र व वायुसमवेत येणें करावें" ह्या बरोबरच ७.१०,४ ताडून पहा. त्याचप्रमाणें दुसऱ्या पुष्कळ ठिकाणीं इन्द्र व आदित्य यांचा अगदीं निरनिराळा उल्लेख केलेला आढळतो.

**इंद्र आणि वरुण.**—ज्या इन्द्राच्या जननाबद्दल वेदांमध्यें इतका अनिश्चितपणा माजून राहिलेला आढळतो तोच इन्द्र अदितीचा मुलगा कल्पिला जावा हें संभवनीय दिसत नाहीं. वरुण अगर मित्र या दोघां आदित्यांच्या बाबतींत अशा तऱ्हेचा विचार उद्भवला नाहीं मग इन्द्राच्याच बाबतींत तसा विचार कां उद्भवावा? तसेंच इन्द्राचा साहसी, धडाडीचा क्रूर स्वभाव आदित्यांच्या शांत उदात्त व उदार स्वभावाशीं मुळींच जुळत नाहीं. उलटपक्षीं वरुणाचा तो सेनानी कल्पिलेला आहे. ८.८२,६ व ८३,९ पहा; विशेषतः ६.६८,३ पहा, कारण त्यांत म्हटलें आहे—"एक (म्हणजे इन्द्र) आपल्या वज्रानें शत्रूचा बींमोड करतो व दुसरा (म्हणजे वरुण) साधु घरीं राहतो."

आदित्य हे उच्च दर्जाचे आकाश व तेज यांचे देव असून देव व मानवांचे ते कायदे करणारे व न्याय देणारे आहेत. त्यांच्या सत्तेखालीं सर्व चराचर वस्तु आहेत. असें असतां कांहीं वामप्रकृतीचे लोक व पापीप्रवृत्तीचीं पिशाचें त्यांची सत्ता जुमानीत नाहींत. अंतरिक्षांत संचार करणारे राक्षस वारिधारा अडवून धरून पाऊस पडूं देत नाहींत, त्याचप्रमाणें निर्मल आकाशावर अंधार व ढग पसरून प्रकाशाचा ते अवरोध करतात, पापीलोक पुण्यव्यक्तींचा छळ करतात व ईश्वराच्या आज्ञा मोडतात. भौतिक त्याचप्रमाणें आधिभौतिक बाबतींत न्यायाचा पुरस्कर्ता वीर अवश्य भासूं लागला, कारण स्वतः आदित्य रक्तपाताच्या विरुद्ध होते. अशा परिस्थितींत इन्द्रासारखा धडाडीचा वीरच ती जागा भरून काढण्यास योग्य वाटावा ह्यांत नवल नाहीं. नीतिपथाचा उच्छेद करणाऱ्यांनां इन्द्र शिक्षा करतो हें खालील भागांत आढळतें. १०.८९,८ मध्यें म्हटलें आहे कीं, "हे इन्द्रा, तूं पापी लोकांनां शोधून काढून त्यांचे पांच पाट काढतोस, मित्र व वरुण यांनीं घालून दिलेले कायदे जे मोडतात त्यांनां तूं कडक शासन करतोस." याप्रमाणेंच ९ व्या ऋचेंतहि म्हटलें आहे. ८.५६,८ ताडून पहा. ५.२,८ मध्यें इन्द्राला "व्रतपा देवानाम्" असें म्हटलें आहे. तसेंच १०.३२,६ मध्येंहि तसेंच म्हटलें आहे. अंतरिक्षांतील दैत्यांवर जो इन्द्रानें जय संपादन केला त्यामुळेंच त्याला असें मानूं लागले. मित्राकरितां व वरुणाकरितां हा विजय इन्द्रानें संपादन केला असें १०.११३,५ मध्यें वर्णन आहे. इन्द्राच्या भौतिक महत्त्वापासूनच पुढें त्याला आधिभौतिक महत्त्व प्राप्त झालें.

वरुणाखेरीज इतर आदित्यांनां फारसें महत्त्व नाहीं; त्यांच्या महत्त्वाच्या मानानेंच त्यांचा इन्द्राशीं संबंध येतो अगर येत नाहीं. भग, अर्यमन् व दक्ष ह्यांचा वरुणासमवेतच कायतो उल्लेख केलेला आढळतो. ८.८५,६ मध्यें मात्र असें वर्णन आहे कीं, "ज्यानें पृथ्वीवरील सर्व जीवजंतु उत्पन्न केले, ज्याच्या सत्तेखालीं सर्व जीवजंतु सुखानें नांदतात त्याची (म्ह० इन्द्राची) आपण स्तुति करूं. इन्द्राबरोबरच मित्राचेंहि स्तवन करूं *इ०" वाल० ४.३ मध्यें वर्णन आहे—"जो (म्ह० इन्द्र) हें सर्व स्तवन स्वतःकडेच घेतो व सोमरसाचें पान करतो व ज्याच्याकरितां विष्णूनें मित्राच्या सांगण्यावरून तीन पावलें टाकलीं" ह्या ऋचेंच ज्या अर्थी विष्णूचा नामनिर्देश आलेला आहे त्या अर्थी मित्राचा व इन्द्राचा संबंध विष्णु-आदित्यांमुळें आला असावा. कारण वृत्राच्या युद्धांत इन्द्राबरोबर विष्णुहि असतो. १०.२२,१ मध्येंहि मित्राचा उल्लेख आहे.

तदनंतर ज्या ठिकाणीं इन्द्र व वरुण यांचा एकत्र उल्लेख केलेला आहे त्या भागांतूनहि इन्द्र हा नीतिशास्त्राचा पालनकर्ता म्हणूनच प्रामुख्यानें वर्णन केलेला आढळतो. तरी पण इन्द्राच्या आधिभौतिक पराक्रमांनांच वरुणाच्या सान्निध्यामुळें जास्त महत्त्व देण्यांत आलें आहे. ७.२८,४ व ८४,२ मध्यें इन्द्र व वरुण यांचा संबंध चांगला वर्णिलेला आढळतो. ७.८४,२ मध्यें म्हटलें आहे कीं,—"सर्व जग वरुणानें नेमून दिलेल्या शासनांनीं एकत्रित केलेलें आहे. वरुणाचा राग आमच्यावर न होवो. इन्द्र आमचें रक्षण करो" हा अर्थ ७.२८,४ मध्यें स्पष्ट होतो, कारण त्यांत म्हटलें आहे—"हे इन्द्रा, आमचें रक्षण कर, आमचे शत्रू सशस्त्र होत्साते आमच्यावर चालून येत आहेत. आम्हीं केलेल्या पापांचें इतकें कडक प्रायश्चित्त वरुण न देवो!" ह्या दोन ऋचांत वरुण व इन्द्र यांची परस्परांशीं कशी संलग्नता होती तें उघड दिसत आहे.

वरुण व इन्द्र या दोघांनांहि जलाच्या देवता मानतात. दोन्हीहि जलदेवता असल्या तरी वरुणाचें निवासस्थान आकाशांत असून तो वारिधारांनां पृथ्वीतलावर सोडतो; व इन्द्राचें निवासस्थान अंतरिक्षांत असून तो राक्षसांच्या कचाट्यांतून वारिधारांनां मुक्त करतो. दोन्हीहि पाऊस देतात व त्यामुळें धनधान्यसमृद्धिहि तेच देतात.

* इन्द्राशीं स्तुतीनें मित्रत्वाचा रण करूं असाहि अर्थ होणें शक्य आहे.

७.८२,३; ७.८५,३; १.१७,३; ६; तसेंच ३.६२,१-३; ६.६८,२; ५; आणि ४.४१,३ मध्यें द्रव्यार्थ प्रार्थना आहेत आणि वरुण व इन्द्र दोघेहि जल देणाऱ्या देवता असल्याबद्दलचीं वर्णनें आहेत.

त्याचप्रमाणें हे दोन्ही देव संततीचा लाभ करून देणारे आहेत. ४.४२,८–९ मध्यें पुरुकुत्सानी हिनें त्यांची प्रार्थना केल्यामुळें तीस त्रसदस्यु नांवाचा पुत्र झाला असें वर्णन आहे. ७.८४,५ मध्यें त्यांनीं लढाईंत मदत करावी अशी वारंवार प्रार्थना केलेली आहे. ४.४१,२;४ मध्यें त्याचप्रमाणें अर्थ आहे. ७.८२,२–९ मध्येंहि अशाच तऱ्हेचीं वर्णनें आहेत. दुसऱ्या ऋचेंत देवांनीं वृत्रवधार्थ आपलें तेज इन्द्र व वरुणा यांच्या ठिकाणीं स्थापन केलें असें आहे. ७ व्या मंडलांतील ८३ व्या सूक्तांत सुदास् राजाला १० राजांविरुद्ध मोठ्या प्रयासानें जय मिळाल्याबद्दल त्यानें इन्द्रवरुणांचे मानलेले आभार वर्णन केलेले आहेत. ७.८५,२ मध्यें असेंच वर्णन आहे.

ह्या दोन देवतांमधील स्वभावसादृश्यापेक्षां त्यांच्या स्वभावांतील विसंगतपणाच जास्त मनोरंजक व महत्त्वाचा आहे. हिलेब्रॅण्टनें हा विसंगतपणाच जास्त लक्षपूर्वक तपासून पाहिला आहे. ७.८२,२ मध्यें इन्द्राला सर्वांवर सत्ता गाजविणारा म्हटलें आहे व वरुणाला श्रीमान् व उदार म्हटलें आहे. ५ मध्यें मित्र वरुणाची पूजा करतो व इन्द्र बलाढ्य असल्यामुळें रणांगणावर जातो असें वर्णन आहे. ६ मध्यें वरुणाची व इन्द्राची स्तुति त्याच्या उत्साहवर्धनार्थ केली जाते. वरुण शत्रूंनां नुसता धाकांत ठेवतो व इन्द्र चोपून काढतो. पुन्हा ७.८३,९ मध्यें "इन्द्र समरांगणावर शत्रूला लोळवितो व वरुण प्रजाजन नीतितत्त्वें नीट पाळतात किंवा नाहीं हें पहात असतो." तसेंच ७.८५,३ व ७.८२,६ मध्यें अशाच तऱ्हेचीं वर्णनें आढळतात. शेवटच्या ऋचेंत तर मरुतांनां वरुणच इन्द्राच्या मदतीसाठीं पाठवितो असें वर्णन आहे.

ह्या उताऱ्यांवरून वरुण व इन्द्र यांमधील तफावत स्पष्ट रीतीनें दिसून येते. एक उदारधी, श्रीमान्, शांत, पुण्यपावन व सर्वांवर प्रभुत्व गाजविणारा असा आहे व दुसरा साहसी, धडाडीचा, बलाढ्य, रणांगणावर विजय मिळविण्याची हांव धरणारा व सेनानी आहे. ते दोघे वेदकालीन निसर्गाच्या निरनिराळ्या भागाचे अधिपति आहेत. येवढेंच नव्हे, तर त्यांच्यांत दिसणारें साम्यच वरवर दिसणारें असून त्यांच्या स्वभावांतील फरकच जास्त महत्त्वाचा आहे. वरुण हा आदित्य असून आकाशाचा देव आहे. इन्द्र हा आकाशाचा देव नसून अंतरिक्षाचा व पर्यायानें वादळाचा देव आहे. तो वारिधारा चोरणाऱ्या दैत्यांशीं युद्ध करतो अशी वेदकालीन समजूत आहे. याप्रमाणें अंतरिक्षाचा म्हणून मानलेला देव आकाशाचा देव कसा होईल अशी पेरीनें शंका घेतली आहे व जो अंतरिक्षाचा देव होता तोच आकाशाचा देव कसा झाला असावा याबद्दल त्यानें खालील दाखले पुढें मांडले आहेत.

४ थ्या मण्डलांतील ४२ वें सूक्त घेऊन पेरी, गेल्डनर व केगी यांचा अनुवाद करून त्या सूक्ताचे विभाग पाडतो. या सूक्ताचा आधार घेऊन इन्द्राचें अंतरिक्षाच्या सिंहासनावरून आकाशांतील सिंहासनावर संक्रमण कसें झालें तें सिद्ध करण्याचा त्याचा हेतु दिसतो. ऋचा १ ते ४ वरुणाचें भाषण आहेत; ५ व ६ इन्द्राचें भाषण आहेत; ७ स्वतः कवि बोलतो; ८,९ व १० मागाहून पुस्त्या जोडलेल्या आहेत. लुडविग ४ थी ऋचा इन्द्राच्याच तोंडीं घालतो, परंतु त्यांतील "पुत्रो अदितेः" हे शब्द इन्द्राला लागू पडत नाहींत, कारण इन्द्र अदितीचा मुलगा आहे असें सिद्ध झालेलें नाहीं. पहिल्या तीन ऋचांत वरुण म्हणतो "सर्व राज्य माझें आहे; सर्व अनन्त वस्तूंवर माझी सत्ता आहे; देव सुद्धां या माझी आज्ञा पाळतात; मी राष्ट्रावर सत्ता चालवितों, मी वरुण आहें, सर्व शक्तींचें मी जगाच्या उत्पत्तीपासून आश्रयस्थान आहें. मी राजा वरुण आहें; हे इन्द्रा, पृथ्वीचीं दोन्ही अर्धें माझीं आहेत; मी विश्वकर्मा आहें. मीच सर्वांनां उत्पन्न केलें व सर्वांचें संरक्षण मीच करतों. मी वारिधारांनां वाहावयास लाविलें; स्वर्गाला पुण्यधाम बनविलें; ह्या अदितीच्या पुत्रानें तिन्ही लोकांत नीतिशास्त्राचा प्रसार केला." नंतर पुढच्या दोन ऋचांत इन्द्र म्हणतो–"लढवय्ये लोक माझी प्रार्थना करतात. मी इन्द्र लढाईला रंग आणतों. सर्व हें मी केलें. माझ्या वेगास देवांनां देखील थोपवून धरतां आलें नाहीं. सोमरस पिऊन मी मत्त झालों म्हणजे दोन्ही लोक माझ्यापुढें चळचळां कांपतात." नंतर स्वतः कवि म्हणतो "सर्वांनां तुझी अतुल शक्ति माहीत आहे. तूंच सर्वांच्या वतीनें वरुणाजवळ बोलतोस. शत्रूचा निःपात करणारा उदारधी अशी तुझी ख्याती आहे; हे इन्द्रा, वारिधारांनां अडवून ठेविलें असतांनां तूंच ह्यांनां मुक्त केलेंस."

ह्या सूक्तांत दोन्ही देवतांचे स्वभाव विशेष स्पष्ट रीतीनें दर्शविले आहेत. पहिल्या दोन ऋचांत वरुण आपली सत्ता प्रस्थापित करण्यासाठीं कांहीं विधानें पुढें मांडतो. "त्या विधानांशीं अथवा कारणांशीं मला कांहीं कर्तव्य नाहीं. मी अतिबलाढ्य आहें तेव्हां मीच सत्ताधीश होणार" असें इन्द्र म्हणतो. ७ व्या ऋचेंत उन्मत्त इन्द्राचें गुणवर्णन करून त्याला कवि शांतवूं पाहतो.

एकाची सत्ता दुसरा हिरावूं पहातो याबद्दल चटकन लक्षांत येण्यासारखा पुरावा नाहीं. परंतु जर हें सूक्त लक्षपूर्वक वाचून स्वतःशींच विचार केला तर असें आढळून येईल कीं, वरुण स्वतःची सत्ता प्रस्थापित करण्याचा जो एवढा अट्टाहास करतांना दिसतो तो काय म्हणून ? कवीनें जो त्याला अशा

तऱ्हेनें रंगविला आहे तो कांहीं तरी कारणामुळेंच असावयास पाहिजे व तें कारणहि त्याच्या सभोंवार दिसलें असलें पाहिजे. त्याचप्रमाणें ऋग्वेदामधील पुष्कळशीं सूक्तें इन्द्राबद्दलच आहेत, ह्यावरून असें दिसून येतें कीं, इन्द्र त्या वेळीं लोकप्रिय असा राष्ट्रीयदेव मानला गेला असला पाहिजे; अशी जरी स्थिति होती तरी त्या वेळींहि वरुण हाच देवाधिदेव होता अशाबद्दलच्या कथा रूढ होत्या. ह्यावरून तत्कालीं दोन मतें उपलब्ध होतीं; हीं दोन मतें पूर्णपणें परस्परविरोधी असलीं पाहिजेत व तो विरोध मोडण्याकरितां वरील सूक्त असावें असें दिसतें.

इन्द्र व वरुण या दोन देवतांमध्यें समेट घडवून आणण्याचा हा प्रयत्न आहे. पूर्वीं वरुण सर्व सत्ताधीश होता, परंतु त्याची जागा नंतर इन्द्राला मिळाली. हा फरक होत असतां समेटाची भाषा निघाली असावी.

हें संक्रमण स्पष्ट तऱ्हेनें वर्णन करतां येणार नाहीं, कारण निसर्गाच्या जुन्या देवाची म्हणजे वरुणाची जागा इन्द्रानें पटकाविली असा भाग नसून वरुणाच्या जागीं इन्द्र जो अधिष्ठित झाला तो केवळ बाह्य कारणामुळें झाला. युद्धप्रिय राष्ट्राला युद्धदेवताच मान्य होणार. त्या राष्ट्राला ज्या मानानें लढाया माराव्या लागल्या असतील त्या मानानें युद्धदेवतेची पूजाअर्चा तें राष्ट्र करणार हें उघड आहे. त्याचप्रमाणें देवतेची उपासना मनुष्य करतो तो त्या देवतेनें आपल्यावर कृपादृष्टि ठेवून आपलें आयुष्य निरामय करावें हीच त्याची इच्छा असते. आपलें सुख विवक्षित देवतेच्या कृपादृष्टीवर अवलंबून आहे ही कल्पना मनुष्याच्या मनांत रुजली म्हणजे त्या देवतेबद्दल त्याच्या मनांत आदरहि तितकाच मोठा असतो. उष्णकटिबंधांत पावसाची किती आवश्यकता भासते ह्याचें निराळें वर्णन करण्याची जरूरी नाहीं, अशा प्रदेशांत इन्द्राची प्रार्थना केल्यानंतर पाऊस पडतो ह्या कल्पनेनें इन्द्राबद्दलचा आदर त्या प्रदेशांतील रहिवाशांच्या मनांत उत्पन्न व्हावा हें साहजिकच आहे. त्याचप्रमाणें वेदकालीं आत्मसंरक्षणार्थ किती विलक्षण धडपड चालली असेल त्याचीहि कल्पना सहज करतां येण्यासारखी आहे, आर्यावर्तांत नवीन येणाऱ्या राष्ट्रांनां स्वतःचें वर्चस्व प्रस्थापन करण्यास किती खटपट करावी लागली असेल त्याचीहि कल्पना करतां येईल. त्या कालीं जीवितरक्षणासाठीं अष्टौप्रहर युद्ध करणें भाग होतें. अशा परिस्थितींत बलाढ्य इन्द्राच्या कृपादृष्टीची व मदतीची प्रत्येकाला किती अपेक्षा असली पाहिजे हें उघड दिसेल. ह्या कारणामुळें इन्द्र लवकरच सर्वांचें मुख्य दैवत होऊन बसला, व त्यानें लवकरच वरुणोपासना मागें पाडली. वरुण आणि इन्द्र यांचीं कार्यक्षेत्रें निराळीं होतीं. वेदकालीन कवी त्या दोघांचीं स्वभाववर्णनें मार्मिकतेनें करतात यावरून इन्द्रानें वरुणाची जागा पटकावली नव्हती असें सिद्ध होत नाहीं. इन्द्रानें वरुणाची जागा घेतली म्हणजे इन्द्र आकाशाचा देव झाला, तो एक आदित्य झाला, त्याला आध्यात्मिक स्वरूप मिळालें असें नसून तो होता तसाच लढवय्या राहिला, अंतरिक्षाचा व वादळाचा देव, पृथ्वीतलावर होणाऱ्या युद्धाचा देव, जयप्राप्ति व धनधान्यसमृद्धि करून देणारी देवता व देशप्रवेश करूं पहाणाऱ्या राष्ट्राचें महत्त्वाचें उपास्य दैवत बनून राहिला. आपलें क्षेत्र सोडून तो वरुणाच्या क्षेत्रांत शिरत नाहीं, परंतु लोकांच्या बदललेल्या दृष्टिकोणामुळें त्याला वरुणापेक्षां अधिक महत्त्व प्राप्त झालें एवढेंच; तथापि वरुण आपल्या उच्चस्थानापासून भ्रष्ट झालेला वेदांत वर्णिलेला नाहीं, त्याचप्रमाणें इन्द्र आपली पायरी सोडून उच्चस्थानावर अधिष्ठित झाला नाहीं. आर्य लोकांच्या कल्पनेंत हा फेरबद्दल त्या काळींहि घडून येत होता व सूक्तांच्या एकीकरणापूर्वी तो फेरबदल घडूनहि आला होता एवढेंच वेदावरून आढळून येतें.

१०.१२४ ह्या सूक्तांत वरुणाची सत्ता इन्द्राच्या ताब्यांत कशी गेली हें वर्णन केलें आहे. ह्या सूक्ताचा पुष्कळांनीं पुष्कळ तऱ्हेचा अर्थ लाविलेला आहे. पहिल्या ऋचेंत अग्नीला यज्ञास येण्याचें आह्वान आहे. दुसऱ्या, तिसऱ्या व चवथ्या ऋचांत अग्नीनें प्रत्युत्तर दिलें आहे. त्यांत तो म्हणतो कीं, पूर्वींचा काळ आतां बदलला आहे. पूर्वीं जो सत्ताधीश होता तो आतां राहिलेला नाहीं. पुष्कळ वर्षें मी माझ्या पूर्वींच्या धन्याला सोडिलें असून माझा हल्लींचा धनी इन्द्र आहे. ५ व्या ऋचेंत इन्द्र वरुणाला आपली सत्ता पूर्वींप्रमाणें आपल्या हातीं घेण्याविषयीं विनंति करतो, कारण दानवांचा पूर्ण निःपात झालेला असतो. ६ व्या ऋचेंत 'वृत्राला आपण दोघे मिळून मारूं' असें इन्द्र वरुणाला म्हणतो. ह्या ठिकाणीं सूक्ताचा साहजिक शेवट होतो. ७ व्या ऋचेंत ढगांनीं व्याप्त अशा आकाशाचें वर्णन आहे. ८ व्या ऋचेंत इन्द्राच्या सत्तेचें वर्णन आहे. ९ व्या ऋचेंत स्वर्गंगांचा मित्र इन्द्र आहे असें म्हटलें आहे.

ह्या सूक्तावरून वरुण व इन्द्र याबद्दलचें द्वैतमत होईल तितकें कमी करण्याचा प्रयत्न कवीनें केलेला दिसतो. ह्या सूक्तावरून असें दिसून येतें कीं, इन्द्राला सर्व मानमरातब मिळूं लागलेला पाहून वरुणानें आपलें सिंहासन सोडलें व अग्नि ह्या आपल्या जुन्या धन्याचें म्हणजे वरुणाचें दास्य करण्यास नाखुष झाला व खुषी नव्हती तरी इन्द्राचें दास्य त्याला पत्करणें भाग पडलें. लढायांतून स्वशत्रूंचा निःपात केल्यामुळें इन्द्राला जरी सत्ताधीशत्वाचा लाभ झाला होता तरी त्याला ती जागा कायमची नको होती. जिकडेतिकडे स्थिरस्थावर होतांच त्यानें फिरून वरुणाला पूर्वींची सत्ता आपल्या हातीं घेण्याविषयीं विनंति केली.

इन्द्र आणि वरुण यांचा यज्ञैतिहासिक संबंध येणेंप्रमाणें सांगतां येईल.

यज्ञांच्या अत्यंत विकासकालीं प्रजापति या देवतेला महत्त्वाचें स्थान आहे. इन्द्राला दुय्यम प्रकारचें आहे, पण वरुणाचा संबंध फारच क्वचित् येतो.

ऋक्संहितेमध्यें यज्ञाचें जें स्वरूप येतें त्या स्वरूपांत इन्द्राला बरेंच प्राधान्य आहे. अनेक यज्ञावयवांचा ऋग्मंत्रांत जसा इन्द्राशीं संबंध येतो तसा पुढील श्रौतसूत्रोक्त धर्मांत येत नाहीं.

विशिष्ट श्रौतकर्माशीं वरुणाचा संबंध ऋग्वेदमंत्रांत देखील थोडा दिसतो; तथापि शुनःशेपाख्यानासारख्या कथांमध्यें नरयज्ञानें जीस तुष्ट करावयाचें ती देवता वरुण दाखविली आहे. या कथेचें ब्राह्मणांत जें स्वरूप आहे त्या स्वरूपांत इन्द्र हा वरुणशांत्यर्थ यज्ञ होऊं न देण्याची खटपट करीत आहेसें दिसतें.

श्रौत धर्मविकास आणि देवतामहत्त्व यांचा अन्योन्याश्रय असा दाखवितां येईल कीं, ज्या वेळेस नरयज्ञ होत आणि ज्या वेळेस यज्ञसंस्था अत्यंत स्वतंत्र होती त्या वेळेस वरुणदैवत प्रधान असावें.

ऋग्मंत्रांचा मुख्य संग्रह ज्या काळांत झाला त्या काळांत इन्द्रदेवता प्रधान असून यज्ञसंस्था अधिकाधिक विकसित झालेली असावी.

यज्ञसंस्था अत्यंत विकसित झाली त्या काळीं प्रजापति या देवतेस प्राधान्य आलें असावें. ब्राह्मणांत तर प्रजापति हीच देवता मुख्य दिसते.

वरुणाच्या महत्त्वाच्या कालीं पुरोहितवर्गाची स्थिति कशी काय असावी, वरुणाचे पुरोहित एखादा वर्ग असून त्या वर्गास इन्द्रपुरोहितवर्गानें मागें सारलें असें म्हणावें तर या पुरोहितवर्गाची भांडाभांडी दाखविणारीं विधानें कोणतीं असा एक महत्त्वाचा प्रश्न उपस्थित होतो.

याला उत्तर असें देतां येईल कीं, वरुण आणि इन्द्र यांचे उपासक भिन्न नसावेत. जे वरुणाचे उपासक तेच इन्द्राचे उपासक, यामुळें व दुसऱ्या एका कारणामुळें यज्ञसंस्थेंतील इतिहासांत या द्वैताचे भिक्षुकी कलहाच्या रूपाचे परिणाम फारसे सांपडणार नाहींत. वरुण हा ज्या अर्थी सर्वेश्वर होत होता आणि ज्या अर्थी भक्तीचें प्राधान्य त्याच्या उपासनेस चिकटत होतें, त्या अर्थी त्याचें तसें वाढलेलें माहात्म्य यज्ञकर्म करणारांमध्यें प्रिय नसणार. पुरोहितवर्गाची प्रवृत्ति यज्ञयागांकडे विशेष होती त्या अर्थी स्वतंत्र धंदेवाईक याज्ञिकांचा वर्ग वरुणाकडे ओढला जाईल हें शक्य नव्हतें. यज्ञांचा विकास म्हणजे एकेश्वरी मताकडे व भक्तीकडे दुर्लक्ष होय. वेदकालीन लोकांच्या मानसिक विकासस्थितींस आणि एकंदर पुरोहितवर्गाच्या हितसंबंधांस एकेश्वरोपासनेपेक्षां यज्ञसंस्थाच अधिक अनुरूप होती. असो.

**इन्द्र आणि मरुत्.**—इन्द्रानें दैत्यांवर ज्या अनेक मोहिमी केल्या त्या मोहिमांत त्याला वादळांचे देव जे मरुत् त्यांचें फार साहाय्य असे. पुष्कळ ऋचांतून त्याला 'मरुत्वन्त' म्हटलें आहे; 'मरुद्गण' म्हटलें आहे; मरुतांनां सुद्धां 'इन्द्रवन्तः' व ( १०.१२८,२ ) 'इन्द्रज्येष्ठाः' म्हटलें आहे (६.५१,१५) २.२९,३ मध्यें 'इन्द्रामरुतः' असें संबोधनाचें बहुवचन आढळतें. एकेवेळीं ते फक्त इन्द्राला लढण्यास प्रोत्साहन देतात; कारण, बलाढ्य इन्द्राला कोणाच्या मदतीची अपेक्षा नसते. ३.४७,४ मध्यें 'मरुद्भिः सह सोमं पिब' असें म्हटलेलें आहे. ह्यांत इन्द्राची स्तुति आहे. १०.११३,८; ५.२९,२ १.५२.४;९;१०; ३.३२,३ ताडून पहा. तेथें मरुत् साहाय्यक आहेत. ५.३०,६ मध्यें मरुत्कृत इन्द्रस्तुति आहे. ५.२९,३ मध्यें मरुतांनां इन्द्राचे उपाध्याय म्हटलें आहे. मरुतांसह इन्द्राला बोलाविलें. १.१०१,७ मध्यें मैत्री करण्याकरितां बोलवितात 'मरुत्वन्तं सख्याय हवामहे'. ते इन्द्राला कसें लढावें याबद्दल सल्ला देतात.

मरुतांची संख्या किती आहे याबद्दल बराच मतभेद आहे. भाष्यामध्यें ६३ 'त्रिःषष्टिः' संख्या धरली आहे व त्याला आधार दिला आहे. ८.८५,८ मध्यें त्यांची संख्या १८० आहे असें वर्णन आहे. १.१३३,६ मध्यें ते फक्त २७ आहेत असें म्हटलें आहे. इन्द्राशीं त्यांचा संबंध अगदीं निकट आहे. १.१००,५ स्वतःच्या पुत्रांप्रमाणें रुद्रां( मरुतां )समवेत इन्द्रानें शत्रूंचा निःपात केला. १.१७०,२ मध्यें मरुतांनां इन्द्राचे भाऊ म्हटलें आहे.

वृत्रहननाच्या वेळीं इतर देव मिळून पळाल्याचें वर्णन पूर्वीं आलेलें आहे, परंतु इतर देवांपेक्षां मरुत् जास्त धीट होते, त्यांच्या मित्रत्वावर पूर्ण विश्वास टाकण्याविषयीं इन्द्राला सांगण्यांत आलेलें आहे.

असें जरी आहे तरी इन्द्र व मरुत् यांमध्यें बेबनाव झाल्याचीं द्योतकेंहि आढळतात.

१.१७०,२ मध्यें मरुत् म्हणतात—"हे इन्द्रा, आम्हाला मारण्याची इच्छा कां करतोस ? आम्ही मरुत् तुझे भाऊ आहों त्यांनां ठार मारूं नकोस." १.१७१,६ मध्यें "मरुतांवरील तुझा राग शांत होऊं दे" असें वर्णन आढळतें. इन्द्राचा मरुतांशीं बेबनाव झालेला दिसतो. संकटकालीं आपल्या मित्रांनीं आपल्याला सोडून दिलेलें पाहून इन्द्र त्यांच्यावर फार रागावतो असें १.१६५ मध्यें वर्णन आहे. रोटच्या टिपणावरून त्या सूक्ताचा गोषवारा खालीलप्रमाणें देतां येईल.

मरुतांनां नेहमीं बरोबर घेऊन निघणारा इन्द्र एके दिवशीं एकाकीच बाहेर पडतांना पाहून मरुतांनीं 'कोठें निघालां ?' असा प्रश्न केला. 'यज्ञाला' असें इन्द्रानें तुटक

उत्तर दिलें. तें उत्तर ऐकून मरुत् त्याच्याबरोवर जाण्याची तयारी करतात. तों त्यांची उत्सुकता पाहून "तुम्ही वृत्राच्या लढाईचे वेळीं मात्र बरोबर येण्यास उत्सुक नव्हतेत, परंतु यागाचे वेळीं मात्र तयार आहां" असें म्हणून इन्द्र त्यांची चेष्टा करतो. असा टोमणा मारण्यास मरुतांचें वर्तन तशा प्रकारचें घडलेलें असतें त्यामुळें त्यांनां प्रत्युत्तर करतां येत नाहीं, परंतु इतर प्रसंगीं ते आपल्या शौर्याची व मित्रनिष्ठेची साक्ष इन्द्राला पटवितात व इन्द्राला फिरून आपलासा करून घेतात.

**इन्द्र आणि वायु.**—मूरचे संस्कृत ग्रंथ पु. ५. पृ. १४५ मध्यें लिहिलें आहे कीं, वायूचा मरुतांशीं अथवा वादळाच्या देवतांशीं क्वचितच संबंध येतो हें विलक्षण दिसतें. इन्द्राबरोबर वायूचें जरी अनेकवेळां आह्वान केलेलें आढळतें, तरी दैत्यांवरोबरील संग्रामांत वायु क्वचितच इन्द्राबरोबर असतो ही गोष्ट त्याच्याहिपेक्षां चमत्कृतिजनक आहे. एके ठिकाणीं इन्द्र व वायु यांचें साहचर्य मोघम शब्दांत वर्णिलेलें आहे—"गुराख्यांच्या साठीं जो (म्हणजे इन्द्र) वायुसमवेत जय संपादन करतो" (४.२१,४). वायु व इन्द्र यांमध्यें संबंध पुष्कळ निकट आहे, कारण दोघांच्या स्तवनासाठीं पुष्कळ सूक्तें रचलेलीं आढळतात. ह्यावरून असें दिसतें कीं, वैदिक लोकांनीं अंतरिक्षांत सुटणाऱ्या एका तऱ्हेच्या वाऱ्याला इन्द्र कल्पिला व दुसऱ्या तऱ्हेच्या वाऱ्याला वायु कल्पिला असावा. १०.१६८ मध्यें वाताचें वर्णन आलें आहे त्यावरून वरील समजूत दृढ होते. इन्द्र व वायु या दोघांचेंहि कार्यक्षेत्र एकच म्हणजे अंतरिक्ष हें होय.

दोघांबद्दल जीं जीं सूक्तें आढळतात त्या सूक्तांत त्या दोघांनांहि सोमपानार्थ पाचारण असतें. त्या दोघांचा मान प्रथमपानाचा असतो (१.१३५,४). इन्द्राच्याहि अगोदर वायूला मान आहे (४.४६,१). दोघेहि एकाच रथावर आरूढ होतात (४.४७,३), व त्यांच्या रथाला अत्यंत वेगवान् घोडे जोडलेले असतात (१.२,५). ७.९०,५ मध्यें असें वर्णन आहे कीं, त्यांच्या रथांचे घोडे वेगवान असून ते इच्छामात्रें करून रथाला जोडले जातात. दोघांनांहि दिविस्पृक् असें विशेषण लाविलेलें आढळतें (१०.१६८,१). त्यांच्या रथांनांहि हेंच विशेषण लावलेलें आढळतें. १.२३,२; ४.४६, ४ हिरण्यवंधुर (सुवर्णाची बैठक) असेंहि त्यांच्या रथाचें वर्णन आहे ४.४६,४. त्याचप्रमाणें नियुत्वत् म्हणजे पुष्कळ घोडे जोडलेला असेंहि वर्णन आहे १.१३५,४ व ७. दोघांनांहि मनोजव व सहस्राक्ष अशीं विशेषणें लाविलेलीं आढळतात (१.२३,३).

त्यांच्या कृपादृष्टीमुळें धन, पुत्रपौत्र व जयप्राप्ति व्हावी म्हणून त्यांची प्रार्थना करण्यांत येते. १.१३५,८ मध्यें अशा तऱ्हेचें वर्णन आहे. त्याच सूक्ताच्या ५ व्या ऋचेंत दोघांनांहि "वाजदा" म्हणजे अन्नदाते म्हटलें आहे. ७.९०,६;९१,२ यांत द्रव्यादिकांविषयीं प्रार्थना आहे.

**इन्द्र व सोम.**—सर्व देवतांनां सोमरसपानाचा जरी हक्क आहे तरी इन्द्राइतका तो हक्क कोणालाच नाहीं. ह्या सोमरसानेंच इन्द्राची माता प्रत्येक वाढदिवशीं सुद्धां इन्द्राला तोषविते. प्रत्येक लढाईच्या प्रारंभीं सोमरस पिऊनच इन्द्र युद्धाला जाण्यास सिद्ध होतो. सोम म्हणजे 'इन्द्रस्य आत्मा' ९.८५,३ व 'हृदंसनिः' 'हृदयस्य संभक्ता' म्हणजे धैर्य देणारा आहे. ९.६१,१४.

इराणी व भारतीय लोकांनां सोम वनस्पति अवगत होती व ती वनस्पति गाळून त्याच्या रसापासून उन्मादकारक व उत्तेजक पेय तयार करण्याची कला त्या लोकांच्या भाषेंत अंतर पडण्यापूर्वीं माहिती होती. तत्कालीन लोकांनां ह्या रसांत देवता दिसली. त्या काळीं त्या लोकांनां अनेक लढाया माराव्या लागल्यामुळें ही माहिती प्रत्यक्ष उपयोगांत आणून त्यांनीं सोमरसाचें पान करण्यास सुरुवात केली. लढाईच्या प्रसंगीं कसल्याहि तऱ्हेची भीति मनाला शिवूं नये व प्रत्येकाच्या हृदयांत आवेश उत्पन्न व्हावा म्हणून तत्कालीन वीर सोमरसाचें पान करीत.

इन्द्र म्हणजे वीरशिरोमणि अत्यंत बलाढ्य, योद्धा, त्याला तर सोमरसाचें पान अवश्यच.

या रसाला आकार दिल्यामुळें इन्द्राशीं त्याचा संबंध जास्त निकट आला, व वेळोवेळीं ह्या सोमानें इन्द्राला सक्रिय मदत केली. ह्याप्रमाणें सोम वीरच नव्हे, तर देवहि ठरला; व त्या नात्यानें इन्द्राच्या तोडीचा तो लवकरच बनला. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे जें जें म्हणून इन्द्रानें संपादन केलें तें तें सोमानें केलें असें ठरूं लागलें. नवव्या मंडलांत तर सोमपराक्रमाचें अपरंपार वर्णन आहे.

खालील उताऱ्यांवरून सोमकल्पनेंत कसकसा बदल होत गेला हें दिसून येईल. २.११,१०; १०.११२,५ व त्याचप्रमाणें इतर पुष्कळ ठिकाणीं सोम हा फक्त रस म्हणजे एक मादक व उत्तेजक पेयच आहे, परंतु ४.२८,१ त्याचप्रमाणें १.१७६,५; ६.७२,१; २.३,४; २.३०,६ मध्यें सोमाला पुरुषाकृति प्राप्त झाली आहे. ७.१०४ हें तर दोघांच्याहि स्तुतिपर सूक्त आहे.

सोमाबद्दलची ही कल्पना जी अशा तऱ्हेनें परिणतावस्थेप्रत पोहोंचली ती एखाद्या पुराणकथेमुळें नव्हे, तर प्रथमतः जी एक साधी कल्पना तिचेंच निरनिराळ्या अलंकारांमुळें हें रूप वनलेलें असावें.

इतर सर्व देवतांच्या मानानें इन्द्र सोमपानांत जास्त पटाईत होता. या पानातिरेकाबद्दल सूक्तकारांचेंच काय मत

होतें तें पाहूं. ९.९९,३ मध्यें म्हटलें आहे-"मुख्यतः इन्द्रासाठीं आम्हीं हें मादक पेय तयार करीत आहों." ६.३७,२ मध्यें इन्द्राला 'द्युक्षो मदस्य सोम्यस्य राजा' म्हटलें आहे. १०.१६७,१ मध्यें तर 'या गाळींव पेयाच्या कलशावर सर्वस्वी तूंच सत्ता चालवितोस' असें म्हटलें आहे. सोमपानाची संवय इन्द्राला जन्मतःच जडली असें ३.३२,९-१० व ७.९८,३ मध्यें वर्णन आहे. ३.४८,३ मध्यें आईच्या दुधापेक्षांहि इन्द्राला सोमरस जास्त प्रिय होता असें म्हटलें आहे. सोमाच्या बाबतींत इन्द्र कशाचीहि पर्वा करीत नाहीं. त्यानें त्वष्ट्याचाहि सोम चोरून पिऊन टाकला असें ३.४८,४ व ४.१८,३ मध्यें वर्णन आहे. त्याला एखाद्या तहानेल्या हरणाप्रमाणें सोमपानासाठीं पाचारण केलेलें आहे ८.४,१०. त्याला तहानेला गवा म्हटलें आहे १.१६,५. ज्याप्रमाणें एखादा तहानेला बैल हौद रिकामा करतो त्याप्रमाणें इन्द्र सोमरसाचें पात्र फस्त करतो १.१३०,२. एखाद्या गव्यापेक्षांहि याची तहान दांडगी आहे ७.९८,१. त्याच्या पोटाला एखाद्या सरोवराची अगर समुद्राची उपमा दिलेली आहे १०.४३,७. सोमपानानंतर सोमरस त्याच्या नसांनसांतून भिनतो ३.५१,१२; ८.१७,५. यज्ञयागाचेवेळीं इन्द्राला सोमपानार्थ आह्वान करतात येवढेंच नव्हे, तर श्येनपक्षी इन्द्राला सोम पोहोंचवितो १.८०,२; ४.२६,५; ६.२०,६. कांहीं वेळां सोमपानाचे प्रसंगीं इन्द्राला खाद्यहि लागतें. त्याच्यासाठीं एक बैल मारला जातो १०.२७,२. ६.१७,११ मध्यें तर तसले शंभर बैल त्याच्यासाठीं मारले जातात असें वर्णन आहे. ५.२९,७ मध्यें तीनशें बैल मारले जातात व तदनंतर सोमरसाचीं तीन सरोवरें पिऊन तो आपली तृषा भागवितो असें वर्णन आहे. ८.६६,४ मध्यें असें वर्णन केलें आहे कीं, एका घोटासरशीं इन्द्र सोमरसानें भरलेलीं तीन तळीं पितो. पात्रांतून सोमरस काढून देण्याइतका देखील त्याला धीर निघत नाहीं, पात्रांसकट तो सर्वच गट्ट करतो १०.११६,४. १०.११९ मध्यें इतका सोमरस पिऊन तर्र झालेल्या इन्द्राचें वर्णन मोठें गमतीचें आहे. यागासाठीं केलेल्या भोजनसमारंभाचेवेळीं पाण्यावर ज्याप्रमाणें नौका हेलकावे खाते त्याप्रमाणें इन्द्र झोकांड्या खातो असें २.१६,७ मध्यें वर्णन आहे.

**इन्द्र व बृहस्पति.**-इन्द्र व सोम यांच्या संबंधाप्रमाणेंच इन्द्र व बृहस्पति यांचा संबंध आहे, म्हणजे ह्या संबंधाच्या बुडाशीं एकादी पौराणिक कथा नसून एक साधी कल्पना आहे. ज्याप्रमाणें शारीरिक पराक्रमासाठीं सोमरसाशीं इन्द्राचें साहचर्य जोडण्यांत आलें त्याचप्रमाणें बौद्धिक सामर्थ्य वाढण्यासाठीं इन्द्राचें बृहस्पति अथवा ब्रह्मणस्पतीशीं साहचर्य जोडण्यांत आलें आहे. रोटच्या "ब्रह्म आणि ब्राह्मण" या निबंधांत ब्रह्मणस्पतीबद्दलच्या कल्पना कशा वाढत गेल्या त्याचें वर्णन आहे. "वारिधारा अडवून ठेवणाऱ्या राक्षसांना मारून पृथ्वीवर वारिधारा सोडण्यासाठीं इन्द्राची ऋग्वेदांत नेहमीं प्रार्थना केलेली आढळते. इन्द्राच्या बहुतेक लढायांच्या प्रसंगीं ब्रह्मणस्पति त्याच्या जवळ असतो व इन्द्राच्या जयाचा बरासचा वांटा त्याचा असतो. एके ठिकाणीं तर असा उल्लेख आहे कीं, एकटा ब्रह्मणस्पतीच वल राक्षसाची गुहा फोडून वारिधारारूपी गाईंची मुक्तता करतो." त्या विधानाच्या समर्थनार्थ रोट २.२४,३ चा दाखला देतो. त्या ऋचेंत-'ज्याप्रमाणें इन्द्र आपल्या वज्रानें गुहा फोडतो त्याप्रमाणें एकटा बृहस्पति आपल्या ब्रह्मन् म्हणजे प्रार्थनेच्या जोरावर गुहा फोडतो' असें वर्णन आहे.

चवथ्या मण्डलांतील ४९ वें हें एकच सूक्त इन्द्र व बृहस्पति यांच्याकरतां रचिलेलें दिसतें. ह्या सूक्तांत फक्त त्या दोघांना यज्ञासाठीं पाचारण केलेलें आढळतें. त्याशिवाय त्यांच्या परस्परसंबंधाविषयीं कांहीं माहिती त्या सूक्तांत आढळत नाहीं. घोडे देण्याविषयीं व सोमरसाचें आकंठ पान करण्यासाठीं त्यांची प्रार्थना करण्यांत येते. ७.९७ मध्यें याच दोघांबद्दल मोघम उल्लेख आहे. याच सूक्ताच्या ९ व्या ऋचेंतहि त्यासंबंधीं उल्लेख आहे. ८.८५,१५ मध्यें कृष्णनामक एका व्यक्तीचा नाश केला असा उल्लेख आहे. १.१८,४ मध्यें ज्याप्रमाणें बृहस्पति इन्द्राचा आध्यात्मिक मित्र आहे तसाच भौतिक मित्रहि असल्याबद्दलचें वर्णन आहे.

**इन्द्र व गन्धर्व.**—( १०.१३९,४;६; ८.१,११; ६६,५; ९.८३,४ ) या पांच ठिकाणीं गंधर्वांचे उल्लेख आले आहेत व त्यांचीं स्पष्टीकरणेंहि सायणाचार्यांनीं निरनिराळीं केलीं आहेत तीं येणेंप्रमाणें.

प्रथमस्थळीं मंत्र ४ मध्यें गंधर्वशब्दाची व्याख्या 'गन्धर्व गीतरूपं गोशब्दं धारयन्तं' अशी केली आहे व ६ व्या मंत्रांत 'विश्वावसुरूपेण वर्तमानः इन्द्रः' असें आहे, तें चिंत्य आहे; कारण, सूक्ताच्या आरंभीं 'विश्वावसुर्नाम गंधर्वऋषिः' असें म्हटलेलें आहे. 'गंधर्व गवां रश्मीनां धर्तारं' असें गंधर्व शब्दाचें व्याख्यान तिसऱ्या ठिकाणीं केलें आहे. 'गंधर्व गां उदकं धारयतीति गंधर्वो मेघस्तं हिंसितवान्' असें चवथ्या ठिकाणीं म्हटलें आहे. 'गंधर्वः उदकानां स्तुतीनां वा धारकः आदित्यः' अशी गंधर्वशब्दाची व्युत्पत्ति शेवटच्या स्थलीं दिली आहे.

ग्रासमनचा अनुवाद करून रोट गंधर्व म्हणजे इन्द्रधनु म्हणतो. गन्धर्वांचाच चंद्र हा पोटभेद असावा असें सेंटपीटर्स कोशामध्यें म्हटलें आहे. गंधर्वांचें वसतिस्थान आकाश अगर अंतरिक्ष आहे व ते सोमरसाचे रक्षणकर्ते आहेत, त्याचप्रमाणें चंद्राशींहि त्यांचा संबंध आहे. ज्या अर्थी गन्धर्व सोमरसाचे अथवा पाण्याचे रक्षणकर्ते आहेत असें म्हटलें आहे, त्या अर्थी त्यांच्याबद्दल दोन तऱ्हेच्या कल्पना रूढ आहेत

त्या अशाः गंधर्वांच्या ताब्यांत अंतरिक्षांतील वारिसंचय असल्यामुळें पृथ्वीवरील लोकांनां त्या वारिसंचयाचा लाभ होण्यास प्रयास पडतात, म्हणून इंद्राची व गंधर्वांची थोडी चकमक उडाली असली पाहिजे ही एक कल्पना व गंधर्वांनींच दैत्यांपासून सोमरसाचें अथवा वारिधारांचें संरक्षण केलें असलें पाहिजे व इन्द्र ज्या वेळीं त्यांच्या तपासांत असतो त्या वेळीं त्यांचा सुगावा ह्या गंधर्वांनींच लावून दिला असला पाहिजे ही दुसरी कल्पना. १०.१३९,४ मध्यें उपरिनिर्दिष्ट दुसरी कल्पना सांपडते. ६ व्या ऋचेमध्येंहि तशाच तऱ्हेची कल्पना आढळते.

याच्या विरुद्ध असलेली पहिली कल्पना ( गन्धर्व इन्द्राचे शत्रू आहेत ही ) ८.१,११;६६,५;९.८३,४ मध्यें आढळते. ह्या ठिकाणीं सोम व पाणी दोन्हीहि गंधर्वांच्या ताब्यांत असून इन्द्र त्यांनां तीं मुक्त करण्यास भाग पाडतो असें वर्णन आहे. "इन्द्र सूर्याला गंधर्वावर एकदम हल्ला करण्यास धाडो" अशी ८.१,११ मध्यें प्रार्थना आहे. "अंतरिक्षांत गंधर्वांनां इन्द्र भेदून काढून भक्तांनां आनंद देवो" असें ६६.५ मध्यें वर्णन आहे. ९.८३.४ मध्येंहि असेंच वर्णन आढळतें.

**इन्द्र व अग्नि.**—इन्द्राच्या खालोखाल अग्नीची महती वेदांत वर्णन केलेली आढळते. त्याचप्रमाणें ह्या दोन देवतांचा परिचयहि निकट आहे, परंतु त्या परिचयाची विशेषशी माहिती मिळत नाहीं.

अग्नि हें विस्तवाचें दैवत असल्यामुळें विस्तवाचें ज्याप्रमाणें त्रिविध रूप असतें त्याप्रमाणेंच या देवतेचेंहि त्रिविध रूप असतें. आकाशांतील अग्नि म्हणजे सूर्य. अंतरिक्षांतील अग्नि इन्द्राला त्याच्या अनेक लढायांत साहाय्य करतो आणि तिसरा म्हणजे पृथ्वीवरील विशेषतः यज्ञयागांतील अग्नि. या तिसऱ्या प्रकारच्या अग्नीला देवांनां हविर्भाग पोहोंचविण्याचें अथवा त्यांनां यज्ञाला आमंत्रण करण्याचें दूताचें काम करावें लागतें.

ह्या कल्पनांमुळें इन्द्राशीं जो अग्नीचा परिचय होतो तो दोन कारणांमुळें होतो. एक सर्वसाधारण कारण, अग्नि हा देव व मनुष्य यांमधील प्रतिहारी असल्यामुळें इतर देवांशीं जो त्याचा संबंध येतो तसाच इन्द्राशींहि येतो. दुसरें विशेष कारण, अग्नि हा अंतरिक्षांत विद्युल्लतेच्या रूपानें वसत असल्यामुळें वृत्रहननाचे वेळीं इन्द्राला अमूल्य मदत करतो. ह्या दोन कारणांमुळें इन्द्राशीं अग्नीचा परिचय झाला. इतर देवांप्रमाणें अग्नीहि इन्द्रापुढें दुय्यम प्रतीचा देव ठरला आहे. वरुणच एकटा कायतो इन्द्राच्या तोडीचा देव आहे, परंतु ही बरोबरी राखण्यास खुद्द वरुणालाहि बरेच प्रयत्न पडतात.

पुष्कळ ठिकाणीं इन्द्रानें अग्नीला उत्पन्न केलें असा उल्लेख आढळतो. २.१२,३ मध्यें इन्द्राचें दैत्यांशीं जें युद्ध झालें त्या वेळीं इन्द्रानें वीज उत्पन्न केली असें वर्णन आहे. १०.४५,३ मध्यें त्याच विजेपासून पृथ्वीवर अग्नि उत्पन्न झाला असें वर्णन आहे. "अंतरिक्षांत, वारिसंचयांत, ढगांत मनुष्यांचा मित्र जो इन्द्र त्यानें तुला (म्हणजे अग्नीला) उत्पन्न केलें" असें त्या ऋचेंत वर्णन आहे. ह्या ऋचेचा ग्रासमन जो विद्युल्लतेशीं संबंध जोडतो, तो यथार्थ आहे. ६.५९,२ या ऋचेशीं हें वर्णन विसंगत दिसतें त्याचें कारण अग्नीच्या उत्पत्तीविषयीं बराच मतभेद आहे हें होय. अगदीं भिन्नभिन्न परिस्थितींत अग्नि दृश्यमान होतो त्याचा उलगडा करण्यासाठीं हा मार्ग पत्करला असावा असें दिसतें. निसर्गांतील एक शक्ति आणि हा किंवा तो विस्तव अशा द्विविधरूप अग्नीच्या उत्पत्ति भिन्न असल्या पाहिजेत हें उघड आहे.

अग्नीला ऋत्विज अथवा देवांचा प्रतिहारी म्हटलेलें खालील अवतरणांवरून दिसून येईल. ५.५,३ मध्यें म्हटलें आहे "हे अग्नि, इन्द्राला घेऊन ये." ३.५३,४ मध्यें म्हटलें आहे कीं, "ज्या ज्या वेळीं आम्ही सोम तयार करतों त्या त्या वेळीं प्रतिहारी अग्नि तुजप्रत येवो." ३.३५,९ मध्यें "हे इन्द्रा, अग्निमुखानें तूं सोमपान कर" असें म्हटलें आहे. ज्वाला अग्नीची जिव्हा असून सोमरस अग्नींत टाकला म्हणजे ज्वाला उंच होऊन आकाशाला भिडते. ५.५१,२ मध्यें अशा तऱ्हेचेंच वर्णन आहे. ८.३८,१ मध्यें निराळ्याच तऱ्हेचें वर्णन सांपडतें. "या यज्ञाचे ऋत्विज इन्द्र व अग्नि हे होवोत, कारण दोघेहि समरांगणावर व त्याप्रमाणेंच यज्ञाचे वेळीं जयशाली होतात." तुमच्या मदतीशिवाय मनुष्यांनां कशाचाच लाभ होणार नाहीं एवढाच याचा अर्थ दिसतो. वास्तविक पाहिलें असतां एकटा अग्नीच कायतो ऋत्विज आहे परंतु येथें इन्द्र व अग्नि यांनां ऋत्विज कल्पिलें आहे.

विद्युल्लतेंत अग्नीचें वास्तव्य आहे म्हणून त्याला युद्धाच्या वेळचा इन्द्राचा मित्र कल्पिला असून युद्धाच्या वेळीं दोघांचीहि प्रार्थना करण्यांत येते. इन्द्रसोम किंवा इन्द्रबृहस्पति यांचा संबंध ज्याप्रमाणें परिणतावस्थेप्रत पोहोंचला त्याचप्रमाणें इन्द्र व अग्नि यांच्या साहचर्याची गोष्ट झाली. युद्धसमयीं एखादी देवता इन्द्राला मदत करणारी ठरली म्हणजे मग इन्द्राच्या प्रत्येक कार्यांत त्या देवतेलाहि थोडाबहुत भाग मिळतोच.

पृथ्वीतलावर यज्ञासाठीं म्हणून ज्या वेळीं इन्द्र व अग्नि यांस आह्वान केलें आहे, त्या वेळीं एकाच रथावर आरूढ होऊन या अशी ( १.१०८,१ ) मध्यें प्रार्थना आहे. या सूक्ताच्या ३ ऱ्या ऋचेंत दोघांनांहि वृत्राला मारणारे ( वृत्रहणौ ) हें उपपद लाविलेलें आहे.

१.१०९,४ मध्यें अश्विनींची प्रार्थना करण्यांत आलेली आहे. ती प्रार्थना वनस्पतींच्या संरक्षणासाठीं आहे. हे आश्विनौ, वनस्पती पाण्यांत बुडवून नंतर मथांत बुडवा अशा तऱ्हेचें वर्णन आहे. इन्द्र व अग्नि यांनां अश्विना म्हटलें आहे

त्याचें कारण त्यांच्या जवळ विद्युल्लता आहे म्हणून नव्हे, तर कवींनीं ते दोघेहि रथ हांकीत आहेत अशी कल्पना केली आहे, म्हणून त्यांनां 'अश्विना' 'घोडे चालविणारे' असें म्हटलें आहे. पुनः 'अश्विना' हें इन्द्र आणि अग्नीबद्दलच येथें घातलें आहे कीं नाहीं हें निश्चित नाहीं; कारण ३ ऱ्या ऋचेंत वृषण, अग्नि व इन्द्र यांच्याकरितां काम करीत आहेत असें वर्णन आहे, ४ थ्या ऋचेंत भद्रहस्ता व सुपाणी हीं विशेषणें वृषणांला शोभून दिसतात. अश्विना हें द्विवचन असल्यामुळें आपल्याला तें वृषणांकडे घेतां येत नाहीं. सोमवल्ली दाबून रस काढण्याच्या दगडांनां नेहमीं घोड्याची उपमा देतात. 'अश्विना' हा शब्दप्रयोग जर इन्द्र व अग्नि यांनां उद्देशूनच केलेला असेल, तर त्याचा खालीलप्रमाणें अर्थ लावितां येईल–"ज्या देवांकरितां याग आरंभिला आहे त्या देवांचें आह्वान करून त्यांनां याग यथासांग होतो आहे किंवा नाहीं तें पाहण्याची विनंति करण्यांत येत आहे."

वृत्रहननाच्यावेळीं अग्नीनें कोणती कामगिरी केली तें खालील उताऱ्यांवरून दिसून येईल. ३.१२,६ मध्यें वर्णन आहे कीं, इन्द्र व अग्नि या दोघांनीं मिळून दैत्यांच्या नव्वद किल्ल्यांचा विध्वंस केला" तसेंच १.१०९,७ व ८ मध्येंहि वर्णन आहे. १.५९,६ मध्यें अग्नीनें शंभर राक्षसांचा वध केला असें म्हटलें आहे. ८.४०,५ मध्यें अंतरिक्षांतील इन्द्राच्या पराक्रमांत अग्नीनें साहाय्य केल्याबद्दल त्याची प्रार्थना करा असें वर्णन आढळतें. ८ व्या ऋचेंत तसेंच वर्णन आहे. ५.२९,७ मध्यें अग्नीचा दर्जा ठरविला आहे. "इन्द्रासाठीं त्याचा मित्र जो अग्नि त्यानें तीनशें बैल भाजले, वृत्राला मारण्यासाठीं इन्द्र तीन तळीं सोम प्याला." १०.५२,५ मध्यें स्वतः अग्नि म्हणतो, "देवांनों, मी तुमच्यासाठीं अमरत्व व स्वातंत्र्य मिळवितों, ही विद्युल्लता मी इन्द्राच्या स्वाधीन करतों व तिच्या योगानें तो लढायांतून जय संपादन करील." इन्द्र, पाऊस व प्रकाश यांनां मुक्त करतो, यावरून अग्नीची त्याला अशा तऱ्हेची मदत झाली हेंहि लक्षांत येईल. ६.६९,२ मध्यें गाई, प्रकाश व उषा पुनः मिळवून देण्यासाठीं इन्द्र व अग्नि या दोघांचीहि प्रार्थना आहे. इन्द्राचे घोडे म्हणजे दाही दिशा कल्पिल्या असून अग्नीचे घोडे वारिधारारूपी गाई कल्पिल्या आहेत. ३.१२,९ मध्यें इन्द्र व अग्नि यांच्या पराक्रमामुळें शांतता व प्रकाश यांचा लाभ झाला म्हणून त्यांची स्तुति आहे.

इन्द्रानें वारिधारांनां मुक्त केल्यावर ज्याप्रमाणें सर्व साधारण दैत्यांचा तो शत्रु व जेता बनला त्याचप्रमाणें अग्नि व इन्द्र हे सरसकट दैत्यांचे शत्रु व त्यांनां मारणारे बनले. मानवांचे जेवढे म्हणून शत्रू आहेत तेवढ्यांच्या पारिपत्यासाठीं ह्या जोडीची मदत असते. ही जोडी लढाईंत लूट व सर्व तऱ्हेची संपत्ति मिळवून देते अशी समजूत आहे. ६.६०,४;५;६; ५९,९; ५.८६,४; ३.१२,४; १.१०९,१;२; ५;८; ७.९३,२; ८.४०,४.

५.२,८ व १०.३२,६ मध्यें अग्नीबद्दल एक विलक्षण कथा आढळते. या ऋचांशीं सादृश्य असणारी फक्त ५.२,६ हीच कायती ऋचा आहे, तींत अग्नीच्या बंदिवासाचें व अत्रीच्या प्रार्थनेमुळें त्याची बंधमुक्तता झाल्याचें वर्णन आहे. वरील कथाभाग असा आहे कीं, अग्नि कोठें तरी लपला असून वरुण व इन्द्र त्याचा तपास लावतात. ही कथा १० व्या मण्डलांतील कथेप्रमाणेंच आहे. त्या कथेंत असें वर्णिलें आहे कीं, यज्ञाबाबतच्या निरनिराळ्या अश अनेक कामांमुळें अग्नि मेटाकुटीस आला व पळून गेला, पुढें यमानें त्याचा तपास लावून फिरून त्याला देवांच्या स्वाधीन केला. १०.५१ आणि ५२ मध्यें हें वर्णन आहे. तैत्तिरीयसंहिता २.६,६ मध्यें अशी कथा आहे कीं, एका माशानें अग्नीची लपण्याची जागा उघडकीस आणली. अग्नि हा पाण्यांत लपला असल्यामुळें माशानें त्याचें तें ठिकाण उघडकीस आणलें असावें. हीच कल्पना आधारभूत घेऊन इन्द्रानें त्याचें लपण्याचें ठिकाण उघडकीस आणलें असें म्हणतां येणार नाहीं काय? कारण अंतरिक्षांतील पाण्याचा पृथ्वीतलावरील पाण्याशीं वारंवार संबंध जोडून गूढार्थ उघडा करण्याचा तत्कालीन कवींनीं वारंवार प्रयत्न केलेला आढळून येतो. पृथ्वीवरील पाण्यांत दडलेल्या अग्नीला ज्याप्रमाणें माशानें हुडकून काढला त्याप्रमाणें अंतरिक्षांतील पाण्यांत दडलेल्या अग्नीला इन्द्रानें हुडकून काढला हें साहजिकच दिसतें. तिसऱ्या एके ठिकाणीं यमानें त्याला हुडकून काढलें असें वर्णन आहे, परंतु तें नांव उगीच कोणीतरी घातलें असावें अशी शंका घेण्यांत आली आहे.*

**इन्द्र आणि विष्णु.**—विष्णु हा सर्वांनां नवजीवन देणारा एक रक्षणकर्ता आदित्य आहे. पृथ्वी अंतरिक्ष व आकाश अशीं या देवाचीं तीन पावलें असून सर्वांत मोठें पाऊल ज्या ठिकाणीं पडतें त्या ठिकाणीं देव राहतात. हा देव धनधान्यसमृद्धि देतो व सृष्टिक्रम अप्रतिहत चालावा म्हणून स्वर्ग व पृथ्वी यांनां बळकट आधार देतो. समृद्धीचा देव म्हणून याचा त्वष्टा व पूषन्‌शीं संबंध येतो; परंतु सृष्टिक्रमांत बिघाड आणणारे अनेक दुष्ट स्वभावांचे दैत्य असल्यामुळें त्यांचें निर्दलन होणें अवश्य असतें त्या कारणाकरितां विष्णूला दैत्यसंहारक बनावें लागतें. दैत्यांचा संहार दुसरेहि देव आपापल्यापरी करीत असतात. इन्द्र व अश्विनी दिवस व रात्र नियमानें यावे व पाऊस यथाकाल पडावा एतदर्थ मेहनत करीत असतात तेव्हां साहजिकच विष्णु समानशील असल्यामुळें ह्या देवांशीं मैत्री करतो. दैत्यांचा मुख्य संहारक

* पेरी, J. A. O. S. Vol. XI.

जो इन्द्र त्याच्याशीं विष्णूचें पुष्कळच साहचर्य वर्णिलेलें आहे. त्याचप्रमाणें इतर देवांप्रमाणेंच ह्या विष्णूचाहि दर्जा कनिष्ठ-प्रतीचा आहे. विष्णु इन्द्राला सोम देतो, कित्येक प्रसंगीं एकव्या विष्णूलाच इन्द्र युद्धास पाठवितो, मात्र तसा पाठवितांना आपलें बळ व धैर्य विष्णूबरोबर रवाना करतो. विष्णु अगदीं इन्द्राच्या खांद्याशीं खांदा भिडवून लढतो इतका कीं, कित्येक प्रसंगीं आपलें वज्र जास्त सुलभतेनें फिरवतां यावें म्हणून 'जरा बाजूला हो' असें इन्द्रास सांगण्याची पाळी येते (४.१८,१; ८.८९,१२; १.८५,७). सृष्टिक्रम अबाधित व सुयंत्रित चालावा म्हणून इन्द्र व विष्णु संगतमतानें कसे लढतात तें खालील उतार्‍यांवरून दिसून येतें. वाल. ४.३ मध्यें विष्णूनें मित्राच्या सांगण्यावरून तीन पावलें टाकिलीं असें वर्णन आहे. ८.१२,२७ मध्यें विष्णु हीच गोष्ट इन्द्राच्या पराक्रमामुळें करतो असें वर्णन आहे. ६.२०,२ मध्यें इन्द्रानें विष्णूला बरोबर घेऊन पाणी अडविणार्‍या वृत्राचा वध केला असें वर्णन आहे. ७.९९,४ मध्यें हे वीरांनों, तुम्ही सूर्य, उषा व अग्नि यांनां मुक्त केल्यामुळें यज्ञयाग करणें सुकर झालें असें वर्णन आहे. ५ व्या ऋचेंत इन्द्र व विष्णु यांनीं शंबराचे नव्याण्णव किल्ले उध्वस्त केले अशा तर्‍हेचें वर्णन आहे. इन्द्राप्रमाणेंच धैर्य येण्यासाठीं विष्णु सोमपान करतो (६.६९,२). ६ व्या ऋचेंत दोघांनांहि सोमसमुद्र म्हटलें आहे. (पांचवी ऋचा ताडून पहा).

दैत्यसंहारक पुढें धनधान्यसमृद्धि देणारा देव ठरतो त्याप्रमाणें विष्णुहि धनधान्यसमृद्धि देणारा देव बनतो. इन्द्र व विष्णु यांनां अभिमातिष असें म्हटलेलें आहे (६.६९,४). १.१५५,२ व ६.६९,१ मध्यें दैत्यांच्या बाणांपासून मानवांचें रक्षण इन्द्र व विष्णु करतात अशा तर्‍हेचें वर्णन आढळतें.

६.६९,८ मध्यें हे इन्द्राविष्णू, तुम्हीं दोघांनीं शत्रूचा पराजय केला. परंतु तुमचा पराजय केव्हांहि झाला नाहीं. तुम्हां दोघांपैकीं एकाचाहि पराजय झाला नाहीं. मग तुम्ही दोघे एकत्र झाल्यावर पराजय कोठून होणार, हे विष्णो, व हे इन्द्रा, ज्या वेळीं तुम्ही दोघांनीं असुरांशीं युद्ध केलेंत त्या वेळीं हजारांचे तीन भाग केलेत व तो तो भाग त्याला त्याला दिलात.

१.६१,७ ह्या ऋचेचा अर्थ ग्रासमननें असा केला आहे– "मातेचें दुग्ध प्राशन करून धष्टपुष्ट झाल्यानंतर उंची पेयाचें पान केल्यानंतर व मिष्टान्न भक्षण केल्यानंतर अतिबलाढ्य जो तो (म्ह. इन्द्र) त्यानें चकचकीत अस्त्र चोरून घेतलें व खडकाच्या वर नेम धरून वराहास मारिलें. बेनफे त्या ऋचेचा अर्थ असा लावतो कीं, यज्ञांतील हविर्भाग खाऊन तृप्त झाल्यावरोबर इन्द्रानें देवांच्या सुतारानें घडविलेलें अस्त्र घेतलें, व तो आपल्या शत्रूवर चालून गेला. इन्द्राबद्दलच्या कल्पनेवर ह्या ठिकाणीं एक नवीनच कल्पना मिळते. प्रामेथ्यूस ज्याप्रमाणें स्वर्गांतील अग्नि चोरतो असें वर्णन आहे, त्या प्रामेथ्यूससारखाच इन्द्र हें अस्त्र चोरतो. डॉ. पेरी त्या ऋचेचा खालीलप्रमाणें अर्थ लावतात.

"आनंदातिशयानें पेय पिऊन सोममेजवानीच्यावेळीं मिष्टान्नभक्षण केल्याबरोबर जास्त शक्तिमान् जो विष्णु त्यानें ह्याच्या आईजवळून पक्वान्न हिरावून घेतलें; त्यानें वराहाला मारलें व त्याबरोबरच खडक उलथून पाडला." परंतु ह्या अर्थानें युद्धांतील अर्थ लागत नाहीं. त्याप्रमाणें इन्द्रकथेचाहि ह्यामुळें नीटसा अर्थ लागत नाहीं. ऋग्वेदांत ह्या कथेचा इतरत्र कोठेंहि उल्लेख नाहीं.

**इन्द्र आणि त्वष्टा.**—ऋग्वेदामध्यें खालील ठिकाणीं इन्द्र व त्वष्टा यांमधील परिचय उद्धृत होतो. त्वष्टा हा देवांचा कारागीर असून त्यानें इन्द्राकरितां वज्र तयार केलें. या विधानास खालील ऋचांत पुरावा सांपडतो. १.५२,७ मध्यें म्हटलें आहे कीं, त्वष्ट्यानें तुझ्यामधील बल वाढविलें, त्यानें तुजकरितां वज्र तयार केलें; ६.१७,१० मध्यें म्हटलें आहे कीं, हे बलाढ्य पुरुषा, तुझ्यासाठीं त्वष्ट्यानें हजार अणकुचीचें व शंभर धारा असलेलें सदा तुझ्यापुढें नम्र व तत्पर असलेलें वज्र निर्माण केलें व त्या वज्रानें वृत्रबलीचा तूं निःपात केलास. १०.४८,३ व १.६१,६ ताडून पहा. वर विवेचन केलेल्या १.६१,७ मध्येंहि तसाच उल्लेख आहे.

इन्द्र त्वष्ट्याला जेरीस आणून त्याचा सोमरस बलात्कारानें पिऊन टाकतो या विधानाला खालील ऋचांतून पुरावा सांपडतो ४.१८,३ मध्यें असें वर्णन आहे कीं, इन्द्रानें त्वष्ट्याच्या घरांत शिरून शंभर गाईंच्या किंमतीचा भांड्यांत भरून ठेवलेला सोमरस पिऊन टाकला. ३.४८,४ मध्यें असें वर्णन आहे कीं, त्वष्ट्याला जेरीस आणून इन्द्रानें सोमरस पिऊन टाकला.

प्रत्येक देवतेबद्दल जेवढ्या म्हणून दंतकथा असतील तेवढ्यांच्या मुळाशीं सृष्टींतील कांहींतरी गूढ तत्त्व बीजरूपानें वास करीत असलें पाहिजे अशी भावना उराशीं धरून प्रत्येक दंतकथेचा त्या दृष्टीनें अर्थ लावूं पहाणारा मिरिॲन्यूस इन्द्राच्या या आततायी वर्तनाचा तितक्याच आततायीपणानें खालील अर्थ लावतो. "त्वष्टा हा पृथ्वी, आकाश व सर्व चराचरी वस्तूंचा उत्पादनकर्ता आहे, त्याच्या घटांत असलेला सोमरस इन्द्र त्या त्वष्ट्याला जेरीस आणून पिऊन टाकतो असें वर्णन आहे. ह्याचा अर्थ असा दिसतो कीं, सोमाला मधु म्हटलेलें आहे. हा त्वष्ट्याच्या घरांतील सोम अथवा मधु म्हणजे पाऊसच होय. त्वष्ट्याला जेरीस आणून इन्द्रानें पृथ्वीवर आपल्या भक्तांसाठीं पाऊस पाडला असा ह्या कथेचा अर्थ दिसतो."

परंतु आपल्याला इतक्या सहजपणें त्या कथेचा अर्थ लावतां येत नाहीं. इन्द्र सोमरस खालीं म्हणजे भूतलावर

न पाठवितां स्वतःच पितो आहे असा स्पष्ट उल्लेख आहे. ४.१८,३ मध्यें इन्द्रानें स्वतःच्या आईशीं अरेरावीचें वर्तन केलें असा उल्लेख आहे. ह्यावरून इन्द्र जाल्याच फार उद्धट होता असें दिसतें. त्याचप्रमाणें ३ ऱ्या मण्डलांतील ४८ व्या सूक्तांत इन्द्राची सोमपानाभिरुचि वर्णन केलेली आहे ह्या सबंध सूक्तांत सोम याचा नेहमींचाच अर्थ घेतलेला आहे, मग ह्याच ऋचेंत त्या शब्दाचा 'पाऊस' असा अर्थ कसा घ्यावयाचा? ४.१८,३.

मिरिॲन्यूसची ही कल्पना त्याच्याच तोंडून परस्परविरोधी विधानें वदविते. त्वष्ट्याचा पावसाशीं संबंध काय? त्वष्ट्या-जवळून इन्द्र पाऊस चोरून घेऊन मनुष्यांनां देतो अशी जर कल्पना गृहीत धरली तर त्वष्टा मनुष्यांपासून पाऊस चोरून ठेवतो असा अर्थ होईल व खुद्द त्वष्टा देव व मनुष्य यांचा शत्रु ठरेल; परंतु त्वष्ट्याबद्दलची ही समजूत त्याच्या मूळ-स्वभावाशीं अगदींच विसंगत आहे; कारण वारिधारा अडवून धरणाऱ्या राक्षसांच्या निर्दलनार्थ त्वष्टा इन्द्राला वज्र घडवून देतो. सोमाला वारंवार मधु म्हटलेलें आहे ही गोष्ट खरी आहे, त्याचप्रमाणें सोम म्हणजे पाऊस असेंहि अलंकारिक भाषेंत म्हणतात; परंतु ३.४८,४ मध्यें कोठेंहि मधुशब्दाचा उल्लेख नाहीं. त्याचप्रमाणें स्वतःच्या सोयीसाठीं मिरिॲन्यूस १०.४९,१० चा आधार घेतो, त्यांत मधु याचा अर्थ शुद्ध गाईचें दूध असाच होतो. त्या ठिकाणीं इन्द्र स्वतःच्या परा-क्रमाचें वर्णन करतो. जी गोष्ट खुद्द त्वष्ट्यालाहि करतां आली नाहीं ती गोष्ट मीं केली म्हणजे गाईच्या ठिकाणीं मी दूध उत्पन्न केलें."

(३) त्वष्ट्याचा मुलगा जो विश्वरूप त्याचा वध इन्द्र करतो. वर इन्द्र व त्रित याबद्दल उल्लेख आला आहे त्यांत ह्याबद्दल विवेचन आलेलें आहे.

**इन्द्र आणि ऋभू.**—त्वष्टा ज्याप्रमाणें कारागीर आहे त्याप्रमाणेंच ऋभू हे कुशल कारागीर आहेत. हे ऋभू तीन आहेत तरी त्या तिघांमध्यें फारसा फरक करीत नाहींत. ४.३३,९ मध्यें "वाज सर्व देवांचा कारागीर होता, ऋभुक्षा इन्द्राचा होता, विभ्वा वरुणाचा होता" अशी त्या तिघांजणांत तफावत केलेली आढळते. ते इन्द्राचा रथ व घोडे तयार करतात (१.१११,१). १.२०,२ मध्येंहि त्यांच्या दक्षतेचें असेंच वर्णन आहे. ५.३१,४ मध्यें 'अनूंनीं तुझा रथ बनविला' असें वर्णन आहे. ऋभूंबद्दल अनू हा शब्दप्रयोग बहुमानार्थी असून रथ बांधण्याचें काम त्यांनांच अवगत होतें असें दिसतें.

इन्द्र व त्याचे कारागीर यांमधील हा परिचय आणखी दाट होत गेलेला दृष्टीस पडतो. ४.३५,७ मध्यें इन्द्राला ऋभूंबरोबर सोमपान करण्याबद्दल विनंति करण्यांत आलेली आहे. ऋभू हे धनधान्यसमृद्धि देणारे असून इन्द्राचे मोठे दोस्त होते असेंहि वर्णन आहे. ३.५२,६ ताडून पहा. १.१११,४ मध्यें खुद्द इन्द्रालाच ऋभुक्षन् म्हटलें आहे. ७.३७,४; १०.७४,५ मध्येंहि असेंच म्हटलें आहे ४.३७,५ मध्यें ऋभूंच्या शक्तीची इन्द्राच्या शक्तीबरोबर तुलना केलेली आहे.

**वसूंचा अग्रणी इन्द्र.**—वसूंबद्दल माहिती इतकी त्रोटक आहे कीं, इन्द्र त्यांचा अग्रणी होता असें मानण्यास मूळांत कोठें चांगलासा पुरावा सांपडत नाहीं. कांहीं ठिकाणीं ह्या देवांच्या तीन जाती असल्याबद्दलचा उल्लेख आढळतो. आदित्य, रुद्र व वसु अशा या तीन जाती आहेत. "हे मित्रवरुणा, रुद्र, वसु व आदित्य यांच्या समवेत असणारे तुम्ही आमच्या रथाचें रक्षण करा" असें २.३१,१ मध्यें वर्णन आहे. "मी देवांचें, आदित्यांचें, रुद्रांचें, व वसूंचें 'स्थान' मोडीत नाहीं" असे इन्द्र स्वतःशींच १०.४८,११ मध्यें उद्गार काढतो. त्याचप्रमाणें १०.६६,३ मध्यें म्हटलें आहे कीं, "वसूंसमवेत इन्द्र आमच्या घरांचें रक्षण करो, आदित्यांसमवेत अदिति आमचें रक्षण करो, रुद्रांसमवेत रुद्रदेव आम्हांवर दया करो, व देवतांसमवेत त्वष्टा आम्हाला धनधान्यसमृद्धीचा लाभ करून देवो."

७.४७,२ ही एकच ऋचा पेरीच्या मतें वसूंचा स्वभाव दाखविते. त्या ऋचेंत असें वर्णन आहे कीं, ज्या वारिधारांचें रक्षण अग्नि करतो व ज्या वारिधारांच्यापासून इन्द्र वसूंसमवेत ताजातवाना होतो त्या वारिधारांचा लाभ आम्हालाहि होवो, "ह्यावरून आपणांस अशी कल्पना करतां येईल कीं, वारिधारामोचनप्रसंगीं ह्या वसूंनींहि इन्द्राला यथाशक्ति मदत केलेली दिसते; परंतु ह्या कल्पनेला साधक अशीं इतरत्र प्रमाणें आढळत नाहींत. इन्द्र व वसु यांचा संबंध म्हणजे अर्वाचीन कल्पकतेचा परिणाम असावा. आदित्यांचा अध्वर्यु ज्याप्रमाणें वरुण, रुद्रांचा अग्रणी ज्याप्रमाणें रुद्र, त्याप्रमाणें वसूंचा कोणीतरी अग्रणी असावा व त्या जागीं तत्कालीन अग्रेसर योद्ध्यांमध्यें इन्द्राचें नांव प्रामुख्यानें ऐकूं येत असल्यामुळें इन्द्राची योजना झाली असावी. इन्द्राबद्दल 'वसुपति' असा शब्दप्रयोग करण्यांत येतो त्याचा 'वसूंचा अग्रणी' अथवा 'धनराशींचा अधिपति' असा अर्थ होईल. पुष्कळ ठिकाणीं धनपति असाच अर्थ ध्वनित असतो; व ह्यामुळेंच इन्द्र व वसु यांमधील संबंध मोघम ठरतो.

**मानवशत्रूंशीं इन्द्राच्या झालेल्या लढाया.**—अंतरिक्षांतील जयशाली वीर, दैत्यांचा निर्दालनकर्ता वीर, सर्व देवांमधील वीरशिरोमणी असा जो इन्द्र त्याला लोकांनीं युद्धदैवत मानावें हें अत्यंत साहजिक आहे व इन्द्राला तीच पदवी प्राप्त झाली होती हें सिद्ध करणारे अनेक पुरावे आढळतात. ह्या पुराव्यांवरून इन्द्राचा आपल्या भक्तमंडळीशीं कशा तऱ्हेचा संबंध होता हेंहि दिसून येईल. ह्या ठिकाणीं

ज्या युद्धांच्या निकालानें इन्द्राला जगदुत्पादनानें आदिशक्ति व दयाळु देवता ठरविली त्या युद्धांच्या अगोदर इन्द्र हा कशा तऱ्हेचा योद्धा होता त्याची प्रथम आपण बरोबर कल्पना करून घेऊं.

२.३०,१० मध्यें अगदीं सर्वसाधारण असा उल्लेख आहे त्यांत म्हटलें आहे कीं, "जेवढ्या म्हणून तुला लढाया मारावयाच्या असतील तेवढ्या लढाया तूं सर्व शूरवीरांनां मदतीस घेऊन जिंक व आम्हांला विपुल लूट मिळवून दे." ४.१६, १७ मध्यें म्हटलें आहे कीं, "ज्या वेळीं रणकल्लोळ ऐन रंगांत आला असेल, ज्या वेळीं योद्ध्यांच्या शस्त्रास्त्रांचा खणखणाट अतिशय जोरांत होऊं लागेल त्या वेळीं हे वीरा, आमच्या शरीरांचें रक्षण कर." ७.३१,३;६ ताडून पहा.

परंतु इन्द्राचा माणसांशीं याच्याहिपेक्षां निकट परिचय होतो. अग्नि व अश्विनीप्रमाणें इन्द्रसुद्धां आर्यांचा रक्षणकर्ता होतो. आर्यन् लोकांचा इन्द्र हा खास राष्ट्रीयदेव आहे. पूर्वीच्या लोकांशीं नवीन येणाऱ्या लोकांच्या ज्या चकमकी उडाल्या त्या सर्व चकमकींत त्यांनां इन्द्राचें मोठेंच पाठबळ होतें. गाणारा कवि विरुद्ध पक्षाच्या लोकांनां दैत्य मानीत असे असें दिसतें. त्यांनां दस्यु व दास असें म्हटलेलें आढळतें. मूरनें आपल्या संस्कृतग्रंथांत (पु. ५ पृ. ११३) इन्द्राच्या ह्या वर्णनाबद्दलच्या ऋचा एके ठिकाणीं ग्रथित केलेल्या आहेत. १.१०३,३ मध्यें असें वर्णन आहे कीं, "वज्र हातीं घेऊन स्वशक्तीबद्दल पूर्ण आत्मविश्वास असलेला तो वीर चालूं लागला व शत्रूच्या किल्ल्यांच्या त्यानें विध्वंस केला. भो वज्रबाहु, दस्यूंवर आपलें अस्त्र सोड, आर्यांचें तेज व पराक्रम वाढीव." १.१३०,८; ४.२६,२; ६.१८,३; ८.१४,१५; २४,२७; १०.४९,२ ताडून पहा. १.१३१,५ मध्यें इन्द्रानें केलेल्या साहाय्याचें मार्मिक वर्णन आहे.

आर्यन् लोकांचीं निरनिराळीं मंत्रकालीन राष्ट्रें पंजाबांतून भटकत फिरत असतांनां जे दक्षिणेकडे व पूर्वेकडे गेले व सर्व देश त्यांनीं आक्रमिला त्या वेळीं इन्द्रानें त्यांनां जी मदत केली त्या मदतीचा उल्लेख वरील ऋचेंत केलेला आढळतो. मंत्रकालीन लोक अर्धवट भटकत, अर्धवट एके जागीं स्थायीक अशा स्थितींत होते. ते ज्या वेळीं सिंधुनदापार होऊन हिंदुस्थानांत वसाहत करूं लागले त्या वेळचा वेदांमधील उत्तरभाग आहे.

टोळ्याटोळ्यांत कुळांकुळांत व जातीजातींत लढाया जुंपल्या व त्या सर्व मारामारीच्या प्रसंगीं प्रत्येक टोळीनें कुळानें अथवा जातीनें इन्द्राला आपल्यालाच साहाय्य करावें अशी याचना केलेली आढळून येते व इन्द्रानें आपल्यालाच मदत करावी म्हणून प्रत्येकानें त्याला नानातऱ्हेचीं आमिषें दाखवावींत असा क्रम सुरू झाला. चवथ्या मण्डलांतील २४ व्या सूक्तांत अशा तऱ्हेचें वर्णन आहे. ४.३०,१८ मध्यें असेंच वर्णन आहे–'त्यां सरयू, अर्णव व चित्ररथ ह्या नद्यांपासून आर्यांनां एका दिवसांत हांकून दिलेंस' ६.२२,१० मध्यें 'दास व आर्यशत्रूंपासून आमचा बचाव कर' अशी इन्द्राची प्रार्थना केलेली आहे. ६.३३,३; ४६,८; ८.५२,७ ताडून पहा.

इन्द्राचा कुत्साशीं असलेला जो संबंध वर्णिलेला आहे त्यांत ह्या भांडणाबद्दल स्पष्ट पुरावा आढळतो. फार प्राचीन काळीं कुत्स आर्जुनेय नांवाचा एक राजर्षि इन्द्राचा मित्र होता. हे दोघेहि एकाच रथावर बसून जातात (६.२०,५). त्यांच्या रथाला वायुरूपी घोडे जोडलेले असतात (१.१७४, ५;१७५,४); केवळ कुत्साचें प्रिय करण्याकरतां इन्द्र शुष्णदैत्याचा वध करतो व कुत्सासाठींच सूर्याच्या रथाचें एक चक्र हरण करतो (१.१७५,४; ४.३०,४). ५.२९,४ मध्येंहि असेंच वर्णन आहे. कांहीं ठिकाणीं याच्या अगदीं उलट वर्णनें आढळतात. कुत्स हा इन्द्राचा मित्र नसून शत्रूच आहे असें त्या वर्णनावरून आढळतें. १.५३,१० मध्यें इन्द्र कुत्साला दुसऱ्या एका राजाच्या स्वाधीन करतो असें वर्णन आहे. २.१४,७; ४.२६,१; ६.१८,३ मध्येंहि अशाच तऱ्हेचीं वर्णनें आढळतात. वालखिल्य ५,२ मध्यें तर इन्द्र कुत्साला ठार मारतो असें वर्णन आहे. १०.३८,५ मध्यें तर याच्याहि पेक्षां चमत्कारिक वर्णन आहे, त्यांत म्हटलें आहे कीं, "कुत्साच्या हातून स्वतःला सोडवून इकडे ये, तुझ्यासारख्या वीराला असें डांबून घेणें शोभत नाहीं" त्याचप्रमाणें ज्यांची बाजू इन्द्र नेहमीं घेतो असे जे तुर्वश व यदु त्यांनांच ठार मारण्याविषयीं इन्द्राची प्रार्थना करण्यांत येते (७.१९,८). ह्या व असल्या तऱ्हेच्या परस्परविरोधी वर्णनांचें कारण हेंच दिसतें कीं, वेदांत पुष्कळ कवींनीं ऋचा लिहिल्या म्हणून त्या त्या कवींच्या कल्पनेप्रमाणें व तत्कालीन अष्टौप्रहर चाललेल्या झगड्यामुळें इन्द्राबद्दल अशा तऱ्हेचे एकाचा एकाशीं मेळ नाहीं असे उतारे सांपडतात.

**इन्द्र व पर्वत.**—रोट म्हणतो, त्याप्रमाणें पर्वत हा डोंगरांचा पूर्वज असून शिवाय ढगांचा अधिपति होता, ह्यापेक्षां त्यासंबंधीं विशेषशी माहिती उपलब्ध नाहीं. १.१२२,३ मध्यें "इन्द्र व पर्वत आम्हांला परितोषकें देवोत" असें वर्णन आहे. १.१३२,६ मध्यें "भो इन्द्र, पर्वत, आमचें आमच्या शत्रूंपासून रक्षण करा," असें वर्णन आहे. त्याचप्रमाणें ३.५३,१ मध्यें इन्द्र व पर्वत यांचा उल्लेख एकत्र आलेला आहे.

**जगदुत्पत्तीसाठीं इन्द्रानें केलेले प्रयत्न.**—सृष्टीमधील इन्द्राचें जें कार्यक्षेत्र आहे त्या कार्यक्षेत्राच्या बाहेरील इन्द्राचे हे प्रयत्न आहेत. वादळांत दृश्यमान होणाऱ्या देवाच्या पोटीं इन्द्राचें जनन झालेलें आहे. यावरून पाहतां इन्द्राबद्दलचीहि कल्पना न्याय्य ठरते. स्वतःच्या कार्यक्षेत्रांत

इन्द्रानें जे जे पराक्रम केले त्यांचेंच ठोकळ वर्णन केलें म्हणजे जगदुत्पत्तीसाठीं त्यानें केलेल्या प्रयत्नांची रूपरेषा आपणांस कळून येते. ही कल्पना कसकशी परिणत होत गेली तें खालील विवेचनावरून लक्षांत येईल.

(१) पंचमहाभूतांच्या खळवळीमुळें विश्वाचे सर्व भाग खिळखिळे झाले होते त्यांनां स्थैर्य व जुनी व्यवस्था इन्द्रानें मिळवून दिली.

(२) ज्यानें हें घडवून आणिलें त्यानेंच विश्वाची जागा प्रथम आंखून दिलेली असली पाहिजे.

(३) हा रचनाकार ब्रह्मदेव असला पाहिजे.

या अनुक्रमानें ती कल्पना वाढत गेली असावी. एखाद्या विशिष्ट ऋचेमधील वर्णनाची उभारणी यापैकीं कोणत्या विशिष्ट कल्पनेस अनुसरून झालेली आहे हें सांगणें कठिण आहे. अशा तऱ्हेच्या वर्णनात्मक ऋचांचा संकलितपणें विचार केला असतां वरील तऱ्हेची परंपरा आढळून येते.

(१) पंचमहाभूतांच्या युद्धानंतर इन्द्र विश्वाला स्थैर्य देऊन सृष्टिक्रम घालून देतो या कल्पनेला पोषक अशा खालील ऋचा आहेत. १.५६,६ मध्यें वर्णन आहे कीं, पृथ्वीतलावर अंतरिक्षाचें आच्छादन इन्द्रानें स्थिर केलें व सोमरसाच्या पानानें उन्मत्त होऊन इन्द्रानें शत्रूंचा निःपात केला व वारिधारांची मुक्तता केली. ६ वी ऋचा ताडून पहा. १०.११३,४ मध्यें असें म्हटलें आहे कीं, इन्द्र जन्मल्याबरोबरच आपल्या शत्रूंवर तुटून पडला. तो पराक्रमासाठीं व युद्धासाठीं फार हपापलेला होता. ८.४५,४; ६६,१ ताडून पहा. इन्द्रानें खडक फोडला, वारिधारांनां मुक्त केलें व मोठ्या कुशलतेनें विस्तीर्ण असा आकाशमंडप उभारला १.६२,५; ६.३०,३; ८.७८,५; १०.१११,५ ताडून पहा.

(२) इन्द्र विश्वाची जागा आंखून सृष्टिक्रम चालू करतो ह्या विधानाला खालील ऋचा पोषक आहेत. २.१२,२ मध्यें वर्णन आहे कीं, "ज्यानें डळमळणाऱ्या पृथ्वीला स्थिर केली, ज्यानें झोकांड्या खात असणाऱ्या पर्वतांनां स्थिर केलें, ज्यानें वायूला मर्यादा घालून दिली व स्वर्गाला धीर दिला तोच इन्द्र." २.१३,१० मध्यें इन्द्रानें सहा दिशांची जागा ठरविली असें वर्णन आहे; ८.१५,२ मध्यें इन्द्रानें आपल्या शक्तीनें दोन्ही लोक, पर्वत, क्षेत्रें व पाणी स्थिर केलें असें वर्णन आहे. १०.८९,४ मध्यें 'एखादा ज्याप्रमाणें कण्याला दोन चाकें बसवितो त्याप्रमाणें या वीरानें स्वर्ग व पृथ्वी बसविली' असें वर्णन आहे. त्याच सूक्तांतील पहिली ऋचा त्याचप्रमाणें १.६२,७;१२१,२; २.१५,२; १७,५; ३.३०,९; ५.२९,४; ६.१७,७; ८.१४,९ ताडून पहा. ह्या बाबतींत वाल० ३,४ मधील उतारा विशेष महत्त्वाचा आहे, त्यांत म्हटलें आहे—"ढगांनां जिंकल्यानंतर त्यानें शुष्णाचा पराभव केला, नंतर आकाश उलगडून चांगलें स्थिर केलें, त्यानंतर मनुष्य जन्मास आला."

ज्या जगाची रचना इन्द्रानें आपल्या पराक्रमानें स्थिर-स्थावर केली त्या जगाची उत्पत्तीहि इन्द्रानेंच केली.

जगदुत्पादनकर्ता इन्द्रच होता. १०.५४,३ मध्यें ज्या अर्थी तूं आपल्यापासूनच आपल्या आईबापांनां (म्हणजे द्यावापृथिवीला) उत्पन्न केलेंस असें वर्णन आहे. ८.३६,४ मध्यें इन्द्राला "जनिता दिवो जनिता पृथिव्याः" म्हणजे स्वर्ग व पृथिवी यांचा उत्पादनकर्ता असें म्हटलें आहे.

(१) त्याचप्रमाणें सूर्यादिकांशीं इन्द्राचा संबंध जोडलेला आहे. काळोखांतून सूर्याला इन्द्र मुक्त करतो व त्याच्या गतीचें नियंत्रण करतो, शेवटीं सूर्याचा उत्पादनकर्ताहि इन्द्रच होता असें म्हटलें आहे.

(२) सूर्याप्रमाणें इतर तेजोगोलांच्या गतीचेंहि इन्द्रच नियंत्रण करतो, याला आधार ३.३०,१२;४.१६,४ आहे. त्या ऋचेंत वर्णन असें आहेः—'सूर्याच्या मुक्ततेनंतर इन्द्रानें मनुष्यांनां प्रकाशाचा सार्वत्रिक लाभ करून दिला.' ३.३०,१३ मध्यें इन्द्रानें उषेचाहि लाभ करून दिला असें वर्णन आहे. ६.३०,२ व ३.३०,१२ मध्येंहि असेंच वर्णन आहे. ३.३०,१२ मध्यें सूर्याच्या गतीचें इन्द्रानें नियंत्रण केलें असा उल्लेख आहे. ५.३१,११ मध्यें रात्रीं सूर्याचा रथ माघारी गेला होता तो इन्द्रानें पुन्हां परत आणला असा उल्लेख आहे. १.१०२,२ मध्यें 'चंद्र, सूर्य जे आपापल्या मार्गानें जातात ते इन्द्रामुळें' असा उल्लेख आहे. १०.१३८,६ मध्यें चंद्राचा मार्ग इन्द्र आंखून देतो असें वर्णन आहे. १.१२१,१३; ४.२८,२; ६.७२,२; १०.१७१,४ ताडून पहा.

पेदुकथेचा संबंधहि कदाचित् ह्याच ठिकाणीं येत असावा. अश्विनांजवळून पेदूला (एका राजाचें नांव) एक पांढरा घोडा मिळाला. 'हा घोडा इन्द्रानें अश्विनी देवांनां दिला होता' 'इन्द्रेण युवाभ्यां दत्तं' असें वर्णन आहे. हे इन्द्रा, तूं यजमानाला अन्न, द्रव्य देतोस तसेंच व्रीह्यादि धान्य देतोस. तूं सर्व जगाचा एकटाच (अद्वितीय) स्वामी आहेस. हे इन्द्रा, तूं प्रफुल्लित औषधी धारण करितोस. तसेंच तूं सूर्याच्या दीप्ति व मोठमोठाले प्राणी उत्पन्न करतोस. तूं सर्वांचा ईश्वर आहेस" असें १.११८ मध्यें वर्णन आहे. हा पेदु म्हणजेच सूर्य होय हें जर खरें असेल तर सूर्याचा मार्ग इन्द्रानें आंखून दिला हें उघड आहे.

(३) इन्द्रानें सूर्य, ग्रह व शुक्र उत्पन्न केला ह्या कल्पनेला खालील आधार आढळतात. ८.१२,३० मध्यें इन्द्रानें विस्तीर्ण अशा आकाशामध्यें सूर्य ठेवला 'सूर्यं धारितवानसि' असें म्हटलें आहे. ८७,२ मध्यें 'त्वं सूर्यं तेजोभिरदीपयः' असें आहे. २.१२,७ मध्यें इन्द्रानें सूर्य व उषा उत्पन्न केली

असें वर्णन आहे. ३.३१,१६; ३२,८; ६.१७,५; ३०,५; ३९.३,४ ताइून पहा.

इन्द्र हा वनस्पतींचाहि उत्पादनकर्ता आहे असें म्हटलें आहे व तेंहि ओघानेंच येतें, कारण सर्व वनस्पतींची वाढ पाणी व प्रकाश ह्यांवरच अवलंबून असल्यामुळें पाणी व प्रकाश देणारा इन्द्र पर्यायानें वनस्पतींचा उत्पादक ठरतो. २.१३,६ मध्यें इन्द्रानें सोमवल्ली उत्पन्न केली असें म्हटलें आहे. ७ व्या ऋचेंतहि अशाच तऱ्हेचा उल्लेख आहे. ३.३४,१० मध्यें इन्द्रानें (आयुष्य) वनस्पति दिली असें वर्णन आहे. १०.१३८,२ 'हे इन्द्रा, तूं पृथ्वीवर जलवृष्टि केलीस, पर्वतांचा भेद केलास व आंत लपवून ठेविलेल्या गाईंना मुक्त केलेंस' इत्यादि वर्णन आहे.

ह्याशिवाय वेदांत असे अनेक दाखले आढळतात कीं, त्यावरून जगदुत्पादनकर्ता इन्द्र ठरतो.

एखाद्या देवतेबद्दल याच्यापेक्षां उच्च दर्जाच्या कल्पना सांपडणें कठीण आहे व ह्या अतिशयोक्तीमुळेंच इन्द्र हा वेदकालीन देवांमध्यें श्रेष्ठतम देव ठरला.

**इन्द्राचें दयालुत्व व स्वतःच्या भक्तांशीं असलेला संबंध.**—इन्द्राच्या कार्यक्षेत्रांसंबंधी वर विचार आलेला असल्यामुळें त्याच्या भक्तांनीं निरनिराळे वर मागण्याकरतां केलेल्या प्रार्थनांचा निराळा उल्लेख करण्याचें कारण नाहीं. पाऊस, प्रकाश व खशत्रूंपासून संरक्षण याकरतां मुख्यतः इन्द्राची प्रार्थना करण्यांत येते. यावरून पुढें इन्द्र हा धनधान्यसमृद्धि देणाराहि देव आहे ही कल्पना रूढ झाली.

वेदकालीन धन म्हणजे गुरें होत. हीं गुरें व परकीयांशीं झगडण्यासाठीं वरींचशीं मुलें त्या काळचे लोक देवापाशीं मागत असत व हीं मुलें मागण्याच्या अगोदर ह्या समजुतींस पोषक अशा खालील ऋचा आहेत. ४.३२,१७ मध्यें 'आम्हांला हजार घोडे व हजार डोण्या सोम मिळावा म्हणून आम्ही इन्द्राची प्रार्थना करतों' असें म्हटलें आहे. १९ व्या ऋचेंत म्हटलें आहे—"हे वृत्रसूदना, आम्हाला दहा हण्डे मोहोरा मिळाल्या, तूं मोठा कृपाळु दाता आहेस (वहुप्रदः असि)". २० व्या ऋचेंतहि पुष्कळ धन देण्याबद्दल इन्द्राची प्रार्थना केलेली आहे; त्याचप्रमाणें २१ व्या ऋचेंतहि आहे.

'पुत्रपौत्रांचा लाभ होण्याकरितां आपल्याला इन्द्राची प्रार्थना केली पाहिजे' असें ६.१८,६ मध्यें म्हटलें आहे. १३ व्या ऋचेंत इन्द्र आपल्या भक्तांसाठीं रहाण्यास घरें व वसाहती तयार करून देतो असें वर्णन आहे.

वेदकालांत गुरांची किंमत केवढी मोठी होती याची कल्पना करतां येणार नाहीं. ज्या दुधावर कुटुंबच्या कुटुंब रहात असे त्या दुधाचा पुरवठा गाई करीत असत. त्याचप्रमाणें यज्ञयागादिकांत अवश्य असणारें घृत व लोणी हे पदार्थहि गाईपासूनच मिळतात. त्याप्रमाणें देवघेवीच्या व्यवहारांत गुरांचा उपयोग करीत असत. अमुक एका वस्तूची किंमत १०० अथवा १००० गाई असें वारंवार म्हटलेलें आढळतें. ४.२४,१० मध्यें एक ऋत्विज आपल्या जवळ असलेली इन्द्राची मूर्ति १० गाईंला विकण्यास काढतो असें वर्णन आहे. १.३३,१ मध्यें 'गुरें मिळावींत हीच आमची एक इच्छा आहे तेवढी तो महापराक्रमी पुरुष पुरविणार नाहीं काय?' असें म्हटलें आहे. ह्यामुळें ज्या वेळीं इन्द्रानें गाईच्या ठिकाणीं दूध उत्पन्न केलें त्या वेळीं त्यानें सर्वांत मोठी देणगी दिली असें तत्कालीन कवी समजूं लागले. त्याचप्रमाणें दुधाला त्यांनीं आपल्या कल्पनेप्रमाणें शिजविलेल्या अन्नाची उपमा दिली, कारण दूध काढल्याबरोबर उपयोगांत आणतां येत असे. १.६२,९ मध्यें अशा आशयाचें वर्णन आहे. त्याचप्रमाणें ३.३०,१४;३९,६; ८.७८,७ पहा. त्वष्ट्यालाहि ही गोष्ट करतां आली नाहीं. ती इन्द्रानें केल्यामुळें इन्द्राला केवढें महत्व प्राप्त झालें असेल त्याची कल्पना करावी. स्वतः इन्द्रच १०.४९,१० मध्यें ह्याबद्दल आत्मप्रौढी गात आहे असें वर्णन आहे. त्याचप्रमाणें वांझ गाईपासून इन्द्रच दूध काढूं शकतो असें ४.१९,७ मध्यें वर्णन आहे.

एखाद्या मनुष्याशीं बोलल्याप्रमाणें कवि इन्द्राशीं संभाषण करतो. एखादा गरीब माणूस ज्याप्रमाणें श्रीमंत मनुष्याबरोबर बोलेल तसा कवि इन्द्राबरोबर बोलतो. ह्या प्रार्थनांचें रूपांतर पुष्कळवेळां अत्यंत काकुळतीस येऊन केलेल्या विनवण्यांतहि होतें. कांहीं कांहीं कवि तर एखाद्या बरोबरीच्या मित्राच्या पाठीवर थाप मारून स्वागत करावें त्याप्रमाणें इन्द्राचें स्वागत करतात. पुष्कळवेळां ते इन्द्राशीं संभाषण करतांना ग्राम्य कोट्याहि करतात. (वर दिलेली १०.३८,५ ताइून पहा). परंतु बहुतेक ऋचांमधून इन्द्राबद्दल रूढ असलेली राष्ट्रीयदेव ही कल्पना व भक्ति दिसून येते. या बाबतींत मूरनें आपल्या संस्कृत ग्रंथांत (पु. ५ पृ. १०३) ऋचा ग्रथित केलेल्या आहेत.

माणसें इन्द्राच्या अस्तित्वाबद्दल शंका काढतात (२.१२,५; ६.१८,३; ८.८९,३,४). परंतु त्याच्यावर पूर्ण भरंवसा टाकावा (१.१०२,२; १०८,६; ६.२८,५; ९.११३,२). कारण तोच संकटकालीं मदत करणारा आहे (८.६९,७). इन्द्राच्या मित्रांनां संकटाची केव्हांहि भीति नसते (१०.१५२,१). कारण साधु पुरुषाचा तो मोठा साहाय्यकर्ता आहे (८.६९,३). कवींचा तो फार जुना मित्र आहे (६.१८,५; २१,५ व ८). एवढेंच नव्हे, तर भावासारखा आहे (३.५३,५). अगर प्रेमळांतला प्रेमळ बापासारखा आहे (४.१७,१७). कवि आपल्या बापाला ज्याप्रमाणें मिठी मारील त्याप्रमाणें इन्द्राला मिठी मारतो (३.५३,२) अथवा ज्याप्रमाणें बायका आपल्या नवऱ्याला मिठ्या मारतात त्याप्रमाणें कवी इन्द्राला मिठ्या मारतात (१.६२,११

१८६,७; १०.४३,१ ). परंतु कांहीं कांहीं वेळीं कवि फार उतावीळ होऊन इन्द्राबद्दल अपमानकारक शब्द उच्चारतो. ४.३२; ४.२१,९; ७.३२; ८.८१,३०; ३.१८,२; ३.२५,५; १०.३८,५; ३.४५,१ ).

ह्या उताऱ्यांवरून इंद्राचा आपल्या भक्तमंडळीशीं कशा तऱ्हेचा संबंध होता हें दिसून येईल. भक्तमंडळीच्या पुढाऱ्यावर इन्द्राची कशा तऱ्हेची कृपादृष्टि होती हें पाहूं.

कुत्सावर इन्द्राची सर्वांत जास्त मेहेरबानी होती. कुत्साकरतां इन्द्र सूर्याच्या गतीलाहि प्रतिरोध करतो व ज्या लढाईत कुत्स लढत होता त्या लढाईत कुत्साला जय मिळेतोंपर्यंत रात्र पडूं देत नाहीं. ( ५.२९,१० ). ४.३०,४ ताडून पहा.

'हे अश्विनौ, तुम्ही पूर्व किंवा पश्चिमेच्या जवळ असतां अथवा द्रुह्यू, अनू, तुर्वश व यदु यांच्या जवळ असतां तद्वत् मी बोलाविलें असतां मजजवळ प्राप्त व्हा' ८.१०,५. ( २.१५,५; ४.३०,१७ ) 'शत्रूंनीं फेंकून दिलेल्या तुर्वश व यदु यांना इन्द्रानें चांगल्या ठिकाणीं आणलें' असें वर्णन आढळतें. ( ६.४,५;५.३१,८ ) 'हे इन्द्रा, तूं तुर्वश व यदु ह्या राजांच्या करितां ओषधी व वनस्पतींची करमणूक केलीस असें वर्णन आहे.

तुर्वीति व वय्य ह्यांचीं हीं नांवें ह्या बाबतींत आढळतात. त्यांच्यावरहि इन्द्रानें उपकार केल्याचें वर्णन आहे. ह्यांच्यासाठीं इन्द्रानें एक जलौघ थोडावेळ थांबवून धरला होता. १.५४,६.

सुदास राजाहि इन्द्राचा मोठा भक्त होता. ह्या सुदास राजाचें इन्द्रानें परचक्रापासून रक्षण केल्याचें वर्णन आहे (७.१९,३; २०,२; ३२,१०,११; ७.८३ ). वसिष्ठाच्या कुळाला सुदासराजाच्या दरबारीं मोठी मान्यता होती व त्यांच्याच प्रार्थनामुळें सुदास राजाला जय मिळाला अशी समजूत होती. ( ७.३३,२.३ पहा ) सुदासाच्या कथेला कांहीं तरी ऐतिहासिक आधार दिसतो, कारण सुदासाच्या लढायांचें वर्णन बरेंच विस्तृत आढळतें. याविषयीं विशेष विवेचन दाशराज्ञयुद्धप्रसंगीं येईल.

मुद्गल व मुद्गलानी या दोघांनांहि इन्द्राचें साहाय्य असल्याबद्दलचें वर्णन आहे. मुद्गलाच्या रथाच्या बैलाला इन्द्रानें प्रेरणा केली ( चोदयन् शत्रुषु प्रेरयन् ) व मुद्गलानें लढाई जिंकली ( १०.१०२ ).

लढाईच्या प्रसंगींच नव्हे तर शांततेच्या काळांत सुद्धा इन्द्र मनुष्यांचा साहाय्यकर्ता आहे. वृद्ध कक्षीवन्ताला त्यानें तरुण वायको मिळवून दिली ( १.५१,१३ ). "जख्खड झालेल्या कक्षीवन्तानें सोमरस तयार केल्यामुळें इन्द्रानें त्याला वायको दिली." त्याचप्रमाणें इन्द्र म्हाताऱ्या झालेल्या वायकांत तारुण्य उत्पन्न करतो. आंधळ्यांनां व लंगड्यांनां तो मदत करतो ( ४.३०,१९; २.१३,१२,१५,७; ४.१९,९ ). पापपंकांत पडलेल्या आईनें उकिरड्यावर टाकलेल्या मुलाचा तो जीव वांचवितो ( २.१५,७ ) ( १३,१२; ४.३०,१६ ताडून पहा ) ह्या कथेवरून इन्द्राच्या बाळपणाच्या कथेची आठवण होते. ती कथा ४ मण्डलांतील १८ व्या सूक्तांत आहे. ह्या कथेमुळेंच इन्द्र हा टाकलेल्या मुलाचा पालनकर्ता होता अशी समजूत रूढ झाली असल्यास नकळे.



**इन्द्र आणि पूषन्.**—इन्द्रासारख्या अतिबलाढ्य देवतेबरोबर पूषन्सारख्या निरुपद्रवी व शांतताप्रिय देवतेचें साहचर्य प्रथमदर्शनीं चमत्कारिक दिसतें. वेदकालीन कवींनांहि हें साहचार्य चमत्कृतिजनक वाटलें होतें असें त्यांच्या पूषन्च्या हंसूं येण्यासारख्या वर्णनावरून वाटतें. ६.५७,२ मध्यें असें वर्णन आहे कीं, एक सोमरस मागतो तर दुसरा करंभ* मागतो, त्याचप्रमाणें ३ ऱ्या ऋचेंत एकाच्या रथाला दोन बोकड जोडलेले आहेत तर दुसऱ्याच्या रथाला सशक्त असे पाणीदार घोडे जोडलेले आहेत. असें वर्णन आहे.

तरी या दोन देवतांच्या स्वभावांमध्यें कांहींतरी साम्य असावें, कारण वेदांत ज्या दोन देवतांचें साहचर्य दाखविलेलें असतें तें कांहींतरी अथवा उगीच नसतें. सूर्याचाच पूषन् हा एक अवतार असून त्याला आघृणि असेंहि दुसरें नांव आहे ( ३.६२,७ ). त्याच्या बहिणीचें नांव सूर्या होतें ( ६.५५,४,५; ५८,४ ). त्याला करंभ आवडत असे व त्यापासूनच त्याचे दांत किडके होते असें ( ४.३०,४ ) मध्यें वर्णन आहे. त्याच्या रथाला दोन बोकड जोडलेले असून त्याच्या हातीं ते बोकड हांकण्यासाठीं 'पराणी' ( अष्ट्रा ) धारण करतो असें ( ६.५८,२ ) मध्यें वर्णन आहे. इत्यादि उताऱ्यांवरून पूषन् हा धनगरांचा देव असावा असा तर्क करतां येईल. पूषन् हा धनधान्यसमृद्धि देणारा देव आहे त्याबद्दल ग्रासमन म्हणतो–"पूषन् ज्या तऱ्हेची समृद्धि देतो ती समृद्धि इन्द्र, पर्जन्य अथवा मरुतांप्रमाणें पावसावर अवलंबून नाहीं, परंतु प्रकाशावर आहे व तो प्रकाशहि सूर्याचा आहे." पूषन् हा जनावरांचा व मनुष्यांचा रक्षणकर्ता आहे. १०.१७,३ मध्यें त्याला अनष्टपशुर्भुवनस्य गोपा ! असें म्हटलें आहे.

पूषन्चें इन्द्राबरोबरील साहचर्य दोन आधारांवर उभारलेलें दिसतें. दोघेहि समृद्धि देणारे देव असून त्यांची जोडीनें केलेली प्रार्थना खालील ऋचांत आढळून येते. 'इन्द्रानें सोम व पूषन् यांच्या मदतीनें गाईच्या ठायीं दूध उत्पन्न केलें' असें २.४०,२ मध्यें म्हटलें आहे. ३.५७,२ मध्यें इन्द्र व

---

* अन्यः करंभ इच्छति ( करंभो दधिसक्तवः ) करंभ=दह्यांत कालवलेलें सातूचें पीठ.

पूषन् ह्यांनीं वारिधारांनां पृथ्वीवर येण्यास मार्ग मुक्त केला असें वर्णन आहे. ४.५७,७ मध्यें पुष्कळ देवतांची प्रार्थना केलेली आढळते, त्यांत म्हटलेलें आहे–'इन्द्र नांगरो व पूषन् त्याला मार्ग दाखवो. दरवर्षीं आम्हाला धनधान्य मिळो.'

पूषन् हा सर्वांचा रक्षणकर्ता आहे ह्या समजुतीमुळें त्याचा इन्द्राशीं संबंध येतो. इन्द्र पूषन्च्या साहाय्यानें शत्रूंचा निःपात करतो असें ६.५६,२ मध्यें वर्णन आहे. त्याचप्रमाणें सर्वांचा रक्षणकर्ता पूषन् असल्यामुळें त्याचा संबंध दानवांचा पराभव करणाऱ्या इन्द्राबरोबर येतो. "इन्द्रानें ज्या वेळीं वारिधारांनां मुक्त केलें त्या वेळीं पूषन् त्याच्या मदतीला होता." असें ६.५७,४ मध्यें वर्णन आहे.

वृत्रहननाचे वेळीं पूषन् व विष्णु इन्द्राला उत्तेजन देतात. "ज्या इन्द्राला मरुतांनीं उत्तेजन दिलें, ज्या इन्द्रासाठीं अग्नीनें शंभर बैल भाजले, त्या इन्द्रासाठीं पूषन् व विष्णु यांनीं तीन तळीं सोम तयार केला" असें ६.१७,११ मध्यें वर्णन आहे.

**इन्द्र आणि अश्विनी.**—ज्या ऋचांत इन्द्र व अश्विनी यांचें साहचर्य वर्णिलें आहे अशा ऋचांची संख्या वेदांत फारच कमी आहे.

१.११६,२० मध्यें अश्विनींनीं इन्द्राला साहाय्य केल्याचें वर्णन आहे. १.१८२,२ मध्यें अश्विनींनां इन्द्रतमा म्हटलें आहे. ८.९,१२ व ३५,१ मध्यें इन्द्राबरोबर इतर देवांनां व व अश्विनींनां यज्ञासाठीं आमंत्रण केलेलें आहे ' इन्द्रनासत्या ' हा समास ८.२६,८ मध्यें आढळतो. १०.७३,४ मध्येंहि असाच अश्विनी व इन्द्र यांचा संबंध वर्णिलेला आहे. १३१,४ मध्यें अश्विनी इन्द्राला नमुचिदैत्याशीं लढण्यास मदत करतात असें वर्णन आहे. ५ व्या ऋचेंत म्हटलें आहे, ज्याप्रमाणें बाप मुलाला मदत करतो त्याप्रमाणें अश्विनी इन्द्राला दूरदर्शीपणानें व मोठ्या कौशल्यानें मदत करतात.

पेद्च्या घोड्यांच्या उत्पत्तीचे वेळीं इन्द्राबरोबर अश्विनी असतात.

ह्यावरून असें दिसून येईल कीं, इन्द्र व अश्विनी यांचें साहचर्य तितकेंसें निकट नाहीं. व म्हणून तें साहचर्य अश्विनींबद्दलच्या अर्वाचीन कल्पनांवरून बनलेलें असावें असें पेरीचें मत आहे. इन्द्र हा वादळाचा देव आहे हें वर आलेंच आहे. ह्या इन्द्रानें वारिधारा अडवून धरणाऱ्या दैत्यांचा मोड केला. अश्विनींनीं प्रकाशाचा लाभ करून दिला ह्याच कल्पनेमुळें त्यांचें सख्य जडलें असावें. दैत्यांचा निःपात करण्यासाठीं ज्याप्रमाणें इन्द्राची प्रार्थना करण्यांत येते त्याप्रमाणें अश्विनींचीहि करण्यांत येते. इन्द्राप्रमाणें अश्विनींचीहि मदत मागण्यांत येते. इन्द्रानें ज्याप्रमाणें सृष्टिक्रमाचें नियंत्रण केलें त्याप्रमाणें अश्विनीहि करतात; यामुळें परस्परांच्या पराक्रमांची अदलाबदल होते. अश्विनी पाणी देतात, इन्द्र प्रकाश देतो वगैरे. नंतर इन्द्र व अश्विनी हे समृद्धि देणारे देव आहेत अशी समजूत रूढ झाली. पुढें त्यांमध्यें जास्तच निकट परिचय झाला व हे देव दयाळु व व्याधिनिवारक ठरले. व्याधिनिवारणाचा स्वभाव विशेष अश्विनींचा आहे.

अश्विनींबद्दलच्या कल्पना व इन्द्राबद्दलच्या कल्पना यांत इतकें साम्य असतांना त्यांच्याबद्दल उतारे इतके थोडे सांपडावेत हें आश्चर्य आहे. त्याचप्रमाणें त्यांच्यांत चुरसहि फारशी दिसून येत नाहीं.

**इन्द्राचें स्वरूपवर्णन.**—इन्द्राचें स्वरूप कशा तऱ्हेचें होतें तें पाहूं.

इन्द्राला ज्याप्रमाणें मानवी आकार दिलेला आहे त्याप्रमाणें इतर कोणत्याहि देवाला दिलेला आढळत नाहीं; ह्याचें कारण असें दिसतें कीं, इन्द्र हा सर्वांत मोठा राष्ट्रीय देव मानलेला होता. इन्द्राचा अतुल पराक्रम, त्याचें अवाढव्य शरीर, विलक्षण धडाडी, त्याची दूरदृष्टि व धूर्तता त्याची अगणित संपत्ति व विलक्षण औदार्य इत्यादींचीं वर्णनें प्रत्येक कवि मुक्तकंठानें करीत असलेला आढळतो त्याचप्रमाणें त्याचा रथ घोडे व शस्त्रास्त्रें यांचींहि वर्णनें आढळतात. इन्द्रासंबंधींच्या ऋचांतून त्या देवतेचें जें वर्णन आढळतें त्या वर्णनावरून तत्कालीन योद्धा कशा तऱ्हेचा होता हेंहि पर्यायानें कळून येतें. कारण तत्कालीन स्वभावविशेषाचें प्रतिबिंब इन्द्राच्या स्वरूपवर्णनांत पडावें हें साहजिकच आहे.

इन्द्र हा वत्सागर आहे ( १.११,२ ). श्रेष्ठांतील श्रेष्ठ आहे ( ८.५०,२ ). सर्व देवांमध्यें अतिबलाढ्य देव आहे, त्याच्यामध्यें सर्व देवांचें पौरुषेय, बल व शहाणपण एकवटलें आहे ( १.८०,१५ ). त्याच्या तुलनेला कोणताहि देव पुरत नाहीं. ( ६.२१,१०; ७.२१,७ ). कोणीहि तरुण अथवा वृद्ध त्याच्या पासंगाला पुरत नाहीं, कारण त्याचें शरीर सर्व जग व्यापून उरतें व त्यामुळें आकाशांत प्रकाशाला रहाण्यास जागा मिळत नाहीं ( १.८१,५ ). देव, मानव, उदकें ह्यांपैकीं कोणासहि त्याच्याइतकें सामर्थ्यवान् होतां येणार नाहीं ( १.१००,१५; ५४,१; २.१६,३; ६.२९,५ ). कारण तो अमर्याद आहे ( १.१०२,७; ४.१६,५ ). आकाशाला तो आपल्या डोक्यानें आधार देतो ( २.१७,२ ). अंतरिक्षांतील अति दूरचा प्रदेशहि त्याला जवळ वाटतो ( ३.३०,२ ). पृथ्वीला त्याला व्यापतां येणार नाहीं ( १.५५,१; ३.३६,४ ). स्वर्ग आणि पृथ्वी दोन्ही मिळून त्याच्या कंबरपट्ट्यालाहि पुरत नाहींत ( १.७३,६ ). तो सोम पिऊन उन्मत्त झाला म्हणजे स्वर्ग व पृथ्वी यांच्याहि कक्षेबाहेर जातो. ( १.१००,१४; ३.३६,६; ६.२१,२; ८.६,१५; १२,२४; ७७,५; ८७,५; ८९,४ ). एवढेंच नव्हे तर पृथ्वी, अंतरिक्ष व आकाश या

तिघांनां एकत्र केलें तरी तो यांच्यापेक्षां मोठा आहे (१.१०,८; ३.४६,३). इन्द्राचा अर्धा भागच दोन्ही लोकांपेक्षां मोठा आहे (६.३०,१). त्याची एक कूस पृथ्वी झांकण्यास पुरेशी होते (३.३२,११). त्याच्या बलापैकीं कांहीं भाग पृथ्वीवर आहे, कांहीं आकाशांत आहे. प्रकाशाचा मध्यबिंदु ज्याप्रमाणें अत्यंत तेजोमय असतो त्याप्रमाणें इन्द्राचा पराक्रम आहे. "पृथ्वी जरी दसपट मोठी असती व सर्व लोक अमर असते, तरी तुझी महती प्रतिदिनीं लोकांनीं गाइली असती" (१.५२,११). दोन्ही लोक व पर्वत त्याच्या नुस्त्या श्वासोच्छ्वासानें चळचळां कांपतात, (२.१२,१–तो स्वतःच वादळ आहे !) वृक्ष सुद्धां त्याच्यापुढें माना वांकवितात, पृथ्वीवरील प्रत्येक वस्तु थरथरते व आज्ञाधारक स्त्रीप्रमाणें दोन्ही लोक त्याच्यापुढें नम्र होतात. तो स्वर्गांतील देवांचा राजा व पृथ्वीवरील सर्व राष्ट्रांचा अधिपति आहे. (१.१००,१; ३.३१,८; ४६,२; ६.२२,९; ३६,४; ७.२७,३; ८.३७,३; ८४,३). वाहणाऱ्या व एकेजागीं स्थित असणाऱ्या पाण्याचा, त्याचप्रमाणें सोमरसाचा तो अधिपति आहे (६.४४,२१; ८.५३,३), आणि त्याला तीं सर्व पूर्णपणें अवगत आहेत (८.४६,१२). क्रूर लांडगा देखील त्याच्या आज्ञेप्रमाणें वागतो (८.५५,८). कारण सर्व वस्तूंवर त्याची अनियंत्रित सत्ता आहे (५०,४). मानवांचीं सर्व कुलें त्याच्या स्वाधीन आहेत (६.३१,१). दोन्ही विशाळ लोक त्याच्या मुठींत राहतात (३.३०,५). ह्या देवानें केलेली यत्किंचित् अथवा क्षुल्लक गोष्ट दाहीदिशा पुकारली जाते (८.४५,३२). मोठमोठे पर्वत त्याच्यापुढें तिळाएवढे असून अत्यंत खोल पाणी सुद्धां तो सहज तरून जातो (६.२४,८). तो आपल्या दौऱ्यावर निघाला म्हणजे सिंहनाद करतो (२.२०,३ त्याचप्रमाणें पुरूवस् हें १०.९५,७ मधील विशेषण ताडून पहा). तो चालला असतांना अंतराळीं धुळीचे ढग उठतात (३.५१,२; ४.१६,५: ५.३४,५; ६.१८,२). त्याच्या मार्गांत कांहींहि आडवें आलें तरी त्याचे शतशः तुकडे होतात (२.२१,२). तो सर्वगामी असून त्याची गति अप्रतिहत आहे (१.८४,२;७). भोजनसमारंभानंतर तो इकडेतिकडे फिरतो त्यावेळीं तो एखाद्या गाईप्रमाणें अथवा एखाद्या मत्त बैलाप्रमाणें अथवा सोसाट्याच्या वाऱ्याप्रमाणें भासतो (४.३२,२; ७.१९,१; ८.३३,८). सूर्याच्या मार्गाप्रमाणेंच त्याचा मार्ग दुष्प्राप्य आहे (१.१००,२). दोन्ही लोकांत त्याचा महिमा मावत नाहीं (१.१०,८). त्याच्या तोडीचा असा एकहि प्रतिपक्षीय नाहीं. कोणालाहि त्याला चीत करतां येत नाहीं. सर्वांनां तो वांकवितो (१.३३,२; १.२९,४). कारण तो सर्वांचा जेता आहे (५.३४,६;३५,४६.१७,४;१, ८.१,२; २०,३; २५,५; ४४,४; ७.२०,३). आणि ज्यांनीं त्याला एकदां चिथविलें त्यांची त्याच्या रागापासून सुटका केव्हांहि होणें नाहीं (५.३४,७; ७.३१,१२). त्याचा पराजय कोणालाहि करतां यावयाचा नाहीं. तो सर्वदृक् व सर्वश्रवा आहे (८.६७,५). त्याचा सिंहनाद बहिऱ्यांनांहि ऐकूं येतो व ते भीतीनें थरथर कांपूं लागतात (१०.२७,५). खुद्द देवांनांहि इन्द्राला बंदिवान करतां येत नाहीं (४.१७,१९; ३०.३,५), आणि ज्या ज्या वेळीं त्याच्या हातून मनुष्यवध होतो त्या त्या वेळीं तो मानवी सूडाची यत्किंतहि पर्वा बाळगीत नाहीं (५.३४,४). ह्याप्रमाणें तो अजिंक्य होता व सर्व काल राहील, कोणालाहि त्याला अडवितां येणार नाहीं. त्यानें कांहींहि हातीं घेतलें तरी त्यांत त्याला यश मिळतें (४.३०,२३).

जगांतील सर्वसंपत्तीचा इन्द्र मालक आहे (१.३०,१०६; १७४,१; ६.४५,८), सर्व संपत्ति त्याच्या कोशांत आहे (८.१,२२), मनुष्यांच्या वसतिस्थानाचा व गुरांच्या गोठ्यांचा तो मालक आहे (४.२०,८), ज्याप्रमाणें सर्व नद्या समुद्राला मिळतात त्याप्रमाणें संपत्ति मिळविण्याचे सर्व मार्ग त्याच्या ठिकाणीं एकत्रित होतात (६.१९,५). गुरांचे सर्व कळप त्याचे असून तो आपल्या सूर्यरूपी डोळ्यानें त्यांच्यावर नजर ठेवतो (७.९८,६). तो एक संपत्तीची वाहती गंगाच आहे (८.३२,१३). सोन्याचा झरा आहे (५०,६). चार सागरांप्रमाणें तो संपत्तीचा आगर आहे (१०.४७,२). मनुष्यांनां तो आपल्या कोशांतून मोठ्या उदारपणानें बक्षिसें देतो. त्याच्याइतका उदारपणा कोणाच्याहि अंगीं नाहीं (८.१४,४; ७०,३; ७७,३). सर्व दात्यांमध्यें तो अतिशय उदार असल्यामुळें तो मोठ्या मनानें व अत्यंत सढळ हातानें देणग्या देतो (१.३०,१; ४.३१,७) त्याचें साहाय्य अविनाशी असतें. त्याची प्रार्थना केल्याबरोबर तो भक्ताला गुरें देतो (६.२४,१; ४५,२३;२६). तो कधींहि कोणाला विन्मुख जाऊं देत नाहीं (७.२७,४). येवढेंच नव्हे, तर जास्त संपत्ति मिळवून देण्यास तो जास्त मदत करतो (८.१६,१०). शंभर मत्सरी लोकांनांहि त्याच्या देणग्यांत ढवळाढवळ करतां येत नाहीं (४.३१,९). ४.२७ मध्यें हे इन्द्रा, तुझ्या मदतीचें आमच्याच्यानें आकलन होत नाहीं असें म्हटलें आहे. "त्याचप्रमाणें तुझी उदारता व शक्ति या आमच्या कल्पनेबाहेरच्या म्हणजे आम्हाला अगम्य अशा आहेत". तो किती उदार आहे हें सांगतां येणें कठीण आहे; कारण त्याची दानशूरता प्रकाशाप्रमाणें पृथ्वीवर सगळीकडे आहे (८.२४;२१). असें कोणालाहि म्हणतां यायचें नाहीं कीं, आम्हाला इन्द्रापासून कसलाहि लाभ झाला नाहीं, उलट असेंच म्हणतात कीं, इन्द्रासारखा दाता कोणी नाहीं. दयाळुत्वाचीं त्याचीं कृत्यें एकामागून एक अप्रतिहत अशीं घडून येतात (७.२६,४). इन्द्राचीं हीं दयाळुपणाचीं कृत्यें झाडांच्या अंकुरांप्रमाणें एकाशेजारीं एक अशीं वाढतात (६.२४,३).

इन्द्राचें तारुण्य व बल तितकेंच अविनाशी आहे. तो कधींहि म्हातारा होत नाहीं, त्याचप्रमाणें त्याला मृत्यूहि नाहीं

( ३.३२,७; ६.१९,२ ). तो दुसऱ्यांला म्हातारे करतो, परंतु स्वतः नेहमीं तरुण असतो ( २.१६,१ ). महिने, वर्षे दिवस सुद्धां त्याला वृद्ध करीत नाहींत ( ३.४६,१; ६.२४, ७; १०.४८,५ ). ज्या वेळीं तो स्वतःशींच म्हणतो, मी अमर आहें त्या वेळीं त्याची नुस्ती इच्छाहि सफल होते (८.८२,५). १०.८६,११ मध्यें म्हटलें आहे कीं, "सर्व स्त्रियांत इंद्राणी जास्त सुखी, कारण तिचा नवरा वृद्ध होऊन कधींहि मरणार नाहीं."

त्याचप्रमाणें इन्द्र सर्वांत शहाणा व दूरदर्शी आहे ( १.६१, १४; ६२,१२ ). त्याच्या पोटांत सोम आहे, त्याच्या प्रत्येक अवयवांत अतुल शक्ति भरलेली आहे, त्याच्या हातांत वज्र आहे आणि त्याच्या डोक्यांत शहाणपण आहे ( २.१६,२; ८.८५,३ ). सर्व शहाण्यांतील तो अतिशय शहाणा आहे ( १०.११२,९ ). त्याचा शहाणपणा अगम्य आहे ( २.२१, ४ ). तो मोठा मांत्रिक असून त्याला सर्व मंत्रतंत्र अवगत आहेत ( ६.२२,१; ४४,१४ ). तरी तो विश्वासू असून कधींहि विश्वासघात करीत नाहीं ( ८.५१,१२ ). त्याला पापाचा डाग कधींहि लागलेला नाहीं ( १.१२९,५ ). सर्व आंगिरसांमध्यें तोच सर्वांत उत्तम आंगिरस आहे, सर्व योद्ध्यांमध्यें तोच उत्कृष्ट योद्धा आहे, सर्व मित्रांत तोच मित्र श्रेष्ठ आहे, आनंदी लोकांचा आनंद तो द्विगुणित करतो, सर्व गवयांमध्यें तोच उत्तम गवयी आहे ( १.१००,४ ). द्रष्ट्यांचा साक्षात्कार त्याला प्राप्त झालेला आहे ( ३.३६,५ ). त्याचेठायीं ब्रह्मन् व ऋषि एकत्रित झालेले आहेत. तो स्वाभिमानयुक्त आहे ( १.६२,१० ). हातीं घेतलेल्या कामांत त्याचें पूर्ण लक्ष असतें ( १.१०२,५ ).

इन्द्राच्या ह्या स्वभावाबरोबरच तो आपल्या भक्ताच्या डोळ्यांनां जगड्व्याळ स्वरूपांत दिसतो. त्याची शरीरयष्टि सुदृढ असून त्याची गर्दन भरलेली आहे. त्याची पाठ कणखर आहे. त्याच्या शरीरांत वसत असलेली शक्ति अतुल आहे. पाणी ज्याप्रमाणें झऱ्यांत दडलेलें असतें त्याप्रमाणें त्याची शक्ति त्याचेठायीं दडलेली असते ( १.५५,८; ४.१७,८ ५.३७,१; ८.१,२३;१७,८;६७,७ ). सोमपानप्रसंगीं त्याच्या स्वरूपाचें वर्णन आठवतें. त्याच्या पोटांत सोमरसाचीं तळींच्यातळीं गडप होतात ( १.८,७;११,१;३०,३;१०४,९; ३.३६,८ ) त्याचें मुख विशाल सागराप्रमाणें आहे ( ६. ४१,२ ). त्याचे बाहु लांबसडक असून त्याचे हात जाड व कठिण आहेत. उजवा व डावा दोन्हीहि सुभग आहेत. त्याचें बळ त्या बाहूंत एकवटलें आहे; त्या बाहूंच्या योगानें तो मोठमोठीं लोकोपयोगी कृत्यें करतो ( १.८०,८;१०२,६; ४.२१,९; ६.१९,३; ८.३२,१०;३३,५;५०,१८;७०,१ ). त्याला एक सोनेरी रंगाची दाढी असून सोमपानानें तृप्ति झाली म्हणजे ती दाढी तो हलवितो ( २.११,१७; ८.३३,६; १०.९३,१,४ ). त्याचे गाल व ओंठ सुंदर असून अशा प्रसंगीं तो ते फुगवितो ( ३.३२,१ ). पुष्कळ ऋचांतून 'हरि' शब्दावर श्लेष केलेले आढळतात. इन्द्रालाहि 'हरिशिप्र' 'हरिकेश', हरिश्मश्रु, हरिवर्चस, हिरण्मय वगैरे म्हटलेलें आढळतें. तो अतिशय कठिण व बळकट असल्यामुळें त्याला 'आयस'हि म्हणतात. ( १.७,२; ७.३४,४; ८.५५,३; १०.९६,४,५,८,९,१२ ). त्याची एकंदर आकृति सुंदर अचिन्त्य, व सूर्याप्रमाणें दैदीप्यमान आहे ( १.५३,३; १७३,४; ३.४५,५; ४.१६,१४,२१,२; ५.३७,१ ). तो उषेप्रमाणें सुभगाकृति आहे ( १.५७,३ ). अलंकाराप्रमाणें त्याच्या भोंवती तुरळक ढग आहेत ( ४.२२,२ ). परंतु त्याला स्वेच्छेप्रमाणें मन्त्रसामर्थ्यानें वाटेल तीं रूपें धारण करतां येतात ( ३.५३,८; ६.४७,१८ ).

ऋग्वेदांत दोन ठिकाणीं इन्द्राच्या मूर्तिसंबंधीं उल्लेख आलेला आहे. ४.२४,१० मध्यें "ह्या माझ्या इन्द्राच्या मूर्ति-बद्दल दहा गाई कोण देईल ? असें म्हटलें आहे. त्यानें आपल्या शत्रूंचा निःपात केला म्हणजे त्याला परत घेऊन या." ८.१,५ मध्यें म्हटलें आहे कीं, "कितीहि किंमत आली तरी मी तुला विकणार नाहीं." वेदकालीं असल्या मूर्ती कशा तऱ्हेच्या असतील हें कल्पनेवरूनच ठरवावें.

ऋभूंनीं तयार केलेल्या सुवर्णरथावर आरूढ होऊन इन्द्र लढाईस अगर यज्ञाला जातो. तो रथ चांगला धडधाकट बांधलेला असून त्याची गतीहि विचाराहून द्रुततर आहे ( १.१६,२; १०२,३; ६.२९,२; ३७,३; १०.४४,२ ). इन्द्र सोन्याच्या चाबकानें घोडे हांकतो ( ८.३३,११ ). साधारणतः तो दोन घोड्या हांकतो ( २.१५,६; ३.४४,३ ). परंतु कवीच्या कल्पना इन्द्राच्या रथाला अनेक घोडे जोडतात ( २.१८,४,७; ४.४६,३; ७.४७,१८ ). ते घोडे सोम प्याल्याप्रमाणें मस्ती करतात ( १.८१,३; ३.४३,६; १.३०, १६ ). मध्येंच इन्द्र थकतो ( १०.१०५,३ ). त्या घोड्यांची आयाळ सुवर्णाची आहे ( ८.३२,२९ ). त्यांच्या पाठी सरळ आहेत ( ८.१,२५; ६.४२; ३.२५,४ ). त्यांच्या शेपट्या मोरांच्या पिसाऱ्याप्रमाणें आहेत ( ३.४५,१; ८.१,२५ ). त्यांचे अवयव उत्कृष्ट आहेत ( ३.४३,४ ). त्यांची मालीस उत्तम तऱ्हेनें केलेली आहे (५-६ ). सूर्यासारखे त्यांचे डोळे तेजस्वी आहेत, ते स्वतः सूर्यकिरणाप्रमाणें आहेत ( १.१६,१; २.११,१६ ). त्यांनां चारा विपुल मिळतो ( ३.५३,२ ). खाण्यास पुष्कळ मिळाल्यामुळें त्यांचे पुढे पुष्ट दिसतात ( १.१०,३ ). गरुड ज्याप्रमाणें आपल्या पंखांमुळें जलद जातो त्याप्रमाणें इन्द्र ह्या घोड्यांनीं त्वरित जातो (८.३४,९). ज्या ज्या वेळीं इन्द्र बाहेर जाण्यास निघेल त्या त्या वेळीं हे घोडे बाहेर जाण्यास तयार असतात ( १.१०४,१ ). यज्ञमंडपाकडे तर ते त्याला निमिषार्धांत नेतात ( १०.३२,२ ).

प्रार्थनेच्या जोरानें ते धुरेला जोडले जातात ( २.१८,३; ३.३५,४; ८.१,२४; ४५.३९; ८७.९ ). हे घोडे स्वर्गाकडून इन्द्राला मिळाले ( १.१२१,८ ) अगर ते त्याला ऋभूंनीं दिले ( १.११,१ ). इन्द्र वाऱ्याच्या घोड्यांनां जोडूनहि प्रवास करतो अगर सूर्याचे घोडे घेतो ( १.५१,१०, १२१, १२; १०.२२,५; वाल० २.८, १०.४९,७ ).

इन्द्राचें नेहमींचें आयुध म्हणजे वज्र. हें वज्र त्वष्ट्यानें इन्द्राकरितां तयार केलें. हें वज्र सोन्याचें होतें असें वर्णन आहे ( १.५७,२; ८४.९; ८.५७,३ ). त्याचप्रमाणें पोलादी होतें असेंहि म्हटलें आहे (१.८१,४; ८.८५,३; १०.४८,३). ह्या आयुधानें जय तेव्हांच मिळे (१.१००,१३). हें अस्त्र असे (१.८४,१३ ). ह्याला 'सचाभू' म्हणजे इन्द्रमित्र म्हटलें आहे (१.१३१,३). तें त्रिधारी अथवा चतुर्धारी असे (१.१२१,४). शतधारी असे, असें ६.१७,१० मध्यें म्हटलेलें आहे. त्याला शंभर गांठी आहेत ( १.८०,६ ). हजार टोकें आहेत ( ५.३४,२ ). ज्याप्रमाणें बैल आपलीं शिंगें घांसून तीक्ष्ण करतो त्याप्रमाणें इन्द्र आपलें आयुध तीक्ष्ण करी (१.५५,१). १०.४२,७ मध्यें दुसऱ्या एका शंबानांवाच्या आयुधाचा उल्लेख आहे. १०.६०,३ मध्यें त्याच्या हातीं पराणी असते असेंहि वर्णन आहे. १.३२.१२; १०.१८०,२ मध्यें त्याच्या हातीं भाला आहे. पुष्कळ ठिकाणीं त्याच्या हातीं धनुष्य बाण आहेत असेंहि वर्णन आहे (८.४५,४; ६६.७,११; १०. १०३.२,३ ). त्याला पुष्कळ ठिकाणीं अद्रिवत् म्हटलें आहे. त्याच्या हातांत एक अंकुश असून त्या योगानें सोम तयार करणाऱ्या लोकांकरितां तो धन मिळवून देतो ( ८.१७,१०; १०.४४,९). कांहीं कांहीं ठिकाणीं शिप्र याचा अर्थ शिरस्त्राणासारखा भासतो त्यावरून त्याचे डोक्याला सोन्याचें शिरस्त्राण असावें असें दिसतें ( ६.२९,६ ). इन्द्राच्या हातांत आपल्या प्रतिपक्षीयांना पकडण्यासाठीं एक जाळें असल्याचेंहि वर्णन आहे ( ९.८३,४ ).

कवींनीं इन्द्राला एक कुटुंबहि दिलेलें आहे. त्याला इन्द्राणी नांवाची बायको होती ( ३.५३,४,६; ७.१८,२; १०.९९,५ ). दैत्याशीं युद्ध करण्यास जातेवेळीं इन्द्राणी त्याला सोम पिण्यासाठीं परत बोलावते १०.८६. त्याच्या गृहसौख्याचें उपरोधिक वर्णन आहे. इन्द्राच्या आवडत्या वृषाकपि नांवाच्या माकडामुळें नवराबायकोचें थोडें वितुष्ट येतें. कारण हें माकड दुसऱ्यांची झोंप मोडीत असे. ( ऋ. १.२ ) व स्वतःच्या धनिणीच्या प्रसाधनसाधनांत हात घालीत असे (ऋ. ५) स्वतःची इन्द्र बिलकुल काळजी घेत नाहीं अशी इन्द्राणीची नेहमीं तक्रार असे व त्या माकडाला ठार मारण्याचा निश्चयहि तिनें जाहीर केला होता. ही इन्द्राणी अतिशय सुंदर स्त्री होती (ऋ. ६). पुष्कळ प्रसंगीं तें माकड इन्द्राच्या उपयोगीं पडल्यामुळें त्याला सोडण्यास इन्द्र तयार होत नाहीं. ( ऋचा १२–१८ ) सरतेशेवटीं माकडाला ताळ्यावर आणल्यानंतर नवराबायकोंत पुन्हां ऐक्यभाव होतो.*

**वरुण.**—ऋग्वेदांतील देवतांपैकीं इन्द्राच्या बरोबरीनें वरुण ही देवताहि अत्यंत महत्त्वाची आहे. तिचें महत्त्व स्तुतिपर सूक्तांच्या संख्येवरूनच केवळ ठरविणें बरोबर होणार नाहीं. कारण केवळ वरुणाच्या स्तुतिपर अशीं सूक्तें दहा बाराच आहेत. या सूक्तसंख्येच्या मानानें पाहिलें तर वरुण ही तिसऱ्या प्रतीची देवता ठरेल; आणि मित्रावरुण ह्या जोडदेवतांनां उद्देशून असलेलीं आणखी सुमारें पंचवीस सूक्तें हिशोबांत घेतलीं तरी वरुणाचा नंबर पांचवा म्हणजे अश्विनदेवतांच्या बराच खालीं व मरुतांच्या बरोबरीनें लागेल.

वरुणदेवतेवरील मानवी गुणांचा अध्यारोप शारीरिक गुणांपेक्षां नैतिक गुणांचे बाबतींत अधिक पूर्णत्वास पोहोंचलेला आहे. वरुणाचें शरीरविषयक व आयुधादि बाबतींचें वर्णन अगदीं अल्प आहे; त्याच्या हालचालीविषयींच्या वर्णनावर विशेष भर दिलेला आढळतो. त्याला तोंड, डोळा, बाहू, हात व पाय हे अवयव असल्याचें लिहिलें आहे. तसेंच तो हात हालवणें, चालणें, वाहनांतून गमन करणें, बसणें, खाणें व पिणें वगैरे क्रिया करतो. त्याचा चेहरा अग्नीसारखा असल्याचें वर्णन आहे. ( ७.८८,२ ) मित्र व वरुण यांचा नेत्र सूर्य होय ( १.११५,१; ६.५१,१; ७.६१,१ ), व ही गोष्ट नेहमीं सूक्ताच्या पहिल्या ऋचेंतच दिलेली आढळते त्यावरून वरुणदेवतेचें हें विशिष्ट स्वरूप सूक्तकारांच्या मनश्चक्षूपुढें प्रथम उभें रहात असे असें दिसतें. वरुण मानवजातीला ज्या नेत्रानें पाहतो असें वर्णन आहे ( १.५०,६ ) तो नेत्र म्हणजे निःसंशय सूर्यच होय. अर्यम्याप्रमाणेंच मित्रावरुणालाहि सूर्यनेत्री असें म्हटलें आहे ( ७.६६,१० ). वरुण हा दूरदृष्टि ( १.२५,५ व १६; ८.९०,२ ) व सहस्रनेत्री ( ७.३४,१० ) असें वर्णन आहे. मित्रावरुण हे आपले हात पसरतात ( ५.६४,२; ७.६२; ७.६२,५ ) आणि सूर्यकिरणांचा बाहूप्रमाणें उपयोग करून मार्ग आक्रमण करतात ( ८.९०,२ ). सविता व त्वष्टा यांच्या प्रमाणें त्याचे हात सुंदर ( सुपाणी ) आहेत. मित्र व वरुण स्वतःच्या पायांनीं त्वरित चालतात ( ५.६४,७ ) व वरुण आपल्या तेजस्वी पदानें कपटप्रयोग तुडवितो ( ८.४१,८ ). यज्ञसमारंभांत तो पसरलेल्या दर्भांवर बसतो (१.२६,४; ५.७२,२) आणि इतर देवतांप्रमाणें तो व मित्र सोम पितात ( ४.४१,३ ). वरुण सोन्याचा झगा ( द्रापी ) धारण करतो व झगझगीत वस्त्रें परिधान करतो ( १.२५,१३ ). पण मित्र व वरुण हे घृताचा चकाकणारा पोषाख घालतात ( ५.६२,४ ) असें जें वर्णन

* या वृषाकपिसूक्ताचा टिळकांनीं अगदीं निराळाच अर्थ लावलेला आहे व त्याचा वेदकालनिर्णयाकडे उपयोग केला आहे.

आहे तें केवळ रूपक असून तें अग्नीमध्यें अर्पण केलें जाणाऱ्या पातळ तुपाला उद्देशून असावें असें वाटतें. वरुण सुंदर, पीतनेत्री, टक्कल पडलेला वृद्ध असल्याचें वर्णन आहे. वरुणाच्या आयुधवाहनादिकांचें जें वर्णन आहे, त्यांत त्याच्या रथालाच कायतें प्रामुख्य दिलेलें दिसतें. तो रथ सूर्याप्रमाणें चकाकणारा, दांड्याच्या जागीं वाद्या असलेला, बसावयाच्या जागा व चाबूक असून भक्कम जुंपलेले घोडे जोडलेला असें वर्णन आहे (५.६२,४). मित्र व वरुण आपल्या रथामध्यें उंच आकाशभागीं आरोहण करतात (५.६३,१). असला तो वरुणाचा रथ आपणांस पृथ्वीवर पाहावयास मिळावा, म्हणून कवि प्रार्थना करतो (१.२५,१८).

मित्र व वरुण यांचें निवासस्थान सोन्याचें असून तें स्वर्गांत आहे (५.६७,२; १.१३६,२); व वरुण आपल्या त्या मंदिरामध्यें बसून सर्व कृत्यांचें अवलोकन करीत असतो (१.२५,१०–११). त्याचें व मित्राचें सदन मोठें, भव्य आणि त्यास हजार खांब असल्यामुळें भक्कम असें असून (५.६८,५; २.४१,५) त्याला हजार दारें आहेत (७.८८,५). सर्वदर्शी सूर्य हा निवासस्थानांतून बाहेर पडून मित्र व वरुण यांच्या सदनाकडे मानवांच्या कृत्यांची खबर देण्याकरतां जातो (७.६०,१,३) व त्यांत प्रवेश करतो (१.१५२,४). अत्युच्च अंतरिक्षामध्यें वरुण पितरांनां दृष्टीस पडतो (१०.१४,८). शतपथब्राह्मणांत (११.६,१) जगताचा राजा वरुण आकाशाच्या मध्यप्रदेशीं अधिष्ठित झालेला असून तेथून तो आपल्या भोंवतालचीं सर्व शासनस्थानें अवलोकन करीत असतो असें वर्णन आहे.

कांहीं वेळां वरुणाच्या हेरांचाहि उल्लेख आलेला आहे. ते त्याच्या भोंवतालीं बसलेले असतात (१.२४,१३). ते दोन जगांचें अवलोकन करीत असतात, व यज्ञसमारंभाची त्यांनां माहिती असून प्रार्थना म्हणण्यास ते उत्तेजन देतात (७.८७,३). मित्र व वरुण हे आपल्या हेरांनां निरनिराळ्या लोकांच्या घरांमध्यें पाठवितात (७.६१,३). हे हेर हुषार असल्यामुळें कधींहि फसत नाहींत (६.६७,५). अथर्ववेदांत (४.१६,४) असें वर्णन आहे कीं, वरुणाचे दूत स्वर्गांतून खालीं उतरून पृथ्वीवर भ्रमण करतात व आपल्या सहस्रावधी नेत्रांनीं सर्व वर्गाचें निरीक्षण करीत असतात. हेरांची ही कल्पना सृष्टींतील ताऱ्यांच्या आधारावर उभारलेली दिसते; पण ऋग्वेदांत या मताला पुष्टि देणारा पुरावा मुळींच आढळत नाहीं. तारे हें हेराप्रमाणें लक्ष ठेवतात असें कोठें वर्णन नाहीं, किंवा हेर हे रात्रीं आपल्या कामावर जातात असेंहि म्हटलेलें नाहीं. वरुणाच्या हेरांची कल्पना पृथ्वीवरील न्यायनिष्ठ राजाच्या कारभाराला अवश्य असलेल्या हेरांच्या अस्तित्वावरूनच सुचलेली दिसते. शिवाय मित्र व वरुण यांचेच हेर असतात, असें नसून अग्नि (४.४,३) सोम यांच्याबद्दल तसाच उल्लेख आहे; इन्द्राबरोबर लढणाऱ्या दानवांच्या हेरांचें व सामान्यतः सर्व देवांच्या हेरांबद्दल वर्णन आहे (१०.१०,४). एके ठिकाणीं आदित्य हे आपल्या उंच ठिकाणाहून हेरांप्रमाणें पहात असतात असें म्हटलें आहे (८.४७,११). ह्या हेरांचा प्रथम मित्र व वरुण यांच्यासंबंधानेंच उल्लेख केलेला असावा हें अनुमान काढण्यास कारण असें आहे कीं, इराणीलोकांतील मिथ्र ह्याचेहि हेर असल्याचा उल्लेख आहे, व वेदांतल्या नांवाप्रमाणें त्यांचेंहि नांव (स्पश्) हेंच आहे. ऋग्वेदांत सोनेरी पंखांचा वरुणाचा दूत म्हणून म्हटलें आहे तो अर्थात् सूर्य होय (१०.१२३,६).

यम व इतर प्रमुख देवतांप्रमाणें वरुणाला पृथक् किंवा मित्रासहवर्तमान राजा असें म्हटलें आहे (१.२४,७;८). तो सर्वांचा म्हणजे देवांचा व मानवांचा (१०.१३२,४; २.२७,१०), सर्व जगताचा (५.८५,३) आणि सर्व अस्तित्वांत असलेल्या गोष्टींचा (७.८७,६) राजा आहे. तो स्वावलंबी राजा असल्याचेंहि म्हटलें आहे (२.२८,१); पण स्वावलंबी हें विशेषण सामान्यतः इन्द्राला लावलेलें आढळतें. राजापेक्षांहि बऱ्याच अधिक वेळां वरुणाला एकट्याला किंवा बहुधा मित्रासहित सम्राज म्हटलेलें आहे. सम्राज ही पदवी थोड्या ठिकाणीं अग्नीला व बऱ्याच ठिकाणीं इन्द्राला लावलेली असते. वरुण व मित्र दोघांनां मिळून हें पद इन्द्रापेक्षां दुप्पट वेळां लावलेलें आहे; आणि ऋग्वेदांत वरुणापेक्षां दसपट सूक्तें इन्द्रस्तुतिपर आहेत ही गोष्ट लक्षांत घेतां सम्राज हें पद वरुणाचें होय, असें म्हणणें फार सयुक्तिक आहे.

तसेंच क्षत्र हें पद वरुणालाच प्राधान्येंकरून लावलेलें आहे; मित्रावरुणाच्या जोडीला सामान्यतः व दोन वेळां अर्यम्यासहि लावलें आहे. उलट तें फक्त एकेकदां अग्नि, बृहस्पति व अश्विन यांनां लावलें आहे. त्याचप्रमाणें क्षत्रिय शब्द पांच वेळां आला आहे, त्यांपैकीं चार वेळां तो वरुण किंवा आदित्य यांनां उद्देशून आहे; व एकदां सर्व देवतांनां सामान्यतः लावलेला आहे. असुर हा शब्द वरुणाला एकट्याला किंवा मित्रासह इन्द्र आणि अग्नि यांच्यापेक्षां बऱ्याच अधिक वेळां लावलेला आहे. आणि एकमेकांविषयींच्या सूक्तांची संख्या विचारांत घेतां तें पदहि वरुणालाच विशेषतः लावलेलें दिसतें. तसेंच देवांपैकीं मित्र व वरुण यांना असुरा आर्या असें म्हटलें आहे (७.६५,२).

वरुण व मित्र ह्यांच्या दैवी सत्तेला 'माया' असें नांव आहे. त्याचा शाब्दिक अर्थ गूढशक्ति असा सामान्य असून तो शब्द चांगल्या अर्थी देवांनां व वाईट अर्थी दैत्यांनां लावलेला असतो. या शब्दाचा अर्थ बहुतेक तंतोतंत इंग्रजी भाषेमधील 'क्रॅफ्ट' या शब्दाप्रमाणें आहे. क्रॅफ्टचाहि जुना अर्थ 'गूढशक्ति, जादू' असा असून नंतर 'कौशल्य, कला' असा एक चांगला अर्थ, आणि 'कपटविद्या, लबाडी' असा दुसरा वाईट

अर्थ उत्पन्न झाला. माया हा शब्द चांगल्या अर्थी ( 'विलक्षण कृति' या अर्थानें ) असुर शब्दाप्रमाणें मुख्यतः वरुण व मित्र यांस उद्देशून लावलेला आहे; तर वाईट अर्थी दैत्यकृतीकरितां तो राखून ठेवलेला दिसतो. या गूढशक्तीच्या बळावरच वरुण आकाशांत उभा राहून सूर्य या मानदंडानें पृथ्वीचा आकार मोजतो (५.८५,५). मित्र व वरुण उषांना पाठवितात (३.६१,७). सूर्याला आकाश आक्रमण करण्यास व मेघ आणि पर्जन्य यांनीं झांकून टाकण्यास लावतात; आणि मधुबिंदूंचा वर्षाव करितात (५.६३,४) किंवा ते आकाशांतून पाऊस पाडतात, आणि असुरांच्या गूढशक्तीच्या साहाय्यानें नियम चालवितात, आणि म्हणूनच मायिन् हें विशेषण देवतांपैकीं वरुणालाच मुख्यत्वेंकरून लागतें (६.४८,१४; ७.२८,४; १०.९९,१० व १४७,५).

इन्द्राच्या अगदीं उलट गोष्ट म्हटली म्हणजे वरुणासंबंधानें आख्यायिका अशा मुळींच नाहींत; मात्र वरुण (आणि मित्र) आधिभौतिक व नैतिक व्यवस्था चालविणारा असल्याबद्दल बरेंच वर्णन आहे. सृष्टींतील कायद्यांचा वरुण हा अधिपति होय. त्यानें पृथ्वी व आकाश यांची स्थापना केली व तो सर्व जगांत वास्तव्य करतो (८.४२,१). आकाशत्रय व पृथ्वीत्रय हीं त्यानें आपल्यामध्यें स्थापन केलीं आहेत (७.८७,५). तो आणि मित्र सर्व जगतावर राज्य चालवितात; अथवा जगद्वय व्यापून टाकतात (७.६१,४). सर्व जगताचे ते दोघे रक्षण करणारे आहेत (२.२७,४). वरुणाच्या हुकुमानेंच पृथ्वी व आकाश हीं पृथक् झालेलीं आहेत (६.७०,१; ७.८६,१; ८.४१,१०). मित्रासहवर्तमान तो पृथ्वी व स्वर्ग (५.६२,३), किंवा पृथ्वी, आकाश आणि स्वर्ग (५.६;१ व ४) यांनां आधारभूत झालेला आहे. त्यानेंच आकाशामध्यें सूर्य प्रकाशत राहील अशी योजना केली आहे (७.८७,५). त्यानें जलनिधीमध्यें अग्नि, आकाशामध्यें सूर्य व पाषाणामध्यें सोम यांची स्थापना केली आहे (५.८५,२). सूर्याकरितां रुंद मार्ग त्यानें तयार करून दिला आहे (१.२४,८; ७.८७,१). वरुण, मित्र व अर्यमा हे सूर्याकरितां मार्ग मोकळे करून देतात (७.६०,४). ज्या ठिकाणीं सूर्याचे घोडे स्वैर संचार करतात त्या ठिकाणीं मित्र व वरुण यांनीं व्यवस्था लावून दिली आहे (५.६२,१). आकाशांत जो वायु घों घों वहात असतो तो वरुणाचा श्वासोच्छ्वास होय (७.८७,२).

वरुणानें घालून दिलेल्या नियमान्वयेंच चंद्र रात्रीच्या वेळीं प्रकाशमान होऊन आकाश आक्रमीत असतो, व तारेहि रात्रौ उच्च प्रदेशीं चकाकत असतात व दिवसा अदृश्य होतात (१.२४,१०). वरुणानें निशांनां आलिंगन दिलें आहे आणि तो आपल्या गूढशक्तीनें दिवस व रात्र निर्माण करतो असें एके ठिकाणीं (८.४१,३) वर्णन आहे. परंतु या एका उल्लेखावरून त्याचा रात्रीशीं किंवा दिवस व रात्र असे विभाग पाडण्याशीं संबंध असल्याचें सिद्ध होऊं शकत नाहीं. वास्तविक वरुणाचा सूर्याला धरूनच बहुतेक उल्लेख येत असतो; चंद्र किंवा निशा यांच्याशीं त्याचा संबंध येत नाहीं. येणेंप्रमाणें अगदीं जुन्या वैदिक सूक्तांत वरुण हा रात्रीं व दिवसा प्रकाशाचा स्वामी असल्याचें व मित्र हा फक्त दिवसा दिसणाऱ्या आकाशांतील प्रकाशाची देवता असल्याचें दिसतें.

परंतु नंतर ब्राह्मणग्रंथांच्या कालांत वरुणाचा विशेषतः रात्रीच्या वेळच्या आकाशाशीं संबंध असल्याचें वर्णन आहे. उदाहरणार्थ मित्र दिवस व वरुण रात्र उत्पन्न करतो असें म्हटलें आहे (तैत्तिरीय संहिता ६.४,८,३); दिवसाचा मालक मित्र व रात्रीचा मालक वरुण असें वर्णन आहे (तै. सं. २.१,७,४). हें वरील मत उत्पन्न होण्याचें कारण असें दिसतें कीं, मित्राचा सूर्याशीं संबंध जोडीत असत आणि वरुणाच्या नैसर्गिक अधिष्ठानाची स्पष्ट कल्पना नसल्यामुळें वरुणाचें कार्य मित्राच्या उलट मानण्याची प्रवृत्ति पडली असावी. मित्र व वरुण यांचीं हीं परस्परविरुद्ध कार्यें शतपथब्राह्मणांत (१२.९.२,१२) निरनिराळ्या रीतीनें स्पष्ट करून सांगितलीं आहेत; व म्हटलें आहे, या जगाचा मालक मित्र व त्या जगाचा मालक वरुण होय.

कांहीं ठिकाणीं, वरुण हाच ऋतूंचें नियमन करतो, असें म्हटलें आहे. त्याला बारा महिने माहीत आहेत (१.२५,८); आणि मित्र, वरुण व अर्यमन् हे पर्जन्यकाल, मास, दिन, रात्र यांची व्यवस्था लावतात असें वर्णन आहे (७.६६,११).

ऋग्वेदांत सुद्धां पुष्कळ ठिकाणीं वरुण हा जलांचें नियंत्रण करणारा असें म्हटलें आहे. त्याच्या हुकुमानेंच नद्या पाण्यानें भरून वाहूं लागतात; व सतत तशाच वाहत राहतात (२.२८,४). त्याच्याच गूढ सामर्थ्याच्या योगानें, नद्या जरी सारख्या समुद्राला जाऊन मिळत असल्या तरी त्या पाण्यानें समुद्र कधींच पूर्ण भरून जात नाहीं (५.८५,६). मित्र व वरुण हेच नद्यांचे अधिपती होत (७.६४,२). वरुणाचा समुद्राशीं संबंध असल्याचा उल्लेख ऋग्वेदांत येऊन गेलाच आहे; मात्र अशीं उल्लेखस्थानें फार नाहींत; कारण वेदकालीं समुद्राचें फारसें महत्त्व वाटत नसावें. वरुण हा समुद्रांतील जलांतून मार्गक्रमण करतो; तर मरुद्गण हे आकाशांत, अग्नि हा पृथ्वीवर आणि वात हा अंतरिक्षांत असतो (ऋ. १.१६१,१४). असें एक विधान आहे कीं, सप्त नद्या एखाद्या मोठ्या खळखळणाऱ्या जलाशयांत उडी घ्यावी त्याप्रमाणें वरुणाच्या मुखांत उडी घेतात (ऋ. ८.५८,१२); या विधानांतील जलाशय म्हणजे समुद्र असावा. यौःप्रमाणें वरुण हा सिंधूमध्यें (म्हणजे समुद्रामध्यें) उतरतो असें विधान आहे (ऋ.

७.८७,६; ) त्याचा सामान्यतः अंतरिक्षांतील जलाशीं संबंध येतो. गुप्त समुद्राप्रमाणें वरुण हा आकाशांत चढून जातो ( ऋ. ८.४१,८ ). मनुष्यांचें सत्यासत्य अवलोकन करीत तो माधुर्य स्रवणाऱ्या आणि अत्यंत स्वच्छ अशा जलांमधून फिरतो ( ऋ. ७.४९,३ ). वरुण जलांचें वस्त्र अंगावर घेतो ( ऋ. ९.९०,२ ). मित्रावरुण यांची स्तुति वारंवार केलेली सांपडते, व त्यांनीं वृष्टि करावी अशी त्यांची प्रार्थना करण्यांत येते. आकाश, अंतरिक्ष, आणि पृथ्वी यांजवर मेघरूपी भांडें उपडें करून तो पाण्याचा वर्षाव करतो. या योगानें तो भूमीला ओलावा आणतो, व या प्रसंगीं पर्वत धुक्यामध्यें आणि मेघांमध्यें लपून जातात ( ऋ. ५.८५,३,४ ). पोषक अन्न देणाऱ्या गाई मित्रावरुणांजवळ आहेत, मधानें भरलेले झरे त्यांजवळ आहेत. वृष्टीनें भरलेलें आकाश आणि प्रवाहांनीं वाहणारें पाणी त्यांजवळ आहे. तृणमय भूमीवर ते घृताच्या ( म्हणजे जलवृष्टीच्या ) धारा पाडतात आणि अंतरिक्षामध्यें ते मध पसरतात ( ऋ. ३.६२,१६ ); ते आकाशांतून वृष्टि आणि पोषक अन्न पृथ्वीवर पाठवितात ( ऋ. ७.६४,२ ), दिव्य जलानें भरलेला पाऊस त्यांजपासून येतो ( ऋ. ८.२५,६ ); वृष्टि करण्याच्या त्यांच्या शक्तीला एक सगळें सूक्त ( ऋ. ५.६३ ) दिलेलें आहे. जल आणि वृष्टि ह्यांच्याशीं याप्रमाणें संबंध आल्यानें नैघण्टुकाच्या पांचव्या अध्यायांत अंतरिक्षस्थ आणि द्युस्थ दोन्हीहि देवतांमध्यें वरुणाचें नांव घातलेलें दिसतें. ब्राह्मणग्रंथामध्येंहि मित्रावरुण हे वृष्टीचे देव मानले आहेत. अथर्ववेदांत वरुणाला सर्व सृष्टीवर सत्ता चालवण्याचा हक्क राहिलेला नाहीं. तेथें तो फक्त जलांचाच अधिपति राहिलेला आहे. सोमाचा पर्वताशीं त्याप्रमाणें याचा जलाशीं संबंध आहे ( अ. ३.३,३ ). द्युस्थ पिता या नात्यानें तो पाऊस पाडतो ( अ. ४.१५,१२ ). त्याचें सुवर्णगृह जलामध्यें आहे ( अ. ७.८३,१ ); तो जलांचा अधिपति आहे. तो आणि मित्र वृष्टीचे अधिपति आहेत ( अ. ५.२४,४,५ ). यजुर्वेदामध्यें त्याला जलांचें अपत्य म्हटलेलें आहे. तो आपलें गृह मातृरूप जलांचे ठिकाणीं करतो. ( वा. सं. १०.७ ); जलें हीं वरुणाच्या पत्नी होत ( तै. सं. ५.५,४,१ ) मित्र आणि वरुण हे जलांचे नेते होते ( तै. सं. ६.४,३,२ ).

वरुणाचे कायदे स्थिर आहेत असें विधान वारंवार येतें. धृतव्रत हें विशेषण त्याला बरोबर शोभतें. केव्हां केव्हां मित्र आणि तो यांनां तें जोडीनें लावण्यांत येतें. देव वरुणाचे कायदे पाळतात (ऋ.८.४,७), किंवा वरुण, मित्र व सविता यांचे कायदे पाळतात (ऋ.१०.३६,१३). अमर देव देखील मित्रावरुणांच्या कायद्याविरुद्ध जाऊं शकत नाहींत (ऋ. ५. ६९,४). मित्रावरुण हे जगन्निर्बंध आणि प्रकाश यांचे स्वामी आहेत. या निर्बंधांच्या योगानें ते व्यवस्था ठेवितात (ऋ. १.२३,५). व्यवस्थेचे पुरस्कर्ते हें विशेषण विशेषतः त्यांनां लावतात व केव्हां केव्हां आदित्यांनां व दुसऱ्या देवांनां लावतात. ऋत ( व्यवस्था ) आणि सत्य यांचे ते पोशिंदे आहेत (ऋ. १.२,८). ऋतस्य गोपा म्हणजे व्यवस्थेचे रक्षिते हें नांव वरुणाला देतात किंवा आदित्यांनांहि देतात, अग्नि आणि सोम यांनांहि हें नांव केव्हां केव्हां लावलेलें सांपडतें. बहुधा अग्नीला लावलेलें विशेषण जें ऋतावान् ( व्यवस्था ठेवणारा ) तेंहि मित्रावरुणाला कित्येक वेळां लावलेलें आढळतें. वरुणाचें सामर्थ्य इतकें मोठें आहे कीं, त्याच्या राज्याचा व त्याच्या शक्तीचा अंत उडणाऱ्या पक्ष्यांनां किंवा वाहणाऱ्या नद्यांनां लागला नाहीं. हे पक्षी व नद्या त्यांच्या क्रोधाचा प्रतिकार करूं शकत नाहींत (ऋ. १. २४,६). मित्रावरुण देवतांची सामर्थ्यमर्यादा नद्या किंवा आकाश यांनां सांपडलेली नाहीं (ऋ. १.१५०,९). तो सर्वव्यापी आहे, सर्वांचीं गृहें त्याच्या कक्षेत आहेत ( ऋ. ८.४१,१ व ७ ). तीन स्वर्ग आणि तीन पृथ्वी ह्या त्याचे ठिकाणीं आहेत ( ऋ. ७.८७,५ ). वरुण सर्वज्ञ आहे, आकाशांत पक्ष्यांचा मार्ग तो जाणतो. तसेंच समुद्रांतील जलरथांचा मार्ग, दूर प्रवास करणाऱ्या वाऱ्याचा मार्ग तो जाणतो. आणि आजपर्यंत घडलेल्या आणि पुढें होणाऱ्या गुप्त गोष्टी त्याला दिसतात ( ऋ. १.२५,७ व ९ व ११ ), तो मनुष्याचें खरें खोटें पहात असतो ( ऋ. ७.४९,३ ). त्याच्याशिवाय कोणाला डोळ्याचें पातें लववितां येत नाहीं ( ऋ. २.२८,६). मनुष्याच्या नेत्रांची उघडझांक वरुण मोजून ठेवितो. मनुष्य जें कांहीं करतो तो जो विचार करतो आणि ज्या योजना करतो तें सर्व वरुण जाणतो (अ. ४.१६,२ व ५). आकाश व पृथ्वी यांजमध्यें आणि यांच्यापलीकडे असलेलें सर्व कांहीं त्याला दिसतें. आकाशापलीकडे दूर उडून जाऊन वरुणाच्या कचाट्यांतून सुटूं असें मनुष्य म्हणेल तर तें त्याला करितां येणार नाहीं ( अ. ४.१६,४ व ५ ). वरुण सर्वज्ञ आहे व या सर्वज्ञतेच्या बाबतींत त्याच्याशीं अग्नीची तुलना केली आहे. यावरून सर्वज्ञता हा त्याचा विशेष गुण आहे हें स्पष्ट होतें ( ऋ. १०.११,१ ). नीतीचा शास्ता या नात्यानें कोणत्याहि देवतेपेक्षां वरुण फार श्रेष्ठ आहे. पातक्यानें त्याचे कायदे मोडले असतां त्याला राग येतो व तो याजबद्दल कडक शिक्षा करतो ( ऋ. ७.८६,३ व ४ ). पातक्यांस तो ज्या पाशानें बद्ध करितो त्यांचें वर्णन दिलेलें आहे ( ऋ. १.२४,१५; १.२५,२१; ६.७४,४; १०.८५,२४ ). हे पाश असत्य भाषण करणाऱ्याच्या भोंवतीं सातवेळां किंवा तीनवेळां वेष्टिले जातात. जो सत्य बोलतो त्याला हे धक्का लावीत नाहींत ( अ. ४. १६,६ ). असत्याच्या मार्गांत मित्र आणि वरुण हे पुष्कळ पाशांनीं युक्त अशा प्रतिबंधाच्या रूपाचे आहेत. एकदां इन्द्रावरुण यांनां पाशयुक्त असें म्हटलें आहे, मात्र हे पाश

दोरीचे नव्हत (ऋ. ७.८४,२). पाश हा शब्द एकदांच अग्नीसंबंधानें वापरलेला आहे. त्यानें आपल्या भक्तांचे पाश शिथिल करावे अशी प्रार्थना तेथें केली आहे (ऋ. ५.२,७). यावरून हे पाश वरुणाचें वैशिष्ट्य द्योतक आहेत हें स्पष्ट होतें. मित्रावरुण हे असत्य दूर करणारे, त्याचा द्वेष करणारे व त्याबद्दल शिक्षा करणारे आहेत असे उल्लेख येतात (ऋ. १. १५२,१; ७.६०,५; ७.६६,१३). त्यांच्या सत्कारांत कसूर करणारांनां ते रोग जडवितात (ऋ. १.१२२,९). उलटपक्षीं अनुताप झालेल्यांनां वरुण दयेनें वागवितो. दोरीप्रमाणें तो अनुतप्तांचें पापबंधन सोडवितो (ऋ. २.२८,५; ५.८५,७ व ८). मनुष्य स्वतः जें पाप करितात तेवढ्याचपासून तो त्यांची सुटका करितो असें नव्हे तर तो त्यांच्या पितरांनीं केलेल्या पापांच्या बंधांतूनहि त्यांची मुक्तता करितो (ऋ. ७.८६,५). प्रतिदिनीं त्याचे नियम मोडणारा असाहि जो त्याचा भक्त असेल त्याचें तो रक्षण करितो (ऋ. १.२५,१). हयगयीनें ज्यांच्या हातून त्याचे नियम मोडले जातात त्यांच्याकडे तो दयार्द्र दृष्टीनें पाहतो (ऋ. ७.८९,५). इतर देवतांस केलेल्या प्रार्थनांत ऐहिक संपत्ति मागितलेली असते, त्याप्रमाणें वरुण आणि आदित्य यांचें असें एकहि सूक्त नाहीं कीं ज्यांत अपराधाबद्दल क्षमा करण्याची प्रार्थना त्या देवतांस केलेली नाहीं.

वरुणाजवळ शेंकडों किंवहुना हजारों उपाय आहेत. तो मृत्यूला दूर करितो व पातकापासून मुक्तता करितो (ऋ. १.२४,९). तो आयुष्य कमी करूं शकतो किंवा वाढवूं शकतो (ऋ. १.२४,२१; १.२५,१२; ७.८८,४; ७.८९,१). त्याला धीर 'अमृतस्य गोपा' म्हटलेलें आहे (ऋ. ८.४२,२); तसेंच आनंदानें शासनकरणारे वरुण व यम या दोन राजांची परलोकीं गांठ पडावी अशी जी पवित्र इच्छा ती इच्छा हा वरुण मनामध्यें स्थिर करितो (ऋ. १०.१४,७); आपल्या भक्तांशीं वरुण मित्रत्वाच्या नात्यानें वागतो (ऋ. ७.८८, ४ ते ६); त्याचा भक्त फक्त वरुणाच्या स्वर्गीय धामामध्यें त्याच्याशीं आत्मैक्य भोगतो आणि केव्हां केव्हां आपल्या मनश्चक्षूनें त्याचें दर्शन घेतो (ऋ. १.२५,१८; ७.८८,२).

आतांपर्यंत वेदांतील ज्या वरुणविषयक गोष्टी मांडल्या त्यांवरून वरुणाच्या भौतिक मूलबीजासंबंधानें खालील सिद्धांत निघतात. मित्रदेवतेसंबंधानें जे उल्लेख आलेले आहेत ते उल्लेख व वरुणविषयक उल्लेख एकत्र घेतले असतां मित्र आणि वरुण यांचा संबंध सूर्याशीं फार निकटचा आहे व या दोघांत वरुण ही देवता श्रेष्ठ आहे हें स्पष्ट होतें. मित्र आणि वरुण ह्यांच्यांत इतकें साम्य आहे कीं, मित्रामध्यें वैशिष्ट्यद्योतक असा एकहि स्वतंत्र गुण दाखविलेला नाहीं. त्याची आणि वरुणाची बहुतेक नेहमींच जोड घालून दिलेली असल्यानें वरुणाच्या प्राधान्यामुळें मित्राचें व्यक्तित्व नाहींसें झालें असें दिसतें. आवेस्तांतील पुराव्यावरून मित्र ही देवता आदित्यदेवता आहे असें सर्व संशोधक कबूल करतात. तेव्हां प्रारंभीं वरुण ही कांहींतरी वेगळ्या निसर्गघटनेची प्रतिनिधिभूत देवता असावी. सामान्य मत असें आहे कीं, सर्वव्यापि आकाशाला वरुण हें नांव दिलें गेलें. सूर्यापेक्षां आकाश हें कोणाहि पाहणाराला कितीतरी पटीनें विस्तृत दिसतें. या विस्तृत आकाशक्षेत्राला अगदीं लहानसा सूर्य आपल्या दैनिक मार्गक्रमणांत व्यापीत असतो. अर्थातच हें आकाश व सूर्य यांजमध्यें आकाशालाच मनुष्याची कल्पना श्रेष्ठ देवतेचें स्थान देईल. सूर्य दररोज याच आकाशांतून भ्रमण करितो. आकाशाव्यतिरिक्त तो कांहीं कोठें दिसत नाहीं यामुळें आकाश आणि सूर्य यांचें निकटचें नातें सहजच कल्पिलें गेलें असावें. आकाशाचा नेत्र सूर्य ही कल्पना अगदीं स्पष्ट आहे. मित्राचा नेत्र सूर्य ही कल्पना जोंपर्यंत मित्राचें वैशिष्ट्य नाहींसें होऊन वरुणामध्यें तो मिळून गेला नव्हता तोंपर्यंत प्रचारांत येणें शक्य नव्हतें. असें असून सूर्याचा नेत्र असाहि उल्लेख ऋग्वेदांत कित्येकवेळां आलेला आहे. सूर्याला दूरचें पाहणारा हें जें विशेषण लावतात तें आकाशालाहि तितकेंच लागू पडतें. आकाशाला केवळ दिवसाच नव्हे तर रात्रींहि चंद्र आणि नक्षत्रें यांच्याद्वारा पाहतां येतें ही कल्पनाहि आकाशासंबंधानें सहज निघूं शकते. वरुणाच्या कल्पनेंत त्याचा भौतिक पाया दूर होऊन तो उंच आकाशांत मित्रासह रथस्थ होतो असा जो भाग आलेला आहे त्याचा सहज उलगडा होतो. कारण वरुणाचा आदित्यदेवतेशीं संबंध आहे व ऋग्वेदांतील प्रत्येक प्रमुख देवता रथस्थ होऊन मार्ग आक्रमण करिते. यापुढें वरुणाचा राजवाडा उंच आकाशांत आहे आणि त्याचा वृष्टीशीं संबंध आहे, ह्या गोष्टीविषयीं विचार करितां आकाशकटाहप्रतिनिधीभूत अशी जी देवता मुळांत होती तिच्या संबंधानें या कल्पना अगदीं यथार्थ आहेत, असेंच दिसून येईल. तसेंच सर्वांचा शास्ता ही पदवी जर एखाद्या भौतिक घटनेला कल्पनेच्या उत्क्रांतींत मिळावयाची तर ती आकाशालाच प्रथम मिळेल, हें उघड आहे. कारण या आकाशाचा मोठा विस्तार पाहून व पृथ्वीच्या तें अतिशय वरतीं आहे, तें सर्व पृथ्वीला व्यापून आहे आणि त्याचे ठिकाणीं नियमबद्ध क्रमानें पुनःपुनः घडणाऱ्या अशा सर्वांत आश्चर्यकारक घटना, ताऱ्यांच्या हालचाली इत्यादि अनुभवास येतात हें पाहून त्याचे ठिकाणीं देवतात्व कल्पावयाचें तर सहजच ही देवता अहर्निश मनुष्यांच्या कृतीकडे लक्ष देत आहे व कधींहि न ढळणाऱ्या अशा नियमांची संरक्षक आहे, या प्रकारचीच कल्पना केली जाईल. ग्रीक दैवतेतिहासांत झ्यूस (द्यौः) या देवतेच्या संबंधांत कल्पनेची अशीच उत्क्रांति झालेली आढळते. झ्यूस हें पहिल्यानें फक्त एक आकाशवाचक नाम होतें परंतु पुढें आकाशाच्या उंच प्रदेशांत राहणाऱ्या देवांचा शास्ता एक

आहे, तो मेघांनां एकत्र करितो, त्याचे जवळ विद्युद्रूपी वज्र आहे, त्याची इच्छा तोच या जगताचा कायदा आहे, अशी आकाशासंबंधानें कल्पना तयार होऊन झ्यूस हें नांव या सर्वश्रेष्ठ देवाला लावण्यांत आलें.

ऋग्वेदांतील सर्वांत श्रेष्ठ देवतांमध्यें जें वैयक्तिक गुणसंबंधांत अंतर सांपडतें त्याचें कारण हें आहे कीं, या देवांचा संबंध मूलतः निरनिराळ्या भौतिक घटनांशीं आहे. आकाशांत प्रकाशासंबंधीं ज्या नियमित क्रमानें पुनः पुनः घडून येणाऱ्या गोष्टी आहेत त्यांशीं वरुणाचा संबंध असल्यानें, नैतिक व भौतिक सृष्टीच्या व्यवस्थानियमांचा प्रमुख संरक्षक हें नांव वरुणाला दिलेलें आढळतें. पंचमहाभूतांच्या झगड्यांत भाग घेणारा जो इन्द्र त्याला वेदकालीन युद्धशील भारतीयांनीं क्षत्रिय-राजा म्हणून कल्पिलें आहे हें ठीकच आहे. वादळासंबंधींच्या अंतरिक्षांतील घडामोडी कालदृष्ट्या अगदीं अनियमित व स्वरूपदृष्ट्या अत्यंत विविध असल्यानें त्यांच्याशीं संबंध असलेल्या इन्द्राच्या स्वभावांत सहजच नानातऱ्हेचा लहरीपणा कल्पिलेला आहे, व इन्द्रासंबंधानें ऋग्वेदांतील इतर देवतांपेक्षां कितीतरी अधिक अद्भुत कथा निर्माण झाल्या आहेत.

यज्ञविकासाच्या काळांत प्रजापति हा सर्वश्रेष्ठ देव झाल्यावर वरुणाचे श्रेष्ठ देव या नात्याचे गुण सहजच कमीकमी होत गेले आणि त्याच्या मूळच्या सत्ताक्षेत्रापैकीं फक्त जलप्रदेशावरील सत्ता त्याजकडे राहिली. याप्रमाणें होत होत शेवटीं वेदोत्तरकालीन दैवतेतिहासांत वरुण हा समुद्राचा पति म्हणजे भारतीय 'नेप्च्युन' झालेला आहे.

ओल्डेनबर्ग यानें अशी कल्पना काढली आहे कीं, चंद्रालाच पूर्वी वरुण म्हणत असत. त्याची अशी उपपत्ति आहे कीं, आदित्यदेवता सात होत्या या आदित्यदेवता व अवेस्तामधील अमेशस-स्पेन्त या देवता एकच होत. या सात आदित्यदेवतांपैकीं वरुण आणि मित्र म्हणजे अनुक्रमें चंद्र व सूर्य होत व पांच ग्रह हे खालच्या प्रतीचे पांच आदित्य होत. ओल्डेनबर्गचें असेंहि म्हणणें आहे कीं, वरुण आणि मित्र ह्या इंडोयूरोपीय देवता नसून एका सेमिटिक जातींतून इंडो-इराणी कालखंडांत या देवता उसन्या घेतल्या गेल्या. वरुणाची कल्पना याप्रमाणें उसनी घेतली गेली तेव्हां त्या कल्पनेंत पूर्वी जे गुण अंतर्भूत झालेले होते त्यांपैकीं अगोदरच पुष्कळ नाहींसे झाले असले पाहिजेत. वरुणाला भौतिक स्वरूपापेक्षां पुष्कळसें नैतिक स्वरूप आलेलें असलें पाहिजे. असें नसतें तर मित्र म्हणजे सूर्य या देवताला वरुणानें म्हणजे चंद्रदेवतेनें इंडो-इराणी काळांत इतकें मागें टाकिलें नसतें, व त्याला नैतिक सृष्टींतील शास्ता या नात्यानें श्रेष्ठ अशी कल्पनात्मक पदवी अवेस्तांत (अहुरमझ्द म्हणून) व वेदांत (वरुण म्हणून) प्राप्त झाली नसती. ही ओल्डेनबर्गची उपपत्ति ऋग्वेदांत वरुणाच्या ज्या स्वभावकल्पना आल्या आहेत त्यांशीं जुळत नाहीं. त्याचप्रमाणें ही कल्पना पत्करली तर वरुण आणि ग्रीक लोकांचा ओरेनास यांजमध्यें कांहींहि संबंध नाहीं असें गृहीत धरावें लागतें. वरुण हा सेमेटिक लोकांपासून उसना घेतला असें म्हणण्यास एकेश्वरी विचार यहुदी लोकांच्या परंपरेंतून काढण्याचा मोह थोडाबहुत कारण झाला असेल काय असा संशय येतो.

वरुण ही देवता इंडो-इराणी काळांतील आहे यांत संशय नाहीं. कारण अवेस्तांतील अहुरमझ्द हा गुणांच्या दृष्टीनें वरुणाशीं एकरूप आहे. त्याचें नांव मात्र निराळें आहे. वरुण हें नांव देखील इंडो-यूरोपीय असावें असें म्हणण्यास जागा आहे. इतकें तरी खरें कीं, ग्रीक ओरेनास आणि वरुण या शब्दांचा संबंध लावतांना जरी कांहीं वर्णविपर्ययविषयक नियमांच्या अडचणी येतात तरी कांहीं तुलनात्मक भाषाशास्त्रांचे अभ्यासक या दोन शब्दांतील ऐक्याचें नातें अद्यापिहि मानतात.

वरुण हा शब्द इंडो-यूरोपिय काळांतील असो किंवा त्यानंतरच्या काळांतील असो, तो वृ=आच्छादणें या धातूपासून निघाला असावा व त्याचा अर्थ सहजच व्यापणारा असा झाला. ऋग्वेद १.८९,३ या ठिकाणीं सायणाचार्य वरुण शब्दांत हाच धातु गृहीत धरतात, व वरुण हा आपल्या पाशांमध्यें दुष्टांनां अडकवितो असें भाष्य करितात. इतरत्रहि (तै. सं. १.८,१६) अंधकाराप्रमाणें व्यापून टाकणारा, वेष्टणारा असें वरुण या शब्दावर सायणाचार्यांनीं भाष्य केलें आहे. हा शब्द इंडो-यूरोपीय असेल तर तो द्यौः (म्हणजे आकाश) याचा गुणवाचक असेल, व पुढें ग्रीसमध्यें आकाशाचें नित्य विशेषण होऊन भारतामध्यें हा आकाशांतील श्रेष्ठ देव झाला असेल. इन्द्र व वरुणाचा संबंध पूर्वी दाखविला आहे.

**अग्नि.**—अग्नि ही भूमिस्थ देवतांतील प्रमुख देवता आहे. होमांत प्रत्यक्ष संबंध अग्नीशीं येतो व अग्नि ही देवता देखील आहे यामुळें अग्नीचें विशेष महत्त्व आहे. यज्ञात्मक अग्निदेवतेचें विधिविषयक वेदकाव्यांत विशेष महत्त्व आहे. वैदिक देवतांमध्यें इन्द्राच्या खालोखाल अग्निच येतो. प्रामुख्यानें त्याचीं अशीं २०० सूक्तें ऋग्वेदांत आहेत व दुसऱ्याहि कित्येक सूक्तांमध्यें इतर देवतांबरोबर त्याचीहि प्रार्थना केलेली आढळते. या देवतेचें नांव व तिच्या मूळ भौतिक स्वरूपाचें नांव एकच म्हणजे अग्नि हें असल्यानें त्याच्या शरीराचें जें वर्णन येतें त्या वर्णनांत मनुष्यत्व अगदीं थोडकेंसेंच दिसतें. त्याचे जे अवयव वर्णन केलेले सांपडतात ते यज्ञाग्निसंबंधीं जीं रूपें आपणांस दृग्गोचर होतात त्यांवरील रूपकांसारखे स्पष्ट दिसतात. तो घृतपृष्ठ आहे (ऋ. ५.४,३); तो घृतमुख आहे (ऋ. ३.१,११); त्याची जिव्हा सुंदर आहे (ऋ. १.१४,७); तो घृतकेश आहे (ऋ. ८.४९,२);

ज्वाला हेच त्याचे केश होत ( ऋ. १.४५,६ ); त्याचे केश तपकिरी रंगाचे आहेत ( ऋ. ३.२१३ ); त्याची दाढीहि तशीच आहे ( ऋ. ५.७,७ ); त्याच्या दंष्ट्रा तीक्ष्ण आहेत ( ऋ. ८.४९,३ ); त्या ज्वालायुक्त आहेत ( ऋ. १.५८,५ ); त्याचे दांत सुवर्णमय व चकचकीत आहेत ( ऋ. ५.२,३; ५.७,४ ); त्याचे सुळे लोहमय आहेत ( ऋ. १०.८७,२ ); एका ठिकाणीं तो अपाद आणि अशीर्ष आहे असें वर्णन आहे ( ऋ. ४.१,११ ), दुसरीकडे त्याचें शीर्ष ज्वालायुक्त आहे ( ऋ. ७.३,१ ); तो त्रिशीर्ष असून त्याचे सात किरण आहेत ( ऋ. १.१४६,१; २.५,३ ), असें वर्णन आहे. त्याला सर्व बाजूंनीं मुखें आहेत ( ऋ. २.३,१ ); त्याला तीन जिव्हा आहेत ( ऋ. ३.२०,२ ); किंवा सात जिव्हा आहेत ( वा. सं. १७.८९ ) असेंहि वर्णन आढळतें. त्याच्या घोड्यांनांहि सात जिव्हा आहेत असें वर्णन आढळतें (ऋ. ३.७,२); या सात जिव्हांनां निरनिराळीं नांवें सांपडतात. घृत हा अग्नीचा नेत्र आहे ( ऋ. ३.२६,७ ); अग्नि चतुर्नेत्र आहे ( ऋ. १.३१,१३ ); सहस्रनेत्र आहे (ऋ. १.७९१२); सहस्रशृंग आहे ( ऋ. ६.१,८ ); मनुष्यास देण्याकरितां पुष्कळशा देणग्या तो आपल्या हातांत ठेवितो ( ऋ. १.७२, ८ ); इन्द्राप्रमाणें त्याला सहस्रमुष्क असें म्हटलें आहे ( ऋ. ८.१७,३२ ); त्याला तिरंदाज म्हटलें आहे ( ऋ. ४. ४,१ ); त्याची तिरंदाजाशीं तुलना केली आहे ( ऋ. १.७०, २१ ). लोखंडाची पात घांसून तिला तिरंदाज धार आणतो त्याप्रमाणें अग्नि आपल्या ज्वालेला धार आणतो असें म्हटलें आहे.

पुष्कळ प्राण्यांशीं त्याचें साम्य दाखविलें आहे. हें साम्य दाखवितांना त्याचें स्वरूप वर्णन करण्याचा उद्देश मुख्य नसून त्याच्या क्रिया व धर्म स्पष्ट करण्याचा हेतु असतो. त्याप्रमाणेंच त्याला वारंवार वृषभ असें म्हटलें आहे ( ऋ. १.५८,५ ). अग्नि हा ताकददार बैल आहे व त्याची मान भरदार आहे ( ऋ. ५.२,१२ ). बैलाप्रमाणें तो डुरकण्या फोडतो ( ऋ. १०.८,१ ). त्याच्यामध्यें पुरुषत्वाची विपुलता आहे ( ऋ. ४.५,३ ). त्याला शिंगें आहेत ( ऋ. ५.१,८; ६.१६,३९ ); हीं शिंगें घासून तो त्यांनां धार आणीत असतो ( ऋ. ८.४९,१३ ). हीं शिंगें तो हालवीत असतो आणि यामुळें त्याला धरतां येत नाहीं ( ऋ. १.४१,६ ); तो जन्मतो तेव्हां त्याला वत्स ( गोऱ्हा ) असें नांव पुष्कळवेळां दिलेलें आढळतें. त्याची अश्वाशीं तुलना केलेली आढळते ( ऋ. १.५८,२ ); त्याला अश्वहि म्हटलेलें आहे ( ऋ. १. १४९,३; ६.१२,६ ). अश्वाप्रमाणें तो आपली शेपटी हालवितो ( ऋ. २.४,४ ); यजमानानें शुद्ध केलेला अग्नि हा खरारा करून स्वच्छ केलेल्या घोड्याप्रमाणें आहे ( ऋ. १. ६०,५ ). यजमान घोड्याप्रमाणें याला चेतना आणतात व गति देतात ( ऋ. ७.७,१). ते याला घोड्याप्रमाणें नरम करण्यासाठीं व आपल्या इच्छेप्रमाणें त्याजकडून काम घेण्यासाठीं यत्न करितात ( ऋ. २.५,१; ३.२७,३ ). देवांनां घेऊन येणाऱ्या घोड्याप्रमाणें अग्नीला यजमान उद्दीपित करितात ( ऋ. ३.२७,१४ ). यज्ञभूमीमध्यें धुरेला अग्नि बांधिला जातो ( ऋ. २.२,१ ) ; देवांकडे हविर्द्रव्य पोंचविण्यासाठीं त्याची रथाचे ठिकाणीं योजना करितात ( ऋ. १०. ५१,७ ). खिंकाळणारा घोडा असें अग्नीला म्हटलें आहे ( ऋ. १.३६,८ ); व कोठें अशा घोड्याची त्याच्याशीं तुलना केलेली आहे ( ऋ. ३.२६,३ ); जयशाली घोड्याप्रमाणें हा अग्नि आहे ( ऋ. ८.९१,१२ ). धोक्यांतून वचावणाऱ्या घोड्याप्रमाणें हा आहे ( ऋ. ४.२,८ ).

अग्नि हा पक्ष्याप्रमाणें आहे. तो आकाशांतील गरुडपक्षी आहे ( ऋ. ७.१५,४ ); तो दिव्यपक्षी आहे ( ऋ. १.१६४, ५२ ); जलामध्यें त्याचें वास्तव्य असल्यानें तो जलपक्षी हंस यासारखा आहे ( ऋ. १.६५,९ ); झाडावर पक्षी वसावा त्याप्रमाणें अग्नि वन आपल्या ताब्यांत घेतो ( ऋ. १.६६,२; ६.३,५; १०.९१,२ ); अग्नीला पंख आहेत (ऋ. १.५८,५; २.२,४ ); तो उड्डाण करीत मार्गक्रमण करतो ( ऋ. ६.३,५; ६.४,६ ); तो देवांकडे त्वरनें उडून जातो (ऋ. १०.६,४ ); तो फूत्कार करणारा साप आहे असें वर्णन एकदां आलेलें आहे ( ऋ. १.७९,१ ).

अचेतन वस्तूंशीं अग्नीचें पुनःपुनः साम्य दाखविलें आहे. सूर्य सुवर्णासारखा असतो त्याप्रमाणें अग्निहि असतो. ( ऋ. २.२,४;७,३,६ ); तो आपली जिव्हा पुढें करतो तेव्हां तो कुऱ्हाडीप्रमाणें दिसतो ( ऋ. ६.३,४ ); कुऱ्हाडीची उपमा त्याला आणखीहि अनेक वेळां दिलेली आहे ( ऋ. १.१२७,३ ); त्याला रथ असें म्हटलें आहे ( ऋ. ३. ११,५ ); किंवा रथाची उपमा दिलेली आहे ( ऋ. १. १४१,८ ); रथाप्रमाणें तो संपत्ति घेऊन येतो ( ऋ. १. ५८,३; ३.१५,५ ) व युद्धामध्यें तो भीति उत्पन्न करितो ( ऋ. १.६६,६ ); त्याची रथाशीं तुलना करतांना हा रथ हांकणारा दुसरा कोणी आहे अशीहि कल्पना असते. भरलेल्या रथाप्रमाणें त्याला यज्ञाकडे घेऊन येतात असें वर्णन आढळतें ( ऋ. १०.१७६,३ ); धन व वडिलार्जित संपत्ति यांशींहि अग्नीची तुलना केलेली आढळते ( ऋ. १. ५८,६; १.७३,१ ).

त्याचें अन्न म्हणजे लांकूड ( ऋ. २.७,६ ); किंवा घृत ( ऋ. ७.३,१ ) हें आहे. त्याचें पेय घृत हें आहे ( ऋ. २.७,६;१०,६९,२ ); त्याच्या मुखांत घृत ओतून त्याला पुष्ट करितात ( ऋ. ३.२१,१;५,११,३ ); तो तेल खाणारा आहे ( अ. वे. १.७,२ ); तो आपल्या तीक्ष्ण दांतांनीं रानें चावून टाकतो ( ऋ. १.१४३,५ ); तो आपल्या जिव्हेनें तीं खाऊन काळीं करतो ( ऋ. ६.

६०,१०;१०,८९,२ ); तो सर्वभक्षक आहे ( ऋ. ८.४४,२६ ); दिवसांतून त्याला तीनदां भोजन मिळतें ( ऋ. ४.१२,१ ); त्याला केव्हां केव्हां हुतद्रव्य खाण्याचें देवांचें मुख व देवांची जिव्हा असें म्हटलें आहे ( ऋ. २.१,१३ ); त्याच्या ज्वाला म्हणजे चमचे असून तो या चमचांनीं देवांनां त्यांचें खाद्य देतो व त्यांचा सत्कार करतो ( ऋ. १.७६,५;१०,६,४ ). पुष्कळ वेळां हविर्द्रव्य अग्नीनें स्वतः भक्षण करावें अशी प्रार्थना केलेली आहे (ऋ. ३.२१,१,४); अग्नीमध्यें जें घृत टाकतात तें घृत घेण्यासाठीं तो उभा राहतो ( ऋ. १.१२७,१ ). त्याचें सामान्य हविर्द्रव्य जरी इंधन किंवा घृत असलें तरी केव्हां केव्हां स्वतंत्रपणें व इतर देवतांबरोबर बहुतेक नेहमीं त्याला सोम पिण्यासाठीं बोलाविलेलें असतें ( ऋ. १.१४,१०; १.१९,९; १.२१,१ व ३; २.३६,४ ); एका सूक्तांत त्याला 'सोमगोपा' असें म्हटलेलें आहे ( ऋ. १०.४५,५ व १२ ); त्याला यज्ञार्थ येण्यासाठीं आह्वान केलेलें आहे ( ऋ. १०.९८,९ ); व तेथें यज्ञामध्यें कुशासनावर तो देवांबरोबर वसतो असें वर्णन पुष्कळ वेळां आलेलें आहे ( ऋ. ५.११,२; ३.१४,२; ५.२६,५; ७.११,२ ).

अग्नीच्या तेजस्विपणासंबंधानें अर्थातच पुष्कळ वर्णनें आहेत. त्याची ज्वाला तेजस्वी आहे ( ऋ. ७.१५,१० ); तो शुभ्रवर्णाचा आहे ( ऋ. १.४१,१; ५.२,३ ); त्याचें रूप सुवर्णासारखें आहे ( ऋ. ४.३,१; १०.२०,९ ); तो सूर्याप्रमाणें प्रकाशतो ( ऋ. १.१४९,३; ७.३,६ ); उषःकालच्या किरणाप्रमाणें त्याचें तेज असतें. वर्षणाऱ्या मेघाच्या विद्युल्लतेप्रमाणें त्याचें तेज असतें ( ऋ. १०.९१,४–५). रात्रीच्या वेळीं देखील तो प्रकाशतो ( ऋ. ५.७,४ ). सूर्याप्रमाणें तो आपल्या किरणांनीं अंधकाराचा नाश करितो ( ऋ. ८.४३,३२ ). तो अंधकाराचा नाश करणारा व रात्रीच्या अंधकारांतून पलीकडे पाहणारा आहे ( ऋ. १.९४,५; ७.९,२ ); तो उद्दीपित केला म्हणजे अंधकाराचे दरवाजे उघडून टाकतो ( ऋ. ३.५,१ ); अंधकारानें व्याप्त झालेली पृथ्वी आणि आकाश अग्नि जन्मला म्हणजे दृग्गोचर होतात ( ऋ. १०.८८,२ ). त्याला 'उषर्बुधः' म्हणजे पहांटे उठणारा असें इतर देवतांनां व्यक्तिशः न मिळणारें नांव आहे ( देवतांनां समुच्चयानें हें नांव केव्हां केव्हां दिलेलें आढळतें ).

अग्नीचा मार्ग व त्याचीं रथचक्रें काळीं आहेत ( ऋ. १.१४९,७; २.४,६–७; ६.६,१ ); त्याचे घोडे मार्गांत काळ्या खुणा करीत चालतात. वाऱ्यानें हा अग्नि रानांतून जोरानें धांवत जातो ( ऋ. १.५८,४ व ५ ); तो रानावर हल्ला करतो, आणि पृथ्वीचे केश कातरतो ( ऋ. १.६५,८ ); न्हाव्यानें दाढी करावी त्याप्रमाणें तो पृथ्वीचे केस कापतो ( ऋ. १०.१४२,४ ).

त्याच्या ज्वाला समुद्राच्या लाटांप्रमाणें गर्जना करतात ( ऋ. १.४४,१२ ); त्याचा आवाज मोठ्या वाऱ्याप्रमाणें किंवा आकाशांतील गर्जनेप्रमाणें असतो ( ऋ. ५.२५,८; ७.३,६ ); गर्जना करणाऱ्या द्यौःप्रमाणें (१०.४५,४); अथवा पर्जन्याप्रमाणें (८.४१,५); अथवा सिंहाप्रमाणें (३.२,११); तो गर्जना करतो. तो रानांतील वैलावर हल्ला करतो तेव्हां बैलाप्रमाणें डुरकण्या फोडतो. आणि त्याच्या ठिणग्या तृण भक्षण करूं लागल्या म्हणजे जो आवाज होतो तो ऐकून पक्षी घाबरून जातात ( ऋ. १.९४,१० व ११ ); मरुद्गणांचा आवाज किंवा स्वैर सुटलेलें सैन्य किंवा वज्रपात ह्यांचा निग्रह करितां येत नाहीं त्याप्रमाणें अग्नीचा निग्रह करितां येत नाहीं.

अग्नीच्या ज्वाला ऊर्ध्वमुख असतात ( ऋ. ६.१५,२ ); वाऱ्याच्या योगानें त्याच्या ज्वाला आकाशांत उड्डाण करितात ( ऋ. ८.४३,४ ); त्यांचा रक्तवर्ण धूर आकाशांत उंच जातो ( ऋ. ७.३,३ ); खांब रोंवणाऱ्याप्रमाणें तो आपल्या धुराचा खांब आकाशाला देतो ( ऋ. ४.६,२ ); तो आपल्या शीर्षभागानें आकाशाला स्पर्श करितो व सूर्याच्या किरणांत आपले किरण मिसळतो ( ऋ. ७.२,१ ); तो आपल्या जिह्वेनें सगळें आकाश व्यापतो ( ऋ. ८.६१,१८ ); उंच आकाशांतील व सूर्याचे खालील जलाजवळ तो जातो ( ऋ. ३.२२,३ ); दिवोदासाचा अग्नि पृथ्वीपासून देवांकडे पसरत पसरत आकाशाच्या शिखरावर जाऊन उभा राहिला ( ऋ. ८.९२,२ ); धूमकेतु हें विशेषण अग्नीच्या संबंधानें वारंवार आलें असून तें फक्त अग्नीलाच लावलेलें आढळतें.

अग्नि विद्युद्रथांतून जातो ( ऋ. ३.१४,१ ); त्याचा रथ तेजस्वी असतो ( ऋ. १.१४०,१ ); तो शुभ्रप्रकाशमान, सुवर्ण व सुंदर असतो (ऋ. १.१४१,१२; ५.१,११; ४.१,८; ४.२,४ ); त्याला घृतपृष्ठ, रोहित, पिंगट, सुंदर, विश्वरूपी, चपल, असे दोन किंवा चार घोडे ओढित असतात ( ऋ. १.१४,६; ७.४२,२; १०.७०,२; २.४,२ ); तो हे घोडे देवांनां बोलावून आणण्याकरितां जोडतो (ऋ. १.१४,१२; ३.६,६ ); हा अग्नि यज्ञयागासंबंधांत सारथ्याचें काम करणारा आहे ( ऋ. १.२५,३; १०.९२,१ ); आपल्या घोड्यांच्या साहाय्यानें तो आपल्या रथांत देवांनां घेऊन येतो ( ऋ. ३.६,९ ); देवांबरोबर तो एकाच रथांत बसून येतो (ऋ. ३.४,११; ७.११,१ ); किंवा तो त्यांच्या पुढें वेगळ्या रथांत येतो ( १०.७०,२ ); अंतरिक्षांतून मरुद्गणांनां, आकाशांतून इन्द्राला व वरुणाला तो यज्ञाचे ठिकाणीं आणितो ( ऋ. १०.७०,११ ).

वैदिक कवींच्या सामान्य दृष्टीप्रमाणें अग्नीचा पिता द्यौ होय. द्यौनें अग्नीला उत्पन्न केलें ( ऋ. १०.४५,८ ); अग्नि हा द्यौचें आपत्य आहे ( ऋ. ४.१५,६; ६.४९,२ ); असु-

राच्या पोटीं याचा जन्म झाला ( ऋ. ३.२९,४ ); हा द्यावापृथ्वींचा पुत्र आहे, असें अनेक वेळां म्हटलें आहे ( ऋ. ३.२,२; ३.३,११; ३.२५,१; १०.१,२; १०.२,७ ); त्वष्टा आणि जलें यांचें अपत्य, आकाश आणि पृथ्वी यांचें अपत्य असेंहि कित्येक वेळां अग्नीला नांव दिलें आहे ( ऋ. १०.२,७; १०.४६,९ ); त्वष्ट्याचें अपत्य, किंवा जलांचें अपत्य असेंहि अग्नीला कोठें कोठें म्हटलें आहे ( ऋ. १.९५,२; १०.९१,६ ); उषांनीं, अग्नि सूर्य आणि यज्ञ यांनां जन्म दिला असेंहि विधान आढळतें (७.७८,३); इन्द्राविष्णू यांनीं अग्नि सूर्य व उषा यांनां जन्म दिला ( ऋ. ७.९९,४ ); इन्द्रानें दोन दगडांच्यामध्यें अग्नीला उत्पन्न केलें ( ऋ. २.१२,३ ); असेंहि म्हटलें आहे. इळाचा पुत्र अग्नि आहे ( ऋ. ३.२९,३ ); अग्नि हा यज्ञाचा गर्भ आहे ( ऋ. ६.४८,५ ); असेंहि वर्णन आहे. केव्हां केव्हां असें म्हटलें आहे कीं, आर्यांसाठीं प्रकाश व्हावा म्हणून देवांनीं अग्नीला उत्पन्न केलें ( ऋ. १.५९,२; ६.७,१; ८.९१,१७;) देवांनीं मनुष्यासाठीं अग्नि तयार केला ( ऋ. १०.४६,९ ); देवांनीं मनुष्यांमध्यें अग्नि आणून ठेविला ( ऋ. १.३६,१०; २.४,३; ६.१६,१ ); अग्नि हा देवांचा पिता असेंहि म्हटलें आहे ( ऋ. १.६९,१ ); हीं परस्परविरोधी वर्णनें कोणत्या भिन्न दृष्टीनें अस्तित्वांत आलीं, त्या दृष्टी सहज समजण्याजोग्या आहेत.

अग्नीमध्यें मानवी गुणांचा आरोप फार थोडा केला असल्यानें अग्निकथांमध्यें त्याच्या पराक्रमाचें वर्णन फार थोडें आहे. या कथांत मुख्यतः त्याच्या यज्ञांतील कामगिरीचें वर्णन असून त्याचे विविध जन्म, त्याचीं विविध रूपें व निवासस्थानें यांचाच त्यांत विशेष भाग आहे.

अग्नीच्या जन्मासंबंधाचे जे निरनिराळे कथाभाग आहेत, त्यांच्यांतील वर्णनें भिन्न व किंचित् विरोधी दिसण्यासारखीं असलीं तरी त्यांत खरोखरीचा विरोध नाहीं. उत्पत्तिस्थानाचा भेद हाच या वर्णनांतील भेदाच्या मुळाशीं आहे. अग्निजन्माच्या कथांत अरणींच्या घर्षणानें त्याचा प्रतिदिनीं भूमीवर जन्म होतो, ही गोष्ट वारंवार येते ( ऋ. ३.२९,२; ३.२३,२; ३.२३,३; ७.१,१; १०.७,९ ). या जन्माच्या संबंधांत वरची अरणी हा त्याचा पिता व खालची ही त्याची माता ( ऋ. ३.२९,३ ); दोन्ही अरणी त्याच्या माता आहेत असेंहि वर्णन येतें ( ऋ. १.३१,२ ). लहान अपत्याप्रमाणें या दोन काष्ठांपासून अग्नीचा जन्म होतो, व हें अपत्य हातीं लागावयाला फार कठिण असतें असें वर्णन असतें (ऋ. ५.९,३; ५.९,४); शुष्क काष्ठांतून दैदीप्यमान अग्निदेवाचा जन्म होतो ( ऋ. १.६८,२ ). हें अग्निरूप अपत्य जन्मल्यावरोबर आपल्या मातापितरांनां भक्षण करतें. त्याची माता त्याला दूध पाजूं शकत नाहीं. घर्षणानें अग्नि उत्पन्न करतात या क्रियेला उद्देशून मनुष्य अग्नि उत्पन्न करतात असें म्हटलें आहे ( ऋ. १.६०,३; ४.१,१; ७.१,१ ). अग्नीला उत्पन्न करणाऱ्या ज्या दहा कन्यका ( ऋ. १.९५,२ ) त्या म्हणजे दहा अंगुली होत. या अंगुलींनीं वरची अरणी घुसळली जाते.

अग्नीला सहसःसुनु म्हणजे शक्तीचा पुत्र असें जें नांव आहे तें पडण्याचें कारण म्हणजे घर्षणानें अग्नि उत्पन्न करण्याच्या क्रियेंत पुष्कळच शक्ति खर्चावी लागते हें असावें. पृथ्वीवर जोरानें घर्षण करून मनुष्यें अग्नि उत्पन्न करितात. या विधानांवरून ( ६.४८,५ ) वरील कल्पनेला पुष्टि मिळते. घर्षणानें अग्नि उत्पन्न करावयाचा तो सूर्योदयापूर्वी करावयाचा नाहीं असा एक उत्तरकालीन विधि आहे ( मै. सं. १.६,१० ). रोज सकाळीं अग्नि नव्यानें उत्पन्न केला गेला जात असल्यानें त्याला यविष्ठ किंवा यविष्ठ्य हें नांव सहजच दिलेलें आढळतें. हेंहि नांव फक्त यालाच दिलेलें सांपडतें. त्याचे नवीन जन्म त्याच्या जुन्या जन्माहून निराळे आहेत ( ऋ. ३.१,२० ); वृद्ध होऊन तो पुन्हां तरुणरूपानें जन्मास येतो ( ऋ. २.४,५); याप्रमाणें तो खरोखरी वृद्ध होत नाहीं (ऋ.१.२८,२); त्याचें नवें तेज त्याच्या जुन्या तेजाप्रमाणेंच असतें. ( ऋ. ६.१६,११ ); इतर देवांप्रमाणें अग्नीला तरुण असेंहि नांव असून त्याला वृद्धहि म्हटलें आहे. अग्नीइतका पुरातन यज्ञयाग करणारा नाहीं ( ऋ. ५.३,५ ); पहिला यज्ञ यानें केला ( ऋ. ३.१५,४ ); पूर्वीच्या उषःकालानंतर हा प्रकाशला ( ऋ. १.४४,१० ); पूर्वीच्या लोकांच्या यज्ञयागामध्यें अग्नीनें घेतलेला भाग पुनः पुनः उल्लेखिला आहे (ऋ. ८.४३,१३ ) इ. याप्रमाणें अतिप्राचीनकालीं व तदनंतरच्या कालीं अग्नि सारखेंच काम करीत असल्यानें त्याला पुरातन आणि यविष्ठ म्हणजे अगदीं तरुण अशीं दोनहि नांवें एकाच ठिकाणीं दिलेलीं आढळतात.

अग्नीचा काष्ठापासून जन्म होतो असें विधान विशेष वारंवार येतें ( ऋ. ६.३,३; १०.७९,७ ); वनस्पतींचा गर्भ ( ऋ. २.१,१४; ३.१,१३ ); वनस्पतीमध्यें ठेविलेला ( ऋ. १०.१,२ ); याप्रमाणेंहि वर्णन येतें. सर्व वनस्पतींत तो प्रविष्ट झाला आहे, किंवा सर्व वनस्पतींच्या प्राप्तीसाठीं तो खटपट करतो ( ऋ. ८.४३,९ ); वृक्षांचा गर्भ हें जें त्याचें नांव आहे ( ऋ. १.७०,४ ), किंवा वृक्षाचा व ओषधींचा गर्भ असें जें त्याला म्हटलें आहे ( ऋ. २.१,१ ) त्यांत झाडांच्या डाहाळ्यांच्या परस्परघर्षणापासून वनामध्यें अग्नि उत्पन्न होतो या गोष्टीचा संबंध असावा.

भूमीची नाभि असें जें अग्नीला नांव आहे (ऋ. १.५९,२), तें त्याचें भूमीवरील स्वरूप वर्णन करितें. होमाचा अग्नि वेदीवर ज्या स्थानीं स्थापिलेला असतो, त्या स्थानाला उद्देशून हें वरील नांव दिलेलें असावें. वैदिक विधीमध्यें उत्तरावेदीमधील अग्नीस ठेवण्याचा जो खळगा त्याला नाभि असें पारि-

भाषिक नांव आहे. अग्नीला देवांनीं अमृतत्वाचा म्हणजे अमरत्वाचा नाभि अथवा केंद्र केला हें जें अलंकारिक वर्णन (ऋ. ३.१७,४) आहे तें वरील पारिभाषिक नाभिशब्द अग्नीसंबंधानें उपयोगांत येऊं लागल्यानंतर सुचलें असावें. ऋग्वेदांत वेदिषद हा शब्द दोन वेळां येतो व तो केवळ अग्नीसंबंधानेंच येतो.

अग्नीच्या अंतरिक्षस्थ जलरूप जन्मस्थानाचा उल्लेख वारंवार येतो. अपांनपात् म्हणजे जलाचा पुत्र हें याप्रमाणें अग्नीचें नांव बनून शेवटीं अपांनपात् ही स्वतंत्र देवता झाली आहे. अग्नीला जलांचा गर्भ असेंहि म्हटलें आहे (ऋ. ३.११२ व १३); जलांच्या पोटांत अग्नि उद्दीपित होतो (ऋ. १०.४५,१; व अ. वे. १३. १,५०); जलांच्या अंकावर वाढलेला हा वृषभ आहे (ऋ. १०.८,१); ह्याला समुद्राचें परिवेष्टन आहे (ऋ. ८.९१,५); हा धनु म्हणजे मेघद्वीप यांतून खालीं उतरतो (१.१४४,५; १०.४,५); अग्नि हा तेजोयुक्त अंतरिक्षांत वास करणारा व गर्जना करणारा आहे. अशा ठिकाणीं विद्युत् म्हणजेच अग्नि असा अर्थ असावा. ऋग्वेदांतील कांहीं उत्तरकालीन सूक्तांमध्यें (ऋ. १०.५१; ३.१२४) अग्नीसंबंधानें अशी कथा आहे कीं, अग्नि हा जलामध्यें आणि ओषधींमध्यें लपून बसलेला होता व त्याला देवांनीं शोधून काढलें. ब्राह्मणग्रंथामध्यें ही कथा पुनःपुनः आली आहे. ही कथा मागील प्रकरणांत दिलीच आहे. अथर्व वेदामध्यें विद्युदग्नि व जलगर्भ अग्नि यांत फरक केला आहे. (अ. वे. ३.२१,१ व ७; ८.१,११); जलांतील अग्नीची वस्ती पृथ्वीवर आहे असें या वेदांत म्हटलें आहे (अ. वे. १२.१,३७); ऋग्वेदांत एके ठिकाणीं अग्नि सर्व प्रवाहांत असतो असें म्हटलें आहे (ऋ. ८.३९,८ व आप. श्रौ. सू. ५.२,१), उत्तरकालीन विधिविषयक मंत्रांत लहान जलाशय व जलकुंभ यांच्या संबंधांतहि जलाग्नीची प्रार्थना केलेली आहे. अगदीं जुन्या वेदकालीं देखील अग्नि ज्याच्या पोटांत आहे तीं जलें पृथ्वीवरीलच होत असें मानित असावे असें पुष्कळ उल्लेखांवरून वाटतें. ओल्डेनबर्गच्या मतें अग्निगर्भ-जल म्हणजे पृथ्वीवरील जलच होय. तिसऱ्या मंडळाच्या पहिल्या सूक्तामध्यें देखील विद्युद्रूपी अग्नि उद्दिष्ट नसावा असें त्याचें मत आहे. तें कसेंहि असो. जलस्थ अग्नीची कल्पना वेदांमध्यें चोहोंकडे प्रामुख्यानें दिसते. सूर्याचें घर जसें आकाश तसें अग्नीचें घर जल हे उल्लेख जागोजाग आढळतात (ऋ. ५.८५,२; अ. वे. १३.१,५०; १९.३३,१). ओषधी व काष्ठ यांनांहि अग्नीचें गृह असें म्हटलें असून त्याजबरोबर जल हें त्याचें वसतिस्थान आहे असे उल्लेख सांपडतात (ऋ. २.१,१ इ.).

अग्नि आकाशांतहि जन्मास येतो असें वारंवार म्हटलेलें आढळतें. अग्नि सर्वांत उंच अशा आकाशांत जन्मतो (ऋ. १.१४३,२; ६.८,२); तो सर्वांत उंच अशा स्वर्गांत बीजरूपानें होता. मातरिश्वन् यानें त्याला तेथून आणला. अशा ठिकाणीं अग्नि म्हणजे विद्युत् असें दिसतें. कारण विद्युत् ही अंतरिक्षांतून येते व जलांतूनहि येते असें दोन्ही प्रकारचें वर्णन आहे (अ. वे. ३.२१,१ व ७ व ८.१,११); ऐतरेय ब्राह्मणांत (७.२) अग्नीला दिव्य व अप्सुमत् अशीं दोन्हीहि नांवें आहेत. विद्युत् हें विजेचें नांव ऋग्वेदांत सरासरी तीस वेळां अग्नीच्या बरोबर येतें व या ठिकाणीं अग्नि व वीज यांत फरक केलेला दिसतो. हा फरक म्हणजे अग्नि ही देवता असून विद्युत् ही निसर्गांतील त्याची एक घटना आहे हा होय. विजेच्या आघातानें वणवे लागल्याचें पाहून अग्नि आकाशांतून पृथ्वीवर उतरतो या प्रकारची जी कथा तयार झालेली आहे तिजवरून आकाशांतील अग्नि व विद्युत् एकच होत ही वेदकवींची कल्पना असल्याचें स्पष्ट दिसतें. अग्नि हा आकाशांत जन्मतो या गोष्टीचें आणखी एक प्रत्यंतर असें आहे कीं, मनुष्यांनां अग्नि प्राप्त झाला तो त्यांनां देवांकडून देणगी म्हणून मिळाला असें वर्णन आढळतें. अग्नीला अतिथि हें विशेषण वारंवार लावलेलें आहे. त्यावरून ही वरील कल्पनाच स्पष्ट होते.

वेदांमध्यें कांहीं कांहीं भागांत अग्नीचें सूर्याशीं ऐक्य कल्पिलेलें आहे. अग्नि हा तेजस्वी आकाशांत प्रकाश देणारा आहे. तो प्रातःसमयीं उठतो तो स्वर्गांतील मुख्य शास्ता आहे (ऋ. ३.२,१४); अंतरिक्षाच्या पलीकडल्या बाजूला त्याचा जन्म झाला असून तो सर्व वस्तूंचा द्रष्टा आहे (ऋ. १०.१८७,४ व ५); प्रातःकालीं सूर्याच्या रूपानें तो जन्मतो (ऋ. १०.८८,६); ऐतरेयब्राह्मणांत (८.२८, व ९.१३) असें म्हटलें आहे कीं, सूर्य अग्नीमध्यें प्रवेश करितो व नंतर तेथून त्याचा उदय होतो. अग्नि सूर्याच्या किरणांशीं मिळून जातो. पृथ्वीवर अग्नि प्रदीप्त करितात तेव्हां देवहि अग्नि प्रदीप्त करितात. अग्नि आकाशांत प्रकाशतो (ऋ. ५.३७,१; ७.२,१;६.२,३;३.२७,१२;८.४४,२९); ह्या सर्व ठिकाणीं अग्नीचा सूर्याशीं ऐक्यभावच कल्पिलेला दिसतो. मात्र केव्हां केव्हां अशा उल्लेखांत विद्युत् उद्दिष्ट आहे किंवा सूर्य उद्दिष्ट आहे हें स्पष्ट होत नाहीं. अग्नीचें सूर्याशीं ऐक्य ज्यांत कल्पिलेलें दिसतें असे उल्लेख फारसे सांपडत नाहींत. अग्नीचें भूमिगत स्वरूपच विशेष वर्णिलेलें सांपडतें. सूर्याशीं अग्नीचें ऐक्य न दाखवितां त्याचें साम्यच पुष्कळ वेळां वर्णिलेलें आढळतें. उदाहरणार्थ मनुष्य सूर्याकडे डोळे लावतो त्याप्रमाणें भक्तांचीं मनें अग्नीकडे लागलेलीं असतात असें वर्णन येतें (ऋ. ५.१,४); परंतु अशा ठिकाणीं कित्येक वेळां अग्नीच्या इतर स्वरूपांकडे ओझरती नजर फेंकली असते व कोणतें स्वरूप विवक्षित ठिकाणीं कवीला उद्दिष्ट आहे हें निश्चितपणें सांगतां येणें कठिण होतें.

वर सांगितल्याप्रमाणें अग्नीचीं जन्मस्थानें व स्वरूपें अनेक असल्यानें अग्नीसंबंधानें तो तीन प्रकारचा आहे, त्याचीं तीन स्वरूपें आहेत, वगैरे वर्णन पुष्कळ भागांतून आढळतें. वेदकालीं जें आध्यात्मिक वाङ्मय उदयास आलें तें पुष्कळ अंशानें अग्नीच्या या तीन स्वरूपांच्या आधारावर तयार झालेलें आहे. अग्नीचे जन्म तीन आहेत ( ऋ. १.९५,३; ४.१,७ ); देवांनीं अग्नीला त्रिरूपात्मक केलें ( ऋ. १०.८८, १० ); अग्नि हा तीन प्रकारचा प्रकाश आहे (ऋ. ३.२६,७); अग्नीला तीन मस्तकें आहेत ( ऋ. १.१४६,१ ); त्याला तीन जिह्वा, तीन देह, तीन स्थानें आहेत ( ऋ. ३.२०,२ ); त्रिषधस्थ, तीन स्थानीं असणारा, हें विशेषण अग्नीसंबंधानेंच विशेषतः आलेलें आहे आणि त्रिपस्त्य, तीन गृहांचा, हें विशेषण फक्त अग्नीलाच लावलें आहे ( ऋ. ८.३९,८ ). अग्नीचीं तीन स्थानें निरनिराळे कवी थोड्या फार फरकानें देतात. प्रथम अग्नि द्युलोकांत उत्पन्न झाला, दुसऱ्या वेळीं तो आमच्यामध्यें उत्पन्न झाला, तिसऱ्यानें तो जलांत उत्पन्न झाला ( ऋ. १०.४५,१ ) असें एक कवि म्हणतो. ( ऋ. ८.४५,१६; १०.२,७; १०.४६,९ ) या ठिकाणींहि द्युलोक, पृथ्वी व जल हाच अग्नीच्या वसतिस्थानांचा क्रम आहे. ( ऋ. १.९५३ )या ठिकाणीं समुद्र द्युलोक आणि जल असा क्रम आहे. कोठें कोठें भूमिस्थ अग्नि प्रथम येतो. तो मनुष्यांच्या गृहांत प्रथम जन्मला. द्युलोकाच्या पायथ्याशीं व अंतरिक्षाच्या अंतर्भागीं त्याचा जन्म झाला (ऋ. ४.१,११); अमर देवांनीं तीन ज्वाला उद्दीपित केल्या, एक मनुष्यांजवळ त्यांच्या उपयोगार्थ ठेवली व दोन शेजारच्या लोकांत गेल्या ( ऋ. ३.२,९ ). आपस्तंब श्रौतसूत्र ( ५.१६,४ ) या ठिकाणीं प्राण्यांमध्यें असलेला अग्नि तो भौम अग्नि, जलांमधील तो अंतरिक्षस्थ अग्नि व सूर्यामधील तो द्युलोकस्थ अग्नि असा भेद केला आहे. केव्हां केव्हां भूमिस्थ अग्नि तिसऱ्यानें येतो. अग्नि हा तीन भावांमधला एक असून त्यांतील मधला भाऊ म्हणजे विद्युत् व तिसरा घृतपृष्ठ होय ( ऋ. १.१६४,१ ); अग्नि द्युलोकांत तळपतो, अंतरिक्ष हें अग्निदेवाचें आहे, मनुष्यें अग्नि उद्दिपित करतात. तो घृतप्रिय असून हवि पोंचविणारा आहे ( अ. वे. १२.१,२०; १३.३,२१; १८.४,११ ).

अग्नीचें तिसरें स्वरूप हें सर्वांत श्रेष्ठ आहे असें एकदां म्हटलेलें आहे ( ऋ. १०.१,३;५.३,३;१.७२,२ व ४ ); यास्क आपल्या निरुक्तांत ( नि. ७.२८ ) असें सांगतो कीं, ऋग्वेदांत ( १०.८८,१० ) येथें उल्लेखिलेले अग्नीचे तीन प्रकार म्हणजे भूमिस्थ, अंतरिक्षस्थ व द्युलोकस्थ हे होत, असें शाकपूणि नांवाचा जो निरुक्तकार त्याचे पूर्वीं होऊन गेला त्याचें मत होतें. द्युलोकांतील जें अग्नीचें रूप आहे तें एका ब्राह्मणाच्या मतें सूर्यच होय असें निरुक्तांत म्हटलें आहे ( नि. १२.१९ ); पुढें जी सूर्य, वायु आणि अग्नि या तीन एकमेकांशीं निकटसंबद्ध अशा देवतांची कल्पना उत्पन्न झाली तिचें मूळ अग्नीच्या ह्या तीन रूपांतच होतें. या तीन देवता वरील निरनिराळ्या तीन जगतांत असतात अशी कल्पना आहे ( ऋ. १०.१५८,१ ); ( अ. वे. ४.३९,२ ); ( ऋ. १.१६४,४४ ). सूर्य, इन्द्र, आणि अग्नि हें त्रिकूटहि अग्नीच्या रूपत्रयांतून आलें असावें. या कल्पनांत वात किंवा वायु आणि इन्द्र यांनीं वैद्युत अग्नीची जागा घेतली आहे. वैद्युत अग्नीच्या ठिकाणीं वायु किंवा इन्द्र ह्यांची स्थापना होण्याचें कारण विद्युत् ही अगदीं क्षणिक असते हें एक असावें अथवा विद्युद्रूपाला व्यक्तित्व दिल्यानंतर त्याला अग्नि या नांवाखेरीज दुसरें नांव नसल्यानें व या नांवाचा उपयोग पुनरुक्तीनें करणें दुष्ट नसल्यानें वायु अथवा इन्द्र अशा विद्युद्रूपाशीं थोड्या दूरान्वयानें संबद्ध अशा नांवांचा उपयोग वैद्युताग्नीसाठीं केला असावा. वरील अग्नित्रयाची कल्पना वेद ग्रंथांतील तीन होमाग्नींच्या कल्पनेच्याहि मूळाशीं आहे असें दिसतें. वैदिक विधींमध्यें हे श्रौत अग्नी गृह्य ( घरगुती ) अग्नीपासून स्वतंत्र ठेविले आहेत, आणि ब्राह्मण संप्रदायांत या तीन अग्नींचाच मुख्यतः संबंध आहे. वैदिक विधींचा अग्नीसंबंधाच्या जुन्या कथांवर परिणाम होऊन म्हणा किंवा कसेंहि म्हणा एका होमाग्नीचे पुढें तीन होमाग्नी झाले हें खरें. उत्तरकालीन भारतीय वाङ्मयांत जे तीन होमाग्नी आहेत ते ऋग्वेदांत परिचित झालेल्या अग्नींच्या तीन रूपांचे प्रतिनिधिभूत कल्पिलेले आहेत. हे तीन होमाग्नी ऋग्वेदकालीं किंवा त्याच्या पूर्वींहि असावेत. अग्नीनें देवांनां घेऊन यावें आणि तीन स्थानीं बसावें असें वर्णन आहे ( ऋ. २.३६,४; ५.११,२;१०.१०५,९ ). द्यौ आणि पृथ्वी हे जे विश्वाचे दोन भाग कल्पिलेले आहेत त्यांनां अनुसरून पुष्कळ ठिकाणीं अग्नीला दोन जन्म आहेत असें म्हटलें आहे. द्विजन्मा हें नांव फक्त अग्नीलाच दिलेलें सांपडतें ( ऋ. १.६०,१;१.१४०,२;१.१४९,२ व ३ ); अग्नीचा एक जन्म श्रेष्ठ आणि एक कनिष्ठ आहे ( ऋ. २.९,३ ); त्याचें वसतिस्थान एक खालच्या जगतांत आणि एक वरच्या जगतांत आहे ( ऋ. १.१२८,३ ); सामान्यतः भूलोकांतील अग्नि आणि द्युलोकांतील अग्नि असे भेद कल्पिलेले आहेत (ऋ. ३.५४,१;१०.४५,१०). एका ठिकाणीं मात्र त्याचा द्युलोकांत होणारा जन्म आणि जलांत होणारा जन्म ह्यांच्यांत भेद दाखविला आहे ( ऋ. ८.४३,२८ ); उच्च स्थानावरून येण्याविषयीं अग्नीला आमंत्रण दिलें जातें (ऋ. ८.११,७); आणि तो या स्थानावरून खालच्या वसतिस्थानीं येतो (८.६४, १५). त्याच्या परमोच्च पित्याजवळून त्याला आणिलें म्हणजे तो ओषधीमध्यें प्रवेश करितो ( ऋ. १.१४१,४ ), या ठिकाणीं अग्नि हा जलवृष्टीच्या आश्रयानें खालीं येतो नंतर तो वनसतींमध्यें शिरतो व तदनंतर त्या वनसतींतून पुनः निर्माण

होतो अशी कल्पना आहे. जलाप्रमाणें अग्नि पृथ्वीवर उतरून पुनः आकाशाकडे उड्डाण करतात ( ऋ. १.१६४,५१ ). याप्रमाणें अग्नीचीं दोन रूपें जीं कल्पिलीं आहेत त्यांनां अनुलक्षून अग्नीनें अग्नीसाठीं होम करावा ( ऋ. १०.७,६ ); अग्नीनें अग्नीला घेऊन यावें ( ऋ. ७.३९,५ ); अग्नीनें देवांसह यज्ञासाठीं खालीं यावें ( ऋ. ३.६,९ ) इ. या प्रकारच्या प्रार्थना केल्या आहेत. त्याच द्विरूपात्मक कल्पनेला धरून मनुष्यांनीं अग्नि पेटविला तसा देवांनींहि अग्नि पेटविला असें वर्णन येतें. देवांनीं अग्नि प्रज्वलित केला या कल्पनेच्या मुळाशीं द्युलोकांतील अग्नि कोणी तरी पेटविला पाहिजे आणि मनुष्यांप्रमाणें देवांनींहि यज्ञयाग केला पाहिजे ही कल्पना आहे ( ऐ. ब्रा. २.३४ ).

दुसऱ्याहि दृष्टीनें अग्नीला पुष्कळ जन्म आहेत असें ह्मटलें आहे ( ऋ. १०.५,१ ). भूमीच्या ठिकाणीं असलेल्या अग्न्यायतनांमध्यें अनेक प्रकारचे अग्नी प्रज्वलित केले जातात या गोष्टीला अनुलक्षून ( भूमिस्थ ) अग्नीला नाना जन्म आहेत अशी कल्पना केली असावी. प्रत्येक कुटुंबांत, गृहांत व वस्तींत अग्नि राहतो असे उल्लेख वारंवार येतात (ऋ. ४.६,८; ४.७,१ व ३; ५.१,५; ५.६,८ ). पुष्कळ स्थळीं अग्नि प्रदीप्त करतात ( ऋ. ३.५४,९ ). अग्नीला पुष्कळ देह आहेत (ऋ. १०.९८,१० ). अनेक ठिकाणीं हा अग्नि पसरलेला आहे, तरी तो सर्वत्र एकच आहे व तो राजा आहे ( ऋ. ३.५५,४ ). नाना स्थळीं पेटविला गेला तरी तो एकच असतो ( वालखि० १०.२ ). शाखा वृक्षाला चिकटलेल्या असतात त्याप्रमाणें या अग्नीशीं दुसऱ्या अग्नींचा संबंध असतो ( ऋ. ८.१९,३३ ). दुसऱ्या अग्नीवरोबर या अग्नीला येण्याचें आमंत्रण दिलें जातें ( ऋ. ७.३,१; ८.१८,९; ८.४९,१; १०.१४०,६ ). 'सर्व अग्नींबरोबर ये' असेंहि कोठें कोठें ह्मटलें आहे ( १.२६,१०; ६.१२,६ ).

अग्नीच्या जन्मस्थानासंबंधींच्या वर्णनांत कोठें कोठें वरीच संकीर्णता दिसून येते. वर तीन जन्मस्थानें व दोन जन्मस्थानें अशा प्रकारचें वर्णन आलें आहे त्याहून वेगळें वर्णन देखील कित्येक ठिकाणीं सांपडतें. ( ऋ. २.१,१ ) या ठिकाणीं द्युलोक, जल, पापाण, काष्ठ आणि ओपधी हीं अग्नीचीं जन्मस्थानें ह्मणून उल्लेखिलीं आहेत. ( ऋ. ३.२२,२ ) या ठिकाणीं द्युलोक, पृथिवी, अन्तरिक्ष, जल आणि ओपधी यांमध्यें अग्नीचें तेज असल्याचा उल्लेख आहे. अग्नीच्या वसतिस्थानाविषयींची अशीच विस्तृत जंत्री इतरत्रहि दृष्टीस पडते ( अ. ३.२१; १२.१,१९; आपस्तंब श्रौतसूत्र ५.१६,४ ). अद्रीच्या ठिकाणीं अग्नी राहतो असें जेथें वर्णन येतें ( ऋ. १.७०,४ ) तेथें मेघाच्या पोटांत अदृश्य रूपानें असणारी विद्युल्लता उद्दिष्ट असावी. दगडांतून अग्नि उत्पन्न केला जातो ( ऋ. २.१,१ ), किंवा इन्द्र दोन दगडांतून अग्नि उत्पन्न करतो ( ऋ. २.१२,३ ), या प्रकारच्या वर्णनांतहि वरीलप्रमाणें मेघांतील विजेचाच संबंध असावा. परंतु गारगोटींतून अग्नि पाडण्याच्या क्रियेकडे देखील या उल्लेखाचा संबंध असणें शक्य आहे. मनुष्याचे हृदयांत अग्नि आहे ( ऋ. १०.५,१ ); पशू, अश्व, पक्षी, द्विपाद, चतुष्पाद यांजमध्यें अग्नि आहे ( अ. वे. ३.२१,२; १२.१,१९; १२.२,३३; तै. सं. ४.६.१,३ ); या उल्लेखांमध्यें प्राण्यांच्या शरीरांतील उष्णता हाच अग्नि याचा अर्थ असला पाहिजे. अग्नि हा चैतन्याची ठिणगी असून निसर्गामध्यें याचा चोहोंकडे प्रसार असल्यानें स्थिरचरांतील व सर्व अस्तित्वांतील वस्तूंचा अग्नि हा गर्भ आहे असें याचें सहजच वर्णन केलें जातें. ( ऋ. १.७०,३. अ. वे. ५.२५,७ );

तीन भावाभावांची कल्पना अग्नीच्या त्रिरूपात्मक कल्पनेंतून निघाली असली पाहिजे ( ऋ. १.१६४,१ ); यज्ञिय अग्नि नानाप्रकारचे असल्यानें अग्नीचे ज्येष्ठ बंधू अनेक आहेत अशी कल्पना निघाली असावी ( ऋ. १०.५१,६ ); हे ज्येष्ठ बंधू तीन आहेत असें एके ठिकाणीं वर्णन आढळतें ( तै. सं. २.६,६ ); देवाचे चार होते होते त्यांपैकीं पहिले तीन मृत्युवश झाले असें जें वर्णन आहे त्यांत ह्या अग्नीच्या बंधूंचाच संबंध असेल. वरुण हा अग्नीचा भाऊ आहे असें एकदां वर्णन आलेलें आहे ( ऋ. ४.१,२ ); इन्द्र हा अग्नीचा जुळा भाऊ आहे ( ऋ. ६.५९,२ ); अग्नीबरोबर इन्द्राचा संबंध जितका येतो तितका त्याचा दुसऱ्या कोणत्याहि देवतेबरोबर येत नाहीं. इन्द्र आणि अग्नि यांची मिळून एक जोडदेवता आहे. अग्नीची याप्रमाणें दुसऱ्या देवतेशीं क्वचितच जोड केलेली आढळते. अग्नीच्या जोडीनें दुसऱ्या ज्या संयुक्त देवता बनल्या आहेत त्या अग्निसोम, अग्निपर्जन्य या दोनच असून त्यांचें महत्त्व इन्द्राग्नीइतकें नाहीं. इन्द्र व अग्नि यांची याप्रमाणें जोडी असल्यानेंच उष्णतेनें अग्नि हा खडकांनां फोडून टाकतो ( ऋ. ८.४६,१६ ); व श्रद्धाहीन पणी लोकांनां तो जिंकतो ( ऋ. ७.६,३ ); असें वर्णन येतें. अग्निसोम ह्या जोडीला एक सूक्त दिलें आहे ( ऋ. १.९३ ).

इतर देवतांशींहि अग्नीचें ऐक्य केव्हां केव्हां कल्पिलेलें आढळतें. विशेषतः वरुण व मित्र या देवतांशीं अग्नीचें ऐक्य केव्हां केव्हां मानलें आहे ( ऋ. २.१,४; ३.५,४; ७.१२,३ ); अग्नि यज्ञाचे ठिकाणीं जातो तेव्हां तो वरुण असतो ( ऋ. १०.८,५ ); तो जन्मतो तेव्हां वरुण असतो. तो प्रज्वलित केला जातो तेव्हां तो मित्र असतो ( ऋ. ५.३,२ ); संध्याकाळीं तो वरुण असतो व सकाळीं उदयास येतो तेव्हां तो मित्र असतो. सविता होऊन तो अंतरिक्ष आक्रमण करतो. इन्द्र होऊन तो आकाशाचा मध्यभाग प्रकाशित करतो ( अ. वे. १३.३,१३ ). ऋग्वेदांतील एका भागांत ( ऋ. २.१,३-७ ) त्याचें पांच देवतांशीं व सुमारें

बारा देवांशीं क्रमानें ऐक्य सांगितलेलें आहे. नानाप्रकारचीं दिव्यरूपें तो घेतो (ऋ. ३.३८,७). त्याला अनेक नांवें आहेत (ऋ. ३.२०,३). त्याच्यांत सर्व अंतर्भूत झालेले आहेत (ऋ. ५.३,१). धावेचा आऱ्यांनां सर्व बाजूंनीं आश्रय असतो त्याप्रमाणें अग्नीचें सर्व देवांनां वेष्टण आहे (ऋ. ५.१३,६). अग्निसंप्रदायांतील अग्नीचें अगदीं जुनें कार्य म्हणजे दुष्ट पिशाच्च व विरुद्धपक्षाचे मंत्रप्रयोग ह्यांचा प्रतीकार करणें व नाश करणें हें आहे. वेदांमध्येंहि अग्नीच्या या कार्याचा उल्लेख आहे. अग्नि आपल्या प्रकाशानें राक्षस पिशाचादिकांचें निराकरण करतो (ऋ. ३.१५,१); आणि यामुळें त्याला रक्षोहन् हें नांव मिळालें आहे (ऋ. १०.८७,१). अग्नि प्रज्वलित केला गेला म्हणजे तो आपल्या लोहमय दांतांनीं आणि आपल्या जाज्वल्य उष्णतेनें मांत्रिक, राक्षस व पिशाचें यांनां भाजून काढतो व भक्षण करून टाकतो (ऋ. १०.८७,२ व ५ व १४.); व बारिक नजरेनें तो यज्ञाचें संरक्षण करतो. मंत्रप्रयोग करणाऱ्यांच्या जाती तो ओळखतो व त्यांचा तो नाश करतो (अ. वे. १.८,४); पृथ्वीवरील राक्षस पिशाचांचें निराकरण करण्याचें कार्य अग्नीप्रमाणें इन्द्र, बृहस्पति, अश्विन् देवता आणि विशेषतः सोम यांजकडेहि आहे. तरी तें प्रारंभीं फक्त अग्नीचेंच कार्य असावें व कालांतरानें तें सदरील इतर देवतांकडे दिलें असावें. याप्रमाणें असुरांनां किंवा अंतरिक्षस्थ रक्षोगणांनां मारण्याचें कार्य मूलतः इन्द्राचें असून नंतर तें अग्नीकडेहि आलेलें आहे (ऋ. ७.१३,१); इन्द्राचें हें कार्य अग्नीकडे आलेल्याचें प्रत्यंतर ऋग्वेदसूक्तांत आणि ब्राह्मणग्रंथांत दोन्ही ठिकाणीं इन्द्रापेक्षां अग्नीच राक्षसांला मारणारा या नात्यानें प्रामुख्यानें दृश्यमान होतो.

दुसऱ्या कोणत्याहि देवतेपेक्षां मनुष्याच्या जीविताशीं अग्नीचा अधिक संबंध आहे. मनुष्यांच्या गृहाशीं तर त्याचा विशेषच निकट संबंध येतो. गृहपति हें नांव फक्त अग्नीलाच दिलेलें आहे, आणि तें त्याला वारंवार दिलेलें आढळतें. प्रत्येक गृहांत तो राहतो (ऋ. ७.१५,२); तो गृह सोडून केव्हांहि जात नाहीं (ऋ. ८.४९,१९); दमूनस् म्हणजे घरचा हें विशेषण यालाच सामान्यतः लावलेलें आहे (ऋ. १.६०,४ इ.). गृहपति अग्नि ही कल्पना फार पुरातन कालापासून असली पाहिजे असें दिसतें. कारण उत्तरकालीन लांबलचक त्रेताग्निविषयक विधीमध्यें आहवनीय किंवा पौर्व आणि दक्षिण हे दोन अग्नी ज्या अग्नीपासून घेतले जातात त्या अग्नीचें नांव गार्हपत्य किंवा गृहपतीचा असें आहे. या संबंधांत हेंहि एक लक्षांत ठेवण्याजोगें आहे कीं, ऋग्वेदकालीं देखील यज्ञिय अग्नि एका ठिकाणाकडून दुसऱ्या ठिकाणाकडे नेला जात असे असे उल्लेख सांपडतात. अग्नि हविर्द्रव्याभोंवतीं फिरून आणला जातो (ऋ. ४.९,३; ४.१५,१); अग्नि हविर्द्रव्याभोंवतीं फिरतो (ऋ. ४.१५,३); यज्ञकुंडाभोंवतीं अग्नि तीन वेळां प्रदक्षिणा करितो (ऋ. ४.६,४; ४.६,५; ४.१५,२); आपल्या पितरांपासून सुटल्याबरोबर अग्नि पूर्वेकडे नेला जातो आणि नंतर पश्चिमेकडे नेला जातो (ऋ. १.३१,४).

मनुष्यांच्या गृहामध्यें अग्नीला अतिथि असें नांव दिलेलें वारंवार आढळतें. प्रत्येक गृहांत अग्नि हा अतिथि आहे (ऋ. १०. ९१,२); गृहस्थांचा हा पहिला अतिथि आहे (ऋ. ५.८,२); कारण मर्त्य लोकांमध्यें वस्तीस राहिलेला असा अमर्त्य म्हणजे अग्नीच होय (ऋ. ८.६०,१). अमर्त्य हें नांव इतर देवतांपेक्षां अग्नीलाच अधिक वेळां लावलेलें आहे. मनुष्यांच्या वस्तीमध्यें अग्नीनें वस्ती केली आहे (ऋ. ३.५,३); गृहाग्नीनेंच मनुष्यांनां वस्ती करावयास शक्य केलें (ऋ. ३.१,१७); वस्ती करून राहणारांचा हा नेता आणि संरक्षिता आहे (ऋ. ३.२,५; १.९६,४); विश्पति म्हणजे वस्ती करणारांचा नायक हें विशेषण प्रमुखतः अग्नीलाच लावलेलें आहे.

याप्रमाणें अग्नि हा मनुष्यांच्या अगदीं जवळचा नातेवाईक झाला आहे (ऋ. ७.१५,१; ८.४९,१०); कोठें कोठें त्याला नातेवाईक असेंच म्हटलेलें आहे, कोठें मित्र असें म्हटलेलें आहे (ऋ. १.७५,४ इ.) पुष्कळवेळां त्याला पिता असें म्हटलेलें आहे (ऋ. ६.१,५); केव्हां केव्हां त्याला भक्तांचा बंधु (ऋ. ८.४३,१६; १०.७,३), पुत्र (ऋ. २.१,९), अथवा माता (ऋ. ६.१,५), असेंहि म्हटलें आहे. अग्नीला हीं जीं नांवें दिलीं आहेत तीं अग्नि ज्यावेळीं होमाचा अग्नि म्हणून नसून गृहांतील सामान्य जीवनाचा केंद्र होता तेव्हां दिलेलीं असावीं. याप्रमाणें कौटुंबिक जीवनाचा तो मोठा आधार असल्यानें त्यासंबंधानें मनुष्यांच्या मनांत इतर देवतांच्या संबंधांत क्वचितच सांपडतें असें अत्यंत जिव्हाळ्याचें नातें उत्पन्न झालें आहे. अग्नि हा गृहांत नेहमीं वस्तीस असल्यानें मनुष्याच्या पूर्वजांशीं इतर देवतांपेक्षां अग्नीचाच विशेष निकट संबंध मानला जाणें साहजिकच आहे. त्याप्रमाणेंच अग्नीच्या भक्तांकडून त्याचें जें वर्णन करण्यांत येतें त्यांत अग्नि हा पूर्वीपासून अमुक कुळाचा मित्र आहे असें वर्णन येतें, व ही पूर्वापार चालत आलेली मैत्री (ऋ. १.७१;१०) इतर कोणत्याहि देवतेपेक्षां या अग्निदेवतेच्या संबंधांतच विशेष वर्णिलेली सांपडते. पूर्वजांनीं प्रदीप्त केलेला व त्यांनीं प्रार्थिलेला असा हा अग्नि देव आहे. त्याप्रमाणें भारताचा अग्नि (ऋ. २.७,१; ७.८,४), वध्र्यश्वाचा अग्नि (ऋ. १०.६९,१), देववाताचा अग्नि (ऋ. ३.२३,३), दिवोदासाचा (ऋ. ८.९२,२) व त्रसदस्यूचा (ऋ. ८.१९,३२) अग्नि असे निरनिराळे अग्नी सांगितलेले आहेत. अग्नीशीं अशा रीतीनें निकट संबंध असलेल्या पूर्वजांपैकीं,

कांहींचीं नांवें ऋग्वेद सूक्तकारांच्या कुळांचीं अथवा गोत्रांचीं आहेत. या पूर्वजांपैकीं वसिष्ठ व दुसरे कांहीं खरोखरी अस्तित्वांत होते असें दिसतें व अंगिरस, भृगु व इतर कित्येक केवळ कल्पित कथांतील पुरुष होत असें वाटतें.

होम अग्नीशिवाय होत नसल्यानें या होमासंबंधानें देखील मनुष्याच्या रोजच्या जीवनाशीं अग्नीचा निकट संबंध येतो. तो मनुष्यांनीं त्याच्या पदरांत टाकलेलें हविर्द्रव्य घेऊन स्वस्थ वसतो असें मात्र नव्हे. पृथ्वी आणि देवलोक यांजमध्यें तो मध्यस्थाचें काम करतो. तो होमद्रव्य देवांकडे पोंचवितो. देव त्याच्याशिवाय सोम सेवून आनंद करीत नाहींत (ऋ. ७.११,१९); तो देवांनां यज्ञाकडे घेऊन येतो किंवा हवि देवांकडे पोंचवितो (ऋ. ३.१४,२; ७.११,५); तो हव्यभक्षणासाठीं (ऋ. ५.१,११), दर्भासनावर त्यांनां बसवितो (ऋ. १.३१,१७; ८.४४,३); देवांकडे जाणारे व पृथ्वीकडे जाणारे दोन्हीहि मार्ग तो जाणतो व या दोन्हीहि मार्गांनीं तो जातो (ऋ. ६.१६,३; ८.७,२; १०.९८,११); यास्तवच याला दूत हें नांव पुनःपुनः लावलेलें आढळतें. हा मार्ग जाणणारा व हवि पोंचविणारा दूत आहे (ऋ. १.७२,७); हा सर्व गृहांत जातो (ऋ. ४.१,८); हा त्वरित गतीनें उड्डाण करितो (१०.६,४); हा पृथ्वी आणि देवलोक यांजमध्यें फिरत असतो (४.७,८; ४.८,४; १०.४,२);हा मनुष्यें आणि देव या दोन वर्गांमध्यें इकडून तिकडे जात असतो. देव आणि मनुष्यें यांनीं याला हव्य नेण्या-आणण्याचें काम दिलेलें आहे (हव्यवाह हें नांव अग्नि-संबंधानें नेहमीं वापरलेलें आढळतें). भक्तांची प्रार्थना देवांनां कळविण्याचें (ऋ. १.२७,४), व देवांनां यज्ञस्थानीं आणावयाचें (ऋ. ४.८,२), हीं दोन्हीं कामें अग्नीवर सोंपविलेलीं आहेत. तो देवांचा दूत आहे (ऋ. ६.१५,९); व विवस्वत् याचाहि दूत आहे. तो द्युलोकाचे कोनकोपरे सर्व जाणतो व हव्य पोंचविण्याचें आणि देवांनां आणण्याचें काम करतो (ऋ. ४.७,८; ४.८,२); या नात्यानें त्याला मुख्यतः मनुष्यांचा दूत असेंच मानलें पाहिजे. उत्तरकालीन ग्रंथांत अग्नि हा देवांचा दूत असून काव्य उशसन किंवा दैव्य हा असुरांचा दूत आहे असें वर्णन आहे (तै. सं. २.५,८; २.५,११), तैत्तिरीय ब्राह्मण (२.४.१,६), येथें अग्नि हा देवांकडे जाणारा मार्ग असून या मार्गाच्या द्वारें द्युलोकाचें शिखर गांठतां येतें असें वर्णन आहे.

वेदांत अग्नीकडे प्रमुखतः यज्ञाचे वेळीं पौरोहित्य करण्याचें कार्य असल्यानें अग्नि हा मनुष्यांचा पृथ्वीवरील पुरोहिता-प्रमाणें द्युलोकपुरोहित आहे असें त्याचें वर्णन येतें. त्याला सामान्यतः ऋत्विज किंवा विप्र असें म्हणतात. केव्हांकेव्हां पुरोहित असें नांव त्याला देण्यांत येतें व होता हें नांव त्याला नेहमींच लावलेलें आढळतें. मनुष्यांनीं व देवांनीं नेमलेला हा होता आहे (ऋ. ८.४९,१; १०.७,५); तो सर्वांत अधिक श्रेष्ठ व पूज्य असा होता आहे (ऋ. १०.२,१; १०-९१,८); तो अध्वर्यु आहे (ऋ. ३.५,४); व बृहस्पति, सोम व इन्द्र याप्रमाणें ब्रह्मा आहे असेंहि कोठें कोठें म्हटलें आहे (ऋ. ३.५,४; ४.९,४). वर दिलेले इतर मानवी पुरोहित जीं कामें करतात तीं सर्व कामें अग्नि करीत असतो. मात्र तो श्रेष्ठ पदावरून हीं कामें करितो (ऋ. १.९४,६; २.१,२). देवांनां पूजा अर्पण करण्यासाठीं किंवा त्यांचा सत्कार करण्यासाठीं अग्नीला नेहमीं बोलाविलें जातें (ऋ. ३.२५,१; ७.११,३ इ.). देवहि दिवसांतून तीन वेळां अग्नीचा सत्कार करतात. तो यज्ञ पुरा करणारा आहे (ऋ. ३.३,३; ३.२७,२); आपल्या दिव्य शक्तीनें तो विधिकर्मांची वृद्धि करितो. हव्य असेल तें तो सुगंधयुक्त करितो व तें संभाळून देवांकडे पोंचवितो (३.२७,७; १०.१५,१२; १.१,४). तो यज्ञकर्माचा पिता आहे (ऋ. ३.३,४); राजा आहे (ऋ. ४.३,१); शास्ता आहे (ऋ. १०.६,३); तो अध्यक्ष आहे (ऋ. ८.४३,२४); तो केतु आहे (ऋ. ३.३,३; ३.१०,४; ६.२,३; १०.१,५). एका सूक्तांत (ऋ. १०.५१) असें सांगितलें आहे कीं, अग्नि हा आपलें काम करण्याला कंटाळला व यज्ञसंबंधीं त्याचीं जीं कामें तीं करण्याचें त्यानें नाकारलें पण देवांकडून त्याला पाहिजे होता तो मोबदला मिळण्याचें ठरल्यावर त्यानें मनुष्यांचें पौरोहित्य पुढें चालविण्याचें कबूल केलें. अग्नीचा पौरोहित्य हा मुख्य गुण आहे. इन्द्र जसा मोठा योद्धा तसा अग्नि मोठा पुरोहित आहे. परंतु अग्नीचें हें रूप जरी ऋग्वेदाच्या आरंभापासून अखेरपर्यंत प्रामुख्यानें दिसत असलें तरी इतिहासदृष्ट्या हें अलीकडील आहे. विधिप्रयोग करणाऱ्याच्या गूढात्मक विचारांनीं उत्तरकालीन विधिग्रंथांत जें अपार यज्ञविषयक गूढसंकेत वाङ्मय उत्पन्न केलें त्या विचारांचेंच अग्नीचें पौरोहित्य हें एक फल आहे. हव्यवाह किंवा हव्यवाहन या नांवांचा जो सामान्य यज्ञाग्नि त्याहून क्रव्याद (म्हणजे प्रेतभक्षक) नांवाचा अग्नि वेगळा आहे. वाजसनेय संहितेंत आमाद (कच्चें अन्न खाणारा) क्रव्याद् (प्रेतमांस खाणारा) व देवयज (म्हणजे यागयोग्य) असे तीन अग्नी सांगितले आहेत (वा. सं. १.१७); तैत्तिरीय संहितेंत सुद्धां तीन अग्नी सांगितले आहेत (तै. सं. २.५,८); हे अग्नी म्हणजे हव्यवाहन म्हणजे देवांनां त्यांचें हव्य घेऊन जाणारा, कव्यवाहन म्हणजे पितरांनां त्यांचें अन्न घेऊन जाणारा आणि सहरक्षस म्हणजे असुरांचा अग्नि हे होत.

अग्नि हा ऋषि असून पुरोहित आहे (ऋ. ९.६६,२०); श्रेष्ठ ऋषि या नात्यानें अग्नीला प्रज्वलित करतात (ऋ. ३.१,३); अग्नि हा सर्वांत दयार्द्र दृष्टीचा ऋषि आहे (ऋ. ६.१४,२); अग्नि म्हणजे पहिला ऋषि अंगिरस होय (ऋ. १.३१,१); तो विद्वानांमध्यें दिव्यशक्तियुक्त आहे

(ऋ. ३.३,४); तो यज्ञकर्म व दुसरीं सर्व कर्मे बरोबर जाणतो (ऋ. १०.११०,११; १०.१२२,२); तो ऋतु बरोबर जाणतो, व देवांचे यज्ञकर्मविषयक जे नियम आहेत त्या नियमांसंबंधींच्या अज्ञानामुळें मनुष्यांच्या हातून होणारे दोष तो दुरुस्त करतो. तो द्युलोकाचे कोनेकोपरे जाणतो (ऋ. ४. ८,२ व ४); तो आपल्या चातुर्यानें सर्व जाणतो. त्याला सर्व प्रकारचें ज्ञान आहे (ऋ. ३.१,१७; १०.२१,५); धाव चाकाभोंवतीं असते त्याप्रमाणें अग्नि सर्व ज्ञानाला वेष्टून आहे (ऋ. २.५,३); हें ज्ञान त्याला जन्मतःच प्राप्त झालें (ऋ. १.९६,१); विश्वविद् म्हणजे सर्व जाणणारा, विश्ववेदस कवि म्हणजे विद्वान्, कविक्रतु म्हणजे विद्वानाची बुद्धि असलेला हीं विशेषणें प्रामुख्यानें अग्नीला लाविलीं जातात; जातवेदस् हें नांव ऋग्वेदांत १२० वेळां आलेलें आहे आणि याचा अर्थ सर्व विद्या जाणणारा असा आहे (ऋ. ६.१५, १३). द्युलोकस्थ नियम आणि मनुष्यांच्या सर्व पिढ्या अग्नि जाणतो (१.७०,१ व ३); तो सर्व प्राणी जाणतो व त्याला सर्व प्राणी दिसतात (ऋ. ३.५५,१०; १०.१८५,४); त्याला उद्देशून दिलेलें आमंत्रण त्याला ऐकूं येतें. अग्नि हा ज्ञान देणारा आहे (ऋ. ८.९१,८); अग्नीपासून ज्ञान व स्तोत्रें उत्पन्न होत असतात (ऋ. ४.१,३); तो प्रेरणा करणारा आहे (ऋ. १०.४६,५); तो तेजस्वी भाषा निर्माण करणारा आहे (ऋ. २.९,४); तो स्तुतीचा प्रथम उत्पादक आहे (ऋ. ६.१,१); तो उत्तम वक्ता व गायक आहे (ऋ. ६.४,४).

अग्नि भक्तांवर उपकार करणारा आहे, तो शंभर लोहमय भिंतींनीं त्यांचें रक्षण करितो (ऋ. ७.३,७; ७.१६,१०); तो त्यांनां संकटांपासून संभाळतो किंवा समुद्रांतून जहाजांत बसवून न्यावें त्याप्रमाणें तो भक्तांनां संकटांतून पार करतो (ऋ. ३.२०,४; ५.४,९; ७.१२,२); त्याचें आतिथ्य करणाऱ्याचा तो मित्र व त्राता आहे (ऋ. ४.४,१०; ८.४९,५); त्याला इंधन आणण्यासाठीं खपणाऱ्या उपासकाचें तो रक्षण करितो. जो मनुष्य त्याला अन्न देतो व घृतानें त्याचें पोषण करितो त्याला सहस्र अक्षांनीं तो राखीत असतो. वाळलेलीं झुडपें खाऊन टाकावीं त्याप्रमाणें तो आपल्या भक्ताचे शत्रू खाऊन टाकतो (ऋ. ४.४,४); विजेनें झाड जळावें त्याप्रमाणें तो द्वेष करणाराचा निःपात करतो (ऋ. ६. ८,५); त्याला युद्धांत बोलावितात (ऋ. ८.४३,२५); आणि तेथें तो सर्वांच्या अग्रभागीं असतो (ऋ. ८.७३,८); तो ज्याचें रक्षण करतो आणि लढाईंत तो ज्याला स्फुरण देतो त्याला भरपूर अन्नपुरवठा होतो आणि तो केव्हांहि जिंकिला जात नाहीं (ऋ. १.२७,७). झाडांतून शाखा निघतात त्याप्रमाणें सर्व प्रकारचीं सुखें अग्नीपासून सर्वांनां मिळतात (ऋ. ६.१३,१); तो संपत्ति देतो व संपत्तीहि त्याजवळ भरपूर आहे (ऋ. १.१,३; १.३१,१०; १.३६,४); त्याचे ठिकाणीं सर्व प्रकारचें धन एकत्र झालें आहे (ऋ. १०.६,६); तो संपत्तीचें दार उघडून देतो (ऋ. १.६८,१०); देवलोक आणि पृथ्वी अथवा देवलोक, पृथ्वी आणि समुद्र येथील सर्व संपत्ति त्याच्या ताब्यांत आहे (४.५,११; ७.६,७; १०.९१,३); तो द्युलोकांतून पाऊस धाडतो (ऋ. २.६,५). अरण्यांतील जलाशयाप्रमाणें तो आहे (ऋ. १०.६,१). अग्नि हा असा असल्यानें त्याला नेहमीं नाना प्रकारची देणगी देण्याबद्दल प्रार्थना करण्यांत येते. अन्न दे, धन दे, दारिद्य दूर कर, संतति दे, शत्रू नाहींसे कर, राक्षसपिशाच्यांपासून संरक्षण कर, अशी अनेक प्रकारें त्याची प्रार्थना करण्यांत येते. अग्नि जे वर देतो ते सामान्यतः कौटुंबिक सुख, संतति व संपत्ति हें असून सामर्थ्य, विजय व वैभव ह्या देणग्या इन्द्राकडून प्राप्त होतात. मूर्खपणानें झालेल्या पापाची अग्नि क्षमा करितो. अतिथीच्या पुढें भक्तांनां तो निष्पाप करतो (ऋ.४.१२,४; ६.७३,७); वरुणाच्या क्रोधांतून तो वांचवितो (ऋ.४.१,४); मातापित्यांनीं केलेल्या अपराधाच्या शिक्षेपासून तो मनुष्यांस सोडवितो (अ. वे. ५.३०,४, तै. ब्रा. ३.७.१२,३ व ४);

अग्नि हा असुर म्हणजे दिव्य सम्राट् आहे. इन्द्रासारखा तो सामर्थ्यवान् आहे (ऋ. ७.६,१); शक्तिमान देवलोकापेक्षांहि त्याचें माहात्म्य मोठें आहे (ऋ. १.५९,५); द्यावापृथ्वीपेक्षां तो मोठा आहे (ऋ. ३.६,२;१०.८८,१४); तो सर्व जगतापेक्षां मोठा आहे. हे सर्व लोक तो जन्मतांच त्यानें व्यापिले (ऋ. ३.३,१०). सर्व देवांपेक्षां त्याचें माहात्म्य अधिक आहे (ऋ. १.६८,२); तो अंधकारांत वस्ती करतो तेव्हां सर्व देव त्याला भितात व त्याचें आधिराज्य कबूल करतात (ऋ. ६.३,७); वरुण, मित्र, मरुद्गण आणि सर्व देव त्याचें वैभव गातात आणि त्याची पूजा करतात (ऋ. ३.९,८;३.१४,४;१०.६९,९); प्राचीन काळीं अग्नीनें मोठाले पराक्रम केले. त्याचे थोर पराक्रम पाहून मनुष्य थरथर कांपतात. युद्ध करून त्यानें देवांकरतां जागा मिळविली व त्यांनां शापांतून मुक्त केलें. तो हजारों लोकांचा जेता (सहस्रजित्) आहे. (सहस्रजित् हें विशेषण सोमाला अधिक वेळां लावलेलें आढळतें). तो घरांतून दस्यूंनां घालवितो व आर्यांसाठीं विस्तृत प्रकाश करितो (ऋ. ७. ५,६); तो आर्यांचा पुरस्कर्ता आहे (ऋ. ८.९२,१); व अधर्मी पणी लोकांचा पराभव करणारा आहे (ऋ. ७. ६,३); वृत्रहन् हें नांव अग्नीला वऱ्याच वेळां लावलेलें आढळतें. पुरंदर म्हणजे किल्ल्यांचा विध्वंस करणारा हें नांव अग्नीला दोनतीन वेळां दिलेलें आढळतें. ह्या क्रिया अर्थात् मूलतः इन्द्राच्या आहेत. हे गुण विद्युदात्मक अग्नीमध्यें शोभतील. परंतु मुळांत ते इन्द्राचे गुण आहेत ह्यांत संशय नाहीं. अग्नि हा द्यावापृथ्वीचा पुत्र आहे तरी तो ह्या दोन लोकांचा जनक आहे असें म्हटलें आहे

( ऋ. १.९६,४ ); त्याचीं कर्मे कधींहि नष्ट होणारीं नसून ( ऋ. २.८,३ ), द्यावापृथ्वी हीं कर्मे चालवितात ( ऋ. ७.५,४;२.८,३ ). द्यावापृथ्वी हे दोन लोक त्यानें विस्तृत केले ( ऋ. ३.६,५;७.५,४ ); हे दोन लोक त्यानें दोन चर्माप्रमाणें पसरले ( ऋ. ६.८,३ ); आकाशाचे घुमट तो आपल्या ज्वालांनीं किंवा धुरानें उचलून धरतो ( ऋ. ३.५,१०;४.६,२ ); हे दोन लोक त्यानें वेगवेगळे ठेविले ( ऋ. ६.८,३ ). द्यावापृथ्वी या दोन लोकांनां तो खऱ्या स्तुतींनीं उचलून धरतो ( ऋ. १.६७,३ ); तो रात्रौ जगताच्या किंवा पृथ्वीच्या मूर्धस्थानीं असतो ( ऋ. १०.८८,५ व ६ ), तो आकाशाचेंहि शिखर आहे ( ऋ. १.५९,२;६.७,१; ८.४४,१६ ). त्यानें अंतरिक्ष मोजलें व आपल्या माहात्म्यानें आकाशाला स्पर्श केला (ऋ. ६.८,२ ); त्यानें अंतरिक्षस्थ स्थानें मोजलीं व तेजस्वी द्युलोकाची मोजणी केली ( ऋ. ६.७,७ ); त्यानें सूर्याला द्युलोकांत चढावयास लाविलें ( ऋ. १०.१५६,४ ); अग्नि प्रदीप्त केल्यानें सूर्याच्या उदयाच्या बाबतींत कांहीं मंत्रप्रयोगासारखा परिणाम होतो ही कल्पना ऋग्वेदांत थोडीफार आढळते. खालील ऋचेंत सूक्तकाराचा असाच कांहीं अर्थ दिसतो. 'हे अग्ने, आम्ही तुला समिद्ध करून प्रदीप्त केलें, ह्मणजे तुझें लोकोत्तर रूप आकाशांत प्रकाशमान होईल ( ऋ. ५.६,४ ).' ब्राह्मणग्रंथांत अशी कल्पना एकेठिकाणीं आली आहे कीं, सूर्योदयाच्या पूर्वी याग करून तो सूर्य उत्पन्न करितो असें न केलें तर सूर्योदय होणार नाहीं (श. ब्रा. २.३.१,५; तै. सं. ४.७,१३ ). ऋग्वेदांत इतरत्र अग्नीचें पेटविणें आणि सूर्योदय ह्या दोन क्रिया समकालीन दाखविल्या आहेत. अग्नि जन्मला तेव्हां सूर्योदय झाला. अग्नीनें आकाश तारांनीं विभूषित केलें आहे असें म्हटलें आहे ( ऋ. १.६८,५ ). उडणारे व चालणारे, स्थिर व चर सर्व कांहीं त्यानें उत्पन्न केलें ( ऋ. १०.८८,४ ); वनस्पतींमध्यें, सर्व भूतांमध्यें त्यानें बीज ठेविलें. पृथ्वी आणि स्त्रिया यांचे ठिकाणीं त्यानें संतति उत्पन्न केली ( ऋ. १०.१८३,३ ). मनुष्यांची आपत्ति अग्नीनें उत्पन्न केली असें एके ठिकाणीं म्हटलें आहे. ( ऋ. १.६,२ ); त्यानें द्युलोक, पृथ्वी, जलें उत्पन्न केल्याचें याच ऋचेंत जें विधान आहे त्या विधानाचा सहज विस्तार म्हणून मनुष्य उत्पन्न करण्याची क्रिया अग्नीच्या ठिकाणीं आरोपित केली असावी. मानववंशाचा मूळ पिता अग्नि असा या उल्लेखाचा अर्थ करतां येत नाहीं. अग्नीला अमरत्वाचा संरक्षक आणि स्वामी असें म्हटलें आहे ( ऋ. ७.७,४;७.४,६ ). तो मनुष्यांनां अमृत देतो ( ऋ. १.२१,४ ).

अग्नि हा इन्डो-यूरोपीय शब्द आहे. ह्याचें लॅटिन "इग्निस" असें रूप असून स्लाव्हानिक 'ओग्नि' असा शब्द आहे. तरी अग्नीची अग्नि या नांवानें उपासना फक्त भारतीयांतच आहे. इन्डो इराणी काळामध्यें यागयोग्य अग्नि देव बनला होता व त्याचे भोंवती पुष्कळ विधींचें जाळें झालेलें होतें. पुरोहितांचा स्वतंत्र वर्ग बनलेला होता. या वर्गाला अथर्वन असें नांव असावें. हा जो यागयोग्य अग्नि देव म्हणून मानला होता तो समर्थ शुद्ध आणि ज्ञानी देव म्हणून त्याची उपासना केली जात असे. अन्न, संतति, बुद्धि आणि कीर्ति देणारा असा हा देव होता. ज्या गृहांत तो असेल त्याचा तो मित्र व त्या गृहाच्या शत्रूंचा नाश करणारा असा तो होता. वीज, काष्ठापासून उत्पन्न केला जाणारा अग्नि, वगैरे हीं त्या एका अग्नीचीं निरनिराळीं रूपें आहेत अशीहि कल्पना तेव्हां असावी असें दिसतें. होमाचा अग्नि हा इन्डो-यूरोपीय काळांतहि असावा असें दिसतें, कारण इटालियन, ग्रीक हे लोक इराणी व भारतीय लोकांप्रमाणें देवांकरितां अग्नीमध्यें देवांनां देण्याचे पदार्थ टाकित असत. परंतु या होमाच्या अग्नीवर देवत्वाची कल्पना त्या वेळेला आरोपित केली असलीच तरी ती तेव्हां फार अस्पष्ट अशीच असावी. अग्नि हा शब्द अज=गति देणें [ लॅटिन ( ॲगो ) ग्रीक ( अगो ) ] या धातूपासून साधितां येतो, आणि तसा तो निघाला असण्याचा संभव आहे. कारण या व्युत्पत्तीप्रमाणें अग्नि याचा अर्थ चपल असा होईल व चपलता अथवा वेग हा अग्नीमध्यें असतोच.

द्युलोकस्थ अग्नीचें नांव अपांनपात् हें न राहतां अपांनपात् जशी स्वतंत्र देवता बनली आहे अशीच दुसऱ्या नांवासंबंधाची गोष्ट आहे. अग्नीचीं कांहीं नांवें इतक्या पूर्णतेनें स्वतंत्र देवतारूप झालीं नसून त्यांनां अर्धवट देवतारूप आलेलें आहे. याप्रमाणें वैश्वानर या शब्दाची गोष्ट आहे. वैश्वानर हा शब्द ऋग्वेदांत सुमारें साठ वेळां आलेला आहे यापैकीं दोन वेळां खेरीज करून तो सर्वत्र अग्नीचाच वाचक आहे. ऋग्वेदांतील १४ सूक्तांत आलेला हा वैश्वानर म्हणजे अग्निवैश्वानर ही देवता होय, असें अनुक्रमणीकाराचें मत आहे. वैश्वानर हा शब्द ऋग्वेदांत नेहमीं अग्नि या नांवाबरोबर येतो. याचा अर्थ सर्व मनुष्यांचा असा आहे. सर्व विश्वांतील द्युलोकस्थ व भूमिस्थ जीं जीं अग्नीचीं रूपें आहेत त्या सर्व रूपांतील अग्नि असा वैश्वानर याचा अर्थ दिसतो. या वैश्वानर अग्नीला दिलेलीं सूक्तें केव्हां केव्हां मातरिश्वन् व भृगु यांच्या कथेचा उल्लेख करितात. द्युलोकस्थ अग्नि पृथ्वीवर कसा आला यासंबंधाची ही कथा आहे ( ऋ. ३.२,४; ६.८,४ ); अग्निवैश्वानर याला एकदां मातरिश्वन् असेंहि म्हटलें आहे ( ऋ. ३.२६,२ ). नैघण्टुकामध्यें ( ५.२ ) अग्नीच्या नांवांत वैश्वानर हें नांव दिलेलें आहे. यास्क या वैश्वानर शब्दावर टीका करतांना ( निरुक्त ७.२३ ) म्हणतो कीं, जुने याज्ञिक अग्निवैश्वानर म्हणजे सूर्य असें समजत; परंतु शाकपूणि याच्या मतें वैश्वानर म्हणजे भूमिस्थ अग्नि होय. निरुक्त ७.१३१ येथें यास्क, आपलें स्वतःचें म्हणून असें मत देतो

कीं, अग्निवैश्वानर या नांवानें स्तुति, स्तोत्र व हविर्द्रव्य मिळविणारा अग्नि म्हणजे भूमिस्थ अग्नीच होय. अंतरिक्षस्थ आणि द्युलोकस्थ अग्नींनां वैश्वानर हें नांव उगीच एखादे वेळेला लावलें जातें. ब्राह्मण व सूत्रग्रंथांत वैश्वानर हें अग्नीचें विशिष्ट स्वरूप आहे असें मानिलें आहे (आश्व. श्रौ. १.३,२३); (का. श्रौ. २३.३,१); (पंचविंश. ब्रा. २१.१०,११) (शत. ब्रा. १.५.१,१६).

तनूनपात् ह्या अग्नीच्या नांवासंबंधानें पाहतां हें नांव सामान्यतः स्वतंत्रपणें आलेलें आढळतें. हें ऋग्वेदांत आठवेळां आलेलें आहे आणि दोन स्थळें खेरीजकरून (ऋ. ३.२९,११; १०.९२,२) आप्री सूक्ताच्या दुसऱ्या ऋचेंत हें नांव येतें. ह्या ऋचा पशुमेधसंबंधीं असून यांत निरनिराळ्या नांवांच्या व रूपांच्या अग्नींनां बोलावणें केलें आहे. नैघण्टुकांत (५.२) हें स्वतंत्र नाम म्हणून आढळतें. यास्काची या शब्दाची व्युत्पत्ति कृत्रिम व असंभवनीय आहे (नि.८.५); स्वतःचाच पुत्र काष्ठ आणि मेघ यांमध्यें स्वयमेव उत्पन्न होणारा असा याचा अर्थ दिसतो. बर्गाईन याच्या अर्थाप्रमाणें दिव्य पित्याच्या शरीरापासून झालेला असा याचा अर्थ आहे. मातरिश्वन् आणि नराशंस यांजहून तनूनपात् वेगळा दाखविला आहे. याला आसुरदिव्यगर्भ असें म्हटलें आहे (ऋ. ३.२९,११); उषा, गृहपुरोहित रक्तरूपाचा पुत्र तनूनपात् याचें चुंबन घेतात (ऋ. १०.९२,२) असें म्हटलें आहे. तनूनपात् हा शोभनजिह्व आहे (ऋ. १०.१०१,२); देवांकडे हव्य घेऊन जाण्याबद्दल त्याची प्रार्थना केली आहे (ऋ. १.१३,२); घृतमय असें हविर्द्रव्य तो सर्वांनां वांटून देतो (ऋ. १.१४०,२); देव याचा दिवसांतून तीन वेळां सत्कार करितात. वरुण, मित्र व अग्नि हे याचा रोज सत्कार करितात. अग्नि तनूनपात् व अग्नि सोमगोपा (चंद्रांतील अग्नि) हे एक आहेत असें हिलेब्रँट म्हणतो.

नराशंस हें अग्नीला वारंवार लावलें जाणारें आणखी एक नांव आहे. नैघण्टुकामध्यें (५.३) हें स्वतंत्र नांव म्हणून दिलेलें आहे. ऋग्वेदांतहि हें स्वतंत्र आढळतें. ऋग्वेदांत हें केवळ अग्नीलाच दिलेलें आहे असें नाहीं. पूषन् या देवतेलाहि हें नांव दोनदां लावलें आहे (ऋ. १.१०६,४; १०.६४,३); आप्री सूक्तामध्यें हें नांव नेहमीं तिसऱ्या ऋचेंत येतें, आणि आप्र हें ज्याचें नांव आहे अशा सूक्तांत हें दुसऱ्या ऋचेंत येतें. नराशंस याला चार अवयव आहेत (ऋ. १०.९२,११); त्याला द्युलोकस्थ पत्नी आहे (ग्नास्पतिः २.३८,१०); जिव्हेवर व हातावर मध घेऊन तो याग करतो (ऋ. १.१३,३; ५.५,२); दिवसांतून तीन वेळां तो यज्ञावर मधानें सिंचन करतो (ऋ. १.१४२,३); तीन द्युलोक आणि देव यांनां तो सुगंधित द्रव्य लावतो (ऋ. २.३,२); सर्व देवांनां तो घेऊन येतो आणि यज्ञ त्यांनां संतोषकारक होईल असें करतो. याच्या यागांच्या द्वारें भक्तगण देवांचा महिमा गातात (ऋ. ७.२,२); नराशंस व दैव्य यांजमध्यें सोम जातो येतो, या ठिकाणीं नराशंस म्हणजे भूमिस्थ व दैव्य म्हणजे द्युलोकस्थ अग्नि असावा. तनूनपात् आणि मातरिश्वन् यांहून या नराशंस अग्नीची भिन्नता म्हणजे तो जन्मतो तेव्हां नराशंस असतो (ऋ, ३.२९,११). बृहस्पतीला दिलेल्या एका सूक्तांत (ऋ. १०.८२,२) रक्षणार्थ नराशंसाला आह्वान केलें आहे. दुसऱ्या एका बृहस्पतीच्या सूक्तांत (ऋ. १.१८,९) तो द्युलोकाचा यजमान आहे असें म्हटलें आहे. या दोन ठिकाणीं नराशंस म्हणजेच बृहस्पति अशी कल्पना दिसते. नराशंस याचा अर्थ मनुष्यांची प्रार्थना अर्थात् मनुष्यांच्या प्रार्थनेचा विषय असा असावा. कारण नराशंस, देवानामशंस अशीं रूपें आढळतात (ऋ. २.३४; १.१४१,११); व एकदां अग्नीला 'शंसं आयोः' म्हणजे आयूची प्रार्थना (आयूचा प्रार्थनाविषय) असें म्हटलेलें आहे (ऋ. ४.६,११). बर्गाईनच्या मतें नराशंस या शब्दानें दाखविलेलें अग्नीचें रूप म्हणजे मनुष्यांच्या प्रार्थनेचा देव अथवा दुसरा बृहस्पति हें असावें.

**सोम.**—ऋग्वेदांत जे यज्ञयाग आहेत त्यांत सोमयाग हाच मुख्य आहे आणि यामुळेंच सोमदेव हा ऋग्वेदांतील अत्यंत प्रमुख देवांपैकीं एक देव आहे. नवव्या मंडळांतील ११४ सूक्तें म्हणजे सर्व नववें मंडळ आणि इतर मंडळांतील ६ सूक्तें याच्या स्तुतीला दिलेलीं आहेत. दुसऱ्याहि चार पांच सूक्तांत मधून मधून याचें गुणकीर्तन आलेलें आहे. तसेंच इन्द्र-सोम, अग्नि-सोम, पूषन् व रुद्र-सोम या जोड देवतांच्या गुणकीर्तनांत याचेंहि गुणकीर्तन सुमारें ६ सूक्तांत आलेलें आहे. सोम हें नांव सोम या शुद्ध स्वरूपांत व इतर शब्दांशीं समास होऊन असें एकंदर ऋग्वेदांत शेंकडोवेळां आढळतें. तेव्हां नांवाचें कमी अधिक वेळां येणें याजवर महत्त्वाचें मापन अवलंबून ठेविलें असतां वैदिक देवतांमध्यें सोमाचा नंबर तिसरा लागतो.

सोम हा इन्द्र व वरुण यांपेक्षां मानवी गुणांनीं बऱ्याच कमी प्रमाणानें वेष्टिलेला आहे. कारण कवींनां सोमलता आणि तिचा रस हे नेहमीं समोर दिसत असल्यानें त्यांच्या कल्पनेला तितकी मर्यादा घातली जात असे. या कारणामुळें सोमाचें स्वरूप मानवी होतें व त्याच्या क्रिया मनुष्याच्या होत्या अशा प्रकारचें वर्णन फारच थोडें आहे. त्याचीं म्हणून जीं आश्चर्यकारक पराक्रमाचीं कृत्यें वर्णिलीं आहेत तीं विशिष्टतेनें त्याचीं नसून दुसऱ्या श्रेष्ठ देवांनां सामान्य अशींच आहेत. इतर देवांप्रमाणें हा सोमदेव यज्ञाला यावा व त्यानें दर्भासनावर बसून हव्य भक्षण करावें अशी त्याची इन्दु आणि सोम या नांवानें प्रार्थना केली जाते. सोमवल्ली दगडाखालीं चिरडणें वगैरे क्रिया होत असतां जे मंत्र म्हणावयाचे

त्या मंत्रांनींच बहुधा सर्व नववें मंडळ भरलेलें आहे. सोम हा दगडाखालीं ठेंचला म्हणजे सोमरस तयार होतो. नंतर ऊर्णवस्त्रानें तो गाळला जातो. ह्या ऊर्णवस्त्रांतून तो लांकडी भांड्यांत पडतो आणि नंतर हा रस तृणपात्रांत मधुर पेय म्हणून देवांनां दिला जातो. केव्हां केव्हां अग्नींत तो टाकला जातो (ऋ. १.९४,१४; ५.५,१; ८.४३,११ इ.); केव्हां केव्हां पुरोहित हा रस पितात. सोमाच्या संबंधीं ज्या क्रिया होतात त्यांवर नाना प्रकारच्या संकीर्ण कल्पना रचल्या आहेत आणि यांपैकीं कांहीं कल्पना इतक्या गूढ आहेत कीं त्यांचा अर्थ लागत नाहीं.

सोमकथा नीट समजण्यासाठीं सोमलता आणि तिजपासून निघणारा मादक रस यांचें वर्णन आणि या लतेवर व रसावर होणाऱ्या अनेक संस्कारांचें वर्णन अवश्य आहे. सोमलतेचा भाग ठेंचतात त्याचें नांव अंशु (ऋ. ९.६७,२८); अंशु म्हणजे अंकुर किंवा देंठ. हे अंशु फुगलेले असतात, व गाईनीं आपल्या आंचळांतून दूध द्यावें त्याप्रमाणें यांजपासून दूध निघतें (ऋ. ८.९,१९); सोमलतेला अंधस असें नांव आहे असें दिसतें (ऋ. ८.३२,२८; १०.९४,८); ही लता द्युलोकांतून आली (ऋ. ९.६१,१०); व ती गरुडानें आणली (ऋ. ५.४५,९; ९.६८,६; १०.१४४,५). अंधस हें नांव रसालाहि देतात. सोमदेवाला इन्दु असें नांव आहे (ऋ. ९.५१,३; १०.११५,३); त्याच्या रसाला सोम असें नांव आहे, त्याला रस, पितु, म्हणजे पेय (ऋ. १.१८७) मद (मादक पेय) अशीं नांवें आहेत. केव्हां केव्हां अन्न हेंहि नांव सोमाला दिलेलें आढळतें (ऋ. ७.९८,२; ८.४,१२), (शतपथ ब्रा. १.६.४,५); मधु ह्या शब्दाचा अश्विन् देवतासंबंधांत मध असा अर्थ आहे पण मधुर पेय या अर्थी हा शब्द पय, घृत व विशेषतः सोमरस यांनांहि लावतात (ऋ. ४.२७,५; ८.६९,६); सोम याचा अर्थ अमृत असतो तेव्हां मधु हा त्याचा समानार्थी शब्द असतो. ज्याप्रमाणें अमृत सोमाला मधु हें नांव आहे त्याप्रमाणें साध्या सोमाला अमृत हें नांव वारंवार दिलेलें आढळतें (ऋ. ५.२,३; ६.३७,३; इ.), (वा. सं. ६.३४;), (श. ब्रा. ९.५.१,८); सोमराजा पिळला म्हणजे अमृत असतो (वा. सं. १९.७२); सोम्य मधु असे शब्द सोमार्थी येतात (ऋ. ४.२६,५; ६.२०,३); अलंकारिक अर्थानें सोमाला पीयूष म्हणतात (ऋ. ३.४८,२ इ.); त्याचप्रमाणें त्याला दूध (ऋ. ९.१०७,१२;), अंशुलहरी (ऋ. ९.९६,८); आणि मधाचा रस असेंहि म्हणतात (ऋ. ५.४३,४;). सर्वांत अधिक वेळां येणारें असें याचें अलंकारिक नांव म्हणजे इंदु हें होय. इंदु म्हणजे प्रकाशमान बिंदु. यासारख्याच अर्थाचा द्रप्स हा शब्द सोमाला लावतात. पण तो इंदुशब्दापेक्षां पुष्कळ कमी वेळां दिसतो.

सोमांतून रस काढण्याच्या क्रियेला सू आणि दुह् हे दोन धातू लावलेले सांपडतात (९.९२,४ इ; ३.३६,६ व ७ इ.). सू म्हणजे दाबून अथवा पिळून रस काढणें व दुह् म्हणजे दोहन करणें. हा रस मादक असतो (ऋ. १.१२५,३; ६.१७,११; ६.२०,६); हा मधुमान् असतो (ऋ. ९.९७, १४); मधुमान् याचा अर्थ सामान्यतः गोड असा आहे. सोमाला हा शब्द लावतात तो केव्हां केव्हां याच साध्या अर्थानें लावतात. तेव्हां पूर्वी सोमांत मध मिसळीत असावेत व म्हणून मधुमान् हा शब्द त्याला लावला जात असावा असें मानण्यास जागा आहे (ऋ. ९.१७,८; ९.८५,४८; ९.९७,११; ९.१०९,२०); दाबांतून सोमरस निघतांना त्याला नदीच्या ऊर्मीची उपमा देण्यांत येते (ऋ. ९.८०,५); त्याला नुसतें ऊर्मी असेंहि नांव दिलेलें आढळतें (ऋ. ९.६४, ११ इ.); मधाची ऊर्मी असेंहि नांव येतें (ऋ. ३४.७,१); भांड्यांत एकत्र केलेल्या रसाला अर्णव (ऋ. १०.११५,३); समुद्र (ऋ. ५.४७,३; ९.६४,८ इ.); अशीं नांवें आहेत. द्युलोकांतील सोमाला उत्स म्हणजे झरा असेंहि नांव आहे. गाईच्या सर्वांत उंच स्थानीं हा उत्स आहे (ऋ. ५.४५,८); हा उत्स गाईमध्यें ठेविला आहे आणि दहा लगामांनीं म्हणजे अंगुलींनीं ह्या उत्साचें नियंत्रण केलें जातें (ऋ. ६.४४,२४); विष्णूच्या परमोच्च स्थानांतील मधाचा झरा असेंहि याला नांव आहे (ऋ. १.१५४,५).

सोमलता व तिचा रस व सोमदेव या सर्वांचा वर्ण बभ्रु, अरुण, हरित म्हणजे तपकिरी, लालपिंगट अशा प्रकारचा वर्णिला आहे. सोम म्हणजे अरुण वृक्षाची शाखा असें एका ठिकाणीं वर्णन आहे (ऋ. १०.९४,३); दुग्धपूर्ण असा अरुण अंशु किंवा लाल देंठ असें वर्णन दुसऱ्या ठिकाणीं आहे (ऋ. ७.९८,१); हरित वर्णाचा देंठ पिळून तो रस गाळण्यांतून गाळला जातो असें वर्णन एका ठिकाणीं आहे (ऋ. ९.९२,१); ब्राह्मणग्रंथांत जी सोमलता घ्यावी म्हणून वर्णन आहे किंवा तिच्या जागीं दुसरी लता जी विहित मानली आहे तिचा रंग लाल असला पाहिजे असें म्हटलें आहे (श. ब्रा. ४.५.१०,१); सोम विकत घेण्यासाठीं जी गाय द्यावयाचें विधिग्रंथांतून लिहिलेलें आहे त्या गाईचा रंग लाल किंवा तपकिरी असावा असें म्हटलें आहे, व याचें कारण सोमाचा रंग तसा असतो असें दिलें आहे (तै. सं. ६.१,६; श. ब्रा. ३.३.१,१४).

सोमाला हातांनीं शुद्ध करतात (ऋ. ९.८६,३४); दहा बोटांनीं शुद्ध करतात (ऋ. ९.८,४; ९.१५,८ इ.); दहा कुमारिका बहिणी बहिणी सोम शुद्ध करतात (ऋ. ९.१,७; ९.६,५); विवस्वानाच्या मुली सोम शुद्ध करतात (ऋ. ९. १४,५); अशींहि वर्णनें आढळतात. त्रिताच्या कुमारी पाषाणाच्या साहाय्यानें हरितवर्ण सोमाला पिळून इन्द्राचें पेय

तयार करतात (ऋ. ९.३२,२; ९.३८,२); सूर्याची कन्या सोम आणते किंवा शुद्ध करते असेंहि वर्णन आहे (ऋ. ९.१,६; ९.७२,३; ९.११३,३); प्रार्थनेनें सोमरस शुद्ध होतो असेंहि म्हटलें आहे (ऋ. ९.९६,१३; ९.११३,५); सोम घेणारे पुरोहित म्हणजे अध्वर्यू होत (८.४,११); सोमाचें देंठ दगडानें ठेंचतात (ऋ. ९.६७,१९); किंवा दगडानें वाटतात (ऋ. ९.१०७,१०); सोमरस तयार करण्यासाठीं सोमलता कुटतात (ऋ. १०.८५,३); दगड लतेच्या साली काढतात (तै. ब्रा. ३.७.१३,१); हे दगड एका कातड्यावर ठेवलेले असतात. गाईच्या कातड्यावर हे सोम चावतात (बप्सति) असें म्हटलें आहे (ऋ. ९.७९,४). हे दगड वेदीवर ठेवितात (५.३१,१२); नंतरच्या काळांतील विधीमध्यें दगड वेदीवर ठेवण्याची पद्धत नाहीं. हातांनीं दगड धरतात (ऋ. ७.२२,१; ९.७९,४); (अ. वे. ११.१,१०); दोन हात आणि दहा बोटें या दगडाला कामाला जोडतात. यावरूनच दहा लगाम या दगडानें कह्यांत ठेवितात असें म्हटलें आहे (ऋ. १०.९४,८). दगडांनां घोड्यांची उपमाहि दिलेली आढळते, व ही उपमा युज्=रथाला जोडणें हा शब्द दगडासंबंधानें योजण्याच्या प्रघातावरून निघाली असावी (ऋ. १०.९४,६); सोम ठेंचण्याच्या दगडांनां अद्रि, ग्रावन् हे शब्द वापरतात. अद्रिशब्द असतो तेथें सू हें क्रियापद येतें व ग्रावन्शब्द असतो तेथें वद्=बोलणें व याच अर्थाचीं दुसरीं क्रियापदें येतात, यावरून ग्रावन्शब्द लावतांना सोमाचे ठिकाणीं मानवी गुणांचा अध्यारोप अधिक केल्याचें स्पष्ट होतें. ग्रावन् व अद्रि हे शब्द द्विवचनी बहुतेक केव्हांहि सांपडत नसून त्यांचा एकवचनी किंवा बहुवचनी प्रयोग आढळतो. अश्म (ऋ. ८.२,२), भरित्र (ऋ. ३.३६,७), पर्वत (ऋ. ३.३५,८), पर्वताः, अद्रयः (ऋ. १०.९४,१), अशींहि या दगडांनां नांवें आहेत. दगडानें ठेंचून रस काढण्याची क्रिया ऋग्वेदकाळीं विशेष वहिवाटींतली होती, परंतु पुढील विधिग्रंथांत उखळमुसळ (खल व बत्ता) यांनीं रस काढणें विहित आहे, तेंहि ऋग्वेदकाळीं अवगत होतें (ऋ. १.२८,१). पारशी लोकांमध्यें ही चाल अद्यापि असल्यानें इंडो इराणी काळामध्यें देखील उखळाचा व मुसळाचा उपयोग सोमरस काढण्याकडे करीत असावे.

सोमाच्या कांड्या ठेंचून निघालेला रस मेंढीच्या लोंकरीच्या वस्त्रावर ओततात (ऋ. ९.६३,१०); व या वस्त्रांतून तो गाळला जातो (ऋ. ९.६९,९); हें वस्त्र या रसांतील वाईट भाग काढून टाकतें व या वस्त्रांतून हा रस शुद्ध होऊन देवांच्या मेजवानीसाठीं तयार होतो (ऋ. ९.७८,१); या गाळण्याला पुष्कळ नांवें आहेत व या गाळण्याचा उल्लेख वारंवार येतो. याला त्वच म्हणजे त्वचा, रोमन् म्हणजे केश, वार म्हणजे लोंकर, पवित्र म्हणजे गाळणें, सानू म्हणजे गाळण्याचा वरचा भाग अशीं निरनिराळीं नांवें आहेत. या नांवांपूर्वी अवि म्हणजे मेंढी या शब्दापासून झालेलें विशेषण केव्हां केव्हां लावलेलें सांपडतें. पवित्र अथवा गाळणें या अर्थी लाक्षणिक रीतीनें नुसता अवि हा शब्दहि योजिलेला सांपडतो. गाळण्यांतून निघून खालीं पडणारा सोमरस स्वच्छ असल्यानें त्याला पुनान अथवा पवमान अशीं नांवें सामान्यतः दिलीं जातात. मृज्=शुद्ध करणें हा धातु सोम गाळण्यानें शुद्ध करण्याच्या क्रियेला लावला जातो. पण तो त्यांत पाणी आणि दूध मिसळण्याच्या क्रियेलाहि लावला जातो (ऋ. ९.८६,११; ९.९१,२). निर्मळ गाळलेल्या सोमरसाला शुद्ध असें नांव आहे. पण त्याला शुक्र अथवा शुचि म्हणजे चकचकित हें विशेषण अधिक वेळां लावलेलें आढळतें (ऋ. ८.२,१०; ९.३३,२; १.५,५; १.३०,२;); हा कांहीं न मिसळलेला शुद्ध सोम वायु आणि इन्द्र यांनांच फक्त दिला जातो. शुचिप म्हणजे शुद्ध सोम पिणारा हें वायूचें विशिष्टत्वदर्शक विशेषण आहे. उत्तरकालीन विधीमध्यें असाच प्रकार आढळतो. या विधींत जोड देवतांकरतां जे ग्रह किंवा प्याले तयार केले जातात त्यांत वायु आणि इन्द्रवायू यांनां शुद्ध सोम दिला जातो. मित्रावरुण या संयुक्त देवतेला तो दूध मिसळून दिला जातो व अश्विन् देवतांनां मध मिसळून दिला जातो.

गाळण्यांतून सोम निघाला म्हणजे तो कलशांत (९.६०,३) किंवा द्रोणांत म्हणजे डोणींत उतरतो. सोमाचे प्रवाह म्हशींच्या कळपाप्रमाणें द्रोणांच्या रानांत घुसतात (ऋ. ९.३३,१; ९.९२,६); हा सोमदेव पक्ष्याप्रमाणें उडून डोणीमध्यें जाऊन बसतो (ऋ. ९.३,१); झाडावर पक्षी बसावा त्याप्रमाणें हरितवर्ण सोम चंबूमध्यें जाऊन बसतो. या डोणींत सोमाबरोबर पाणी मिसळतात. लाटेबरोबर मिसळत असतां सोम गर्जना करतो (ऋ. ९.७४,५); बैल गाईंच्या कळपावर धांवावा त्याप्रमाणें हा डोणीकडे धांवतो आणि तिच्यांतील पाण्यावर बैलाप्रमाणें मोठा आवाज करीत घुसतो. पाण्याचें वस्त्र अंगावर घेऊन हा इन्दु डोणींत चक्रावर धांवत असतो, आणि त्याला गाणारे स्फुरण चढवित असतात (ऋ. ९.७६,५; ९.१०७,२६); चतुर लोक आपल्या हातांनीं पाण्यामध्यें सोम पिळतात, लोंकरीच्या वस्त्रांतून निघाल्यावर आणि त्या लांकडी डोणींत फिरत असतां दहा कुमारिका त्याला शुद्ध करतात (ऋ. ९.६,५); आणखी पुष्कळ ठिकाणीं सोमांत पाणी मिळसल्याचा उल्लेख आहे (ऋ. ९.३०,५; ९.५३,४; ९.८६,८; व २५) सोमाचे बिंदू जलाच्या प्रवाहांत चकाकतात (ऋ. ९.७६,१). मृज् म्हणजे धुणें शुद्ध करणें हा धातु सोमांत पाणी मिसळण्याच्या क्रियेला सामान्यतः योजतात. त्याप्रमाणेंच दुसरा धातु योजला जातो तो आधाव म्हणजे धुणें हा होय (ऋ. ८.१,१७). सोम तयार करावयाचा म्हणजे प्रथम सवन म्हणजे ठेंचून पिळणें व नंतर पाण्याशीं मिसळणें या क्रिया करावयाच्या असतात (ऋ.

७.३२,६; ८.१,१७; ८.३१,५; अ. वे. ६.२,१ ). उत्तर-कालीन विधींमध्येंहि याच क्रमानें म्हणजे सवन व आधावन या क्रमानें सोम तयार होतो. डोणींत किंवा चंवूमध्यें सोमांत दूध मिसळतात ( ऋ. ९.८,६ ); दुधानें सोमाला गोडी येते असें म्हणतात ( ऋ. ८.२,३ ); पाणी व दूध दोन्ही सोमांत मिसळण्याबद्दल कित्येक ठिकाणीं सांगितलें आहे. सोम गाईचें म्हणजे दुधाचें वस्त्र घेऊं इच्छितो, तेव्हां तो जलाचें वस्त्र पांघरतो, जलप्रवाह त्याच्या पाठीमागून येतात, अशा तऱ्हेचें वर्णन येतें ( ऋ. ९.२,३ व ४); दगडांनीं सोम ठेंचतात तो पाण्यानें धुतात, व त्याला जणों गाईचें वस्त्र (दुग्धवस्त्र) देतात, मनुष्य सोमाच्या कांड्यांतून दोहन करून सोमरस काढतात ( ऋ. ८.१,१७; २.३६,१; ६.४०,२; ९.८६,२४ व २५; ९.९६ ); सोमाबरोबर तीन वेगळे पदार्थ मिसळीत असत व त्याचें याप्रमाणें तीन प्रकारचें मिश्रण करीत असत असें ऋग्वेदांतील उल्लेखांवरून दिसतें. ( त्र्याशिर ५.२७,५ ), दूध (गवाशिर ), ताक किंवा दहीं (दध्याशिर), आणि यव (यवाशिर) हे तीन पदार्थ सोमांत मिसळीत असत. ह्या मिश्रणाच्या पदार्थाला अलंकारिक रीतीनें वस्त्र, वासस, अत्क म्हणजे पांघरूण किंवा निर्णिज म्हणजे चकाकणारा झगा ( ऋ. ९.१४,५) असें म्हटलें आहे. निर्णिज हा शब्द गाळण्यालाहि वापरला आहे (ऋ. ९.७०,७); सोमाला सौंदर्यानें अलंकृत झालेला ( ऋ. ९.३४,४), मोठ्या किंमतीचे अलंकार परिधान केलेला (ऋ. ९.९१,१), असें म्हटलेलें आहे. घृत देखील सोमांत मिसळीत असत (ऋ. ९.८२,२); पण घृत हें क्वचितच मिसळीत असत. घृत किंवा जल हें कांहीं सोमांत मिसळण्याचें नेहमींचें द्रव्य नव्हे.

विधिग्रंथांत आप्यायन नांवाचा संस्कार आहे. हा संस्कार अर्धवट ठेंचलेल्या सोमाच्या कांड्यांवर थोडेंसें पाणी शिंपून त्या फुगतील असें करणें होय. या संस्काराच्या पहिल्या पायऱ्या मैत्रायणी संहितेंत सांपडतात (४.५,५ ). आप्या हें क्रियापद ऋग्वेदांतहि सोमाच्या संबंधानें आढळतें ( ऋ. १.९१,१६ ते १८; १०.८५,५ ); पण या ठिकाणीं सोम याचा अर्थ सोमलता असा नसून चंद्र असा आहे. दुसऱ्या एका ठिकाणीं जेथें आप्या हा धातु सोमसंबंधानें वापरला आहे ( ऋ. ९.३१,४ ) तेथें वरीलप्रमाणें आप्यायन संस्काराचा अर्थ उद्दिष्ट असणें शक्य दिसतें. समुद्र किंवा नदी यांजप्रमाणें सोम फुगतो ( पी-पिन्व ) ( ऋ.९.६४,८; ९.१०७,१२ ) असेंहि वर्णन आढळतें.

ऋग्वेदांत दिवसांतून तीन वेळां सोमसवनाचें काम दाखविलें आहे. ऋभुगणांनां सायंकाळच्या सवनसमयीं येण्यासाठीं बोलाविलें जातें ( ऋ. ४.३३,११ ), इन्द्राला माध्याह्नसवनाचे प्रसंगीं बोलावतात ( ऋ. ३.३२, १ व २; ८.३७,१ ), हें सवन केवळ इन्द्रासाठींच असतें ( ऋ. ४.३६,७ ). सकाळचें सोमसवन हें इन्द्राचें प्रथम पान असतें ( ऋ. १०.११२,१ ).

सोमाचें स्थान ( सदस्थ ) वारंवार उल्लेखिलें जातें. एकदां तीन सदस्थांचा उल्लेख आलेला आहे. तो शुद्ध झाला म्हणजे हीं तीन स्थानें व्यापतो ( ऋ. ९.१०३,२ ). दुसऱ्या एका ठिकाणींहि (८.८३,५ ) सोमाला त्रिषधस्थ हें पद लाविलें आहे. उत्तरकालीन सोमयागविधीमध्यें तीन डोण्या वापरतात. या तीन डोण्या म्हणजेच वरील तीन स्थानें असावींत ( तै. सं. ३.२,१; का. श्रौ. ९.७,४ ); ( ऋ. ८.२,८ ); परंतु वर्गाइनच्या मतें वर उल्लेखिलेलीं सोमाचीं तीन स्थानें केवळ काल्पनिक कथाभाग आहेत. इन्द्र सोमाचीं तीन तळीं पिऊन टाकतो असें जें वर्णन आहे तेंहि याच प्रकारचें आहे ( ऋ. ५.२९,७ व ८; ६.१७,११; ८.७,१०). सोमाला त्रिपृष्ठ हें विशेषण लावतात व हें सोमाचें वैशिष्ट्यवाचक विशेषण आहे. हें एकदां सोमरसाला लावलें आहे ( ऋ. ७.३७,१ ), यावरून सोमाशीं मिळवावयाचे जे तीन पदार्थ त्यांजकडे याचा संबंध असावा असें वाटतें. सायणाचार्यांचेंहि हेंच मत आहे. अग्नीला घृतपृष्ठ हें नांव जसें त्याजवर तूप टाकतात त्याजवरून आलें त्याचप्रमाणें सोमाचें त्रिपृष्ठ हें नांव निघालें असावें. सोमरसाशीं पाणी मिसळतात एवढ्या आधारावर सोमरसाचा जलाशीं नानाप्रकारचा संबंध कल्पिलेला व वर्णिलेला आहे. त्याच्याकरितां जलाचे प्रवाह धांवतात ( ऋ. ९.३१,३ ); त्याच्या नियमाप्रमाणें जलें काम करितात ( ऋ. ९.८२,५ ); प्रवाहांच्या अग्रस्थानीं हा वाहतो ( ऋ. ९.८६,१२ ); तो सिंधूंचा राजा आहे ( ऋ. ९.१५,५; ९.८६,१३; ९.८९,२ ); तो जायांचा पति आहे ( ऋ. ९.८६,३२ ); तो समुद्रीय राजा आहे व देव आहे ( ऋ. ९.१०७,१६ ); जलें त्याच्या भगिनी होत ( ऋ. ९.८२,३ ); जलांचा नेता या नात्यानें सोमाची वृष्टीवर सत्ता आहे ( ऋ. ९.७४,३ ); तो जलें उत्पन्न करितो आणि द्यावा-पृथ्वीवर वर्षाव करितो ( ऋ.९६,३ ); तो द्युलोकांतून पाऊस पाडतो ( ऋ. ९.८,८; ९.४९,१; ९.९७,१७; ९.१०८,९ व १० ); सोमाच्या बिंदूंनांहि कित्येकवेळां पावसांतील बिन्दूंची उपमा दिली आहे ( ऋ. ९.८९,१; ९.१०६,९ ); पाण्यानें भरलेल्या मेघाप्रमाणें सोम हा मधाच्या प्रवाहाबरोबर वाहतो ( ऋ. ९.२,९ ); पवमान सोमाचे बिंदू द्युलोकांतून व अंतरिक्षांतून पृथ्वीच्या शिखरावर पडतात असें वर्णन आहे ( ऋ. ९.६३,२७ ). कांहीं ठिकाणीं सोमांतून सोमरस काढण्याच्या क्रियेचा लाक्षणिक संबंध पावसाकडे असावा असें दिसतें ( ऋ. ८.७,१०; ९.७४,४ ). शतपथ ब्राह्मणांत अमृत आणि जल एकच असें म्हटलें आहे. अशा प्रकारच्या ऐकींव कल्पनेवरून गरुडानें द्युलोकांतून सोम आणून तो मनुष्यांनां दिला ही कल्पना निघाली असावी. एकंदरींत असें दिसतें कीं,

अंतरिक्षांतून पडणारा पाऊस व द्युलोकांतील सोम हे एकच अशी तेव्हांची कल्पना नसून वरून खालीं पृथ्वीवर येणारा दिव्य सोम वृष्टिजलाशीं मिश्र होऊन येत होता अशी कल्पना होती.

जलांची प्रार्थना करून त्यांनीं सोमांची मादक ऊर्मि उत्पन्न करावी, ही ऊर्मि म्हणजे इन्द्राचें पेय द्युलोकांत उत्पन्न झालेला झरा आहे, असें म्हटलेलें आढळतें (ऋ. १०.३०,९); सोम हा जलामध्यें वाढणारा बिंदु आहे (ऋ. ९.८५,१०;९.८९,२); तो जलांचा गर्भ आहे (ऋ. ९. ९७,४१); (श. ब्रा. ४.४.५,२१); तो त्यांचें अपत्य आहे. कारण सात भगिनी त्याच्या माता होऊन त्याच्या जन्मकालीं भोंवतालीं असतात; तो जलांचा गंधर्व आहे (ऋ. ९.८६,३६); जलांनां त्याच्या माता असें म्हटलें आहे (ऋ. ९.६१,४); जलांमध्यें किंवा गाईंमध्यें राहणारा युवा किंवा तरुण असें सोमाला म्हटलें आहे (ऋ. ५.४५,९; ९.९,५); सोमरस शोधिला जात असतांना व द्रोणांत किंवा चंबूंत तो जोरानें उतरत असतांना जो शब्द होतो त्याचा उल्लेख वारंवार आला आहे. पावसाच्या आवाजाशीं याची तुलना केलेली आहे. अशा प्रसंगींची भाषा सामान्यतः अतिशयोक्तींची असते. उदाहरणार्थ पवित्रावरून म्हणजे गाळण्यावरून वाहत जाऊन खालीं डोणींत पडणारे सोमबिंदू लढणाऱ्या वीराप्रमाणें मोठा घोष करितात असें म्हटलें आहे (ऋ. ९.६९,२); सोमाच्या अशा प्रसंगींच्या शब्दाला डुरकणें या अर्थाचीं क्रियापदें (क्रंद, नद, मा, रु, वास) वगैरे लाविलेलीं आढळतात (ऋ. ९.९१,३;९.९५,४); स्तन (म्हणजे मेघ गर्जना करणें) हें क्रियापद देखील या संबंधांत लाविलेलें आढळतें (ऋ. ९.८६,९); विद्वान् लोक गर्जना करणारा व कधींहि कमी न पडणारा असा सोम पिळून त्याच्या कांड्यांतून रस दोहन करितात असें वर्णन आहे (ऋ. ९.७२,६); सोमाच्या शुद्धीकरणाशीं विजेचाहि कित्येक ऋचांत संबंध दाखविला आहे (ऋ. ९. ४१,३;९.८०,१;९.८४,३;९.८७,८); हें शुद्धीकरण म्हणजे दिव्य सोमाचें शुद्धीकरण असावें व याशीं जो विजेचा संबंध दाखविलेला आहे तो विजेचा पाऊस पडतो त्यावरून कल्पिलेला असावा.

सोमाच्या शब्दाचें वर्णन करतांना त्याचें बैलाशीं साम्य दाखविलें आहे किंवा त्याला वृषभ असें म्हटलें आहे. तो रानांत बैलाप्रमाणें डुरकण्या फोडतो (ऋ. ९.७,३); हा पिंगट रंगाचा बैल मोठा आवाज करितो आणि सूर्याबरोबर प्रकाशतो (ऋ.९.२,६). दुग्धमिश्रित किंवा विरहित जलांनां गाईंची संज्ञा अलंकारिक रीतीनें दिलेली असते. या कारणानें सहजच सोमाचें जलाशीं नातें म्हणजे बैलगाईचें नातें होय. हा गाईंमध्यें बैल आहे (ऋ. ९.१६,६; ९.६९,४; ९. ९६,७). हा गाईंचा नायक आहे (ऋ. ९.७२,४). गाईंमधून जात असतां बैल ओरडतो त्याप्रमाणें हा ओरडतो (ऋ. ९.७१,९); बैल गाईकडे जात असतां जसा ओरडतो तसा हा ओरडतो (ऋ. ९.७१,७); गाईहि त्याजकडे पाहून ओरडतात (ऋ. ९.८०,२ इ.). ज्याप्रमाणें पृथ्वी आणि सरिता या ठिकाणचा बैल आहे, त्याप्रमाणें तो द्युलोकचा बैल आहे. सोमामध्यें दिसून येणारा मद दाखविण्यासाठीं कित्येक वेळां त्याची गव्याशीं तुलना केली आहे. त्याला पशुहि म्हटलें आहे (ऋ. ९.८६,४३); जलरूपी गाईंमध्यें हा बैल असल्यानें सोमाला जलामध्यें सुपीकता असें म्हटलें आहे (ऋ. १०.३६,८; ९.१९,५); त्याला रेतोधा म्हणजे गर्भ ठेवणारा असेंहि विशेषण आहे (ऋ. ९.८६,३९); यजुर्वेदामध्यें रेतोधा हें नांव चंद्राला दिलेलें आढळतें (मै. सं. १.६,९); हा सुपीकपणा उत्पन्न करणारा आहे व अपत्यधारणशक्ति उत्पन्न करणारा आहे (ऋ. ९.६०,४; ९. ७४,५); सोमाला उक्षन्, वृषन्, वृषभ अशीं नांवें वारंवार आलीं आहेत. त्यामुळें त्याला तिग्मशृंग म्हणजे अणीदार शिंगांचा हें विशेषणहि केव्हां केव्हां लावण्यांत येतें. ऋग्वेदांत हें सहा वेळां आलें आहे. पैकीं पांच वेळां याबरोबर वृषभ अर्थाचा शब्द आहे. याप्रमाणें मंथ म्हणजे इन्द्राकरतां घुसळून तयार केलेलें पेय याला तिग्मशृंग वृषभ असें म्हटलें आहे (१०.८६,१५); अग्नीप्रमाणें सोम आपलीं शृंगें घांसून तीक्ष्ण करितो (९.१५,४; ९.७०,७).

सोम वेगवान् आहे (ऋ. १.४,७); आणि दगडानें ठेंचलेल्या सोमांतून रस वेगानें वाहतो तेव्हां त्याच्या त्या वेगाला घोड्याची उपमा दिली जाते, किंवा घोडा हें नांव त्याला दिलें जातें. ज्याप्रमाणें वेगवान् घोड्याला धुवून साफ करावें त्याप्रमाणें दहा कुमारिका याला साफ करतात (ऋ. ९. ६,५); मद आणणारा सोमबिंदु तपकिरी वर्णाचा घोडा आहे (९.६३,१७); गाळण्यांतून डोणींत पडणारा सोमरस म्हणजे अरण्याकडे धांवणारा पक्षी अशीहि कल्पना आली आहे (ऋ. ९.७२,५) इ.

या रसाचा वर्ण पिंवळा असतो म्हणून याचें तेज हें कवींच्या वर्णनाचा मुख्य विषय होऊन बसलें आहे. सोमाचे किरण सूर्यासारखे असें विधान आढळतें. सोमाला सूर्याची उपमा वारंवार देण्यांत येते. सोम सूर्याप्रमाणें प्रकाशतो किंवा सूर्याबरोबर प्रकाशतो, अथवा सूर्यकिरण पांघरूण घेतो (ऋ. ९.७६,४;९.८६,३२;९.७१,९); तो सूर्याच्या रथावर चढतो, आणि सूर्याप्रमाणें सर्व वस्तूंच्या वरतीं आहे. द्युलोक आणि पृथ्वी तो आपल्या किरणांनीं सूर्याप्रमाणें भरून टाकतो (ऋ. ९.४१,५); जन्मतांच हा सोमपुत्र आपल्या मातापित्यांनां प्रकाशमान करितो (ऋ. ९.९,३); सूर्याची कन्या याला शुद्ध करते (ऋ. ९.१,६); अंध-

काराशीं हा युद्ध करतो; आपल्या प्रकाशानें अंधकाराला तो दूर करतो ( ऋ. ९.९,७;९.८६,२२ ); अंधकार दूर करून तो चकचकित प्रकाश करतो ( ऋ. ९.६६,२४;९. १००,८;९.१०८,१२ इ. ).

सोम प्याल्यानें उत्साह येतो व ताकद वाढते ही सोमाची क्रिया अर्थातच आश्चर्यकारक आहे. तेव्हां सामान्य अन्नपाणी सेवून जो उत्साह व जी ताकद वाटत नाहीं, ती ताकद व उत्साह उत्पन्न करणारा व स्वाभाविक शक्तीपलीकडील कामांस उत्तेजित करणारा असा हा सोम असल्यानें, हा सोम म्हणजे दिव्य पेय असून या पेयानें अमरता उत्पन्न होते अशी कथा उत्पन्न झाली. सोमकथांमध्यें सोमाला अमृत म्हणजे अमरत्व देणारें पेय म्हटलें आहे. सोम हा अमृतत्व देणारा व उत्साह उत्पन्न करणारा पदार्थ आहे ( ऋ. १.८४,४ ); देवांनां हा प्रिय आहे ( ऋ. ९.८५,२ ); मनुष्यांनीं सोम काढून त्याच्यांत दूध मिसळलें म्हणजे सर्व देव त्याचें पान करतात ( ऋ. ९.१०९,१५ ); कारण या पानाच्या योगानें ते आनंदमय होतात ( ऋ. ८.२,१८; ८.५८,१८ ); सोम अमर आहे ( ऋ. १.४३,९; ८.४८,१२; ९.३,१ इ. ); अमरत्व येण्यासाठीं सोमाचें देवांनीं पान केलें ( ऋ. ९. १०६,८ ); सोमाला देवांनीं अमृतत्व दिलें ( ऋ. ९.९१,६; ९.१०८,३ ); आणि मनुष्यांनांहि अमृतत्व दिलें ( ऋ. १.९१,१; ८.४८,३ ). आपला भक्त असेल त्याला हा सोम जेथें शाश्वत प्रकाश आणि वैभव नांदतें अशा शाश्वत आणि अक्षय्य लोकांत नेवून ठेवितो. वैवस्वत जेथें राहतो त्या लोकांत हा आपल्या भक्ताला अमर करून ठेवितो (ऋ. ९.११३,७ व ८).

अर्थातच सोमामध्यें रोग बरे करण्याची शक्ति आहे. रुग्ण माणसाला सोम हा औषधरूप आहे ( ऋ. ८.६१, १७ ); कोणीहि रुग्ण असेल तर त्याला सोमदेव बरा करतो, लंगडे असतील त्यांनां पाय देतो, अंधळे असतील त्यांनां सोम डोळे देतो ( ऋ. ८.६८,२;१०.२५,११ ); तो मानवशरीराचा पालक आहे. तो मनुष्याच्या प्रत्येक अवयवांत आहे ( ऋ. ८.४८९ ); तो या जन्मीं दीर्घ आयुष्य देतो ( ऋ. १.९१,६;८.४८,४ व ७;९.४,६; ९.९१,६ ); सोमाचें पान पिणाराच्या हृदयांतून पाप दूर करितें. या पानानें असत्याचा नाश होतो, आणि सत्याची वृद्धि होते. सोमपान केलें म्हणजे आवाज चांगला चालतो ( ऋ. ६.४७,३;९.८४,४;९.९५,५;९.९७,३२ ); सोम हा वल्हीं मारणारानें नाव वल्हवावी त्याप्रमाणें मनुष्यांनां गति देतो. याच कारणाकरितां सोमाला 'वाचस्पति' म्हटलें आहे ( ऋ. ९.२६,४;९.१०१,५ ); त्याला वाचो अग्रिय अथवा अग्र म्हणजे वाचेचा नायक असेंहि म्हटलें आहे ( ऋ. ९.७,३;९.६२,२५–२६;९.८६,१२;९.१०६,१० ); तो द्युलोकांतून मोठ्या आवाजानें बोलतो ( ऋ. ९.६८,८ ); ब्राह्मणग्रंथांत देव सोमासाठीं वाणीरूपी किंमत देतात असें म्हटलें आहे. सोमानें उत्साहाचा विचार उत्पन्न होतो ( ऋ. ६.४७,३ ); या कारणानें त्याचे भक्त आम्ही सोम प्यालों आहों, आम्ही आतां अमर झालों, आम्ही प्रकाशांत प्रवेश केला आहे, आम्हांला सर्व देवांची ओळख झालेली आहे असें उद्गारतात ( ऋ. ८.४८,३ ); विचाराचा पति, सूक्तांचा पिता, नेता, जनिता अशींहि त्याला नांवें आहेत. कवींचा नायक पुरोहितांमधील ऋषि असा हा सोम आहे. ऋषींचें मन, ऋषित्व देणारा, प्रार्थनेचा रक्षक असा हा आहे ( ऋ. ९.९६,११;६.५२,३ ); यज्ञाचा आत्मा ( ऋ. ९.२,१०; ९.६,८ ); देवांमधील ब्रह्मा ( ऋ. ९.९६,६ ); असा हा आहे. हा देवांनां त्यांचा त्यांचा यज्ञभाग ठरवून देतो ( ऋ. १०.८५,१९); या त्याच्या कर्तबगारीमुळें त्याच्या शहाणपणाचें वर्णन पुनःपुनः केलेलें आहे. सोम हा मेधायुक्त ऋषि आहे ( ऋ. ८.६८,१ ); देवांचीं निरनिराळीं कुळें तो जाणतो ( ऋ. ९.८१,२;९.९५,२;९.९७,७;९.१०८,३ ); तो एक मनुष्य अवलोकन करणारा आणि मेधावी असा तरंग आहे ( ऋ. ९.७८,२ ); सोम प्राण्यांकडे सुज्ञाच्या नजरेनें पाहातो ( ९.७१,९ ); त्याला अनेक नेत्र आहेत ( ऋ. ९.२६,५ ); तो सहस्रनेत्र आहे ( ऋ. ९.६०,१ ). सोमानें पितरांनां पराक्रम करण्यास 'उद्दीपित' केलें ( ऋ. ९.९६,११ ); त्याच्या द्वारा पितर प्रकाशांत पोंचले व गाई मिळवूं शकले (ऋ. ९.९७,३९); सोमाचा पितरांशीं योग होतो ( ऋ. ८.४८,१३ ); सोमावरोबर पितर येतात ( अथर्ववेद १८.४,१२; श. ब्रा. २.६.१,४); पितरहि सोमप्रिय होते असें त्यांचें वर्णन आहे ( ऋ. १०.१४,६; अ. वे. २.१२,५ ).

सोम पिऊन मनुष्यावर जो उल्हासजनक परिणाम होतो तसाच परिणाम देवांवरहि होतो अशी कल्पना सहजच केलेली आहे. सोमाच्या योगानें जो उत्तेजक परिणाम होतो तो इन्द्रावर विशेष होतो व अंतरिक्षांतील आपल्या शत्रूंशीं लढतांना इन्द्र सोमपानानें उत्तेजित होऊन शत्रूंचा समाचार घेतो असें वर्णन आहे. सोम इन्द्राला वृत्राशीं लढावयाची ताकद आणतो असें वर्णन अनेक ठिकाणीं आलेलें आहे ( ऋ. ८.८१,१७ इ. ); सोमाच्या मदतांत इन्द्र आपले सर्व शत्रू मारून टाकतो ( ऋ. ९.१,१० ); इन्द्र सोम प्याला म्हणजे त्याच्याशीं लढाईत कोणीहि टिकत नाहीं ( ऋ. ६.८७,१ ); सोम हा इन्द्राचा आत्मा होय ( ऋ. ९.८५,३ ); सोम हा इन्द्राचा परमपावन मित्र होय ( ऋ. १०.२५,९ ); हा सोम इन्द्राची ताकद वाढवितो ( ऋ. ९.८६,२ ); तो वृत्राला ठार मारण्यांत इन्द्राला मदत करितो ( ९.६१,२२ ); सोमाच्या मदतीनें इन्द्रानें जलप्रवाह सुरू केला आणि त्यानें अहीला मारिलें ( ऋ. ४.२८,१ ); सोमाला इन्द्राचें वज्र असेंहि म्हटलें आहे ( ऋ. ९.५२,७;९.७७,१;९.१११,३ ); इन्द्राचा रस

म्हणजे सोम हा सहस्रजेता असा वज्र होतो. शंभर किल्ले विध्वंसून टाकणारें असें हे सोमाचें मद उत्पन्न करणारें पान आहे (ऋ. ९.४८,२); सोम म्हणजे वृत्राला मारणारी आणि आनंदांत मग्न करणारी अशी कांडी आहे (ऋ. ६. १७,११); सोमाला इंद्राप्रमाणें न मरणारा आणि किल्ले विध्वंसून टाकणारा असें म्हटलें आहे (ऋ. ९.८८,४); सहासात वेळां वृत्रहन् हें जें मूलतः इन्द्राचें नांव आहे तें त्याला दिलें आहे.

सोम इन्द्राच्या पोटांत गेल्यावर त्यानें सूर्याला आकाशांत उगवावयास लाविलें (ऋ. ९.८६,२२); स्वतंत्रपणें सोम ही क्रिया घडवून आणतो असेंहि वर्णन आहे. सोमानें सूर्याला प्रकाशावयास लाविलें (९.२८,५; ९.३७,४); आकाशांतील नक्षत्रांनां प्रकाशावयास लाविलें (ऋ. ९.८५,९); त्यानें जलामध्यें सूर्य उत्पन्न केला (ऋ. ९.४२,१); त्यानें सूर्याला उगवावयास लावून त्याला प्रेरणा केली. त्यानें सूर्य मिळवून तो दुसऱ्यांनां दिला. त्यानें उषांनां प्रकाशावयास लाविलें. सूर्याचा भाग तो आपल्या भक्तांनां देतो (ऋ. ९.४,५); आपल्या भक्तांकरितां तो प्रकाश करितो (ऋ. ९.३५,१); त्यानें प्रकाश शोधून काढिला (ऋ. ९.५९,४); त्यानें धुलोक आणि प्रकाश जिंकिला (ऋ. ९.३,२). घृत हें अमरतत्त्वाच्या नाभीच्या ठिकाणीं आहे. सर्व जगत् या घृताच्या आधारावर आहे (४.५८,१ व ११), असें वर्णन येतें. त्याप्रमाणें सोम याचें साम्राज्य सर्व विश्वावर आहे (ऋ. ९.८६,२८ व २९); सर्व दिशांचा हा पति आहे (ऋ. ९. ११३,२;). द्यावापृथ्वी निर्माण करणें, त्यांनां स्थिर करणें, द्युलोकाला आधार देणें, सूर्यामध्यें प्रकाश उत्पन्न करणें (ऋ. ६.४४,२३ व २४; ६.४७,३ व ४) या विश्वरचनेंतील क्रिया सोम करितो असेंहि वर्णन आहे.

वृत्राशीं इन्द्राचें युद्ध होत असतां इन्द्राशीं याचा निकट संबंध येत असल्यानें स्वतंत्रपणेंहि सोम हा मोठा लढवय्या आहे असें वर्णन येतें. सोम हा जेता आहे. सोमाचा युद्धांत केव्हांहि पराभव होत नाहीं. तो लढाईकरितां जन्मला आहे (ऋ. १.९१,२१); वीरांमध्यें तो श्रेष्ठ वीर आहे. भीतिप्रदांमध्यें तो अत्यंत भीतिप्रद आहे. त्याचाच नेहमीं जय होतो (ऋ. ९.६६,१६ व १७); तो आपल्या भक्तांसाठीं गाई, रथ, घोडे, सोनें, आकाश, उदक हजारों चांगल्या गोष्टी व झाडून सर्व पदार्थ जिंकून आणितो (ऋ. ९.७८,४; ८.६८,१); तो स्वर्गांतील व पृथ्वीवरील सर्व संपत्ति अन्न व गुरें ढोरें वगैरे देतो (ऋ. ९.४५,३; ९.४९,४; ९.५२,१ इ.); सोम म्हणजे रयि म्हणजे खजिना(ऋ.९.४८,३), सोम म्हणजे देवांची संपत्ति (श. प. ब्रा. १.६.४,५), अशींहि वर्णनें येतात. शत्रूंपासून सोम रक्षण करितो (ऋ. १०.२५,७), तो राक्षसांनां पळवून लावतो (ऋ. ९.४९,५); आणि इतर देवतांप्रमाणें परंतु त्यांजपेक्षां अधिकवेळां त्याला रक्षोहन् हें नांव दिलें आहे. दुष्टांस ठार मारणारा हें पद फक्त सोम देवालाच लाविलें आहे. उत्तरकालीन वैदिक वाङ्मयांत सोम पिणारे ब्राह्मण डोळ्याचें पातें लवतें न लवतें इतक्या वेळांत कोणालाहि ठार करूं शकतात असें वर्णन येतें (मै. सं. ४.८,२).

सोम हा योद्धा असल्यानें त्याजवळ शस्त्रें असल्याचें वर्णन येतें (ऋ. ९.९६,१६); तो वीराप्रमाणें हीं शस्त्रें हातांत धरतो (ऋ. ९.७६,२); हीं शस्त्रें तिखट धारेचीं आणि भयंकर असतात (ऋ. ९.६१,३०; ९.९०,३); एका ठिकाणीं सोमानें हीं शस्त्रें आपल्या मत्सरी बापापासून हिसकून घेतलीं असें वर्णन आहे (ऋ. ६.४४,२२); सहस्र टोंकांचा बाण सोमाजवळ आहे (ऋ. ९.८३,५; ९.८६,४०); त्याचें धनुष्य बाण सोडण्याच्या कामीं अत्यंत वेगवान् आहे (ऋ. ९.९०,३).

इन्द्र वसतो त्या रथांतच सोम बसतो (ऋ. ९.८७,९; ९.९६,२; ९.१०३,५); रथांतून लढणाऱ्या इन्द्राचा तो सारथि आहे (अ. वे. ८.८,२३); तो रथांत बसून जातो (ऋ. ९.३,५); त्याचा रथ दिव्य आहे (ऋ. ९.१११,३); प्रकाश हा त्याचा रथ आहे (ऋ. ९.८६,४५); पवित्र म्हणजे गाळण्याचें लोंकरी वस्त्र हा त्याचा रथ आहे (ऋ. ९.८३,५); तो उत्तमोत्तम सारथि आहे (ऋ. ९.६६,२६); त्याला स्वतःच्या चांगल्या पंखांच्या घोड्या आहेत (ऋ. ९.८६,३७); वायूप्रमाणें त्याच्या जवळ घोड्यांच्या जोड्या आहेत (ऋ. ९.८८,३).

इन्द्राचे जे जवळचे स्नेही म्हणजे मरुद्गण त्यांचाहि अर्थात् या सोमाशीं संबंध आहे. हे मरुद्गण दिव्य वृषभ म्हणजे सोम याचें दोहन करितात (ऋ. ९.१०८,११; ९.५४,१); हें मूल जन्मतें तेव्हां याला मरुद्गण अलंकृत करतात (ऋ. ९.९६,१७); मरुद्गण इन्द्राची सेवा करितात त्याप्रमाणें सोमाची सेवा करितात (ऋ. ६.४७,५; ९.६६,२२); वायु सोमाला आनंद देतात (ऋ. ९.३१,३); वात हा त्याचा संरक्षक आहे (ऋ. १०.८५,५); अग्नि, पूषन् आणि रुद्र यांच्या जोडीनें सोम असतो म्हणजे सोमपूषन्, सोमरुद्र आणि अग्निसोम अशा जोडदेवता आहेत. केव्हां केव्हां वरुणाशीं त्याचा रहस्यात्मक ऐक्यभाव वर्णिला आहे (ऋ. ९.७७,५; ९.९५,४).

ऋग्वेदामध्यें एका ठिकाणीं सोमाला मौजवत असें म्हटलें आहे. मौजवत याचा अर्थ ऋग्वेदोत्तर कांहीं विधानांवरून मुजवत् पर्वतावर उत्पन्न झालेला असा आहे. अनेकवेळां गिरिष्ठा म्हणजे पर्वतांत राहणारा, पर्वतावृध् म्हणजे पर्वतावर वाढणारा (ऋ. ९.४६,१), असें सोमाचें वर्णन आलेलें

आहे. पर्वतांनां सोमपृष्ठ असें म्हटलें आहे (अ. वे. ३. २१,१०); यज्ञपरिभाषेप्रमाणें अद्रि किंवा सोम ठेंचण्याचे दगड ह्यांनां सोमपृष्ठ हें नांव लावण्यांत येतें (ऋ. ८.५२,२); मौजवत, गिरिष्ठ वगैरे शब्द पृथ्वीवरील पर्वत हे सोमाचे उत्पत्तिस्थान होत असें दाखवितात (तु.* ९.८२,३); अवेस्तामध्यें हओम पर्वतावर उगवतो असें विधान आहे, त्यावरून वरील कल्पनेला पुष्टि येते. सोम हा पर्वतावर उगवत असल्यानें द्युलोकांत गोड जिव्हेचे मित्र पर्वतवासी वृषभांचें दोहन करितात (ऋ. ९.८५,१०; तु. ९.९५,४), असें जें वर्णन येतें तें करतांना कवीच्या दृष्टीसमोर सोमाचें उत्पत्तिस्थान जें पर्वत तें असावें असें दिसतें. वरुणानें जलामध्यें अग्नि स्थापित केला आहे. द्युलोकामध्यें सूर्य आणि अद्रीवर सोम ठेविला आहे (ऋ. ५.८५,२); तसेंच मातरिश्वन् यानें द्युलोकांतून अग्नि आणिला व श्येनानें अद्रीवरून सोम आणिला (ऋ. १.९३,६); या विधानांतहि अद्रि व पर्वत यांचा अर्थ पृथ्वीवरील डोंगर असा असूं शकेल परंतु अद्रि याचा अर्थ दैवतविषयक कथांमधून मेघ असाहि होत असल्यानें अद्रि म्हणजे पृथ्वीवरील पर्वत असें निश्चयानें म्हणवत नाहीं.

सोमलता ही जशी पृथ्वीवरील लता आहे तशी ती द्युलोकांतील लता आहे (ऋ. १०.११६,३); सोमाचें खरें उत्पत्तिस्थान व वसतिस्थान देवलोकांतच आहे असें मानलें आहे. सोमवल्लीचा जन्म वर उंच ठिकाणीं होतो. सोमवल्ली प्रथम द्युलोकांत असून नंतर ती पृथ्वीला मिळाली (ऋ. ९. ६१,१०); हा मधरस म्हणजे मादक रस द्युलोकाचा पुत्र आहे (ऋ. ९.३८,५); दिवःशिशुः (द्युलोकाचा पुत्र) हें नांव सोमाला वारंवार दिलेलें आढळतें. एका ठिकाणीं सोमाला सूर्याचें अपत्य म्हटलें आहे (ऋ. ९.९३,१); दुसऱ्या एका ठिकाणीं याला महान् पक्षी असें म्हणून याचा पिता पर्जन्य आहे असें म्हटलें आहे (ऋ. ९.८२,३; तु=९.११३,३). अथर्ववेदामध्यें अमृताचें म्हणजे सोमाचें मूळ पर्जन्यबीजच होय असें म्हटलें आहे (अ. वे. ८.७,२१); सोमाला शिशु (ऋ. ९.९६,१७), किंवा युवा असें म्हणतात; तेव्हां अग्नीप्रमाणें सोमहि पुनः पुनः तयार केला जातो या गोष्टीकडे कवीचें लक्ष असावें. सोम हा द्युलोकांतील पीयूष म्हणजे दूध आहे (ऋ. ९.५१,२ इ.); सोम हा द्युलोकांत शुद्ध केला जातो (ऋ. ९.८३,२; ९.८३,२२ इ.) त्याचा प्रवाह द्युलोकांतील आवडत्या ठिकाणीं वाहतो (ऋ. ९.१२,८); आपल्या धारेच्या द्वारें तो अंतरिक्षांतून द्युलोकांत चोहोंकडे धांवतो (ऋ. ९.३,७); तो द्युलोक व्यापितो (ऋ. ९.८५, ९); तो द्युलोकांत वस्ति करतो (श. ब्रा. ३.४.३,१३); तो द्युलोकाचा पति आहे (ऋ. ९. ८६,११ व ३३); द्युलोकांतील पक्षी असल्यानें तो पृथ्वीकडे वरून पाहतो आणि सर्व भूतांनां अवलोकन करतो (ऋ. ९.७१,९); सूर्यदेवाप्रमाणें तो सर्व लोकांच्या वरतीं आहे. सोमाचे बिंदू शुद्ध करून द्युलोकांतून अंतरिक्षांतून पृथ्वीच्या पृष्ठभागावर ओतले जातात (ऋ. ९.६३,२७); याच कारणानें सोमाला रजस्तुर म्हणजे अंतरिक्ष ओलांडून जाणारा (ऋ. ९.४८,४; ४.१०८,७), असें म्हटलें आहे. तिसऱ्या शिखरावर प्रकाशमान द्युलोकांत दुग्धपरिवेष्टित सोमाला बोटें सोलून काढित असतात (ऋ.९.८६,२७); त्याचें स्थान सर्वांत उंच द्युलोकांत आहे (ऋ. ३.२,१०; ४. २६,६; ९.८६,१५); त्याचें स्थान तिसऱ्या द्युलोकांत आहे (तै. सं. ३.५,७ इ.). द्यु हें नांव पुष्कळवेळां मेंढ्याच्या लोंकरीचें जें गाळणें केलें असतें त्याला गूढार्थानें लावतात असें दिसतें. द्युलोकाच्या नाभीवर, मेंढ्यांच्या लोंकरीच्या गाळण्यावर, सोम आहे (ऋ. ९.१२,४); द्युलोकांतील ज्योतींतून पलीकडे, गाळण्यांतून पलीकडे, जाणारा सोम आहे (ऋ. ९.३७,३); द्युलोकांत सूर्याबरोबर धांवणारा, गाळण्यावर धांवणारा, असा हा सोम आहे (ऋ. ९.२७,५); या सर्व ठिकाणीं द्युलोक म्हणजे गाळणें असा अर्थ दिसतो. वृषभानें द्युलोक व्यापिला आहे. हा राजा गाळण्यावरून गर्जना करीत जात आहे (ऋ. ९.८५,९; तु=९.८६,८), या ठिकाणींहि द्युलोक म्हणजे गाळणें हाच अर्थ असावा. सानु म्हणजे शिखर हा शब्द गाळण्याला नेहमीं वापरलेला आहे. दिवःसानु म्हणजे द्युलोकाचें शिखर याचा व सानु म्हणजे गाळणें याचा कवीच्या कल्पनेंत संबंध असावा. द्युलोकांत दिव्य सोम अथवा अमृत सोम असतो म्हणून सानु यासारखे शब्द पृथ्वीवरील सोमाच्या संबंधांत साहजिकपणें वापरण्यांत आले असावेत.

सोम हा द्युलोकांतून आणला गेला. यासंबंधाची अगदीं सामान्य कथा म्हणजे श्येनानें सोम आणला ही होय (ऋ. १.८०,२); अति उच्च द्युलोकांतून श्येन पक्ष्यानें सोम आणला (ऋ. ४.२६,६); या पक्ष्यानें इन्द्राकडे सोम किंवा मधु आणला (ऋ. ३.४३,७); वेगवान् श्येन पक्षी सोमवल्लीकडे उड्डाण करून गेला (ऋ. ५.४५,९); व त्यानें इन्द्राकरितां त्या वल्लीची मधुर कांडी तोडून आणिली (ऋ. ४.२०,६); श्येन पक्ष्यानें इन्द्रासाठीं ही सोमवल्ली आपल्या पायांत धरून अंतरिक्षाच्या मार्गानें आणली (ऋ. ८.७१,९); मनाच्या वेगानें उडून या पक्षानें लोहमय किल्ला भेदून (तु. ४.२७,१) व द्युलोकांत जाऊन वज्रधारी इन्द्रासाठीं सोम आणिला (ऋ. ८.८९,८); श्येन पक्ष्यानें फार दूर वरून द्युलोकांतून सोमवल्ली आणली (ऋ. ९.६८,६; ९.७७,२; १०.११,४; १०.९९,८ इ.). ऋग्वेदमंडळ ४ सूक्त २६ व २७ यामध्येंहि सोम आणण्याची कथा विस्तारानें दिली आहे. ब्राह्मणग्रंथांत गायत्रीनें सोम आणला अशी कथा आहे. गायत्री याचा पुरोहितीं गूढार्थ अग्नि असा आहे.

* तु=तुल्य विधान.

ऋग्वेदामध्यें इन्द्र आणि श्येन हे वेगळे आहेत. व श्येन इन्द्राला सोम आणून देतो असें स्पष्ट वर्णन असतें. एकाच ठिकाणीं फक्त (आणि या ठिकाणीं सोमश्येनकथेचा कांहीं संबंध नाहीं) सोमयागाचे ठिकाणीं बसलेला इन्द्र हा श्येन आहे असें वर्णन आलें आहे (ऋ. १०.९९,८). द्युलोकांतील श्येन हें पद अग्नीला लावलें आहे (ऋ. ७.१५,४; मरुतांनाहि हें पद दोनदां लावलेलें आढळतें). वैद्युदग्नि म्हणजे वीज इच्याशीं श्येन याचा संबंध आहे (तै. ब्रा.३.१०.५,१; तु=तै. ब्रा. ३.१२.१,२); अग्नीला पक्षी असें वारंवार म्हटलें आहे.

ब्लूमफील्ड यानें वरील गोष्टींचा विचार करून असें मत दिलें आहे कीं, सोम श्येनानें आणिला ही जी कथा* आहे तिचें मूळ मेघांतून (मेघ म्हणजे लोहमय किल्ला होय) वीज निघून ती खालीं येते आणि मेघांतील जल (जल म्हणजे अमृत अथवा सोम) तिच्या बरोबर खालीं येतें ही सामान्य नैसर्गिक घटना होय. ब्लूमफील्ड आपल्या बाजूचा पुरावा म्हणून (ऋ. १.९३,६ व अ. वे. ६.४८) हीं स्थानें पुढें मांडतो. यांपैकीं पहिल्या ऋचेंत अग्नि व सोम यांचें पृथ्वीवर येणें एकत्र उल्लेखिलेलें आहे. सोमश्येनकथेंत एक अशी गोष्ट आहे कीं, श्येनपक्षी सोम घेऊन जात असतां तिरंदाज कृशानूनें त्याजवर बाण टाकून त्याचा एक पंख उडविला (ऋ. ४.२७,३ व ४; तु. ऐ. ब्रा. ३.२५); ही बाण मारण्याची गोष्ट ब्राह्मणग्रंथांत विशेष विस्तारानें दिलेली आहे. कोठें पंख तर कोठें त्याचा एक पाय तुटला गेल्याचें वर्णन आहे. हा पंख खालीं पडून त्याचा पर्ण (पलाश) वृक्ष झाला किंवा शाल्यक वृक्ष झाला असें वर्णन येतें. पर्ण किंवा शाल्यक वृक्ष या वरील कारणामुळें कांहीं विशिष्ट संस्कारांत पवित्र मानला आहे.

सोम ही सर्वांत महत्त्वाची वल्ली असल्यानें सोमाला लतांचा पति (ऋ. ९.११४,२) असें म्हटलें आहे व लतांचा सोम हा राजा आहे (९.९७,१७ व १९); त्याला वनस्पति म्हणजे वनांचा पति असेंहि नांव आहे (ऋ. १.९१,६; ९.१२,७); सोमानें सर्व लता उत्पन्न केल्या आहेत (ऋ. १.९१,२२); ब्राह्मणग्रंथांत लतांचा सोमाशीं संबंध दाखविला आहे. त्यांनां सौम्य असें म्हटलें आहे (श. ब्रा. १२.१.१,२); सोम हा लतांचा पति आहे इतकेंच नव्हे तर त्याला इतर प्रमुख देवांप्रमाणें राजा ही पदवी दिलेली आहे. तो

* **सोम व श्येन यांची कथा.**– ऋग्वेदामध्यें (ऋ.१.९३,६) अग्नि व सोम यांपैकीं एकास मातरिश्वानें द्युलोकांतून आणलें व सोमास श्येनानें अद्रीवरून आणलें असें म्हटलें आहे. अथर्ववेद ६.४८ मध्यें तीन मंत्र आहेत. त्यांतील दुसरा सायंकालच्या सोमाच्या निष्कर्षणाचे वेळीं ऋभूंनां उद्देशून म्हणावयाचा असून, त्या वेळीं जगती छंदाचीं सूक्तें म्हणावयाचीं असतात. दोन प्रहरच्या सोमाच्या निष्कर्षणाचे वेळीं तिसरा मंत्र इन्द्राला उद्देशून म्हणावयाचा असून त्यावेळीं त्रिष्टुभ् छंदांतील सूक्तें म्हणावीं म्हणून सांगितलें आहे. पहिला मंत्र श्येन म्हणजे गरुडाला उद्देशून असून, त्याचा छंद गायत्री म्हणून सांगितलें आहे. हा मंत्र प्रातःसवनाचे वेळीं म्हणावयाचा आहे व वैतानसूत्रामध्यें अथर्व ६.४७,१ या मंत्रासंबंधीं, वरील मंत्राचा उपयोग केला असून, तेथें तो मंत्र स्पष्टपणें अग्नीस उद्देशून आहे. आतां अग्नि ही ज्या अर्थीं प्रातःसवनाची देवता आहे व प्रातःसवनाच्या वेळीं म्हणावयाच्या सूक्तांचा छंद गायत्री आहे, त्या अर्थीं अथर्व ६.४८,१ मधील श्येन किंवा गरुड हा अग्नीच होय यासंबंधीं संशय घेण्यास जागा राहिली नाहीं.

यावरून, गायत्रीनें स्वर्गामधून सोम आणिला, असें म्हणणाऱ्या ब्राह्मणग्रंथांतील स्वैर कल्पनेचा वरोबर अर्थ लक्षांत येतो. याच्या मुळाशीं, अग्नि जो श्येन त्याचें त्याचा छंद जो गायत्री त्याच्याशीं अगदीं अभिन्नत्व कल्पिलें आहे व ही गोष्ट या ब्राह्मणग्रंथांच्या दृष्टीनें अगदीं स्वाभाविक आहे.

मंत्रग्रंथांमधील म्हणजे वेदांमधील या कथेची मुख्य मूलाधार जीं ऋग्वेद ४.२६ व २७ हीं सूक्तें, त्यांचा विचार करितांना एवढी गोष्ट लक्षांत ठेविली पाहिजे कीं, स्वर्गांतला विद्युद्रूपी जो अग्नि तोच श्येन होय म्हणजे ही सगळी कथा हें एका अगदीं साध्या पण लक्षांत भरणाऱ्या सृष्टिचमत्काराचें रूपक दिसतें. स्वर्गीय पेय जें सोम तें मेघांत लपवून ठेविलेलें असतें व त्याच ठिकाणीं विद्युत्हि लपवून ठेविलेली असते, अशी कल्पना केलेली दिसते. जेव्हां उन्हाळ्यामध्यें आकाशांत मेघगर्जना होते तेव्हां विद्युद्रूपी श्येन ढग फोडून बाहेर येतो व त्याच्या बरोबरच स्वर्गीय रसाचा (सोमाचा) लोंढा पृथ्वीवर वहात येतो. नंतर तो स्वर्गीय रस यज्ञाला उपयोगीं पडतो, विशेषतः इन्द्राला उपयोगीं पडतो, कारण तो विशेष प्रसिद्ध सोमपान करणारा आहे.

ऋ. ४.२७ मध्यें या प्रसंगाचें वर्णन असून तें अग्नि व सोम यांच्या संवादरूपांत केलेलें आहे. पहिली ऋचा विद्युद्रूपी अग्नि ह्यानें म्हटलेली असून, तींत अन्य देवतांपासून अग्नीचें विशिष्टत्व सिद्ध करणाऱ्या पारिभाषिक गोष्टींचा भरपूर उल्लेख आलेला आहे. यापुढच्या तीन ऋचा सोमाच्या तोंडीं आहेत व त्यांत त्यानें अग्नीनें आपणांकरितां केलेल्या पराक्रमांचें वर्णन केलें आहे. सोम आणखी सांगतो कीं, आपल्या शरीररक्षकांपैकीं, एक धनुर्धारी जो कृशानु, त्यानें श्येनाला एक बाण मारिला; पण त्यायोगें श्येनाच्या उडण्यास कांहींहि प्रतिरोध न होतां, त्याचें केवळ एक पीस (पर्ण) तुटलें व तें खालीं जमिनीवर पडलें. जमिनीवर वीज पडण्याचें हें वर्णन असावें हें अगदीं संभवनीय दिसतें. परंतु हा शेवटला कथेचा भाग केवळ सृष्टिवर्णनपर न राहतां, तो येथून पुढें कवींच्या तडाख्यांत गेला असावा व अन्यठिकाणच्या कवींच्या प्रमाणेंच येथल्या कवींनीं मग मूळ सृष्टिवर्णनविषयपर कथेच्या विस्ताराकरितां व तिचें स्वारस्य वाढविण्याकरितां आपल्या कल्पनाशक्तीचा उपयोग केला असावा, व ही कथा रचण्यामध्यें कवीनें श्रोत्यांच्या रुचीस पटेल त्याप्रमाणें व आपल्या कल्पनेस जमेल त्याप्रमाणें हव्या त्या गोष्टी दुसऱ्या कथांमधूनहि घेतल्या असाव्यात. (Bloomfield–JAOS. Vol XVI).

नद्यांचा राजा आहे. ( ऋ. ९.८९,२ ); तो सर्व पृथ्वीचा राजा आहे ( ऋ. ९.९८,५७ ); तो देवांचा राजा आहे ( ऋ. ९.८३,१०; ९.८७,२; ९.१०९,४ ); तो देवांचा व मर्त्यांचा राजा आहे (ऋ. ९.९७,२४); तो ब्राह्मणांचा राजा आहे (वा. सं. ९.४०; तै. सं. १.८,१०; मै. सं. २.६,९); त्याला देव हें नांव अर्थातच दिलेलें आढळतें पण एका ठिकाणीं हा देव देवासाठीं पिळलेला आहे असें वर्णन येतें ( ऋ. ९.३,९ ).

वेदोत्तर वाङ्मयांत चंद्राला सोम हें नांव दिलेलें आहे. चंद्र हा कमीकमी होत जातो याचें कारण देव त्याच्या कला हळू हळू पिऊन टाकतात हें असून चंद्र पुन्हा पूर्ववत् होतो तो सूर्याच्या कडून त्याला कलांची प्राप्ती झाल्यानें होतो असें या वाङ्मयांत वर्णन आहे. छांदोग्योपनिषदांत ( ५.१०,१ ) असें म्हटलें आहे कीं, चंद्र म्हणजे सोम राजा होय. हा राजा देवांचें अन्न असून ते त्याचें पान करितात. ब्राह्मण-ग्रंथांतहि सोम आणि चंद्र हे एकच असल्याची कल्पना रूढ झाल्याची दिसते. ऐतरेय ब्राह्मणांत (७.११) चंद्र हा देवांचा सोम होय, शथपथब्राह्मणांत (१.६.४,५) देवांचें अन्न जो सोम राजा तोच चंद्र होय असें म्हटलें आहे. कौषीतकी ब्राह्मणांत ( ७.४०;४.४ ) यज्ञासाठीं जी लता किंवा जो रस घ्यावयाचा तो चंद्रदेवाचें प्रतीक म्हणून घ्यावयाचा असें म्हटलें आहे. ब्राह्मणग्रंथांत ज्या चंद्रासंबंधींच्या कथा आहेत त्यांत चंद्राला क्षय असण्याचें कारण पितर आणि देव त्याच्या शरीराचा अंश ( चंद्राचें शरीर अमृताचें बनलेलें आहे ) हळूहळू सेवन करित असतात हें दिलेलें आहे. यजुर्वेदामध्यें नक्षत्रें म्हणजे प्रजापतीच्या मुली चंद्ररूप सोम याच्या पत्नी होत असें म्हटलें आहे. अथर्ववेदांत सोम याचा अर्थ कित्येक वेळां चंद्र असाच आहे ( अ. वे. ७.८१,३ व ४; ११.६,७ इ. ). कांहीं पंडितांच्या मतें ऋग्वेदांतील थोड्याशा अलीकडील सूक्तांत म्हणजे पहिल्या व दहाव्या मंडलांतील सूक्तांत सोम आणि चंद्र यांचें ऐक्य कोठें कोठें मानलेलें आहे. परंतु बहुतेक पंडितांच्या मतें सोमाचें चंद्राशीं ऐक्य हें वेदांत तरी अगदीं गौण प्रतीचें असून वेदांतील सोम म्हणजे सोमरसाची त्याजवर देवत्वाची कल्पना रचून बनविलेली देवता होय. सोम आणि चंद्र यांचें ऐक्य ऋग्वेद १०.८५ या सूक्तांत असल्याबद्दल बहुतेक सर्वांचें एकमत आहे. या सूक्तांत सोम आणि सूर्यकन्या किंवा सूर्या यांच्या विवाहाचें वर्णन आहे. याच विवाहकथेंत सोम हा नक्षत्रांच्या अंकावर बसलेला आहे असें म्हटलें आहे ( ऋ. १०.८५,२ ). ब्राह्मणांनां विदित असलेला जो सोम तो कोणी सेवीत नाहीं, ब्राह्मण जो कुटतात तो सोम निराळा आहे असेंहि म्हटलें आहे ( ऋ. १०.८५,३ ).

चंद्राचें सोमरूप केवळ ब्राह्मणांनांच विदित आहे, या विधानावरून चंद्राच्या सोमत्वाची कल्पना फारशी प्रचलित झाली नव्हती असें म्हणतां येईल. दिव्य सोम आणि चंद्र यांचें ऐक्य कशा रीतीनें झालें असावें तें समजणें फारसें अवघड नाहीं. सोम हा द्युलोकांतील असून तेजस्वी आहे, तो अंधकार दूर करतो आणि जलाचे ठिकाणीं वृद्धि पावतो अशी त्यासंबंधाची कल्पना होती व कित्येकवेळां त्याला इन्दु असें नांवहि दिलें जात होतें ( ऋ. ६.४४,२१ ); यावरून पुढें त्याची चंद्राशीं तुलना करण्याचें सुचलें असावें. एका ठिकाणीं जलांतील चंद्राप्रमाणें चंवूतील सोम दिसतो असें विधान येतें ( ऋ. ८.७१,८; तु=१.१०५,१ ); दुसऱ्या एका ठिकाणीं गृध्राच्या दृष्टीनें नजर फेंकीत द्रप्स ( सोम ) समुद्राकडे जातो असें जें वर्णन आहे त्यांत द्रप्स शब्दानें चंद्र उद्दिष्ट आहे असें पुष्कळांचें मत आहे. हिलेब्रँट आपल्या वैदिक दैवतेतिहासांत असें मत प्रतिपादितो कीं, ऋग्वेदाचें सगळें नववें मंडळ चंद्राला उद्देशून केलेल्या सूक्तांनीं भरलेलें आहे. या मंडळांत सोमाचा अर्थ सोमलता असा कोठेंहि नसून चंद्र असाच अर्थ आहे. त्याचें म्हणणें कीं, ऋग्वेदांतील अगदीं जुन्या व अगदीं अलीकडच्या भागांत दोन्ही ठिकाणीं सोम याचा देव या नात्यानें चंद्र असाच अर्थ आहे व तो देव नसतां त्याचा अर्थ सोमलता किंवा सोमरस असा आहे. चंद्र हें सोमाचें अथवा अमृताचें स्थान आहे आणि सोमाचा भक्त जेव्हां सोमरस पिळतो तेव्हां हा रस म्हणजे चंद्रांतील अमृताचा भाग असल्यानें भक्ताच्या मनांत सोमरस पिळतांना त्या चंद्रदेवाचीच मूर्ति असते असें हिलेब्रँट म्हणतो. हिलेब्रँटचें आणखी असें मत आहे कीं, वैदिक संप्रदायांत सोम या नांवानें चंद्रच मुख्य देव आहे. सूर्यापेक्षांहि हा चंद्र वैदिककालीं जगताचा कर्ता व शास्ता या नात्यानें श्रेष्ठ आहे. आणि इन्द्र हा चन्द्राच्या खालीं दुसऱ्या नंबरचा वैदिक देव आहे.

या कल्पनेच्या विरुद्ध असें प्रतिपादण्यांत येतें कीं, ऋग्वेदांत सोमाचा संबंध ज्या ठिकाणीं आला आहे त्यांपैकीं अधिकांत अधिक स्थानांचा विचार केला असतां सोमलता आणि सोमरस यांजवर मनुष्यांच्या गुणांचा आरोप करून सोमदेवता बनविलेली आहे हें अगदीं स्पष्ट आहे. या ठिकाणीं हें लक्षांत ठेवण्याजोगें आहे कीं, उत्तरकालीन वाङ्मयांत जरी सोम आणि चंद्र अभिन्न मानीत असल्याचा पुरावा आहे तरी चंद्र व सोम एकच, किंवा चंद्र हा देवांचें अन्न आहे, अशा स्पष्ट आणि निःसंदेह अर्थाचें ऋग्वेदांत तरी कोठेंहि स्थल नाहीं जेथें सोमाच्या तेजाचें वर्णन अस्पष्ट तऱ्हेनें दिलेलें आहे अशा कांहीं ठिकाणीं मात्र चंद्राचा संबंध कल्पितां येतो. सोमसूक्तांत ज्या अनेक संकीर्ण कल्पना आलेल्या आहेत त्यांमध्यें कोठें कोठें अमृत आणि चंद्र हे एकच अशा तऱ्हेची अस्पष्ट कल्पना आलेली असेल. सोमाचें तेज अथवा त्याचें आप्यायन म्हणजे वृद्धि वर्णन करणाऱ्या भागांत, ही

सोमाची वृद्धि चंद्राच्या वृद्धीप्रमाणें असल्यानें, चंद्राचेंच वर्णन सोम या नांवाखालीं केलें असल्याचा संभव आहे. परंतु एकंदरींत उत्तरकालीन सूक्तांतील कांहीं स्थळें वगळतां ऋग्वेदांतील कवींनां सोमदेव म्हणजे मानवी गुणांनीं युक्त असा पृथ्वीवरील सोमरस किंवा सोमलता हाच होता असें निःसंशय म्हणतां येतें. वेदावरील भाष्यकार ऋग्वेदांत येणाऱ्या सोमशब्दाचा अर्थ देव असा करीत नाहींत ही गोष्ट देखील वेदकालींचा सोमदेव म्हणजे सोमरस किंवा सोमलता हाच होय ह्या मताला पुष्टिकारक आहे. कारण या भाष्यकारांच्या काळीं सोम आणि चंद्र हे एकच मानीत असत व असें मानणाऱ्या भाष्यकारांनां ऋग्वेदकालीं असलें ऐक्य जर मानलें जात असतें तर तें माहीत असण्याचा पूर्ण संभव होता.

इन्डो इराणी काळांत सोम तयार करीत असत व त्याची देव म्हणून उपासना करीत असत हें अवेस्तामधील हओम संबंधींच्या कथांवरून स्पष्ट आहे. ऋग्वेदामध्यें सोम हा पर्वतावर किंवा एका विशिष्ट पर्वतावर उगवतो असें वर्णन आहे तर अवेस्तामध्येंहि त्याच प्रकारचें म्हणजे एका विशिष्ट पर्वतावर तो उगवतो असें वर्णन आहे. ऋग्वेदामध्यें वरुण हा सोम एका अद्रीवर ठेवितो. अवेस्तामध्यें होरैति या एका मोठ्या पर्वतावर एका मोठ्या बुद्धिमान् माणसानें हओम ठेविला आहे. ऋग्वेदामध्यें एका श्येनानें सोम आणिला असें वर्णन आहे तर अवेस्तामध्यें कांहीं पवित्र पक्ष्यांनीं हओम ज्या पर्वतावर उत्पन्न होतो तेथून तो चोहोंकडे पसरलेला आहे. दोन्ही ठिकाणीं सोम हा वनस्पतींचा राजा आहे, दोन्ही ठिकाणीं आरोग्य व दीर्घायुष्य देणारें व मरणाला दूर करणारें असें हें औषध आहे. सोम जलामध्यें वाढतो त्याप्रमाणें हओम अर्द्विशूरच्या जलामध्यें वाढतो. इन्डोइराणी लोकांच्या उपासनेमध्यें सोम पिळून त्याचें हवन करणें हा एक महत्त्वाचा भाग होता. ऋग्वेद आणि अवेस्ता यांजमध्यें फरक एवढाच कीं, ऋग्वेदांत हें सोमसवन तीन वेळां सांगितलें आहे तर अवेस्तांत ( यस्न १०.२ ) दोन वेळां सांगितलें आहे. दोन्ही ठिकाणीं सोमाचे अंशू ठेंचीत असत. सोमरस पिंवळा असून त्यांत दूध मिसळीत असत असें वर्णन आहे (यस्न १०.१३); दोन्हीं ठिकाणीं देवलोकींचा सोम व पृथ्वीवरील सोम हे भिन्न सांगितले आहेत आणि सोमदेव व सोमरस हेहि भिन्न सांगितले आहेत. दोन्ही ठिकाणीं सोमकथेंत सोम हा प्रथम देवलोकीं असून नंतर तो पृथ्वीवर आला असें वर्णन आहे. दोन्ही ठिकाणीं सोमबिंदु हा यज्ञिय अग्नीप्रमाणें श्रेष्ठ असून त्याला राजा हें नामाभिधान मिळालेलें आहे. सोमाला वृत्रहन् तसेंच हओमला वेरेथ्रघ्न असें नांव आहे. हओम हा सोमाप्रमाणें अस्त्रें फेंकतो. वदरें म्हणजे अस्त्र हा शब्द वैदिक वज्र या शब्दाप्रमाणें आहे. सोम आणि हओम दोन्हीहि प्रकाशाचे जेते आहेत. स्वर्षा म्हणजे प्रकाशाचा जेता याला अवेस्तांत ह्वरेस हा तत्सम शब्द आहे. दोन्ही धीमान् आहेत ( सुक्रतु= हुखतु). दोन्ही दुष्टांचे दुष्ट बेत हाणून पाडतात. शत्रूंवर आपल्या भक्तांनां विजय मिळवून देतात. दिव्य लोकांची प्राप्ति करून देतात, दोन्ही अश्व देतात, उत्तम अपत्यें देतात. ऋग्वेद आणि अवेस्ता यांमध्यें सोम प्राचीनकालीं तयार करणारे म्हणून ज्या प्राचीन पुरुषांचीं नांवें आलीं आहेत, तीं देखील एकमेकांशीं मिळतात. ऋग्वेदांत विवस्वत् आणि त्रित आप्त्य तर अवेस्तांत विवङ्हन्त्, आथ्व्य आणि थृत हे प्राचीन सोमसवन करणारे आहेत. उत्साह व उल्हास उत्पन्न करणारें असें हें देवलोकींचें पेय आहे ही कल्पना इन्डोयूरोपीय कालांतली असूं शकेल. इन्डोयूरोपीय कालांतली जर ही कल्पना असेल तर सदरील दिव्य पेय म्हणजे एक प्रकारचा मध अशी कल्पना असावी. संस्कृत मधु, ग्रीक मेड्डु, असीरियन मेड्डु, हे समान शब्द या कल्पनेस पुष्टिकारक आहेत. सदरील मध किंवा मधु त्याचें राखण करणारा जो असुर त्याजपासून घेऊन पृथ्वीवर एका श्येनपक्ष्यानें आणिला असावा. इन्द्राचा सोम आणणारा श्येन हा झ्यूस या ग्रीक देवतेचा जो अमृत आणणारा श्येन आहे त्यासारखा आणि ओडिन ही देवता ज्या श्येनाचें रूप घेऊन मध घेऊन गेल्याची कथा आहे, त्या श्येनासारखा आहे. इन्डो यूरोपियन कालांत जेथें मधु हें दिव्य पेय म्हणून कल्पना होती तेथें इन्डो-इराणी काळांत सोमाचें दिव्य पेय म्हणून स्थापना झाली. परंतु मधु अथवा मध हा वैदिक काळांतहि सोमाशीं मिसळण्याचा एक पदार्थ म्हणून शिल्लक राहिलेला दिसतो. व्युत्पत्तिदृष्ट्या सोम आणि हओम हे एकाच अर्थाचे आहेत. सोम यामध्यें सू तर हओम यामध्यें हू हा धातू असून या दोन्ही धातूंचा अर्थ दाबणें, ठेंचणें, पिळणें असा आहे व पिळून काढलेला रस हाच सोम आणि हओम या दोन्ही शब्दांचा धात्वर्थ अथवा यौगिक अर्थ आहे.

द्यौः–द्यौः या शब्दाचा अर्थ ऋग्वेदांत सुमारें ५०० स्थलीं आकाश असा आहे. दिवस असा त्याचा अर्थ पन्नास वेळ आहे. आकाशांतील देव असा द्यौः याचा अर्थ असतो तेव्हां तो शब्द बहुधा एकटा नसतो तर पृथिवी या शब्दाशीं संयुक्त होऊन द्यावापृथ्वी अशा स्वरूपांत तो सांपडतो. द्यावापृथ्वी यांजकडे सर्व विश्वाचें जनकत्व सोंपविलें आहे. ऋग्वेदांतील कोणतेंहि सूक्त केवळ द्यौला उद्देशून केलेलें नाहीं. द्यौचा उल्लेख स्वतंत्र येतो तेव्हां कोणाचा तरी पिता या नात्यानें येतो. या प्रकारच्या उल्लेखांत उषा ही त्याची मुलगी, अश्विन्देव हे त्याचे पुत्र, अग्नि, पर्जन्य, सूर्य, आदित्य, मरुत्, अंगिरस् हे त्याचे पुत्र होत असें म्हटलेलें आढळतें. त्याला पिता असें जागोजाग म्हटलेलें आहे ( ऋ. १.९०,७; १.१६४,३३; ४.१,१० ); इन्द्राचा पिता असें एके ठिकाणीं त्याला म्हटलेलें आहे ( ऋ. ४.१०,२ ); सुरेता ( प्रभूतवीर्याचा ) असें त्याला एके ठिकाणीं म्हटलें आहे व त्याच ठिकाणीं त्यानें

अग्नीला निर्माण केल्याचें सांगितलें आहे ( ऋ. ४.१७,४ ); द्यौ हा वृषभ आहे ( ऋ. ५.३६,५ ); तो रक्तवर्ण वृषभ असून पृथ्वीकडे डुरकण्या फोडतो ( ५.५८,६ ); वृत्राला इन्द्रानें मारलें तेव्हां द्यौनें आपली पसंती व्यक्त केली ( ऋ. ६.७२,३ ); द्यौ हा मोठा पिता आहे ( ऋ. १.७१,५ ); द्यौ हा उच्च आहे ( ऋ. १.५४,३ ); तो उच्चस्थान आहे ( ऋ. ५.४७,७ ); द्यौला अग्नीनें मनुष्याकरितां गर्जना करावयास लाविलें ( ऋ. १.३१,४ ). द्यौः हा शब्द पिता या अर्थानें षष्ठीच्या रूपांत पन्नास वेळ आढळतो व प्रथमेच्या रूपांत तीस वेळां आढळतो. त्याची चतुर्थी आठ वेळां व द्वितीया चार वेळां आढळते. वरील स्थळांपैकीं एक षष्ठांश स्थळें अशीं आहेत कीं, त्या ठिकाणीं द्यौचें पितृत्व स्पष्ट झालेलें नाहीं. इतर ठिकाणीं तें स्पष्ट झालेलें आहे. वर सांगितल्याप्रमाणें पृथ्वी या शब्दाबरोबर संयुक्त होऊनच द्यौ हा शब्द बहुतेक सांपडतो. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे ऋग्वेदांत द्यौचे ठिकाणीं प्राधान्यें करून एकच व्यक्तिगुण आरोपिलेला आहे व तो त्याचें पितृत्व होय. कांहीं स्थळीं द्यौ हा वृषभ असून तो डुरकण्या फोडतो अशीं विधानें येतात ( ऋ. १.१६०,३; ५.३६,५; ५.५८,६ ), अशा ठिकाणीं द्यौ हा पृथ्वी सुपिक करणारा व गरजणारा असा एक पशु आहे अशी कल्पना दिसते. द्यौची मोत्यानें अलंकृत केलेल्या काळ्या घोड्याशीं एका ठिकाणीं तुलना केली आहे ( ऋ. १०.६८,११ ), या ठिकाणीं रात्रीचें आकाश उद्दिष्ट असावें. द्यौला अशनिमत् म्हणजे वज्रधारी असें म्हटलें आहे, यावरून त्याचे ठिकाणीं मनुष्याचें रूपहि कल्पिलें जात होतें असें दिसतें. मेघांतून तो स्मित करतो ( ऋ. २.४,६ ), या ठिकाणीं वीज आकाशांत चमकते या घटनेचा संबंध असावा. परंतु अशा पशूचें किंवा मनुष्याचें रूप द्यौच्या ठिकाणीं कल्पिणारीं स्थळें अगदीं थोडीं असून एका जनकत्वाच्या गुणापलीकडे द्यौ या देवामध्यें कोणतेहि व्यक्तिगुण दिसत नाहींत. जेव्हां द्यौ हा पिता असतो तेव्हां पृथ्वी ही त्या ठिकाणीं माता म्हणून स्पष्टपणें किंवा अस्पष्टपणें सांगितलेली असते. द्यौ या देवाला इतर श्रेष्ठ देवांप्रमाणें असुर असें केव्हां केव्हां म्हटलें आहे ( ऋ. १.१२२,१; १.१३१,१; ८.२०,१७ ); एकदां एका ठिकाणीं द्यौस्पितर् या रीतीनें संबोधिलेलें आहे. वीस ठिकाणीं द्यौः हा शब्द स्त्रीलिंगी आहे. द्यौः हा इंडोयूरोपीय काळांतील देव आहे. इंडोयूरोपीय काळांतील हा सर्व विश्वचालक देव आहे असें कोणी म्हणतात परंतु हें बरोबर दिसत नाहीं. ऋग्वेदकाळाचे प्रारंभीं देखील सर्वश्रेष्ठ एकदेव अशी कल्पना उद्भूत झाली नव्हती व म्हणून त्याहि पूर्वीच्या अतिप्राचीन काळीं ग्रीक झ्यूस सारखा सर्व विश्वाचा चालक एक देव इंडोयूरोपीय लोक मानीत असतील हें संभवत नाहीं. उलट हें संभवतें कीं, तेव्हांचे जे वरच्या दर्जाचे देव असतील ते ऋग्वेदकालीन देवांपेक्षांहि अधिक प्राथमिक स्वरूपाचे असे देवत्व आरोपिलेले निसर्गपदार्थ असतील. ह्या निसर्गपदार्थात्मक अनेक देवतांत मात्र पृथिवीला माता व द्यौ याला सर्व देवतांत श्रेष्ठ असा पिता तेव्हांचे लोक मानीत असतील. कारण द्यौ आणि पृथ्वी यांचे पोटांत सर्व देव मानलेले पदार्थ व घटना अंतर्भूत होतात.

द्यौ हा शब्द दिव् ( प्रकाशणें ) या धातूपासून निघाला असून त्याचा अर्थ प्रकाशमान असा आहे. देव हा शब्द त्याच धातूपासून निघालेला आहे.

**मित्र.**—मित्र आणि वरुण यांचा संबंध इतका दृढ आहे कीं, ऋग्वेदांत मित्रालाच केवळ उद्देशून केलेलें असें एकच सूक्त आहे ( ऋ. ३.५९ ) या सूक्तांत जी त्याची स्तुति आहे ती त्याच्या गुणांचें स्पष्ट वर्णन करणारी नाहीं. पहिल्या ऋचेंत मात्र विशिष्ट गुण थोडासा आलेला आहे. हांक मारून तो लोकांनां एकत्र करतो आणि अनिमिष नेत्रांनीं शेत पेरणाराकडे तो पाहात असतो.

दुसऱ्या एका स्थळींहि ( ऋ. ७.३६,२ ) मित्राला उद्देशून हेंच वर्णन केलेलें आहे, म्हणजे हांक मारून तो लोकांनां एकत्र करतो असें म्हटलेलें आहे. या ठिकाणीं वरुणाला थोर शक्तिमान् व कधीं न चुकणारा असा मार्गदर्शक म्हटलेलें आहे. या स्थळावरून मित्रदेवता ही सूर्याचें एक रूप आहे असें मानण्यास जागा होते. कारण ( ऋ. ५.८२,९ ) या ठिकाणीं सविता सर्व प्राण्यांनां आपला शब्द ऐकावयास लावितो आणि त्यांनां प्रेरणा करितो असें म्हटलेलें आढळतें. मित्रसूक्ताच्या पांचव्या ऋचेंत मित्र हा माणसांनां एकत्र करणारा थोर आदित्य आहे असें म्हटलें आहे. यातयज्जन म्हणजे लोकांनां एकत्र करणारा हें विशेषण ऋग्वेदांत आणखी तीन ठिकाणीं आढळतें. ( ऋ. ५.७२,२ ) येथें मित्रावरुणांनां, ( ऋ. १.१३६,३ ) येथें मित्रवरुण व अर्यमा यांनां आणि (ऋ. ८.९१,१२) येथें अग्नीला यातयज्जन असें म्हटलें असून अग्नि हा मित्राप्रमाणें लोक एकत्र करणारा आहे असें म्हटलें आहे. यावरून हें विशेषण मित्राचेंच वैशिष्ट्यदर्शक आहे असें दिसतें. मित्रसूक्तांत तो द्यावापृथ्वींनां आधार देतो, पंचजन त्याचा कायदा पाळतात; तो सर्व देवांचें पोषण करतो असें म्हटलें आहे. ( ऋ. ५.८१,४ ) या ठिकाणीं मित्राचे नियम उल्लेखिले असून सविता व मित्र एकच असें म्हटलें आहे आणि दुसऱ्या एका ठिकाणीं ( वालखिल्य ४.३ ) विष्णु आपलीं तीन पावलें टाकतो तीं मित्रानें केलेल्या नियमानुसार टाकतो असें वर्णन आहे. या दोन स्थळांमध्यें मित्र हा सूर्याच्या गतीचें नियमन करितो या प्रकारचा ध्वनि दिसतो. ( ऋ. १०.८,४ ) या ठिकाणीं उषांच्या अग्रभागीं म्हणजे अगोदर जाणारा अग्नि मित्र स्वतः-साठीं उत्पन्न करतो असें म्हटलेलें आहे. अग्नि उद्दीपित केला म्हणजे मित्र असतो ( ऋ. ३.५,४ ); अग्नि जन्मला म्हणजे

वरुण व उद्दीपित केला म्हणजे मित्र असतो (ऋ. ५.३,१); अथर्ववेदांत १३.३,१३ या ठिकाणीं सूर्योदयाच्या वेळचा मित्र आणि सायंकाळचा वरुण यांचा भेद दाखविला आहे व अथर्ववेद ९.३,१८ या ठिकाणीं वरुणानें आच्छादिलेलें व झांकलेलें वस्तुजात मित्रानें प्रातःकाळीं उघडें करावें अशी त्याची प्रार्थना केली आहे. ब्राह्मणग्रंथांत मित्राचा दिवसाशीं व वरुणाचा रात्रीशीं संबंध प्राधान्यानें कल्पिलेला आहे. त्यासंबंधाचें बीज वरील स्थळीं दिसून येतें. मित्राचा सूर्याशीं प्रामुख्यानें संबंध कल्पिला गेल्यानें पुढें दिवसाशीं त्याचा संबंध कल्पिला गेला असावा व वरुणाकडे मित्राच्या उलट काम येऊन तो रात्रीचा देव झाला असावा. विधिविषयक वाङ्मयामध्यें मित्राला पांढरा आणि वरुणाला काळा पशु लागतो या गोष्टीवरूनहि त्या काळीं मित्र हा दिवसाचा व वरुण हा रात्रीचा देव मानला जात होता असें स्पष्ट दिसतें (तै. सं. २.१,७; २.१,९; मै. सं. २.५,७). वेदग्रंथांत मित्र ही सूर्यदेवता आहे असा जो थोडासा पुरावा मिळतो त्याला अवेस्तामध्यें आणि सामान्यतः इराणी संप्रदायामध्यें असलेल्या गोष्टींची पुष्टि मिळते. अवेस्तामध्यें इराणी संप्रदायांत मिथ्र हा निःसंशय सूर्यदेव आहे किंवा निदान सूर्याशीं खास संबंध असलेला असा प्रकाशाचा देव आहे.

मित्र ह्या शब्दाची व्युत्पत्ति संशयित आहे. ऋग्वेदामध्यें मित्र याचा अर्थ सुहृद् असा कित्येक स्थळीं आहे. मित्र देवाचा दयाळूपणा (सौहृद) जागजागीं उल्लेखिलेला आहे. मित्र हा शांततेचा देव आहे असेंहि विधान येतें (तै. सं. २.१,८). यावरून आणि अवेस्तामध्यें मित्राची नैतिक बाजू वर्णन करतांना तो विश्वासुपणाचा सरंक्षक आहे असें वर्णन आहे यावरून मित्र याचा मूळ अर्थ स्नेही किंवा सुहृद् असून पुढें सूर्यदेवाची निसर्गांतील वस्तुजातावर कृपा करणारी सत्ता पाहून त्याला हें नांव दिलें गेलें असावें असें मानण्यास जागा आहे.

**विष्णु.**–विष्णु या देवतेला ब्राह्मणग्रंथांतील आख्यायिकांमध्यें जरी अत्यंत महत्त्व दिलेलें असलें तरी ऋग्वेदांत ही देवता गौणच मानलेली आहे. तथापि उल्लेखस्थानांच्या संख्येवरून ठरणाऱ्या महत्त्वापेक्षां बरेंच अधिक महत्त्व तिला असल्याचें या देवतेच्या व्यक्तिविषयक वर्णनावरून दिसतें. केवळ उल्लेखसंख्येच्या मानानें पाहतां या देवतेचें स्थान चवथें ठरतें; कारण संपूर्ण विष्णुवर्णनपर अशा ऋचा पांचाहून अधिक नाहींत, आणि विष्णु हें नाम सबंध ऋग्वेदांत फक्त शंभर वेळां आलेलें आहे. विष्णूच्या मनुष्यस्वरूपात्मक गोष्टी म्हणजे तो तीन पावलें टाकतो व तो विशाल देहाचा तरुण आहे, इतक्याच सांपडतात (१.११५,६). त्याच्या संबंधाचें मुख्य वर्णन म्हणजे तो त्रि-वि-क्रम म्हणजे तीन पावलांनीं सर्व विश्व आक्रमणारा, असें वर्णन सुमारें दहावारा ठिकाणीं आलेलें आहे. तसेंच उरुगाय, व उरुक्रम हीं त्याचीं विशेषणें तितक्याच वेळां आणखी आलेलीं असून त्यांवरून त्याच्या वरील कृत्याचाच अर्थबोध होतो. यापैकीं दोन पावलांनीं त्यानें मनुष्याला दृग्गोचर अशी सर्व पृथ्वी व्यापिली, व तिसरें पाऊल उंच अंतरिक्षांत पक्ष्यांच्या उड्डाणाच्या व मनुष्याच्या दृष्टीच्या पलीकडे टाकलें (ऋ. १.११५,५;७.९९,२). त्याचें वसतिस्थान स्वर्ग असून तेथें धार्मिक लोक आनंदांत राहतात, तेथें मधुकूप आहे (ऋ. १.१५४,५). तो आपल्या वसतिस्थानाचें म्हणजे स्वर्गाचें संरक्षण करतो (ऋ. १.१५४,५).

विष्णूचीं उपरिनिर्दिष्ट तीन पावलें म्हणजे सूर्याच्या दैनिक मार्गक्रमणांतील तीन ठिकाणें, उदय, मध्य व अस्त हीं होत, असें बहुतेक यूरोपीय पंडितांचें व यास्काच्या पूर्वीचा आचार्य और्णवाभ याचेंहि मत (निरुक्त १२.१९) आहे; परंतु ऋग्वेदेतर वेदांत, ब्राह्मणांत व वेदोत्तर वाङ्मयांत असें मत आहे कीं, विश्वांतील तीन विभाग (भूलोक, भुवर्लोक व स्वर्गलोक) सूर्यदेवतेनें आक्रमण केल्याचा त्यांत संबंध आहे; आणि विष्णूनें तिसरें पाऊल उंच टाकलें या गोष्टीशीं जुळणारें हें दुसरें मत असल्यामुळें तेंच ग्राह्य दिसतें.

विष्णूसंबंधानें प्रमुख कल्पना गतिविषयक असून त्याचें गमन त्वरित, दूर व नियमित असतें असें वर्णन पुष्कळ ठिकाणीं आहे. त्याच्या गमनासंबंधानेंच ९० दिवसांचा एकेक असे चार ऋतू मिळून ३६० दिवसांचें सौरवर्ष वगैरे वर्णन आहे (ऋ. १.१५५,६). वेदोत्तर वाङ्मयांत विष्णूचें आयुध जें फिरतें चक्र त्याचें वर्णन सूर्याशीं मिळतें आहे. तसेंच त्याचें वाहन जो गरुडपक्षी त्याचे प्रतिशब्द गरुत्मत् व सुपर्ण हे ऋग्वेदांत सूर्याला उद्देशून योजिलेले आहेत. या एकंदर वर्णनावरून विष्णु म्हणजे सूर्य अशी मूळ कल्पना असावी, असें दिसतें. सूर्य मध्यान्हीं ऊर्ध्वबिंदूंत स्थिर असल्यासारखा दिसतो; या मध्यबिंदूलाच (Zenith) यास्कानें विष्णुपद असें नांव दिलें आहे. विष्णूला गिरिक्षित् व गिरिष्ठा असें म्हटलें असून (ऋ. १.१५४,२) पुढें (ऋ. १.१५५,१) विष्णु व इन्द्र यांनां पर्वतशिखरावर बसलेले असें म्हटलें आहे. याचा अर्थ ढगांच्या पलीकडे दिसणारा सूर्य असा स्पष्ट दिसतो. वरील विष्णूच्या प्रतिशब्दांवरून विष्णूला 'गिरीश' असें नंतरच्या वाङ्मयांत (तैत्तिरीय सं. ३.४,५) म्हटलें आहे.

विष्णूनें तीन पावलें टाकून पृथ्वी आक्रमण केली ती आपत्तिग्रस्त मनुष्याला मुक्त करण्याकरतां (ऋ. ६.४९,१३), मनुष्याला पृथ्वीवर राहण्याची सोय करून देण्याकरतां (ऋ. ७.१००,४), असें वर्णन आहे. या संदर्भावरूनच पुढें आर्ष महाकाव्यांतील व पुराणांतील विष्णूच्या वामनावताराची कथा उद्भवली असावी. मध्यंतरीं ब्राह्मणग्रंथांत (शत. ब्रा. १.२.५,५; तैत्ति. सं. २.१,३; तैत्ति. ब्रा. १.६,१,५)

विष्णूनें बटुरूप धारण करून तीन पावलें टाकून असुरांच्या हातून पृथ्वी देवांकरितां सोडविली, अशा अर्थाची विष्णूबद्दलची आख्यायिका आहे.

विष्णु हा इन्द्राचा मित्र असून वृत्राबरोबरच्या युद्धांत त्यानें इन्द्राला मदत केलेली आहे (ऋ. ८.१२,२६, व २७). तसेंच इन्द्र व विष्णु दोघांनीं मिळून दासावर विजय मिळविला, शंबराचे ९९ दुर्ग नाश केले व वर्चिनाचे वीर ठार मारले (ऋ. ७.९९,४ व ५). तसेंच त्या दोघांनीं मिळून सर्व वातावरण व अंतरिक्ष (ऋ. ६.६९,५) आणि सूर्य, उषा व अग्नि (ऋ.७.९९,४) हीं उत्पन्न केलीं. मित्र, वरुण व मरुत् यांचेबरोबर विष्णूनें स्तोत्रें गाऊन इन्द्राचा गौरव केला (ऋ. ८.१५,९). विष्णूचे जोडीदार म्हणून मरुतांचा उल्लेख येत असतो (१.१५६,४).

गर्भधारण व गर्भसंरक्षण या कामीं मदत करणाऱ्या म्हणून ज्या देवता आहेत त्यांतहि विष्णूची गणना आहे (ऋ. ७.३६,९;१०.१८४,१). विष्णु स्वर्ग, पृथ्वी व सर्व जीव यांचा आधार आहे (ऋ. १.१५४,४).

ब्राह्मणग्रंथांत विष्णूनें आपल्या तीन पावलांनीं पृथ्वी, अंतरिक्ष व स्वर्ग व्यापिले अशी कल्पना आहे (शत. ब्रा. १.९,३,९; तैत्ति. ब्रा. ३.१,२,७). विष्णूसंबंधाच्या ऋग्वेदांत मूळ असलेल्या दोन कथा ब्राह्मणग्रंथांत अधिक विस्तृत केल्या आहेत. ऋग्वेदांत इन्द्रानें असुरांचा पराभव केला असें आहे, पण ब्राह्मणग्रंथांत देव व असुर असे दोन विरोधी पक्ष असल्याचें सांगितलें असून उभयतांमधील सामन्यांत देवांनां सदोदित जय मिळत नसे, उलट त्यांची पुष्कळ वेळां स्थिति वाईट होत असे असें वर्णन आहे. एकदां असुरांनीं देवांचा पराभव केला, व नंतर बटुरूपी विष्णु आक्रमील तितका पृथ्वीचा भाग देवांनां परत देण्याचें कबूल केलें. पण विष्णूनें आपल्या मूळ सामर्थ्यानें सर्वच पृथ्वी व्यापिल्यामुळें ती सर्व देवांनां परत मिळाली शतपथ ब्राह्मण १.२.५,१ या ठिकाणीं विष्णूनें असुरांनां फसविण्याकरतां बटुवेष घेतला होता असें आहे.

ब्राह्मणग्रंथांतील दुसऱ्या कथेचें मूळ ऋग्वेदांतील (१.६१,७;८.६६,१०) ऋचांत आहे त्यांत असें वर्णन आहे कीं, विष्णूनें सोमरस प्राशन करून इन्द्राच्या आग्रहावरून वृत्राच्या १०० म्हशी व एक दुग्धपात्र हरण केलें, व इन्द्रानें वृत्राला ठार मारलें. हीच गोष्ट पुढें तैत्तिरीय संहितेंत (६.२,४) विस्तृत करून दिली आहे ती अशीः एका वराहानें असुरांची चीजवस्त सात टेंकड्यांच्या पलीकडे ठेविली होती. इन्द्रानें कुशांकुरांनीं वराहाला ठार मारलें व विष्णूनें तो वराह देवांनां यज्ञांत अर्पण करण्याकरतां नेला; व देवांनां असुरांची सर्व मालमत्ता मिळाली. याच वराहाला शतपथ ब्राह्मणांत (१४.१.२,११) एमुष असें नांव असून त्यानें पाण्यांतून पृथ्वी वर काढली असें म्हटलें आहे. पुढें रामायणांत व पुराणांत यालाच विष्णूचा वराहावतार असें मानलें आहे.

विष्णूच्या दुसऱ्या दोन अवतारांचें मूळहि ब्राह्मणग्रंथांत सांपडतें. शतपथब्राह्मणांत (१.८.१,१) मनूला जलप्रलयांतून वांचविणाऱ्या मत्स्यालाच पुढें पुराणांत विष्णूचा मत्स्यावतार असें मानलें आहे. शिवाय शतपथब्राह्मणांत (७.५.१,५) प्रजापति संतति निर्माण करण्याकरतां जलामध्यें कूर्मरूपानें संचार करतो, या विधानावरून पुढें पुराणांत विष्णूच्या कूर्मावतारांची कथा बनविलेली दिसते. या कथा मागील प्रकरणांत दिल्याच आहेत.

शतपथ ब्राह्मणांत (१४.१,१) यज्ञस्वरूप विष्णूबद्दल अशी कथा आहे कीं, यज्ञकर्माचें फल त्याला प्रथम कळल्यामुळें तो देवांमध्यें श्रेष्ठ बनला; पुढें त्याच्याच धनुष्यानें त्याचें मस्तक छेदिलें जाऊन त्याचा सूर्य बनला. तैत्तिरीय आरण्यकांत (५.१,१ ते ७) वरील कथेंत अशी भर घातली आहे कीं, अश्विनीकुमार वैद्यांनीं तें मस्तक परत स्वस्थानीं बसविलें.

ऐतरेय ब्राह्मणांत (१.१) विष्णु हा सर्वश्रेष्ठ देव व अग्नि हा कनिष्ठ असून इतर सर्व देवता त्यांच्या मध्यंतरीं असल्याचें दिलें आहे. उलट त्याच ब्राह्मणांत (ऋ. १.३०) विष्णूला देवांचा द्वारपाल असेंहि म्हटलें आहे.

**आदित्य.**—आदित्य हें नांव एका देवतासमूहाला लावलेलें असून ऋग्वेदांत त्यांच्या वर्णनपर सबंध सूक्तें सहा आहेत व दुसऱ्या दोन सूक्तांत त्यांचा अंशमात्र उल्लेख आहे. या समूहांतील देवतांच्या नांवांबद्दल व संख्येबद्दल ऋग्वेदांत बरीच अनिश्चितता आहे. फक्त एका ठिकाणीं (ऋ. २.२७,१) त्या जास्तींत जास्त सहा दिल्या आहेत, त्या येणेंप्रमाणेंः मित्र, अर्यमन्, भग, वरुण, दक्ष व अंश. अथर्ववेदांत अदितीचे हे पुत्र आठ होते असें म्हटलें असून (८.९,२१) तैत्तिरीय ब्राह्मणांत (१.१,९१) या आठांचीं नांवें पुढीलप्रमाणें दिलीं आहेत. अंश, भग, धातृ, इन्द्र, विवस्वत्, मित्र, वरुण व अर्यमन्. ऋग्वेदाच्या दहाव्या मंडलांत व शतपथ ब्राह्मणांत अदितीचा आठवा पुत्र मार्तण्ड असें म्हटलें असून त्याच ब्राह्मणांत (६.१.२,८; ११.६.३,८) हे आदित्य बारा असल्याचें व ते बारा महिन्यांचे निदर्शक असल्याचें सांगितलें आहे. वेदोत्तर वाङ्मयांत बारा महिन्यांचे बारा आदित्य किंवा सूर्यदेवता असें सर्वत्र स्पष्ट दिलेलें आहे; व त्यांत विष्णु हा पहिला व सर्वश्रेष्ठ असें म्हटलें आहे. ऋग्वेदांत सूर्याला आदित्य म्हटलें आहे, त्यावरून सूर्य हा सातवा व मार्तण्ड हा आठवा आदित्य असावा. ऋग्वेदांतच एका ठिकाणीं (९.१,४) आदित्यांची माता व वसूंची सुवर्णकांती कन्या मधुकक्षा ही होय, असें सांगितलें आहे.

ऋग्वेदांत (७.८५,४) व मैत्रायणी संहितेंत (२.१,१२) इन्द्र हा अदितीचा पुत्र म्हणजे आदित्यांपैकींच एक आहे; पण शतपथ ब्राह्मणांत (११.६.३,५) बारा आदित्यांहून इन्द्र निराळा दिला आहे. आदित्यांपैकीं मित्रावरुण यांचीच एकत्र स्तुति केलेली आहे. शिवाय आदित्य यांचा उल्लेख वसू, रुद्र, मरुत्, अंगिरस, ऋभू, विश्वेदेव या देवतासमूहांबरोबर बहुतेक असतो. आदित्य हें नांव सामान्य सर्व देव या अर्थानेंहि वापरलेलें आहे; व आदित्यांचें वर्णन सर्वसामान्य देवांच्या वर्णनांशीं बहुतेक जमतें; पण आदित्यांपैकीं प्रमुख जे मित्रावरुण त्यांच्या वर्णनांशीं जमत नाहीं. मूळचे सात आदित्य म्हणजे सूर्य, चंद्र व इतर पांच मिळून सप्त ग्रह होत, असें ओल्डेनबर्गचें म्हणणें आहे; त्याचें कारण इराणी अमेषस्पेंत यांची संख्या ग्रहांइतकीच म्हणजे सात आहे. तथापि या मताविरुद्ध गोष्ट ही दिसते कीं, इराणी व वैदिक नांवांपैकीं एकांतहि साम्य नाहीं, व इराणी मिथ्र हा सप्तग्रहांच्या यादींत नाहीं. म्हणून वरील मत कांहीं बऱ्या अवेस्ता-पंडितांनींहि त्याज्य मानलें आहे.

ऋग्वेदांत आदित्यांपैकीं मित्र, वरुण वगैरे प्रमुख आदित्य यांची स्तुति स्वतंत्र सूक्तांतून आलेली आहे; व या प्रकरणांतहि त्यांचें स्वतंत्र वर्णन दिलेलें आहे. आदित्यांपैकीं उरलेल्या देवतांची माहिती त्या त्या स्वतंत्र नांवाखालीं थोडक्यांत दिलेली आहे.

सामान्यतः सर्व आदित्यांचें वर्णन असें येतें कीं, त्यांना सर्व दूरस्थ गोष्टीहि समीप होतात; सर्व चलाचलांना त्यांचा आधार आहे; सर्व विश्वाचें ते पालन करतात; माणसांच्या मनांतले बरे वाईट विचार ते जाणूं शकतात, व पापी जनांनां ते शिक्षा करतात; आपल्या भक्तांच्या रोगादि आपत्ति दूर करतात व त्यांनां प्रकाश, दीर्घायुष्य, संतति वगैरे देतात.

मित्र वरुण वगैरे यांचें वर्णन वर आलेलेंच आहे. आतां उरलेल्या आदित्यदेवतांचें विशिष्ट वर्णन करूं.

**अर्यमन्.**—या देवतेचा उल्लेख ऋग्वेदांत सुमारें १०० वेळां आला आहे तरी त्याचें वैयक्तिक वर्णन अत्यंत अल्प असल्यामुळें नैघण्टुकांत देवांच्या यादींत याचें नांव दिलेंच नाहीं. बहुतेक ठिकाणीं मित्रावरुणाबरोबर अर्यमाचा उल्लेख आहे. आदित्य, मित्र याप्रमाणें अर्यमन् हा इतर देवतांचा 'स्नेही' अशा अर्थानें आलेला आहे. आवेस्ताग्रंथांतहि याचा उल्लेख असल्यामुळें इन्डो-इराणी काळांतील ही प्राचीनतर देवता आहे हें उघड आहे.

**भग.**—या देवतेच्या स्तुतिपर ऋग्वेदांत एक सूक्त (=७.४१) असून इतर साठ ठिकाणीं तिचें नांव आलें आहे. या शब्दाचा अर्थ 'देणारा' असा आहे व संपत्ति देणारी देवता म्हणून भगवद्दल वैदिक सूक्तांत सर्वत्र कल्पना आहे. भग म्हणजे 'समृद्धि, संपत्ति, सुदैव' असा पुष्कळ ठिकाणीं अर्थ आहे. उषा ही भगाची भगिनी होय (ऋ. १.१२३,५). इराणी भाषेंत 'बघ देव' हें अहुरमज्द याचें एक नांव आहे. इन्डो-यूरोपीय काळांतहि 'बोगू देव' हा शब्द आढळतो यावरून ही देवता फारच जुनी होय.

**अंश.**—हा शब्द ऋग्वेदांत फक्त आठदहा वेळां आला आहे, व त्याचा अर्थ बहुतेक भगसारखाच आहे, म्हणजे वांटा, भाग, वांटणारा वगैरे अर्थ आहेत. देव या अर्थानें हा शब्द फक्त तीनदां आला आहे.

**दक्ष.**—देवतेचें नांव या अर्थानें हा शब्द ऋग्वेदांत पांचसहा वेळांहून अधिक आला नाहीं. 'शक्तिमान्, कुशल, बुद्धिमान्' अशा विशेषणात्मक अर्थानें दक्षशब्द बऱ्याच वेळां आला आहे. अर्थात् मूर्तस्वरूपांत 'धाडसी, हुषार देवता' असा दक्ष याचा अर्थ आहे. सृष्ट्युत्पत्तिविषयक सूक्तांत (ऋ. १०.७२,४ व ५) दक्ष हा अदितीपासून उत्पन्न झाला असें प्रथम सांगून लगेच अदिति दक्षाची कन्या असें म्हटलें आहे. या विरोधात्मक वर्णनाचा असा अर्थ लावतात कीं, दक्ष व अदिति हीं सर्वांचीं मातापिता होत.

**विवस्वत्.**—ऋग्वेदांत विवस्वत् देवतेच्या वर्णनपर स्वतंत्र, सबंध अशी एकहि ऋचा नसून फक्त तीसपस्तीस ठिकाणीं तिचा इतरांबरोबर उल्लेख आलेला आहे. त्याला अश्विनांचा (ऋ. १०.१७,२) व यमाचा (ऋ. १०.१४,५) पिता असें म्हटलें आहे. वेदोत्तर वाङ्मयांत मानवजातीचा मूळपुरुष जो मनु त्याचा पिता विवस्वत् असें मानलें आहे. सर्व देव हीं विवस्वताचीं अपत्यें असेंहि म्हटलें आहे (ऋ. १०.६३,१). त्वष्ट्रची कन्या सरण्यू ही विवस्वताची पत्नी होय (ऋ. १०.१७, १ व २). एके ठिकाणीं (ऋ. ६.८,४) मातरिश्वाला व इतर सर्वत्र अग्नीला (ऋ. १.५८,१; ४.७,४; ८.३९,३; १०.२१,५) विवस्वताचा दूत म्हटलें आहे.

इन्द्राचा विवस्वताशीं संबंध दाखविला आहे. विवस्वताच्या स्तवनानें इन्द्राला आनंद होतो (ऋ. ८.६,३९). नवव्या मंडलांत विवस्वताशीं सोमाचा संबंध पुष्कळ आलेला आहे. विवस्वताच्या कन्या (=बोटें) सोमाला स्वच्छ करतात (ऋ. ९.१४,५). सोम विवस्वतासन्निध राहतो (ऋ. ९.२६,४). अश्विन्हि त्याच्याबरोबर राहतात व हविर्भाग घेण्याकरितां येण्याविषयीं त्यांची एकत्र प्रार्थना केलेली आहे (ऋ.१.४६,१३). वरुण व इतर देव यांच्याबरोबरहि विवस्वताचा उल्लेख आहे (ऋ. १०.६५,६). विवस्वताचा आदित्याच्या भक्तांशीं विरोध असल्याचें दिसतें, कारण एके ठिकाणीं (ऋ. ८.५६,२०) ते भक्त प्रार्थना करतात कीं, विवस्वताच्या बाणानें अकालीं मरण न येवो. कांहीं ठिकाणीं (ऋ. ७.९,३; ३.३०,१३) अग्नीला व उषेला विवस्वत् म्हणजे 'तेजस्वी' असा विशेषणार्थी

शब्द जोडला आहे. ब्राह्मणग्रंथांत विवस्वतालाच आदित्य म्हटलें आहे; वेदोत्तर वाङ्मयांत विवस्वत् म्हणजे सूर्याचें एक नांव अशा अर्थी हा शब्द वापरला आहे.

विवस्वत् ही देवता विवङ्ह्वन्त (यिमाचा पिता) या नांवानें इन्डो-इराणी काळांतहि आढळते. हओम तयार करणारा पहिला मनुष्यप्राणी विवङ्ह्वन्त होय, दुसरा आथ्व्य व तिसरा थ्रित (यस्न ९.१०). यांपैकीं पहिल्या व तिसऱ्या व्यक्तीचा उल्लेख ऋग्वेदांत आहे, त्यांत इन्द्र, मनु, विवस्वत् व त्रित यांचे शेजारीं बसून सोम प्याला असें आहे.

ऋग्वेदकालानंतर कथापुराणांतून विवस्वत् ही देवता त्रिताप्रमाणें हळू हळू नाहींशी होत गेली. व्युत्पत्त्यर्थावरून व अश्विन, अग्नि व सोम यांच्याशीं असलेल्या संबंधावरून विवस्वत् म्हणजे उदयकाळचा सूर्य असावा असें वाटतें. परंतु आवेस्तांतील सदृश नामावरून व कथेवरून विवस्वत् म्हणजे मानवजातीचा प्रथम यज्ञ करणारा पूर्वज होय, असें ओल्डेनबर्गचें मत आहे.

**सूर्य.**—ऋग्वेदांतील दहा सूक्तें सूर्याच्या वर्णनाकडे दिलीं आहेत. सूर्यदेवाचें नांव कितीवेळां ऋग्वेदांत आलेलें आहे हें नक्की सांगतां येत नाहीं, कारण पुष्कळ ठिकाणीं सूर्य या शब्दानें निसर्गदृष्ट घटना उद्दिष्ट आहे किंवा या घटनेवरून कल्पिलेला देव उद्दिष्ट आहे हें समजणें अवघड असतें. सूर्य याचा अर्थ निसर्गदृष्ट सूर्यबिंब असा असल्यानें सूर्यदेव हा आदित्य देवतांमध्यें सर्वांत अधिक प्रमाणानें जड निसर्गाशीं संबद्ध असा आहे. या देवाचा आकाशांत प्रकाशमान असणाऱ्या सूर्यबिंबाशीं असलेला संबंध कवी केव्हांहि दृष्टि आड करीत नाहींत. मोठ्या अग्नीच्या मुखाप्रमाणें आकाशांतील पूजार्ह सूर्यतेज आहे (ऋ. १०.७,३); सूर्याच्या नेत्राचा उल्लेख कित्येक वेळां आलेला आहे (ऋ. ५.४०,८ इ.); पण तितक्याच वेळां मित्र आणि वरुण यांचा अथवा मित्र, वरुण आणि अग्नि यांचा सूर्य हा नेत्र आहे असेंहि विधान आलेलें आहे (ऋ. १.११५,१). एका ठिकाणीं (ऋ. ७. ७७,३) देवांच्या नेत्राला उषा घेऊन येते असें म्हटलें आहे. नेत्र आणि सूर्य यांतील साम्य व संबंध ऋ. १०. १६,३ या ठिकाणींहि दर्शविलेला आहे. मृत मनुष्याचा नेत्र सूर्याकडे जातो अशी कल्पना वरील स्थलीं आहे. अथर्ववेदामध्यें याला नेत्रांचा पति म्हटलें आहे (अ. वे. ५. २४,९); सर्व भूतांचा हा नेत्र असून त्याला आकाशाच्या, पृथ्वीच्या आणि जलांच्या पलीकडे दिसतें (अ. वे. १३. १,४५); तो सर्व जगताची टेहळणी करणारा (स्पश) आहे त्याला मर्त्यांचीं चांगलीं व वाईट कृत्यें दिसतात (ऋ. १.५०,७;६.५१,२ इ.); सूर्य मनुष्यानां जागें करतो व नंतर ते आपले व्यवसाय करितात (ऋ. ७.६३,४); सर्व मनुष्यांनां जागें करणारा हा आहे (ऋ. ७.६३,२ व ३); सर्व स्थिरचरांचा हा आत्मा व संरक्षक आहे (ऋ. १. ११५,१;७.६०,२); त्याच्या रथाला एतश नांवाचा एक घोडा (ऋ. ७.६३,२); किंवा अनेक घोडे (ऋ. १. ११५,३ इ.); किंवा घोड्या (ऋ. ५.२९,५); किंवा सात घोडे (ऋ. ५.४५,९); किंवा हरिता नांवाच्या घोड्या (ऋ. १.५०,८ इ.); अथवा सात चपल घोड्या आहेत (ऋ. ४.१३,३) अशीं विधानें सांपडतात. सूर्याचा मार्ग वरुण तयार करून देतो (ऋ. १.२४,८); किंवा मित्र, वरुण, आणि अर्यमन् या आदित्यदेवता त्याला मार्ग करून देतात (ऋ. ७.६०,४); पूषन् हा त्याचा दूत आहे (ऋ. ६.५८,३); अग्नि आणि यज्ञ याप्रमाणें उषा, सूर्य प्रकट करतात किंवा उत्पन्न करितात (ऋ. ७.८०,२; ७.७८,३); उषांच्या अंकावरून सूर्य चोहोंकडे प्रकाश पसरतो (ऋ. ७.६३,३); दुसऱ्या एका दृष्टीनें उषेला सूर्याची पत्नी म्हटलें आहे (ऋ. ७.७५,५); सूर्याला अदितीचा पुत्र म्हणून आदित्य किंवा आदितेय असें नांव आहे (ऋ. १.५०,१२;८.९०,११;१०.८८,११; इ.). आदित्य आणि सूर्य निराळे असेंहि एके ठिकाणीं वर्णन आहे (ऋ. ८.३५,१३–१५); द्यौ हा त्याचा पिता (ऋ. १०.३७,१); तो समुद्रांत लपलेला असतां देवांनीं त्याला वर काढलें (ऋ. १०.७२,१); अग्नीचें एक रूप म्हणून देवांनीं त्याला देवलोकांत ठेवलें (ऋ. १०.८८,११); दुसऱ्या प्रकारच्या एका कल्पनेप्रमाणें विश्वव्यापी पुरुषाच्या नेत्रापासून सूर्याची उत्पत्ति झाली (ऋ. १०.९०,३); वृत्रापासूनहि त्याची दिवाकर या नांवाखालीं उत्पत्ति अथर्ववेदांत वर्णिली आहे (अ. वे. ४.१०,५);

सूर्याची उत्पत्ति करणारे अशा प्रकारें पुष्कळ देवतांचा व्यक्तिशः उल्लेख आलेला आहे. इन्द्रानें सूर्याला उत्पन्न केलें (ऋ. २.१२,४ इ.); इन्द्र–विष्णु यांनीं सूर्याला उत्पन्न केलें (ऋ. ७.९९,४); इन्द्र–सोम यांनीं सूर्याला त्याच्या प्रकाशासह आणिलें (ऋ. ६.७२,२); इन्द्र–वरुण यांनीं सूर्याला आकाशांत चढविलें (ऋ. ७.८२,३); मित्रावरुण यांनीं सूर्याला आकाशांत स्थापन केलें (ऋ. ४.१३,२); सोमानें सूर्यामध्यें प्रकाश ठेविला (ऋ. ६.४४,२३); अग्नीनें सूर्याला आकाशांत चढावयास लाविलें. धात्यानें सूर्य आणि चंद्र यांस उत्पन्न केलें (ऋ. १०.१९०,३); अंगिरसानें आपल्या विधींनीं सूर्याला आकाशांत स्थान दिलें (ऋ. १०.६२,३); सूर्योत्पत्तिसंबंधाच्या या सर्व उल्लेखांत दृष्टीला दिसणारें जें सूर्यबिंब त्यासंबंधाचेंच वर्णन आहे यांत संशय नाहीं.

कित्येक स्थलीं सूर्य अंतरिक्ष क्रमून जाणारा पक्षी आहे अशी कल्पना आहे (ऋ. १०.१७७,१ व २;५.४७,३; १.१९१,९); त्याची उडणाऱ्या श्येनाशीं तुलना केली आहे

व कोठें त्याला श्येन असेंहि म्हटलें आहे (ऋ. ७.६३,५; ५.४५,९); एका ठिकाणीं त्याला वृषभ म्हटलें आहे व तेथेंच त्याला पक्षी असेंहि म्हटलें आहे. (ऋ. ५.४३,३); उषांनीं आणलेला शुभ्र आणि तेजस्वी घोडा असेंहि त्याचें एके ठिकाणीं वर्णन आहे (ऋ. ७.७७,३); सूर्याचे घोडे म्हणजे त्याचे किरण होत. हे सात आहेत (ऋ. ७.६१,१६); त्याच्या रथाच्या कन्या असें त्याच्या सात घोड्यांना म्हटलें आहे (ऋ. १.५०,९).

कांहीं ठिकाणीं सूर्याचें वर्णन अचेतन वस्तूप्रमाणें केलें आहे. आकाशांतील तो रत्न आहे (ऋ. ७.६३,४); मित्र आणि वरुण, मेघ आणि वृष्टि यांनीं झांकून ठेवितात असें एक तेजस्वी आयुध म्हणजे सूर्य होय (ऋ. ५.६३,४). मित्र–वरुणांचें वज्र (ऋ. ५.६२,२), मित्र–वरुणांनीं आकाशांत ठेविलेला तेजस्वी रथ (ऋ. ५.६३,७), अशा-प्रकारचेंहि सूर्याचें वर्णन आलें असून कोठें कोठें त्याला चक्र असेंहि म्हटलें आहे (ऋ. १.१७५,४ इ.).

सूर्य हा जगताकरितां मनुष्यांकरितां देवांकरितां प्रकाशतो. कातडें जलांत फेंकून द्यावें त्याप्रमाणें त्याचे किरण अंधकार जलांत फेंकून देतात (ऋ. ४.१३,४); कातडें गुंडाळून टाकावें त्याप्रमाणें तो अंधकार गुंडाळून टाकतो (ऋ. ७. ६३,१); चेटके आणि अंधकारांत संचरणारे राक्षसादिक यांचा निःपात करतो (ऋ. १.१९१,८ व ९); सूर्याची उष्णता प्रखर व तापदायक असल्याबद्दलचे उल्लेख ऋग्वेदांत दोन तीनच येतात (ऋ. ७.३४,१९;९.१०७,२०).

दिवस मोजण्याचें काम सूर्य करितो. (ऋ. १.५०,७); तो आयुष्य वाढवितो (ऋ. ८.४८,७); अस्वास्थ्य, रोग, दुःस्वप्न यांचा तो नाश करितो (ऋ. १०.३७,७); सूर्यावर सर्व प्राणी अवलंबून आहेत (ऋ. १.१६४,१४); सूर्यानें सर्व आकाश सांवरून धरलें आहे (ऋ. १०.८५,१); विश्व-कर्मन् म्हणजे सर्व विश्व उत्पन्न करणारा हें नांव त्याला लावतात (ऋ. १०.१७०,४); तो देवांचा पुरोहित आहे (असुर्यः पुरोहितः ऋ. ८.९०,१२); तो उगवतो तेव्हां मित्र वरुण आणि इतर देवांनां आम्ही निष्पाप असल्या-बद्दलचें सांग अशी देव त्याची प्रार्थना करितात (ऋ. ७. ६०,१;७.६२,२); तो उगवतांना वृत्रहंता इन्द्र त्यांजकडे जातो असें म्हटलें आहे. इन्द्राबरोबर त्याचें आह्वान करितांना त्याला वृत्रहंता असें म्हटलें आहे (ऋ. ८.८२,१, २ व ४); सूर्याबद्दल एकच कथा आहे कीं इन्द्रानें त्याला एकदां जिंकिलें (ऋ. १०.४३,५), व त्याचें चक्र चोरलें (ऋ. १.१७५,४;४.३०,४); वादळांत सूर्य दिसेनासा होतो त्या प्रसंगावरून वरील कल्पना केली असावी. आवेस्ता-मध्यें हरे (वैदिक स्वर्, या शब्दापासून 'सूर्य' शब्द झालेला आहे) म्हणजे सूर्य याचे घोडे वैदिक सूर्याप्रमाणें वेगवान् असून त्याला अहुरमज्द याचा नेत्र म्हटलें आहे.

**सविता.**—ऋग्वेदांतील ११ पूर्ण सूक्तें सविता या देवाला दिलीं आहेत इतर कांहीं सूक्तांतहि त्याचें वर्णन आलेलें आहे. यांपैकीं ८–९ सूक्तें गोत्रमंडलांत आहेत. सवित्याचें वर्णन प्रामुख्यानें सुवर्णमय देवता असें केलें आहे. तो हिरण्यनेत्र आहे, हिरण्यहस्त आहे, हिरण्यजिह्व आहे, हिरण्यबाहु आहे (ऋ. १.३५,८; १.३५,९; ६.७१,३; ६.७१,१ व ५). त्याचे हात रुंद आहेत, सुंदर आहेत (ऋ. २.३८,३; ३.३३,६); त्याची जिह्वा सुंदर आहे (ऋ. ३. ५४,११). लोहमय हनवटीचा (अयोहनुः) असें त्याला एकदां म्हटलें आहे. त्याचे केंस पिंवळे आहेत (ऋ. १०. १३९,१); त्याचें वस्त्र पिंगट असतें (ऋ. ४.५३,२); त्याचा रथ हिरण्याचा असून त्याची धुराहि हिरण्याची आहे (ऋ. १. ३५,२ व ५); तो स्वतः नानारूपें धारण करणारा आहे. त्या-प्रमाणें त्याचा रथहि आहे (ऋ. १.३५,३; ५.८१,२); त्याच्या रथाला दोन तेजस्वी घोडे किंवा दोन अगर अधिक तप-किरी रंगाचे पांढऱ्या खुराचे घोडे आहेत (ऋ. १.३५,२ व ५; ७.४५,१); सवित्याचें तेज थोर आहे असें वर्णन आढळतें. हें तेज तो चहुंकडे पसरितो. त्याचें हें तेज हिरण्यमय आहे (ऋ. ३.३८,५; ७.३८,१); हिरण्यमय रूपाचा असें याचेंच फक्त वर्णन आहे. अंतरिक्ष, द्युलोक, पृथ्वी, सर्व जगत्, पृथ्वींतील जागा व आकाशाचा विस्तार. तो प्रकाशित करतो (९.३५,७ व ८; ४.१४,२; ४.५३,४ इ.). तो आपले हिरण्मय बलवान् हात वर करून उगवतो व आशीर्वाद देतो (ऋ. २.३८,२; ४.५३,३ व ४ इ.). हें त्याचें बाहू उचलणें हा एक त्याचा विशेष आहे, कारण इतर देवांच्या अशा क्रियेची याच्याशीं तुलना केली आहे. अग्नि हा सवित्याप्रमाणें बाहू उचलतो असें म्हटलें आहे (ऋ. १.९५,७); सविता बाहू उचलतो त्याप्रमाणें उषा प्रकाश प्रसवतात (ऋ. ७. ७९,२); तो आपल्या सुवर्णमय रथांत बसून वर चढणारा आणि खालीं उतरणारा मार्ग आक्रमण करीत असतां सर्व प्राणिमात्रांचें निरीक्षण करतो (ऋ. १.३५,२ व ३); तो उषेपूर्वी अश्विदेवांच्या रथाला प्रेरणा करितो (ऋ. १.३४,१०); उषेच्या मार्गक्रमणानंतर तो प्रकाशतो (ऋ. ५.८१,२); त्यानें पृथ्वीच्या सर्व जागा मापून टाकल्या आहेत. तो द्युलोकाच्या तीन तेजोमय विभागांत जातो आणि सूर्य-किरणांशीं त्याचा संयोग होतो (ऋ. ५.८१,३ व ४); सूर्यरश्मि हें विशेषण एकदां ऋग्वेदांत आलें असून तें सवित्यालाच लाविलें आहे. सूर्याच्या किरणांनीं प्रकाशमान होऊन हरिकेश सविता पूर्वेच्या बाजूनें सारखा आपला प्रकाश वर आणीत असतो (ऋ. १०.१३९,१); तो अंतरिक्षाला व द्युलोकाच्या तीन तेजस्वी विभागांनां तीनदां फेरा देतो (ऋ. ४.५३,५); सदाचारी लोक वास करितात तेथें मृत आत्म्याला घेऊन जा अशी त्याची प्रार्थना केली असते (१०.१७,४); तो देवांनां अमरत्व देतो व मनुष्याला दीर्घायुष्य

देतो ( ऋ. ४.५४,२ ); त्यानें ऋभूंनांहि अमृतत्व दिलें ( ऋ. १.११०,२ व ३ ); दुःस्वप्नें दूर कर, मनुष्यांनां पापमुक्त कर अशी सूर्याप्रमाणें त्याची प्रार्थना केली जाते ( ऋ. ५.८२,४; ४.५४,३ ); राक्षस व मंत्रप्रयोग करणारे मांत्रिक यांनां तो हांकून लावितो ( ऋ. १.३५,१० इ. )

इतर देवांप्रमाणें सवित्यालाहि असुर म्हटलें आहे ( ऋ. ४.५३,१); तो ठरींव नियमाप्रमाणें चालतो (ऋ. ४.५४,४); १०.३४,८ ); पाणी आणि वारा हे त्याच्या नियमानें वागतात ( ऋ. २.३८,२ ); दुसरे देव त्याचें नेतृत्व स्वीकारतात ( ऋ. ५.८१,३ ); इन्द्र, वरुण, मित्र, अर्यमन् व रुद्र यांनां देखील त्याच्या इच्छेविरुद्ध व सत्तेविरुद्ध कांहीं करतां येत नाहीं ( ऋ. २.३८,७; ५.८२,२ ); वसु, अदिति, वरुण, मित्र, अर्यमन् हे त्याची स्तुति गातात ( ऋ. ७.३८,३ व ४ ); पूषन् किंवा सूर्य याप्रमाणें तो स्थिरचराचा स्वामी आहे ( ऋ. ४.५३,६ ); इतर देवांप्रमाणें तो आकाशाचा आधार आहे ( ऋ. ४.५३,२ ); सर्व जगताचा आधार आहे ( ऋ. ४.५४,४ ).

सवित्याला एकदां अपांनपात्, जलांचें अपत्य, असें म्हटलें आहे ( ऋ, १.२२,६ ); अपांनपात् हें नांव सामान्यतः केवळ अग्नीलाच दिलेलें आढळतें. ऋग्वेद १०.१४९,२ येथेंहि सवित्याला अपांनपात् असें म्हटलें आहे. या ऋचेवर भाष्य करतांना यास्क आपल्या निरुक्तांत म्हणतो कीं, ( निरुक्त. १०.३२ ) सविता हा देव अंतरिक्षलोकांतील म्हणजे मध्यलोकांतील असावा. कारण तो वृष्टि करितो असें ऋचेंत म्हटलें आहे. याच ठिकाणीं द्युलोकांत असणाऱ्या आदित्याला म्हणजे सूर्याला सविता हें नांव आहे असें यास्क सांगतो. सवित्याला अपांनपात् हें नांव असल्यानें व त्याचे मार्ग अंतरिक्षांत आहेत असें एके ठिकाणीं विधान असल्यानें ( ऋ. १.३५,११ ) नैघण्टुकांत द्युलोकस्थ देवतांमध्यें व मध्यलोकस्थ देवतांमध्यें दोन्ही ठिकाणीं सविता देवाचें नांव आलें आहे. सवित्याला एके ठिकाणीं विश्वाचा प्रजापति म्हटलेलें आहे ( ऋ. ४.५३,२ ); शतपथ ब्राह्मण १२.३, ५,१ या ठिकाणीं प्रजापति व सविता एकच असें लोक म्हणतात असें विधान आहे. तैत्तिरीय ब्राह्मण. १.६.४,१ या ठिकाणीं प्रजापति सविता झाला व त्यानें जीव उत्पन्न केले असें म्हटलें आहे. चैतन्यदायक शक्तीचा स्वामी सविता हा एकटाच असून आपल्या क्रमणांनीं तो पूषन् होतो ( ऋ. ५.८१,५ ); आपल्या चैतन्यदायक शक्तीसह पूषन् सर्व प्राण्यांकडे त्यांचा रक्षिता या नात्यानें नजर फेंकित मार्गक्रमण करितो ( ऋ. १०.१३९,१ ); एकामागून एक आलेल्या दोन ऋचांत ( ऋ. ३.६२,९ व १० ) पूषा व सविता यांचा निकट संबंध उल्लेखिलेला आहे. या दोन ऋचांपैकीं पहिलीमध्यें सर्व भूतांनां पाहणारा पूषन् याची कृपा व्हावी अशी प्रार्थना आहे, आणि दुसरीमध्यें भक्तांच्या विचारांनां प्रेरणा दे अशी सवित्याची प्रार्थना केली आहे. ही दुसरी ऋचा म्हणजे सुप्रसिद्ध सावित्री होय. वेदाध्ययनाच्या प्रारंभीं ही ऋचा म्हणून सवितादेवाची प्रार्थना करण्याचा उत्तरकालीन प्रघात सुरू झाला. आपल्या नियमांच्या योगें सविता मित्र होतो असेंहि विधान आहे ( ऋ. ५.८१,४ ); कोठें कोठें भगदेवाशीं सवित्याचें ऐक्य कल्पिलेलें दिसतें ( ऋ. ५.८२,१ व ३; ७.३८,१ व ६ ); मात्र कदाचित या ठिकाणीं सवित्याचें विशेषण म्हणूनहि भग शब्द आला असेल. भग हें नांव सविताभगः, भगः सविता याप्रमाणें सविता शब्दाला जोडून आलेलें पुष्कळवेळां आढळतें. भग म्हणजे भाग्य देणारा देव होय. मित्र, पूषन् व भग यांजपासून सविता निराळा आहे. अशा प्रकारच्या अर्थाचीं विधानेंहि पुष्कळ आहेत. सविता आणि सूर्य हे दोन्ही शब्द एकाच देवतेचे वाचक म्हणून उपयोजिले आहेत अशा प्रकारच्या ऋचाहि बऱ्याच आहेत. सविता देवानें आपलें तेज उंच प्रदेशीं स्थापून सर्व विश्वाला प्रकाश दिला आहे. सूर्यानें पृथ्वी, अंतरिक्ष आणि द्युलोक हीं स्थानें आपल्या किरणांनीं व्याप्त केलीं आहेत ( ऋ. ४.१४,२ ) हें वरील प्रकारचें वर्णन आहे. ऋग्वेद ७.६३ या सूक्तांत २, व ४ या ऋचांत सवित्यालाच सामान्यतः जे शब्द लावले जातात त्या शब्दांनीं सूर्याचें वर्णन केलें आहे. तर तिसऱ्या ऋचेंत सविता म्हणजे सूर्यच असें म्हटल्यासारखें दिसतें. दुसऱ्याहि कित्येक सूक्तांत सवित्याचें वर्णन सूर्यासारखें व सूर्याचें वर्णन सवित्यासारखें केलेलें आढळतें व दोन्ही नांवें एका अर्थी वापरलेलीं सांपडतात ( ऋ. १०.१५८,१ ते ४; १.३५, १–११ ); कांहीं ठिकाणीं मात्र सविता आणि सूर्य हे वेगळे दाखविले आहेत. सविता द्यावापृथ्वींच्यामध्यें फिरतो. रोग दूर करतो, व सूर्याला गति देतो ( ऋ. १.३५,९ ); सविता मनुष्यें निष्पाप असल्याबद्दल सूर्याला सांगतो ( ऋ. १.१२३,३ ); तो सूर्याच्या किरणांशीं संयोग पावतो ( ऋ. ५.८१,४ ); तो सूर्याच्या किरणांनीं प्रकाशतो ( ऋ. १०. १३९,१ ); मित्र, अर्यमन् व भग यांसह तूं सूर्य उगवला म्हणजे भक्ताला चैतन्य दे अशी सवित्याची प्रार्थना करितात ( ऋ. ७.६६,४ ).

यास्क सांगतो कीं ( निरुक्त १२.१२ ), सवित्याचें उदयाची वेळ म्हणजे अंधकारनाशाची वेळ होय. ऋग्वेद ५.८१,४ या ऋचेवरील भाष्यांत सायण म्हणतो कीं, सूर्याला उदयापूर्वी सविता म्हणतात, उदय झाल्यापासून अस्त होईपर्यंत सूर्य म्हणतात. परंतु सविता झोंपी जावयास लावितो ( ऋ. ४.५३,६; ७.५३,१ ) अशा प्रकारच्या उल्लेखावरून प्रातःकाळाप्रमाणें सायंकाळाशींहि त्याचा संबंध येतो. एका सूक्तांत तर त्याचें अस्तास जाणारा सूर्य असेंच वर्णन आलेलें

आहे. त्याला उद्देशून असलेलीं सूक्तें प्रातःकाळच्या किंवा सायंकाळच्या यागाचे प्रसंगीं म्हणण्यासाठीं आहेत असें त्यांच्या स्वरूपावरून दिसतें. तो द्विपाद आणि चतुष्पाद प्राण्यांनां विसांवा देतो व जागे करितो (ऋ. ६.७१,२; ७.४५,१); तो आपलें घोडे सोडतो. प्रवाश्याला विसांवा देतो, त्याचे आज्ञेनें रात्र येते. कोष्टी आपलें विणावयास घातलेलें वस्त्र गुंडाळून ठेवितो, कारागीर आपलें काम अर्धें टाकून उठतो (ऋ. २.३८,४); पुढें पूर्व दिशा अग्नीची, दक्षिण ही सोमाची, त्याजबरोबर पश्चिम ही सवित्याची अशी कल्पना उदयास येऊन रूढ झाली (श. ब्रा. ३.२.३,१८); सवितृ हा शब्द सू या धातूपासून निघाला आहे. सू या धातूचा अर्थ उठविणें, चेतना देणें उद्दीपित करणें असा दिसतो (ऋ. ९.१५७,१; ५.८१,५ इ.). यास्क निरुक्तामध्यें (१०.३१) सविता याचा अर्थ 'सर्वस्य प्रसविता' सर्वांमध्यें चैतन्य उत्पन्न करणारा असा देतो.

सविता या शब्दाबरोबर देव हा शब्द सरासरीनें निम्म्यावेळां आढळतो. यावरून सविता हा शब्द विशेषण या नात्यानें वापरण्याची वहिवाट होती असें दिसतें.

ऋग्वेद ३.५५,१९; व १०.१०,५; या ठिकाणीं सविता हा शब्द त्वष्टा याचें विशेषण आहे असें दिसतें.

या सर्व गोष्टींवरून असें दिसतें कीं, सविता हें विशेषण प्रथम सूर्याला लावीत असत. कारण सूर्य हा विश्वामध्यें गति आणि जीवन देणारा असा असून सर्व गतींचें नियंत्रण करणारी अशी गति त्याचे ठिकाणीं आहे. सूर्याचें विशेषण या नात्यानें सविता शब्दाचा उपयोग होऊं लागल्यानंतर पुढें सूर्यापासून हें विशेषण विभक्त करून त्यांत दर्शविलेल्या गुणांची वेगळी देवता मानण्यांत आली. ही देवता अर्थातच सूर्याप्रमाणें वस्त्वात्मक नाहीं, तर कमी अधिक गुणात्मक आहे. वैदिक कवींच्या दृष्टीनें सविता ही सूर्यदेवाची दिव्य शक्ति असून या शक्तीलाच देवता मानलेलें आहे. ओल्डेनबर्गच्या मतें सवितादेवतेमध्यें चैतन्योत्पादकत्वाची कल्पना प्रमुख असून त्याचा सूर्य देवाशीं संबंध अगदीं गौण आहे.

**पूषन्.**—पूषन् या देवतेचें वर्णन केलें आहे अशीं आठ सूक्तें ऋग्वेदांत आहेत. एका सूक्तांत इन्द्रपूषन् यांची जोडीनें स्तुति केली आहे व दुसऱ्या एका सूक्तांत सोमपूषन् यांची संयुक्त देवता या नात्यानें स्तुति केलेली आहे. याप्रमाणें निव्वळ उल्लेखांच्या संख्येच्या दृष्टीनें विचार केला असतां विष्णूपेक्षां याचें स्थान थोडेंसें वरचें आहे. वेदकालच्या उत्तरभागांत आणि वेदोत्तरकालीं ह्याचें नांव फारसें येत नाहीं. स्वतंत्र देव या नात्यानें याचें व्यक्तित्व कोठेंहि स्पष्ट वर्णिलेलें नाहीं, व त्याच्या रूपांत मानवीपणा फार थोडा आहे. दुष्टांनां तुडवण्यासाठीं त्याची प्रार्थना केली आहे. या संबंधांत त्याच्या पायाचा संबंध येतो. त्याच्या उजव्या हाताचा उल्लेख एके ठिकाणीं आहे (ऋ. ६.५४,१०); रुद्राप्रमाणें त्याला जटा आहेत व दाढी आहे (ऋ. १०.२६,७; ६.५५,२); त्याच्याजवळ सुवर्णमय भाला आहे (ऋ. १.४३,६); एक अंकुशहि आहे (ऋ. ६.५३,९); त्याला उत्तम सारथीहि म्हटलें आहे (ऋ. ६.५६,२); त्याच्या गाडीला अज म्हणजे बोकड असतात (ऋ. १.३८,४); तो पेज पितो (ऋ. ६.५६,१); व कदाचित् त्याला या कारणानेंच दंतहीन हें नांव मिळालें असावें (श. ब्रा. १.७,४,७); पूषन् सर्व प्राणी एकदम पाहातो (ऋ. ३.६२,९); अग्नीचेंहि याप्रमाणेंच वर्णन येतें (ऋ. १०.१८७,४); सूर्याप्रमाणें याचें हा सर्व स्थिरचरांचा स्वामी आहे असें वर्णन येतें (ऋ. १.११५,१); सूर्य व अग्नि यांच्याप्रमाणें मातेची व भगिनीची प्रेमयाचना करणारा असें याचें वर्णन येतें (ऋ. ६.५५,५); सूर्या हिचें कामतप्त पूषन्शीं देवांनीं लग्न लाविलें (ऋ. ६.५८,४); सूर्या हिचा भ्रतार या नात्यानें विवाहसूक्तांत विवाहसंस्काराशीं याचा संबंध येतो. नवपरिणीता वधूचे हात धरून त्यानें तिला आशीर्वाद द्यावा अशी त्याची प्रार्थना करण्यांत येते. तो सूर्याचा दूत या नात्यानें अंतरिक्षसमुद्रांत आपल्या सुवर्णमय जहाजांवर प्रवास करितो (ऋ. ६.५८,३); तो द्युलोकांत राहतो आणि सर्व विश्वाचें निरीक्षण करीत फिरतो (ऋ. २.४०,४; २.४०,५). सवित्याच्या प्रेरणेनें हा सर्व प्राण्यांचें ज्ञान करून घेतो व त्यांचें संरक्षण करितो. याला आघृणि म्हणजे तेजस्वी हें विशेषण वारंवार लाविलेलें आढळतें. हें विशेषण इतर कोणाहि देवाला लाविलें जात नाहीं.

पृथ्वी आणि द्युलोक यांच्या दूरभागीं पूषन् जन्मला आहे, तो या आवडत्या स्थानांच्यामध्यें इकडून तिकडे जात असतो. त्याला याप्रमाणें दूरस्थानांची चांगली माहिती असल्यानें मृतांनां तो पितरांकडे घेऊन जातो. अथर्ववेदांत पूषन् हा मृतांनां सदाचारी मनुष्यांच्या लोकांत घेऊन जातो असें वर्णन आहे.

पूषन् हा मार्गांचा संरक्षक आहे. मार्गांतील धोके, लांडगा लुटारू वगैरे दूर करण्याविषयीं त्याची प्रार्थना करितात (ऋ. १.४२,१ ते ३); यासंबंधात त्याला विमुचो नपात् म्हणजे (मुक्ततेचा पुत्र) असें म्हटलें आहे. त्याला विमोचन म्हणजे सोडविणारा असेंहि दोन ठिकाणीं म्हटलें आहे. पापापासून मुक्तता करावी अशी त्याची प्रार्थना केली आहे (अ. वे. ६.११२,३). शत्रूंनां पिटाळून लावावें आणि लूट मिळावी (ऋ. ६.५३,४), शत्रूंनां दूर करावे, मार्ग चांगले करावे आणि चांगल्या कुरणांत घेऊन जावें (ऋ. १.४२,७ व ८), अशी त्याची प्रार्थना केली आहे. मार्गांत तो वाटाड्या आहे (प्रपथ्य, वा. सं. २२.२०); सूत्रग्रंथांत कोणीहि प्रवासाला

निघाला तर त्यानें मार्ग करणाऱ्या पूषन् देवाला बलि द्यावा व हा बलि देतांनां ऋग्वेद सूक्त ६.५३ म्हणावें असें सांगितलें आहे. सकाळीं व सायंकाळीं देवांनां व भूतांनां बलि दिले जातात तेव्हां पूषाला घराच्या उंबऱ्यावर बलि मिळतो. ( शांखायन गृह्यसूत्र २.१४,९ ).

मार्ग जाणणारा असा हा असल्यानें लपविलेला माल सहज सांपडण्याची हा तजविज करूं शकतो ( ऋ. ६.४८,१५ ); यामुळें सूत्रांत एखादी हरविलेली वस्तु परत मिळवावयाची असल्यास पूषा देवाच्या उद्देशानें याग केला जातो. ( आश्व. गृह्य. ३.७,९ ); पूषा देव हा गुरांढोरांचें रक्षण करतो ( ऋ. ६.५४,५ व ६ व १०; इ. ). हें त्याचें विशिष्ट कर्म आहे. त्यांचा खळग्यांत गुरांनां तो पडूं देत नाहीं. त्यांनां सुखरूप घरीं आणतो. चुकलेल्यांनां हांकून आणतो ( ऋ. ६.५४,७ ); हा घोड्यांचेंहि संरक्षण करतो ( ऋ. ६.५४,५ ); मेंढ्यांचें वस्त्र हा विणतो व मऊ करितो ( ऋ. १०.२६,६ ); या कारणांनीं जनावरेंहि पूषाला प्रिय आहेत व हा जनावरें उत्पन्न करितो अशीं विधानें येतात ( ऋ. १.५,१; मै. सं. ४.३,७; इ. ). गाई चरावयास किंवा फिरावयास नेतांनां पूषाला उद्देशून कांहीं मंत्र म्हणण्याचें सूत्रांत सांगितलें आहे ( शां. गृ. सू. ३,९ ); दुसऱ्या देवाप्रमाणें याला असुर म्हटलें आहे व दुसरेहि कित्येक गुण याचे ठिकाणीं असल्याचें सांगितलें आहे. तो शक्तिमान् आहे, चपल आहे ( ऋ. ५.४३,९;६.५४,८ ); त्याचें वैभव देवाप्रमाणें आहे (ऋ. ६.४८,१९); तो धीरांचा राजा आहे. युद्धांत मदत करितो ( ऋ. १.१०६,४८,१९; ). तो धीमान् आहे, उदार आहे ( ऋ. १.४२,५;२.३१,४ ); अश्विन् देवतांनां विशेष लावलें जाणारें दस्र ( चमत्कार करणारा ) हें विशेषण या पूषादेवाला कांहीं वेळ लावलें आहे ( ऋ. १.४२,५ इ.); तसेंच अग्नीचीं व इन्द्राचीं दस्म ( आश्चर्यकारक ) आणि दस्मवर्चस् ( आश्चर्यकारक तेजाचा ) हीं विशेषणें त्याला लावलेलीं सांपडतात (ऋ. १.४२,१०;६.२८,४; इ.). अग्नीचें नराशंस ( नरस्तुत ) हें विशेषणहि त्याला लाविलेलें सांपडतें ( ऋ. १.१०६,४ ); केवळ पूषन्‌ला लावलेलीं विशेषणें म्हणजे आघृणि, अजाश्व, विमोचन, विमुचोनपात्, पुष्टिंभर, अनष्टपशु, अनष्टवेदस्, (माल न हरवणारा), करंभाद, ( पेज खाणारा ) हीं होत. पशुप हें विशेषण फक्त पूषन्‌लाच लावलेलें आढळतें ( ऋ. ६.७८,२; ).

पूषन् हा सोम व इन्द्र या देवतांशीं संयुक्त जोडलेला आढळतो ( ऋ. २.४०,६,५७ ). भग व विष्णु या देवतांबरोबर पूषादेवाला पुष्कळवेळां बोलाविलेलें दिसतें. दुसऱ्या कित्येक देवतांनां उद्देशून असलेल्या ऋचांतहि याचें मधून मधून नांव येतें.

उपलब्ध पुराव्यावरून पूषा देव हा निसर्गांतील एखाद्या घटनेचा प्रतिनिधिभूत आहे असें निःसंशय म्हणवत नाहीं. परंतु पुष्कळशा उल्लेखांवरून सूर्याचा व त्याचा निकट संबंध असावा एवढें मात्र स्पष्ट दिसतें. यास्क आपल्या निरुक्तामध्यें ( नि. ७.९ ) पूषन् याचा अर्थ आदित्य, सर्व भूतांचा संरक्षक असा देतो. वेदोत्तर वाङ्मयांतहि सूर्याचें नांव म्हणून पूषन् शब्द केव्हां केव्हां येतो. सूर्याचा मार्ग हा पृथ्वीकडून द्युलोकाकडे जाणारा असल्यानें व या मार्गांत देवांची आणि मृत झालेल्या भाविकांची वस्ती असल्यानें सूर्यसंबद्ध देवतेकडे मार्गाच्या संरक्षकाचें काम व मृतांनां त्यांच्या लोकीं पोंचविण्याचें काम हीं दोन्हीं कामें आलीं असावीं. पूषादेवाचे ठिकाणीं गुराढोरांचें संरक्षकत्व जें कल्पिलें आहे तें त्याच्या मार्गरक्षकपणाच्या कर्तव्यावरून कल्पिलें असावें. अवेस्तामधील सूर्यदेवता जी मिथ्र याजकडेही पूषा देवाप्रमाणें गाईगुरें वाढविणें व चुकलेल्या गुरांनां घेऊन येणें हीं गुरें पाळणारांचीं कामें सोंपविलेलीं आहेत.

पूषन् हा शब्द पुष ( भरभराट करणें ) या धातूपासून निघाला आहे व या रीतीनें पूषन् याचा अर्थ वैभव देणार असा होतो. हा वैभव देण्याचा गुण विश्ववेदस्, अनष्टवेदस् पुरुवस्, पुष्टिंभर या विशेषणांनीं दर्शविलेला आहे. तसेंच धन दे व रक्षण कर अशी जी त्याची प्रार्थना करण्यांत येते तिच्यामध्येंहि पूषा देवाचें भरणपोषणाचें कार्य सुचविलें आहे ( ऋ. ६.४८,१५; इ. ). पूषा देव जी संपत्ति देतो तिचा संबंध इन्द्र, पर्जन्य व मरुद्गण यांजकडून मिळणाऱ्या संपत्तिप्रमाणें पर्जन्याशीं नसून प्रकाशाशीं आहे व हें दाखविण्यासाठींच पूषा देवाला आघृणि म्हणजे तेजोयुक्त हें विशेषण पुनः पुनः लावलेलें आढळतें. तो जें मनुष्यांचें कल्याण करतो तें मनुष्य व गुरेंढोरें यांचें संरक्षण करून व परलोकीं जीं आनंदस्थानें आहेत तेथें त्यांस पोंचवून करतो. या सर्व गोष्टींवरून पूषा देवाच्या गुणसमुच्चयाच्या मुळाशीं सूर्य हा गुराख्यांचा व मेंढक्यांचा देव या नात्यानें जी कल्याणकारिता व्यक्त करतो ती आहे असें दिसतें.

**मरुत्.**—मरुत् या ऋग्वेदांतील प्रधान देवता आहेत. ऋग्वेदामध्यें केवळ मरुतांसाठींच म्हणून तेहतीस सूक्तांचा विनियोग केला गेला असून इन्द्राच्या जोडीस त्यांनां कमींत कमी सात सूक्तें व अग्नि आणि पूषन् यांच्या जोडीस प्रत्येकीं एक एक सूक्त मिळालें आहे. मरुत् हा एक देवतांचा गण किंवा शर्ध ( ऋ. १.३७,१ व ५ ) असून त्यांचा फक्त बहुवचनींच उल्लेख होतो. त्यांची संख्या त्रिषष्टि म्हणजे एकशेंऐशीं ( ऋ. ८.८५,८ ) किंवा त्रिसप्त म्हणजे एकवीस ( ऋ. १.१३३,६; अ. वे. १३.१,१३ ) आहे. त्यांच्या उत्पत्तीविषयीं वारंवार उल्लेख आला आहे ( ऋ. ५.५७,५ इत्यादि ). ते रुद्रपुत्र असून त्यांनां अनेकदां रुद्राः ( ऋ. १.३९,४; १.३९,७ इत्यादि ) व कधीं कधीं रुद्रियाः ( ऋ. १.३८,७; २.३४,१० इ. ) असें म्हटलेलेंहि आहे. पृश्नि ही त्यांची

माता आहे (ऋ. २.३४,२; ५.५२,१६; ५.६०,५; ६.६६,३) व म्हणून त्यांनां पृश्निमातरः असेंहि अभिधान दिलेलें आढळतें (ऋ. १.२३,१० इ. व अ. वे. ५.२१,११). त्यांच्या आईचा धेनु पृश्नि (ऋ.५.५२,१६) किंवा नुसता धेनु असा उल्लेख केलेला असून स्वतः त्यांच्यासाठींहि गोमातरः असें अभिधान योजण्यांत आलेलें आहे (ऋ. १.८५,३; तु. ८.२०,८). ही धेनु म्हणजे वर्षाकालांतील चित्रविचित्र रंगाचा प्रभंजन मेघच असला पाहिजे; कारण हे मरुत् ज्या दैदीप्यमान् व फुगलेल्या स्तनाच्या धेनूंबरोबर आगमन करतात (ऋ. २.३४,५) त्यांचा पर्जन्य व विद्युत् यांहीं युक्त अशा मेघांशिवाय दुसरीकडे कोठें संबंधच लावणें शक्य नाहीं. पृश्नीपासून मरुतांची उत्पत्ति झाली तेव्हां त्यांनां अग्नीची उपमा दिलेली आहे (ऋ. ६.६६,१–३). सौदामिनीच्या हास्यापासून ते निर्माण झाले असें म्हटलेलें आहे (ऋ. १.२३,१२; १.३८,८). अग्नि हा त्यांचा जनक होता असें वर्णन आहे (ऋ. ६.३,८; १.७१,८). एके स्थळीं त्यांची वायूनें गगनगर्भामध्यें उत्पत्ति केली असा उल्लेख (ऋ. १.१३४,४) असून त्यांनां गगनाचे वीर (ऋ. १.६४,४; १.१२२,१; ५.५४,१०) किंवा मर्याः म्हणजे पुरुष असेंहि म्हटलेलें आहे (ऋ. ३.५४,१३; ५.५९,६). एकदां त्यांचें सिंधुमातरः असें वर्णन असून (ऋ. १०.७८,६) इतर ठिकाणीं ते स्वयंभू आहेत असेंहि म्हटलेलें आहे (ऋ. १.१६८,२; ५.८७,२). मरुत् हे सर्व भाऊ भाऊ असून त्यांच्यामध्यें लहानमोठा कोणीच नाहीं (ऋ. ५.६,६; ५.६०,५), कारण ते सर्व समानवयस्क आहेत (ऋ. १.१६५,१). ते बरोबर वाढलेले आहेत (ऋ. ५.५६,५; ७.५८,१) व एकचित्त आहेत (ऋ. ८.२०,१ व २१). त्यांचा जन्म एकाच ठिकाणीं झाला असून (ऋ. ५.५३,३) त्यांचें वसतिस्थानहि एकच आहे (ऋ.१.१६५, १; ७.५६,१). ते भूमीवर, अंतरिक्षांत व स्वर्गांत वाढले (ऋ. ५.५५,७) किंवा त्यांचा वास वरच्या, मधल्या व खालच्या अशा तिन्हीहि स्वर्लोकांत आहे (ऋ.८.८३,१ व २) असें त्यांच्याविषयीं म्हटलेलें आहे.

इन्द्राणी ही त्यांची सोबतीण (ऋ. १०.८६,९) असून ते तिच्या व सरस्वतीच्या (ऋ. ७.९६,२; ७.३९,५) सहवासांत असतात. तथापि त्यांचा रोदसीशीं अत्यंत निकट संबंध आहे. ही देवता त्यांच्याबरोबर त्यांच्या रथावर उभी राहून त्यांनां सुख देते (ऋ. ५.५६,८) किंवा नुसती त्यांच्यापाशीं उभी असते (ऋ. ६.६६,६). ज्या ज्या ठिकाणीं तिच्या नांवाचा उल्लेख आलेला आहे तेथें ती प्रत्येक वेळीं मरुतांबरोबरच दाखविली आहे (तु. ऋ. १.१६७, ४ व ५). म्हणून ज्याप्रमाणें अश्विनींची सूर्या त्याप्रमाणें रोदसी ही मरुतांची भार्या मानली जात होती असें दिसतें.



मरुतांच्या दैदीप्यमानतेचें वारंवार वर्णन आलें आहे. त्यांची कांति अग्नीप्रमाणें (ऋ. १०.४१,१; ३.२६,५) असून त्यांनां साक्षात् अग्नि असेंहि अभिधान दिलेलें आहे (ऋ. ३.२६,४). ते पर्वतांमध्यें प्रकाशतात (ऋ. ८.७,१). स्वयंप्रकाशित (ऋ. १.३७,२ इ.) हें विशेषण त्यांच्याखेरीज इतरांनां लावलेलें बहुतेक कोठें आढळत नाहीं.

त्यांचा विद्युत्देवतेशीं संबंध विशेष येतो (ऋ. ५.५४,२; ३ व ११; १.६४,५). मरुत् जेव्हां घृताचा वर्षाव करतात तेव्हां विद्युत् आपल्या हास्यानें पृथ्वीस प्रकाशित करते (ऋ. १.१६८,८; तु. ५.५२,६). ते पर्जन्याची वृष्टि करीत असतांना विद्युत् आपल्या वासराच्या मागोमाग जाणाऱ्या गाईप्रमाणें हंबरते (ऋ. १.३८,८). विद्युत् व मरुत् यांचा परस्परांशीं इतका निकट संबंध आहे कीं, ऋग्वेदामध्यें विद्युत् शब्दाचे जेवढे समास आहेत तेवढे मरुतांसंबंधींच आहेत, व एक अपवाद खेरीज करून यांतील एकहि समास दुसऱ्या कोणासहि अनुलक्षून योजिलेला आढळत नाहीं. विद्युत् ही त्यांचा भाला (ऋष्टि) (ऋ. १.१६८,५ ५.५२,१३) असून हेंच त्यांचें नेहमींचें शस्त्र दिसतें. कधीं कधीं त्यांनीं हातांत परशु घेतल्याचेहि उल्लेख सांपडतात, पण ते कमी (ऋ. १.३७,२; १.८८,३). एके ठिकाणीं मरुतांनीं वज्र धारण केल्याचेंहि वर्णन आलेलें आहे (ऋ.८.७,३२). ऋग्वेद ५.५४,११ या ऋचेमध्यें त्यांच्या स्वरूपासंबंधीं इतर ठिकाणांपेक्षां बरेंच सविस्तर वर्णन आलें आहे. तेथें असें म्हटलें आहे कीं, त्यांच्या खांद्यावर भाले टाकलेले असतात, पायांत नूपुर असतात, छातीवर सुवर्णालंकार रुळत असतात, हातामध्यें विद्युत् असते व डोक्यास कांचनाचें शिरस्त्राण घातलेलें असतें.

मरुत् ज्या रथांत बसतात ते सुवर्णाचे केलेले असून (ऋ. ५.५७,१) विजांनीं चकाकत असतात (ऋ. १.८८,१; ३.५४,१३). त्यांचीं चक्रें किंवा नेमी सुवर्णाच्या असतात (ऋ. १.६४,११; १.८८,५) व ते सर्व प्रकारच्या शस्त्रास्त्रांनीं सज्ज असून (ऋ. ५.५७,६) त्यांत पोहरे ठेवलेले असतात (ऋ. १.८७,२). या रथांनां जुंपलेले घोडे रक्त किंवा पिंगल वर्णाचे असतात (ऋ. १.८८,२; ५.५७,४); त्यांचे चरण कांचनाचे असतात (ऋ. ८.७,२७) व ते मनांतील विचाराइतके चंचल असतात (ऋ. १.८५,४). मरुतांनां पृषदश्व असें म्हटलेलें आहे त्यावरून या घोड्यांच्या अंगावर ठिपके ठिपके असतात असें दिसतें. या घोड्यांनां केवळ दोनच ठिकाणीं अश्वाः असें पुल्लिंगी अभिधान दिलें असून (ऋ. ५.५५,६; ५.५८,६) इतर ठिकाणीं त्यांचा पृषतीः असा स्त्रीलिंगामध्यें उल्लेख आला आहे (ऋ. १.३९,६ इ.) मरुतांच्या रथाच्या दांड्यास वायू हे अश्व जोडलेले असतात असेंहि त्याच्या संबंधीं वर्णन आहे (ऋ. ५.५८,७).

मरुत् हे आकाशाइतके मोठे आहेत ( ऋ. ५.५७,४ ). त्यांच्याइतका बलवान् दुसरा कोणीहि नाहीं (ऋ. १.१६७,९). ते तरुण आहेत ( ऋ. १.६४,२; १.१६५,२; ५.४२,१५ ) व त्यांचें तारुण्य कायम टिकणारें आहे ( ऋ. १.६४,३ ). ते ईश्वरी अंश ( असुर ) आहेत, ओजस्वी आहेत, साहसी आहेत व निर्मल आणि निष्कलंक आहेत ( ऋ. १.६४,२ व १२; ६.६६,२ ). ते शीघ्रकोपी ( ७.५६,८ ), भयंकर उग्रस्वरूप ( ऋ. ५.५६,२ व ३ ), वन्यपशूप्रमाणें क्रूर ( ऋ. २.३४,१ ) व लहान मुलाप्रमाणें किंवा वांसराप्रमाणें क्रीडासक्त (ऋ १.१६६,२; ७.५६,१६; १०.७८,६ ) आहेत. ते एखाद्या कृष्णपृष्ठ हंसासारखे दिसतात ( ऋ. ७.५९,७ ) व त्यांनां लोहदन्त वराहाची किंवा सिंहाची उपमा साजेल ( ऋ. १.८८,५; १.६४,८ ).

मेघगर्जनेस त्यांचा शब्द म्हटलें आहे ( ऋ. १.२३,११ ). परंतु वायूची गर्जना ही देखील त्यांचाच शब्द होय ( ऋ. ७.५६,३ ). ते आपल्या रथांच्या नेमींनीं पर्वत दुभंगून टाकतात ( ऋ. १.६४,११; ५.५२,९ ) व ते वायूसह आगमन करतात तेव्हां पर्वतांनां हादरून सोडतात (ऋ. ८.७,४). ते झाडें मोडतात व वन्य गजांप्रमाणें अरण्यांचा फन्ना पाडतात ( १.३९,५; १.६४,७ ). अरण्यें भयभीत होऊन त्यांच्यापुढें नम्र होतात ( ऋ. ५.६०,२ ). ते भौम व स्वर्गीय प्राण्यांनां उलथून पाडतात ( ऋ. १.६४,३ ). सर्व प्राण्यांस त्यांचें भय वाटतें ( ऋ. १.८५,८ ). ते सोसाट्याच्या वाऱ्याप्रमाणें वेगवान् ( ऋ. १०.७८,३ ) असून धुळीचे लोटचे लोट आकाशांत उठवितात ( ऋ. १.६४,१२ ). ते वाऱ्याचा शब्द करतात ( ऋ. ७.५६,३ ). ते वायूबरोबर येतात ( ऋ. ८.७,३;४ व १७ ) व त्यास अश्वाप्रमाणें आपल्याबरोबर नेतात (ऋ. ५.५८,७ ).

मरुतांचें एक मुख्य कार्य म्हटलें म्हणजे पर्जन्यवृष्टि करणें हें होय. सागरांतून वर जाऊन ते पर्जन्याचा वर्षाव करतात ( ऋ. १.३८,९ ). कधींहि न आटणाऱ्या अशा त्या कूपाचें दोहन करून ते पर्जन्यासह दोन्ही लोकांतून वाहत जातात ( ऋ. १.६४,६; ८.७,१६ ). पर्जन्याचा वर्षाव करीत असतांना ते मेघांच्या योगानें अंधकार उत्पन्न करतात (ऋ. १.३८,९ ). ते स्वर्लोकांतील दुग्धभांडाकडून व पर्वतांतील झऱ्याकडून वृष्टि करवितात ( ऋ. ५.५९,७ ). ते वेगानें जाऊं लागले कीं पाणी वाहूं लागतें ( ५.५८,६ ). याच कारणावरून भूलोकांतील एका नदीस मरुद्वृधा असें नांव मिळालें आहे ( ऋ. १.७५,५ ). मरुतांनीं केलेल्या पर्जन्यवृष्टीस लाक्षणिक अर्थानें दूध, तूप, झऱ्याचें पाणी किंवा मध असेंहि म्हटलें आहे ( ऋ. १.१६६,३; १.८५,३; १.८५,११; ५.५४,८ ). ते समुद्रांतून वर आकाशांत पाणी नेऊन तेथून त्याचा भूलोकावर वर्षाव करतात ( अ. वे. ४.२७,४ ). उदक देण्याच्या इच्छेनें ते गारांचा वर्षाव करीत व गर्जना करीत वेगानें अभिसरण करतात ( ऋ. ५.५४,३ ). ते स्वसामर्थ्यानें वायूकडून व सौदामिनीकडून दोहन करून आचळांतून स्वर्गीय वस्तू बाहेर काढतात व सर्व पृथ्वीस दुग्धमय करून सोडतात ( ऋ. १.६४,५ ). ज्या झऱ्याचें ते दोहन करतात तो गर्जना करतो ( ऋ. १.६४,६ ). ते पर्जन्यवृष्टि करतात तेव्हां आकाशरूपी रक्तवर्ण वृषभ डरकावण्या फोडतो ( ऋ. ५.५८,६ ). ते अश्वास मुतावयास लावतात (ऋ. १.६४,६). ते स्वर्लोकांतील पर्जन्याची वृष्टि करतात व अश्वाच्या प्रवाहांचा विपुल वर्षाव करतात ( ऋ. ५.८३,६ ). ते अश्वाबरोबर मूत्रोत्सर्ग करतात तेव्हां रक्तवर्ण होतात ( ऋ. २.३४,१३ ). ते उष्णतेचें निवारण करतात ( ऋ. ५.५४,१ ) पण ते अंधकारहि नाहींसा करतात व उजेड देतात ( ऋ. १.८६,१० ). ते सूर्यासाठीं मार्ग तयार करतात ( ऋ. ८.७,८ ). त्यांनीं दोन्ही लोकांनां पृथक् राखलें आहे (ऋ. ८.८३,९ व ११ ).

वाऱ्याच्या शब्दास अनुलक्षून मरुतांनां गवईहि म्हटलेलें आहे (ऋ. ५.५२,१; ५.६०,८; ७.३५,९). त्यांनीं आपल्या गानानें सूर्यास प्रकाशावयास लावलें (ऋ. ८.२९,१० ). त्यांनीं आपली बांसरी वाजवितां वाजवितां पर्वतांचा भेद केला ( ऋ. १.८५,१० ). कारण, इन्द्रानें जेव्हां त्या सपक्ष नगाचा वध केला तेव्हां त्यांनीं गाणें गायिलें व सोमरस काढला ( ऋ. ५.२९,२; ५.३०,६ ) गाणें गाऊन त्यांनीं इन्द्रास सामर्थ्य आणलें ( ऋ. १.८५,२ ). इन्द्राच्या साहचर्यामध्यें त्यांनां पुरोहितहि म्हटलें आहे ( ऋ. ५.२९,३ ). तेच पहिले दशग्व म्हणजे दहा महिने यज्ञ करणारे होते (ऋ. २.३६,२). भृगूंनीं अग्नि उद्दीपित केला व यांनीं दात्यांच्या गृहामध्यें तो शुद्ध केला ( ऋ. १०.१२२,५ ). इतर देवांप्रमाणें तेहि सोमपान करणारे होते ( ऋ. २.३६,२ इ.).

अशनिवर्षाचा सृष्टिचमत्कार याच मरुद्देवता असल्यामुळें त्यांचें साहजिकच अनेक ठिकाणीं इन्द्राचे दोस्त म्हणून वर्णन आहे. ते आपल्या गानानें इन्द्राचें बल वाढवितात ( ऋ. ३.३५,९; १.१६५,११ ). इन्द्र वृत्राशीं लढत असतां यांनीं त्यास मदत केली ( ऋ. ८.६५,२ व ३; १०.११३,३ ). त्याचप्रमाणें इन्द्र सपक्ष नगाशीं व शंबराशीं लढत असतांनाहि यांनीं त्यास साहाय्य केलें ( ऋ. ३.४७,३ व ४ ). यांच्या साह्यानेंच इन्द्रास प्रकाश मिळाला ( ऋ. ८.६५,४ ); गाई सांपडल्या ( ऋ. १.६,५ ) व त्यानें आकाशास आधार दिला ( ऋ. ७.४७,५ ). वास्तविक पाहिलें असतां इन्द्रानें जे कांहीं पराक्रम केले ते सर्व मरुतांच्या मदतीनेंच होत (ऋ. १.१००; १.१०१; १.१६५; १०.६५ ). तथापि कोठें कोठें मरुतांनीं याहून अधिक स्वतंत्रपणें किंवा केवळ एकट्या स्वतःच्याच बळावर पराक्रम गाजविले होते असें दिसतें. उदाहरणार्थ त्यांनीं इन्द्राचें साहाय्य घेऊन वृत्रावर हल्ला केला ( ऋ. १.२३,९ ) व त्यांनीं एकट्यांनींच त्याला एका सांध्या-

पासून दुसऱ्या सांध्यापर्यंत फाडून काढलें ( ऋ. ८.७,२३ ) व गाईचा शोध लावला ( ऋ. २.३४,१ ). इतर देवांप्रमाणें त्यांचाहि इन्द्र हाच पुढारी आहे ( ऋ. १.२३,८ इ० ). व तो नेहमीं त्यांच्याबरोबर असतो ( ऋ. १०.१२८,२ ). तथापि एक दोनदां मरुत् ऐन अडचणीच्या प्रसंगीं इन्द्रास सोडून गेल्याचेंहि वर्णन आढळतें. त्यांनीं एकट्या इन्द्राचेंच सपक्ष नगाशीं युद्ध जुंपवून देऊन ( ऋ. १.१६५,६ ) आपण स्वतः त्यास सोडून गेले ( ऋ. ८.७,३१ ). एका ऋचेमध्यें इन्द्र व मरुत् यांच्यामध्यें वैमनस्य असल्याचाहि पुरावा सांपडतो. या प्रसंगीं ते इन्द्रास म्हणतातः—"बा इन्द्रा, तूं आम्हांस कां मारूं पाहतोस? आमचा तूं भांडणामध्यें जीव घेऊं नकोस ( ऋ. १.१७०,२ तु० १.१७१,६ ). ब्राह्मणांमध्येंहि एके स्थळीं ( तै. ब्रा. २.७.११,१ ) मरुत् व इन्द्र यांच्या भांडणासंबंधीं हकीकत आली आहे.

जेव्हां इन्द्राशीं संबंध येत नाहीं तेव्हां मरुतांचे दुर्गुण बाहेर पडतात. अशा प्रसंगीं त्यांच्यामध्यें त्यांच्या वडिलांच्या म्हणजे रुद्राच्या स्वभावांतील मत्सरीपणा बराचसा उतरलेला दिसतो. मरुतांनीं आपल्या भक्तांचें विजेपासून रक्षण करावें व त्यांच्यावर रोष करूं नये म्हणून त्यांची प्रार्थना केलेली आहे ( ऋ. ७.५६,९ ), त्यांनीं आपला तीर व शिला ( ऋ. १.१७२,२ ), विद्युत् ( ऋ. ७.५७,४ ) गाई व माणसें यांचा संहार करणारा शूल ( ऋ. ७.५६,१७ ) हीं आवरून धरावीं म्हणून त्यांची करुणा भाकलेली आहे. त्यांचा राग सर्पाप्रमाणें आहे ( ऋ. १.६४,८ व ९ ). तथापि रुद्राप्रमाणेंच त्यांचीहि सिंधु व असिक्नी नद्यांत, समुद्रावर व पर्वतांवर असणाऱ्या रोगनाशक औषधी घेऊन येण्यासाठीं प्रार्थना करण्यांत येते ( ऋ. ८.२०,२ व ३–६ ). जल याच त्या औषधी असाव्या असें दिसतें; कारण मरुत् पर्जन्यवृष्टि करून औषध देतात ( ऋ. ५.५३,१४ ). अग्नीप्रमाणें मरुतांनांहि अनेक वेळां पावक म्हटलेलें आढळतें ( ऋ. ७.५६,१२ इ. )

मरुतांचा विद्युत्, मेघगर्जना, वारे व पर्जन्य यांशीं वारंवार जो संबंध दिसून येतो त्यावरून व वर वर्णन केलेल्या त्यांच्या इतर गुणांवरून यूरोपीय पंडित त्या ऋग्वेदांतील तुफानदेवता आहेत असें मानतात. तथापि भारतीय पंडित मरुत् या वायुदेवता आहेत असा अर्थ करतात व वैदिक कालानंतर तो शब्द निव्वळ वायु या अर्थींच वापरला जाऊं लागला आहे. परंतु ऋग्वेदामध्यें तो शब्द केवळ वायु या अर्थी कोठेंहि वापरलेला सांपडत नाहीं. कारण मरुतांमध्यें विद्युत् व मेघ यांच्या गुणांचेंहि मिश्रण आढळतें. ए. कुहन व बेनफी यांचें असें मत होतें कीं, मरुद्देवता या मृतांच्या आत्म्यांच्या ठायीं मनुष्यगुणारोप करून कल्पिलेल्या आहेत. मेयर व श्रॉडर यांनीं देखील बहुतांशीं याच मताचा पुरस्कार केलेला आहे. ऐतिहासिकदृष्ट्या मरुत्शब्दाचा हा मूलार्थ शक्य आहे परंतु त्यास ऋग्वेदांत कांहीं आधार नाहीं. या शब्दाची व्युत्पत्ति अनिश्चित असल्याकारणानें तिच्या योगानें त्या शब्दाच्या मूळ कल्पनेवर कांहींच प्रकाश पडणें शक्य नाहीं. या शब्दांत मर् हा धातु असावासा वाटतो, पण तो मरणें, चिरडणें किंवा प्रकाशणें यांपैकीं कोणत्या अर्थी आहे तें कळत नाहीं. तथापि मरुतांचें जें वर्णन आलें आहे त्यावरून शेवटचाच अर्थ अधिक संभवनीय दिसतो.

**रुद्र.**—या देवतेस ऋग्वेदामध्यें प्रधान जागा नाहीं. सर्व ऋग्वेदामध्यें केवळ तीनच सबंध सूक्तें या देवतेच्या वर्णनास दिलीं असून चौथ्या एका सूक्ताचा कांहीं भाग त्या कामीं खर्ची पडला आहे. सोम देवतेच्या जोडीस आणखीहि एका सूक्ताचा विनियोग या देवतेकडे झाला आहे. ऋग्वेदामध्यें या देवतेचें नांव सुमारें पाउणशें वेळां आलें असेल.

ऋग्वेदांत या देवतेचें स्वरूपवर्णन पुढें दिल्याप्रमाणें आलें आहे. रुद्रास एक हात ( ऋ. २.३३,७ इ० ), व बाहू ( ऋ. २.३३,३; वा. सं. १६.१ ) असून त्याचीं गात्रें बळकट आहेत ( ऋ. २.३३,११ ). त्याचे ओष्ठ सुंदर असून ( ऋ. २.३३,५ ) ( पूषन्प्रमाणें ) त्याच्या केसांची वेणी घातलेली असते ( ऋ. १.११४,१ व ५ ). त्याचा वर्ण बभ्रु म्हणजे पिंगट आहे ( ऋ. २.३३,५ इ० ). त्याची आकृति दैदीप्यमान ( ऋ. १.११४,५ ) व रूपें अनेक ( ऋ. २.३३,९ ) आहेत. तो सुवर्णालंकारांनीं विभूषित झालेला आहे ( ऋ. २.३३,९ ). तो रथांतील आसनावर अधिष्ठित झालेला असतो ( ऋ. २.३३,४ ). उत्तरकालीन संहितांमध्यें ( विशेषतः वा. सं. १६ मध्यें ) रुद्राचीं आणखी कित्येक लक्षणें दिलीं आहेत. त्याला सहस्र नेत्र असून ( अ. वे. ११.२,२ व ७ ) उदर, मुख, जिह्वा व दंत आहेत (अ. वे. ११.२,२,६ ). त्याचें उदर कृष्णवर्ण व पाठ रक्तवर्ण आहे. ( अ. वे. १५.१,७ व ८ ). त्याची मान व कल्ले निळे आहेत ( वा. सं. १६.७; अ. वे. २.२७,६ ). तो ताम्रवर्ण व लाल आहे ( वा. सं. १६.७ ). त्यानें कातड्याचीं प्रावरणें परिधान केलेलीं असतात ( वा. सं. ३.६१;१६.५१ ) व तो पर्वतावर वास करतो ( वा. सं. १६.२–४ ).

त्याची कृशानूबरोबर व धनुर्धरांबरोबर प्रार्थना केलेली आहे ( ऋ. १०.६४,८ ) व जेथें जेथें इन्द्रास रथासनाधिष्ठित धनुर्धराची उपमा दिली आहे ( ऋ. ६.२०,९; तु. २.३३,११ ) तेथें तोच विवक्षित असावा. कारण पुष्कळ ठिकाणीं त्याच्या हातांत मजबूत व वेगवान् ( ऋ. ७.४६,१ ) असे तीर व कमठा हीं आयुधें असल्याविषयीं वर्णन आलें आहे ( ऋ. २.३३,१० व ११;५.४२,११;१०.१२५,६ ). केवळ एकाच ठिकाणीं त्याच्या हातीं वज्र असल्याचा उल्लेख आहे. ( ऋ. २.३३,३ ).

रुद्र हा मरुतांचा पिता आहे ( ऋ. १.११४,६ व ९; २.३३,१ ). त्यानें मरुतांनां पृश्नीच्या दैदीप्यमान अशा स्तनांतून उत्पन्न केलें ( ऋ. २.३४,२ ). रुद्र हा राक्षसांशीं लढण्याच्या भानगडींत पडलेला कधींहि दिसत नाहीं. वैदिक कालानंतर शिवाचें एक नांव होऊन बसलेला त्र्यंबक हा शब्द वैदिक वाङ्मयामध्यें अगोदरच रुद्रास लावण्यांत आलेला आहे ( वा. सं. ३.५८; श. ब्रा. २.६.२,९ ). खुद्द ऋग्वेदांतहि एकदां तो शब्द रुद्रासच अनुलक्षून योजिलेला असावा असें दिसतें ( ऋ. ७.५९,१२ ). येथें त्याचा अर्थ 'त्रिमाता' म्हणजे तीन आहेत माता ज्याच्या असा संभवतो ( ऋ. ३.५६,५ ), व तो सर्व विश्वाचे जे तीन विभाग कल्पिण्यांत येतात त्यांनां अनुलक्षून असावा. वेदकालानंतर शिवाच्या पत्नीकरितां उपयोजिलेलें अंबिका हें नांव प्रथम वा. सं. ३.५ मध्यें आढळतें; परंतु तेथें तें शिवाच्या पत्नीचें नांव नसून भगिनीचें आहे. शिवाच्या पत्नीचीं उमा व पार्वती हीं दुसरीं दोन नांवें प्रथमतः तैत्तिरीय आरण्यकांत व केनोपनिषदांत आलीं आहेतसें दिसतें. ऋग्वेदांत ( २.१,६ ), अथर्ववेदांत ( ७.८७,१ ), तैत्तिरीय संहितेंत ( ५.४,३;५.५,७ ) व शतपथ ब्राह्मणांत ( ६.१.३,१० ), रुद्र म्हणजे अग्नि असें म्हटलेलें आहे. रुद्र हा शब्द अनेक वेळां विशेषणासारखाहि उपयोजिलेला आढळतो. कित्येक ठिकाणीं तो अग्नीचें विशेषण आहे, परंतु त्याहूनहि अधिक ठिकाणीं त्याचा अश्विनींचें विशेषण म्हणून उपयोग केलेला आहे. वाजसनेयी संहितेंत रुद्राचीं जीं कित्येक नांवें दिलीं आहेत त्यांमध्यें शर्व आणि भव हीं दोन नांवें आहेत ( १६.१८;२८ ) हीं दोन नांवें अथर्ववेदांत देखील आलीं असून तेथें त्यांच्या संहारक बाणांचा व सौदामिनीचा उल्लेख आलेला आहे ( २.७६,६; ६.९३,१;१०.१,२३;११.२,१ व १२ ). परंतु या ठिकाणीं त्या परस्पर भिन्न अशा रुद्राहून निराळ्याच कोणी देवता मानलेल्या दिसतात. शांखायन श्रौतसूत्रांत एके ठिकाणीं ( ४.२०,१ ) भव आणि शर्व यांनां रुद्राचे पुत्र म्हटलें असून त्यांनां बुभुक्षित लांडग्यांची उपमा दिलेली आहे. वाजसनेयी संहितेंत ( ३९.८ ) अग्नि, अशनि, पशुपति, भव, शर्व, ईशान, महादेव, उग्रदेव वगैरे देवतांनां एकाच देवाचीं निरनिराळीं रूपें म्हटलीं आहेत. रुद्र, शर्व, पशुपति, उग्र, अशनि, भव, महादेव, हीं अग्नीच्या आठ वेगवेगळ्या रूपांचीं नांवें म्हणून दिलीं आहेत ( श. ब्रा. ६.१.३,७; तु. शां. ब्रा. ६.१ इ. ), आणि शर्व, भव, पशुपति व रुद्र हीं सर्व अग्नीचीं नांवें आहेत असेंहि एका ठिकाणीं म्हटलें आहे ( श. ब्रा. १.७.३,८ ). अग्निकुमारास अशनि म्हणून जें एक नांव शतपथ ब्राह्मणांत सांगितलें आहे ( ६.१,३,१० ) त्याचा अर्थ त्या ठिकाणीं विद्युत् असा दिला आहे, परंतु शांखायन ब्राह्मणांत त्यालाच इन्द्र म्हटलें आहे. वाजसनेयी संहितेंत, अथर्ववेदांत व नंतरच्या ग्रंथांत त्याला पशुपति म्हणजे सर्व पशूंचा राजा असें नांव दिलें आहे. हें नांव देण्याचें कारण घरांत न बांधलेल्या जनावरांवर रुद्राचा हल्ला होण्याचा विशेष संभव असतो व म्हणून तीं त्याच्याच देखरेखीखालीं सोंपविण्यांत येत.

ऋग्वेदांत रुद्राला क्रूर म्हटलेलें आहे ( २.३३,९ व ११; १०.१२६,५ ). तो स्वर्लोकांतील रक्तवर्ण ( अरुष ) वराह आहे ( ऋ. १.११४,५ ). तो वृषभ आहे ( ऋ. २.३३,७ व १५ ). तो सर्वांहून श्रेष्ठ ( ऋ.७.१०,४ ) असून बलवानांहून बलवान् आहे ( ऋ. २.३३,३ ). तो दुष्प्रधर्ष ( ऋ. ७.४६,१ ) व वेगवान् आहे ( ऋ. १.११४,४ ). तो तरुण असून ( ऋ. २.३३,१ ) त्याचें तारुण्य कायम टिकणारें आहे. तो स्वर्लोकांतील मोठा देव ( असुर ) आहे ( ऋ. २.१,६ ). तो शूरांचा अधिपति (ऋ. १.११४,१ व २ इ.) व या अफाट भूलोकाचा ईशान म्हणजे धनी आहे (ऋ. २.३३,९ ). तो पृथ्वीचा पिता आहे ( ऋ. ६.४९,१० ). सर्व मानव व देव यांच्या हातून जीं कांहीं कृत्यें घडतात तीं सर्व तो जाणतो ( ऋ. ७.४६,२ ). तो नद्यांनां पृथ्वीवर वहावयास लावतो व गर्जना करीत सर्वांनां भिजवून टाकतो ( ऋ. १०.९२,५ ). तो बुद्धिमान् ( ऋ. १.४३,१ ), परोपकारी ( ऋ. २.३३,७; ६.४९,१० ) व मीढ्व, म्हणजे उदार आहे ( ऋ. १.११४,३ ). उत्तरकालीन वेदांत मीढ्व शब्दाचीं तारतम्यभावदर्शक रूपें फक्त रुद्रशब्दासच लावलेलीं आहेत. तो लवकर प्रसन्न होतो ( ऋ. २.३३,६ ) व तो शिव म्हणजे शुभ आहे ( ऋ. १०.९२,९ ). अथर्ववेदाच्या कालापर्यंत देखील शिव हें अभिधान कोणत्याहि विशिष्ट देवतेसाठींच म्हणून राखून ठेवलें गेलें नव्हतें.

ऋग्वेदामध्यें अनेक प्रसंगीं रुद्रावर दुष्टपणाचा आरोप केलेला आहे त्याला उद्देशून असलेल्या सूक्तांत त्याच्या घोर बाणांविषयीं भय व्यक्त केलें असून त्यानें रागावूं नये म्हणून प्रार्थना केलेल्या आहेत. त्याचा कोप झाला असतां त्यानें आपल्या भक्तांस व त्यांच्या मातापितरांस, मुलाबाळांस, नोकरचाकरांस, गुराढोरांस व अश्वांस उपद्रव देऊं नये म्हणून त्याची प्रार्थना केलेली आहे ( ऋ. १.११४,७ व ८ ). त्यानें आपलीं धेनुसंहारक व मनुष्यसंहारक अस्त्रें आवरून धरावीं म्हणून त्याची करुणा भाकलेली आहे ( ऋ. २.३३,१ ). एकदां तर त्याला नरहन्ता असेंहि विशेषण लावलेलें आहे ( ऋ. ४.३,६ ) व आश्वलायन गृह्यसूत्रांत एके ठिकाणीं ( ४.८,३२ ) तो मनुष्यांचा संहार करण्यास टपलेला असतो असें म्हटलें आहे. तो ताप व खोकला आणतो व विषप्रयोग करतो असेंहि वर्णन आहे ( अ. वे. ११.२,२२ व २६ ). त्याजवळ रुंद तोंडाचे भुंकणारे कुत्रे असून ते आपलें भक्ष्य न चावतांच गिळतात ( अ. वे. १०.१,३०; तु. वा.

सं. १६.२८ ). प्रत्यक्ष देवांनां देखील रुद्राच्या धनुष्यबाणांचें भय वाटत होतें ( श. ब्रा. ९.१.१,१ व ६ ). रुद्राच्या या भीषण लक्षणांमुळेंच बहुधा त्याला ब्राह्मणांत व सूत्रांत इतर देवांपासून पृथक् केलें असावें. जेव्हां देव स्वर्गाप्रत जाते झाले तेव्हां रुद्र मागेंच राहिला ( श. ब्रा. १.७.३,१ ). वैदिक कर्मामध्यें इतर देवतांनां आहुती दिल्यानंतर जें अवशेष राहतें तेंच प्रायः रुद्रास अर्पण करण्यांत येतें ( गोभि. गृ. सू. १.८,२८; आप. ध. सू. २.४,२३ ) ज्याप्रमाणें राक्षसांनां रक्त हेंच त्यांचा यज्ञांतील हविर्भाग म्हणून अर्पण करण्यांत येतें ( ऐ. ब्रा. २.७ ) त्याप्रमाणें व्याधी व मृत्यु यांहींकरून मनुष्यांनां व पशूंनां उपद्रव देणाऱ्या रुद्राच्या गणासहि त्यांनीं बळी घेतलेल्या प्राण्यांचीं आंतडीं देण्यांत येतात ( शां. श्रौ. सू. ४.१९,८ ). उत्तरकालीन वैदिक वाङ्मयांत देवांचें निवासस्थान पूर्वेस तर रुद्राचें प्रायः उत्तरेस कल्पिलेलें आहे.

वाजसनेयी संहितेंत रुद्रास जीं अनेक विशेषणें लाविलीं आहेत त्यांतील कित्येक तर अत्यंत अपमानास्पद आहेत. उदाहरणार्थ त्याला चोर, लबाड, ठक, उचल्यांचा व चोरांचा राजा म्हटलेलें आहे ( १६.२०–१ ). वस्तुतः या रुद्रदेवतेची कल्पना जवळ जवळ वेदकालानंतरच्या शिव देवतेसारखीच असल्याविषयीं तिच्या या अनेक विशेषणांवरून दिसून येतें.

तथापि राक्षसांप्रमाणें रुद्र हा केवळ दुष्टपणानेंच ओतप्रोत भरलेला नाहीं. देवांपासून उपद्रव होऊं नये म्हणून देखील याची प्रार्थना करण्यांत येते ( ऋ. १.११४,४; २.३३,७ ). संकटांपासून रक्षण करण्याकरितांच केवळ याला विनविण्यांत येतें ( ऋ. ५.५१,१३ ) असें नाहीं, तर त्यानें मनुष्यांचें व पशूंचें हित करावें ( ऋ. १.४३,६ ), त्यांनां सुख द्यावें ( ऋ. १.११४,१ व २; २.३३,६ ) म्हणूनहि त्याची प्रार्थना केलेली आहे. त्याच्या अंगीं रोग बरे करण्याची शक्ति असल्याविषयीं वारंवार उल्लेख आलेले आहेत. त्याच्या जवळ सर्व प्रकारच्या औषधी आहेत ( ऋ. ५.४२,११ ). तो आपल्या औषधींनीं वीरांनां सजीव करतो, कारण तो सर्व वैद्यांमध्यें श्रेष्ठ आहे ( ऋ. २.३३,४ ).

जलाष म्हणजे बहुधा रोग बरे करणारा व जलाषभेषज म्हणजे रोग बरे करणाऱ्या औषधी बाळगणारा हीं दोन विशेषणें केवळ रुद्रालाच लावण्यांत आलेलीं आहेत ( ऋ. १.४३,४; अ. वे. २.२७,६ ). रोगांवरील या औषधी म्हणजे बहुधा पर्जन्य असावा ( तु. ऋ. ५.५३,१४; १०.५९,९ ). रुद्राप्रमाणें मरुतांजवळहि शुद्ध व हितकारी औषधी असतात असा एका ऋचेंत उल्लेख आहे ( ऋ. २.३३,१३ ). सूत्रांमध्यें रुद्रानें गुरांतील रोगांनां प्रतिबंध करावा म्हणून त्याच्या नांवाचे याग सांगितले आहेत ( आ. गृ. सू. ४.८,४०; कौ. सू. ५१.७ ) इ.

ऋग्वेदांतील पुराव्यांवरून रुद्राचा संबंध कोणत्या भौतिक चमत्काराशीं आहे हें नीट समजत नाहीं. रुद्र ही तुफानदेवता आहे असें साधारणतः मानलें जातें. परंतु इन्द्र ज्याप्रमाणें आपल्या अस्त्राचा उपयोग केवळ आपल्या भक्तांच्या शत्रूंविरुद्धच करतो तसें रुद्र करीत नाहीं म्हणून रुद्र ही देवता मूलतः केवळ तुफानाच्या स्वरूपाचीच प्रतिकृति नसून तुफानांतील विजेच्या योगानें होणाऱ्या संहाराची भयानक बाजूच ती विशेषतः दाखवीत असावी; अशी कल्पना केली तर, रुद्राचे शर प्राणसंहारक आहेत, तो तुफानदेवता जे मरुत् त्यांचा पिता किंवा अधिपति आहे व या मरुतांच्या हातांत विद्युत् हेंच शस्त्र असून ते सौदामिनीच्या हास्यापासून निर्माण झाले आहेत ( ऋ. १.२३,१२ ) इत्यादि वर्णनाचा उलगडा होतो व त्याचा अग्नीशीं निकट संबंध कां मानण्यांत येतो हेंहि स्पष्ट होतें.

वेबर म्हणतो कीं, अगदीं प्राचीन काळीं रुद्र ही देवता तुफानाच्या गर्जनेचीच द्योतक होती ( व म्हणूनच त्या शब्दाच्या अनेकवचनाचा मरुत् हा अर्थ होतो ). अग्नीची गर्जना व तुफानाची गर्जना यांत निकट साम्य असल्यामुळें तुफान व अग्नि या दोहोंच्या संयोगामुळें रुद्र ही देवता बनली आहे. एच्. एच्. विल्सन यास रुद्र हा अग्नीचें किंवा इन्द्राचेंच निराळें स्वरूप असावें असें वाटलें होतें. श्रोडर याला रुद्र हा वाऱ्यांतून भटकणारा मृतांच्या आत्म्याचा अधिपति वाटतो व ओल्डेनबर्ग याच्या मतें रुद्र ही प्रथमतः पर्वताची व अरण्याची देवता कल्पिलेली असावी.

रुद्र शब्दाची व्युत्पत्ति प्रायः रुद् म्हणजे रडणें या धातूपासून लावण्यांत येते व भारतीय पंडितांचेंहि हेंच मत आहे. ग्रासमन याला तो शब्द रुद् म्हणजे प्रकाशणें या धातूपासून निघाला असावा असें वाटलें व पिशेलनें या रुद् धातूचा अर्थ रक्तवर्ण असणें असा करून रुद्र शब्दाचा अर्थ ओजस्वी किंवा लाल असा केला आहे.

**अदिति.**—या देवतेवर स्वतंत्र सूक्त नसलें तरी हिचें नांव अनेक सूक्तांत येतें. हिचें स्वरूप निश्चित नाहीं. तिला अनर्वा हें विशेषण कधीं कधीं ( ऋ. २.४०,६; ७.४०,४ ) लावलेलें आढळतें.

अदिति मित्रावरुणांची ( ऋ. ८.२५,३; १०.३८३ ) व अर्यम्याची (ऋ. ८.४७९) आई म्हणून वर्णिली आहे व यामुळें तिला राजांची आई (ऋ.२.२७.७) हें विशेषण स्वाभाविकपणें सार्थ होतें. तिच्या बलवान् पुत्रांचा उल्लेख वारंवार ( ऋ. ३.४,११;८.५६,११ ) होतो. ते आठ आहेत (ऋ. १०.७२,८) असेंहि वर्णिलें आहे. तिला 'पस्त्या' असें म्हटलें आहे.

पौराणिक कथांमध्यें अदिति ही दक्षकन्या होय म्हणून वर्णिलें असून तिला कश्यपपत्नी केलें आहे. परंतु वेदांत

( वा. सं. २९.६० तै. सं. ७.५,१४ ) तिला विष्णूची पत्नी म्हटलें आहे.

दिति म्हणजे वांधणें आणि अदिति म्हणजे मुक्त करणें असे अर्थ या शब्दाचे असावेत असें दिसतें. देव अदिति, आप आणि पृथ्वी यांच्यापासून उत्पन्न झाल्याचें म्हटलें आहे (ऋ.१०. ६३,२ ). या पुढील ऋचेंत त्यांची माता द्यौः अदिति हिनें त्यांनां मधुमय दुग्ध दिल्याचेंहि वर्णिलें आहे. यावरून अदिति व द्यौः यांनां एकरूप कल्पिल्याचें दिसतें. इतर कांहीं जागीं (ऋ.१.७२;९; अथर्व.१३.१,३८) अदितीला पृथ्वीशींहि एकरूप केलें आहे. तथापि, पुष्कळ ठिकाणीं (ऋ. १०.६३, १० इ.) द्यावापृथिवी यांच्या बरोबरीनें हिचा निराळा उल्लेख करून, त्यांच्यापासून हिला वेगळी काढली आहे. एके ठिकाणीं ( ऋ. १.८९,१० ) अदिति विश्वसृष्टीची मूर्ति असल्याचें दिसतें.

बहुधा तेजस्वी आदित्यांची माता म्हणून, अदितीचा कधीं कधीं तेजाशीं संबंध जोडण्यांत आला आहे. तेज मिळण्यासाठीं तिची प्रार्थना केलेली आहे ( ऋ. ४.२५,३; १०.३६,३ ); तिच्या अक्षय तेजाचा गौरव केला आहे ( ७. ८२,१० ) आणि उषेला अदितिमुख म्हटलें आहे ( १.११३, १९ ). कोठें कोठें इतर देवतांनां वापरलेलीं विशेषणें अदितीच्या संबंधांतहि वापरलीं आहेत.

ऋग्वेदाच्या कांहीं उताऱ्यांतून ( १.१५३,३; ८.९०,१५; १०.११,१ इ. ) व त्याचप्रमाणें मागाहूनच्या वैदिक ग्रंथांतून (वा. सं. १३.४३;४९ ) अदितीला गो म्हटलें आहे आणि संस्कारांतल्या गायीला सामान्यतः अदिति असें संबोधण्यांत येतें. भूलोकच्या सोमाची अदितीच्या दुग्धाशीं तुलना केली आहे ( ऋ. ९.९६,१५ ); अदितीची नप्त्री ( कन्या ) म्हणजे दुग्धच असावें व ती सोमाशीं तो पात्रांत पडत असतांना एकजीव होते (ऋ.९.६९,३). अध्वर्यू आपल्या दाहा अंगुलींनीं अदितीच्या मांडीवर सोम शुद्ध करतात असें जें म्हटलें आहे. ( ऋ. ९.२६,१; ७१,५ ) त्याचा अशाच तऱ्हेचा संदर्भ असावा.

वरील गोष्टींवरून अदितीचीं मुख्य दोन वैशिष्ट्यें दिसून येतात. पहिलें, तिचें मातृत्व हें होय. ती एका देवसमुदायाची माता असून, त्यांचें नांव तिच्या नांवापासून बनलेलें मातृकनाम आहे हें उघड दर्शवितें. तिच्या नांवाच्या व्युत्पत्त्यर्थाशीं जुळतें असें दुसरें प्रधान वैशिष्ट्य म्हणजे, शारीरिक यातना आणि नैतिक दोष यांच्या बंधनांपासून मुक्त करणारी तिची शक्ति हें होय. तिच्या नांवासंबंधींच्या गहन कल्पनांवरून तिला गो, अफाट पृथिवी, अंतरिक्ष किंवा विश्व या संज्ञा प्राप्त झाल्या असतील पण अशा अमूर्त कल्पनेला इतक्या लवकर मूर्त स्वरूप कसें मिळालें आणि विशेषतः अदिति आदित्यांची माता कशी बनली याचीं कारणें काय द्यावींत? वर्गाइनच्या मतें, देवांनां दुग्ध देणारी माता द्यौः अदिति ( =अफाट आकाश) होय (ऋ. १०.६३,३ ). अशा प्रकारच्या विधानांत अदितीचें मातृत्व शोधावें लागेल. हें मत बरोबर दिसत नाहीं. दुसरें एक मत म्हणजे, ऋग्वेदांत अनेक ठिकाणीं आदित्यांनां लाविलेलें अदितेः पुत्राः हें विशेषण, वेद-पूर्वकालीं (सहसः पुत्रः शक्तीचा पुत्र याप्रमाणें) "स्वातंत्र्याचे पुत्र" याच अर्थीं केवळ वरुणादि देवांचा प्रधान गुण दाखविण्यासाठीं योजिलें असावें. अशा प्रकारचें विशेषण अदितीला मातेचें मूर्त रूप लवकरच देईल. उदाहरणार्थ ऋग्वेदांतच पाहाना, शवसः ( बलाचा पुत्र ) या इन्द्राच्या संज्ञेवरून, इन्द्राच्या मातेचें शवसी असें नांव काढण्यांत आलें; तसेंच शचीपति ( बलाचा स्वामी ) या त्याच्या पदवीवरून पुढें त्याच्या पत्नीचें नांव शची असें धरण्यांत आलें. आदित्य अदितीचे पुत्र, या मातृकनामाच्या घटनेवरून तिच्या पुत्रांच्या समुदायाला नियमन प्राप्त होतें. या देवता कल्पिलेल्या मूर्तरूपांत, पूर्वींचा बंधनराहित्य अस्तित्वाचा अर्थ कायम राहून, आदित्यापासून घेतलेलीं तेजस्वितेसारखीं विशेषणेंहि त्यांत आहेत. याप्रमाणें, निवळ भारतीय असणारी अदिति देवता, तिच्या निदान कांहीं पुत्रांपेक्षां तरी ऐतिहासिक दृष्ट्या वयानें लहान आहे.

अदितीच्या स्वरूपाविषयीं ओल्डनबर्ग, म्याक्समुल्लर, रोट वगैरेंचें एकमत नाहीं. नैघण्टुकांत अदिति हा पृथिवी, वाक्, गो, आणि द्विवचनीं द्यावापृथिवी यांशीं समानार्थक शब्द आहे. यास्क अदितीची व्याख्या "देवांची बलवती माता" अशी करून, तिला अन्तरिक्षांत स्थान देतो, व आदित्यांनां स्वर्गलोकांत सोडतो.

**दिति.**—दिति हें नांव ऋग्वेदांत तीन वेळां आलेलें आहे व त्यापैकीं दोन वेळां तर तें अदितीच्या जोडीनें आलें आहे. मित्रावरुणांनीं आपल्या रथांतून अदिति आणि दितीला पाहिल्याचें वर्णिलें आहे(ऋ.५.६२,८). या ठिकाणीं सायणाचार्य त्यांचा अर्थ अविभाज्य पृथिवी व तीवरील निरनिराळे प्राणी असा करितात, रोट "अक्षय आणि नश्वर" असा आणि मूर "दृश्य सृष्टीचा एक सबंध संच" असा अर्थ करितात. दुसऱ्या उताऱ्यांत ( ऋ. ४.२,११ ), दिति देण्याविषयीं व अदितीपासून संरक्षण करण्याविषयीं अग्नीची प्रार्थना केली आहे. या ठिकाणीं "उदार दाता" आणि "अनुदार दाता" असा या दोन शब्दांचा सायणाचार्य अर्थ करितात आणि "संपत्ति" व "दारिद्र्य" असा रोटचा अर्थ आहे. हे दोनहि शब्द "दा" या धातूपासून बनले असल्यानें "दान" आणि "अदान" असाच अर्थ संभवतो असें मॅकडोनेलचें मत आहे. तिसऱ्या एका उताऱ्यांत ( ऋ. ७.१५,१२ ), अदितिविरहित पण अग्नि, सवितृ आणि भग यांच्या सहवासांत दिति हा शब्द उल्लेखिला असून, ती ( दिति ) इष्ट देत असल्याचें सांगितलें आहे. मागाहूनच्या संहितांतून ( वा. सं. १८.२२; अथर्व. १५.१८,४;१६.६,७ ) देखील

अदितीच्याबरोबर दितीचाहि देवी म्हणून उल्लेख आला आहे. अथर्ववेदांत ( ७.७,१ ) तिचीं मुलें दिलीं आहेत. हीं दैत्य असून, वेदपश्चात्कालींच्या इतिहासांत देवशत्रू म्हणून वर्णिलेले आढळतात. दिति हें देवी म्हणून आलेलें नांव, अदिति या नांवाला केवळ विरोध म्हणूनच आलें असावें; अशाच तऱ्हेचें दुसरें उदाहरण म्हणजे, "असुर" या नांवावरून "सुर" हें नांव निघालें.

**वायु-वात.**—ऋग्वेदामध्यें वायु व वात हें दोन्हीहि शब्द भौतिक चमत्कारांप्रमाणेंच भौतिक चमत्काराच्या देवतेसहि उद्देशून योजलेले आहेत. तथापि मुख्यत्वेंकरून वायु ही देवता आहे व वात हें पंचमहाभूतात्मक एक तत्त्व आहे. वायूचें वर्णन एका सबंध सूक्तांत व इतर सूक्तांच्या कांहीं भागांत आलेलें आहे, व इन्द्रदेवतेच्या जोडीस त्याला आणखीहि पांच सहा सूक्तें मिळालीं आहेत. वाताची प्रार्थना ऋग्वेदांतील दहाव्या मंडळाच्या शेवटीं फक्त दोन लहान सूक्तांतच केलेली आढळून येते ( १६८ व १८६ ). कधीं कधीं वात व वायु या दोघांचीं नांवें एकाच ऋचेमध्येंहि आलेलीं आहेत ( ऋ. ६.५०,१२; १०.९२,१३ ). वायु व वात या दोहोंतील फरक ज्या एका गोष्टीवरून व्यक्त होतो ती गोष्ट म्हटली म्हणजे वायूचें साहचर्य इन्द्राशीं कल्पिलें असून त्या दोन्हीहि देवतांची इन्द्रवायु या नांवानें एकत्र स्तुति केलेली आहे. उलटपक्षीं वात हा मुख्यतः एक भौतिक चमत्कारच असल्यामुळें त्याचा संबंध इन्द्राशीं जोडण्याऐवजीं फक्त पर्जन्याशींच जोडण्यांत आला आहे. या दोन पवन-देवतांस लावलेलीं विशेषणेंहि अगदीं निरनिराळीं असून वाताचीं विशेषणें वेग व उग्रता यांसारख्या भौतिक गुणांचीं निदर्शक आहेत.

वायूच्या उत्पत्तीविषयीं फारच थोडे उल्लेख आढळून येतात. एके ठिकाणीं त्याला त्वष्ट्याचा जामात म्हटलें आहे ( ऋ. ८.२६,२१–२२ ), परंतु त्याच्या बायकोच्या नांवाचा उल्लेख केलेला नाहीं. पुरुषसूक्तांत तो महापुरुषाच्या श्वासोच्छ्वासापासून जन्मास आला असें वर्णन आहे ( ऋ. १०.९०, १३ ). वायूचा मरुतांशीं कांहीं संबंध असेलसें दिसत नाहीं. एका ठिकाणीं मात्र वायूनें गगनगर्भांतून मरुत् निर्माण केले ( ऋ. १.१३४,४ ) व ते पूषन् व विश्वेदेवांप्रमाणें त्याजबरोबर असतात ( ऋ. १.१४२,१२ ) असें म्हटलें आहे. तो सुंदर ( ऋ. १.२,१ ), गगनस्पर्शी, सहस्राक्ष व मनांतील विचाराप्रमाणें चंचल ( ऋ. १.२३,२–३ ) आहे. तो शब्दितगमन म्हणजे शब्द करीत जाणारा आहे ( ऋ. १०.१००,२ ). त्याचा रथ दैदीप्यमान असून त्याला रोहित किंवा अरुण अश्वांची जोडी किंवा मालिका जुंपलेली असते. या मालिकेंत त्याच्या इच्छेनुरूप नव्याण्णव, शंभर किंवा सहस्र अश्व असतात ( ऋ. ४.४८,४; ४.४६,३ ). वायु ज्या रथांत इन्द्रासह वसतो त्यास सुवर्णाचें आसन असून तो गगनस्पर्शी आहे ( ऋ. ४.४६,२ व ४ ). इतर देवतांप्रमाणेंच वायूहि सोमाचा भोक्ता असून त्याला सोमपानप्रसंगीं पहिला मान मिळतो. कारण तोच सर्व देवांमध्यें अत्यंत वेगवान् आहे ( श. ब्रा. १३.१.२,७ इ. ) देवांमध्यें एकदां सोमपानाचा पहिला मान कोणास द्यावा हें ठरविण्यासाठीं शर्यत लागली असतां तींत वायु पहिला व इन्द्र दुसरा आला, अशी ऐतरेय ब्राह्मणांत एक कथा आहे ( २.२५ ). वायूला ऋग्वेदांत सोमरक्षक म्हटलें आहे ( १०.८५,५ ). वायु हा यश, संतति व बैलांच्या, घोड्यांच्या किंवा सुवर्णाच्या रूपांत संपत्ति देतो ( ऋ. ७.९०,२ व ६ ). तो शत्रूंची पांगापांग करतो ( ऋ. ४.४८,२ ) व निर्बल लोक आत्मसंरक्षणार्थ त्याची प्रार्थना करतात ( ऋ. १.१३४,५ ).

वारे या अर्थी वाताचें जें वर्णन आहे तें भौतिक चमत्कारास बरेंचसें धरून आहे. त्याच्या एका स्तुतिपर सूक्तांत ( ऋ. १०. १६८ ) त्याचें असें वर्णन आहेः सर्व वस्तू अस्ताव्यस्त करीत व गर्जना करीत त्याचा नाद पुढें पुढें सरकत जातो. तो पृथ्वीवरील धूळ उडवीत गमन करतो. जात असतां तो मार्गांत हवेंत भटकतो. तो एक दिवसहि विश्रांति घेत नाहीं. त्याची उत्पत्ति अगोदर झाली असून तो आपांचा मित्र आहे. त्याचें जन्मस्थान अज्ञात आहे व तो मन मानेल तिकडे फिरतो. प्रत्येकास त्याची गर्जना ऐकूं येते, पण त्याचें रूप कोणासहि दिसत नाहीं (तु. ऋ. १.१६४,४४). तो देवांचा श्वास आहे ( तु. ऋ. ७.८७,२; १०.९२,१३ ). त्याची आहुती देऊन पूजा करण्यांत येते.

वात हा रुद्राप्रमाणेंच आरोग्य व दीर्घायुष्य देतो, कारण त्याच्या गृहामध्यें अमृताचा सांठा आहे ( ऋ. १०.१८६,३ ). वायूच्या व्यापारांचें वर्णन बहुतेक तुफानास जोडूनच येतें ( ऋ. ४.१७,१२; ५.८३,४; १०.१६८,१ व २ ). विजा चमकण्याच्या प्रसंगीं किंवा सूर्योदयाच्या पूर्वी वाऱ्याची झुळुक येत असल्यामुळें वात हा अरुणप्रकाश उत्पन्न करतो ( ऋ. १०.१६८,१ ) व उषेला प्रकाशमान करतो ( ऋ. १. १३४,३ ) असें म्हटलें आहे. वायूच्या शीघ्रतेमुळें देवांच्या व काल्पनिक अश्वांच्या वेगास वायूची वारंवार उपमा देण्यांत आली आहे ( ऋ. ४.१७,१२; ५.४१,३; १.१६३,११; ४.३८,३ ).

**अश्विन्.**—इन्द्र, अग्नि व सोम यांच्यानंतर मोठी महत्त्वाची देवता म्हणजे अश्विन् होत. अश्विनांच्या वर्णनपर सबंध सूक्तें ऋग्वेदांत पन्नास असून शिवाय इतर ४०० ठिकाणीं त्यांचा उल्लेख आहे. अश्विन् हें नांव भारतीय असूनहि या देवतेचा कोणत्या विशिष्ट सृष्टिव्यापाराशीं संबंध आहे ही गोष्ट इतकी अस्पष्ट आहे कीं, अगदीं प्रथमच्या वेदार्थकारांपासून सर्वांनाच या देवतेच्या मूळ स्वरूपाबद्दल

मोठें कोडें पडलें आहे. असा घोंटाळा माजलेला असल्यामुळेंच ही देवता वेदपूर्वकालीन असावी, हें बरेंच संभवनीय दिसतें. अश्विन् हे जुळे भाऊ असून त्यांची जोडी कधींहि न फुटणारी आहे (ऋ. ३.३९,३; १०.१७,२). एका संपूर्ण सूक्तांत (२.३९) या जुळ्या बंधूंची डोळे, हात, पाय, पंख, वगैरे जोड अवयवांशीं किंवा कुत्रीं, बकरीं, हंस वगैरे जोडीनें राहणाऱ्या पशुपक्षांशीं तुलना केलेली आहे. परंतु कित्येक ठिकाणीं ते दोघे मूळ पृथक् असल्याचा व पृथक् जन्मल्याचाहि उल्लेख आहे (ऋ. ५.७३,४; १.१८१,४). यास्कानें दिलेल्या उताऱ्यांत (निरु० १२.२) 'एक निशेचा पुत्र व एक उषेचा पुत्र' असें म्हटलें आहे. अश्विनांबद्दल येणारा शब्द 'नासत्य' हाहि ऋग्वेदांत (ऋ. ४.३,६) एकदां एकवचनी वापरला आहे.

अश्विन् हे तरुण असून वयानें सर्व देवांहून धाकटे असें वर्णन आहे (ऋ. ७.६७,१०; तै. सं. ७.२,७). ते तेजस्वी (ऋ. ७.६८,१), सुंदर (ऋ. ६.६२,५) व अनेक रूपें धारण करणारे (ऋ. १.११७,९), अत्यंत बळकट व सामर्थ्यवान् (ऋ. ६.६२,५) वगैरे वर्णन असतें. शिवाय त्यांनां बहुतवेळां लावण्यांत येणारीं विशेषणें म्हणजे दस्र 'चमत्कारिक' व नासत्य=न+असत्य हीं होत. नासत्य हें नांव 'असुर' या अर्थी आवेस्तांतहि आलें आहे. रुद्रवर्तनी व हिरण्यवर्तनी 'तांबडा किंवा सोनेरी मार्ग असणारे' हीं विशेषणेंहि त्यांनांच विशेषतः लावलेलीं आढळतात. मधु म्हणजे मद्य याचाहि त्यांच्यासंबंधानें फार उल्लेख आलेला आहे. त्यांच्या रथाला मधुवर्ण किंवा मधुवाहन म्हटलें आहे. मधूयु, माध्वी म्हणजे मधुप्रिया व मधुपा=मद्य पिणारे असें अश्विनांना वर्णिलें आहे. शिवाय इतर देवांप्रमाणें सोमपान करणारेहि ते असून उषा व सूर्य यांच्याबरोबर त्यांनां सोमपानार्थ येण्याबद्दल प्रार्थिलें आहे (ऋ. ८.३५,१).

अश्विनांचा रथ सर्व सोनेरी असून त्याचीं चाकें वगैरे सर्व भाग तीन तीन असल्याचें चमत्कारिक वर्णन आहे (ऋ. १.१८०,१; १.११८,१ व २). रथाच्या तीन चाकांपैकीं एक सूर्याच्या विवाहसमारंभाला ते आले होते त्यावेळीं मोडलें (ऋ. १०.८५,१५).

अश्विन् या नांवावरून 'घोडे बाळगणारे' असा अर्थ होतो, व त्यांच्या रथाला घोडे असतात (ऋ. १.११७,२), असें जरी वर्णन आहे, तरी इतरत्र पक्षी (ऋ. ६.६३,६), हंस (ऋ. ४.४५,४), गरुड (ऋ. १.११८,४) जोडलेले असतात असें निरनिराळें वर्णन आढळतें. ऐतरेय ब्राह्मणांत (४.४ ते ९) सोम व सूर्या यांच्या विवाहसमयीं ज्या रथांच्या शर्यती झाल्या त्यांत रासभ जोडलेल्या रथांत बसून त्यांनीं शर्यत जिंकली असें वर्णन आहे. त्यांचा रथ एका दिवसांत पृथ्वी व स्वर्ग आक्रमून जातो (ऋ. ३.५८,८). वर्तिस्, परिज्मन् 'भोंवतालीं प्रदक्षिणा करणारा' असें त्यांच्या रथाचें वर्णन आहे.

अश्विनांच्या वसतिस्थानासंबंधानें विविध उल्लेख आहेत. द्यु, व पृथ्वी (ऋ. १.४४,५), द्यौ व अंतरिक्ष (ऋ. ८.८,४), मोठे वृक्ष, गिरिशिखर (ऋ. ७.७०,३) असा अनेक प्रकारचा राहण्याचें ठिकाण म्हणून उल्लेख आहे. त्यांचें वसतिस्थान अज्ञात आहे असेंहि म्हटलें आहे (ऋ.६.६३,१; ८.६२,४). त्यांची उगवण्याची वेळ उषःकाल व सूर्योदय यांच्या दरम्यान असते (ऋ. ८.५,२). शतपथ ब्राह्मणांत (५.५.४,१) त्यांचा रंग तांबुसपांढरा असतो व म्हणून त्यांनां तशा रंगाचाच बोकड बळी द्यावा, असें सांगितलें आहे.

अश्विन् हे द्युदेवतेचे पुत्र असें वर्णन आहे. ते विवस्वत् (सूर्य) व सरण्यू (उषा) यांचे पुत्र असें सांगितलें आहे (ऋ. १०.१७,२). सूर्याची कन्या सूर्या हिचे अश्विन् हे पती असें म्हटलें आहे (ऋ. ४.४३,६). ते स्त्रियांनां अपत्योत्पादनसमर्थ करतात (ऋ. १०.१८४,२); त्यांनीं एका नपुंसकाच्या स्त्रीला पुत्र दिला (ऋ. १.११२,३); एका वृद्ध कुमारिकेला पति दिला (ऋ. १०.३९,३). अथर्ववेदांत (२.३०,२) ते प्रेमी युगुलांच्या भेटी करून देतात, असें म्हटलें आहे.

अश्विन् हे दुःखपीडितांनां त्वरित येऊन मुक्त करणारे होत (ऋ, १.११२,२). अंध, पंगू, रोगग्रस्त सर्वांनां बरे करणारे वैद्य म्हणून ते प्रसिद्ध आहेत (ऋ.८.१८,८;१०.३९,३). ते देवांचे धन्वंतरि व भक्तांचा मृत्यु टाळणारे आहेत (अ. वे. ७.५३,१; तैत्ति. ब्रा. ३.१.२,११).

ऋग्वेदांत अश्विनाबद्दलच्या आख्यायिका बऱ्याच आहेत. च्यवानऋषीबद्दल (ऋ.१.११६,१०), वृद्धकलीबद्दल (ऋ. १०.३९,८), विमद पुरुमित्राबद्दल (ऋ.१०.६५,१२ व ३९,७), विश्वकाबद्दल (ऋ. १.११६,२३ व ११७,७), तुग्रपुत्र भुज्यूबद्दल वगैरे अनेकांबद्दल कथा आहेत.

वरील कथांत विशेष प्रसिद्ध म्हणजे तुग्रपुत्र भुज्यु याची कथा होय. त्याला समुद्रांत टाकून दिला होता, तेव्हां त्यानें अश्विनीकुमारांची प्रार्थना केली. तेव्हां शंभर वल्हीं असलेल्या जहाजांत बसून येऊन त्यांनीं भुज्यूला वांचविला. शिवाय अत्रि सप्तवध्रि हा ऋषि अग्नीच्या खाईंत पडला होता त्याला त्यांनीं बाहेर काढला; ऋज्राश्वाला दृष्टि दिली; विश्पलाचा मोडलेला पाय लोखंडाचा बसवून दिला; घोषा या वृद्धकुमारिकेला पति मिळवून दिला. याशिवाय ऋग्वेदाच्या १.११२ व ११६ ते ११९ या सूक्तांत अश्विनांनीं साहाय्य केलेल्या आणखी माणसांची यादी दिली आहे. त्यांपैकीं बरेच प्रत्यक्ष वांचविलेले किंवा रोगमुक्त केलेले इसम असावे असें वाटतें. बर्गेन वगैरे पंडितांनीं वरील सर्व कथा

रूपकात्मक, सृष्टींतील सूर्यादिकांचे व्यापार निदर्शित करणाऱ्या आहेत, असा शेरा मारला आहे, तो बरोबर वाटत नाहीं.

अश्विन् हे कोणत्या सृष्टिव्यापाराचे निदर्शक आहेत, याबद्दल प्राचीन ऋषींनीं स्पष्ट वर्णन कोठेंच केलेलें नाहीं. अश्विनांनां कोणी द्यावापृथिवी, कोणी दिवस व रात्र, कोणी सूर्य व चंद्र असें म्हटलें आहे; प्राचीन आचार्यांनीं त्यांस 'दोन धार्मिक राजे' असें मानलें आहे. यास्काचें मत अस्पष्टच आहे. रोटनें त्यांनां इन्द्र व सूर्य, हॉप्किन्सनें संधिप्रकाश व इतर विद्वानांनीं सूर्य व चंद्र असें ठरविलें आहे. अश्विन् म्हणजे प्रभाततारा व सायंतारा ही कल्पनाहि योग्य नाहीं, कारण अश्विनांची जोडी कधींच फुटत नाहीं, तर उलट या प्रातःसायंतारांची कधींच भेट व्हावयाची नाहीं. द्यौचे मुलगे हे दोघे अश्विन् व त्यांची बहीण या कथेशीं ग्रीक आख्यायिकेंतील झ्यूसचे दोघे अश्ववीर मुलगे व त्यांची बहीण हेलेन यांचें, व लेटिक देवांपैकीं सूर्यकन्येचें प्रेमाराधन करण्याकरतां आलेले दोघे मुलगे यांचें साम्य आहे. दोघां अश्विनांनीं ज्याप्रमाणें सूर्या हिच्याशीं लग्न लावलें, त्याप्रमाणें लेटिक देवपुत्रांनीं सूर्यकन्येशीं लग्न लाविलें आहे. हें सर्व मतवैचित्र्य लक्षांत घेऊनहि गेल्डनेर असें म्हणतो कीं, अश्विन् हे हिंदुस्थानांतीलच प्राचीन काळचे कोणी दोघे मोठे परोपकारी महात्मे असावे.

अश्विन् हे कोणी मनुष्य असोत, किंवा संधिप्रकाश, प्रभाततारा वगैरे नैसर्गिक गोष्टींवरील रूपक असोत, ते प्राचीनतम अशा इन्डो-यूरोपीय काळांतील असावेत, असें वाटतें.

**उषा.**—उषा म्हणजे उषःकालदेवता. हिच्या वर्णनपर ऋग्वेदांत सुमारें २० सूक्तें असून शिवाय ३०० वेळांहून अधिक तिचा इतरत्र उल्लेख आला आहे. उषःकाल ही नित्य घडणारी नैसर्गिक क्रिया कवीच्या समोर असल्यामुळें या उषादेवतेवर मानवगुणाध्यारोप फार अल्प केलेला आहे. निसर्गाचें काव्यमय वर्णन या दृष्टीनें ऋग्वेदांतील उषासूक्तें हीं अत्यंत बहारीचीं आहेत; किंबहुना पृथ्वीवरील इतर कोणत्याहि वाङ्मयामध्यें उषासूक्तांहून अधिक रमणीय धार्मिक वर्णनपर काव्य सांपडत नाहीं. उषेचें दैदीप्यमान स्वरूप वर्णन करतांना स्वार्थी भिक्षुकी दृष्टि आड आलेली दिसत नाहीं, किंवा यज्ञविषयक गोष्टींच्या उल्लेखानें उच्च कविकल्पनेचा विरस झालेला नाहीं. उषा ही एखाद्या नर्तकीप्रमाणें भपकेदार पोशाख करून आपला वक्षःप्रदेश आविष्कृत करिते ( ऋ. १.९२,४). मातेनें अंगावर भूषणें घालून नटविलेल्या कुमारिकेप्रमाणें उषेचें स्वरूप दिसत आहे (ऋ. १.१२३,११). प्रकाशरूपी वस्त्र परिधान करून ही कुमारिका ( उषा ) पूर्वदिक्प्रदेशीं दृग्गोचर होऊन आपले मोहक हावभाव दाखवूं लागते (ऋ. १.१२४,३ व ४). अप्रतिम लावण्यवती ही उषा आपलें प्रकाशरूपी सौंदर्य लहानथोर कोणाहि इसमापासून लपवून ठेवीत नाहीं ( ऋ. १.१२४,५ ). जणूं काय नुकतेंच स्नान केल्यामुळें अधिकच खुलून दिसणारी ही उषा बाहेर येतांच सर्वत्र प्रकाश पसरून अंधकार नाहींसा होतो (ऋ.५.८०,५ व ६). उषा ही अत्यंत प्राक्कालीन असली तरी पुनः पुनः जन्म घेतल्यानें सदोदित तारुण्यांतच असते; आणि आपल्या तारुण्यमदानें मनुष्यांस मोहून त्यांचें आयुष्य दिवसानुदिवस नाश करीत असते (ऋ. १.९२,१० ). पण ती मात्र पूर्वीप्रमाणेंच पुढेंहि सुंदर व तरुण अशी अजरामर राहणार (ऋ. १.११३,१३ ते १५). ती आपल्या आगमनानें सर्व पादचारी प्राण्यांनां जागृत करते व पक्ष्यांनां अंतरिक्षांत संचारास प्रवृत्त करते, येणेंप्रमाणें तिच्या आगमनाबरोबर सर्व प्राणी अल्पमृत्यूंतून ( निद्रेंतून ) जीवंत होऊन इतस्ततः वावरूं लागतात (ऋ. १.४८,५ ते १० आणि ४९,३ ). उषा सर्व दुष्ट स्वप्नें नाहींशीं करते (ऋ. ८.४७,१४ ते १६ ); भुताखेतांनां पळवून लावते (ऋ. ७.७५,१ ).

प्रत्येक दिवशीं नियमित स्थळीं उषा दिसूं लागते, व परमेश्वरानें घालून दिलेला नियम कधींहि मोडीत नाहीं (ऋ. १.९२, १२; १२३,९; १२४,२; ७.७६,५ ). ती देवांच्या उपासकांनां जागे करून हवनार्थ अग्नि प्रज्वलित करण्यास लावते व अशा रीतीनें देवांच्या उपयोगीं पडते (ऋ. १.११३,९). पण ती फक्त देवांच्या खऱ्या निःसीम भक्तांनां उठविते, नास्तिक क्षुद्र लोकांस तसेंच झोपेंत लोळत टाकते (ऋ. १.१२४, १०; ४.५१,३ ). याच्या उलट असेंहि वर्णन आहे कीं, देवांचे उपासक तिला जागी करतात; वसिष्ठांनीं प्रथम तिला सूक्तें म्हणून जागी केली.

उषा एका मोठ्या चकाकणाऱ्या रथावर बसून येते (ऋ. ७.७८,१ व ४). तिच्या रथाला तांबडे घोडे जोडलेले असतात (ऋ.७.७५,६). ती सूर्याला येण्याला मार्ग मोकळा करते (ऋ. १.११३,१६). उषा आपल्या प्रणयी सूर्याच्या सौंदर्यप्रकाशानें अधिक खुलून दिसते ( ऋ. १.११३,९; १.९२,११). तरुणीमागें जाणाऱ्या तरुणाप्रमाणें सूर्य उषेच्या मागून जातो (ऋ. १.११५,२). तिला तिचा प्रिय देव प्राप्त होतो ( ऋ.१.१२३, १० ); उषा ही सूर्याची पत्नी होय (ऋ. ७.७५,५), सूर्य उषेच्या मागून येतो ( उगवतो ) या दृष्टीनें वरील पतिपत्नी किंवा प्रणयीप्रणयिनी हा संबंध यथार्थच आहे. पण कालदृष्ट्या उषा अगोदर व नंतर सूर्य उगवत असल्याकारणानें उषेला सूर्याची माता असेंहि म्हटलें असून (ऋ. ७.७८,३ ) ती यज्ञ व अग्नि यांची जननी असेंहि सांगितलें आहे. उषा ही द्युदेवतेची कन्या (ऋ. १.३०,२२) व आदित्य भग आणि निशा यांची भगिनी होय ( ऋ. १.१२३,५; १.१२४,८ ). पहांटे दिसणारे अश्विन् हे उषेचे मित्र असें म्हटलें आहे ( ऋ. ४.५२,२ व ३ ).

उषा उत्पन्न करणारे किंवा शोधून काढणारे म्हणून पुष्कळ देवांचीं नांवें आढळतात. इन्द्र (ऋ. २.१२,७), सोम (ऋ. ६.३९,३), बृहस्पति (ऋ. १०.६८,९) तसेंच प्राचीन पितर (ऋ. ७.७६,४) यांनीं उषा शोधून काढली असें म्हटलें आहे.

संपत्ति, संतति, दीर्घायुष्य देण्याविषयीं उषेची प्रार्थना केलेली आहे (ऋ. १.३०,२२; १.४८,१). उषाभक्तांनीं ऐश्वर्य मिळावें व मातेप्रमाणें तिची माया असावी म्हणून तिची प्रार्थना केली आहे (ऋ. ७.८१,४). मृत मनुष्याचा आत्मा सूर्य व उषा ह्याच्यांत जाऊन मिळतो, असें सांगितलें आहे (ऋ. १०.५८,३).

नैघण्टुकामध्यें (१.८) उषेचे समानार्थक सोळा शब्द दिलेले असून आणखीहि दुसरे इतरत्र आहेत. तिला बहुदात्री (मघोनी) हें विशेषण विशेषेंकरून दिलेलें आढळतें. उषा हा शब्द वस्=प्रकाशणें या धातूपासून झालेला आहे.

**त्रित आप्त्य.**—ऋग्वेदांत या देवतेच्या वर्णनास एकहि स्वतंत्र सूक्त दिलेलें नाहीं, परंतु तिचा प्रसंगवशात् एकोणतीस ऋचांत चाळीस ठिकाणीं उल्लेख आहे. आप्त्य हें विशेषण त्रितबरोबर किंवा त्याच्याऐवजीं आलेलें आढळतें.

वृत्रावर जय मिळविण्याच्या कामीं मरुतांनीं त्रित व इन्द्र यांनां साहाय्य केलें होतें (ऋ. ८.७,२४). त्रित आप्त्य यास आपलीं पैतृक अस्त्रें अवगत असल्यामुळें तो इन्द्राच्या आग्रहावरून त्वष्ट्याच्या तीन तोंडाच्या पुत्राशीं लढला व त्याला ठार करून त्यानें गाई सोडविल्या (ऋ. १०.८,८). याच्याच पुढल्या ऋचेंत इन्द्रानेंहि तोच पराक्रम केल्याचें वर्णन आहे. इन्द्रानें त्रितासाठीं त्या सपक्ष नागापासून गाई सोडविल्या (ऋ. १०.४८,२). इन्द्रानें त्वष्ट्याचा पुत्र विश्वरूप यास त्रिताच्या स्वाधीन केलें (ऋ. २.११,९). सोमरस काढणाऱ्या त्रितामुळें इन्द्रास जोर येऊन त्यानें अर्बुदास हाणून पाडलें व अंगिरसांबरोबर वलाचे तुकडे केले (ऋ. २.११,२०). जेव्हां बलाढ्य मरुत् बाहेर पडतात व विजा चमकतात तेव्हां त्रित मेघनाद करतो व उदक गर्जना करूं लागतें (ऋ. ५.५४,२). मरुतांच्या एका सूक्तामध्यें (ऋ. २.३४) त्रित येतो तेव्हां मरुतांचा उज्वल मार्ग प्रकाशूं लागतो (ऋचा १०) व त्रित हा मरुतांनां रथांतून घेऊन येतो (ऋचा १४) असें वर्णन आलें आहे. जेव्हां त्रित आकाशांतून अग्नीवर वारा घालून त्यास प्रदीप्त करतो तेव्हां अग्नीच्या ज्वाला वर जातात (ऋ. ५.९,५). त्रित हा अग्नीला उत्सुकतेनें शोधीत असतांना त्याला तो गायीच्या (भूमीच्या ?) मस्तकावर सांपडला; त्रित हा ज्वालांनीं व्याप्त होत्साता यागगृहामध्यें आपल्या जागेवर बसला (ऋ. १०.४६,३–६). त्रित हा स्वर्गांत असल्या-विषयीं म्हटलें आहे (ऋ. ५.९,५); त्याचें वसतिस्थान गुप्त आहे (ऋ. ९.१०२,२); तें दूर आहे; कारण कीं, आदित्य व उषा यांनां सर्व दुष्कृत्यें व दुष्ट स्वप्नें त्रितावर नेऊन टाकण्याविषयीं प्रार्थना केलेली आहे (ऋ. ८.४७,१३;१७). ऋग्वेद १.१०५,१७ मध्यें त्रित हा कूपामध्यें पडला आहे व देवांनां तो मदत करण्याविषयीं प्रार्थना करीत आहे असें वर्णन सांपडतें. बृहस्पतीनें त्याची प्रार्थना ऐकून त्याला संकटांतून मुक्त केलें. दुसऱ्या एका ठिकाणीं (ऋ. १०.८,७) त्रित हा आपल्या पित्याची प्रार्थना करीत असून आपलीं पैतृक शस्त्रें मागत आहे व त्याच्या पुढच्याच ऋचेमध्यें त्रिताचें विश्वरूपाशीं युद्ध झाल्याची हकीकत आहे. ऋग्वेदाच्या नवव्या मंडलांत त्रितासंबंधीं पुढें दिल्याप्रमाणें वर्णन आलें आहेः—त्रित सोमाचें शुद्धीकरण करतो (९.३४,४). त्रिताच्या बाला (बोटें) इन्द्राला पिण्यासाठीं दगडांनीं रगडून पिंगलवर्ण थेंब काढतात (९.३२,२; ३८,२). सोम हा त्रिताच्या दोन रगडणाऱ्या दगडांजवळ गुप्त जागीं वास करतो (९.१०२,२) त्यानें त्रिताच्या पृष्ठांवर संपत्तीचा प्रवाह आणावा अशी त्याची प्रार्थना केली आहे (९.१०२,३). सोमानें सूर्यास भगिनींसह त्रिताच्या शिखरावर (सानूवर) प्रकाशावयास लाविलें (९.३७,४). तीं (सूक्तें) पर्वतांवर राहणाऱ्या देंठरूपी वृषभास पिळून काढतात (९.९५,४).

ब्राह्मणांमध्यें त्रित हा एकत व द्वित यांच्याप्रमाणेंच उदकापासून जन्मलेला अग्नीचा पुत्र आहे असें म्हटलें आहे (श. ब्रा. १.२.३,१ व २; तै. ब्रा. ३.२.८,१० व ११). सायणानें ऋ. १.१०५ वर भाष्य लिहितांना शाट्याय-नींची जी एक कथा उद्धृत केली आहे तींत तो म्हणतो कीं, एकत, द्वित व त्रित हे तीन ऋषी असून त्रिताला दुसऱ्या दोघांनीं कूपांत टाकलें होतें. हे तीन्हीहि या ठिकाणीं उघड उघड संख्यावाचक शब्द दिसत आहेत. द्वित हा ऋग्वेदामध्यें एकदां त्रिताबरोबर (ऋ. ८.४७,१६) व एकदां एकटाच (ऋ. ५.१८,२) आलेला आहे, व या ठिकाणीं त्याला अग्नीच कल्पिलेलें दिसतें. नैघण्टुकामध्यें त्रिताचें नांव देवतांमध्यें घातलेलें नाहीं. यास्क हा निरुक्तामध्यें (४.६) त्रित याची व्युत्पत्ति तॄ धातुपासून लावून त्याचा अर्थ शहाणपणामध्यें अत्यंत प्रवीण असा देतो. परंतु याशिवाय त्यानें या शब्दाचा उपर्युक्त संख्यावाचक अर्थहि दिला असून दुसऱ्या एके ठिकाणीं (निरुक्त ९.२५) त्याचें तीन लोकांत राहणारा इन्द्र असेंहि स्पष्टीकरण केलें आहे.

सारांश, ऋग्वेदांत तीन चार ठिकाणीं इन्द्र व त्रित या दोघांनींहि एकच (राक्षसास मारण्याचा) पराक्रम केल्याचें वर्णन आहे. तुफानाच्या वेळीं त्रित व मरुत् यांचें साहचर्य कल्पिलेलें आहे. त्रिताला अग्नि सांपडला त्याला त्यानें स्वर्गांत प्रज्वलित केलें व अग्नीच्याच एका रूपांत तो मानवी प्राण्याच्या गृहांत ठाणें घालतो. त्याचें निवासस्थान

दूर व अज्ञात आहे व तेथें सोम आहे. इन्द्र हा फक्त सोमपान करणारा आहे, परंतु त्रिताला सोम तयार करणारा म्हटलें आहे. त्रिताप्रमाणें अवेस्तांतहि एक थ्रित आला आहे परंतु तो मानव आहे. ( त्रितहि संस्कृत काव्यग्रंथांत मानव झाला आहे ). एके ठिकाणीं ( यस्न ९.१० ) त्याला ज्यानें मनुष्य लोकांसाठीं हओम (=सोम) तयार केला असा तिसरा मानव म्हटलें आहे ( आथ्व्य=आप्त्य हा दुसरा होता ). दुसऱ्या एके स्थळीं ( वेन्दि. २०.२ ) अमृतत्वाचा वृक्ष जो शुभ्र हओम त्याच्या सभोंवतीं वाढणाऱ्या दशसहस्र रागविनाशक औषधी अहुरमझ्दापासून घेणारा तो पहिला वैद्य होता असें वर्णन आहे. त्रित यास दोन ठिकाणीं ( यस्त ५.७२; १३.११३ ) शायुझद्रि याचा पुत्रहि म्हटलें असून तेथें अपाम् नपात् ( पृथ्वीवरील एक स्थळ ) हें त्याचें निवासस्थान सांगितलें आहे. यावरून असें दिसतें कीं, सोम व त्रित यांचा परस्परसंबंध पर्शुभारतीय काळापासून होता. तीन तोंडांच्या राक्षसास ( अझि दहाक यास ) मारण्याची त्रिताची दुसरी कामगिरी अवेस्तामध्यें थ्रएतओन नांवाच्या दुसऱ्याच एका तत्सदृश माणसानें केली आहे. परंतु त्यांत विशेष लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट ही कीं, दहाक यास मारण्याकरितां जात असतां थ्रएतओन याजवरोबर त्याचे दुसरे दोन बंधू होते व त्यांनीं त्याचा जीव घेण्याचा प्रयत्नहि केला होता.

त्रित शब्दाचें विशेषण आप्त्य याची व्युत्पत्ति आप् म्हणजे पाणी या शब्दापासून झाली असावी असें वाटतें व म्हणून तें व अपाम् नपात् यांचा अर्थ जवळ जवळ एकच दिसतो. ऋ. ८.४७,१५ वरील भाष्यांत सायणानें आप्त्य याचा अर्थ आपांचा पुत्र असा दिला आहे.

वरील गोष्टींवरून मॅकडोनेल यानें असें अनुमान काढलें आहे कीं, त्रित ही विद्युद्देवता म्हणजे अग्नीचें तृतीय किंवा वायव्य रूप, अग्नि व वायु किंवा इन्द्र व सूर्य या त्रयींतील मधल्याचें प्राथमिक स्वरूप होती. या देवतेचें हें प्राथमिक रूप हुबेहुब इन्द्रासारखेंच होतें. परंतु हळू हळू इन्द्रानें त्रिताची जागा पटकावली व ऋग्वेदकालांतच त्रित इतका मागें पडला कीं, त्याचा उल्लेख ऋग्वेदांत फारच थोड्या ठिकाणीं आला आहे. ही जर उपपत्ति बरोबर असेल तर सोम व गरुड ( श्येन ) यांच्या पौराणिक कथेंत म्हटल्याप्रमाणें सोमास स्वर्गांतून सौदामिनीनें आणलें या गोष्टीस दुजोरा मिळतो. तथापि भरपूर पुरावा नसल्यामुळें यासंबंधीं अगदीं परस्पर भिन्न मतें व्यक्त झालीं आहेत. रोट हा त्रित यास वायु व जल यांची देवता समजत असे. हिलेब्रॅन्ट त्याला देदीप्यमान आकाशाची देवता समजतो. पेरीची अशी समजूत आहे कीं, ती तुफानाची देवता असून इन्द्राहूनहि प्राचीन आहे. पिशेलनें पूर्वी त्रित ही समुद्रदेवता आहे असें म्हटलें होतें; परंतु पुढें त्याचें मत बदलून तो आतां असें म्हणतो कीं, त्रित हा मूलतः एक मानवी वैद्य असून त्यास मागून देवतांमध्यें जागा मिळाली. हार्डी हा त्रित ही चंद्रदेवता आहे असें समजतो.

**अज एकपाद्.**—या देवतेचा अहिर्बुध्न्याशीं निकट संबंध असल्यामुळें त्याजबरोबर तिचें नांव पांच ठिकाणीं आलेलें आहे. अहिर्बुध्न्यावांचून या देवतेचा उल्लेख फक्त एकाच ठिकाणीं सांपडतो ( ऋ. १०.६५,१३ ). परंतु या स्थळीं 'तन्यतुः पावीरवी, एकपाद् अजः, दिवो धर्ता, सिन्धुः, समुद्रिय आपः, विश्वेदेवासः व सरस्वती' या ज्या देवांची प्रार्थना केलेली आहे तेच देव जवळजवळ सर्व पुढल्याच सूक्तांत अहिर्बुध्न्याबरोबर आले आहेत ( ऋ. १०.६६,११ ). या दोन ऋचांवरून असें दिसतें कीं अज एकपाद् ही एक वायव्यदेवता असली पाहिजे. परंतु नैघण्टुकामध्यें ( ५.६ ) अज एकपाद् ही एक स्वर्गीय देवता म्हणून दिलेली आहे. अथर्ववेदांत एके ठिकाणीं अज एकपादानें दोनहि लोक निश्चल केले असें म्हटलें आहे ( १३.१,६ ). तैत्तिरीय ब्राह्मणांत ( ३.१.२,८ ) अज एकपाद् हा पूर्वेस उदय पावल्याचें वर्णन आहे. या ऋचेवर टीका लिहितांना टीकाकारानें अज एकपाद् हा एक प्रकारचा अग्नि आहे असें त्याचें स्पष्टीकरण केलें आहे, व निरुक्त १२.२९ वर प्रवचन करतांना दुर्गाचार्यानें त्याचा सूर्य असा अर्थ केला आहे. यास्क हा अज एकपाद् कोण आहे यासंबंधीं आपलें कांहींच मत न देतां फक्त अज म्हणजे अजन, प्रेरणा करणारा व एकपाद् म्हणजे ज्यास एकच पाय आहे तो, अर्थात् अज एकपाद् म्हणजे जो एका पायानें पितो किंवा रक्षण करितो एवढेंच स्पष्टीकरण देतो. अज एकपादास देवतांत स्वतंत्र स्थान नाहीं तरी गृह्य विधींमध्यें अहिर्बुध्न्याप्रमाणेंच त्यालाहि पेयनिषेक देण्यांत येतो ( पारस्क० २.१५,२ ). महाभारतामध्यें अज एकपाद् याचा एकादश रुद्रांपैकीं एकाचें नांव किंवा शिवाचें अभिधान या दोन्हीहि अर्थी उपयोग आला आहे.

रोट व ग्रासमन हे अज एकपादास तुफानाची देवता मानतात व त्या शब्दाचा अर्थ एक पायाचा चोदना देणारा किंवा तुफान उत्पन्न करणारा असा करतात. व्हिक्टर हेनरीस ती सूर्यदेवता वाटते. हा 'एकटा जाणारा अज' म्हणजे चंद्र होय असें हार्डीचें मत आहे. पांचव्या एकानें अज एकपाद् म्हणजे जन्मरहित एक पायाचा अशी या शब्दाची व्युत्पत्ति लावून त्याचा अर्थ वियुक्त अशा गूढ लोकावर राहणारा असा केला आहे, व सहावे एक गृहस्थ अशी कल्पना लढवितात कीं 'एक पायाचा अज' हें नांव आरंभीं सौदामिनीस लाक्षणिक अर्थानें देण्यांत आलें होतें. मेघरूपी पर्वतांतील तिच्या चपलतेमुळें तिला अज असें म्हटलें असून पृथ्वीवर पडणारी तिची प्रकाशाची लकेर हाच त्या अजाचा एक पाय होय.

**मातरिश्वन्.**—मातरिश्वन् या देवतेला ऋग्वेदांत एकहि सूक्त दिलेलें नाहीं. मातरिश्वन् या देवाचें नांव फक्त सत्तावीस वेळां येथें आलेलें आहे. यापैकीं ऋग्वेदाच्या अर्वाचीन भागांत तें एकवीस वेळां आहे. तिसऱ्या मंडळांत तें पांचवेळां आलेलें आहे व सहाव्या मंडळांत तें एकदांच आलेलें आहे. या जुन्या सहा उल्लेखांत मातरिश्वन् देवाचें अग्नीशीं ऐक्य कल्पिलें आहे. मातरिश्वन् याची कथा अग्नि आणि अग्नि उत्पन्न करणारी व्यक्ति या कल्पनेवर रचलेली आहे. तरी या कथेचें पृथक्करण केलें असतां ही व्यक्ति आणि अग्नि हे भिन्न नाहींत असेंच दिसून येईल. वेदोत्तरकालीन वाङ्मयांत व ऋग्वेदेतर वेदांत मातरिश्वाची जी कल्पना आहे ती कल्पना ऋग्वेदकालीं उत्पन्न झाल्याचें या वेदाच्या अर्वाचीन भागावरूनहि दिसत नाहीं.

ऋग्वेदांत तीन ठिकाणीं अग्नीचें नांव म्हणून मातरिश्वन् हा शब्द आला आहे ( ऋ. ३.५,९; ३.२६,२; १.९६,४ ); एका अग्निसूक्ताचे शेवटीं ( ऋ. ९.९८,१९ ) मातरिश्वन् या शब्दाचें संबोधन आलेलें आहे. तेथेंहि तो अग्निवाचकच असावा. आणखी एका ऋचेंत मातरिश्वन् याची व्युत्पत्ति सांगतांना अग्नीचें एकरूप असेंच त्याला म्हटलें आहे. दिव्यबीजरूप असतांना याला तनूनपात् म्हणतात. हा जन्मला म्हणजे नराशंस होतो. ह्याच्या मातेच्या ठिकाणीं मातरिश्वन् म्हणून त्याची उत्पत्ति झाली तेव्हां वेगवान् वायूचें याला स्वरूप आलें. एकाच देवतेला अग्नि, यम, मातरिश्वन् अशीं भिन्न भिन्न नांवें ज्ञानी लोक देतात ( ऋ. १.१६४,४६ ); मातरिश्वन् याला एकदां बृहस्पतीचें स्वरूप म्हटलेलें आहे, व या बृहस्पतीची अग्नीशीं एकस्वरूपता अनेक वेळां आलेली आहे.

इतर ठिकाणीं अग्नि आणि मातरिश्वन् यांमध्यें भेद दाखविलेला आहे. अग्नि हा उच्च द्युलोक विभागांत जन्म पावून मातरिश्वन् याला दृष्ट झाला ( ऋ. १.१४३,२ ); मातरिश्वन् आणि विवस्वत् यांनां पहिल्यानें अग्नि दिसला. पुरोहिताच्या निवडीच्या प्रसंगीं दोन्ही विश्वविभाग थरारले ( ऋ. १.३१,३ ), द्युलोकस्थ ज्योतींत अग्नि हा सर्वांत उच्च असल्यानें त्यानें, मातरिश्वन् यानें गुप्त असलेला हव्यवाहन प्रदीप्त केला त्यावेळीं, आपल्या तेजानें आकाश सांवरून धरलें ( ऋ. ३.५,१० ). या ऋचेपूर्वीच्या ऋचेंत अग्नीला मातरिश्वन् म्हटलें आहे. दोन लगतच्या ऋचांत हा असा विरोध उत्पन्न होण्याचें कारण हेंच असलें पाहिजे कीं, अग्नीच्या एका विशिष्ट स्वरूपाचें नांव मातरिश्वन् हें असावें आणि हें नांव सामान्यतः अग्नीचें नांव म्हणून केव्हां केव्हां वापरण्यांत येत असावें. याप्रमाणें वरील दोन ऋचांपैकीं दुसरींत विशिष्ट अग्नीचें मातरिश्वन् हें नांव आहे, व पहिलींत सामान्यतः अग्नीचें वाचक म्हणून तें नांव वापरलें आहे. मातरिश्वन् व अग्नि यांजमध्यें भेद दाखविणारीं आणखी स्थळें येणेंप्रमाणें: मातरिश्वन् यानें यज्ञसभेच्या ध्वजाचे ठिकाणीं असणारा द्विजन्मा व तेजस्वी यजमान यास भृगूकडे एक देणगी म्हणून आणून सादर केलें ( ऋ. १.६०,१ ). मातरिश्वन् यानें द्युलोकांतून अग्नि आणिला आणि श्येनानें अद्रीवरून सोम आणिला ( ऋ. १.९३,६ ), मातरिश्वन् यानें द्युलोकांत राहणाऱ्या वंदनीय पुरोहितापासून अग्नि आणिला ( ऋ. ३.२,१३ ); मातरिश्वन् आणि देव यांनीं अग्नि तयार केला. मनुष्यासाठीं म्हणून सर्वांत पहिला पूजनीय पुरोहित अग्नि हा भृगूंनीं उत्पन्न केला ( ऋ. १०.४६,९ ); या अग्निदेवाला मातरिश्वन् यानें फार दूरवरून मनुष्यांसाठीं आणिलें ( ऋ. १.१२८,२ ); विवस्वत् याचा दूत मातरिश्वन् यानें थोर शक्तीच्या मरुद्देवांनीं आपोदेवतांच्या अंकावर ज्याला धरलें त्या वैश्वानर अग्नीला दूरवरून येथें आणिलें ( ऋ. ६.८,४ ); मातरिश्वन् यानें देवांकरितां मंथनानें उत्पन्न झालेल्या अग्नीला दूर प्रदेशांतून आणिलें ( ऋ. ३.५,९ ); गूढ अग्नि मातरिश्वन् यानें मंथनानें उत्पन्न केला व हा अग्नि त्यानें मनुष्यांच्या घरांतून स्थापन केला ( ऋ. १.१४१,३; १.७१,४; १.१४८,१ ),

उत्तरकालीन सूक्तांत आणखी कांहीं स्थलें मातरिश्वन्च्या उल्लेखाचीं सांपडतात, परंतु तेथें त्याच्या विशिष्ट स्वभावावर फारसा प्रकाश पडत नाहीं. अशा दोन स्थलीं मातरिश्वन् हा सोम शुद्ध करून त्याचा आस्वाद घेऊन आनंद करीत आहे असें वर्णन आहे (ऋ. ९.६७,३१; १०.११४,१ ); व आणखी एका स्थलीं इन्द्राबरोबर सोमपान करणाऱ्या पितरांबरोबर याचें नांव आहे ( वालखिल्य. ४.२ ); इन्द्राची मातरिश्वन् याशीं कुशल कारागीर म्हणून तुलना केली आहे ( ऋ. १०.१०५,६ ); या ठिकाणीं मातरिश्वन्ची कुशलता म्हणजे अग्नि उत्पन्न करण्याची कुशलता असावी. एका विवाहसूक्तांत ( ऋ. १०.८५,४७ ) विवाह करणाऱ्या वधूवरांचीं अंतकरणें जोडण्यासाठीं इतर देवतांबरोबर आह्वान करून मातरिश्वन् यालाहि बोलाविलें आहे. त्याप्रसंगीं तो वरीलप्रमाणें कुशल कारागीर म्हणूनच त्याला आमंत्रण असावें. आणखी एका दुर्बोध ऋचेंत(ऋ. १०.१०९,१ ) मातरिश्वन् याला अमर्याद आणि भ्रमण करणारा असें म्हटलें आहे. हीं विशेषणें असें दाखवितात कीं, उत्तरकालीन मातरिश्वन् या संबंधाची जी कल्पना रूढ झाली तिचीं बीजें ऋग्वेदकालीं अस्तित्वांत होतीं.

द्युलोकस्थ अग्नीचें व्यक्तित्व आरोपिलेलें एक रूप म्हणजे मातरिश्वा होय. व हाच मातरिश्वा प्रोमेथ्युसप्रमाणें द्युलोकांतून पृथ्वीवर गुप्त असलेला अग्नि आणणारा होता. या प्रकारची मातरिश्वन् याची कल्पना ऋग्वेदांतील वरील उल्लेखांवरून व्यक्त होते. अशा मातरिश्वन् याचें मूळ बीज मेघांतील वीज

हेंच असलें पाहिजे असें वाटतें. मेघांतील वीज हें त्याचें रूप मानलें म्हणजे द्युलोकांतून पृथ्वीवर विवस्वानाचा तो दूत म्हणून येतो हें त्याचें वर्णन ठीक जुळतें ( ऋ. ६.८,४ ). या मातरिश्वाप्रमाणें अग्नीहि या दोन लोकांमध्यें विवस्वानाच्या दूताचें काम करणारा आहे. अथर्ववेदांत अग्नीचें गूढ नांव या नात्यानें मातरिश्वन् शब्द सांपडतो ( अ. वे. १०.८,३९ व ४० ); परंतु अथर्ववेदांत व इतर संहितांत, ब्राह्मणांत व त्यानंतरच्या वाङ्मयांत मातरिश्वन् हा शब्द वायूचें नांव म्हणून सांपडतो. मातरिश्वन् याचा अर्थ वायू व त्याचा मूळ अर्थ अग्नि यांजमधील दुवा ऋ. ३.२९,११ या ठिकाणीं व ऋ. १.७९,१ या ठिकाणीं सांपडतो. मातरिश्वन् या रूपानें अग्नि आपल्या मातेच्या ठिकाणीं उत्पन्न झाला तेव्हां त्यानें वेगवान् वायूचें रूप घेतलें ( ऋ. ३.२९,११ ); अग्नि हवेमध्यें सर्पाप्रमाणें चलनवलन व फूत्कार करीत असतां सोसाट्याच्या वाऱ्याप्रमाणें असतो ( ऋ. १.७९,१ ); अशा कल्पनांवरून पुढें मातरिश्वन् याचा अर्थ वायू असा करण्याची कल्पना निघाली असावी.

मातरिश्वन् या शब्दाला समान असा शब्द इंडो–यूरोपीय ग्रंथांत कोठेंहि सांपडत नाहीं. ऋग्वेदांतील सूक्तकारांनीं आपल्या मातेच्या ठिकाणीं तयार केला जाणारा अशी त्याची व्युत्पत्ति जी दिली आहे ती थोडीफार सार्थ असावी. श्वि ( फुगणें ) हा श्वन् मधील धातु असावा; व मातरिश्वन् याचा अर्थ आपल्या मातेच्या ठिकाणीं वाढणारा असा असावा. अग्नीलाहि आपल्या मातांच्या ठिकाणीं वाढणारा असें म्हटलें आहे ( ऋ. १.१४५,५ ); माता या शब्दानें खालची अरणी किंवा विजेचा मेघ हा अर्थ घेत असावेत; बहुधा दुसराच अर्थ असावा. कारण मातरिश्वन् द्युलोकांतील आहे असें वर्णन आहे. यास्क आपल्या निरुक्तामध्यें ( ७.२६ ) मातरिश्वन् हें वायूचें नांव आहे असें धरून मातरि ( अंतरिक्षाचे ठिकाणीं ) श्वन् ( श्वस् किंवा आशु अन् ) म्हणजे श्वासोच्छ्वास करणारा ( वाहणारा ) अशी याची व्युत्पत्ति देतो.

**आपदेवता.**—आप म्हणजे जलें यांचें ऋग्वेदाच्या चार सूक्तांत स्तुतिस्तोत्र गाइलें आहे ( ऋ. ७.४७ व ४९; १०.९ व ३०; इ. ). इतरत्रहि मधूनमधून कांहीं ऋचांतून त्यांचें गुणकीर्तन येतें. दुसऱ्या देवतांबरोबरहि यांना कांहीं कांहीं ऋचांतून आह्वान केलें आहे. यांच्या ठिकाणीं व्यक्तित्वारोप केलेला जो सांपडतो तो अगदीं प्राथमिक स्वरूपाचा आहे. आप या माता आहेत, तरुणपत्नी आहेत, व यज्ञाला येणाऱ्या व वर देणाऱ्या देवता आहेत. देवांच्या मार्गानें जाणाऱ्या या देवता आहेत ( ऋ. ७.४७,३ ); वज्रधारी इन्द्रानें त्यांजकरितां प्रवाहमार्ग खोदून दिला ( ऋ. ७.४७,४; ७.४९,१ ); आणि या इन्द्राचे नियम केव्हांहि मोडीत नाहींत ( ऋ. ७.४७,३ ). सवित्याच्या आज्ञेंत या वागतात असेंहि विधान येतें. या आपोदेवी स्वर्गीय असून विशिष्ट प्रवाहमार्गानें जाऊन समुद्राला मिळणाऱ्याहि आहेत ( ऋ. ७.४९,२ ); देवांची वस्ति जेथें आहे, मित्र आणि वरुण ज्या ठिकाणीं असतात, तेथें या आपोदेवी असतात असा ध्वनि जागोजाग आहे ( ऋ. १०.३०,१ ); सूर्य त्यांजवळ असतो ( ऋ. १.२३,१७ ); वरुण त्यांच्यामध्यें फिरतो आणि मनुष्यांचें सत्यासत्य पाहत असतो ( ऋ. ७.४९,३ ); अशा स्थलीं वृष्टिजल हेंच आपोदेवींचें स्वरूप असावें असें दिसतें. परंतु नैघण्टुकामध्यें ( ५.३ ) भूलोकस्थ देवींमध्येंच आपोदेवींचा अंतर्भाव केला आहे. ( यास्क निरुक्त. ९.२६ ).

अग्नि जलांत राहतो असें त्याचें वर्णन वारंवार येतें. जलांमध्यें अग्नीनें प्रवेश केला आहे ( ऋ. ७.४९,४ ); अपोदेवींनीं अग्नीला जन्म दिला ( ऋ. १०.९१,६ ); अग्नीच्या एका रूपाला अपांनपात् असेंहि नांव आहे. आप ह्या माता आहेत ( ऋ. १०.१७,१० ); या जगताच्या पत्नी आहेत. त्याच्या इतक्याच या वृद्ध आहेत. त्याचें यांचें मूळ सारखेंच आहे ( ऋ. १०.३०,१० ); प्रेमळ मातां-प्रमाणें त्यांनीं आपला पवित्र रस लोकांस द्यावा अशी त्यांची प्रार्थना केली जाते ( ऋ. १०.९०,२ ); मातेचे गुण त्यांचे ठिकाणीं अतिशय आहेत. सर्व चराचरांच्या त्या मातृस्थानीं आहेत ( ऋ. ६.५०,७ ).

आपोदेवता शुद्ध करितात, स्वच्छ करितात. या देवता कल्मष दूर करतात. यांच्या सान्निध्यांतून भक्त शुद्ध व पवित्र होऊन निघतो ( ऋ. १०.१७,१० ); हिंसा, शिव्या शाप देणें, खोटें बोलणें वगैरे नैतिक पातक दूर करण्यासाठींहि यांची प्रार्थना केली जाते ( ऋ. १.२३,२२ ); यांचे ठिकाणीं रोगनाशनाचा गुण आहे ( ऋ. ६.५०,७ ); या रोग दूर करितात, दीर्घ आयुष्य देतात. निरामयत्व, अमरता, हें सर्व यांच्या पोटीं मिळतें ( ऋ. १०.९,५ ते ७ ); घरांमध्यें मनुष्याचें आरोग्य राहावें यासाठीं त्यांची देखरेख असते. ( हि. गृ. सू. २.४,५ ); सोमपुरोहित अपांनपात् याला बलि देतो तेव्हां यांनाहि त्याजवळ आसन घेऊन बलि ग्रहण करण्याची प्रार्थना करण्यांत येते ( ऋ. १०.३०,१४ ); आपांचा मधाशींहि संबंध पुष्कळवेळां आलेला आहे. आपो-देवता आपलें दूध मधाशीं मिसळतात ( ऋ. १.२३,१६ ); आपाची ऊर्मि भरपूर मधानें युक्त अशी असते. या ऊर्मीत घृत थबथबत असलें म्हणजे इन्द्राचें तें पेय होतें. या पेयानें इन्द्राला आनंद व उल्हास उत्पन्न होतो ( ऋ. ७.४७,१ व २ ); ज्या मधमिश्रित जलाचें पान करून इन्द्राला वीराची ताकद प्राप्त झाली असें जल देण्याविषयीं अपांनपात् याची प्रार्थना केलेली आहे ( ऋ. १०.३०,४ ); जलांची प्रार्थना करून देवांना बंदींतून सोडविणाऱ्या इन्द्रासाठीं प्रभूत

मधानें युक्त व देवांना आनंदविणारी अशी मोठी ऊर्मि आपोदेवतांनीं वरुन खालीं सोडावी अशी त्यांची प्रार्थना केली आहे. ही ऊर्मि अथवा लाट द्युलोकांत उत्पन्न होते व ती मादक असून इन्द्राचें तें पेय आहे असेंहि या प्रार्थनेंत म्हटलेलें आहे (ऋ. १०.३०,७ व ९); या उल्लेखांवरून द्युलोकस्थ जलांत इन्द्रपेय जो स्वर्गीय सोम तो होता अथवा हीं जलेंच म्हणजे इन्द्राचें पेय जें स्वर्गीय सोम तें होय असें क्वचित् मानित असत असें दिसतें. इतर उल्लेखांत भूलोकस्थ सोम तयार करण्यासाठीं ज्या जलांचा उपयोग करण्यांत येतो त्यांचा संबंध दिसतो. घृत, दूध आणि मध यांशीं युक्त होऊन इन्द्रासाठीं तयार केलेला सोम घेऊन अध्वर्यूंशीं मनानें संवाद करीत आपोदेवता दृश्यमान होतात (ऋ. १०.३०,१३); सुंदर कुमारिकांशीं तरुणानें स्नेह करावा त्याप्रमाणें सोम आपोदेवींच्या सहवासांत रममाण होतो. प्रेमबद्ध पुरुषाप्रमाणें तो त्यांजवळ जातो. आपोदेवी या तरुणांपुढें कुमारीप्रमाणें विनम्र होतात (ऋ. १०.३०,५ व ६).

**पर्जन्य.**—ऋग्वेदीय देवतांमध्यें या देवाचा अतिशय गौण भाग आहे; याचीं केवळ तीन सूक्तें असून तीसांपेक्षांहि कमी वेळां याचें नांव त्या संहितेंत सापडतें. अथर्ववेदांत एक पर्जन्यसूक्त (४.१५) आहे पण त्यांतील पुष्कळशा ऋचा ऋग्वेदांतीलच आहेत. पुढील उताऱ्यांत 'पर्जन्य' शब्दाचा अर्थ "पावसाचा ढग" असाच घेतला पाहिजेः (ऋ. १.१६४, ५१; १.३८,९; ५.५३,६; १०.९८,१;८; ९.२,९; ९.२२,२; अथर्व. १०.१०,७) या सर्व ठिकाणीं भाष्यकार पर्जन्याचा अर्थ "मेघ" असा करितात. कांहीं ठिकाणें अशीं आहेत कीं, तेथें पर्जन्याचा सामान्य अर्थ करावा कीं, विशेषनाम घेऊन अर्थ लावावा अशी अडचण येऊन पडते. उदाहरणार्थ अग्नीचें बल पर्जन्यासारखें दुमदुमतें असें म्हटलें आहे (ऋ. ८.९१,५); आणि पर्जन्याकडून उद्वोधित होऊन शब्द करणारे असें बेडकांनां एके ठिकाणीं (ऋ. ७.१०३,१) म्हटलें आहे. तथापि बहुतेक सर्व उताऱ्यांतून पावसाच्या ढगाची (मेघाची) अधिष्ठात्री देवता असा या शब्दाचा स्पष्ट अर्थ दिसतो; व मेघाचीं सर्व विशेषणें बहुधा याला लावण्यांत येतात. पर्जन्यावरील सगुणत्वारोप पुष्कळ वेळां प्राणिवाचक असतो. त्याला पुष्कळदां वृषभ असें म्हटलें आहे (ऋ. ५.८३,१; अथर्व ४.१५,१). कांहीं वेळां पर्जन्य वांझ गाईप्रमाणें कांहीं वेळां स्वेच्छेनुसार आपल्या शरीराची निरवानिरव करणारा फलदायी असतो (ऋ. ७.१०१,३).

पाऊस पाडणें हें त्याचें मुख्य वैशिष्ट्य आहे. पाऊस पाडण्यासाठीं (ऋ. ७.१०१,५) आणि तो पाडल्यानंतर थांबविण्यासाठीं (ऋ. ५.८३,१०) त्याची विनवणी केली आहे. तथापि पर्जन्य आणि मरुत् यांची पाऊस पाडण्याची कर्तबगारी मित्रावरुणाच्या कर्तबगारीपेक्षां गौण आहे असा गर्भितार्थ निघतो (ऋ. ५.६३,३–६). तो पुष्कळवेळां गडगडतो असें वर्णन आहे (ऋ. ५.८३). गडगडत तो वृक्ष, राक्षस आणि दुष्ट यांनां पाडतो; याच्या महावधाला सर्व विश्व भितें (ऋ. ५.८३,२). पर्जन्याचा विद्युतशींहि संबंध आणला आहे. जेव्हां पर्जन्य आपल्या रेतानें पृथ्वीच्या ठायीं गर्भधारणा करितो तेव्हां वारे वाहातात, विजा पडतात (ऋ. ५.८३,४). ऋग्वेदांतील एका विश्वेदेवसूक्तांत मेघ आणि उदकें यांनीं समृद्ध असून विद्युतानें द्यावापृथिवी सिंचन करून प्रेरित करितो व गडगडतो आणि ओरडतो असें जें एका देवाचें वर्णन आहे (ऋ. ५.४२,१४) तो पर्जन्यच असावा असें दिसतें.

पाऊस पाडणारा म्हणून स्वाभाविकपणें पर्जन्य हा एक विशेष दर्जाचा वनस्पत्युत्पादक व वर्धक आहे. जेव्हां हा पृथ्वी घृतगर्भा करितो, तेव्हां वनस्पती उगवतात; याच्या व्रतांत प्रत्येक जातीची वनस्पति येते; यानें भोजनाकरितां ओषधी उत्पन्न केल्या (ऋ. ५.८३,४; ५;१०; तु. ६.५२,६; अथर्व. ४.१५; २.३,१५; ८.७,२१). वनस्पतींतच फक्त पर्जन्य बीज घालतो असें नाहीं तर गायी, घोड्या आणि स्त्रिया (ऋ. ७.१०२,२) यांच्या ठिकाणींहि गर्भाधान करितो; गर्भ घालण्यासाठीं याची प्रार्थना केली आहे (ऋ. ५.८३,७ तु. ६.५२,१६). तो शश्वतींत गर्भ घालणारा (रेतोधा) वृषभ आहे; तो चराचराचा आत्मा आहे (ऋ. ७.१०१,६; तु. १. ११५,१). हा स्वराट् (स्वतंत्र राजा) अखिल जगतावर राज्य करितो, सर्व भुवनें आणि तीन द्यावा (स्वर्ग) याच्यांत अधिष्ठित झालीं आहेत आणि याच्याठिकाणीं तीन आप वाहतात(ऋ. ७.१०१,२, ४.५) असेंहि याचें वर्णन केलेलें आहे. याच्या उत्पादक व्रतामुळें पुष्कळ वेळां याला "पिता" ही पदवी मिळते (ऋ. ७.१०१,३; ९.८२,३; अथर्व. ४.१५, १२; १२.१,१२). "आमचा असुर (देव) पिता" असें याला एकदां (ऋ. ५.८३,६) संबोधिलें आहे; दुसऱ्या जागीं "असुरांची माया" (ऋ. ५.६३,३;७) असें कदाचित् याच्याबद्दलच म्हटलें असावें. असें मॅकडोनेल म्हणतो पण या दोन्ही ऋचांत मित्रावरुण हे शब्द स्पष्ट आहेत.

गर्भितार्थावरून पृथिवी याची पत्नी दिसते (ऋ. ५.८३,४; ७.१०१,३; तु. १.१६०,३). अथर्ववेदांत (ऋ. १२.१,१२) पृथिवी माता, पर्जन्य पिता असें म्हटलें आहे, पण दुसरीकडे (अ. वे. १०.१०,६) वशा ही त्याची पत्नी असें स्पष्ट वचन आहे. यावरून आणि वृषभ या त्याच्यासंबंधींच्या प्राणिगुणारोपाच्या कल्पनेवरून आणि गडगडाट, विद्युत् व पाऊस यांचा त्याच्याशीं असलेल्या संबंधावरून द्यौःशीं याचें सादृश्य दिसतें (ऋ. १०.४५,४; २.४,६; २७,१५); एकदां तर याला द्यौःचा पुत्र म्हटलें आहे (ऋ.७.१०२,१). पर्जन्यानेंच स्वतः एक वत्स, वनस्पतिबीज, उत्पन्न केल्याचें म्हटलें आहे; हा

वत्स कदाचित् विद्युत् असावा. तो सोमहि असूं शकेल, कारण एकदां त्याचा बाप पर्जन्य (ऋ. ९.८२,३) असें वर्णन आलें आहे व त्याला पर्जन्यानें वाढविला (ऋ.९.११३,३) असें म्हणतात.

पर्जन्याचा दुसऱ्या कित्येक देवतांशीं संबंध जोडला आहे. त्याचा वाताशीं निकट संबंध आहे व एक अपवाद (येथें तो अग्नीशीं संयुक्त आहे) सोडून पर्जन्यवात हीच संयुक्तदेवता दृष्टीस पडते. पर्जन्याबरोबर मरुतांनां सुद्धां कांहीं ठिकाणीं पाचारिलें आहे (ऋ. ५.६३,६; ८३,५). एका सूक्ताच्या दोन ऋचांतून (ऋ.६.५२,६;१६) अग्नीचीहि याच्याबरोबर संभावना केली आहे. इन्द्र आणि पर्जन्य यांचें बरेंच सादृश्य आहे व या दृष्टीनें दोघांची तुलना केलेली आढळते (ऋ. ८.६,१).

पर्जन्य नांवाच्या व्युत्पत्तीविषयीं शंका आहे. तथापि लिथुॲनियन पर्जन्यदेव जो परकूनस् याच्याशीं या नांवांतील वर्णसादृश्यावरून बहुधा नेहमीं ऐक्य दाखविण्यांत येतें. या दोनहि नांवाचा संबंध खरा असला तरी, त्यांचें भारत-यूरोपीय रूप सामान्यवाचकच होतें. एवढें स्पष्ट दिसतें कीं, ऋग्वेदांत हा शब्द गडगडणाऱ्या पावसाच्या ढगाचा सामान्यवाचक व त्याचप्रमाणें त्याच्या सगुणत्वाचें विशेषनाम आहे. मेघ आणि पर्जन्यदेव हे दोनहि अर्थ ब्राह्मणग्रंथांत व पुढील वाङ्मयांत टिकले आहेत.

**अपांनपात्.**—अपांनपात् नांवाची देवता ऋग्वेदांत एका संपूर्ण (२.३५) सूक्तांत स्तविली आहे, नदीसूक्ताच्या दोन ऋचांतून (ऋ. १०.३०,३;४) पाचारली आहे आणि त्या संहितेंत एकंदर अजमासें तीसवेळां नांवानें उल्लेखिली गेली आहे. उदकें (आपः) दीप्तिमान् अपांनपात्च्या सभोंवतीं उभीं राहातात; आपो-युवती या युवकाच्या भोंवतीं फिरतात; तीन देवी या देवाला अन्न अर्पण करण्याची इच्छा करितात; तो पहिल्या मातांचें (पूर्वसूनाम्) दुग्ध प्राशन करितो (ऋ. २.३५,३–५). हा वृषभ त्यांच्यांत गर्भ उत्पन्न करितो, हा शिशु त्यांचें स्तनपान करितो आणि त्या याचें चुंबन घेतात (ऋ. २.३५,१३); अपांनपात् उदकांत बलिष्ठ होऊन विराजतो (ऋ. २.३५,७). हा इन्धनाखेरीज उदकांत प्रकाशतो (ऋ. २.३५,४; १०.३०,४). अपांनपात् हिरण्यरूप, हिरण्यसदृश आणि हिरण्यवर्ण आहे; हिरण्ययोनींतून निघून खालीं बसतो आणि आपल्या भक्ताला अन्न अर्पण करितो (ऋ. २.३५,१०). ज्याला युवती इन्धतात, जो हिरण्यवर्ण आहे, ज्याचें घृत हेंच अन्न आहे अशा अपांनपाताचें रूप अन्तर्हित होऊन वाढतें (ऋ. २.३५,११). याची गाय (त्याच्या) घरीं चांगली दुभती आहे (ऋ. २.३५,७). मनोजवाप्रमाणें वेगवान् घोडे (वृषणः) अपांनपाताला घेऊन जातात (ऋ. १.१८६,५). अपांनपाताचा नद्यांशीं संबंध आणला आहे (नाद्यः ऋ. २. ३५,१). त्यानें सर्व भूतजात उत्पन्न केले, त्या सर्व याच्या शाखा होत (ऋ. २.३५,२;८). या सूक्ताच्या शेवटच्या ऋचेंत या देवतेला अग्नि म्हणून पाचारिलें आहे, आणि म्हणून त्याला अग्नीशीं एकरूप मानलें पाहिजे. याच्या उलट अग्नीला कांहीं ठिकाणीं अपांनपात् म्हटलें आहे. अग्नि हा अपांनपात् आहे (ऋ. ३.९,१). हा अपांनपात् अग्निप्रिय होता म्हणून पृथ्वीवर बसतो (ऋ. १.१४३,१). पण त्यांच्यांत सुद्धां फरक दाखविला आहे. अग्नि अपांनपाताला बरोबर घेऊन वृत्रावर विजय मिळवितो (ऋ. ६.१३,३). या ठिकाणीं अपांनपात् हा जणूं काय दुसऱ्याच्या शरीराशीं संगत झाला आहे असें दिसतें. "आशुहेमन्" हें अपांनपाताला तीन वेळां योजलेलें विशेषण अन्यत्र अग्नीला योजण्यांत येतें.

निरनिराळ्या देवतासमूहांत विशेषतः अज एकपाद (ऋ. २.३१,६; ७.३५,१३), अहिर्बुध्न्य (ऋ. १.१८६,५; २.३१,६; ७.३५,१३) आणि सवितृ यांच्या सान्निध्यानें अपांनपाताचा उल्लेख येतो. निदान एकदां तरी सवितृचें विशेषण म्हणून हें नांव आलें आहे, मग कदाचित् सवितृ हें अग्नीचेंच एक रूप म्हणून तें योजलें असावें.

जो हिरण्यवर्ण आहे, विद्युतानें आच्छादलेला आहे, जो अति उंचस्थानीं वास करितो, अन्तर्हित राहून वाढतो, दैदीप्यमान होतो, जो उदकांचा पुत्र आहे, जो पृथिवीवर अवतरतो आणि जो अग्निसारूप्य पावतो, तो अपांनपात् मेघाच्छादित असें अग्नीचें विद्युद्रूप असावेंसें दिसतें. कारण, अग्नीला उघड अपांनपात् म्हटलें आहे एवढेंच नव्हे तर त्याला उदकांचा गर्भ (ऋ. ७.९,३; १.७०,३) अशीहि संज्ञा आहे. हा अपांगर्भ मानवांच्या घरांतून वास करितो (ऋ. ३. ५,३), त्याचें स्थान उदकांत आहे (ऋ. ८.४३,९), आणि उदकें व ओषधी यांचा गर्भ जो अग्नि त्याला दोन अरणी प्रसवतात (ऋ. ३.१,१३). अग्नीला "अद्रीचा पुत्र" (अद्रेः सूनो) असेंहि म्हटलेलें आहे (ऋ. १०.२०,७ तु. ६.४८,५) व त्याचें कारण विद्युद्रूप अग्नि मेघाद्रीपासून उत्पन्न होतो. स्वर्गीय आणि भूलोकचीं अग्नीचीं रूपें यांच्याशीं विरोध करण्याकरितां कीं काय, उदकें, समुद्र, स्वर्गाची कांस, उदकांची मांडी याठिकाणीं उत्पन्न केलेला तिसरा अग्नि वर्णिला आहे (ऋ. १०.४५,१–३). वस्तुतः स्वर्गीय अग्नीचें उदकांतील स्थान, वैदिक दैवतेतिहासांतील उत्तम प्रकारें सिद्ध झालेल्या गोष्टींपैकीं एक होय.

अपांनपात् भारतीय दैवतेतिहासांतील नसून, पर्शु-भारतीय कालांत तो पडतो. अवेस्तांत अपांनपात् ही एक जलदेवता असून ती त्यांच्या तळाशीं राहातें, तिच्याभोंवतीं स्त्रियांचा

घोळका असतो आणि बहुतेक नेहेमीं त्यांच्यासकट या देवतेला आह्वान केलें जातें, वेगवान् घोडे अपांनपाताला घेऊन जातात आणि समुद्राच्या तळाशीं यानें तेज पकडून ठेवल्याचें सांगतात. ही देवता कोण असावी यासंबंधांत यूरोपीय विद्वानांचें एकमत नाहीं. ओल्डनबर्गचें असें मत आहे कीं, अपांनपात् ही मूळ एक साधी जलदेवता असावी पण पुढें हिच्याशीं अगदीं विसदृश असा जो उदकोत्पन्न अग्नि, त्याला व या देवतेला एक मानूं लागले असावेत. याला पुरावा तो असा आणतो कीं, दोन अपांनपात्-सूक्तांपैकीं एक ( १०.३० ), सूत्रोक्त विधींत, केवळ उदकासंबंधीं म्हणून असलेल्या संस्कारांशीं निगडित आहे व त्याचप्रमाणें दुसरें २.३५ देखील आपला जलभरित स्वभाव चांगला व्यक्त करितें. हिलेब्रँटच्या मतें अपांनपात् म्हणजे चंद्र आणि मॅक्सम्युलरच्या मतें तो सूर्य किंवा विद्युत् होय.

**अहिर्बुध्न्य.**—अहिर्बुध्न्य ( पातालसर्प ) ऋग्वेदांत फक्त बारावेळां उल्लेखिलेला असून, याचें नांव विश्वेदेवसूक्तांत मात्र दिसतें. अजएकपादाशीं पांच वेळां, अपांनपात्शीं तीन वेळां, समुद्राशीं तीन वेळां, आणि सवित्याशीं दोन वेळां याची सांगड घालण्यांत आली आहे. याला एकट्यालाच ज्यांत आह्वान केलें आहे अशा साऱ्या तीन ऋचा (ऋ. ५.४१,१६; ७.३४, १६;१७ ) सांपडतात. जेव्हां दुसरी एकच देवता याच्याबरोबर उल्लेखिली असते, तेव्हां ती अपांनपात् (ऋ. १. १८६,५ ) तरी असते किंवा अजएकपाद ( ऋ. १०.६४,४ ) असते. जेव्हां अहिर्बुध्न्य आणि अजएकपाद एकाच ऋचेंत आले असतात तेव्हां ते नेहमीं ( एक लहानसा अपवाद (ऋ.१०.६६,११ हा सोडून) सन्निध असतात. ज्यांत हें नांव पाचारिलें आहे असे अतिशय वैशिष्ट्यबोधक समूह म्हणजे अजएकपाद, अहिर्बुध्न्य, समुद्र, अपांनपात्, पृश्नि (ऋ.७.३५, १३ ); अहिर्बुध्न्य, अज एकपाद, त्रित, ऋभुक्षन्, सवितृ, अपांनपात् ( ऋ. २.३१,६ ); समुद्र, सिंधु, रज, अन्तरिक्ष, अजएकपाद, गडगडणारे अर्णव, अहिर्बुध्न्य आणि विश्वेदेव ( ऋ. १०.६६,११ ). या सोबत्यांवरून पाहतां, अहिर्बुध्न्य ही अन्तरिक्षांतील देवता असावीशी दिसते; नैघंटुकांत ( ५.४ ) तसेंच म्हटलें आहे. पण ज्याठिकाणीं त्याचाच फक्त उल्लेख आला आहे त्यावरूनच कांहीं निश्चित माहिती गोळा करितां येईल. याच्याविषयीं ज्यास्त माहिती ज्या ऋचेंत ( ऋ. ७.३४, १६) आहे तेथें कवि म्हणतो "उदकांत जन्मलेल्या आणि रजांतील (आकाशांतील) नदीच्या तळाशीं बसलेल्या अहीला मी उक्थांनीं स्तवितों." यावरून तो अन्तरिक्षांतील समुद्रांत राहातोसें दिसतें; यास्क बुध्न्य याचा अर्थ अन्तरिक्ष असा घेतो ( निरु. १०.४४ ). याच्या पुढील ऋचेंत आणि दुसऱ्या एके ठिकाणीं (ऋ. ५.४१,१६) आपल्या भक्तांनां दुखापत न करण्याविषयीं याला विनविलें आहे. यावरून त्याच्या स्वभावांत कांहीं तरी पीडादायक असावें असें अनुमान निघतें. अहि हें वृत्राचें सामान्य विशेषण आहे आणि उदकें घेरणारा वृत्र, उदकांनीं वाहून गेलेला आहे, किंवा उदकांत, किंवा अन्तरिक्षाच्या तळा( बुध्न्य )शीं बसला आहे, असें त्याचें वर्णन आढळतें. अन्तरिक्षांतील अग्नीला अहि असें म्हटलें असून ( ऋ. १.७९,१ ), आकाशाच्या तळाशीं ( बुध्न्ये ) तो प्रदीप्त केल्याचेंहि म्हटलें आहे ( ऋ. ४.११,१ ). तेव्हां याचा सारांश असा निघतो कीं, जरी अहिर्बुध्न्य अपांनपाताचा सदृश असा देव म्हणून मानण्यांत येतो, तरी तो मुळांत अहि वृत्रापेक्षां निराळा नव्हता. मागाहूनच्या वैदिक ग्रंथांत अहिर्बुध्न्याचा अग्नि गार्हपत्याशीं संबंध लावला आहे ( वा. सं. ५. ३३; ऐ. ब्रा. ३.३६; तै. ब्रा. १.१.१०,३ ) उत्तरकालीन वाङ्मयांत अहिर्बुध्न्य हें रुद्राचें व शिवाचें नांव म्हणून येतें.

**सरस्वती नदीदेवता.**—ऋग्वेदामध्यें पृथ्वीवरील नद्यांनां देवता मानून त्यांनां बरेंच महत्त्व दिलें आहे. ऋग्वेदांतील 'नदी-स्तुति' नामक प्रसिद्ध सूक्तांत (ऋ. १०. ७५) सिंधुनदीची बहुतेक स्तुति असून पांचव्या व सहाव्या ऋचांत तिला मिळणाऱ्या नद्यांची स्तुति आहे. शिवाय विपाश व शुतुद्री यांची स्तुति दुसऱ्या एका सबंध सूक्तांत ( ऋ. ३.३३ ) केली आहे.

तथापि इतर कोणत्याहि नदीपेक्षां सरस्वतीनदीचें महत्त्व फार गायिलें आहे. या नदीवर व्यक्तित्वाचा अध्यारोप इतरांपेक्षां फार पूर्णतेनें केलेला आहे, तरी कवींच्या मनश्चक्षूपुढें देवतेबरोबर नदीचें स्वरूप नेहमीं उभें असे. सरस्वतीच्या स्तुतिपर ऋग्वेदांत तीन सूक्तें असून शिवाय अनेक ठिकाणीं तिचा उल्लेख आहे. सरस्वती, शरयू व सिंधु यांची महानद्या म्हणून स्तुति केली आहे ( ऋ. १०.६३,९ ); आणि दुसऱ्या ठिकाणीं (ऋ. १०.७५,५ ); गंगा, यमुना, सरस्वती, शुतुद्री, परुष्णी व दुसऱ्या कांहीं मिळून एकवीस नद्यांनां संबोधिलें आहे. सरस्वतीनदीच्या तीरावर वास करणाऱ्या राजांचा व इतर लोकांचा उल्लेख ऋ. ७.९६,२; ८.२१,१८ मध्यें आहे. सरस्वतीनदीचें पाणी पोषक असून ती सर्वांत मोठी आहे; आणि तिचें पाणी अत्यंत स्वच्छ असून ती पर्वतांपासून, द्युलोकस्थ समुद्रापासून निघते (ऋ.७.९५,१ व २; ५.४३,११). आपल्या अफाट लाटांनीं ती पर्वतांचीं शिखरें फोडून बाहेर पडते व तिचा मोठा व जोराचा प्रवाह खळखळाट करीत वाहूं लागतो (ऋ. ६.६१,२ व ८ ). महानद्यांत ती सर्वांत मोठी व सर्वांपेक्षां अधिक जोरानें वाहणारी आहे; व तिनें आपलें जलरूपी दुग्ध देण्याचें बंद करूं नये म्हणून तिची प्रार्थना केली आहे (ऋ. ६.६१,१३ ); तिच्या सान्निध्यांतून उचलून दूरदेशीं कोणी आपणास टाकूं नये, अशी कवीनें प्रार्थना केली आहे (ऋ. ६.६१,१४ ). तिच्या सात बहिणी आहेत व सात शाखा आहेत (ऋ. ६.६१,१० व १२ ) व ती सातांपैकीं एक

असून सर्वांना मातेसारखी आहे (ऋ. ७.३६,६). सर्व मातांमध्यें, सर्व नद्यांमध्यें व सर्व देवतांमध्यें सरस्वती श्रेष्ठ आहे (ऋ. २.४१,१६). तिला पावीरवी (विद्युल्लतेची कन्या) म्हटलें आहे व एका वीराची (बहुधा सरस्वताची) पत्नीहि म्हटलें आहे (ऋ. ६.४९,७). तिनें भूलोक व अंतरिक्ष व्यापिले आहेत, व ती तीन ठिकाणीं राहते (ऋ. ६.६१,११ व १२). आकाशांतून, महापर्वतांतून खालीं यज्ञस्थानीं येण्याबद्दल तिची प्रार्थना केली आहे (ऋ. ५.४३,११). वरील शेवटच्या तीन उताऱ्यांत (तु. ७.९५,२) तिचा उगम द्युलोकांत असल्याबद्दलच्या कल्पनेचा उल्लेख आहे; तसाच गंगानदीबद्दल वेदोत्तर कथापुराणांत उल्लेख आहे. ती पितरांबरोबर त्याच रथांत बसून यज्ञस्थलीं येते व दर्भासनावर बसते (ऋ. १०.१७,८ व ९). आपल्या पवित्र जलानें तेथील अशुद्धता दूर कर अशी तिची प्रार्थना केली आहे. ती जीवनशक्ति व अपत्यें यांचा लाभ करून देते (ऋ. २.४१,१७) व इतर देवतांप्रमाणें प्रजोत्पत्तीच्या कार्यांत मदत करते (ऋ. १०.१८४,२). तिनेंच वध्र्यश्वाला दिवोदास नामक पुत्राची प्राप्ती करून दिली (ऋ. ६.६१,१). ती भक्तांना धनधान्यसमृद्धि देते (ऋ. ७.९५,२; ८.२१, १७). ती देवनिंदकांचा नाश करते; ती भयंकर व वृत्रहन्त्री आहे (ऋ. ६.६१,३ व ७).

पूषन्, इन्द्र व मरुत् यांच्याबरोबर ती असते (ऋ. ३. ५४,१३; ७.९,५). ते तिचे मित्र आहेत (ऋ. ७.९६,२). जेव्हां अश्विनांनीं इन्द्राला मदत केली तेव्हां सरस्वतीनें त्याला ताजातवाना केलें (ऋ. १०.१३१,५). वाजसनेयी संहितेंत (१९.१२) वरील कथेसंबंधानें असें सांगितलें आहे कीं, जेव्हां देवांनीं इन्द्र वरा होण्याकरतां यज्ञ केला, तेव्हां अश्विनीवैद्यांनीं व सरस्वतीनें आपल्या वाणीनें इन्द्रामध्यें पुन्हां सामर्थ्य उत्पन्न केलें. वाजसनेयी संहितेंत सरस्वती अश्विनांची पत्नी असेंहि म्हटलें आहे (१९.९४). सरस्वती व दृषद्वती यांच्या कांठावर अग्नि यज्ञाकरतां तयार केला असा उल्लेख आहे (ऋ. ३.२३,४); व ऐतरेय ब्राह्मणांत (२.१९) सरस्वतीनदीवर ऋषींनीं केलेल्या यज्ञाचा उल्लेख आहे.

ऋग्वेदांत सरस्वतीला नदीदेवता इतकेंच मानलें आहे; पण शतपथ (३.९.१,७) व ऐतरेय (३.१.) ब्राह्मणांत तिला वाक्, वाणी असें म्हटलें आहे; आणि वेदोत्तर कथांत तिला वाग्देवता, बुद्धिदेवता मानली आहे व ब्रह्मयाची पत्नी म्हटलें आहे.

सरस्वतीनदीच्या भौगोलिक स्थानाबद्दल बराच वाद आहे. आवेस्ताग्रंथांत उल्लेखिलेली अफगाणिस्तानांतील हरक्विती तीच सरस्वती असें कित्येक म्हणतात. रोट, ग्रासमन, लुडविग व झिमर सिंधु म्हणजेच ऋग्वेदकालीन सरस्वती असावी असें म्हणतात. मध्यदेशांतील एक लहान नदीला सरस्वती नांव आहे. सरस्वती व दृषद्वती या दोन्ही ब्रह्मावर्त नामक पवित्र देशाच्या सरहद्दीवर होत्या, असें मॅक्समुल्लर म्हणतो. ही हल्लीं वालुकामय प्रदेशाखालीं गुप्त झाली आहे.



सरस्वतीला समान पुरुषवाचक देवता सरस्वत् म्हणून आली असून तिची स्तुति (ऋ. ७.९६) केली आहे.

**पृथिवी.**—ऋग्वेदांत पृथिवी ही देवता द्युःबरोबरच बहुतेक आलेली असून फक्त एका तीन ऋचांच्या लहानशा सूक्तांत (ऋ. ५.८४) तिचा स्वतंत्रपणें उल्लेख आहे. अथर्ववेदांत (१२.१) तिच्या वर्णनपर असें एक लांब व सुंदर सूक्त आहे. पृथिवीवर केलेला व्यक्तित्वाचा आरोप अगदीं अल्प असून तिच्यांतील बहुतेक गुण सामान्य जड पृथ्वीच्या गुणांसारखेच आहेत. ऋग्वेदांतील वर्णनांत पृथिवी अनेक उंच उंच वस्तूंनीं भरलेली, पर्वतांचा भार सहन करणारी व अरण्यांतील वृक्षांना आधार देणारी असेंच म्हटलें आहे. तिला मही (मोठी), दृढा व अर्जुनी (प्रकाशमान) असेंहि म्हटलें आहे.

पृथिवी या शब्दाचा अर्थ 'विस्तृत' असा आहे. तैत्तिरीय संहितेंत (७.१,५) व तैत्तिरीय ब्राह्मणांत पृथिवी शब्दाची व्युत्पत्ति प्रथ् धातूपासून आहे असें स्पष्ट सांगितलेलें आहे. पृथिवीला 'दयाळु माता' असें म्हटलें असून (ऋ. १०.१८,१०) द्यावापृथिवीला उद्देशूनहि 'माता' म्हटलेलें आढळतें.

**बृहस्पति.**—ऋग्वेदांत या देवतेला बरेंच महत्त्व दिलेलें आहे; अकरा सबंध सूक्तें बृहस्पतीच्या स्तुतिपर असून इन्द्राबरोबर दोनदां व इतर १२० वेळां त्याचा उल्लेख आहे; व ब्रह्मणस्पति म्हणून ५० ठिकाणीं आणखी उल्लेख आहे. त्याला सात मुखें, सुंदर जिव्हा, तीक्ष्ण शृंगें व शंभर पंख असून त्याचा वर्ण सोन्यासारखा तेजस्वी व आवाज स्पष्ट आहे (ऋ. १०.१५५,२; ७.९७,७ व ५). धनुष्य, बाण (ऋ. २.२४,८), सोन्याचा परशु (ऋ. ७.९७,७) हीं आयुधें असून त्याच्या रथाला तांबडे घोडे जोडलेले असतात (ऋ. ७.९७,६).

बृहस्पति उच्च अंतरिक्षांतील महातेजापासून उत्पन्न झाला व त्यानें अंधकार नाहींसा केला (ऋ. ४.५०,४). त्याला त्वष्ट्यानें उत्पन्न केलें असेंहि म्हटलें आहे (ऋ. २. २३,१७). उलट तो सर्व देवांचा पिता असें म्हटलें आहे (ऋ. २.२६,३).

बृहस्पति हा गृहपुरोहित असून (ऋ.२.२४,९) सर्व प्राचीन विद्वानांचा (पुरोधा) मुख्य आहे (ऋ. ४.५०,१). वेदोत्तर वाङ्मयांत त्याला देवांचा ब्राह्मण पुरोहित म्हटलें आहे. बृहस्पतीशिवाय यज्ञकर्मे यथासांग पार पडत नाहींत (ऋ. १.१८,७). देवांनां यज्ञांतील हविर्भाग त्याच्यापासून प्राप्त

झाले (ऋ.२.२३,१). तो स्वतः सूक्तें म्हणतो व त्यामुळें इन्द्र, वरुण, मित्र, अर्यमन् व इतर देव यांनां आनंद होतो (ऋ. १.४०,५); त्याच्याबरोबर ऋक्वत् गणहि असतो, व त्यामुळें त्याला गणपति असें म्हटलें आहे (ऋ. २.२३,१). त्याला ब्रह्मणस्पति असेंहि म्हटलें आहे. तो सर्व स्तावक मंत्रांचा कर्ता असून (ऋ. १.१९०,२) इतर मानव पुरोहितांनां त्यानेंच स्तुतिमंत्र सांगितले (ऋ. १०.९८,२७). त्याला वाचस्पति म्हणजे वक्तृत्व व शहाणपणा यांची देवता, असें वेदोत्तर वाङ्मयांत मानलेलें आहे.

इन्द्रानें गाई सोडविल्याबद्दलची जी कथा आहे त्यांत अग्नीप्रमाणें बृहस्पतीचाहि उल्लेख आहे (ऋ. २.२३,१८). इन्द्रासहवर्तमान वलाला मारून त्यानें गाई सोडविल्या (ऋ. २.२३,१८; ४.५०,५); व त्या स्वर्गामध्यें वांटून दिल्या (ऋ. २.२४,१४). वलपराजयाची ही कथा एखाद्या म्हणीप्रमाणें रूढ झालेली आहे (अथर्व० ९.३,२). वलाचा दुर्ग त्यानें उध्वस्त केला त्यावेळीं त्याला उषा, सूर्य व गाई यांची प्राप्ति झाली (ऋ. १०.६७,५). बृहस्पति अंगिरसानें वृत्रांनां मारले, दुर्ग फोडले व शत्रू जिंकले (ऋ. ६.७३,१ व २), लढाईमध्यें त्याचा कोणीहि पराजय करूं शकत नाहीं (ऋ. १.४०,८), करतां युद्धप्रसंगीं त्याची प्रार्थना करावी (ऋ. २.२३,१३).

इन्द्राचा तो मित्र व साहाय्यकर्ता आहे (ऋ. २.२३,१८) व इन्द्राप्रमाणें तो सोमपान करणाराहि आहे (ऋ. ४.४९,३). आणखी एक कथा अशी आहे कीं, विहिरींत पुरलेल्या मृतानें केलेली प्रार्थना त्यानें ऐकली व त्याला तेथून सोडविलें (ऋ. १.१०५,१७).

बृहस्पतीचें स्तवन करणारावर तो कृपा करतो (ऋ. २.२५,१). शुद्धाचरणी माणसाला सर्व संकटांतून तो मुक्त करतो व त्याला धन व समृद्धि देतो (ऋ. १.१८,३;२.२३,४ ते १०). या त्याच्या परोपकारीपणामुळें त्याला पिता असें म्हटलें आहे (ऋ. ४.५०,६; ६.७३,१).

त्याला असुर्य असें म्हणून त्याची देवांत गणना केली आहे (ऋ. ३.६२,४). वनस्पतींचें संवर्धन करणारा असेंहि त्यास म्हटलें आहे (ऋ. १०.९७,१५ व १९). नंतरच्या काळांत त्याची नवग्रहांत गणना होऊं लागली. बृहस्पति ही देवता शुद्ध भारतीय आहे. त्यांतील पति या पदावरून व तत्संबंधीं कथांवरूनहि बृहस्पति ही ऋग्वेदपूर्वकालीन देवता नसावी, असें दिसतें.

पुष्कळ ऋचांमध्यें अग्नि व बृहस्पति एकच अशा तऱ्हेचें वर्णन आढळतें (ऋ. ५.४३,१२). त्याला सदसस्पति म्हटलें आहे (ऋ. १.१८,६); व इन्द्राग्नीलाहि सदस्पती म्हटलें आहे (ऋ.१.२१,५). अग्नीप्रमाणें बृहस्पतीचींहि तीन वसतिस्थानें आहेत (ऋ.४.५०,१). या पुराव्यावरून बृहस्पति हें अग्नीचेंच एक स्वरूप असून ऋग्वेदकालीं त्याला स्वतंत्र देवतेचें स्वरूप प्राप्त झालें असावें, या मताला बळकटी येते. विल्सन् व मॅक्समुल्लर हे वरील मताचे आहेत. बृहस्पति म्हणजे पुरोहितांच्या कृत्यांचें मूर्त स्वरूप, असें केगी व ओल्डेनबर्ग मानतात. हिलेब्रँट बृहस्पतीला वनस्पतींची देवता व चंद्राचें मनुष्यस्वरूप असें मानतो.

बृहस्पति म्हणजे देवांचा ब्राह्मण पुरोहित, या गोष्टीवरून बृहस्पति म्हणजे आद्य भारतीय देवतात्रयीपैकीं एक जो ब्रह्मदेव याची तत्समदेवता म्हणून रूढ होऊन ब्रह्म हा शब्द वेदान्त तत्त्वज्ञानांतील विश्वाचें आद्य निर्गुण स्वरूप या अर्थी वापरण्यांत येऊं लागला असावा असें दिसतें.

**स्त्रीदेवता.**—वैदिक उपासनेंत देवी कनिष्ठ दर्जावर आहेत. विश्वचालक म्हणून यांनां क्वचितच मानण्यांत येतें. उषेलाच काय तें थोडें महत्त्व आहे. सूक्तसंख्या व नामनिर्देश यावरून देवतांचे जे वर्ग पाडतां येतात, त्यांत उषा तिसऱ्या वर्गांतील ठरते. तथापि इतर देवांप्रमाणें हिला मात्र सोमहवींत भाग मिळाला नाहीं. हिच्यानंतर सरस्वतीचा अनुक्रम आहे; पण सरस्वती अगदीं खालच्या वर्गांतली आहे. कांहीं थोड्याशा इतर देवी एकेका सूक्तांतून स्तविल्या गेल्या आहेत. पृथ्वी ही द्यौपासून स्वतंत्र अशी क्वचितच येते, आणि द्यावापृथिवीपर तीन ऋचांचें एक लहानसें सूक्त आहे. रात्री म्हणजे रात्र हिच्या स्तवनपर एकच सूक्त आहे (ऋ. १०.१२७). उषेप्रमाणें हिलाहि द्यौची कन्या म्हटलें आहे. पण हिचें स्वरूप अंधकारयुक्त म्हणजे काळें नसून चांदण्यांनीं चकाकणारें शुभ्र असल्याचें वर्णन आहे. रात्र होतांच पक्षी घरट्यांत व पुरुष घरोघर परत येतात व चोर, लांडगे यांपासून संरक्षण करण्याबद्दल रात्रीची प्रार्थना करतात. प्रातःकालच्या उषादेवतेची जोडदेवता रात्रीला मानून दोघींची एकत्र प्रार्थना कित्येक ऋचांत केली आहे. वाक् म्हणजे वाणी हिला देवता कल्पून हिचें वर्णन एका ऋचेंत केलें आहे (ऋ. १०.१२५). ती सर्व देवतांबरोबर असते व मित्रा-वरुण, इन्द्राग्नी व अश्विन् यांनां मदत करते. ती जलांमध्यें, समुद्रांत राहते; नैघण्टुकांत वाक्‌ला अंतरिक्षस्थ देवतांत गणलें आहे. वाक्‌ला स्त्री बनवून तिच्या मोबदल्यानें गंधर्वांपासून सोम घेतल्याचें वर्णन ब्राह्मणग्रंथांत आहे (ऐ. ब्रा. १.२७). पुरंधि या नांवाचा उल्लेख ऋग्वेदांत सुमारें नऊ वेळां आला असून तिचा अर्थ समृद्धि असा आहे. विष्णु, अग्नि, पूषन्, सवितृ यांच्याबरोबर क्वचित् व बहुतेक भगबरोबर तिचें वर्णन येतें. आवेस्तांतील पारेंदि ही देवता तत्समान आहे. दुसरी धिषणा ही ऋग्वेदांतील त्याच अर्थाची देवता आहे. इळा म्हणजे दधिदुग्धहवि व इडा म्हणजे धेनु (नैघण्टुक २.११) अशा

अर्थानें या आल्या असून आप्री सूक्तांत सरस्वती व मही अथवा भारती यांच्याबरोबर इळेचा उल्लेख आहे. अग्नीला (ऋ.३.२९,९ व १०) व पुरूरव्याला (ऋ.१०.९५,१८) तिचा पुत्र म्हटलें आहे. बृहद्दिवा, राका, सिनीवाली, कुहू वगैरे देवता आहेत. शिवाय मरुतांची माता पृश्नि, विवस्वताची भार्या सरण्यू व सूर्या उर्फ उषा यांचा मागें उल्लेख आलाच आहे.

देवांच्या बायका म्हणून इन्द्राणी, वरुणानी, अग्नायी, रुद्राणी, अश्विनी या आल्या आहेत; पण वेदांत त्यांनां फारसें महत्त्व दिलेलें दिसत नाहीं; पण ब्राह्मणग्रंथांत मात्र निरनिराळ्या संप्रदायांतील प्रमुख स्थान त्यांनां देण्यांत आलेलें आहे.

**कनिष्ठदेवता.—ऋभुदेव.**—वेदांतील प्रमुख देवाशिवाय दैवी गुणधर्मांचा पूर्ण अध्यारोप न केलेले असे दुसरे कित्येक कनिष्ठप्रतीचे देव आख्यायिकांतून उल्लेखिले गेले आहेत. त्यांपैकीं अतिशय महत्त्वाचे म्हणजे 'ऋभु' होत. ऋग्वेदांत अकरा सूक्तांत त्यांची स्तुति केली असून शंभरांवर नुसते नांवानें उल्लेख आले आहेत. 'ऋभु' ही देवत्रयी असून, त्यांचीं वैयक्तिक नांवें ऋभुक्षन्, वाज आणि विभ्वन्, अशीं आलीं आहेत. कांहीं ठिकाणीं हीं तिन्ही नांवें, कांहीं ठिकाणीं दोन व कांहीं ठिकाणीं एकट्या 'ऋभु' देवतेचेच उल्लेख आले आहेत. बहुवचन दर्शवावयाचें असल्यास 'ऋभवः' हें नांव चालतें व त्याचप्रमाणें ह्या तीन देवतानामांपैकीं कशाचेंहि बहुवचन केलें तरी देवत्रयीचा साकल्यानें बोध होतो. कांहीं ठिकाणीं ह्या तिन्ही देवनामांचीं बहुवचनें (ऋ. ४.३६,३; ८.४८,१) व कांहीं स्थलीं दोघांचींच ('वाजा ऋभुक्षणः' किंवा 'वाजा ऋभवः') बहुवचनें ह्यांचा अधिकपददोषपूर्वक ह्या देवतात्रयाचा बोध करून देण्याकरितां उपयोग केलेला दिसतो. 'वाजो विभ्वान् ऋभवः' हें संयुक्त पद एकस्थळीं (ऋ. ४.३६,६) आल्याचें दिसून येतें. मधूनमधून सर्व (विश्वे) ऋभु (ऋ. ७.५१,३) या आलेल्या पदावरून अशा तऱ्हेचा एक समुदाय मानल्याचें दिसून येतें, त्याचप्रमाणें ऋभूंसह ऋभु, विभूंसह विभ्वन् यांस आह्वान (ऋ. ७.४८,२) केलेलें आहे. ह्या शेवटल्या उल्लेखावरून ऋभु व विभ्वन् हे त्याच तऱ्हेच्या देवसमुदायांचे मुख्य अग्रणी असल्याचें उघड दिसतें. एका उल्लेखांत (ऋ. ४.३३,५) ह्या तीन ऋभूंस, वृद्ध, तरुण, व बाल असें म्हटलेलें आढळतें.

सुमारें बारा उल्लेखांत 'ऋभु' हे 'सुधन्वन्' (उत्तम तिरंदाज) याचे पुत्र 'सौधन्वान' या पैतृक संज्ञेनें दर्शविले गेले आहेत. (ऋ. ४.३७,४) ह्या उल्लेखांत इन्द्राचे पुत्र (सूनो) ह्या नांवानें ऋभूंस संबोधिलें आहे. पुनः ह्याच उल्लेखांत (शवसो नपातः) "शक्तीचीं मुलें" हें अभिधान त्यांस लावून 'नपातः' ह्या शब्दावर कोटी केल्याचें दिसतें. कारण 'शक्तीचा मुलगा (शवसः सुनु) हें अभिधान केवळ इन्द्रासच लावलें जातें व म्हणून 'ऋभु' देवतांस "शक्तीचे नातु" हें अभिधान बरोबर लागलें. "शवसो नपातः" हें ऋभुदेवतांचें विशेष अभिधान असून पांचवेळां ह्याचा उल्लेख आला आहे व फक्त एकवेळां हेंच अभिधान मित्रावरुणास लावल्याचें आढळतें. एका उल्लेखांत (ऋ. ३.६०,३). ऋभु हीं "मनूचीं मुलें" (मनोर्नपातः) असल्याचें सांगितलें असून त्यांचे आईबाप (पितर) पुष्कळ स्थळीं उल्लेखले आहेत. एका सूक्तांत (ऋ. १.१६१,३) ऋभूंनीं अग्नीस आपला भाऊ म्हणून आह्वान केलें आहे.

ऋभुदेवतांनां वारंवार यज्ञप्रसंगीं येण्याकरितां (ऋ. ४.३४,१–३; ३७,१) व सोमरस पिण्याकरितां आह्वान केलेलें असतें. अंतरिक्षांत उच्चस्थानीं असल्यामुळें त्यांनीं खालच्या प्रदेशांत सोमाकडे यावें (ऋ. ४.३७,३) म्हणून त्यांची स्तुति केली जाते. अशा प्रसंगीं बहुशः त्यांचें साहचर्य इन्द्राशीं (ऋ. ३.६०,४–६; ४.३३,३;३४,६;३५,७) व कांहीं थोड्या प्रसंगीं मरुतांशीं (ऋ. १.२०,५;११,४; ४.३४,११) व फक्त एके ठिकाणीं आदित्य, सवितृ, पर्वत, नद्या (ऋ. ४.३४,८) इत्यादिकांबरोबर असल्याचें वर्णन आहे. इतर गोष्टींत ऋभूंचें इन्द्राशीं फारच साधर्म्य आहे. ह्या देवता इन्द्रासारख्या आहेत (ऋ. ४.३७,५) व ऋभु हा एक नूतन इन्द्रच आहे (ऋ. १.११०,७). इन्द्राबरोबर ऋभुदेव हे मनुष्यांनां जयाकरितां मदत करतात (ऋ. ४.३७,६) व शत्रूंचा पाडाव करण्याकरितां (ऋ. ७.४८,३) इन्द्राबरोबर ऋभुदेवांचें आह्वान केलें जातें. त्यांनीं आपल्या चातुर्यामुळें इन्द्रसख्य संपादन केल्याचें वर्णन आहे (ऋ. ३.६०,३; ४.३५,७;९); कारण, इन्द्राचे घोडे बनविणारे चतुर कारागीर हेच ऋभुगण होत. ऋभूंचा व इन्द्राचा इतका विशेष संबंध आहे कीं, त्यामुळें इन्द्राला ह्या देवत्रयींतील ज्येष्ठ देवतेप्रमाणें "ऋभुक्षन्" (ऋभूंमध्यें श्रेष्ठ) ही संज्ञा लावली जाते. कांहीं "विश्वेदेव" सूक्तांमध्यें ऋभूंचा इतर कांहीं देवांशीं विशेषतः त्वष्टृदेवतेशीं संबंध दाखविला आहे.

ऋभूंच्या शारीरिक वर्णनांचे अगर एकंदर पोशाख वगैरेचे उल्लेख फारच अपुरे आहेत. दिसण्यांत ते सूर्यासारखे असून (ऋ. १.११०,४) त्यांचा एक रथ असतो (ऋ. १.१६१,७) व तो घोड्यांनीं ओढला जातो (ऋ. ७.४८,१). त्यांचा रथ चकचकीत व त्याचे घोडे पुष्ट असून ऋभुदेव स्वतः धातुमय शिरस्त्राणें व उत्तमोत्तम माला धारण करतात (ऋ. ४.३७,४). ऋभूंजवळ पुष्कळ अश्व असून (अश्विन् ऋ. ४.३७,५) ते चतुर हाताचे (सुहस्ताः) व हुषार असून त्यांचीं चातुर्याचीं कामें इतकीं बिनमोल (ऋ. ३.६०,४) आहेत कीं, त्यामुळेंच ऋभुदेव हे मूळचे मनूचे वंशज अतएव मर्त्य असून देखील आपल्या उद्योगानें त्यांनीं देवांसारखे

अमृतत्व मिळवलें ( ऋ. ३.६०,३; १.११०,४ ) व आपल्या चातुर्यानें व अद्भुत कृत्यांनीं त्यांनीं देवांचा दर्जा व सख्य प्राप्त करून घेऊन ( ऋ. ४.३३,३;४; ४.३५,३; ४.३६;४ ) गरुडपक्ष्याप्रमाणें अंतरिक्षांत वास करून अमर झाले ( ऋ. ४.३५,८ ). ऐतरेय ब्राह्मण ( ३.३० ) म्हणतें कीं, ऋभू हे मानव असून त्यांनीं तपाच्या जोरावर सोमयज्ञांत देवांबरोबर स्वतःसहि हविर्भाग मिळवला. ऋभुदेवांच्या चातुर्यामुळें देव इतके खूष झाले कीं, वाज हा देवांचा, ऋभुक्षन् हा इन्द्राचा व विभ्वन् हा वरुणाचा कारागीर होऊन बसले ( ऋ. ४.३३,९ ). ते देवांकडे गेले व चातुर्याचे जोरावर त्यांनीं यज्ञांत भाग मिळवला (ऋ. १.२०,१; १.१२०,६ ). म्हणूनच तिसरें सायंसवन ऋभुदेवतांचें आपल्या अतुल सामर्थ्यानें मिळवलेलें आहे ( ऋ. १.१६१,८; ४.३३,११ ).

वेदांतील प्रमुख देवांप्रमाणें, संपत्ति व समृद्धि देण्याकरितां ( ऋ. ४.३३,८; ४.३७,५ ) त्याचप्रमाणें गुरें, घोडे, शूर पुरुष ह्यांची प्राप्ति व्हावी याकरितां ( ऋ. ४.३४,१० ); व त्याचप्रमाणें शक्ति, उत्साह, संतति, चतुराई ( ऋ. १.१११,२ ); इत्यादि देण्याकरितां ऋभुदेवांची स्तुति केली जाते, व ज्याला हे युद्धांत मदत करितात तो अपराजित होतो ( ऋ. ४.३६,६ ). युद्धांत मदत व लूट मिळण्याकरितां ऋभु व वाज ह्यांचीं स्तोत्रें गाइलीं जातात.

'तक्ष' हें क्रियापद त्वष्टृदेवाप्रमाणें ऋभुदेवांच्या चातुर्याबद्दल फार वापरलें जातें. ज्यावरून ऋभूंना देवांचा दर्जा प्राप्त झाला अशीं पांच अद्भुत कृत्यें ऋभुदेवांनीं केल्याबद्दल प्रत्येक सूक्तांतून वर्णन आहे.

ऋभूंनीं घोडे नसलेला, लगाम नसेलेला, तीन चाकांचा परंतु सवेंध अंतरिक्षांतून परिभ्रमण करणारा असा एक अद्भुत रथ अश्विनी देवतांकरितां तयार केला ( ऋ. १.१११,१; ४.३३,८; ४.३६,१,२).

इन्द्राकरितां त्यांनीं दोन तरुण उमदे अश्व ( हरी ) तयार केले ( ऋ. ४.३३,१० ). ऋ. १.१६१,३ ह्या स्थलीं ऋभूंनीं एकामागून एक असे दोन घोडे बनविले असें वर्णन आहे तें देखील वरचेंच कृत्य होय.

ह्यानंतर त्यांनीं बृहस्पतीकरितां ( ऋ. १.१६१,६ ) एक अमृत देणारी, सामर्थ्य उत्पन्न करणारी, वाटेल तें रूप धारण करणारी ( ऋ. ४.३३,८; १.१६१,३; ४.३४,९ ) अशी गाय उत्पन्न केली. एका गाईला तिचें वांसरूं पुनः परत मिळवून दिलें ( ऋ. १.११०,८ ) अशी एक लहानशी अद्भुत गोष्ट केल्याचें वर्णन आहे.

नाश पावत चाललेल्या निर्जीव स्तंभाप्रमाणें पडलेले व विस्कळित शरीरें झालेले ( ऋ. १.११०,८; ४.३३,२ ) असे आपले मृतप्राय मातापितर यांच्या ठिकाणीं त्यांनीं पुनः चैतन्य उत्पन्न केलें ( ऋ. १.२०,४; ४.३५,५ ) व त्यांनां चालण्याची शक्ति उत्पन्न केली हें ऋभुदेवांचें कृत्य देवांस फारच आवडलें ( ऋ. ४.३६,३ ).

सर्व कृत्यांत अद्भुत व अतिशय वर्णिलेलें असें ऋभुदेवांचें कौशल्याचें कृत्य म्हटलें म्हणजे त्वष्ट्यानें घडविलेल्या एका पेल्याचे चार सुंदर पेले घडविणें हें होय ( ऋ. १.२०,६; ४.३५,२ ). सर्व प्रमुख देवांनीं अग्निमुखानें ऋभुदेवांस त्वष्ट्यानें बनविलेल्या देवांच्या काष्ठमय अमृत पिण्याच्या पात्राचीं चार पात्रें घडविण्याची आज्ञा केली, व एवढी गोष्ट सिद्ध झाली ह्मणून ऋभुदेवांनां देवांबरोबर पूजा स्वीकारण्याचा अधिकार दिला ( ऋ. १.१६१,१ ). ऋभुदेव एका स्थलीं ( ऋ. १.११०,५ ) तें पात्र क्षेत्राप्रमाणें मोजीत असल्याचें वर्णन आहे. पुढें ऋभुदेवांनीं तें काम केलें व त्वष्ट्यानेंहि त्यांची स्तुति केली ( ऋ. ४.३३,५ ). परंतु दुसऱ्या एका उल्लेखांत ( ऋ. १.१६१,४ ) त्वष्ट्यानें ऋभुदेवांचें हें कृत्य पाहून आपणांस स्त्रियांमध्यें लपविलें व ऋभूंचा नाश करण्याचें ठरविलें.

ऋभुदेवांनीं स्तोत्रें रचलीं ( ऋ. १०.८०,७ ); यज्ञ निर्माण केला ( ऋ. ३.५४,१२ ), व दोन्ही लोक घडविले ( ऋ. ४.३४,९ ) किंवा तेच आकाशाचे आधारस्तंभ आहेत ( ऋ. १०.६६,१० ) असे जे अवांतर उल्लेख आले आहेत ते ऋभुदेवांच्या चातुर्याचेच दर्शक आहेत.

दुसऱ्या एका आख्यायिकेंत ऋभुदेवांचा सवितृदेवतेशीं संबंध आला आहे. ऋभुदेव हे वायुगतीनें अंतरिक्षांत भ्रमण करीत असतां ( ऋ. ४.३३,१; १.१६१,१२ ) सवितृदेवाच्या घरीं पोहोंचले व जेव्हां ते 'अगोह्य' येथें आले त्यावेळीं 'सवितृ' देवानें त्यांनां अमृतत्व दिलें. ( ऋ. १.११०,२ ) त्या ठिकाणीं बारा दिवस पूर्ण विश्रांति घेऊन त्यांनीं आतिथ्य स्वीकारलें, व नंतर सुपीक शेतें उत्पन्न केलीं व त्यांतून जलप्रवाह काढले; वृक्षलतांनीं उंच प्रदेश व जलसंचयांनीं निम्नप्रदेश सुशोभित झाले ( ऋ. ४.३३,७ ).

'ऋभु' हा शब्द मूळ 'रभ्' ( ग्रहण करणें ) या धातूपासून झाला आहे ( तु. ऋ. २.३,९ ) व ह्यावरून 'ऋभु' याचा सरळ धात्वर्थ 'ग्रहणीय' 'हातचलाख' असाच होतो. ऋग्वेदांत इन्द्र, अग्नि, आदित्य ह्यांनां पुष्कळदां हें विशेषण म्हणून लावण्यांत आलेलें आहे. हा शब्द, जर्मन शब्द Elbe ह्याशीं किंवा इंग्लिश शब्द Elf ह्याशीं समान दिसतो. 'वाज्' ह्या शब्दाचा धात्वर्थ ( वज्=) 'उत्साहवान्' व 'विभ्वन्' ( विभू ) ह्याचाहि अर्थ 'श्रेष्ठ' ( कारागीर ) असा आहे. ह्यावरून एकंदर ऋग्वेदांतील ऋभुदेवांची माहिती व त्यांपैकीं दोन शब्दांचे धात्वर्थ ऋभुदेवांच्या कलाचातुर्यालाच प्रामुख्यानें दर्शवितात.

'ऋभू' हे प्रथमपासून देव मानले गेले नव्हते हें उघड आहे. इन्द्राशीं त्यांचा असलेल्या निकट संबंधाचें, त्यांच्या मूळ नैसर्गिक स्वभावधर्माशीं कांहीं नातें जुळतें कीं काय हा फार संशयित मुद्दा आहे. त्याचप्रमाणें 'सौधन्वान्' ह्या त्यांच्या पैतृक संज्ञेवरून कोणाचा बोध होतो हेंहि अनिश्चितच आहे, कारण "सुधन्वन्" हा शब्द ऋग्वेदांत 'रुद्र' व 'मरुत्' ह्यांचें विशेषण म्हणून फक्त दोनदां आलेला आहे. ऋभूंचे मातापितर म्हणून जे वारंवार उल्लेख आले आहेत ते बहुतेक द्यावापृथिवीच असण्याचा पुष्कळ संभव आहे. ऋभुदेव हे सुपीकता उत्पन्न करतात ही कल्पना त्यांनीं 'अगोह्य' ( कधींही न झांकल्या जाणाऱ्या ) सवितृदेवतेच्या घरीं केलेल्या बारा दिवसांच्या वस्तीच्या कल्पनेशीं संबद्ध आहे. ह्यावरून पुष्कळ संशोधकांनीं असें मानलें आहे कीं, ऋभुदेव हे हेमंतसंपात बिंदूच्या (Winter Solstice) बारा दिवसांत निश्चल असलेले असे जे तीन ऋतू ह्यांचे निदर्शक असावेत. त्वष्ट्यानें बनविलेलें देवांचें अमृत पिण्याचें पात्र म्हणजे चंद्र होय व त्याचीं चार रूपांतरें हे ऋभूंनें केलेले चार पात्रखंड होत. एकंदरींत असें संभवनीय दिसतें कीं, ऋभू हे प्रथमतः भूपृष्ठावरील किंवा अंतरिक्षांत संचार करणारे वनदेव असावेत व त्यांची कार्यकुशलता जसजशी वाढत गेली तसतसा त्यांच्या चातुर्याच्या अनेक आख्यायिका प्रचलित झाल्या असाव्यात. परंतु ऋग्वेदांतील संकलित पुरावा अशा तऱ्हेचीं अनुमानें खात्रीलायक बनविण्यास पुरेसा नाहीं.

**अप्सरा.**—अप्सरा ही एक प्रकारची स्वर्गयोषिता असून ज्या भौतिक मूलापासून आरंभीं तिची कल्पना निघाली त्यापासून ती ऋग्वेदांत देखील जवळजवळ सर्वस्वीं विलग झालेली दिसते. ऋग्वेदापासून आपणांस अप्सरांसंबंधीं फारच थोडी माहिती मिळूं शकते. कारण कीं, साऱ्या ऋग्वेदांत हें नांव केवळ पांचच वेळ आलेलें आहे. अप्सरा ही अंतरिक्षांत अतिशय उंच असलेल्या आपल्या प्रियकराकडे ( गंधर्वाकडे ) पाहून स्मित करते ( ऋ. १०.१२३,५ ). वसिष्ठाचा जन्म अप्सरेपासून झाला ( ऋ. ७.३३,१२ ). वसिष्ठ हे अप्सरांसन्निध बसतात ( ऋ. ७.३३,९ ). सोमरसामध्यें जें पाण्याचें मिश्रण करण्यांत येतें त्यास अनुलक्षून समुद्रांतील अप्सरा सोमाकडे अभिसरण करतात ( ऋ. ९.७८,३ ) असें वर्णन आलें आहे. लांब केसांचा सर्वज्ञानी मुनि अप्सरांच्या व गंधर्वांच्या मार्गांत संचार करण्यास समर्थ आहे ( ऋ. १०.१३६,६ ). जलांतील गंधर्वाची पत्नी 'अप्या योषा' ( ऋ. १०.१०,४ ) म्हणजे देखील निःसंशय अप्सराच होत.

अथर्ववेदामध्यें अप्सरांविषयीं ज्यास्त माहिती आली आहे. त्या जलामध्यें वास करतात व तेथून त्या निमिषार्धांत येऊन परत जातात ( अ. वे. २.२,३ ). त्यांनीं मनुष्यांमध्यें न राहतां एखाद्या नदीकडे जावें व तेथें जलतटाकीं वास करावा अशी त्यांची प्रार्थना केली आहे (अ. वे. ४.३७,३). विश्वावसु गंधर्वाबरोबर असलेल्या अप्सरांचा मेघ, विद्युत् व तारे यांच्याशीं संबंध वर्णिलेला आहे ( अ. वे. २.२,४ ). अथर्ववेदांत अप्सरा या गंधर्वांच्या स्त्रिया आहेत असा स्पष्ट उल्लेख आहे ( अ. वे. २.२,५ ) व उत्तरकालीन संहितांमध्यें अप्सरा म्हणजे गंधर्वपत्नी हें एक समीकरणच झालें आहे ( वा. सं. ३०.८; अ. वे. ८.९,९ इ. ). शतपथ ब्राह्मणांत ( श. ११.५.१,४ ) असें म्हटलें आहे कीं अप्सरा ह्या जलांत वास करणाऱ्या एका ( आतयः तु. ऋ. ९.५,९ ) पक्ष्याचें रूप धारण करतात. वेदोत्तरकालीन वाङ्मयामध्यें अप्सरा या वन्य कासारांत व नद्यांत विशेषतः गंगेमध्यें संचार करतात व त्या सागरामध्यें असलेल्या वरुणाच्या महालांत आढळून येतात अशा प्रकारचे अनेक ठिकाणीं उल्लेख आहेत. 'अप्सु सरन्ति' म्हणजे पाण्यामध्यें ज्या संचार करतात त्या अप्सरा अशी बहुधा अप्सरा शब्दाची व्युत्पत्ति असावी.

उपर्युक्त पुराव्यांवरून असें दिसतें कीं, अप्सरा ही एक जलसंचारी स्वर्गीय देवता आहे अशी पुरातन कल्पना असून ऋग्वेदकालींच ती गंधर्वपत्नी मानली गेली होती. उत्तरकालीन संहितांमध्यें भूलोक व त्यांतील विशेषतः वृक्ष हे देखील अप्सरांच्या संचारक्षेत्रामध्यें अंतर्भूत केलेले आढळतात. न्यग्रोध व अश्वत्थ वृक्षांवर अप्सरांचा वास असून हे वृक्ष त्यांच्या वीण्यांच्या व झांजांच्या ध्वनीनें निनादित झालेले असतात असें म्हटलें आहे ( अ. वे. ४.३७,४ ). दुसऱ्या एका ठिकाणीं हे व औदुंबर व प्लक्ष हे दुसरे वृक्ष अप्सरांचीं व गंधर्वांचीं निवासगृहें आहेत असें वर्णन आहे ( तै. सं. ३.४,८ ). या वृक्षांवर असलेल्या गंधर्वांनीं व अप्सरांनीं त्यांच्या जवळून जाणाऱ्या लग्नसमारंभांतील वरातीचें शुभ करावें अशी त्यांची प्रार्थना केलेली आहे. ( अ. वे. १४.२,९ ). शतपथब्राह्मणांत ( श. ११.६,१ ) अप्सरा या नृत्य, गायन व क्रीडा करण्यांत गुंतलेल्या असतात असें दाखविलें आहे. वेदोत्तरकालीन ग्रंथांत, काल्पनिक व वास्तविक असे दोन्हीहि प्रकारचे पर्वत, अप्सरा व गंधर्व यांचीं प्रिय निवासस्थानें म्हणून दिले आहेत. अथर्ववेदांत अप्सरांविषयीं आणखी असेंहि म्हटलें आहे कीं, त्या द्यूतप्रिय असतात व जुगार खेळत असतांना एखाद्याचें नशीब उघडतें तेंहि त्यांच्याच कृपेमुळें ( अ. वे. २.२,५ इ. ); पण त्यांच्या अंगीं मनुष्यास वेड लावण्याचेंहि सामर्थ्य आहे व म्हणून त्यांजवर जादूचे मंत्रप्रयोग करण्यांत येतात ( अ. वे. २.३,५ इ. ).

अप्सरा फार सुंदर असतात (तु. श. ब्रा. १३.४,३, ७ व ८) व त्या फक्त गंधर्वांवरच प्रीति करतात असें नाहीं, तर कधीं कधीं त्यांचें मानवांवरहि प्रेम जडतें (तु. ऋ. १०.९५,९). वैदिक वाङ्मयांत अशा प्रकारच्या प्रणयाची एका अप्सरेसंबंधीं कथा दिली आहे. दुसऱ्या कित्येक अप्सरांच्या नांवाचाच फक्त उल्लेख आला आहे. अथर्ववेदांत उग्रजित्, उग्रंपश्या व राष्ट्रभृत् हीं तीन नांवें आहेत (६.११८,१ व २) वाजसनेयी संहितेंत उर्वशी, मेनका व आणखी दुसरीं कित्येक नांवें दिलीं आहेत (१५.१५,१९) व शतपथ ब्राह्मणांत (३.४.१,२२) भरतकुलाची आद्यजननी जी शकुंतला (१३.५.४,१३) तिचा व मेनकेचा (११.५.१,१) उल्लेख आला आहे.

यांतील ज्या एकाच अप्सरेचें नांव ऋग्वेदांत आढळतें ती उर्वशी होय. उर्वशी ही अप्सराच होती याला पुरावा म्हटला म्हणजे वसिष्ठास एका ऋचेंत उर्वशीचा पुत्र तर दुसरींत अप्सरापुत्र म्हटलें आहे (ऋ.७.३३,११ व १२). एके ठिकाणीं उर्वशीची नद्यांबरोबर प्रार्थना केली आहे (ऋ. ५.४१,१९). याशिवाय तिचें नांव आणखी फक्त दोनच वेळ आलें आहे व तेंहि एका उत्तरकालीन व दुर्बोध अशा सूक्तामध्यें (ऋ.१०.९५,१० व १७) आहे. या सूक्तांत उर्वशी व तिचा प्रियकर इळापुत्र पुरूरवा यांचा संवाद आहे. तेथें उर्वशीस 'अप्या' हें विशेषण लावलें असून तिला अंतरिक्ष भरून टाकणारी व आकाश आक्रमण करणारी म्हटलें आहे (शेवटचें विशेषण ऋ. १०.१३९,५ मध्यें स्वर्गनिवासी गंधर्वांसहि लावलें आहे). पुरूरवा व उर्वशी यांचा ऋग्वेदांतील हा संवाद प्रस्तुत ग्रंथांत पान ४३ वर सविस्तर दिला आहे. शतपथ ब्राह्मणामध्यें (११.५,१) हा संवाद कोणत्या प्रसंगीं व काय कारणानें झाला तें देऊन एकंदर कथासूत्र जोडलें आहे (प्रस्तुत ग्रंथ पान ४२ व १५७ पहा). ब्राह्मणांतील ही उर्वशीची गोष्ट कांहीं अंशीं ऋग्वेदांतील एतद्विषयक ऋचांच्या चुकीच्या अर्थाच्या आधारावर रचली गेली आहे असें मॅक्डोनेल यास वाटतें. ऋ. १०.९५ शिवाय पुरूरव्याचें नांव सर्व ऋग्वेदांत आणखी फक्त एकाच ठिकाणीं (ऋ. १.३१,४) आलें आहे. त्या ऋचेंत असें म्हटलें आहे कीं, अग्नि हा आकाशाकडून सुकृत्यकारी मनुष्य [मनु=मनुष्य (मॅक्डोनेल)] जो पुरूरवा त्यासाठीं गर्जना करविता झाला. परंतु पुरूरवा या शब्दाचा अर्थ मोठ्यानें ओरडणारा किंवा हांक मारणारा असा असल्यामुळें सदरहू ऋचेंत पुरूरवसे हा शब्द मनवे या शब्दाचें विशेषणहि होऊं शकेल असें मॅक्डोनेल म्हणतो. वेबर वगैरे कांहीं पंडितांनीं तर पुरूरवा व उर्वशी म्हणजे रवि व उषा असाहि त्या शब्दांचा अर्थ केला आहे.

**गंधर्व.**—ऋग्वेदांत अप्सरा व गंधर्व यांचें साहचर्य कल्पिलेलें आहे. या वेदांत गंधर्व हा शब्द एकंदर वीस वेळां आला आहे तरी त्यांतील फक्त तीनच ठिकाणीं तो बहुवचनीं उपयोजिलेला आढळतो. अथर्ववेदामध्यें मात्र बत्तीसांपैकीं अर्ध्या स्थळीं तो अनेकवचनीं घातलेला आहे. अवेस्तामध्येंहि हा शब्द कांहीं थोडक्या ठिकाणीं आला आहे. परंतु तेथें त्याचें गन्दरेव असें रूप असून प्रत्येक ठिकाणीं तें एकवचनांतच सांपडतें. यावरून असें अनुमान निघतें कीं, प्रथम गंधर्व नांवाची कोणी एक व्यक्ति असून पुढें तिजपासून गंधर्व कुल तयार झालें. उत्तरकालीन संहितांमध्यें (अ. वे. ११.५,२ व तै. सं. ७.८,२५). देव दानव व पितर यांच्या प्रमाणेंच गंधर्वांचाहि एक निराळा वर्ग मानलेला आहे. कांहीं यजुःसंहितांत गंधर्वांची संख्या केवळ २७ च सांगितली आहे, पण अथर्ववेदांत (११.५,२) ती ६३३३ दिली आहे. गंधर्वांसंबंधीं ऋग्वेदांत जो पुरावा सांपडतो तो इतका तुटपुंजा व अनिश्चित आहे कीं, त्यावरून गंधर्वांविषयीं मूळ कल्पना काय असावी याचा नीटसा निर्णय होऊं शकत नाहीं. या बाबतींत विशेष लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट म्हटली म्हणजे दुसऱ्या मंडळापासून सातव्या मंडळापर्यंत गंधर्व हें नांव केवळ एकाच ठिकाणीं आलें असून आठव्यामध्यें त्याचा दोन वेळ इन्द्रशत्रु म्हणून उल्लेख आला आहे. कोठें कोठें त्याचा केवळ सामान्य नामासारखाच उपयोग आहे व क्वचित् प्रसंगीं त्याला विश्वावसु म्हणजे सर्वसंपत्तिमान् हें विशेषण जोडलेलें सांपडतें (ऋ. ९.८६,३६;१०.१३९,४ व ५; अ. वे. २.२,४ वा. सं. २.३). ऋग्वेदांतील एका सूक्तांत विश्वावसु हा शब्द गंधर्व या अर्थी सामान्य नामासारखा वापरलेला आहे (ऋ. १०.८५,२१ व २२ तु. ४० व ४१). पण उत्तरकालीन संहितांत, ब्राह्मणांत व वेदोत्तरकालीन वाङ्मयांत विश्वावसूचा गंधर्वांतील एका व्यक्तीचें नांव म्हणून वारंवार उपयोग केलेला आढळतो.

ऋग्वेदांत अंतरिक्ष हें गंधर्वांचें स्थान सांगितलें आहे. गंधर्व हा अंतरिक्षांत वास करतो (ऋ. ८.६६,५); तो दिव्य आहे व तो नभोमंडलावर ताठ उभा राहतो (ऋ. १०.१२३,७). तो अप्सरांचा प्रियकर असून त्याच्याकडे पाहून त्या स्मित करतात (ऋ. १०.१२३,५). तो स्वर्गांत राहतो (अ. वे. २.२,१ व २) व कृतार्थ झालेल्या माणसांस गंधर्वांच्या सहवासांत रहावयास मिळतें (अ. वे. ४.३४,३). कित्येक ऋचांमधून गंधर्वांचा सूर्य, तारे, चंद्र इ. प्रकाशाच्या कोणत्याना कोणत्या तरी रूपाशीं निकट संबंध दाखविलेला आढळतो (ऋ. १०.१२३,६; वा. सं. ९.७. अ. वे. १३.१,२३ इ.) ऋग्वेदांतील १०.१२३ या सूक्तांत बहुधा त्याचा इन्द्र-धनुष्याशींहि संबंध जोडण्यांत आलेला दिसतो. वेदोत्तरकालीन वाङ्मयांत गंधर्वनगर हें मृगजलाचें एक नांव म्हणून दिलेलें आहे.

याशिवाय ऋग्वेदांत विशेषतः नवव्या मंडलांत गंधर्व व सोम यांचा विशेष संबंध आलेला आहे. गंधर्व हा सोम

ठेवलेल्या जागेवर पहारा करतो व देवकुलांचें रक्षण करतो (ऋ. ९.८३,४; तु. १.२२,१४). सोमाचीं सर्व रूपें नीट पाहून घेऊन तो गगनमंडलावर उभा राहतो (ऋ. ९.८५, १२). पर्जन्य, सूर्यकन्या व गंधर्व हे सर्व मिळून सोमाचें संगोपन करतात (ऋ. ९.११३,३). देव, गंधर्वांच्या मुखानें सोम पितात (अ. वे. ७.७३,३). मैत्रायणी संहितेंत (३.८,१०) असें सांगितलें आहे कीं, आरंभीं गंधर्व हे देवांसाठीं सोमाचें जतन करीत होते, परंतु त्यांच्या हातून तो चोरीस गेल्यामुळें त्याबद्दल शिक्षा म्हणून त्यांचें सोमपान बंद करण्यांत आलें. सोम व गंधर्व यांच्या या संबंधामुळेंच गंधर्वांस वनस्पतींचें ज्ञान असल्याविषयीं म्हटलें असलें पाहिजे (अ. वे. ४.४,१). इन्द्रानें गंधर्वांस अंतरिक्षामध्यें विदीर्ण केल्याचें ऋग्वेदांतील वर्णन (ऋ. ८.६६,५) किंवा गंधर्वांचें दमन करण्याविषयीं ऋग्वेदांत केलेल्या प्रार्थना (८.१,११) यांनां गंधर्वांचा हा सोमावरील साभ्यसूय पहाराच कारण होता यांत संशय नाहीं. कारण, पुढें एका उत्तरकालीन संहितेंत (तै. सं. १.२,९) सोमानें गरुडाचें रूप घेऊन विश्वावसु गंधर्वाच्या हातावर तुरी याव्या अशी सोमाची प्रार्थना केली आहे. सोम हा कांहीं दिवस गंधर्वांजवळ होता–त्याला विश्वावसु गंधर्वानें चोरून नेलें होतें–परंतु गंधर्वांनां बायकांचें वेड असल्यामुळें वाग्देवतेस गंधर्वांकडे पाठवून देवांनीं त्याला गंधर्वांपासून परत आणलें (ऐ. ब्रा. १.२७; तै. सं. ६.१,६; मै. सं. ३.७,३). देव आणि गंधर्व यांमधील वैर फार पुरातन दिसतें. कारण अवेस्तामध्यें (य. ५.३८) असें म्हटलें आहे कीं, शुभ्र हओमाचें निवासस्थान जो वोदरुकष त्यांत राहत असलेल्या गंधर्वाशीं लढून केरेसास्प यानें त्याला जिंकलें. शिवाय सोम पळवून नेणाऱ्या गरुडावर नेम धरणारा ऋग्वेदांतील कृशानु नामक धन्वी (४.२७,३) हा एक गंधर्वच होतासें दिसतें व तैत्तिरीय आरण्यकांत (१.९,३) तसें स्पष्ट म्हटलेंहि आहे.

कोठें कोठें गंधर्वांचा जलाशींहि संबंध आला आहे. उदकांतील गंधर्व व जलदेवता हीं यमयमींचीं मातापितरें होतीं (ऋ. १०.१०,४). पाण्यांत ओतलेल्या सोमास उदकांचा गंधर्व असें म्हटलें आहे (ऋ. ९.८६,३६). अथर्ववेदांत गंधर्व हा आपल्या अप्सरांसहित जलामध्यें वास करतो असें त्याचें वर्णन आहे (२.२,३; ४.३७,१२). अवेस्तामध्यें गंधर्व हा खोल दरीचा स्वामी असून तो उदकांत राहतो. (य. १५.२८).

गंधर्व हे स्वर्गांतील गायक आहेत अशी जी कल्पना महाकाव्यांत व त्यानंतरच्या वाङ्मयांत दृष्टीस पडते तिचा ऋग्वेदांत स्पष्ट असा कोठेंच मागमूस सांपडत नाहीं (तु. ऋ. १०.१७७,२ व १०.११,२).

गंधर्वांचें स्वरूप कसें होतें याविषयीं ऋग्वेदांत फक्त दोन तीन ठिकाणींच उडत उडत उल्लेख आलेले आहेत. वायु हे त्यांचे केंस आहेत (ऋ. ३.३८,६). व गंधर्वांजवळ तेजस्वी शस्त्रें आहेत (ऋ. १०.१२३,७). अथर्ववेदांत जरा अधिक स्पष्ट माहिती सांपडते (४.३७; ८.६,१ व पुढें). त्यांत ते केंसाळ आहेत, त्यांचा अर्धाभाग पशूसारखा असतो व त्यांच्यापासून मनुष्यास निरनिराळ्या प्रकारचें भय असतें असें सांगितलें आहे. तथापि इतर ठिकाणीं ते देखणे असतात असेंहि वर्णन पहावयास सांपडतें (श. ब्रा. १३. ४.३,७ व ८). शिवाय गंधर्व सुरभि म्हणजे सुवासिक वस्त्रें परिधान करतो असें ऋग्वेदांत एके ठिकाणीं म्हटलें (ऋ. १०.१२६,८) असून पृथ्वीचा गंध गंधर्वांपर्यंत जाऊन पोंचतो असें याच प्रकारचें दुसरेंहि एक वाक्य अथर्ववेदांत सांपडतें (१२.१,२३).

यावरून असा एक विचार मनांत येतो कीं, गंधर्व हा शब्द गंध शब्दापासून तर निघाला नसेलना? ही व्युत्पत्ति बरोबर जरी असली तरी तिच्या योगानें या देवतेच्या मूलकल्पनेसंबंधीं कांहींच बोध होत नाहीं. आतांपावेतों पुढें मांडलेल्या पुराव्यावरून आपणांस फार झालें तर एवढेंच म्हणतां येईल कीं, गंधर्व हा कोणी तेजःपुंज असा स्वर्गीय प्राणी होता, व कधीं कधीं तो आपली प्रियकरीण जी अप्सरा तिजबरोबर उदकांतहि वास करतो अशी समजूत होती. तथापि गंधर्वांसंबंधीं निरनिराळ्या पंडितांकडून निरनिराळे तर्क व्यक्त झाले आहेत. कोणी त्यास इन्द्रधनुष्याचें प्रतीक मानतात, कोणी त्यास वायुदेवता म्हणतात, कोणाला ती चंद्रदेवता वाटते, कोणाला त्यांत मेघदेवता दिसते, कोणाचा तर्क ती सोमदेवता असावी असा धांवतो तर कोणी तो उदयकालचा रवि असावा असें अनुमान करतात.

**इष्ट देवता.**—वास्तोष्पतीचें नांव ऋग्वेदांत फक्त सातच वेळां आलें आहे व त्याच्या स्तुतीसाठीं तीन ऋचांच्या एका लहान सूक्ताचाच कायतो विनियोग करण्यांत आला आहे (ऋ. ७.५४). या सूक्तामध्यें वास्तोष्पतीनें गृहप्रवेश मंगलमय करावा, व्याधि हरण करावी, मनुष्य व पशू यांचें कल्याण करावें, गुरें व अश्व यांची वृद्धि करावी व सदासर्वदा सांभाळ करावा म्हणून त्याची प्रार्थना केली आहे. एके ठिकाणीं (ऋ. ७.५४,२) त्याला इन्दु या नांवानें संबोधून तो सोम असल्याविषयीं म्हटलें आहे. विश्वेदेवांच्या सूक्तांतील एका ऋचेमध्यें (ऋ. ५.४१,८) त्याची व त्वष्ट्याची एकत्र प्रार्थना केली आहे, व ते दोघे एकच आहेत असेंहि बहुधा तींत दर्शविलें असावें. दुसऱ्या एका ऋचेंत (ऋ. ८. १७,१४) त्याला सोमरस काढणारांचा आधारस्तंभ व कवच म्हटलें असून त्याचें व इन्द्राचें एकत्व कल्पिलेलें दिसतें. दहाव्या मंडळामध्यें त्याचा एकाच ठिकाणीं उल्लेख आला

असून तेथें त्याला व्रतपा म्हटलें आहे व देवांनीं त्यास ब्रह्माबरोबर म्हणजे प्रार्थनेबरोबर निर्माण केलें असें त्यासंबंधीं वर्णन आहे ( ऋ. १०.६१,७ ). गेल्डनेर याचें असें मत आहे कीं, या ठिकाणचें वर्णन रुद्रास अनुलक्षून असावें, कारण कीं, तैत्तिरीय संहितेंत ( ३.४०,१० ) वास्तोष्पति हें रुद्राचें एक विशेषण म्हणून उपयोजिलेलें आहे. जरी वास्तोष्पति हा शब्द निरनिराळ्या देवतांस अनुलक्षून उपयोजिलेला दिसतो तरी ( अग्नीस जसा गृहपति तसा ) तो कोणत्याहि एखाद्या विशिष्ट देवतेस लावीत असत असें मानावयास पुरेसा आधार सांपडत नाहीं. गृह्यसूत्रांत असें सांगितलें आहे कीं, नूतन गृहप्रवेश करण्याच्या प्रसंगीं वास्तोष्पतीची आराधना करावी ( शां. गृ. सू. ३,४; आ. गृ. सू. २.९,९; पा. गृ. सू. ३.४,७ ) यावरून व त्याच्या प्रार्थनेंतील मजकुरावरून वास्तोष्पति ही तिचें नांव दर्शवितें त्याप्रमाणें केवळ एक गृहदेवता आहे असें दिसतें.

'क्षेत्रस्य पति' याचीहि वरील वर्गांतच गणना होत असून ती क्षेत्राची म्हणजे शेताची अधिदेवता आहे. ऋग्वेद सूक्त ४.५७ यांतील पहिल्या तीन ऋचांत या देवतेनें अश्व व गायी बैल द्यावेत व स्वर्लोक व भूलोक, जल व वनस्पती यांत माधुर्य ओतावें म्हणून तिचें स्तवन केलें आहे. विश्वेदेवांच्या ऋचेंत ( ऋ. ७.३५,१० ) या देवतेची सविता, उषा, व पर्जन्य या देवतांबरोबर समृद्धिप्राप्त्यर्थ प्रार्थना केली आहे. तसल्याच एका दुसऱ्या ऋचेंत ( ऋ. १०.६६,१३ ) या देवतेनें नेहमीं संनिध असावें म्हणून तिची आराधना आहे. शेत नांगरण्याच्या प्रसंगीं या देवतेचें यजन करण्यांत येतें असें गृह्यसूत्रकार म्हणतात ( आ. गृ. सू. २.१०,४; शां. गृ. सू. ४.१३,५ ). कृषिदेवतांनां उद्देशून असलेल्या सूक्ताच्या एका ऋचेंत ( ऋ. ४.५७,६ ) तासदेवता सीता हिची पिकें उत्तम यावीं म्हणून आराधना केली आहे. सीतेचा पुढें ( पा. गृ. सू. २.१७,९ ) इन्द्रपत्नी म्हणून उल्लेख आला आहे [ याचें कारण बहुधा ऋग्वेदांत एकदां इन्द्रास उर्वरापति म्हणजे क्षेत्रपति म्हटलें आहे हें असावें ( ऋ. ८.२१,३; तु. ४.५७,७ ). ] व तिला सावित्री हें पैतृकनाम मिळालें आहे ( तै. ब्रा. २.३,१०,१ ).

**देवतायुग्म.**—वैदिक उपासनेंतील एक विशेष प्रकार म्हणजे मूळच्या दोन स्वतंत्र देवतांची एक जोडदेवता कल्पून तिची स्तुति करणें. अशा सुमारें बारा जोडदेवता ऋग्वेदांत आल्या असून कमींत कमी साठ सूक्तें त्यांच्यासंबंधानें आहेत. इन्द्रदेवता सात निरनिराळ्या देवतांच्या जोडीनें आली आहे; व मित्रा-वरुण या एकट्या जोडदेवतेच्या वर्णनपर तेवीस सूक्तें आहेत, व इन्द्राग्नीचीं सूक्तें अकरा, इन्द्रावरुणाचीं नऊ, इन्द्रवायूचीं सात, द्यावापृथिवीचीं सहा, इन्द्रासोमा व इन्द्राबृहस्पतीचीं प्रत्येकीं दोन आणि इन्द्राविष्णु, इन्द्रापूषणा, सोमापूषणा, सोमारुद्रा व अग्निसोमाचें प्रत्येकीं एक सूक्त आहे. वरच्याशिवाय आलेल्या जोडदेवत इन्द्रनासत्या, इन्द्रापर्वता, इन्द्रामरुतः, अग्निपर्जन्या, पर्जन्यवाता ( एकदां वातापर्जन्या ) उषासानक्ता अथवा नक्तोषासा, सूर्यामासा अथवा सूर्याचंद्रमसा ह्या असून त्यांचें वर्णन इतस्ततः कांहीं ऋचांत आलें आहे.

या जोडदेवतांची कल्पना मूळ द्यावापृथिवी या जोडीवरून निघालेली असावी; कारण, पृथ्वी व आकाश हीं प्राचीन विचारवंतांनांहि सृष्टिरचनेंत एकमेकांनां कायमचीं जोडलेलीं आहेत, असें वाटल्यामुळें त्यांच्या जोडीची कल्पना पुष्कळ प्राचीन समाजांत पसरलेली आढळते; व म्हणूनच द्यावापृथिवी या जोडीची कल्पना वेदपूर्वकालीन असण्याचा संभव दिसतो. वैदिककाळांत तर ही कल्पना इतकी दृढ दिसते कीं, द्यौःबद्दल स्वतंत्र एकहि सूक्त नसून एकट्या पृथ्वीबद्दल तीन ऋचांचें एकच लहानसें सूक्त आहे. शिवाय द्यावाक्षामा व द्यावाभूमी अशीं जोडनांवेंहि क्वचित् आढळतात. द्यावापृथिवीला रोदसी असें नांव सुमारें शंभरवेळां दिलेलें आहे, व पितरा, मातरा, जनित्री असें म्हटलें आहे ( ऋ. १.१५९ १ ते ३ व १६०,२ ). तेच सर्वांचे आद्यजनक होत ( ऋ. ७.५३,२ ). त्यांच्या विवाहाचा उल्लेख ऐतरेय ब्राह्मणांत ४.१७) आहे. सर्व देव, बृहस्पति ( ऋ. ७.९७,८) व अग्नि ( १०.२,७ ) त्यांनींच उत्पन्न केले. उलट इन्द्र ( ऋ. ६.३०,५ ), विश्वकर्मन् ( ऋ. १०.८१,२ ), त्वष्टृ ( ऋ. १०.११०,९ ) व पुरुष ( १०.९०,१४ ) यानें त्यांनां निर्माण केलें असें निरनिराळें वर्णन आहे. द्यावापृथिवी ही देवता दुग्ध, घृत, मधु, देणारी (ऋ.६.७०,१ ते ५), अमृत वर्षिणारी (ऋ. १.१५९,२ ), महान्, विशाल वगैरे असल्याचें वर्णन असून शिवाय हुषार, सत्यप्रिय, आपत्तिनिवारक ( ऋ. १.१५९,१; १.१८५,१० ) इत्यादि नैतिक गुणहि तिच्यांत आहेत.

मित्रावरुणाचा उल्लेखांच्या मानानें नंबर द्यावापृथिवीच्या खालोखाल लागतो. या जोडींतील दोन्ही देवतांचें वर्णन पूर्वी येऊन गेलें असल्यामुळें येथें अधिक कांहीं लिहिण्यासारखें नाहीं. ही जोडदेवता पर्शुभारतीय काळांतील आहे, कारण अवेस्ताग्रंथांत अहुर व मिथ्र यांची तत्समान जोडी आलेली आहे.

इन्द्रावरुण हे दोन विश्वराजे (ऋ, १.१७,१) आहेत. यांनीं सर्व जलप्रवाह तयार केले व सूर्याला आकाशमार्गे आक्रमण करण्यास लावलें (ऋ. ७.८२,३ ). वृत्राचा पराजय करणारे (ऋ. ६.६८,२); युद्धांत मदत व जय देणारे (ऋ.१.१७,७), ऐश्वर्य, कीर्ति, संपत्ति देणारे ( ऋ. ४.४१,२ ते १० ) एकत्र सोमपान करणारे इत्यादि त्यांचें वर्णन आहे. शिवाय दोघांपैकीं प्रत्येक भिन्नगुणी म्हणजे इन्द्र युद्धप्रिय तर वरुण

शांतताप्रिय असेंहि दिलें आहे (ऋ.६.६८,३; ७.८२,५ व ६; ७.८५,३ ). इन्द्राग्नी यांची मैत्री दृढ दिसते, कारण या जोडीच्याच वर्णनपर सूक्तें सर्वांत अधिक आहेत. सोमपान करण्यांत हीच जोडी सर्वांत अधिक पटाईत असून ( ऋ. १.२१,१ ) त्यांनीं वृत्राला मारलें व दासाचे नव्व्याण्णव दुर्ग फोडले ( ऋ. १.२२,६ ) वगैरे सर्व वर्णन मूळ इन्द्राचें एकट्याचें असून तेंच सदर जोडीला लावलें आहे. येणेंप्रमाणें बहुतेक जोड्यांत एकाचे गुण व कृत्यें त्याच्या जोडीदारावरहि लादण्यांत येतात. इन्द्रबृहस्पति यांच्या सूक्तांत (ऋ. ४.४९; ७.९७) मुख्यतः त्यांनां सोमपानास येण्याचें आमंत्रण असून अश्वादि संपत्ति देण्याबद्दल विनविलें आहे. इन्द्रवायू यांच्यासंबंधानें सोमपाननिमंत्रणाखेरीज दुसरा उल्लेख बहुधा नाहींच. शतनेत्रे, धियस्पति, शवसस्पति ( सामर्थ्यवान् ) वगैरे विशेषणें त्यांनां लावलीं आहेत ( ऋ. १.२३,३;४.४७,३). इन्द्रसोम हे एकटा इन्द्र करतो तींच पराक्रमाचीं कृत्यें करितात असें वर्णन आहे. उदाहरणार्थ, जलप्रवाह मानवांकरितां सुरू करणें, सप्तसिंधू मोकळ्या करणें, दैत्याला मारणें इत्यादि. या जोडीचीं मुख्य अशीं कृत्यें म्हणजे सूर्य व प्रकाश निर्माण करून अंधकार नाहींसा करणें, अंतरिक्षाला आधार देणें व पृथिवी विस्तृत करणें हीं होत (ऋ. ६.७२,१ व २ ). इन्द्राविष्णू या जोडीला मदपती म्हटलें असून त्या दोघांनांहि मुख्यतः सोमपानास येऊन पोटभर सोम पिण्याची प्रार्थना केली आहे. ते सोममदानें धुंद होऊन खूप भटकले. ते संपत्ति देतात व संकटमुक्त करतात. इन्द्रपूषन् या दोघांचें विशेष कृत्य म्हणजे जलप्रवाह सुरू करणें व वृत्राला मारणें ( ऋ. ६.५६,२ ). यांपैकीं इन्द्र सोम पितो, पण पूषन् करंभ ( पेज ) मागतो. सुखसमृद्धि देण्याविषयीं यांची प्रार्थना केलेली आहे.

सोमपूषन् हे अंधकार दूर करतात; संपत्ति, द्यावापृथिवी निर्माण करतात; भरपूर धनधान्य व युद्धांत विजय देतात. त्यांनां देवांनीं अनीतीचें केंद्र बनविलें आहे. त्यांच्यांत भिन्नता म्हणजे एक अंतरिक्षांत राहतो तर दुसरा पृथ्वीवर व आकाशांत राहतो. सोमरुद्र (ऋ. ६.७४) यांची गृहांतील सर्व रोग व संकटें दूर करण्याबद्दल, पापें नाहींशीं करण्याबद्दल, वरुणाला मुक्त करण्याबद्दल प्रार्थना केली आहे. अग्निसोम यांनीं जलप्रवाह मुक्त केले, प्रकाश आणला, आकाशांत तारे बसविले. गो, अश्व, संतति, संपत्ति, आरोग्य, सुख देण्याबद्दल त्यांनां प्रार्थिलें आहे ( ऋ. १०.१९,१ व ६७.६ ). अथर्ववेद, मैत्रायणि संहिता (३.७,१) व शतपथ ब्राह्मण (११.१.६,१९ ) यांत त्यांचा उल्लेख आहे. अग्नि व सोम या यज्ञांतील प्रमुख देवता असून या जोडदेवतेचें वर्णन अत्यंत अल्प आहे, ही आश्चर्याची गोष्ट आहे.

यांशिवाय अग्निपर्जन्य (ऋ. ६.५२,१६) यांची धान्य व संततीकरितां, पर्जन्यवात यांची ( ऋ. ६.५०,१२ ) भरपूर धान्य देण्यासाठीं, उषा व रात्री या द्यौःकन्यांची (ऋ.५.४१,७) जीवमात्रांनां जागृत करण्यासाठीं (ऋ. २.३१,५) प्रार्थना केली आहे. सूर्य व चंद्र यांनां आकाशांत एका मागून एक बृहस्पति उगवण्यास लावतो (ऋ. १०.६८,१०). विधात्यानें त्यांनां तयार केलें ( ऋ. १०.१९०,३ ). वरुणाचे (ऋ. ८.४१,९) व अंतरिक्षाचे (ऋ. १.७२,१० ) दोन डोळे म्हणून म्हटले आहेत ते सूर्य व चंद्र हेच असले पाहिजेत.



**देवतासंघ.**—वैदिक दैवतेतिहासांत कांहीं कमी अधिक स्पष्ट देवतासंघ असून ते कोणत्यातरी एका विशिष्ट देवाशीं संबद्ध असे असतात. सर्वांत मोठा व महत्त्वाचा संघ म्हणजे मरुतांचा. ऋग्वेदांत यांची संख्या २१ किंवा १८० अशी निरनिराळी आढळते. हे मरुत्, इन्द्र पराक्रम करीत असतांना त्याच्याबरोबर असतात असें वर्णन आहे. हाच संघ रुद्र या नांवाखालीं त्यांच्या ( रुद्र ) पित्याच्या सहवासांत आढळतो ( ऋ. ७.१०,४; ७.३५,६ ). ब्राह्मणांत रुद्र हा वेगळा देवतावर्ग असून त्याची संख्या अकरा धरतात, तैत्तिरीय संहितेंत ही संख्या तेहतीस आहे. आदित्याचा छोटा संघ ऋग्वेदांत त्यांच्या अदिति मातेबरोबर (ऋ. ७.१०,४ इ.) किंवा त्यांच्या वरुण या वरिष्ठावरोबर (ऋ. ७.३५,६ इ. ) उल्लेखिलेला आहे. ऋग्वेदांत दोन ठिकाणीं यांची संख्या सात किंवा आठ, आणि ब्राह्मणांत बारा दिलेली आढळते. हा संघ मरुत्संघापेक्षां जास्त स्पष्ट आहे, कां कीं, यांतील प्रत्येकाला वेगवेगळीं नांवें आहेत. ऋग्वेदांत वारंवार उल्लेखिला जाणारा तिसरा संघ वरील दोहोंपेक्षां ज्यास्त अस्पष्ट आहे, कारण त्यांतील देवांचें वैशिष्टीकरण नाहीं किंवा त्यांची संख्याहि दिलेली नाहीं. दोन ठिकाणीं आदित्यांसह वरुण किंवा अदिति, रुद्रांसह रुद्र, आणि वसूंसह इन्द्र ( ऋ. ७. १०,४; ३५,६ ) पाचारिले गेलेले आढळतात म्हणून या देवांचा इन्द्राशीं विशिष्ट संबंध आहे असें मानण्यांत येतें. मागाहूनच्या वैदिक ग्रंथांत अग्नि हा वसूंचा नायक आहे. आदित्य, रुद्र आणि वसू हे तीनहि संघ ऋग्वेदांत कांहीं थोड्या ठिकाणीं एकत्र पाचारिले आहेत ( ऋ. २.३१,१; १०.६६,१२; तु. ७. १०,४; ३५,६ ). ब्राह्मणांत पृथ्वीवरील वसू, अंतरिक्षांतील रुद्र, आणि स्वर्गातील आदित्य असे तीन वर्ग पाडले आहेत. छान्दोग्योपनिषदांत ( ३.६,१० ), वसू अग्नीशीं, रुद्र इन्द्राशीं, आदित्य वरुणाशीं, मरुत् सोमाशीं आणि साध्य ब्रह्मयाशीं संबद्ध करून पांच संघ दाखविले आहेत. याखेरीज अर्धदेवांश अंगिरसांचा एक संघ आहे यांचा बहुतेक बृहस्पति आणि ऋभूंपैकीं धाकटा यांच्याशींच बहुतेक संबंध येतो. तसाच विश्वेदेवांचा एक व्यापक संघ केला आहे. ऋग्वेदांत यांच्याप्रीत्यर्थ सबंध चाळीस सूक्तें आलीं आहेत, यांची योग्यता मोठी आहे. यज्ञहविर्भागांत कोणीहि देव वगळला जाऊं नये म्हणून हा संघ आहे.

**भावमूलक अगर क्रियामूलक देवता.**—आतां मनुष्याच्या भावना आणि सृष्टींतील क्रिया यांच्या ठायीं देवत्व स्थापन होऊन वैदिक देवतसृष्टींत कशी काय भर पडली या प्रश्नाकडे आपण वळूं.

सवितृ, धातृ, त्वष्टृ, प्रजापति, मातरिश्वा, विश्वकर्मा इत्यादि नामें विशिष्ट क्रियांचीं आणि विशेषेंकरून महत्त्वाच्या क्रियांचीं बोधक आहेत. सविता हा 'सु' म्हणजे प्रेरणा करतो, धाता उत्पादन करतो, त्वष्टृ त्वक्ष् म्हणजे तासणें करितो, मातरिश्वा मातरि म्हणजे आकाशांत श्वसन करतो, देष्टृ 'दिश्' दाखविणें करतो. सृष्टींतील अनेक क्रियांवर सत्ता गाजविणारा कोणी तरी असला पाहिजे इत्यादि कल्पना प्रचलित असल्यामुळें त्या क्रियांचे अधिकारी देव स्थापित होणें स्वाभाविक होतें. पुष्कळदां इतर नांवानीं प्रचलित असणाऱ्या देवतेलाच विशिष्ट क्रियेवर तिची सत्ता असल्यामुळें निराळें क्रियानुरूप नांव प्राप्त झालें आहे. धातृ हें नांव जगाचें उत्पादक व संरक्षक ह्या अर्थानें प्रजापतिर्ब्रह्म यास लाविलें आहे. विधातृ हें नांव कधीं इन्द्रास (ऋ.१०.१६७,३) एकदां विश्वकर्म्यास ( ऋ. १०.८२,२ ) परंतु दोन ठिकाणीं दैवतांच्या समूहामध्यें स्वतंत्र देवता म्हणून दिलेलें दिसतें (ऋ. ६.५०,१२;९.८१,५ ).

जरी विशिष्ट क्रियांवर अधिष्ठात्री एखादी देवता मानली गेली तरी त्या देवतेस केवळ विचारमय स्वरूप न राहतां भौतिक स्वरूप येऊं लागतें व त्या देवतेची नातींगोतीं उत्पन्न होतात. ह्या तऱ्हेचें स्वरूप त्वष्ट्यास आलें आहे. त्वष्ट्याच्या हातांचा व हातांतील कुऱ्हाडीचा (ऋ. ८.२९,३) उल्लेख आला आहे. तो हुषार कारागीर आहे ( ऋ. १.८५,९ ), त्यानें इन्द्रासाठीं वज्र केलें (ऋ.५.३१,४), ब्रह्मणस्पतीच्या कुऱ्हाडीस धार लाविली ( ऋ. १०.५३,९ ) इत्यादि क्रिया त्याच्याठायीं आरोपित झाल्या आहेत. त्याची कन्या सरण्यू हिचें विवस्वताबरोबर लग्न होऊन यमयमी हीं भावंडें उत्पन्न झालीं. बृहस्पतीस त्वष्ट्यानें उत्पन्न केलें (ऋ. २.२३,१७). त्वष्टा सोमाचा रक्षक आहे व इन्द्राचाहि जनक आहे इत्यादि कल्पना देखील त्वष्ट्यावर लादल्या गेल्या. त्वष्टा व त्याचा मुलगा विश्वरूप याचा इन्द्राशीं संबंध पूर्वी वर्णन केलाच आहे. त्वष्ट्याविषयीं उल्लेख पुष्कळ आहेत पण कोणतेंहि सूक्त त्याच्या स्तुतीकरितां लिहिलेलें आढळत नाहीं.

विश्वकर्मा प्रजापति या देवतेस देखील क्रियाविशिष्ट देवता समजावयास हरकत नाहीं. यालाहि थोडें भौतिक स्वरूप आल्यावांचून राहिलें नाहीं. ऋग्वेदांत ( ४.५३,२ ) त्यास सविता म्हटलें आहे. प्रजापति हा आपली कन्या उषा हिच्यावर प्रेमबद्ध झाला आणि उषा हरिणी झाली व हा हरिण झाला, आणि रुद्रानें त्यावर बाण मारण्याची तयारी केली इत्यादि कथा ब्राह्मणांत आलेल्या आहेत. हिरण्यगर्भविषयक जें सूक्त आहे त्या सूक्तांत सृष्टिकर्तृत्व ह्या हिरण्यगर्भास दिलें आहे आणि तैत्तिरीय संहितेंत ( ५.५,१ ) हिरण्यगर्भासच प्रजापति म्हटलें आहे.

प्राचीन इराणी लोकांच्या ग्रंथांतून ज्या अनेक देवता दिसतात त्यांत भावविषयक देवतांस प्राधान्य दिलेलें आहे. भारतीय दैवतेतिहासांत भावविषयक देवतांस प्राधान्य नाहीं. तथापि त्यांचें अस्तित्व नाहीं असेंहि नाहीं. मन्यु, श्रद्धा, तपस्, अरमति, असुनीति, निर्ऋति, काम इत्यादि भावमूलक दैवतें ऋग्वेदीय व अथर्ववेदीय देवतांत सांपडतात.

**सामान्य गुणवर्णन.**—वेदांतील देवविषयक ज्या कल्पना आहेत त्या कल्पनांमध्यें रूपरेखेचा अनिश्चितपणा व व्यक्तित्वाची अस्पष्टता अथवा अभाव दिसतो हें वर जें देवतांचें वर्णन दिलें आहे त्यावरून लक्षांत येईल. याप्रमाणें देवांच्या रूपरेखेंत व व्यक्तित्वांत व्यंग दिसून येण्याचें कारण असें आहे कीं, हे वेदांतील देव इतर कोणत्याहि दुसऱ्या इन्डो-यूरोपीय लोकांच्या देवांपेक्षां त्यांच्या पायाभूत भौतिक घटनांच्या जवळ आहेत. वेदावर परिश्रम करणाऱ्या प्राचीनांपैकीं यास्क हा आपल्या निरुक्तांत देवांच्या स्वभावाविषयीं असें सांगतो कीं, या देवांचें–उदाहरणार्थ सूर्य, पृथ्वी, यांचें–जें चरित्र दिसतें त्यामध्यें मनुष्यचरित्रासारखें चरित्र सांपडत नाहीं ( निरु. ७.४ ); वैदिक देवतांचे जे निसर्गदृष्ट मूल आधार आहेत त्या मूल आधारभूत, घटनांत विशिष्टत्वसूचक गुण फार थोडे असून इतर त्याच वर्गांतील नैसर्गिक घटनांनां सामान्य असे गुण बरेच आहेत. उदाहरणार्थ उषा, सूर्य व अग्नि यांजमध्यें प्रकाशयुक्तपणा, अंधकार दूर करणें व प्रातःकाळीं दृष्टोत्पत्तीस येणें हे सामान्य गुण आहेत. निरनिराळ्या देवता जेव्हां एकच घटनेच्या निरनिराळ्या स्वरूपावरून बनविलेल्या असतात तेव्हां त्यांजमध्यें भेददर्शक गोष्टींचा अभाव तितका अधिकच स्पष्ट असतो. वैदिक देवदेवतांचा स्वभाव या वरील कारणांमुळें अशा प्रकारचा दिसतो कीं त्यांत प्रत्येक देवतेचे विशिष्टत्वदर्शक गुण फारच थोडे असून बऱ्याच देवांनां किंवा सर्व देवांनां सामान्य असे कित्येक गुण म्हणजे तेज, सामर्थ्य, कृपा, बुद्धिमत्ता वगैरे सामान्यतः त्या देवतेच्या स्वभावाचे घटक असतात. प्रत्येक प्रधान गणल्या जाणाऱ्या देवतेमध्यें कांहीं मोठी सृष्टिक्रमांतील व निसर्गदृष्ट कृति करण्याची शक्ति आहे अशा प्रकारचें वर्णन येतें. द्युलोकाला आधार देणें द्युलोक स्थिर करणें, तसेंच पृथ्वीची स्थापना करून तिला आधार देणें हीं कर्में इतक्या देवतांनां सामान्य म्हणून सांगितलेलीं आहेत कीं, अथर्ववेदांत (१९.३२) दर्भाच्या मंत्रप्रयोगार्थ उपयोगिलेल्या मुठीलाहि हें द्यावापृथ्वीला आधार देण्याचें कर्म विशिष्ट म्हणून सांगितलें आहे. जवळजवळ दहा बारा देवांसंबंधानें त्यांनीं द्यावापृथ्वी

उत्पन्न केली आहे, असें सांगितलें आहे; आणि यापेक्षांहि अधिक देवांनीं सूर्य निर्माण केला, त्याला आकाशांत स्थापन केला, किंवा त्याच्याकरितां मार्ग तयार केला असें वर्णन आलेलें आहे. पृथ्वी, आकाश, किंवा द्यावापृथ्वी यांची स्थापना करून त्यांचा विस्तार करणारे अशा प्रकारचें चार पांच देवांचें वर्णन आहे. स्थिरचरांचे स्वामी असें सूर्य, सविता, इन्द्र, पर्जन्य, आदित्यदेव यांचें व इतर देवांचें वर्णन आहे.

या प्रकारचे जे सामान्य स्वभावधर्म सांगितले आहेत त्यांजमुळें त्या त्या देवतेंत, तिचा प्रधान व विशिष्ट गुण कोणता तें समजणें अवघड होतें, कारण प्रार्थनेच्या व स्तुतिपर सूक्तांत हे सामान्य स्वभावधर्म विशेष प्रामुख्यानें वर्णिले असतात. निरनिराळ्या निसर्गविभागांतील देव वरील-प्रमाणें त्यांच्यांतील प्रमुख स्वभावधर्म सारखे असल्यानें एकमेकांशीं एकरूप समजले जाण्याचा संभव उत्पन्न होतो. अग्नि हा मूलतः पृथ्वीवरील अग्नीवरून कल्पिलेला देव आहे. तो आपल्या प्रकाशानें अंधकाररूपी राक्षस दूर करितो. व इन्द्र हा वादळांतील देव असून तो आपल्या विजेच्या योगानें अंधकारराक्षसांचा नाश करितो. अग्निदेवाच्या कल्पनेमध्यें, अंतरिक्षांतील विद्युद्रूपी अग्नीच्या कल्पनेची भर पडते. व यांप्रमाणें अग्नि व इन्द्र यांजमधील साम्य वाढत जाऊन या दोघांनां जोडीनें बोलावण्याचा प्रघात पडल्यावर तें अधिकच दृढ होतें. जोडीनें देवतांनां आह्वान करण्याच्या पद्धतीनें असा एक परिणाम होतो कीं, या जोडीपैकीं एका देवतेच्या ज्या विशिष्ट क्रिया असतात, त्या क्रिया जोडीपैकीं दुसऱ्या देवतेच्या म्हणून मानल्या जाऊन, ती दुसरी देवता एकटीच वर्णिली असतांहि या क्रिया तेथें सांगितल्या जातात. याप्रमाणें अग्नीला सोमपान करणारा, वृत्राला मारणारा, गाई, पाणी, सूर्य, उषःकाल यांनां जिंकणारा हीं विशेषणें लाविलीं जातात. ह्या क्रिया मूळ इन्द्राच्या आहेत.

पुष्कळ गुण निरनिराळ्या देवतांचे सामान्य म्हणून मानले गेल्यानें विशिष्ट देवतेची रूपरेखा अस्पष्ट होते; तसेंच प्रत्येक देवाच्या ठिकाणीं प्रत्येक प्रकारची शक्ति आहे, अशा प्रकारची स्तुति केल्यानें कोणत्याहि देवतेच्या ज्या विशिष्ट शक्ति असतात, त्यांचा स्पष्टपणा नाहींसा होतो, व या दोन कारणांनीं कोणताहि देव दुसऱ्या एखाद्या देवाशीं एकरूप मानला जाण्याचा संभव वाढतो. या प्रकारचीं ऐक्यें ऋग्वेदांत वारं-वार आढळून येतात. एक कवि अग्निदेवाला उद्देशून म्हणतो कीं, हे अग्निदेवा, तूं जन्मकाळीं वरुण असतोस, तुला उद्दीपित केला म्हणजे तूं मित्र होतोस; हे बलपुत्रा, तुझ्या ठिकाणीं सर्व देव आहेत, तूं भक्ताला इन्द्र आहेस ( ऋ. ५.३,१ ) इ. अग्नि हा वैदिक काळांतील अग्न्युपासक पुरोहितवर्गाच्या दृष्टीनें एक प्रमुख देव होता. या देवाच्या स्वभावासंबंधानें जे नाना-प्रकारचे विचार ऋग्वेदांत आलेले आहेत त्यांजवरून, आणि पृथ्वीवर जे निरनिराळे अग्नी पेटविले जातात तीं अग्नीचीं निरनिराळीं रूपें आहेत, अंतरिक्षांत वीज या रूपानें हाच अग्नि आहे, सूर्य हा द्युलोकांतील अग्नीच होय, याप्रमाणें अग्निविषयक जी विचारसरणी ऋग्वेदांत आलेली आहे व जिच्यामध्यें गूढात्मकता वारंवार दिसून येते तिजवरून, अशी कल्पना होते कीं, नानाप्रकारच्या देवता या एकाच देवाचीं निरनिराळीं रूपें आहेत. ही एकदेवत्वाची कल्पना ऋग्वेदांत बऱ्याच ठिकाणीं आली आहे. एकाच देवाला उपासक अग्नि, यम, मातरिश्वा अशीं निरनिराळीं नांवें देतात ( ऋ. १. १६४,४६ ), विप्र आणि कवी या एका पक्षाला ( सूर्याला ) आपल्या शब्दांनीं अनेक रूपें देतात ( ऋ. १०.११४,५ ), याप्रमाणें वर्णनें येतात. या वर्णनांवरून ऋग्वेदकाळाच्या शेवटीं शेवटीं बहुदेवतात्मक एकेश्वरी मत उदयास आलें होतें असें दिसतें. या सुमारास सर्व देव व निसर्गहि आपल्यांत अंतर्भूत करणारा असा एक देव असल्याची कल्पना थोडी थोडी उत्पन्न होऊं लागली होती असेंहि दिसतें वगैरे विवेचन पूर्वी केलेलेंच आहे. अदिति देवता सर्व देव, सर्व मनुष्यें, जें कांहीं घडलेलें आहे व घडणार आहे तें सर्व, तसेंच अंतरिक्ष व द्युलोक या सर्वांशीं एक रूप आहे ( ऋ. १.७९,१० ), प्रजापति हा सर्व देवांच्या वरील केवळ श्रेष्ठ देव नसून सर्व पदार्थ त्याच्यांत अंतर्भूत होतात ( ऋ. १०.१२१,८ व १० ), हें सर्वेश्वरी मत अथर्ववेदांत पूर्णपणें परिणत झालेलें आहे ( अ. वे. १०.७,१४ व २५ ) आणि उत्तरकालीन वैदिक वाङ्मयांत हें सर्वेश्वरी मत स्पष्टपणें प्रतिपादिलेलें आहे.

ऋग्वेदांतील जुन्या भागांत देवांची प्रार्थना करितांनां कित्येक देवांनां तो सर्वांत श्रेष्ठ आहे असें म्हटलेलें आहे. परंतु ही श्रेष्ठत्वाची कल्पना कवींनीं अखेरपर्यंत नेलेली नाहीं. वेदांतील कवी ज्या देवतेची स्तुति करीत असतील त्या देवतेची त्या प्रसंगीं ते अतिशयच स्तुति करितात व तिचें गुणवर्णन करितांना परस्परविरोध अगर असंगती यांकडे ते लक्ष देत नाहींत असें कांहीं ठिकाणीं दिसतें. या गोष्टीवरून मॅक्समुल्लर यानें वैदिक देवतासंबंधानें अशी एक कल्पना प्रतिपादिली आहे कीं वेदांमध्यें कित्येक देव एकदां एक तर एकदां दुसरा असे आळीपाळीनें सर्वांत श्रेष्ठ मान-ण्याची रीत होती. या प्रकारच्या देवताविषयक कल्पनेला विशिष्टदेवप्राधान्यवाद ( Aenotheism ) असें नांव तो देतो. या मताप्रमाणें, वैदिक कवी ज्या विशिष्ट देवांची स्तुति करीत असतील त्या देवांमध्यें देवपणाचे सर्वांत उच्च जे गुण-धर्म ते सर्व आहेत अशी ते कल्पना करितात, तो विवक्षित देव अगदीं स्वतंत्र व सर्वश्रेष्ठ देव आहे असें ते मानतात व तो एकच देव ते आपल्या मनश्चक्षूसमोर ठेवितात. या मॅक्समुल्लरच्या मतासंबंधानें अशी एक प्रतिकूल बाजू

मांडण्यांत येते कीं, वेदांतील देवता व्यक्तिशः इतर देवतांशीं कोणत्याहि रीतीनें संबद्ध नसून स्वतंत्र आहेत असें म्हणणें वस्तुस्थितीस सोडून आहे, कारण वैदिक दैवतसंप्रदायांत निरनिराळे देव जितके पुनःपुनः निरनिराळ्या परिस्थितींत व निरनिराळ्या कार्यासाठीं एकत्र आणिले जातात व संघीभूत केले जातात तितक्या मानानें कोणत्याहि दुसऱ्या संप्रदायांत देवतांचें एकत्रीकरण व संयोगीकरण केलेलें सांपडत नाहीं. त्याप्रमाणेंच देवतांच्या परस्परावलंबित्व-संबंधानें सांगावयाचें तर देवांत अतिशय शक्तिमान् मानलेले असे देव देखील दुसऱ्या देवांवर अवलंबून असल्याचें दाखविलें आहे. उदाहरणार्थ वरुण आणि सूर्य हे इन्द्रावर अवलंबून आहेत ( ऋ. १.१०१,३ ), वरुण आणि अश्विन् देवता या विष्णूच्या शक्तीपुढें लीन होतात ( ऋ. १.१६५,४ ), तसेंच इन्द्र, मित्र, वरुण, अर्यमन्, रुद्र, हे देव सवित्याच्या नियमांचें उलंघन करूं शकत नाहींत ( ऋ. २.३८,९ ). मॅक्समुल्लरच्या मताविरुद्ध आणखी असेंहि सांगतां येतें कीं, विश्वेदेव यांनां उद्देशून जीं कित्येक सूक्तें आहेत, त्यांमध्यें कनिष्ठ देवतासुद्धां सर्वच देवतांची क्रमानें स्तुति केलेली आहे. वैदिक सूक्तांपैकीं पुष्कळशीं सूक्तें सोमायागार्थ रचलीं असल्यानें व या यागामध्यें बहुतेक सर्व देवतांची उपासना अंतर्भूत असल्यानें यागाभिज्ञ ऋत्विजाला यागामध्यें बोलाविल्या जाणाऱ्या देवतांचें उच्चनीच स्थान सहजच वारकाईनें माहीत असण्याची आवश्यकता होती. कोणत्याहि देवतेची स्तुति करितांना तूं श्रेष्ठ किंवा तूंच एक आहेस असें जरी स्तुतींत म्हटलें असलें तरी असें वर्णन करणाऱ्या ऋचेंत किंवा पुढच्या मागच्या संदर्भांत ती देवता एकच नव्हे अशा प्रकारचा भाग असतो. व त्यामुळें त्याच अथवा तत्सम शब्दानें त्या देवतेसंबंधानें जी क्षणभर एकेश्वरी कल्पना मनांत येते ती लवकरच दूर होते. याचें उदाहरण, एक कवि अग्नीला उद्देशून म्हणतो कीं, अग्नि हा एकटाच वरुणाप्रमाणें संपत्तीचा स्वामी आहे. तेथें हेंहि लक्षांत ठेविलें पाहिजे कीं कांहीं देवता दोनदोन तर कांहीं तीनतीन तर कांहीं अधिक संख्येनें एकत्र युक्त अशा प्रार्थिल्या जातात. श्रेष्ठ वरुणदेव देखील याप्रमाणें दुसऱ्या एक किंवा अनेक देवांशीं संयुक्त अशा रीतीनें प्रार्थिला जातो ( ऋ. ६.६७,२ ). या सर्व विवेचनावरून हें दिसून येईल कीं, स्वतंत्र देवबाहुल्य हें वेदांत खरोखरीनें नसून तसा भास मात्र तेथें होतो व हा भास होण्याचीं कारणें वेदांतील देवतांनां मनुष्यरूप फार थोडें प्राप्त झालें असल्यानें त्यांच्या रूपरेखेंतील अनिश्चितता, झ्यूसप्रमाणें देवतासमूहामध्यें सर्वांत उच्च स्थान व्यापणारा देव वेदांत नाहीं ही गोष्ट, देवांचा स्तुतिपाठक पुरोहित अथवा कवि साहजिकच आपल्या इष्ट देवाचें माहात्म्य अतिशयोक्तीनें गाऊन इतर देवांनां गौणस्थान देतो ही स्थिती आणि सर्व देव एकच आहेत व कोणताहि देव दैवी गुणांचा नमुना म्हणून मानितां येईल या प्रकारचा विश्वास त्याकाळीं वाढत होता ही गोष्ट हीं आहेत.

वैदिक कवींच्या दृष्टीनें वैदिक देवतांनां जन्म होता. या देवता द्युलोक आणि पृथ्वी यांच्या अपत्यभूत आहेत, किंवा इतर देवतांपासून जन्मलेल्या आहेत असें त्यांचें वर्णन येतें. या वर्णनावरूनच देवतांच्या निरनिराळ्या पिढ्या वैदिक कविकल्पित होत्या हें उघड आहे. तथापि पूर्वे म्हणजे प्राचीन देव अशा प्रकारें कांहीं देवांचा उल्लेख कित्येक ठिकाणीं स्पष्टपणें आलेला आहे ( ऋ. ७.२१,७ इत्यादि ). देवांचें पहिलें युग किंवा प्राचीन युग असाहि उल्लेख कोठें कोठें येतो ( ऋ. १०.७२,२ व ३ ). अथर्ववेदांत ( अ. वे. ११.८,१० ) एके ठिकाणीं इतर देवांपूर्वीं दहा देव होते असें वर्णन आलेलें आहे. हे देव प्रथम मर्त्य असत असें अथर्ववेदांत स्पष्ट सांगितलें आहे ( अथर्ववेद ११.५,१९; ४.११,६ ). ब्राह्मणग्रंथांत सर्व देवांनां समुच्चयानें मर्त्य असें म्हटलें असून ( श. ब्रा. १०.४.३,३ ) इन्द्र, अग्नि आणि प्रजापति या संबंधानें व्यक्तिशः ते मर्त्य आहेत असें विधान आहे ( ऐ. ब्रा. ८.१४; ३.४; श. ब्रा. १०.१.३,१ ).

ऋग्वेदामध्यें देव हे प्रथम अमर नव्हते असें सुचविलें आहे. सवित्यानें त्यांनां अमरत्व दिलें ( ऋ. ४.५४,२; वा. सं. ३३.५४ ), अग्नीनें त्यांनां अमरत्व दिलें ( ऋ. ६.७,४; अ. ४.२३,६ ), सोम पिऊन त्यांनां अमरत्व आलें (ऋ. ९.१०६,८ ), अशा प्रकारचीं विधानें ऋग्वेदांत आहेत. उत्तरकालीं अशी एक कल्पना निघाली कीं, इन्द्रानें तपश्चर्येनें द्युलोक जिंकून घेतला ( ऋ. १०.१६७,१ ), अशाच मार्गानें देवांचें स्थान देवांनां मिळालें ( तै. ब्रा. ३.१२,३,१ ). तपश्चर्येनें व ब्रह्मचर्यानें देवांनीं मृत्यूवर विजय मिळविला (अ. वे. ११.५,१९), रोहिताच्याद्वारा देवांनीं अमरत्व मिळविलें ( अ. वे. १३.१,७ ), कांहीं एक प्रकारचा विधि करून देवांनीं मृत्यूवर जय मिळविला ( तै. सं. ७.४,१ ), याप्रमाणें अमरत्वासंबंधाचीं विधानें आहेत. इन्द्र आणि दुसरे कित्येक देव अमर आहेत ( ऋ. ३.४६,१ इत्यादि ) असें म्हटलेलें आढळतें. पण देवांचें हें अमरत्व वैदिक कवींच्या दृष्टीनें नेहमींचें होतें किंवा कांहीं काळानें आटपत असे हें समजण्यास कांहीं मार्ग नाहीं. वेदोत्तरकालीन मताप्रमाणें देवांचें अमरत्व हें कालमर्यादित होतें, हें फक्त एका युगापावेतों ( कल्पापावेतों ) टिकणारें होतें असें दिसतें.

देवांचें शारीरिक दर्शन अस्पष्ट असलें तरी मनुष्यगुणारोपित असतें; कारण त्यांचीं कृत्यें पुढें मांडण्यासाठीं त्यांच्या स्वाभाविक मूलगुणावस्थाच फक्त अलंकारांत दिग्दर्शित केलेल्या असतात. जसें, शिर, मुख, आस्य, कपोल, नेत्र, केश, स्कंध, हृदय, उदर, बाहू, कर, पाद निरनिराळ्या वैयक्तिक देवांवर

आरोपित केले असतात. शीर, हृदय (वक्षस्थल), बाहू आणि कर हीं इन्द्र आणि मरुत यांच्या युद्धविषयक साधनांत प्रमुखत्वानें आढळतात. सूर्याचे बाहू म्हणजे केवळ त्याचे किरण होत आणि त्याचा नेत्र त्याची शारीरिक अवस्था दिग्दर्शित करण्याकडे योजला असतो. अग्नीची जिह्वा आणि अवयव केवळ त्याच्या ज्वाला दाखवितात. सोम तयार करणारा असें वैशिष्ट्य पुढें मांडण्याकरितांच केवळ त्रिताच्या अंगुली, आणि सोमपानाची इन्द्राची शक्ति जोरदार रीतीनें दाखविण्यासच फक्त इन्द्राचें उदर उल्लेखिलेलें आहे. विश्वरूप धारण करणारे म्हणून दोन तीन देवांविषयींच वर्णन आहे.

ज्यांचा बाह्य आकार इतक्या अस्पष्टपणें कल्पिला होता आणि अनेक ठिकाणीं अजूनहि ज्यांचा नैसर्गिक दृष्ट्या लोकांशीं असणारा संबंध स्पष्ट दिसत होता अशा या देवतांच्या संबंधांत, ऋग्वेदांत मूर्ती किंवा देवस्थानें कां आढळत नाहींत हें समजणें कठीण नाहीं. वस्त्रें धारण करणाऱ्या कांहीं देवांचें वर्णन आढळतें. उदाहरणार्थ, शोभिवंत वस्त्रांनीं अलंकृत असें उषेचें वर्णन आहे. कांहीं देव चिलखतें किंवा शिरस्त्राणें यांनीं सशस्त्र होऊन अगदीं सज्ज आहेत. इन्द्र तर नेहमींच वज्र घेऊन, आणि इतर देव भाले, परशु, धनुष्यबाण घेऊन सशस्त्र राहातात. सामान्यतः देव दीप्तिमान् रथावर आरूढ होतात असें वर्णन असतें. बहुतेक प्रत्येक देवतेचा एक एक रथ असतो. रथाला बहुशः घोडे असतात, पण पूषन्‌चा रथ बकरीं, मरुतांचा बहुधा ठिपके अंगावर असलेलें हरीण अथवा घोडे आणि उषेचा रथ गायी आणि घोडे ओढून नेतात.

यज्ञांत आंथरलेल्या दर्भासनावर बसण्याकरितां देव रथांतून येतात असें वर्णन आहे. उलटपक्षीं, अग्नि देवांकडे यज्ञहवी पोंचते करितो अशीहि कल्पना दिसून येते. देवांचें मादक पेय म्हणजे सोम. यज्ञांत हवी देण्याकरितां उपयोगांत आणीत असलेलें मानवांचें आवडतें अन्न देव खातात. हें अन्न म्हणजे निरनिराळ्या प्रकारचें दूध, घृत, यव आणि तांदूळ (हीं अगदीं प्राचीन वैदिक कालांत नसावीं), गुरें आणि शेळया मेंढ्या हें होय. देवतांच्या विशिष्ट गुणांशीं कांहीं तरी बाबतींत निकट संबंध असलेल्या पशूंची प्रथम निवड करीत. उदाहरणार्थ, ज्याच्याशीं इन्द्राची नेहमीं तुलना करण्यांत येते असा वृषभ इन्द्राला अर्पण करण्यांत येतो व इन्द्र तो व कधींकधीं असंख्यात वृषभ खाऊन टाकितो. सान्निध्यानें, इन्द्राचे घोडे धान्य खातात असें मानण्यांत येतें. देवांचें स्थान स्वर्ग, तृतीय स्वर्ग किंवा विष्णूचें परम (उच्चतम) पद असें निरनिराळें वर्णिलें आहे. सोम पिऊन तेथें ते आनंदांत दिवस काढतात. शांततेंत आणि स्नेहभावानें सरसकट सर्व देव एकत्र राहातात असें मानण्यांत येतें. भांडणाचा सूर काढणारा फक्त एकच देव आहे व तो म्हणजे वीर्यशाली व धृष्ट इन्द्र होय. एकदां तो बहुधा सर्व देवांबरोबर लढला (ऋ. ४.३०,३५) असें दिसतें; त्यानें आपल्या खुद्द बापाला ठार मारिलें, आणि उषेचा रथ मोडून टाकला. एकदां तर त्यानें आपल्या इमानी मरुद्बांधवांनां ठार करण्याचा धाक घातला असें दिसून येतें.

अग्नि, सूर्य, वादळ इत्यादि प्रमुख नैसर्गिक शक्ति दिग्दर्शित करणारे देव, विजयी आणि अतएव आशावादी भारतीयांनां ऋद्धिदायी व केवळ हितकर अशाच व्यक्ती दिसल्या. ज्याच्यांत पीडादायक गुण अधिक दृग्गोचर होतात असा देव म्हणजे फक्त रुद्र होय. रोगासारख्या मानवी जीविताशीं संबद्ध अशा दुष्ट गोष्टी क्षुद्र (कमी प्रतीच्या) दैत्यांपासून उद्भवतात आणि अवर्षण, अंधकार यासारखीं सृष्टींतील मोठीं अरिष्टें वृत्रासारखे प्रबल दैत्य उत्पन्न करितात. या दैत्यांवर विजय मिळविल्यानें देवांचे हितकर गुण प्रामुख्यानें पुढें येतात. देवांची दया मानवी प्राण्यांच्या दयेसारखीच असते. हे देव प्रामुख्यानें यज्ञभोक्ते असतात; सोम काढतांना, हवी अग्नींत टाकतांना यांचीं सूक्तें म्हणण्यांत येतात आणि ऋत्विज निरनिराळ्या विधींतील गुंतागुंतीच्या प्रकारांकडे अवधान राखितात म्हणून देव यजमानाचे मित्र असतात व अधार्मिकांनां ते शिक्षा करितात. इन्द्राच्या संबंधांत ही गोष्ट विशेष दिसून येते.

**वैदिक नीतिमत्ता.**—वैदिक देवांत नीतिमत्ताहि वास करिते. सर्वच देव सत्य व प्रामाणिक असतात; ते नेहमींच निष्कापट्य आणि सदाचार यांचे रक्षक व सखे समजले जातात. तथापि आदित्य आणि विशेषतः वरुण हे नैतिक शासनांचे प्रमुख पुरस्कर्ते होत. दुष्कर्में करणारांवर देव कोपतात परंतु अपराध आणि पाप यांच्या कल्पनेशीं पूर्ण निगडित झालेला म्हणजे वरुणाचा कोप होय. अपराधापासून मुक्तता करण्याविषयीं अग्नीची सुद्धां प्रार्थना केलेली आहे पण इतर अनेक त्याच्या प्रार्थनांतील ही एक आहे, त्यांचा मुख्य आशय हा नव्हे. इंद्रसुद्धां पापनाशन करितो पण हें लक्षण त्याच्या स्वभावाचें गौण अंग दिसतें. या दैवी नीतिमत्तेच्या दर्जावरून स्वाभाविकपणें त्यावेळची सुधारणेची प्राथमिक अवस्था दिग्दर्शित होते. उदाहरणार्थ, वरुणाचा सदाचाराशीं असलेला संबंधदेखील विरुद्ध पक्षाच्या फसव्याशीं उलट कपट योजण्यापासून त्याला परावृत्त करील अशा प्रकारचा नाहीं. तथापि चांगल्या धार्मिक माणसाशीं वागतांना त्याचा इमानीपणा अबाधित राहातो. पण इंद्राचें कपट पुष्कळ वेळां चांगल्या हेतूनेंहि केलेलें नसतें.

परमेश्वरविषयक वृत्ति पुष्कळशी समाजांतील व्यवहारनीति व स्त्रीपुरुषसंबंध यांची नियामक होते. ईश्वरविषयक कल्पनांमुळें नैतिक कल्पनांवर मंत्रकालीं काय परिणाम झाला त्याची कल्पना येण्यासाठीं थोडेंसें विवेचन अवश्य आहे.

वेदकालीन नीतिकल्पनांविषयीं स्थूल विचार मागें दिलेच आहेत. यमयमीसूक्ताचा उल्लेख नीतिविषयावर लिहिणारे वारंवार करतात.* हें सूक्त मागें (पृ. ४४) दिलेंच आहे त्याचें आणि वसिष्ठाच्या पदरीं बांधलेल्या चोरीचें आतां थोडेंसें विवेचन येथें करूं.

यम व त्याची जुळी बहीण यमी यांच्यामध्यें झालेला संवाद या सूक्तांत वर्णन केला आहे, तो फारच चमत्कारिक आहे. कोलब्रूकनें या सूक्ताचा अर्थ लावतांना घोडचूक केलेली आहे; त्यानें सूक्ताच्या अर्थाचा विपर्यास केला आहे येवढेंच नव्हे तर त्यावरील टीकेच्या अर्थाचाहि विपर्यास केला आहे. मन पापास प्रवृत्त करण्याचा प्रयत्न यमानें केलेला नसून यमीनें केलेला आहे (कोलब्रूकनें घेतलेलें यमुना नांव चुकीचें आहे) व तिचा प्रयत्नहि त्यास पापमार्गास वळविण्याचा नसून स्वतःशीं लग्न करण्याबद्दल मन वळविण्याचा आहे. यम व यमी हीं दोघें खरीं कोण आहेत हें कळल्यावर वरील नैतिक गुन्ह्यास हास्यास्पद स्वरूप येतें. त्यांच्या नांवांवरून बोध होतो त्याप्रमाणें तीं दोघें जुळीं वहीणभाऊ आहेत व मानवी वंशाची उत्पत्ति करणारें तें पहिलें मानवी जोडपें अगर दंपत्य होय. पुरुष व त्याच्याच शरीरांशापासून उत्पन्न झालेली स्त्री हीं दोघें मानवांचीं पहिलीं मातापितरें होत, ही जशी हिब्रू ग्रंथांत समजूत आहे त्याप्रमाणें ह्या जुळया वहीणभावंडांचा संबंध दाखविला आहे. हाच विचार वरील वादग्रस्त सूक्तांत यमीच्या तोंडीं घातला आहे; कारण ती म्हणते "आम्ही गर्भाशयांत होतों तेव्हांपासूनच आम्ही नवराबायको व्हावें अशी विधात्याची योजना दिसते." पुढील काळांत या विसरत चाललेल्या दंतकथांवर लोकांचा प्रत्यक्ष विश्वास बसेना तेव्हां मानवी वंशाच्या उत्पत्तीच्या दंतकथेंत कां होईना, पण वहीण व भाऊ यांमध्यें अशा प्रकारचा अपवित्र संबंध असावा या कल्पनेचीच लोकांना चीड आली. वरील सूक्ताच्या मुळाशीं अशा प्रकारची नीतिविषयक शंका आहे. त्या सूक्तांत यमानें आपला नवरा व्हावें म्हणून त्याचें मन वळविण्यांत यमीनें आपलें सर्व वक्तृत्व खर्च केलें आहे; पण सृष्टिनियमाचा भंग करण्याचें तो नाकारतो. अमर्त्य अशा देवांनीं एकटा मर्त्य मानव उत्पन्न केला त्यानें वंश वाढवावा अशी त्या देवांचीच इच्छा आहे व असा संबंध जडावा अशी विधात्याचीच योजना आहे व तिला नाकारणें हें तिजवरील प्रेमाचें खास निदर्शक नव्हे असा ती त्याच्याशीं युक्तिवाद करते. पण तो उत्तर देतो कीं, बहिणीशीं अशा प्रकारचा संबंध जोडणाऱ्या भावास लोक पापी समजतात; कधींहि विश्रांति न घेणारे असे देवदूत पृथ्वीवर काय चाललें आहे याची नोंद ठेवण्याकरितां सर्वत्र संचार करतात व कदाचित् पुढें अशी वेळ येईल कीं, बहीणभाऊ सृष्टिबाह्य वर्तन करतील, तरीपण मी कांहीं तुझी इच्छा पूर्ण करीत नाहीं.

कवि असल्या व्यभिचारास संमति देत नाहीं येवढेंच नव्हे तर आद्यमातापितरांची पुराणकथाहि त्याच्या नीतिपर टीकेच्या तावडींतून सुटली नाहीं; व या बाबतींत आपल्या मनाचें समाधान होण्याकरतां, अरसिकता व वेडगळपणा यांचा दोष पदरीं घेऊनहि, ज्या संबंधापासून सबंध मानववंशाची उत्पत्ति व्हावयाची अशा प्रकारचा संबंध तो होऊंच देत नाहीं. असें न केल्यास मानववंशाची वाढ कशी करावयाची या प्रश्नाविषयीं त्यानें आपल्या डोक्यास कधींच त्रास दिलेला नाहीं. त्याच्यामतें विवाहविषयक बाबतींत घालून दिलेले नियम पवित्रतेनें पाळले गेले म्हणजे झालें.

अशा प्रकारचें दुसरें एखादें उदाहरण परकीय प्राचीन वाङ्मयांत शोधून काढावयाचें म्हटलें तर मोझेइक इतिहासांत तें आढळतें. ज्या संबंधास आपण सध्यां सृष्टिनियमबाह्य म्हणूं असा संबंध अॅडम व ईव्ह यांच्या मुलांमध्यें होता या गोष्टीकडे "सृष्ट्युत्पत्ति" मध्यें दिलेल्या हकीकतींत मुकाट्यानें कानाडोळा केलेला दिसतो. यासंबंधीं तेथें मुळींच विचार प्रदर्शित केलेले नाहींत. सर्व मानववंशाची उत्पत्ति एका जोडप्यापासून झाली येवढीच वस्तुस्थिति तेथें स्पष्ट सांगितली आहे. वर सांगितलेल्या सूक्ताच्या कर्त्यानें वरील गोष्टीवर बऱ्याच शंकाकुशंका काढल्या आहेत व हा प्रश्न वांकड्यातिकड्या मार्गानें सोडविला आहे म्हणा किंवा अडचणींतून कसा तरी मार्ग काढला आहे. नीतिअनीतीच्या प्रश्नाकडे सृष्ट्युत्पत्तिग्रंथांत अजिबात दुर्लक्ष केल्याबद्दल जसा दोष द्यावयाचा नाहीं तद्वतच या प्रश्नाची चर्चा या सूक्तांत केल्याबद्दल कोणाला श्रेय द्यावयाचें नाहीं. प्राचीन परंपरागत कथांतील भागाचें आधुनिक (नैतिकदृष्ट्या) चिकित्सादृष्टीनें परीक्षण करून त्यावर मत देण्यानें आपण कोठें वहावत जातों येवढें या उदाहरणावरून व्यक्त होतें. बौद्ध ग्रंथांमध्येंहि बुद्धाच्या वंशाची उत्पत्ति बंधुभगिनीविवाहापासूनच दाखविली आहे, मात्र तेथें हा विवाह नीचोच्चविवाहापेक्षां श्रेष्ठतर म्हणून त्याचें समर्थन करण्याचा प्रयत्न केला आहे.

वर आक्षेप घेतलेल्या दुसऱ्या उदाहरणाच्या बाबतींतहि हाच प्रकार झाला आहे; पण कोलब्रूकच्याच शब्दांची या प्रश्नाचा बराच उलगडा होण्यास मदत होते. कोलब्रूक म्हणतो, "सातव्या मण्डलांतील दुसऱ्या सूक्तांतील कथा मजेदार आहे. वसिष्ठ वरुणाच्या घरीं रात्रीं आला व त्याच्यावर वरुणाच्या पाळलेल्या कुत्र्यानें हल्ला केला. कांहींजण म्हणतात कीं, निजावयाच्या उद्देशानें वसिष्ठ गेला तर कांहीं म्हणतात वसिष्ठानें तीन दिवस उपोषण केलें होतें तेव्हां क्षुधाशमनार्थ धान्य चोरून आणण्याच्या उद्देशानें गेला. भुंकणाऱ्या व चावण्याचा प्रयत्न करणाऱ्या कुत्र्यास

* JAOS. Vol. III p. 329-341.

झोंप यावयास लावण्याकरितां वसिष्ठानें सूक्तांत सांगितल्याप्रमाणें प्रार्थना अगर मंत्र म्हटला.'' ऋषींच्या अंगीं असणाऱ्या ज्ञानाचा व सामर्थ्याचा आदर्श म्हणून नांवाजलेल्या वसिष्ठऋषीस येथें चोरी करतांना पकडलें आहे! वरुणानें त्याला पकडलें असें नाहीं, कारण, त्याच्या कुत्र्यास वसिष्ठास सहज शाप देतां आला असता; पण अर्वाचीन काळच्या नीतिविषयक कल्पनांनीं मागच्या काळाचें परीक्षण करणारांनीं वसिष्ठऋषीस पकडलें आहे! चोरीपासून तोटा कोणाचा झाला तर वैदिकधर्मांतील श्रेष्ठ देव, सदा शाश्वत तेजांत व पुण्य व उदार जनांच्या सहवासांत राहणारा असा जो वरुण त्याचा. वरुणाच्या घरांत सांपडणारें धान्य म्हणजे काय असावें बरें? ज्यांनीं ही वेडीवांकडी गोष्ट रचली त्याच टीकाकारांवर या प्रश्नाचें उत्तर सोंपविणें बरें. या प्राचीन सूक्ताचें स्पष्टीकरण करणाऱ्या विद्वानांच्या कर्तव्यांपैकीं, अर्थात् त्यांच्या मतानें, एक कर्तव्य हें आहे कीं, नेहमींच्या प्रार्थना, स्तुति वगैरे व्यतिरिक्त जर सूक्तांत दुसरें कांहीं आढळलें तर अमकें सूक्त अशा अशा प्रसंगास अनुलक्षून रचलें असावें असें मत ठोकून देणें किंवा सूक्तास प्रस्तावनादाखल म्हणून एखादी गोष्ट शोधून काढणें. अशा तऱ्हेच्या प्रसंगानुसार पुष्कळ गोष्टी रचलेल्या आहेत व त्यांपैकीं ज्या ऋग्वेदासंबंधीं आहेत त्या एकत्र करून त्यांचा एक स्वतंत्र 'बृहद्देवता' नांवाचा ग्रंथच बनविला आहे. वरुणाच्या घरांत रात्रीं वसिष्ठ शिरले ही कथा वरील ग्रंथांतून घेतली आहे. वसिष्ठविषयक म्हणून जीं सूक्तें समजलीं जातात त्यांत कुत्रा अंगावर चालून आला असतांना त्यापासून रक्षण करण्यासंबंधींच्या कांहीं ऋचा आढळल्या व कांहीं ऋचा (यांचा मागच्या ऋचांशीं कांहीं संबंध नाहीं) अशा आढळल्या कीं ज्यांत घरांतील सर्व माणसांनां झोंप यावी अशी प्रार्थना केली आहे. पूज्य मानलेल्या सूक्तांच्या संग्रहांत वरील प्रकारच्या ऋचा सांपडण्याचें कारण शोधून काढण्याचा प्रयत्न अर्थातच झाला असला पाहिजे व वरील गोष्टी सांधणारी अशी एखादी गोष्ट कोणाच्या तरी डोक्यांतून निघाली असावी. त्याचा परिणाम असा झाला आहे कीं, पंजाब प्रांतांत हजारों वर्षांपूर्वीं वास्तव्य करणाऱ्या वसिष्ठासारख्या ऋषीवर चोरी लादली गेली आहे.

वैदिक देवांच्या विशेषणांत बलाइतका उच्च दर्जा नीतिमत्तेला नाहीं. ''सत्रा'' (सत्य) व ''विमाय'' (प्रामाणिक) यासारखीं विशेषणें ''महान्'' व ''बलिष्ठ'' यासारख्या विशेषणांहून कमी प्रतीचीं आहेत. देव चाहील ते करूं शकतात. इच्छापूर्ति त्यांच्यावर अवलंबून असते. सर्व प्राण्यांवर त्यांची सत्ता चालते. त्यांनीं घालून दिलेले नियम मोडण्याची कोणाचीहि प्राज्ञा नाहीं किंवा त्यांनीं दिलेल्या आयुष्यापेक्षां जास्त कोणीहि जगूं शकत नाहीं.

**देवतांची संख्या.**—ऋग्वेद आणि अथर्ववेद यांतून देवांची संख्या ३३ सांगितली आहे (ऋ. ३.६,९ इ.; अथर्व. १०.७,१३). ही संख्या कित्येक वेळां ''त्रि एकादश'' अशा शब्दांनीं सांगितलेली असते. एका ऋचेंत (ऋ. १.१३९,११) अकरा देव स्वर्गांत, अकरा पृथ्वीवर आणि अकरा उदकांत असल्याबद्दल उल्लेख आहे. त्याचप्रमाणें अथर्ववेदांत (१०.९,१२), स्वर्गांत, अन्तरिक्षांत आणि पृथ्वीवर राहाणारे असे देवांचे विभाग पाडिले आहेत, पण त्यांची संख्या दिलेली नाहीं. एकंदर देवसमूह तेहेतिसानें पुरा होत नसून, कांहीं ठिकाणीं (ऋ. १.३४,११;४५,२;८.३५,३;३९,९) या ३३ बरोबर इतर देवहि आलेले आहेत. एका ऋचेंत (ऋ. १०.५२,६; तु० वा. सं. ३३.७) देवांची संख्या ३३३९ अशी कांहींतरी लहरीनें सांगितल्यासारखी दिसते. यांचे तीन वर्ग पडतात, असें यांच्या संबंधीं सामान्य विधान केलें आहे (ऋ. ६.५१,२). द्यावापृथिवी आणि उदकें यांच्याशीं जेव्हां देवांचा संबंध येतो तेव्हां त्यांचे तीन वर्ग सूचित केले जातात (ऋ. ७.३५,११; १०.४९,२;६५,९). ब्राह्मणांतून सुद्धां देवांची संख्या ३३ दिलेली आहे. शतपथ आणि ऐतरेयब्राह्मण यांत, ८ वसू, ११ रुद्र, १२ आदित्य असे तीन समूह पाडले आहेत, परंतु शतपथ ब्राह्मणांत (४.५.७,२) द्यावापृथिवी (या ठिकाणीं प्रजापति ३४ वा) किंवा इंद्रप्रजापति (११.६.३,५) मिळवून, आणि ऐतरेय ब्राह्मणांत (२.१८,) वषट्कार व प्रजापति मिळवून, देवांची संख्या ३३ पुरी केली आहे.

**वर्गीकरण.**—ऋग्वेदाच्या ऋ. १.३९,११ ला अनुसरून यास्काचार्य (नि. ७.५) देवतांचे तीन प्रकार कल्पितात. पृथिवीस्थान (नि. ७.१४–९.४३), अन्तरिक्षस्थान (मध्यमस्थान) (नि. १०.१–११.५०), आणि द्युस्थान (नि. १२.१–४६). ते यानंतर असें प्रतिपादितात कीं, नैरुक्तांच्या मतें, पृथ्वीवर अग्नि, अन्तरिक्षांत इंद्र किंवा वायु व स्वर्गांत सूर्य या तीनच देवता काय त्या होत्या. ही गोष्ट ऋ. १०.१५८,१ या सारख्या स्थलांवरून दिसून येते—''स्वर्गांतून सूर्य, अन्तरिक्षांतून वात, पृथ्वीवरील प्रदेशावरून अग्नि आमचें रक्षण करो.'' निरनिराळ्या कामांप्रमाणें या प्रत्येकाला निरनिराळीं नांवें आहेत, जसें एकच मनुष्य होतृ, अध्वर्यु, ब्रह्मन्, उद्गातृ या अधिकारांवर काम करितो त्याप्रमाणें सर्व वेगवेगळाले देव या तीन प्रातिनिधिक देवतांचींच रूपें आहेत हें मत यास्काचार्यांनां मान्य नाहीं. ज्या र यास्काचार्य टीका करितात तें नैघंटुकाचें पांचवें प्रकरण देवांच्या यादींत अनेक किरकोळ देवत्वारोपित वस्तू देवता म्हणून देतें; व या योगानें प्रत्येक वर्गाची संख्या अकरांपेक्षां फारच मोठी भरते. विशेष नमूद करण्यासारखी गोष्ट म्हणजे, या देवांच्या यादींत त्वष्टृ आणि पृथिवी यांचीं नांवें तीनहि क्षेत्रांत, अग्नि आणि उषस् यांचीं

पृथिवी आणि अन्तरिक्ष या दोन क्षेत्रांत, आणि वरुण, यम व सवितृ यांचीं नांवें अन्तरिक्ष आणि द्युक्षेत्रांत आलेलीं आहेत.

निरनिराळ्या वैदिक देवांचें वर्गीकरण त्यांच्या सापेक्ष महत्त्वास अनुसरून केलें जाण्याचाहि एक संभव दिसतो. अशा प्रकारचा वर्ग ऋग्वेदांत मोघम उल्लेखिलाहि आहे; त्या ठिकाणीं ( ऋ. १.२७,१३ ) त्यांनां लहानमोठे, वृद्धतरुण असें म्हटलें आहे. हें विधान देवांमधील योग्यतानुक्रमासंबंधीं वैदिक कवींचें ठाम मत दर्शवीत असावेंसें वाटतें. एका ऋचेंत (ऋ. ८.३०,१ ) देवांनां अनुलक्षून 'तुम्हांपैकीं कोणीहि अर्भक किंवा कुमार नाहीं; तुम्ही सर्वजण मोठेच आहांत' असें जें म्हटलें आहे, तें विसंवादासारखें भासतें पण तो विसंवाद नव्हे; कारण या गोष्टीसंबंधानें प्रत्यक्ष देवांशीं बोलतांना कोणीहि कवि असेंच म्हणेल. सर्व देवांमध्यें दोन देव बलाढ्य योद्धा इन्द्र आणि श्रेष्ठ नीतिशास्ता वरुण हे समान बलवान् देवतांचे पुढारी असून निःसंशय श्रेष्ठ आहेत. पूर्वरूपांत वरुण त्याच्या नैतिक गुणाधिक्यामुळें इराणी लोकांचा अहुरमझ्द नांवानें श्रेष्ठ दैवत बनला; आणि इकडे भरतखंडांत इन्द्र विजयी आर्यांची युद्धदेवता म्हणून पुढें आला. जेव्हां भौतिक आणि नैतिक जगाच्या श्रेष्ठ शासनासंबंधीं विचार केला जातो, तेव्हांच कायतो वरुण सर्वोत्तम दिसतो; त्याला सामान्य जनांचा देव म्हणतां येणार नाहीं. अनेक विद्वानांचें असें मत आहे कीं, अगदीं प्राचीन काळीं वरुण आणि आदित्य श्रेष्ठतम देव गणले जात असत; पण पुढें त्यांची जागा इन्द्रानें पटकाविली. कसेंहि असलें तरी अतिप्राचीन ऋग्वेदकालीं देखील इन्द्राचा दर्जा गौण होता हें दाखविण्यास पुरावा मिळत नाहीं. आतां हें खरें आहे कीं, अवेस्तांत अहुरमझ्द हा श्रेष्ठतम देव आहे व इन्द्र दैत्य आहे. पण जरी कदाचित् पर्शुभारतीय कालामध्यें मूळ इन्द्राला वरुणाच्या जोडीनें सत्ता असली तरी झरथुष्ट्रीय संप्रदायांत अहुरमझ्दाला श्रेष्ठपद मिळालें त्या वेळीं इन्द्राला गौणत्व प्राप्त झालें असावें. इन्द्रवरुणानंतर अग्नीषोम या यज्ञिय देवता येतात. इन्द्र व या दोन देवता ऋग्वेदांतील सर्वांत ज्यास्त लोकप्रिय देवता असाव्यात, कारण यांचीं सूक्तें वारंवार आढळतात. ऋक्सूक्तांपैकीं जवळजवळ तीनपंचमांश यांच्याप्रीत्यर्थ आहेत. गोत्रमंडलांत प्रथम इन्द्राग्नींचीं सूक्तें येतात व नवव्या मंडळांत बहुतेक सर्व सोमसूक्तें आहेत, ही गोष्ट देखील वरील विधानाची सत्यता पटविते. बाकीच्या प्रत्येक देवतेच्या सूक्तसंख्येवरून व तिचा ऋग्वेदांत किती वेळां नामनिर्देश आहे हें पाहून देवांचे पांच वर्ग पाडितां येतातः—( १ ) इन्द्र, अग्नि, सोम; ( २ ) अश्विन्, मरुत्, वरुण; ( ३ ) उषा, सवितृ, बृहस्पति, सूर्य, पूषन्; (४ ) वायु, द्यावापृथिवी, विष्णु, रुद्र; ( ५ ) यम, पर्जन्य. केवळ सूक्तसंख्येवर बसविलेलें हें प्रमाण साहजिकच पूर्णांशानें बरोबर नसणार. उदाहरणार्थ, वरुण ( बहुशः मित्रासह ) फक्त तीस सूक्तांतून स्तविला गेला आहे आणि त्याचा नामनिर्देश अजमासें २५० वेळां आलेला आहे. उलटपक्षीं अश्विनांचीं ५० वर सूक्तें असून ४०० हून ज्यास्त वेळां त्यांचा उल्लेख आला आहे, तथापि मोठेपणांत ते वरुणाच्या तोडीचे आहेत असें कधींहि म्हणतां येणार नाहीं. त्यांचें हें उल्लेखसंख्यात्मक महत्त्व प्राक्प्रकाशदेवता म्हणून यज्ञाशीं ज्यास्त निकट संबंध असल्यामुळें उत्पन्न झालें असावें तसेंच मरुतांचें महत्त्व इन्द्रसहवासामुळें आहे. इतर देवतांच्या सापेक्ष महत्त्वाचें मापन करितांना अशाच तऱ्हेनें विचार करावा लागेल. या तऱ्हेनें लाविलेल्या क्रमांत अनेक अडचणी व शंका उद्भवतात म्हणून वैदिक देवांच्या हिशेबांत योग्यतानुक्रमाप्रमाणें झालेलें वर्गीकरण समाधानकारक असूं शकत नाहीं.

दुसरें वर्गीकरण वरील पेक्षांहि कमी समाधानकारक असून, दैवतविषयक कथांच्या उत्पत्त्यनुसार सापेक्ष कालनिर्णय करून त्या काळाच्या आधारें तें करण्यांत आलें आहे. भारती-यूरोपीय व पर्शुभारतीय कालापासून आणि भारतीयांच्या स्वतंत्र राष्ट्रीय अस्तित्वापासून कालगणना सापेक्षत्वानें करण्यांत येते. उदाहरणार्थ, बृहस्पति, रुद्र, विष्णु हीं निवळ भारतीय दैवतेतिहासांतील दैवतें मानण्यांत येतात; निदान त्यामागील काळांत त्यांनां घालण्यास पुरेसा पुरावा तरी अजून सांपडला नाहीं असें कांहीं पंडितांचें मत आहे. पुष्कळशा देवता पर्शुभारतीय कालांतील आहेत. पण द्यौःखेरीज दुसऱ्या कांहीं वैदिक देवता भारती-यूरोपीय कालांतील आहेत कीं काय हें मुळींच निश्चित होत नाहीं. तेव्हां दैवतकथोत्पत्तिकालानुसार वर्गीकरण फारच अशाश्वत पायावर उभारलेलें दिसून येतें.

देवतांच्या सगुणत्वाच्या अवस्थांवरूनहि त्यांचें वर्गीकरण करितां येईल. पण अवस्थांमध्यें स्पष्ट विभाजक रेषा काढण्याच्या कामांत अनेक अडचणी येतात.

या सर्व गोष्टींचा विचार करितां, वैदिक देवतांचें त्यांच्या मूलस्वभावानुसार वर्गीकरण कमी आक्षेपार्ह ठरतें. कारण, कांहीं बाबतींत भौतिक मूळ काय असावें अशी शंका उद्भवेल आणि एखादी विशिष्ट देवता भलत्या ठिकाणीं पडण्यांत चुकी होईल, तथापि या पद्धतीच्या योगानें, सजातीय देवता एकत्र आणून, त्यांची तुलना सुलभ होते. म्हणून थोड्या फार फरकानें हीच पद्धत आतांपर्यंत वापरली आहे. ऋग्वेदांत सुचविलेल्या आणि प्राचीन ऋक्भाष्यकारांनीं अनुसरलेल्या त्रिवर्गानुरोधानें निरनिराळ्या हविर्विषयांचे संघ बनवून वरील विवेचन केलें आहे.

दैवतेतिहासाचा एक अवश्य भाग म्हटला म्हणजे दैवतांविषयीं उपासकाची भावना कोणत्या प्रकारें निरनिराळी होती याचा इतिहास होय.

दैवतविषयक भावना मंत्रकालांत निराळी आणि ब्राह्मणकालांत निराळी सहजच दिसते. उपनिषदांत दैवतविषयक भावना त्याहूनहि निराळी आहे. मंत्रकालांतल्या भावनेचें स्वरूप स्पष्ट आहे. वरुणासारख्या देवतेच्या बाबतींत हा सर्वशक्तिमान् आहे आणि भक्तानें लीनतेनें त्याच्याशीं वागावें ही वृत्ति आहे, तथापि देवापाशीं सलगी जी महाराष्ट्रांतील भागवतसंप्रदायांत वारंवार दृष्टीस पडे ती सलगीहि वैदिक वरुणसूक्तांत वसिष्ठानें दाखविली आहे.

वैदिक वाङ्मय यज्ञास अनुकूल असेंच असल्यामुळें तत्कालीन केवल भक्तिमूलक परंतु अगदीं कर्मविहीन अशा उपासनेच्या वाङ्मयाचे अवशेष आज फारसे उपलब्ध नाहींत. तथापि ध्यानस्मरणादि मानसपूजेच्या प्रकारांचें अस्तित्व मधून मधून दृग्गोचर होतें. श्रद्धेचें महत्त्व दाखविणारे तीन उतारे येथें देतों.

ज्याला न जाणणारे लोक तो शत्रूंचा घातक कोठें आहे असें विचारतात, तो नाहींच असें कोणी म्हणतात, तो शत्रूंच्या धनांचा नाश करितो त्याच्या ठिकाणीं श्रद्धा ठेवा व तो इन्द्र असें समजा ( ऋ. २.१२,५ ).

तो योद्धा जनांकरितां शोधकदृष्टीनें व आपल्या सामर्थ्यानें मोठें युद्ध करितो, तो जेव्हां आपल्या वज्राचा ( मेघावर ) प्रहार करितो तेव्हां त्या दीप्तिमान् इन्द्राच्या ठिकाणीं लोक श्रद्धा ठेवतात ( ऋ. २.५५,५ ).

हे इन्द्रा! जो मर्त्य सर्वव्यापक अशा तुझ्या ठिकाणीं श्रद्धा ठेवतो, त्याला तूं यज्ञप्रसंगीं धनवान्, अन्नवान् व बलवान् करितोस ( ऋ. ७.३२,१४ ).

मंत्रकालाविषयीं सामान्यतः असें म्हणतां येईल कीं, मंत्रकालांत भक्तिमिश्रित उपासना होती आणि त्या उपासनेवर कर्ममहत्त्वाचें आवरण चढत होतें. ब्राह्मणकालांत कर्मप्राधान्य अधिक दिसून येतें; आणि यज्ञ केल्यामुळें देवांसहि महत्त्व प्राप्त झालें, देवांसहि यज्ञच वळकटी देतात ही कल्पना दिसते. कर्मवाद म्हणजे जसें करावें तसें भरावें हा वाद ब्राह्मणकालांत अर्थात् गौणच असणार. हा उपनिषत्कालांत जरी जोरानें पुढें आला तरी त्याचीं मुळें मंत्रकालांत सांपडतात.

असो. वरील विवेचनावरून वाचकांस वेदकालीन दैवतांबद्दलच्या तत्कालीन निरनिराळ्या वृत्तींचें व कल्पनांचें अवगमन करणें बरेंच सुलभ होईल. आतां आपण यज्ञसंस्थेकडे पुन्हा वळून त्या संस्थेचा इतिहास थोडासा ज्यास्त व्यापक व अंतर्मुख दृष्टीनें अवगत करून घेऊं.

---



# प्रकरण १३ वें.

## वेदकालीन इतिहास—यज्ञसंस्थेचा अधिक इतिहास.

यज्ञसंस्थेचा स्थूल इतिहास मागें दिलाच आहे. यज्ञसंस्थेच्या मुळाशीं जी दैवतविषयक कल्पना असते ती कल्पना जितकी अधिक स्पष्ट होईल तितका दैवतेतिहासहि अधिक समजेल म्हणून दैवतेतिहास मध्येंच दिला आहे. आतां यज्ञसंस्थेच्या इतिहासाकडे पुन्हां वळूं.

यज्ञसंस्था पौराणिक धर्माच्या उद्गमापासून लयास जाऊं लागल्या. पौराणिकांची वृत्ति यज्ञसंस्थेस विघातक, पण यज्ञांचा आदरपूर्वक उल्लेख करण्याची दिसून येते. पुराणांत कवींनीं अनेक जुन्या यज्ञांचा इतिहास दिला आहे व त्यावरोबर सृष्ट्युत्पत्तिविषयक अनेक रूपकेंहि दिलीं आहेत. कांहींतरी अपूर्व फलनिष्पत्तीसाठीं यज्ञ होत असत तथापि यज्ञमार्ग मोठा कठिण आहे असें दाखविण्याचा प्रयत्न त्यांत दृष्टीस पडतो. महाभारत आणि पद्म, अग्नि, ब्रह्म, विष्णु, सौर आणि वायु या पुराणांमधील यज्ञविषयक उल्लेख येथें प्रथम देतों, आणि नंतर रूक्ष ऐतिहासिक पद्धतीनें यज्ञेतिहास देण्याकडे वळतों. पौराणिक साहित्याचा ऐतिहासिकदृष्ट्या फारसा उपयोग नाहीं, कां कीं यज्ञसंस्थेशीं अपरिचितपणा त्यांच्या विधानांत दिसून येतो (पृष्ठ २२५ पहा). त्यामुळें केवळ उल्लेख देऊन टाकले म्हणजे आम्हीं मोकळे झालों.

**महाभारतांतील यज्ञविषयक उल्लेख-आदिपर्व.**— अध्याय १ ला यामध्यें कुलपति शौनक यानें द्वादशवार्षिक सत्र केलें असतां त्यामध्यें रोमहर्षणपुत्र सौति हा आला व तो तेथें आला असतां शौनकादि ऋषींनीं त्याला भारत सांगण्याविषयीं प्रार्थना केली आहे व त्यावरून सौतीनें भारत सांगण्यास आरंभ केलेला आहे. म्हणजे द्वादश वार्षिक सत्रच भारतकथानकाला आरंभ करण्यास कारणीभूत झालें असें म्हणण्यास हरकत नाहीं.

अध्याय १२ वा यामध्यें सर्पसत्र करण्याविषयींचा विचार सुरू झाला असतां त्या ओघानेंच प्राप्त झालेलें आस्तीक व जरत्कारू यांचें आख्यान अध्याय १३ यामध्यें आलेलें आहे.

अध्याय ५१ यामध्यें जनमेजयानें सर्पसत्राची प्रतिज्ञा करून त्याला (यज्ञाला) लागणारी सर्व सामग्री संपादन करून नंतर यज्ञदीक्षा घेतली. यज्ञाच्या नांवाप्रमाणें बऱ्याच सर्पांचा संहार झाला असें म्हटलें आहे. ह्या यज्ञामध्यें चण्ड भार्गव हा होता असून कौत्स व जैमिनि असे दोघे उद्गाते होते आणि शार्ङ्गरव हा ब्रह्मा असून पिंगल हा अध्वर्यु होता. त्याचप्रमाणें पुत्रशिष्यांचें साहाय्य घेऊन भगवान् व्यास ह्यांनीं सदस्यत्व स्वीकारलें होतें. भगवान् व्यासाप्रमाणेंच आणखी उद्दालक, प्रमतक, श्वेतकेतु, पिंगल, असित, देवल, नारद-पर्वत,

आत्रेय, कुंड-जठर, कालघट, वात्स्य, श्रुतश्रवा, कोहल, देवशर्मा, मौद्गल्य, समसौरभ, इत्यादि बरेच सदस्य होते असें अध्याय ५३ यांत म्हटलें आहे. ज्याच्याकरितां सर्पसत्राला आरंभ करण्यांत आला तो तक्षक स्वसंरक्षणार्थ इन्द्राला शरण गेला व इन्द्रानें त्यास आश्वासनहि दिलें, परंतु ऋत्विजांनीं इन्द्रासह तक्षकाचें आह्वान केल्यामुळें इन्द्रासह तक्षक येतो; पण इन्द्र भीतीनें शेवटीं त्यास सोडून जातो आणि तक्षकास बळी जाण्याचा प्रसंग येतो. तथापि आस्तिकानें यज्ञामध्यें येऊन यज्ञाची व राजा जनमेजयाची स्तुति केल्यामुळें राजा संतुष्ट होऊन स्वेच्छित वरप्रदान देण्याविषयीं उन्मुख झाला असतां आस्तिकानें यज्ञसमाप्तिरूप वर मागितला व त्यामुळें जनमेजयाला सर्पयज्ञाची तेथेंच परिसमाप्ति करणें भाग पडलें. अशा रीतीनें मुख्य शत्रु जो तक्षक याचा नाश न होतांच यज्ञाची परिसमाप्ति झाली.

अध्याय १८१ यामध्यें द्रुपद राजानें द्रोणवधार्थ यज्ञ केला त्यामध्यें याज व उपयाज हेच दोघे पुरस्कर्ते होते असें म्हणावयास हरकत नाहीं. ह्या यज्ञापासून राजा द्रुपद ह्याला धृष्टद्युम्न व कृष्णा ( द्रौपदी ) अशा दोन अपत्यांचा लाभ झालेला आहे.

अध्याय २१४ यांत देवांनीं यज्ञाला आरंभ केला त्या वेळीं यमाकडे शमित्याचें ( पशुघातकाचें ) काम आलेलें असल्यामुळें त्याच्या हातून प्रजासंहाररूपी कार्य होईनासें झालें व त्यामुळें प्रजावृद्धि असंख्य झाली व देवांनां भीति उत्पन्न झाली असें वर्णन दिलेलें आहे, देवांनां भिण्याचें कारण 'प्रजासंहाररूपी कार्य थांबल्यामुळें मर्त्य अमर्त्य ( अमर ) होऊं लागले आहेत व त्यांची प्रजासंतति वाढून आपला पराजय होईल' असें दिलेलें आहे.

**सभापर्व.**—राजसूय यागाला प्रारंभ होण्याला कोणी कारणीभूत झालें असेल तर ती नारदानीं केलेली राजसूयाची "ये चान्ये च महीपाला राजसूयं महाक्रतुम् । यजन्ते ते सहेन्द्रेण मोदन्ते भरतर्षभ ॥ तस्य त्वं पुरुषव्याघ्र संकल्पं कुरु पांडव । गन्तासि त्वं महेन्द्रेण पूर्वैः सह सलोकताम् ॥" येणेंप्रमाणें केलेली प्रशंसा होय. ( अ. १२ वा ). नारदाच्या सांगण्यावरून धर्मराज यांनीं राजसूय याग करण्याविषयीं निश्चय केला व त्याला अनुमति घेण्याकरितां कृष्णास बोलावणें पाठविलें ( अ. १३ वा ). कृष्णानें यज्ञविघातक जरासंधाचा वध करण्याविषयीं उपदेश करून ( अ. १४ ) त्याप्रमाणें ( अ. २५ ) योग आणला व त्यानें (जरासंधानें) बंदिखान्यांत टाककेल्या राजांनां सोडविलें. द्वारकेहून आलेल्या श्रीकृष्णाच्या आज्ञेवरून यज्ञसामग्री संपादन करण्याचा उपक्रम झाल्यानंतर भगवान् बादरायणाचार्यांनीं साक्षात् मूर्तिमान् वेदच अशा महाभाग द्विजांची ऋत्विजांच्या अधिकारावर योजना केली. कृष्णद्वैपायनांनीं त्या यज्ञांत स्वतः ब्रह्मत्व स्वीकारलें. धनंजय गोत्रांतील विप्रोत्तम मुनि सुसाम हे उद्गाते झाले. वेदवेदांगपारग याज्ञवल्क्य ऋषि मुख्य अध्वर्यु बनले. धौम्य व वसुपुत्र पैल ह्यांनीं होतृकर्म पत्करिलें; आणि ह्या सर्वांचे वेदवेदांगनिपुण सर्व शिष्य व पुत्र हे होत्रग झाले होते. अशा रीतीनें सर्व ऋत्विजांची योजना झाल्यावर ब्राह्मण व क्षत्रिय इत्यादि लोकांनां दूतद्वारा आमंत्रण व नकुलद्वारा धृतराष्ट्रादिकांनां आमंत्रण केलें ( अ. ३६ ) व त्याप्रमाणें सर्वलोक येऊन दाखल झाले ( अ. ३७ ). धर्मराज ह्यांनीं भीष्म, द्रोण इत्यादिकांची यथायोग्य स्थानावर योजना केल्यानंतर राजसूय यागाला प्रारंभ झाला ( अ. ३८ ). पुढें अवभृथ स्नानानंतर भीष्माच्या अनुज्ञेवरून सहदेवानें श्रीकृष्ण भगवान् यांची पूजा केली, परंतु ती शिशुपाल यास पहावेना, अशा रीतीनें ह्या अग्रपूजेबद्दलचा बराच कडाक्याचा वाद होऊन युद्ध होण्यापर्यंत मजल येऊन पोहोंचली व त्याप्रमाणें श्रीकृष्णाची व शिशुपालाची लढाई सुरू होऊन शिशुपाल श्रीकृष्णाकडून मारला गेला ( अ. ७० ). अध्याय ७१ यामध्यें "पूर्णे शतसहस्रे तु विप्राणां भुंजतां तदा । स्थापितस्तत्र संज्ञार्थं शंखोऽध्मायत नित्यशः ॥ मुहुर्मुहुः प्रणादस्तु तस्य शंखस्य भारत । उत्तमः श्रूयते शब्दः श्रुत्वा विस्मयमागमन् ॥ न तत्र कृपणः कश्चिद्दरिद्रो न बभूवह । क्षुधितो दुःखितो वापि प्राकृतो वापि मानुषः ॥" अशा रीतीनें विस्तारपूर्वक यागाचें वर्णन दिलेलें आहे. त्याचप्रमाणें "हेमनिष्कजभांडानि भूषणानि च सर्वशः । प्रददौ तत्र विप्राणां धर्मराजो युधिष्ठिरः । यानि तत्र महीपालैर्लब्धवान् भरतर्षभः । तानि सर्वाणि रत्नानि ब्राह्मणानां ददौ तदा ॥ कोटिसहस्रं प्रददौ ब्राह्मणानां महात्मनां । न करिष्यति तं लोके कश्चिदन्यो महीपतिः" असें त्याच्या दातृत्वाचें वर्णन केलेलें आहे. असो. एकंदर गोष्टींचा विचार करतां असें दिसून येईल कीं, ह्या धर्मराजकृत राजसूययागामुळेंच भारतांतील सर्व प्रसंग ( वनवास भोगावयास लागणें, लढाई उपस्थित होऊन कौरवपक्षीय व पांडवपक्षीय राजांचा संहार होणें इत्यादि ) ओढवले असें म्हटलें असतां अतिशयोक्तीचा आरोप आपल्यावर येईल ही भीति वाळगण्याचें कारण नाहीं. कारण, राजसूय यागाच्या वेळची धर्मराजाची संपत्ति पाहून अगोदरच दुष्ट असलेला तो दुर्योधन जास्तच दुष्ट बनून शकुनीच्या सांगण्यावरून द्यूताचा प्रसंग घडवून आणता झाला व त्यामुळें भारतीय युद्धाचा पाया रचला गेला व अशा रीतीनें या राजसूययागाचें पर्यवसान युद्ध उपस्थित होऊन प्रजासंहाररूप कार्याकडे झालें.

**वनपर्व.**—अध्याय ९३ यांत गयकृत यज्ञाचें वर्णन "यस्य यज्ञो बभूवेह बह्वन्नो बहुदक्षिणः । तत्र वै दक्षिणाकाले ब्रह्मघोषो दिवं गतः । न तत्पूर्वे जनाश्चक्रुर्न करिष्यन्ति चापरे । गयो यदकरोद्यज्ञे राजर्षिरमितद्युतिः ॥" अशा रीतीनें दिलेलें आढळतें. त्यानें कोणता यज्ञ केला त्यांत ऋत्विज वगैरे कोण कोण होते इत्यादि माहिती दिलेली नाहीं.

अध्याय १०६ यांत सगर राजाच्या अश्वमेधयज्ञाचें वर्णन आलेलें आहे. परंतु त्यांत ऋत्विजांचीं वगैरे नांवें नाहींत. सगर राजाला साठहजार पुत्र होते व ते अति बलवान् असल्यामुळें त्यांनीं इन्द्रादि देवांचा पराजय केला. तेव्हां इन्द्रादि देव सगरपुत्रांनां मारण्याच्या विचारांत असतां सगर राजानें अश्वमेधाचे वेळीं मेध्यघोडा सोडून दिलेला त्यांच्या दृष्टीस पडला व तो दृष्टीस पडतांच इन्द्रानें ही सगरपुत्रांस मारण्यास संधि चांगली आहे असा विचार करून मेध्य-अश्वास घेऊन त्यानें (इन्द्रानें) कपिल महामुनि पाताळांत ज्या ठिकाणीं तपश्चर्या करीत होते तेथें नेऊन सोडला. इकडे घोडा नाहीं असें पाहून सगर राजाच्या आज्ञेवरून त्याचे पुत्र त्याच्या शोधार्थ निघाले असतां त्यांस त्याचा पत्ता पृथ्वीतलावर कोठेंच लागेना. तेव्हां त्यांनीं पृथ्वीच बराच भाग खणला (पुढें तोच समुद्र झाला) व पाताळांत जाऊन पहातात तों त्यांनां तेथें घोडा चरतांना दिसला. अर्थात् तो ह्या कपिल मुनीनें चोरला असावा अशा संशयावरून ते त्यास मारावयास धांवले असतां कपिल महामुनीनें तपःसामर्थ्यानें त्यांचा दाह करून टाकला (अ. १०७). पुढें त्यांच्या उद्धारार्थ भगीरथानें पाताळांत गंगा नेऊन त्यांचा उद्धार केला असें (अ. १०९) वर्णन आहे. ह्यावरून दोन गोष्टी आपल्यास स्पष्ट आढळून येतात त्यांपैकीं समुद्र पृथ्वीतलावर निर्माण होणें ही एक गोष्ट व दुसरी देवनदी गंगा पृथ्वीवर येणें ही होय.

अध्याय २५७ यांत दुर्योधनानें राजसूय याग करावयाचें मनांत असतांहि ब्राह्मणांच्या "न स शक्यः क्रतुश्रेष्ठो जीवमाने युधिष्ठिरे। दीर्घायुर्जीवति च ते धृतराष्ट्रः पिता नृप॥ एष ते वैष्णवो नाम यज्ञः सत्पुरुषोचितः । एतेन नेष्टवान्कश्चिद्‌त्ते विष्णुं पुरातनम् । राजसूयं क्रतुश्रेष्ठं स्पर्धत्येष महाक्रतुः" ह्या सांगण्यावरून त्यानें वैष्णवयाग केला असें वर्णन आहे. त्यासंबंधीं इतर कांहीं माहिती दिलेली नाहीं व ह्या यागामुळें कांहीं गोष्टी घडून आल्याचें दिसत नाहीं.

**उद्योगपर्व.**—अध्याय १३ ह्यामध्यें "तत्राश्वमेधः सुमहान् महेन्द्रस्य महात्मनः । वव्रते पावनार्थं वै ब्रह्महत्यापहो नृप॥" अशा तऱ्हेनें अश्वमेधाचा उल्लेख आलेला आहे. "विभज्य ब्रह्महत्यां तु वृक्षेषु च नदीषु च। पर्वतेषु पृथिव्यां च स्त्रीषु चैव युधिष्ठिर" अशा रीतीनें या यज्ञानें ती ब्रह्महत्या चार ठिकाणीं वांटली गेली व इन्द्र हत्येपासून मुक्त झाला.

**शान्तिपर्व.**—अध्याय ७९ ह्यांत यज्ञाला लागणाऱ्या ऋत्विजांची "आनृशंस्यं सत्यवाक्यमहिंसा दम आर्जवम्। अद्रोहोऽनभिमानश्च ह्रिस्तितिक्षा दमः शमः॥ यस्मिन्नेतानि दृश्यन्ते" इत्यादि लक्षणें सांगितलीं आहेत ह्यापेक्षां ह्यांत यज्ञासंबंधीं उल्लेख वगैरे कांहीं नाहींत.

**अनुशासनपर्व.**—अध्याय ३४ ह्यांत "पुरा भङ्गस्वनो नाम राजर्षिरतिधार्मिकः । अपुत्रः पुरुषव्याघ्र पुत्रार्थं यज्ञमाहरत्" असा पुत्रकामेष्टिसंबंधानें एवढाच उल्लेख आहे. या यज्ञांत इन्द्राला बोलावलें नाहीं.

अध्याय १२३ ह्यांत रंतिदेव ह्यानें गोसत्र केलें असा उल्लेख आढळतो. ह्या गोसत्रामध्यें कोट्यवधि गाई हनन केल्याचें वर्णन "गवां वै वध्यमानानां न चान्तः प्रत्यदृश्यत। गवां चर्मसहस्रैस्तु राशयः पर्वतोपमाः।" इत्यादि श्लोकांनीं केलें आहे व हा याग बरींच वर्षें चालू होता असें "एवं बहूनि वर्षाणि" ह्या पदावरून दिसतें.

**आश्वमेधिकपर्व.**—अध्याय १० वा यामध्यें संवर्तनामक अध्वर्यूच्या देखरेखीखालीं मरुत्तनामक राजानें यज्ञ केल्याचें सांगितलें आहे. यज्ञविषयक इतर माहिती वगैरे कांहीं दिलेली नाहीं.

अध्याय ७१ ह्यांत ज्ञातिवधज पापप्रक्षालनार्थ व्यासांनीं अश्वमेध यज्ञ करण्यास धर्मराजाला सांगितलें व पृथ्वीसंचारार्थ मेध्य अश्व सोडण्यांत आला (अ. ७२ वा). पुढें अध्याय ८९ वा ह्यांत यज्ञाला उपक्रम होऊन त्याची सांगता झालेली आहे. हा यज्ञ राजसूययागाप्रमाणेंच मोठ्या थाटानें पार पाडण्यांत आला असें म्हटलेलें आहे.

**राजसूयादियज्ञांचा पुराणांतील उल्लेख.—पद्मपुराण**—सृष्टिखंड अध्याय ३ यांत ब्रह्मदेवानें सृष्टि निर्माण केल्याबद्दलच्या कथानकामध्यें अग्निष्टोम, अतिरात्र, अप्तोर्याम या यज्ञांचीं नांवें आलीं असून "यज्ञनिष्पत्तये सर्वमेतद्ब्रह्मा चकार ह। चातुर्वर्ण्यं महाभाग यज्ञसाधनमुत्तमं॥ यज्ञेनाऽप्यायिता देवा वृष्ट्युत्सर्गेण मानवाः। आप्यायनं वै कुर्वंति यज्ञाः कल्याणहेतवः॥" असा यज्ञांसंबंधानें पुलस्त्यांचा अभिप्राय व्यक्त झाला आहे.

सृष्टिखंड अध्याय ५ यांत गंगाद्वारीं दक्षानें यज्ञ केल्याची हकीकत आहे. या यज्ञाकरितां कश्यप, भगवान् अत्रि, पुलस्त्य, पुलह, क्रतु, प्रचेतस्, अंगिरा व महातपस्वी वसिष्ठ वगैरे ऋषी आले होते. या यज्ञांत 'होता' वसिष्ठ असून 'अध्वर्यू'चें काम अंगिरानामक ऋषीकडे होतें. 'उद्गाता' बृहस्पति असून नारद 'ब्रह्मा' झाले होते. ब्रह्मदेवाकडे 'सदस्या'चें काम होतें. या यज्ञाचें नांव कोठें उल्लेखिलेलें नाहीं, तथापि वर्णनावरून तो अग्निष्टोम अगर दुसरा एकादा 'सोमयाग' असावा.

सृष्टिखंड अध्याय १५ यांत ब्रह्मदेवानें 'पुष्कर' नामक क्षेत्रांत यज्ञ केल्याचें वर्णन आलें आहे. भीष्मांनीं पुलस्त्य ऋषींनां या यज्ञाची हकीकत विचारली आहे. भीष्मांनीं जे प्रश्न विचारले आहेत त्यांतच यज्ञाविषयीं भीष्मांचें मतहि थोडक्यांत व्यक्त झालें आहे. "अग्निहोत्रार्थ-

मुत्पन्ना वेदाश्चैवाग्नयस्तथा । ये चान्ये पशवो भूमौ सर्वे ते यज्ञकारणात् । सृष्टा भगवता तेन इत्येषा वैदिकी श्रुतिः” भीष्माचे या यज्ञांत अनुष्ठान कसकसें झालें? अग्रपूजा कोणाची केली ? वगैरे प्रश्न आहेत. पुलस्त्यांनीं हकीकत सांगतांना ‘वराहावतार’ धारण करून यज्ञपुरुष प्रगट झाल्याचें वृत्त सांगितलें आहे. या यज्ञाला अनेक ब्रह्मर्षी व राजर्षी आले होते. देवर्षींनींहि आपल्या आगमनानें यज्ञास शोभा आणिली होती. ब्रह्मदेवानें या यज्ञामध्यें ‘भृगु’ ऋषींनां ‘हौत्र’, ‘पुलस्ती’ला ‘आध्वर्यव’, ‘मरीचीं’नां ‘उद्गातृत्व’ व नारदाला ‘ब्रह्मत्व’ दिलें होतें. सनत्कुमारप्रभृतींकडे ‘सदस्यत्व’ सोंपविलें होतें. ब्रह्मदेवाची पत्नी ‘सावित्री’ हिला कांहीं कर्मासाठीं ब्रह्मदेवाच्या आज्ञेनें ‘अध्वर्यू’ बोलावण्यास गेला असतां “कांहीं स्त्रिया अजून यावयाच्या आहेत त्या आल्या-खेरीज मी यज्ञमंडपांत येत नाहीं” असें सांगून सावित्रीनें अध्वर्यूला धुडकावून लावलें. ब्रह्मदेवाला त्याबद्दल राग आला त्यानें सावित्रीची खोड मोडण्याकरितां कांहीं देवांच्या अनुमतानें एका ‘आभीर’ अगर ‘अहीर’ जातीच्या मुलीशीं गांधर्वविवाह लावून तिला यज्ञाच्या शाळेंत आणलें. या नव्या स्त्रीचें नांव ‘गायत्री’ असें होतें. या यज्ञांत ‘प्रवर्ग्य’ करीत असल्याचें वर्णन आहे. यज्ञभूमीवरील ‘सदो’मंडपामध्यें सावित्रीनें ब्रह्मदेवाची पुष्कळ प्रकारें ‘अन्य स्त्री वरल्याबद्दल’ निर्भर्त्सना केली आहे व शेवटीं ती ब्रह्मदेवावर रुसून गेली आहे. सावित्री निघून गेल्यावर ‘गायत्री’च्याच सांनिध्यानें तो यज्ञ शेवटास गेला.

अध्याय २५ (सृष्टिखंड) यांत ‘अश्वमेध’ व २७ व्या अध्यायांत ‘पौंडरीक’ व ‘वाजपेय’ या यज्ञांचा उल्लेख आहे.

ब्रह्मदेवाच्या ‘पुष्कर’ येथील यज्ञाचें २९ व्या अध्यायांत पुन्हां विस्तृत वर्णन आलें आहे. त्यांत होता, ब्रह्मा इत्यादि मुख्य ४ ऋत्विजांच्या कक्षेंत असणाऱ्या ‘ब्राह्मणाच्छंसी’, ‘पोता’, ‘आग्नीध्र’, ‘अत्युद्गाता’ (प्रस्तोता), ‘प्रतिहर्ता’, ‘सुब्रह्मण्य’, ‘मैत्रावरुण’, ‘अच्छावाक’, ‘ग्रावस्तुत्’, ‘प्रतिप्रस्थाता’, ‘नेष्टा’, ‘उन्नेता’ इत्यादि १२ ऋत्विजांचा उल्लेख आला आहे. ब्रह्मदेवानें (स्वयंभू) ३६० यज्ञ निर्माण केले असें वर्णन आलें आहे. चमसाध्वर्यू १० असल्याचें लिहिलें आहे.

| | |
|---|---|
| ब्रह्मा=नारद. | होता=भृगु. |
| ब्राह्मणाच्छंसी=गौतम. | मैत्रावरुण=वसिष्ठ. |
| पोता=देवरात. | अच्छावाक=ऋतु. |
| आग्नीध्र=देवल. | ग्रावस्तुत्=च्यवन. |
| उद्गाता=अंगिरस. | अध्वर्यु=पुलस्त्य. |
| प्रस्तोता=पुलह. | प्रतिप्रस्थाता=शिबि. |
| प्रतिहर्ता=नारायण. | नेष्टा=बृहस्पति. |
| सुब्रह्मण्य=अत्रि. | उन्नेता=सांशपायन. |

मुलगे व नातू ज्याला सहाय करीत आहेत असा ‘धर्म (?)’ या यज्ञांत ‘सदस्य’ झाला होता. १ भरद्वाज, २ शमीक, ३ पुरुकुत्स, ४ युगंधर, ५ एणक, ६ ताण्डिक, ७ कोण, ८ कुतप, ९ गार्ग्य, व १० वेदराशी यांच्याकडे ‘चमसाध्वर्यू’चें काम होतें. याशिवाय कण्व मार्कंडेय व अगस्ति वगैरे ऋषी आपल्या पुत्रपौत्रांसमवेत या यज्ञांत रात्रंदिवस रावत होते. मन्वंतर उलटून गेल्यावर या यज्ञाचें ‘अवभृथ’ झालें. ब्रह्मयाला (ऋत्विक्) दक्षिण, होत्याला पूर्व, अध्वर्यूला पश्चिम व उद्गात्याला उत्तर दिशा दक्षिणा म्हणून ब्रह्मदेवानें दिली. याखेरीजहि हजारों गाई, गांव, दासी, शेळ्या व मेंढ्या दक्षिणा म्हणून ऋत्विजांनां, उपऋत्विजांनां वगैरे देण्यांत आल्या.

ब्रह्मखंड (अ. १३) द्वापर युगांत दीननाथ राजानें पुत्रप्राप्त्यर्थ ‘गालव’ मुनींच्या सांगण्यावरून ‘नरमेध’ नामक यज्ञ केला. राजानें ‘कृष्णदेव’ नामक एका ब्राह्मणाचा मुलगा या यज्ञांत ‘बळी’ देण्यासाठीं आपल्या चाकरांकडून जुलमानें आणविला होता. त्या बळी देणार असलेल्या मुलाला राजाचे लोक घेऊन जातांना पाहून विश्वामित्र मुनींनां दया आली व ते त्या ब्राह्मणपुत्राच्या मुक्ततेसाठीं दीननाथ राजाकडे गेले आणि आपल्या तपःसामर्थ्यानें त्या राजाचे हातून बळी न देववितां यज्ञ करून त्या विप्रपुत्राची मुक्तता केली. पुढें त्या राजाला सुलक्षणी असा एक पुत्र झाला. बळी जाण्याचा प्रसंग आल्यामुळें त्या ब्राह्मणाची केविलवाणी स्थिति झाली ती फारच हृदयद्रावक होय! ‘माता यदि विषं दद्यात् पित्रा विक्रीयते सुतः । राजा हरति सर्वस्वं तत्र कः पालको भवेत् ॥’ हे त्या गरीब ब्राह्मणाचे त्यावेळचे उद्गार होत! विश्वामित्रमुनींच्या अंतःकरणांतील दयेच्या कल्पनेसाठीं त्याच्याच तोंडचे ‘प्राणा ममापि गच्छंतु सुखी भवतु बालकः । बालकार्थे द्विजार्थे च स्वाम्यर्थे ये जना इह । त्यजन्ति तृणवत्प्राणांस्तेषां लोकाः सनातनाः’ येवढे उद्गार पुरेसे होतील.

पातालखंड अध्याय ९ यांत श्रीरामांनीं रावणवधनिमित्तक ब्रह्महत्यानिवारणार्थ ‘अश्वमेध’ यज्ञ अगस्ति मुनींच्या सांगण्यावरून केल्याचा उल्लेख आहे. रामाच्या प्रश्नावरून अश्वमेधाला योग्य अशा अश्वाचीं लक्षणें भगवान् अगस्तिमुनींनीं सांगितलीं आहेत तीं अशीं:—गंगाजलाप्रमाणें त्या घोड्याच्या शरीराचा वर्ण पांढरा स्वच्छ असावा. कानाशीं श्यामवर्ण असून तोंडावर तांबुस वर्ण असावा. पिवळ्या वर्णावर शेंपूट असावें. उच्चैःश्रव्याप्रमाणें दैदीप्यमान असा तो अश्व मनोवेगानें सर्वप्रकारच्या चालींनीं चालणारा असावा इ. इ. सर्व मुनिगणांसह श्रीराम शरयूतीरावर आले व तेथें सोन्याचे नांगरांनीं यज्ञभूमि उत्कृष्ट रीतीनें नांगरून तयार केली व त्या ठिकाणीं यज्ञमंडप दिला. यज्ञमंडपामुळें चार

योजनें जमीन व्यापली होती. वसिष्ठ गुरूंच्या सल्ल्यानें अश्वमेधयज्ञाला येण्याविषयीं अनेक ऋषिमहर्षींनां निमंत्रण गेल्यामुळें नारद, असित, पर्वत, कपिलमुनि, जातूकर्ण्य, अंगिरा, व्यास, आर्ष्टिषेण, अत्रि, गौतम, हरीत, याज्ञवल्क्य, संवर्त, व शुक इत्यादि थोर थोर ऋषी यज्ञासाठीं व प्रभु रामाच्या दर्शनासाठीं अगत्यानें आले होते. श्रीरामांनीं अश्वमेध यज्ञसंबंधीं दीक्षा धारण करून लक्ष्मणाला सुलक्षण असा घोडा आणण्याची आज्ञा केली. लक्ष्मणानें घोडा आणला. राम तो घोडा पाहून हर्षित झाले. श्रीरामानें सीतेचा त्याग केल्यामुळें वसिष्ठांनीं एक सुवर्णाची सीतेची मूर्ति करवून तिच्यासह रामाकडून प्रारंभीं ब्रह्महत्यानिवारक असें कुण्डमंडपाचें अनुष्ठान करविलें. त्या वेळीं वेदशास्त्रविचारवेत्त्या वसिष्ठ मुनींनीं कुलपरंपरागत 'आचार्यत्व' स्वीकारलें होतें. अगस्त्य ऋषीकडे ब्रह्मत्व, वाल्मीकिमुनींनां आध्वर्यव व कण्वमुनींनां द्वाररक्षकाचें काम देण्यांत आलें होतें. त्या मंडपाला आठ दिशांस आठ दारें असून त्या ठिकाणीं तोरणें लावलीं होतीं. प्रत्येक मुख्य दिशेच्या द्वाराला मंत्रवेत्ते असे दोन दोन ब्राह्मण नियोजित केले होते. देवल व असित हे पूर्वद्वारामध्यें असून दक्षिणद्वाराच्या ठिकाणीं महातपस्वी कश्यप व अत्रि या दोघांची नेमणूक झाली होती. जातूकर्ण्य व जाजली ही जोडी पश्चिमद्वारांत असून उत्तर द्वारामध्येंहि दोन तपस्वी ऋषी नियोजित केले होते. कुंडमंडपानुष्ठान झाल्यावर वसिष्ठमुनींनीं त्या श्यामकर्ण अश्वाची पूजा केली व त्याला संचारार्थ सोडला. अश्वाच्या रक्षणाकरितां श्रीरामांनीं शत्रुघ्न, भरत, हनुमंत व इतर वानर योद्धे यांची नेमणूक करून त्यांची रवानगी केली. मग रामांनीं आचार्यादिकांची पूजा केली. आचार्यांनां (वसिष्ठमुनींनां) ६० वर्षांचा एक हत्ती, रत्नमालांनीं भूषित व मनोवेगी असा एक घोडा, चार घोडे जोडलेला एक 'पौरट' संज्ञक रथ रामांनीं दिला. याखेरीज एकलक्ष मणी, १०० तोळे मोतीं, १००० तोळे पोंवळीं व एक चांगल्या उत्पन्नाचा आणि उत्कृष्ट वस्तीचा गांव दक्षिणा म्हणून दिला. इतर अध्वर्युप्रभृतींनां मोठमोठ्या दक्षिणा दिल्या. याखेरीज कित्येक कन्यादानें, अश्वदानें, गोदानें इ. इ. पुष्कळ प्रकारचीं दानें ऋत्विजांनां व इतर ऋषींनां दिलीं.

दिग्विजय करून परत आलेल्या अश्वाला धुण्यासाठीं उदक आणावयाकरितां ६४ राजांनां त्यांच्या स्त्रियांसह बरोबर घेऊन राम सीतेसहवर्तमान (रामानें सीतेला लहु व कुश या मुलांसह आणल्याचा वृत्तांत येथें दिला नाहीं) नदीतीरावर गेले. वसिष्ठांनींहि शरयूनदीवर जाऊन उदक आणलें व सर्व उदकांनीं अश्वाला विधिपूर्वक स्नान घातलें. पुढें घोड्याला मारावयाचें इतक्यांत त्याचें अश्वरूप नष्ट होऊन एक दिव्य पुरुष उत्पन्न झाला. रामाच्या आज्ञेनें तो पुढें उत्तम लोकाला गेला. शेवटीं वसिष्ठांच्या सल्ल्याप्रमाणें अश्वाच्या मांसाच्या हविर्भागाऐवजीं 'कापरा'चाच होम करून रामांनीं अश्वमेध संपविला.

पातालखंड अध्याय १६ यांत च्यवनभार्गवमुनींचा सासरा शर्यातिनामक राजा यानें 'सोमयाग' करून अश्विनीकुमारांनां सोमभाग दिल्याचें वृत्त आहे. शर्यातीनें अश्विनीकुमार हे अपंक्त ब्राह्मण असून त्यांनां सोमग्रह अर्पण केल्याबद्दल इन्द्रानें त्याला मारण्याचा उपक्रम करतांच च्यवन मुनींनीं त्याचा हातच स्तंभित करून टाकला वगैरे हकीकत आहे.

उत्तरखंड अध्याय १२ यांत मरुत्तराजानें सोमयाग केल्याचा व त्या यज्ञांत विष्णूचे द्वारपाल देवहूतीच्या उदरीं जन्मले होते त्यांनीं आध्वर्यव व ब्रह्मत्व केल्याचा उल्लेख आला आहे.

उत्तरखंड अध्याय १३ यांत सह्याद्रिपर्वताच्या एका शिखरावर (हल्लींचें महाबळेश्वर?) ब्रह्मदेवानें सोमयाग केल्याचा उल्लेख आहे.

उत्तरखंड अध्याय १९५ यांत खांडववनामध्यें इन्द्रादिदेवांनीं पूर्वीं यज्ञ केल्याचा उल्लेख आहे. शिबिराजाला खांडव वनामध्यें यज्ञाचे कित्येक 'यूप' दिसले त्यावरून त्यानें नारदास प्रश्न केला तेव्हां त्यांनीं त्याला जी हकीकत सांगितली तींत पूर्वोक्त यज्ञाचा उल्लेख आहे.

**अग्निपुराण.**–राजा युधिष्ठिरानें 'राजसूय' यज्ञ केल्याचा उल्लेख अग्निपुराण अध्याय १३ भारताख्यान यांत आहे.

अग्निपुराण अध्याय ५ यांत विश्वामित्रानें यज्ञ केल्याचा उल्लेख आहे.

**ब्रह्मपुराण.**—अध्याय ८ यांत हरिश्चंद्रानें 'राजसूय' यज्ञ केल्याचा उल्लेख आहे. याच अध्यायांत 'सगर' राजानें अश्वमेध केल्याचा उल्लेख आहे.

सोमराजानें 'राजसूय' यज्ञ केला. हिरण्यगर्भ ब्रह्मा, अत्रि, भृगु हे त्या यज्ञांत ऋत्विज होते. सदस्याचें काम अनेक ऋषींसह 'हरि' हे करीत होते. सिनी, कुहू, द्युति, पुष्टि, प्रभा, वसु, कीर्ति, धृति व लक्ष्मी या नऊ देवस्त्रिया त्या यागाला आल्या होत्या.

ब्रह्मपुराण अध्याय ३९ यांत दक्षानें 'अश्वमेध' यज्ञ केल्याचा उल्लेख आहे. अध्याय ४० यांत 'वाजपेय' यज्ञाचा उल्लेख आहे.

मालव देशांतल्या 'इन्द्रद्युम्न' राजानें 'अश्वमेध' यज्ञ केल्याचा उल्लेख (अध्याय ४९) मध्यें आहे.

अध्याय ७३ मध्यें बलीनें अश्वमेध केल्याचा उल्लेख आहे. याच यज्ञांत वामनानें त्रिपाद भूमि मागितली.

विश्वकर्म्याचा नातू भौवन यानें एकदम १० घोडे सोडून अश्वमेध यज्ञ केला. कश्यप हा त्या भौवनाचा पुरोहित

होता. या भौवनानें गोदावरीनदीच्या कांठीं अश्वमेध यज्ञ केला. भौवनानें कश्यपांनां यज्ञसांगतार्थ समुद्रवलयांकित पृथ्वी देण्याचें ठरविलें. परंतु आकाशवाणीनें त्याचा निषेध करून इतर मोठमोठालीं दक्षिणादानें करविलीं. (अध्याय ८२ ).

वैवस्वतकुलोत्पन्न 'जनक' राजानें आपल्या याज्ञवल्क्य नामक पुरोहिताच्या सह्यानें व वरुणाच्या आज्ञेनें अश्वमेधादि अनेक यज्ञ केले. अशाच रीतीनें त्या वंशांतील 'जनक' संज्ञक पुरुषांनीं अनेक यज्ञ केले. जनकांनीं केलेल्या यज्ञांची जी 'सद' नामक मंडपभूमि तिलाच जनस्थान हें नांव पडलें ( ८९ अध्याय ).

प्रियव्रत नामक राजानें गोदावरी नदीच्या दक्षिण तीरावर अश्वमेध केला.

**विष्णुपुराण.**—अंश ३ अध्याय १८ यांत जनकराजानें अश्वमेधयज्ञ केल्याचा उल्लेख आहे.

अंश ४ यांत मरुत्तराजानें अनेक यज्ञ केल्याचा उल्लेख आहे.

अंश ४ यांत इक्ष्वाकूचा पुत्र निमि यानें सहस्रसंवत्सर सत्र केल्याचा उल्लेख आहे. ह्या सत्रांत वसिष्ठांनां होत्याचें काम दिलें होतें.

अंश ४ यांत अत्रिपुत्र सोमानें 'राजसूय' यज्ञ केल्याचा उल्लेख आहे.

अंश ४ अध्याय १२ यांत 'उशना' यानें १०० अश्वमेध यज्ञ केल्याचें लिहिलें आहे.

**सौरपुराण.**–अध्याय १६ यांत अश्वमेध, राजसूय, गोमेध नरमेध, वाजपेय, पौंडरीक या यज्ञांचा नामोल्लेख असून अध्याय १ यांत 'प्रतर्दन' नामक राजानें यज्ञ केल्याचा उल्लेख आहे. अध्याय ७ यांत प्राचेतस 'दक्षानें' यज्ञ केल्याचें लिहिलें आहे. अध्याय १४ त सौत्रामणि व अतिरात्र या यज्ञांचे उल्लेख आढळतात.

विश्वसृज नामक देवांनीं सहस्र( परि )वत्सर सत्र केलें. त्या सत्रांत 'तप' हेंच गृहपति ( मुख्य यजमान ) असून वेद हे स्वतःच 'ब्रह्मा' झाले होते. इला ( रा ) नांवाची स्त्री या सत्रांत यज्ञपत्नी होती. मृत्यूनें स्वतः शामित्राचें काम केलें होतें.

**वायुपुराण.**—अध्याय २ यांत नैमिषारण्यवासी ऋषींनीं सत्र केलें, हें सत्र १२ वर्षे चाललें होतें, या सत्राला वैखानस, वालखिल्य वगैरे ऋषी आले होते असें वर्णन आहे. भृग्वादि महर्षींनीं दहा हजार द्रव्य दक्षिणा देऊन पृथक् पृथक् ज्योतिष्टोमयाग केले.

अध्याय ९ यांत 'देवसृष्टि'कथनप्रसंगीं चतुर्मुख प्रजापतीपासून यज्ञादिकांची उत्पत्ति झाल्याचें वर्णन आहे. प्रथम( पूर्व )मुखापासून गायत्री छंद, त्रिवृत्साम, रथंतरसाम व अग्निष्टोमक्रतु उत्पन्न झाले, दक्षिणमुखांतून त्रिष्टुप्छंद, पंचदशस्तोम, बृहत्साम व उक्थ्यक्रतू हे उत्पन्न झाले, ब्रह्मदेवाच्या तिसऱ्या म्हणजे पश्चिममुखापासून जगतीछंद, सप्तदशस्तोम, वैरूपसाम व अतिरात्र क्रतु उत्पन्न झाला व चौथ्या किंवा उत्तरमुखापासून अनुष्टुप्छंद, एकविंशस्तोम, वैराजसाम व अप्तोर्यामक्रतु निर्माण झाले असें लिहिलें आहे. अध्याय १२ यांत 'अग्निहोत्र' व 'हविर्यज्ञ' यांचा उल्लेख आहे. अध्याय १४ त 'ब्रह्मयज्ञा'चा उल्लेख आहे.

इष्टापूर्तयज्ञ, अश्वमेध, धिष्ण्यादि अग्नींचीं नावें, पाकयज्ञ, लौकिकाग्नि व मंथनाग्नि इत्यादिक उल्लेख अध्याय २९ मध्यें आहेत.

वायुपुराण अध्याय ३० यांत हिमालयाच्या पृष्ठावर प्राचेतस दक्षानें यज्ञ केल्याचा उल्लेख आहे ( अश्वमेध ). अध्याय ११२ यांत राजसूय व अश्वमेध उल्लेखिले आहेत. शमीगर्भ, निर्मथ्याग्नि व अश्वमेधनामक इष्टींचे उल्लेख मधूनमधून आले आहेत. अध्याय १११ यांत गयासुरानें यज्ञ केल्याचा उल्लेख आहे. या यज्ञांत अपरिमित द्रव्य खर्च झालें. असो.

**ऐतिहासिक विवेचन.**—मागें यज्ञांचा इतिहास देतांना ज्या विधानांस सहज प्रमाणें देतां आलीं त्या विधानांस दिलीं, तथापि ज्या विधानांच्या सिद्ध्यर्थ विशेष खोलांत जावें लागेल आणि तसें गेल्यानें वाचकांस विकासकथेचे धागे लक्षांत घेण्यास त्रास पडेल अशीं विधानें कांहीं केलीं आणि विवेचन वगळलें. त्या विवेचनाकडे आतां वळलें पाहिजे. याशिवाय अनेक ऋत्विजांच्या कर्तव्यांचें स्वरूप स्वतंत्र आणि निश्चित होण्यापूर्वीं बहुतेक ऋत्विजांचीं कर्में सदृश होतीं अशी पूर्वस्थिति असल्यास तिचें अवलोकन झालें पाहिजे. प्रथमतः आपणांस एक गोष्ट स्पष्ट केली पाहिजे ती ही कीं ऋग्वेदाचे मंत्र ज्या काळांत तयार झाले त्या काळांत पुढें उत्तान पावलेली यज्ञसंस्था कितपत दृग्गोचर होते. संहितीकरणाच्या काळांत म्हणजे यज्ञांच्या अतिशय उत्तान काळांत ऋग्वेदमंत्रांचा उपयोग यज्ञांत म्हणण्याकडे केला आहे पण ते मंत्रच ज्यावेळेस तयार होत होते त्या वेळीं यज्ञसंस्था होती काय? असल्यास ती दाखविणारे उल्लेख कांहीं सांपडतात काय? पुढें आतां उतारे देतों त्यांवरून असें दिसून येईल कीं, ऋग्मंत्रांत बरेच यज्ञावयव सांपडतात. श्रौत धर्माचें मंत्रकालीन तंत्र आजच्यापेक्षां फारसें निराळें नव्हतें. ऋग्वेदांत यज्ञावयव दाखवितांना पुढील काळच्या श्रौतसूत्रांनीं बोधिलेल्या यज्ञपद्धतीशीं न जुळणाऱ्या क्रियाहि दाखविल्या आहेत, आणि त्रेताग्निसाध्य कर्मांशिवाय इतर पारमार्थिक कर्मांचें अस्तित्वहि दाखविलें आहे.

**यज्ञसंस्थेचें ऋग्मंत्रांत दिसणारें रूप.**—ऋग्वेदांतील सूक्तें हें आपलें सर्वांत जुनें वाङ्मय होय. यांत ज्या संस्था बऱ्याच वाढलेल्या किंवा पूर्ण दशेला पावलेल्या दिसतात त्यांच्या पाठीमागें जावयास आपणांस वाङ्मय नाहीं. श्रौतधर्माचें स्वरूप यजुर्वेदांत जें पूर्णपणें वाढलेलें दिसतें त्याहून प्राथमिक असें त्या धर्माचें स्वरूप ऋग्वेदांतील मंत्रांत येणाऱ्या उल्लेखांवरून लक्षांत येतें हें खरें, पण ज्यास आपण यजुर्वेदीय धर्माशीं तुलना करतां प्राथमिक स्वरूप म्हणूं तेंच स्वरूप अत्यंत प्राथमिक होतें असें निरपेक्ष दृष्टीनें म्हणतां येणार नाहीं. ऋग्वेदमंत्रांतील श्रौतधर्म देखील बराच वाढलेला दिसतो. या वाढीचें पूर्वावलोकन ग्रांथिक साहित्यानें करणें आपणांस अशक्य आहे. परमार्थसाधन हा धंदा होण्यापूर्वी त्याचें जें स्वरूप होतें तें मंत्रकालापेक्षांहि जुनें आहे. सोमयाग भारतीयांत होता तसा पारशांत होता. अश्वमेध भारतीयांत होता आणि पारशांतहि होता. होता नांवाचा ऋत्विज भारतीयांत होता व पारशांत होता. अथर्वा ही पदवी विशिष्ट प्रकारच्या भिक्षुकास लावीत. पारशांच्या भिक्षुकास देखील अथ्रवा म्हणत. अशी स्थिति असल्यानें आपणांस यज्ञसंस्थेच्या इतिहासाच्या अगदीं प्रारंभास केवळ वैदिक वाङ्मयाच्या साहित्यानें जातां येणार नाहीं. आपणांस यज्ञसंस्थेचें ऋग्मंत्रांत दिसून येणारें बरेंच वाढलेलें स्वरूप प्रथम मूळाशीं धरून तौलनिक पद्धतीनें किंवा नैरुक्तांच्या व्युत्पत्तिप्रधान पद्धतीनें मात्र मंत्रकालाच्या पाठीमागच्या कालांत बुड्या मारतां येतील. त्या प्रयत्नास लागावयाच्या अगोदर निःसंशय ग्रांथिक पुराव्यानें जितकी माहिती सिद्ध करतां येईल तितकी केली पाहिजे. करितां आपण ऋग्मंत्रांत आढळणाऱ्या यज्ञसंस्थाबोधक उल्लेखांकडे प्रथम लक्ष देऊं.

**ऋग्वेदांत आढळणारीं व सूत्रोक्त प्रयोगाशीं जुळणारीं यज्ञिय पात्रें, यज्ञिय विहार, ऋत्विजांचीं नांवें, शस्त्रें पठण करतांना मध्यें भरावयाचे निविद्, शस्त्रें, स्तोत्रें, यज्ञियहवि यांचा उल्लेख दाखविणारें टिपण.**

(१) ऋत्विजांच्या नांवांचा उल्लेख.

**त्वमध्वर्युरुत होतासि पूर्व्यः प्रशास्ता पोता १.९४,६**

हे अग्ने, तूं अध्वर्यु, प्राचीन होता, प्रशास्ता, आणि पोता आहेस.

(२) ऋत्विजांचीं नांवें.

**तवाग्ने होत्रं तव पोत्रमृत्वियं तव नेष्ट्रं त्वमग्निदृतायतः। तव प्रशास्त्रं त्वमध्वरीयसि ब्रह्मा चासि गृहपतिश्च नो दमे १०.९१,१०.**

हे अग्ने, होता, पोता, नेष्टा, आग्नीध्र, प्रशास्ता या ऋत्विजांचीं सर्व कर्में तुझींच आहेत. तूंच अध्वर्यु आहेस. आमचे गृहांत ब्रह्मा व यजमान तूंच आहेस.

(३) होता व पोता या नांवांचा उल्लेख.

**होता मंद्रो दिविष्टिषु। उत पोता निषीदति ४.९,३.**

अग्ने, तूंच होता आणि पोता होऊन बसतोस.

(४) गृहपति ( यजमान ) व ब्रह्मा यांचा उल्लेख.

**उतो गृहपतिर्दमे। उत ब्रह्मा निषीदति ४.९,४.**

अग्ने, तूं आमच्या (यज्ञ) गृहांत यजमान व ब्रह्मा होऊन बसतोस.

(५) ऋत्विजांच्या नांवांचा उल्लेख.

**होताध्वर्युरावयाअग्निमिंधो ग्रावग्राभ उत शंस्ता सुविप्रः १.१६२,५.**

होता, अध्वर्यु, अग्निमिंध(आग्नीध्र), ग्रावग्राभ(ग्रावस्तोता), शंस्ता(प्रशास्ता).

(६) होतानामक ऋत्विजाचा उल्लेख.

**सत्तो होता न ऋत्वियस्तिस्तिरे बर्हिरानुषक् ३.४१,२.**

होता योग्य कालीं बसला आहे, बर्हि पसरल्या आहेत. होतानामक ऋत्विजाचा उल्लेख आणखी १.११७,१. ३.१०,२. ५.४१,५. ८.६१,२;८३,६.९.९२,२. १०.९८,४–५. याप्रमाणें अनेक ठिकाणीं आला आहे.

(७) ब्राह्मणाच्छंसी नामक ऋत्विजाचा उल्लेख (अस्पष्ट).

**ब्रह्मपुत्र इव सवनेषु शंससि २.४३,२.**

ब्रह्मपुत्रा [ ब्रह्म्याचे गणांतील ब्राह्मणाच्छंसी ]प्रमाणें शंसन करतोस.

(८) सप्त होते.

**होतारं सप्त जुह्वो यजिष्ठं यं वाघतो वृणते अध्वरेषु १.५८,७.**

यजन करणारे सात होते यज्ञांत अग्नीची परिचर्या करितात.

(९) सप्त होते.

**सप्त होतार ऋत्विजः ९.११३,२.**

सप्त होत्यांचा आणखी ८.४९,१६. ९.१०,७. १०.६३,७. याठिकाणीं उल्लेख आला आहे.

(१०) सोमाभिषव करणाऱ्या यजमानाचा उल्लेख.

**इन्द्राग्नी शृणुतं हवं यजमानस्य सुन्वतः ५.६०,१५.**

इंद्राग्नी, सोमाभिषव करणाऱ्या यजमानाचें आव्हान ऐका. अशा तऱ्हेचा उल्लेख आणखी ५.२६,५. या ठिकाणीं आहे.

(११) अध्वर्यु व आग्नीध्र (अस्पष्ट) यांचा उल्लेख.

**अध्वर्युं वा मधुपाणिं सुहस्त्यमग्निधं वा० १०.४१,३.**

हे अश्विनौ देव हो, अध्वर्यु अथवा आग्नीध्र यांचेकडे सोम पिण्यासाठीं या.

(१२) शमिता ( पशूचें विशसन करणारा. )

**सुकृता तत् शमितारः कृण्वंतूत मेधं शृतपाकं पचंतु १.१६२,१०.**

कुशल शमिते मेध करोत. पशूचीं अंगें उत्तम प्रकारें पचवोत. आणखी ५.८५,१. या ठिकाणीं शमित्याचा उल्लेख आहे. परंतु

तो यज्ञांतील शमिता नसून सामान्य पशू मारून त्याची कातडी सोलून ती कमविणारा या अर्थी आहे.

(१३) शस्त्रांचें शंसन.

**उक्था शंसंतो देववाततमाः ६.२९,४.**

शस्त्रांचें शंसन करणारे देवांच्या अत्यंत समीप जाणारे असे होतात. आणखी असा उल्लेख ८.२,१४. या ठिकाणीं आहे.

(१४) शस्त्रें तोंडपाठ ठेवणें.

**आसन् उक्था पांति ये. ५.१८,४.**

जे तोंडांत शस्त्रें रक्षण करतात.

(१५) शस्त्रें पठण करणारे व साम पठण करणारे.

**उक्थभृतं सामभृतं बिभर्ति ७.३३,१४.**

उक्थ धारण करणारे व साम धारण करणारे.

(१६) साम पठण करून स्तुति करणें.

**अंगिरसां सामभिः स्तूयमानाः १.१०७,२.**

अंगिरसांच्या सामांनीं स्तविले.

(१७) स्तोम, स्तोत्र, साम.

**प्रतिस्तोमं शस्यमानं गृभाय ४.४,१५.**

हे शस्यमान स्तोम (स्तोत्र) सेवन करा. ऋग्वेदांत स्तोम शब्द फार ठिकाणीं आला आहे व त्याचा सर्वत्र स्तोत्र किंवा साम असाच अर्थ केला आहे.

(१८) पृष्ठ्य साम (माध्यंदिन सवनांतील पहिल्या सामाला पृष्ठ्य असें म्हणतात.)

**समंधसा ममदः पृष्ठ्येन ४.२०, ४.**

उत्तम हवी, सोम आणि पृष्ठ्य (साम) यांच्या योगानें संतुष्ट हो.

(१९) बृहत् साम (बृहत् आणि पृष्ठ्य हे सामाचे भेद आहेत.)

**बृहद्गायंतः सुतसोमे अध्वरे ८.५५, १.**

इंद्राकरितां यज्ञांत सोमाभिषव केल्यावर बृहत् साम गा. बृहत् सामाचा उल्लेख आणखी ८.७८,१; ८७,१. येथें आहे.

(२०) शक्वरी छंदांतील साम.

**गायत्रं त्वो गायति शक्वरीषु. १०.७१,११.**

गायक तुजसाठीं शक्वरी (छंदांत) गातात.

(२१) होत्याचें शंसन व अध्वर्यूनें प्रतिगर देणें.

**शंसावाध्वर्यो प्रति मे गृणीहि. ३.५३,३.**

हे अध्वर्यो, मी शंसन करतों, तूं प्रतिगर दे.

(२२) निविद् (शस्त्रें पठण करतांना मध्यें भरावयाचे निगद.)

**सत्तो होता निविदः पूर्व्या अनु २.३६,६.**

कर्मासाठीं बसलेला होता पूर्वींचें निविद पठण करतो. निविद शब्दाचा उल्लेख आणखी १.१७६,६. १.९६,२. ६.६७,१०. या ठिकाणीं आहे.

(२३) परिधी (अग्नीच्या दक्षिण, पश्चिम व पूर्व बाजूस ठेवावयाचीं काष्ठें.)

**सप्तास्यासन् परिधयः १०.९०,१५.**

या (यज्ञा)चे सात परिधी आहेत.

(२४) इध्मा.

**बृहन्निदिध्म एषां ८.४५,२.**

(ज्यांचा इंद्र सखा आहे) त्यांचा इध्मा मोठा असतो.

(२५) वेदी (अग्नीची स्थापना करण्याचा ओटा).

**तद्वेदिं सुभग त आहुतिं ते सोतुं चक्रिरे ८.१९,१८.**

हे अग्ने, ते (यजमान) तुजकरितां आहुती देण्याकरितां चांगली वेदी तयार करतात. ऋग्वेदांत वेदी या अर्थानें नाभि या शब्दाचा बरेच ठिकाणीं उल्लेख केला आहे. वेदी व नाभि हे शब्द आणखी ८.१३,२९. १.१४०,१. १.१६४,३५. ३.३,९. इत्यादि ठिकाणीं आलेले आहेत.

(२६) वेदीचें मापन.

**अमिमीत वेदिं १०.६१,२.**

वेदीचें मापन केलें.

(२७) सद (यज्ञांतील एका विहाराचें (मंडपाचें) नांव.)

**ध्रुवे सदस्युत्तमे । सहस्रस्थूण आसाते २.४१,५.**

अश्विनौ देव ज्याला हजार खांब आहेत व जो स्थिर आहे अशा उत्तम सदांत बसतात.

(२८) धिष्ण्या.

**को धिष्ण्यां प्रति वाचं पपाद १०.११४,६.**

धिष्ण्येस उद्देशून कोण (वाणी) बोलतो?

(२९) धिष्ण्यांवरील अग्नि.

**कद्धिष्ण्यासु वृधसानो अग्ने ४.३,६.**

हे अग्ने, तूं धिष्ण्यांवर कसा दिसतोस?

(३०) अग्नींत हविर्द्रव्याचें हवन करतांना अध्वर्यूनें उभें राहण्याची जागा.

**अंजंति यं दक्षिणतो हविर्भिः १.९५,६.**

या अग्नीला दक्षिण बाजूनें अंजन करतात.

(३१) अवदानधर्म.

**त्रिधा समक्तं नयतु प्रजानन् २.३,१०.**

तीन प्रकारांनीं (तुपानें) भिजविलेला (हवि). अवदान घेतांना प्रथम स्रुचींत तूप ओतून मग त्यांत हविर्द्रव्य घ्यावयाचें. नंतर ज्या पात्रांतून हविर्द्रव्य घेतलें त्या पात्रांतील हविर्द्रव्यावर तूप ओतून स्रुचींतील हविर्द्रव्यावर थोडेंसें तूप घालावें. हा अवदानधर्म होय.

(३२) स्वाहाकार म्हणून अवदान अर्पण करणें.

**स्वाहा गायत्रवेपसे हव्यमिंद्राय कर्तन १.१४२,१२.**

इंद्राला 'स्वाहा' म्हणून हवि अर्पण करा. अशाच तऱ्हेचे आणखी उल्लेख १.११०,१; १४२,१३. २.३६,१. ३.४,११. ५.५,११.

(३३) सोमरसाचें वषट्कारानें हवन.

**ते ते पिबंतु जिव्हया । मधोरग्ने वषट्कृति १.१४,८.**

वषट्कारयुक्त सोम जिव्हेनें प्राशन करोत.

(३४) वषट्कार म्हणून आहुति देणें.

**य आहुतिं परिवेदा वषट्कृतिं १.३१,५.**

जे वषट्कारानें आहुति देतात. अशा तऱ्हेचे आणखी उल्लेख १.१२०,४. २.३६,१. ७.१५,६ या ठिकाणीं आहेत.

(३५) स्रुवा ( लांकडाची पळी ) यज्ञिय पात्र.

**उन्निन्यथुः सोममिव स्रुवेण १.११६,२४.**

स्रुव्यानें सोमरस ( भरून ) उचलला जातो. याप्रमाणें आणखी उल्लेख १.१२१,६ या ठिकाणीं आहे.

(३६) स्रुची (लांकडी पळी मोठ्या टवळ्याची व पुढें टोंक असलेली ).

**स्रुचेव घृतं जुहवाम विद्मना १.११०,६.**

स्रुचीनें तुपाचें हवन करूं. स्रुचि शब्दाचा उल्लेख आणखी वरेच ठिकाणीं आला आहे.

(३७) जुहू ( वरीलप्रमाणें लांकडी पळी. )

**अग्ने मंद्रया जुव्हा यजस्व १.७६,५.**

अग्ने, हर्षयुक्त अशा जुहूनें देवांच्यासाठीं यजन कर. आणखी उल्लेख १.१४५,३. २.२७,१. ८.४३,१०;४४;५. १०.११५,२.

(३८) खारी ( सोमरस मोजण्याचें माप–सा. भा. )

**शतं सोमस्य खार्यः ४.३२,१७.**

शंभर खारी सोमरस. हें माप सू. श्रौ. धर्मांत रूढ नाहीं.

(३९) चमस ( सोमरस पिण्याचें पात्र ).

**चमसा इन्द्रपानाः १.५४,९.**

सोमरस पिण्याचे चमस. आणखी उल्लेख १.१६१,१. ८.७१,७. १०.९६,९;१०३,८.

(४०) द्रोण ( द्रोणकलश ).

**पर्णवीरिव दीयति । अभिद्रोणान्यासदम् ९.३,१.**

सोमरस पक्ष्याप्रमाणें द्रोणां( द्रोणकलशां )कडे धांव घेतो.

(४१) सोमरस गाळावयाचें गाळणें. दशापवित्र.

**अव्यो वारैः परिपूतः ८. २,२.**

वकऱ्याच्या केंसांच्या गाळण्यानें गाळलेला सोम.

(४२) हवनीय द्रव्य आज्य.

**सुसमिद्धाय शोचिषे घृतं तीव्रं जुहोतन. ५.५,१.**

सुसमिद्ध व शुची अग्नीकरितां तुपाचें हवन करा.

(४३) पुरोडाश व पयमिश्र सोम.

**पुरोळाशं यो अस्मै सोमं ररत आशिरम् ८.३१,२.**

याला जे पुरोडाश व पयमिश्र सोम अर्पण करतात.

(४४) चरु.

**प्रसूतो भक्षमकरं चरौ. १०.१६७,४.**

तुझ्या प्रेरणेनें युक्त असा तुजकरितां चरु तयार करतों.

(४५) पृषदाज्य ( दहीं मिसळलेलें तूप. )

**तस्माद्यज्ञात् सर्वहुतः संभृतं पृषदाज्यं १०.९०,८.**

त्या यज्ञापासून पृषदाज्य प्राप्त करून घेतलें.

(४६) धाना व करंभ.

**धानावंतं करंभिणमपूपवंतमुक्थिनं ३.५२,१.**

इंद्रा, धाना, करंभ आणि अपूप यांनीं युक्त सोम सेवन कर.

(४७) अग्नीची तीन ठिकाणीं स्थापना. (आहव० गार्ह० दक्षि०).

**पुरोहितमग्निं नरस्त्रिषधस्थे समीधिरे ५.११,२.**

मनुष्यांनीं पुरोहित अग्नीची तीन ठिकाणीं स्थापना केली.

(४८) पयमिश्र सोम.

**गोभिः श्रीतो मदाय कं । प्रसोम इन्द्र हूयते ८.७१,५.**

इंद्रा, तुला मद येण्याकरितां या पयमिश्र सोमाचा होम केला जात आहे.

(४९) यवमिश्र सोम.

**अंशुर्यवेन पिपिशे ९.६८,४.**

यवमिश्र असा सोम.

**ऋग्वेदांत आढळणाऱ्या व सूत्रोक्त श्रौतधर्माशीं जुळणाऱ्या अशा यज्ञक्रियांचें सूत्रानुक्रमानें केलेलें टिपण.**

(१) ऋत्विग्वरण.

**यद्देवापिः शंतनवे पुरोहितो होत्राय वृतः १०.९८,७.**

देवापि शंतनूला होत्राकरितां वरतो (प्रत्येक यागांत त्या यागासाठीं ज्या ज्या ऋत्विजांची जरूर असेल अशा ऋत्विजांचें वरण ( योग्य कार्यार्थ योजना ) होत असतें. ऋत्विग्वरणाचा विधि यजुर्वेदांत नाहीं. वरणाचे उल्लेख मात्र वरच्यासारखेच आहेत. )

(२) अग्न्याधानांतील विधि.

**उपस्थायं चरति यत्समारत सद्योजातः० अभिश्रांतं मृशते नांद्ये मुदे १.१४५,४.**

उत्पन्न होतांच त्याचें (अग्नीचें) उपस्थान करतात. श्रमित अशा त्या अग्नीला हर्ष होण्याकरितां अभिमर्श करतात. ( अग्नि उत्पन्न केल्यानंतर त्याला उपस्थान करण्याचा विधि आजच्या इष्टयादि कर्मांमध्यें नाहीं. आज हें उपस्थान अग्न्याधानांतच दृश्य होतें. उपस्थान स्वतंत्र असून त्याचा उपयोग अग्न्याधानाकडे केला असण्याचा संभव आहे.)

(अ) अग्याधानांतील सामग्री. पुष्करपर्ण.

**त्वामग्ने पुष्करादध्यथर्वा निरमंथत ६.१६,१३.**

हे अग्ने, अथर्वऋषीनें तुला पुष्करापासून ( पुष्करपर्णापासून ) मंथन करून उत्पन्न केलें. ( पुष्करपर्णावर अग्नि ठेवण्याची ही पूर्वपीठिका समजावी. )

(३) प्रातःकालीन [अग्निहोत्र] होम.

**उषो यदग्निं समिधे चकर्थ० मानुषान् यक्ष्यमाणां अजीगः १.११३,९.**

हे उषे, तूं अग्नीला प्रदीप्त करणारी व यजन करणाऱ्यांनां जागें करणारी आहेस.

(अ) प्रातःकालीं अग्नीचें स्तवन.

**प्रातरग्निः पुरुप्रियो विशस्तवेत ५.१८,१.**

प्रातःकालीं अग्नीची स्तुति करतात. (प्रातःकालीन कांहीं तरी अग्निसेवात्मक कर्म प्राचीन आहे असें हे उल्लेख दाखवितात.)

(आ) सायंप्रातर्होम.

**स इधानः प्रतिदोषामुषासं ४.१२,२.**

त्या अग्नीला प्रत्येक रात्रीं व उषःकालीं प्रदीप्त करतात.

**तमिद्दोषा तमुषसि यविष्ठमग्निमत्यं न मर्जयंत नरः ७.३,५**

रात्रीं व उषःकालीं श्रेष्ठ अग्नीची सेवा करतात.

(४) अग्निहोत्रहोमद्रव्य सोमरस.

**उन्निन्यथुः सोममिव स्रुवेण १.११६,२४.**

स्रुव्यानें सोम घेतल्याप्रमाणें (स्रुव्यानें होम अग्निहोत्रहोमांत फक्त होतो. होमद्रव्य सोम घेण्याबद्दल सत्याषाढसूत्रांत सांगितलें आहे. यांतील विशेष गोष्ट स्रुवा शब्द होय. स्रुवा शब्दाचा अर्थ विवक्षित पळीला लागण्यापूर्वीचा हा उल्लेख असेल तर हा अग्निहोत्रांतील सोमहोमाचा उल्लेख निश्चयानें होणार नाहीं.)

(५) अग्निहोत्र्यानें प्रवास करून आल्यावर करावयाचें उपस्थान.

**इमामग्ने शरणिं मीमृषो न इममध्वानं यमगाम दूरात् १.३१,१६.**

अग्ने, आमचे हातून झालेल्या (व्रतरूप) हिंसेबद्दल व आम्ही दूर गेलों याबद्दल क्षमा कर.

(६) दर्शपूर्णमास (पर्व) याग.

**भरामेध्मं कृणवामा हवींपि ते चितयंतः पर्वणा पर्वणा वयं १.९४,४.**

पर्वणीचे दिवशीं स्मरणपूर्वक आम्ही तुजकरितां इध्मा तयार ठेवूं व हवी तयार करूं.

(७) इध्माहरण.

**यस्त इध्मं जभरत् सिष्विदानो मूर्धानं वा ततपते त्वाया ४.२,६.**

हे अग्ने, जे तुजकरितां घामानें थवथवून अथवा डोकें तापवून इध्मा आणतात.

(८) बर्हिरास्तरण (वेदींत)

**देव बर्हिर्वर्धमानं सुवीरं स्तीर्णं राये सुभरं वेद्यस्यां २.३,४.**

हे बर्हिर्देव हो, या वेदींत तुम्ही पसरलें जा.

**प्राचीनं बर्हिः प्रदिशा पृथिव्या वस्तोः १०.११०,४.**

प्रागग्र व पृथिवी झांकणारें बर्हि.

(९) बर्हीवर हवी ठेवणें 'हविरासादन.'

**स्तीर्णं बर्हिः स्वर्णरे श्रवांसि दधिरे परि ५.१८,४.**

पसरलेल्या बर्हीवर (श्रवांसि) हवी ठेवले आहेत.

(१०) होत्याचा देवताव्हानार्थ विहारांत येण्याचा काल.

**अस्तृणन् बर्हिरस्मा आदिद्धोतारं न्यसादयंत १०.५२,६.**

अग्नि म्हणतो, बर्हि पसरल्यानंतर मला देवताव्हानासाठीं बसविलें.

(११) प्रयाज व अनुयाज यागांचा उल्लेख.

**प्रयाजान्मे अनुयाजांश्च केवलान् १०.५१,८.**

अग्नि म्हणतो प्रयाज व अनुयाज केवळ माझ्यासाठीं असोत.

**नराशंसो नोवतु प्रयाजे शं नो अस्त्वनुयाजो हवेषु १०.१८२,२.**

नराशंस देवता प्रयाज व अनुयाज यागांत आमचें रक्षण करो.

(१२) सूक्तवाक् यागासंबंधीं उल्लेख.

**तस्मिन्नग्नौ सूक्तवाकेन देवा हविर्विश्व आजुहवुः १०.८८,७.**

अग्नींत सूक्तवाकाच्या योगानें देवांनीं हवि हवन केला.

(१३) अग्निमंथन.

**अग्निं नरो दीधितिभिररण्योर्हस्तच्युती जनयंत प्रशस्तं ७.१,१.**

हाताच्या अंगुलींनीं अरणीपासून अग्नि उत्पन्न केला.

(अ) मंथनसाधन.

**अस्तीदमधिमंथनमस्ति प्रजननं कृतं। एतां विश्पलीमाभराग्निं मंथाम० ३.२९,१.**

हें अधिमंथन (मंथा) आहे. हें (अरणीवर) अग्नि बाहेर पडण्यास निर्गमस्थल केलें आहे. ह्या विश्पली (अरणी)ला आणा. आपण मंथन करूं.

(आ) अरणींतून अग्नीची उत्पत्ति.

**उत स्म यं शिशुं यथा नवं जनिष्टारणी ५.९,३.**

दोन अरणी नवीन शिशूप्रमाणें अग्नि उत्पन्न करतात.

(इ) उत्पन्न झालेला अग्नि वृद्धिंगत करणें.

**शिशुं जातं न बिभ्रति ६.१६,४०.**

उत्पन्न झालेल्या अग्नीला नुकत्याच जन्म पावलेल्या मुलाप्रमाणें धरतात.

(१४) अग्निप्रणयन. प्राग्वंशांतील अग्नि उत्तरवेदीवर नेणें.

**जातो यदेनमपसो अधारयन्। सो अध्वराय परिणीयते० ३.२,७.**

उत्पन्न झालेल्या अग्नीला कर्मासाठीं धारण करणारे अध्वरासाठीं नेतात.

**अध्वरेषु प्रणीयते । विप्रो यज्ञस्य साधनः ३.२७,८.**

मेधावी विप्र यज्ञसाधन अशा अग्नीला अध्वरामध्यें नेतात.

(१५) अग्निप्रणयनसाहित्य. ऊर्णा व कुलाय यांचा उल्लेख.

**ऊर्णावंतं प्रथमः सीद योनिं।कुलायिनं घृतवंतं० ६.१५,१६.**

हे अग्ने, ज्या वेदी( योनी )वर ऊर्णा व कुलाय( मुंजकुलाय ) आहेत अशा वेदीवर आरोहण कर.

## पशुयागासंबंधीं.

(१६) पशुयागाचा उल्लेख.

**परि सद्मेव पशुमांति होता० ९.९२,६.**

पशुसमृद्ध अशा ( यज्ञ )गृहांत होता वसतो.

**पर्येति रेभन् । मितेव सद्म पशुमांति होता. ९.९७,१.**

पशुसमृद्ध यज्ञगृहांत जसा होता येतो.

(१७) यूपांजन.

**अंजंति त्वामध्वरे देवयंतो वनस्पते मधुना दैव्येन । यदूर्ध्वस्तिष्ठा० ३.८,१.**

हे यूप ( वनस्पते ), उभा असलेल्या तुला अध्वरामध्यें दिव्य मधूनें अंजन करतात.

(१८) यूपोच्छ्रयण.

**उच्छ्रयस्व वनस्पते वर्ष्मन् पृथिव्यामधि ३.८,६.**

हे वनस्पते ( यूप ), पृथिवीवरून वर उचलला जा.

(१९) यूपपरिव्ययण ( यूपाला रशना गुंडाळणें )

**युवा सुवासाः परिवीतः० ३.८,४.**

उत्तम रशना गुंडाळलेला असा यूप.

(२०) चषाल (यूपाच्या टोंकावर ठेवण्याचें लांकडी कडें ), स्वरु ( यूपरशनेंत खोंचावयाची लांकडी बारीक सुरी ).

**चषालवंतः स्वरवः ३.८,१०. चषालं ये अश्वयूपाय तक्षति १.१६२,६.**

चषाल आणि स्वरू यांनीं युक्त असे यूप. अश्वयूपासाठीं चषाल तयार करतात.

(२१) स्वधिति ( पशूचें मांस छेदन करणारी सुरी ).

**पश्वो अनक्ति सुधितः सुमेकः ४.६,३.**

तीक्ष्ण अशी सुरी पशूच्या पोटांत शिरते.

(२२) यूप पुरण्याचा उल्लेख.

**यान्वो नरो देवयंतो निमिम्युर्वनस्पते स्वधितिर्वा ततक्ष ३.८;६.**

यज्ञाची इच्छा करणारे स्वधिति तयार करून यूपाला पुरतात.

(२३) पर्यग्निकरण ( शामित्रशालेंत पशु नेतांनां यज्ञमंडपांतील सर्व अग्नींच्या भोंवतीं तीन वेळ फिरविणें ). सदर मंत्रांत अश्वमेधांतील अश्वपर्यग्निकरणाचा उल्लेख आहे. पाशुक पर्यग्निकरणांत हाच विधि असतो म्हणून पर्यग्निकरणसंबंधीं उल्लेख दाखवितांनां हा मंत्र दिला आहे.

**यद्धविष्यमृतुशो देवयानं त्रिर्मानुषाः पर्यश्वं नयंति १.१६२,४.**

यज्ञ करणारे हविष्य अशा अश्वाला तीन वेळ फिरवितात.

(२४) मेद ( वपा ) याग.

**स्तोकानामग्ने मेदसो घृतस्य होतः प्राशान ३.२१,१.**

हे अग्ने, मेद व त्यासंबंधीं स्तोक यांचें सेवन कर.

**घृतवंतः पावक ते स्तोकाश्चोतंति मेदसः ३.२१,२.**

तुजसाठीं मेदापासून घृतयुक्त स्तोक ( थेंब ) स्रवत आहेत.

(२५) हृदयशूल ( हें मांस शिजलें कीं नाहीं हें पाहण्याचें साधनभूत काष्ठ आहे. तें पाशुकसंबंधीं असल्यामुळें येथें त्याचा उल्लेख आलेला दाखविला आहे. )

**यत्ते गात्रादग्निना पच्यमानादभि शूलं निहतस्याव धावति १.१६२,११.**

तुझीं ( पशूचीं ) गात्रें अग्नीनें शिजविलीं म्हणजे त्यांकडे शूल धांव घेतो.

## चातुर्मास्यांतर्गत महापितृयज्ञ ( पित्र्या ).

(२६) पितरांकरितां हवि.

**बर्हिषदः पितर ऊत्यर्वागिमावो हव्या चकृमा जुषध्वं १०.१५,४.**

बर्हीवर बसलेल्या पितरांनों, तुमच्याकरितां हे हवी तयार केले आहेत. हे सेवन करा.

(२७) अग्निष्वात्त पितरांनां हविअर्पण.

**अग्निष्वात्ताः पितर एह गच्छत सदः सदः सदत सुप्रणीतयः। अत्ता हवींषि प्रयतानि बर्हिषि० १०.१५,११.**

अग्निष्वात्त पितरांनों, तुमच्याकरितां बर्ही पसरल्या आहेत त्यांवर स्वस्थळीं बसा व हवी सेवन करा.

(२८) चातुर्मास्यांतर्गत गृहमेधीयेष्टि.

**गृहमेधास आगत मरुतो माप भूतन ७.५९,१०.**

ज्यांच्या गृहांत याग होतो असे मरुत हो, या, जाऊं नका.

## घर्म ( प्रवर्ग्य ) संबंधीं.

(२९) घर्म तापविणें. तुपानें अंजन करणें.

**अंजति यं प्रथयंतो न विप्रा वपावंतं नाग्निना तपंतः पितुर्न पुत्र उपसि प्रेष्ठ आघर्मो अग्निमृतयन्नसादि ५.४३,७**

या घर्माला स्तुति करणारे विप्र ( तुपानें ) अंजन करतात. त्याला अग्नीनें तापवितात. बापाजवळ जसा मुलगा बसतो तसा त्या घर्माला अग्नीजवळ ठेवतात.

(३०) घर्मानुष्ठान करतांना विहाराचीं दारें बंद करीत असतात त्याबद्दलचा उल्लेख.

अध्वर्यवो घर्मिणः सिष्विदाना आविर्भवंति गुह्या न केचित् ७.१०३,८.

घर्मानुष्ठान करणारे ऋत्विज घर्म तापल्यामुळें घामानें थबथबले तरी गुप्त स्थानापासून बाहेर येत नाहींत.

(३१) घर्मांत सामांचें पठण.

**घर्मं न सामन् तपत ८.७८,७.**

सामांनीं घर्म तापविला जातो.

(३२) प्रवर्ग्य( घर्म )देवता अश्विनौ देव.

**अयं वां घर्मो अश्विना ८.९,४.**

हे अश्विनौ देव हो, हा घर्म तुमचेसाठीं आहे.

दुसरे ठिकाणीं उल्लेख.

**पिबतं घर्मं मधुमंतमश्विना बर्हिः सीदतं नरा ८.७६,२.**

अश्विनौ देव हो, वर्हींवर बसून हा घर्म प्राशन करा.

घर्मासंबंधीं आणखी उल्लेख आलेलीं स्थळें.

**१.११२,७. ३.५३,१४. ५.१९,४. ५.३०,१५;७३,६. ७.७०,२.**

(३३) घर्मानुष्ठानानंतर होणाऱ्या 'उपसत्' इष्टीचा उल्लेख.

**इमां मे अग्ने समिधमिमामुपसदं वनेः २.६,१.**

हे अग्ने, 'उपसत्' इष्टीसंबंधीं मी दिलेली ही समित् सेवन कर.

## सोमयागसंबंधीं.

(३४) सुत्येचे दिवशीं पहांटे होत्यानें म्हणावयाच्या ऋचांना प्रातरनुवाक् म्हणतात त्याची कल्पना.

**यावन्मात्रमुषसो न प्रतीकं सुपर्ण्योऽवसते मातरिश्वः। तावद्दधात्युप यज्ञमायन् ब्राह्मणो होतुरवरो निषीदन् १०.८८,१९.**

जोंपर्यंत रात्र उषेचें मुख झांकून ठेवते, प्रकाश पडूं देत नाहीं, तोंपर्यंत ब्राह्मण होता बसून यज्ञाला (कर्माला) अनुसरतो.

(३५) वसतीवरी( घागर )आहरण. ( सोम कुटण्यास लागणारें पाणी ).

**ता अध्वर्यो अपो अच्छा परेहि यदासिञ्चा ओषधीभिः पुनीतात् १०.३०,५.**

हे अध्वर्यो, ज्याच्या सिंचनानें सोमाचा रस निवेल असें तें पाणी आण.

(३६) वसतीवरी ( पाण्याची घागर ) वर्हींवर स्थापन.

**आग्मन्नाप उशतीर्बर्हिरेदं न्यध्वरे असदं देवयंतीः। अध्वर्यवः सुनुतेंद्राय सोमं० १०.३०,१५.**

अध्वर्यो, हीं उदकें वर्हींवर स्थित आहेत. इंद्राकरितां सोम कूट.

(३७) सोम कुटावयास घेतांना धुवून घेण्याचा विधि.

**यदद्भिः परिषिच्यसे मृज्यमानो गभस्त्योः ९.६५,६.**

पाणी शिंपडून हातांनीं धुतलेला सोम.

(३८) सोम कुटावयास घेतांना त्याखालीं बैलाचें कातडें घेण्याचा विधि.

**सुष्वाणासो व्यद्रिभिश्चिताना गोरधि त्वचि ९.१०१,११**

बैलाच्या कातड्यावर दिसणारे व ग्राव्यानें कुटले जाणारे असे सोमरस.

(३९) सोमरस हातांनीं पिळून काढण्याचा विधि.

**अण्वीभिस्तना पूतासः १.३,४.**

हाताच्या अंगुलींनीं पिळून काढलेला.

(४०) सोमाभिषव ( सोम कुटण्याची क्रिया ) विधि.

**सोता हि सोममद्रिभिरेमेनमप्सु धावत। गव्या वस्त्रेव वासयंत० ८.१,१७.**

हे अध्वर्यूंनो, ग्राव्यांनीं सोम कुटा, तो पाण्यांत टाका, बकऱ्याच्या केसांच्या वस्त्रानें तो गाळा. सोम कुटावयाचें काम अध्वर्युगणांतील चार ऋत्विज करतात.

(४१) सोमरस पिळून घेऊन उरलेला चोथा बैलाच्या कातड्यावर ठेवण्याचा विधि.

**उच्छिष्टं चम्वोर्भर सोमं पवित्र आसृज। निधेहि गोरधि त्वचि १.२८,९.**

सोम पवित्रावर टाकून गाळून राहिलेला बैलाच्या कातड्यावर टाका.

(४२) गाळलेला सोमरस पात्रांत भरणें.

**अयं सोमश्चमूपुतोमत्रे परिषिच्यते ५.५१,४.**

हा चमूपुत ( अभिषवण फलकावर कुटलेला ) सोम अमत्रांत ( नामकपात्रांत ) भरला जात आहे.

'चमू' याचा सर्व ठिकाणीं अभिषवण फलक ( ज्यावर सोम कुटतात त्या लांकडी दोन फळ्या ) असाच अर्थ केला आहे.

वर आलेलें 'अमत्र' नामक पात्र सूत्रोक्त श्रौतधर्मांत उल्लेखिलेलें नाहीं.

(४३) सोमरसाचें वर्हींवर आसादन करण्यासंबंधीं उल्लेख.

**बर्हिष्ठां ग्रावभिः सुतं ३.४२,२.**

ग्राव्यांनीं कुटलेला व वर्हींवर ठेवलेला सोमरस.

(अ) दुसरा उल्लेख.

**अयं त इन्द्र सोमो निपूतो अधि बर्हिषि ८.१७,११.**

इंद्रा, हा गाळून वर्हींवर ठेवलेला सोम तुजकरितां आहे.

(४४) विप्रुड्ढोम ( अध्वर्यु, सामक गण व सप्तहोते यांनीं करावयाचा होम. )

**यस्ते द्रप्सस्कंदति यस्ते अंशुर्बाहुच्युतो धिषणाया उपस्थात्। अध्वर्योर्वा परि वा यः पवित्रात्तं ते जुहोमि १०.१७,१२.**

हे सोम, अभिषव करतांना अभिषव करणाऱ्यांच्या हातून इकडे तिकडे व सोम कुटण्याच्या पळीवर उडालेले थेंब, तसेंच सोम गाळतांना उडालेले थेंब आणि न कुटल्या गेलेल्या सोमाच्या कांड्या या सर्वांचा मी तुजकरितां होम करितों.

(४५) विप्रुड्ढोमांत सप्तहोते असतात.

**द्रप्सं जुहोम्यनु सप्तहोत्राः १०.१७,११.**

सप्त होत्यांसह या थेंबांचें हवन करतों. दोन्ही मंत्रांचा वरील विप्रुड्ढोमाकडे विनियोग आहे.

(४६) मंथी आणि शुक्र ग्रह ( प्रातःसवनांत या ग्रहांतील सोमाचा याग होत असतो. )

**गवाशिरं मंथिनमिंद्र शुक्रं पिबासोमं० ३.३२,२.**

( हे इंद्र, मंथि आणि शुक्र यांतील गवाशिर सोम पी.) सूत्रोक्त श्रौत धर्मांत या ग्रहांत दूध मिसळण्याची क्रिया चालू नाहीं.

(४७) गवाशिर='मैत्रावरुण'ग्रह, यवाशिर 'मंथि'ग्रह.

**इममिंद्र गवाशिरं यवाशिरं च नः पिब ३.४२,७.**

हे इंद्र, हे आमचे गवाशिर आणि यवाशिर सोम पी.

मंथि व मैत्रावरुण या ग्रहांतील सोमाचा प्रातःसवनांत याग होत असतो.

(४८) ऐंद्रवायव ग्रह.

**अग्रं पिबा मधूनां सुतं वायो दिविष्टिषु । त्वं हि पूर्वपा असि ४.४६,१.**

वायो, यज्ञामध्यें अभिषुत असा सोम तूं आधीं प्राशन कर, तूंच सर्वांच्या आधीं प्राशन करणारा आहेस. सू. श्रौ. ध. प्रयोगांत प्रथम ऐंद्रवायव ग्रहांतील सोमाचें हवन होतें.

(४९) मैत्रावरुण ग्रह.

**इमे वां मित्रावरुणा गवाशिरः सोमाः० १.१३७,१.**

हे मित्रावरुण हो, हे पयमिश्र सोम तुमचेसाठीं आहेत.

(५०) आश्विन ग्रह.

**प्रातर्युजा विबोधयाश्विनावेह गच्छतां । अस्य सोमस्य पीतये १.२२,१.**

हे अध्वर्यो, प्रातःकालीं येणाऱ्या अश्वी देवांनां जागे कर, हा सोम पिण्यास ते तेथें येवोत.

(५१) अतिग्राह्य ग्रह ( याचा याग अग्नीला उद्देशून होत असतो ).

**विप्रेभिर्विप्र संत्य प्रातर्यावभिरागहि । देवेभिः सोमपीतये ।**

हे विप्र, ( सत्य ) अग्ने, प्रातःकालीं येणाऱ्या देवांच्यासह सोम पिण्यासाठीं ये.

## ऋत्विजांचें सोमपान.

(५२) सोमभक्षण.

**अपाम सोममममृता अभूम ८.४८,३.**

आम्ही सोम प्राशन करून अमर होऊं.

**(अ) शं नो भव हृद आ पीत इन्दो ८.४८,४.**

आम्ही प्राशन केलेल्या सोमा, तूं आम्हाला सुखकर हो.

(५३) होत्यानें प्रथम सोमभक्षण करणें,

**होतेव नः प्रथमः पाह्यस्य ५.४३,३.**

होता प्रथम प्राशन करतो त्याप्रमाणें.

## ऋतुयाज नामक याग.

(५४) होत्याचा ऋतुयाग.

हे याग होता, पोता, नेष्टा, आग्नीध्र, ब्राह्मणाच्छंसी व प्रशास्ता या प्रत्येकानीं याज्या पठण केल्यावर होत असतात.

**होत्रात्सोमं द्रविणोदः पिब ऋतुभिः २.३७,१.**

हे द्रविणोद, होत्यानें अर्पण केलेला हा सोम ऋतूंच्यासह प्राशन कर.

(५५) पोतानामक ऋत्विजाचा ऋतुयाग.

**पोत्रात्सोमं द्रविणोदः पिब ऋतुभिः २.३७,२.**

हे द्रविणोद, पोता ऋत्विजानें अर्पण केलेला सोम ऋतूंसह पी.

(५६) नेष्ट्याचा ऋतुयाग.

**नेष्ट्रात्सोमं द्रविणोदः पिब ऋतुभिः २.३७,३.**

हे द्रविणोद, नेष्ट्याकडून होणाऱ्या यागांतील सोम ऋतूंच्यासह प्राशन कर.

बाकीच्या तीन ऋत्विजांच्या यागांत ऋतूंचा उल्लेख आला नाहीं. पण त्यांनीं अर्पण केलेला सोम पिण्याबद्दल प्रार्थनेचा उल्लेख आला आहे.

(५७) आग्नीध्राचा याग.

**पिबाग्नीध्रात्तव भागस्य तृप्णुहि २.३६,४.**

आग्नीध्रानें अर्पण केलेला सोम व तुझा भाग सेवन कर.

(५८) ब्राह्मणाच्छंसीचा याग.

**त्वमस्य ब्राह्मणादातृपत् पिब २.३६,५.**

ब्राह्मणाच्छंसीनें अर्पण केलेला सोम प्राशन करून तृप्त हो.

(५९) प्रशास्तृकृत् याग.

**प्रशास्त्रादापिबतं सोम्यं मधु २.३६,६.**

प्रशास्त्यानें अर्पण केलेला मधुर असा सोम प्राशन कर.

(६०) प्रातःसवनीय पुरोळाश.

**पुरोळाशं सनश्रुत प्रातःसावे जुषस्व नः ३.५२,४.**

हे इंद्र, हा पुरोडाश प्रातःसवनांत भक्षण कर.

(६१) प्रातःसवनीय पुरोळाशाबरोबर असणारे दुसरे पदार्थ.

**धानावंतं करंभिणमपूपवंतमुक्थिनं ३.५२,१.**

हे इंद्र, धाना, करंभ, अपूप व उक्थ यांनीं युक्त असा सोम प्रातःकालीं सेवन कर.

(६२) प्रातःसवनांत निर्वापाचे वेळीं पूषादेवतेसाठीं करंभांचा निर्वाप करीत असतात. त्याचा उल्लेख.

**पूषण्वते ते चकृमा करंभं० ३.५२,७.**

हे पूषा, तुजकरितां करंभनामक हवि तयार केला आहे.

(६३) प्रातःसवनांतील [ पहिलें ] आज्य शस्त्र.

**प्र वः सखायो अग्नये स्तोमं यज्ञं च धृष्णुया । अर्च गाय च वेधसे ६.१६,२२.**

अग्नीला स्तोम व यज्ञ अर्पण करा, व त्याकरितां गायन करा. सर्व यज्ञांतील पहिलें ( आज्य ) शस्त्र अग्निदेवतेसंबंधीं असतें.

(६४) प्रातःसवनांतील सामगान.

**तमर्केभिस्तं सामभिस्तं गायत्रैश्चर्षणयः । इन्द्रं वर्धंति ८.१६,९.**

त्या इंद्राला मनुष्यें अर्कांनीं ( शस्त्रांनीं ) आणि गायत्र ( वृत्तांतील ) सामांनीं वाढवितात.

(६५) प्रातःसवनांतील चवथें आज्य साम.

**ता यज्ञेषु प्रशंसतेंद्राग्नी शुंभता नरः । ता गायत्रेषु गायत १.२१,२.**

त्या इंद्राग्नीची प्रशंसा करा. त्याकरितां गायत्र वृत्तांत गायन करा.

(६६) प्रातःसवनीय पुरोळाश, स्विष्टकृत् याग.

**अग्ने जुषस्व नो हविः पुरोळाशं जातवेदः । प्रातःसावे धियावसो ३.२८,१.**

अग्ने, आम्हीं अर्पण केलेला हा प्रातःसवनीय पुरोळाश सेवन कर.

सर्वत्र स्विष्टकृत याग अग्निदेवतेला उद्देशून असतो.

(६७) नराशंस सोम.

**मनोन्वाहुवामहे नाराशंसेन सोमेन । पितॄणां च मन्मभिः । १०.५७,३.**

पितरांना नाराशंस सोमाच्या योगानें आह्वान करतो. पितरांना 'नराशंसपीत' असें म्हटलें आहे.

(६८) माध्यंदिनसवनांत सोम कुटावयाच्या वेळचें ग्रावस्तुत्कर्म.

**यत्र ब्रह्मा पवमान छंदस्यां३ वाचं वदन् । ग्राव्णा सोमे महीयते० ९.११२,६.**

( हे पवमान, ज्या ठिकाणीं छंदोयुक्त वाणी उच्चारली जाते. ग्राव्यानें सोम कुटला जातो. )

माध्यंदिनसवनांत सोम कुटतांना 'ग्रावस्तुत्' नामक ऋत्विजानें कांहीं ऋचा म्हणावयाच्या असतात.

(६९) सोमाभिषव कर्म व ग्रावस्तुत् कर्म यांची समाप्ति.

**सुते अध्वरे अधिवाचमक्रताक्रीळयो न मातरं तुदंतः । विषू मुंचा सुषुवुषो मनीषां विवर्ततामद्रयः० १०.९४,१४.**

आईनें मारल्यावर मूल जसें आक्रोश करतें तसे हे ग्रावे सोम कुटतांना आक्रोश करीत आहेत. सोम कुटणाऱ्या ग्राव्यांची स्तुति पुरे करा, आणि ग्रावे बाजूला करा.

(७०) माध्यंदिनसवनीय पुरोळाश याग.

**माध्यंदिनस्य सवनस्य धानाः पुरोळाशमिंद्र कृष्वेह चारुं ३.५२,५.**

हे इंद्रा, हा माध्यंदिनसवनीय पुरोळाश ( भक्षणानें ) संस्कृत कर.

(७१) माध्यंदिनसवनीय दधिग्रह याग.

**श्रातं मन्य ऊधनि श्रातमग्नौ सुश्रातं मन्ये० माध्यंदिनस्य सवनस्य दध्नः पिबेंद्र० १०.१७९,३.**

हें अग्नीवर तापविलेलें हविर्द्रव्य ( दहि ) चांगलें तापलें आहे. इंद्रा, हा माध्यंदिनसवनीय दध्न प्राशन कर.

(७२) माध्यंदिनसवनांतील मरुत्वतीय शस्त्र.

**तुभ्येदिंद्र मरुत्वते सुताः सोमासो अद्रिवः । हृदा हूयंत उक्थिनः ८.६५,८.**

हे शस्त्रवंत इंद्र, मरुतांच्यासह तुजसाठीं ह्या सोमाचें हवन केलें जात आहे.

मरुत्वतीय शस्त्र इंद्र व मरुत् यांना उद्देशून आहे.

(७३) माध्यंदिनसवनांत 'बृहत्' नामक साम.

**इन्द्रमिद्गाथिनो बृहत् १.७,१.**

इंद्रासाठीं बृहत्साम गा.

माध्यंदिनसवनांत पहिलें बृहत् नांवाचें साम विकल्पानें पठण करीत असतात. मात्र सामाची ऋचा ही नाहीं.

(७४) माध्यंदिनसवनांतील सोम.

**इन्द्र सोमं सोमपते पिबेमं माध्यंदिनं सवनं० ३.३२,१**

इंद्रा, हा माध्यंदिनसवनीय सोम पी. अशा तऱ्हेचे आणखी उल्लेख ५.४०,४. ८.३७,१ ते ६.

(७५) माध्यंदिनसवनीय पुरोळाश, स्विष्टकृत् याग.

**माध्यंदिने सवने जातवेदः पुरोळाशमिह कवे जुषस्व ३.२८,४.**

हे कवि अग्ने, हा माध्यंदिनसवनीय पुरोळाश सेवन कर.

(७६) तृतीयसवनीय सौम्यचरुयाग.

**यत्ते राजन् शृतं हविस्तेन सोमाभिरक्ष नः ९.११३,४.**

हे सोम, हा तुजसाठीं हवि शिजविला आहे. आमचें रक्षण कर.

(७७) तृतीयसवनीय पुरोळाश.

**तृतीये धानाः सवने पुरुष्टुत पुरोळाशमाहुतं मामहस्व नः । ऋभुमंतं वाजवंतं त्वा कवे ३.५२,६.**

ऋभुमान्, वाजवान् इंद्रा, हा आम्ही अर्पण केलेला तृतीयसवनीय पुरोळाश सेवन कर.

(७८) तृतीयसवनीय पुरोळाश, स्विष्टकृत् याग.

**अग्ने तृतीये सवने हि कानिषः पुरोळाशं सहसः सूनवाहुतं ३.२८,५.**

हे अग्ने, तूं तृतीय सवनासंबंधीं पुरोळाशाची इच्छा करतोस.

(७९) तृतीयसवनांतील शंसन ( शस्त्रपठण ).

**तृतीये विदथेमन्म शंसि २.४,८.**

तृतीय यज्ञांत ( सवनांत ) शंसन करणारे आम्ही. ( शंसि याचा अर्थ शंसन करणाऱ्यांना. )

(८०) तृतीयसवनांतील वैश्वदेव शस्त्र.

**आ विश्वदेवं सत्पतिं सूक्तैरद्यावृणीमहे । सत्यसवं सवितारं ॥**

सवित्याची सूक्तांनीं स्तुति करूं. ( वैश्वदेव शस्त्रांत सविता देवासंबंधीं सूक्त व निविद् पठण केले जातात.)

(८१) तृतीयसवन–वैश्वदेव शस्त्र.

**स्तोमो वाजा ऋभवस्तं जुजुष्टन० तान्व एना ब्रह्मण वेदयामसि ९.३६,७.**

हे वाजऋभू हो, हा स्तोम ( हें स्तोत्र ) सेवन करा. ह्या ब्रह्मांनीं ( शस्त्रांनीं ) आम्ही त्यांनां जागे करूं. (वैश्वदेव शस्त्रांत ऋभूसंबंधीं सूक्त व निविद पठण केले जातात.)

(८२) अतिरात्र.

**ब्राह्मणासो अतिरात्रे न सोमे सरो न पूर्णमभितो वदंति ७.१०३,७.**

अतिरात्र [ नामक ] सोमयागांतील ब्राह्मण घोष करतात त्याप्रमाणें.

(८३) अतिरात्राची कल्पना.

**मम त्वा सूर उदिते मम मध्यंदिने दिवः । मम प्रपित्वे अपि शर्वरे वसवा स्तोमासो अवृत्सत ८.१,२९.**

हे इंद्रा, मी सकाळीं, माध्यान्ही, सायंकाळीं व रात्रीं तुला उद्देशून म्हटलेले स्तोम तुझें लक्ष मजकडे वळवोत. फक्त अतिरात्र यज्ञांतच रात्रीं स्तोत्रें व शस्त्रें पठण करतात.

(८४) संवत्सरसत्र.

**ब्राह्मणासः सोमिनो वाचमक्रत ब्रह्म कृण्वंतः परिवत्सरीणं ७.१०३,८.**

सोमयुक्त व संवत्सरपर्यंत [ नित्य ] स्तोत्रें [ पठण ] करणारे असे ब्राह्मण. आणखी सत्राचा उल्लेख ७.३३,१३ या ठिकाणीं आहे.

(८५) त्रिकद्रुक ( सत्रांतर्गत अभिप्लवषळहांतील पहिले तीन दिवस.)

**त्रिकद्रुकेषु चेतनं देवासो यज्ञमत्नत ८.९१,२१.**

देवांनीं [ यानें स्वर्गप्राप्ति होईल असें ] जाणून त्रिकद्रुक नामक यज्ञ केला.

**त्रिकद्रुकेष्वपिबत् सुतस्य १.३२,३.**

'त्रिकद्रुक' यज्ञांत कुटून गाळलेला सोम पिणारा इंद्र.

(८६) हारियोजन.

**यः पात्रं हारियोजनं पूर्णमिंद्र चिकेतति योजान्विंद्र ते हरी १.८२,४.**

इंद्रा, हारियोजन पात्र पूर्ण ( भरलेलें ) आहे हें जाणून ( रथाला ) घोडे जोड. (हारियोजन नामक याग तृतीयसवनाचे शेवटीं होतो. त्याचीं द्रव्यें धाना, करंभ व सोम हीं सर्व द्रोणकलश नामक पात्रांत असतात. यागानंतर या पात्रांतून या द्रव्याचें प्राणभक्षण ( नुसतें हुंगणें ) होतें. मंत्रांत या द्रोणकलशालाच हारियोजन म्हटलें आहे असें वाटतें. सू. श्रौ. धर्मीय प्रयोगांत 'हारियोजन' नामक पात्र नाहीं.)

(८७) यजमान नामाभिधान.

**दधाति पुत्रः पित्रोरपीच्यं नाम तृतीयं ९.७५,२.**

पुत्र ( यजमान ) पित्याला माहीत नसणारें असें तिसरें नांव धारण करतो.

सोमयाजी होणाऱ्या यजमानाचें यज्ञाचे शेवटीं होता सोमयाजी असें नांव ठेवतो.

(८८) अवभृथ.

**इष्टा होत्रा असृक्षतेंद्रं वृधासो अध्वरे । अच्छावभृथमोजसा ८.८२,२३.**

यज्ञांत इंद्राला [ हवींनीं ] वाढविणारे होत्रक अवभृथाचेवेळीं इंद्राचें विसर्जन करितात.

(८९) बृहस्पतिसव ( नामक यज्ञ ) कल्पना.

**शुचिमर्कैर्बृहस्पतिमध्वरेषु नमस्यत ३.६२,५.**

यज्ञामध्यें उत्तम प्रकारच्या स्तोत्रांनीं बृहस्पतीची स्तुति करा.

(९०) क्षत्रियांच्या यज्ञांतील विशिष्ट विधीचा उल्लेख.

**ग्राव्णामिच्छृण्वन्तिष्ठसि न ते अश्नाति पार्थिवः १०.८५,४**

ग्राव्यांचा शब्द ऐकत असणाऱ्या सोमा, पार्थिव, [ राजे ] तुझें सेवन करीत नाहींत. ( यज्ञांत क्षत्रियांनां सोमपान नाहीं. )

(९१) पुरुषमेध.

**यत् पुरुषेण हविषा देवा यज्ञमतन्वत १०.९०,६.**

देवांनीं पुरुषहवीनें यज्ञ केला.

(९२) अश्वमेधकल्पना.

**सहस्रसावे प्रतिरंत आयुः ३.५३,७.**

ज्यामध्यें हजार वेळ अभिषव केला जातो अशा अश्वमेधांत आमचें आयु ( अन्न ) वाढो.

(९३) अश्वमेधांतील अश्वाबरोबर न्यावयाचा त्वाष्ट्र पशु.

**एष च्छागः पुरो अश्वेन वाजिना पूष्णो भागो नीयते विश्वदेव्यः । अभिप्रियं यत् पुरोळाशमर्वता त्वष्टेदेनं सौश्रवसाय जिन्वति ॥ १.१६२,३.**

हा च्छाग विश्वेदेवांकरितां व पूषन्‌चा भाग असा या अश्वापुढें नेला जात आहे त्या पशूच्या पुरोडाशानें त्वष्टा देव संतुष्ट होवो.

आतांपर्यंत आपण सध्यां सूत्रदृष्ट यज्ञामध्यें ज्या क्रिया आढळतात त्यांपैकीं किती क्रियांचें अस्तित्व ऋग्मंत्रांत दृष्ट होतें हें पाहिलें. आतां ज्या यज्ञविषयक क्रिया ऋग्मंत्रांत दिसतात पण आज प्रचलित नाहींत त्यांचेकडे लक्ष पुरवूं.

**ज्या यज्ञक्रिया ऋग्वेदसंहितेंतील मंत्रांत उल्लेखिल्या असून हल्लीं यज्ञप्रयोगांत रूढ नाहींत अशा यज्ञक्रिया.**

**(१) गायत्रेण नवीयसा १.१२,११.**

नवीन गायत्रानें ( छंदानें ) स्तुति करणें—चालू यज्ञक्रियेंत सूत्रदृष्ट असलेलीं शस्त्रें व सामसूत्रदृष्ट स्तोत्रें पठण करितात, नवीन करीत नाहींत.

**(२) उलूखलसुतानामवेद्विंद्र जल्गुलः १.२८,१.**

इंद्रा, उखळांत कुटलेला सोम पी—उखळांत सोम कुटण्याची पद्धत चालू नाहीं.

**(३) अग्निं सूक्तेभिर्वचोभिरीमहे १.३६,१.**

सूक्तें म्हणून (अथवा) सूक्तवाणीनें अग्नीची याचना करतों—मंत्रांत 'सूक्तेभिः' असें पद असून त्याचा 'सूक्तांनीं' असा अर्थ घेतला तरी 'नुसतीं सूक्तें वाणीनें उच्चारून याचना करीत, असत' असें दिसतें. चांगल्या वाणीनें याचना करीत असत असा अर्थ घेतला तरी नुसत्या वाणीनें ( मंत्रविरहित ) स्तुति करीत असत असा अर्थ निघतो. दोन्हीहि प्राचीनच आहेत. सायणांनीं 'सूक्तरूपवाक्यैः' असा अर्थ केला आहे.

**(४) ऋचस्तमग्निं वर्धयामसि १.३६,११.**

नुसत्या ऋचा म्हणून अग्नि वृद्धिंगत करूं.—नुसत्या ऋचा म्हणून अग्नि वृद्धिंगत करण्याची पद्धत हल्लीं नाहीं. इष्टींत होता 'सामिधेनी'नामक ऋचा पठण करतो त्या वेळीं अध्वर्यु अग्नींत समिधा टाकीत असतो. परंतु वरील मंत्रांत प्रयोगी असा कोणत्याहि तऱ्हेचा उल्लेख नाहीं.

**(४) स इद्वने नमस्युभिर्वचस्यते १.५५,४.**

तो (इन्द्र) वनांत नमस्कारांनीं स्तविला जातो. (वचस्यते=स्तूयते )—अरण्यांत नमस्कारांनीं स्तुति करण्याची क्रिया हल्लींच्या सूत्रोक्त श्रौतधर्मांत दिसत नाहींत. "श्रौतधर्मा"खेरीज इतर प्रकारची उपासना येथें दृष्टीस पडते.

**(५) देवपत्नीरिन्द्रायार्कमहिहत्य ऊवुः १.६१,८.**

देवपत्न्यांनीं इन्द्राकरितां स्तोत्र तयार केलें—वरील मंत्रार्थावरून पूर्वकालीं देवपत्नी ( स्त्रिया ) इन्द्राकरितां स्तोत्रें तयार करीत असें दिसतें. सायणभाष्यांत 'देवपत्नीः=देवानां पालयित्र्यो गायत्र्याद्याः' असा अर्थ केला आहे परंतु तो जरा चमत्कारिक दिसतो.

**(६) संजानाना उपसीदन्नभिज्ञु पत्नीवन्तो नमस्यन्नमस्यन् ॥ रिरिक्वांसस्तन्वः कृण्वत स्वाः १.७२,५.**

पत्नींसह व गुडघे टेंकून आणि शरीर कृश करून नमस्कारपूर्वक ज्ञानी अर्चन करितात—गुडघे टेंकून उपासना करण्याची पद्धत श्रौतधर्मांत नाहीं. व्रतांतून ती दृष्टीस पडते, ती प्राचीन असावी. रिरिक्वांसस्तन्वः=रिक्तीकुर्वन्तः । अभिज्ञु=आभिमुख्येन अवस्थितजानुः । सा. भा.

**(७) तिस्रो यदग्ने शरदस्त्वामिच्छुचिं घृतेन शुचयः सपर्यान् १.७२,३.**

तीन शरद् ( संवत्सर ) शुद्ध अग्नीचें शुची लोक तुपानें यजन करितात.—मंत्रांतील शरत् शब्दाचा संवत्सर असा अर्थ केला आहे. असें तीन संवत्सरात्मक यजन हल्लीं सुरू नाहीं. शरत् शब्दाचा शरदृतु असा जरी अर्थ घेतला तरी तीन वर्षें नुसत्या शरदृतूंत करावयाचा असा याग नाहीं. पांच वर्षें लागोपाठ शरदृतूंत करावयाचा असा 'पंचशारदीय'नामक याग मात्र कृष्णयजुर्वेदांत आहे.

**(८) त्रिःसप्त यद्गुह्यानि त्वे इत्पदाविदन्निहिता यज्ञियासः १.७२,६.**

गुप्त व यज्ञार्ह अशीं अग्नीचीं एकवीस स्थानें यज्ञ करणारे लोक जाणीत.—एकवीस हीच यज्ञांची कायम संख्या नाहीं. यज्ञ ( सत्रांतील घेतल्यास ) अनेक आहेत. सायण भाष्यांत 'सप्तपाकयज्ञ, सप्तहविर्यज्ञ, व सप्तसोमयज्ञ' अशी एकवीसांची भरती केली आहे. परंतु त्यांचा मंत्रांत संदर्भ नाहीं.

**(९) सहस्रं साकमर्चत १.८०,९.**

हजारजणांनीं एकदम अर्चन केलें ( पूजन=यजन )—हजारों माणसांनीं एकत्र जमून एकदम यजन करण्याची चाल हल्लीं नाहीं.

**(१०) मध्वः पिबंति गौर्यः । या इन्द्रेण सयावरीः— १.८४,१०.**

इन्द्राबरोबर जाणाऱ्या गौरवर्ण गाई सोम प्राशन करतात—मंत्रांत 'सोम' शब्द नसून 'मध्वः' शब्द आहे. त्याचा भाष्यांत 'सोम' असा अर्थ केला आहे व तो सोमरसाची चव दाखविणारा असल्यामुळें अन्वर्थक आहे. 'गौर्यः' या पदाचा अर्थ 'गौरवर्णा गावः' असा केला आहे व 'सयावरी' याचा 'बरोबर जाणाऱ्या' असा अर्थ केला आहे. हा

सर्व अर्थ बरोबर धरल्यास 'गाई सोम पीत होत्या' ही गोष्ट चमत्कारिक दिसते.

**(११) आदंगिराः प्रथमं दधिरे वय इद्धाग्नयः १.८३,४.**

अग्नीला प्रदीप्त करणाऱ्या अंगिरसांनीं प्रथम हवि धारण केला ( संपादन केला )—मंत्रार्थ असाः 'अंगिरसांनीं प्रथम अग्नि पेटवून हवनाकरितां हवि तयार केला.' यावरून असा भास होतो कीं, अंगिरस हेच प्रथम यज्ञक्रिया ( यजनक्रिया ) सुरू करणारे असावे.

**(१२) उप ते स्तोमान्पशुपा इवाकरं रास्वा पितर्मरुतां १.११४,९.**

हे मरुतांच्या पशु पालन करणाऱ्या पित्या, तुजकरितां हा स्तोम तयार केला आहे—रुद्रदेवतेकरितां स्तोम करीत नाहींत. मंत्रांत 'रुद्र' पद नाहीं. 'पितर्मरुतां' असें पद आहे. मरुतांनां 'रुद्रपुत्र' असें पुष्कळ ठिकाणीं म्हटलें आहे. परिभाषा–स्तोम म्हणजे सामगायन करतांना त्या मंत्राच्या पुनःपुनः होणाऱ्या आवृत्त्या.

**(१३) ओषा अगन् प्रथमा पूर्वहूतौ १.१२३,२.**

प्रथम आह्वान केलेली उषा प्रमुखत्वानें येते—उषादेवतेला कोणत्याहि यज्ञांत आह्वान नाहीं. अग्निष्टोमादि यज्ञांत शेवटच्या दिवशीं 'प्रातरनुवाक' नामक ऋचा होत्यानें म्हणावयाच्या असतात. परंतु त्यांतहि उषादेवतेसंबंधीं म्हणावयाच्या ऋचा प्रथम नसून अग्निदेवतेसंबंधीं ऋचा म्हटल्यावर मग म्हणतात. म्हणजे त्यांतहि उषेचें प्राथम्य सिद्ध होत नाहीं.

**(१४) गृहंगृहमहना यात्यच्छा दिवेदिवे अधिनामा दधाना । सिषासंती द्योतना शश्वदागादग्रमग्रमित् भजते वसूनां १.१२३,४.**

प्रत्येक दिवशीं घरोघर जाणारी, दररोज जास्त वृद्धिंगत होणारी उषा हवी भक्षण करते—उषेकरितां हविर्भाग कोणत्याहि यज्ञांत अथवा इष्टींत नाहीं. मंत्रांत 'हवि' असें पद नाहीं, 'वसूनां' असें पद आहे, व सायणांनीं त्याचा हवि असा अर्थ केला आहे तोच बरा दिसतो. 'धन' असा अर्थ जुळत नाहीं.

**(१५) प्रप्र पूष्णस्तुविजातस्य शस्यते...स्तोत्रमस्य नतंदते...१.१३८,१.**

पोषक अशा पूषाची स्तुति करतात...त्याचें स्तोत्र कोणी टाकीत नाहींत ( सर्व पठण करतात )—पूषा देवतेसाठीं स्तोत्र यज्ञांत नाहीं.

**(१६) अयंहि ते शुनहोत्रेषु सोम इन्द्र त्वाया परिषिक्तो मदाय २.१८,६.**

इन्द्रा, तुला मद येण्यासाठीं हा सोम 'शुनहोत्र'नामक पात्रांत भरला आहे—'शुनहोत्र'नामक पात्र चालू यज्ञपात्रांत नाहीं. सायणांनीं 'शुनहोत्र' याचा 'पात्रविशेष' असा अर्थ केला आहे, व तो मंत्रांतील सर्व पदांवर दृष्टि टाकल्यास बरोबर दिसतो.

**(१७) आतस्थुः कवयो महस्पथः । ते बाहुभ्यां धमितमग्निमश्मनि नकिः षो अस्त्यरणो जहुर्हि तं २.२४,७.**

पूर्वी [ दृष्ट ] नसलेला अग्नि कवींनीं मोठ्या रस्त्यावर हातांनीं उत्पन्न करून पर्वतावर टाकला—पूर्वकालीं यजनक्रियेव्यतिरिक्त दुसऱ्या कामाकरितांहि अग्नि नवाच उत्पन्न करावा लागत असे असें दिसतें. सायणांनीं 'धमितं' याचा 'मंथनानें' असा अर्थ केला आहे. परंतु मंत्रांत मंथनाचा उल्लेख नाहीं.

**(१८) त्रीणि शता त्री सहस्राण्यग्निं त्रिंशच्च देवा नव चासपर्यन् । औक्षन् घृतैः, अस्तृणन्बर्हिरस्मा, आदिद्धोतार न्यसादयन्त ३.९,९.**

तीन हजार तीनशें एकोणचाळीस देवांनीं अग्नीचें अर्चन केलें; त्यांत तूप सिंचन केलें; त्याच्याकरितां दर्भ पसरले; व त्यावर त्याला बसविलें—तीन हजार तीनशें एकोणचाळीस देवांनीं अग्नींत तुपाचें हवन करून त्याला होता म्हणून दर्भावर बसविण्याची क्रिया हल्लींच्या सूत्रोक्तधर्मांत असणें शक्य नाहीं.

**(१९) अध्वर्योर्वा प्रयतं शक्रहस्ताद्धोतुर्वा यज्ञं हविषो जुषस्व ३.३५,१०.**

हे इन्द्रा, होत्याच्या अथवा अध्वर्यूच्या हातानें यजनीय हवी सेवन कर—होत्याच्या हातानें इन्द्राला हवि अर्पण करण्याची क्रिया सूत्रोक्त श्रौतधर्मांत नाहीं.

**(२०) सेदग्ने अस्तु सुभगः सुदानुर्यस्त्वा नित्येन हविषा य उक्थैः । पिप्रीषति स्व आयुषि दुरोणे विश्वेदस्मै सुदिना, सासदिष्टिः ४.४,७.**

जो नित्य हवीच्या व शस्त्रांच्या योगानें अग्नीला आपल्या सर्व आयुष्यभर खूष करितो त्याचे सर्व दिवस ( आयुष्य ) अग्नि सुखकर करतो. हीच इष्टि [याग]—अग्नीसाठीं नित्य शस्त्रें पठण करून हवी अर्पण करण्याची क्रिया सूत्रोक्त श्रौतधर्मांत नाहीं. अग्निहोत्रहोम नित्य आहे परंतु त्याकरितां शस्त्रें स्तोत्रें पठण करीत नाहींत.

**(२१) इन्द्रं परेवरे मध्यमास इन्द्रं यांतोवसितास इन्द्रं । इन्द्रं क्षियंत उत युध्यमाना इन्द्रं नरो वाजयंतो हवंते ४.२५,८.**

उच्च, नीच, मध्यम असे सर्व लोक इन्द्रासाठीं हवन करतात. कोणत्याहि कार्याला निघालेले इन्द्रालाच बोलावितात. युद्धांत इन्द्रालाच हांक मारतात. घरांत असणारे सुखवस्तु लोक इन्द्रासंबंधीं यजन करतात व त्याच्या जवळच अन्नाची

याचना करितात—वरील मंत्रांत सूत्रोक्त श्रौतधर्माव्यतिरिक्त क्रिया इतकीच कीं, एकट्या इन्द्रासाठींच याग करणें. सूत्रोक्त श्रौतधर्मांत अनेक देवता येत असतात. दुसरी गोष्ट म्हणजे अशी वरील मंत्रकालीं सर्व लोकांत इन्द्राचीच उपासना रूढ होतीसें दिसतें.

**(२२) ये स्तोमेभिः प्रसूरयो नरो मघान्यानशुः ५.१०,३.**

जे स्तोमांच्या [ स्तोत्रांच्या ] योगानें द्रव्य संपादन करतात—वरील मंत्रांत सूत्रोक्त श्रौतधर्माव्यतिरिक्त क्रिया नाहीं. ऋग्वेदकालीन लोकांच्या एका द्रव्यार्जन साधनाचा उल्लेख आला आहे, म्हणून हा मंत्र घेतला आहे.

**(२३) त्वामग्ने अंगिरसो गुहाहितमन्वविन्दन् शिश्रियाणं वनेवने। स जायसे मथ्यमानः सहो महत्त्वामाहुः ५.११,६.**

गुहेचा व वनाचा आश्रय करून राहणारा अग्नि अंगिरसांनां सांपडला. तो मंथनानें उत्पन्न होतो—मंथन करून अग्नि उत्पन्न करण्याची क्रिया साध्य होण्यापूर्वी अरण्यांतील अग्नीच ऋषींनां ठाऊक होता असें वाटतें.

**(२४) यो अस्मै घ्रंस उत वा य ऊधनि सोमं सुनोति ५.३४.३,**

जो या[ इन्द्रा ]करितां दिवसा व रात्रीं सोमाभिषव करतो—इन्द्राकरितां रात्रीं सोम कुटण्याची क्रिया सूत्रोक्त श्रौतधर्मांत आढळत नाहीं.

**(२५) विसर्माणं कृणुहि वित्तमेषां ये भुञ्जते अपृणन्तो न उक्थैः १.४२,९.**

शस्त्र पठण करणाऱ्या आम्हाला न देतां जे [ द्रव्याचा ] उपभोग घेतात त्यांचें द्रव्य नाहींसें कर—मंत्रांत सूत्रोक्त श्रौतधर्माखेरीज अशी क्रिया नाहीं. परंतु पूर्वी शस्त्रें पठण करणारे आपणांस द्रव्य न देणारांचा द्वेष तिरस्कार करीत असत, एवढेंच दाखविलें आहे.

**(२६) सुता इन्द्राय वायवे सोमासो दध्याशिरः ५.५१,७.**

इन्द्रवायूकरितां अभिषव केलेले व दधिमिश्र सोम—सोमरस दधिमिश्र करून अर्पण करण्याची क्रिया सूत्रोक्त श्रौतधर्मांत नाहीं.

**(२७) प्रातर्देवीमदितिं जोहवीमि मध्यंदिन उदिता सूर्यस्य ५.६९,३.**

प्रातःकालीं, माध्यान्हकालीं व अपराह्णकालीं अदितीला आह्वान करतो—प्रातःकाल अथवा माध्याह्नकाल अशा विशिष्ट कालींच अदितीला आह्वान करण्याची क्रिया सूत्रोक्त श्रौत धर्मांत नाहीं.

**(२८) प्रातर्यावाणा प्रथमा यजध्वं...प्रातर्हि यज्ञमश्विना दधाते प्रशंसंति कवयः पूर्वभाजः ५.७७,१.**

प्रातःकालीं येणाऱ्या अश्विनौ देवांनां उद्देशून यजन करा....प्रातःकालींच अश्विनौ देव यज्ञ सेवन करतात. पूर्वींचे कवी अश्विनौ देवांची प्रातःकालींच स्तुति करीत—अश्विनौ देवांचें प्रातःकालीं यजन व शंसन सूत्रोक्त श्रौतधर्मांत नाहीं.

**(२९) प्रातर्यजध्वमश्विना हिनोत न सायमस्ति देवया अजुष्टं ५.७७,२.**

अश्विनौ देवांकरितां प्रातःकालींच यजन करा. सायंकालीं हवी देवांनां अर्पण करण्यास योग्य नसतो, असेव्य असतो—सूत्रोक्त श्रौतधर्मांत प्रातःकालींच अश्विनौ देवांनां हवी अर्पण करीत नाहींत. सायंकाळीं हवी असेव्य होतो, देवांनां अर्पण करण्यांस अयोग्य होतो, असाहि कोठें सूत्रोक्त श्रौतधर्मांत उल्लेख नाहीं.

**(३०) प्र नव्यसा सहसः सूनुमच्छा यज्ञेन ६.६,१.**

नवीन यज्ञानें युक्त असे आम्ही...—मंत्रांत फक्त नवीन यज्ञाचा उल्लेख आहे. हल्लीं सूत्रोक्त यज्ञच होत असतात. त्या व्यतिरिक्त नवे यज्ञ होत नाहींत.

**(३१) अपूर्व्या पुरुतमान्यस्मै...वचांस्यासा स्थविराय तक्षन् ६.३२,१.**

पूर्वीं कोणीं न केलेल्या...अशा वाक्यांनीं इन्द्राची स्तुति करतो—नवीन वाक्यांनीं स्तुति करण्याची पद्धत सूत्रोक्त श्रौतधर्मांत नाहीं.

**(३२) यस्य तीव्रसुतं मदं मध्यमंतं च रक्षसे ६.४३,२.**

ज्याचा अभिषव कठीण आहे अशा, मध्यगत व अंतगत अशा सोमाचें तूं रक्षण करतोस—मंत्रांतील "तीव्रसुत याचा प्रातःसवनांतील सोम, 'मध्य' याचा माध्यंदिनसवनांतील सोम व 'अंत' याचा तृतीयसवनांतील सोम" असा भाष्यकारांनीं अर्थ दिला आहे. 'तीव्रसुत' असें प्रातःसवनांतील सोमास म्हटलें आहे. तीव्रसुत म्हणजे जो कुटावयास कठीण, प्रथमच कुटावयास घेतलेला असा. मध्यगत सोमास ( माध्यंदिनसवनांतील सोमास ) तीव्रसुत म्हटलें नाहीं. सूत्रोक्त श्रौतधर्मांत प्रातःसवनांत व माध्यंदिनसवनांत निरनिराळा सोम कुटावयास घेत असून तृतीयसवनाकरितां मात्र माध्यंदिनसवनांतीलच सोम पुन्हा कुटून रस काढितात. मंत्राचा भावार्थ "प्रातःसवनांत कुटावयास घेतलेलाच सोम बाकीच्या दोन्ही सवनांत पुन्हा पुन्हा कुटावयाचा." अशा तऱ्हेची क्रिया सूत्रोक्त श्रौतधर्मांत नाहीं.

**(३३) बलिं शीर्षाणि जभ्रुरश्व्यानि ७.१८,१९.**

इन्द्राला अश्वशिरांचा बलि अर्पण केला—वरील वाक्य यज्ञविषयक नाहीं. लढाईतील आहे. परंतु इन्द्रास अश्वशिरांचा बलि अर्पण केल्याचा उल्लेख आलेला आहे म्हणून घेतलें आहे.

**(३४) न ते गिरो अपि मृष्ये तुरस्य...सदा ते नाम स्वयशो विवक्मि ७.२२,५.**

मी तुझी स्तुती टाकणार नाहीं. सर्वदा तुझेंच नाम उच्चारीत जाईन—वरील मंत्रांत यज्ञक्रियेचा उल्लेख नाहीं. तेव्हांहि नामग्रहणरूप उपासना दिसते. भाष्यकारांनीं 'नाम' याचा 'स्तोत्र' असा अर्थ केला आहे. तो जरी घेतला तरी सूत्रोक्त श्रौतधर्मांतर्गत यज्ञांत इन्द्राशिवाय अनेक देवता येत असतात.

**(३५) ये च पूर्व ऋषयो येच नूला इन्द्र ब्रह्माणि जनयंत विप्राः ७.२२,९.**

पूर्वींचे व नवे ऋषी स्तोत्रें तयार करते झाले—ऋग्वेदकालीं स्तोत्रें तयार करण्याची क्रिया एकसारखी चालू होती असें दिसतें. सूत्रोक्त श्रौतधर्मांत सूत्रकारांनीं सांगितलेलींच शस्त्रें स्तोत्रें पठण करतात.

**(३६) न सोम इन्द्रमसुतो ममाद नाब्रह्माणो मघवानं सुतासः। तस्मा उक्थं जनये ७.२६,१.**

सोमाभिषव केल्याशिवाय व अभिषव केलेला सोम ब्रह्मा (स्तोत्रा) शिवाय अर्पण केल्यास इन्द्रास मद येत नाहीं. त्याकरितां शस्त्र पठण करतो—"अभिषव केलेला सोम स्तोमरहित अर्पण केल्यास इन्द्राला मद येत नाहीं." असा मंत्रार्थ आहे यावरून पूर्वी शस्त्रस्तोत्ररहित सोम इन्द्राला अर्पण करीत असत कीं काय अशी शंका येते. म्हणून हा उतारा घेतला आहे.

**(३७) इमे हिते ब्रह्मकृतः सुते सचा मधौ न मक्ष आसते ७.३२,२.**

मक्षिका ज्याप्रमाणें मधाचे (पोळ्याचे) जवळ बसतात त्याप्रमाणें स्तोत्रें करणारे अभिषव केलेल्या सोमाजवळ बसतात—सूत्रोक्त श्रौतधर्मांत अशा तऱ्हेनें सोमाजवळ सर्वांत्रांनीं जमून बसण्याची क्रिया नाहीं.

**(३८) ऋतं होता न इषितो यजाति ७.३९,१.**

यज्ञसंबंधीं होता यजन करतो—सूत्रोक्त श्रौतधर्मांत यजन करण्याचें काम अध्वर्यूकडे असतें. प्राचीन कालीं होता व अध्वर्यू एकच असावा असें वाटतें.

**(३९) उपस्थेयाम शरणं न वृक्षं ७.९५,५.**

वृक्षाप्रमाणें उभे राहून उपस्थान करूं—वरील प्रकारची उपासना सूत्रोक्त श्रौतधर्माखेरीज आहे.

**(४०) सीदन्तस्ते वयो यथा गोश्रीते मधौ मदिरे विवक्षणे। अभि त्वामिन्द्र नोनुमः ८.२१,५.**

पक्षी जसे [जमाव करून] बसतात तसे दूधमिश्र व मदकर अशा सोमाजवळ वसून तुला [इन्द्राला] स्तवूं—सोमरसाजवळ पुष्कळ लोकांनीं जमून वसून इन्द्राची स्तुति करण्याची क्रिया सूत्रोक्त श्रौतधर्म रूढ होण्यापूर्वींची दिसते.

**(४१) कन्या३ वारवायती सोममपि सुताविदत्। अस्तं भरन्त्यब्रवीदिन्द्राय सुनवै त्वा ८.८०,१.**

उदकार्थ जाणाऱ्या कन्येला मार्गांत सोम सांपडला. तो घरीं नेल्यावर "हा आतां इन्द्राला अर्पण करूं" असें ती म्हणाली—यज्ञाशिवाय व स्त्रियांनीं इन्द्राला सोम अर्पण करण्याची क्रिया सूत्रोक्त श्रौतधर्मांत नाहीं.

**(४२) नमसेदुपसीदत दध्नेदभि श्रीणीतन। इन्दुमिन्द्रे दधातन ९.११,६.**

नमस्कार करून सोमाजवळ वसा, त्यांत दहिं मिसळा व तो इन्द्राला अर्पण करा—सोमरस पात्रांत भरावयाचे वेळीं त्याला नमस्कार करण्याचा विधि सूत्रोक्त श्रौतधर्मांत नाहीं, व दधिमिश्र सोमहि सूत्रोक्त श्रौतधर्मांत नाहीं.

**(४३) यमाय सोमं सुनुत १०.१४,१३.**

यमाकरितां सोमाभिषव करा.—यम देवतेला उद्देशून सोमाभिषव सूत्रोक्त श्रौतधर्मांत रूढ नाहीं.

**(४४) तांश्च पाहि गृणतः सूरीन् वषट् वषळित्यूर्ध्वासो अनक्षन् नमोनम इत्यूर्ध्वासो अनक्षन् १०.११५, ९.**

वषट् वषट् व नमः नमः असें म्हणणाऱ्याचें रक्षण कर—नमः नमः असें म्हणून स्तुति करण्याची पद्धत सूत्रोक्त श्रौतधर्मांत नाहीं.

× × × × ×

आतांपर्यंत जे उल्लेख दिले आहेत त्यांवरून निदान असें दिसून येईल कीं, यज्ञसंस्था जेव्हां वाढत होती अशा काळांतच मंत्र तयार होत होते. पुरुषसूक्तांत ज्याप्रमाणें वैदिक वाङ्मयरूपी साहित्य तीन ठिकाणीं विभागलेलें दृष्टीस पडतें त्याप्रमाणेंच होता, पोता, नेष्टा, आग्नीध्र, प्रशास्ता, अध्वर्यु, ब्रह्मा, गृहपति इत्यादि सात होते व एक गृहपति मिळून आठ क्रिया करणारे पुरुष मंत्रकाळांतच दिसतात. यज्ञांची क्रिया पाहिली तर त्यांत शस्त्रें म्हणणें, सामें म्हणणें, सामांचें वर्गीकरण वगैरे दिसतेंच. परिधि, इध्म, धिष्ण्या इत्यादि शब्दांस संज्ञास्वरूप आलें होतें. वेदीचें मापन होई. आहुति स्वाहाकार करून द्यावी कीं वषट्कार करून द्यावी याविषयीं देखील भेद वाढला होता. सोम, घृत इत्यादि रसांचीं अवदानें द्यावयास स्रुवा, स्रुची, जुहू, खारी, चमस, द्रोण इत्यादि पात्रें दृष्टीस पडतात आणि त्यांसंबंधीं उल्लेख जवळजवळ सूत्रोक्त यज्ञक्रियेप्रमाणेंच दिसतात. हवनीय द्रव्यांत सोम, आज्य, पृष्टदाज्य, पुरोडाश, पयमिश्रसोम, चरु, धाना, करंभ, यवमिश्रसोम इत्यादि द्रव्यें दिसतात.

ऋत्विग्वरण ब्राह्मणांत जरी दिसत नाहीं आणि सूत्रोक्त धर्मांत दिसतें तरी त्याचें मूळ प्रत्यक्ष मंत्रांत आहे असें दिसतें. श्रौत क्रियांत अग्न्याधान, सायंप्रातर्होम, दर्शपूर्णमास, पशु, चातुर्मास्यांतर्गत पिंडपितृयज्ञ, गृहमेधीयेष्टि, घर्म (प्रवर्ग्य), सोमयाग, अतिरात्र, संवत्सरसत्र अश्वमेध इत्यादि श्रौत प्रकार दिसून येतात. वरील प्रकारची स्थिति जर आपणांस ऋग्वेदांत दिसून येते तर त्यांपासून यजूंची अत्यंत नियमबद्ध पद्धति कशी बनत गेली ही कल्पना होण्यासारखी आहे.

## सोमयागांतील मुख्य ऋत्विजांच्या नांवांचा संहितांमध्यें उल्लेख दाखविणारें कोष्टक.

| ऋत्विग्नाम | ऋग्वेद संहिता | तैत्तिरीय संहिता | वाजसनेयि संहिता | सामवेद संहिता | अथर्ववेद संहिता | ऋग्वेदसंहिता | | तैत्तिरीय संहिता | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | | | | | | मंत्रभाग | | ब्राह्मणभाग | |
| | | | | | | ऋत्विज | अन्यार्थी | ऋत्विज | अन्यार्थी | ऋत्विज | अन्यार्थी |
| अध्वर्यु | ५७ | ८६ | १४ | ८ | ८ | ५७ | ० | १० | ० | ७६ | ० |
| ब्रह्मा | ३०२ | १९० | ४८ | १३ | ७२ | २३ | २७९ | ६ | ७० | १६ | ९८ |
| होता | ३२४ | १०३ | १२३ | ४३ | ३४ | २८७ | ३७ | ५० | २ | ४६ | ५ |
| उद्गाता | १ | १२ | ० | ० | ० | १ | ० | १ | ० | ११ | ० |
| प्रतिप्रस्थाता | ० | १ | ० | ० | ० | ० | ० | ० | ० | १ | ० |
| ब्राह्मणाच्छंसी | ३ | १ | ० | ० | ० | ३ | ० | ० | ० | १ | ० |
| मैत्रावरुण (प्रशास्ता) | ५ | १६ | २ | ० | १ | ४ | १ | १ | १ | ३ | ११ |
| प्रस्तोता | ० | ३ | ० | ० | ० | ० | ० | १ | ० | २ | ० |
| नेष्टा | ६ | ५ | २ | ० | १ | ० | १ | २ | ० | ३ | ० |
| आग्नीध्र | ३ | ३६ | २ | ० | ० | ५ | ० | ४ | १ | ८ | २३ |
| अच्छावाक | ० | २ | ० | ० | ० | ३ | ० | ० | ० | २ | ० |
| प्रतिहर्ता | ० | २ | ० | ० | ० | ० | ० | १ | ० | १ | ० |
| उन्नेता | ० | ४ | १ | ० | ० | ० | ० | ० | ० | ४ | ० |
| पोता | ११ | २ | १ | १ | ४ | १० | १ | ० | ० | २ | ० |
| ग्रावस्तुत् (ग्रावग्राभ) | १ | १ | ० | ० | ० | १ | ० | ० | ० | ० | ० |
| सुब्रह्मण्य | ० | ० | ० | ० | ० | ० | ० | ० | ० | ० | ० |
| सदस्य | ० | १० | ० | ० | ० | ० | ० | ३ | ० | ७ | ० |

वरील कोष्टकामध्यें आपणांस लक्षांत ठेवण्याजोग्या गोष्टी पुढें दिल्याप्रमाणें दिसतात.

(१) सुब्रह्मण्य नांवाच्या अत्यंत थोडें काम असणाऱ्या ऋत्विजाचा उल्लेख कोणत्याहि संहितेंत नाहीं.

(२) उद्गात्याचा म्हणजे सामवेद ज्या वर्गानें बनविला त्या ऋत्विजाचा उल्लेख फक्त कृष्णयजुर्वेदांत बऱ्याच (१२) वेळ येतो. त्यापैकीं ११ वेळ उल्लेख ब्राह्मणांत असून मंत्रांत उल्लेख एकच आहे, ऋग्वेदांत एकच वेळ येतो, आणि इतर वेदांत मुळींच नाहीं. म्हणजे सामसंहितेंतहि नाहीं. सामांचा उल्लेख मात्र ऋग्मंत्रांत वारंवार येतो. यावरून असा एक संशय उत्पन्न होतो कीं, उद्गात्याचें माहात्म्य बऱ्याच उत्तरकालीं वाढलें असावें.

(३) ग्रावस्तुत् या ऋत्विजाचा उल्लेख वाजसनेयी, साम आणि अथर्व या संहितांतून नाहीं. जो उल्लेख आहे तो ऋग्वेद आणि तैत्तिरीय संहिता या दोन्ही वेदांत दिसणाऱ्या परंतु एकाच ऋचेंत आहे आणि त्यांत केवळ ग्रावग्राभ म्हणजे वरवंटा उचलून ठेवणारा एवढेंच त्याचें स्वरूप होय. अर्थात् या सामान्य कार्याचा पुढें मागें गौरव होऊन त्या कार्यांत ग्रावस्तुतीचा प्रवेश होऊन ऋत्विक्कार्याचें स्वरूप आलें असावें असें दिसतें.

(४) उन्नेता या ऋत्विजाचा उल्लेख फक्त यजुःसंहितेंतील ब्राह्मणभागांत चारवेळ आला आहे इतर संहितांत मुळींच नाहीं. सामान्य खटपट्याचें काम करणारा हा मनुष्य दिसतो. त्याला ऋत्विक्पद देखील पुढेंमागें गौरवासाठीं दिलें असावें असें दिसतें.

(५) अच्छावाकाचा उल्लेख तैत्तिरीय संहितेंतील ब्राह्मणवाक्यांबाहेर कोठेंहि नाहीं. हा होतृगणांतील ऋत्विज पण हौत्रमंत्रांत त्याचा कांहींच उल्लेख नाहीं यावरून हा देखील उत्तरकालीन दिसतो. निदान क्रियेच्या कर्त्याला महत्त्व व नांव उत्तरकालीं मिळालें असावें. अच्छावाकास त्याच्या कार्याच्या आरंभीं जे मंत्र म्हणावे लागतात त्यांत अच्छ हें पद येतें. यावरून हौत्रकर्माच्या विशिष्ट विकासानंतर या होत्यास हें नांव मिळालें असें दिसतें.

(६) प्रतिहर्ता फक्त कृष्णयजुःसंहितेंत दोन वेळां उल्लेखिला गेला आहे.

(७) ब्राह्मणाच्छंसीचा उल्लेख या विशिष्ट नांवानें कृष्णयजुःसंहितेखेरीज कोठेंहि नाहीं. हा उल्लेख देखील संहितांतर्गत ब्राह्मणभागांत व तो देखील एकदांच आला आहे. ऋक्संहितेंत ब्रह्मपुत्र नांवानें उल्लेखिलेला ऋत्विज ब्राह्मणाच्छंसी होय असें म्हणतां येईल. या ऋत्विजास ब्राह्मणाच्छंसी

हें नांव मिळण्याचें कारण तो जी याज्या म्हणतो तींत ब्राह्मणात् हें पद आहे. ब्रह्मपुत्र हा शंसन करणारा आहे इतपत पुरावा ऋग्वेदमंत्र देतात.

(८) प्रशास्ता व मैत्रावरुण या दोन नांवांपैकीं प्रशास्ता हें नांव अधिक जुनें दिसतें. कां कीं, प्रशास्ता हें सामान्य क्रियेचें वाचक आहे आणि मैत्रावरुण हें मित्रावरुणांच्या स्तुतीवरून पडलेंसें दिसतें. प्रशास्ता व मैत्रावरुण हीं दोन्ही एकाच ऋत्विजाचीं नांवें आहेत असें म्हणण्याचें कारण मित्रावरुणांची स्तुति करणाराला प्रशास्ता असें म्हटलें आहे. ऋत्विग्वरणामध्यें मैत्रावरुणाचें वरण करतांना प्रशास्ता शब्दानें वरण करतात व प्रशास्त्याच्या नांवानें प्रैष देतात. सूत्रकार, प्रशास्ता व मैत्रावरुण एकच समजतात. तथापि तैत्तिरीय संहितेंत मैत्रावरुण हेंच नांव चार वेळ येतें. प्रशास्ता हें नांव आढळत नाहीं. ऋग्वेदमंत्रांत प्रशास्ता हें नांव वारंवार आढळतें.

(९) प्रतिप्रस्थाता याचा उल्लेख तैत्तिरीय संहितेंत एकदांच आला आहे, व तो देखील ब्राह्मणभागांत आहे. बाकी कोणत्याहि संहितांतून उल्लेख नाहीं.

(१०) आग्नीध्र या शब्दाचा ऋत्विगर्थी उल्लेख अग्नीत् व अग्निमिंध या नांवानें तैत्तिरीय संहितेंतील मंत्रविभागांत ४ वेळ व ब्राह्मणभागांत ८ वेळ मिळून एकंदर १२ वेळ आला आहे 'अग्निमिंध' हें नाव एकदांच आलें आहे. ऋग्वेदांत याचा उल्लेख तीनवेळां आला आहे.

(११) प्रस्तोता या ऋत्विजाचा उल्लेख तैत्तिरीय संहितेंत मंत्रभागांत एकदां व ब्राह्मणभागांत २ वेळ मिळून तीन वेळ आला आहे. हा इतर संहितांत दिसत नाहीं.

(१२) पोता या ऋत्विजाचा उल्लेख तैत्तिरीय संहितेंत फक्त ब्राह्मणभागांत दोन वेळ आहे. पण ऋग्वेदांत याचा उल्लेख १० वेळतरी ऋत्विगर्थानें आला आहे. अथर्ववेदांत चारदां आला आहे व शुक्लयजु व सामवेदांत एक एक वेळ आला आहे.

ऋग्वेदामध्यें ऋत्विजांच्या नांवांचा संख्याबाहुल्यावरून अनुक्रम लावावयाचा असें म्हटल्यास तो येणेंप्रमाणें होतोः होता, ब्रह्मा, अध्वर्यु, पोता, नेष्टा, प्रशास्ता, आग्नीध्र इत्यादि.

कृष्णयजुर्वेदांत होता, अध्वर्यु, ब्रह्मा, उद्गाता, आग्नीध्र, प्रशास्ता, नेष्टा असा होतो.

इतर वेदांत अध्वर्यु, ब्रह्मा व होता यांखेरीज इतरांचा फारसा उल्लेखच नाहीं. अथर्ववेदांत पोत्याचा उल्लेख चार वेळ आला आहे.

सदस्य हा शब्द ऋत्विगर्थी व एकवचनीं असा तैत्तिरीय संहितेंत कोठें आढळत नाहीं. सामान्यतः 'सदांत (सदोमंडपांत) बसणारे ते सदस्य' अशा अर्थानें कांहीं ठिकाणीं आला आहे. अर्थात् तो अनेकवचनीं आहे. उत्तरकालीन ग्रंथांत 'सदस्य' हा ऋत्विगर्थी स्पष्ट आहे. यावरून सामान्यतः सदांत बसणाऱ्यांपैकीं एका प्रमुख व्यक्तीला 'सदस्य' हें नांव मिळालें असावें व ऋत्विज या नात्यानें त्याचा स्वीकार करण्याची रूढी पडली असावी. कल्पसूत्रामध्यें 'सदस्यः सप्तदशः' सदस्य १७ वा ऋत्विज असें म्हटलें आहे.

**यज्ञविकासमूलक क्रियाभेद.**—कोणतीहि क्रिया अधिकाधिक विकसित होऊं लागली म्हणजे त्या विकासांत दोन क्रिया होत असतात. एक क्रिया म्हणजे आकार वाढणें आणि दुसरी क्रिया म्हटली म्हणजे क्रियेमध्यें अधिकाधिक श्रमविभाग होणें. ऋत्विजांत होत असलेला श्रमविभाग आपणांस पहावयाचा झाल्यास ऋग्मंत्रांकडेसच आपण लक्ष दिलें पाहिजे. ब्राह्मणांत आणि त्यावरोबर जुळणी होणाऱ्या यजुर्वेदाच्या रचनेंत निरनिराळ्या ऋत्विजांच्या क्रियांचें पृथक्करण पूर्वींच होऊन गेलें आहे अशी अवस्था दृष्टीस पडते. यासाठीं आपण होता, अध्वर्यु, ब्रह्मा, पोता इत्यादि ऋत्विजांचें कर्म प्रत्यक्ष ऋग्वेदाच्या मंत्रभागांत कसें काय होतें इकडे लक्ष देऊं.

होत्याचें काम म्हणजे फक्त शस्त्रें, स्तोत्रें वगैरे म्हणणें, आहुति देणें इत्यादि क्रिया करणें नव्हे. तसेंच अध्वर्यूचें काम म्हणजे यज्ञाच्या व्यवस्थापकास शोभणारी क्रिया करणें. या तऱ्हेची मांडणी सूत्रोक्त आणि ब्राह्मणोक्त श्रौतधर्मांत आहे. तसेंच एकच होता, एकच अध्वर्यु, अशी स्थिति आहे. पांच सहा होते अगर चार पांच अध्वर्यू अशी स्थिति नाहीं. क्रिया निश्चित असून त्यांचे अधिकारीहि निश्चित असल्याची स्थिति यजुर्वेदघटनोत्तर श्रौतधर्मांत आहे. तर या स्थितीच्या पूर्वस्वरूपांकडे आपण प्रथम लक्ष दिलें पाहिजे.

**होता.**—आपण ऋग्वेदाचें मुख्य कार्य जें देवतांची स्तुति करणें असें समजलें जातें तें कार्य करणाऱ्या ऋत्विजाकडे प्रथम वळूं. त्याचें ऋक्संहितेंत आढळणारें स्वरूप पुढें दिलेल्या उल्लेखांवरून स्पष्ट होईल.

**अग्निं दूतं वृणीमहे होतारं विश्ववेदसम् ॥ अस्य यज्ञस्य सुक्रतुम् ॥ १.१२,१.**

सर्वज्ञ व कर्मकुशल अशा अग्नीला आम्ही आमच्या यज्ञाचा होता व दूत नेमतों. (होत्याचें आह्वान कार्य.)

**अग्ने देवाँ इहावह जज्ञानो वृक्तबर्हिषे ॥ असि होता न ईड्यः ॥ १.१२,३.**

हे अग्ने, तूं येथें उत्पन्न झालास म्हणजे बर्हि आंथरून वाट पाहत बसलेल्या यजमानासाठीं देवांनां बोलावून आण. कारण तूं आमचा प्रशंसनीय होता आहेस. (येथें आह्वान करणारा तो होता असा अर्थ केल्यास अधिक सरळ होईल.)

**सुसमिद्धो न आवह देवाँ अग्ने हविष्मतो होतः पावक यक्षि च ॥ १.१३,१.**

हे अग्ने, ज्याअर्थी तूं आतां चांगला प्रज्वलित झाला आहेस त्याअर्थी हविःप्रदान करणाऱ्या यजमानाकडे देवांनां बोलावून घेऊन ये आणि शुचिर्भूत होत्या, तूं त्यांची पूजा कर. (आह्वानकार्य.)

**अग्ने सुखतमे रथे देवाँ ईळित आवह । असि होता मनुर्हितः ॥ १.१३,४.**

हे अग्ने, आमच्याकडून स्तविला गेलास म्हणजे सुखकारक अशा एका रथांत बसवून सर्व देवांनां घेऊन ये. कारण, मनूनें 'देवाला बोलावणारा' होता म्हणूनच तुला येथें स्थापित केलेला आहे. (आह्वानकार्य.)

**आकीं सूर्यस्य रोचनाद्विश्वान्देवाँ उषर्बुधः । विप्रो होतेह वक्षति । १.१४,९.**

बुद्धिमान् होता आतां उषःकाल झाला हें जाणून सूर्यप्रकाशांतून सर्व देवांनां येथें बोलावून आणो. (आह्वान.)

**त्वं होतामनुर्हितोऽग्ने यज्ञेषु सीदसि । सेमंनो अध्वरं यज ॥ १.१४,११.**

हे अग्ने, मनुष्यांनां हितकर असा होता होऊन तूं यज्ञांत बसला आहेस तर तूं हा आमचा यज्ञ शेवटास ने. (येथें हवनकार्य अधिक प्रमाणानें आहे.)

**नि त्वा यज्ञस्य साधनमग्ने होतारमृत्विजम् ॥ मनुष्वद्देव धीमहि प्रचेतसं जीरं दूतममर्त्यम् ॥ १.४४,११.**

हे अग्निदेवा, यज्ञाचें साधन व वसंतादि ऋतूंमध्यें यजन करणाऱ्या ऋत्विजाप्रमाणें तुज ज्ञानसंपन्न होत्याला आम्ही मनुष्य होत्याप्रमाणें स्थापन करतों. कां कीं, तूं शत्रूंच्या आयुष्याची हानि करणारा देवदूत व अमर आहेस. (आह्वानकार्य.)

**नि त्वा होतारमृत्विजं दधिरे वसुवित्तमम् । श्रुत्कर्णं सप्रथस्तमं विप्रा अग्ने दिविष्टिषु ॥ १.४५,७.**

हे अग्ने, बुद्धिमान् असतात ते तुला म्हणजे होत्याला यज्ञामध्यें स्थापित करतात. कारण, तूं श्रवणकुशल व धनाचा लाभ करून देणारा म्हणून प्रख्यात आहेस. (अनिश्चय)

**होतारं सप्तजुह्वो३ यजिष्ठं यं वाघतो वृणते अध्वरेषु । अग्निं विश्वेषामरतिं वसूनां सपर्यामि प्रयसा यामि रत्नम् ॥ १.५८,७.**

यजन करणारे सात ऋत्विज ज्या अग्नीला यजनकुशल होता म्हणून यज्ञामध्यें नियोजित करतात, त्या सर्वधनाधिपति अग्नीला मी हविर्द्रव्यरूप अन्नानें खूप करतों आणि त्याच्याजवळ धनाची याचना करतों. (हवनार्थी, हवनकर्त्याचें प्रामुख्य.)

**होता निषत्तो मनोरपत्ये सचिन्वासां पती रयीणाम् ॥ १.६८,७.**

हे अग्ने, 'मनु' ऋषीच्या पुढच्या प्रजेमध्यें तूं होता होऊन बसलास. (अनिश्चित.)

**होताध्वर्युरावया अग्निमिन्धो ग्रावग्राभ उत शंस्ता सुविप्रः । तेन यज्ञेषु स्वरंकृतेन स्विष्टेन वक्षणा आपृणध्वम् ॥ १.१६२,५.**

होता, (देवतांच्या) संमुख (हविःपदार्थ) नेणारा अध्वर्यु, अग्नीला प्रज्वलित करणारा (अग्निमिन्ध=आग्नीध्र), वरवंटा उचलून घेणारा (ग्रावग्राभ=ग्रावस्तुत्) आणि सुविप्र असा स्तुति करणारा (शंस्ता=प्रशास्ता किंवा मैत्रावरुण) असे तुम्ही सारेजण आपल्या मंत्रोच्चारसौष्ठवानें अलंकृत केलेल्या व उत्कृष्ट हवनपद्धतीनें पार पाडलेल्या यज्ञाच्या योगानें जिकडे तिकडे तुपाचे पाट वहावयास लावा. (आह्वानकार्य.)

**सीद होतः स्व उ लोके चिकित्वान्त्सादया यज्ञं सुकृतस्य योनौ । देवावीर्देवान्हविषा यजास्यग्ने बृहद्यजमाने वयो धाः ॥ ३.२९,८.**

हे ज्ञानसंपन्न होत्या, तूं आपल्या स्थानावर येऊन बैस आणि हा यज्ञ जणों सुकृताची खाण असेल त्या ठिकाणीं स्थापन कर. देवरक्षक असा तूं देवांचें यजन करतोस आणि ज्याच्या येथें यजन करतोस त्या यजमानाच्या ठिकाणीं पुष्कळ अन्नाची समृद्धि करतोस.

**इष्टा होत्रा असृक्षतेन्द्रं वृधासो अध्वरे । अच्छावभृथमोजसा ॥ ८.९२,२३.**

यज्ञ करणारे होते अवभृथाचे दिवशीं आपल्या तेजानें इन्द्राला उत्पन्न करितात व वाढवितात. (यजनार्थी)

**अयमिह प्रथमो धायि धातृभिर्होता यजिष्ठो अध्वरेष्वीड्यः ॥ यमप्नवानो भृगवो विरुरुचुर्वनेषु चित्रं विभ्वं विशेविशे ॥ ४.७,१.**

यज्ञकर्म करणाऱ्यांनीं हा होता यजनीय, यज्ञामध्यें स्तुत्य असा (अग्नि) येथें प्रथम प्रस्थापित केला इ०. (अनिश्चित).

**पिप्रीहि देवाँ उशतो यविष्ठ विद्वाँ ऋतूँ ऋतुपते यजेह । ये दैव्या ऋत्विजस्तेभिरग्ने त्वं होतॄणामस्यायजिष्ठः ॥१०.२,१.**

हे तरुण अग्ने, स्तुति ऐकण्याची इच्छा असणाऱ्या देवांनां संतुष्ट कर. हे ऋतुपते, यागकालांनां जाणणारा तूं या यज्ञामध्यें त्या देवांनां पूजित कर. देवांमध्यें उत्पन्न झालेल्या ऋत्विजांसह तूं यजन कर. तूं होत्यांच्या (यजनकर्त्यांच्या) मध्यें अत्यंत यजनकुशल आहेस. (हवनार्थी)

**वेषि होत्रमुत पोत्रं जनानां मन्धातासि द्रविणोदा ऋतावा । स्वाहा वयं कृणवामा हवींषि देवो देवान्यजत्वग्निरर्हन् ॥ १०.२,२.**

हे अग्ने, लोकांच्या साठीं तूं होत्याचें कर्म व पोत्याचें कर्म यांची इच्छा करतोस. तूं मेधावी, व सत्यवान् व धनप्रद आहेस. आम्ही देवांच्या करितां स्वाहाकार करतों नंतर तो प्रकाशमान अग्निदेव देवांचें यजन करो. (हवनार्थी)

आ देवानामपि पंथामगन्म यच्छक्नवाम तदनु प्रवोळ्हुम्। अग्निर्विद्वान्स यजात्सेदु होता सो अध्वरान्त्स ऋतून्कल्पयाति ॥ १०.१,३.

आम्ही देव ज्या मार्गानें स्वर्गाला जातात त्या मार्गावर जाऊन पोहोंचूं. ज्या योगानें देवांच्या सन्निध जाऊं त्या-कर्माचें अनुष्ठान करण्यास आम्ही समर्थ होऊं इतकेंच नव्हे तर तें कर्म अनुक्रमानें समाप्त करण्यासहि समर्थ होऊं; आणि नंतर त्या स्वर्गप्रापक मार्गाला जाणणारा अग्नि देवांचें यजन करो. कां कीं, मनुष्यांचा होमनिष्पादक 'होता' तोच आहे. तो अग्नीच यज्ञांची व त्यांच्या योग्य काळाची कल्पना करतो. (हवनार्थी)

शूषेभिर्वृधो जुषाणो अर्कैर्देवाँ अच्छा रघुपत्वा जिगाति। मन्द्रो होता सुजुह्वा ३ यजिष्ठः संमिश्लो अग्निराजिघर्ति देवान् ॥ १०.६,४.

वर्धित झालेला अग्नि हविर्द्रव्यरूप बलांनीं व स्तोत्रांनीं सेव्यमान होत्साता इन्द्रादि देवांच्याकडे जाण्यासाठीं भराभर पावलें टाकून जलद चालतो. आणि स्तुत्य व यजनशील असा तो 'होता' देवांनां हविर्द्रव्यें समर्पण करतो. (हवनार्थी)

आ नो बर्हिः सधमादे बृहद्दिवि देवाँ ईळे सादया सप्त होतॄन् ॥ इन्द्रं मित्रं वरुणं सातये भगं स्वस्त्य१ग्निं समिधानमीमहे ॥ १०.३५,१०.

हे अग्ने. ज्या ठिकाणीं देव सोमपान करून धुंद होतात त्या आमच्या दीप्तिमान् अशा महायज्ञामध्यें सप्त होते व इन्द्र, मित्र, भग आणि इतर यजनीय देव यांनां आणून बसीव म्हणजे धनलाभाकरितां त्या देवांचें मी स्तवन करीन. उत्तम प्रकारें प्रज्वलित झालेल्या अग्नीजवळ आम्ही सर्व प्रकारें कल्याणाची याचना करितों. (सप्त होते, स्तवनार्थी)

इदमित्था रौद्रं गूर्तवचा ब्रह्मक्रत्वा शच्यामन्तराजौ। क्राणा यदस्य पितरो मंहनेष्ठाः पर्षत्पक्थे अहन्ना सप्त होतॄन् ॥ १०.६१,१.

मोठ्या आवाजाचा (नाभानेदिष्ठ) रुद्राला आवडणारें स्तोत्र या वेळीं कसें करावें हें जाणत असल्यामुळें तयार करण्यास योग्य असें स्तोत्र तो अंगिरसांच्या सत्रांत करतो. जें स्तोत्र त्याच्या (नाभानेदिष्ठाच्या) बापानें व भावांनीं गाई मिळण्याचें साधन म्हणून (नाभानेदिष्ठाला) सुचविलें होतें त्या स्तोत्राच्या पठनानें सत्राच्या सहाव्या दिवशीं त्यानें सप्तहोत्यांनां सत्राच्या समाप्तीपर्यंत पार पाडून नेलें. (सप्त होते, अनिश्चित.)

सकेतुरध्वराणामग्निर्देवेभिरागमत्। अंजानः सप्तहोतृभिर्हविष्मते ॥ ३.१०,४.

यज्ञांची प्रख्याति करणारा तो अग्नि सप्तहोत्यांनीं तुपासारख्या हविर्द्रव्यांनीं न्हाऊन सोडिला असतांना हविर्दात्या यजमानाकडे देवांनां घेऊन येवो. (आह्वानव्यतिरिक्त कर्म)

यथायजो होत्रमग्ने पृथिव्या यथा दिवो जातवेदश्चिकित्वान्। एवानेन हविषा यक्षि देवान् मनुष्वद्यज्ञं प्रतिरेममद्य ॥ ३.१७,२.

हे अग्ने, तूं ज्याप्रमाणें पृथ्वीच्या किंवा द्युदेवतेच्या हविर्द्रव्याचें यजन केलेंस त्याचप्रमाणें उपजत ज्ञानी व बुद्धिमान् असा तूं आम्ही करीत असलेल्या या यज्ञांत 'होता' होऊन हविर्द्रव्यांनीं देवतोद्देशानें यजन कर आणि मानुष होत्याप्रमाणें आमच्या या यज्ञाचें अनुष्ठान पार पाड—पैल तीराला ने. (हवनार्थ)

होता देवो अमर्त्यः पुरस्तादेति मायया। विदथानि प्रचोदयन् ॥ ३.२७,७.

मरणधर्मरहित असा होतानामक देव आपल्या कर्मविषयक ज्ञानानें संपन्न होत्साता समजून घेण्यास अवश्य अशा कर्माचें ज्ञापन करण्यासाठीं सर्वांच्या पुढें अर्थात् इतर देवांच्या अगोदर येतो. (आह्वानव्यतिरिक्त कर्म)

प्र सप्तहोता सनकादरोचत मातुरुपस्थे यदशोचदूधनि। न निमिषति सुरणो दिवेदिवे यदसुरस्य जठरादजायत ॥ ३.२९,१४.

(सात असामी ज्याचे ठिकाणीं हवन करतात असा) सप्तहोता नामक अग्नि सनातन असल्यामुळें नित्य प्रकाशित असतो. आईच्या मांडीवर बालक शोभतो त्याप्रमाणें या यज्ञस्थलाच्या ठिकाणीं शोभत असलेला हा अग्नि चित्ताकर्षक अशा आपल्या ज्वालारूप मुखानें रोजच्यारोज मंजुळ शब्द करतो. असुरांच्या उदरांतून जन्मलेला हा अग्नि यत्किंचितहि झोंप न घेतां सदैव जागृत असतो. (हवनार्थी)

यदद्य त्वा प्रयति यज्ञे अस्मिन्होतश्चिकित्वो वृणीमहीह। ध्रुवमया ध्रुवमुताशमिष्ठाः प्रजानन् विद्वाँ उपयाहि सोमम्॥ ३.२९,१६.

हे ज्ञानसंपन्न अग्ने, आज चालू असलेल्या यज्ञांत ज्या अर्थीं मी तुला वरलें आहे त्या अर्थीं आम्ही अर्पिलेलीं हविर्द्रव्यें तूंच देवांकडे नेहमीं घेऊन जा आणि हवि स्वीकारलेल्या देवांच्या तृप्ततेमुळें शांत झालेला असा तूं माझी निष्ठा जाणून सोमाला जवळ कर. आम्ही तयार केलेल्या सोमरसाजवळ लवकर ये. (आह्वानव्यतिरिक्त क्रिया)

इन्द्र पिब स्वधया चित्सुतस्याग्नेर्वा पाहि जिव्हया यजत्र ॥ अध्वर्योर्वा प्रयतं शक्र हस्ताद्धोतुर्वा यज्ञं हविषो जुषस्व ॥ ३.३५,१०.

हे इन्द्रा, बलानें कुटलेल्या ह्या सोमरसाचें प्राशन कर. हे यजनीय इन्द्रा, अग्नीच्या ज्वालारूप जिह्वेनें तूं या कुटलेल्या सोमरसाचें पान कर. हे समर्थ इन्द्रा, तुझ्यासाठीं तयार केलेलें यजनीय असें हविर्द्रव्य अध्वर्यूच्या अगर होत्याच्या हातून तूं सेवन कर. ( हवनार्थी )

**यस्त्वद्धोता पूर्वो अग्ने यजीयान्द्विताच सत्ता स्वधया च शंभुः । तस्यानुधर्म प्रयजा चिकित्वो था नो धा अध्वरं देववीतौ ॥ ३.१७,५.**

हे अग्ने, पृथ्वी व द्युलोक यांच्या ठिकाणीं 'होता' म्हणून स्थापित केलेला व सुखकारी असा तुझ्यापेक्षां जुना आणि यजनकुशल जर जो कोणी असेल त्याच्या कर्माला अनुसरूनच ज्ञानवान् असा तूं यजन कर आणि आमचा यज्ञ देव सेवन करतील असें कर. ( यजनार्थी )

**भूरीणि हि त्वे दधिरे अनीकाग्ने देवस्य यज्यवो जनासः । स आवह देवतातिं यविष्ठ शर्धो यदद्य दिव्यं यजासि ॥ ३.१९,४.**

हे अग्ने, ज्या अर्थी प्रकाशमान अशा तुला यजन करणारे लोक आहुतिप्रक्षेपाच्या योगानें तुझ्या ठिकाणीं पुष्कळशीं तेजें स्थापित करीत असतात त्या अर्थी हे तरुण अग्ने, तूं देवांना घेऊन येथें ये आणि ज्या योगें या यज्ञांत त्या देवांचें तुला यजन करतां येईल असें कर. ( यजनार्थ )

**अग्निं होतारं प्रवृणे मियेधे गृत्सं कविं विश्वविदममूरम् । स नो यक्षद्देवताता यजीयान्राये वाजाय वनते मघानि ॥ ३.१९,१.**

या यज्ञांत मी गृत्स (बुद्धिमान्), सर्वज्ञ, अमूढ अशा अग्नीला 'होता' म्हणून पूजतों. यजनशील असा तो अग्नि यज्ञांत आमच्यासाठीं देवांचें यजन करो आणि धन व बल आम्हांस देण्याकरितां ( आम्ही दिलेलें ) हवी भक्षण करो. ( यजनार्थ )

**उप यो नमो नमसि स्तभायन्नियर्ति वाचं जनयन्यजध्यै । ऋञ्जसानः पुरुवार उक्थैरेन्द्रं कृण्वीत सदनेषु होता ॥ ४.२१,५.**

लोकांनां स्तंभित करून यजनासाठीं वाणीला उत्पन्न करणारा, स्तोत्रांच्या योगानें आपलासा करूं लागल्यास तेव्हांच होणारा आणि बहुलोकप्रिय असा जो इन्द्र तो हविरन्नानें संपन्न अशा यजमानाच्या घरीं अन्न पाठवून देतो त्याला मी नियोजित केलेला होता यज्ञगृहांत येण्यासाठीं उद्युक्त करो. ( हवनव्यतिरिक्तार्थी. )

**कथामहामवृधत्कस्य होतुर्यज्ञं जुषाणो अभिसोममूधः । पिबन्नुशानो जुषमाणो अन्धो ववक्ष ऋष्वः शुचते धनाय ॥ ४.२३,१.**

महान् गुणांनीं संपन्न अशा इन्द्राची कीर्ति वाढेल असें मजजवळ कोणतें स्तोत्र आहे ? यजन करणाऱ्या कोणत्या होत्याच्या यज्ञाला खूष होऊन तो हविर्द्रव्यरूप अन्नाची इच्छा करणारा व दिलेल्या हवींचें सेवन करणारा इन्द्र यजमानाला देण्याकरितां पुष्कळ धन घेऊन येईल. ( हवनार्थी. )

**इन्द्रा कोवां वरुणा सुम्नमाप स्तोमो हविष्माँ अमृतो न होता । यो वां हृदि क्रतुमाँ अस्मदुक्तः पस्पर्शदिन्द्रावरुणा नमस्वान् ॥ ४.४१,१.**

हे इन्द्रावरुण हो, हविर्द्रव्ययुक्त असें कोणतें स्तोत्र तुम्हांस प्रिय होईल? ज्याच्या हृदयांत उत्कृष्ट ज्ञानाचा उदय झाला आहे अशा होत्याप्रमाणें मी उच्चारलेलें कोणतें नमस्कारपूर्वक केलेलें स्तोत्र तुमच्या हृदयाला हालवून सोडील? कोणत्या शस्त्रपठणानें तुमच्या मनाला आल्हाद होईल? ( स्तुत्यर्थ. )

**यथा होतर्मनुषो देवताता यज्ञेभिः सूनो सहसो यजासि । एवानो अद्य समना समानानुशन्नग्न उशतो यक्षि विद्वान् ॥ ६.४,१.**

हे होत्या, बलपुत्र अग्ने, ज्या रीतीनें मनूच्या यज्ञांत यज्ञांनीं ( हविर्द्रव्यांनीं ) देवांचें यजन करतोस त्याचप्रमाणें आज या यज्ञांत यजनकर्ता असा तूं आपल्या बरोबरीच्या व यज्ञकाम अशा यजनीय देवांचें सत्वर यजन कर. (यजनार्थी.)

**त्वं होता मन्द्रतमो नो अध्रुगन्तर्देवो विदथा मर्त्येषु । पावक या जुह्वा ३ वह्निरासाग्ने यजस्व तन्वन्तव स्वाम् ॥ ६.११,२.**

हे अग्ने, तूं मनुष्यामध्यें चालू असलेल्या यज्ञांत 'होता' होतोस. अत्यंत स्तुत्य असा तूं आमच्याशीं द्रोह न करतां दानादिगुणांनीं मित्र होतोस. हे अग्ने, पावक व देवांचें जणों मुखच अशा तुझ्या ज्वालारूपी जुहूनें हविर्वहन करणारा होत्साता तूं आपल्या स्वतःच्या तनूचेंच यजन कर. ( यजनार्थी हवनार्थ. )

**इमं नो अग्ने अध्वरं होतर्वयुनशो यज । चिकित्वान्दैव्यं जनम् ॥ ६.५२,१२.**

हे होत्या, ( होमनिष्पादक ) अग्ने, देवसमुदायाचें यजन कसें करावें हें उत्कृष्ट जाणणारा तूं आमचा हा यज्ञ आनुपूर्वीनें म्हणजे पूर्वानुक्रमाला धरून तूं यजन कर. (हवनार्थी.)

**असादि वृतो वह्निराजगन्वानग्निर्ब्रह्मा नृषदने विधर्ता ॥ द्यौश्चयं पृथिवी वावृधाते आयं होता यजसि विश्ववारं ॥ ७.७,५.**

वरण केलेला, हविर्द्रव्यें वाहून नेणारा, सर्वव्यापी ( ब्रह्मा ) व विश्वाधार असा अग्नि द्युलोकांतून येऊन नराच्या स्थानीं ( होत्याच्या स्थानीं ) बसला. द्यावापृथिवी ज्याला वाढवितात त्या विश्ववरणीय अग्नीला मानुष होता यजनानें संतुष्ट करतो. ( यजनार्थी )

**महां अस्यध्वरस्य प्रकेतो न ऋते त्वदमृता मादयन्ते ॥ आविश्वेभिः सरथं याहि देवैर्न्यग्ने होता प्रथमः सदेह ॥ ७.११,१.**

हे अग्ने, तूं यज्ञाचा प्रज्ञापक होत्साता मोठा आहेस. तुझ्या-वांचून अमर असे देव सोम पिऊन धुंद होत नाहींत. सर्व देवांच्यासह रथांत बसून ये आणि या अंथरलेल्या वर्हीवर प्रथम होता होऊन बैस. ( अनिश्चितार्थ )

**त्वमग्ने गृहपतिस्त्वं होता नो अध्वरे । त्वं पोता विश्ववार प्रचेता यक्षि वेषि च वार्यम् ॥ ७.१६,५.**

हे विश्ववरणीय अग्ने, तूं आमच्या यज्ञामधील गृहपति आहेस. त्याचप्रमाणें 'होता' तूं असून पोताहि तूंच आहेस. यास्तव प्रकृष्टमति असा तूं वरणीय अशा हविर्द्रव्यांचें यजन व भक्षण कर. ( यजनार्थी )

**ऊर्ध्वो अग्निः सुमतिं वस्वो अश्रेध्प्रतीची जूर्णिर्देवतातिमेति । भेजाते अद्री रथ्येव पन्थामृतं होता न इषितो यजाति ॥ ७.३९,१.**

ज्याच्या ज्वाला उंच जात आहेत असा अग्नि वसति करणाऱ्या मज स्तोत्रकर्त्याचें शोभन असें स्तोत्र ऐको ( सेवन करो ). सर्व प्रजेमध्यें वृद्ध व अभिमुख अशी उपादेवता यज्ञाला जाते. श्रद्धावान् असे यजमान व पत्नी यज्ञमार्गाचें सेवन रथांत बसून जाणाऱ्या एखाद्या वीराप्रमाणें करतात त्याचप्रमाणें प्रेष दिलेला असा आमचा होता यज्ञाचें यजन करो. ( यजनार्थ )

**परि त्रिधातुरध्वरं जूर्णिरेति नवीयसी । मध्वा होतारो अंजते ॥ ८.६१,९.**

वेगवान् व तीन निरनिराळ्या रंगांनीं तळपणारा अग्नि प्रतिक्षणीं नव्या नव्या ज्वालेनें यज्ञाच्या समीप जातो तेव्हां होते ( ऋत्विज ) त्याला तुपानें अंजन करतात.

( आह्वानव्यतिरिक्तकर्म ).

**तमर्केभिस्तं सामभिस्तं गायत्रैश्चर्षणयः । इन्द्रं वर्धंति क्षितयः ८.१७,९.**

सर्व मानवी प्रजा त्या इन्द्राला अर्कांनीं, सामांनीं, व गायत्रानीं वाढवितात. ( अर्क म्हणजे अर्चन काय ? अनिश्चित )

**यो हव्यान्यैरयता मनुर्हितो देव आसा सुगंधिना । विवासते वार्याणि स्वध्वरो होता देवो अमर्त्यः ८.१९,२४.**

मनूनें ( प्रजापतीनें ) स्थापित केलेला प्रकाशक देव जो अग्नि तो आपल्या सुगंधयुक्त मुखानें आम्ही अर्पिलेलीं हविर्द्रव्यें देवांच्याकडे पोंचवितो. शोभनयज्ञ व प्रकाशमान असा हा अमर होता परिचर्या करणाऱ्या यजमानाला पुष्कळ द्रव्यें देतो. ( अनिश्चित ).

**अग्निं वः पूर्व्यं हुवे होतारं चर्षणीनाम् । तमया वाचा गृणे तमु वस्तुषे ॥ ८.२३,७.**

मनुष्यांचा होमनिष्पादक ( होता ) अशा पुरातन अग्नीला तुमचा यजनकर्ता या नात्यानें मी बोलावतों आणि त्या त्या अग्नीला या स्तुतिरूप वाणीनें तुमच्यासाठीं मी स्तवितों.

( यजनार्थ )

**अच्छा नो अंगिरस्तमं यज्ञासो यन्तु संयतः । होता यो अस्ति विक्ष्वा यशस्तमः ॥ ८.२३,१०.**

नियत असे आमचे यज्ञ अंगिरसांमध्यें श्रेष्ठ अशा अग्नीच्या संमुख जावोत. जो अग्नि मनुष्यामध्यें 'होता' होऊन सर्वतोपरी यशस्वी होतो त्या अग्नीच्या संमुख जावोत. (अनिश्चित ).

**सप्त होतारस्तमिदीळते त्वाग्ने सुत्यजमह्रयम् । भिनत्स्यद्रिं तपसा विशोचिषा प्राग्ने तिष्ठ जनाँ अति ॥ ८.४९,१६.**

अभिमत फल देणाऱ्या व प्रवृद्ध अशा त्या तुज अग्नीला सात होते आपल्या स्तवनानें संतुष्ट करतात. कां कीं, तूं आपल्या ठिकाणच्या संतप्ततेनें मेघाला वितळवितोस. हे अग्ने, सर्व लोकांनां ओलांडून पलीकडे ( असणाऱ्या देवलोकांत ) जाऊन उभा रहा. ( स्तुत्यर्थ )

**नितिग्ममभ्यं१शुं सीदद्धोता मनावधि । जुषाणो अस्य सख्यम् ॥ ८.६१,२.**

यजमानाशीं अग्नीचें सख्य जुळावें अशी इच्छा करणाऱ्या होत्यानें त्या तीक्ष्णज्वाल अशा अग्नीला खालीं बसविला.

( अनिश्चित )

**समीचीनास आसते होतारः सप्त जामयः । पदमेकस्य पिप्रतः ॥ ९.१०,७.**

एकमेकाला निकट आप्त मानणारे एकाचेंच ठिकाण भरून काढण्यासाठीं असे सात होतृसंज्ञक ऋत्विज बसलेले असतात. ( अनिश्चित. )

**इष्यन्वाचमुपवक्तेव होतुः पुनान इन्द्रोविष्यामनीषाम्। इन्द्रस्य यत्क्षयथः सौभगाय सुवीर्यस्य पतयः स्याम ॥ ९.९५,५.**

स्तुति करणाऱ्या होत्याला उपवक्ता ( अध्वर्यु ? ) प्रोत्साहन देतो त्याप्रमाणें प्रोत्साहन देऊन तूं बुद्धीला मुक्त कर. कां कीं, इन्द्रासह तूं यज्ञामध्यें जेव्हां निवास करतोस तेव्हां आम्ही स्तोते भाग्यशाली होऊन वीर्य आणि धन यांचे स्वामी होऊं.

( स्तवनार्थी होता, उपवक्ता कोण ? )

**अच्छानृचक्षा असरत्पवित्रे नामदधानः कविरस्य योनौ । सीदन्होतेव सदने चमूषूपेमग्मन्नृषयः सप्तविप्राः ॥ ९.९२,२**

नरांमध्यें द्रष्टा व कवि ( असा सोम ) उदक धारण करून आपल्या योनी ( दशापवित्रा )चे ठिकाणीं जातो, नंतर यज्ञामध्यें ( यज्ञगृहामध्यें ) देवांची स्तुति करण्याकरितां जसा

होता वसतो तसा वसतो आणि मग तो चमसांमध्यें प्रविष्ट होतो. नंतर सात ऋषी विप्र त्याच्याजवळ जातात. (सप्तहोते, स्तवनार्थी.)

**समिद्धो अग्निर्निहितः पृथिव्यां प्रत्यङ् विश्वानि भुवनान्यस्थात् । होता पावकः प्रदिवः सुमेधा देवो देवान् यजत्वग्निरर्हन् ॥ २.३,१.**

पृथ्वीवर स्थापित केलेला व उत्तम रीतीनें प्रज्वलित झालेला हा अग्नि सर्व भूतांच्या सन्मुख उभा आहे. पवित्र, पुरातन, बुद्धिमान् व देदीप्यमान असा हा अग्निरूप होता यज्ञयोग्य अशा देवांचें यजन करो. (यजनार्थ.)

**होताऽजनिष्ट चेतनः पिता पितृभ्य ऊतये । प्रयक्षं जेन्यं वसु शकेम वाजिनो यमम् ॥ २.५,१.**

सचेतन होता, पितरांच्या रक्षणार्थ असलेला पिता, असा हा (अग्नि) श्रेष्ठ धन प्राप्त करून देण्याकरितां उत्पन्न झाला आहे. अन्नवान् असे आम्ही त्याला येथेंच ठेवून घेण्यास समर्थ होऊं. (अनिश्चित.)

होता हें विशेषण अग्नीला वारंवार लावीत असत. याचें कारण असें दिसतें कीं, अग्नीचें मनुष्यविषयक देवसमूहामध्यें जें कार्य तेंच होत्याचेंहि होय. या वृत्तीमुळें अग्नीला होता जेथें म्हटलें आहे अशा ऋचा जागोजाग आढळतात. शाकलसंहितेंतील पहिल्याच ऋचेंत अग्नीला पुरोहित आणि होता असें म्हटलें आहे. या प्रकारच्या ऋचा पुरोहितास होता म्हणत असतील कीं काय असा संशय उत्पन्न करितात. अग्नि, तूं देवांनां बोलावून आण; कां कीं, तूं आमचा होता आहेस, आणि तूं देवांचें यजन कर, इत्यादि प्रार्थना अग्नीला केल्या आहेत. अग्नीचें आह्वानकार्य तेंच होत्याचेंहि होय, अग्नीचें हवनकार्य तेंच होत्याचेंहि होय, अग्नीचें यजनकार्य तेंहि होत्याचेंच होय. होता ज्ञानसंपन्न आहे, तो होमनिष्पादक आहे, तो हविर्द्रव्यें देखील समर्पण करितो, तो स्तवन करितो, तो यजनकुशल आहे. सप्तहोते व सप्तजुह्वा असा उल्लेख वारंवार आलेला आहे म्हणजे होत्याच्या हातीं पळ्या दिलेल्या आहेत इत्यादि प्रकारचे अनेक उल्लेख पाहून अशी कल्पना होते कीं, होता हा केवळ आह्वान करणारा असें त्याचें स्वरूप नसून मुख्य पुरोहित किंवा केवळ पुरोहित असेंच त्याचें स्वरूप असावें. अध्वर्यु हवन करीत असतां व होता हवन करीत नसतां होता हें पद अध्वर्यूला कां लागत नाहीं अशी शंका प्राचीनांनां देखील आली होती आणि हु याचा अर्थ आह्वान असा ब्रह्मवाद करून वेळ मारून नेलेली आहे; ही गोष्ट होत्याचें कार्य बदलल्याचें प्राचीनांनांच दिसलें होतें असें दाखविते. सप्तहोते म्हणून जे उल्लेख आपणांस दिसतात त्या सप्तहोत्यांमध्यें आज निरनिराळ्या नांवांनीं ओळखल्या जाणाऱ्या ऋत्विजांचा समावेश होत असावा आणि त्याच्याहि पूर्वकालीं जर होता आणि अध्वर्यु हे निराळे संप्रदाय असतील तर ते संप्रदाय एकीकृत होऊन मोठे यज्ञ तयार झाले असावेत आणि कांहीं काळपर्यंत यज्ञ हा सामुच्चयिक परंतु कर्मवैशिष्ट्य स्थापन झाल्याशिवाय असावा असें दिसतें.

**अध्वर्यु.**—आतां आपण यज्ञामध्यें विशेष प्रमुख व मुख्य कार्यकर्ता असा जो अध्वर्यु त्या अध्वर्यूच्या क्रियांकडे वळूं. त्याचें ऋक्संहितेंत आढळणारें स्वरूप पुढील उल्लेखांवरून स्पष्ट होईल.

**अध्वर्यवो भरतेंद्राय सोममामत्रेभिः सिंचता मद्यमन्धः । कामी हि वीरः सदमस्य पीतिं जुहोत वृष्णे तदिदेष वष्टि ॥ २.१४,१.**

हे अध्वर्यू हो, इन्द्राकरितां सोमरस भरून न्या. मदकर असा सोमरस चमसपात्रांनीं (अग्नीमध्यें) सिंचन करा. तो वीर इन्द्र या सोमपानाची सदैव इच्छा करणारा असल्यामुळें त्या वृष्टिकर्त्या इन्द्रासाठीं सोमरसाचें हवन करा.

**अध्वर्यवो यो अपो वव्रिवांसं वृत्रं जघानाशन्येव वृक्षम् । तस्मा एतं भरत तद्वशायँ एष इन्द्रो अर्हति पीतिमस्य ॥ २.१४,२.**

हे अध्वर्यू हो, जो इन्द्र उदकांनां आवरून धरणाऱ्या वृत्राला, वीज वृक्षाला मारते त्याप्रमाणें मारता झाला त्या सोमपानेच्छु इन्द्राकरितां हा सोम भरून घ्या व (उत्तरवेदीकडे) घेऊन जा. हा इन्द्र या सोमपानाला योग्य आहे.

**अध्वर्यवो यो दृभीकं जघान यो गा उदाजदप हि वलं वः । तस्मा एतमंतरिक्षे न वातमिन्द्रं सोमैरोर्णुत जूर्न वस्त्रैः ॥ २.१४,३.**

हे अध्वर्यू हो, ज्या इन्द्रानें दृभीक नामक असुराला मारिलें व ज्यानें वलासुरानें अडवून ठेवलेल्या गाई खुल्या केल्या व वलाला मारिलें त्या इन्द्राला आकाशांत वारा व्यापून राहतो त्याप्रमाणें सोमधारांनीं व्याप्त करा. वस्त्रांनीं जसें अंग झांकून टाकतात त्याप्रमाणें सोमरसानें इन्द्राला आच्छादित करून टाका.

**अध्वर्यवो य उरणं जघान नव चख्वांसं नवतिं च बाहून् । यो अर्बुदमव नीचा बबाधे तमिन्द्रं सोमस्य भृथे हिनोत ॥ २.१४,४.**

हे अध्वर्यू हो, जो इन्द्र नव्याण्णव बाहू असणाऱ्या उरण नामक असुराला मारता झाला व ज्यानें अर्बुदाला पालथा पाडून तुडविला त्या इन्द्राला सोमपात्र भरल्यानंतर स्तुतीनें संतुष्ट करा.

**अध्वर्यवो यः स्वश्नं जघान यः शुष्णमशुषं यो व्यंसम् । यः पिप्रुं नमुचिं यो रुधिक्रां तस्मा इन्द्रायान्धसो जुहोत ॥ २.१४,५.**

हे अध्वर्यू हो, जो इन्द्र सर्वभक्षक अशा अश्वाला मारता झाला व ज्या इन्द्रानें शुष्ण नामक असुराला भुजदंड छाटून मारलें आणि ज्यानें सर्वव्यापी पिप्रु नामक असुराला व नमुचि नामक असुराला मारिलें त्या इन्द्राकरितां हविरन्नांचें हवन करा.

अध्वर्यवो यः शतं शम्बरस्य पुरो बिभेदाश्मनेव पूर्वीः। यो वर्चिनः शतमिन्द्रः सहस्रमपावपद्भरता सोममस्मै ॥ २.१४,६.

हे अध्वर्यू हो, ज्यानें शंबरासुराचीं जुनाट शंभर नगरें खड्याप्रमाणें जमीनदोस्त केलीं; व ज्यानें वर्चि नामक असुराचे हजार पुत्र भूमीवर हाणून पाडले त्या इन्द्राकरितां सोमरस भरून तयार करा.

अध्वर्यवो यः शतमासहस्रं भूम्या उपस्थेऽवपज्जघन्वान्। कुत्सस्यायोरतिथिग्वस्य वीरान्न्यावृणग्भरता सोममस्मै ॥ २,१४,७.

हे अध्वर्यू हो, ज्या इन्द्रानें प्रथम शत्रूंना मारिलें, नंतर ज्या इन्द्रानें हजार असुरांना भूमीवर हाणून पाडलें. शिवाय ज्या इन्द्रानें कुत्सनामक राजर्षि, आयुनामक राजर्षि व अतिथिग्व यांच्याशीं शत्रुत्व करणाऱ्या शुष्णादि असुरांचा वध केला त्या इन्द्राकरितां सोमरस भरून घ्या.

अध्वर्यवो यन्नरः कामयाध्वे श्रुष्टी वहन्तो नशथा तदिन्द्रे। गभस्तिपूतं भरत श्रुतायेन्द्राय सोमं यज्यवो जुहोत ॥ २.१४,८.

हे यज्ञनेते अध्वर्यू हो, अभीष्टसिद्धीची इच्छा करणारे तुम्ही इन्द्राच्या ठिकाणीं सोमरस पोहोंचवून अभिलषित फल प्राप्त करून घ्या. लोकप्रसिद्ध इन्द्राकरितां शुद्ध केलेला सोमरस भरून न्या. हे याग करणारे अध्वर्यू हो, नेलेला सोमरस अग्नीमध्यें हवन करा.

अध्वर्यवः कर्तना श्रुष्टिमस्मै वने निपूतं वन उन्नयध्वम्। जुषाणो हस्त्यमभि वावशे व इन्द्राय सोमं मदिरं जुहोत ॥ २.१४,९.

हे अध्वर्यू हो, या इन्द्राला सुखकर होईल असा सोमरस तयार करा. पाण्यांत कालवून व गाळून शुद्ध केलेला सोमरस चमसांत भरा. तो इन्द्र तुमच्या हातच्या सोमरसाची इच्छा करतो. यासाठीं मादक अशा सोमरसाचें इन्द्राकरितां हवन करा.

अध्वर्यवः पयसोधर्यथा गोः सोमेभिरीं पृणता भोजमिन्द्रम्। वेदाहमस्य निभृतं म एतद्दित्सन्तं भूयो यजतश्चिकेत ॥ २.१४,१०.

हे अध्वर्यू हो, गाईची कास जशी दुधानें भरलेली असते त्याप्रमाणें फलदाता व रक्षणकर्ता जो इन्द्र त्याला सोमरसांनीं परिपूर्ण करा. माझ्या सोमरसाच्या अंगीं असलेला सुखसाधन स्वभाव माझा मीच जाणतों हा मी आतांच तुम्हाला सांगत आहें, यजनीय असा इन्द्र सोमदात्या यजमानाला अतिशय ओळखतो.

अध्वर्यवो यो दिव्यस्य वस्वो यः पार्थिवस्य क्षम्यस्य राजा। तमूर्दरं न पृणता यवेनेन्द्रं सोमेभिस्तदपो वो अस्तु ॥ २.१४,११.

हे अध्वर्यू हो, जो इन्द्र पूज्य अशा द्युलोकाचा व पृथ्वी आणि अंतरिक्ष यांतील धनाचा राजा होतो, ज्याप्रमाणें एखादें कोठार धान्यानें भरलेलें असतें त्याप्रमाणें इन्द्राचें उदर सोमरसानें भरून काढा, हें काम तुमच्याच हातून होवो.

मंदस्व होत्रादनु जोषमन्धसोध्वर्यवः स पूर्णां वष्ट्यासिचम्। तस्मा एतं भरत तद्वशो ददिर्होत्रात्सोमं द्रविणोदः पिब ऋतुभिः ॥ २.३७,१.

हे धनदातृ देवा, देवाचें अन्न अशा या सोमरसानें होत्यानें केलेल्या यागास अनुमोदन देऊन हर्षभरित हो. हे अध्वर्यू हो, तो द्रविणोदा देव सिंचनरूपानें दिलेल्या संपूर्ण आहुतीची इच्छा करतो, यासाठीं धनप्रद अशा त्या अग्नीला हा सोम भरून पोंचता करा. तो द्रविणोदा तुम्हाला अभीष्ट फल देतो. हे द्रविणोद, होत्यानें केलेल्या यागापासून ऋतूंच्या सहवर्तमान तूं सोमरसाचें प्राशन कर.

अध्वर्यवश्चकृवांसो मधूनि प्रवायवे भरत चारु शुक्रम्। होतेव नः प्रथमः पाह्यस्य देव मध्वो ररिमा ते मदाय ॥ ५.४३,३.

हे अध्वर्यू हो, मधुर अशीं सोम, आज्य वगैरे हविर्द्रव्यें तयार करणारे तुम्ही वायूकरितां अवदान भरून घ्या. रमणीय व उत्तेजक अशा या सोमरसाला हे वायो, तूं होत्याप्रमाणें इतर देवांच्या अगोदर प्राशन कर. हे वायुदेवा, मधुर सोमरस आम्ही तुला अर्पण करतों.

सपर्यवो भरमाणा अभिज्ञु प्रवृंजते नमसा बर्हिरग्नौ। आजुह्वाना घृतपृष्ठं पृषद्वदध्वर्यवो हविषा मर्जयध्वम् ॥ ७.२,४.

गुडघे टेंकून परिचर्या करणारे हविर्द्रव्यासह दर्भ अग्नीमध्यें प्रक्षिप्त करीत असतात. हे अध्वर्यू हो, हविर्द्रव्य अर्पण करून घृतपृष्ठ अशा अग्नीची परिचर्या करा.

अध्वर्यवोरुणं दुग्धमंशुं जुहोतन वृषभाय क्षितीनाम्। गौरा द्वेदीयाँ अवपानमिन्द्रो विश्वाहेद्याति सुतसोममिच्छन् ॥ ७.९८,१.

हे अध्वर्यू हो, जनतेमध्यें श्रेष्ठ अशा इन्द्रासाठीं घुसळून तयार केलेल्या व अरुणवर्ण अशा सोमरसाचें हवन करा.

दूर असलेल्या पिण्यायोग्य सोमरसाला गौरमृगाहूनहि अधिक चाहणारा इन्द्र यजमानासाठीं सोमरसाची इच्छा करून सर्वदा यज्ञस्थलीं जात असतो. याकरितां इन्द्रासाठीं सोमरसानें यजन करा.

**अध्वर्यवो हविष्मंतो हि भूताच्छाप इतोशतीरुशन्तः। अवयाश्चष्टे अरुणः सुपर्णस्तमास्यध्वमूर्मिमद्या सुहस्ताः॥ १०.३०,२.**

हे अध्वर्यू हो, तुम्ही हविःसंपन्न असे व्हा. हे सोमाभिषवाची इच्छा करणाऱ्यांनों, सोमाभिषवाला उत्सुक झालेलीं हीं उदकें येथून तुम्ही आपल्याकडे घेऊन जा. अरुणाप्रमाणें तांबूस असा सोमरस अंतरालांतून खालीं पडत असतांना मेघस्थ उदकांनां पाहतो. हे कमनीयहस्त अध्वर्यू हो, अरुणवर्ण अशा सोमरसाचा लोट त्या उदकासह खालीं ( दशापवित्रावर ) लोटा.

**अध्वर्यवोपइता समुद्रमपांनपातं हविषा यजध्वम्। स वोददूर्मिमद्या सुपूतं तस्मै सोमं मधुमन्तं सुनोत॥ १०.३०, ३.**

हे अध्वर्यू हो, उदकें आणण्यासाठीं तुम्ही जलाशयावर जा, तो अपांनपात् तुम्हांला शुद्ध असा जलसमूह देवो. तुम्हीसुद्धां त्या अपांनपात्‌देवानें दिलेल्या उदकानें सिंचन करून मधुर असा सोम कुट्टन तयार करा, व त्या सोमानें अपांनपात्‌चें यजन करा.

**याभिः सोमो मोदते हर्षते च कल्याणीभिर्युवतिभिर्न मर्यः। ता अध्वर्यो अच्छा परेहि यदासिंचा ओषधीभि पुनीतात्॥ १०.३०,५.**

कुट्टन तयार केलेला सोम ज्या उदकांच्या सहवासानें तरुणींच्यासह तरुण हर्षित होतो त्याप्रमाणें हर्षित होतो त्या उदकांनां आणण्यासाठीं तूं जलाशयावर जा. ज्यावेळीं त्या उदकानें सोमवल्ली भिजवून काढशील त्या वेळीं सोम व उदकें हीं बरोबरच गाळण्यावर ओत.

**एवेद्यूने युवतयो नमन्त यदीमुशन्नुशतीरेत्यच्छ। संजानते मनसा संचिकित्रेध्वर्यवो धिषणापश्च देवीः॥ १०.३०,६.**

सोमाभिषवाकरितां उत्सुक झालेला अध्वर्यु सोमाभिषवार्थ उत्सुक झालेल्या उदकांनां आणण्यासाठीं ज्या वेळेस जातो त्या वेळेस तरुण स्त्रिया ज्याप्रमाणें तरुणापुढें नमतात त्याप्रमाणें तीं उदकें अध्वर्यूपुढें नमतात. अध्वर्यू हे त्या उदकांची स्तुति, लक्षण, वाणी व तीं उदकें यांनां विशिष्ट बुद्धीनें उत्कृष्ट जाणतात व स्वतःचा अधिकार व परस्परोपकार यांनां डोळ्यांनीं पाहतात.

**यं सोममिन्द्र पृथिवीद्यावा गर्भं न माता बिभृतस्त्वाया। तं ते हिन्वन्ति तमु ते मृजन्त्यध्वर्यवो वृषभ पातवा उ॥ ३.४६,५.**

हे इन्द्रा, हे द्यावापृथ्वी हो! माता ज्याप्रमाणें गर्भाला धारण करते त्याप्रमाणें तुझ्यासाठीं आम्ही हा सोम धारण केला आहे. हे श्रेष्ठ इन्द्रा, अध्वर्यू हे तुझ्याकरतांच त्या सोमरसाला भरून पाठवितात, व तुला पिण्यासाठीं सोमरस गाळतात.

**यजामहे वां महः सजोषा हव्येभिर्मित्रावरुणा नमोभिः। घृतैर्घृतस्नू अध यद्वामस्मे अध्वर्यवो न धीतिभिर्भरन्ति॥ १.१५३,१.**

हे मित्रावरुण हो, आम्ही सर्व मिळून हविर्द्रव्यांच्या योगानें व स्तोत्रांच्या योगानें तुमचें पुष्कळसें यजन करतों. हे उदकवृष्टि करणारे मित्रावरुण हो, आमचे अध्वर्यूहि घृताहुतियुक्त अशा यजनकर्मांनीं तुम्हांला तृप्त करीत आहेत.

**आ यं जना अभिचक्षे जगामेन्द्रः सखायं सुतसोममिच्छन्। वदन्ग्रावाववेदिं भ्रियाते यस्य जीरमध्वर्यवश्चरन्ति॥ ५.३१,१२.**

अहो लोक हो, हा पहा, स्तोत्र करणाऱ्याला व सोमाचा अभिषव करणाऱ्याला भेटण्याची इच्छा करणारा इन्द्र तुमच्या भेटीस आला आहे. हे अध्वर्यू हो, तुम्ही जो वरवंटा ( घाव घालतांना ) आदळतां तो सोम कुटण्याचा वरवंटा फट् फट् असा शब्द करीत आपल्या आघातानें वेदीला खालीं दडपतो.

**प्रसोता जीरो अध्वरेष्वस्थात्सोममिन्द्राय वायवे पिबध्यै। प्रयद्वां मध्वो अग्रियं भरन्त्यध्वर्यवो देवयन्तः शचीभिः ७.९२,२.**

हे इन्द्रवायू हो, ज्या यज्ञामध्यें सोमरसाचा प्रथम भाग देवाची इच्छा करणारे अध्वर्यू अभिषवादिकर्मांच्या योगानें तुमच्यासाठीं भरून तयार करतात, त्या यज्ञांत अभिषवरूप कार्य झटपट करणारा ( अध्वर्यु ) इन्द्राला व वायूला पिण्याकरतां सोमरस पुढें पाठविता झाला.

**ब्राह्मणासः सोमिनो वाचमक्रत ब्रह्म कृण्वन्तः परिवत्सरीणम्। अध्वर्यवो घर्मिणः सिष्विदाना आविर्भवन्ति गुह्या न केचित्॥ ७.१०३,८.**

सोमयुक्त व स्तोत्रात्मक असें सांवत्सरिक कर्म करणारे ब्राह्मण जसा शब्द करतात तसा हे बेडूक शब्द करतात. घामानें डबडबलेल्या अंगाचे व घर्मानुष्ठान करणारे अध्वर्यू जसे सध्यां गुप्त झाले आहेत त्याचप्रमाणें उन्हाळ्यांत बेडूकहि कोठें दृष्टीस पडत नाहींत. परंतु पावसाळ्यांत ते पुन्हां दिसूं लागतात.

आजागृविर्विप्र ऋतामतीनां सोमः पुनानो असदच्चमूषु। सपन्ति यं मिथुनासो निकामा अध्वर्यवो रथिरासः सुहस्ताः ॥ ९.९७,३७.

जागरणशील व स्तुतींनां जाणणारा तो सोम शुद्ध होत असतांना चमसामध्यें गळत असतो. एकमेकाशीं जुटीनें वागणारे निरंतर कार्येच्छु, यज्ञनेते व उत्कृष्ट हातांचे अध्वर्यू ज्या सोमाला दशापवित्रावर ओततात तो सोमरस वरून चमसांत पडतो.

रथेष्ठायाध्वर्यवः सोममिन्द्राय सोतन । अधि ब्रध्नस्याद्रयो विचक्षते सुन्वतो दाश्वध्वरम् ॥ ८.४,१३.

हे अध्वर्यू हो, रथांत बसून येणाऱ्या इन्द्राकरितां सोम कुटून तयार करा. सोमाच्या अभिषवाकरितां पसरलेल्या कातड्यावर ठेवलेल्या पाट्यावर मांडून ठेवलेले वत्ते (वरवंटे) हविर्दान करणाऱ्या यजमानाचा याग जेणेंकरून संपादला जाईल त्या रीतीनें सोमवल्ली कुटीत असतांना विशेष प्रकाशित होतात.

त्वमध्वर्युरुत होतासि पूर्व्यः प्रशास्ता पोता जनुषा पुरोहितः । विश्वा विद्वाँ आर्त्विज्या धीर पुष्यस्यग्ने सख्ये मारिषामा वयं तव ॥ १.९४,६.

हे अग्ने, अध्वर्यु तूंच आहेस व पुरातन असा होताहि तूंच आहेस. प्रशास्ता, पोता व जन्मसिद्ध असा पुरोहितहि तूंच आहेस. हे सर्वज्ञ अग्ने, तूं ऋत्विजांचीं सर्व कर्मे जाणतोस व फलद्रूप करतोस. हे अग्ने, तुझ्या मैत्रीमध्यें आमचा नाश न होई असें कर.

होताध्वर्युरावया अग्निमिंधो ग्रावग्राभ उत शंस्ता सुविप्रः । तेन यज्ञेन स्वरंकृतेन स्विष्टेन वक्षणा आपृणध्वम् ॥ १.१६२,५.

होता, अध्वर्यु, अग्निमिंध, गावग्राभ व सुविप्र शंस्ता असे सर्वजण हो, उत्तमप्रकारें संपादिलेल्या यज्ञांच्या योगानें नद्या वहावयास लावा.

यदी मातुरुपस्वसा घृतं भरन्त्यस्थित । तासामध्वर्युरागतौ यवो वृष्टीव मोदते ॥ २.५,६.

(वेदिरूप) मातेच्या तिघी बहिणी (जुहू, उपभृत् व ध्रुवा) घृतरूपी हविर्द्रव्यें भरून घेऊन जेव्हां त्याच्याजवळ येतात तेव्हां तो अध्वर्यु धान्यबीज ज्याप्रमाणें वृष्टीची प्राप्ति होतांच हर्षित होतें त्याप्रमाणें हर्षित होतो.

मित्रो अग्निर्भवति यत्समिद्धो मित्रो होता वरुणो जातवेदाः । मित्रो अध्वर्युरिषिरो दमूना मित्रः सिन्धूनामुत पर्वतानाम् ॥ ३.५,४.

अग्नि प्रदीप्त झाला असतां तो मित्र, होता, वरुण व जातवेद म्हणजे उपजतज्ञानी होतो. मित्र झालेला तो अग्नि अध्वर्यु, गमनशील (वायू) व गृहसुखकारी होतो. शिवाय तो मित्र झालेला अग्नि समुद्रांचा व पर्वतांचाहि मित्र होतो.

स्तीर्णे बर्हिषि समिधाने अग्ना ऊर्ध्वो अध्वर्युर्जुजुषाणो अस्थात् । पर्यग्निः पशुपा न होता त्रिविष्ट्येति प्रदिव उराणः ॥ ४.६,४.

बर्हि अंथरल्यावर, अग्नि प्रज्वलित केल्यानंतर, प्रियतम असा अध्वर्यु उठून उभा राहतो. पुरातन व देवपूजक असा तो (अग्निरूप) होता तीन वेळ प्रदक्षिणा करतो.

समिद्धाग्निर्वनवत्स्तीर्णबर्हिर्युक्तग्रावा सुतसोमो जराते। ग्रावाणो यस्येषिरं वदन्त्ययदध्वर्युर्हविषाव सिन्धुम् ॥ ५.३७,२.

ज्यानें अग्नि प्रदीप्त केला, व ज्यानें बर्हि आंथरले तो प्रार्थना करतो. सोम कुटावयाचे वत्ते जुळवून सोम कुटल्यावर तो स्तवन करतो. ज्या अध्वर्यूचे ते वत्तेसुद्धां देवांनां उद्देशून जणों काय या, या, असे शब्द उच्चारित आहेत असा तो अध्वर्यु हविर्द्रव्यासह नदीतीरावर (यजनासाठीं व अवभृथस्नानासाठीं) जातो.

या ते काकुत्सुकृता या वरिष्ठा यया शश्वत्पिबसि मध्व ऊर्मिम् । तया पाहि प्रते अध्वर्युरस्थात्सन्ते वज्रो वर्ततामिन्द्र गव्युः ॥ ६.४१,२.

हे इन्द्रा, ब्रह्मदेवानें सुंदर घडविलेली व विस्तीर्ण अशी जी तुझी जीभ व ज्या जिभेनें तूं नेहमीं सोमरसाचे घोट घेत असतोस त्या जिव्हेनें आमचें रक्षण कर. आमचा अध्वर्यु तुझ्यासाठीं सोमरस भरून घेऊन जात आहे. हे इन्द्रा, शत्रूंच्या गाई आम्हाला मिळवून देण्यासाठीं तुझें वज्र शत्रूंच्यावर तुटून पडो—त्यांचा नायनाट करो.

हविष्कृणुध्वमागमदध्वर्युर्वनते पुनः । विद्वाँ अस्य प्रशासनं ॥ ८.६१,१.

हे हविर्द्रव्यें तयार करणारे (लोक) हो, तुम्ही हविर्द्रव्यें तयार करा. अग्नि आतां येईल. अध्वर्यु त्याची सेवा करतो. कां कीं, तोच त्या अग्नीच्या यजनाच्या पद्धतीला जाणतो.

वेत्यध्वर्युः पथिभी रजिष्ठैः प्रति हव्यानि वीतये । अधा नियुत्व उभयस्य नः पिब शुचिं सोमं गवाशिरम् ॥ ८.९०,१०.

हे नियुत्संज्ञक वायो, अध्वर्यु सरळ मार्गांनीं हविर्द्रव्यें तुला भक्षणासाठीं घेऊन जातो. हे वायो, तूं नुसता व दुग्धमिश्र असा दोन प्रकारचा सोमरस प्राशन कर.

आ नो नियुद्भिः शतिनीभिरध्वरं सहस्रिणीभिरुप याहि वीतये वायो हव्यानि वीतये । तवायं भाग ऋत्वियः सरश्मिः सूर्ये सचा । अध्वर्युभिर्भरमाणा अयंसत वायो शुक्रा अयंसत ॥ १.१३५,३.

हे वायो, तुझ्या शेंकडो, हजारों अश्वांसह तूं आमच्या यज्ञाला ये व तुला आवडत्या या हविर्द्रव्यांचें भक्षण कर. हविर्द्रव्यें तुझ्यासाठींच आहेत. हा तुझाच कालप्राप्त असा भाग आहे. सूर्य आपल्या रश्मिजालानें उदित झाल्यावरोवरच अध्वर्यूंनीं तुझ्यासाठीं सोम भरून तयार केले आहेत.

इमे वां सोमा अप्स्वा सुता इहाध्वर्युभिर्भरमाणा अयंसत वायो शुक्रा अयंसत ॥ १.१३५,६.

हे इन्द्रवायू हो, तुम्हां दोघांनां आवडणारे असे हे सोमरस येथें कुटून तयार करून अध्वर्यूंनीं अगदीं भरून तयार ठेवले आहेत.

अध्वर्युभिः पञ्चभिः सप्त विप्राः प्रियं रक्षन्ते निहितं पदं वेः । प्राञ्चो मदन्त्युक्षणो अजुर्या देवा देवानामनु हि व्रतागुः ॥ ३.७,७.

सात विप्र, पांच अध्वर्यूंच्यासह अग्निरूपी पक्ष्याला प्रिय असलेल्या स्थानाला रक्षण करतात. त्या अग्निस्थानाच्या ठिकाणीं देव प्रसन्नमुख व जरारहित होत्साते हर्षभरित होतात. देव पूर्वीच्या देवांनीं चालविलेल्या व्रताला अनुसरूनच गेले.

अध श्वेतं कलशं गोभिरक्तमापिप्यानं मघवा शुक्रमन्धः । अध्वर्युभिः प्रयतं मध्वो अग्रमिन्द्रो मदाय प्रतिधत्पिबध्यै शूरो मदाय प्रतिधत्पिबध्यै ॥ ४.२७,५.

धनवान् व शूर असा इन्द्र गोदुग्धमिश्रित व सारभूत अशा सोमानें भरलेला कलश अध्वर्यूंनीं दिला असतां त्याचा स्वीकार करो व मद येण्यासाठीं सोमरसरूप अन्नानें भरलेला पांढरा शुभ्र असा हा कलश पिण्यासाठीं उचलून घेवो.

प्रवीरया शुचयो दद्रिरेवामध्वर्युभिर्मधुमन्तः सुतासः । वह वायो नियुतो याह्यच्छा पिबा सुतस्यान्धसो मदाय ॥ ७.९०,१.

हे वायो, तुला प्रेरणा करणाराला शुद्ध व मधुर असे सोम कुटून तयार करून अध्वर्यू देत असतात. यासाठीं हे वायो, घोड्यांच्यासह रथ येथें आण, त्या रथांत बसून ये. आमच्या यज्ञास येऊन कैफ येण्यासाठीं कुटून तयार केलेल्या सोमरूप अन्नाचा स्वकीय भाग तूं पिऊन टाक.

अभि प्रिया दिवस्पदमध्वर्युभिर्गुहा हितम् । सूरः पश्यति चक्षसा ॥ ९.१०,९.

सुवीर्यसंपन्न असा इन्द्र अध्वर्यूंनीं आपल्या हृदयांत ज्या ठिकाणीं सोमरस ओतला आहे तें ठिकाण आपल्या डोळ्यांनीं सर्व बाजूनें पाहतो.

प्रति यदापो अदृश्रमायतीर्घृतं पयांसि बिभ्रतीर्मधूनि । अध्वर्युभिर्मनसा संविदाना इन्द्राय सोमं सुषुतं भरन्तीः ॥ १०.३०,१३.

हे उदक देवतांनों, माझ्या यज्ञाला येणाऱ्या तुम्हाला मी पाहिल्या. घृत व उदकांनां मिश्र करून होमकालीं धारण करणाऱ्या तुम्हाला मी डोळ्यांनीं पाहिल्या. त्याचप्रमाणें अध्वर्यूशीं मनांतल्यामनांत बोलत असतांनां व कुटून तयार केलेला सोम इन्द्राकरितां भरून घेतांना मी तुम्हांला आपल्या डोळ्यांनीं पाहिल्या.

वृष्णः कोशः पवते मध्व ऊर्मिर्वृषभान्नाय वृषभाय पातवे । वृषणाध्वर्यू वृषभासो अद्रयो वृषणं सोमं वृषभाय सुष्वति ॥ २.१६,५.

हे इन्द्रा, फलवृष्टिकर्ता व मदकर अशा सोमाचा रस प्रेरक होत्साता वहात असतो. सेचनसमर्थ असे अध्वर्यू हो, शब्द करणारे सोमाभिषवपाषाण देवांनां श्रेष्ठभूत अशा सोमरसाला कुटून तयार करितात.

अस्मा अस्मा इदन्धसोध्वर्यो प्रभरासुतम् । कुवित्समस्य जेन्यस्य शर्धतोभिशस्तेरवस्परत् ॥ ६.४२,४.

हे अध्वर्यो, आमच्या, आमच्याच इन्द्राला तूं सोमरूप अन्नाचा रस भरून दे. तो इन्द्र जिंकावयास योग्य अशा शत्रूंच्या तापापासून आमचें संरक्षण करो.

अध्वर्यो वीर प्रमहे सुतानामिन्द्राय भर स ह्यस्य राजा । यः पूर्व्याभिरुत नूतनाभिर्गीर्भिर्वावृधे गृणतामृषीणाम् ॥ ६.४४,१३.

हे वीरा, हविःप्रेरक अध्वर्यो, या महान् इन्द्राला कुटलेला सोमरस अर्पण कर. तो इन्द्र सोमाचा राजा आहे. जो इन्द्र जुन्या व नव्या अशा स्तोत्रात्मक वाणींनीं वाढला जातो. तो इन्द्र ज्याअर्थी सोमाचा राजा आहे त्या अर्थी त्या इन्द्राला सोमरस अर्पण कर.

अध्वर्यो द्रावया त्वं सोममिन्द्रः पिपासति । उप नूनं युयुजे वृषणा हरी आ च जगाम वृत्रहा ॥ ८.४,११.

हे अध्वर्यो, तूं सोम कुटून तयार कर. हा सोम पिण्याची इन्द्र इच्छा करीत आहे. आपले घोडे आपल्या रथाला जोडून तो वृत्रनाशक इन्द्र येथें आला आहे.

अध्वर्यवा तु हि षिंच सोमं वीराय शिप्रिणे । भरा सुतस्य पीतये ॥ ८.३२,२४.

हे अध्वर्यो, हनुमान् अशा शूर इन्द्राला पाजण्यासाठीं सोम लवकर सिंचन कर व इन्द्राला पिण्याकरतां कुटून तयार झालेला सोमरस भरून ने.

**अध्वर्यो अद्रिभिः सुतं सोमं पवित्र आसृज। पुनीहीन्द्राय पातवे ॥ ९.५१,१.**

हे अध्वर्यो, वरवंट्यांनीं, कुटलेला सोम गाळण्यासाठीं पवित्राच्या ठिकाणीं ओत व इन्द्राला पिण्यासाठीं गाळून तयार कर.

**शंसावाध्वर्यो प्रति मे गृणीहीन्द्राय वाहः कृणवाव जुष्टम्। एदं बर्हिर्यजमानस्य सीदाथा च भूदुक्थमिन्द्राय शस्तम् ॥ ३.५३,३.**

अध्वर्यो, तूं व मी दोघेहि शंसन करूं. तूं मला उत्तेजक असें कांहीं तरी म्हण. इन्द्राला आवडेल असें सुंदर स्तोत्र तुम्ही आम्ही करूंया. यजमानाच्या बर्हीवर येऊन बैस आणि मग इन्द्राकरितां स्तुतीचा प्रारंभ होवो.

**एदु मध्वो मदिंतरं सिंच वाध्वर्यो अन्धसः। एवाहि वीरः स्तवते सदावृधः ॥ ८.२४,१६.**

हे अध्वर्यो, मदकर अशा सोमरूप अन्नाचा मदकर असा रस इन्द्राकरतां गाळून तयार कर. वीर व वर्धनशील असा हा इन्द्रच स्तोत्रशस्त्रांनीं स्तविला जातो.

**इन्द्र पिब स्वधया चित्सुतस्याग्नेर्वा पाहि जिह्वया यजत्र। अध्वर्योर्वा प्रयतं शक्रहस्ताद्धोतुर्वा यज्ञं हविषो जुषस्व ॥ ३.३५,१०.**

हे इन्द्रा, बलानें कुटून तयार केलेला सोम प्राशन कर, किंवा अग्नीच्या ज्वालारूपी जिह्वेनें प्राशन कर. हे समर्था, अध्वर्यूच्या हातचा तुला दिलेला सोम पी, किंवा होत्यानें दिलेल्या यजनीय अशा हविःप्रदानाचें सेवन कर.

**यस्ते द्रप्सः स्कन्दति यस्ते अंशुर्बाहुच्युतो धिषणाया उपस्थात्। अध्वर्योर्वा परि यत्ते पवित्रा तन्ते जुहोमि मनसा वषट्कृतं स्वाहा ॥ १०.१७,१२.**

हे सोमा, तुझा जो रस ( अधिषवण चर्माबाहेर ) सांडतो किंवा तुझ्या वल्लीचा एखादा तुकडा अध्वर्यूच्या हातून गळून पडतो व ( अधिषवण फलकाच्या ) जवळपास सांडतो त्या सर्व सांडलेल्या सोमरसाला मनासहवर्तमान अग्नीमध्यें हवन करतो.

**एमा अग्मन्रेवतीर्जीवधन्या अध्वर्यवः सादयता सखायः। नि बर्हिषि धत्तन सोम्यासोपांनप्त्रा संविदानास एनाः ॥ १०.३०,१४.**

धनसंपन्न व जीवांनां प्रसन्न करणारीं हीं उदकें आमच्या यज्ञाला येत आहेत हें जाणून हे गड्यांनों, हे सोमसंपादकांनों, हे अध्वर्यू हो, अपांनपात् देवासह या मंतरल्या जाणाऱ्या उदकांनां तुम्ही ( वेदींत अंथरलेल्या ) बर्हीवर आणून ठेवा.

**आग्मन्नाप उशतीर्बर्हिरेदं न्यध्वरे असदन्देवयन्तीः। अध्वर्यवः सुनुतेन्द्राय सोममभूदुवः सुशका देवयज्या ॥ १०.३०,१५.**

वेदींत बर्हि अंथरण्याची इच्छा करणारीं अशीं उदकें आमच्या यज्ञाला आलीं आहेत व तीं आमच्या या यज्ञांत राहून देवांनां तृप्त करण्याची इच्छा करीत आहेत. यासाठीं हे अध्वर्यू हो, तुम्ही इन्द्राकरितां सोम कुटा. या उदकांच्या प्रसारानें तुमची देवांसाठीं चाललेली यज्ञक्रिया सुलभ झाली आहे असें समजा.

**अध्वर्युं वा मधुपाणिं सुहस्त्यमग्निधं वा धृतदक्षं दमूनसम्। विप्रस्य वा यत्सवनानि गच्छथोत आयातं मधुपेयमश्विना ॥ १०.४१,३.**

हे अश्विनौ हो, जरी तुम्ही दुसऱ्या एखाद्या विप्राच्या सवनांत गेलेले असाल तरि त्या यज्ञांनां सोडून आमच्या यज्ञांतील सोमात्मक पेय पिण्याकरितां हातांत सोमरस घेऊन उभा राहिलेल्या सुहस्त्य अध्वर्यूसाठीं किंवा उदार अग्नीध्राच्या प्रार्थनेला तरी ऐकून येथें या.

**दधन्वे वा यदीं मनु वोचद्ब्रह्माणि वेरु तत्। परि विश्वानि काव्या नेमिश्चक्रमिवाभवत् ॥ २.५,३.**

( अध्वर्यु ) जो हविर्द्रव्यांचा प्रक्षेप करतो अथवा ( ब्रह्मा ) ब्रह्मांचें पठण करतो या सर्व गोष्टी अग्नि जाणतोच. सर्व कर्में धावेच्या पोटीं असलेल्या चक्राप्रमाणें याच्या पोटांत असतात.

**यमु पूर्वमहुवे तमिदं हुवे सेदु हव्यो ददिर्यो नाम पत्यते। अध्वर्युभिः प्रस्थितं सोम्यं मधु पोत्रात्सोमं द्रविणोदः पिब ऋतुभिः ॥ २.३७,२.**

हे धनदात्या, ज्या तुला मी पूर्वी बोलाविलें होतें त्या तुला मी आतांहि बोलावीत आहें. धनप्रद, बोलावण्यायोग्य व अभीष्ट फल देणारा जो ( अग्नि ) देवांनीं योजिला जातो त्या धनप्रदाला अर्पण करण्यासाठीं सोमात्मक मधुर असें हविर्द्रव्य अध्वर्यूंनीं नेलें आहे. हे धनदात्या, ऋतूंच्या सहवर्तमान पोत्यापासून सोमरस पी.

वरील उताऱ्यांवरून आपणांस असें दिसतें कीं, अध्वर्यूचें मुख्य काम सोमरसाचें हवन करण्याचें होतें. अध्वर्यु हा शब्द अनेकवचनींहि अनेक ठिकाणीं आढळतो यावरून सोमहवनाचें कार्य एकाच वेळीं अनेक ऋत्विज् करीत असतील असा काल असावा अशी शंका घेण्यास जागा होते.

अध्वर्यूला स्तुति करण्याचें कार्य असल्याबद्दलहि उल्लेख आहेत. तो यज्ञक्रिया जाणतो, तोच यजनपद्धति जाणतो, तो अग्नि प्रदीप्त करतो, बर्हि अंथरतो, त्याचे ग्रावे शब्द करीत असतात, तो सोमरस पात्रामध्यें भरतो. इन्द्राकरितां, वायूकरितां, अश्विनांकरितां वगैरे तो हविर्द्रव्यें समर्पण करितो. अध्वर्यू घर्मानुष्ठान करितात, ते घृताहुतियुक्त यजनकर्मांनीं मित्रावरुणांनां संतुष्ट करतात, ते यजमानाचा याग संपादन करितात, ते कातड्यावर ठेवलेल्या पाट्यावर वरवंट्यानें सोम कुटतात, दशापवित्रावर गाळतात व चमसादि पात्रांत भरून देवांस अर्पण करितात, अनेक असुरांनां मारणाऱ्या इन्द्राला ते सोमरस अर्पण करून उत्तेजित करतात इत्यादि अनेक क्रिया प्रामुख्यानें अध्वर्यूंच्या म्हणून उल्लेखिल्या आहेत. यावरून अध्वर्यूंचा यज्ञविधि सोमरसप्रधान असून त्यांत अनेक क्रिया असत व मंत्रांबरोबर तंत्रहि बरेंच वाढलें होतें असें दिसतें.

**पोता, नेष्टा वगैरे.**—आतां ऋग्वेदसंहितेंत आढळणाऱ्या पोता, नेष्टा, प्रशास्ता, आग्नीध्र, ब्राह्मणाच्छंसी इत्यादि दुय्यम प्रतीच्या ऋत्विजांविषयींचे उल्लेख अवलोकन करून शेवटीं सर्वांवर देखरेख करणारा जो ब्रह्मा या नांवाचा मुख्य ऋत्विज त्याकडे वळूं.

**आयस्मिन्त्सप्तरश्मयस्तता यज्ञस्य नेतरि । मनुष्वद्दैव्यमष्टमं पोता विश्वं तदिन्वति ॥ २.५,२.**

ज्या यज्ञनेत्याच्या ठिकाणीं सात ( होतृरूपी ) दोरे पसरले गेले आहेत तो 'पोता' ( होऊन ) मनुष्याप्रमाणें देवसंबंधीं असलेलें आठव्या ऋत्विजाचें सर्व कर्म संपादन करतो.

**मरुतः पिबत ऋतुना पोत्राद्यज्ञं पुनीतन । यूयं हि ष्ठा सुदानवः ॥ १.१५,२.**

हे मरुत् हो, ऋतूंसहवर्तमान पोतृनामक ऋत्विजाच्या पात्रांतून सोमरस प्या व आमचा यज्ञ पुनीत करा. हे उत्कृष्ट दाते हो, तुमचें पावित्र्य प्रसिद्ध आहे यासाठीं आमचा यज्ञ पावन करा.

**अभियज्ञं गृणीहि नो ग्नावो नेष्टः पिब ऋतुना । त्वं हि रत्नधा असि ॥ १.१५,३.**

हे सपत्नीक नेष्ट्या, आमच्या यज्ञाची तारीफ कर व ऋतूंसहवर्तमान सोम पी. कारण तूं रत्नधारक आहेस हें प्रसिद्ध आहे.

**ब्राह्मणादिन्द्र राधसः पिबा सोममृतूँरनु । तवेद्धि सख्यमस्तृतम् ॥ १.१५,५.**

हे इन्द्रा, ब्राह्मणाच्या पात्रांतून तूं सोमरस पी व नंतर ऋतूंनांहि पाज, कारण तुझें ऋतूंशीं कायमचें सख्यच बनून गेलें आहे.

**द्रविणोदाः पिपीषति जुहोत प्र च तिष्ठत । नेष्ट्रादृतुभिरिष्यत १.१५,९.**

धनदाता देव ऋतूंच्या सह नेष्ट्याच्या पात्रांतून सोम पिऊं इच्छितो यास्तव हे ऋत्विज हो, पुढें व्हा व होम करा.

**त्वमध्वर्युरुत होतासि पूर्व्यः प्रशास्ता पोता जनुषा पुरोहितः । विश्वा विद्वाँ आर्त्विज्या धीरपुष्यस्यग्ने सख्ये मा रिषामा वयं तव ॥ १.९४,६.**

हे अग्ने, तूंच पुरातन अध्वर्यु व होता आहेस. तूंच प्रशास्ता, पोता व जन्मसिद्ध असा पुरोहित आहेस. सर्व आर्त्विज्यांस म्हणजे सर्व ऋत्विक्कर्मांस तूं जाणत असून हे प्राज्ञ अग्ने, तूं न्यूनाचें परिकरण करतोस. हे अग्ने, आमचें तुझ्याशीं सख्य झालें असतां आम्ही कोणाकडूनहि हिंसित होणार नाहीं.

**साकं हि शुचिना शुचिः प्रशास्ता क्रतुनाजनि । विद्वाँ अस्य व्रता ध्रुवा वया इवानु रोहते ॥ २.५,४.**

शोधक अशा कर्मासह शुद्ध असा प्रशास्ता उत्पन्न झाला. या प्रशास्त्याचीं अविनाशी कर्में जो जाणतो तो शाखेप्रमाणें वृद्धिंगत होतो.

**साकं हि शुचिना शुचिः प्रशास्ता क्रतुनाजनि । विद्वाँ अस्य व्रता ध्रुवा वया इवानुरोहते ॥ २.५,४.**

स्वयंशोधक असा प्रशास्ता शुद्ध अशा क्रतूसह उत्पन्न झाला आहे, याचीं निश्चित फलदायी अशीं व्रतें जाणून यजमान पक्ष्यांप्रमाणें त्या व्रतांचा क्रमाक्रमानें अनुष्ठान करून विस्तार करतो.

**ता अस्य वर्णमायुवो नेष्टुः सचंत धेनवः । कुवित्तिसृभ्य आवरं स्वसारो या इदं ययुः ॥ २.५,५.**

नेष्ट्याच्या त्या गमनशील, हर्षवती, व बहिणीप्रमाणें असणाऱ्या अंगुली अनुष्ठीयमान कर्माला अनुसरत होत्सात्या तीन्ही अग्नींची पुष्कळवेळ परिचर्या करतात.

**तवाग्ने होत्रं तव पोत्रमृत्वियं तव नेष्ट्रं त्वमग्निदृतायतः । तव प्रशास्त्रं त्वमध्वरीयसि ब्रह्मा चासि गृहपतिश्च नो दमे ॥ २.१,२.**

हे अग्ने, होत्र, पोत्र व नेष्ट्र हें तुझेंच आहे. तूंच अग्नीध्र आहेस. यज्ञेच्छु अशा तुझेंच प्रशास्त्र आहे. आमच्या यज्ञगृहांतील अध्वर्यु, ब्रह्मा व गृहपतीहि तूंच आहेस.

**प्रजावता वचसा वह्निरासा च हुवे नि च सत्सीह देवैः । वेषि होत्रमुत पोत्रं यजत्र बोधि प्रयन्तर्जनितर्वसूनाम् ॥ १.७६,४.**

फलप्रद अशा स्तोत्रांनीं स्तविला असतां जो अग्नि आपल्या ज्वालारूपी मुखानें जो देवांच्याकडे हवी पोंचवितो

त्या तुज अग्नीला मी बोलावितों. हे यजनीय अग्ने, इतर देवांच्यासह तूं येथें येऊन बैस आणि होत्र व पोत्र यांची इच्छा कर. त्याचप्रमाणें आहुतिद्वारा सर्वांनां उत्पन्न करणारा तूं आम्हांला धनसंपत्ति मिळेल अशा रीतीचें ज्ञान दे.

**यज्ञैः संमिश्लाः पृषतीभिर्ऋष्टिभिर्यामञ्छुभ्रासो अंजिषु प्रिया उत ॥ आसद्या बर्हिर्भरतस्य सूनवः पोत्रादासोमं पिबता दिवो नरः २.३६,२.**

यज्ञयुक्त, घोड्या जोडलेल्या रथांत बसलेले, आयुधें धारण केलेले, सुंदर व आभरणप्रिय आणि भरतपुत्र हो, तुमच्यासाठीं अंथरलेल्या बर्हीवर येऊन बसा व पोत्यापासून सोम प्या.

**आवक्षि देवाँ इह विप्रयक्षि चोशन्होतर्निषदा योनिषु त्रिषु । प्रतिवीहि प्रस्थितं सोम्यं मधु पिबाग्नीध्रात्तव भागस्य तृप्णुहि ॥ २.३६,४.**

हे विप्र, यजनीय अशा देवांनां या यज्ञांत बोलाव व त्यांचें यजन कर. हे होत्या, आमच्या हवीची इच्छा करणारा असा तूं तिन्ही ठिकाणीं बैस आणि हवनाकरितां गेलेल्या मधुर सोमरसाची इच्छा कर आणि आग्नीध्रापासून तूं आपला सोमरसाचा भाग घेऊन तृप्त हो.

**एष स्य ते तन्वो नृम्णवर्धनः सह ओजः प्रदिवि बाह्वोर्हितः । तुभ्यं सुतो मघवन्तुभ्यमाभृतस्त्वमस्य ब्राह्मणादातृपत्पिब ॥ २.३६,५.**

हा सोम तुझ्या शरीराचें बल वाढविणारा आहे. ज्या सोमानें तुझ्या बाहूंच्या ठिकाणीं शत्रूंचा पराभव करण्याचें सामर्थ्य देणारें ओज स्थापित केलें त्या प्रकारचा सोम तुझ्यासाठीं कुटून तयार केला आहे व हवन करण्यासाठीं ( उत्तरवेदीसन्निध ) नेला आहे तर ब्राह्मणापासून तूं सोमरसाचें तृप्ति होईपर्यंत प्राशन कर.

**जुषेथां यज्ञं बोधतं हवस्य मे सत्तो होता निविदः पूर्व्या अनु । अच्छा राजाना नम एत्यावृतं प्रशास्त्रादापिबतं सोम्यं मधु ॥ २.३६,६.**

हे मित्रावरुण हो, माझा यज्ञ सेवन करा. माझ्या बोलावण्याकडे लक्ष द्या. ( वेदींत ) बसलेला आमचा होता पूर्वीचे निविद् मागून शंसन करतो, व झांकलेलें असें सोमरूप अन्न तुमच्या अभिमुख प्राप्त होतें अशा प्रकारचें तें मादक व मधुर सोममय हवि प्रशास्त्यापासून प्राशन करा.

**यमु पूर्वमहुवे तमिदं हुवे सेदु हव्यो ददिर्यो नाम पत्यते । अध्वर्युभिः प्रस्थितं सोम्यं मधु पोत्रात्सोमं द्रविणोदः पिब ऋतुभिः ॥ २.३७,२.**

हे धनदात्या, ज्या तुला मी पूर्वी बोलावलें होतें त्या तुला मी आतांहि बोलावीत आहें. धनप्रद बोलावण्यायोग्य व अभीष्ट फल देणारा जो देवतारूपानें यजिला जातो त्या धनप्रदाला अर्पण करण्यासाठीं सोमात्मक मधुर हविर्द्रव्य अध्वर्यूंनीं नेलें आहे. हे धनदात्या, ऋतूंच्यासहवर्तमान पोत्यापासून सोमरस पी.

**अपाद्धोत्रादुत पोत्रादमत्तोत नेष्ट्रादजुषत प्रयो हितम् । तुरीयं पात्रममृक्तममर्त्यं द्रविणोदाः पिबतु द्राविणोदसः ॥ २.३७,४.**

जो धनदाता होत्यापासून सोम प्याला, पोत्यापासून प्याला व धुंद झाला. शिवाय नेष्ट्यापासूनहि देवांचें अन्न असा सोम ज्यानें सेवन केला तो द्रविणोदा दशापवित्रानें पुसलेल्या व अमरत्वसाधन अशा चौथ्या पात्रांतील सोमरस प्राशन करो.

**मेद्यन्तु ते वह्नयो येभिरीयसेऽरिषण्यन्वीळयस्वा वनस्पते । आयूया धृष्णो अभिगूर्या त्वं नेष्ट्रात्सोमं द्रविणोदः पिब ऋतुभिः ॥ २.३७,३.**

हे धनदात्या, ज्यांच्या योगानें तूं येथें प्राप्त होतोस ते तुझे घोडे तृप्त होवोत. हे वनस्पते, हिंसा न करितां दृढ हो. हे धैर्यशीला, तूं येथें येऊन नेष्ट्यापासून ऋतूंच्यासहवर्तमान सोमरस प्राशन कर.

**पवमानः सो अद्य नः पवित्रेण विचर्षणिः । यः पोता स पुनातु नः ॥ ९.६७,२२.**

स्वतः पवित्र असा जो सर्वदर्शी व पवित्र ( सोम ) तो आपल्या पापनाशक अशा तेजानें आम्हांस पावन करो.

**उद्गातेव शकुने साम गायसि ब्रह्मपुत्र इव सवनेषु शंससि । वृषेव वाजी शिशुमतीरपीत्या सर्वतो नः शकुने भद्रमावद विश्वतो नः शकुने पुण्यमावद ॥ २.४३,२.**

हे शकुने, उद्गाता ज्याप्रमाणें सामगायन करतो त्याप्रमाणें तूं गात असतोस. सवनांमध्यें ब्रह्मपुत्र जसा शंसन करतो तसा तूं तिन्ही काळीं शब्द ( सूर ) काढतोस. अंडिल घोडा घोडीशीं संग करतांना जसा हिंसतो तसा तूंहि शब्द कर.

**स सद्म परिणीयते होता मन्द्रो गविष्टिषु । उत पोता निषीदति ॥ ४.९,३.**

तो ( अग्नि जेव्हां ) यज्ञगृहांत नेला जातो तेव्हां तेथें चालणाऱ्या यज्ञामध्यें तो स्तुत्य असा होता व पोता होऊन बसतो.

**वेषि ह्यध्वरीयतामुपवक्ता जनानाम् । हव्या च मानुषाणाम् ॥ ४.९,५.**

यज्ञेच्छु अशा मनुष्याच्या हविर्द्रव्याची तूं इच्छा करीत असतोस. शिवाय तूं उपवक्ता ( ब्रह्मा किंवा सर्वकर्मांवर सदस्य ) होतोस.

**त्वमग्ने गृहपतिस्त्वं होता नो अध्वरे । त्वं पोता विश्ववार प्रचेता यक्षि वेषि च वार्यम् ॥ ७.१६,५.**

सर्वांना स्वीकरणीय अशा हे अग्ने, तूं आमच्या यज्ञांमधील गृहपति आहेस, तूंच होता आहेस व पोताहि तूंच आहेस. यासाठीं प्रकृष्टबुद्धि असा तूं देवांनां स्वीकरणीय अशा हवीचें यजन कर व भक्षण कर.

**होताध्वर्युरावया अग्निमिन्धो ग्रावग्राभ उत शंस्ता सुविप्रः। तेन यज्ञेन स्वरंकृतेन स्विष्टेन वक्षणा आपृणध्वम् ॥ १.१६२,५.**

होता, हविर्द्रव्यें वाहणारा अध्वर्यु, अग्निमिन्ध (आग्नीध्र) ग्रावग्राभ (ग्रावस्तुत्) व सुविप्र असा शंस्ता असे सर्व ऋत्विज् हो, तुम्ही उत्कृष्ट अशा अलंकृत व उत्तम संपादिलेल्या यज्ञानें नद्या वहावयास लावा.

**अध्वर्युं वा मधुपाणिं सुहस्त्यमग्निधं वा धृतदक्षं दमूनसम् । विप्रस्य वा यत्सवनानि गच्छथोत आय तं मधुपेयमश्विना ॥ १०.४१,३.**

हे अश्विनौदेव हो, तुम्ही दोघे सोमरस हातांत घेतलेल्या सुहस्त्य अशा अध्वर्यूकरितां किंवा धृतवल दानमनस्क अशा आग्नीध्राकरितां येथें या. जरी तुम्ही दुसऱ्या एखाद्या विप्राच्या यज्ञाकरितां गेला असलां तरी तेथून आमचा सोमरस पिण्यासाठीं येथें या.

**तमु नः पूर्वे पितरो नवग्वाः सप्त विप्रासो अभि वाजयन्तः। नक्षद्दाभं ततुरिं पर्वतेष्ठामद्रोघवाचं मतिभिः शविष्ठम् ॥ ६.२२,२.**

अत्यंत पूर्वकाळीं नऊ महिने अनुष्ठान करणारे व इन्द्राकरितां अन्न करणारे असे आमचे पितर सात विप्र शत्रू हिंसक, तारक, पर्वतस्थ, वचनपालक व बलवान् अशा त्याच इन्द्राला स्तुतींनीं संतोषविते झाले.

**त्वमध्वर्युरुत होतासि पूर्व्यः प्रशास्ता पोता जनुषा पुरोहितः । विश्वा विद्वाँ आर्त्विज्या धीर पुष्यस्यग्ने सख्ये मा रिषामा वयं तव ॥ १.९४,६.**

हे अग्ने, तूंच अध्वर्यु आहेस. होता, प्रशास्ता, पोता व पुरोहित तूंच आहेस इ०

**तां इयानो महि वरूथमूतय उप घेदेना नमसा गृणीमसि । त्रितो न यान्पञ्च होतॄनभिष्टय आववर्तदवरां चक्रियावसे ॥ २.३४,१४.**

ज्या श्रेष्ठ अशा पांच होत्यांनां अभीष्टसिद्धीसाठीं व संरक्षणासाठीं 'त्रित'नामक ऋषीनें चक्राकार फिरविलें त्या पांच होत्यांनां रक्षणाची याचना करणारे आम्ही या स्तोत्रानें स्तवीत आहों.

**ग्राव्णो ब्रह्मा युयुजानः सपर्यन् कीरिणा देवान्नमसोपशिक्षन् । अत्रिः सूर्यस्य दिवि चक्षुराधात्स्वर्भानोरप माया अघुक्षत् ॥ ५.४०,८.**

अत्रि नामक ब्रह्मा (अभिषव साधन असे) ग्रावे (वरवंटे) जुळित असतांना, स्तोत्रानें देवांचें पूजन करीत असतांना, आणि नमस्कारानें त्यांनां प्रसन्न करीत असतांना, अंतरिक्षांत व्यापक अशा सूर्यमंडळाला धारण करता झाला. शत्रुमोहक अशा स्वर्भानुनामक असुराच्या मायेला अत्रीच्या साहाय्यानें इन्द्र दूर करता झाला.

**अध्वर्यवश्चकृवांसं मधूनि प्रवायवे भरत चारु शुक्रम् । होतेव नः प्रथमः पाह्यस्य देव मध्वो ररिमा ते मदाय ॥ ५.४३,३.**

हे अध्वर्यू हो, मधुर मधुर हविर्द्रव्यें तयार करणारे तुम्ही वायु देवासाठीं प्रथम सोमरस भरून ठेवा, होता ज्याप्रमाणें प्रथम सोमरस पितो त्याप्रमाणें हे देवा, या यजमानाचा हा सोमरस तूं प्रथम (इतर देवतांच्या पूर्वी) प्राशन कर. हे वायु देवा, मधुर असा सोमरस मी तुला अर्पण करतों.

**ब्रह्मा.**—ब्रह्मा या ऋत्विजाचें कार्य मुख्यतः स्तुति करण्याचें असावें परंतु इतरहि यज्ञविषयक कार्यें तो करीत असे हें पुढील कांहीं उल्लेखांवरून दिसून येईल.

**उत ब्रह्माणो मरुतो मे अस्येन्द्रः सोमस्य सुषुतस्य पेयाः। तद्धि हव्यं मनुषे गा अविन्ददहन्नहिं पपिवाँ इन्द्रो अस्य ॥ ५.२९,३.**

हे ब्रह्मे हो, मरुत् हो, तुम्ही व इन्द्र मी कुटून तयार केलेला सोम घ्या. तुम्ही प्यालेलें सोमात्मक हवि मनुष्याला गाई मिळवून देतें. सोम प्याल्यानंतरच इन्द्रानें वृत्राचा वध केला.

**अनवस्ते रथमश्वाय तक्षन्त्वष्टा वज्रं पुरुहूत द्युमन्तम्। ब्रह्माण इन्द्रं महयन्तो अर्कैरवर्धयन्नहये हन्तवाउ ॥ ५.३१,४.**

हे पुरुहूत, घोडे जोडतां येण्यासाठीं अनूनीं तुझा रथ तासला, त्वष्ट्यानें वज्र चकचकीत केलें. ब्रह्मे वृत्रहननाच्या उद्देशानें इन्द्राला स्तोत्रांनीं वाढविते झाले.

**असादि वृतो वह्निराजगन्वानग्निर्ब्रह्मा नृषदने विधर्ता। द्यौश्च यं पृथिवी वा वृधाते आयं होता यजति विश्ववारम् ॥ ७.७,५.**

वरलेला हविर्द्रव्यें वाहणारा, ब्रह्मा (मोठा) व धारक असा अग्नि द्युलोकांतून आला व नृसदनांत बसला. द्यौ व पृथ्वी ज्या अग्नीला वाढवितात त्या अग्नीला होता यजनानें संतुष्ट करतो.

वयं नाम प्रब्रवामा घृतेनास्मिन्यज्ञे धारयामा नमोभिः। उप ब्रह्मा शृणवच्छस्यमानं चतुःशृंगोवमीद्गौर एतत् ॥ ४.५८,२.

आम्हीं घृतासह नांव उच्चारूं. या यज्ञांत नमस्कारांनीं (नांव) धारण करूं. 'ब्रह्मा' आम्ही तें (नांव) उच्चारीत असतांना ऐकणारा चतुःशृंग व गौरवर्ण असा देव या कर्माला पार पाडो.

इयं वेदिः परो अन्तः पृथिव्या अयं यज्ञो भुवनस्य नाभिः। अयं सोमो वृष्णो अश्वस्य रेतो ब्रह्मायं वाचः परमं व्योम ॥ १.१६४,३५.

ही वेदी म्हणजेच पृथ्वीचा परमावधि होय. हा यज्ञ भुवनाचा नाभि आहे. वर्षकारी आदित्यरूपी अश्वाचें 'सोम' हेंच रेत आहे व हा ब्रह्मा म्हणजेच वाणीचें परमोत्कृष्ट व सुरक्षित असें स्थान होय.

मोषु ब्रह्मेव तन्द्रयुर्भुवो वाजानां पते। मत्स्वा सुतस्य गोमतः ॥ ८.८१,३०.

हे अन्नपते इन्द्रा, ब्रह्म्याप्रमाणें तन्द्रींत येऊन निर्व्यापार बनूं नकोस. कुटलेल्या सोमरसांत दूध अगर दहीं मिसळल्यावर तूं तो प्राशन कर व संतुष्ट हो.

आ यद्वज्रं बाह्वोरिन्द्र धत्से मदच्युतमहये हन्तवाउ। प्र पर्वता अनवन्त प्र गावः प्र ब्रह्माणो अभिनक्षन्त इन्द्रम् ॥ ८.८५,५.

हे इन्द्रा, अहीला मारण्याकरितां जेव्हां तूं आपल्या बाहूंनीं शत्रूंची रग जिरविणारें वज्र धारण केलेंस किंवा अही मेल्यावर पर्वतांनीं जेव्हां कोसळून गडगडाट केला आणि गाई जेव्हां हंबरूं लागल्या तेव्हां ब्रह्माणः (ब्राह्मण) तुज इन्द्राला सर्वतोपरि पूजित करिते झाले.

तमेव ऋषिं तमु ब्रह्माणमाहुर्यज्ञन्यं सामगामुक्थशासम्। स शुक्रस्य तन्वो वेद तिस्रो यः प्रथमो दक्षिणया रराध ॥ १०.१०७,६.

यज्ञनेता, सामगाणारा, व शस्त्रें म्हणणारा जो असेल त्यालाच ऋषी व त्यालाच ब्रह्माहि म्हणतात. जो प्रथम दक्षिणेनें आराधन करतो तोच शुक्राच्या (दीप्यमान प्रकाशाच्या) तीन तनू जाणतो.

त्वां विष्णुर्बृहन्क्षयो मित्रो गृणाति वरुणः। त्वां शर्धो मदत्यनु मारुतम् ॥ ९ ॥ ८.१५,९.

हे इन्द्र, श्रेष्ठ, असा विष्णु, मित्र, वरुण हे तुझी स्तुति करतात व वायु तुला मद आणतो.

इन्द्रो ब्रह्मेन्द्रः ऋषिरिन्द्रः पुरू पुरुहूतः। महान्महीभिः शचीभिः ॥ ८.१६,७.

हा इन्द्र, ब्रह्मा आहे, तोच ऋषि आहे, पुष्कळ वेळ पुष्कळांकडून बोलावला जाणारा आहे. मोठ्या क्रियांनीं तो मोठा होत असतो.

ब्रह्माणस्त्वा वयं युजा सोमपामिन्द्र सोमिनः। सुतावन्तो हवामहे ॥ ८.१७,३.

हे इन्द्रा, सोमयुक्त व अभिषव केलेल्या सोमांनीं संपन्न असे आम्ही ब्रह्मे सोम पिणाऱ्या तुला योग्य अशा स्तोत्रानें बोलावतों.

यो यजाति यजात इत्सुनवच्च पचाति च। ब्रह्मेदिन्द्रस्य चाकनत् ॥ ८.३१,१.

जो ब्रह्मा (एकदां) यजन करतो तो पुन्हां यजन करतो, तोच सोमाभिषव करतो, तोच पशू शिजवितो व तोच इन्द्राची पुन्हां पुन्हां इच्छा करितो.

न नूनं ब्रह्मणामृणं प्राशूनामस्ति सुन्वतां। न सोमो अप्रता पपे ॥ ८.३२,१६.

सोम कुटून प्राशन करणाऱ्या ब्राह्मणांनां (ब्रह्म्यांना) ऋण नसतें. कां कीं, ते विस्तीर्ण धनाच्या योगानेंच सोम पितात.

नानानं वा उ नो धियो विव्रतानि जनानाम्। तक्षारिष्टं रुतं भिषग्ब्रह्मासुन्वन्तमिच्छतीन्द्रायेन्दो परिस्रव ॥ ९.११२,१.

हे सोमा, आमचीं कर्में नानाप्रकारचीं असतात. त्याचप्रमाणें इतरांचींहि कर्में विविधप्रकारचीं असतात. सुतार लांकूड तासण्याची इच्छा करतो, वैद्य रोगाच्या निवारणाची इच्छा करतो व ब्रह्मा सोमाभिषव करणाऱ्या (यजमानाची) इच्छा करतो त्याप्रमाणें मी तुझ्या परिस्रवणाची इच्छा करितों. यासाठीं हे इन्दो, इन्द्राकरितां तूं सर्व बाजूंनीं पाझर.

यत्र ब्रह्मा पवमान छन्दस्यां ३ वाचं वदन्। ग्राव्णा सोमे महीयते सोमेनानन्दं जनयन्निंद्रायेंदो परिस्रव ॥ ९.११३,६.

हे पवित्र सोमा, तुझ्यासाठीं सोमाभिषव करणाऱ्या ग्राव्यांच्या योगानें छंदोबद्ध अशी वाणी उच्चारीत असतांना कुटलेल्या सोमरसानें देवांच्या ठिकाणीं आनंद उत्पन्न करणारा ब्रह्मा ज्या ठिकाणीं देवांकडून पूजिला जातो त्या ठिकाणीं हे सोमा, तूं सर्व बाजूंनीं पाझर.

ऋग्वेदांत गायत्री, अर्की व उक्थी असे तीन प्रकारचे लोक आढळतात त्याचप्रमाणें 'ब्रह्मे' म्हणून कांहीं लोक असावे असें दिसतें. ब्रह्म म्हणजे स्तुति व स्तुति करणारा तो ब्रह्मा

अशी उपपत्ति लाविली तर ब्रह्मे हे अर्की व उक्थी यांच्या वर्गापैकींच एक होत असें म्हणावें लागेल. परंतु ऋग्वेदांतच कोठें कोठें जें वर्णन आलें आहे त्यांत आज अध्वर्यु ज्या कांहीं क्रिया करतो त्याच क्रिया ब्रह्मे करीत असें आढळून येतें. "अत्रि नांवाचा एक ब्रह्मा सोमाभिषवासाठीं वरवंटे जुळवीत असतां सूर्य मध्याह्नावर आला" असें वर्णन पांचव्या मंडळाच्या चाळिसाव्या सूक्तांत आलें आहे. हें वर्णन पाहतां ब्रह्मानामक ऋत्विजाच्या प्रचलित क्रियाकलापांत व पूर्वीच्या क्रियेंत अगदींच उलटापालट झाली आहे हें सहज दिसून येतें. अभिषवाचें म्हणजे सोम कुटण्याचें कार्य अध्वर्यु आपल्या २-३ साथिदारांसह करीत असल्याचा प्रयोग दृष्ट आहे व या ऋचेंत हें काम ब्रह्मा करतो असें आढळून येतें, इतकेंच नव्हे तर याच ऋचेंत देवांची स्तुति करणें वगैरे कार्यहि ब्रह्माच करतो असें म्हटलें आहे. म्हणजे हल्लीं 'होता' जी कामगिरी करतो तीहि ब्रह्म्यालाच करावयाची असें स्पष्ट दिसून येतें. देवतांची स्तुति करण्याचें कार्य ब्रह्मेच करीत ही गोष्ट अधिक निश्चित करण्यास पांचव्या मंडळांतील एकतिसाव्या सूक्तांतील चौथी ऋचा अधिकच पोषक होते. वृत्रहननाच्या उद्देशानें 'ब्रह्माणः अर्कैः इन्द्रं अवर्धयन्' म्हणजे वृत्रवधाकरितां ब्रह्म्यांनीं अर्कांच्या [ स्तोत्रांच्या ] योगानें इन्द्राला वाढविला असें वर्णन सदर ऋचेंत आलें आहे. दुसऱ्या एके ठिकाणीं जें वर्णन आलें आहे त्यावरून यज्ञनेता, सामगाणारा व शस्त्रें म्हणणारा जो असेल त्यालाच ऋषि किंवा ब्रह्मा म्हटलें जाई असें मानण्यास जागा आहे. यावरूनहि हवन किंवा स्तवन हीं कार्यें ब्रह्मेच करीत असें जें विधान कल्पिलें आहे त्याला विशेषच जोर येतो.

होता व अध्वर्यु असे दोन ऋत्विज इष्टींत, पशूंत किंवा सोमयागांत नियोजित करण्यांत येतात. होत्याकडे देवांना बोलावण्याचें किंवा श्रौतपरिभाषेंत बोलवयाचें तर देवतांचें आह्वान करण्याचें कार्य नेमलेलें असून हवनीय देवतांची स्तुति करण्याचीहि कामगिरी त्याला करावी लागते. अध्वर्यु देवतांच्यासाठीं अग्नीमध्यें हविर्द्रव्यांचें यजन करतो. परंतु ऋग्वेदसंहितेकडे नजर टाकल्यास हवन करणें, देवांना बोलावणें किंवा त्यांची स्तुति करण्याचें कार्य करणें या गोष्टी करणाऱ्या व्यक्ती पृथक् पृथक् होत्या अगर असत असें दिसून येत नाहीं.

**संहिता व मंत्रविनियोग यांची तुलना.**— आतांपर्यंत जें ऋत्विजांच्या स्थितीसंबंधानें विवेचन केलें त्यावरून आज निदान एवढें म्हणतां येईल कीं, यज्ञसंस्था जसजशी वाढत गेली तसतसें ऋत्विजाचें सामान्य स्वरूप जाऊन त्यास विशिष्ट स्वरूप प्राप्त झालें आणि हें जसजसें प्राप्त होऊं लागलें तसतसें संहितीकरणहि अधिक सहेतुक व अधिक नेटानें होऊं लागलें असावें. ऋग्मंत्रांमध्यें तो विशिष्टीरणाची क्रिया चालू असलेला काल व्यक्त होतो, आणि आजच्या संहितांत विशिष्टीकरण संपूर्ण झालेलें दिसतें. संहितांच्या ज्या तुलना पूर्वीं झाल्या त्यांवरून अथर्ववेद आणि सामवेद यांतील किती भाग ऋग्वेदमंत्रांशीं समान आहे हें स्पष्ट झालें आहे. तथापि यजू व अथर्व या दोहोंस सामान्य असें मंत्रवाङ्मय किती होतें हा प्रश्न स्पष्ट झाला नव्हता तो परिशिष्टांतील पहिल्या कोष्टकानें स्पष्ट केला आहे. परिशिष्टांतील दुसरें कोष्टक असें सिद्ध करितें कीं, ऋग्वेदरचना झाली तिच्यापूर्वीं हौत्रांच्या अनेक पद्धती समाजांत चालू होत्या, मंत्रांचे विनियोग केवळ निश्चित झाले नव्हते आणि यामुळें ऋग्वेदाची रचना करितांना ती हौत्रानुसार न करतां दुसऱ्या कांहीं निराळ्या तत्त्वानें करणें कां भाग पडलें या प्रश्नावर प्रकाश पडतो.

ऋग्वेदांतील मंत्रांच्या विनियोगाच्या कोष्टकांमध्यें त्यांचा आश्वलायन सूत्र, ऐतरेय ब्राह्मण, शांखायन सूत्र व कौषीतकी उर्फ शांखायन ब्राह्मण यांनीं कसकसा विनियोग केला आहे हें दाखविलें आहे. या कोष्टकाचा ऐतिहासिक उपयोग कोणत्या तऱ्हेनें होणें शक्य आहे यांविषयीं आम्हांस विचार येणेंप्रमाणें सुचतात.

मंत्रांची संहिता होणें आणि त्याचा विनियोग होणें यांमध्यें संबंध काय आहे यांविषयीं विचार करण्यास हें साहित्य उपयोगी पडतें. आश्वलायन श्रौतसूत्र संहिता आजच्या स्थितींत आहे असेंच गृहीत धरलें, म्हणजे अंतिम संहितीकरणानंतर आश्वलायन सूत्र तयार झालें. तथापि कौषीतकी उर्फ शांखायन ब्राह्मण आणि ऐतरेय ब्राह्मण यांच्या कालीं संहितेचें स्वरूप कोणतें असावें हें आपणांस आज खात्रीपूर्वक सांगतां येत नाहीं. ऐतरेय ब्राह्मणांत अशा अनेक ऋचा आहेत कीं, ज्या शाकलसंहितेंत सांपडत नाहींत. तथापि आजच्या संहितेंतील बराचसा भाग ऐतरेय ब्राह्मणांत उल्लेखिला गेला असल्यामुळें त्या कालीं असावा यांत शंका नाहीं. जेथें ऋचा एकच आहे पण तिचे विनियोग मात्र कौषीतकी व ऐतरेय यांनीं भिन्न दिले आहेत तेथें अशी कल्पना करतां येईल कीं, संहिता कोणत्या तरी स्वरूपांत तयार असून तिच्यांतील मंत्रांचा उपयोग निरनिराळ्या लोकांनीं निरनिराळा केला असावा आणि अर्थात् यामुळें ते दोन्ही विनियोग नवीन असण्याचा संभव आहे. जेथें दोन्ही विनियोग एकच आहेत तेथें ती क्रिया बरीच जुनी असावी, आणि परंपरा भिन्न होण्यापूर्वीची असावी, अथवा एकाची क्रिया व मंत्र दुसऱ्यानें घेतले असावेत या दोन शक्यता दिसतात. विनियोगाच्या कोष्टकांवरून हेंहि दिसून येईल कीं, आजच्या शाकलसंहितेंतील निम्याअधिक मंत्रांचा विनियोग ब्राह्मणांत नाहीं. सूत्रांतहि सर्व मंत्रांचा विनियोग दिलेला आढळत नाहीं त्यांचें कोष्टक पुढें दिलें आहे (कोष्टक ३ रें ).

वैदिक वाङ्मयाचा तौलनिक अभ्यास करून त्याच्या साहाय्यानें ब्राह्मणजातीचा आणि सामाजिक चळवळींचा इतिहास निर्माण करणें या प्रकारच्या अभ्यासास या ग्रंथांत केवळ आरंभ झाला आहे असें समजावें. आजपर्यंतच्या संशोधकांनीं या विषयाकडे फारसें लक्ष न दिल्यामुळें आम्हांस जें काय मांडावयाचें तें मांडून अभ्यास करतांनां जें साहित्य जमा करावें लागलें तें साहित्य अभ्यास पुढें चालू रहावा या दृष्टीनें वाचकांपुढें ठेविलें आहे. हिंदुस्थानांत निरनिराळ्या ठिकाणीं पसरलेल्या ब्राह्मणांच्या शाखा व त्यांचा वैदिक वाङ्मयाशीं संबंध हीं शोधून काढून ब्राह्मणांच्या स्थानांतरासंबंधानें जितका आपणांस पत्ता लावतां येईल तितका लावणें अवश्य आहे. हा पत्ता वैदिक वाङ्मयाच्या तौलनिक अभ्यासानें बराचसा लागणार आहे आणि ज्या गोष्टींवर आम्ही अद्यापि निर्णयात्मक कांहीं लिहिलें नाहीं अशा गोष्टींवर आणखी विवेचन करण्यास हीं तौलनिक कोष्टकें उपयोगी पडतील असा आम्हांस दृढ भरंवसा आहे.

---

## प्रकरण १४ वें.

### अतींद्रियस्थितीसंबंधानें कल्पना.

यज्ञसंस्थेचा इतिहास समजावयास दैवतेतिहास जितका महत्त्वाचा आहे तितकाच अतींद्रिय सृष्टीसंबंधानें लोकांच्या असलेल्या कल्पना समजणें महत्त्वाचें आहे. परमार्थविषयक निरनिराळ्या कल्पनांचे प्रकार जसजसे असतील त्याप्रमाणें तो परमार्थ साध्य करून घेण्याचे मार्ग उत्पन्न होतील. स्वर्ग म्हणजे काय याची कल्पना निश्चित नसली तरी पारलौकिक इष्टगतीसाठीं मनुष्य कांहीं तरी करतोच. तो जें कांहीं करतो त्यावरून त्याच्या परलोकाविषयींच्या कल्पना आपणांस अंशें करून ज्ञात होतात. कधीं कधीं पारलौकिक स्थितिविषयीं स्पष्ट उल्लेखहि सांपडतात. यासाठीं वेदकालच्या परलोकासंबंधाच्या व मनुष्य मृत झाल्यानंतर त्याचें काय होतें यासंबंधाच्या कल्पना आपणांस गोळा करणें अवश्य होतें.

**मरणोत्तरस्थितिविज्ञान—मृतांची व्यवस्था.—** वैदिक सूक्तांत मरणाविषयींचे उल्लेख फार थोडे आहेत. जेव्हां हे उल्लेख येतात तेव्हां शत्रूंनां मरण यावें अशा प्रकारची इच्छा प्रदर्शित केलेली आढळते. या उल्लेखांत आम्हांला दीर्घायुष्य दे अशी कवि प्रार्थना करतात. अंत्येष्टि प्रसंगीं मरणोत्तरस्थितीविषयींचे विचार व्यक्त केलेलेआढळतात. दहन करणें व जमिनींत पुरणें या दोन्ही प्रकारांनीं प्रेताची व्यवस्था करण्याची वहिवाट एकाच वेळीं रूढ होती. ऋग्वेदांत एका ठिकाणीं (१०.१६) दहनविधीचा उल्लेख आहे तर दुसऱ्या ठिकाणीं (ऋ. १०.१८,१० ते १३) पुरण्याच्या विधीचा उल्लेख आहे. मृत्तिकेचें गृह असें वर्णन एके ठिकाणीं (ऋ. ७.८९) आढळतें. अग्निदग्ध व अनग्निदग्ध अशा दोन पितृवर्गांचा उल्लेख येतो (ऋ.१०.१५,१४; अ.वे.१८.२,३८). परंतु दहन हा मृतांनां स्वर्गलोकीं पोंचविण्याचा विशेष रूढ असा मार्ग होता. उत्तरकालीन प्रेतविधींत हाच एक मार्ग विशेष वर्णिलेला सांपडतो (आश्व. गृ. सू. ४.१). लहान मुलें व संन्यासी यांचीं प्रेतें पुरीत व मोठ्या संसारी माणसांच्या अस्थि व रक्षा पुरीत अशीं वर्णनें उत्तरकालीन प्रेतविधिवर्णनांत येतात.

मरणोत्तर जीवन वगैरेसंबंधीं ज्या कथा वेदांतून आढळतात त्या अर्थातच दहनसंस्काराशीं विशेष निगडित असलेल्या दिसतात. अग्नि हा प्रेताला दुसऱ्या लोकीं, पितरांकडे व देवांकडे घेऊन जातो (ऋ. १०.१६,१ ते ४; १०.१७,३), मर्त्यांस तो उत्तम अमर्त्यत्व देतो (ऋ. १.३१,७), दिव्य पक्षी जो अग्नि त्याच्या द्वारा मनुष्यें सूर्याच्या अति उच्च स्थानीं जातात, पुराण ऋषी ज्या सदाचारी लोकांच्या स्थानीं गेले त्या स्थानीं अग्नीच्या द्वारा मनुष्यें जातात (वा. सं. १८.५१ व ५२), गार्हपत्य अग्नि मृताला सुकृताच्या लोकांत घेऊन जातो (अ. वे. ६.१२०,१). प्रेतभक्षण करणारा अग्नि (क्रव्याद) आणि देवांकडे त्यांचा बलि घेऊन जाणारा अग्नि हे वेगळे आहेत (ऋ. १०.१६,९). अग्नीनें प्रेताचें नीट संरक्षण करावें, आणि त्याचा जो अज भाग तो त्यानें जाळावा अशी त्याची प्रार्थना केलेली आहे (ऋ. १०.१६,४). यज्ञामध्यें मारावयाच्या घोड्यावरोबर एक अजहि अगोदर अग्नींत जाळला जातो. या क्रियेमध्यें असा हेतु असतो कीं, त्या अजानें देवांनां त्यांचा बलि त्यांजकडे येत आहे ही वर्दी यावी (ऋ. १.१६२,२ व ४). सूत्रग्रंथांत (आ. गृ. सू. ४.२; कौ. श्रौ. सू. २५.७,१९) प्रेताला काळ्या बोकडाच्या त्वचेवर ठेवावें असें सांगितलें आहे; आणि या प्रसंगीं पशूचा यज्ञ केला तर तो गाईचा किंवा बोकडाचा करितात. दहनप्रसंगीं एखाद्या पक्ष्यानें, पशूनें, मुंग्यांनीं किंवा सर्पांनीं प्रेताला कांहीं इजा केली असेल तर ती अग्नि आणि सोम यांनीं वरी करावी अशी त्यांची प्रार्थना केली जाते (ऋ. १०.१६,६).

अग्नीच्या धुराबरोबर मृत मनुष्य दिव्य लोकांत जातो अशी समजूत होती (आ. गृ. सू. ४.४,७). या दिव्य लोकाचा मार्ग फार दूर असून पूषन् हा या मार्गावरून जाणाऱ्या मृतांचा संरक्षक आहे आणि सविता हा त्यांचा मार्गदर्शक आहे (ऋ. १०.१७,४). मृत मनुष्य येत आहे ही वर्दी पितरांकडे अगोदर घेऊन जाणारा यज्ञिय बोकड हा दाट अंधकाराच्या गर्तेतून जातो, व स्वर्गाचें तिसरें दालन या गर्तेपलीकडे आहे तेथें पोहोंचतो (अ. ९.५,१ व ३ तु० अ. ८.१,८).

मृत मनुष्यांबरोबर वस्त्रेंभूषणें दिलीं जात असत व तीं देण्याचा हेतु त्यांच्या परलोकींच्या जीवनक्रमांत वस्त्रभूषणांची

अडचण त्यांस पडूं नये हा असे (अ. १८.४,३१). पतीच्या शरीराबरोबर पत्नीला व त्याच्या शस्त्रास्त्रांनां जाळण्याची पद्धत होती असें कांहीं उल्लेखांवरून दिसतें (ऋ. १०.१८,८ व ९). मृताच्या शरीराला सर्पणाची एक मोळी बांधित असत; हेतु हा कीं, मृताचा माग नाहींसा व्हावा आणि यमाला या लोकीं पुन्हां येण्याला अडचण पडावी (अ. ५.१९,१२); तु. (ऋ. १०.१८,२; १०.९७,१६).

**आत्मा.**—अग्नीनें किंवा जमिनींत पुरण्यानें शरीराचाच फक्त नाश होतो अशी समजूत वेदांत आहे. मृताचा आत्मा अमर्त्य आहे, या वेदांतील कल्पनेच्या मुळाशीं ही जुनी कल्पना आहे कीं, आत्मा हा शरीरापासून वेगळा राहूं शकतो. शरीराच्या मूर्च्छावस्थेंत देखील तो शरीरापासून दूर होऊं शकतो आणि मरणोत्तर तो स्वतंत्रपणें सारखा अस्तित्वांत राहूं शकतो. एका सूक्तांत (ऋ. १०.५८) मृतवत् पडलेल्या माणसाच्या मनाला (म्हणजे आत्म्याला) तूं दूर भटकत आहेस तो परत ये अशी विनवणी केली आहे. वेदांमध्यें आत्मा एका शरीरांतून बाहेर पडल्यावर दुसऱ्या शरीरांत प्रवेश करितो ही कल्पना नाहीं. परंतु एका ब्राह्मणग्रंथांत असें विधान सांपडतें कीं, जे नीट ज्ञान करून घेऊन आपले विधी करीत नाहींत ते पुनः पुनः जन्म घेऊन मृत्यूच्या भक्ष्यस्थानीं पडतात (श. ब्रा. १०.४.३,१०). शरीरांत असलेल्या चैतन्याला प्राण, आत्मन्, असु, मनस् इत्यादि नांवें आहेत (ऋ. १.११३, १६; ८.८९,५). अथर्ववेदांत पुष्कळ ठिकाणीं असु किंवा मनस् यांच्या शरीरांतील अस्तित्वावर मानवाचें जीवित अवलंबून आहे असें मानलेलें आहे. असुनीति अथवा असुनीत म्हणजे आत्म्यांनां नेणें हे शब्द अग्नि मृतांचे आत्मे या लोकांतून दुसऱ्या लोकांत घेऊन जातो या क्रियेला लावितात (ऋ. १०. १५,४; १०.१६,२). प्रेतविधिसंबंधीं विधानांमध्यें मृताच्या मनाला किंवा असूला प्रार्थिलेलें नसतें तर त्याच्या अंतर्गत व्यक्तीला पिता, प्रपिता इत्यादि शब्दांनीं संबोधिलेलें असतें. यावरून आत्मा ही केवळ छाया नसून तो व्यक्तीच्या स्वरूपांत असतो असा समज असल्याचें स्पष्ट होतें. या शरीरांतून सुटल्यावरच अमरत्व प्राप्त होतें (श. ब्रा. १०.४.३,९); तरी मरणोत्तर स्थितीच्या कथांमध्यें मृत शरीरालाहि महत्त्वाचा भाग दिलेला आहे. कारण मरणोत्तर स्थिति ही देहयुक्त स्थिति असल्याची समजूत आहे (ऋ. १०.१६,५; अ. वे. १८.२,२६). हें मरणोत्तर शरीर निर्व्यंग असतें (अ. वे. ६.१२०,३). अर्थात् असें शरीर म्हणजे स्थूल भौतिक शरीर नसून अग्नीनें शुद्ध केलेलें असें सूक्ष्म शरीर असतें (तु=ऋ. १०.१६,६). उत्तरकालीन भारतीय विचारपरंपरेंत ज्या सूक्ष्म शरीराचा अथवा लिंगदेहाचा उल्लेख येतो, तशा प्रकारचें हें परलोकींचें शरीर असावें. मृत शरीराचा मरणोत्तर स्थितीशीं जो संबंध आहे तो महत्त्वाचा आहे असें मानण्याचें कारण मृताच्या अस्थि न सांपडणें, ही एक मोठी शिक्षा समजली जात असे हें होय (श. ब्रा. ११.६.३,११; १४.६.९,२८). ऋग्वेदांत एके ठिकाणीं (ऋ. १०.१६,३) मृताच्या नेत्राला सूर्याकडे व त्याच्या आत्म्याला म्हणजे श्वासाला वायूकडे जाण्यास सांगितलें आहे. ह्या कल्पना ‘पुरुष’विषयक कल्पनांवरून (ऋ. १०.९०,१३) सुचल्या असाव्यात. कारण पुरुषाच्या नेत्राचा सूर्य बनतो व त्याच्या श्वासाचा वायू बनतो असें पुरुषसूक्तांत म्हटलें आहे. आत्मा जनांमध्यें किंवा ओषधींमध्यें जातो असें जें विधान आहे (ऋ. १०.९०; १०.५८,७), त्यांत आत्मा शरीरांतर करतो, या कल्पनेचें बीज दिसतें.

पितर ज्या मार्गानें गेले त्या मार्गानें जाऊन (ऋ. १०. १४,७); मृताचा आत्मा शाश्वत प्रकारच्या लोकांत जातो (ऋ. ९.११३,७). अग्नीनें राक्षसांनां ज्या पंखांनीं मारिलें (वा. सं. १८.५२); त्या पंखांवर बसून हा आत्मा जातो, व देवाप्रमाणें त्याच्या ठिकाणीं तेजःसंपन्नता येते (अ. वे. ११.१,३७). तो रथांतून जातो असाहि उल्लेख येतो (अ. वे. ४.३४,४). मरुद्गण त्याला पुढें नेत असतात, मंद वारे त्याला पंख्याप्रमाणें वारा घालतात, वृष्टीनें त्याला थंडपणा येतो आणि अशा रीतीनें उच्च लोकांकडे प्रवास करून मृताचा आत्मा आपलें जुनें शरीर पूर्ण स्वरूपांत पुनः धारण करतो (अ. वे. १८.२,२१ ते २६); आणि या वैभवाच्या स्थितींत सर्वांत उंच द्युलोकांत यमाच्या संगतींत आनंद करणाऱ्या पितरांच्या सान्निध्यांत तो जातो (१०.१४,८ व १०; १०.१५४,४ व ५). आत्म्याच्या या द्युलोकांत येण्याचा उल्लेख आत्मा घरीं परत आला अशा शब्दांनीं केला जातो (ऋ. १०.१४,८). यमानें हा आपला असें ओळखलें म्हणजे तो या आत्म्याला विश्रांतीचें स्थान देतो (अ. वे. १८.२,३७; ऋ. १०.१४,९).

शतपथ ब्राह्मणामध्यें अशी एक कल्पना सर्वसामान्य म्हणून दिली आहे कीं, मृतांनां दोन अग्नींमधून पुढें जावें लागतें. हे दोन अग्नी दुष्टांनां जाळून टाकतात व चांगल्यांनां पुढें जाऊं देतात. हीं चांगलीं माणसें पितरांच्या मार्गानें जातात किंवा सूर्याकडे जाण्याच्या मार्गानें जातात (श. ब्रा. १.९,२,३; इ.) उपनिषदांमध्यें ब्रह्मवेत्त्याला दोन मार्ग सांगितलेले आहेत. पूर्णज्ञानी असेल त्याला ब्रह्माकडचा मार्ग सांगितला आहे व दुसरा मार्ग स्वर्गांत जाणारा आहे. स्वर्गांत गेलेला आत्मा आपल्या सत्कर्मांचीं फलें भोगून झाल्यावर पुनः पृथ्वीवर येऊन जन्म घेतो. आत्मज्ञान ज्यांनां नाहीं ते राक्षसपिशाचांच्या अंध लोकांत जातात, किंवा दुष्टाप्रमाणें पृथ्वीवर पुन्हां जन्म घेतात.

**स्वर्ग.**—पितर आणि यम राहतात ती जागा आकाशाच्या मध्यभागीं आहे (ऋ. १०.१४,१५). ती जागा सगळ्यांत उंच आकाशांत आहे. ती तिसऱ्या द्युलोकांत असून आकाशाच्या अति खोल जागीं आहे. तेथें शाश्वत प्रकाश आहे. (ऋ. १०.१४,८; ९.११३,७ ते ९). अथर्ववेदांत या जागेचें वर्णन सर्वांत उंच असणारें ज्योतिर्मय विश्व (अ. वे. ११.४,११; ४.३४,२), आकाशाचें शिखर (अ. वे. १८.२,४७), तिसरें आकाश आणि तिसरा स्वर्ग असें केलें आहे (अ. वे. ९.५,१ व ८; १८.२,४८). मैत्रायणि संहितेंत पितृलोक म्हणजे तिसरा लोक असें वर्णन आहे (मै. सं. १.१०,१८; २.३,९); ऋग्वेदांत पितृलोक म्हणजे सूर्याचा अति उंच भाग असेंहि वर्णन आहे (ऋ. ९. ११३,९); पितर हे सूर्याशीं संयोग पावतात, ते त्याचें रक्षण करतात (ऋ. १०.१०७,२; १०.१५४,५); त्यांच्या करितां सूर्य आकाशांत प्रकाशतात (ऋ. १.१२५,६); पितरांचा विष्णूच्या पावलांशीं योग होतो (ऋ. १०. १५,३); धार्मिक लोक विष्णूचें सर्वांत उंच जें पाऊल किंवा स्थान तें स्थान पाहून आनंदित होतात (ऋ. १.१५४,५); देव ज्या ठिकाणीं आनंद करतात तिकडे पोंचण्यासाठीं विष्णूनें तीन पावलें टाकलीं, त्याप्रमाणें जेथें धार्मिक लोक यज्ञ करतात तेथें पोंचण्यासाठीं सूर्य उषेच्या पाठीमागून जातो. जे सुकृती लोक स्वर्गांत जातात त्यांचाच तारे हे प्रकाश होत असें ताऱ्यांच्या संबंधानें वर्णन येतें (तै. सं. ५.४,१३; श. ब्रा. ६.५.४,८); पुराणपुरुषीं अत्रि अगस्त्य व सप्तर्षि वगैरे नक्षत्रपदाला चढविले गेले असें वर्णन आहे (तै. आ. १.११,१,२); यम आणि देव ज्या झाडाखालीं पान करतात त्या झाडाचा उल्लेख ऋग्वेदांत येतो. (ऋ. १०. १३५,१). अथर्ववेदामध्यें एका अंजिराच्या झाडाजवळ तिसऱ्या स्वर्गांत देव वस्ति करतात व पान करतात असें वर्णन आहे (अ. वे. ५.४,३).

मरणोत्तर स्थितीसंबंधाचे महत्त्वाचे उल्लेख ऋग्वेदाच्या नवव्या व दहाव्या मंडळांत येतात. या संबंधाचे थोडेसे उल्लेख पहिल्या मंडळांतहि येतात. कडक तपश्चर्या करणारे, लढाईंत प्राण देणारे वीर व यज्ञांत उदारपणानें दक्षणा देणारे यांनां पारितोषिकादाखल स्वर्ग मिळतो (ऋ. १०. १५४,२ ते ५; १.१२५,५; १०.१०७,२). अथर्ववेदामध्यें यज्ञदक्षणा देणाऱ्यांनां नानाप्रकारचीं सुखें मिळतात असा उल्लेख वारंवार येतो.

स्वर्गामध्यें मृताला आनंदमय जीवनक्रम लाभतो (ऋ. १०.१४,८; १०.१५,१४; इ.), या ठिकाणीं त्याच्या सर्व इच्छा पूर्ण होतात (ऋ. ९.११३,९ व ११), या ठिकाणीं त्याचें देवांशीं सान्निध्य असतें (ऋ. १०.१४,१४), विशेषतः यम आणि वरुण या दोन राजांच्या सहवासांत त्याचा काळ जातो (ऋ. १०.१४,७), स्वर्गामध्यें मृतांनां जरा येत नाहीं (ऋ. १०.२७,२१), त्यांनां तेथें सुंदर शरीर मिळतें व देवांनां ते प्रिय होतात (ऋ. १०.१४,८; १०. १६,५ इ.), तेथें मातापिता, पुत्र इत्यादि त्यांनां भेटतात (अ. वे. ६.१२०,३), पत्नी आणि अपत्यें यांचा योग तेथें होतो (अ. वे. १२.३,१७), तेथें शारीरिक व्यंग नसतें व दुसरी कोणत्याहि प्रकारची अपूर्णता तेथील जीवनांत नसते (ऋ. १०.१४,८; अ. वे. ६.१२०,३). तेथें आजार नाहीं, लंगडेपणा नाहीं, वांकडेतिकडे अवयव नाहींत (अ. वे. ३.२८,५). मृतांनां त्या लोकांमध्यें सर्व प्रकारें पूर्ण असे अवयव व शरीर लाभतें. इत्यादि वर्णन अथर्ववेदांत आणि शतपथ ब्राह्मणांत पुनः पुनः आलेलें आहे.

ऋग्वेदामध्यें मृत हे आनंद करितात असें सामान्य वर्णन पुष्कळ वेळां आलेलें आहे (ऋ. १०.१४,१०; १०.१५,१४; इत्यादि). ऋग्वेदांत एका ठिकाणीं (ऋ. ९.११३,७ ते ११); स्वर्गांत मिळणाऱ्या आनंदाचें विस्तरशः वर्णन आलें आहे. स्वर्गांत प्रकाश अक्षय्य असतो, तेथें जलप्रवाह अत्यंत वेगाचे असतात, तेथें गतीला निरोध नाहीं (तु. तै. ब्रा. ३.१२.२,९), तेथें सात्विक व आत्मिक अन्न आहे व तें भरपूर आहे, तेथें आनंद, सुख, समाधान, सर्व इच्छांची पूर्ति या गोष्टी आहेत, तेथें प्रेमाचा आनंद आहे (तै. ब्रा. २.४.६,६), तेथें भरपूर कामाचा आनंद आहे (अ. वे. ४.३४,२), तेथील आनंद हा पृथ्वीवरील अतिश्रेष्ठ आनंदाच्या शंभरपटीनें मोठा आहे (श. ब्रा. १४.७.१,३२ व ३३). या सुखी लोकांच्या स्वर्गांत गायन आहे, वादन आहे (ऋ. १०.१३५,७). सोम, घृत आणि मध यांचा येथें सारखा प्रवाह वहात असतो (ऋ. १०.१५४,१). घृताचे येथें मोठाले सांठे आहेत व दूध, मध आणि मद्य यांच्या मोठाल्या नद्या आहेत (अ. वे. ४.३४,५ व ६; श. ब्रा. ११.५.६,४); येथें नाना रंगाच्या वाटेल ती इच्छा पुरविणाऱ्या तेजस्वी गायी आहेत (अ. वे. ४.३४,८); येथें श्रीमंत, गरीब, समर्थ आणि गांजलेले असा भेद नाहीं (अ. वे. ३.२९,३). संहितांमध्यें आणि ब्राह्मणांमध्यें हा जो स्वर्गलोकींचा जीवनक्रम वर्णिला आहे त्याला उपनिषदांमध्यें देवलोकींच्या नाशवंत व कनिष्ठ प्रकारच्या सुखाचें स्थान दिलें आहे. या सुखानंतर पुनः जन्म येतो. उपनिषदांमध्यें ज्यांनां सत्याचें पूर्ण ज्ञान झालेलें आहे, त्यांनांच फक्त परमात्म्याशीं ऐक्य प्राप्त होऊन शाश्वत शांतीचा अक्षय्य आनंद व खरी अमरता प्राप्त होते असें मत व्यक्त झालें आहे. याप्रमाणें सुकृत करणाऱ्या मृत लोकांनां स्वर्गांत जो जीवनक्रम लाभत होता तो जीवनक्रम श्रमरहित व सुखोपभोगयुक्त समजला जात होता. या जीवनक्रमांत त्यांच्यांतील मृत्युलोकींचीं व्यंगें नाहींशीं झालेलीं

असत, व देवांच्या संगतींत गान, पान व शारीरिक भोग भोगीत ते काळ घालवीत.

याज्ञिकांची कल्पना स्वर्ग म्हणजे भौतिक सौख्यपूर्ण पृथ्वीपेक्षां जास्त आनंददायक असा लोक असावा अशी दिसते. स्वर्ग म्हणजे सुकृत करणारांचें जगत् आहे (ऋ. १०.१६,४). सुकृति आणि धार्मिक मनुष्य जे यज्ञ वगैरे व्यवस्थेनें करतात ते या जगांत आनंदांत राहतात. या स्वर्गामध्यें त्यांनीं पृथ्वीवर केलेल्या इष्टापूर्ताशीं त्यांचा संयोग होतो. ऋत्विग्वर्गास ज्या दक्षणा त्यांनीं दिल्या असतील त्याबद्दलचा मोबदला येथें त्यांनां मिळतो ( ऋ. १०.१५४,३ इ. ). ब्राह्मणग्रंथांत असें म्हटलें आहे कीं, जे विधिपूर्वक यज्ञ करतात, त्यांनां आदित्य, अग्नि, इन्द्र, वरुण, वायु, बृहस्पति, प्रजापति, ब्रह्मा यांच्याशीं सलोकता व सायुज्यता प्राप्त होते ( श. ब्रा. २.६.४,८; ११.४.४,२१; तै. ब्रा. ३.१०.११,६ ). तैत्तिरीय ब्राह्मणांत ( ३.१०.९,११ ) कोणी एक ऋषि आपल्या ज्ञानाच्या योगानें सुवर्णाचा हंस होऊन स्वर्गांत गेला व सूर्याशीं तादात्म्य पावला असें वर्णन आहे. तैत्तिरीय संहितेंत एका ठिकाणीं ( ६.६,९ ) कांहीं विवक्षित यज्ञयाग केल्यानें मनुष्य जीवंत स्वर्गाला पोंचतो अशी कल्पना आहे.

एका विवक्षित रीतीनें अभ्यास केला असतां मनुष्य मरणापासून मुक्त होऊन ब्रह्म्याशीं सात्मता पावतो ( श. ब्रा. १०.५.६,९ ), कांहीं एक गूढ गोष्ट ज्ञात करून घेतल्याचा मोबदला म्हणून मनुष्य या लोकांत पुन्हां जन्म पावतो ( श. ब्रा. १.५.३,१४ ). याप्रमाणें शतपथ ब्राह्मणांत कर्मफलप्राप्ति व देहांतरप्राप्ति या कल्पनांचीं बीजें सांपडतात. बऱ्याच प्राचीन सूत्रग्रंथांत या कर्मविषयक व पुनर्जन्माबद्दलच्या आणि स्वर्ग व नरक यांसंबंधीं कल्पना आढळून येतात इतकेंच नव्हे तर ब्राह्मणकाळाच्या उत्तर भागांत देखील म्हणजे छांदोग्य, बृहदारण्यक, कठ या जुन्यांत जुन्या उपनिषदांतहि या कल्पना परिपक्व अवस्थेंत दृग्गोचर होतात. कठोपनिषदांत नचिकेताची गोष्ट आहे ( पृ. १७७ पहा ). हा नचिकेता मृत्यूच्या दरबारांत जातो तेथें मृत्यु त्याला असें सांगतो कीं, ज्यांचें पुण्य, स्वर्ग आणि अमरत्वप्राप्तीपुरतें नाहीं ते पुनः पुनः मृत्यूच्या कवजांत सांपडतात व संसारांत पुनः येतात. इहलोकीं त्यांनां शरीर प्राप्त होतें किंवा ते एखादा अचेतन पदार्थ होऊन येतात. जो आत्म्याचें संयमन करतो तो विष्णूच्या अति उंच स्थानाप्रत पोंचतो. आपल्या कर्मानें जे अधम ठरतात त्यांच्याकरितां नरक असतो.

**नरक.**—ऋग्वेदसूक्तांत पुण्य केलेल्या लोकांनां मरणोत्तर त्याचा मोबदला मिळतो अशा तऱ्हेच्या कल्पना आढळतात. त्या अर्थी जे दुर्जन आहेत त्यांनांहि मरणोत्तर कसलें तरी स्थान प्राप्त होतें अशा तत्कालीन कल्पना असाव्यात असें दिसतें. अथर्ववेदांत आणि कठोपनिषदांत नरकाची कल्पना निःसंदेह स्वरूपांत आली आहे. राक्षसी व चेटक्या यांचें स्थान खालीं असून त्याला नरकलोक असें नांव आहे ( अ. वे. २.१४,३; आणि ५.१९,३ ) व यमाच्या वर असलेल्या लोकाला स्वर्गलोक असें नांव आहे ( अ. वे. १२.४,३६ ). नरकलोकांत खुनी मनुष्य जातो ( वा. सं. ३०.५ ). अथर्ववेदामध्यें नरकाला अधमतम, कृष्णतम आणि अंधतम अशीं नांवें दिलेलीं आढळतात ( अ. वे. ८.२,२४; ५.३०,१८; १८.३,३ ). अथर्ववेदांत एके ठिकाणीं नरकांत होणाऱ्या यातना वर्णिलेल्या आहेत ( अ. वे. ५.१९ ). शतपथ ब्राह्मणांत ( ११.६,१ ) नरकयातना विस्तारानें वर्णिलेल्या आहेत. येथें केलेल्या दुष्कर्माबद्दल पुढच्या लोकीं शिक्षा मिळते ही कल्पना ब्राह्मणकालापूर्वी स्पष्टपणें व्यक्त झालेली नाहीं. शतपथब्राह्मणांत असेंहि सांगितलें आहे कीं, मरणानंतर प्रत्येकाचें वजन करितात व त्याच्या चांगल्या वाईट कृत्याप्रमाणें त्याला बक्षिस किंवा शिक्षा मिळते ( श. ब्रा. ११.२.७,३३ तु. १२.९.१,१ ). ही शिक्षेची व बक्षिसाची कल्पना इराणी ग्रंथांतहि आहे. रोट याच्या मतें ऋग्वेदामध्यें नरकाची कल्पना नाहीं. त्याच्या मतें दुष्टांचा नाश मरणानें होतो असें ऋग्मंत्रांवरून होतें. तरी पण ऋग्वेदांत नरकासंबंधाची थोडीफार कल्पना असल्याबद्दलचा पुरावा मिळतो. दुराचारी व असत्य लोकांसाठीं ही खोल जागा निर्माण केली आहे. ( ऋ. ४.५,५ ); दुराचारी लोकांनां अगाध अंधकारांत फेंकून देण्याविषयीं इन्द्रसोमाची प्रार्थना केली आहे ( ऋ. ७.१०४,३ ). सूक्तकारानें अशीहि प्रार्थना केली आहे कीं, घुबडाप्रमाणें लपत फिरणारी जी दुष्ट राक्षसी ती अंत ना पार अशा गर्तेमध्यें पडावी ( ऋ. ७.१०४,१७ ); व शत्रू आणि लुटारू या लोकांनां पृथ्वीच्या खालीं टाकून दिलें जावें. याप्रमाणें ऋग्वेदांत जो पुरावा सांपडतो तो थोडा आहे व त्यावरून नरक म्हणजे पृथ्वीखालीं असणारा अंधकाराचा खड्डा असावा अशी कांहीं तरी तत्कालीनांची कल्पना असावी एवढेंच सिद्ध होतें. ऋग्वेदांतील कवींचें लक्ष या लोकांतील सुखाकडे होतें व त्यांनीं दुसऱ्या लोकीं मिळणाऱ्या सुखांचा विचार क्वचितच केला असल्यानें त्या लोकीं मिळणाऱ्या शासनाकडेहि त्यांनीं सहजच लक्ष पुरविलें नाहीं. ब्राह्मणग्रंथांतील कल्पना अशा दिसतात कीं, मरणानंतर चांगले व वाईट दोन्ही प्रकारचे लोक परलोकीं जन्म घेतात व त्यांच्या कृत्याप्रमाणें त्यांनां फळ मिळतें ( श. ब्रा. ६.२.२,२७; १०.६.३,१ ). पण या ग्रंथांमध्यें चांगलें किंवा वाईट फळ शाश्वतचेंच मिळतें असा उल्लेख नाहीं. अशीहि कल्पना या ग्रंथांतून दिसते कीं, ज्यांनां यज्ञयागाचे विधी बरोबर समजत नाहींत व ज्यांचेकडून या विधीचें आचरण यथासांग होत नाहीं त्यांनां आपलें इहलोकींचें आयुष्य संपण्यापूर्वी परलोकीं जावें लागतें ( श. ब्रा. ११.२.७,३३ ).

सर्व मृतांनां न्यायासनापुढें उभें राहिलें पाहिजे ही जी ख्रिस्ती व तदुत्तरकालीन मुसुलमान संप्रदायांतील कल्पना तशा प्रकारची कल्पना वेदकाळामध्यें प्रचलित असल्याचें दिसत नाहीं. ऋग्वेदांत एक दोन ठिकाणीं अशा प्रकारच्या वृत्तीचा अंधुक उल्लेख ख्रिस्ती संशोधकांस सांपडतो असें वाटतें. परंतु त्यांच्या मतेंच हा उल्लेख इतका अस्पष्ट आहे कीं, त्याजवरून कोणतेंहि अनुमान काढतां येत नाहीं. (तै. आ. ६.५,१३) येथें यमापुढें खरे आणि खोटे निवडले जातात असें म्हटलें आहे. परंतु यम हा न्यायाधीशाचें काम करितो असा तेथेंहि भावार्थ दिसत नाहीं. इन्डोयूरोपीय काळांत नरकाची कल्पना असावी असें वेबरचें मत आहे. ग्रीक भाषेंत फ्रेग्वाय असा शब्द आहे. या फ्रेग्वाय शब्दाला समानरूप असा संस्कृतांत भृगु शब्द आहे व फ्रेग्वाय आणि भृगु यांच्या कथांमध्यें थोडेंसें साम्य आहे, या आधारावर वेबरनें आपलें मत बनविलें आहे. शतपथ ब्राह्मणांत भृगूची अशी कथा आहे कीं, त्याच्या बापानें म्हणजे वरुणानें त्याला त्याचा गर्वपरिहार होण्यासाठीं नरकाच्या यातना पाहण्यास पाठविलें व फ्रेग्वाय याची कथा अशी आहे कीं, गर्वामुळें त्यांनां नरकांत तीव्र यातना भोगण्याची शिक्षा मिळाली. या दोन कथांमधील साम्य केवळ यदृच्छामूलक आहे असें वाटतें. कारण नरकांत यातना भोगावयास जाण्यासंबंधाची कल्पना भारतांत प्राचीन कालची नसून उत्तरकालीं ती येथें उद्भवली असें मानण्यास बराच पुरावा आहे.

**पितर.**—जे पुण्यशील मृतलोक तिसऱ्या स्वर्गांत असतात त्यांनां पितर असें नांव आहे. मनुष्य जातीचे पूर्वज अथवा मूळपुरुष (ऋ. १०.१५,८) ज्यांनीं पुराणमार्गांचें आक्रमण केलें त्यांनां पितर म्हणतात. अलीकडे मृत झालेले लोक ज्या मार्गांनीं आपल्या पूर्वज ऋषींनां भेटावयास जातात, ते मार्ग करणारे जे पूर्व ऋषी त्यांनां पितर म्हणतात (ऋ. १०.१४,२ व ७ इ.). विष्णूच्या तिसऱ्या पाउलाशीं यांचा संबंध आहे (ऋ. १०.१५,३). ऋग्वेदांतील दोन सूक्तें यांच्या स्तुत्यर्थ खर्च झालीं आहेत (ऋ. १०.१५; १०.५४). पितरांचीं कुळें नवग्व, वैरूप, अंगिरस, अथर्व, भृगु, वासिष्ठ या नांवांनीं प्रसिद्ध आहेत (ऋ. १०.१४,४-६; १०.१५,८). अंगिरसादि चार कुळें म्हणजेच अथर्ववेद रचणारीं व ऋग्वेदाचें दुसरें व सातवें मंडळ रचणारीं ऋषि-कुळें होत. या कुळांपैकीं अंगिरसाचा यमाशीं विशेष संबंध दिसतो (ऋ. १०.१४,३ व ५). कनिष्ठ, मध्यम, वरिष्ठ असें एक पितरांचें वर्गीकरण करतात. पूर्वींचें आणि अलीकडील अशा प्रकारचेंहि त्यांचें वर्गीकरण करतात. हे सर्व पितर त्यांच्या वंशजांनां माहित नसतात तरी अग्नीला ते सर्व माहित असतात (ऋ. १०.१५,१ व २ इ.).



अंतरिक्ष, पृथ्वी व आकाश या ठिकाणीं पितर राहतात असें वर्णन अथर्ववेदांत येतें (अ. वे. १८.२,४९).

प्राचीन पितरांनीं सोमयाग केला (ऋ. १०.१५,८). ते यमाबरोबर आनंद करतात, देवांबरोबर भोजनोत्सव करतात (ऋ. १०.१४,१०; ७.७६,४). देवांप्रमाणेंच त्यांचा जीवनक्रम असल्यानें देवांप्रमाणेंच त्यांनां सन्मान मिळतो. इन्द्र आणि देव यांच्या रथांवर ते बसून येतात (ऋ. १०.१५,१०). त्यांनां सोम प्रिय आहे (ऋ. १०. १५,१), ते दर्भासनावर दक्षिणेकडे बसतात आणि सोम पितात, पृथ्वीवर त्यांच्यासाठीं तयार होणाऱ्या सोमाविषयीं ते आतुर असतात; यम, त्याचा पिता विवस्वान् आणि अग्नि यांसह त्यांस बोलाविण्यांत येतें व यमाबरोबर त्यांनीं हवन केलेले पदार्थ भक्षण करावे अशी त्यांची प्रार्थना करण्यांत येते (ऋ. १०.१५,८ ते ११ इ.). हजारांच्या जमावांनीं ते येतात व यज्ञभूमीवर व्यवस्थेनें बसतात (ऋ. १०.१५, १० व ११). यज्ञांचे ठिकाणीं पितर येतात तेव्हां कांहीं दुष्ट पिशाचें मित्रांचें रूप घेऊन त्यांच्यामध्यें बसतात असें अथर्ववेदांत एके ठिकाणीं सांगितलें आहे (अ. वे. १८. २,२८).

पितरांचें अन्न म्हणजे त्यांनां दिलेले बलि होत. हा बलि स्वधा या नांवानें एके ठिकाणीं उल्लेखिला आहे (ऋ. १०. १४,३). स्वाहा शब्दानें देवांचा हवि उल्लेखिला आहे. उत्तर-कालीन विधीमध्यें दैनिक सवनांत पितरांचा व देवांचा भाग याचप्रमाणें स्पष्टपणें वेगळा वेगळा दाखविला आहे (श. ब्रा. ४.४,२२). पितरांचें अर्चन करतात, त्यांनीं आपल्या भक्तांचें म्हणणें ऐकावें, भक्तांकरितां त्यांनीं मध्यस्थी करावी व त्यांचें संरक्षण करावें, तसेंच त्यांच्या वंशजांनीं त्यांचा कांहीं अपराध केला असल्यास तो त्यांनीं क्षमा करावा व त्या अपराधाबद्दल वंशजांनां त्यांनीं कांहीं त्रास पोंचवूं नये, अशा प्रकारें पितरांची प्रार्थना करण्यांत येते (ऋ. १०.१५,२;५ व ६; तु. ३.५५,२). उषा, नद्या, पर्वत, द्यावापृथ्वी, पूषा, ऋभुगण यांच्या व पितरांच्या कृपेची याचना एकत्र केली जाते (ऋ. ६.५२,४; ६.७५,१०; ७.३५,१२ इ.). संपत्ति, संतति व दीर्घायुष्य मिळावें अशी त्यांची प्रार्थना केली जाते (ऋ. १०.१५,७ व ११ इ.). वसिष्ठाची त्यांनीं आपल्या वंशजांनां मदत यावी अशी प्रार्थना केली आहे (ऋ. ७. ३५,१; तु. १०.१५,८). तुर्वश, यदु, उग्रदेव याप्रमाणें कांहीं पूर्व पुरुषांची व्यक्तिशः प्रार्थना केलेली आहे (ऋ. १.३६,१८).

पितर हे अमर आहेत (अ. वे. ६.४१,३), त्यांनां देवहि म्हटलेलें आहे (१०.५६,४), अंगिरसकुळांतील पितर व दुसरे कांहीं पितृसंघ यांचे ठिकाणीं ऋषित्व आणि

देवत्व यांचें मिश्रण कल्पिलेलें आहे. देव जशीं विश्वघटनाविषयक कामें करतात, तशीं कांहीं कामें पितर करतात असेंहि कल्पिलेलें आहे. त्यांनीं आकाशामध्यें नक्षत्रें बसवून तें सुशोभित केलें. त्यांनीं रात्रीचे ठिकाणीं अंधार व दिवसाचे ठिकाणीं प्रकाश ठेविला (ऋ. १०.६८,२१). त्यांनीं लपलेला प्रकाश शोधून काढला व उषेला जन्म दिला (ऋ. ७.७६,४). सोमाच्या संगतीनें द्यावापृथ्वीचा त्यांनीं विस्तार केला.

देवांकडे त्यांचें हव्य घेऊन जाणारा अग्नि हा प्रेतभक्षक अग्नीपासून जसा निराळा मानला आहे (ऋ. १०.१६,९), तसा देवांचा मार्ग व पितरांचा मार्ग हे वेगळे असें म्हटलें आहे (ऋ. १०.२,७; १०.१८,१ इ.). शतपथ ब्राह्मणांत पितृलोक आणि स्वर्गलोक निराळे मानले आहेत. स्वर्गलोकाचें द्वार ईशान्येस असून पितृलोकाचें द्वार आग्नेयीस आहे असें म्हटलेलें आहे (श. ब्रा. ६.६.२,४; १३.८.१,५). पितर हे मनुष्यापासून निराळे आहेत व पितरांनां स्वतंत्रपणें उत्पन्न केलें आहे असें तैत्तिरीय ब्राह्मणांत म्हटलें आहे (तै. ब्रा. ८.३.८,२).

**यम.**—सुखसंपन्न मृतांचा मुख्य यम होय. ऋग्वेदांतील कवींच्या विचारांत मरणोत्तर स्थितीसंबंधाचे विचार फार थोडे येत असल्यानें यमाला उद्देशून फक्त तीन सूक्तें केलेलीं आढळतात (ऋ. १०.१४; १०.१३५; १०.१५४). यम आणि यमी यांचा संवाद हें एक आणखी यासंबंधीं सूक्त आहे (ऋ. १०.१०). ऋग्वेदांत यमाचें नांव ५० वेळां आलेलें आहे व तें फक्त पहिल्या आणि दहाव्या मंडळांत आलेलें आहे. तो देवांच्या संगतींत आनंद करितो (ऋ. ७.७६,४; १०.१३५,१). यमाबरोबर ज्या देवतांचीं नांवें येतात त्या देवता म्हणजे वरुण (१०.१४,७), बृहस्पति (१०.१३,४) आणि अग्नि या होत. अग्नि हा मृतांनां घेऊन जाणारा असल्यानें त्याचें आणि यमाचें नातें साहजिकच जवळचें आहे. अग्नि हा यमाचा मित्र आहे (ऋ. १०.२१,५). तो यमाचा पुरोहित आहे (ऋ. १०.५२,३). यमानें लपलेल्या अग्नीला शोधून काढलें (ऋ. १०.५१,३). अग्नि, यम आणि मातरिश्वन् हीं एकाच परमेश्वराचीं नांवें आहेत असें एका ठिकाणीं सांगितलें आहे (ऋ. १.१६४, ४६). अग्नि व इतर देवता यांच्या समूहांत यमाचेंहि नांव सांपडतें (ऋ. १०.६४,३; १०.९२,११).

याप्रमाणें यम हा देव आहे असें ध्वनित केलें आहे. त्याला देव मात्र म्हटलेलें नाहीं, त्याला मृतांवर शासन करणारा राजा असें म्हटलें आहे (ऋ. ९.११३,८; १०.१६,९). मृत मनुष्य स्वर्गांत गेल्यावर यम आणि वरुण यांच्यासमोर जातो (ऋ. १०.१४,७). यमाला उद्देशून एका सूक्तांत यमाचा पितरांशीं विशेषतः अंगिरसांशीं संबंध दाखविलेला आहे (ऋ. १०.१४,३ व ५). अंगिरसांबरोबर तो यज्ञाला येतो व तेथें आनंद करितो (ऋ. १०.१४,३ व ४; १०.१५,८). तैत्तिरीय आरण्यकांत (६.५,२) यमाच्या घोड्यांचा उल्लेख आहे. यमाचे घोडे हिरण्यनेत्र व लोहमय खुरांचे आहेत असें वर्णन आहे. यम हा लोकांनां एकत्र करितो (ऋ. १०.१४,१), मृताला विसांव्यासाठीं स्थान देतो (ऋ. १०.१४,९; अ. वे. १८.२,३७) व त्याच्याकरितां वसतिस्थान तयार करितो (ऋ. १०.१८,१३).

यमाचें घर आकाशाच्या अगदीं दूरच्या भागांत आहे (ऋ. ९.११३,८). तीन स्वर्गांपैकीं दोन सवित्याचे आहेत व एक यमाचा आहे (ऋ. १.३५,६). हा यमाचा स्वर्ग सर्वांत उंच व तिसरा आहे. वाजसनेयी संहितेंत (१२.६३) यम आणि यमी हीं स्वर्गांत सर्वांत उंच ठिकाणीं राहतात असें म्हटलें आहे. यमाचें वसतिस्थान देवांचें घर असून यमाभोंवती गायन आणि अलगुज वगैरे वाद्यांचें वादन चालू असतें (ऋ. १०.१३५,७).

यमाकरितां सोम तयार करितात, त्याला घृतहि हवन करितात (ऋ. १०.१४,१३). आपल्या भक्तांनां त्यानें देवांकडे न्यावें व दीर्घ आयुष्य द्यावें अशी त्याची प्रार्थना करितात. (ऋ. १०.१४,१४).

विवस्वान् हा यमाचा पिता होय (ऋ. १०.१४,५). व सरण्यू ही त्याची माता होय (ऋ. १०.१७,१). वैवस्वत हें नांव यमाला दिलेलें पुष्कळ वेळां आढळतें (ऋ. १०.१४,१ इ.) वैवस्वत हें नांव इन्डो-इराणी काळांत वेगळ्या स्वरूपांत सांपडतें. अवेस्तामध्यें वीवह्वन्त हा पहिल्यानें सोमसवन करणारा मनुष्य म्हणून सांगितला आहे आणि त्याला या सोमसवनाबद्दल बक्षिस म्हणून यिम हा पुत्र मिळाला आहे. अथर्ववेदांत (१८.२,३२) यम हा विवस्वतापेक्षां श्रेष्ठ असून त्याजपेक्षां कोणीहि श्रेष्ठ नाहीं असें वर्णन आलेलें आहे.

ऋग्वेदांत १०.२०,४ या ठिकाणीं यम आणि यमी हीं आपणाला गंधर्व आणि अप्सरा (अप्या योषा) यांची संतती म्हणवितात. यम हा एकटाच मर्त्य आहे असा उल्लेख यमीचे बोलण्यांत येतो (ऋ. १०.१०,३). दुसऱ्या एका सूक्तांत यमानें मरण पतकरून आपल्या देहाचा त्याग केला असें म्हटलें आहे (ऋ. १०.१३,४). तो दुसऱ्या लोकांत गेला. बहुतांकरितां त्यानें मार्ग शोधून काढिला. जुने पितर ज्या ठिकाणीं गेले त्या ठिकाणीं जाण्याचा मार्ग त्यानें शोधून काढिला (ऋ. १०.१४,१ व २). मर्त्यांपैकीं प्रथम मृत्युवश जाहलेला असा हा यम होय (अ. वे. १८.३,१३), या

ठिकाणीं मर्त्य म्हणजे मनुष्य असाच अर्थ घ्यावयास पाहिजे. मर्त्य म्हणजे देव असाहि पुढें अर्थ होऊं लागला. मृतांमध्यें पहिला व सर्वांत जुना असा हा यम असल्यानें त्यानंतर मृत्युवश झालेल्या लोकांचा तो सहजच नायक मानला गेला. त्याला विश्पति म्हणजे वसति करणारांचा नायक असें नांव आहे. आमचा पिता असेंहि त्याला उद्देशून म्हटलें आहे ( ऋ. १०.१३५,१ ) मनुष्यांनां उत्तरकालीन ग्रंथांत विवस्वान् आदित्याचे वंशज असें म्हटलें आहे तें यमाच्या व त्यांच्या संबंधामुळें म्हटलेलें दिसतें ( तै. सं. ६.५,६ श. ब्रा. ३.१.३,४ ऋ. १.१०५,९ ). यमाचा आणि सूर्याचा संबंध असल्याचें ऋग्वेदावरूनहि दिसतें. यमानें दिलेला दिव्य घोडा ( सूर्य ) असा जो ( ऋ. १.१६३ ) उल्लेख आहे त्याचा अर्थ अमर झालेल्यांनां यमानें दिलेलें सूर्यलोकींचें स्थान हा कदाचित् असावा. मृत्यु हा यमाचा मार्ग आहे ( ऋ. १.३८,५ ). एके ठिकाणीं ( ऋ. १.१६५,४ ) मृत्यु म्हणजेच यम असें विधान केल्याचें दिसतें. यमाचा पायांतील खोडा हा वरुणाच्या पाशाप्रमाणेंच आहे ( ऋ. १०.९७,१६ ).

या प्रकारचे यमाचे गुण असल्यानें ऋग्वेदकालीं यमाची थोडीफार भीतीच वाटत असली पाहिजे. अथर्ववेदांत व तदुत्तरकालीन यमविषयक कथांत मरणाचे भीतिजनक देखावे यमाशीं निकटसंबद्ध झाल्यानें यम हा मृत्यूचा देवच होऊन बसला. उत्तरकालीन संहितांत अंतक व मृत्यु यांच्याबरोबर यमाचें नांव येतें. निर्ऋति म्हणजे रोग ( अ. वे. ६.२९,३ मै. सं. २.५,६ ) याबरोबर यमाचें नांव येतें. मृत्यु हा यमाचा दूत म्हणून सांगितला आहे ( अ. वे. ५.३०,१२ ). मृत्यु हा मनुष्यांचा स्वामी आहे, यम हा पितरांचा स्वामी आहे असें अथर्ववेदांत सांगितलें आहे ( अ. वे. ५.२४,१३ व १४ ). झोंप यमाच्या राज्यांतून येते ( ऋ. १९.५६,१ ).

यम या शब्दाचा अर्थ जुळें असा आहे. या अर्थानें हा शब्द ऋग्वेदांत पुष्कळ वेळां आलेला आहे. यम हा शब्द लगाम या अर्थानें वेदांत थोड्या वेळां आलेला आहे. यमीचा यम हा जुळा भाऊ होता ( ऋ. १०.१० ). अवेस्तामध्येंहि यम याला जुळेपणाचा अर्थ आहेसा दिसतो ( यस्न. ३०.३ ). अवेस्तामध्यें आढळत नाहीं तरी त्यानंतरच्या वाङ्मयांत यिम याला एक बहीण होती असें सांगितलें आहे व या बहिणीचें नांव यिमे असें असून या भावाबहिणींनीं पहिलें मनुष्याचें जोडपें उत्पन्न केलें असें वर्णन आहे. भारतीय वाङ्मयाच्या उत्तरकालांत जेव्हां यम हा मृत्यूचा देव होऊन दुष्टांनां शासन करणारा झाला, तेव्हां त्याच्या नांवाची व्युत्पत्ति लावतांना, यम (नियंत्रण करणें) हा धातु त्या नांवाच्या मुळाशीं आहे असें मानूं लागले. पण ही व्युत्पत्ति वेदकालीं यमाविषयींच्या ज्या कल्पना होत्या त्या कल्पनांशीं नीटशी जुळत नाहीं.

उलूक म्हणजे घुबड आणि कपोत म्हणजे खबूतर हे यमाचे दूत मानले आहेत ( ऋ. १०.१६५,४ ). या ठिकाणीं यम म्हणजेच मृत्यु मानला असावा. यमाचे आणि मृत्यूचे दूत एकच आहेत असें दिसतें ( अ. वे. ८.८,११ ). वरील दूतांखेरीज यमाचे नेहमींचे दूत म्हणजे दोन कुत्रे असून त्यांचें विस्तारानें वर्णन ( ऋ. १०.१४ ) आलेलें आहे. त्यांनां चार डोळे आहेत, त्यांचें नाक रुंद आहे, रंगानें एक काळ्या पट्टयांचा करडा व दुसरा तपकिरी आहे, ते सरमेचे पुत्र होत. ते रस्त्यावर बसून यमलोकाचें रक्षण करितात ( ऋ. १०. १४,११; अ. वे. १८.२,१२ ). या कुत्र्यांच्या जवळून मृतानें नीट पुढें निघून जावें व यमाबरोबर आनंद करणाऱ्या पितरांस भेटावें असें सांगितलें आहे ( ऋ. १०.१४,१० ). मृताला यमानें या कुत्र्यांजवळ रक्षणार्थ नेऊन सोडावें आणि त्याचे रोग सर्व दूर करून यमानें त्याचें कल्याण करावें अशी यमाची प्रार्थना केलेली आहे.

यमाचे कुत्रे असुतृप म्हणजे जीवामध्यें तृप्ति मानणारे असतात, ते मनुष्याकडे बारीक नजर ठेवितात आणि यमाचे दूत म्हणून मनुष्यलोकांत सर्वत्र फिरतात. सूर्याचा प्रकाश नेहमीं मिळावा अशी त्यांची प्रार्थना केली जाते. या प्रकारच्या वर्णनावरून यमाच्या कुत्र्याचें काम कोण मनुष्य मृत्युवश होण्यासारखा आहे हें शोधून काढणें आणि यमाच्या राज्यांत शिरण्यासाठीं जे लोक आपला मार्ग क्रमीत असतात त्यांजवर नजर ठेवणें हें आहे असें दिसतें. अवेस्तामध्यें चार डोळ्यांचा पिंवळ्या कानाचा कुत्रा चिनवत पुलापाशीं पाहरा करितो असें सांगितलें आहे. हा पूल इहलोक आणि परलोक यांच्यामध्यें आहे. हा कुत्रा पवित्राचरणी मनुष्यांच्या अंतरंगांतून राक्षसाला आपल्या भुंकण्यानें पळवून लावतो. हा राक्षस या पवित्र लोकांनां नरकांत ओढून नेईल अशी भीति असते. यमाचे दोन कुत्रे दुर्जनांच्या आत्म्यांनां यमाच्या राज्याबाहेर ठेवण्याचें काम करीत होते अशी कल्पना असल्याबद्दल पुरावा फारसा नाहीं, तरीपण अशी कल्पना असणें शक्य दिसतें. ( ऋ. ७.५५,२ ते ५ ) या मंत्रांचा औफ्रेक्ट याच्या मतें असा अर्थ होतो कीं, वरील कुत्र्यांचा उपयोग दुर्जनांनां बाहेर ठेवण्याकडे केला जात होता. अथर्ववेदांत यमाच्या दूतांचा उल्लेख करतांना अनेकवचन अथवा द्विवचन घातलेलें आहे. यमाच्या दोन कुत्र्यांपैकीं एक काळा व दुसरा करड्या रंगाचा काळ्या पट्टयांचा आहे असें वर्णन आहे ( अ. वे. ८.१,९ ). ब्लूमफील्डच्या मतें यमाचे दोन कुत्रे म्हणजे चंद्र आणि सूर्य होते. बरगाइनच्या मतें हे कुत्रे म्हणजे अग्निरूप यम आणि यमी यांचींच रूपें होत.

वेदामध्यें व इतर प्राचीन ग्रंथांत जे यमासंबंधीं उल्लेख सांपडतात त्यांजवरून यम हा पुरुष निरनिराळ्या लोकांच्या परंपरागत कथांत आढळतो व या यमाकडे मृतांच्या आत्म्यांचें अधिपतित्व आहे असें दिसतें. यमाच्या कथांमध्यें तो मनुष्यजातीचा पहिला पिता असून पहिला मृत्युवश जाहलेला इसम हाच आहे असें वर्णन येतें व या त्याच्या आद्य स्थानावरूनच त्याचे ठिकाणीं अधिपतित्वाची कल्पना केली गेली. यम आणि यमी ( यिम आणि यिमे ) हें भावाबहिणींचें युग्म इन्डो-इराणी काळांतील कथेंत आहे. यमाला अगम्यगमनाच्या दोषांतून मुक्त करण्याचा जो प्रयत्न दिसतो ( ऋ. १०.१० ) त्याजवरून अशा प्रकारच्या गमनासंबंधींची कल्पना पूर्वी होती हें उघड होतें. इन्डो-इराणी काळांत यम हा सत्ययुगांतील राजा अशी कल्पना असेल. कारण अवेस्तामध्यें तो पृथ्वीवरील नंदनवनाचा राजा आहे, तर ऋग्वेदांत तो स्वर्गांतील नंदनवनाचा राजा आहे. यम हा आद्य मानव होय अशी फार प्राचीन कालापासून कल्पना असावी असें रोटचें व दुसऱ्या कांहीं पंडितांचें मत आहे. मेयरच्या मतें यम म्हणजे आत्मा अशीच आरंभींची कल्पना होती व यमी ही इन्द्राणीप्रमाणें मागाहून कवीच्या कल्पनेंतून निघाली. दुसऱ्या कांहीं पंडितांच्या मतें निसर्गांतील कांहीं घटनेला यम हें नांव प्रथम दिलें गेलें. कोणाच्या मतें अग्नीच्या विवक्षित रूपाला यम असें म्हणत. अस्तास जाणारा सूर्य याला यम हें नांव प्रथम पडून नंतर तो मृतांचा देव कल्पिला गेला, असें कांहीं लोकांचें मत आहे. हिलेब्रँटच्या मतें यम म्हणजे चंद्र होय. चंद्राचे ठिकाणीं मृत्यु हा स्पष्ट दिसतो. तो सूर्याचें मृत्युवश होणारें अपत्य आहे व त्याचा पितरांशीं निकट संबंध आहे. हिलेब्रँटच्या मतें फक्त इन्डोइराणी काळांतच यम हा चंद्र देव होता. पुढें अवेस्तांत अथवा वेदांत त्याचें हें स्वरूप राहिलें नाहीं. तेथें तो पृथ्वीवरील नंदनवनाच्या किंवा पुण्यशील मृतांच्या लोकाचा राजा मानला गेला.

---

## प्रकरण १७ वें.

### ब्राह्मणोक्त व सूत्रोक्त यज्ञसंस्थेचें वर्णन.

आतांपर्यंत यज्ञसंस्थेचा जो इतिहास सांगितला त्यांतील बहुतेक भाग यज्ञसंस्था दृढ होण्यापूर्वींच्या कालचा म्हणजे ऋग्वेदाच्या मंत्रकालींच्या स्वरूपाचा होय. यजुर्वेदाचें पृथक्करण करतांना ब्राह्मणोक्त यज्ञसंस्थेचें स्पष्टीकरण बरेंचसें झालें आहे. तथापि तेवढ्यानें यज्ञ म्हणजे कसा असतो हें स्पष्ट होत नाहीं, यासाठीं विधींच्या वर्णनाकडे वळलें पाहिजे. हा क्लिष्ट भाग वाचकांस वाचावयास लावावयाचें जितकें दूर ढकलतां आलें तितकें ढकललें. पण जें वैदिक धर्माची माहिती होण्यासाठीं जाणलेंच पाहिजे तें देण्यांवाचून आम्हाला गत्यंतर नाहीं. यासाठीं सोमयाग व एकरात्रक्रतूपासून द्वादशाह म्हणजे बारा दिवसांच्या क्रतूपर्यंत यागांचें स्थूल वर्णन देतों. या यागांपेक्षां मोठे याग म्हणजे सत्रें. त्यांचें वर्णन मागें दिलें आहे तेवढें पुरें आहे. सत्रें अलीकडे होत नाहींत. सत्राचें सामान्य स्वरूप एवढेंच कीं, द्वादशाह क्रतूमध्यें जें अनुष्ठान चालतें तेंच आलटून पालटून अनेक दिवस चालविणें. लो. टिळकांनीं आपल्या "आर्टिक होम इन दि वेदाज" या पुस्तकामध्यें असें सांगितलें आहे कीं, दैनिक कर्मेंच पांच सात महिने चालून त्यांचा समुच्चय बनला आणि सत्रें तयार झालीं.

सोमयागाची माहिती झाली म्हणजे एकंदर यज्ञसंस्थेच्या बऱ्याच भागाची माहिती झाली. यागाच्या प्रकारामध्यें इष्टि, पशु, सोमयाग आणि चयन हे मुख्यस्वरूपबोधक प्रकार होत. पशुयागांत इष्टि येते; व सोमयागांत इष्टि व पशू हे प्रकार येतात. चयन, इष्टि, पशु, किंवा सोमयाग यांपैकीं कोणत्याहि यागास जोडतां येतो. पण त्याचा तो अवश्य भाग नव्हे. चयनाशिवाय हे तिन्ही विधी करतां येतात, पण चयन स्वतंत्रपणें होत नाहीं. सोमयागाचा मुख्य दिवस एकच असतो म्हणून तो एकरात्र क्रतुच होय. अग्निष्टोमाच्या क्रियेंत थोडेबहुत फरक होऊन अतिरात्र, उक्थ्य इत्यादि प्रकार होतात. त्यांचें सविस्तर वर्णन पुढें येईलच.

आतां सोमयागाच्या वर्णनाकडे वळूं.

सोमयागाची सामान्यपणें कल्पना येण्याकरितां 'अग्निष्टोम' नामक प्रथम किंवा प्रकृतिभूत अशा सोमयागाच्या अनुष्ठानाचा क्रम संक्षेपानें येथें देण्यांत येत आहे.

**दीक्षा घेणें**.—हा सोमयाग वसंतऋतूंत करावयाचा असतो. पौर्णिमा, अमावास्या किंवा प्रतिपदा यांपैकीं कोणत्यातरी एका तिथीस अग्निष्टोमसंबंधीं आरंभक अशी दीक्षणीयेष्टि करावयाची असते किंवा पूर्वोक्त तीन तिथींपैकीं एखाद्या तिथीस सोमयागाचा मुख्य म्हणजे सोम कुटून हवन करण्याचा दिवस येईल अशा रीतीनें दीक्षणीयेष्टि करण्यांत येते.

**अनुष्ठानारंभ**.—गार्हपत्याच्या पश्चिमेस दर्भासनावर बसून यजमानपत्नी अग्निष्टोमासंबंधीं प्रधानसंकल्प करतात. नंतर यजमान सोमप्रवाक म्हणून बोलावणेकऱ्यासारख्या एका ऋत्विजाची योजना करतो.

**ऋत्विङ्निमंत्रण**.—यजमानाच्या आज्ञेनें तो सोमप्रवाक सोमयागास लागणाऱ्या ब्रह्मा, होता, अध्वर्यु इत्यादि १६ अगर सदस्यांसह १७ ऋत्विजांकडे जाऊन त्यांना यजमानातर्फे सोमयागांत आर्त्विज्य करण्यासाठीं निमंत्रणें देतो.

**ऋत्विजांचें स्वागत**.—ऋत्विग्मंडळी यजमानाच्या घरीं आल्यानंतर त्यांचे स्वागतासाठीं यजमान मधुपर्कविधि करतो.

**अग्निसमारोप व यज्ञभूमिप्रवेश**.—नंतर देवयजनाचें ( यज्ञभूमीचें ) याचन झाल्यावर अरणींच्या ठिकाणीं अग्नीचें

समारोपण करून त्या अरणी व यज्ञसामग्री घेऊन यजमान-पत्नी व ऋत्विज वगैरे देवयजनस्थलांत प्रवेश करितात.

**प्राग्वंश मंडप**.—यज्ञभूमीच्या ठिकाणीं प्रथम प्राग्वंश-नामक मंडप तयार केला जातो. या मंडपावर आच्छादनासाठीं टाकलेले कळक प्राचीन म्हणजे पूर्वेस शेंडे करून घातले जातात. यामुळें या मंडपास प्राग्वंश किंवा प्राचीन-वंश अशी संज्ञा पडली आहे. प्राग्वंश मंडपाची लांबी पूर्वपश्चिम १६ प्रक्रम किंवा पाउलें असून रुंदी दक्षिणोत्तर १२ पावलें किंवा प्रक्रम असते. मंडपाच्या चारी दिशांनां चार व ईशान्य कोपऱ्यांत एक मिळून पांच दारें केलेलीं असतात. शिवाय चारी कोपऱ्यांनां चार झरोकीं राखिलेलीं असतात. दाराखेरीज बाकीचा सर्व मंडप सभोंवतीं कूड घालून बंदिस्त केलेला असतो.

**अग्निस्थापना**.—या प्राग्वंशमंडपांत कुंडें व वेदी वगैरे घालून त्या ठिकाणीं (कुंडांत) समारोपित अशा अरणींचें मंथन करून त्या योगानें उत्पन्न केलेल्या अग्नीची स्थापना केली जाते. नंतर आज्यसंस्कार करून **कूष्मांडहोम, द्वादशसंभार-यजुर्होम व सप्तहोतृहोम** केला जातो.

**दीक्षणीयेष्टि**.—त्यापुढें अग्निष्टोमसंज्ञक सोमयागाच्या अंगभूत अशा दीक्षणीयेष्टीचा प्रारंभ केला जातो. अग्निष्टोमास सुरवात झाल्यापासून तो समाप्त होईपर्यंत यजमान व पत्नी यांनीं खाण्या-पिण्याच्या व इतर आचारांच्या बाबतींत कांहीं विशिष्ट नियमांचा अंगिकार करावा लागतो व अशा नियमानें राहण्याला 'दीक्षा' अशी संज्ञा आहे. **दीक्षेसंबंधीं जी इष्टि ती दीक्षणीयेष्टि** होय. दीक्षणीयेष्टीमध्यें 'अग्नाविष्णू' या देवतेच्या उद्देशानें पुरोडाशाचें हवन केलें जातें. आज्येडाभक्षणापर्यंत दीक्षणीयेष्टीचें अनुष्ठान संपूर्ण झाल्यावर प्राग्वंशमंडपाच्या उत्तर दिशेस कूड घालून बंदिस्त केलेल्या एका जागेंत यजमान आपली हजामत करवितो व नखें काढवितो आणि नंतर स्नान करतो. केश-निकृंतनाखेरीज बाकी सर्व गोष्टी यजमानाबरोबर पत्नीहि करीत असते. स्नान झाल्यावर यजमान व पत्नी नवीं वस्त्रें यथाविधि परिधान करतात. नंतर उभयतां दूध, तूप इत्यादि हविष्य पदार्थांनीं युक्त असें भोजन करितात. नंतर उभयतां आपल्या अंगास लोणी चोळतात व डोळ्यांत काजळ अगर सुर्मा घालतात आणि दर्भांच्या अंकुरांनीं आपल्या शरीराच्या ठिकाणीं 'पवन' नामक संस्कार करवितात.

प्राग्वंशांत यजमानाचा प्रवेश.—नंतर यजमानाला अध्वर्यु व पत्नीला प्रतिप्रस्थाता असे दोघेजण दोघांनां प्राग्वंश मंडपांत आणून त्यांच्या नियमित जागीं बसवितात. नंतर दीक्षाहुती घातल्यावर यजमान वेदीमध्यें कृष्णाजिन पसरून त्यावर बसतो. पत्नीच्या डोक्याला रेशमी जाळी घालण्यांत येते. यजमान आपल्या कमरेला मोळाची एक तिपेडी दोरी गुंडाळतो व डोक्यास पागोटें गुंडाळतो. नंतर शरीर खाजविण्याकरितां वगैरे आपल्या हातीं हरणाच्या शिंगाचा एक तुकडा धारण करतो व उंबराचा दंडहि आपल्या हातांत ग्रहण करतो. नंतर संभारयजुःसंज्ञक मंत्राचें वाचन होऊन केशिनीसंज्ञक दीक्षेचा जप केला जातो. नंतर यजमान आपल्या मुठी वळतो. अध्वर्यु अमक्याचा पुत्र, अमक्याचा नातु व अमक्याचा पणतु आणि अमकीचा पुत्र, अमकीचा नातु व अमकीचा पणतु अमुक हा यजमान सोमयज्ञ करीत असल्याची खबर सर्वत्र जाहीर करतो. नंतर प्रवर्ग्यसंभरण नामक कर्म केलें जातें. दीक्षणीयेष्टीच्या पूर्वींहि प्रवर्ग्यसंभरण करून घेण्याची चाल आहे.

**प्रायणीयेष्टि**.—दीक्षणीयेष्टीच्या दुसऱ्या दिवशीं 'प्रायणीया' नांवाची इष्टि करण्यांत येते. पथ्यास्वस्ति, अग्नि, सोम, सविता व अदिति या प्रायणीयेष्टीच्या पांच प्रधानदेवता असून अदिती-शिवाय इतरांचें आज्यानें व अदितीचें तुपांत शिजविलेल्या भातानें हवन करण्यांत येतें. पथ्यास्वस्ति वगैरे चार देवतांचें अनुक्रमें चारी दिशेस व अदितीचें मध्यभागीं हवन करावयाचें असतें.

**सोमक्रय**.—प्रायणीयेष्टीचें अनुष्ठान संपल्यावर पुढें दिलेल्या रीतीनें 'सोमक्रय' म्हणजे सोमवल्ली विकत घेण्याचा विधि केला जातो. एक कालवड व इतर कांहीं वस्तु आणि गाडा वगैरे घेऊन यजमान वगैरे मंडळी सोम विकत घ्यावयाच्या ठिकाणीं जातात. नंतर सोम विकणारा (सोमविक्रयी) जो असेल त्यापासून मोबदल्याचे पदार्थ देऊन सोमवल्ली मोजून विकत घेण्याचा विधि होतो. सोम विकत घेतल्यावर त्या सोम विकणाराला लांकडाच्या ढलपटांनीं किंवा मातीच्या ढेंकळांनीं चोप देऊन घालवून देण्यांत येतें.

नंतर विकत घेतलेल्या सोमराजाला (वल्लीला) गाड्यांत घालून त्याला दोन बैल जोडले जातात व तो सोमराजाचा गाडा प्राग्वंशमंडपाचे द्वारीं आणण्यांत येतो. यावेळीं 'सुब्रह्मण्य'-नामक एक सामगायक ऋत्विज पळसाची डाहाळी हातीं घेऊन सोमराजाचा गाडा हांकण्याचें काम करीत असतो. सोमराजा प्राग्वंशाच्या द्वारांत येऊन पोंचण्यापूर्वींच यजमान, अध्वर्यु, ब्रह्मा वगैरे प्राग्वंशांत येऊन सोमराजाच्या आतिथ्यासाठीं कराव्या लागणाऱ्या इष्टीची तयारी करूं लागतात. सोमराजा प्राग्वंशाच्या द्वारांत येतांच एक बोकड त्याच्यापुढें भेटीदाखल घेऊन जाण्यांत येतो व राजाला बसविण्यासाठीं खुर्चीप्रमाणें एक घडवंची घेऊन जाण्याचीहि तजवीज झालेली असते.

**आतिथ्येष्टि**.—सोमराजा आल्यावर व त्याच्या गाड्याचा दक्षिण बाजूचा बैल सोडल्यानंतर अध्वर्यु सोमराजाच्या आतिथ्यासाठीं करावयाच्या आतिथ्येष्टीचा निर्वाप पत्नीच्या हस्तें करवितो. नंतर सोमराजाच्या गाड्याचा उत्तरेकडील बैल सोडून मग सोमराजाला गाड्यांतून उतरवून उंबराच्या लांकडाच्या (पूर्वोक्त) एका घडवंचीवर बसविला जातो. प्राग्वंशमंडपांत आहवनीयाग्नीच्या दक्षिणेस घडवंची मांडून तिच्यावर कृष्णाजिन पसरून नंतर त्यावर राजास बसविलें जातें. नंतर आतिथ्येष्टीचें काम पुढें चालू होतें.

'विष्णु' ही आतिथ्येष्टीची प्रधानदेवता होय. विष्णु देवतेच्या उद्देशानें नऊ कपालांवर तयार केलेल्या एका पुरोडाशाचें हवन केलें जातें. **तानूनप्त्र**—नंतर इडा भक्षणापर्यंत आतिथ्येष्टीचें अनुष्ठान संपविल्यावर अध्वर्यूनें कांशाच्या वाटीमध्यें विधिपूर्वक ठेवलेल्या

तुपाला स्पर्श करून सर्व ऋत्विज एकोप्यानें व प्रमादरहित असें अनुष्ठान करण्याविषयीं शपथ घेतल्यासारखा तानूनप्त्र नामक विधि करितात. मग यजमान व सर्व ऋत्विज यांजकडून सोमरसाच्या ठिकाणीं **आप्यायन**नामक संस्कार करण्यांत येतो आणि त्यापुढें वेदीमध्यें एकावर एक हात ठेऊन **निह्नव** म्हणजे एका विशिष्ट तऱ्हेचा नमस्कार करावा लागत असतो. **प्रवर्ग्य**–नंतर 'प्रवर्ग्य'-नामक अनुष्ठानास सुरवात होते. एकावर एक अशीं तीन वोळकीं एकास एक चिकटवून बनविलेलें असें एक पात्र मातीचें तयार केलेलें असतें त्यास **महावीर** म्हणतात. एका मातीच्या ओव्यावर तें 'महावीर' संज्ञक पात्र ठेऊन त्यासभोंवतीं अग्नि प्रज्वलित करण्यांत येतो. महावीरामध्यें तूप ओतून अग्नीच्या आंचीनें तें तूप कढविलें जातें. नंतर गाईचें व शेळीचें दूध त्या कडकडीत तापलेल्या दुधांत ओतण्यांत येतें. दुग्धमिश्र अशा त्या महावीरांतील कडकडीत तापलेल्या तुपास 'घर्म' अशी संज्ञा आहे. या घर्मसंज्ञक द्रव्याचें यथाविधि हवन करण्यांत येतें. महावीरसंज्ञक पात्र मातीच्या ओव्यावर ठेवल्यापासून तों 'घर्म' नामक द्रव्याचें हवन होईपर्यंतच्या अनुष्ठानांत वरचेवर प्रसंगानुसार होता कांहीं विशिष्ट मंत्रांनीं स्तुति करीत असून 'प्रस्तोता' हा सामगायन करीत असतो. घर्मसंबंधीं असणाऱ्या या सर्व अनुष्ठानास प्रवर्ग्य अशी संज्ञा आहे.

**उपसदिष्टि.**—प्रवर्ग्याचें अनुष्ठान झाल्यानंतर 'उपसत्' नामक एक इष्टि होत असते. अग्नि, सोम व विष्णु या तीन देवता उपसदिष्टीमध्यें प्रधानभूत होत. या तिन्ही देवतांच्या उद्देशानें 'उपसत्' इष्टीमध्यें तुपाचें हवन केलें जातें. प्रवर्ग्य व उपसत् इष्टि हीं दोन कृत्यें क्रमानें सकाळीं एकदां व दुपारीं एकदां मिळून रोज दोन वेळ अशीं तीन दिवस करावयाचीं असतात. मधल्या (दुसऱ्या) दिवशीं सकाळचा प्रवर्ग्य व उपसत् इष्टि समाप्त झाली म्हणजे सुब्रह्मण्याचें सामगायन होतें व लागलीच वेदीकरणास सुरवात केली जाते. प्राग्वंश मंडपाचे पुढें ३ प्रक्रम जागा टाकून एक शंकू ठोकतात व तेथून पुढें ३६ प्रक्रमांवर एक शंकू ठोकतात. ही महावेदीची पूर्वपश्चिम लांबी होय. पश्चिमेस ठोकलेल्या शंकूच्या दक्षिणोत्तर १५।१५ प्रक्रमांवर एकएक शंकू ठोकतात व पूर्वेस ठोकलेल्या शंकूच्या दक्षिणोत्तर १२।१२ प्रक्रमांवर एकएक शंकू ठोकतात. ही महावेदीची रुंदी होय. महावेदीच्या पूर्वेकडील बाजूचीं दक्षिणोत्तर टोंकें हीं महावेदीचे अंस असून पश्चिमेकडील बाजूचीं दक्षिणोत्तर टोकें या महावेदीच्या श्रोणी होत. महावेदीच्या उत्तरांसाच्या उत्तरेस एक लहानसें प्रक्रम अंतरावर ३६ अंगुळें हम चौरस असा एक खळगा खणतात. यास **चात्वाल** ही संज्ञा आहे. महावेदीच्या उत्तरांसापासून पश्चिमेस १२ प्रक्रमांवर व तेथून उत्तरेस एका प्रक्रमावर एक वेद्याकार स्थल तयार करतात त्याचें नांव **'उत्कर'**. महावेदीच्या ठिकाणीं स्फ्य, परशु इत्यादि साधनांनीं वेदीकरण संस्कार केला जातो. **उत्तरवेदी**–महावेदीमध्येंच पूर्वबाजूला मधोमध अशी एक ओटेवजा उत्तरवेदी केली जाते. ही उत्तरवेदी दहा पावलें हम चौरस केलेली असते. नंतर प्रवर्ग्य व उपसत् इष्टि झाल्यावर त्या दिवशींचें अनुष्ठान संपतें. तिसऱ्या दिवशीं प्रवर्ग्य व उपसत् इष्टि झाली म्हणजे दुपारच्या वेळेची वाट न पाहतां लागलीच पुन्हां प्रवर्ग्य व उपसत् इष्टि करतात. नंतर प्रवर्ग्योद्वासन नामक कर्मास प्रारंभ होतो.

**प्रवर्ग्योद्वासन**—प्रवर्ग्याची सर्वसामग्री घडवंचीवर ठेऊन त्या घडवंचीसह यजमान, पत्नी व अध्वर्युप्रभृति ऋत्विज उत्तरवेदीकडे येतात. मध्यें टप्याटप्याचे ठिकाणीं 'प्रस्तोता' **सामगायन** करीत असतो. उत्तरवेदीनजीक आल्यावर प्रवर्ग्याची सर्व सामग्री उत्तरवेदीवर चक्राकार मांडतात व तीवर दहींमध ओततात. आग्नीध्र नांवाचा ऋत्विज आपल्या खांद्यावर पाण्यानें भरलेला एक कलश घेतो व त्यांतील पाण्याची धार पाडीत पाडीत उत्तरवेदीसभोंवतीं तीन प्रदक्षिणा करतो. कांहीं मंत्र म्हणून ऋत्विजांनीं उपस्थान केल्यावर प्रवर्ग्योद्वासनाचें अनुष्ठान समाप्त होतें.

## अग्नीषोमीय पशु.

**अग्निप्रणयन.**—नंतर अग्निप्रणयन करण्यांत येतें आणि त्यापुढें सवनीय हविसंबंधीं शाखाहरण विधि करण्यांत येतो. पुढें हविर्धानसंज्ञक दोन गाडे केलेले असतात ते दोन गाडे महावेदीमध्येंच असणाऱ्या हविर्धान नामक मंडपांत नेऊन स्थापित करण्यांत येतात. एक गाडा दक्षिण बाजूस असतो त्यास दक्षिणहविर्धान व एक गाडा उत्तरबाजूस असतो त्यास उत्तरहविर्धान म्हणतात.

**हविर्धान मंडप.**—नंतर 'हविर्धान'नामक मंडप तयार करण्याचा समंत्रकविधि करण्यांत येतो. दक्षिण हविर्धानाच्यापुढें **'उपरव'** संज्ञक चार खळगे खणून तयार करतात. प्रत्येक खळग्याचा व्यास टीचभर असतो. चार कोंपऱ्यांत चार खळगे असून प्रत्येक खळग्यामध्यें एका टिचेचें अंतर असतें. या चारहि उपरवांचे संस्कार यथाविधि करण्यांत येतात. उपरव खणतांना जी माती निघते ती उपरवांच्या पुढच्या बाजूस पसरून सोमरसाचीं पात्रें मांडून ठेवण्यासाठीं एक चौकोनी ओटा तयार करतात. त्या ओट्यास **'खर'** अशी संज्ञा आहे. उपरवावर **अधिपवणफलक** संज्ञक दोन फळ्या बसवितात व त्यावर कृष्णाजिन पसरून सोम कुटावयाचे चार दगडी वत्ते जुळून मांडून ठेवतात.

**आग्नीध्रीय मंडप.**—महावेदीच्या अर्धभागीं उत्तरबाजूस 'आग्नीध्रीय'नामक एक मंडप तयार करण्यांत येतो. **मार्जालीय मंडप.**—त्याचप्रमाणें दक्षिण बाजूस 'मार्जालीय' म्हणून एक मंडप तयार करण्यांत येतो. **सदनामक मंडप**–हविर्धान मंडपाच्या पश्चिमेस 'सद' नांवाचा एक मंडप तयार करण्यांत येतो. हा मंडप दक्षिणोत्तर १८ अरत्नी लांब व पूर्वपश्चिम ५ अरत्नी रुन्द असा असतो. 'सद' नामक मंडपाच्या मध्यभागीं **'औदुंबरी'**संज्ञक उंबराची मेढ विधिपूर्वक पुरण्यांत येते. 'सद' व 'हविर्धान' या दोन्ही मंडपांना पूर्वेस एक व पश्चिमेस एक अशीं दोन दोन दारें केलेलीं असतात.

चात्वालांतून माती उकरून घेऊन त्या मातीनें सदोमंडपांत टीचभर व्यासाचे हमचौरस अगर वर्तुळ असे सहा ओटे एक एक हाताच्या अंतरानें घालतात. त्याचप्रमाणें 'आग्नीध्रीय' मंडपांत एक व 'मार्जालीय' मंडपांत एक असे दोन ओटे घालतात.

या सर्व ओव्यांनां **'धिष्ण्य'** अशी संज्ञा आहे. नंतर अग्नींचें अन्वाधान करण्यांत येऊन 'अग्नीषोमीय' पशूच्या मुख्य अनुष्ठानास सुरुवात होते.

इध्मावर्हींचें आहरण करून पात्रासादन केलें जातें. आज्य-ग्रहणानंतर ब्रह्मा सोमराजाला उचलून घेतो.

**वैसर्जन होम.**—नंतर 'वैसर्जन होम' नामक कर्म होतें.

**अग्नीषोमप्रणयन.**—त्यानंतर अग्नीषोमप्रणयन करण्यांत येतें. यजमानपत्नी व त्यांच्या कुटुंबांतील सर्व माणसांसह अध्वर्यु वगैरे ऋत्विज अग्नि व सोमराजा यांनां घेऊन जातात. अग्नि उत्तर वेदीवरील अग्नींत मिश्र करण्यांत येतो व सोमराजा हविर्धानमंडपांत उक्त स्थलीं नेऊन ठेवण्यांत येतो. आज्या-सादनापर्यंत कर्म आल्यावर अग्नीषोमीय पशू बांधण्यासाठीं 'यूप' नामक स्तंभ उभारण्याचा विधि **(यूपोच्छ्रयण)** केला जातो. नंतर पशूचें **उपाकरण** म्हणजे अग्नीषोम देवतेला पशूचें समर्पण करण्याचा विधि होतो. पशु म्हणजे या ठिकाणीं बोकड घ्यावयाचा असतो. नंतर प्रवृत्ताहुती वगैरे कर्मास सुरवात होऊन पशूला मारण्यांत येतें. **वपायाग**—मेलेल्या पशूचें पोट फाडून **'वपा'** नांवाचा एक कागदासारखा पदार्थ पशूच्या कोठ्यास चिकटून असलेला सोडवून बाहेर काढण्यांत येतो आणि त्याचें हवन करण्यांत येतें. नंतर 'सुब्रह्मण्य' नामक एक ऋत्विज इन्द्राला निमंत्रणादाखल एक साम गातो व अमक्याचा अमुक नातु, पणतु, अमुक नांवाचा हा यजमान तुला यज्ञाला बोला-वीत आहे अशी त्याची प्रार्थना करितो. पुढें पशुपुरोडाशाचें निर्वपण करण्यांत येतें. पुरोडाश तयार होऊन वेदींत आणून ठेवल्यावर नदीमधून किंवा इतर वाहत्या जलप्रवाहामधून एक पाण्याची घागर अध्वर्यु भरून आणतो व शालामुखीय नामक अग्नीच्या पश्चिमेस ती ठेवून देतो. ह्या घागरींतील उदकास **'वसतीवरी'** अशी संज्ञा आहे. या पाण्याचा उपयोग दुसऱ्या दिवशीं सोमवल्ली कुटावयाचे वेळीं वगैरे करण्यांत येतो.

**पशुपुरोडाशयाग व अंगयाग.**—पशुपुरोडाशाचा याग झाल्यानंतर हवनशिष्ट अशा पुरोडाशाचें यजमान व कांहीं प्रमुख ऋत्विज भक्षण करतात. नंतर मारलेल्या पशूच्या शरीरापासून काढून घेतलेल्या निरनिराळ्या अंगांचें अग्नीमध्यें हवन होतें. हवन होऊन राहिलेल्या अंगांच्या अवशेषाचें यजमान व कांहीं ऋत्विज भक्षण करतात. नंतर राहिलेलें सर्व कर्म आटपल्यावर अग्नीषोमीय पशूचें अनुष्ठान समाप्त होतें.

**वसतीवरीपरिहरण.**—रात्रीं 'वसतीवरी' नामक पाण्यानें भरलेली घागर अध्वर्यु आपल्या खांद्यावर घेऊन यज्ञभूमीसभोंवती कांहीं विवक्षित रीतीनें प्रदक्षिणा घालतो व शेवटीं ती पाण्यानें भरलेली घागर आग्नीध्रीयमंडपांत नेऊन ठेवतो. **सुब्रह्मण्याह्वान**—नंतर पूर्वी सांगितल्याप्रमाणें इन्द्राला यज्ञाला येण्याविषयीं यजमानातर्फे विनंति करण्यादाखल 'सुब्रह्मण्य' हा ऋत्विज सामगायन करतो. नंतर दुसऱ्या म्हणजे मुख्य दिवशीं दहीं, आमिक्षा इत्यादि ज्या पदार्थांचें हवन करावयाचें आहे त्यांसंबंधीं **'दोह'** म्हणजे गाईचीं दुधें काढून तीं विरजून ठेवण्यांत येतात. नंतर सर्व ऋत्विज अलंकार वगैरे धारण करून आग्नी-ध्रीयमंडपांत रात्रीची वस्ती करतात. पत्नी प्राग्वंशांत जागत राहते आणि यजमान हविर्धानमंडपांत सोम (वल्ली) राजाचें संरक्षण करीत बसतो.

## सुत्याह किंवा सवनीयदिन.

**प्रातःसवन.**—मोठी पहांट झाली, म्हणजे सोमयागाच्या मुख्य दिवसाच्या अनुष्ठानास सुरवात करण्यांत येते.

प्रथम अध्वर्यु आग्नीध्रीयमंडपांतील धिष्ण्याग्नीवर **'यज्ञतनु'** संज्ञक ३३ आज्याहुती देतो. नंतर सवनीय पशूच्या अनुष्ठानास सुरवात होते. आज्यासादनांत कर्म झालें म्हणजे आग्नीध्रीय वगैरे मंडप व स्रुचा यांनां अभिमर्शन करण्यांत येतें. नंतर 'खर' नामक ओव्यावर सोमरस सांठविण्याचे लांकडी **ग्रह** (पेले) वगैरे पात्रें मांडून ठेवावयाचीं असतात. उपरवांवर फळ्या घालून त्यावर अधिषवणसंज्ञक चामडें पसरलेलें असतें. त्याच ठिकाणीं सोम कुटावयाचे वत्ते किंवा वरवंटे एकमेकाशीं तोंडें समोरासमोर जुळवून ठेवण्यांत येतात व त्याच्यावर वरीचशी सोमवल्ली काढून ठेवण्यांत येते. **प्रातरनुवाक**—नंतर अध्वर्यूच्या आज्ञेवरून 'होता' हा ऋत्विज प्रातरनुवाक संज्ञक मंत्रसमूह पठन करतो. नंतर सवनीय पुरोडाशाच्या पात्रांचें आसादन करण्यांत येतें. मग 'इन्द्र' देवतेच्या उद्देशानें **पुरोडाशादि हविर्द्रव्याचा निर्वाप** केला जातो.

नंतर एकंदर पांच प्रकारचीं हविर्द्रव्यें तयार करण्यांत येतात. १ **धाना** (कर्पट भाजलेले सातू), २ **करंभ** (भाजक्या सातूच्या पिठांत दूध मिश्रण केल्यावर बनलेला पदार्थ), ३ **परिवाप** (भाताच्या लाह्या), ४ **पुरोडाश**, ५ **पयस्या** किंवा **आमिक्षा** (नासक्या दुधाचा घट्ट चोथा) हीं तीं पांच हविर्द्रव्यें होत. नंतर चात्वालाशेजारीं एक मोठें पाण्यानें भरलेलें पात्र ठेवलेलें असतें त्यांतून मैत्रावरुण व होता यांचे चमस (सोमरस प्राशन करावयाचीं पाळीं,) **पन्नेजनी** नामक एक तपेली आणि **एकधना** नांवाच्या २।३ लहान लहान घागरी भरून घेण्यांत येतात. पन्नेजनी नामक तपेली आणण्या-नेण्याचें काम पत्नीकडून करविण्यांत येतें.

**दधिग्रहप्रचार.**—नंतर 'दधिग्रह' म्हणजे एका पेलेवजा लांकडी पात्रांत दहीं भरून घेऊन त्या दह्याचें हवन केलें जातें.

**अंशुप्रचार.**—नंतर थोडासा सोम कुटून त्याच्या रसानें भरलेल्या एका पात्रानें हवन केलें जातें. यास 'अंशुप्रचार' म्हणतात. **अदाभ्यप्रचार**—याचप्रमाणें 'अदाभ्य' संज्ञक एका पात्रांतून सोमरसाचें हवन करण्यांत येतें. **महाऽभिषव**—नंतर अध्वर्यु, प्रतिप्रस्थाता, नेष्टा व आग्नीध्र असे चौघे ऋत्विज चारी दिशांस बसून अधिषवण चर्मावर सोमवल्ली खूप कुटून तिचा रस काढतात. नंतर एका लांकडी घडवंचीवर **'दशापवित्र'** संज्ञक एक लोकरीचें गाळणें पसरण्यांत येतें व त्यावरून घडवंची खालीं ठेवलेल्या द्रोणकलशांत (लांकडी डोणींत) सोमरस गाळून घेण्यांत येतो. **ग्रहग्रहण**—नंतर निरनिराळ्या देवतांच्या उद्देशानें निरनिराळीं पेलेवजा लांकडी पात्रें गाळण्यांतून खालीं पडत असलेल्या सोमरसाच्या धारेमध्यें भरून घेऊन 'खर' नामक ओव्यावर जागच्याजागीं ठेवलीं

जातात. शेवटीं द्रोणकलश आधवनीय व पूतभृत या सोमरसपूरित पात्रांनां अभिमर्श केला गेल्यानंतर अध्वर्यु, प्रस्तोता, प्रतिहर्ता, उद्गाता, प्रशास्ता, यजमान व ब्रह्मा हे अनुक्रमें एकमेकाला स्पर्श करून **विप्रुड्ढोम** संज्ञक कर्म करितात.

नंतर चात्वालाशेजारीं व वेदीच्या आंत बसून प्रस्तोता उद्गाता व प्रतिहर्ता हे तिघे ऋत्विज **'बहिष्पवमान'**संज्ञक सामगायन करतात. नंतर **ग्रहोपस्थान** व **धिष्ण्योपस्थान** हीं कर्में झाल्यानंतर पुरोडाशादि हविर्द्रव्यांनां अलंकरण इत्यादि संस्कार केले जातात व 'अश्विनौ' देवतांच्यासाठीं सोमरसाचा एक ग्रह ( पेला ) भरून ठेवला जातो.

**सवनीय पशु.**—नंतर यूपस्तंभाला दोरी गुंडाळण्यापासून सवनीय पशूचें अनुष्ठान सुरू होतें. अग्निदेवतेच्या उद्देशानें पशूचें उपाकरण म्हणजे समर्पण केल्यानंतर पशुसंबंधीं **वपायागापर्यंत** सर्व अनुष्ठान अनुक्रमानें केलें जातें. **उपस्थान**–नंतर द्रोणकलश वगैरे सर्व ग्रहांचें व धिष्ण्यांचें उपस्थान करून अध्वर्युप्रभृति सर्व ऋत्विज आपआपल्या नियमित जागीं येऊन बसतात. नंतर शमिता नांवाचा जो ( पशु मारणारा ) माणूस असतो तो अध्वर्यूंच्या आज्ञेवरून पशूचीं निरनिराळीं अंगें शामित्र शाळेंत अग्नीवर शिजत लावतो. प्रतिप्रस्थात्यानें सवनीय हवि आणून दिल्यानंतर अध्वर्यु त्या पांच हविर्द्रव्यांचें वेदीमध्यें आसादन करून ठेवतो. **सवनीय पुरोडाशाचें यजन**–नंतर सवनीय अशा पुरोडाशादि ५ द्रव्यांचें यजन केलें जातें. **द्विदेवत्यप्रचार**–प्राशित्रावदानपर्यंत अनुष्ठान करावयाचें झाल्यानंतर अध्वर्यु व प्रतिप्रस्थाता हे इन्द्रवायु, मित्रावरुण व आश्विन या जोडदेवांच्या उद्देशानें द्विदेवत्यसंज्ञक सोमरसानें भरलेल्या दोन पात्रांनीं यजन करितात.

**शुक्रामंथिप्रचार.**—मग शुक्रामंथिप्रचार नामक कर्म सुरू होतें. अध्वर्यूनें 'शुक्र' नांवाचा एक ग्रह ( सोमरसानें भरलेलें पात्र ) घेतलेला असतो व प्रतिप्रस्थात्यानें 'मंथि'नामक ग्रह घेतलेला असतो. चमसाध्वर्यू म्हणून जे उपऋत्विज असतात त्यांनीं सोमरसानें भरलेले **चमस** घेतलेले असतात. नंतर कांहीं विशेष पद्धतीनें अध्वर्यु व प्रतिप्रस्थाता हे उभयतां आपआपल्या हातांतील ग्रहानें सोमरसाचें हवन करतात. त्याचवेळीं चमसाध्वर्यू आपल्या हातांतील चमसांनीं सोमरसाचें हवन करतात. नंतर मैत्रावरुणप्रभृति पांच होत्रकांच्या चमसांनीं सोमरसाचें हवन केलें जातें. पुढें अध्वर्यु, प्रतिप्रस्थाता व होता हे तिघे 'द्विदेवत्य'संज्ञक ग्रहांतील हवनशिष्ट सोमरसाचें प्राशन करितात. **वाजिनयाग.**–नंतर इडा भक्षण केलें जातें व वाजिनाचा (नासलेल्या दुधाचें पातळ पाणी) याग करण्यांत येतो. **सवन मुखभक्ष**–नंतर हवन होऊन राहिलेल्या सोमरसाचे आपआपल्या चमसानें होतृप्रभृति ऋत्विज प्राशन करितात. या सामुच्चयिक सोमरस भक्षणास **'सवनमुखभक्ष'** अशी पारिभाषिक संज्ञा आहे. नंतर अध्वर्यूनें ज्याच्या हातावर पुरोडाशशकल दिलें आहे असा 'अच्छावाक' नांवाचा ऋत्विज कांहीं मंत्रसंघाचें पठण करतो व नंतर त्याच्या सोमरसचमसाचें हवन अध्वर्यु करतो. अच्छावाक आपल्या हुतशिष्ट चमसाचें प्राशन करतो.

**ऋतुग्रहप्रचार**–नंतर अध्वर्यु व प्रतिप्रस्थाता हे उभयतां 'ऋतुयाग' नांवाचें सोमरसहवनात्मक कर्म करतात. ऋतुयागामध्यें होता, मैत्रावरुण इत्यादि सात होते व यजमान आणि अध्वर्यु यांनीं याज्यामंत्र म्हणावयाचे असतात. अध्वर्यु व यजमान हे आपआपले याज्यामंत्र म्हणण्याचें काम होल्यावरच संपवितात. ऋतुयागामध्यें अधिक महिन्यासुद्धां तेरा महिने व सर्व ऋतु यांच्या उद्देशानें सोमरसाचें हवन होत असतें. नंतर हुतशेष अशा सोमरसाचें ऋत्विज प्राशन करतात. नंतर इन्द्राग्नी या जोडदेवतेच्या उद्देशानें एक सोमरसाचा पेला भरून ठेवण्यांत येतो. नंतर होता **'शस्त्र'**संज्ञक विशिष्ट-मंत्रसंघ विशिष्ट पद्धतीनें म्हणतो. नंतर भरून ठेवलेल्या सोमरसाचें हवन व भक्षण होतें. नंतर इन्द्राग्नीप्रमाणेंच 'मित्रावरुण' या देवतेसाठीं सोमरसाचा ( ग्रह ) पेला भरून ठेवल्यावर उद्गाता वगैरे तिघेजण सामगायक ऋत्विज मित्रावरुणांच्या स्तुतिपर सामगायन करतात. नंतर 'मैत्रावरुण' नामक ऋत्विज मित्रावरुणांच्या स्तुत्यात्मक 'शस्त्र' पठण करतो. नंतर पूर्वीप्रमाणेंच भरून घेतलेल्या सोमरसाचें हवन व भक्षण होतें. नंतर 'प्रतिप्रस्थाता' 'इन्द्र' देवतेसाठीं सोमरसाचा ग्रह भरून घेतो. नंतर इन्द्राच्या स्तुतिपर असें उद्गातृप्रभृति सामक सामगायन करतात. 'ब्राह्मणाच्छंसी' शस्त्र पठण करतो. नंतर सोमरसाचें हवन झाल्यावर ब्राह्मणाच्छंसी प्रमुख ऋत्विज हवनशिष्ट सोमरसाचें प्राशन करतात. याचप्रमाणें प्रतिप्रस्थाता 'इन्द्राग्नी' देवतेसाठीं ग्रह भरून घेतो. 'अच्छावाक' शस्त्र म्हणतो, सामगान केलें जातें व नंतर सोमरसाचें हवन आणि भक्षणविधि केला जातो. **सवनप्रायश्चित्तें.**–नंतर अध्वर्यू सवनप्रायश्चित्तें घालतो आणि मैत्रावरुणानें 'सर्पत' 'बाहेर चला' अशी आज्ञा करतांच सर्व ऋत्विज सदाच्या बाहेर पडतात व प्रातःसवनाचें अनुष्ठान समाप्त होतें.

**माध्यंदिनसवन.**—नंतर माध्यंदिनसवनाचें अनुष्ठान सुरू होतें. द्विदेवत्ययाग, ऋतुग्रहयाग, वगैरे कांहीं कृत्यें माध्यंदिन सवनांत वर्ज होत असून बाकी अनुष्ठान बरेंचसें प्रातःसवनाप्रमाणें होत असतें. तथापि कांहीं कांहीं विशिष्ट गोष्टींचा येथें संक्षेपानें उल्लेख करणें जरूर आहे. **सोमाभिषव**–सोम कुटण्याचा विधि अध्वर्युप्रभृति चार ऋत्विज प्रातःसवनाप्रमाणेंच प्रायः करतात. सोम कुटण्याचें काम चालू असतां **'ग्रावस्तुत्'** नामक ऋत्विज सोमाच्या स्तुतिपर कांहीं मंत्रसमूह पठण करतो; व त्या वेळीं त्याला एक पागोटें देण्यांत येतें. **ग्रहग्रहण**—नंतर गाळण्यावरून पडत असलेल्या सोमधारेमध्यें निरनिराळ्या देवतांच्यासाठीं ग्रह ( पेले ) भरून ठेवले जातात. नंतर सोमरसानें भरलेल्या पात्रांचें उपस्थान केलें जातें.

**विप्रुड्ढोम.**—नंतर प्रातःसवनांप्रमाणेंच अध्वर्युप्रभृति ऋत्विज 'विप्रुट्'नामक होम करतात. नंतर ऋत्विज सदोमंडपांत यथाविधि प्रवेश करतात व पुढें उद्गातृप्रभृति सामक 'पवमान' संज्ञक 'सामगायन' करतात. नंतर अध्वर्यूंच्या आज्ञेनें 'आग्नीध्र' धिष्ण्यांच्या ठिकाणीं अग्नींचें विहरण व सवनीय पुरोडाशांच्या ठिकाणीं अलंकरण वगैरे करतो. **दधिघर्मप्रचार**–नंतर 'प्रतिप्रस्थाता' 'दधिघर्म' याग करतो.

**हवनशिष्ट** दधिग्रहाचें भक्षण झाल्यावर आग्नीध्र सवनीय पुरोडाशादि हवींचें वेदीमध्यें आसादन करतो. **सवनीयपुरोडाशयाग.**–नंतर अध्वर्यु सवनीय पुरोडाशाचें यजन करतो. **शुक्रामंथिप्रचार**–प्राशित्रावदान होईपर्यंत अनुष्ठान झालें म्हणजे अध्वर्यु व प्रतिप्रस्थाता हे उभयतां प्रातःसवनाप्रमाणें 'शुक्रामंथिप्रचार' करतात. म्हणजे 'शुक्र' व 'मंथि' नामक दोन सोमग्रहांचें हवन करतात. चमसाध्वर्यूंनीं याहि वेळेस प्रातःसवनाप्रमाणें चमसांनीं सोमरसाचें हवन करावयाचें असतें. **दाक्षिणात्यहोम.**–नंतर अध्वर्यूला यजमान, यजमानाला पत्नी व पत्नीला यजमानाच्या कुटुंबांतील मनुष्यें याप्रमाणें अन्वारब्ध करून सर्वांच्या वरून वस्त्राचें आच्छादन केलें असतांना अध्वर्यु 'दाक्षिणात्य' म्हणजे दक्षिणांगभूत होम करतो. मग दक्षिणा देण्यास सुरवात होते. प्रथम 'आत्रेय' संज्ञक एका विद्वान व शिष्ट ब्राह्मणाला सुवर्ण देण्यांत येतें. **दक्षिणादान**–मग सदस्यासुद्धां सर्व (१७) ऋत्विजांनां दक्षिणा देण्यांत येते. प्रथम आग्नीध्राला व शेवटीं प्रतिहर्त्याला दक्षिणा देण्यांत येते. सामगायकांनां साथ करणारे **'उपगाते'** व यज्ञावलोकनाला येणारे **'प्रसर्पक'** म्हणजे शिष्ट लोक यांनांहि दक्षिणा देण्याचा विधि होतो. सोळा ऋत्विजांमध्यें एकापेक्षां एक कमी असे चार वर्ग असतात. पहिल्या वर्गांतील ऋत्विजाला १२ गाई, दुसऱ्या वर्गांतील ऋत्विजाला ६ गाई, तिसऱ्या वर्गांतील ऋत्विजाला ४ गाई व चौथ्या वर्गांतील ऋत्विजाला ३ गाई दक्षिणा देण्यांत येते. सदस्याला पहिल्या वर्गाच्या बरोबरीची दक्षिणा मिळते. **वैश्वकर्मणहोम**–नंतर 'वैश्वकर्मण' संज्ञक होम केला जातो. **मरुत्वतीययाग**–मग अध्वर्यु व प्रतिप्रस्थाता हे उभयतां 'मरुत्वतीय' संज्ञक ग्रहांचें यजन करतात. नंतर अध्वर्यु 'इन्द्रमरुत्वान्' देवतेसाठीं सोमग्रह भरून घेतो. होता 'शस्त्र' पठण करतो. मग सोमरसाचें हवन व भक्षण केलें जातें. मग 'महेंद्र' देवतेसाठीं सोमग्रह भरून घेतल्यानंतर महेंद्राच्या स्तुतिपर सामगायन केलें जातें व होता शस्त्र म्हणतो. नंतर भरून घेतलेल्या सोमरसाचें यजन होतें. **अतिग्राह्यप्रचार**–त्याचवेळीं आग्नेय, ऐंद्र व सौर्य व तीन अतिग्राह्यसंज्ञक सोमग्रहांचें हवन अनुक्रमें प्रतिप्रस्थाता, नेष्टा व उन्नेता हे तिघे करतात. नंतर हवनशिष्ट सोमरसाचें भक्षण केलें जातें. अतिग्राह्य ग्रहांचें भक्षण प्रतिप्रस्थाता वगैरे तिघेजण करतात. **उक्थ्यप्रचार**–नंतर प्रातःसवनाप्रमाणेंच तीनवेळ 'उक्थ्यप्रचार' म्हणजे उक्थ्यसंज्ञक सोमग्रहांचें हवन केलें जातें. प्रत्येक ग्रह 'इंद्र' देवतेसाठीं भरून घेतला जातो. सामक सामें गातात. मैत्रावरुण, ब्राह्मणाच्छंसी व अच्छावाक हे तिघेजण प्रत्येक ग्रहाचे निमित्तानें इंद्राच्या स्तुतिपर शस्त्रें अनुक्रमें पठण करतात. ग्रहांचें हवन होतें व नंतर हुतशेषाचें भक्षण केलें जातें. **सवनप्रायश्चित्तें**–नंतर सवनप्रायश्चित्त संज्ञक आहुती घातल्यानंतर माध्यंदिनसवनाचें अनुष्ठान समाप्त होतें.

**तृतीयसवन.**—प्रारंभीं हविर्धानद्वारें बंद करून आदित्य देवतेसाठीं एक सोमरसाची स्थाली भरून घेतली जाते. नंतर **आदित्यग्रहाचा याग** केला जातो. **सोमाऽभिषव**–पुढें प्रातःसवनाप्रमाणेंच सोम कुटण्याचा विधि अध्वर्युप्रमुख चार ऋत्विज करतात. **ग्रहग्रहण**–नंतर सोमरस गाळण्यांत येऊन माध्यंदिनसवनाप्रमाणेंच निरनिराळ्या देवतांच्या साठीं कांहीं सोमग्रह भरून ठेवण्यांत येतात. **'पूतभृत्'** नामक सोमरसानें भरलेल्या कलशांत यजमान व पत्नी **'आशिर'** संज्ञक घुसळलेलें दहीं मिसळतात. **विप्रुड्ढोम**–नंतर **ग्रहोपस्थान** झाल्यावर माध्यंदिनसवनाप्रमाणेंच अध्वर्युप्रभृति ऋत्विज व यजमान हे 'विप्रुट्' संज्ञक होम करतात. यापुढें उद्गातृप्रभृति तिघेजण सामक आर्भव **'पवमान'** संज्ञक सामगायन करतात. नंतर ग्रहोपस्थान व पात्रसंमर्शन केल्यानंतर प्रतिप्रस्थाता सवनीय निर्वाप करतो. पुरोडाशादि हविर्द्रव्यें तयार झाल्यावर आग्नीध्र त्यांच्या ठिकाणीं अलंकरण करतो. **पाशुकानुष्ठान**–नंतर प्रतिप्रस्थात्यानें शमिता नामक पशूंचीं अंगें शिजविणाऱ्या माणसाला 'अंगें शिजून तयार झालीं किंवा नाहीं?' असें विचारण्यापासून पाशुकाच्या अनुष्ठानास सुरवात होते. **अंगयाग**–अध्वर्यु पशूंच्या निरनिराळ्या अंगांचें हवन करतो. नंतर अध्वर्यु, होता, ब्रह्मा, मैत्रावरुण, आग्नीध्र व यजमान हुतशेष पश्वंगांचें भक्षण करतात. **सवनीयपुरोडाशयाग**–नंतर तृतीयसवनानिमित्त सवनीयपुरोडाशाचा याग केला जाऊन प्राशित्रावदानापर्यंत अनुष्ठान केलें जातें. पुढें तृतीयसवननिमित्तक सोमरसाचें यजन केलें जातें. अध्वर्यूबरोबर इतर चमसाध्वर्यूहि सोमरसाचें हवन करीत असतात. मग मैत्रावरुणादि हौत्रकांच्या चमसांचें यजन होतें. नंतर सवनीय इडेचें भक्षण होऊन कपालविमोचनापर्यंत अनुष्ठान केलें जातें. **सवनमुखभक्ष**–मग सवनमुखसंज्ञक चमस भक्षणविधि केला जातो. **पिंडदान**–नंतर यजमानासह सर्व ऋत्विज आपआपल्या पिता, पितामह व प्रपितामहांच्या उद्देशानें पिंडदान करतात. नंतर सावित्र ग्रहाचें यजन झाल्यावर 'विश्वेदेव' देवतेसाठीं सोमरसाचा ग्रह भरून घेतला जातो. नंतर होता **'वैश्वदेव'** संज्ञक शस्त्र पठण करतो. नंतर भरून घेतलेल्या सोमग्रहाचें हवन व नंतर भक्षण होतें. यापुढें सोमदेवतेला अर्पण करण्यासाठीं चरु (भात) शिजविला जातो. यास 'सौम्यचरु' अशी संज्ञा आहे. **सौम्यचरुयाग**–चरु शिजून तयार झाला म्हणजे त्याचें यजन केलें जातें. हवनशेष अशा त्या सौम्यचरूच्या स्थालीमध्यें तूप ओतून त्यामध्यें आपलें मुख अध्वर्यु अवलोकन करतो व ती स्थाली उद्गातृप्रभृति तिघां सामकांना देतो. मग आग्नीध्र हा अध्वर्यूच्या आज्ञेवरून धिष्ण्यांचे ठिकाणीं अग्नीचें विहरण करतो. अध्वर्यु माध्यंदिनसवनाप्रमाणेंच धिष्ण्यांच्या ठिकाणीं घातलेल्या शलाकाग्नीवर व्याघारण करतो. **पात्नीवतप्रचार**–नंतर 'पात्नीवत' नामक सोमग्रहाचें यजन होतें व नंतर भक्षण होतें. मग उद्गातृप्रभृति सामक हे 'अग्निष्टोम' नामक सामाचें गायन करतात. 'ध्रुव' नामक एका स्थालींतील सोमरस होतृचमसांत ओतला जातो. मग शस्त्र पठण झाल्यावर सोमचमसांचें हवन होतें व नंतर हुतशेष सोमाचें भक्षणहि होतें. **अनूयाज व उपयाज**–मग अनूयाज, उपयाज इत्यादि सवनीयपशूसंबंधाचें अनुष्ठान संस्रावहोमापर्यंत केलें जातें. **हारियोजनप्रचार**–मग द्रोणकलश नामक पात्रानें प्रतिप्रस्थाता 'हारियोजन' संज्ञक याग करतो. मग सर्व ऋत्विज आग्नीध्रीय मंडपांत जाऊन दह्याची साय खातात. सर्व चमसांमध्यें एकधनांमधील पाणी व हिरण्यागार दूर्वा थोडथोड्या घालून ठेवण्यांत येतात. नंतर आहवनीयाचें उपस्थान करून सर्व ऋत्विज

आहवनीयाच्या ठिकाणीं ७७ समिधा देतात. **सख्यविसर्जन**–मग सर्व ऋत्विज एकमेकांचे हात धरून उभे राहतात व 'सख्यविसर्जन' म्हणजे यज्ञासंबधानें आपआपसांत केलेल्या ऐकमत्याच्या करारांचें जणों विसर्जन करितात.

**पत्नीसंयाज.**—यापुढें अध्वर्यु 'पत्नीसंयाज' नामक कर्म करतो. मग ऐष्टिकप्रायश्चित्तें घातल्यावर ध्रुवाज्याची समाप्ति केली जाते. मग **समिष्टयजुसंज्ञक होम** करण्यांत येतो. मग प्रणीताविमोक व उपवेषनिरसन केलें जातें. औदुंबरी उपटून चात्वालावर आणून टाकण्यांत येते व सूर्याचें उपस्थान केलें जातें. **सवनप्रायश्चित्तें**–मग सवनीय प्रायश्चित्तें घालण्यांत आल्यानंतर मैत्रावरुणानें 'सर्पत' असें म्हणतांच सर्व ऋत्विज सदोमंडपाच्या बाहेर पडतात व तृतीयसवनाचें अनुष्ठान समाप्त होतें. **अवभृथ**–नंतर अवभृथसंबंधीं अनुष्ठान सुरू होतें. अन्वाधानापासून हविर्द्रव्यनिर्वापापर्यंत अनुष्ठान आलें म्हणजे 'वरुण' देवतेसाठीं पुरोडाशाचा निर्वाप केला जातो. पुरोडाश तयार झाल्यावर महावेदीच्या उत्तरांसासंनिध आणून ठेवण्यांत येतो. मग सर्व सोमलिप्तपात्रें व इतर यज्ञसाहित्य चात्वालासन्निध आणून ठेवलें जातें. मग प्रस्तोत्याला तूं सामगायन कर म्हणून अध्वर्यु सांगतो. यजमानपत्नी व अध्वर्युप्रभृति सर्व ऋत्विज अवभृथास जाण्यासाठीं मंडपाबाहेर पडतात. मधल्या एका टप्यावर सामगायन होतें व शेवटीं एखाद्या जलाशयाच्या अगर वाहत्या नदीच्या तीरावर सर्वजण येऊन पोंचतात. जलप्रवाह दृष्टीस पडतांच विशिष्ट मंत्रांचा जप केला जातो. नंतर पाण्याच्या ठिकाणीं दर्भमुष्टि टाकण्यांत येते व तेथेंच अग्नि आहे अशी कल्पना करून त्या ठिकाणीं अवभृथसंबंधीं तयार केलेल्या पुरोडाशाचा वरुणदेवतेप्रीत्यर्थ याग केला जातो. स्विष्टकृतापर्यंत अनुष्ठान झाल्यावर घडवंचीवर कातडें पसरलेलें असतांना त्यावर सोमवल्लीचा चोथा ठेवण्यांत येतो. नंतर तो चोथा कांहीं विषमसंख्याक मंत्र म्हणून स्रुचीमध्यें भरला जाऊन पाण्यावर पालथा केला जातो. मग मार्जन झाल्यानंतर यजमान, पत्नी व ऋत्विज जलप्रवाहामध्यें स्नान करतात. यजमान कमरेस गुंडाळलेली मेखला सोडून टाकतो व पत्नी आपल्या कमरेचें योक्त्र सोडून टाकते. मग यजमान व पत्नी नवीं धुतलेलीं वस्त्रें परिधान करितात. नंतर अध्वर्यूच्या आज्ञेवरून 'उन्नेता' हा ऋत्विज सर्व ऋत्विजांनां जलप्रवाहाबाहेर काढतो. नंतर उन्नेत्याला पुढें करून जलप्रवाहाकडे पुन्हां अवलोकन न करतां सर्वजण उंबराच्या समिधा हातांत घेऊन यज्ञभूमीमध्यें परत येतात. आल्यानंतर सर्व ऋत्विज, यजमान व पत्नी आपआपल्या हातांत आणलेल्या उंबराच्या समिधा आहवनीयावर देतात व उपस्थान करतात व अवभृथाचें अनुष्ठान समाप्त होतें. **उदयनीयेष्टी**–नंतर प्रायणीयेष्टीप्रमाणें उदयनीयेष्टीचें अनुष्ठान केलें जातें. **अनुबंध्ययाग**–त्यानंतर 'मित्रावरुण' देवतेच्या उद्देशानें पशुतंत्राप्रमाणें एका **वशेचा** ( म्हणजे वांझ गाईचा ) याग करण्यांत येतो. या यागास 'अनुबंध्य' अशी संज्ञा आहे. हल्लीं कलिवर्ज्य मानल्यामुळें प्रत्यक्ष गाय मारून हा याग न करतां त्याऐवजीं मित्रावरुण देवतेसाठीं प्रतिनिधिभूत असा 'आमिक्षा' द्रव्याचा याग करण्याची पद्धति चालू आहे. मैत्रावरुणी आमिक्षायाग झाल्यावर **'देविका'** संज्ञक देवतांचे याग केले जातात. मग यजमानाचें क्षौर ( हजामत ) होतें. यजमानानें स्नान केल्यावर वाजिनयाग करण्यांत येतो.

महावेदीच्या उत्तर बाजूस आहवनीयांतील अग्नि एका परळांत घेऊन जातात व त्या अग्नीवर वेदींत अंथरलेल्या दर्भांपैकीं कांहीं दर्भ जाळण्यांत येतात. त्या धुराचें अनुमंत्रण करण्यांत येतें. **सक्तुहोम**–नंतर त्याच अग्नीवर अध्वर्यु सातूच्या भाजक्या पिठाचा ओंजळीनें होम करतो. **अग्निसमारोप**–मग अरणींच्या ठिकाणीं अग्नींचा समारोप करून यजमान यज्ञस्थलाहून आपल्या घरीं प्रयाण करतो. नंतर यज्ञभूमीच्या उत्तरेस निराळ्या घातलेल्या विहारामध्यें अग्निमंथन करून अग्निस्थापन करतात व त्यांच्या ठिकाणीं अग्नि देवतेच्याच उद्देशानें **'उदवसानीया'**–नामक इष्टि करण्यांत येते. **पूर्णाहुति**–इष्टि प्रत्यक्ष न केल्यास स्रुचीमध्यें १२ स्रुवे तूप घेऊन 'पूर्णाहुति' संज्ञक एक आहुति दिली जाते.

या प्रकारें 'अग्निष्टोम' नामक प्रकृतिभूत सोमयागाचें अनुष्ठान समाप्त होतें.

**अग्निष्टोम समजून घेतला म्हणजे इतर सोमयाग समजतील. त्याचें इतर सोमसंस्थांशीं सादृश्य व असादृश्य परिशिष्टांत सप्त संस्थांचें विवेचन करतांना दिलेंच आहे. त्या संस्थांतील मुख्य दिवसाचें अनुष्ठान म्हणजे थोडक्या फरकानें अग्निष्टोमाचेंच अनुष्ठान आहे. इतर लांबलचक क्रतू अग्निष्टोमाच्या सवनदिनांत होणाऱ्या अनुष्ठानाच्या थोडक्याशा फरकाच्या पुनरुक्तीनें होत असतात. त्या दिवशीं जें थोडक्या फरकानें अनुष्ठान होतें तें उक्थ्य, षोडशी वगैरेमधलेंच असतें.**

## सत्रांपेक्षां लहान पण अग्निष्टोमापेक्षां मोठे असलेले यज्ञ.

अग्निष्टोमाचा विस्तार जरी पांच दिवसपर्यंत असतो तरी अग्निष्टोम हा एकरात्र क्रतु म्हणजे एकच दिवसाचा यज्ञ होय. यांतील मुख्य दिवस सवनदिन होय. अग्निष्टोमापेक्षां मोठे पण सत्राहून लहान असे कांहीं क्रतू म्हणजे यज्ञ आहेत. या यज्ञांचे दोन प्रकार. एक अहीन व दुसरा व्यूढ. या दोन प्रकारांपैकीं 'अहीन' प्रकारांतले यज्ञ पुढें लिहिल्याप्रमाणें.

**द्विरात्र.**—हा यज्ञ प्रथम आंगिरसांनीं केला व पुढें लोकांनीं प्रचारांत आणला अशी समजूत आहे. अग्निष्टोमांतील प्रधान याग ज्याप्रमाणें एक दिवस आहे त्याप्रमाणें या यज्ञांतील प्रधान याग दोन दिवस होत असतो. 'अभिप्लव' नामक एक सहा दिवस चालणारा क्रतु आहे. त्या यज्ञांतील पहिल्या दिवशीं संस्थारूप असणाऱ्या ज्योतिष्टोम किंवा अग्निष्टोमनामक क्रतूचें अनुष्ठान करावयाचें असतें. प्रस्तुतच्या द्विरात्र यज्ञामध्यें प्रधान यागाच्या पहिल्या दिवशीं पूर्वोक्त अभिप्लव क्रतूंतील प्रथम दिवशीं करावयाच्या अग्निष्टोमाचाच प्रयोग करावा लागतो. अभिप्लव क्रतूमधून 'निरूढ' म्हणजे निवडून घेतल्यामुळें या अग्निष्टोमासहि 'अभिप्लव' अशी संज्ञा मिळाली आहे. द्विरात्र यज्ञांतील प्रधान

यागाच्या दुसऱ्या दिवशीं 'गति' अशी विशिष्ट संज्ञा असलेल्या 'अतिरात्र' नामक क्रतूचें अनुष्ठान करावयाचें असतें.

द्विरात्रांतील सामगायन.—त्याचप्रमाणें पूर्व दिवशीं म्हणजे अग्निष्टोमाच्या अनुष्ठानाच्या दिवशीं 'गायत्र' या नांवाच्या सामाचें व दुसऱ्या म्हणजे अतिरात्राच्या अनुष्ठानदिवशीं त्रिष्टुभ्-छंदात्मक अशा एका सामाचें प्राधान्यानें गायन करावयाचें असतें. अथवा प्रथम दिवशीं 'रथंतर' व दुसऱ्या दिवशीं 'बृहत्'नामक सामाचें गायन करावें किंवा प्रथम दिवशीं बृहतीछंदात्मक ऋचेंत गाइलें जाणारें 'वैखानस' नामक साम गावें व दुसऱ्या दिवशीं षोडशी उर्फ 'गौरिवीत'नामक साम गावें असे दोन पक्ष आणखी सांगितले आहेत. सामगायनांतील शेवटच्या तुकड्यास 'निधन' अशी संज्ञा आहे. प्रथम दिवशीं गाइल्या जाणाऱ्या सामाच्या निधनसंज्ञक तुकड्यांत 'हविष्मत्' या शब्दाचा व दुसऱ्या दिवशींच्या सामाच्या निधनसंज्ञक भागांत 'हविष्कृत्' या शब्दाचा उपयोग करावा.

कृष्णपक्षाच्या शेवटच्या म्हणजे अमावास्येच्या दिवशीं या **द्विरात्र**यज्ञाच्या प्रधानयागाच्या दोन दिवसांपैकीं प्रथमचा दिवस व शुक्लपक्षाच्या प्रथम दिवशीं दुसरा दिवस येईल अशा बेतानें यज्ञानुष्ठानास प्रारंभ करावा.

**त्रिरात्र**.—अग्निष्टोम, उक्थ्य व अतिरात्र या भिन्न भिन्न तीन क्रतूंच्या एकत्र समवायानें हा क्रतु बनला आहे. अग्निष्टोमादि तिन्ही क्रतूंचें अंगभूत दिवस धरून प्रत्येकीं पांच पांच दिवस अनुष्ठान चालतें. प्रधानयाग म्हणजे सोमरसाच्या हवनाचा एकच दिवस असतो. अंगभूत दिवसांखेरीज या तिन्ही यज्ञांतील प्रधान यागाचेंच तेवढें अनुष्ठान क्रमानें तीन दिवस करावयाचें असल्यामुळें या तीन दिवसांच्या सांघिक यागास **त्रिरात्र** असें नांव मिळालें आहे. शिवाय **त्रिरात्रयज्ञ** गर्गऋषींनीं विशेषतः लोकप्रचारांत आणल्यामुळें याला **'गर्गत्रिरात्र'** असेंहि म्हणतात. या यज्ञांत सामान्यतः सर्व अनुष्ठान अग्निष्टोमासारखेंच असतें. विशेष कांहीं गोष्टी करावयाच्या असतात त्यांचें ज्ञान होण्यासाठीं व त्रिरात्र क्रतूचें सामान्य स्वरूप नीट लक्षांत यावें म्हणून वेदांतील आख्यायिका देण्यांत येत आहे ती अशी:—

अर्थवाद व आख्यायिका.—वसु, रुद्र आणि आदित्य असे देवांमध्यें तीन संघ आहेत. प्रजापतीनें या तिन्ही संघांची उत्पत्ति सृष्टयारंभीं केली आणि तिन्ही संघांना प्रत्येकीं एकएक अग्नि देऊन तुम्ही अग्नीची उपासना करीत जा असें सांगितलें. एक वर्षभर त्या तिन्ही संघांतील देवांनीं अविच्छिन्नपणें अग्नीची उपासना केल्यावर सर्वांनीं मिळून एक गाय उत्पन्न केली. देवांचें उपासनासामर्थ्य पाहून प्रजापति संतुष्ट झाला व सर्व देवांनीं मिळून उत्पन्न केलेल्या त्या गाईचें संरक्षण करण्याचें काम त्यानें वसूंच्याकडे सोंपविलें. लवकरच त्या गाईपासून ३३३ गाई उत्पन्न झाल्या. नंतर प्रजापतीनें वसूंनां दिलेली गाय त्याजकडून घेऊन रुद्रांच्या हवालीं केली व हिचें संरक्षण आतां तुम्ही करा असें सांगितलें. त्यांनीं त्या गाईला सांभाळल्यावर तिच्यापासून रुद्रांनांहि ३३३ गाईंचा लाभ झाला. प्रजापतीच्या इच्छेनें त्या गाईची जोपासना करण्याचें काम पुढें आदित्यांच्याकडे आलें. तेथेंहि त्या गाईला पुन्हां संतति होऊन आदित्यांनां ३३३ गाई प्राप्त झाल्या. म्हणजे तिन्ही संघांच्याकडे मिळून ९९९ गाई झाल्या व शिवाय सर्वांची आई ती हजारावी. हजार गाई जमतांच वस्वादि देवांच्या विनंतीवरून प्रजापतीनें वसू, रुद्र व आदित्यसंघांकडून त्रिरात्रनामक एक यज्ञ करविला. पहिल्या दिवशीं वसूंकडून **अग्निष्टोमाचें**, दुसऱ्या दिवशीं रुद्रांकडून **उक्थ्याचें** व तिसऱ्या दिवशीं आदित्यांकडून **अतिरात्राचें** अनुष्ठान करविलें. तीन दिवसांत संपविलेल्या या यज्ञाची दक्षणा म्हणून देवांकडून त्यांच्या जमलेल्या हजार गाई देवविल्या. या यज्ञाच्या योगानें वसूंनां इहलोकचें, रुद्रांनां अंतरिक्षलोकचें व आदित्यांनां द्युलोकचें आधिपत्य मिळालें. वस्वादि संघत्रयाकडून अग्निष्टोमादि क्रतुत्रयाचें अनुष्ठान क्रमानें तीन दिवस संघरूपानें झाल्यामुळें या यज्ञास त्रिरात्र असें नांव मिळालें व या त्रिरात्रक्रतूचा लोकप्रचार सुरू झाला. रुद्रांनां मिळालेला अंतरिक्षलोक डळमळून खालीं आला व रुद्रांनां स्थान नाहींसें झालें म्हणून यज्ञतत्त्ववेत्त्यांनीं त्रिरात्र क्रतूमध्यें दुसऱ्या दिवशीं करावयाचें उक्थ्यसंज्ञक अनुष्ठान रुद्रांच्या अनुष्ठानांत थोडासा फरक करून करण्याची योजना निश्चित केली ती अशी:—

मधल्या म्हणजे उक्थ्य क्रतूच्या दिवशीं होत्यानें आज्य-नामक शस्त्र म्हणतांना तें त्रिष्टुभ्छंदात्मक ऋचांनीं बनविलेलें असें म्हणावें. खेरीज दाशतयी (ऋग्वेद) संहितेंत असणारीं 'संयान' नामक सूक्तें आणि षोडशिसंज्ञक शस्त्रहि पठण करावें. तिन्ही दिवस रोज ३३३ गाई दक्षिणा म्हणून द्याव्या. गाई देण्यासाठीं त्या यज्ञमंडपांत नेत असतां दहा दहा गाईंची टोळी फोडून देऊन नेत. शेवटीं उरतात त्या तीन गाई शेवटच्या दशकांतच सामील करून द्याव्या. रोज ३३३ गाई याप्रमाणें तीन दिवस दिल्यावर शेवटीं एक (मूळची गाय) राहते ती होत्याला, उन्नेत्याला अगर सदांत असणाऱ्या सर्व सदस्यांस द्यावी. अथवा कोणालाच न देतां तिला मोकळी सोडावी. कोणाचें असें म्हणणें आहे कीं, ब्रह्मा व आग्नीध्र या दोघांनां मिळून ती गाय द्यावी अथवा ती न देतां तिच्या मोबदला नाना-वर्णांनीं युक्त व खूप दूध देणारी किंवा जिच्या दोन्ही बाजूंला पांढरे केंस आहेत अशी दुसरी एखादी गाय द्यावी.

या त्रिदिनात्मक त्रिरात्र क्रतूंमध्यें तिन्ही दिवस मिळून १००० स्तोत्रियासंज्ञक ऋचा गाइल्या जातात. १००० गाई दक्षिणा दिली जाते यामुळें हा यज्ञ करणारास १००० लोकांच्या सुखाच्या तुलनेला पुरणारें स्वर्गसुख मिळतें.

उपर्युक्त त्रिरात्र यज्ञामध्यें करावयाच्या आणखी कांहीं गोष्टी अशाः—तांबूस रंगाची, पिंगट डोळ्याची व एकवर्ष वयाची गाय देऊन सोमवल्ली विकत घ्यावी. तांबूस वर्ण असलेल्या आणि नीटनेटके अवयव असलेल्या चार वर्षें वयाच्या गाईनें दक्षिणा-रूपानें दान करावें. रागीट स्वभावाची व अतिशय कुरूप गाय असेल तिचें **अनुस्तरणी** म्हणून प्रसंग येईल तर हनन करावें. (कोणी पुरुष मेल्यास त्याच्या प्रेतावरच्या दरेक अवयवावर आस्तरण करण्याकरितां जिच्या शरीराचे अवयव उपयोगांत आणावयाचे अशी मृत पुरुषाच्या मागोमाग मारली जाणारी गाय ती अनुस्तरणी होय).

अनुस्तरणीच्या पूर्वी सांगितलेल्या दोन प्रकारांपैकीं दुसऱ्या प्रकारची गाय सहस्रतमी म्हणजे हजारावी म्हणून दक्षिणेच्या गाईमध्यें योजावी.

वाग्देवता हीच एका अर्थानें हजारावी गाय आहे, अर्थात् पूर्वोक्त लक्षणाची गाय सहस्रतमी म्हणून दिल्यास दुसऱ्या हजार गाई दिल्याप्रमाणें आहे. परंतु या दानानें यजमानाला सहस्रदानाचें फल मिळालें तरी प्रतिग्रह करणारा दोषी ठरतो. म्हणून या सहस्रतमी गाईचा प्रतिग्रह करतांना 'ही गाय म्हणजे सहस्रात्मक वर' व 'दुसरी ही वराखेरीज असलेली गाय' असा दोन्ही गाईच्यावद्दल निर्देश करून नंतर प्रतिग्रहकर्त्यानें त्या सहस्रतमी गाईचा स्वीकार करावा म्हणजे दोष लागत नाहीं. ही सहस्रतमीसंज्ञक गाय दोन्ही वाजूंला अगर एक बाजूला अंगावर पांढरे पट्टे असलेली असावी. सहस्रतमीच्या ऐवजीं दुसरी गाय दक्षिणा म्हणून द्यावयाची असल्यास नीटनेटक्या सुंदर अवयवांची व पुष्कळ दूध देणारी अशी द्यावी. जी गाय सहस्रतमीच्या मोवदला द्यावयाची त्या गाईला आग्नीध्रीयेला उजवें घालून आहवनीयाजवळ आणावी व तिजकडून द्रोण-कलशनामक सोमरसाच्या डोणींतील सोमरस हुंगवावा. नंतर त्या गाईला पुन्हां आग्नीध्रीयेजवळ परत घेऊन यावें आणि तिला आग्नीध्रीयेच्या पूर्वेस पश्चिमेकडे तोंड करून उभी करून आग्नीध्रीये-मध्यें 'उभाजिग्यथुः' या मंत्रानें एक आज्याहुति घालावी. नंतर 'रोहिण्यै स्वाहा' 'पिंगलायै स्वाहा' 'एकाहायन्यै स्वाहा' अशा रीतीनें त्या गाईच्या वर्णनानुरूप मंत्रांनीं होम करावा. नंतर तिच्याजवळ उभें राहून 'इडेरंते' ह्या मंत्राचा तिच्या कानांत जप करावा.

सहस्रतमी गाईचा प्रतिग्रह करणारानें 'एकासिनसहस्रं' या मंत्राचें अगोदर पठण करून नंतर प्रतिग्रह करावा. मग 'स्योनासिसुषदा' हा मंत्र म्हणावा. नंतर त्या गाईच्या किंमती-दाखल १०० मान सोनें यजमानाजवळून घ्यावें व ती गाय पश्चिमेकडे तोंड करून यजमानाच्या गोठ्याकडे वळवावी.

**( आत्रेय ) चतूरात्र.**—ज्या यज्ञामध्यें प्रधान यागाचें म्हणजे सोमरसाच्या हवनाचें अनुष्ठान चार दिवस चालावयाचें त्याचें नांव चतूरात्र. प्रजाभिवृद्धीस जरूर असणारें ब्रह्मवर्चस प्राप्त होणें हा यज्ञाचा प्रधान हेतु असल्यानें या यज्ञामध्यें पवमान-संज्ञक जीं गाणीं सकाळीं एक, दुपारीं एक, सायंकालीं एक अशा रीतीनें गावयाचीं असतात तीं गाणीं प्रकृतिभूत अग्नि-ष्टोमांतील पद्धतीनें न गातां गायनांतील प्रत्येक ऋचा २४।२४ वेळ आवृत्ति करून गावीं. शिवाय पवमान गायनाखेरीज साम-गायनें गावयाचीं तीं पहिल्या दिवशीं प्रातःसवनामध्यें त्रिवृत् नामक स्तोमानें युक्त, माध्यंदिनसवनामध्यें पञ्चदशसंज्ञक स्तोमयुक्त, आणि तृतीयसवनांमध्यें सप्तदशस्तोमयुक्त करून गावीं. दुसऱ्या दिवशीं तिन्हीं सवनांच्या ठिकाणीं अनुक्रमें पञ्चदश, सप्तदश व एकविंशसंज्ञक स्तोमयुक्त अशीं सामें गावीं. तिसऱ्या दिवशीं सप्तदश, एकविंश व त्रिणव या स्तोमांनीं युक्त अशीं सामें तिन्ही सवनांत क्रमानें गावीं. शेवटच्या म्हणजे प्रधानयागाच्या चवथ्या दिवशीं एकविंश, त्रिणव व त्रयस्त्रिंश या स्तोमांनीं युक्त असें सामांचें गायन करावें. प्रत्येक दिवशीं सांगितलेल्या पद्धतीनें सामें गाइल्यानें यज्ञकर्त्याला अनुक्रमें तेज, इन्द्रियदार्ढ्य, ब्रह्मवर्चस व अन्नाद्यत्व प्राप्त होतें.

अत्रीनें हा चतूरात्र यज्ञ केला त्या वेळीं चारी दिवस पूर्वोक्त पद्धतीनें चार प्रकारच्या स्तोमयुक्त गायनांचा अवलंब केल्या-मुळें त्याला ब्रह्मवर्चसादि फल प्राप्त झालें. तसेंच फल जो कोणी हा चतूरात्र करतो त्याला मिळतें. या क्रतूची लोकप्रसिद्धि **अत्रिऋषी**पासून झाल्यामुळें ह्याला अत्रीचा चतूरात्र अशी संज्ञा आहे.

**( जामदग्न्य ) चतूरात्र.**—प्रजा, पशू आणि धन यांना पोष किंवा पोषणकारक असें म्हणतात. या पोषणकर तिन्ही संपत्ती प्राप्त करून घेणें याचें नांव पुष्टि. अशी पुष्टि प्राप्त होण्या-साठीं प्रथमतः जमदग्नीनें चतूरात्र नामक यज्ञ केला व त्यानें पूर्वोक्त पुष्टि मिळविली. पुष्टिमार्गाचा आद्य प्रवर्तक हा जाम-दग्न्यच असल्यामुळें या जामदग्न्याच्या वंशांत उत्पन्न झालेले कोणचेहि पितापुत्र पुष्टिरहित अर्थात् दारिद्र्यादिकांनीं पछाडलेले कधींहि आढळत नाहींत.

अत्रिऋषींनीं चतूरात्र यज्ञाच्या बसविलेल्या कल्पनेहून जम-दग्नीच्या चतूरात्र यज्ञांतील प्रयोगकल्पनेंत थोडासा फरक आहे, तो असाः—या यागाच्या अंगभूत 'उपसद्' नामक इष्टी सहादिवसांत रोज २ प्रमाणें बारा कराव्या आणि त्या इष्टीमध्यें प्रधान देवतेचा याग प्रकृतिभूत अग्निष्टोमांतील उपसदेप्रमाणें आज्यानें न करतां क्रमानें आग्नेयादि वैश्वदेवांत १२ देवतांचे पुरोडाशद्रव्यानें याग करावे.

**पंचरात्र.**—पांच दिवसपर्यंत अग्निष्टोम, उक्थ्य, उक्थ्य, अग्निष्टोम व विश्वजित् या भिन्नभिन्न क्रतूंचें, अनुक्रमें अनु-ष्ठान केल्यानें पूर्ण होणारा यज्ञ तो पंचरात्र. या यज्ञांत पांच दिवसांत मिळून अग्निष्टोमाच्या २, उक्थ्याच्या २ व विश्व-जिताची १ अशा आवृत्ती केल्या जातात. प्रकृतिभूत अग्निष्टो-माहून या यज्ञांत करावयाच्या अग्निष्टोमांत व इतर क्रतूंच्या अनुष्ठानांत थोडथोडा फरक करावयाचा असतो तो असाः—

पहिल्या दिवशींच्या अग्निष्टोमांतील सर्व सामें त्रिवृत्स्तोम-युक्त म्हणजे एकेका ऋचेची तीन वेळ आवृत्ति करून गावयाचीं. दुसऱ्या दिवशींच्या उक्थ्यक्रतूंतील सर्व सामें पंचदशस्तोमांनीं युक्त अशीं गावीं.

याचप्रमाणें तिसरे दिवशींच्या उक्थ्यक्रतूंत सप्तदशस्तोमयुक्त सामगान करावें. चवथ्या दिवशीं जो अग्निष्टोम करावयाचा त्या दिवशीं 'गवामयन' नामक सत्रांत 'महाव्रत' नामक एक प्रधान दिवस आहे, त्या दिवशीं जीं स्तोत्रें गावयाचीं तींच स्तोत्रें गावयाचीं. 'विश्वजित्' नामक एक अग्निष्टोमाचा विकार आहे तोच विकार अतिरात्राचा विकार म्हणून पांचव्या दिवशीं करावयाचा असतो. या यज्ञांत 'पृष्ठ' संज्ञा असलेल्या रथंतरादि सर्व सामांचें गायन होत असल्यामुळें याला **विश्वजित् सर्व-पृष्ठातिरात्र** असें नाव पडलें आहे.

**षड्रात्र.**—रथंतर सामयुक्त व त्रिवृत्स्तोमात्मक अग्निष्टोम, पंचदशस्तोम व बृहत्संज्ञक सामानें युक्त असा उक्थ्य, सप्तदश-स्तोम व वैरूपसामयुक्त उक्थ्य, एकविंशस्तोम व वैराजसामयुक्त

षोडशी, त्रिणवस्तोम व शाक्वरसामयुक्त उक्थ्य आणि त्रयस्त्रिंशत्स्तोम व सामयुक्त उक्थ्य अशा भिन्नभिन्न सहा क्रतूंच्या समवायानें होणाऱ्या यज्ञास 'षड्रात्र' अशी संज्ञा आहे. सहा दिवसपर्यंत ओळीनें एकेका दिवशीं पूर्वोक्त एकेका क्रतूचें अनुष्ठान व्हावयाचें असतें. सत्ररूप 'द्वादशाहा'मध्यें पृष्ठ्यसंज्ञक असा जो सहा दिवसांचा विभाग आहे त्या विभागांत दररोज जीं पृष्ठ्यसंज्ञक सामें गावयाचीं तींच सामें या षड्रात्र क्रतूंत सहा दिवस क्रमानें गाइलीं जात असल्यानें अंशतः सत्रसाम्य प्राप्त झालेल्या या षड्रात्र यज्ञास 'देवसत्र' अशी संज्ञा पडली आहे.

या षड्रात्र उर्फ देवसत्रनामक यज्ञाच्या प्रसंगानें 'सारस्वत' नामक सत्रांतील कांहीं विशिष्ट गोष्टी सांगितल्या आहेत त्या अशाः—हविर्धाननामक मंडप व आग्नीध्रीयसंज्ञक मंडप हे पिंपळाच्या लांकडांनीं निर्माण केलेले असावे. व हे मंडप असे करावे कीं, प्रथम खालीं चाकें व कणा घालून त्यांना गाड्यांचा आकार द्यावा व त्यांच्यावर फळ्या टाकाव्या आणि त्यावर भूईवर घालावयाचे त्याच पद्धतीनें हविर्धान व आग्नीध्रीय हे मंडप पिंपळाच्या लांकडाचे बनवावे.

लांकडी उखळीचें बूड जसें विस्तृत व बसकें असतें तसें बूड यूपाला करावें म्हणजे अशी सोय होईल कीं, जेथें जेथें यूप पाहिजे असेल तेथें तेथें तो खळगा खणून पुरण्याचा त्रास न पडतां नीट उभा करतां येईल.

प्रथमच्या एक दिवसाचें अनुष्ठान संपलें म्हणजे त्या दिवशीं अध्वर्यूनें पूर्व दिशेस शम्या फेंकावा. तो जेथें पडेल तेथें गार्हपत्य अग्नीची स्थापना करून त्याच्यापुढें ३६ प्रक्रमावर आहवनीय स्थापन करावा. अशा रीतीनें प्रत्येक दिवशींचें अनुष्ठान आटपल्यावर शम्या फेंकण्याची वगैरे क्रिया करून दररोज अनुष्ठानाची जागा पूर्वबाजूस पुढें पुढें सरकत जाईल अशी योजना करावी. चाकें लावलेले पूर्वोक्त दोन्ही मंडप जागा बदलेल त्या मानानें पुढें पुढें न्यावे.

प्रत्येक दिवशीं सरस्वती नदीच्या तीरातीरानें स्वर्गलोक पूर्व दिशेस आहे हें लक्षांत घेऊन पुढें पुढें पूर्व दिशेस जावें सरस्वतीचें तीर म्हणजे देवांचा स्वर्गाला जाण्याचा मार्ग होय. पहिली जागा सोडून पुढच्या जागेंत गाड्यासहवर्तमान जाणाऱ्या सर्व ऋत्विजांनीं व यजमानपत्नींनीं उत्साहातिशयानें जयसूचक ध्वनी मोठमोठ्यानें करीत जावें.

दहा गाई व त्यांत एक अंडिल बैल आपल्या जवळ बाळगावा व त्या बैलापासून दसपट म्हणजे १०० गाईंची वाढ होईपर्यंत सारस्वत सत्राचें अनुष्ठान पुनः पुनः चालवावें. गाईंची संख्या १०० पर्यंत आल्यावर सत्राचें उत्थान म्हणजे समाप्ति करावी. या योगानें सत्रकर्त्यांना शंभर वर्षें आयुष्य भोगावयास मिळतें.

अथवा १०० गाई व एक बैल प्रथम बाळगावा व त्यापासून दसपट म्हणजे हजार गाईंची वाढ होईपर्यंत ह्या सारस्वतसत्राचें अनुष्ठान चालवावें. त्या योगानें हजारों भोग्यपदार्थांनीं भरलेला स्वर्ग मिळतो. याशिवाय सत्रसमाप्तीचा आणखी एक काल म्हणजे सत्र करणाऱ्या यजमानापैकीं कोणी मरेल तर त्या दिवशीं अथवा राष्ट्रक्षोभामुळें शत्रुसैन्याकडून सत्रकर्ते यजमान जिंकले जातील त्या दिवशीं सत्राचें उत्थान करावें. अशा रीतीनें करावें लागणारें उत्थान किंवा सत्रसमाप्ति ही पापापासून तारणारी आहे. यासाठीं पूर्वोक्त निमित्तांपैकीं एकादें निमित्त घडेपर्यंत अनुक्रमानें षड्रात्रक्रतू करीत रहावें. अशा रीतीनें सातत्यानें होणाऱ्या षड्रात्र क्रतूंच्या आवृत्तीस सत्र ही संज्ञा आहे. सरस्वती नदीच्या तीरीं हें सत्र करण्यांत विशेष फल असल्यानें या सत्रास 'सारस्वत सत्र' ही संज्ञा मिळाली.

**सप्तरात्र.**—त्रिवृत्स्तोमात्मक व 'रथंतर'सामयुक्त अग्निष्टोम, पंचदशस्तोम व 'बृहत्' सामयुक्त उक्थ्य, सप्तदश स्तोमात्मक वैरूपसामयुक्त उक्थ्य, एकविंशस्तोम व 'वैराज' सामयुक्त षोडशी, त्रिणवस्तोम व 'शाक्वर'सामयुक्त उक्थ्य, पंचविंश स्तोमयुक्त व महाव्रत धर्मवान् असा अग्निष्टोम आणि सर्वस्तोम व पृष्ठ्यसंज्ञक सर्व सामांनीं युक्त असा विश्वजित् नामक अतिरात्र अशा सात भिन्नभिन्न यज्ञांच्या प्रधान दिवसांचें अनुष्ठान ओळीनें सात दिवस व्हावयाचें असल्यामुळें ह्या यज्ञास सप्तरात्र हें नांव पडलें आहे.

सदाच्या पुढच्या बाजूस बसून श्लोकांनीं स्तवन करावें व सदाच्या पश्चिमेस बसून अनुश्लोकांनीं स्तवन करावें वगैरे जे महाव्रताचे धर्म आहेत त्या धर्मांनीं सहित असा पूर्वोक्त सहाव्या दिवशींचा अग्निष्टोम करावा.

प्रथम सांगितल्याप्रमाणें एकेका दिवशीं रथंतर, बृहत्, वैराज इत्यादि सामें क्रमानें गाइलीं जाणारे क्रतू करण्याऐवजीं असा एक पक्ष आहे कीं, सातव्या दिवसाच्या अलीकडे असलेल्या सहा दिवसांत जर पूर्वोक्त रथंतरादि पृष्ठस्तोत्रें गाइलीं तर सातव्या दिवशींच्या विश्वजित् क्रतूंत तींच सारीं पृष्ठें जशींच्यातशींच गाणें प्राप्त होणार अर्थात् त्या दिवशींच्या सामगायनांत नावीन्य कांहींच न होतां एकदां धार काढल्यानंतर एखादा विसराळू माणूस जसा पुन्हां धार काढण्याच्या इरादानें गाईजवळ जावा तशांतला प्रकार होणार; तर तसें न करतां पूर्वींच्या सहा दिवसांत एकेका दिवशीं क्रमानें रथंतर व बृहत् या पृष्ठस्तोत्राचें गायन करावें आणि शेवटल्या म्हणजे सातव्या दिवशीं रथंतरादि सर्व पृष्ठस्तोत्रांचें यथापूर्व गायन करावें म्हणजे दूध देण्याकरितां पान्हवलेल्या गाईची धार काढण्यास प्रवृत्त झालेल्या पुरुषाप्रमाणें त्या दिवशीं रथंतरादि पृष्ठस्तोत्रांचा लाभ होऊन अनुष्ठान समृद्ध होईल.

ह्या सप्तरात्र क्रतु करणाऱ्या यजमानाला गाय, बोकड, घोडा, मेंढी, माणूस, गाढव व उंट हे सात ग्राम्य पशू, दोन खुराचे सात आरण्यक पशू व गायत्र्यादि सात छंदांची प्राप्ती होते.

**अष्टरात्र.**—अष्टरात्र क्रतूमध्यें पहिले पांच दिवस सप्तरात्रांत सांगितल्याप्रमाणें ओळीनें करावयाचे, सहाव्या दिवशीं त्रयस्त्रिंशत्स्तोमात्मक उक्थ्य करावयाचा, आणि सातव्या दिवशीं पंचविंशस्तोमात्मक व महाव्रतधर्मवान् असा अग्निष्टोम करून आठव्या दिवशीं मागें सांगितल्याप्रमाणें सर्वपृष्ठस्तोत्रात्मक विश्वजित्संज्ञक अतिरात्र करावयाचा. आठ भिन्नभिन्न क्रतूंचें समवायानें सतत आठ दिवस अनुष्ठान होत असल्यानें या यज्ञास अष्टरात्र ही संज्ञा प्राप्त झाली आहे.

गायत्रीच्या प्रत्येक पादास आठ अक्षरें असतात. गायत्री ही ब्रह्मवर्चस देणारी आहे अर्थात् गायत्रीच्या पादाक्षरांइतक्या

म्हणजे आठ दिवसपर्यंत अनुष्ठान केल्यानें गायत्रीची प्रसन्नता होऊन ब्रह्मवर्चस सहज प्राप्त होतें. शिवाय अष्टरात्रक्रतूचें आठ दिवस अनुष्ठान केल्यानें दिशा व उपदिशा यांच्याशीं याग-दिवसांचें संख्यासाम्य होऊन या यज्ञकर्त्याचें ब्रह्मवर्चस अष्टदिशांस प्रसिद्धीस येईल असें श्रुतितात्पर्य आहे.

**नवरात्र.**—अवर्षणामुळें अन्नाचा अभाव होऊन प्रजा क्षुधेनें व्याकुळ झाली तर त्या प्रजेच्या क्षुन्निवारणार्थ व अन्नप्राप्त्यर्थ नवरात्र नामक यज्ञ करावा. या नवरात्राच्या योगानें देशांत बहुत धान्य पिकून प्रजांच्या क्षुत्पीडा निवारण होतात. या नवरात्रनामक यज्ञाचे स्थूलमानानें तीन विभाग पडतात. तीन तीन दिवसांचा एक एक भाग असे तीन भाग होतात. पहिल्या विभागाच्या अनुष्ठानानें भूलोक, दुसऱ्या विभागाच्या अनुष्ठानानें अंतरिक्षलोक आणि तिसऱ्या विभागाच्या अनुष्ठानानें स्वर्गलोक क्षुन्निवारणसमर्थ होतो.

तिपेडी दोरी वळण्याची इच्छा करणारा माणूस ज्याप्रमाणें एका पेडांत दुसरा पेड सामील करतो व तसाच मग तिसरा पेड मिळवून घेतो, त्याप्रमाणें एका विभागाच्या अनुष्ठानानें एकदां भूलोक क्षुन्निवारणसमर्थ झाला कीं, पुढचे दोन लोकहि क्रमानें क्षुन्निवारणसमर्थ होतात.

एकेका विभागांत तीन तीन दिवस अनुष्ठान करावयाचें हें वर सांगितलेंच आहे. आतां या तीन दिवसांत क्रमानें कोण-कोणते यज्ञ करावयाचे असतात हें सांगावयाचें आहे.

सर्व सामगायकांच्या परिचयाचे असे ज्योतिष्टोम, गोष्टोम व आयुष्टोम नावांचे तीन क्रतू आहेत. या क्रतूंचें सामान्यतः स्वरूप एकच आहे. फक्त स्तोत्रिया म्हणजे सामगायनाच्या ऋचांच्या संख्येंत थोडा फरक आहे तो असा कीं, ज्योतिष्टो-मांत जितक्या स्तोत्रिया ऋचा आहेत त्यापेक्षां गोष्टोमांत एक अधिक असावयाची व आयुष्टोमांत एक कमी असावयाची. साम-वेदाच्या एका शाखेंत या तीन क्रतूंना त्रिकद्रुक असें विशिष्ट नाम आहे. हे तिन्ही क्रतू श्रुतिदृष्ट्या भूरादि त्रैलोक्याचे अधिपती असल्यानें या यज्ञाचें अनुष्ठान करणारा तिन्ही लोकांत प्रतिष्ठित होतो असा श्रुत्यर्थवाद आहे. इतकेंच नव्हे, तर "हे तीन यज्ञ केलेला अमका अमका गृहस्थ आमची क्षुत्पीडा निवारण करणारा आहे असा त्या यज्ञकर्त्याचा लौकिक प्रजेच्या तोंडून त्रैलोक्यांत पसरतो" असेंहि श्रुतितात्पर्य आहे.

ज्योतिष्टोम, गोष्टोम, आयुष्टोम, या तीन क्रतूंच्या क्रमानें तीन आवृत्ति केल्या म्हणजे नऊ दिवस होतात. या नऊ दिवसांच्या अनुष्ठानसमवायास अनुलक्षून या क्रतूचें **नवरात्र** हें नांव पडलें आहे. नवरात्र क्रतूचेहि चार प्रकार आहेत त्यांपैकीं वर्णित केलेल्या प्रकारास '**शललीपिशंग**' असेंहि आणखी एक नांव सूत्रकारांनीं दिलेलें आढळतें.

**दशरात्र.**—१ अग्निष्टुत् नामक एक अग्निष्टोम विकार, २ उक्थ्य, ३ अग्निष्टोम, ४ अग्निष्टोम, ५ उक्थ्य, ६ अग्निष्टोम (उपदल), ७ अग्निष्टोम, ८ उक्थ्य, ९ अग्निष्टोम व १० विश्व-जिद् (अतिरात्र), याप्रमाणें दहा क्रतू ओळीनें दहा दिवस केल्यानें हा दशरात्र नामक क्रतु सिद्ध होतो.

१ 'यज्ञायज्ञिय' म्हणून एक 'साम' आहे या सामाच्या योगानें सिद्ध होणाऱ्या स्तोमयोगास (ऋचेमध्यें 'अग्नि' हें पद असल्यामुळें) अग्निष्टोम असें म्हणतात, पण ज्या यज्ञांत सर्वच सामें अग्निदेवतेची स्तुति करणारीं असतात इतकेंच नव्हे, तर तीं सर्व सामें त्रिवृत् नामक स्तोमयोगानेंच गावयाचीं असतात, अशा एका यज्ञास 'अग्निष्टुत्' अशी संज्ञा आहे. दशरात्र यज्ञां-तील पहिल्या दिवशीं हा 'अग्निष्टुत्' संज्ञक अग्निष्टोमविकार करावा लागतो. या क्रतूचें फल तेजःप्राप्ति.

२ दुसऱ्या दिवशीं उक्थ्य नामक क्रतूचें अनुष्ठान व्हावयाचें त्यांत पंचदशस्तोमयुक्त व इंद्रविषयक ऋचांत ग्रथिलेलीं सामें गावयाचीं. या यज्ञाचें फल इंद्रियदार्ढ्यप्राप्ति.

३ तिसऱ्या दिवशीं त्रिवृत्स्तोमात्मक अग्निष्टोमच करावयाचा पण सामांच्या सर्व ऋचांमध्यें विश्वेदेवांची स्तुति असावयाची. या क्रतूचें फल पुष्टि प्राप्त होणें.

४ 'तीव्रसोम' म्हणून उक्थ्यनामक क्रतूंमध्यें एक विशिष्ट प्रकार आहे. या यज्ञांत 'आशिर' संज्ञक हविःपदार्थ करण्या-साठीं शंभर गाईंचें दूध काढावें लागतें. या 'तीव्रसोम' नामक उक्थ्यजातीय क्रतूसच अग्निष्टोमाचें स्वरूप देऊन दशरात्राच्या चवथ्या दिवशीं त्याचें अनुष्ठान करावयाचें. तीव्रसोमयज्ञांत १५ सामें गावयाचीं असतात त्यांतलीं शेवटचीं तीन वगळलीं म्हणजे १२ शिल्लक राहतात. तेवढीं बाराच सामें गाइलीं म्हणजे या यज्ञास अग्निष्टोमाचें स्वरूप येतें. सप्तदशस्तोमात्मक अशा या अग्निष्टोमांतील सर्व सामें प्रजापति देवतेची स्तुति करणारीं असतात. या क्रतूचें फल प्रजेची अभिवृद्धि.

५ एकविंश स्तोमात्मक व सूर्याची स्तुति ज्या ऋचेंत केलेली आहे अशाच ऋचांच्या आधारें सामगायन करून उक्थ्यनामक क्रतू दशरात्रांतील पांचव्या दिवशीं करावा. या यज्ञाचें फल कांति प्राप्त होणें हें होय.

६ सप्तदशस्तोमात्मक आणि प्रजापतीची स्तुति असणारीं सामें ज्यांत गावयाचीं आहेत असा उपहव्यसंज्ञक अग्निष्टोम-विकार दशरात्राच्या सहाव्या दिवशीं करावा. या क्रतूचें फल सर्वांमध्यें पूज्यता प्राप्त होणें.

७ व ९ इंद्र देवतेची स्तुति असणाऱ्या ऋचांचीं, त्रिणव-नामक स्तोमयुक्त अशीं सामें गाइला जाणारा अग्निष्टोम क्रतु दशरात्रांतील ७ व्या व ९ व्या दिवशीं करावा. या क्रतूचें फल विजयप्राप्ति.

८ विश्वेदेवांच्या स्तुतीनें भरलेलीं सामें गाइलीं जातात असा त्रयस्त्रिंशत्स्तोमात्मक 'उक्थ्य' ८ व्या दिवशीं करावा. या क्रतूचें फल प्रतिष्ठासिद्धि.

९ दशरात्राच्या शेवटच्या म्हणजे १० व्या दिवशीं पूर्वी वर्णन केलेला 'विश्वजित्' नामक सर्वपृष्ठाऽतिरात्र क्रतु करावा. या यज्ञाचें फल सर्वांवर विजय मिळणें.

१० या क्रतूसंबंधानें वेदामध्यें आख्यायिका आहेत त्याः—

प्रजापतीला प्रजा निर्माण करण्याची इच्छा झाली. तेव्हां त्या संबंधानें विचार करतांना त्याला प्रजानिर्मितीचें साधन असा **दशरात्र** नामक क्रतू दिसला व हा दशरात्र क्रतू संपादन होण्याचें साधन म्हणून 'दशहोतृकसंज्ञक' मंत्रहि त्याला आढळला 'चित्तिः स्रुक्, चित्तमाज्यं' हा तो मंत्र होय. होम-निष्पादक अशा स्रुचा वगैरे दहा पदार्थांचीं नांवें या मंत्रांत असल्यानें या मंत्रास 'दशहोता' ही संज्ञा मिळाली आहे. प्रजापतीनें दशहोतृसंज्ञक मंत्राचा होम केला व नंतर दशरात्र यज्ञ केला. दशरात्र यज्ञाच्या योगानें प्रजापति प्रजा निर्माण करण्यास समर्थ झाला. प्रजाकामेच्छु यजमानानें प्रजापतीप्रमाणें प्रथम दशहोतृ मंत्राचा होम करून नंतर दशरात्रयज्ञ करावा म्हणजे त्याला प्रजा प्राप्त होते.

दहा ही संख्या विराट् छंदाची आहे. अर्थात् दिनसंख्येनें विराट् छंदाशीं साम्य पावलेल्या ह्या दशरात्र क्रतूला '**वैराज**' असें नांव मिळालें आहे. हा वैराज क्रतू जो करतो तो यज्ञकर्ता यजमान वैराज्यपदाला जातो.

प्रजोत्पादन हें ह्या यज्ञाचें मुख्य फल व या यज्ञाचा प्रवर्तकहि प्रजापति असल्यानें या यज्ञाला 'प्राजापत्य' असेंहि आणखी एक नाव मिळालें आहे. जो हा यज्ञ करील त्याला प्रजा प्राप्त होईल.

आपल्या भाऊवंदांपेक्षां आपण मोठे व्हावें व आपल्या भाऊवंदांनीं आपणांस मोठेपणाचा मान द्यावा असें वाटेल त्यानें इन्द्राप्रमाणें हा क्रतु करावा म्हणजे त्यालाहि इन्द्रासारखीच फलप्राप्ति होईल.

अलंकारिक भाषेनें बोलावयाचें झाल्यास हा दशरात्रक्रतू म्हणजे 'तीन वशिंडांचा' एक बैल आहे असें म्हटलें तरी चालेल. कां कीं, या दशरात्र यज्ञांत बैलाच्या वशिंडाप्रमाणें वृद्धि पावलेले तीन दिवस आहेत. दुसरा, पांचवा व आठवा हे ते दिवस होत.

बैलाच्या वशिंडाच्या पुढचा मानेचा भाग व मागचा पाठीचा भाग सखल असतात त्याप्रमाणें दुसऱ्या, पांचव्या व आठव्या दिवशीं होणाऱ्या क्रतूमधील स्तोत्रऋचांची संख्या उंच म्हणजे ज्यास्त असून या दिनत्रयाच्या मागच्या पुढच्या दिवशीं होणाऱ्या क्रतूमधील स्तोत्रऋचांची संख्या सखोल म्हणजे कमी आहे. दशरात्र यज्ञाचें हें माहात्म्य लक्षांत येऊन जो यजमान ह्या यज्ञाचें अनुष्ठान करतो तो आपल्या बरोबरीच्या मंडळींत प्रजा, पशु व धन या तिन्ही बाबतींत श्रेष्ठ होतो. दुसऱ्या पांचव्या व आठव्या दिवशीं क्रमानें होणारे पंचदश, एकविंश व त्रयस्त्रिंशसंज्ञक स्तोमयोग हे यजमानस्थानीं समजावे व इतर दिवशीं होणारे स्तोमयोग हे प्रजास्थानीं कल्पावे. हा दशरात्र क्रतू करणारा यजमान प्रजांचा अधिपति होतो असें श्रुतीनें वर्णिलें आहे.

पापनिवृत्ति व अन्नप्राप्ति होण्यासाठीं जसा हा दशरात्र क्रतू करावा म्हणून विधान आहे त्याचप्रमाणें एखाद्या शत्रूनें आपल्यावर अभिचार म्हणजे मारणप्रयोग केला असेल, तर त्याचा परिहार होण्यासाठींहि हा दशरात्र क्रतू करावा असें विधान आहे. हा दशरात्र क्रतू केला म्हणजे यज्ञ करणारा यजमान आपल्या रक्षणासाठीं हजारों शूर योद्ध्यांनीं परिपूर्ण अशीं देवांचीं दहा नगरेंच जणों काय आपल्या रक्षणासाठीं आपल्या भोंवतीं वसवितो असें म्हटलें तरी चालेल. या यज्ञानें यज्ञकर्ता यजमान तर मारणापासून बचावला जातोच, पण उलट मारणप्रयोग करणारा शत्रूहि मरतो.

एखादा राजा प्रथम राज्यवैभव भोगून नंतर दरिद्री व्हावा, त्याला क्लेश व्हावे, त्याप्रमाणें दुसऱ्या दिवशींच्या वशिंडस्थाना-पन्न अशा यज्ञांत पंचदशस्तोम केल्यावर दुसऱ्या दिवशीं म्हणजे यज्ञाच्या तिसऱ्या दिवशीं जो क्रतू करावयाचा त्यामध्यें कमी संख्या असलेला स्तोम करणें म्हणजे एकप्रकारें दारिद्र्यच वाटतें. म्हणून वशिंडस्थानीं मानलेल्या दुसऱ्या पांचव्या व आठव्या दिवसांच्या मागच्या व पुढच्या दिवशीं अग्निष्टोमसंस्थाप्रयोजक अशा 'यज्ञायज्ञिय' नामक सामांचें गायन करीत जावें, म्हणजे दारिद्र्यदोष नष्ट होऊन कर्माची समृद्धि होईल.

**एकादशरात्र.**—पूर्वीं ज्योतिष्टोम, गोष्टोम व आयुष्टोम असे तीन क्रतू वर्णिले आहेत त्यापैकीं अग्निष्टोमविकारभूत अशा ज्योति-ष्टोमयज्ञासच अतिरात्रसंस्थेचें रूप देऊन एकादशरात्रक्रतूच्या पहिल्या दिवशीं त्या **ज्योतिरतिरात्राचें** अनुष्ठान करावें. नंतर दुसऱ्या दिवसापासून सात दिवस संपेपर्यंत मागें षड्रात्र क्रतूच्या प्रकरणांत वर्णिलेले सहा क्रतू दररोज क्रमाक्रमानें करीत जावे. आठव्या दिवशीं चतुर्विंशस्तोमयुक्त रथंतर साम गाइलें जाणारा उक्थ्य क्रतु करावा. नवव्या दिवशीं चतुश्चत्वारिंशत्स्तोमयुक्त बृहत् व रथंतर हीं सामें गाइलीं जाणारा उक्थ्य क्रतु करावा. दहाव्या दिवशीं अष्टाचत्वारिंशत् स्तोमयुक्त बृहत्साम गाइलें जाणारा उक्थ्य क्रतू करावा आणि शेवटच्या म्हणजे ११ व्या दिवशीं एकोनत्रिंशत्स्तोमयुक्त अतिरात्र क्रतु करावा.

उपर्युक्त वर्णनांत ८, ९ व १० या तिन्ही दिवशीं ओळीनें उक्थ्यसंज्ञक क्रतूच करावयास सांगितल्याचें आढळून येईल. या तिन्ही उक्थ्यांमध्यें उपयुक्त केल्या जाणाऱ्या चतुर्विंशादिस्तो-मयोगास **छंदोम** अशी संज्ञा आहे. गायत्र्यादि छंदांनीं म्हणजे त्या त्या छंदाच्या पादाक्षरांनीं मापले जाणारे ते छंदोम होत.

पहिल्या दिवसापासून अकरा दिवसपर्यंत केल्या जाणाऱ्या क्रतूंचीं फलें अनुक्रमें १ स्वर्गलोकप्रकाशन, २–७ क्रतूंची अनु-कूलता, ८ ब्रह्मवर्चस, ९ इंद्रियबल, १० पशूंची समृद्धि आणि ११ प्रतिष्ठा प्राप्त होऊन पशूंचीहि प्राप्ती होणें अशीं आहेत.

**द्वादशाह क्रतूमध्यें कामनापरत्वें ग्रहांच्या अनुष्ठानाचे प्रकार.**—ऐंद्रवायव, मैत्रावरुण व आश्विन या तिन्ही ग्रहांस म्हणजे सोमरसानें भरलेल्या पेल्यांस **द्विदेवत्य** अशी संज्ञा आहे. आपले वडील, आजे, पणजे, ज्या आचारानें वागले त्याच आचारानें आपल्या पुत्रपौत्रांनीं वागावें अशी इच्छा असणाऱ्या यजमानानें द्वादशाहक्रतूमध्यें द्विदेवत्य ग्रहांपैकीं ऐंद्रवायव नामक ग्रह प्रथम भरून घेऊन नंतर बाकीचे भरावे.

वस्तुतः प्रकृतिभूत अग्निष्टोमामध्यें ऐंद्रवायव हाच ग्रह प्रथम भरून घ्यावयाचा विधि आहे, तथापि कामनेच्या दृष्टीनें सांगतांना ऐंद्रवायव ग्रह प्रथम घ्यावा ही गोष्ट पुन्हां सांगावी लागली आहे. ज्याप्रमाणें रोजचा अग्निहोत्रहोम दह्यानें द्यावा असें एकदां सांगून पुन्हां काम्यपरत्वें, म्हणजे इंद्रियसौष्ठव प्राप्त होण्यासाठीं 'दध्नेंद्रियकामस्य' 'इंद्रियकाम असेल तर दह्यानें होम' द्यावा असें पुन्हां एकदां सांगितलें. त्याचप्रमाणें ऐंद्रवायव ग्रहाच्या बाबतींत समजावें.

रोगग्रस्त अशा यजमानानें रोगमुक्तीसाठींहि द्वादशाह क्रतूमध्यें 'ऐंद्रवायव' हाच ग्रह प्रथम भरून घ्यावा.

सत्ररूप द्वादशाहामध्यें दीक्षित यजमानापैकीं कोणी मृत झाल्यास बाकीच्यांनीं ग्रह भरून घेतांना प्रथमतः 'मैत्रावरुण' नामक द्विदेवत्य ग्रह भरून घ्यावा व नंतर बाकीचे भरावे.

सर्व देवांमध्यें उभयतां अश्विनीकुमार हे आनुजावर म्हणजे मानानें कमी दर्जाचे आहेत. वस्तुतः देव या नात्यानें इतर देवांच्या बरोबरीनें ते पूज्य असतांना वैद्यकीचा धंदा केल्यामुळें त्यांचा दर्जा कमी झाला. मनुष्यसमुदायामध्यें देखील वैद्यकीचा धंदा करणारे लोक कमी दर्जाचे असल्याचें वर्णन श्रुतींत आहे. वैद्यकीच्या धंद्यामुळें कमी दर्जावर आलेले आश्विनदेव पुढें बहिष्पवमानसंज्ञक सामगायनाच्या श्रवणानें पावन होऊन पुन्हां वरच्या दर्जांत आले, त्याचप्रमाणें वास्तविक योग्यता मोठी असूनहि कनिष्ठ दर्जांत गणल्या जाणाऱ्या यजमानानें द्वादशाह क्रतूमध्यें **आश्विन**संज्ञक द्विदेवत्यग्रह प्रथम भरून घेऊन नंतर बाकीचे भरावे. म्हणजे अश्विनौ देवांच्या अनुग्रहानें त्या यजमानाचा दर्जा श्रेष्ठ प्रतीचा होतो.

शरीरकांति किंवा संपत्ति नष्ट झालेल्या यजमानानें द्वादशाह क्रतूंमध्यें 'शुक्र'नामक ग्रह प्रथम घेऊन नंतर बाकीचे घ्यावे. कारण, आदित्य म्हणजेच हा शुक्र ग्रह होय. आदित्याहून जास्त प्रकाशमान असा कोणता ग्रह आहे ? यासाठीं आदित्यस्वरूप असा 'शुक्र' ग्रह प्रथम घेतल्यानें दरिद्री किंवा शरीरकांति नष्ट झालेला यजमान संपत्तीच्या व शरीरकांतीच्या बाबतींत पराकाष्ठेला जाऊन पोंचतो.

शत्रूचा नाश व्हावा अशी इच्छा असणारानें 'मंथि'नामक ग्रहाचें प्रथमतः ग्रहण करून मग इतरांचें करावें म्हणजे शत्रु मृत्यूकडून घेरला जातो.

आपले वडील, आजे वगैरे पूर्वज धन, विद्या इत्यादि बाबतींत श्रेष्ठ होते, आपण मात्र अगदीं हीन आहों व या हीनतेमुळें कोठेंहि समाजामध्यें आपल्याला चार शब्द बोलून वजन पाडतां येत नाहीं असें वाटणाऱ्या यजमानानें 'आग्रयण' नामक ग्रह प्रथम भरून घ्यावा.

दुसऱ्यानें केलेल्या 'मारणा'चा प्रयोग त्याच्यावरच पुन्हां उलटावा व आपला बचाव व्हावा असें वाटत असेल त्यानें 'उक्थ्य' नामक ग्रह प्रथम भरून घ्यावा. मात्र ग्रह भरून घेण्यापूर्वीं 'सरस्वत्यभिनोनेषि' ह्या पुरोरुक् संज्ञक ऋचेचें पठण करावें आणि नंतर ग्रह भरून घ्यावा.

रोगपरिहाराची अथवा पर्जन्यवृष्टि होण्याची इच्छा करणारानें ऐंद्रवायवादि ग्रह भरून घेणें ते अगदीं कांठोकांठ सोमरस भरून येईल अशा रीतीनें भरपूर भरून घ्यावे.

ब्रह्मवादी असें म्हणतात कीं, सर्व सोमयाग अग्निष्टोमप्रारंभक आहेत आणि म्हणूनच अग्निष्टोमास 'ज्येष्ठ यज्ञ' असें म्हटलें आहे. असें असतांना द्वादशाहामध्यें प्रथम दिवशीं तुम्ही अतिरात्राचा प्रयोग कां करता ? यावर दुसऱ्या पक्षाचें उत्तर असें कीं, द्वादशाह यज्ञ हा जर एक पुरुष मानला तर अतिरात्र यज्ञ हे त्याचे चक्षुर्गोलक होत व अग्निष्टोम हे त्या डोळ्यांतील बाहुल्या होत. यासाठीं यजमान जर अग्निष्टोम प्रथम करील तर डोळ्यांच्या आधारावांचून भलत्याच ठिकाणीं बाहुल्या बसविल्यासारखें होईल. तर तसें न करतां प्रथम अतिरात्ररूप चक्षुर्गोलकाचा आधार तयार करून नंतर अग्निष्टोमरूपी बाहुल्या त्यांत बसवाव्या. म्हणजे प्रथम दिवशीं अतिरात्र व दुसरे दिवशीं अग्निष्टोम करावा. त्याचप्रमाणें शेवटच्या बाराव्या दिवशीं व त्याच्या अलीकडच्या किंवा अकराव्या दिवशीं क्रमानें अतिरात्र व अग्निष्टोम क्रतु करावा. मध्यें जे आठ दिवस राहतात त्यांमध्यें दररोज उक्थ्यनामक यज्ञ करावा.

सारांश अतिरात्र, अग्निष्टोम व उक्थ्य या तीन क्रतूंच्या आवृत्तिसमूहानें द्वादशाहनामक यज्ञ सिद्ध होतो.

वरील वर्णन विशेषतः तैत्तिरीय संहितेस धरून दिलें आहे आणि जेथें विशेष फोड करावी असें वाटलें तेथें सत्यापाढ सूत्राचा उपयोग केला आहे. आख्यायिका अर्थात् प्रत्येक क्रतूसंबंधानें आहेत. पैकीं त्रिरात्रासंबंधाची मात्र येथें नमुन्यादाखल दिली आहे.

पुढें परिशिष्टांत जीं यज्ञसंस्थेतिहासबोधक कोष्टकें आहेत तीं यजू आणि अथर्व यांच्या समेटापूर्वी यज्ञसंस्था कशी काय होती यासंबंधाचा भावी संशोधकांनां विचार करण्यास साहाय्यक होतील. त्यांतील दुसरें कोष्टक निरनिराळ्या ब्राह्मण ग्रंथांप्रमाणें हौत्र कसें बदलत होतें व त्या ब्राह्मणांत व त्याच्याच अनुयायी सूत्रकारांत कसा भेद उत्पन्न होत होता याचा एकंदर इतिहास दाखवितें. असो.

यज्ञसंस्था आज बुडाल्यासारखीच आहे पण ती कार्य करून गेली. प्राचीन वाङ्मय तिनें जिवंत ठेविलें आणि आपणांस देशाचा भौतिक व सांस्कृतिक इतिहास लिहिण्यास साहित्य दिलें. या साहित्याचा आपणांस ऐतिहासिक उपयोग कसा होतो हें पुढच्या भागांत स्पष्ट होईल. वेदकालीन इतिहास लिहिण्यास वेद व इतिहासपुराणेंहि अंशेंकरून उपकारक होतील.

---

# परिशिष्ट.

## (अ)

### वेदकालनिर्णयार्थ ज्योतिषाचा उपयोग.

वेदकालनिर्णयार्थ झालेल्या संशोधनाचा इत्यर्थ पूर्वी (पृ. १८६–९३ पहा) दिलाच आहे. त्याच विषयासंबंधीं पूर्वी केसरींत पत्रव्यवहार झाला होता तो व 'इंडियन अँटिक्वरि' या मासिकांत एक लेख आला होता त्याचा सारांश येथें देतों.

—केसरींतील पत्रव्यवहार—

रा. रा. केसरीकर्ते यांसः—

सा. न. वि. वि. रा. रा. शंकर बाळकृष्ण दीक्षितकृत भारतीय ज्योतिःशास्त्र हें पुस्तक वाचीत असतां त्यांत ६५ पानावर तैत्तिरीय ब्राह्मणांतील एक उतारा माझे पाहण्यांत आला, तो इतका महत्त्वाचा आहे कीं, त्याचेविषयीं जास्त चौकशी रा. दीक्षित यांनीं कशी केली नाहीं याचें आश्चर्य वाटतें. तें वाक्य असें आहे.

**बृहस्पतिः प्रथमं जायमानः ॥ तिष्यं नक्षत्रमभिसंबभूव**
**तै. ब्रा. ३.१,१.**

यांत "बृहस्पति जो प्रथम उत्पन्न झाला तो पुष्य नक्षत्राजवळ झाला." याचा अर्थ गुरु व पुष्य नक्षत्रांची युति पहिल्यानें झाली असा घेतला पाहिजे. व त्यांतील 'अभि' या उपसर्गाचा अर्थ बृहस्पति तिष्य नक्षत्रासमोर पहिल्यानें आला; अर्थात् त्याच्या अंगावरून बृहस्पति गेला असें निर्विवाद ठरतें. या वेळेपूर्वींहि गुरु पुष्याजवळून जात असे पण त्यावेळीं त्याचा शर दक्षिण व पुष्याचा शर उत्तर यामुळें भेदयुति होत नसे. पण ती झालेली जेव्हां तैत्तिरीय ब्राह्मणकालच्या ऋषींनीं प्रथम पाहिली, त्या वेळेस त्यांस मोठें आश्चर्य वाटून वरील वाक्याची रचना झाली. यावरून दुसरी अशी एक गोष्ट सिद्ध होते कीं, त्या वेळचे व तत्पूर्वीचे आर्यलोक तेजःपुंज खस्थांकडे फार बारकाईनें पहात असत. आतां या वाक्यावरून तैत्तिरीय ब्राह्मणकाल कसा निघतो तें सांगतों.

गुरूचा परम शर १ अंश १९ कला आहे व पुष्याचा शर उत्तर ४ कला आहे. तेव्हां अगदीं पहिल्यानें युति होण्यास गुरुकक्षेचा ऊर्ध्व संपात तिष्य नक्षत्राच्या मागें (पश्चिमेस) ३ अंश या स्थानीं आला पाहिजे. वरील वाक्यरचनेपूर्वी तो पात या बिंदूच्या पूर्वेस असल्यामुळें गुरुपुष्याची भेदयुति अशक्य असे. व पृथ्वीपासून गुरूपर्यंत युतिसमयीं जें अंतर त्यांतील फेरफारामुळें गुरूचा शर भूस्थ द्रष्ट्यास कमजास्त दिसला तरी दक्षिणेचा शर उत्तर शर कधींहि होणार नाहीं ही गोष्ट ज्योतिष्यांस माहित आहे. पुष्याच्या थेट दक्षिणेस पात आल्यावर गुरूच्या युतिकालीं उत्तर शर होण्यास सुरवात झाली. तरी पुष्याचा शर ४ कला असल्यामुळें गुरूचा शर फार तर एक कला कमजास्त होईल. म्हणून या युतीवरून गुरुकक्षापातांचें स्थान आम्हांस एक अंशाचे आंत ठरवितां येतें, व पातगति १ अंश होण्यास २५० वर्षे लागतात. म्हणून या युतीचा काल आम्हांस २००।२५० वर्षांच्या चुकीनें ठरवितां येतो. पण याच्या साहाय्यानें आम्हांस ६६०० वर्षे मागें जाता येतें त्यापुढें हें अंतर कांहींच नव्हे.

**ग्रहसाधन कोष्टकें.**

| | | |
|---|---|---|
| पुष्याचा सायन भाग, पान | ३२४ | |
| (इ. स. १८५०) | १२६ | ३७ |
| गुरूच्या पाताचा भोग पान | २५० | |
| (इ. स. १८५०) | ९८ | ५४ |
| हलींचें अंतर (इ. स. १८५०) | २७ | ४३ |
| तैत्तिरीय ब्राह्मणकालीं | ३ | ० |
| ब्राह्मणकालापासून आजपर्यंत गुरुपातगति | २४ | ४३ |

अर्वाचीन यूरोपीय ज्योतिष्यांचा मुकुटमणि जो फ्रेंच ज्योतिषी लीवेरीअर त्यानें गुरूच्या पाताची गति दर वर्षी–१३·८६२ विकला ठरविली आहे. तेव्हां या मानानें गुरुपाताची २४ अंश ४३ कला पिछेहाट होण्यास २४ अं. ४३ क. ÷ –१३·८६२ वि. म्हणजे सुमारें–६४२० वर्षे लागलीं. इतक्या अवधींत लीवेरीअरच्या मताप्रमाणें गुरुपाताच्या कालांतर संस्काराची नाक्षत्रगति ६ कला धन येते. ती मागच्या कालांसाठीं ऋण होऊन हा अवधि सुमारें २५ वर्षांनीं वाढतो. सारांश तैत्तिरीयब्राह्मणोक्त गुरुपुष्यभेदयोग हलींच्या कालापूर्वी सुमारें ६५०० वर्षे झाला; अथवा विशेष बारकाईनें सांगावयाचें तर इ. स. पूर्वी (१८५०–६५००) ४६५० वर्षे झाला. म्हणून पूर्वोक्त तैत्तिरीय वाक्य ६००० वर्षांचें जुनें आहे हें सिद्ध होतें व ऋग्वेद तर याहून वरींच वर्षे प्राचीन असला पाहिजे.

नामदार बाळ गंगाधर टिळक यांनीं विषुवसंपाताच्या वैदिककालीन स्थितीवरून तो काल निदान ६००० वर्षांपूर्वींचा आहे, असें अनेक रीतीनें सिद्ध केलें आहे. पण या युतीनें एक अंशाच्या आंत संपातस्थान ठरवितां येतें. त्यांनां एक समग्र पुस्तक लिहून जी गोष्ट ठरवितां आली ती आयती एक्या त्रैराशिकानें एका ओळींतच सिद्ध होते. असो आमच्या वेदासारख्या ग्रंथांचा अति जुनाट काल ठरविण्यास पात हे आकाशरूपी तवकडीवर शतकें दाखविणाऱ्या कांट्यांप्रमाणें आहेत. ना. टिळकांनीं विषुवसंपात घेतला व मी गुरूचा संपात घेतला व या दोनहि स्वतंत्र मार्गांनीं गणित करून अखेर एकच गोष्ट ठरणें यासारखा दुसरा आनंद नाहीं. कळावें लोभ असावा हे विनंति.

बागलकोट
ता. २२–३–९७ } **व्यंकटेश बापुजी केतकर.**

ता. क. गुरूच्या परमशरांत कालांतरानें थोडासा फेरफार झाला तरी त्याचा परिणाम पाताच्याच आसपासच्या शरावर

होत नाहीं असें म्हणण्यास हरकत नाहीं. म्हणून मीं वर सिद्ध केलेल्या प्रमेयास कोणत्याहि दिशेनें बाध येत नाहीं.

**वें. बा. केतकर.**

वे. शा. सं. रा. रा. व्यंकटेश बापुजी केतकर यांचें वरील पत्र पाहून आम्हांस फार समाधान होतें. त्यांनीं केलेलें गणित बरोबर आहे. मात्र या एकाच वाक्यावरून वैदिक ग्रंथांचा काल कायमचा ठरला असता असें त्यांनीं मानूं नये. "बृहस्पति पहिल्यानें तिष्य नक्षत्राजवळ उत्पन्न झाला" याचा अर्थ कांहीं गृहस्थ "सदर नक्षत्राजवळ तो असतां त्याची ग्रहत्वानें ओळख झाली" असाहि करितील. या अर्थापेक्षां रा. रा. केतकर यांनीं केलेला अर्थ अधिक ग्राह्य आहे हें आम्हांस मान्य आहे. तथापि शंकेखोर मंडळीचें दुसऱ्या पुराव्यावांचून पूर्ण समाधान व्हावयाचें नाहीं एवढें रा. रा. केतकर यांनीं लक्षांत ठेविलें पाहिजे. रा. रा. केतकर यांच्या लेखांत दुसरी एक छोटीशी दुरुस्ती करावयास पाहिजे होती ती ही कीं, त्यांनीं काढिलेला काळ तैत्तिरीय ब्राह्मणांचा नाहीं. तर तैत्तिरीय ब्राह्मणोक्त गुरुपुष्ययोगाचा आहे. तैत्तिरीय ब्राह्मणांत कृत्तिका ह्या नक्षत्रांचें मुख आहेत इत्यादि जीं वाक्यें आहेत त्यांवरून ब्राह्मणकालीं कृत्तिकांत संपात होतात हें उघड आहे. रा. रा. शंकर बाळकृष्ण दीक्षित यांनीं शतपथ ब्राह्मणांतील जें एक वाक्य प्रसिद्ध केलें आहे त्यावरून कृत्तिका त्या कालीं पूर्वदिशा कधींहि सोडीत नसत, म्हणजे अर्थात् त्या वासंतिक संपातस्थानीं होत्या हें उघड होतें. या वाक्यांतील क्रियापद वर्तमानकालीं (एता ह प्राच्यै दिशो न चलंते) व गुरुपुष्ययोगाच्या वाक्यांत 'बभूव' असा भूतभूत काळ आहे. भूतभूत काळ जुनी गोष्ट सांगत असतां उपयोगांत आणितात. करितां कृत्तिकांच्या संबंधानें आणि गुरुपुष्ययोगासंबंधानें मिळून जीं दोन्ही वाक्यें तैत्तिरीय ब्राह्मणांत आढळतात त्यांची संगति लावतां तैत्तिरीय ब्राह्मणकालीं कृत्तिका संपातस्थानीं होत्या (इ. स. पूर्वी २५०० वर्षे) त्यावेळीं, त्याच्याहि पूर्वी म्हणजे रा. रा. केतकर म्हणतात त्याप्रमाणें इ. स. पूर्वी ४६०० वर्षे झालेली गुरुपुष्ययुति ब्राह्मणकारांस माहित होती असा अर्थ करावा लागतो. एवढा बारीक भेद लक्षांत ठेवला म्हणजे मग वर रा. रा. केतकर यांनीं केलेलें अनुमान कबूल करण्यास हरकत नाहीं. रा. रा. केतकर यांनीं हें गणित करून वेदाच्या प्राचीनत्वाबद्दल जीं कांहीं प्रमाणें उपलब्ध आहेत त्यांतच एका चांगल्या प्रमाणाची भर घातली याबद्दल आम्ही त्यांचें अभिनंदन करितों.—के. क.–ता. ३० मार्च १८९७.

**—इंडियन अँटिक्वरीमधील लेख—**

शतपथ ब्राह्मणांत एके ठिकाणीं [११.१,२ पहा.] असा उल्लेख आला आहे कीं, सत्तावीस नक्षत्रांपैकीं फक्त कृत्तिका नक्षत्रच नेहमीं पूर्वबिंदूवर उगवतें. यावरून हें उघड होतें कीं, शतपथ ब्राह्मणाचा हा भाग लिहिला गेला तेव्हां संपातबिंदु कृत्तिकानक्षत्रांत असला पाहिजे. संपातबिंदु दर वर्षी क्रांतिवृत्तांत ५० सेकंद मागें सरकतो असें जरी गृहीत धरलें तरी शतपथ ब्राह्मणाचा काळ खिस्ती शकापूर्वी सुमारें ३००० वर्षे निघतो!

## (आ)

## सप्तसंस्था.

आज श्रौतस्मार्तधर्मवादी धर्माचरण करणें म्हणजे सप्तसंस्था पाळणें असा अर्थ समजतात. यासाठीं सप्तसंस्था म्हणजे काय हें समजलें पाहिजे. श्रौतगृह्यविषयक उत्तरकालीन वाङ्मयांत सप्तसंस्था हा शब्द वारंवार येतो. सप्तसंस्था म्हणजे काय याविषयीं सर्वत्र एकवाक्यता नाहीं. तथापि सायणांचें याविषयीं मत सायणोत्तरकालीं ग्राह्य झालें. सप्तसंस्थांचा संबंध सप्तहोत्यांशीं देखील जुळविला जातो. पण ती केवळ प्राचीन शब्द नवीन कल्पनेस जुळविण्याची तडजोड आहे.

१ एक किंवा अनेक देवतांच्या उद्देशानें हविर्द्रव्यसमर्पणपूर्वक अंगोपांगसहित असें जें एक स्वतंत्र कर्म अगर विधि त्यास संस्था असें म्हणावयाचें. सात सात संस्थांच्या एकेका गणास सप्तसंस्था म्हणतात. याप्रमाणें सप्तसंस्थांचे एकंदर गण किंवा गट तीन आहेत. १ सप्त पाकसंस्था २ सप्त हविःसंस्था ३ सप्त सोमसंस्था, हे ते तीन गण होत. यांपैकीं पहिल्या गणांतील सप्तसंस्था एका अग्नीवर म्हणजे गृह्याग्नीवर होत असून २ व ३ गणांतील सप्तसंस्था त्रेताग्नीवर (आहवनीय, गार्हपत्य व दक्षिणाग्नि) म्हणजे श्रौताग्नीवर होत असतात. म्हणून पहिल्या गणांतील सप्तसंस्थांना स्मार्त सप्तसंस्था व २ आणि ३ या गणांतील संस्थांनां श्रौतसप्तसंस्था असें म्हणतात.

गृह्याग्नीवर होणाऱ्या संस्थांचीं नांवें.

१ पाकसंस्था.—१ अष्टका, २ पार्वणस्थालीपाक, ३ मासिक श्राद्ध, ४ श्रावणी, ५ आग्रहायणी, ६ चैत्री, ७ आश्वयुजी.

त्रेताग्नी (श्रौताग्नी)वर होणाऱ्या संस्थांचीं नांवें.

२ हविःसंस्था.—१ अग्न्याधान, २ अग्निहोत्रहोम ३ दर्शपूर्णमास, ४ चातुर्मास्यानि, ५ आग्रयणेष्टि, ६ निरूढपशुबंध ७ सौत्रामणि.

३ सोमसंस्था.—१ अग्निष्टोम, २ अत्यग्निष्टोम, ३ उक्थ्य, ४ षोडशी, ५ अतिरात्र, ६ अप्तोर्याम, ७ वाजपेय.

या संस्थांपैकीं सप्त सोमसंस्था या अग्निष्टोमाचेच विकार आहेत. अग्निष्टोमांत थोडक्या फरकानें दुसरी संस्था कशी तयार होते हें पाहूं.

उक्थ्य, षोडशी, अतिरात्र, आणि अप्तोर्याम हे अग्निष्टोमाचेच गुणविकार आहेत. 'अग्निष्टोम' ही सप्त संस्थांपैकीं प्रथम संस्था आहे. अग्निष्टोम, अत्यग्निष्टोम, उक्थ्य, षोडशी, वाजपेय, अतिरात्र व अप्तोर्याम अशा सात सोमसंस्था आहेत. परंतु कोणां कोणां आचार्यांत संस्थांच्या संख्येबद्दल मतभेद आहे. एकाचे मतें अग्निष्टोम, उक्थ्य व अतिरात्र ह्या तीनच संस्था आहेत. दुसऱ्याचे मतें 'एतद्वा अग्निष्टोमं प्रथममुपयंत्यथोक्थ्यमथ षोडशिनमथातिरात्रम्' म्हणजे पूर्वोक्त तीन संस्थांत 'षोडशी' या एका संस्थेची भर घालून एकंदर चार संस्था आहेत. भारद्वाजाचे मतानें अग्निष्टोम, उक्थ्य, षोडशी, अतिरात्र व अप्तोर्याम या पांच संस्था आहेत. या पांचहि संस्था प्रकृतिभूत व अग्निष्टोम गुणविकारात्मक आहेत. भारद्वाजांनीं अग्निष्टोमप्रभृति पांच संस्था सांगून शेवटीं सर्व संस्थांनां अनुलक्षून 'संतिष्ठतेज्योति-

ष्टोमः' असा समुच्चयात्मक उपसंहार केला आहे. सारांश कोणाच्या मतें ७, कोणाच्या मतें ५, कोणाच्या मतें ४, तर कोणाच्या मतें ३, याप्रमाणें चार प्रकारचे मतभेद सोमसंस्थांच्या बाबतींत आहेत. यांची एकवाक्यता अशी कीं, सप्तसंस्थांमध्यें प्रकृतिरूप संस्था व विकृतिरूप संस्था असे दोन भेद पडतात. अत्यग्निष्टोम व वाजपेय या दोन संस्था विकृतिरूप असून अग्निष्टोमादि ५ संस्था प्रकृतिरूप आहेत. प्रस्तुत प्रकृतिरूप संस्थांचाच अनुक्रम सांगण्याचा, हेतु असल्यामुळें या ठिकाणीं अत्यग्निष्टोम व वाजपेय यांचा या अनुक्रमदर्शक सूत्रांत अंतर्भाव केला नाहीं. प्रकृतिभूत अशा ५ व विकृतिभूत २ मिळून ७ सोमसंस्था आहेत हें ध्यानांत ठेवावें. इतक्या प्रस्तावानंतर आतां चालू विषयाकडे वळूं.

**उक्थ्य.**—उक्थ्यपर्याय (संज्ञक अनुष्ठाना)सह असणारा तो 'उक्थ्य.' 'षोडश' संज्ञक सामानें व शस्त्रानें जो याग केला जातो तो 'षोडशी.' रात्रीचें अतिक्रमण करून ज्याचें अनुष्ठान संपविलें जातें तो 'अतिरात्र' आणि 'अप्तु' म्हणजे सोमरस 'आग्रयणा' मध्यें विशेष रीतीनें ज्या क्रतूंत ओतला जातो तो **'अतिरात्र'** होय. आतां 'उक्थ्य' क्रतूविषयीं लिहूं. पशु प्राप्त व्हावे अशी इच्छा असणारानें उक्थ्य करावा. अथवा कोणचीहि कामना मनांत न आणतां निष्काम व नित्य म्हणूनहि 'उक्थ्य' संज्ञक क्रतु करावा. कारण 'उक्थ्य' हा काम्य आणि नित्य अशा दोन प्रकारचा आहे. गौतमाचार्यांनीं प्रत्येक ब्राह्मणाचे ४८ संस्कार सांगितले आहेत त्यांत सात प्रकारच्या सोमसंस्था ब्राह्मणाला नित्य अर्थात् संस्कारभूत अशा आहेत असें म्हटलें आहे. 'उक्थ्य' यज्ञाचा अनुष्ठानक्रम प्रायः अग्निष्टोमाप्रमाणेंच आहे. विशेष तेवढा येथें सांगावयाचा आहे. सदोमंडपाला पंधरा मेढी उभाराव्या. 'यमग्ने पृत्सुमर्त्यं' या मंत्रानें 'क्रतुकरणसंज्ञक' आहुति दिल्यानंतर स्रुचींत अवशिष्ट राहिलेलें तूप 'यमग्ने पृत्सु' याच मंत्रानें 'मध्यम' परिधीला चोपडावें. उक्थ यज्ञामध्यें सवनीय पशूबरोबर 'इंद्राग्नी' देवतेच्या उद्देशानें आणखी एका पशूचें उपाकरण करावें. सूत्रकारांनीं शाखांतरामधून हा पक्ष घेतलेला आहे. तैत्तिरीय शाखेमध्यें वाजपेय प्रकरणीं खुलासा करतांना एकेका पशूनें एक एक संस्था करावी असें प्रदर्शित केलें आहे. तृतीयसवनामध्यें धाराग्रह (सोमरसाची धार दशापवित्रांतून पडत असतांना त्या धारेंत भरून घ्यावयाचे ग्रह) घेतेवेळीं 'आग्रयण' ग्रह भरून घेतल्यानंतर 'उक्थ्य' ग्रह भरून घ्यावा. अग्निष्टोमासंबंधीं चमसांचें उन्नयन (सोमरसानें पूरण) करतेवेळीं चमसांच्या ३ गणां (समुदायां)करितां सोमरस शिल्लक राखून मग चमस भरावे. 'सर्वंश्राजानुन्नय' येथून 'कलशौ मृष्ट्वा न्युब्जत' इतक्या प्रैष भागाचा लोप करावा. अग्निष्टोमाच्या शेवटला चमस भरावयाच्या खेपेला केलेल्या पूर्वोक्त प्रैषांशलोपाचा उच्चार संस्थेच्या शेवटचा चमस भरण्याचे प्रसंगीं पुन्हां करावा. अग्निष्टोमसंबंधीं सर्व चमसांचा प्रचार झाल्यानंतर प्रातःसवनाप्रमाणेंच तीन उक्थ्यविग्रह संज्ञक ग्रहांचा प्रचार करावा. 'उपयाम० इन्द्रावरुणाभ्यां त्वा' 'एषते-योनिरिंद्रावृहस्पतिभ्यां त्वा' 'उपयाम० इन्द्राविष्णुभ्यां त्वा' 'एषते योनिरिंद्रावरुणाभ्यां त्वा' 'उपयाम० इन्द्रावृहस्पतिभ्यां त्वा' 'एषते योनिरिंद्रावृहस्पतिभ्यां त्वा' 'उपयाम० इन्द्राविष्णुभ्यां त्वा जुष्टं' 'एषते योनिरिंद्राविष्णुभ्यां त्वा' याप्रमाणें 'उक्थविग्रह' संज्ञक ३ ग्रहांचे अनुक्रमें घेण्याचे व आसादन करण्याचे मंत्र होत. येथें उक्थ्य संज्ञक क्रतूंचे अनुष्ठानांतील विशिष्ट गोष्टींचा खुलासा संपला.

**षोडशी.**—आतां 'षोडशी' यज्ञसंबंधीं विशेष सांगावयाचा. 'षोडशी' यज्ञ बलप्राप्तीसाठीं करावा. (त्याचा प्रयोग प्रायः उक्थ्याप्रमाणेंच). 'षोडशी' यागहि नित्य व काम्य असा दोन प्रकारचा आहे. 'षोडशी' याग काम्य म्हणून करावयाचा असेल तेव्हां ठेंगण्या व कानाच्या वरच्या बाजूस इतर शरीरावरच्या रंगापेक्षां कांहीं तरी निराळा रंग असलेल्या गाईनें सोमक्रय करावा. सदोमंडप उभारणें तो १७ मेढी उभ्या करून उभारावा. आग्निष्टोमिक पात्राचें आसादन करतेवेळीं खराच्या उत्तर अंसावर असलेल्या रिकाम्या जागेंत खैराच्या लाकडाचें उभंट व चतुष्कोणी असें 'षोडशी' ग्रहपात्र 'कस्त्वायुनक्ति' या मंत्रानें आसादन करावें. 'यमग्नेपृत्सु' या मंत्रानें 'क्रतुकरण' संज्ञक आहुति आहवनीयावर दिल्यानंतर त्याच मंत्रानें द्रोणकलशाला अगर 'रराटी'ला स्पर्श करावा. षोडशी यागामध्यें सवनीय पशूच्या उपाकरणाच्या वेळीं उक्थ्याचे वेळीं सांगितलेल्या 'ऐंद्राग्न' देवताक पशूबरोबर आणखी एका तिसऱ्या पशूचें 'इंद्र' देवतेच्या उद्देशानें उपाकरण करावें. 'आतिष्ठ वृत्रहन्' या सहा मंत्रांपैकीं एका मंत्रानें 'षोडशी' संज्ञक ग्रह सोमरसानें भरून घ्यावा. प्रातःसवन व माध्यंदिनसवन या दोन्ही सवनांमध्यें शेवटल्या उक्थ्य पर्यायाचे पूर्वीं द्रोणकलशांतील सोमरसानें षोडशिग्रह भरून घ्यावा व तृतीय सवनामध्यें सर्व उक्थ्य पर्यायांचा प्रचार झाल्यावर 'आग्रयण' कलशांतील सोमरसानें 'षोडशि' ग्रह भरून घ्यावा. 'यस्मान्नजातः' 'एषब्रह्माय ऋत्वियः' 'इन्द्रोनाम घृतं नयः' या मंत्रांनीं षोडशि ग्रह भरून घेतल्यावर प्रत्येक वेळीं त्याचें अभिमंत्रण करावें. अच्छावाकप्रभृति चमस भरून घेतेवेळीं एका चमससमुदायापुरता सोमरस शिल्लक राखावा. प्रतिप्रस्थात्यानें अच्छावाकप्रभृति चमसगणांचा प्रचार केल्यानंतर अध्वर्यूनें षोडशिग्रहाचा प्रचार करावा. सूर्य अस्ताला गेल्यानंतर सुवर्णानें व दोन दर्भांनीं 'षोडशि'ग्रहसंबंधीं सामाचें उपाकरण करावें. सामगायन चालू असतांना सामगायकांच्या जवळच तांबड्या किंवा गोरोचनासारख्या रंगाचा, अथवा पांढरा अगर काळा घोडा बांधून ठेवावा. सदाच्या पूर्वद्वारांत पूर्वेस अगर पश्चिमेस तोंड करून घोडा बांधून ठेवावा. सामगायन चालू असतां अध्वर्यूनें दिलेलें सुवर्ण प्रस्तोता वगैरे तिन्ही सामकांनीं क्रमाक्रमानें आपल्या हातांत धारण करून आपआपल्या 'स्वरभक्तींचें' (सामगायनापैकीं आपआपल्या वांटणीच्या तुकड्याचें) गायन करावें. आपली स्वरभक्ति संपल्यावर त्या गायकानें पुढच्या गायकाच्या हातीं तें सुवर्ण द्यावें व त्यानें तें आपल्या हातीं घेऊन आपली 'स्वरभक्ति' गावी. षोडशि यज्ञामध्यें 'हरि' हें पद ज्या ऋचांमध्यें आहे अशा ऋचांनीं बनविलेलें शस्त्र (षोडशिसंज्ञक) म्हटलें जावें. उद्गातृप्रभृति सामगायकांनीं ज्या ऋचा गाइल्या त्यांनां 'स्तोत्रिया' असें नांव आहे. शस्त्र म्हणणारानें (होत्यानें) शस्त्राच्या आरंभीं या 'स्तोत्रिया' म्हणाव्या लागतात. 'स्तोत्रिया' म्हटल्यानंतर लागलीच ज्या तीन ऋचा म्हटल्या जातात त्यांनां अनुरूपा अशी

संज्ञा आहे. 'स्तोत्रिया' व 'अनुरूपा' म्हटल्यानंतर त्यापुढें ज्या ऋचा (शस्त्रामध्यें) म्हटल्या जातील त्यावेळीं 'ओथामोदइव मदे मदामोद इवमथे' हा 'व्यत्यास'संज्ञक प्रतिगर अध्वर्यूनें द्यावा. 'अनुरूपा' संज्ञक ऋचा म्हटल्या गेल्यावर 'आ त्वा वहंतु हरयः' अशा अक्षरसमुदायानें आरंभ होणाऱ्या ऋचा म्हटल्या जातात. त्यांच्या वेळीं पूर्वी सांगितल्याप्रमाणें 'व्यत्यास' संज्ञक प्रतिगर द्यावे, परंतु 'प्र प्र वस्त्रिष्टुभमिषं' या 'अनुष्टुभ्'छंदात्मक ऋचा म्हणावयास सुरवात होतांच 'व्यत्यास' संज्ञक प्रतिगर देण्याचें बंद करून नेहमींचेच प्रतिगर द्यावे. शस्त्र समाप्त झाल्यावर अध्वर्यूनें 'षोडशि'ग्रह घ्यावा व चमसाध्वर्यू यांनीं चमस घेऊन 'षोडशि' ग्रहाचा प्रचार करावा. आश्रावणप्रत्याश्रावणानंतर 'उक्थशायज सोमानां' असा प्रैष द्यावा. 'इन्द्राधिपतेऽधिपतिस्त्वं' हा मंत्र वषट्कारावरोबर संपेल अशा बेतानें म्हणून वषट्कारावरोबर ग्रहाची आहुति द्यावी. अनुवषट्कारावरोबर ग्रहाची दुसरी आहुति द्यावी. 'इन्द्रश्च सम्राट् वरुणश्चराजा' येथून 'वाग्जुषाणासोमस्य तृप्यतु' येथपर्यंत मंत्र म्हणून षोडशिग्रहाचें भक्षण करावें. चमसांचें भक्षण 'भक्षे हिमाविश' इत्यादि नेहमींच्या मंत्रानें करावें. 'आदित्यवद्गणस्य' हा ऊह त्या मंत्रामध्यें योग्य ठिकाणीं करावा. त्याचप्रमाणें 'तृतीयस्य सवनस्याऽनुष्टुप्छंदसइन्द्रपीतस्य०' असा ऊह पुढें करावा. येथें 'षोडशि' यज्ञासंबंधाचा विशिष्ट तेवढा भाग सांगावयाचें कार्य संपलें.

**अतिरात्र**–ब्रह्मवर्चसाची प्राप्ति होण्यासाठीं 'अतिरात्र' याग करावा. त्याचा प्रयोग प्रायः षोडशीप्रमाणेंच; परंतु विशेष तेवढा सांगतों. २१ मेढी पुरून सदोमंडप उभारावा. 'यमग्नेपृत्सु' या मंत्रानें हविर्धानांत फक्त प्रवेश करावा. 'ऋतुकरण' संज्ञक आहुति, द्रोणकलशाला अथवा रराटीला स्पर्श या गोष्टी वर्ज कराव्या. 'अतिरात्र' यज्ञामध्यें सवनीय पशूबरोबर पूर्वोक्त ३ पशूंचें उपाकरण केल्यावर 'सरस्वती' देवतेच्या उद्देशानें आणखी एका ४ थ्या पशूचें (बकरा किंवा बकरी) उपाकरण करावें. षोडशिग्रहाचे वेळीं चमस सोमरसानें भरून घेतल्यानंतर आणखी १३ चमससमुदाय भरण्याइतका सोमरस वाढवून ठेवावा. षोडशीपर्यंतच्या सर्व (ग्रह व) चमसांचा प्रचार झाल्यावर रात्रिपर्याय संज्ञक १२ चमसगणांचा प्रचार करावा. रात्रिपर्यायसंबंधीं ग्रह भरून घेणें ते 'उपयाम० इन्द्रायत्वापिशर्वराय' या मंत्रानें घ्यावे. प्रथम होतृप्रमुख, दुसऱ्या खेपेस मैत्रावरुणप्रमुख, तिसऱ्या खेपेस ब्राह्मणाच्छंसिप्रमुख आणि चौथ्या खेपेस अच्छावाकप्रमुख चमसांमध्यें सोमरस भरावा. हा एकरात्रिपर्याय झाला. याचप्रमाणें दुसरा व तिसरा रात्रिपर्याय करावयाचा. तिन्ही पर्यायांच्या चमसग्रहांचा प्रचार होऊन भक्ष वगैरे झाल्यानंतर आश्विनपुरोडाशसंबंधीं पात्रासादनापासून प्रयोगास आरंभ करावा. आश्विनदेवतेच्यासाठीं पुरोडाश भाजणें तो दोन कपालांच्या गटावर भाजावा. दर्शपूर्णमासाप्रमाणें सर्व प्रयोग करावा. 'प्रियेणनाम्नाप्रियस्सद आसीदतु' या मंत्रानें आश्विनपुरोडाशाचें महावेदींत आसादन करीपर्यंत अनुष्ठान करावें. मग होतृचमसप्रमुख सर्व चमस भरावे. साम व शस्त्र म्हटलें जावें. नऊ ऋचांमध्यें व रथंतर छंदामध्यें उद्गातृप्रभृतिसामकांनीं 'संधि'संज्ञक स्तोत्र म्हणजे साम गावें. 'आश्विन' नामक शस्त्र होत्यानें म्हणावें. सूर्योदय झाल्यानंतर आश्विनशस्त्राची 'परिधानीया' म्हणजे शेवटली ऋचा तीन वेळ म्हणून होत्यानें आपलें शस्त्र संपवावें. होत्याचा चमस अध्वर्यूनें घ्यावा. प्रतिप्रस्थात्यानें आश्विन पुरोडाशाचें अवदान घ्यावें. होत्याच्या खेरीज बाकीचे चमस चमसाध्वर्यूनीं उचलावे. 'अश्विभ्यां तिरोअह्नियानाऽस्सोमानामनुब्रूहि' 'अश्विभ्यांतिरो अह्नियान्सोमान्प्रस्थितान् प्रेष्य' असे प्रैष द्यावे. वषट्कार होतांच चमसांच्या होमावरोबरच प्रतिप्रस्थात्यानें समग्र पुरोडाशाचा होम करावा. चमसभक्षणाचे वेळीं 'पंक्तिच्छंदसः' असा मंत्रांत ऊह करावा.

**अप्तोर्याम**.–पशुप्राप्त्यर्थ 'अप्तोर्याम' क्रतु करावा. त्याचा प्रयोगक्रम प्रायः अतिरात्राप्रमाणेंच; विशेष तेवढा येथें लिहिला आहे. संधिस्तोत्र निमित्तक चमसांचें पूरण करतांना चार चमसगणांसाठीं सोमरसाची वृद्धि करून ठेवावी. होता, मैत्रावरुण, ब्राह्मणाच्छंसी व अच्छावाक या क्रमानें चारी चमसगण आहेत. प्रत्येक चमसगणाला साम व शस्त्र व्हावयाचें असतें. चमसगणांचें हवन व भक्षाचा क्रम संधिचमसाच्या हवनाचेवेळीं सांगितलाच आहे. 'आदित्यवद्गणस्य० अतिच्छंदाच्छन्द इन्द्रपीतस्य' असा ऊह भक्षणाच्या मंत्रांत करावा.

'अग्नीदौपयजानंगारान्' हा प्रैष देण्यापासून पशूसंबंधाचें सर्व अनुष्ठान वगैरे सर्व संस्थांचे ठिकाणीं सारख्याच रीतीनें 'प्रातरग्निहोत्र' होमापर्यंत करावें.

## (इ)

## ऋत्विक्कर्म व संहितीकरण यांचा संबंध.

हा संबंध पहावयाचा म्हटला म्हणजे ऋग्वेदास हौत्रवेद, यजुर्वेदास अध्वर्युवेद, सामवेदास उद्गातृवेद व अथर्ववेदास ब्रह्मत्ववेद हें नांव कितपत सार्थ होईल याचा विचार केला पाहिजे. सामवेदास उद्गातृवेद म्हणण्यास फारशी अडचण पडणार नाहीं. अथर्ववेदास ब्रह्मवेद हें नांव मारून मुटकूनच देतां येईल. ऋग्वेद व यजुर्वेद यांसंबंधानें थोडेंसें स्पष्टीकरण केलें पाहिजे.

**ऋग्वेद व हौत्रवेद**.—ऋग्वेदास हौत्रवेद म्हणतात. तथापि ऋग्वेदांत असा कांहीं भाग आहे कीं, त्याचा हौत्राकडे विनियोग हौत्रावरील कांहीं ग्रंथकारांनीं दिलेला नाहीं.

हौत्रावरील प्रसिद्ध ग्रंथकार आश्वलायन यानें ज्या सूक्तांचा व ऋचांचा विनियोग हौत्राकडे दिलेला नाहीं अशा सूक्तांचें व ऋचांचें टांचण वे. रा. दातार यांनीं केलें आहे तें येणेंप्रमाणें.

१.१०,४ व ८;१९,२–९;२२,१०–१२,१४–१६,१९–२१;३८,१–७,९–१५;३९,१–१०;४०,७–८;४१;४२;४३,१–५,७–९;५९,१,५–७;६२,१–५,७–१३;६६–७०; ७८; ७९,१०–१२;८२,२,४–५; ८४,१८–२०; ८८; ९०,१–४,६–९;९१,३,२२–२३;९३,४,८,१०–१२;९७;१०२; १०४,१–८;१०५–१०८;१०९,१–५,८;११४,१,४–८,११;१२०,१०–१२;१२१–१२२;१२५–२६;१२७,२–११;१३२,१–५;१३३,१–५;१३४;१३५,७–९;१३६; १३८; १३९,२,१०;१४९;१५१;१५२,२–६;१५३; १५८; १६६; १६७;१६८;१७०;१७१;१७२;१७६;१७८;१७९;१८६,१,३–११;१८७;१९०,१,३–६,८;१९१.

**२.**८,६;१८;१९,२-१२;२०;२२,४;२४;२५; २६; २७, ६-७,९-१०,१२-१७;२८;२९;३०;३१;३२,८; ३३,२-७, ११-१५;३५,१-२,४-८,१०-१५;४१,१४-१५;४२;४३.

**३.**१६;२४,१;२५,१-४;२८,३;२९,१-३,५-७,९,११-१६;३३;३६,१०;३७,११;३९,१-४,६-९;४५; ५२,२-४, ७-८;५३,१,३-४,७-२४;५४,२-२०;५५,१-१८,२०-२२;५६;५७;५९,४-५.

**४.**१,१-२;५;१३,१-३,५;१४;१५,४-१०;१८;२४;२८; २९;३१,४-१५;३२;३७,५-८;३८,१-९; ३९,१-५; ४०, १-४;४६,३-४;४८,२-४;४९,१-२,५-६;५५;५७,१, ४, ६-७.

**५.**१९;२७;२८,१-२,४;३१-३४;३५,७-८; ३६-३८; ३९,४-५;४०,५-६,७-९;४१,१-५,७-२०;४२,१-२,४-१८;४३,२-६,८-१०,१४-१७; ४४,१४-१५; ४५; ४६, १-६;४७;४९;५०,२-५;५१,१-४;५२; ५३,१-५,७-१५; ५४,४-७,९-१५;५६;५७; ५८,१-४,६-८; ५९; ६०,२, ४-७;६१;६२,१-८;६३;६४;६५;६६,४-६;६७;६९;८२, ८;८४,२;८५;८६.

**६.**७,४-७;१५,१७-२०;१६,४६-४८;२६;२७;२८,१-२,५-८;२९;३९;४०,३-५;४१;४४,१-३,७-१३,१७-२४; ४७,५-७,९-१०,१२-३१;४८,३-८,११-२२;५०,१-१३, १५;५१,१-१२;५२,१-६,८-१२,१४,१६-१७; ५३; ५४, १-८,१०;५५;५६;५७;५८,२;५९; ६०,२, १४-१५; ६१, ४-९,१३; ६७,१-२,४-८;७२.

**७.**५;६;१३;१४;१७,४-७; १८,१६-२५; २९,४; ३०, ४-५;३१,७-९;३३;३५;३६,१-८;३७;३८,१-६;३९,४-७; ४०;४१;४२,४-६;४३,४-५;४४;४६;४७;४९;५०;५२;५४; ५५;५८;५९,१-७,१२;६०;६१;६२,१-४,६;६३;६४,४-६; ६५,५-६;८६,१-७;८७,१-५,७;८८;८९,१-४;९१,७; ९३,२-३,५-८;९९,४-६;१०१;१०२,२-३;१०३;१०४.

**८.**१,३१-३४;२,२८,४०-४३; १८; १९,१-२, ७-१८, २१-२२,२५-२९,३२-३७;२०;२१,३-८, ११-१२,१७-१८; २५;२६,२०,२२;२७,१-१२,१६-२२;३०; ३१; ३४, १-७,८-१७;३९;४१,१-२,६-१०;४२,४-६;४६,२१-२४, २६-३३;४७;४८,१,४-१२,१४;५०,७-८;५१; ५२,४-६, १०-१२;५३,१-९;५४,१-७,९-१२; ५५,१५; ५६,१-९, ११,१३-२१;५७,१३-१९;५८,११-१२,१६,१८;५९,१२-१५;६१,१-६,९-१२,१४-१५,१७-१८; ६६,२-११;६७, ४-१०;६८,१-९;६९,९-१०;७५,१-५; ८०,१-७;८३,७-१२;८४,७-९;८५,१-१२,१६-२१;८८,७-८; ८९,१-९, १२;९०,१-८,१३-१६;९१,१९-२२;९२,८-१५; या मंडलांतील अकरा वालखिल्य सूक्तांपैकीं आश्वलायन सूत्रांत विनियोग न दिलेलीं सूक्तें:-९ व १०.

**९.**१,२-१०;२-४;६-७;८,१-३,५-९;९-१०;११,१-५,७-९;१२-१७;१८,१-३, ५-८; १९-६६; ६७,१-१३, १५-२२,२४-२८,३०-३२;६८-७०;७१,१-५, ७-९;७२; ७४,१-३,५-८;७५-८२;८४-९५;९६,१-५,७-१०,१२-२४;९७-१००;१०१,१,३, ७-१६; १०२-१०३; १०४,१, ३-७;१०५,१,३-६;१०६;१०७,१-२०, २२-२६; १०८-१०९;११०-११३. सवनीय दिवशीं माध्यंदिन सवनांतील सोम कुटण्याचे वेळीं ग्रावस्तुत् नामक ऋत्विजानें म्हणण्याच्या विशिष्ट ऋचा संपल्यानंतर सोम कुटण्याचें काम पुरें होईपर्यंत या मंडलांतील सूक्तें आरंभापासून होतील तितकीं म्हणावीं असें सूत्रांत सांगितलें आहे.

**१०.**८,७-९;९,४-९;१०; ११,१-७,९;१२; १३,३-५; १४,२,३-६,९,१२-१६; १५,६-८,१०; १६,७-१०,१३-१४;१७, १-२,८-९, १३-१४;१८,१-९,११-१४;१९-२०;२३,२-७;२४-२६; २८;३१,२-११;३२-३४;३५,२-१४;३८;४५,१२;४७;५१;५२,२-६;५३,१-२,५,७-११; ५५,१-४,६-८;५६,२-७;५८-६०;६३-६५;६९;७१,२-९,११;७२,१-४,६-९;७४,१-५;७५;७७-७८;८१,१,३-४; ८२,१,४-७; ८५,१-१८,१९-२३,२५-४७;८७,१-२१,२३-२५; ९०;९३;९५; ९८-१००;१०१,१-११; १०२;१०४,१,५-१०; १०५; १०७-१०९;१११-११२; ११४;११६-११७;११९;१२१,७-९; १२३,३-५,७;१२४-१२७;१२९-१३०;१३२;१३३,४-७;१३४,७;१३५-१३९; १४१-१४२;१४४-१४६;१४८-१५२;१५५,१-३,५;१५६-१५९;१६१-१६९;१७०,३-४;१७१;१७३-१७४;१७६,१; १८०,३;१८२; १८४-१८६; १९०-१९१.

हें टांचण देण्याचें महत्त्व असें आहे कीं, ज्या काळीं मंत्रांचें संहितीकरण झालें त्या काळीं श्रौताशिवाय दुसऱ्या कांहीं तरी कार्याकडे ऋग्वेदी लोकांची विद्या वाहिली गेली होती असें हें टांचण दाखवितें. उपलब्ध ग्रंथांतून हौत्राकडे न लागलेला हा भाग कदाचित् कांहीं लुप्त शाखांनीं हौत्राकडे लावला असेल अशीहि शक्यता आहे. जरी कांहीं भाग असा सांपडला कीं, ज्याचा हौत्रविनियोग दिलेला नाहीं, तरी तो फारच थोडा आहे; आणि त्याचें अस्तित्व ऋग्वेदाचें हौत्रवेद हें नांव आक्षेपणीय करीत नाहीं.

**यजुर्वेद, अध्वर्युवेद व याजुषहौत्र.**—यजुर्वेदास अध्वर्युवेद म्हणतात पण तें म्हणणें देखील कांहीं नियमित प्रमाणांतच सत्य आहे. श्रौतास अनुपयुक्त असा भाग कृष्णयजुःसंहितेंत आहे हें चवथ्या प्रकरणावरून दिसून येईल. याशिवाय बरेंच हौत्र कृष्णयजुर्वेदांत आहे. यामुळें इष्टि व पशु कर्मासाठीं ऋग्वेद हौत्र न घेतां याजुष हौत्रहि घेण्यांत येतें. याजुष हौत्रासंबंधानें महाराष्ट्रांतील भिक्षुकवर्गांत दुफळी झाली आहे तिची थोडक्यांत हकीकत येणेंप्रमाणें.

**—याजुषहौत्राचें भांडण.—**

याजुषहौत्रवाद हा सुमारें पन्नास वर्षांपूर्वी उपस्थित झाला. ऋग्वेद हा हौत्रविधायक वेद असल्यामुळें कित्येक कृष्ण-

यजुर्वेदी अग्निहोत्री अग्न्याधानापासूनच आश्वलायनसूत्रानुसारी ऋग्वेदी हौत्राचा स्वीकार करीत व कित्येक स्ववेदांत व सूत्रांत पठित असलेल्या दर्शपूर्णमास, पशु व सौत्रामणी इ० हौत्राचा अंगीकार करून अनुक्त अशा स्थलीं मात्र म्हणजे अग्निष्टोमांत वगैरे आश्वलायनीय हौत्र करीत. दोन्ही पक्षांच्या कृष्णयजुर्वेदीय अग्निहोत्र्यांच्या घरीं ऋग्वेदी आश्वलायन ब्राह्मण हौत्र करण्यास खुषीनें जात असत. सुमारें ५० वर्षांपूर्वी सातारा जिल्ह्यांत वाईनजीक ४ कोसांवर कृष्णाकांठीं 'पांचवड' म्हणून एक खेडें आहे तेथें वाई येथील वे. शा. सं. काशीनाथ दीक्षित करंदीकर यांचा अग्निष्टोम यज्ञ झाला. सदर यज्ञांत रा. धुंडिराज दीक्षित बापट यांचे पणजे सुप्रसिद्ध नीलकंठ दीक्षित नाना बापट, मेरू शास्त्रीबोवा गडबोले व त्र्यंबकशास्त्री शाळिग्राम पुणें इत्यादि मंडळी हजर होती. याजुषहौत्र असलें तरी सोमयागाचा आरंभ झाला म्हणजे तो संपेपर्यंत आश्वलायनीय हौत्रच करावयाचें अशी बहुंशीं वहिवाट होती. परंतु 'यथोपदिष्टं ब्राह्मणवन्तं यथारूपमितरे' म्हणजे यजुर्वेदांत असलेल्या उपदेशाप्रमाणें व विधायक अशा वाक्यावरून हौत्रकर्म करावें; याखेरीजचे प्रसंगीं मंत्रांतील लिंग असेल त्याला अनुसरून होत्यानें प्रयोग करावा. अशा अर्थाच्या हिरण्यकेशीय सूत्राचा आधार घेऊन मेरुशास्त्री यांनीं सोमांगभूत दीक्षणीयेष्टीच्या प्रधानयागाच्या याज्यापुरोनुवाक्या बहुंशी वहिवाटीप्रमाणें होत्यानें आश्वलायनोक्त न म्हणतां यजुर्वेदांतील म्हणाव्या असा प्रश्न काढला. त्यावर शाळिग्राम शास्त्री यांनीं दीक्षणीयेच्या याज्यापुरोनुवाक्या तुमच्या हिरण्यकेशीय सूत्रांत पठित नाहींत, किंवा वेदांतहि उपदिष्ट नाहींत करितां नुसत्या लैंगिकमंत्रांकडे दृष्टि देऊन यजुर्वेदोक्त याज्यापुरोनुवाक्या होत्यानें म्हणणें गैर आहे म्हणून सांगितलें. नीलकंठ दीक्षित बापट यांनीं आश्वलायनसूत्रानुसारी हौत्राचा स्वीकार केला असल्यामुळें ते या वादांत उदासीन होते. शेवटीं हा वाद बराच निकरावर जाऊन याज्यापुरोनुवाक्या यजुर्वेदोक्त म्हटल्या जाऊन यज्ञ समाप्त झाला. यामुळें ऋग्वेदी मंडळीच्या अंतःकरणांत हिरण्यकेशी लोकांविषयीं थोडीशी तेढ राहिली. तथापि त्यांनीं याजुषहौत्राविषयीं तुच्छता केव्हांहि दाखविली नाहीं. सौमिक कर्मामध्यें मुख्यभूत अशा ऋग्वेदीय हौत्राचा त्याग करून कोणचीहि आपत्ति नसतांना परिभाषेच्या आधारें लिंगोक्तमंत्रावरून याजुर्वेदीय हौत्र करणें हा यजुर्वेद्यांचा केवळ हट्ट होय असें ऋग्वेदी म्हणूं लागले.

हा यज्ञ झाल्यावर कांहीं वर्षांनीं श्रीक्षेत्र काशी येथें सुप्रसिद्ध पंडित बाळशास्त्री रानडे (बालसरस्वती) यांचा यज्ञ झाला. त्यांनीं अग्न्याधानामध्यें स्वशाखोक्त अशा याजुषहौत्राचा स्वीकार केला होता. अग्निष्टोमाचे प्रसंगीं सुप्रसिद्ध वैदिक व श्रौती रामकृष्ण जोशी (ऋग्वेदी) यांच्या बंधूंनींच हौत्र केलें होतें. पण तेथें कोणतेंहि भांडण न होतां यज्ञाची समाप्ति झाली.

सुमारें २० वर्षांपूर्वी वाई येथें वे. शा. सं. शंकर दीक्षित गोखले यांनीं अग्निष्टोम केला. गोखले यांचे अग्न्याधानांत याजुषहौत्रच स्वीकारलें होतें. यज्ञाचे प्रसंगीं सुप्रसिद्ध श्रौती वे. शा. श्रीधर शास्त्री माटे (ऋग्वेदी), वे. शा. सं. बहुसोमयाजी अनंत दीक्षित बापट पांचवडकर (धुंडिराज दीक्षितांचे आजे) वे. शा. सं. विनायक दीक्षित नेने चिंधोलीकर, वे. शा. सं. बाळंभट तात्या रानडे वगैरे मंडळी होती. सदर यज्ञांत वे. रा. वासुदेवभट परांजपे (ऋग्वेदी) यांनीं हौत्र केलें होतें. दीक्षणीयेष्टीच्या प्रधानयागाचे वेळीं पांचवडचे यज्ञांतील वादाची पुनरावृत्ति सुरू झाली. धर्ममार्तंड भाऊशास्त्री लेले, अण्णंभट अभ्यंकर, त्र्यंबकशास्त्री लेले ह्या मंडळींनीं यजुर्वेदोक्त याज्यापुरोनुवाक्या होत्यानें म्हटल्या पाहिजेत असा आग्रह धरला. वे. श्रीधरशास्त्री माटे यांनीं केवल परिभाषासूत्रावर नजर देऊन यजुर्वेदोक्त याज्यापुरोनुवाक्या म्हणणें हें अन्यायाचें व गौण आहे असें सांगितलें. परंतु भाऊशास्त्री व त्र्यंबकशास्त्री लेले यांनीं वाद सुरू केला. वे. शा. सं. अनंत दीक्षित बापट व वे. शा. सं. विनायक दीक्षित नेने यांनीं आपल्या घरीं प्रथमपासूनच आश्वलायनीय हौत्राचा स्वीकार केला असल्यामुळें या वादांमध्यें हे उभयतां सहाध्यायी श्रौती उदासीन होते. शेवटीं यजमान सांगेल तें होत्यानें ऐकावें अशी तडजोड निघाली. गोखले यजमान यांनीं भाऊशास्त्र्यांचे म्हणण्याप्रमाणें यजुर्वेदोक्त याज्यापुरोनुवाक्या म्हणाव्या असें सांगितल्यावरून परांजपे यांनीं यजुर्वेदोक्त याज्यापुरोनुवाक्या म्हटल्या व अनुष्ठान पुढें सुरू झालें. पुढें सुत्येच्या दिवशीं प्रवृत्ताहुतीसंबंधीं अशीच वाचावाच झाली व यज्ञांतील ऋग्वेदी ऋत्विजांचीं अंतःकरणें भांडणामुळें थोडींशीं दुखावलीं गेलीं आणि या यज्ञापासून ऋग्वेदी व कृष्णयजुर्वेदी भिक्षुकांत बरेंच तीव्रतेचें द्वैत उत्पन्न झालें.

नंतर ४।५ वर्षांनीं सातारा येथें वे. रा. रामदीक्षित बापट यांचा अग्निष्टोम यज्ञ झाला. हेहि याजुषहौत्रानुयायीच होते. सदर बापटांचे यज्ञप्रसंगीं सप्तहौत्रासाठीं वाईकर ऋग्वेदी यांचीं मनें कलुषित झालीं असल्यामुळें ते आले नव्हते. साताऱ्याचीच ऋग्वेदी मंडळी नियोजित केली होती. वाईस झालेल्या अनुष्ठानावरहुकूमच सर्व अनुष्ठान या यज्ञांत झालें. विशेष वाचावाची न होतां हा यज्ञ शेवटास गेला.

पुढें थोड्या दिवसांनीं पुणें जिल्ह्यांतील 'केळवडें' या गांवीं वे. रा. विष्णुभट भिडे यांनीं अग्न्याधान केलें. या अग्न्याधानामध्यें याजुषहौत्राचा परिग्रह भिडे यांनीं केला होता. हौत्राचें आर्त्विज्य करण्यासाठीं वाईयेथील सुप्रसिद्ध वैदिक श्रौती वे. रा. पांडुरंग भटजी गोरे अग्निहोत्री (ऋग्वेदी) यांचे चिरंजीव वे. रा. महादेव भटजी गोरे हे गेले होते. शिवाय वे. रा. लक्ष्मणभट भावे (ऋग्वेदी) हेहि एक ऋत्विज म्हणून गेले होते. वाईकर ऋग्वेदीमंडळीच्या मनांत याजुषहौत्राचे बाबतींत जरी नापसंती होती तरी ती अग्निष्टोमासारख्या सौमिक हौत्राचे वेळीं दीक्षणीयेमध्यें वगैरे जें यजुर्वेदीय हौत्र केलें जाई त्याविषयींची होती. दर्शपूर्णमास किंवा पशुसौत्रामणि इत्यादिकांच्या श्रुतिसूत्रपठित अशा यजुर्वेदीय हौत्राबद्दल कोणीहि ऋग्वेदीयांनीं प्रश्न उपस्थित केला नव्हता. यामुळें निर्विवाद अशा अग्न्याधानप्रसंगीं पूर्वोक्त ऋग्वेदी याजुषहौत्र करण्यासाठीं केळवड्यास आले होते.

हें आधान झाल्यावर वर्षदोनवर्षांनीं पुणें शहरांत वे. रा. रामदीक्षित बापट गोळपकर (सातारा येथें यज्ञ केलेले) यांनीं साग्निचित् सर्वपृष्ठाप्तोर्यामनामक यज्ञ करण्याचा उपक्रम केला. वाई व सातारा येथील यज्ञांत हिरण्यकेशीयांच्या मनोदयानुरूप गोष्टी घडून आल्यामुळें व पुण्यास वाईकर ऋग्वेद्यांचें बरेंच महत्त्व असल्यानें वाईपुणेंकर हिरण्यकेशी

हे पुण्यास होणाऱ्या यज्ञांत दीक्षयणीयेमध्यें व इतर वादग्रस्त स्थलीं यजुर्वेदीय हौत्र करणार असा घाट दिसूं लागतांच वाई व पुणेंकर ऋग्वेदीयांनीं पुणें येथील धर्मशास्त्रज्ञ व श्रौतज्ञ वे. शा. सं. गंगाधर शास्त्री दातार यांच्यासारख्या विद्वान् ऋग्वेदी श्रौत्यानें याजुषहौत्राविषयीं लिहिलेल्या शास्त्रार्थाकडे लक्ष न देतां याजुषहौत्र अजीवातच अशास्त्र आहे असें विधान करून हिरण्यकेशीयांच्या तोंडीसतोंड देण्याची जय्यत तयारी केली. हिरण्यकेशी लोकांनीं ऋग्वेदीयांचा पाडाव करण्याच्या प्रयत्नास न लागतां अगोदरपासूनच पुण्यांतील विचारवान् ऋग्वेदीयांचें साहाय्य घेऊन यज्ञ आरंभिला असता तर कदाचित् विशेष तंटा न होतां यज्ञ ऋग्वेदी मंडळीच्या समावेशानेंहि पार पडला असता, परंतु तसें झालें नाहीं. हिरण्यकेशी मंडळी ऋग्वेद्यांच्या वरकडी कशी होईल व त्यांनां दडपून आपणांस यज्ञ पार पडल्याचें श्रेय कसें मिळेल या अभिमानास पेटली, तर उलटपक्षीं ऋग्वेदी मंडळी वापटांचा यज्ञ जेणेंकरून हाणून कसा पाडला जाईल व हिरण्यकेशी लोकांची खोडकी कशी जिरेल अशा प्रकारच्या दुरभिमानाला वळी पडली. उभयपक्षीं उघडाउघड वैर सुरू झालें! दोन्ही पक्षांनीं आपआपल्या शाखेच्या गृहस्थांचीं मनें आपआपल्या बाजूस ओढून घेण्याचा उपक्रम सुरू केला. शनिवार पेठेंतील पावसकरांचे हौदासमोरील एका वखळींत यज्ञमंडप घातला होता. ऋग्वेदी मंडळींच्या हट्टी पुढाऱ्यांच्या चिथावणीनें ऋग्वेदी मंडळींनीं यज्ञांत शक्य तितकीं विघ्नें आणण्याचा प्रयत्न केला. यज्ञियपशु (कांहीं वेळ) पळविला, मंडपावर धोंडे मारण्याचें काम सुरू केलें! शेवटीं पोलिस अधिकाऱ्यांचें साहाय्य घेऊन यज्ञ पार पाडण्यांत आला. सप्तहौत्राचे प्रयोगासाठीं पूर्वी ठरवून ठेवलेली ऋग्वेदी मंडळी आयत्या वेळीं फुटून बाजूस झाल्यामुळें हौत्रप्रयोगाचें कार्य हिरण्यकेशी मंडळींनींच पोथीच्या साहाय्यानें कसेंबसें पार पाडलें! साग्निचित् सर्वपृष्ठाप्तोर्यामाच्या ऐवजीं वे. रा. रामदीक्षितांना साग्निचित् अत्यग्निष्टोम करून पुण्यांतून जाण्याचा प्रसंग आला. त्या यज्ञांत झालेल्या ऋग्याजुषांच्या झटापटीचा परिणाम असा झाला कीं, हिरण्यकेशीयांवर वर्ष दोनवर्षं ऋग्वेदी मंडळींनीं बहिष्कार घातला होता. इतकेंच नव्हे तर महाराष्ट्रांत ऋग्वेदी यजमानाच्या घरीं आध्वर्यवादि आर्त्विज्याकरितां हिरण्यकेशीशाखीय ऋत्विज कोणी असल्यास त्या यज्ञांत अवलोकनासाठीं सुद्धां कांहीं आग्रही ऋग्वेदी हजर राहिले नाहींत.

आज अशी स्थिति झाली आहे कीं, हिरण्यकेशीयांच्या घरीं याजुषहौत्र वैकल्पिक असे तें सार्वत्रिक झालें आहे. संकेश्वर पीठावरील शिष्यस्वामींनीं ऋग्वेदानें उपनयन झाल्यावांचून यजुर्वेदी लोकांनां ऋग्वेदमंत्र म्हणण्याचा अधिकार नाहीं असा हुकूम दिला होता. हा याजुषहौत्रमूलक भिक्षुकी भांडणाचा अधिक परिणाम होय.

याजुषहौत्र वापरूं नये असें म्हणणारांचें मुख्य विधान हौत्र म्हणजे ऋग्वेद हें होय. दुसऱ्या पक्षाचें म्हणणें एवढेंच कीं, हौत्र म्हणजे ऋग्वेद हें खरें; पण जेथें हौत्र असेल तो ऋग्वेदच आहे. मग तें यजुर्वेदाच्या संहितेंत कां असेना. ग्रंथाचें नांव एक व आंतील माल अंशतः निराळ्या प्रकारचा अशी ग्रंथरचनास्थिति मागें वर्णिलीच आहे.

ज्या भांडणांनां शास्त्रीय उपपत्ति लावण्यांत येते त्यांच्या पाठीमागें पुष्कळदां स्वार्थमूलक भांडण असतें. याजुषहौत्राचें भांडण भिक्षुकांमध्यें स्वार्थभावानेंच उत्पन्न झालें.

सध्यांचें एक चालू भांडण अध्वर्युसूत्रांपैकीं कोणत्या सूत्राचा परिग्रह करावा यासंबंधाचें होय. पुण्यास रा. शंकरराव राजवाडे यांनीं हिरण्यकेशी सूत्राचा परिग्रह केला ही गोष्ट पुण्यांतील पुष्कळ ऋग्वेदी भिक्षुकांस संमत नाहीं याचें भिक्षुकी कारण येणेंप्रमाणें: हिरण्यकेशी व ऋग्वेदी दोघेहि बौधायन सूत्राचें अध्ययन करीत नाहींत. यामुळें बौधायन सूत्राचा यजमानानें परिग्रह केला तर ऋग्वेद्यांनां व हिरण्यकेशीयांनां आध्वर्यव करण्याची सवड मिळणें सारखेंच शक्य असतें. परंतु हिरण्यकेशीसूत्रपरिग्रह केल्यास हिरण्यकेशी ब्राह्मणांनां आध्वर्यवाचें काम सहजच येत असल्यामुळें त्यांजकडेच तें दिलें जाण्याचा संभव अधिक असतो. रा. राजवाडे यांच्या हिरण्यकेशी सूत्राच्या परिग्रहास जो विरोध झाला त्याचें कारण वरीलप्रमाणें असून हें भांडण याजुषहौत्राच्या भांडणाचेंच एक शेंपूट आहे असें म्हणतां येईल.

## (ई)

## यज्ञसाहाय्यक विचारपद्धति.

यज्ञसंस्थेंतील निरनिराळ्या गोष्टींचें समर्थन ब्राह्मणें करतात. तथापि तें समर्थन कोणत्या प्रकारची विचारपद्धति वापरून करण्यांत येतें याची सामान्य कल्पना येण्यासाठीं दर्शपूर्णमास नांवाच्या इष्टींतील कांहीं उदाहरणें देतों. या उदाहरणांनीं ब्राह्मणरचनेवर प्रकाश पडेल.

**गोवत्सांचें अपाकरण.**—"ईशान्येकडून पळसाची डहाळी आणून गोवत्सांचें गोदोहनासाठीं गाईपासून अपाकरण करावें म्हणून जें सांगितलें आहे तें सिद्ध करण्याची पद्धति येणेंप्रमाणें:—

१ पृथ्वीपासून तिसऱ्या म्हणजे द्युलोकांत सोम होता तो गायत्रीनें जमिनीवर आणला त्या वेळीं त्याचें एक पान आकाशांतून पृथ्वीवर पडलें. तें रुजून पळसाचा वृक्ष बनला. पानापासून हा पळस उत्पन्न झाला म्हणून त्याला पर्ण किंवा पान म्हणावयाचें.

२ ब्रह्मच पळसाच्या रूपानें व्यक्त झालें आहे. म्हणून पळसाच्या शाखेनें वासरें दूर केलीं म्हणजे ब्रह्मानेंच दूर केल्याप्रमाणें होतें. जगन्निष्पादक जसें ब्रह्म तसा यागनिष्पादक पळस.

३ गायत्रीपासून पळस झाला त्याप्रमाणें गायत्रीपासून पशू झाले. तेव्हां पळस व पशू गायत्रीस्वरूपच आहेत. गायत्रीला तीन पाय असावयाचे म्हणूनच गायत्रीरूप पळसालाहि तीनच पानें आहेत. पळसाच्या डहाळीनें गाई रानांत पोंचविणें म्हणजे गाईनींच गाईनां रानांत पोंचविल्याप्रमाणें आहे.

४ शाखा पूर्वदिशेहून तोडून आणली तर देवलोक जिंकल्यासारखें व उत्तरेदिशेहून आणली तर मनुष्यलोक जिंकल्यासारखें होतें. म्हणून पूर्व व उत्तर यांच्या संधिदिशेहून शाखा तोडून आणल्यास देवलोक व मनुष्यलोक हे दोन्ही जिंकल्यासारखें होईल.

५ वायु हा अंतरिक्षाचा अधिपति आहे व पशूंची अंतरिक्ष ही देवता आहे. यास्तव वांसरें चरावयास सोडलीं म्हणजे तीं वायूच्याच स्वाधीन केल्यासारखें आहे.

६ यज्ञ हें श्रेष्ठतम कर्म आहे म्हणून त्या यज्ञासाठीं सवितादेव तुम्हाला रानांत पोंचवो असें म्हणावें.

७ यज्ञाखेरीज इतर वेळीं गाई चारा खाऊन मनुष्य व वांसरूं यांच्यासाठीं दुधाचा पुरवठा करतात. पण आतां यज्ञप्रारंभानंतर त्यांनीं देवांच्यासाठीं दुधाचा पुरवठा करावा याकरितां त्या गाईंनां अनुलक्षून 'देवभागं आप्यायध्वं' असें म्हणावें.

**पळसाची शाखा आणल्यानंतर खोंचून कां ठेवावी याचें कारण.**—पादरहित अशा गर्भाला स्त्रिया आपल्या उदराच्या ठिकाणीं धारण करतात त्याप्रमाणें पादरहित (उभें राहण्याचें साधन नसलेल्या) अशा पलाशशाखेला खालीं न ठेवतां अंतरिक्षरूपी स्त्रीच्या उदराच्या ठिकाणीं म्हणजे कोठें तरी उच्च प्रदेशांत गर्भाप्रमाणें खोंचून ठेवावी. शाखेला अशा रीतीनें वर ठेवण्यानें यजमानाच्या स्त्रीला गर्भधारण होतें हें फल आहे.

**यज्ञासाठीं दर्भ पूर्वेकडून कां आणावेत ?**—पूर्वकाळचे विद्वान् अनुष्ठानकर्ते देवांनां प्रिय असे वर्हीं (दर्भ) पूर्वेकडून आणीत या जाणिवेनें प्रेरित अशी ती घोड्याची फरशीच्या आकाराची वरगडी वर्हीं आणण्याकरितां पूर्वेस जाते. ही वरगडी मनूनें तयार करून घासून तीक्ष्ण केली. पूर्वींचे ऋषी पूर्वेकडून यज्ञाला प्रारंभ करीत. पूर्वदिशा हें यज्ञाचें मुख आहे म्हणून यज्ञाचा आरंभ पूर्वेकडून म्हणजे मुखाकडून करावा. आतां पूर्वदिशेस दर्भ नसल्यामुळें कोणत्याहि दिशेहून दर्भ आणले तरी ते पूर्वेकडून आणल्यासारखे होत.

**दर्भ कापून आणावयाचे ते मुळापासून कां कापूं नयेत ?**—जें कांहीं जगांत दिसतें आहे तें सर्व देवांचें उपभोग्य आहे. एखादा सामान्य शिपायासारखा नोकर गांवच्या शिवारांत शिरून धान्य अगर दुसरे पदार्थ राजाला पाहिजेत म्हणून निर्भयपणानें साखसुरत हें पहा नेतो असें म्हणून लोकांच्यापासून संपादन करतो, त्याचप्रमाणें देवांकरितां म्हणून अध्वर्यु वर्हीं कापून आणतो. यज्ञाकरितां असलेलें द्रव्य यज्ञांत खर्च न होतां शिल्लक तसेंच राहणें बरें नाहीं सबब यज्ञासाठीं म्हणून असलेले दर्भ एक ठोंब शिल्लक ठेऊन बाकी सारे कापावे.

नांगरट करून लागवड झालेल्या दर्भादि ओषधी कापल्या तरीसुद्धां वहात्या अगर पाटाच्या आश्रयानें मिळणाऱ्या पाण्याची जरूर न लागतां एका वर्षांत पूर्ववत् वाढतात. पण ह्या दर्भादि ओषधी कापतांना कांडें राखून कापाव्या म्हणजे पुन्हां कांड्यापासून त्या वाढीस लागतात.

अशा प्रकारच्या अर्थवादांनीं यज्ञांतील प्रत्येक क्रिया सिद्ध केली आहे. एखादी क्रिया गाळून टाकणें किंवा मागची पुढें करणें शक्य नाहीं. अनुक्रम देखील बांधून टाकणारीं वाक्यें आहेत. यज्ञसिद्धीची विचारपद्धति भूमितीच्या सिद्धांतांप्रमाणें किंवा संस्कृत व्याकरणांतील रूपांप्रमाणें अत्यंत नियमबद्ध नवविली आहे.

## (उ)

## यज्ञसंस्थेतिहासबोधक कोष्टकें.

### कोष्टक १ लें, अथर्ववेद व कृष्णयजुर्वेद यांची यज्ञामध्यें विनियोगसादृश्याच्या दृष्टीनें तुलना.

### कोष्टक २ रें, ऋग्वेदांतील मंत्रांचा हौत्रप्रयोगाकडे विनियोग दाखविणारें.

**पहिल्या कोष्टकाचें स्पष्टीकरण.**

**रकाना १.**—यांत मंत्रांचा श्रौतविनियोग दोन्ही वेदांत भिन्न, समान, अगर एकांत असून दुसऱ्यांत नाहीं अगर दोहोंतहि नाहीं अशातऱ्हेनें वर्गीकरण करून त्या त्या वर्गाचें चिन्ह घातलें आहे. चिन्हें:–अ=दोन्ही वेदांत भिन्न विनियोग. आ=एकाच वेदांत विनियोग. इ=दोन्ही वेदांत विनियोग नाहीं. ई=दोन्ही वेदांत एकच विनियोग.

**रकाना २ व ४.**—यांत अनुक्रमें अथर्ववेदांतील व कृष्णयजुर्वेदांतील सदृश परंतु कांहीं अक्षरांचा फरक असणारे मंत्र दिले आहेत. फरक असणारीं अक्षरें रकान्यांत घेतलीं आहेत.

**रकाना ३ व ५.**—यांत मंत्रांचें स्थान दिलें आहे.

**रकाना ६.**—यांत मंत्रांचा श्रौतविनियोग दाखविला आहे.

# यज्ञसंस्थेतिहासबोधक कोष्टकें.

## कोष्टक १ लें.—अथर्ववेदांतील मंत्रांचें कृष्णयजुर्वेदांतील मंत्रांशीं साम्य व विनियोगसादृश्य अथवा भेद दाखविणारें कोष्टक.

( वे. शा. सं. धुंडिराज गणेश बापट यांनीं केलेलें. )

| वर्ग. | अथर्ववेदमंत्र. | स्थान. | कृष्णयजुर्वेदमंत्र. | स्थान. | विनियोग. |
|---|---|---|---|---|---|
| अ | अप्स्वं ...प्रशस्तिभि- रश्वा........... गावोभवथ वाजिनीः ॥ | सं. १.४,४ | अप्स्वं......प्रशस्ति- ष्वश्वा............। | सं. १.७,७ | (कृ.) अश्वमेधांतील घोडा धुतांना विनियोग. (अ.) प्रातरनुवाकानंतर ब्रह्मयानें जप करण्याकडे विनियोग. |
| अ | आपोहिष्ठा.........। ...............॥ | सं. १.५,१ | आपोहिष्ठा.........। ..............॥ | सं. ४.१,५ | (कृ.) चयनप्रकरणीं विटांची माती पाणी ओतून तयार करण्याकडे विनियोग. |
| अ | योवः शिव.........। ...............॥ | सं. १.५,२ | योवः शिव......। ..............॥ | सं. ४.१,५ | (अ.) पशूमध्यें वपाहोमानंतर मार्जनाकडे विनियोग. |
| अ | तस्माअरं........। ...............॥ | सं. १.५,३ | तस्माअरं.........। ..............॥ | सं. ४.१,५ | |
| अ | शंनोदेवी.........। ...............॥ | सं. १.६,१ | शंनोदेवी.........। ..............॥ | ब्रा. १.२,१ | (कृ.) घर्माच्या शांतिपठणामध्यें विनियोग. |
| अ | ईशाना.............। ...............॥ | सं. १.५,४ | ईशाना........। ..............॥ | ब्रा. २.५,८ | (अ.) पशूमध्यें वपाहोमानंतर मार्जनाकडे विनियोग. (कृ.) आयतनांच्या प्रोक्षणाकडे विनियोग. |
| अ | अप्सुमे.........। ...............॥ | सं. १.६,२ | अप्सुमे........। ...आपश्च विश्वभेषजीः | ब्रा. २.५,८ | (कृ.) अवभृथाच्या आज्यभागाच्या पुरोनुवाक्येकडे विनियोग. (अ.)पशूमध्यें वपाहोमानंतर मार्जनाकडे विनियोग. |
| आ | येनेंद्राय...ब्रह्मणा...। तेनत्वमग्नइह......॥ | सं. १.९,३ | येनेंद्राय...हविषा...। तेनाग्नेत्वमुत......॥ | सं. ३.५.४ | (कृ.) दर्शपूर्णमासांत याजमानामध्यें विनियोग. (अ.) श्रौतविनियोग नाहीं. |
| आ | वितेभि...मेहनं...... गवीनिके। ...विकुमारं जरायुणावपद्यताम् ॥ | सं. १.११,५ | वितेभि...तकरीं...... ...गविन्यौ।... विगर्भंचजरायु च ॥ | सं.३.३,१० | (कृ.) अष्टापदी ( गर्भिणी शेळी )चा गर्भ छेदन करण्याकडे विनियोग. (अ.) श्रौतविनियोग नाहीं. |
| आ | अदारसृत्...तु......। ......वृजिना... ॥ | सं. १.२०,१ | अदार सृत् त...... ......वृजना... ॥ | ब्रा. ३.७,५ | (कृ.) दर्शपूर्णमासाच्या प्रायश्चित्तांत विनियोग. (अ.) श्रौतविनियोग नाहीं. |
| आ | स्वस्तिदा विशांप......। ......सोमपा...... ॥ | सं. १.२१,१ | स्वस्तिदाविशस्प...। .........स्वस्तिदा ॥ | ब्रा. ३.७,११ | |
| अ | विनइंद्र............। अधमं गमयातमो...॥ | सं. १.२१,२ | विनइंद्र............। अधसदंतर्माकृधि ...॥ | सं. १.६,१२ | (कृ.) इन्द्रोवैमृध देवतेच्या पुरोनुवाक्येकडे विनियोग. (अ.) पुरीषछन्नचितीच्या अनुमंत्रणाकडे विनियोग. |
| अ | विरक्षो...जहि......। ......वृत्रहन्...... ॥ | सं. १.२१,३ | विशत्रून्वि ...नुद ...। ......भामितो... ॥ | सं. १.६,१२ | (कृ.) इन्द्रदेवतेच्या याज्येकडे विनियोग. (अ.) श्रौतविनियोग नाहीं. |
| आ | शुकेपुते...........। .........ते...... ॥ | सं. १.२२,४ | शुकेपु मे........। .........मे...... ॥ | ब्रा. ३.७,६ | (कृ.) दर्शपूर्णमासांत यजमानाच्या उपस्थान मंत्रामध्यें विनियोग. (अ.) श्रौतविनियोग नाहीं. |
| आ | नक्तंजाता...।......॥ | सं. १.२३,१ | नक्तंजाता...।......॥ | ब्रा. २.४,४ | दोन्ही वेदांत श्रौतविनियोग नाहीं. |
| इ | किलासं...........। आत्वा स्वोविशतां...। ......शुक्लमि......॥ | सं. १.२३,२ | किलासं............। आनः...अक्षुता...। श्वेतानि............॥ | ब्रा. २.४,४ | |
| इ | असितं...प्रलयन...॥ | सं. १.२३,३ | असितं...निलयन...॥ | ब्रा. २.४,४ | |
| इ | अस्थिज...दूष्या...॥ | सं. १.२३,४ | अस्थिज...कृत्वया...॥ | ब्रा. २.४,४ | |
| इ | सरूपा ...........। सरूपकृत्वमोषधे ...॥ | सं. १.२४,३ | सरूपा ...........। सरूपास्योषधे......॥ | ब्रा. २.४,४ | |

| वर्ग. | अथर्ववेदमंत्र. | स्थान. | कृष्णयजुर्वेदमंत्र. | स्थान. | विनियोग. |
|---|---|---|---|---|---|
| आ | उदसौ...अगादुदि...। ( पुढचें अर्ध भिन्न ) | सं. १.२९,५ | उदसावेतु...उदि... । ( पुढचें अर्ध भिन्न ) | ब्रा. २.७,१६ | (कृ.) राज्याभिषेकांत रथारोहणाचे वेळीं सूर्याकडे अवलोकन करून म्हणण्याकडे विनियोग. (अ.) श्रौतविनियोग नाहीं. |
| अ | आशानामा.........। ..................॥ | सं. १.३१,१ | आशानांत्वा.........। ................॥ | ब्रा. २.५,४ | (कृ.) दर्शपूर्णमासांत चतुर्धाकरणाकडे विनियोग.(अ.) अश्वमेधांतील उत्सृष्ट अश्वाच्या अनुमंत्रणाकडे विनियोग. |
| आ | हिरण्यवर्णा...सविता । यास्वग्निः। या अग्निं सुवर्णा स्ता..................॥ | सं. १.३३,१ | हिरण्यवर्णाः ... कश्यपो यास्विंद्रः। अग्निंया विरूपा स्ता................॥ | सं. ५.६,१ | (कृ.) चयनप्रकरणीं कुंभेष्टकांच्या उपधानाकडे विनियोग. (अ.) श्रौतविनियोग आढळत नाहीं. |
| आ | यासांराजा........। (अर्ध पूर्वीच्या ऋचेंतील) | सं. १.३३,२ | यासाश्राजा........। ( अर्धनिराळा ) | सं. ५.६,१ | ( कृ. ) चयनप्रकरणीं कुंभेष्टकांच्या उपधानाकडे विनियोग. ( अ. ) श्रौतविनियोग नाहीं. |
| आ | यासांदेवा........ । (अर्ध पूर्वीच्या ऋचेतील) | सं. १.३३,३ | यासांदे.......... । ( अर्धनिराळा ) | सं. ५.६,१ | |
| आ | शिवेनमा......न्वो...। ( अर्धनिराळा ) | सं. १.३३,४ | शिवेनमा...नुवो... । ( अर्धनिराळा ) | सं. ५.६,१ | |
| इ | वेन...पश्यत्परमंगुहायत् ......त्येकरूपम् ॥ ( अर्ध भिन्न आहे ) | सं. २.१,१ | वेनस्तत्पश्यन्विश्वा भुवनानि ........... ......त्येकनीळम् ( अर्धभिन्न आहे ) | आर. १०.१ | दोन्ही वेदांत श्रौतविनियोग नाहीं. |
| इ | प्रतद्वोचेद...तस्य... धाम...गुहायत् ।... गुहास्य यस्तानि...सवितुष्पितासत्.........॥ | सं. २.१,२ | प्रतद्वोचे अमृतंनु...नाम ...गुहासु।......गुहासु यस्तत्...सवितुःपितासत्...........॥ | आर. १०.१ | |
| ई | सनःपिता...सउत-बंधुर्धा............। ......ध...यंतिसर्वाम् | सं. २.१,३ | योनःपिताजनितायो ... सनोबंधुर्ज......सविधातधा........। योदेवानां...धा...... यंत्यन्या...........॥ | सं. ४.६,२ आर. १०.१ सं. ४.६,२ | दोन्ही वेदांत चयनप्रकरणीं वैश्वकर्मण होमाकडे विनियोग आहे. |
| इ | परियावापृथिवीसद्यः (पुढचा सर्व मंत्र भिन्न) | सं. २.१,४ | परियावापृथिवीयंतिसद्यः ( पुढचामंत्र सर्व भिन्न ) | आर. १०.१ | दोन्ही वेदांत श्रौतविनियोग नाहीं. |
| इ | यत्रदे...समानेयोना वध्यैरयन्त.........॥ | सं. २.१,५ | यत्रदेवा......तृतीयेधा-मान्यभ्यैरयन्त...... । | आर. १०.१ | |
| अ | इन्द्रस्यनु प्रावोचं वीर्याणि। .................॥ | सं. २.५,५ | इन्द्रस्यवीर्याणि प्रवोचं। ................॥ | ब्रा. २.५,४ | ( कृ. ) निष्केवल्यनामक शस्त्रामध्यें विनियोग. ( अ. ) सोमयागामध्यें अभिषव होमाकडे विनियोग. |
| अ | अहन्नहिं......।... ॥ | सं. २.५,६ | अहन्नहिं...।...... ॥ | ब्रा. २.५,४ | |
| अ | वृषाय...णो अत्रृणी...। ..................॥ | सं. २.५,७ | वृषाय...णोत्रृणी......। ..................॥ | ब्रा. २.५,४ | |
| अ | समास्त्वा........ .........शश्वतस्त्वः ॥ | सं.२.६,१ | समास्त्वा...... । ......पृथिव्याः ॥ | सं. ४.१,७ | (कृ.) चयनांग पशूच्या सामिधेनीकडे विनियोग ( अ. ) याचप्रसंगीं ब्रह्म्याच्या अनुमंत्रणाकडे विनियोग. |
| अ | संचेध्य........। मातेरिषन्नुप...रो... ॥ | सं. २.६,२ | संचेध्य...वोधयैन... मातरिषदुप...ते...॥ | सं. ४.१,७ | |
| अ | त्वामग्ने........। ...ग्ने...जिदूभवस्वे ॥ | सं. २.६,३ | त्वामग्ने........। ...नो...जिन्वस्वे... ॥ | सं. ४.१,७ | |
| अ | क्षत्रेणाग्नेस्वेन...त्रधा। ...मध्यमेष्ठा ॥ | सं. २.६,४ | क्षत्रेणाग्नेस्वायु...त्रधेये। ...मध्यस्थाएधि... ॥ | सं. ४.१,७ | |
| अ | अतिनिदो...रतिद्विपः। ...तरलम...रं... ॥ | सं. २.६,५ | अतिनिदो...रातिमग्ने। ...सहस्रा...रा४... ॥ | सं. ४.१,७ | |

| वर्ग. | अथर्ववेदमंत्र. | स्थान. | कृष्णयजुर्वेदमंत्र. | स्थान. | विनियोग. |
|---|---|---|---|---|---|
| आ | क्षेत्रिया...त्वाजामिशंसात्......। ...ब्रह्मणा ...कृणोमि...त्वाम् ॥ | सं. २.१०,१ | क्षेत्रियै...त्वैत्वा ।... ब्रह्मणे...करोमि..इमे ॥ | ब्रा. २.५,६ | दोन्ही वेदांत श्रौतविनियोग नाहीं. |
| आ | शंतेअग्निः...सोमः...। ( पुढें भिन्न आहे ) | सं. २.१०,२ | शंतेअग्नि...द्यावापृथि॥ ( अर्धभिन्न आहे ) | ब्रा. २.५,६ | |
| आ | शंतेवातो अंतरिक्षे वयोधाच्छंते भवंतु प्रदिशश्चतस्रः ॥ | सं. २.१०,३ | शमंतरिक्षऽसहवातेन ते शंतेचतस्रः प्रदिशो भवंतु ॥ | ब्रा. २.५,६ | |
| आ | इमायादेवीः प्रदिशश्चतस्रः..........। | सं. २.१०,४ | या दैवीश्चतस्रः प्रदिशो। | ब्रा. २.५,६ | |
| आ | सूर्यमृतं...अधि...मुंचंतो असृजन्निरेणसः । एवाहं त्वां क्षेत्रियान्निर्ऋत्या...॥ एकअर्ध | सं. २.१०,८ | सूर्यमृतं...यत्...अमुंचन् नसृजन्व्येनसः । एवमहमिमंक्षेत्रियाज्जामि | ब्रा. २.५,६ | |
| अ | आयुर्दा...जरसं वृणानो ......पृष्ठो अग्ने ।... पुत्रानभि.........॥ | सं. २.१३,१ | आयुर्दा...हविषो जुषाणो...योनिवेधि।...... पुत्रमभि......॥ | सं. १.३,१४ | (कृ.) एका काम्येष्टीच्या याज्येकडे विनियोग. (अ.) श्रौतविनियोग नाहीं. |
| अ | प्राणापानौ...ते स्वाहा | सं. २.१६,१ | प्राणापानौ......तम् ॥ | आर. ४.४२ | (कृ.) प्रवर्ग्याच्या शांतिपठणाकडे विनियोग. (अ०) श्रौतविनियोग नाहीं. |
| आ | इममग्ने...नय...... मित्र...।.........॥ | सं. २.२८,५ | इममग्ने......कृधि... स्तोम......।...... ॥ | ब्रा. २.७,७ | (कृ.) ओदनसवामध्यें यजमानानें चरु प्राशन करतांना म्हणण्याकडे. (अ.) श्रौतविनियोग आढळत नाहीं. |
| अ | आशीर्ण...सौप्र...स्त्वं दक्षंधनं...सचेतसौ । जयन्......य... ॥ | सं. २.२९,३ | आशीर्म...सुप्र...स्त्वमिषं दधातु...स वर्चसम्। संजयन्...इ...॥ | सं. ३.२,८ | (कृ०) सोमयागांत सोमामध्यें 'आशिर' ओतण्याकडे विनियोग. (अ.) सदरप्रसंगीं ब्रह्म्यानें अनुमंत्रणाकडे विनियोग. |
| इ | अत्रिवद्वः क्रमयोहन्मि कण्ववज्ज...।अगस्त्यस्य ...संपिनष्म्यहं क्रिमीन् | सं. २.३२,३ | अत्रिणात्वा क्रिमेहन्मि कण्वेन जमदग्निना ॥ विश्वावसोर्ब्रह्मणाहतः ॥ | आर. ४.३६ | दोन्ही वेदांत श्रौतविनियोग नाहीं. |
| इ | हतोराजा क्रिमीणीमुतैषां स्थपतिर्हतः । हतोहत माता क्रिमिर्हतभ्राता हतस्वसा ॥ | सं. २.३२,४ | क्रिमीणाऽराजा। अप्येषाऽस्थपतिर्हतः अथो माताथो पिता ॥ | आर. ४.३६ | |
| अ | यईशे...यो......। ...तःस...नंसचंताम्॥ | सं. २.३४,१ | येषामीशे...च...। ...तोयं...स्वसन्तु ॥ | सं. ३.१,४ | (कृ.) पशूमध्यें उपाकरणाकडे व अपाव्यहोमाकडे. (अ.)उपाकृत पशूच्या अनुमंत्रणाकडे. |
| अ | प्रमुंचंतो........। ......प्रियं...... ॥ | सं. २.३४,२ | प्रमुंचमाना........। ......जीवं...... ॥ | सं. ३.१,४ | |
| अ | येबध्यमा...दीध्याना...न्वै...। छ्रे...देवो विश्वकर्मा प्रजयासंरराणः | सं. २.३४,३ | येबध्य...बध्यमाना...न्वै...। स्ताऽ...देवः प्रजापतिः...संविदानः। | सं. ३.१,४ | |
| अ | येग्राम्याः........। ...ष्ठान........ ॥ | सं. २.३४,४ | य आरण्याः......।... स्ताऽअ...विदानः ॥ | सं. ३.१,४ | |
| अ | प्रजानन्तः...तु......। (पुढचा अर्ध भिन्न आहे) | सं. २.३४,५ | प्रजानंतः...ति......॥ (पुढचा अर्ध भिन्न आहे) | सं. ३.१,४ | |
| अ | येभक्षयन्तो...धुर्या...ण्याः । या...ष्टिः... कृणवद्विश्वकर्मा ॥ | सं. २.३५,१ | येक्षभक्षयन्तो...हुःया ......ण्णिषा........ इयं...ष्ठैः...कृणोतुविश्वकर्मा ॥ | सं. ३.२,८ | (कृ.) अग्निष्टोमामध्यें वैश्वकर्मण होमाकडे. (अ.) वैश्वकर्मण होमाच्या ( चयनामधील ) अनुमंत्रणाकडे व चातुर्मास्यांतील विश्वकर्म यागाच्या अनुमंत्रणाकडे. |

| वर्ग. | अथर्ववेदमंत्र. | स्थान. | कृष्णयजुर्वेदमंत्र. | स्थान. | विनियोग. |
|---|---|---|---|---|---|
| अ | यज्ञपति...हुर्निभक्तप्रजा<br>......नं । मथव्यान्<br>त्स्तोकानपयान्...... ।<br>नष्टेभिः......... ॥ | सं. २.३५,२ | यज्ञपति...हुः । प्रजा-<br>निर्भक्ता...ना...क्षव्यौ<br>...वपतोरराध । सन्नस्ता<br>भ्याऽ........... ॥ | सं. ३.२,८ | (कृ.) अग्निष्टोमामध्यें वैश्वकर्मण होमाकडे. |
| अ | अदान्या...यज्ञस्य येन-<br>धीरः । यदेनश्च......<br>वद्धएष तं ......... ॥ | सं. २.३५,३ | अनन्यत्सोमपान्...<br>प्राणस्य...रे...एनश्चः<br>...प्रहि...एषा । ... । | सं. ३.२,८ | (अ.) वैश्वकर्मण होमाच्या ( चयनामधील ) अनुमंत्रणाकडे व चातुर्मास्यांतील विश्वकर्म यागाच्या अनुमंत्रणाकडे. |
| अ | घोराऋषयो...र्यदे...<br>सत्यं...वि...र्मन्नमस्ते-<br>पाद्य १ स्मान् | सं. २.३५,४ | घोराऋषयो...षए...<br>संधौ...नमोवि...णे<br>सउपालस्मान् ॥ | सं. ३.२,८ | |
| आ | त्वांविशो...तां...त्वमि-<br>माः प्रदिशः पञ्चदेवीः । | सं. ३.४,२ | त्वांगावो...त...त्वाऽह-<br>वंतमरुतः स्वर्काः । ... | सं. ३.३,९ | (कृ.) वृषालंभयागांतील स्विष्टकृताकडे.<br>(अ.) श्रौतविनियोग नाहीं. |
| आ | ...राष्ट्रस्य...दिश्रयस्व<br>............... ॥ | | क्षत्रस्य...भिशिश्रियाणः<br>............... ॥ | | |
| आ | अमूये दिविसुभगे... ॥<br>विक्षेत्रिय मुंचता मधमं-<br>पाशमुत्तमम् ॥ | सं. ३.७,४ | अमीये सुभगे दिवि<br>... ॥ प्रेहामृत यच्छ-<br>तामेतद्बद्धकमोचनम् ॥ | आर. २.६ | (कृ.) 'कूष्मांड' होम.<br>(अ.) श्रौतविनियोग नाहीं. |
| आ | प्रथमा हव्युवास...॥<br>...दुहामु......... ॥ | सं. ३.१०,१ | याः प्रथमा व्यौच्छत्<br>... ॥...धुक्ष्वो... ॥ | सं. ४.३,११ | (कृ.) चयनामध्यें 'व्युष्टि' नामक इष्टकागण मांडतांना.<br>(अ.) श्रौतविनियोग नाहीं. |
| आ | संवत्सर........स्सहो<br>( अर्ध भिन्न आहे ) | सं. ३.१०,३ | संवत्सरस्य प्रतिमां सते ।<br>(पुढचा अर्ध अगदींभिन्न) | सं. ५.७,२ | (कृ.) चयनामध्यें इष्टकोपधानाकडे.<br>(अ.) श्रौतविनियोग नाहीं. |
| आ | इयमेव...दास्वितरासु ॥<br>(पुढचा अर्ध बराच भिन्न<br>आहे ) | सं. ३.१०,४ | इयमेव...दंतरस्यां... ।<br>(पुढचा अर्ध पुष्कळच<br>निराळा आहे ) | सं. ४.३,११ | (कृ.) चयनप्रकरणीं इष्टकोपधानाकडे विनियोग.<br>(अ.) श्रौतविनियोग नाहीं. |
| आ | एकाष्टका......... ।<br>...देवा...शत्रून्...<br>दस्यूना...शचीपतिः | सं. ३.१०,१२ | एकाष्टका......... ।<br>...दस्यून्...देवा...<br>सुराणा...शचीभिः ॥ | सं. ४.३,११ | |
| आ | यददः......।...... ॥ | सं. ३.१३,१ | यददः......।...... ॥ | सं. ५.६,१ | (कृ.) चयनप्रकरणीं कुंभेष्टकांच्या उपधाकर्मांत विनियोग.<br>(अ.) श्रौतविनियोग आढळत नाहीं. |
| आ | यत्प्रेषि...जा...। छन ॥ | सं. ३.१३,२ | यत्प्रेषि...नता...स्थन॥ | सं. ५.६,१ | |
| आ | अपकामं...।......र्ना॥ | सं. ३.१३,३ | अपकामऽ...।... र्णा ॥ | सं. ५.६,१ | |
| आ | एकोवोदे......... ॥ | सं. ३.१३,४ | एकोदे...अ...।... ॥ | सं. ५.६,१ | |
| आ | आपोभद्रा...आसन्...।<br>............गमेत् ॥ | सं. ३.१३,५ | आपोभद्रा... आसुर...।<br>............गन् ॥ | सं. ५.६,१ | |
| आ | आदित्प...ज्ञासाम् ।<br>............... ॥ | सं. ३.१३,६ | आदित्प.........न<br>आसाम् ।......... ॥ | सं. ५.६,१ | |
| आ | प्रातरग्निं......... ।<br>.........हवामहे ॥ | सं. ३.१६,१ | प्रातरग्निं......... ।<br>.........हुवेम ॥ | ब्रा. २.८,९ | (कृ.) काम्य पशूमध्यें याज्यापुरोनुवाक्यांकडे विनियोग.<br>(अ.) श्रौतविनियोग नाहीं. |
| आ | प्रातर्जितं...हवामहे...।<br>.............. ॥ | सं. ३.१६,२ | प्रातर्जितं...हुवेम... ।<br>.............. ॥ | ब्रा. २.८,९ | |
| आ | भगप्रणे...।...वा... ॥ | सं. ३.१६,३ | भगप्रणे...व ।...... ॥ | ब्रा. २.८,९ | |
| आ | उतेदानीं...।...दितौ ॥ | सं. ३.१६,४ | उतेदानीं...।...दिता ॥ | ब्रा. २.८,९ | |
| आ | भगएव...देव...ना...<br>...।............ ॥ | सं. ३.१६,५ | भगएव...देवा...न...<br>... । ......... ॥ | ब्रा. २.८,९ | |
| आ | समध्वरा...।...मे...॥ | सं. ३.१६,६ | समध्वरा...।...नो...॥ | ब्रा. २.८,९ | |
| आ | अश्वावती,..।...ता..॥ | सं. ३.१६,७ | अश्वावती...।...ना...॥ | ब्रा. २.८,९ | |

३ संस्काराकडे नियोजित असलेले मंत्र अर्थदृष्ट्या कर्मानुरूप असतील त्या मंत्रादींच्या पूर्वी † ही खूण आहे.

## कांड १ लें.

१,१–४ 'येत्रिषप्ताः' (वालकाचें) मेधाजननकर्म.* (आ) 'मेधांते' १,१५.५,१–३ 'आपोहिष्ठा.' वास्तुसंस्कार.*(आ)भिन्न क्रिया २,७.९,१–४ 'अस्मिन् वसु.' उपनयन–शिष्याभिमंत्रण. १३,१–४ 'नमस्ते अस्तु' उपाकर्म आज्यहोम.* (आ.) भिन्न मंत्र ३,५. ३०,१–४ 'विश्वेदेवाः.' उपनयन–शिष्यनाभिस्पर्श. ३३,१–४ 'हिरण्यवर्णाः.' गोदान–शिष्यस्नपन.

## कांड २ रें.

१,१–५ 'वेनस्तत्पश्य.' विवाह–कुमारीलक्षण पाहणें.* (आ)† ऋतमग्ने १,५. १३,१–४ 'आयुर्दा अग्ने' गोदान–शिष्याभिषेक. २८,१–५ तुभ्यमेव. गोदान, चूडाकर्म–मातापितरांनीं कुमारास एकमेकाजवळ देणें व घृतपिंडप्राशन. ३६,५ 'भगस्य नावं.' विवाहानंतर प्रवास–नौकारोहण.* (आ) 'अश्मन्वतीरीयते'. १,८.

## कांड ३ रें.

८,१–६ 'आयातु मित्रः' उपनयन–शिष्यनाभिदेशानुमंत्रण. १०,१–१३ 'प्रथमा हव्युवास.' अष्टका–होम.* (आ) 'उदीरतां' १,४. ११,१–८† 'मुंचामि त्वा' व्याधिनिवारण.* (आ.)† ३,७. १२,१–९ † 'इहैव ध्रुवां.' वास्तुसंस्कार–भूमिकरण. १२,६ 'ऋतेन स्थूणां.' वास्तुसंस्कार–स्थूणांजन.* (आ) † भिन्न क्रिया २,७.१२,८ † 'पूर्ण नारी' वास्तुसंस्कार–नूतनगृहप्रवेश. २०,८ †'अवसृष्टा'. संग्राम–बाणप्रक्षेप.* (आ) † ३,११. २३,१–६ 'येन वेहत्., पुंसवन–केसांत बाण खोंचणें. २४,१ 'पयस्वती' पितृमेध–प्रेतदहनानंतर स्नानकर्मांत. ३१,१–११ 'विदेवा जरसा.' उपनयन–कुमारमूर्धाभिमंत्रण.

## कांड ४ थें.

९,१–९ †'एहिजीवं.' उपनयन–शिष्याच्या कंठांत मणि वांधणें. १०,१–७ †'वाताज्जातो.' उपनयन–शिष्याच्या कंठांत मणि बांधणें. १३,१–७ 'उतदेवाः' उपनयन–शिष्याभिमंत्रण. १५,१–४ 'समुत्पतंतु.' वृष्टिकाम–आज्यहोम. २१,७ †'प्रजावतीः.' गाईचें अभिमंत्रण. (आ.) † २,१०. ३०,१–८ 'अहंरुद्रेभिः.' जातकर्म–शंखपुष्पिकादि प्राशन. ३०,१–८ 'अहंरुद्रेभिः.' मेधाजनन ( वालकाच्या वुद्धीची वाढ होण्यास ) होमशेष तूप डोक्यास लावणें. ३०,१–८ 'अहंरुद्रेभिः.' उपनयन–दंडदानानंतर वाचन. ३१,१–७ †'त्वयामन्यो.' संग्राम–सेनानिरीक्षण. ३२,१–७ †'यस्तेमन्यो.' संग्राम–सेनानिरीक्षण. ३३,१–८ 'अपनः.' दुःशकुननिरसन–जप. ३३,१–८ 'अपनःशोशुचत्.' *प्रेतसंस्कार–प्रेतदहनानंतर परत घरीं जातांना जप. (आ) † 'इमे जीवाविमृतैः' ४,४. ३३,१–८ 'अपनः' प्रेतसंस्कार–स्नानानंतर घरीं आल्यावर अग्नींत समिध् देणें. ३५,१–७ 'यमोदनं.' गाईला जुळें झाल्यास यमलजननशांति.

## कांड ५ वें.

२०,१–१२ †'उच्चैर्घोषो.' *संग्राम–दुंदुभिवादन. (आ) दुंदुभीला अभिमर्श †'उपश्वासय.' ३,१२. २४,१–१७ 'सविताप्रसवानां.' विवाह–आज्यहोम. २५,१–१३ † 'पर्वताद्दिवो.' गर्भाधान–चरुहोम; चरुप्राशन व मैथुन कर्म. २८,१–१४ 'नवप्राणान्.' उपनयन–आज्यहोम व कुमाराच्या कंठांत मणि वांधणें. ३०,१–१७ 'आवतस्ते.' उपनयन–कुमाराभिमंत्रण.

## कांड ६ वें.

१,१–३ 'दोषो गाय.' समावर्तन–चरुभक्षण. ११,१–३ †'शमीमश्वत्थ.' पुंसवन–मधुमंथासह शमीगर्भाश्वत्थाग्निप्राशन २७,१–३ †'देवाः कपोतः' कपोतशांति–होम.* (आ.) † ३,७.२८,१–३ 'ऋचा कपोतं.' कपोतशांति–घरांत गाय फिरवणें. ३३,१–३ †'यस्येदमारजः.' जमीन नांगरणें.* (आ) भिन्नमंत्र 'क्षेत्रस्यपतिना.' ४,८. ३८,१–३ 'सिंहेव्याघ्रः.' उत्सर्जन–आज्य होम. ४०,१–३ † 'अभयं द्यावापृ.' संग्राम–सेना भयनिवृत्त्यर्थ अगस्त्युपस्थान.४१,१–३ 'मनसे चेतसे.' गोदान–व्रीहिमय स्थालीपाक. ४४,१–३ 'अस्थाद्यौः' दुःस्वप्नपरिहार–मुखप्रक्षालन व व्रीहियवपुरोडाशहोम. ४८,१–३ †'विद्मते स्वप्न.' दुःस्वप्ननाशन.* (आ.) † 'यच्चगोषु' ३,६. ४८,१–३ 'श्येनोसि' उपनयन–दंड देण्याचा मंत्र.(आ.)*अमंत्रक. १,२२. ४९,१–३ 'नहिते अग्ने.' प्रेतकर्म–आचार्यमरणानंतर शिष्यानें करावयाचा होम. * (आ.) † 'परंमृत्यो अनु., ४,६. ५३,१–३ 'द्यौश्च मे.' मेधाजनन–क्षीरोदनप्राशन. ५३,२ 'पुनः प्राणः' गोदान क्षुरमार्जन. ५३,३ 'सं वर्चसा.' उपनयन–उदपात्रावलोकन. ५६,१–३ 'मानोदेवाः.' उपाकर्म–दधिसक्तुप्राशन.* (आ.) अमंत्रक ३,५. ५८,१–३ 'यशसं मेंद्रो.' उत्सर्जन–आज्यहोम. ६५,१–३ 'अवमन्युः' संग्राम–जयार्थ आज्यहोम. ६८,१–३ †'आयमगन्सविता.' चूडाकर्म हजामतीकरितां उदकाभिमंत्रण; डोक्यास उदक चोळणें. ६८,१–३† 'आयमगन्सविता.' चूडाकर्म वपन करणें.*(आ.)† येनावपत् १,१७. ६९,१–३ 'गिरावरगराटेषु' मेधाजनन–मुखप्रक्षालन. ७१,१–३ † 'यदन्नमद्मि.' उपनयन–अग्निकार्य भैक्ष्यहोम. ७४,१ 'इहैवस्तंमा.' वास्तुसंस्कार–नूतनगृहप्रवेश वाग्विसर्ग. ७८,१ 'तेन भूतेन.' विवाह–ओंजळीनें आज्यमिश्र यवहोम. ८१,१–३ 'यंतासि०' गर्भाधान–पत्नीच्या हातांत कंकण वांधणें. ८१,१–३ विवाह–आज्यहोम. ९७,१–३ †'अभिभू.' संग्राम–जयकाम होम. ९९,१–३ 'अभितेंद्र.' संग्राम–जयकामहोम. १०४,१–३ 'संदानं वो.' संग्राम–भांगपाशप्रक्षेप.१०५,१–३ 'आदानेन.' संग्राम–भांगपाशप्रक्षेप. १०८,१–५ 'त्वंनोमेधे.' मेधाजनन–क्षीरोदनभक्षण. ११४–११८ सूक्तें 'यद्देवा देव.' प्रेतकर्म–चितीवर आज्यहोम. १२५,१–३ 'वनस्पते.' संग्राम–रथारोहण.* (आ.) † वायोष्ट्वा वीर्येण.' २,६. १२६,१–३ †'उपश्वास्य' संग्रामदुंदुभि वादन.* (आ.) अभिमर्श ३,११. १३३,४–५ † 'श्रद्धाया.' उपनयन–मेखलाबंधन* (आ) † इयं दुरुक्तात्.' १,२२.

### कांड ७ वें.

३,१ 'अयाविष्टा.' संग्रामरथारोहण. ६,२ 'महीमूषु.' चतुर्थीकर्म-खट्वास्पर्श. ११,१ 'यस्तेस्तन.' बालकास प्रथम स्तनपान. १७,१ † 'बृहस्पते.' ब्रह्मचारी सूर्योदयापर्यंत निजल्यास उठविण्याचा मंत्र. २३,१ 'समेत विश्वे.' प्रेतकर्म-चितीवर उदकसेचन. ३१,१ 'स्वाक्तं मे.' गोदान-डोळ्यांत काजळ घालणें. ३३,१ 'उपप्रियं.' उपनयन-शिष्यमूर्धाभिमंत्रण. ३७,१ †'अक्ष्यौ नौ.' विवाह-चतुर्थीकर्म-पतिपत्नी यांनीं परस्परांच्या डोळ्यांत काजळ घालणें व पत्नीच्या डोक्यावर शंखपुष्पीचें फूल बांधणें. ४२,१-२ 'अतिधन्वानि.' वास्तुकरण-भूशुध्यर्थ श्येनदेवताक चरुहोम. ५५,१-६ 'अमुत्रभूयात्.' उपनयन-शिष्यमूर्धाभिमर्शन. ५८,५ 'अरसस्य.' उपाकर्म-आज्यहोम. ६२,१-६ 'ऊर्जं बिभ्रत्'-प्रेतकर्म-प्रेतदहनानंतर कर्त्यानें गृहप्रवेश करतांना जप. ६३,१-२ 'यदग्ने.' उपनयन-अग्निकार्य-परिषेक* (आ.) अमंत्रक १,२०. ७०,१ 'पुनर्मामै.' काम्य पाकयज्ञ-स्वतःचें अनुमंत्रण. ७०,१ 'पुनर्मा.' गोदान-वपनार्थ क्षुरानुमंत्रण. ६७,२-३ 'यदुष्कृतं.' विवाह-पत्नीस स्नानानंतर वस्त्र परिधान करविणें. ७०,१ 'सरस्वति.' आहिताग्निप्रेतसंस्कार. ७७,११ 'सूयवसात्.' प्रवासास जातांना पशूंचें अभिमंत्रण. ७७,११ 'सूयवसात्.' मधुपर्क-गोरुत्सर्ग * (आ.) 'माता रुद्राणां' १,२४. ८६,१ 'पूर्वापरं.' विवाह-आज्यहोम. ८८,२ 'अप्सुते.' अद्भुत शांति-धूमकेतु-'दर्शन. ९४,१ 'अपोदिव्या.' उपनयन-वेदव्रतकर्म. ९४,३ 'इदमापः' उपनयन-अग्निकार्य हस्तक्षालन. ९४,४ 'एधोसि.' उपनयन-अग्निकार्य अग्नीवर हात तापवून तोंडावरून फिरविणें.* (आ.) 'तेजसा मा.' १,२१. १०१,१ 'समिंद्रणो.' उपनयन-उदपात्रावलोकन. ११०.१ 'अपक्रामन्.' उपनयन-कुमारानें प्राङ्मुख होतांना.* (आ.) 'युवासुवासाः' १,२०. ११६,१ 'इन्द्रस्यकुक्षिः.' वृषोत्सर्ग-वृषभ सोडतांना. ११०,१ 'शुंभनी.' विवाहकर्म-आज्यहोम. १२२,१ 'आमंद्रैः.' प्रेतसंस्कार-प्रेतदहनानंतर स्वस्त्ययन विधि.

### कांड ८ वें.

१,१-१० 'अंतकाय.' उपनयन-शिष्यनाभिदेशस्पर्श. २,१-१० 'आरभस्व.' उपनयन-शिष्यनाभिदेशस्पर्शजप. २,१-१० प्रेतकर्म-प्रेताग्नि उद्दीपित करतांना. २,१४-१५ 'शिवे ते स्तां'. गोदान-शिष्याच्या डोक्यावर ओषधि ठेवणें. २,१४-१५ 'शिवे ते स्तां' निष्क्रमण-बालकास प्रथम घराबाहेर आणणें. २,१७ † 'यत्क्षुरेण' गोदान-चूडाकर्म-क्षुराभिमंत्रण* † (आ) क्षुरतेज निमृजन. १,१६. २,१८ 'शिवौतेस्तां' अन्नप्राशन * ओषधि व यवपिष्टप्राशन. (आ) 'अन्नपते' १,६. २,१६ 'यत्तेवासः' नामकरण-बालकास नूतन वस्त्र पांघरविणें *(आ) मंत्र व क्रिया भिन्न १,१५. २,२२ 'शरदेत्वा' गोदान-शिष्याच्या डोक्यावर ओषधि ठेवणें. ६,१-१० 'यौ ते माता.' सीमंतोन्नयन-गर्भिणीजवळ पांढऱ्या मोहऱ्या मंत्रून ठेवणें.* (आ.) मंत्र व क्रिया भिन्न. १,१४.

### कांड ९ वें.

१,११-२४ 'यथासोम.' उत्सर्जन-आज्यहोम. ४,१-२४ 'साहस्रस्त्वे.' वृषोत्सर्ग-वृषभाला सोडतांना. ४,९-१८ † साहस्रस्त्वे-वृषभमांसहोम.

### कांड ११ वें.

६,१-२६ 'प्राणाय नमः' उपनयन-शिष्यांच्या नाभीस साहस्रस्त्वे. स्पर्श करतांना जप.

### कांड. १३ वें.

२,१-४६ 'उदस्य.' उपनयन-त्रिकाल सूर्योपस्थान.

### कांड १४ वें.

१,१-१६ 'सत्येनोत्तभिता.' विवाह-वधूनें पठण करणें. १,२० 'भगस्त्वेतो.' विवाह-वधूच्या अनामिकेस रक्तसूत्र बांधणें. १,२३-२४ 'पूर्वापरं.' विवाह-वधूनें करावयाचा आज्यहोम. १,२३-२४ 'पूर्वापरं.' विवाह-वराकडे अनुचर पाठविणें. १,३१ †'युवं भगं.' विवाह-वराकडे ब्राह्मण पाठविणें. १,३४ 'अनृक्षराः' विवाह-उदक आणण्यास जाणें. १,३८ 'इदमहं.' विवाह-उदकावगाहन व घट भरणें. १,३९ 'आस्यै ब्रा.' विवाह-उदकघट उदाहारास देणें. १,४० 'शंते हिरण्यं.' विवाह-वधूच्या ललाटीं सुवर्ण बांधणें. १,३५-४३ 'यच्च वर्चो.' विवाह-वधूला शीतोष्णोदकानें स्नान घालणें. १,४२ † 'आशासाना.' विवाह-वधूच्या कमरेस योक्त्र बांधणें. १,३९ † 'आस्यैब्राह्म.' विवाह-वधूवरांनीं अग्नीला तीन प्रदक्षिणा करणें.* (आ.) † 'अमोहमस्मि.' १,७. १,४६ 'जीवंरुदंति.' विवाह-वधू वराच्या घरीं जातांना वाटेंत रडल्यास पठण करणें. * (आ.) मंत्रांत थोडा फरक १,८. १,४७ 'स्योनं ध्रुवं.' विवाह-वधूचे ललाटावर बांधलेल्या सुवर्णावर जलाची धार धरणें. १,४७ 'स्योनं ध्रुवं.' विवाह-वधूला वराच्या घरीं आल्यावर प्रथम ज्या दगडावर उभी करावयाची तो दगड घराच्या दक्षिणभागीं गाईच्या शेणावर ठेवणें व त्यावर वधूनें उभें राहणें. १,४७ † 'स्योनं ध्रुवं.' विवाह-वधूनें अश्मारोहण करतांना* (आ.) † 'इममश्मानं' १.७.१,४८-५२ †'येनाग्निरस्याः' विवाह-वधूचें पाणिग्रहण.* (आ) † 'गृभ्णामि ते' १,७.१,५८ 'प्र त्वा मुंचामि.' विवाह-वधूचे केश ( स्नानानंतर ) विंचरणें. १,५८ †'अहं-विष्यामि.' विवाह-वधूनें कमरेचें योक्त्र सोडणें. १,५८ 'अहंविष्यामि.' विवाह-विवाहानंतर सुहृदांनीं वधूचे पाय धुणें. १,५९-६२ † 'उद्यच्छध्व.' विवाह-तल्पावर वसलेल्या वधूला उठविणें. १,६४ †'माहिंसिष्ट.' विवाह-वधूवरांनीं प्रथम गृहप्रवेश करतांना हातांत जलकुंभ व अक्षता घेऊन प्रवेश करणें.* (आ) पदार्थग्रहण नाहीं. † 'इहप्रियं.' १,८. १,६१ 'सुकिंशुकं.' विवाह-वधूवरांनीं स्वगृहीं जातांना. २,६ 'सा मंदसाना.' विवाह-वरानें स्वगृहीं जातेवेळीं मार्गांत जरूर पडल्यास नौकारोहण करतांना* (आ.) 'अश्मन्वतीः' १.८. २,७ व ९ 'या ओषधयः' विवाह-मार्गांत महावृक्ष, महानदी,

क्षेत्र, इत्यादि आढळल्यास जप.* (आ.) 'माविदन्' १,८. २,११ 'माविदन्.' विवाह–वरानें स्वगृहीं जातेवेळीं यानारोहण करतांना. *(आ.)'पूषात्वेतो.' १,८.२,१२ 'संकाशया.' विवाह–वरानें स्वगृहाजवळ आल्यावर जप करणें. २,१७–१८ 'अघोरचक्षुः.' विवाह–वरानें वधूसह अग्नीस तीन प्रदक्षिणा करणें. २,२० 'इहप्रियं.' विवाह–वधूवरांनीं अग्नि, पितर, सरस्वति, मित्र, वरुण यांनां नमस्कार करणें. २,२३ †'उपस्तृणीत.' विवाह–वधूला रोहित चर्मावर वसविणें. *(आ.) अमंत्रक. १,८. २,२४–२५ 'आरोह चर्म.' विवाह–वधूच्या मांडीवर एका मुलास वसविणें व त्या मुलाच्या हातावर फळें, मोदक वगैरे देऊन उठविणें. २,२८ 'सुमंगलीः' विवाह–गृहप्रवेशाचे वेळीं दगडावर उभी केलेल्या वधूला खालीं उतरविणें. २,३१, † 'आरोहतल्पं.' चतुर्थीकर्म–वधूवरांनीं तल्पारोहण करतांना. २,३१ 'आरोहतल्पं.' विवाह–सप्तरेखा लेखन. २,३१ 'आरोहतल्पं.' विवाह–सप्तरेखा आक्रमण. (आ) वधूला सात पावलें चालविणें. † 'इष एकपदी.' १,७. २,३७ 'तं पितराः.' चतुर्थीकर्म–वधूवरांनीं सन्मुख होऊन अंगावर पांघरूण घेतांना. २,३६ † 'परादेहि.' चतुर्थीकर्म–वधूचें वस्त्र वरानें आचार्यास देणें. २,४१ †'देवैर्दत्तं.' चतुर्थीकर्म–वरानें दिलेलें वस्त्र आचार्यानें घेतांना पठण करणें. २,४३ †स्योनाद्योनेः' चतुर्थीकर्म–संभोगकालीं पठण करणें. २,४४ 'नवं वसानः' चतुर्थीकर्म–वरानें दिलेलें वस्त्र घेऊन आचार्यानें घरीं जाणें. २,४५ 'शुंभनी.' विवाह–आज्यहोम. * (आ) 'आनः प्रजां.' २,४७. 'यऋते चित्' विवाह–वधूवरांनीं स्वगृहीं जातेवेळीं वाहन चालू करतांना २,५३–५८ 'बृहस्पतिना' विवाह–वधूनें वराच्या मस्तकावर पळसाच्या पानांतून सर्वौषधि टाकणें. २,६३ † 'इयंनारीः' विवाह–लाजाहोम* (आ.) 'अर्यमणंनु.' १,७. २,६४, † 'इहेमाविंद्र' चतुर्थीकर्म–संभोगकालीन मंत्र. २,६८ 'कृत्रिमः.' विवाह–विवाहापूर्वी वधूला स्नान घातल्यावर वस्त्र पांघरविणें. २,६९ 'यदुष्कृतं' विवाह–स्नानानंतर वधूचे आंग कोरडें करणें. २,७१ †'अमोहमस्मि.' चतुर्थीकर्म–संभोगकालीन मंत्र. २,७३ 'ये पितरः' विवाह–वधूवर स्वगृहीं जात असतां वाटेंत स्मशान आढळल्यास पठण करणें. २,७४ † 'येदंपूर्वाः' विवाह–वधूवर स्वगृहीं जातेवेळीं घरांतून प्रथम उजवा पाय बाहेर टाकतांना मंत्र पठण करणें. २,७५ †'प्रबुध्यस्व' विवाह–मार्गात वधू झोंप घेऊं लागल्यास तिला जागी करतांना. ३,१–६ व ४,१–७ 'नाभिरहं' 'मूर्धाहं.' उपनयन–शिष्यानें करावयाचें सूर्योपस्थान.

### कांड १७ वें.

१,३ 'विषासहिं.' उपनयन–शिष्याच्या नाभिदेशास स्पर्श करतांना जप. १,३ 'विषासहिं.' उपनयन–शिष्याचें अभिमंत्रण. १,३ 'विषासहिं.' उपनयन–सूर्योपस्थान.

### कांड १८ वें.

१,५ प्रेतकर्म–प्रेतदहनानंतर जप. १,४१ 'सरस्वतीं.' प्रेतकर्म–चितीवर आज्यहोम. १,४४ उदीरतां.' प्रेतकर्म–दहनस्थान प्रोक्षण.* (आ.) 'अपेत वीत विच' ४,२. १,४४ 'उदीरतां.' प्रेतकर्म–गर्ता खणणें.* अमंत्रक ४,१. १,४४ 'उदीरतां.' प्रेतकर्म गर्तेत पाणी ओतणें.* अमंत्रक ४,१. १,४४ 'उदीरतां.' गर्तेत दर्भ पसरणें. १,४९ परेयिवांसं.' प्रेतकर्म–याम्यहोम. १,५१ 'बर्हिषदः.' प्रेतकर्म–गर्तेत दर्भ पसरणें. १,५२ 'आच्याजानु.' प्रेतकर्म–प्रेतावर तिळ टाकणें. १,५२ 'आच्याजानु.' प्रेतकर्म–प्रेतास्थि शिंक्यांत ठेवणें. १,५४ 'प्रेहिप्रेहि' प्रेतकर्म-प्रेत गाडींत घालणें.* (आ.) अमंत्रक. ४,२. १,५५ 'अपेतवीत.' प्रेतकर्म–दहनस्थानप्रोक्षण.* (आ.) अमंत्रक ४,२. १,५६ 'उशंतस्त्वा.' प्रेतकर्म–अग्निप्रदीप्त करणें. १,५८ 'अंगिरसो.' प्रेतकर्म–प्रेतावर आज्यहोम करणें.* † (आ.) 'अस्माद्वैत्वं.' ४,३. १,६० 'इमंयम.' प्रेतकर्म–यमाप्रीत्यर्थ अनुस्तरणीच्या वपेचा होम. २,४–१८ †'मैनमग्ने.' प्रेतकर्म–प्रेताचें उपस्थान. २,४–७ मैनमग्ने.' प्रेतकर्म–प्रेतास अग्नि लावणें* (आ.) अमंत्रक ४,४. २,८–९ †'अजोभागः' प्रेतकर्म–प्रेत जळत असतां त्याचे बरोबर जळेल अशा तऱ्हेनें बोकड बांधणें. २,११–१८ 'अतिद्रव.' प्रेतकर्म–प्रेत जळतांना त्याचें उपस्थान * †(आ.) 'प्रेहि प्रेहि' ४,३. २,११–१८ 'अतिद्रव.' प्रेतकर्म अस्थिसंचयन.* (आ.) 'शीतिकेशीतिकावति.' ४,५. २,११–१३ 'अतिद्रव.' प्रेताच्या हातांत द्यावयाच्या 'वृक्य' वगैरे भागांचें अनुमंत्रण.* (आ.) अनुमंत्रण नाहीं. २,१९–२१ †'स्योनास्मै.' प्रेतकर्म–मरणोन्मुख झालेल्यास दर्भावर ठेवणें. २,१९–२१ 'स्योनास्मै.' प्रेतकर्म–प्रेत गाडींतून बाहेर काढून ठेवणें. २,१९–२१ 'स्योनास्मै.' गोळा केलेल्या अस्थी पुरणें. २,३१ 'अश्वावतीं.' प्रेत दहनानंतर स्नान. * (आ) अमंत्रक. २,३६ 'शंतप.' प्रेताग्नि प्रदीप्त करणें. २,३७ 'ददामि०' प्रेतकर्म–दहनस्थान प्रोक्षण.* (आ.) अमंत्रक ४,२.२,३८ †'प्रेमां मात्रां' प्रेतकर्म–दहनस्थानाचें मापन. (आ.) अमंत्रक ४,१. २,५–४६ 'अमासि.' प्रेतकर्म–दहन प्रदेशाचें अनुमंत्रण. २,४८–४९ 'उदन्वती.' प्रेतकर्म–प्रेत गाडींत ठेवणें.* (आ.) अमंत्रक ४,२. २,४९–५० 'येनःपितुः' प्रेतकर्म–प्रेतचितीवर आज्यहोम. २,५१–५२ †'इदमिद्वा.' प्रेतकर्म–इमशानदेश इष्टकांनीं झांकणें. २,५३–५५ †'अग्नीषोमा' प्रेतकर्म–प्रेत गाडींत ठेवणें. २,५६ †'इमौ युनज्मि.' प्रेताच्या गाडीस बैल जोडणें. (आ.) अमंत्रक ४,२. २,५७ †'एतत्त्वावासः' प्रेतावर वस्त्र घालून झांकणें. २,५९ †'दंडं हस्तात्.' प्रेतकर्म–प्रेताच्या हातांतून दंड घेणें. २,६० †'धनुर्हस्तात्.' प्रेतकर्म–क्षत्रिय प्रेताचे हातांतून धनुष्य घेणें.* (आ.) † ४,२. ३,१ †'इयंनारी.' प्रेतकर्म–प्रेताच्या पत्नीनें सहगमन करणें. ३,२ †'उदीर्ष्व.' प्रेतकर्म–प्रेताच्या पत्नीला तिच्या दिरानें प्रेताजवळून उठविणें.* (आ) † ४,२. ३,३–४ †'अपश्यं.' प्रेताजवळ अनुस्तरणी गाईचें अनुमंत्रण. ३,५–६ 'उपद्यां.' प्रेतकर्म–अस्थीवर क्षीर, ओषधी टाकणें. (आ.) अमंत्रक ४,५. ३,७ 'इदंतएकं.' प्रेतकर्म–आहिता-

ग्नीच्या प्रेताग्नींचें अनुमंत्रण. ३,८–९ 'उत्तिष्ठप्रेहि'. प्रेतकर्म–प्रेत दहनस्थानीं नेणें.* (आ.) अमंत्रक ४,२. ३,१२ 'मित्रावरुणा'. पिंडपितृयज्ञ–* कर्त्यानें हात धुण्याचा मंत्र. (आ.) श्रौतकर्म ३,१४ †'परायात' पिंडपितृयज्ञ–पितरांचें विसर्जन. ३,१८ †'अंजते.' पिंडपितृयज्ञ–पिंडांना काजळ लावणें. (आ.) श्रौतकर्म. २,६. ३,२१–२४ †'अथायथा.' प्रेतकर्म–प्रेतोपस्थान. ३,२५–२९ †'इंद्रो मा.' प्रेतकर्म प्रेतावर आज्यहोम. ३,३१–३५ †'दक्षिणायां.' प्रेतकर्म–प्रेतावर आज्यहोम. ३,४२ 'त्वमग्न.' पिंडपितृयज्ञ–समिदाधान. ३,४४ †'अग्निष्वात्ताः.' पिंडपि. य.–बर्हि पसरणें. ३,४९ 'उपसर्प.' पिंडपि. य.–समिदाधान. ३,५६ 'पयस्वती.' प्रेतकर्म–दहनानंतर स्नान. (आ.) अमंत्रक ४,४. ३,६१–६७ '†विवस्वान्.' प्रेतकर्म–प्रेताचें उपस्थान. ३,६१–६२ †'विवस्वान्.' प्रेतकर्म–विवस्वान्–स्थालीपाक. ३,६१–६२ 'विवस्वान्.' प्रेतकर्म–हुतशेष आज्यप्राशन. ३,६९–७० †'यास्ते.' 'प्रेतकर्म-अस्थीवर धाना व तिल टाकणें. ३,७१ †'आरभस्व.' प्रेतकर्म–प्रेताग्नि उद्दीपित करणें. ३,७२ †'येतेपूर्वे.' प्रेतकर्म–अस्थीजवळ चरु ठेवणें. ३,७२ †'येतेपूर्वे.' पिंडपितृयज्ञ–पिंडावर तुपाची धार धरणें. ४,१–१५ 'आरोहत.' प्रेतकर्म–प्रेतोपस्थान. ४,१६–२४ †'अपूपवान्.' प्रेतकर्म नऊ चरू करून अस्थींच्या आठदिशेस आठ व मध्यें एक असे ठेवणें. ४,२५ †'अपूपापिहितान्.' प्रेतकर्म अस्थींच्या जवळ ठेवलेल्या चरूंचें अनुमंत्रण. ४,२९ †'शतधारं.' प्रेतकर्म–शंभर छिद्रांच्या भांड्यानें अस्थींवर धारा धरणें. ४,३१ 'एतत्तेदेव.' प्रेतकर्म–प्रेतावर वस्त्र घालणें ४,३२–३४ 'धानाधेनुः.' प्रेतकर्म–अस्थीवर तिलमिश्रलाह्या टाकणें. ४,३५ 'वैश्वानरे.' प्रेतकर्म–प्रेतदहनानंतर दुसरे दिवशीं स्मशानांत स्थालीपाक. ४,३७ 'इदं कसांबु.' प्रेतकर्म–गर्तेत ठेवलेल्या अस्थींच्याकडे सर्व बांधवांनीं पाहणें. ४,३९ 'पुत्रं पौत्रं.' पिंडपि. य.–पिंडदानानंतर आचमन. ४,४१ 'समिंधते.' पिंडपि. य.–समिदाधान. ४,४३ 'यास्ते धानाः.' प्रेतकर्म–अस्थींवर तिलमिश्र लाह्या टाकणें. ४,४४ †'इदंपूर्व.' प्रेतकर्म–प्रेत गाडींत ठेवणें. ४,४९ 'आ प्रच्यवे.' प्रेतकर्म प्रेतवाहक बैलांचें–अनुमंत्रण. ४,५१ 'इदंपितृभ्यः' प्रेतकर्म चिति रचलेल्या काष्ठावर दर्भ ठेवणें. ४,५१ 'इदंपितृभ्यः.' प्रेतकर्म–अस्थी ठेवण्याच्या गर्तेत दर्भ पसरणें; गर्तेत अस्थी ठेवणें. ४,५२ 'एदं बर्हिः.' प्रेतकर्म–ज्येष्ठानें अस्थी गोळा करणें.* (आ.) अमंत्रक ४,५. ४,५३ 'पर्णोराजा.' प्रेतकर्म–अस्थी ठेवलेल्या खळग्यावर दगड ठेवून झांकणें. * † (आ.) 'उत्तेस्तभ्नामि०' ४,५. ४,५४ 'ऊर्जोभागः' प्रेताचा अस्थीचा खळगा बुजविणें.* (आ.) 'उपसर्प' 'उच्छ्वंचस्व.' ४,५. ४,५६ 'इदं हिरण्यं.' प्रेताच्या हातांतील सोन्यावर तूप घालणें. ४,५७ 'ये च जीवाः' प्रेतकर्म–अस्थींच्या जवळ तूप व मधुमिश्र चरु ठेवणें. ४,५७ 'ये च जीवाः' पिंडपि. य.–पिंडावर तूप घालणें. ४,६१ 'अक्षन्नमी.' पिंडपि. य.–पिंडांचें उपस्थान. ४,६२ 'आयात.' पिंडपि. य.–पिंडदानासाठीं पसरलेल्या दर्भांवर तिल टाकणें. ४,६३ 'परायात०' पिंडपि. य.-पिंडांचें विसर्जन. *(आ.) श्रौतकर्म २,६. ४,६५ 'अभूद्दूतः' पिंडपि. य.–समिदाधान. ४,६६–६७ 'असौहा इह.' प्रेतकर्म–स्मशानांतील दहनाची जागा इष्टकांनीं झांकणें. ४,६८ 'येस्माकं.' पिंडपि.–पिंडदानार्थ दर्भ पसरणें. (आ.) श्रौतकर्म २,६,४,६९ 'उदुत्तमं.' प्रेतकर्म–प्रेतदहनानंतर स्नान. ४,७० 'प्रास्मात्पाशं.' प्रेतकर्म प्रेतदहनानंतर दहा दिवस स्वस्त्ययन. ४,७१–७३ 'अग्नये कव्य.' पिंडपि.–स्थालीपाक होम. ४,७५–७७ †'एतत्तेप्रततामह.' पिंडपि.–पिंडदानाचे मंत्र. (आ.) श्रौतकर्म २,६. ४,८१–८८ 'नमोवः पितरः.' पिंडपि. पिंडोपस्थान. (आ.) श्रौतकर्म २,६.

### कांड १९ वें.

३,१–४ 'दिवस्पृथिव्याः.' मेधाजनन–बालकमुखप्रक्षालन. ४,१–४ 'यामाहुतिं.' मेधाजनन–बालकमुखप्रक्षालन. २०,१–४ 'अपन्यधु.' संग्राम–युद्धास निघालेल्या राजाच्या अंगांत पुरोहितानें कवच घालणें.* (आ.) 'जीमूतस्येव०' ३,१२. ५६,१–६ †'यमस्यलोकात्.' दुःस्वप्ननाशार्थ. ६४,१–४ 'अग्नेसमिधं.' उपनयन–ब्रह्मचारी यानें अग्नींत समिध् देणें * (आ.) अमंत्रक १,२०.

## ( ऋ )

## यज्ञविधींचें रूपकत्व.

यज्ञाविषयीं विवेचन करितांना एक महत्त्वाची कल्पना विचारास घेतली पाहिजे ती ही कीं, यज्ञक्रिया जुळवितांना ज्या कल्पनांची जुळणी केली त्या कल्पना कोठून उद्भवल्या. कांहीं विधींमध्यें भोंवतालच्या सृष्टीची नक्कल केलेली असते. उदाहरणार्थ गुलामास सोडवितांना त्याचें वजन करण्याचा विधि रोमन धर्मशास्त्रांत आहे. पुष्कळ लोकांच्या विवाहविधीमध्यें मारापिटीची नक्कल आहे. आपल्या यज्ञसंस्थेंत तसा कांहीं प्रकार आहे काय ?

या विषयावर महादेव मोरेश्वर कुंटे यांनीं आपल्या Vicissititudes of Aryan Civilization या पुस्तकांत जें सोमयागाचें स्पष्टीकरण केलें आहे तें येथें देतों. सोमयागाचें संपूर्ण वर्णन पूर्वीं दिलेंच आहे त्याच्या साहाय्यानें स्पष्टीकरणावर विचार करतां येईल.

**अग्निष्टोम.**—अग्निष्टोम हा यज्ञ आर्य लोक जेव्हां आपला मूळ देश सोडून भरतखंडाकडे यावयास निघत त्या वेळीं घडून येणाऱ्या प्रसंगांचा ऐतिहासिक अवशेष आहे असें वाटतें. त्यामध्यें जे निरनिराळे विधी करावयाचे असतात त्यांचा अनुक्रम येणेंप्रमाणें: प्रथम देवयजनदेश म्हणून एक स्वतंत्र जागा तयार करीत. अग्निष्टोम यज्ञाकरितां जी वेदी करीत तिला उत्तरवेदी म्हणत. नंतर मंडप उभारीत आणि निरनिराळे ऋत्विज आपआपल्या स्थानावर बसत. यज्ञमंडपाच्या एका भागांत एक औदुंबराचा खुंट पुरीत. मंडपाच्या बाहेर दोन गाडे असत. त्यांच्यावर सोम-

वल्ली प्राचीनवंशावरून आणून ठेवावयाची असे. प्राचीनवंश ही पहिली वेदी असून ती मूलगृहांतील वेदीची द्योतक असावी. उत्तरवेदी ही नवीन अथवा भावी गृहांतील वेदीची द्योतक असावी. या गाड्यांच्या उत्तरेच्या बाजूला सोम ठेवण्याची जागा असे. अध्वर्यु बसावयाची जागा ही मंडपाच्या आग्नेयभागांत असे. आग्नीध्र या ऋत्विजाची जागा व अग्नि उत्तरेस असे व उत्तरवेदीची जागा ही सोमाच्या जागेपासून व गाड्यांपासून पलीकडे असे. या गाड्यांवर असलेलीं हविर्द्रव्यें हीं बहिर्गमन करणाऱ्या मनुष्यांच्या शिधासामुग्रीचीं द्योतक असावीं. मंडपाच्या पश्चिमभागांत प्राचीनवंश अथवा मूलगृहांतील अग्नीची द्योतक अशी वेदी असे. ही वेदी दर्शपौर्णमास इष्टीस लागणाऱ्या सामान्य वेदीप्रमाणें असे. उत्तरवेदीच्या पलीकडे यूप असे, त्याच्या अग्रावरील चषाल फार दुरूनहि दृष्टीस पडत असे. हा यूप पुरोगामी निशाणाचा द्योतक असावा.

आर्यलोक जेव्हां स्थलांतर करीत तेव्हां ते आपला अग्नि बरोबर नेत असत आणि जेव्हां एखाद्या ठिकाणीं वास्तव्य करीत तेव्हां ते आपल्या अग्नीकरितां पूर्व, पश्चिम व दक्षिण दिशांना वेदी तयार करून त्यांमध्यें अनुक्रमें आहवनीय, गार्हपत्य आणि दक्षिणाग्नि यांची स्थापना करीत असत. आहवनीयामध्यें हविर्भाग द्यावयाचे असत. गार्हपत्य हा गृहकृत्यांस लागणारा अग्नि असे आणि दक्षिणाग्नीमध्यें राक्षसांनां व पितरांनां द्यावयाचीं द्रव्यें टाकीत.

जो मनुष्य नवीन प्रदेशांत स्थायिक होऊन रहात असे त्याला दीक्षित असें म्हणत. अग्निष्टोमयज्ञ करण्यापूर्वी दीक्षितानें बरेचसे ऋत्विज बोलवावयाचे असत, त्यांचीं नांवें ब्रह्मा, होता, मैत्रावरुण, अध्वर्यु, प्रस्तोता, उपगातारः, प्रतिहर्ता, प्रतिप्रस्थाता, नेष्टा, पोता, अच्छावाक, आग्नीध्र, आत्रेय, सदस्य, ग्रावस्तुत, उन्नेता, शमिता, सुब्रह्मण्य. हे सर्व ऋत्विज, यजमान व यजमानपत्नी या सर्वांनीं मिळून अग्निष्टोम करावयाचा असतो.

ज्योतिष्टोम यज्ञ केला असतां स्वर्गप्राप्ति होते असें वचन आहे (ज्योतिष्टोमेन स्वर्गकामो यजेत). ज्योतिष्टोम यज्ञांतील क्रिया पाहिल्या असतां त्यांवरून त्या स्थलांतरप्रसंगीं घडून येणाऱ्या गोष्टींच्या द्योतक असाव्या असें वाटतें. प्रथम ऋत्विजांचें वरण होऊन यज्ञामध्यें कोणी काय कामें करावयाचीं हें निश्चित झालें म्हणजे व यज्ञीयभूमि तयार झाली म्हणजे यजमानानें अप्सुदीक्षा हा विधि करावयाचा असतो. अप्सुदीक्षा विधीमध्यें यजमान व यजमानपत्नी यांनीं प्रथम स्नान करावयाचें व नंतर यजमानाची स्मश्रू करावयाची, व यजमानपत्नीचीं नखें काढावयाचीं, इतकीं कार्यें करावयाचीं असतात. ह्या सर्व विधींनां मिळून अप्सुदीक्षा म्हणतात. या विधीवरून यजमानानें आपल्या मातृभूमीचा संबंध तोडल्याचें स्पष्ट होतें.

यानंतर दीक्षणीयेष्टि करावयाची असते. या विधींत पुरोडाश तयार करून तो अग्नि आणि विष्णु यांस अर्पण करावयाचा असतो. दीक्षणीयेष्टीचा हेतु असा दिसतो कीं, जेव्हां एखादा मनुष्य आपलें मूलगृह सोडून दुसऱ्या प्रदेशांत जातो तेव्हां जणू काय त्याचा पुनर्जन्मच होतो. अशा प्रकारच्या पुनर्जन्माचें वर्णन ऐतरेय ब्राह्मणांत दिलें आहे. दीक्षणीयेष्टीमध्यें जननाच्या वेळचे सर्व प्रकार करावयाचे असतात. उदाहरणार्थ यजमानाला एखाद्या वस्त्रांत गुडाळावयाचें असतें व त्या वेळीं तो गर्भांत आहे अशी समजूत असते.

दीक्षित किंवा स्थलांतर करणारा आर्य यानें कृष्णाजिन अंगावर घ्यावयाचें असतें. हातांत एक हरणाचें शिंग धरावयाचें असतें. शरीरावर नवीन वस्त्र धारण करावयाचें असतें, आणि त्याच्या स्त्रीनें आपले कमरेभोंवतीं एक मोळाची दोरी बांधावयाची असते.

त्याला असत्य न बोलण्यास, मित भाषण करण्यास व व्रतपालन करण्यास सांगत असत. यानंतर हविर्द्रव्यें व इतर सामुग्री जमवावयाची असे. यांत सुवर्ण, रौप्य, वस्त्र, गाई, अज व मेष हीं असत.

यानंतर प्रायणीयेष्टि करावयाची असे. या इष्टीची देवता पथ्यास्वस्ति ही असे. यावरून प्रवासाचा व प्रवासामध्यें त्रास होऊं नये म्हणून देवांची स्तुति करण्याच्या प्रचाराचा बोध होतो. या वेळीं म्हणावयाचे मंत्रहि त्याच प्रकारचे आहेत. या वेळीं फक्त भात आणि तूप यांचेंच हवन करावयाचें असतें.

यानंतर पदचर्यानामक विधि असतो. यांत प्रथम एक गाय चालत असते व तिच्या मागून यजमान चालूं लागतो. गाईनें सात पाऊलें टाकल्यावर त्या ठिकाणीं एका लांकडाच्या तरवारीनें एक रेघ ओढतात व त्या रेघेवर थोडें तूप टाकतात. या वेळीं जो मंत्र म्हणावयाचा असतो, त्याचा अर्थ असा आहे कीं, राक्षसाला एका रेघेच्या आंत कोंडून ठेविलें आहे. आमच्या शत्रूंच्या भोंवतीं खंदक खणला आहे. त्या राक्षसाचा मीं असा गळा कापतों. जो आमचा शत्रू आहे त्याचे आह्मी शत्रू आहों. त्याचा मीं असा गळा कापतों. हा मंत्र पदचर्याविधीच्या शेवटीं म्हणावयाचा असतो. यानंतर सोमवल्लीची खरेदी करावयाची असते. ज्या ठिकाणीं आर्यांनां जावयाचें असे, त्या ठिकाणीं सोम मिळत नसे. तो गंधारीलोक मोठ्या प्रयासानें आणीत. मूजवत पर्वतावरचा सोम फार प्रिय असे, आणि तो जसा दुर्लभ होत चालला तसें त्याचें महत्त्व वाढत गेलें, त्यामुळें ते गृहत्याग करते वेळीं पुष्कळ सोम जमा करीत, व त्याची इष्टमित्रांनां मेजवानी देत. सोम विकत घेतल्यानंतर त्याचें आतिथ्य करावयाचें असे. यजमानाकडे एका गाड्यावर घालून सोम आणीत. यजमान सोमास मांडीवर घेऊन त्याला मधुपर्क देत असे. या आतिथ्येष्टीमध्यें सोमाची स्तुति करून त्याला "आमच्याबरोबर आमच्या नव्या घरीं ये', अशी प्रार्थना करीत असत. या मंत्रामध्यें

धाम व दुर्य हे शब्द गृहवाचक आहेत. त्यांपैकीं धाम हा जन्मभूमिवाचक असून दुर्य हा नवीन पुढें होणाऱ्या गृहाचा वाचक असावा.

या विधीनंतर करावयाचा विधि म्हटला म्हणजे 'तनूनप्त्र-प्रचार' हा होय. तनूनप्त्रप्रचार म्हणजे सर्व नातेवाईकांचा एक करार दाखविणारा विधि असावा. या विधींत सर्व ऋत्विज ज्योतिष्टोम यज्ञामध्यें एकमेकांस साहाय्य करण्याची शपथ घेत असत. सर्व ऋत्विज एका ठिकाणीं जमून आपण एकमेकांस सोडणार नाहीं असें तुपाची शपथ घेऊन म्हणत. हे सर्व ऋत्विज बहुतकरून पूर्वी एकाच कुटुंबांतील असावेत.

यानंतर 'राजाप्यायन' नांवाचा विधि करून त्यामध्यें सोमवल्लीवर पाणी शिंपडावयाचें असे. याचा उद्देश सोमवल्ली ओली व ताजी राहावी हा असावा. यानंतर 'निह्नव' करावयाचा असे. या विधींत सर्व ऋत्विज हात जोडून द्यावा-पृथ्वींनां नमस्कार करीत असत. तानूनप्त्र हा शपथविधि, आप्यायन आणि निह्नव हे एकामागून एक करावयाचे विधी देशान्तर करावयाच्या वेळीं होणाऱ्या मानसिक स्थितीचे द्योतक आहेत.

यानंतर 'प्रवर्ग्य' विधि करावयाचा असे. हा सकाळीं, व संध्याकाळीं दोन्ही वेळीं करावयाचा असे. दोन प्रवर्ग्य-विधींच्या मध्यंतरीं व नंतर 'उपसद' विधि असे. या विधी-मध्यें जमिनींत दोन खुंट्या मारून एकीला एक गाय व दुसरीला एक मेंढी तिच्या पोरांसह बांधलेली असे. त्याप्रमाणेंच वेदीजवळ खरनामक जागेवर अग्नि पेटवून एक तीन भांड्यांची उतरण त्यावर ठेवलेली असे. हिला 'महावीर' असें म्हणत. या भांड्यांत प्रथम तूप तापवून त्यांत गाईचें आणि मेंढीचें दूध ओतीत व उतू गेल्यानंतर जें शिल्लक राहील त्या दुधाचे हवि देत असत. प्रवर्ग्य हा शब्द वृत् सोडणें या धातूपासून निघाला असून त्यावरून प्रवर्ग्य विधि हा गृहत्यागाच्या वेळीं करावयाचा असावा असें दिसतें.

'उपसद' विधि हा तात्पुरत्या वस्तीचा द्योतक असावा. या विधीच्या वेळीं म्हणावयाच्या मंत्रांत देवांची आपलें रक्षण व्हावें म्हणून प्रार्थना केलेली असे. येथपर्यंतचे सर्व विधी प्राचीनवंश अथवा आद्य किंवा मूलगृहांतील वेदीवरच करावयाचे असत.

यानंतरचा विधि 'वेदीकरण' हा होय. ही उत्तरवेदी प्राचीनवंशाच्या पूर्वदिशेस बांधावयाची असे. ज्या अर्थी उत्तरवेदी ही प्राचीनवंशाच्या पूर्वेस असे त्या अर्थी या ठिकाणीं प्राचीन शब्दाचा अर्थ पूर्वेकडील असा नसून जुना कि मूळचा असाच होतो हें उघड आहे. उत्तरवेदीच्या पूर्वे कांहीं अन्तरावर एक खांब पुरलेला असे, व येथें यज्ञ बांधावयाचा असे. या यूपाशीं पशूवर कांहीं संस्कार करून त्यास मारावयाचा असे. नंतर त्याचें मांस काढून तें शिज त्याच्या अग्नीमध्यें हवन करावयाच्या भागावर कांहीं संस् करून त्याचें हवन करीत, व बाकीचा भाग ऋत्विजांस खा करतां ठेवीत. याखेरीज अशाच प्रकारें आणखी दोन मारीत. त्यापैकीं एकाचा संबंध सोमरस काढण्याच्या क्रिये असून त्याला 'सवनीय' पशु असें म्हणत, आणि दु या दोहांच्या नंतर मारावयाचा असून त्यास 'अनुबंध म्हणत. हे तीन्ही पशु निरनिराळ्या वेळीं मारावय असून त्यांच्या मांसांतील कांहीं भाग अग्नींत अर्पण क बाकीचा खावयाकरतां ठेवीत.

सोमरस काढण्याकरितां 'उपरव' नांवाची एक ख जागा तयार केलेली असे कांहीं पात्रांतून सोमरस काढीत प्रत्येक पात्रांतील सोमाचें हवन करीत. नंतर सोमवल्ली पाणी शिंपडून पुष्कळसा सोमरस काढीत, आणि वरींच प भरून त्यांचें अग्नींत हवन करीत. या वेळीं अश्विनौ देवां स्तुति करून त्यांनां सोमरस अर्पण करीत. या सर्व क्रिय 'ग्रहप्रचार' अशी संज्ञा असे. या क्रिया चालू अस सामवेदाचें गायन चालत असे व होता मंत्र म्हणत अ सोमाचें हवन चालत असे व मध्यंतरीं हुतशेष सोम ऋत्विज लोक सोमपान करीत असत. सर्व ऋत्विजां एकाच पात्रांतून केव्हां केव्हां व कसा कसा सोम प्यावया हें ठरलेलें असे, व त्यास 'समाख्या' असें म्हणत. या ए पात्रांतूनच सोमपान करण्याच्या क्रियेवरूनच त्या वेळेच आर्यांमधील दृढ बंधन दिसून येतें. हे सर्व विधी झाल्यानं यजमानाच्या पितरांचें स्मरण करून त्यांनां पुरोडाशाचे पि अर्पण करीत. यानंतर जो विधि करावयाचा असतो त्या 'यज्ञपुच्छ असें म्हणतात. या ठिकाणीं 'उदयनीयेष्टि' कर वयाची असते. या इष्टीमध्यें 'पथ्यास्वस्ति' या देवते स्तुति करावयाची असे. ही इष्टि वर सांगीतलेल्या 'प्रायणी इष्टीप्रमाणेंच आहे. प्रायणीय इष्टीच्या वेळीं देशान्तर करण लोक मूळ घरांतून बाहेर पडलेले असत. परंतु यज्ञीय पशू सोम यांची मेजवानी होईपर्यंत त्यांचे इष्टमित्र त्यांनां सोडू गेलेले नसत. उदयनी इष्टीच्या प्रसंगीं त्यांचा अखेर वियोग होत असे.

(एकंदर पृष्ठें ५६८)

